## रचना परिचय

ज्ञानकोशाच्या रचनेविषयीं कांहीं गोष्टींचा पुनरुच्चार केला पाहिजे. कारण, ज्ञानकोशाचा उपयोग करितांना त्या गोष्टी सतत लक्षात पाहिजेत.

**अनुक्रमविषयक पद्धति**—ही आम्ही अलीकडील संस्कृतशब्दकोशकारापेक्षा निराळी ठेवली आहे. प्राचीन शब्दकोशकार हे अक्षरानुक्रमानें ग्रंथरचना करीत नसत. अक्षरक्रम कसा असावा याविषयीं शास्त्रसिद्ध नियम कोणतेच नाहींत त्यामुळें वाचकास संवय कशी आहे आणि त्यास सोयीचें काय जाईल हेंच मुख्य रचनातत्व होय. या दृष्टीनें आम्हीं उपयोगात आणलेलीं रचनातत्वें येणेंप्रमाणें आहेतः—

अ क्ष रा नु क्र म—अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः, क, ख, ग, घ, ङ, च, छ, ज, झ, ञ, ट, ठ, ड, ढ, ण, त, थ, द, ध, न, प, फ, ब, भ, म, य, र, ल, व, श, ष, स, ह, ळ, क्ष, ज्ञ असा ठेविला आहे. म्हणजे अं, क्ष, ज्ञ, यास मराठी वाचकास सोईस्कर जाईल असेंच स्थान ठेविलें आहे.

अनुस्वारापुढें कोणतेंहि व्यंजन आलें व अगोदर व्यंजनविरहित अ नसला तर ते शब्द अनुस्वाराच्या पुढील अक्षराप्रमाणें लावणें. म्हणजे अनुस्वार नाहीं अशी कल्पना करून त्या शब्दास स्थान दिलें आहे. निरनुनासिक व सानुनासिक हे दोन शब्द जवळजवळ येतील तेव्हां निरनुनासिक प्रथम घेतला आहे. व्यंजनविरहित अं आला म्हणजे मात्र तो औच्या पुढें घातला आहे. 'क्ष' आणि 'ज्ञ' हीं अक्षरें स्वतंत्र धरलीं आहेत व तीं ह आणि ळ यानंतर घेतलीं आहेत. अर्धानुस्वार पूर्णानुनासिकाच्या अगोदर घेतला आहे. विसर्गाविषयीं नियम हाच कीं तो नाहीं असें धरून रचना केली आहे व विसर्गयुक्त शब्दांचें स्थान तशाच विसर्गविरहित शब्दानंतर ठरविलें आहे अनुस्वार आणि विसर्ग यांत अनुस्वारास अग्रगामित्व दिलें आहे "ॲ" "ऑ" हीं "अ" "आ" सारखीं धरलीं आहेत मात्र त्यांचें स्थान अनुस्वार व विसर्ग यान्यानंतर ठरविलें आहे

यूरोपीय देशांचीं आणि माणसांचीं नावें मराठींत लिहितांना उच्चार नेहमीं इंग्रजी उच्चाराच्या जवळ जवळ ठेवला आहे. याशिवाय आणखीहि कांहीं गोष्टी लक्षात ठेवल्या पाहिजेत "ए" प्रारंभीं असलेल्या इंग्रजी शब्दाचा उच्चार मराठींत लिहितांना तो कांहीं प्रसंगीं "अ," "आ," किंवा 'ए" केला आहे त्यामुळें मनात असलेला शब्द निरनिराळ्या ठिकाणीं पहावा लागेल

ज्याप्रमाणें कांहीं शब्द वाचक 'अ' खालीं पहावयास लागतील पण ते 'आ" खालीं किंवा 'ए' खालीं असतील हें स्वरांच्या बाबतींत झालें, त्याप्रमाणें तें व्यंजनात सुद्धा सांपडणार. एखादें इंग्रजी स्पेलिंग ओळखलें जाणारें नाव मराठींत "क" "का" किंवा 'के" यांखालीं सांपडेल का कीं, लिंगावरून दोन तीन प्रकारचे उच्चार प्रचलित असतात. तसेंच इंग्रजींत 'यू' चा उच्चार 'अ' आणि 'उ' असा असल्यामुळें कधीं कधीं घोटाळा होण्याचा संभव आहे. व्यंजनात देखील उच्चारभेद आहेतच आज आपलें माहितीचें मुख्य साधन इंग्रजी भाषा असल्यामुळें व इंग्रजीची स्पेलिंगपद्धति उच्चारदर्शनाच्या दृष्टीनें फार सदोष असल्यामुळें वाचकाच्या उच्चारात व ज्ञानकोशामध्यें वापरलेल्या उच्चारांत फरक होणें शक्य आहे ही गोष्ट लक्षात ठेवून विशिष्ट लेख दोन चार ठिकाणीं धुंडाळावा लागेल. पण त्यास इलाज नाहीं शास्त्रीय विषयावरील लेखांमध्यें कांहीं लेख देशी नावाखालीं आले आहेत व कांहीं परकीय नावाखालीं आले आहेत.

विभागान्तर्गत ग्रंथनामसंक्षेपांचें स्पष्टीकरण—

| | |
|---|---|
| अ. ओ. सो. नि. का. पु. | अमेरिकन ओरिएंटल सोसायटीचें नियत कालिक पुस्तक. |
| अ. को. | अर्वाचीन कोश. |
| आर्कि. सर्व्हे. | आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया रिपोर्ट. |
| आफ्रेष्ट | आफ्रेष्टचे कॅटलॉगस कॅटलॉगोरम. |
| इं. अँ. | इंडियन अँटिक्वरी. |
| इं. गॅ. किंवा ग्या. | इंपीरियल गॅझेटियर. |
| इं. गाइड | इंडियन गाइड. |
| इति. संग्र. | इतिहाससंग्रह मासिक. |
| ए. इं. | एपिग्राफिका इंडिका. |
| एन्थोवेन | एन्थोवेनचे ट्राइब्स अँड कास्ट्स ऑफ बाँबे. |
| एन. जी. जी. डब्ल्यु. | नाखूरिख्टन फॉन डेर कोनिग्ल लिखेन गेझेलशाफ्ट डेर विसनशाफ्टेन त्सु गटिंगेन. |
| एपि. कर्ना. | एपिग्राफिका कर्नाटका. |
| ए ब्रि किंवा ब्रिटानिका | एनसायक्लोपीडिया ब्रिटानिका. |
| ए. रि. ए. | एनसायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स. |
| एस्. डब्ल्यू. ए. | सित्सुंगबेरिख्टे डेर बर्लीना अकाडेमी डेर विसनशाफ्टेन. |
| ऐ. ब्रा (ऐतरेय ब्रा.) | ऐतरेय ब्राह्मण. |
| ऐ. ले. सं. | ऐतिहासिक लेखसंग्रह. |
| कॅट कॅट | कॅटलोगस कॅटलोगोरम. |
| कविच. | कविचरित्र. |
| का. इ. सं. | काव्येतिहाससंग्रह. |
| कात्या. | कात्यायन श्रौतसूत्र. |
| कौशि. किंवा कौ. सू. | कौशिकसूत्र. |
| क्रूक. | दि ट्राइब्स् अँड कास्ट्स् ऑफ दि नॉर्थ वेस्टर्न प्राव्हिन्सेस अँड औंध. |
| गो. ब्रा. | गोपथ ब्राह्मण. |
| गॅ. किंवा ग्या. | गॅझेटियर. |
| ज. अ. ओ. सो. ग्रं. | जर्नल ऑफ दि अमेरिकन ओरिएंटल सोसायटी ग्रंथ |
| ज. रा. ए. सो. | जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी. |
| जी. जी. ए. | गटिंग गेलेर्ट अन्सायगन. |
| जे. आर. एम. | जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ ग्रेटब्रिटन अँड आयर्लंड. |
| जे. ए. एस. बी. | जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसा. आफ बंगाल. |
| जेधे. | जेधे शकावली. |
| जे. पी टी. एस. | जर्नल ऑफ दि पाली टेक्स्ट सोसायटी. |
| जै. अश्वमेध | जैमिनीय अश्वमेध. |
| झेड. डी. एम. जी. | त्साइटश्रिफ्ट डेर डॉएटशेन मॉर्गेनलॅन्डिशेन गेझेल शाफ्ट. |
| टॉ. टॉड. | अॅनल्स ऑफ राजस्थान. |
| डब्ल्यु झेड. के. एम. | वीना त्साइटश्रिफ्ट फ्यूर डी कुंड डेस मॉर्गेन लांडेस. |
| डि. गॅ. | डिस्ट्रिक्ट गॅझेटियर. |
| तै. सं | तैत्तिरीय संहिता. |
| थर्स्टन | कास्ट्स् अँड ट्राइब्स ऑफ इंडिया. |
| पदे. | पदेकृत वनौषधिगुणादर्श. |
| पीटर्सन. | पीटर्सनचे संस्कृत हस्तलिखित ग्रंथांसंबंधी रिपोर्ट. |
| प्रा. को. | प्राचीन कोश. |
| प्रा. हिंदु. | अय्यरकृत एन्शंट इंडिया. |
| बाँ. गॅ. किंवा ग्या. | बाँबे गॅझेटियर |
| बाँ. ब्रँ. रॉ. ए. सो. ज. | बाँबे ब्रँच रॉयल एशियाटिक सोसायटीज जर्नल. |
| बील | बीलची ओरिएंटल बायाग्राफिकल डिक्शनरी. |
| बृ. सं (हिता) | बृहत्संहिता. |
| बे. गॅ. | बेळगाव गॅझेटियर. |
| भ. | भरत नाट्यशास्त्र. |
| भा. | भावप्रकाश. |
| भा. भू. | दीक्षितकृत प्राचीन भारतीय भूवर्णन |
| भा. व. | भारतवर्ष मासिक. |
| भा. इ. सं. मं. | भारत इतिहास संशोधक मंडळ. |
| भाग. दश. | भागवत दशमस्कंध. |
| भार. | भारत = महाभारत. |
| म. क. च. | महाराष्ट्र कविचरित्र. |
| म. प्रां. ग्या. | मध्यप्रांत ग्याझेटियर. |

| | |
|---|---|
| म. भा. किंवा महा. | महाभारत. |
| म. रि. म. वि. | मराठी रियासत, मध्यविभाग. |
| मा. | माधवनिदान. |
| मुं. ग. | मुंबई ( बॉम्बे ) गॅझेटियर. |
| मु. रि. | मुसुलमानी रियासत. |
| रंगभूमि. | कुळकर्णीकृत मराठी रंगभूमि. |
| रसेल व हिरालाल. | कास्टस् अँड ट्राइब्स ऑफ दि सेंट्रल प्राव्हिन्सेस. |
| रा. खं. | राजवाडे खंड. |
| वनौ. ( गु. ) | वनौषधि गुणादर्श. |
| वा. | वाग्भट. |
| वाट ( वॅट ). | वॅटचें कमर्शिअल प्रॉडक्ट्स ऑफ इंडिया. |
| वाड. | वाडसंपादित पेशव्यांच्या रोजनिशा. |
| वा. रा. | वाल्मीकि रामायण. |
| वि. च. | विल्हणकृत विक्रमांकदेव चरित. |
| विंटरनिट्झ | विंटरनिट्झचें हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर. |
| विनय. | विनयपिटक. |
| वि. विस्तार | विविधज्ञानविस्तार. |
| वैद्य | वैद्यकृत मध्ययुगीन भारत. |
| वै. सू. | वैतान सूत्र. |
| श. ब्रा. | शतपथ ब्राह्मण. |
| श्रौ. सू. | श्रौतसूत्र. |
| सं. क. का. सू. | संत कवि काव्य सूचि. |
| समासद. | समासद कृत शिवाजीची बखर. |
| सा. द. | साहित्य दर्पण. |
| सु. | सुश्रुत. |
| सेंद्रि. र. पू. भा. | सेंद्रिय रसायनशास्त्र पूर्वविभाग. |
| से. रि. | सेन्सस रिपोर्टे. |
| स्मिथ | स्मिथचा हिंदुस्थानचा इतिहास. |
| हिं. वै. को. | हिंदी वैज्ञानिक कोश. |

कित्येक प्रसंगी संक्षेपांतील विरामचिन्हें गाळलीं आहेत.

या भागांत जेव्हां निदानिका किंवा एरिए (एनसायक्लोपिडिआ ऑफ रिलिजन अँड एथिक्स ) यासारख्या समुच्चय ग्रंथाचें नाव दिलें आहे तेव्हां त्या ग्रंथांत दिलेल्या बऱ्याच आधारांचा उल्लेख वगळण्यांत आला आहे.

जेव्हां आधारग्रंथाचें नांव दिलें असतें तेव्हां त्यातील सर्व माहिती किंवा मतें आम्हास मान्य आहेत असें समजूं नये. उदाहरणार्थ थर्स्टन सारख्याच्या जातिविषयक लेखाविषयीं अत्यंत साशंक बुद्धि बाळगीत आम्ही ते लेख वापरले आहेत.

जेव्हां जुन्या ग्याझेटिअरसारख्या ग्रंथातून माहिती घेतली असते व आतील आंकडे मात्र नवीन खानेसुमारीच्या साहाय्यानें बदललेले,असतात तेव्हां,नवीन खानेसुमारीचें नाव प्रत्येक ठिकाणीं घातलें नाहीं.

## शुद्धिपत्र.

पृ. ५३० ओळ ३४ ' शेणवी ' गाळावा.

पृ. ७३९ मधील ' कोण्णुर ' व पृ. ७४४ मधील 'कोंडूर' हीं नावें एकाच गांवाचीं आहेत.

पृ. ७८५ ' कोणार्क लोक ' या ऐवजीं ' कोन्याक लोक' वाचावें.






अंतरंगपरिचय

काव्य—केटा.

**हिंदुस्थान—**

**इतिहास**—वैदिक.—काश्यप, कीकट, कुंताप, कुंति, कुरस, कुरु, कूर्म, कौपीतकी ब्राह्मण.

पौराणिक.—काश्यप, किंकर, किन्नर, किरीटि, किर्मीर, कीचक, कुकुर, कुंति, कुंतिभोज, कुंती, कुबेर, कुब्जा, कुंभकर्ण, कुमार, कुरु, कुरुयुद्ध, कुवलयापीड, कुश, कुशध्वज, कुशनाभ, कुशान, कुशावर्त, कूर्म, कूर्मपुराण, कृतवर्मा, कृति, कृप, कृष्ण, कृष्णद्वैपायन, केशी, केसरी, केसीध्वज, कैकेयी, कैटभ, कौण्डिन्य, कौरव, कौसल्या, क्रतु.

बौद्ध—कीकट, कुशिनगर, कौशांबी, केक.

प्राचीन हिंदुस्थान.—किलकिल यवन, कुकुर, कुमारदेवी, कुमारराज, कुशान, कोसल.

उत्तर हिंदुस्थान व रजपूत इतिहास.—कुंभ, कुंभराणा, कुमारपाल, कृष्णाकुमारी.

दक्षिण हिंदुस्थान.—किमेदि जमीनदार, किरीटि, कुडाळसंगम, कुब्ज विष्णुवर्धन, कुलशेखर, कृष्णदेवराय, कृष्ण देव होयसळ, कृष्णनाईक वरंगळकर, कोंकण, कोंगाळव, कोंडवीडू गाणदेव, कोरकई.

मुसलमानी.—कुतबमिनार, कुतबशहा, कुतबशाही, कुत्बुद्दीन–ऐबक, कैकुबाद.

मराठे—काशीबाई पेशवे, काशीराज पंडित, कुरुंदवाड, कुसाजी भोसले, कुळकर्णी, कृपाराम, कृष्णराव खटावकर, कृष्णराव बल्लाळ काळे, कृष्णाजी कंक, कृष्णाजी त्रिमल, कृष्णाजी नाईक जोशी, कृष्णाजी भास्कर, केसो भिकाजी दातार, कोठी, कोतवाल, कोन्हेरराम कोल्हटकर, कोन्हेरराव फांकडे, कोप्पळ.

इंग्रजी अमदानी.—क्लाइव्ह.

इतिहास साहित्य.—कीर्तने, कृष्णाजी विनायक

**जातीतिहास**—काश्मीरी, काश्मीरी ब्राह्मण, कासार, काहूत, किरात, किरार, किसान, कीचक, कार, कुकी, कुंजा, कुडवक्कल, कुडाळदेशकर ब्राह्मण, कुडुमी, कुणबी, कुंभार, कुरमवार, कुरमी, कुरवा, कुसवन, कूटमाळी, कृष्णान्वक, केलसी, केवट, कैकाडी, कैकोलन, कैवर्त, कोइरी, कोकू, कोल, कोलघा, कोलन, कोलायन, कोल्हाटी, कोष्टी, कोइली, कोळी, क्युरेपी, क्रमवंत

वाङ्मय—

संस्कृत.—काशीनाथोपाध्याय, किलहॉर्न, कुमारिलभट्ट, कूर्मपुराण, कृष्णकवी, कृष्णदत्त, केदारभट्ट, कैय्यट, कोलब्रुक, कौटिल्य, कौषीतकी.

मराठी.—कूर्मदास, कृष्णदयार्णव, कृष्णदासमुद्गल, कृष्णयाज्ञवल्की, केसरीनाथ, क्यान्डी

बौद्ध.—कुमारजीव.

जैन.—कुंदकुंदाचार्य.

बंगाली.—कृत्तिवास.

फारशी.—किशनचंद, कृष्णदास.

मुसलमानी.—कुराण.

इंग्रजी.—कीट्स, कोलेरिज, कौपर.

रशियन.—क्रोपॉटकिन.

सामान्य.—काव्य, कोश.

**भाषा**—काश्मीरी भाषा, कोंकणी भाषा.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल—**

मुंबई इलाखा, महाराष्ट्र:—कासारबारी, कासेगाव, किक्ली, किन्हई, कुकरमुंडे, कुंडल, कुंड, कुंदगोळ, कुंभोज, कुरकुंब, कुरंगगड, कुरुंदवाड, कुर्ला, कुन्हाडखुर्द, कुलाबा, कुलाबा किल्ला, कृष्णानदी, केंजळगड, केंदूर, केळवे माहीम, कोंकण, कोटूर, कोंडाणे, कोंडाणे किल्ला, कोंदिवटी लेणीं, कोपरगांव, कोल्हापूर.

क र्ना ट क.—काळहोळ, कित्तुर, किरगेरी, किरवळे, कुडची, कुडला, कुणकुंबी, कुतनहसहळ्ळी, कुंभारडी डोंगर, कुमठा, कुर्तकोटी, कुसुगल, केरूर, केळवाडी, कोकटनुर, कोंगनोळी, कोटुमचगी, कोड, कोडमगी, कोण्णूर( कोनूर )

गु ज रा थ.—कासलपुरा, कुतियान, कूवा, केसरिया, कोटेश्वर, कोंट्रा.

ब डो दे सं स्था न.—कोडीनार.

सिं ध.—काश्मोर, केटी, कोत्री, कोहिस्तान.

म ध्य प्रा त —किवमरो, कुनु, कुरुणाल, कुलइन्सूर, केळोद, कोटगळ, केटा, केटापल्ली, कोंडका, कोंडगान, कोरिया-संस्थान.

व ऱ्हा ड.—किनवत कुटासा, कुऱ्हा, केळापुर, कौण्डिन्यपुर.

रा ज पु ता ना.—किशनगड, कुंचावन, कुंभळगड,कुंभेर, कुरावर, कुरीलगड, कूंदियन, केरुरी, केरवली, केराडी, केशोरइ–पाटण, केळवाडा, कोंकणपूर, कोटपुतळा, कोटा, कोठारिया, कोत्रा.

म ध्य हिं दु स्था न.—काळीसिंध, कुक्शी, कोठी, कोर्वइ.

सं यु क्त प्रा त —काशी, काशीपूर, कासगंज, कासिया, काळी नदी, किच्चौचा, किराकत, किरौली, कीरतपुर, कुंच, कुंदा, कुमाऊन, कुलपहार, केदारनाथ, केन, कैमगज, कैमूर, कैराण, कैसरगंज, कोटद्वार, कोपागंज, कोरा, कोऱ्हा, कोशी, कोसम.

पं जा ब.—कासूर, काळाबाग, किउंथल, किलसोभसिंघ कुंचपुर, कुंजा, कुठार, कुनिहार, कुलु, कुंहरसेन, कैथल, कोट, कोटकपुरा, कोटगड, कोटी.

का श्मी र सं स्था न.—काश्मीर

ति बे ट.—कैलास

बं गा ल —कासीमबझार, किशोरगंज, कुचबिहार, कुतुबदिया, कुमारखली, कुरसँग, कुरिग्राम, कुलुहा, कुष्टिया, कृष्णगर, केंदूली, केशवपूर, कोकोचेटें, कोटचादपुर, कोत्रंग, कोमिल, कोलगाग, कोशी.

बि हा र-ओ रि सा.—किशनगंज, केओंझर, केंद्रापारा, केसरीय, कोनारक, कोल्हाण.

वा य व्य स र ह द्द.—काळा पहाड, काळाबाग छावणी, कुरम एजन्सी, कुरम नदी, कुलाची, कोहाट

ब्र ह्म दे श.—किडन, किनगिन, किनु, कुंग्मयोन, कुन्हळ, कोडौंग, क्यबिन, क्यवक्कू, क्यैकटो, क्यैकमराव, क्योनपिआव, क्यौकपदौंग, क्यौक्प्यू, क्यौकसी, क्यौक्तन, क्यौक्ता, क्यौक्से, क्यौगोन.

आ सा म —कोहीम.

है द रा बा द सं स्था न.—काळाचौतरा, किनवत, कुष्तगी, कोंडगल, कोप्पल, कोसगी, कोहीर.

म्है सू र स स्था न व कू र्ग—किग्गतनाड, कुदलगी, कुनिगल, कुमारधारी, कूर्ग, कृष्णराजपेठ, केलडी, कोडचाद्री, कोप्प, कोलार, कोळ्ळीप्पाकई, कृाजपेट

त्रा व ण को र सं स्था न —किलिमनूर, कोटार, कोलाचल

म द्रा स.—कासरगोड, कीलकरै, कुडवाखल, कुंदापूर, कुडालोर, कुत्तालम, कुदरेमुख, कुंदा टेकडी, कुम्नकुलम्, कुमूर, कंबुम्, कुंभकोणम्, कुरंग्रनाड, कुलशेखरपट्टणम्, कुलित्तलइ, कुलम, कूडलगी, कृष्णागिरी, कृष्णा जिल्हा, कोइंबतूर, कोइलकुंतल, कोकनाडा, कोचीन, कोटगिरी, कोट्टायम्,कोट्टयम्, कोट्टूर, कोंडपल्ली, कोंडविडु, कोडैकानल, कोनोल्ली, कोरपूट, कोरिंग, कोलकइ, कोलार सरोवर, कोलेगल, कोलेरून, कोलंगड, कोल्लैमलई, कोवेलंग, कोसीगी, क्विलान, क्वील्हानी

पो र्तु गी ज व सा ह त —कुडाळ

प्रा ची न.—किंपुरुषवर्ष, किष्किंधा, कुट्टापरातक, कुंतल, कुरुजागल, कुरुपांचाल, कुरुवर्ष, कुरुक्षेत्र, कुशद्वीप, कुशस्थली, केकय, केरल, कोंगू देश, कोसल, कौशांबी, क्रौंचद्वीप

आशिया ( हिंदुस्थानेतर )—

जा त —कार्योक लोक.

प्रा दे शि क —काश्गर, किओटो, किलसैफुल, कीरधर, कीलिंग बेटें, कुत उल आमारा, कुम, कुर्दस्तान, केईद्वीपसमूह, केला, कैफेंगफु, कोकोनॉर, कोरिया, कोउंबो कोहइबाब, कोहलू, क्रेटा, क्रेटापिशीन

आफ्रिका—

ऐ ति हा सि क—कूगर.

प्रा दे शि क—कासाला, किंबर्ले, किलिमांजारो, केनिया, केनिया पर्वत, केपकोस्ट, केपटाउन, केपप्रॉव्हिन्स, केरो, कोर्डोफान, क्रून्स्टाड.

यूरोप—

ऐ ति हा सि क–काब्दूर, किचनेर, किर्घा, केटो, कोलंबस, कोलबेर, क्रोपॅटकिन.

प्रा दे शि क.—काब्दूर, कॉव्हेंट्री, कॅस्टेलो ब्रँको, कास्पियन समुद्र, काळा समुद्र, किंग्जटाउन, किंग्जलिन, किलार्नि, कीफ, कील, कुक्सहॅवन, केडीझ, केनिलवर्थ, केन्सिंग्टन, केंब्रिज, कोईंब्रा, कोनिग्जबर्ग, कोपनहेगन, कोबर्ग, कोरुना, कोर्टरॉय, कोलचिस, कोलचेस्टर, कोलोन, कोलोफोन, कोवनो क्यूमी, क्रॅकौ, क्रॉन्स्टाट, किसा, क्रीट, क्रेसी, क्रोन्स्टॅन.

अमेरिका—

प्रा दे शि क —किंग्स्टन, किट्सुसेंट, कौचाबंबा, कोलंबस, कोलंबिया, कोलोरॅडो, कोस्टारिका, क्यूबा, क्रॉयसेंट, किटो, क्विबेक.

आस्ट्रेलिया—क्वीन्सलंड.

वैद्यक शास्त्र—कास, काळपुळी, काळा आजार, कुष्ठ, कृष्णमूत्र ज्वर, क्लोरोफार्म,

च रि त्र.—कोलिकेर.

वनस्पतिशास्त्र—काश, काशीफळ, किंकरी, किराईत, कुंकुमवृक्ष, कुचला, कुंजर, कुंशुरी, कुटकी, कुडा, कुंभा, कुयली, कुरडु, कुसुंबा, कुलिथ, केकती, केणी, केवडा, केशर केळ, कोकंब, कोका, कोको, कोंचिबीर, कोद्रु, कोळी, कोरफड, कोरिंच, कोष्ठ, कोहळा, कोलिझन.

कृषिशास्त्र—कृषिकर्म.

रसायनशास्त्र —काटिन, कायसीन, क्रोमाइट, क्लोरोफार्म

च रि त्र.— केकुल,

पदार्थविज्ञान—केशाकर्षण.

च रि त्रें–किर्चाफ, कुन्डट, केटर, केल्व्हिन, कोहनिग, कोलंब, क्युरी, क्लासिअस,

तत्त्वज्ञान—क्रियावाद.

च रि त्रें—कुमारिलभट, कांट,

ज्योतिषशास्त्र—कृत्तिका, कोल्लम शक.

च रि त्रें—कृष्ण, केप्लर, केशव, कोपर्निकस.

गणितशास्त्र—कोस.

च रि त्रें–कृपाराम, कृष्ण.

धार्मिक व सांप्रदायिक--कीर्तन, कुराण, कूका, कोकिलाव्रत

च रि त्रें--कृष्णदास, केशव चंद्रसेन, केशवस्वामी, केकयंप.

सांस्कृतिक व सामाजिक—कुटुंब, कुल, कौल.

च रि त्रें—किड बेंजामिन.

औद्योगिक व कलाविषयक—कुकू, कुंभारकाम, कुरुंद, केशर, कोको, कोचिनील, कोंबड्या, कोळंबा, क्रोमाइट.

च रि त्रें—कोन, क्रप.

शासन व अर्थशास्त्र---कुळकर्णी, कोठी, कोतवाल

च रि त्रें—केअर्नस, कौटिल्य.

कायदेशास्त्र—कोर्ट.

खनिजशास्त्र—कोळसा.

प्राणिशास्त्र—कासव, कीटक, कृमि, कृमिसमूह, कोकिल, कोचिनील किडे, कोंबड्या, कोल्हा, कोळी.

अध्यापनशास्त्र—किंडरगार्डन.

नाट्यशास्त्र, च रि त्रें—किर्लोस्कर, कीर्तने, कोल्हटकर

युद्धशास्त्र—किल्लेकोट व तटबंदी, क्रप.

अर्थनिश्चय—काम.

ख—खर्ते

हिंदुस्थान—

इ ति हा स पौराणिक —खट्वांग

म रा ठे—खंडेराव गायकवाड, खंडेराव गुजर, खंडेराव दाभाडे, खंडेराव हरि, खंडेराव होळकर, खंडोजी माणकर, खंडो बल्लाळ.

जातोतिहास—खंगार, खंडायत, खंडेवाल.

प्रादेशिक इतिहास व भूगोल—

मुं ब ई इ ला खा, महाराष्ट्र—खटाव, खडकवासले, खडकी, खंडाळा.

गु ज रा थ—खंडाल.

रा ज पु ता ना.—खंडेला.

म ध्य हिं दु स्था न—खजुराहो.

बि हा र ओ रि सा.—खगरिया, खगौल, खंडगिरी, खंडपरा.

सं यु क्त प्रा त.—खजुहा, खटौली.

प्राचीन—खझर, खंड.

वनस्पतिशास्त्र—खजुवा, खजूर.

कृषिशास्त्र—खतें.

खनिजशास्त्र—खडक, खडीचा दगड.

औद्योगिक व कलाविषयक—खडीचा दगड, खडीचें काम.

धार्मिक व सांप्रदायिक—खंडोबा.

अक्षरविकास—ख.

पाढ होण्यास बराच तयारीचा काल गेला असावा. इ. स. च्या दुसऱ्या शतकांतील बुद्ध कवि अश्वघोष याच्या काव्यावरून व नाटकावरूनहि असें अनुमानता येतें कीं, या कवीनें पूर्वापर नमुन्यावरहुकूम आपल्या कृतास मूर्तस्वरूप दिलें असावें

अलंकारशास्त्र व काव्य याच्या अन्योन्य संबंधाकडे पाहिलें तर प्रथम एवढें म्हणता येईल कीं, भारतीय नाट्यशास्त्र किंवा भामहकृत काव्यग्रंथ या दोहोंचा काल ठरविणें अशक्य आहे. भामहाचा ग्रंथहि अत्यंत जुना असला पाहिजे असें दिसतें.

का व्या चें अ भि जा त यु ग—पूर्वअभिजातयुग म्हणजे इ. स. तिसरें व चवथें शतक होय. तंत्राख्यायिका हेंच पंचतंत्राचें अत्यंत जुनें स्वरूप असावें. चवथ्या शतकात भासाचीं नाटकें पुढें आलीं. वरील दोन ग्रंथ, अश्वघोष व त्याचे समकालीन याच्या कविता, हालाची सप्तशति व गुणाढ्यकृत बृहत्कथा इत्यादि ग्रंथ, भारतीय काव्याच्या पूर्वअभिजात युगांतील मुख्य ग्रंथ म्हणून गणण्यास हरकत नाहीं. आंध्रराजे, पश्चिमेकडील क्षत्रप, कुशान राजे व त्याचे समकालीन, या सर्वांच्या दरबारीं वरील वाङ्मयास बहर आला होता असें म्हणावयास हरकत नाहीं.

इ. स. ३२० मध्यें पहिल्या चंद्रगुप्तानें स्थापिलेल्या गुप्त घराण्याच्या राजवटींत काव्याचें सुवर्णयुग सुरू झालें. इ. स. ३४५ मध्यें असलेल्या समुद्रगुप्तावर राजकवि हरिसेन यानें एक प्रशस्ति लिहिलेली आहे व ती अलाहाबाद येथील एका स्तंभावर कोरलेली आहे. तिसरा गुप्तराजा म्हणजे दुसरा चंद्रगुप्त होय. याचें काव्यावर फार प्रेम असे. त्याच्यानंतर इ. स ४१३ मध्यें पहिला कुमारगुप्त गादीवर बसला. या राजाच्या ४० वर्षांच्या अमदानींत लक्ष्मी व सरस्वती याच्यांतील वैर नाहींसें झालें होतें असा लौकिक आहे.

पुढें स्कंदगुप्तानें हूणाचा पराभव केला त्यावेळीं, गाझीपूर जिल्ह्यांतील भिलारी गावीं एका स्तंभावर एक शिलालेख कोरण्यांत आला. परंतु इ. स. ४८० मध्यें स्कंदगुप्त मारल्यामुळें गुप्त घराण्याचें वैभव लयाला गेलें. त्याचे सर्व शिलालेख इ. स. ३५० ते ५५० या काळांतील असून कालिदासाच्या ग्रंथाचाहि त्यात उल्लेख आहे. सौमिल्ल व रामिल याचा काल अनिश्चित असून ते कालिदासाचे समकालीन होते कीं नव्हते हें अज्ञात आहे. मेन्था ( भर्तृमेंथा हस्तिपक ) नावाच्या कवीनें काश्मीरच्या मातृगुप्त राजाकरिता 'हयग्रीववध' नावाचें काव्य लिहिलें आहे. अमरु हा सहृदय व प्रसिद्ध कवि कालिदासाच्या कालाहून फार दूरच्या कालांत झाला नसावा. शूद्रक व विशाखदत्त या नाटककाराचा काल अनिश्चित आहे भट्टी, भारवीप्रभृति महाकाव्याचे जनक आणि शतकत्रयकर्ता भर्तृहरि हे इ. स. ६५० च्या पूर्वीच प्रसिद्धीस आले होते, एवढेंच या कवीबद्दल म्हणतां येईल. वराहमिहीर नावाचा कवि व ज्योतिषी इ. स. ५८७ त वारला हें मात्र निश्चित आहे. सहाव्या शतकाच्या उत्तरपादांत सेतुबंध नावाचें प्राकृत महाकाव्य लिहिणारा किंवा लिहविणारा दुसरा प्रवरसेन राजा, हा काश्मिरास राज्य करीत असे. इ. स. सातव्या शतकाच्या आरंभीं दंडी व सुबंधू असे दोन कवी होऊन गेले यात शंका नाहीं.

ऐतिहासिक पुराव्याच्या क्षेत्राकडे वळल्यास प्रथम एका नाटककाराचें नाव सुचतें व हा नाटककार म्हटला म्हणजे इ. स ६०६ ते ६४७ मध्यें होऊन गेलेला व ठाणेश्वर आणि कनोजचा राजा हर्षदेव अथवा हर्षवर्धन हाच होय. कादंबरीकर्ता बाण व गीतात्मक रचना करणारा भावनाप्रधान मयूर कवी हे त्याच्या समकालीन होत. सातव्या शतकाच्या उत्तरार्धांत 'शिशुपालवध' कर्ता माघ हा होऊन गेला असावा. कारण इ.स. ६२५च्या शिलालेखांत उल्लेखिलेला राजा वर्मलात, याचा पहिला प्रधान हा माघाचा आजा सुप्रभदेव हा होय. त्यानंतरचा कनोजाधिपति यशोवर्मन् हा वाङ्मयाचा आश्रयदाता होताच. शिवाय 'रामाभ्युदय' नावाचें नाटक त्यानें लिहिलें आहे असें म्हणतात. नाट्याचार्य भवभूति व 'गौडवाह' कर्ता प्राकृत कवी वाक्पतिराज हे यशोवर्मनच्या दरबारीं होते. वामनानें उल्लेख केलेला भट्ट नारायण नावाचा नाटककार फारसा उत्तरकालीन नसावा.

अ र्वा ची न यु गां ती ल प्र सि द्ध का व्य ले ख क.—चिप्पट जयपीड (८०६–८३८) व अवन्तिवर्मन् (८५५–८८३) नावाच्या काश्मिरी राजाच्या अमदानींत राजानक रत्नाकर म्हणून एक महाकवि होऊन गेला. हरिविजय, वक्रोक्ति पंचाशिका इत्यादि अनेक काव्यें त्यानें लिहिलीं आहेत. नवव्या शतकाचा अस्त व दहाव्या शतकाचा उदय, अशा वाङ्मयीन संधिकालांत नाटककार राजशेखर होऊन गेला. तो आपणास महेंद्रपाल राजाचा शिक्षक व कृष्णशंकरवर्मन् याचा समकालीन म्हणवितो. ११ व्या शतकांत माळव्यांतील धारानगरीनें वाङ्मयासंबंधीं मोठें कार्य केलें आहे. मुंज राजा (९७४–९९५) हा स्वतःच कवि होता. 'नवसाहसांकचरित' हा ग्रंथ लिहिणारा पद्मगुप्त राजकवि होता. मुंजाचा पुतण्या भोज ( १०१८–१०६० ) याचाहि काव्यास चांगला आश्रय असे. हा राजा बऱ्याचशा काव्याचा जनक असून त्याच्या दरबारचा कोणीहि प्रसिद्ध कवि आज आपणास माहीत नाहीं हें आश्चर्यच आहे! ११ व १२ व्या शतकांत 'वाङ्मयभूमि' म्हणून काश्मिरचा मोठा लौकिक असे. दृश्य काव्य, महाकाव्य व भावनात्मक काव्य लिहिणारा बिल्हण ( १०७०–१०९० ) यानें १०६५ त बहुधा काश्मीर सोडलें असावें. अनेक दरबारांत प्रवेश करून शेवटीं तो पश्चिमेकडील चालुक्य घराण्यांतील सहाव्या विक्रमादित्य राजाच्या दरबारीं कवि झाला. पुढें त्याच्याकरितां बिल्हणानें 'विक्रमांकदेव चरित' नावाचा ग्रंथ लिहिला; यावेळीं

काश्मिरचा राजा हर्ष (१०८९–१०८९) हा गादीवर होता. क्षेमेंद्र कवि काश्मिरातच होऊन गेला त्यानें महाकाव्यें व नाटकें लिहिलीं, रामायणमहाभारतास संक्षिप्त स्वरूप दिलें आणि बृहत्कथा व कादंबरी यांना छंदोबद्ध संक्षिप्त स्वरूप देऊन धर्मपर व उपदेशपर अशीं अनेक स्फुट काव्यें लिहिलीं आहेत. त्यानंतर १०६३ व १०८१ च्या दरम्यान सोमदेवानें कथानकात्मक काव्यें लिहिलीं. काश्मिरचा राजा जयसिंह (११२८–११४९) याच्या राजवटींत मंख कवि होऊन गेला व त्यानें ११३५ ते ११४५ च्या दरम्यान श्रीकंठचरित हें महाकाव्य लिहिलें. ११४८ च्या सुमारास प्रसिद्ध इतिहासकार कल्हण यानें 'राजतरंगिणी' नावाचा काश्मिरचा वृत्तांत संकलित केलेला ग्रंथ लिहिला. बाराव्या शतकांतील काश्मीरसारखें काव्याचें दुसरें केंद्र म्हणजे बंगालचा राजा लक्ष्मणसेन याचा दरबार हें होय. त्याच्या आश्रयानें, उमापतिधर, धोई, गोवर्धन आणि गीतगोविंदकर्ता प्रसिद्ध जयदेव हे सर्व कवी उदयास आले. नैषधचरित लिहिणारा श्रीहर्षकवि हा बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांत कनोजच्या चन्द्र व विजयचंद्र या राजाच्या दरबारीं आश्रित म्हणून राहिलेला असावा.

आधुनिक भारतीय वाङ्मयातील काव्यः— भरतखंडाच्या आधुनिक सर्व भाषाप्रकारांत गाणीं व कथा असलेलें भरपूर वाङ्मय आढळतें. लौकिक अथवा रूढ कविता आणि काव्य या दोहोंतील सूक्ष्म भेद समजणें हें मात्र सर्वदाच सोपें नसतें. द्रविडी बहुजनसमाजांतील सुंदर रूढ गाण्यांपैकीं कांहीं गाणीं अशीं आहेत कीं, ज्यांना रूढ अथवा लौकिक असें नाव देता येणार नाहीं. तुलसीदास (इ. स. १५३२–१६२४) यानें हिंदी भाषेत स्वतंत्र रीतीनें वाल्मिकीच्या आधारें रामायण लिहिलें आहे. तुलसीदासकृत रामायण हें विशिष्ट काव्यपद्धतीचें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. कारण त्यांतील सृष्टिवर्णनें, काव्यशास्त्रांतील ठराविक उदाहरणें पुढें ठेऊन न करिता, प्रत्यक्ष निसर्गावलोकनानेंच केलेली आहेत.

काव्यानें आणखी थोडेसें विवेचनः—क्षेमेन्द्रकृत सुवृत्ततिलकामध्यें काव्य, शास्त्रकाव्य व काव्यशास्त्र यांसंबंधी भेद केलेला आहे. कालिदासाच्या नावावर प्रसिद्ध असलेलें 'नलोदय' हें काव्य, काव्यरीतीचें परिणत स्वरूप दिग्दर्शित करितें. त्यांतील कृत्रिम वृत्तें व शब्दच्छल पाहिला कीं, तें कालिदासाचें काव्य नव्हे हीं गोष्ट स्पष्ट होते तें रविदेवानें लिहिलें असावें. रावणवध अथवा सेतुबंध हें प्राकृत महाकाव्य, काव्यरीतीचें दुसरें उदाहरण होय. प्राकृतातहि या काव्यरीतीचा अवलंब करता येतो, हें ग्रंथकर्त्यास दाखवावयाचें होतें असें दिसतें. रामकृष्णकृत गोपालकेलीचंद्रिका या नाटकांत रंगभूमिनिर्देशाच्या ऐवजी काव्यवर्णनेंच फार आहेत.

प्रशस्तिः—हीं प्रशस्तिगीतें म्हणजे ऐतिहासिक कागदपत्रेंच होत, एवढेंच नव्हे तर कृत्रिम वृत्तांत रचलेलीं व कधीं कधीं कृत्रिम गद्यात लिहिलेलीं तीं थोडींच काव्येंच होत. देवालयाचें समर्पण व धार्मिक स्मारकें यांचा वृत्तांत त्यात सांगितलेला असतो. प्रथम आशीर्वचन, संस्थापकाची वंशावळ व स्तुति, नंतर स्मारकाचें वर्णन, त्याचे हेतु, नंतर शिलालेखक व उपाध्याय यांचा निर्देश व शेवटीं, केव्हा केव्हा मितीचा उल्लेख इतक्या सर्व गोष्टी प्रशस्तिकाव्यात सापडतात.

काव्यरीतीत लिहिलेलीं स्तोत्रें:—बरींचशीं स्तोत्रें क्लिष्ट रीतीनें लिहिलेलीं असतात व तीं सर्व बहुधा आधुनिकच आहेत इ. स. १५९० त पूर्ण झालेलें नारायणभट्टकृत नारायणीय हें एक स्तोत्रहि आहे व मोठें काव्यहि आहे. त्याचे दशक पाडले असून विषय भागवतपुराण हा आहे. केरळ देशात हा भक्तिग्रंथ म्हणून मानला जातो, व कृष्णस्तव केल्यानें एका ब्राह्मणाचा संधिवात नाहींसा झाला, अशी लोकसमजूत आहे. १७ व्या शतकात रामभद्र दीक्षितानें परिणत काव्यरीतींत कांहीं स्तोत्रें केलीं आहेत. रामचयस्तव, रामबाणस्तव, अष्टप्रास अथवा रामाष्टप्रास व वर्णमालास्तोत्र इत्यादि स्तोत्रें त्यापैकींच आहेत या काव्यपद्धतीचें चिनी व जपानी कवितेशीं बरेंच सादृश्य आहे.

महाराष्ट्रीतील काव्य.—महाराष्ट्रीला 'उत्कृष्ट प्राकृत' असें नाव दंडी देतो. हालकृत 'सत्तसई' हा या भाषेतील सर्वांत प्राचीन ग्रंथ होय. 'सेतुबंध' (किंवा 'रावणवध') हें सुंदर काव्यपद्धतीनें लिहिलेलें एक प्राकृत महाकाव्य, बहुधा दुसऱ्या प्रवरसेनाचें किंवा त्याच्या सभेंतील एखाद्या कवीचें असेल महाराष्ट्रीमध्यें लिहिलेल्या एका ग्रंथाचें उदाहरण म्हणून दंडी याचा उल्लेख करतो (काव्यादर्श, १. ३४) नाटकामधील पद्यें (गाथा) नेहमीं याच भाषेतली असतात गाथाकरिता मुख्यतः महाराष्ट्री योजीत.

महाराष्ट्राचा विचार करताना हेमचंद्रानें जैन महाराष्ट्रीकडे लक्ष पुरविलें आहे व तो 'सत्तसई' आणि 'सेतुबंध' यांतून महाराष्ट्रीचीं उदाहरणें निवडतो.

या हाल सातवाहनकृत सत्तसई (सप्तशती) मध्यें प्राकृत भाषेतील ७०० भावगीतांचा संग्रह आहे. या ग्रंथावरून प्राचीन भारतीयांची प्रेमभाषा चांगली कळून येते. वास्तविक हीं गीतें लोकप्रिय दिसत नाहींत. तथापि लौकिक काव्यास अनुसरून काव्यकारांनी हीं रचिलीं असावीत. हाल हा केवळ संग्राहक दिसत नसून त्यानें या गीतांची मोठ्या कौशल्यानें निवड करून त्यांना काव्याची सुंदर छटा दिली असली पाहिजे; त्यानें आपल्याहि कांहीं कविता या संहितेंत घातल्या असाव्यात. एक अशी आख्यायिका आहे कीं, राजा हाल व त्याचा परिवार यांना काव्यदेवी जी भारती तिनें स्फूर्ति दिल्यावर हालानें उपलब्ध असणाऱ्या कवितांतून ७०० कविता निवडून काढल्या.

पुराणांतून आलेल्या आंध्र किंवा आंध्रभृत्य राजाच्या वंशावळींत हाल हा १७ वा राजा म्हणून दाखविला आहे.

आंध्र राजघराण्याला सातवाहन किंवा शालिवाहन असें नाव असून ख्रि. पू. ३ ऱ्या शतकाच्या मध्यापासून इ. स. ३ ऱ्या शतकाच्या आरंभापर्यंत हें घराणें दक्षिणेंत राज्य करीत होतें. हाल हा वंशावळीच्या मध्यभागीं येतो, त्या अर्थी तो इ. स. शतकात राज्यावर असावा. तसेंच वरील आख्यायिका खरी दिसते. कारण आंध्र राजाचे बहुतेक सर्व अंकित लेख प्राकृतात आहेत. विंध्यगिरी व गोदावरी याचा वारंवार उल्लेख सत्तसईंत येतो. त्यावरून ज्या ठिकाणीं आंध्रानीं राज्य केलें त्या दख्खनच्या ईशान्य भागात हा संग्रह निर्माण झाला असला पाहिजे असें दिसतें.

सत्तसईच्या कमींत कमी ६ निरनिराळ्या प्रती उपलब्ध आहेत. या सर्व प्रतींतून फक्त ४३० कविताच आढळतात. थोडया फार प्रमाणात एकोट्टत स्वरूपात असलेला याचा मूळग्रंथ कदाचित् पुढील नकलनवीसाच्या हातून केवळ संकलित स्वरूपाचा बनला असेल. मूळ ग्रंथाचा काल इ. स. ९ ऱ्या शतकापासून धरता येईल. म्हणजे सर्व प्रतींत आटळणाऱ्या कवितानाच फक्त हा काल लागू पडेल. इतर भाग पुढील काळचा असला पाहिजे यात संशय नाहीं. तथापि महाराष्ट्री भाषेंतील हा सर्वांत जुना ग्रंथ होय.

सत्तसईंतील प्रत्येक खंड सामान्यतः एक पूर्णपद म्हणता येईल, काहीं काहीं ठिकाणीं २।३ खंड मिळून एक पद बनलें आहे. यात अगदीं थोड्या शब्दात एखादी मनःस्थिति चित्रित केली आहे; किंवा एखादी तक्रार सांगितली आहे किंवा प्रेमानंद वर्णिला आहे. प्रवासाला गेलेल्या नवऱ्याबद्दल शोक करणारी स्त्री तर वारंवार दिसते; तसेंच नवरा किंवा बायको मरण पावल्याबद्दलचा शोक, गुप्त प्रेम, प्रणयीजनाचीं भाडणें, मुलाला पहिल्यानें दात आल्याचें पाहून झालेला आनंद इत्यादि निसर्गाचें वर्णनहि मधून मधून येतें. "भटकणाऱ्याला जसा त्याच्या सावलीचा उपयोग त्याचप्रमाणें कृपणाला त्याच्या संपत्तीचा उपयोग असतो," यासारख्या बोधप्रद म्हणी या ग्रंथात आढळतात. [ विंटरनिट्झ ]

मराठी काव्य व प्राचीन कवि —मराठी भाषा उत्पन्न झाली तरी तिच्या प्रथमकाळात कोणत्याहि प्रकारची भारदस्त ग्रंथरचना करणें ती संस्कृतात करीत त्याकाळीं सार्वलौकिक भाषा ही संस्कृत असल्यानें असें होणें साहजिकच होतें. देशी भाषाचा पुरस्कार प्रथम ब्राह्मणानीं किंवा देशी राजानींहि केला नाहीं. कां कीं, ते सार्वराष्ट्रीय ब्राह्मणी संस्कृतीचे अभिमानी असत. बंगाल्यात बंगाली भाषेचा पुरस्कार मुसलमानी राजानी केला. निरनिराळी संप्रदाय व पाखंडें ब्राह्मणाच्या तावडींतली जनता आपल्या तावडींत घेण्यासाठीं देशी भाषाचा आश्रय करीत त्यामुळें बौद्धानीं पाली, जैनानीं अर्धमागधी व महानुभावानीं मराठी भाषाचा आश्रय केला. त्यापूर्वींहि कदाचित् मराठी भाषेंत पद्य ग्रंथ झाले असतील, कारण ज्ञानेश्वराच्या पूर्वी मराठी ही निदान २०० वर्षे तरी अस्तित्वात आली असली पाहिजे, त्याशिवाय एकाएकीं ज्ञानेश्वरीसारखा अभिजात भाषेंत ग्रंथ निर्माण होणेंच शक्य नाहीं परंतु आज त्यापैकीं मुकुंदराजाच्या नावावर खपणाऱ्या ग्रंथाशिवाय इतराचे ग्रंथ उपलब्ध नाहींत. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, चोखा, तुकाराम, रामदास, मोरोपंत या संतकवींनीं संस्कृतातील अगम्य ज्ञान खालच्या वर्गांतील समाजास सरसकट खुलें केलें. या मंडळींनें "मराठी भाषा ही संस्कृतपेक्षा हलकी नसून तिच्या बरोबरीची आहे, मग मराठींत ग्रंथरचना का करूं नये" अशा अर्थाचे प्रश्न विचारलेले आहेत. त्याच्या कालींहि पंडिताचा एक वर्ग असून तो मराठींत काव्यरचना करणें हलकें समजत असे. अशा पंडिताची निर्भत्सना या संतकवींनी केलेली आहे. "दूध सुवर्ण चषकातून प्राशन केलें काय किंवा तांब्याच्या भांड्यातून प्यालें काय, दुधाच्या गोडींत काय फरक पडणार ? माझा मराठा बोल पैजेनें अमृतासहि जिंकेल, त्यास नावें ठेवणार मत्सरी व आग्रही होत, भल्यानें हें मराठी पाहों नये असें म्हणणारे मूर्ख असून त्याना या परमार्थसुखाची सोय कशी समजणार, इत्यादि अभिमानाचे उद्गार याच्या ग्रंथात आटळतात.

काव्यग्रंथाचें विवेचन आणि पद्यमयग्रंथाचा इतिहास या दोन्ही गोष्टींचें पृथक्करण येथील काव्यविवेचकानीं चागलें केलें नाहीं. धार्मिक किंवा भक्तिपर काव्य वगळले असता मराठी भाषेंत चागलें काव्य फारच थोडें आहे ज्ञानेश्वराची ज्ञानेश्वरी, किंवा अमृतानुभव, वामन पंडिताची यथार्थदीपिका याना काव्यग्रंथ म्हणणें म्हणजे काव्यग्रंथाच्या स्वरूपाचेंच अज्ञान प्रदर्शित करणें होय. थोडक्यात सागावयाचें म्हणजे मराठींत काहीं भक्तिपर काव्य आहे, संस्कृत काव्याचीं रूपातरें झालीं आहेत. तीं रूपातरें तयार करताना काव्योत्पादन हा मुख्य हेतु नसून धार्मिक लोकशिक्षण हा मुख्य हेतु होता, आणि काव्य केवळ गाभ्याबरोबर नळ्याला यात्रा या न्यायानेंच आलें आहे. काव्येतर ग्रंथात काव्य उत्पन्न झालें असेंच ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथातील काव्यस्वरूपी सुंदर स्थलाविषयीं म्हणता येईल रामदासाच्या मनाच्या श्लोकात काव्य आहे. पण दासबोधात ते थोडेंच आहे. महिपतीचीं भक्तचरित्रें वाचलीं असता त्यात काहीं काव्यस्थलें सापडतील. पण त्या चरित्रास काव्य म्हणण्यास जर जागा असेल तर ती मुख्य ही कीं जे दोष चरित्रात चालावयाचे नाहींत पण जे काव्यात चालतात, ते दोष ज्या अर्थी महिपतीच्या चरित्रसमुच्चयात आहेत त्या अर्थी महिपतीच्या कृतीस काव्यच म्हटलें पाहिजे.

इंग्रजीपूर्वीच्या मराठींतील खरी स्वतंत्र काव्यरचना म्हणजे लावण्या, पोवाडे वगैरे होत. जेथ धार्मिक विषय परंतु धार्मिक बुद्धिहि अप्रधान आहे अशा कृतींनाहि काव्य म्हणता येईल. अशामध्यें राधाविलास, राधाभुजंग, चंद्रावलीवर्णन इत्यादि काव्यें मोडतील. भाषातरें करताना काव्यहेतु मनात धरून करताना केलेल्या दुसऱ्या कृती म्हटल्या म्हणजे

विठ्ठलचरित्र ( चौरपंचाशिकेचें रूपांतर ) व विठ्ठलाची रसमंजरी ह्या होत. एकंदरीनें पहातां मराठींतील काव्य-वाङ्मय म्हणजे उष्टें आणि भिकार होय यांत शंका नाहीं. सुशिक्षित शृंगारिक वाङ्मय अर्वाकडच्या मासिकांतील भीत भीत प्रसिद्ध केलेल्या पद्याशिवाय मराठींत नाहीं. आणि आहे तें अगदीं कनिष्ठ प्रतीचें आहे. भावना सुशिक्षित होऊन त्याचा विकास ज्या समाजांत नाहीं त्या समाजांत खरें प्रेमवाङ्मय कोठून दृष्टीस पडणार. पोंवाडे देखील निर्बुद्ध अशा लोकांनींच लिहिले असल्यामुळें त्यांत कवित्व जरी मधून मधून दृष्टीस पडलें तरी तें आजच्या वाङ्मयप्रेमी वर्गावर छाप टाकील असें नाहीं, आणि मोठमोठालीं चांगलीं काव्यें मराठींत झालींच नाहींत. दुसरी राज्यांतील ज्या मराठी काव्यांत काहीं कवींचें कौशल्य दृष्टीस पडतें, आणि ज्या कवींचा दम जरा जास्त वेळ टिकला असें दिसतें अशीं नांव घेण्याजोगीं मराठी काव्यें आमच्या मतें दोनच आहेत. एक *चिंतामणि पेठकराचें गंगावर्णन* आणि दुसरें टिळकांचें *एक वनवासी फूल* हीं होत. काव्याचे विषय शोधण्यांत स्वातंत्र्य, अ-मसर काव्याचा हव्यास विविध प्रकारचा अनुभव या गोष्टींचा लाभ महाराष्ट्रीय कवितेस कधींच प्राप्त झाला नाहीं. आणि आजपर्यंत झालेलें मराठी वाङ्मय सर्व जळून जरी गेलें तरी जगाचें काव्यनाश या दृष्टीनें काहीं एक नुकसान व्हावयाचें नाहीं. झालें तर तें भाषेचा इतिहास, तुटलेल्या राष्ट्राच्या मनस्थितीचें व ज्ञानमर्यादेचें उदाहरण व स्त्रीशूद्रांच्या धार्मिक शिक्षणासाठीं झालेल्या प्रयत्नाचा इतिहास या नात्यानेंच होईल. मराठींतील बरीचशी प्रसिद्ध झालेली अर्वाचीन कविता पंचविशीच्या आतल्या पोरांनीं लिहिलेली आहे व त्याच मंडळींनीं प्रौढ वयांत कवितारचनेचा क्रम टाकून दिला आहे.

आतां पद्यरूपी ग्रंथांची व कृतींची थोडीशी हजेरी घेऊं व ती घेतांना ज्या ग्रंथामध्यें थोडथोडें काव्य स्वरूप आलें आहे त्याचा व त्या स्थलाचा उल्लेखहि करूं.

प्रथम पंचतंत्रादिक लौकिक कथा बऱ्याच प्राचीन काळीं मराठींत काव्यरूपानें उतरल्या असाव्यात असें दिसतें. पुढें दहाव्या शतकांत श्रीपतीनें रत्नमाळ ग्रंथ तयार केला. हा मराठी आद्य कवि होय. त्यानंतर मुकुंदराज यांनीं विवेकसिंधु व परमामृत वगैरे ग्रंथरचना केली. मुकुंदराजांनीं संस्कृतांतहि ( दशोपनिषद्भाष्य, विवेकसिंधु, ग्रंथराज वगैरे ) काव्यरचना केली आहे. मराठींत ग्रंथरचना करणें हें आपण एक धाडस करीत आहों असें खुद्द मुकुंदराजासहि वाटत असावें. मुकुंदराजाची कविता साधी आहे. यानंतर हेमाद्रीनें पुस्तकें रचिलीं. कामराज नांवाच्या एका कवीच्या उल्लेखावरून तीं पद्यांत असावीं असें दिसतें. या सुमारासच ज्ञानेश्वराची ज्ञानेश्वरी निर्माण झाली. मराठी वाङ्मयांत ज्ञानेश्वरीची योग्यता विशेष. पुष्कळ्या विद्वानांच्या मतें तिच्यासारखा गीतेचा अर्थ सुलभ करणारा दुसरा ग्रंथ अद्याप निर्माण झाला नाहीं. जुन्या शब्दांचें दुर्बोधत्व एकीकडे ठेविल्यास सरस दृष्टांत व भाषेचें मधुर स्वरूप यांहींकरून ग्रंथ इतका खुलविला आहे कीं, तो वाचीत असतां, वाचकाची आपोआप ग्रंथाशीं तन्मयता होते. सहाशें वर्षें झालीं तरी अद्यापि याची छाप महाराष्ट्रावर बसलेली आहे. ज्ञानेश्वराच्या अमृतानुभव ग्रंथहि उत्तम आहे. मात्र भाषा थोडी जास्त कठीण आहे. मुक्ताबाईचे ताटीचे अभंग मधुर म्हणून प्रसिद्ध आहेत. नामदेवाचें सारें कुटुंबच कवी होतें. त्याचे व जनाबाईचे अभंग लडिवाळपणाचे आहेत. व त्यांत वात्सल्यरस बराच आढळतो. याच्या अभंगांनीं विठ्ठलभक्ति समाजांत जास्त पसरली. नामदेव व तुकाराम यांचे अभंग वारकऱ्यांच्या तोंडीं फार आहेत. तुकारामाच्या अभंगांत सडेतोडपणा व कवीस शोभण्यासारखा आवेश जास्त आढळतो. लोकांना शिकवणूक देतांना शिव्या देण्याची खोडहि तुकोबांना होती. खरोखर पाहिलें तर, आमच्या कवींच्या या प्रेमळ भक्तीच्या जोरावर मराठींत उत्तम काव्य निर्माण झालें आहे. चौभा कवीची भाषा ज्ञानेश्वर व एकनाथ यांच्या दरम्यानची असल्यानें तिला ठाकठिकपणा येत चालल्याचें व संस्कृताचें सान्निध्य सुटून तिनें मराठीस विशेष जवळ केल्याचें आढळतें. एकनाथाची भाषा अधिक सुशिक्षित आहे. ते स्वतः पंडित होते. त्याच्याच प्रमाणें वामनाची व मोरोपंतांची भाषा आहे. फरक काय तो तत्कालीन भाषेच्या जुन्या व नव्या वळणाचा आहे. मोरोपंत व मुक्तेश्वर यांत मोरोपंतांची भाषा जास्त ठाकठिकीची आहे. मोरोपंतांना, त्यांच्या आधींच्या सर्व कवींच्या काव्याचा भरपूर उपयोग करून घेतां आला त्यामुळें त्यांचें काव्य ठाकठिकीचें बनलें आहे. मोरोपंतांनां स्वराज्यांत काव्य करण्याचें भाग्य लाधलें होतें हें विशेष आहे. पारतंत्र्यांत इतर वृत्तींप्रमाणें काव्योत्पादनशक्ति अगर वृत्तीहि जोमानें उदय पावत नाहीं. सारांश मोरोपंत म्हणजे मराठी साम्राज्यांतील एक नमुनेदार कवि होय असें म्हटल्यास वावगें दिसणार नाहीं. एकनाथाची भाषा ज्ञानेश्वरानंतरच्या तीनशें वर्षांची असल्यानें बरीच ओळखीची दिसते. नाथाच्या भागवताच्या व भावार्थरामायण वगैरे कथानकविषयक काव्यांच्या भाषेंत थोडा फरक आहे. पहिल्यांत भाषा सोपी आहे तर दुसऱ्यांत ती अवघड आहे. याचें कारण कदाचित् असें असूं शकेल कीं, वेदांताचें ज्ञान अगदीं खालच्या वर्गापर्यंत नेण्याचें काम करावयाचें असल्यानें भागवत सोप्या भाषेंत रचिलें गेलें असावें. मराठी निरूपणात्मक काव्यांत ओंवी हा छंद विशेष रूढ आहे. याचें कारण तो सुलभ असून ( संस्कृतांतील अनुष्टुप्प्रमाणें ) सहज समजणाराहि आहे. अध्यात्मवाङ्मयांत बहुतेक संत कवींनीं हाच छंद उपयोगांत आणिला आहे. ओंवीछंदांत काव्याचें चमत्कारित्व फारसें दृष्टीस पडत नाहीं; त्यास निरनिराळ्या वृत्तांची जरूरी असते. तरी

पण मुक्तेश्वर, श्रीधर, वामन व एकनाथ यांनीं ओंवीबद्ध काव्यात चमत्कारित्व व मनोहारित्व आणिलें आहे. एकनाथानें आख्यानवाङ्मयावर विशेष भर दिला; त्यानेंच याचा पाया घातला असें म्हणण्यास हरकत नाहीं. याच्या वेळच्या चिंतामणी कवीचें ध्वाख्यान गोड आहे. असलीं प्रौढ परंतु रसाळ काव्यें वामन, रघुनाथ पंडित वगैरे कवींचीहि आहेत. एकनाथकालीन एक ख्रिस्त-पुराण म्हणून (स्टीफनचा) ग्रंथ आहे. त्याची भाषा एकनाथापेक्षा सोपी आहे. याचें कारण विषय कथेचा व ग्रंथ साधारण लोकांकरिता लिहिलेला हें असावें. मुक्तेश्वरास काव्य करण्यास वेदान्तपंथ किंवा वारकरीपंथ वगैरे कारणीभूत न होता स्वयंस्फूर्तीनें त्यानें काव्यास प्रारंभ केला. तो कोणत्याहि संप्रदायाचा नव्हता. कवीचें काम लोकशिक्षण-विषयक किंवा मनोरंजक विचार अगर कथा, सृष्टींतील विषयाशीं तादात्म्य पावून स्वयंस्फूर्तीनें गौरवून सांगण्याचें असतें. त्या दृष्टीनें मुक्तेश्वर हा उत्तम कवि होऊन गेला. त्याची भाषासरणी प्रौढ, मनोरम, प्रासादयुक्त आणि व्यवस्थित आहे. त्यानें सृष्टिवर्णनें याच्यांत केलेलीं आहेत. याच्या वेळेपासून मराठी भाषा काव्यांगणांत जोरानें पुढें सरसावली. याने सरस व विपुल अलंकार योजून मराठी कवितेच्या अंगावर बहुत अलंकार चढविले. याच्या काव्यांत महाकाव्यें, आख्यानें व वीणाकाव्यें हीं दृष्टोस पडतात. श्रीधराला रूपकाची फार आवड होती; याचें व महिपतीचें काव्य मुक्तेश्वराच्या खालच्या दर्जाचें असूनहि लोक तें फार वाचतात याचें कारण तें लहान लहान कथात्मक आहे हें होय. रामदासस्वामी याचा काहीं निराळाच पंथ होता. वास्तविक ते कोणत्याच पंथाचे अनुयायी नसल्यानें त्याचे ग्रंथ बहुतेक स्वतंत्र वृत्तीचे आहेत. रामायणादि थोडे अपवाद सोडल्यास, त्याची सारी कविता लोकशिक्षण विषयक आहे. कोमल, मधुरपणा वगैरे त्यात न आढळता निसर्गाचा व सत्याचा नितांत कठोरपणा व तेजस्वितेचा अनुभव त्यात सापडतो. असल्या राजकारणी पुरुषाच्या काव्यातून विचार आढळतात पण भाव थोडेच आढळतात। तरी पण कारुण्य, वात्सल्य, अद्भुत, भक्ति व रौद्र हे रस त्याच्या काव्यात काहीं ठिकाणीं आढळतात. त्यानीं घालून दिलेल्या किरयाचें वळण वळवून काव्य उत्पन्न करणारा कवि त्याच्या पश्चात् अद्यापपर्यंत एकहि झाला नाहीं असें काहींचें म्हणणें आहे. पण कवि या नात्यानें रामदासाची किंमत फारशी मोठी नाहीं. आनंदतनय याची भाषा साधी आहे. अमृतरायाची कविता चटकदार व मनोहर असून भाषा प्रौढ दिसते. याचा कटाव जर एखाद्या उत्तम हरिदासाच्या तोंडून ऐकला तर श्रोते तन्मय होऊन जातात. वामन हा संस्कृत पंडित असल्यानें त्याच्या काव्यावर संस्कृताची व पांडित्याची छाया पडलेली आहे. याचीं पौराणिक आख्यानें चांगलीं रसभरित आहेत; वाणी जोरदार, ओजस्वी व प्रौढ आहे. स्वभावोक्ति सर्वत्र आढळते. मोरोपंतानीं मराठी भाषेवर जितके उपकार केले तितके दुसऱ्या कवानें केले नाहींत. त्यानें कथानकें जरी जुनीं घेतलीं, तरी त्यातील कोट्या, विचार व त्यास लाविलेलें वळण नवीन आहे. मराठी कवितेंत संस्कृत शब्दांचा उपयोग करताना कधीं कधीं अतिरेक केला आहे. त्याची कविता म्हणजे एखाद्या राजाची सर्वांगसुंदर, नाजूक, बहुमोल अलंकारादि आभरणांनीं युक्त व बहुविधकलाकुशल प्रौढ वयाची तरुणी होय. शब्दगौरव, भाषेची प्रौढी, रसानुकूलता भरपूर अलंकार, काल–व्यक्ती–प्रसंग याना अनुसरून वर्णनें, मुख्य सूत्र न सोडतां थोडक्यात पुष्कळ अर्थ आणणें हें याच्या काव्याचें विशेष आहे. अर्थगौरव, पदलालित्य, माधुर्य, ओजस्विता हे याच्या कवितेचे मुख्य गुण आहेत.

मोरोपंतानंतर लक्ष्यात घेण्यासारखे कवी म्हणजे शाहीर होत. यात रामजोशी, परशुराम, अनंतफंदी, होनाजीबाळा व प्रभाकर हे मुख्य होत. याच्या लावण्या देवावर, उपदेशपर व अध्यात्मिक अशा थोड्या असून शृंगारपरच जास्त असत. भाषेच्या दृष्टीनें या चांगल्या आहेत कित्येकाची भाषा अत्यंत गोड व उदात्तवर्णनपर आहे. या लोकानीं पोवाडेहि केले आहेत. ते बहुतेक ऐतिहासिक प्रसंगावरील असल्यानें वीररसप्रधान असतात. मराठी पद्यवाङ्मयाला (समर्थ रामदास सोडून) राजकीय उलाढालींची वार्ता हि नाहीं; ती उणीव पोवाड्यानीं भरून काढिली आहे. पोवाडे व लावण्या हे उत्तानकाव्य होय. काव्यात पदें म्हणून जो भाग आहे त्याचा उपयोग कीर्तनात व मनोरंजनार्थ गाण्यात किंवा प्रसंगविशेषीं मनाच्या प्रक्षुब्ध स्थितीत होतो. मनोवृत्ती हालवून सोडणारें हें एक काव्याचें छोटेंसें अंग आहे. बायकांचीं गाणीं ही काव्याची एक बाजू आहे. या बाजूनें मराठी भाषेचें जुनें स्वरूप व त्यातील कोमल रसाचा साठा आजपर्यंत कायम ठेविला आहे.

संस्कृत काव्यात सर्वसाधारण वृत्त म्हणजे अनुष्टुप छंद होय तसें मराठी काव्यात ओंवी व अभंग होत. ज्ञानेश्वरीची ओंवी साडेतीन चरणी आहे तर एकनाथाची ओवी साडेचार चरणी (क्वचित पाच चरणी) आहे. पुढील कवींनीं एवढी लांब ओंवी न ठेवितां चार चरणी योजलेली आहे. ओंवी व अभंग यात फार थोडा फरक आहे. घनाक्षरी हें वृत्त तालावर म्हणण्याचें आहे; हें चार ओंव्याचें मिळून बनतें. कटाव हे सुद्धा तालावर म्हणतात; याला नियमितपणा नाहीं. जवळ जवळ हें एक लांब गद्यच होय. हरिदासाच्यामुळें हे कटाव फार लोकप्रिय झाले. श्लोक या वृत्तात पुष्कळ प्रकार आढळतात; पैकीं समर्थांचें आवडतें (मनाच्या श्लोकात योजिलेले) भुजंगप्रयात हें एक होय; तें मुसुल्मानी करिमा वृत्तासारखेंच आहे दिंडी व साकी हीं वृत्तें गायनाच्या

अनुरोधानें मुद्दाम वसविलेलीं आहेत. हीं अभंग व ओंवी यासारखींच शुद्ध मराठी वृत्तें आहेत.

मानभाव पंथात ज्ञानेश्वराच्या नंतर कांहीं ओंवीबद्ध ग्रंथ तयार झालेले आढळतात परंतु ते थोडे आहेत व आहेत तेहि प्रसिद्ध झालेले नाहींत त्यामुळें त्यावद्दल कांहीं विधान करिता येत नाहीं. [ महाराष्ट्र सारस्वत, मराठी भा. घटना ]

आ धु नि क क वी —रा.न.चि.केळकर यांनी बडोदें येथील दहाव्या मराठी साहित्यसंमेलनात (स. १९२१)अध्यक्ष म्हणून केलेल्या भाषणावरून पुटील मजकूर घेत आहों. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात, इंग्रजी अंमल महाराष्ट्रात दृढ झाल्यावर समाजात विलक्षण क्रांति घडून येऊन नानातऱ्हेचे स्थितिभेद, मतभेद व रुचिभेद अस्तित्वात आले या बहुविध परिवर्तनाचें पूर्ण निदर्शक असेंच आधुनिक कवितेचें स्वरूप आहे. साम्रतच्या कवींपैकीं कांहींची कविता जुन्या धर्तीची व कांहींची ( इंग्रजी ) भाषांतराची व रूपांतराची बनली; हे प्रयत्न बरेच सफल झाले. या कारणामुळें भाषारचना व विषय यांचें वैचित्र्य आधुनिक कवितेंत अतिशय दिसून येतें. पुराणकथांचें विवेचन व अध्यात्माचें निरूपण यावरोवरच आगगाडींतील प्रवास व उडणारी म्हातारी देखील या कवितांत आढळते. कुरुंदवाडकर, लेले व दासगणू यांची कविता जुन्या थाटाची आहे, तर गोगटे, टिळक व केशवसुत यांची कविता पोप, वर्डस्वर्थ किंवा ब्राउनिंग या इंग्रज कवींच्या वळणाची आहे. मुजुमदार, भिडे, लेले, पागारकर, आगाशे व अनंततनय यांच्या रचनेचें मोरोपंती वळण; गोगटे, चंद्रशेखर व लेंभे यांची कांहींशी संस्कृतप्रचुर परंतु डौलदार व रमणीय श्लोकपद्धति, माधवानुज, सुमंत, नागेश व माधव यांची सफाईदार रचना, चिपळूणकर, विनायक यांची सहजमधुर साकी, तुकारामी व श्रीधरी थाटाचे टिळकाचे अभंग, ओंवी, केशवसुत व ठोमरे यांची विषयानुरूप तुटक, ओजस्वी व परिणामकारक नवीन वृत्तयोजना; तांबे व दत्त यांची लावणी पदाच्या धर्तीवरील हृदयंगम कवनें गोविंदाग्रज व रेंदाळकरांची ललित नादमधुर पण कृत्रिम भाषा आणि टेकाडे व बेहरे यांच्या वाणींतील तडफ हे सर्व विशेष आधुनिक कवितेला शोभादायकच आहेत. तिचें हें स्वरूप जसें वैचित्र्यपर तसेंच चमत्कृतिजनक व आनंददायकहि आहे. या कवींपैकीं भाषांतरकार कवि बरेच आहेत. केवळ स्वतंत्र अशी कविता फक्त लेंभे, खरे, चंद्रशेखर विनायक कोल्हटकर, गोविंदाग्रज व ठोमरे यांचीच म्हणता येईल. संस्कृत व इंग्रजीप्रमाणेंच आ. बंगाली, उर्दू व क्वचित् गुजराथी आणि फ्रेंच या कवितांचीहि भाषांतरें होऊं लागलीं परंतु यात दोष असा आहे कीं, याचा परिणाम कवींच्या प्रतिभेवर होतो. स्वतंत्र कृति प्रसवावयाला समर्थ असलेली या कवींची प्रतिभा परावलंबनाची दुष्ट सवय जडल्यामुळें पुष्कळदा शिथिल होऊन नष्ट झाल्याचें आढळून येतें. सध्या चालू असलेला गोंधळाचा प्रघात पाहिला म्हणजे प्राचीन कवींप्रमाणें अर्वाचीन कवीहि कोणत्या ना कोणत्या तरी सारस्वताचे भक्त बनून नेहमीं परभृतच रहाणार कीं काय असें भय वाटतें.

"वाणाकाव्य" हा आधुनिक कवितेचा एक अत्यंत महत्त्वाचा विशेष आहे. ही अभिनव पद्धति केशवसुतांनीं मराठींत प्रथम सुरू केली गल्या वीस पंचवीस वर्षांत जी मराठी कविता लिहिली गेली, ती बहुतेक या केशवसुती वळणाचीच आहे. त्यामुळें या काळाला केशवसुताचें युग असें कांहीं जण म्हणतात या काळातील ही कविता बरीच त्रुटित व स्फुटगीतात्मक अशी आहे हृदयंगमता हा काव्याचा मुख्य गुण या वाणागीतात जसा आढळतो तसेंच त्यात थोडेंबहुत नादमाधुर्यहि आढळतें. केशवसुत, टिळक व विनायक यांचीं काव्य भावनोद्दीपक जास्त आहेत. हल्लींची दुसरी महत्त्वाची रचना चतुर्दशक ही होय. परंतु हा प्रकार मराठी वाचकांना फारसा रुचलेला अगर कवींना साधलेला असा दिसत नाहीं. हल्लींच्या कवींत कांहीं दोषहि आढळतात वृत्तशैथिल्य, गावंढळ शब्दांची योजना, ग्राम्य रचना व विचार, अर्थशून्य शब्दरचना, अनिवार निरंकुशपणा वगैरे हे दोष होत. यामुळें मराठी कवितेंत ही सदोष व शिथिल रचना रूढ होण्याचें भय वाटत आहे. होतकरू कवींना भाषासौंदर्याची व रचनेच्या ठाकठिकीची परवा वाटेनाशी झाली आहे. आधुनिक कवितेच्या या दोषांची छाननी रसिक टीकाकारांकडून अवश्य झाली पाहिजे.

टी का त्म क वा ङ्म य.—मराठी कवितेवर हें बरेंच उत्पन्न झालें आहे तथापि त्यातल्या त्यात महत्त्वाचे ग्रंथ थोडेच आहेत. संतकवींची मराठी यादी सं त क वि का व्य सू चि ही होय. टीकात्मक वाङ्मयाची बरीचशी नोंद म हा रा ष्ट्री य वा ङ्म य सू ची मध्यें सापडेल संतचरित्रें महिपतीनें प्रथम गाइलीं. याशिवाय अनेक कवींनीं समकालीन किंवा पूर्वकालीन कवींच्या प्रशस्ती लिहिल्या आहेत. कविचरित्राचा एक संग्रह रा.ज. र. आजगावकर यांनीं लिहिला आहे.पण तो बराच काळजीपूर्वक पुन्हा तपासला पाहिजे.

ज्ञानेश्वर, एकनाथ, मोरोपंत, तुकाराम व रामदास या कवींच्या चरित्रावर इतर कवींपेक्षा अधिक वाङ्मय उत्पन्न झालें आहे. ज्ञानेश्वरावर भिंगारकराचा व मोरोपंतावर पागारकराचा व्यासंग विशेष आहे. वामन पंडितावर विद्याधर वामन भिडे यांचे परिश्रम झाले आहेत. त्यात त्यांनीं यथार्थदीपिकेचा कर्ता वामन व राधाभुजंगाचा कर्ता वामन या दोन निरनिराळ्या व्यक्ती आहेत असें मांडलें आहे. राजवाडे यांनीं दासबोधाचें पृथक्करण चांगलें करून त्यातील विचारप्रणाली सुलभ तऱ्हेनें खुली करण्याचा प्रयत्न केला आहे. देशाभिमान महाराष्ट्रीय कवींस होता असें सिद्ध करण्यासाठीं पागारकरांनीं एक लेख १९०३च्या सुमारास केसरींत प्रसिद्ध केला होता; मोरोपंतावर चिपळूणकर व हंस यांचे निबंध प्रसिद्ध आहेत. अनेक टीकालेख पहाता असें दिसून येईल कीं, मराठी कविवृतांचें काव्य या

दृष्टीनें परीक्षण करण्याऱ्या बाबतींत टीकाकारांनीं फारसें कौशल्य दाखविलें नाही व विशिष्ट ओळी उद्धृत करून, "अहाहा! या किती मजेदार आहेत" असें उद्गार काढण्यापलीकडे टीकाकारांची मजल फारशी गेली नाहीं.

एकंदर जगाचा काव्येतिहास पहाण्यास येथें अवकाश नाहीं तथापि येथें एवढेंच सांगता येईल कीं निरनिराळ्या देशांत व निरनिराळ्या काळांत आत्मोत्पत्ति प्राचीन कथावर्णन, भक्ति देशभक्तिप्रवर्तन, इत्यादि हेतूनें झाली आहे व अनेक काव्यें एकीकृत होऊन अनेक प्रसंगीं महाकाव्यें निर्माण झालीं आहेत (महाकाव्य पहा).

काव्हूर—हा प्रसिद्ध इटालियन मुत्सद्दी ता. १।८।१८१० रोजीं ट्यूरीन येथें जन्मला. याचें घराणें फार जुनें असून याचा मूळपुरुष १२ व्या शतकांतला कोणी सॅक्सन योद्धा होता असें म्हणतात. काव्हूरच्या बापाचें नाव मार्किस मिचेल असें होतें. काव्हूरची आई जिनेवाकडील एका सरदार घराण्यांतील होती. हीं दोघेंहि पिडमाँटचा गव्हर्नर प्रिन्स बोर्गेस याच्या ग्यासगीकडे असत (प्रिन्स बोर्गेस हा नेपोलियनचा मेहुणा होय) काव्हूर हा दहा वर्षांचा असताना ट्यूरिन येथील लष्करी शिक्षणाच्या शाळेंत दाखल झाला. तो वयाच्या सोळाव्या वर्षी कॉलेजांतून बाहेर पडला. यापुढें त्यानें पांच वर्षें लष्करी नोकरींत घालविलीं. फुरसतीच्या वेळीं यानें इंग्रजी भाषेचा अभ्यास केला. उदारमतवादी असल्यानें एकतंत्री राज्यपद्धति आणि भिक्षुकशाहीविरुद्ध तो होता मतप्रदर्शनाच्या बाबतींत तो धोरणी नसल्यामुळें प्रथम प्रथम त्याच्यावर पोलिसचा डोळा असे तो अद्यापि लष्करी अधिकारी असल्यानें मंडळाचा सभासद नव्हता. शिवाय चळवळ करण्यास त्या वेळचा काळ योग्य नव्हता असें त्याला वाटे, परंतु चार्लस आल्बर्ट हा गादीवर आल्यानंतर त्यानें १८३१ सालीं आपल्या जागेचा राजीनामा दिला, कारण चार्लस आल्बर्टावर त्याचा विश्वास नव्हता या वेळेपासून तो सरकारविरोधी पक्षाला मिळाला परंतु त्या विरोधांत गुप्त-कट वगैरेंचा गंधहि नव्हता या पुढचीं काहीं वर्षें त्यानें राजकीय व सामाजिक प्रश्नाचा अभ्यास करण्यांत घालविलीं, व परदेशांत प्रवास करून तेथील माहिती मिळविली. फ्रान्स देशांत जी राज्यक्रांति झाली तिचा परिणाम काव्हूरच्या राजकीय मतावर बराच बसला त्यामुळें काव्हूरची खात्री झाली कीं, अनियंत्रित जुलमी राज्यपद्धति व भारभाईची रेती या दोन्ही गोष्टींपेक्षा काहीं तरी विशिष्ट घटनेनें नियंत्रित झालेल्या राजसत्तेपासून देशाला बरेच फायदे होतील तसेंच त्यानें ब्रिटिश राज्यपद्धतीचें जें सूक्ष्म अवलोकन केलें त्यामुळेंहि त्याचीं वरील मतें दृढ झालीं.

अशा प्रकारें काव्हूरच्या विचाराचा विकास होत गेला, व इटली देशास परकीयांच्या बंधनापासून अजीबात मुक्त करण्याचे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. १८४५ सालीं नववा पायस या पोपनें उदारमतवाद्याकडे आपला ओढा दाखविला व ऑस्ट्रियाच्या विरुद्ध पक्षाचें आधिपत्य स्वीकारण्यास तो तयार झाला. यामुळें उदारमतवाद्यांच्या मताना जोराचें चालन मिळालें १८४८ मध्यें सिसलीमध्यें प्रथम बंड उपस्थित झालें त्यावेळीं वर्तमानपत्रकारांतर्फे मंडळाच्या वतीनें बोलतांना काव्हूर म्हणाला कीं, 'राजानें आतां काहींतरी निश्चित धोरण स्वीकारून लोकांना हक्क दिले पाहिजेत.' त्याच सुमारास राजालाहि चोहोंकडून सर्व लोकांनीं भीड घातली व अखेरीस हक्काची सनद देण्यास तो मोठ्या नाराजीनें तयार झाला. सिसली व मिलान्स येथील बंडाच्या हकीकती जेव्हां काव्हूरला समजल्या, तेव्हां पिडमाँटनेंहि चळवळ करण्याची वेळ हीच आहे असें जाणून त्यानें ऑस्ट्रियाशीं लढाई करावी असा उपदेश चालविला. यावेळीं पिडमाँटची बिकट परिस्थिति झाली होती ब्रिटिश सरकारचें व पिडमाँटचेंहि मोर्चे बरे नव्हते. काव्हूर या परिस्थितीला भ्याला नाहीं त्यानें आपल्या एका लेखांत प्रसिद्ध केलें कीं, इंग्लंड पिडमाँटला जरी मदत करणार नाहीं तरी ऑस्ट्रियालाहि मदत करीलसें वाटत नाहीं आणि जर इंग्लंडनें ऑस्ट्रियाला मदत केली तर इंग्लंडाविरुद्ध राजा जरी उठला नाहीं, तरी इटलीची प्रजा इंग्लंडविरुद्ध उठेल. काव्हूरच्या या लेखाचा एवढा परिणाम झाला कीं, थोड्याच काळांत पिडमाँटनें ऑस्ट्रियाविरुद्ध लढाई पुकारली ऑस्ट्रियाचें सैन्य व पिडमाँटचें सैन्य यांजकडे पाहिलें तर पिडमाँटच्या सैन्याचा ऑस्ट्रियापुढें टिकाव लागणें शक्य नव्हतें तेव्हां काहीं किरकोळ चकमकी झाल्यानंतर तात्पुरता तह करण्यांत आला. मध्यंतरीं पिडमाँटमध्यें निवडणुकीची गडबड चालू असतां तींत काव्हूर हा निवडून आला यावेळीं तो पार्लमेंटमध्यें उजुर पक्षाच्या लोकांत बसत असे. पार्लमेंटमधील काव्हूरचें काम प्रथम प्रथम नीट होईना. त्याला फ्रेंच भाषेंत बोलण्याचा सराव असल्यानें तो इटालिअन भाषेंत बोलतांना अडे. लढाई चालू ठेवावयाची कीं नाहीं असा प्रश्न नवीन पार्लमेंटपुढें आला, कारण तहाची मुदत संपली होती तेव्हां निर्वाणीचा उपाय म्हणून राजानें लढाई चालू करण्याचेंच ठरविलें लढाई झाली, परंतु पिडमाँटच्या लोकांचा तींत पराभव झाला दुसरा व्हिक्टर इमॅनुअल हा गादीवर आला.

यावेळीं क्रीमिअन वॉर सुरू झाली होती, तेव्हां काव्हूरनें आपली मुत्सद्दीगिरी चांगली प्रत्ययास आणून दिली या लढाईंत पिडमाँटनें भाग घेण्याचीं काव्हूरचीं कारणें पुढीलप्रमाणें होतीं पिडमाँटसंबंधाचा प्रश्न सर्वराष्ट्रीय करणें जरूरीचें होतें शिवाय काव्हूरची दृष्टि नुसत्या पिडमाँटपुरती नसून सर्व इटालीपुरती होती तेव्हां स्वातंत्र्य सभाळून इटालीला शिस्त पाळता येते हें युरोपाला दाखवावयाचें होतें. परंतु याच्या मोबदल्यांत त्याच्या अपेक्षेप्रमाणें पिडमाँटला मदतीचें अभिवचन पाश्चात्य राष्ट्रांकडून मिळवून देणें अशक्य

होतें. कारण तसें केल्यास ऑस्ट्रिया रशियाशीं संगनमत करील ही त्यास भीती होती. शिवाय पिडमाँटमधील हुजूर पक्ष व राष्ट्रीयपक्ष हे दोन्हीहि परकीय राजकारणास प्रतिकूल होते. परराष्ट्रीय प्रधान जनरल दार्नोमिडा यानें या कामास नापसंती दर्शवून राजीनामा दिला. तेव्हां राजानें काव्हूरला ती जागा दिली. नंतर लौकरच पिडमाँटचें सैन्य क्रिमीआस रवाना झालें. लढाई संपल्यानंतर पॅरिस येथें जी परिषद् बोलाविण्यात आली, तींत पिडमाँटच्या वतीनें काव्हूरला तेथें जावें लागलें. यावेळीं ऑस्ट्रियाच्या विरोधास न जुमानता काव्हूरनें पिडमाँटला जगाच्या राजकारणात मोठ्या राष्ट्राचा दर्जा मिळवून दिला. त्यानें त्यावेळीं स्वतःच्या मुत्सद्देगिरीच्या जोरावर इटलीच्या प्रश्नासंबंधानें नेपोलिअनचेंहि मत थोडेंबहुत वळविलें.

पुढें काव्हूरनें पिडमाँटचें लष्करी सामर्थ्य वाढविलें. परंतु त्याला हें माहीत होतें कीं, एकट्या पिडमाँटच्या हातून ऑस्ट्रियाशीं टक्कर देण्याचें काम होणार नाहीं. म्हणून त्यानें नेपोलिअनपाशीं मदत मागितली. तेव्हां ऑस्ट्रियानें पिडमाँटवर प्रत्यक्ष हल्ला केल्याशिवाय नेपोलिअननें या भानगडीत न पडण्याचें ठरविलें. अशा स्थितींत ऑस्ट्रियाला लढाई करावयास लावण्यांखेरीज काव्हूरला दुसरा उपायच नव्हता. इटालीमध्यें लहान लहान बंडें उपस्थित झालीं. परंतु ऑस्ट्रियाशीं झगडण्याच्या बाबतींत इंग्लंड अजून नाखूष होतें व नेपोलिअनहि कांकूं करीत होता. अखेर नेपोलिअननें काँग्रेस बोलावून इटलीच्या प्रश्नाचा निकाल लावावा, अशी योजना काढली. यावर ऑस्ट्रियाहि म्हणाला कीं, पिडमाँटनें शस्त्रसंन्यास करावा. इंग्लंडनेंहि या योजनेस संमति देऊन आणखी सुचविलें कीं इटलींतील प्रत्येक प्रांताचा या काँग्रेसमध्यें प्रतिनिधी असावा. इंग्लंडचें न ऐकल्यास सर्वच राष्ट्रें पिडमाँटला सोडून देतील अशी काव्हूरला भीति वाटल्यामुळें त्यानें ती योजना मोठ्या नाखुषीनें कबूल केली. परंतु ऑस्ट्रियानेंच ही गोष्ट नाकबूल करून पिडमाँटनें शस्त्रसंन्यास करावा अशाबद्दल निर्वाणीचा खलिता पाठविला. ते हा खलित्याच्या बाबतींत सर्वांनाच राग येऊन फ्रान्स व इंग्लंड या दोन्ही राष्ट्रांनीं इटलीची बाजू पत्करिली. मात्र यापुढें लढाईंत फ्रान्सनें, एकाएकीं काव्हूरला कळूं न देता ऑस्ट्रियाशीं तात्पुरता तह केल्यामुळें त्यालाहि तात्पुरता तह करावा लागला.

व्हिला फ्रँका येथील तह झाल्यानंतर पुन्हां १८५९ मध्यें काव्हूर मुख्य प्रधान झाला. तेव्हां त्यानें इटलीच्या एकीकरणाचा प्रश्न काढला; परंतु याला नेपोलियन संमति देईना. शेवटीं नाईस व सॅव्हाय हे प्रांत फ्रान्सला देण्याचें कबूल करून नेपोलियनला संतुष्ट करावें लागलें. अखेर एप्रिल महिन्यात पिडमाँट, पारमा, मॉडेना, टस्कनी व रोमाग्ना इतक्या संस्थानांची पार्लमेंट भरली.

नाईस प्रांत ही गॅरिबाल्डीची जन्मभूमी होती. हा प्रांत काव्हूरच्या कृतीनें हातचा गेल्यामुळें काव्हूर व गॅरिबाल्डी याच्यात वितुष्ट आलें. नेपोलियनला काव्हूरनें पोपचें रक्षण करण्याबद्दल वचन दिलें असल्यकारणानें रोमवर स्वारी करणें काव्हूरच्या दृष्टीनें इष्ट नव्हतें. परंतु गॅरिबाल्डीची तयारी पाहून काव्हूरनें पोपच्या सत्तेखालील संस्थानें आपल्या राज्यास जोडावयाचीं, मात्र रोमला हात लावावयाचा नाहीं असें ठरविलें. अखेर सप्टेंबर १८५९ त व्हिक्टर इम्यान्युअलनें नेपल्सचें राज्य घतलें.

यानंतर गॅरिबाल्डी व काव्हूर याच्यात पुन्हा तेढ उत्पन्न झाली. कारण गॅरिबाल्डी दक्षिण इटलींतील संस्थानावरील आपली सत्ता सोडावयास तयार नव्हता व त्याच्या मनातून रोमवर स्वारी करण्याचें होतें काव्हूरनें पार्लमेंट सभा बोलावून या प्रश्नावर मतें घेतलीं. मतें काव्हूरच्या बाजूनें पडल्यामुळें गॅरिबाल्डीनें राष्ट्राच्या इच्छेला मान देऊन आपण जिंकलेले सगळे प्रांत उदारपणें व्हिक्टर राजाला देणगी म्हणून दिले.

यापूर्वी कांहीं वर्षें रोमच्या पोपची सत्ता परकीय लोकांच्या जिवावर चालली होती. अशी स्थिति असेपर्यंत 'संयुक्त इटली' हें आपलें ध्येय साध्य होणे अशक्य आहे असें काव्हूरला वाटलें म्हणून त्यानें १८६१ च्या जानेवारींत रोम ही इटलीची राजधानी व्हावी असा ठराव पार्लमेंटमध्यें आणला व तो पासहि झाला. परंतु नेपोलियनमुळें त्याला ही गोष्ट दिरंगाईवर टाकावी लागली शिवाय पोपची सत्ता अबाधीत ठेवण्याचें वेडहि त्याच्या मनात होतें. रोम व व्हेनीस हीं शहरें वगळून काव्हूरची बाकीची 'संयुक्त इटली' स्वतंत्र झाली होती. काव्हूरचीं आयुष्याचीं शेवटचीं वर्षे फार कष्टाचीं गेलीं. गॅरिबाल्डीला उदारपणें वागविण्याचें त्याच्या मनात होतें. गॅरिबाल्डींशीं झालेल्या प्रसंगानें त्याचें आयुष्य कांहींसें कमी केलें यात शंका नाहीं. तारीख ६ जून १८६१ रोजीं तो मरण पावला. त्याचा दफनविधि सँटेना येथें झाला.

काव्हूरच्या मृत्यूनें इटलीची फार भयंकर हानी झाली. त्याच्यासारख्या बुद्धिमान् व मुत्सद्दी पुरुषाची इटलीला अद्यापीहि गरज होती. डी आर्टम्, हा काव्हूरचा खासगी कारभारी, लिहितो कीं "काव्हूरला राजकीय बाबतींत उच्च उच्च ध्येयाचीं स्वप्नें कधीं पडत नसत. त्याच्या मताचा विकास क्रमाक्रमानें होत जाई. सत्य व साध्य असेल तें करण्यापलीकडे काव्हूरनें आपल्या प्रयत्नांचा संचार जाऊं दिला नाहीं." मुत्सद्दीपणा व दूरदर्शित्व हे काव्हूरच्या अंगचे ईश्वरदत्त गुण होते. विचारानें तो नेमस्त व उदार होता. लष्कर थोडें असल्यानें ऑस्ट्रियाच्या विरुद्ध इतर राष्ट्रांशीं संगनमत करण्यात त्याला आपला बुद्धि खर्चावी लागे. नेपल्सशीं झालेलें काव्हूरचें वर्तन राजकीयदृष्ट्या अनीतीचें होतें असें कित्येक टीकाकार म्हणतात. तसेंच यानें

आपली मतें बदलली अशाहि याच्यावर आरोप आहे. काव्हूरचें ध्येय, इटली स्वतंत्र करून तिची पुनर्घटना करणें हें होतें व त्याच्या प्रीत्यर्थ त्यानें आपलें आयुष्य व बुद्धिमत्ता हीं सर्वी घालून तें गाठलें.

**काव्हूर शहर**—हें शहर इटलीमध्यें ट्यूरिन देशात नैर्ऋत्येस ३२ मैलावर आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ८९२४. मध्ययुगात बांधलेल्या किल्ल्याचे मोडकळीस आलेले भाग अजून दृष्टीस पडतात. काव्हूर या प्रसिद्ध मुत्सद्याच्या घराण्याचें नाव याच गावावरून पडलें.

**कॉव्हेंट्री**—इंग्लंडमध्यें वॉरविक शायरमधील म्युनिसिपल व पार्लमेंटरी बरो. हें लंडन आणि नॉर्थवेस्टर्न रेल्वेनें लंडनच्या वायव्येस ९४ मैलावर आहे. लोकसंख्या ( १९२१ ) १,२८,२०५. हें शहर उंचवटयाच्या प्रदेशावर असून त्याला शेरबोर्न व रॅडफर्डब्रूक या नद्यांचें पाणी मिळतें येथें बरींच प्रार्थनामंदिरें आहेत. सेंट मेरी दिवाणखाना व ऑक्सफोर्डच्या सेंट जॉन कॉलेजचा स्थापक व लंडनचा लॉर्ड मेअर थॉमस व्हाइट याचा पुतळा येथें आहे येथें मोफत व्याकरण शाळा, धंदेशिक्षणाची शाळा, कलाभुवन व मुलींकरिता शाळा व बालगुन्हेगाराची शाळा ह्या संस्था आहेत. बॉन्ड व फोर्ड हीं धमर्थ रुग्णालयें येथें आहेत तसेच सुंदर बागहि आहेत. मोटारी, सायकली, शिवणकामाचीं यंत्रें, सत्रज्या, रंग, धातुकाम, घड्याळें वगैरेचे कारखाने येथें आहेत. इ. स. १८८८ साली हें कौंटीबरो झालें. येथील कार्पोरेशनमध्यें एक मेअर, सनदी शहरचे १० अधिकारी व ३० सभासद असतात. येथून पार्लमेंटात एक प्रतीनिधि पाठविला जातो. शहरचें क्षेत्रफळ ४१४९ एकर आहे

अर्ल लिऑफ्रिक व त्याची पत्नी गॉडिव्हा यानीं येथें बेनिडिक्टाइन मठ स्थापिल्यामुळें हें शहर अस्तित्वात आलें. १३४५ साली तिसऱ्या एडवर्डनें येथें कार्पोरेशन स्थापिली. १६२२ साली पहिल्या जेम्सनें हें संघटित केलें १२९५ साली पार्लमेंटात तेथून दोन सभासद जात असत कॉर्पस ख्रिस्तीनंतरच्या शुक्रवारपासून ८ दिवस येथें जत्रा भरते. १२१६ पासून हें लोकरीच्या कपड्याच्या व टोप्याच्या व्यापाराकरिता प्रसिद्ध आहे. १७ व्या शतकातील युद्धामुळें येथील व्यापाराचा नाश झाला १६ व्या शतकाच्या मध्यकाली येथें निळ्या सुताचा कारखाना होता. १८ व्या शतकात येथें फीत तयार होत असे.

**काश**—या झाडास लॅटिनमध्यें सॅक्रारम् स्पॉन्टेनिअम, संस्कृतमध्यें काश किंवा चामरपुष्प, मराठींत कासेगवत, हिंदींत कास व गुजराथींत कासडो इत्यादि नावें आहेत.

हिंदुस्थान व सिलोनमधील ६,००० फूट उंचीच्या उष्णप्रदेशात हें गवत सापडतें. ओलसर व सराल अशा प्रदेशात हीं झाडें फार उंच वाढत असून याच्या फुलाचे दांडे १२ फूट उंच असतात याचीं वरीचशीं रोपें एकत्र सापडत असून असून त्र्याच्या बुडाशीं असणाऱ्या पाढऱ्या कुसळांमुळें तीं सहज ओळखता येतात. पावसाळा संपल्यावर रोपाना फुलें येतात.

याची वाढ फार जोराची असल्यामुळें हीं रोपें समूळ उपटून काढता येत नाहींत. विशेषत आसाम व बंगालमधील चहाच्या मळ्यांत याचा बराच उपद्रव होतो. हें गवत मोठें गाढ व राठ असून घराची शाकारणी करण्यास याचा उपयोग होतो पानें, देठ वगैरेंपासून दोर व चटया करतात. परंतु या कामीं हें मुंज गवतापेक्षा हलक्या प्रतीचें समजतात. मुंज गवतापेक्षा याचा चारा चागला असतो हें गवत म्हशी व रेडे याना विशेषेंकरून घालतात. देशी लिखाण्यासाठीं बोरूसारखीं याचीं काडीं फार उपयोगी पडतात. [ वॅट, पदे; वैद्यक शब्दसिंधु, सेन—आयुर्वेदिक सिस्टिम ऑफ मेडिसिन. ]

**काशी**—हें संयुक्त प्रातातील बनारस जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे हें गंगेच्या काठीं वसलेलें असून संयुक्त प्रांतात लोकसंख्येच्या मानानें लखनौच्या खालोखाल आहे. हें कलकत्त्यापासून ४७९ व मुंबईपासून ९४१ मैल दूर आहे. येथें यात्रेकरू नेहमीं येत जात असल्याकारणानें, येथील लोकसंख्या नेहमीं बदलत असते. इ स. १९२१ साली या शहराची एकंदर लोकसंख्या १,९८,४४७ होती व इ स. १९११ मध्यें १,९९,८६८ असून त्यापैकीं हिंदूची लोकसंख्या १,४२,७५६, मुसलमानाची ५५,४०७ व ख्रिस्त्याची ९८१ होती. गावाजवळून कॅंटोनमेंट असून तेथें इ स. १९११ साली २९२६ लोक रहात होते.

काशी हें भरतखंडातील अत्यत प्राचीन शहरांपैकीं एक शहर होय याला हिंदुस्थानचें अथेन्स अगर रोम असें म्हणता येईल काशीचा इतिहास म्हणजे हिंदुधर्माचाच इतिहास असें म्हटल्यास वावगे होणार नाहीं आर्यांच्या संस्कृतीचें, विद्येचें व तत्वज्ञानाचें माहेरघर म्हणून या शहराची ख्याति असून अद्यापिहि ती थोड्या फार फरकानें तशीच कायम आहे. वैदिक धर्म व बौद्ध धर्म या ठिकाणाहून सर्व भरतखंडात विस्तार पावले. सर्व भरतखंडात हें शहर अत्यत पवित्र असें यात्रेचें ठिकाण मानलें जातें.

या शहराला काशी नावाच्या प्राचीन वेदकालीन राष्ट्रावरुन हें नाव पडलें असावें असें दिसतें या काशी लोकाच्या राजाला काशीराज असें म्हणत असत व या काशीराजासंबंधीं पुष्कळ दंतकथा या प्रातात प्रचलित आहेत. काशी याचा धात्वर्थ (काश्) चकाकणें असा असून सर्व शहरात चकाकणारें शहर या नात्यानें त्याला काशी हें नाव पडलें असावें असें काहींचें मत आहे पण तें बरोबर असेल असें वाटत नाहीं. प्रसिद्ध व्याकरणकार पाणिनी यानें काशी लोकाचा आपल्या ग्रंथात उल्लेख केलेला आहे व त्याचप्रमाणें ख्रिस्तशकापूर्वी पुष्कळ संस्कृत व पाली ग्रंथातहि या लोकाचा उल्लेख आढळतो. बृहत्संहितेंत काशी या शब्दाचा जनवाचक व स्थलवाचक, अशा दोन्ही तऱ्हेनें उपयोग केलेला आहे. अर्थातच बृहत्संहिताकालीं 'काशी' हें नाव स्थलालाहि लावण्यात

येत असावें असें सिद्ध होतें. भरतखंडातील सोळा संस्थानापैकीं काशी हें एक संस्थान होतें असें बौद्धग्रंथात म्हटलेलें आढळतें.

पण काशी शहराला काशी हें नाव पडण्यापूर्वी 'वाराणशी' हें नाव असावें असें दिसतें. वरणा व असि या दोन नद्यामधील प्रदेशात हें शहर वसलें असल्यानें या शहराला वाराणशी हें नाव पडलें असावें अशी समजूत आहे बौद्धाच्या जातक ग्रंथात व कांहीं संस्कृत ग्रंथात 'वाराणशी' या नावानें काशी शहराचा उल्लेख आढळतो. बनार राजा या शहरावर राज्य करीत होता, त्यावरून त्याला 'बनारसी,-वाराणशी' असें नाव पडलें असावें असाहि कित्येकाचा तर्क आहे. याशिवाय या शहराला 'अविमुक्त' हें नाव पुराणात दिलेलें आढळतें. तसेंच या शहराला जातकग्रंथात सुदस्तन, पुष्पावती वगैरे उपनामें दिलेलीं आहेत. अठराव्या शतकात दिल्लीच्या महंमदशहानें या शहराचें नाव 'महंमदाबाद' ठेवण्याचा यत्न केला, पण त्यात त्याला यश आलें नाहीं.

इतिहास.—राजा दिवोदासानें हें काशी शहर वसविलें अशी दंतकथा प्रचलित आहे. पण त्यासंबंधीं खात्रीलायक पुरावा मिळत नाहीं. खि. पू. ६०० च्या पूर्वी कोसल राजानीं हें शहर व त्याच्या आसपासचा मुलूख जिंकून घेतला. पुढें खि. पू ५०० च्या सुमारास मगधराजाची सत्ता प्रबळ होऊन कोसलाच्या ताब्यातील सर्व प्रदेश मगधदेशाच्या शैशुनाग राजाच्या ताब्यात गेला. त्याबरोबर काशी हें मगधाच्या ताब्यात गेलें. यानंतर अनुक्रमें मौर्य, शुंग, गुप्त इत्यादि राजानीं या शहरावर आपला अंमल बसविला होता. खिस्ती शकाच्या सातव्या शतकात काशी शहर हर्षवर्धनाच्या ताब्यात गेलें. पुढें बाराव्या शतकात कनोजच्या गहरवार राजाच्या ताब्यात हें शहर आलें. या राजघराण्यातील शेवटचा राजा जयचंद याचा ११९३ मध्यें महंमद घोरीनें पराभव केला. तेव्हापासून काशी हें मुसलमानी सत्तेखालीं आलें.

महंमद घोरी हा काशीस लुटालूट करण्यास आला होता. तेथील विश्वेश्वराचें देऊळ औरंगझेबानें १६६९ च्या सप्टेंबरात मोडलें. काशी व प्रयाग हीं क्षेत्रें मुसुलमानाकडून परत घेण्याबद्दल पेशव्यानीं अखेरपर्यंत खटपट केल्याचें प्रसिद्ध आहे.

श्री. थोरले माधवरावसाहेब हे स्वर्गवासी होण्याच्या आधीं सरासरी १॥ महिन्यापूर्वी त्यानीं राज्यातील मुख्य प्रतिष्ठित मुत्सद्याकडून जिच्या अंमलबजावणीबद्दल शपथा घेवविल्या होत्या त्या नऊ कलमी यादींत काशीक्षेत्राचा संबंध पुढीलप्रमाणें आला आहे. " श्रीकाशीप्रयाग हीं दोन्ही स्थळें सरकारात ( मराठी साम्राज्यात ) यावीं, असा तीर्थरूपाचा ( नानासाहेबाचा ) हेत होता त्यास प्रस्तुत ( प्रयत्न )करावयाजोगे दिवस आहेत. दहावीस लक्षाची जहागीर मुबदला ‹ ती देऊन दोन्हीं स्थळें हस्तगत करावी ( असा ) प्रयत्न करावा. " श्री. मा. गोपिकाबाई याची इच्छा काशीयात्रा करण्याची होती असें या यादींतच म्हटलें आहे. "ती. मातुश्री बाईसाहेबाचा हेत काशीस जावयाचा आहे. त्यास सुपथा पडल्यावर यात्रा घडवावी." पेशवे याच्या घराण्याचा उत्कर्ष व्हावा म्हणून नारायण दीक्षित पाटणकर यानीं अनुष्ठान केलें होतें. तदंगभूत प्रतिवर्षी एक लक्ष ब्राह्मणभोजन व एक कोटी दूर्वादलसमर्पण करण्याचें व्रत थोरले बाजीराव याच्या वेळेपासून पेशवे यानीं पत्करिल्याचें प्रसिद्ध आहे. त्यास अनुलक्षून यादींत पुढील कलमें आहेत: " काशीस दोन लक्ष ब्राह्मणभोजन करावें, दक्षणा दोन पैसे प्रमाणें द्यावी. काशीचे ब्राह्मणास वर्षासनें आहेत तीं(पिढी दर) पिढी देऊन वर्षास पावती करीत जावीं "

श्री नानासाहेबाच्या वेळेस काशी घेण्याच्या खटपटीस चांगलेंच तोंड लागलें होतें. इ. स. १७६४ पूर्वी काशी देण्याचें सफदरजंगानें कबूल केलें होतें. तेव्हा पेशव्यानीं बाबूराव महादेवास अंमल बसविण्यास तेथें धाडलें. त्यावेळीं मात्र सफदरजंग (अयोध्येचा नवाब) काशी देण्यास अटंटळ करूं लागला याच वेळीं जयाप्पा शिंदे यानींहि काशी घेण्याबाबत फार खटपट केली होती परंतु ते १७५५ त वारल्यामुळें ही मसलत तहकूब राहिली. पुढें १७५८-५९ त दत्ताजी शिंद्यानीं पुन्हा प्रयत्न सुरू केला इतक्यात अबदालीचें बंड व पानिपत प्रकरण होऊन त्यामुळें हाहि यत्न मागें पडला. यानंतर केव्हाहि हें क्षेत्र मराठ्याना मिळालें नाहीं. श्री. नानासाहेबानीं १७४३ च्या सुमारास हिंदुस्थानात स्वारी केली. त्या वेळीं ते काशीजवळ येऊं लागले असता, सफदरजंग यानें काशीच्या ब्राह्मणाना भीति घातली कीं, तुम्ही आपले ब्राह्मण राजास मागें फिरवा, नाहीं तर तुम्हास बाटवून मुसुलमान करूं त्यावर नारायण दीक्षित ( पाटणकर ) याना पुढें करून काशीकर ब्राह्मण श्रीमंताकडे अर्ज करण्यास आले. तेव्हा " ब्राह्मणास माझ्यामुळें त्रास होत असेल तर मी काशीस येत नाहीं. मात्र मला गंगास्नान घडावें " असें त्यानीं त्याना उत्तर दिलें व ब्राह्मणाबरोबर जाऊन गंगास्नान करून परत आले

रघुनाथराव दादा पेशवे याचे चिरंजीव चिमणाजीपंत ( ज्याना यशोदाबाई याना दत्तक दिले होतें. ) याना पेशवाईनंतर इंग्रजानें पेनशन देऊन ठेविलें होतें. ते तेथेच वारले.

शहाअलमशहा दिल्लीकर हा इंग्रजाच्या गोटात काशीस कांहीं दिवस होता, नंतर तेथून महादजी शिंदे याच्या आश्रयास आला. येथें स्नानसंध्या करून राहण्याचा बेत रघुनाथरावदादानीं अनेकवार केला होता [ मुस. रिया; मरा. रिया. मध्य वि, इति. संग्रह; राज. खं. १; ४;१२. ].

पुढें इसवी सन १७७५ च्या नंतर इंग्रजाचा अम्मल या शहरावर सुरू झाला, तो अद्यापिहि चालू आहे.

इंग्रज गव्हर्नर हेस्टिंग्ज याच्या राजवटींत काशी संस्थानचा नवाब वझीर अल्लीनें मध्यें बंड केलें पण तें निष्फळ ठरलें व संस्थान अयोध्येच्या नवाबाच्या राज्यांतून निघून कंपनीच्या मुलुखांत पडलें. पुढें हेस्टिंग्ज व राजा चेतसिंगाचें भांडण होऊन काशी शहर कंपनीकडे आलें इंग्रजांच्या अमलाखालीं काशी शहराला पुन्हा बरे दिवस प्राप्त झाले. धार्मिक बाबतींत ढवळाढवळ न करण्याचें धोरण इंग्रजांनीं ठेवल्यामुळें, काशी हें पुन्हा धर्माचें पीठ होऊन बसलें. येथें अनेक देवळें बांधण्यांत आलीं, व हिंदु धर्माचें पुनरुज्जीवन होऊं लागलें.

दे व ळें, ती र्थे व घा ट.—चिनी प्रवासी ह्युएनत्संग हा ७ व्या शतकात हिंदुस्थानात आला होता त्यावेळीं काशीमध्यें ३० बुद्धविहार व १०० हिंदूंचीं देवालयें होतीं असें त्याच्या प्रवासवृत्तावरून समजतें. आजमितीस काशींत १५०० हून अधिक देवळें आहेत यांपैकीं जवळजवळ निम्म्याहून अधिक देवळें ब्रिटिशांच्या अमदानींत बांधलीं गेलीं नदीच्या काठीं उभें राहिलें असता आपल्याला घाटांची रांगच्या रांग दृष्टीस पडते हे घाट फार सुंदर बांधलेले आहेत. हे घाट फार पवित्र मानले जातात. या घाटांची संख्या ४० हून अधिक आहे त्यांतल्या त्यात प्रसिद्ध घाट म्हणजे, असिसंगम, दशाश्वमेध, मणिकर्णिका, पचगंगा व वारणासंगम हे होत याशिवाय इतर घाटहि प्रेक्षणीय आहेत. पुष्कळ हिंदु राजांनीं आपआपल्या खर्चानीं आपल्या नावाचे घाट बांधविले आहेत. जयपूरचा राजा मानसिंग यानें एका दिवसात एक लाख छोटीं देवळें बांधलीं असें म्हणतात. प्रत्येक घाटासंबंधानें काहीं दंतकथा प्रसिद्ध आहेच दशाश्वमेध व मणिकर्णिका या घाटासंबंधीं तर असंख्य दंतकथा प्रसिद्ध आहेत. दशाश्वमेध घाटासंबंधीं अशी दंतकथा सांगतात कीं, राजा दिवोदासानें आपल्या धर्मबळाच्या जोरावर काशींतून सर्व देवांना हाकलून लावलें. शिवाला पुन्हा काशींत येण्याची इच्छा झाल्यामुळें त्यानें ब्रह्मदेवाला दिवोदासाकडून तशी परवानगी मिळविण्याची विनंति केली. ब्रह्मदेवानें एका वृद्ध ब्राह्मणाचा वेष धारण करून तो दिवोदासाकडे आला. त्याची पूजा करून त्याला काय इच्छा आहे तें मागण्यास राजानें सांगितलें ब्रह्मदेवानें दिवोदासाजवळ एका यज्ञाचें साहित्य पुरविण्याबद्दल विनंति केली. यज्ञसाहित्य जमा करणें अत्यंत भानगडीचें काम असल्यामुळें, दिवोदास हा काहीं तरी चूक करील व अशा रीतीनें आपली अयोग्यता प्रस्थापित करील असें ब्रह्मदेवाला वाटत होतें. पण दिवोदास हा लेचापेचा नव्हता त्यानें एका यज्ञाचच नव्हे तर दहा यज्ञाचें सर्व साहित्य त्या वृद्ध ब्राह्मणाला पुरविलें त्या साहित्याच्या योगानें त्या ब्राह्मणानें दशाश्वमेध केला. अशा रीतीनें या दशाश्वमेध घाटाला अत्यंत पवित्रता प्राप्त झाली कार्तिक अमावस्येच्या दिवशीं दशाश्वमेधघाटावर देवताविसर्जनाचा समारंभ होतो व तो फार प्रेक्षणीय असतो.

दशाश्वमेधाच्या दक्षिणेस शीतलाघाट आहे नंतर चौकीघाट लागतो. या घाटावर एक मोठा अश्वत्थवृक्ष असून त्याच्या खालीं एक लिंग असून भोंवती पुष्कळ सर्पाकृती व इतर मूर्ती आहेत नंतर केदारघाट येतो. या केदारघाटावर सर्व रोगनिवारक गौरीकुंड आहे. त्यानंतर थोडेसें चालून गेल्यावर शिवाल घाट लागतो. अशा रीतीनें पुष्कळ घाट लागल्यावर मानमंदिर घाटाचा देखावा दिसूं लागतो. या घाटाच्या वरच्या बाजूस एक मोठी इमारत आहे. हा घाट व ही इमारत अंबेरचा राजा मानसिंग यानें बांधविली. हा राजवाडा पुढें राजा जयसिंग या प्रसिद्ध ज्योतिष्यानें वेधशाळेसाठीं उपयोगांत आणिला. या घाटानंतर नेपाळी घाट लागतो. पण सर्वांत महत्वाचा घाट म्हणजे मणिकर्णिका घाट होय कार्तिक महिन्यात अगर एखाद्या उत्सवाच्या प्रसंगीं या घाटावर जो देखावा दृष्टीस पडतो तसा देखावा जगामध्यें इतर ठिकाणीं क्वचितच दृष्टीस पडतो असें हॅवेलनें म्हटलें आहे या घाटासंबंधीं काशीखंडांत पुढील कथा आहे – "विष्णूनें या ठिकाणीं आपल्या चक्रानें विहीर खणली व ती आपल्या घामानें भरून काढली नंतर तो तेथून उत्तर रेच्या दिशेस थोडया अंतरावर जाऊन तपश्चर्या करीत बसला. काहीं वेळानें त्या ठिकाणीं शंकर आले व त्यांनीं त्या विहीरींत डोकावून पाहिलें, तों त्यांना त्या विहीरींत कोटयावधि सूर्यांचें तेज दृष्टीस पडलें त्यामुळें ते अत्यंत प्रसन्न होऊन विष्णूची स्तुति करूं लागले व वाटेल तो वर मागण्यास त्यांनीं विष्णूला आज्ञा केली. विष्णूनें त्यांना या कुंडांत निरंतर रहाण्याची प्रार्थना केली. या मागण्यानें शंकरांना फार आनंद झाला व त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्यामुळें त्याच्या कानांतून मणिकर्णिका(जल)विहिरींत पडलें व त्यावरून या कुंडाला मणिकर्णिका हें नांव पडलें. हें कुंड अत्यंत पवित्र मानलें जातें या घाटावरील आणखी एक महत्वाचें स्थळ म्हणजे 'चरणपादुका' हें होय. या चरणपादुकांचेंहि प्रत्येक भक्त भक्तिभावानें पूजन करतो. यानंतर शिंदेघाट, बाजीरावघाट, भोंसलेघाट, रामघाट, चोरघाट हे लागल्यावर पचगंगाघाट लागतो. या ठिकाणीं धूतपापा, सरस्वती, किरणा, यमुना व गंगा यांचा अदृश्य संगम झाला आहे असें मानतात कार्तिकांत येथील देखावाहि पाहण्यालायक असतो. यानंतर गायघाट वगैरे बरेच घाट लागतात पण ते विशेष महत्वाचे नाहींत.

काशीमधील सर्व देवळांचें यथार्थ वर्णन करावयाचें म्हणजे एक मोठा ग्रंथच होईल म्हणून त्यांतल्या त्यांत महत्वाच्या देवळांचेंच अगदीं थोडक्यांत वर्णन लिहिलें आहे. त्रिलोचनघाटावर त्रिलोचनाचें देवालय आहे. वैशाख महिना या देवाचें सतत पूजन करण्यांत घालविल्यास त्याला मोक्ष मिळतो अशी समजूत आहे. रामनगरभागांत व्यासेश्वर नांवाचें एक देवालय आहे. रामनगरभागांत राहाणाऱ्या प्रत्येक व्यासेश्वराचें मांधात दर्शन घेतलें असता त्याला

भीति नाहीं अशी दंतकथा प्रचलित आहे अनपूर्णेचें देवालय तेथें होणाऱ्या अगणित अन्नदानासाठीं प्रसिद्ध आहे हें देवालय बाजीराव पेशवे यांनीं बांधलें या देवालयाच्या भोंवतीं भिक्षेसाठीं असंख्य भिक्षेकरी जमलेले असतात या देवालयाच्या नजीक गणेश अगर विनायकपालचें देऊळ आहे प्रत्येक यात्रेकरूनें या देवालयाचें दर्शन घेतलेंच पाहिजे, त्याशिवाय त्याची यात्रा पुरी झाली नाहीं असें मानण्यात येतें सर्वांत प्रमुख देऊळ म्हणजे विश्वेश्वराचें देऊळ होय. हें सोन्यानें मढविलेलें आहे विश्वेश्वररूपी शिवाची मूर्ति या देवळात असून ही मूर्ति सर्व शहराचें संरक्षण करते असें मानण्यात येतें विश्वेश्वर हा काशीशहराचा राजा आहे असें तेथील लोक समजतात हें स्थान फार पवित्र मानले जातें. हें देऊळ फारसें सुंदर नाहीं व विशेष मोठेंहि नाहीं लाहोरचा राजा रणजितसिंग यानें या देवळाला सोन्याचा मुलामा दिला हें देऊळ इंदोरच्या अहिल्याबाई राणीनें बांधलेलें आहे विश्वेश्वराच्या खालोखाल भैरवनाथाचें देऊळ महत्वाचें मानलें जातें भैरवनाथ यास शहराचा कोतवाल समजतात राक्षस अथवा दुष्ट लोकापासून हा शहराचें रक्षण करतो अशी समजूत आहे याशिवाय बिंदुमाधव, दुर्गा इत्यादि देवतांचीं पुष्कळच देवालयें आहेत ज्ञानवापी, नागकूप, पिशाचमोचन कुंड इत्यादि प्रमुख कुंडहि प्रसिद्ध आहेत

काशीच्या भोंवतालची कांहीं मैल जागा अत्यंत पवित्र मानली जाते प्रत्येक यात्रेकरूला काशीभोंवतीं प्रदक्षिणा घालावी लागते याला पंचकोशीची यात्रा असें म्हणतात या पंचकोशी यात्रेला मणिकर्णिका घाटापासून सुरवात होते तेथून निघून, यात्रेकरू पहिल्या दिवशीं असिसंगम घाटापर्यंत जातो व तेथून जवळच असलेल्या एका खेडेगांवात विश्रांति घेतो दुसऱ्या दिवशीं तो धूपचंदीपर्यंत जातो, तेथून तिसऱ्या दिवशीं तो रामेश्वर येथें येतो चौथ्या दिवशीं शिवपूर येथपर्यंत त्याची यात्रा होते पांचव्या दिवशीं शिवपुराहून तो कपिलधारेला येऊन पोहोंचतो व सहाव्या दिवशीं कपिलधारेहून वर्णा–संगम येथें येऊन मणिकर्णिकेला परत येतो वाटेंत त्याला जवळ जवळ ६०० देवालयें लागतात प्रत्येक ठिकाणीं त्याला पुष्कळ दानधर्म करावा लागतो

फार प्राचीन काळापासून काशी शहराची तीर्थस्थान या नात्यानें प्रसिद्धि आहे आपल्या धर्माचीं तत्वें लोकांना पटवून देण्याकरिता, बुद्धानें या शहराजवळ असणाऱ्या सारनाथ या ठिकाणीं वास्तव्य केलें त्यावरून बुद्धकाळीं काशी हें धर्माचें केंद्र होतें असें सिद्ध होतें बुद्ध धर्माचा जरी काशीच्या आसपास पुष्कळ प्रसार झाला होता तरी काशी शहरात ब्राह्मणीधर्माचेंच वर्चस्व होतें ! ह्युएनत्संग ज्यावेळीं काशी येथें आला त्यावेळी देखील काशी मध्यें शिवभक्तांची संख्या पुष्कळ होती, असें त्याला आढळलें

जैनांचा सातवा तीर्थंकर सुपार्श्वनाथ याचा जन्म काशींतच झाल्यानें हें स्थान जैनांनींहि पवित्र मानिलें आहे वच्छराज व असिसंगम या घाटाच्या दरम्यान पुष्कळ जैन देवालयें आहेत मुसुलमानांच्याहि मशिदी या ठिकाणीं पुष्कळ आहेत, व मुसुलमानी पीराचा पूजा करणारेहि कित्येक हिंदू लोक आढळतात

काशी हें ज्याप्रमाणें फार प्राचीन काळापासून धर्माचें माहेरघर होतें त्याचप्रमाणें तें इतर विद्यांचेंहि पीठ होतें निरनिराळ्या शास्त्रांचें या ठिकाणीं अध्ययन केलें जात असे इ स १८१७ मध्यें वेदांचें अध्ययन करणारे ८९३ विद्यार्थी असून वेदशास्त्रपारंगत असे ४८ आचार्य होते, असें वॉर्डेन म्हटलेलें आहे तसेंच पाणिनीच्या व्याकरणाचें अध्ययन करणारे २१८ विद्यार्थी असून, त्यांना शिकविणारे १८ गुरु होते असेंहि त्यानें लिहिलें आहे याशिवाय धर्मशास्त्र, न्यायशास्त्र इत्यादि इतर शास्त्रांचेंहि अध्ययन केलें जात असे विज्ञानेश्वर हा मिताक्षरेवरील प्रसिद्ध भाष्यकार येथें अध्यापनाचें काम करीत असे. एखाद्या नवीन धर्मप्रवर्तकाला आपलें तत्व प्रचलित करावयाची इच्छा असल्यास त्यानें काशी येथे येऊन तेथील पंडिताची खात्री पटवून देण्याचा प्रघात असे त्याप्रमाणें, आद्यशंकराचार्य हे आपल्या शिष्यगणासमवेत या ठिकाणीं आपल्या तत्वज्ञानाचा माहिती देण्या करता आले होते याशिवाय, कबीर चैतन्य, वल्लभाचार्य, तुळशीदास इत्यादि महान् साधु हेहि काशींत येऊन आपल्या मतप्रसारार्थ राहिले होते १८ व्या शतकात या शहरात पुष्कळच शास्त्रीपंडिताचा भरणा होता १८१० च्या सुमारास हती 'विद्यालंकारा' नावाची एक वंगपंडिता काशींत शास्त्राचं अध्यापन करीत असे, असें ग्रीयरसननें म्हटलें आहे अद्यापि देखील संस्कृत भाषेचें अध्ययन व अध्यापन या ठिकाणीं चाललेलें आढळतें ब्रिटिशाचा अमल सुरु झाल्यापासून या ठिकाणीं पाश्चात्य शिक्षणाच्या शाळाहि स्थापन झाल्या आहेत. इ स १७९१ मध्यें बनारस कॉलेज स्थापन झालें हें सरकारी असून त्याला संस्कृत कॉलेजहि जोडलेलें आहे इ स १८९८ मध्यें,डॉ ॲनी बिझांट बाईंच्या खटपटीनें सेंट्रल हिंदुकॉलेजची स्थापना झाली या कॉलेजमध्यें बी ए पर्यंतचा अभ्यास करून घेण्यात येत असून तें अलाहाबाद येथील विश्वविद्यालयास जोडलेलें होतें या कॉलेजात धार्मिक व नैतिक शिक्षणहि दिलें जात असे शिवाय या कॉलेजला जोडून एक मुलींची शाळा उघडण्यात आली होती हल्लीं हें कॉलेज नवीनच स्थापन झालेल्या हिंदु विश्वविद्यालयास जोडलें आहे १७ व्या शतकात राजा जयसिंगानें जें महाविद्यालय स्थापिलें तें हल्लीं मिशनरी संस्थेच्या ताब्यात आलें आहे याशिवाय मिशनरी सोसायटीच्या व म्युनिसिपालिटीच्याहि पुष्कळ शाळा असून पाच सहा वाचनालयेंहि आहेत

उद्योगधंदे—येथें पितळेचें सामान चांगल्या प्रकारचें तयार होतें किनखाप, रेशीम, जर, मोती व लाखेचें सामान

उत्कृष्ट प्रकारचें तयार केलें जातें. येथें दोन वर्फाचे कारखाने, सात विद्यांच्या भट्या, दोन रसायनशास्त्रीय संस्था, दोन लोखंडाचे, चार चुन्याचे, एक गालिच्याचा असे वरेच कारखाने व कांहीं छापखाने आहेत. सुमारें १५ नियतकालिकें येथें निघतात. पण तीं महत्वाचीं नाहींत संस्कृत कॉलेजतर्फे, येथें 'पंडित' नांवाचें मासिकपुस्तक पूर्वी प्रसिद्ध होत असे.

पु रा ण व स्तु सं शो ध न.—काशीच्या आसपास व खुद्द काशी शहरात पुराणवस्तुसंशोधनाला पुष्कळच क्षेत्र आहे. काशीच्या आसपास लहान लहान अशीं असंख्य देवळें आहेत व तीं राजा मानसिंगानें एका दिवसात बांधविलीं अशी दंतकथा आहे. पण त्या देवालयाच्या शिल्पाकडे पाहिलें असता, तीं मानसिंगाच्याहि पूर्वीचीं दिसतात. त्यापैकीं वरीचशीं बौद्धकालीन दिसतात. हल्लीं सारनाथाच्या आसपासचीं देवळें खणून बाहेर काढण्याचें काम चालू आहे. मुसलमानांनीं उध्वस्त केलेल्या अशा पुष्कळच इमारती येथें आहेत. औरंगझेवाच्या मशीदीच्या मागें एका देवळाचा अवशेष आहे. या अवशेषावरून त्या ठिकाणीं पूर्वी एखाद भव्य ब्राह्मणांचें अगर जैनांचें देवालय असावें असें वाटतें कदाचित तेथें एखादें धर्माची चर्चा करण्याचें मंदिर असावें असेंहि मानण्याला जागा आहे. तसेंच अढ्हाइ कँगुरा नावाची एक मशीद असून तेथें पूर्वी एक बुद्धाचें अगर हिंदूंचें धर्ममंदिर असावें असें दिसतें राजघाटाच्या पश्चिमेस 'भैरव का तलाव' म्हणून एक तलाव असून त्या ठिकाणीं जुन्या इमारतींचे अवशेष सापडतात. त्या तलावाजवळील एका मोठ्या इमारतीच्या वरच्या भागावर एक लाटभैरवाची मूर्ति आहे ही मूर्ति व तीवरील शिल्प पाहिलें असता ती अशोककालीन असावी असें दिसतें. बकरीच्या कुंडाच्या आसपासहि पुराणवस्तुसंशोधनाला योग्य अशीं पुष्कळ स्थळें आहेत.

क ला.—काशीमध्यें शिल्पकला, चित्रकला, वगैरे कलांचे उत्कृष्ट नमुने पहावयाला मिळत नाहींत. देवळांच्या भिंतीवर जीं चित्रें काढलेलीं आढळतात तींहि सुंदर नाहींत. मुसुलमानी मशीदी अगर ब्रिटिश अमदानींत बांधलेलीं देवळें जरा बरीं बांधलेलीं दिसतात. तरी पण कलेच्या दृष्टीनें त्यात विशेष प्रेक्षणीय असें कांहीं आढळून येत नाहीं.

कँ न्टो न में ट.—काशी शहराच्या पश्चिमेस युरोपियन लोकांचें रहाण्याचें ठिकाण आहे त्याला कँटोनमेंट असें म्हणतात. या ठिकाणीं टांकसाळ, प्रिन्स ऑफ वेल्स हॉस्पिटल, टॉऊन हॉल इत्यादि मोठ्या इमारती आहेत.

काशी संस्थानची माहिती ' बनारस जमीनदारी ' या लेखाखालीं येईल.

[ संदर्भग्रंथ.—ई. बी. हॅवेल-बनारस १९०६, शेरिंग-दि सेक्रेड सिटी ऑफ दि हिंदूज ( १८६८ ), ई. गॅ. ७. तीर्थयात्रा-प्रबंध. ]

काशीनाथोपाध्याय.—काश्युपाध्यायाचा नातू, यज्ञेश्वराचा पुतण्या व अनंतोपाध्यायाचा ज्येष्ठपुत्र. यास लोक बाबापाध्ये म्हणतात. धर्मशास्त्रावर धर्मसिंधु म्हणून जो ग्रंथ आहे तो यानें लिहिला ( १७९१ ). हा जातीचा कऱ्हाडा ब्राह्मण व पंढरपूर येथील रहाणारा होता. वारकरीहि यास वरेच मानीत असत कर्नाटकातील बहुतेक कृष्णाचार्यादिक आचार्य याचेच शिष्य होते असा समज आहे.

धर्मसिंधुसारखेरीज प्रायश्चित्तेंदुशेखर, वेदस्तुति-टीका हे याचे दुसरे ग्रंथ होत. रत्नागिरी जिल्ह्यातील गोवेली नावाचा गाव याच्या वंशजास अग्रहार म्हणून दिला गेला आहे.

काशीपूर, त ह सी ल.—संयुक्तप्रांत नैनिताल जिल्ह्यानैर्ऋत्येकडील तहसील व पोटविभाग. क्षे. फ १८९ चौ. मै. लो. सं. ( १९११ ) ६१,१८४. या तहसिलींत ११८ खेडीं व काशीपूर ( तहशीलचें मुख्य ठिकाण ) व जयपूर हीं दोन मोठीं गावें आहेत. सर्व भाग सपाट असून तराईइतका दलदलीचा नाहीं

गा व.—संयुक्त प्रांतात नैनिताल जिल्ह्यामध्यें, असलेल्या याच नावाच्या तहसिलीचें मुख्य ठिकाण हे गाव मुरादाबादकडून येणाऱ्या रस्त्यावर आहे लो. सं. ( १९११ )१२७०३ गावाजवळ प्राचीन किल्ल्याचे व देवालयाचे पुष्कळ अवशेष आहेत. त्यावरून सातव्या शतकातील गोविसान राज्याची राजधानी येथें पूर्वी होती असें कनिंगहॅम यानें ठरविलें आहे आसपास पुष्कळ तळीं असून त्यापैकीं एकाला पांडवाचा गुरु द्रोण याचें नाव दिलेलें आहे. सोळाव्या किंवा सतराव्या शतकात परगण्याचा सुभेदार काशिनाथ यानें हें गाव वसविलें, व गावचें हल्लींचें नाव त्याच्या नावावरून पडलेलें आहे. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत येथील सुभेदार नंदराम हा अलमोऱ्याच्या चंद्रराजापासून बहुतेक स्वतंत्र झाला इ. स. १८०१ त हें गाव इंग्रजांकडे गेलें. त्यावेळीं तें चंद्रराजाचा पुतण्या शिवलाल याच्या ताब्यात होतें. गावात एक मध्यम प्रतीचं मार्केट असून मार्केटाखेरीज इतर घरें मातीचीं आहेत. राजवाडा ( चंद्रराजाच्या घराण्यातील एका शाखेचा राजा येथें असतो. )हीं सर्वांत मोठी इमारत होय. सरकारी कचेऱ्याखेरीज येथें एक शाळा व दवाखाना आहे. म्युनिसिपालिटीचें उत्पन्न १९०३-४ सालीं १४००० रु. होतें. कापड, भांडीं व इतर जिनसाचा व्यापार येथें भरभराटींत आहे.

काशीफळ.—ही भोपळ्याची जात आहे. या फळास ' चकी ' असेंहि म्हणतात. हें फळ फार मोठें नसतें. तें वसकट व कंगोरेदार असतें. याचा रंग हिरवा, पांढरा व शेंदरी असतो याचे वेल व फुलें भोपळ्यासारखींच असतात. पण वढ कमी असते याची लावणी भोपळ्यासारखीच असते. ह्या भोपळ्याच्या बियांपेक्षा लहान असते भोपळ्यापेक्षा

काशीफळाची भाजी कमी गोड असते कांहीं जातींची भाजी फिकी लागते. [ वनौ. गु भा. ४ ].

**काशीबाई पेशवे**—ही थोरल्या बाजीरावसाहेबाची पत्नी व चासकर जोशी यांच्या घराण्यातील महादजीपंत यांची मुलगी. पंताचा व बाळाजी विश्वनाथाचा स्नेह फार होता. ही पतीबरोबर स्वाऱ्यांत जात असे. हिचा स्वभाव शांत व गरीब असे. ही सासू ( राधाबाई ) सारखी राजकारणकुशल नव्हती. बाजीरावावर हिचें वजन बेताचेंच दिसतें. कदाचित् त्यामुळेंच मस्तानीचें प्रस्थ जास्त माजलें असावें. बाजीराव हे माळव्यांत शेवटच्या स्वारीस गेले असता ही त्यांच्याबरोबर होती. बाजीराव हे नर्मदाकाठीं रावेर येथें वारले. नंतर सैन्यासह बाई पुणें येथें ( ३।६।१७४० ) परत आल्या. दमाजी गायकवाडनें पुण्यावर स्वारी केली त्यावेळीं पेशव्यांची मंडळी सिंहगडास गेली होती, त्यावेळीं (८।३।१७५१) काशीबाई व तिची सासू राधाबाई याहि त्यांत होत्या असा उल्लेख सापडतो. काशीबाईचा अंत कधीं झाला तें नक्की आढळत नाहीं. ( म. रि. म. वि. ११२ ).

**काशीराज पंडित**—काशीराज शिवाजी हा महाराष्ट्रीय ब्राह्मण असून दिल्लीच्या बादशहाचा वजीर सफदरजंग याच्या पदरीं प्रथम नोकरीस राहिला. सफदरजंग हा मराठ्यांना पुरस्कर्ता व चहाता असल्यानें त्यानें बरेच मराठे पदरीं बाळगले होते. सफदरजंगाची काशीराजावर विशेष मेहेरबानी होती. त्यामुळें त्याचा मुलगा अयोध्येचा नवाब शुजाउद्दौला यानें त्यास आपल्या बापाच्या वेळचा जुना व माहितगार माणूस समजून आपल्या दरबारांत वकिलातीचें काम दिलें; व वेळोवेळीं मोठमोठ्या राजकारणांत त्याची तो सल्ला मसलत घेत असे. काशीराजाची या दरबारांत मोठी प्रतिष्ठा व वजन असे. इ. स. १७६१ मध्यें पानिपत येथें जें मराठे व दुराणी यांचें घनघोर युद्ध झालें त्यावेळीं पंडित काशीराज हा तेथें हजर होता. त्यानें या प्रसंगीं युक्तीनें व शहाणपणानें मराठ्यास शक्य तितकी मदत केली. परंतु दुर्दैवानें या युद्धांत मराठ्यांचे मुख्य सेनापति भाऊसाहेब व विश्वासराव पेशवे हे रणभूमीवर पतन पावले.

त्यावेळीं काशीराज यानें त्यांचीं प्रेतें शोधून काढून त्यास त्यानें चंदनादि काष्ठें जमवून अग्नि दिला व त्यांची उत्तरक्रिया हिंदु धर्माप्रमाणें उत्तम प्रकारें केली व या प्रकारानें मराठ्यावर उपकार केले. स्वतः काशीराज म्हणतो "आणीक सेवा न घडली। ईश्वरें हाच आम्हास नेमला होता। भगवदिच्छेस उपाय काय ?" पानिपतच्या लढाईचा वृत्तांत ( नकाशा देऊन ) यानें फारशी भाषेंत सविस्तर लिहिला आहे. त्याचें इंग्रजी भाषांतर जेम्स ब्राउन यानें इ. स. १७९१ मध्यें "एशियाटिक रिसर्चेस" या ग्रंथांत प्रसिद्ध केलें. तें ऐतिहासिकदृष्ट्या आहे. [ इतिहाससंग्रह ३. १; राजवाडे खं. ६ ].

**काश्गर**—काश्गर हें चिनी तुर्कस्तानांतील एक महत्वाचें शहर आहे. याचे उत्तर अक्षांश ३९° २४' व पूर्वरेखांश ७६° २४' आहेत. काश्गरचे कुहना शहर व यांगी शहर म्हणजे जुनें व नवें शहर असे दोन भाग आहेत दोन्ही भागांत ५ मैल अंतर असून मधून किझिलसू नदी वहाते. खोकंद, समरकंद व हिंदुस्थान येथून येणाऱ्या रस्त्यावर काश्गर असल्यामुळें याचें राजकीय व व्यापारी महत्व पूर्वीपासूनच आहे. मध्य आशियांतील इतर शहराप्रमाणें बऱ्याच लोकांच्या हातांत हें शहर गेलें. इ. स. १८६४–१८७७पर्यंत अमीर याकुब बेग यानें येथें छोटेखानी राज्य स्थापिलें. परंतु त्याच्या मरणानंतर हें शहर चिनी लोकांनीं जिंकून घेतलें.

कुहना शहर मजबूत तटबंदीचें असून तें तुमान नदीवर आहे पुलापलीकडे कांहीं अंतरावर जुन्या काश्गर शहराचा अवशेष दृष्टीस पडतो, ह्याला आस्की शहर ( जुनें शहर ) असें सध्याचें नांव आहे. कुहना शहराच्या उत्तरेस दोन मैलांवर या देशाचा साधु श्रेष्ठ हजरत हफक याची मशीद आहे.

यांगी शहर इ. स. १८३८ त बांधलें गेलें. याच्या भोंवतीं रुंद व खोल असा एक खंदक आहे. याकुब बेगच्या अगोदर चिनी अमलांत येथें 'अंबन' म्हणजे इलाखाधिपति रहात असे.

कुहना शहराची लोकसंख्या ६०,००० व यांगी शहराची लोकसंख्या २,००० आहे इ.स.१८६५ सालीं चिनी सत्ता संपुष्टांत आल्यानंतर काश्गरचे पक्का माल तयार करण्याचे कारखाने हळू हळू बंद पडले.

इ. स. पूर्वी ७६ वर्षी हॅान घराण्याच्या वेळेस चिनी लोकांनीं युटीएन, सुलेई ( काश्गर ) वगैरे जिंकिले. त्यापूर्वी काश्गरचा उल्लेख सापडत नाहीं. ह्युएनत्संग हिंदुस्थानांतून परत चीन देशांत याच शहरावरून ( काशा असें त्यानें दिलेलें नांव ) गेला. आठव्या शतकांत अरब लोकांच्या स्वारीविरुद्ध काश्गरच्या लोकांनीं बुखाऱ्याच्या राणीला मदत दिली. उइघर राजाच्या अमदानींत दहाव्या शतकांत काश्गर येथें इस्लामी धर्माचा पगडा बसला.

तैमूरनें इ. स. १३८९–९० सालीं काश्गर शहर बेचिराख केलें. खान सुलतान सय्यदची स्वारी झाल्याबरोबर मिर्झा अबूबकर यानें इ. स. १५१४ त या शहराचा नाश केला.

काश्गर शहरावर चिनी अंमल १७५९ नंतर चालू झाला. लहान सहान बंड होऊन शेवटी चिनी अंमल कायम झाला. १८६२ त चिनी मुसुलमानांनीं बंड केलें तेव्हां काश्गरच्या लोकांनीं देखील बंड केलें. या बंडात सादीक बेगनें काश्गरच्या लोकांना मदत केली. परंतु सादिक बेगला सहाय्य करण्याकरितां आलेल्या याकुब बेगानें काश्गर येथें आपला अंमल सुरू केला. तो १८७७ सालीं मरण पावल्यावर चिनी सरकारचा अंमल तेथें पुन्हा बसला.

**काश्मीर संस्थान**—काश्मीर हें हिंदुस्थानांतील एक पहिल्या प्रतीचें संस्थान असून तें हिमालय पर्वताच्या पश्चिम

भागात वसलेलें आहे. याच्या उत्तरेस चीनच्या ताब्यातील तुर्कस्तानचा भाग व काराकोरान पर्वत असून दक्षिणेस पंजाबचा प्रदेश आहे. पूर्वेस तिबेटचें संस्थान असून पश्चिमेस 'सरहद्दीवरील प्रांत' आहेत. चिनाब, झेलम व सिंधु या नद्यांच्या खोऱ्यांत हें संस्थान वसलेलें आहे असें ढोबळ रीतीनें म्हणतां येईल.

काश्मीर संस्थानचा बहुतेक भाग डोंगराळ आहे. हिमालय पर्वताचें पश्चिम टोंक, सिवालिकपर्वताच्या रांगा, पंजाल पर्वत, ननकुन, कजनग, हरमुख, नंगा, काराकोरान, इत्यादि अनेक लहान मोठे पर्वत या प्रदेशांत आहेत. सपाट मैदान फारच थोडें आढळून येतें. काश्मीर संस्थानचा आकार साधारण चौकोनी असून, त्याचे जम्मू, काश्मीर, लडाख तिबेट व गिलजीत हे मुख्य चार प्रांत आहेत. काश्मीर संस्थान हें अनेक मजली घरासारखें आहे असें पुष्कळ लेखकांनी म्हटलें आहे तें अगदीं खरें आहे. दुसऱ्या तऱ्हेनें हें संस्थान म्हणजे चिनाब, झेलम व सिंधु या नद्यांच्या एकावर एक उंच असणाऱ्या दऱ्यांनीं बनलेलें आहे असें म्हणतां येईल. कारण संस्थानच्या खालच्या पायरींमधून चिनाब नदी गेली आहे. दुसऱ्या पायरीमधून झेलम (वितस्ता) नदी व तिसऱ्या पायरीमधून सिंधु नदी गेली आहे. या तीनहि नद्या संस्थानच्या पूर्वभागातील दक्षिणेकडच्या हिमालयाच्या प्रचंड पर्वतराजींमधून उगम पावून प्रथमतः उत्तरेकडे वहात जाऊन नंतर दक्षिणेकडे वहात जातात. व अशा रीतीनें पश्चिमभागाकडून खालीं उतरत येत पंजाबच्या सपाट प्रदेशांत वहात येतात. अनेक मजली घराची उपमा घेतल्यास असें म्हणता येईल कीं, जम्मू हा पहिल्या मजल्याच्या घराचा दरवाजा आहे. त्यांतील कांहीं भाग सपाटीवर वसलेला आहे. त्यानंतर दुसऱ्या मजल्यावर जाण्याकरितां ८,००० फूट उंचीची हिमालयपर्वताची पहिली रांग ओलांडावी लागते. हा प्रदेश समशीतोष्ण असून ओक, देवदारु इत्यादि वृक्षांचीं वनेंच्या वनें आहेत. या टप्प्यात भदरवाह किस्तवार हे प्रांत आहेत. तिसऱ्या मजल्यावर जाण्याकरतां, हिमालयाची पीरपंजाल नावाची शाखा ओलांडावी लागते. या ठिकाणींच काश्मीरची सुंदर दरी आहे. या दरीलाच कोणी 'नंदनवन' म्हणतात. या दरीच्या चारी बाजूंना शुभ्र मोत्यासारख्या बर्फानें आच्छादिलेल्या पर्वतांचीं शिखरें आहेत व अशा मुक्ताहारांत काश्मीरची दरी म्हणजे पाचूप्रमाणें शोभते. त्याच्याहिवर चौथ्या मजल्यावर जाण्याकरितां १४।१५ हजार फूट उंच पर्वताची ओळ ओलांडावी लागते. ही ओळ ओलांडून गेल्यावर उत्तरेस अस्तर व बाल्तिस्तानचा प्रांत व पूर्वेस लडाखचा प्रांत लागतो. वायव्येस गिलजित प्रांत असून त्याच्या आसपास हिंदुकुशपर्वताच्या रांगा पसरल्या आहेत. त्यानंतर सर्वांत वरचा मजला चढून जावयास बरीच चढ चढून जावें लागतें. त्यानंतर सर्व जगात उंच असलेले २८००० फूट उंचीचे काराकोरान पर्वत लागतात.

काश्मीर संस्थानची भौगोलिक दृष्ट्या सविस्तर रीतीनें माहिती देणें अत्यंत अवघड आहे. कित्येक भाग असे आहेत कीं, त्या ठिकाणीं जाणेंहि अवघड आहे; व खुद्द काश्मीर सरकारनेंहि अद्यापि अशा प्रदेशाचें पूर्ण संशोधन केलें नाहीं. काश्मीर हा डोंगराळ प्रदेश असल्याकारणानें तेथें अनेक पर्वत असून कित्येक पर्वतांचीं शिखरें फारच उंच आहेत. उत्तरेस पर्वतांची माळच्या माळ पसरली असून सर्वांत नंगा पर्वत हा एखाद्या मोठ्या धिप्पाड राक्षसाप्रमाणें उभा राहिला आहे. या पर्वताची उंची २६६५६ फूट आहे, जगातील पर्वतामध्यें याचा चौथा नंबर लागतो. पूर्वेस हरमुख नावाचा पर्वत असून त्याची उंची १६९०३ फूट आहे. दक्षिणेस महादेव, ग्वाश ब्रारी (१७८०० फूट) व अमरनाथ (१७३२१) हे पर्वत आहेत. काश्मीर संस्थानांतील सर्वांत उंच असें पर्वतशिखर म्हटलें म्हणजे गॉडविन ऑस्टिन हें होय. या शिखराची उंची २८२६५ फूट असून याचा जगातील पर्वतांत दुसरा नंबर लागतो.

न द्या व स रो व रें.—नद्या व सरोवरें यांची काश्मीरमध्यें समृद्धि आहे. किंबहुना, काश्मीर हें निरनिराळ्या लहान मोठ्या नद्यांचें व सरोवरांचें जाळेंच आहे असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. सर्व नद्यांचीं नांवें सांगणें देखील अशक्य होईल. सर्वांत महत्वाच्या नद्या म्हणजे, चिनाब, रावी, झेलम व सिंधु या होत. रावीनदी काश्मीरच्या आग्नेयभागाला चिकटून वहात गेली आहे. चिनाब ही किस्तवार परगण्यातून वहात जाऊन वळणें घेत, रामबन, उधमपूर, रैसी इत्यादि परगण्यातून पंजाबमध्यें गेली आहे. झेलम नदी व्हरनागजवळ उगम पावून काश्मीर दरींमधून वहात गेली आहे. व सिंधु ही लडख व गिलजित प्रांतामधून शेंकडों मैल वहात जाऊन नंतर पंजाबमध्यें गेली आहे. याशिवाय, नुब्रा, शियाक, हंस्कर, सुरु, द्रस, गिलजीत, कृष्णगंगा, सिंध, लिद्दर, पंच, तवी, उझ इत्यादि किरकोळ नद्या आहेत.

नद्याप्रमाणेंच सरोवरांनाहि काश्मीरमध्यें तोटा नाहीं. हीं सरोवरें निरनिराळ्या आकाराचीं व प्रकाराचीं आहेत. त्यापैकीं सर्वांत मोठीं सरोवरें म्हणजे दल व वुलर हीं होत. याशिवाय मंसबल, अंचर, शिवसंगर, कंसनाग, पर्बी, शतपूर इत्यादि छोटीं सरोवरें आहेत. लडखच्या पूर्वेस, पंगकॉग, चंमूर, सोमोरिरी, हीं मोठालीं खाऱ्या पाण्याचीं सरोवरें आहेत. व्हरनाग, कोकारनाग, अचबल इत्यादि झरे प्रसिद्ध आहेत. अनंतनाथ हें स्थान तर तेथें असलेल्या अगणित झऱ्यांबद्दल विख्यात आहे. कोकरनाग व चष्मशाही हे झरे उत्कृष्ट पाण्याबद्दल प्रसिद्ध आहेत. मलिकनाग नांवाचा झरा गंधकयुक्त पाण्याचा असून त्याचें पाणी मार्गानें मानवतें.

व न स्प ती.—काश्मीरमध्यें पुष्कळ दऱ्या व विपुल पाणी असल्यामुळें त्या ठिकाणीं हरतऱ्हेचीं झाडेंझुडपें आहेत निरनिराळे रंग ज्यापासून तयार करता येतील अशा वनस्पती, पुष्कळ आहेत. अस्टर तहसिलीमध्यें हिंगाची झाडें मुबलक आहेत. भूर्जवृक्षांच्या राया पसरलेल्या आहेत. भाग वनस्पतीचीहि समृद्धि आहे. सुगंधी वनस्पतीचीहि येथें पैदास होते. निरनिराळ्या प्रकारचीं फळें काश्मीरमध्यें विपुल सापडतात. देवदारु, अक्रोड, तुती इत्यादि झाडांचीं जंगलेल्या जंगलें आहेत. निरनिराळीं मनोहर कमळेंहि या ठिकाणीं उगवतात.

प क्षी व प्रा णी.—काश्मीरच्या डोंगराळ प्रदेशात निरनिराळ्या प्रकारचे प्राणी आढळून येतात. इंगल नावाचे काळवीट, काळीं अस्वलें, कस्तुरीमृग, इत्यादि प्राणी या ठिकाणीं पुष्कळ आढळतात. त्याचप्रमाणें, पाढऱ्या कोवळ्या, कुकण पक्षी, काळे तित्तिरपक्षी, लावीपक्षी, बदकें, कोकिळा, राघू, कावळे इत्यादि अनेक प्रकारचे पक्षी काश्मीरमध्यें सापडतात. सर्पांच्या अनेक जाती येथें असून त्यात गुण व पेहूर या जातीचे सर्व विषारी आहेत.

भू स्त र:—वायव्य व आग्नेय भागात पर्वताच्या रांगाना समांतर असे पाषाणांचे थरच्या थर पसरले आहेत. नैर्ऋत्य भागात तृतीय युगातील पाषाणथर उपलब्ध आहेत. झन्स्कर, धौलधर व पीरपंजाल पर्वताच्या रांगात, वज्रतुंड, जंबूर इत्यादि दगड सापडतात. बाल्तिस्तान व लडख या प्रांतातील पर्वतांच्या रांगातहि वज्रतुंड दगड सांपडतात. सरप दरींत, खडूच्या दगडाचे थरच्याथर आहेत. श्रीनगरच्या दरींत प्लीस्टोसीन युगातील पाषाणाचे थर सापडतात.

ह वा मा न व प र्ज न्य.—काश्मीरची दरी पीरपंजाल ओळीच्या योगानें संरक्षित असल्यानें, या दरीमध्यें पर्जन्य नियमित पडत नाहीं. बर्फ वितळल्यामुळें, उन्हाळ्यामध्यें या ठिकाणीं पर्जन्य पडतो. काश्मीर दरीच्या आसपासच्या पर्वतराजीमध्यें आक्टोबर ते मार्च महिन्यात अतोनात बर्फ पडतें. जुलै, ऑगस्ट व सप्टेंबर अशा या महिन्यांत काश्मीरमध्यें बराच उन्हाळा असतो. विशेषतः श्रीनगरमध्यें तर उष्णमान ९५° इतकें असतें. जानेवारी व फेब्रुवारी या महिन्यात कडक थंडी पडते.

नै स र्गि क सं क टें.—दुष्काळ, पूर, धरणीकंप, आगी इत्यादि नैसर्गिक संकटें काश्मीरला सोसावीं लागतात. जम्मू प्रांतात दुष्काळाची बाधा वरचेवर होते; पण त्याच्या उलट काश्मीरमध्यें पुरानें पिकांची खराबी फार होते. इ. स. १८९३ १९०३, १९०७, व १९०९ या सालीं मोठा पूर आल्यामुळें पिकें नासून गेलीं. १८९३ च्या पुरामुळें तर झेलमनदीवरील सात पूल वाहून गेले व त्यामुळें अतोनात नुकसान झालें. धरणीकंपहि मधून मधून असतातच. लडख प्रांतात या धरणीकंपाची नेहमीं बाधा होते. तसेंच काश्मीरमध्येंहि या धरणीकंपाची भेट वरचेवर होते. इ.स १९१० मध्यें काश्मीरला दोन वेळा धरणीकंपाचे धक्के बसले व १९१३ सालीं तर पाच धक्के बसले.

प्रे क्ष णी य स्थ ळें.—काश्मीरमध्यें प्रेक्षणीय स्थळें पुष्कळच आहेत. काश्मीरला हिंदुस्थानचें 'नंदनवन' असें जें नाव देण्यात येतें तें अगदीं यथार्थ होय. सोनामार्ग, गुलमार्ग, यासारखीं शीतल निवासस्थानें, नंगापर्वत, हरमुख, शंकर, अमरनाथ वगैरेसारखीं पंधरा हजार फुटावर असलेलीं हिमाच्छादित शिखरें; उलर, मानसबल, डाल यासारखीं रमणीय सरोवरें; बनिहल, पीरपंजाल,झोझिला यासारखे नयनरम्य घाट, सुखनाग, नीलनागासारखे मन शांत करणारे झरे, निसर्गरम्य वनराजि अशीं एक ना दोन,हजारों स्थळें काश्मीरमध्यें पहाण्यासारखीं आहेत व तीं सर्व पहाण्याला निदान सहा महिने तरी लागतील. सर्व काश्मीरच एकजात पहाण्यासारखें आहे. पण त्यातल्या त्यात कांहीं प्रेक्षणीय स्थळें विशेष पहाण्यासारखीं असल्याकारणानें त्यांचा थोडक्यात परिचय करून देणें अत्यंत जरुर आहे.

श्रीनगरमध्यें व त्याच्या आसपास अनेक बाग पहाण्यासारखे आहेत. त्यापैकीं शालीमार, निषात व चष्मशाही उर्फ बादशाही बाग हे विशेष प्रसिद्ध आहेत. शालीमार बाग प्रचंड असून त्याची लांबी ५९० यार्ड व रुंदी २६० यार्ड आहे. याचे एकावर एक असे चार टप्पे आहेत. बागेच्या मधोमध प्रत्येक टप्यात एकेक तलाव असून हे तलाव पाटानें जोडलेले आहेत. चवथ्या मजलीवर एक सुंदर ६१ फूट लांब व रुंद असा चवुतरा असून त्यावर दगडी मंडप उभारला आहे. याचे खांब काळ्या संगमरवरी दगडाचे असून त्यावर सुबक नक्षीकाम केलेलें आहे. या बागेसभोंवार पाण्याची पुष्करणी असून त्यात १४० कारंजीं आहेत. ही बाग १६१९ सालीं जहांगीर बादशहानें बांधविली.

निषातबाग ही डाल तलावाच्या अगदीं नजीक असल्यामुळें, येथील देखावा फारच रमणीय आहे. या बागेला सात टप्पे असून या बागेची लांबी ५९५ यार्ड व रुंदी ३६० यार्ड आहे. ही बाग नूरजहानचा भाऊ असफशहा यानें बांधविली. चष्मशाही बागहि याच धर्तीची असून तीतील झऱ्यातील पाण्यासारखें पाचक पाणी सर्व जगात नाहीं असें म्हणतात.

श्रीनगरच्या उत्तरेस ११ मैलावर हारवान नावाचा एक तलाव आहे. या तलावाच्या तीन बाजूंना प्रचंड पर्वत आहेत. या पर्वतावरील बर्फाचें वितळलेलें पाणी या तलावात साठतें. येथील देखावा फारच सुंदर आहे. या ठिकाणीं अनेक प्रकारच्या गुलाबाच्या रांगाच्या रांगा असलेल्या दृष्टीस पडतात. श्रीनगरमध्यें जुम्मामशीद ही फार प्रेक्षणीय आहे. ही मशीद शिकंदर लोदीनें १४०४ सालीं बांधली. ही मशीद तीनदां अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडली पण ही मशीद पुन्हां दुरुस्त करण्यात आली. ही सर्व मशीद लांकडी आहे.



शंकराचार्यांचें देऊळ.



बर्फाच्छादित मार कालव्याचा देखावा, श्रीनगर.



काश्मीरच्या महाराजांचा वाडा.



किल्ल्याचा दरवाजा श्रीनगर

व त्यावरील नक्षीकाम फारच सुंदर केलेलें आहे. श्रीनगरच्या ईशान्येस शंकरपर्वत असून त्या पर्वतावर शंकराचें देऊळ आहे. हें देऊळ विशेष मोठें नसलें तरी त्याचें काम फार सुबक आहे. या देवळांत शंकराची पिंडी असून ती काळ्या दगडाची व कमरेइतकी उंच आहे. या ठिकाणचा देखावा फारच रमणीय आहे. हें देऊळ अशोकाचा पुत्र जलौक यानें खिस्तपूर्व २० सालीं बांधलें असें म्हणतात. शंकरपर्वताच्या बाजूनें दक्षिणेस उतरून बरेंच लांब चालून गेल्यावर पनरतन नावाचें देवालय आहे. हें अति जुनें पुराणें देवालय असून, हें हिरवट-निळसर रंगाच्या दगडांनी बांधलेलें आहे. देवळाच्या चारहि बाजूंना कमानीचे दरवाजे असून देवळावर जिकडे तिकडे घडीव मूर्ती आहेत. या मूर्तींकडे पाहिल्यावर त्या मूर्ती मोठ्या कौशल्यानें घडविलेल्या आहेत हें चटकन ध्यानांत येतें. हें देऊळ पार्थ नावाच्या काश्मीरच्या राजाच्या कारकीर्दींत त्याचा प्रधान मेरु यानें ९११-९२१ च्या दरम्यान बांधलें असें म्हणतात. श्रीनगर येथील अजबखानादि पहाण्यासारखा आहे. या अजबखान्यांत जुनीं नाणीं, हत्यारें, जुन्या मूर्ती व शिल्पकलेचे नमुने पहावयाला मिळतात. काश्मीरसंस्थानांतील उत्कृष्ट शालींचे नमुने या ठिकाणीं दृष्टीस पडतात.

अवंतिपूर नावाच्या गांवांत बराचशा जुन्यापुराण्या इमारती होत्या; पण त्या सर्व काळाच्या ओघांत लुप्तप्राय झाल्या आहेत. अद्यापिहि अवंतीश्वर व अवंतिस्वामी या देवांचीं देवळें मोडक्यातोडक्या स्थितींत शिल्लक आहेत. हीं दोन्हीं देवळें हिरवट काळसर दगडाचीं असून देवळाच्या मुख्य दरवाजावर सुबक नक्षीचें काम केलेलें दृष्टीस पडतें. या देवळावरून एक वेळ काश्मीर हें मूर्तिकलेच्या व शिल्पकलेच्या बाबतींत किती पुढें होतें हें दिसून येतें.

वितस्ता उर्फ झेलम नदीच्या उगमापाशीं व्हेरनाग नावाचा एक झरा आहे. या झऱ्याच्या आसपासचा प्रदेश फारच प्रेक्षणीय आहे. या ठिकाणीं जहांगीर बादशहानें एक सुंदर बाग बांधविली. या बागेंत अष्टकोनी पुष्करिणी असून या पुष्करिणींत एक झरा आणून सोडलेला आहे. या पुष्करिणीभोंवतीं अष्टकोनाकृति इमारत असून, त्या इमारतीवर दोन फारसी भाषेंतील शिलालेख आहेत.

या झेलमच्या दरींत एका लहानशा उंचवट्याच्या टेंकडीच्या पायथ्याशीं मार्तंड देवाचें भव्य देवालय आहे. या देवालयाचें प्रवेशद्वार प्रचंड असून, त्यावरील नक्षीचें काम अवर्णनीय आहे. सात आठ फूट उंचीचे एकसंधी दगड दरवाजाला लावलेले आहेत. प्रवेशद्वारांतून आंत गेल्यावर एक मोठें चौकोनी पटांगण असून त्याच्या मध्यभागीं सूर्य देवतेचें देऊळ आहे. या पटांगणाभोंवतीं कमानदार दरवाजाच्या ओळी बांधल्या आहेत. देवळाच्या बाहेरच्या चौकाला दर्शनीखांब व कमानी यांची रांगच्या रांग आहे. हें देऊळ ललितादित्य नावाच्या राजानें बांधलें असें म्हणतात. वास्तुकलेचा व मूर्तिकलेचा एक उत्कृष्ट मासला म्हणून हें देवालय प्रसिद्ध आहे व या शास्त्रांतील सज्ञ गृहस्थांनीं या देवालयाची फारच तारीफ केली आहे.

झेलम नदीला सात पूल असून ते दृष्टिपथांत घालण्यासारखे आहेत. यांपैकीं तिसऱ्या व चौथ्या पुलाच्या दरम्यान शहामहादन नावाची लाकडी प्रचंड इमारत आहे. ही ज्या साधूनें काश्मीरमध्यें मुसुलमानी धर्माचा प्रसार केला त्या साधूच्या स्मरणार्थ बांधलेली आहे. याच्या समोरच नूरजहाननें बांधलेली मोठी दगडी मशीद आहे. चवथ्या पुलाच्या खालीं महाश्री नावाचें पाचमजली देवालय आहे. सहाव्या पुलाच्या नजीक स्कंदभवन नावाचें जीर्ण देवालय आहे. सातव्या पुलाच्या खालीं दूधगंगा व झेलम नदीचा संगम असून त्याठिकाणीं क्षेमगौरीश्वर नावाचें एक देवालय आहे.

याशिवाय, अनंतनाग, अच्छाबल, चिनारबाग इत्यादि कित्येक स्थळें व कितीतरी रम्य देखावे काश्मीरमध्यें पहाण्यास सांपडतात. सृष्टिदेवतेनें आपलें सर्व कौशल्य खर्च करून काश्मीर देश निर्माण केला आहे कीं काय असें मनाला वाटल्यावांचून रहात नाहीं. व मोठमोठ्या धिप्पाड व अजस्र पर्वतांचीं बर्फानें श्वेत बनलेलीं शिखरें, प्रचंड दऱ्या, भयंकर घाट वगैरेचें अवलोकन केलें असतां, परमेश्वरी कर्तृत्वाची अंधुक कल्पना कां होईना, मनाला पटल्यावांचून रहात नाहीं.

का श्मी र म धी ल लो क.—काश्मीर संस्थानचें क्षेत्रफळ ८४,४३२ चौरस मैल आहे. हिंदुस्थानांतील इतर कोणत्याहि संस्थानापेक्षां काश्मीरचें क्षेत्रफळ अधिक आहे. १९११ सालीं केलेल्या खानेसुमारींत काश्मीर संस्थानची लोकसंख्या ३१,५८,१२६ इतकी भरली. त्यांपैकीं १६,७४,३६७ पुरुष व १४,८३,७५९ स्त्रिया होत्या. १९०१ च्या लोकसंख्येच्या मानानें १९११ मधील लोकसंख्या जवळजवळ शेंकडा ९ या प्रमाणांत वाढली. प्रांतवार खानेसुमारी पुढीलप्रमाणें आहे. जम्मू प्रांत १५,१७,८६९; काश्मीर प्रांत १२,९५,२०१; सरहद्दीवराल प्रांत ३,६५,०६०. जिल्हेवार खानेसुमारींत दक्षिणकाश्मीरचा नंबर पहिला लागतो. त्याची लोकसंख्या ६,३९,२१० असून, उत्तर काश्मीर ४,६०,७८६, जम्मू ३,२९,६९१ मिरपूर ३,२४,९२२ गिलजित २३,५५९ अशी आहे. सर्व तहशिलींत उत्तर मच्छिपुर तहशीलीची लोकसंख्या मोठी आहे (२,००,६०१). काश्मीर संस्थानांत मोठीं शहरें अशीं दोनच आहेत. एक श्रीनगर (लो.सं.१२४२४०) व दुसरें जम्मू (लो.सं. ३१७२६). बाकी शहरें लहान लहान आहेत. अशा लहान शहरांची संख्या ५९ आहे. त्यांपैकीं सात शहरें ५००० वर वस्तीचीं आहेत, वीस शहरें २-५ हजार लोकसंख्येचीं आहेत. तीस ५०० ते १००० इतक्या लोकसंख्येचीं आहेत. काश्मीर हा कृषिप्रधान देश असल्याकारणानें त्यामध्यें खेड्यांची संख्या फार आहे. १९११ च्या खानेसुमारींत काश्मीरमध्यें ८८६५ इतकीं खेडीं हो

प्रदेश डोंगराळ असल्यानें सपाट व शेतील

जमीन एकसारखी आढळून येत नाहीं. त्यामुळें ज्या ज्या ठिकाणीं शेतीला उपयुक्त अशी जमीन असेल त्या त्या ठिकाणी चार पांच खोपट्या अशा तऱ्हेनें या खेडेगावांची स्थिति असते.

काश्मीरमधून बाहेर वस्ती करण्यास जाणाऱ्या लोकांची संख्या फार आहे. जुलमी राजाच्या जुलमाला कंटाळून, काश्मीरमध्यें जन्मलेले कित्येक लोक बाहेर जात असत. पण शांतता प्रस्थापित झाल्यापासून हा ओघ थांबत चालला आहे. बाहेर गेलेले लोक परत येत चालले आहेत. तरी पण अद्यापिहि बाहेर जाणारे लोक बरेच आहेत. १९०१ सालीं काश्मीरमधून ८६,१५७ लोक बाहेर गेले तर १९११ सालीं ८१,९४८ लोक बाहेर गेले. १९०१ सालीं ८५,५९७ लोक काश्मीरमध्यें रहाण्यास आले तर १९११ सालीं ७६,२७५ लोक आले.

धर्म, जाती व पंथ.—काश्मीर संस्थानात मुख्यतः हिंदु, बौद्ध, इस्लाम हे धर्म प्रचलित आहेत. पारशी व ख्रिश्चन या धर्मांचे विशेष विचारांत घेण्याजोगें प्राबल्य नाहीं. या तीन धर्मांच्या दृष्टीनें काश्मीरातील लोकसंख्येचें वर्गीकरण केलें असतां असें आढळून येतें कीं हिंदु ( शीख धरून ) ७,२१,९४३, मुसुलमान २३,९८,३२०, बौद्ध ३६,५१८ अशी लोकसंख्येची वर्गवारी होती. त्याशिवाय जैन लोकांची संख्या ३४५, पारशी २१, खिस्ती ९७५ अशी होती. हिंदुधर्मातील पोटभेद, ब्राह्मणी, आर्य, शीख असे पाडले असतां, ब्राह्मणधर्मीयांची संख्या ६,८९,३४२, आर्यांची १०४७ व शीखांची ३१५५३ इतकी होती. ब्रह्मोपंथाचा एकच माणूस आढळून आला. अशा रीतीनें, काश्मीरमध्यें शेंकडा ७६ मुसुलमान, व २२ हिंदु हें प्रमाण पडतें.

जाती.—जातीसंबंधानें समग्र विवेचन करतां येणें शक्य नाहीं. तरी पण हिंदूमध्यें जातिभेदाचें अतिशय महत्त्व असल्या-कारणानें त्यासंबंधानें थोडें विवेचन करणें जरूर आहे. काश्मीर संस्थानचे जम्मू, काश्मीर, व सरहद्दीवरील प्रांत असे तीन भाग पडतात; व त्या प्रांतांस अनुसरून जातींचें विवेचन केल्यास सोईचें होईल. यासाठीं तशा रीतीनें विवेचन करीत आहों.

जम्मू.—जम्मू प्रांताचे, दुग्गर, चिभल, पूर्व पर्वतप्रदेश व पश्चिम पर्वतप्रदेश असे चार पोटभेद आहेत. जम्मू प्रांतामध्यें जे हिंदू आहेत त्यामध्यें, मुख्यतः ब्राह्मण, रजपूत, खत्री व ठक्कर अशा चार जाती आहेत. या जातींच्या उपजाती पुष्कळच आहेत. डोम, गुजर, जाट, डोग्रा, इत्यादि प्रमुख पोटजाती आहेत. चिभल इलाख्यांत चिभ नांवाची एक रजपुताची पोटजात आहे. ही जातच्या जात बाटून मुसलमान झालेली आहे. तरी पण तिच्यामध्यें अद्यापिहि जातिभेदाचें बरेंच प्रस्थ आढळून येतें. विवाहविषयक निर्बंध यांच्यामध्यें पुष्कळच आढळून येतात. पूर्व टेंकडी-मुलखांत ब्राह्मणधर्माचा व्हावा तितका प्रसार न झाल्यानें तेथील लोकांनां धर्मनिर्बंधाचें नांव देखील ठाऊक नाहीं असें म्हटलें तरी चालेल. या लोकांमध्यें देखील ब्राह्मण, रजपूत, क्षत्रिय इत्यादि जाती आहेत. पण काश्मीर अगर जम्मूच्या इतर भागांतील लोक यांना कमी लेखून यांच्याशीं रोटीबेटीव्यवहार करीत नाहींत. अगदीं खालच्या जातींत मेघ नांवांची एक जात असून ती शरीराच्या ठेवणीवरून आर्यन वंशाची दिसते. येथील वटवल नांवाची एक जात मात्र अनार्य असावी असें आढळून आलें आहे. पश्चिमेकडील डोंगराळ प्रदेशांत रहाणाऱ्या लोकांत मुसुलमान झालेले लोक फार आहेत. तरी पण त्यांच्यांतहि हिंदू चालीरीती आढळून येतात. यांत भट्टी, बुधान, धुंड, डोमल इत्यादि जाती मूळच्या रजपूत असून बाटलेल्या दिसतात. याशिवाय बंब व खख यांहि पोटजाती मूळच्या रजपूतच आहेत. खोजा, मोची, इत्यादि जाती मात्र मुसुलमान आढळतात.

काश्मीर.—ज्या ज्या परकीय लोकांच्या स्वाऱ्या काश्मीरावर झाल्या, त्या त्या लोकांचे वंशज काश्मीरमधील अनेक जातींच्या लोकांमध्यें आढळतात, तरी त्या सर्वांचा येथें उल्लेख करणें शक्य नाहीं. काश्मीरमध्यें मुख्यतः दोन भेद दृष्टीस पडतात. एक काश्मीरी ब्राह्मणाचा व दुसरा काश्मीरी मुसुलमानाचा; काश्मीरी मुसुलमानामध्यें शेख, सय्यद, मोंगल व अफगाण अशा चार मुख्य जाती आहेत. याशिवाय आणखी डोम, गलवान, वाटल, भंड, डेगर, उर, मल, इत्यादि अनेक पोटजाती आहेत. मुसलमानाची सत्ता काश्मीरावर पसरण्यापूर्वी या सर्व जाती ब्राह्मणच होत्या असें दिसतें. काश्मीरी ब्राह्मणाचे ज्योतिषी, गुरु व कारकून हे उपवर्ग आहेत.

सरहद्दीवरील प्रांत.—लदख प्रांतांत बुद्धाचा भरणा फार आहे. धंद्यावरून या बुद्धांच्या, अनेक जाती आहेत. रिगझंग, मंग्रिक व रिमिन या तीन मुख्य जाती असून त्यांचे अनेक पोटभेद आहेत. लदख येथील मुसुलमानामध्यें तरकछोस, मघमी व कामिन या जाती आहेत. गिलगित प्रांतांत मुसलमान झालेल्या बौद्धांचाच भरणा अधिक आहे. या मुसुलमानांच्या या प्रांतांत शिन व यस्कन या दोन मुख्य जाती आहेत.

पंथ.—काश्मीरमधील हिंदुधर्मीयामध्यें कोणाच्या मतें शैव, वैष्णव व शाक्त असे तीन, तर कोणाच्या मतें ईश्वर, शैव, वैष्णव, शाक्त व गाणपत्य असे पांच पंथ आहेत. पण सर्वांत मुख्य पंथ म्हणजे शैव पंथ होय. काश्मीरी पंडित हे एकजात शैव असून जम्मूमधील बहुतेक हिंदु लोक शैवच आहेत. इतर पंथाचे लोक देखील थोडे फार आहेत, पण शैवामध्यें व त्यांच्यामध्यें वैरभाव वगैरे आढळून येत नाहीं.

बौद्ध लोकांमध्यें लामाचा धर्म प्रचलित आहे. या लामाचेंहि दोन पंथ आहेत. एक रक्तवस्त्री लामांचा पंथ व दुसरा पीतवस्त्री लामांचा पंथ. यांतला पहिला पंथ हा मूळचा पंथ असून पीतवस्त्री पंथ हा त्यानंतरचा आहे.

काश्मीर संस्थानात रफवश्या पंथाचाच प्रसार अधिक आढळतो

मुसुलमानाचे शिया व सुनी असे मुख्य दोन पथ आहेत पण काश्मीर संस्थानमध्ये उपपथहि पुष्कळच आहेत. ( १ ) वहावी पथ —लदख प्रातात याचा प्रसार बराच असून जम्मू प्रातात या प्रांतातील लोक थोडे आहेत महमद हा अद्यापि जिवत आहे हें सत्य या पथाला मान्य नाहीं ( २ ) अहमदी —या पथाचा गुरु मिरझा गुलाम अहमद हा असून, हा शेवटचा इमाम होय व निकालाच्या शेवटच्या दिवशीं याचा अवतार होणार अशी मुसुलमानाची समजूत आहे या पथाचा प्रसार काश्मीरमध्ये फारच थोड्या ठिकाणा झाला आहे ( ३ ) नूरवक्षी —या पथाचा सस्थापक सय्यद नूरबक्षी खुरासानी हा होय या पथाचे लोक लदख प्रातात विशेष आढळतात पण या पथाच्या अनुयायाची सख्या हळुहळू कमी होत चालली आहे, व यातील बरेच लोक वहावी पथाचें अनुयायित्व पत्करू लागले आहेत ( ४ ) मौलवी —हे सर आगाखानाचे अनुयायी आहेत या पथाचा मूळ पुरुष हजरत इस्मायल होय ( ५ ) नक्षबदी —या पथाचा सस्थापक सय्यद जमत अली शाह असून अद्यापि हा जिवत आहे या पथाची तत्वें वहावी पथाच्या अगदीं विरुद्ध आहेत

शि क्ष ण —शिक्षणाच्या बाबतींत मात्र काश्मीर सस्थान अगदीं मागसलेलें आहे एकदर ३१,०३,५०१ लोकसख्येपैकीं ६३,२५१ पुरुष व १६८५ स्त्रिया मिळून ६८,२३६ इतका सख्या शिकलेल्याची आहे म्हणजे शेकडा २ हें प्रमाण पडत असून तें अगदींच कमी आहे यात शका नाहीं यात पजाब अगर इतर प्रात याच्यामधून नोकरीकरता आलेल्या लोकाचीच सख्या पुष्कळ आहे खुद्द काश्मीरमधील लोकात, काश्मीरी पडिताचाच वर्ग काय तो सुशिक्षित दिसतो लदख येथील बौद्धधर्मीय लोकांत काहीं लाकाना तात्पुरतें तिबेटी लिहिता बोलता येतें बाकी सर्व काश्मीर सस्थान शिक्षणाच्या दृष्टीनें पूर्ण अधारातच आहे असें म्हटलें असता हरकत नाहीं मुसुलमान लोकात मुलाशिवाय ज्याना लिहिता वाचता येतें अशाची सख्या फारच कमी आहे मातृभाषेच ज्ञान ज्याना आहे अशाचे वरील आंकडे पाहिले कीं, मग इंग्लिश जाणणारे लोक किती थोडे असतील हें साांगण्यास नकोच शिक्षणाच्या बाबतींत काश्मीर सरकारानें थोडें अधिक लक्ष्य देण्यास सुरवात केली आहे हें स्तुत्य आहे १९०१ साली काश्मीरमध्यें एकदर २८० शाळा होत्या, त्या १९११ मध्यें ३७९ पर्यंत वाढल्या आहेत त्यापैकीं कॉलेजें २, हायस्कुलें ८, नॉर्मलस्कूल १, मिडलस्कुलें २७, प्राथमिक शिक्षणाच्या शाळा १९०, वाचकाच्या शाळा ५ व खासगी शाळा १२५ आहेत अशा रीतानें १९०१ पेक्षा १९११ मध्यें शिक्षणसस्थाची वाढ बरीच समाधानकारक झाली यात शका नाहीं, पण प्राथमिक शिक्षण काश्मीर सरकारनें मोफत व सक्तीचें केल्यास फार फायदेशीर होण्याचा संभव आहे शिक्षणसस्थाची प्रातवार विभागणी केल्यास जम्मूमध्यें १६१, काश्मीरमध्यें १८५ व सरहद्दीवरील प्रातात २९ इतक्या शिक्षणसंस्था आहेत.

इतर शैक्षणिक चळवळींकडे लक्ष्य दिलें असता हाच शोचनीय प्रकार आढळून येतो काश्मीर सस्थानात एक दरींत ८ छापखाने आहेत त्यापैकीं जम्मूमध्यें चार, काश्मीरमध्यें तीन व सरहद्दीवरील प्रातात एक आहे या छापखान्यात नाव घेण्याजोगा छापखाना म्हणजे जम्मू येथील सरकारी छापखाना होय पण या छापखान्यात सरकारी कामाशिवाय इतर खासगी छपाईकाम क्वचितच केलें जातें 'काश्मीर स्टेट गॅझेट' हें एकच नियतकालिक असून त्याचा खप ३७५ आहे १९०१–११ या कालात १० उर्दू व १ इंग्लिश एवढींच पुस्तकें काश्मीरमध्यें प्रसिद्ध झालीं

प्र च लि त भा षा —'दर बारा कोसावर भाषा बदलते' असें म्हणतात व याचा अनुभव हिंदुस्थानातील इतर भागा प्रमाणेंच काश्मीरमध्येंहि आढळून येतो काश्मीरमध्यें अनेक प्रकारच्या भाषा प्रचलित आहेत. काश्मीरमध्यें बाहेरून आलेले लोक आपापल्या भाषा बोलतात त्या सोडून दिल्या तरी खुद्द काश्मीरच्या अशा भाषा दहा बारा आहेत व त्याचेहि पोटभेद पुष्कळ आहेत काश्मिरी, पहाडी व डोग्री या भाषा बोलणारे लोक पुष्कळ आहेत काश्मिरी भाषा बोलणाऱ्याची सख्या ११,६५,००० असून पहाडी व डोग्री बोलणाऱ्याची सख्या अनुक्रमें ५,४४,००० व ५,१७,००० आहे त्याशिवाय गुजरी, पजाबी बाल्टि, पोथवारी, चिमलि, लदखी, शिन या भाषाहि प्रचलित आहेत ल्हासी, नारकदी, चबा, काग्रा, मडी, दर्दी या भाषाचाहि प्रसार थोड्या ठिकाणीं आढळतो यूरोपीय भाषात इंग्लिश भाषेचाच प्रसार अधिक आहे राजभाषा उर्दू असल्यामुळें त्या भाषेचें ज्ञान असणाऱ्या प्रवाशाला काश्मीर मध्यें कोणत्याहि ठिकाणीं सहज जाता येतें. पण त्यातल्या त्यात पहाडी भाषा ही डोंगराळ प्रदेशात विशेष प्रचलित आहे झेलमच्या दरींत काश्मीरी व सिंधु नदीच्या दरींत तिबेटी या भाषा रूढ झाल्या आहेत पजाबीचाहि प्रसार बराच आढळून येतो महाराजा रणवीरसिंह यानीं आपल्या कारकीर्दींत डोंगरी ही दरबारी भाषा करण्याचा प्रयत्न केला होता पण तो सिद्धीस गेला नाहीं

लि पि —काश्मीरमध्यें ६।७ लिपी प्रचारात आहेत त्या म्हणजे उर्दू, फारशी, अरबी डोग्री, हिंदी, बोधि, गुरुमुखी या होत उर्दू ही दरबारभाषा असल्यामुळें व शाळेंत एच्छिक भाषा म्हणून तिचा प्रवेश असल्यानें तिचा प्रसार लेखनाच्या कामीं फार होतो काश्मिरी भाषा पूर्वी शारदा लिपींत लिहिली जात असे पण ती हल्लीं फारशी लिहिली जात बोधि लिपी ही तिबे

प्रकार आहे व उदय येथील बौद्ध ही लिपी प्रचारांत आणतात. डोग्रा जातीचे हिंदू लोक डोग्री लिपी सामान्यतः वापरतात व जम्मू प्रांतात गुरमुखीचा प्रकार आढळून येतो. या निरनिराळ्या भाषामध्यें फारच थोडें वाङ्मय आढळून येतें. महाराजा रणवीरसिंहाच्या कारकीर्दीत डोग्री भाषेंत जीं काय सरकारी पुस्तकें प्रसिद्ध झालीं तेवढीच. त्याशिवाय डोग्री भाषेंत व डोग्रा लिपींत लिहिलेलीं अशीं पुस्तकें फारच थोडीं आहेत. बौद्ध लामांनीं बोधि भाषेंत जेवढीं कांहीं धर्मविषयक पुस्तकें लिहिलीं असतील तेवढींच. त्यापलीकडे या भाषेंत दुसरें वाङ्मय आढळत नाहीं. उर्दू भाषेंत मात्र बरींच पुस्तकें आढळून येतात. काश्मीरी भाषा ज्यावेळीं शारदा लीपींत लिहिली जात असे त्यावेळीं काश्मीरी भाषेंत थोडें फार धार्मिक व इतर स्वरूपाचें वाङ्मय तयार झालें असेल पण त्यापलीकडे हल्लीं त्या भाषेंतील वाङ्मय विशेषसें आढळत नाहीं. पण त्या भाषेंत वाङ्मय निर्माण करण्याचे प्रयत्न चालू आहेत. काश्मीरी भाषेसंबंधाची विशेष माहिती 'काश्मीरी भाषा' या लेखांत दिलेली आहे. काश्मीरमधील लोक जात्याच शिक्षणाच्या बाबतींत मागसलेले असल्यानें वाङ्मयाची गोडी त्यांच्यामध्यें उत्पन्न झालेली नाहीं व त्यामुळें काश्मीरमध्यें वाङ्मयाचें दुर्भिक्ष आढळून येतें. कांहीं सुशिक्षित लोक, ज्यांना पुस्तकाची व वाङ्मयाची हौस असेल ते पंजाबमधून उर्दू वर्तमानपत्रें व पुस्तकें विकत आणून तीं वाचतात.

सामाजिक चालीरीति—सामाजिक चालीरीतींमध्यें, विवाहपद्धतीचा नंबर पहिला लागतो तेव्हां त्यासंबंधीं प्रथमतः विचार करणें जरूर आहे. हिंदुस्थानामध्यें सर्वसाधारण जे विवाहविषयक निर्बंध दृष्टीस पडतात त्यांची छटा काश्मीरच्या बाबतींतहि आढळून येते. विवाहविधीच्या बाबतींतहि काश्मीर व हिंदुस्थानचा इतर भाग यामध्यें पुष्कळच साम्य आहे. तरी पण देशाच्या विशिष्ट रचनेमुळें थोडे फार फरकहि आढळून येत नाहींत असें नाहीं. विवाहसंस्थेचा इतिहास पाहिल्यास आपल्याला असें आढळून येतें कीं, समाज बाल्यावस्थेंत असतांना विवाहविषयक निर्बंध कडक रीतीनें पाळले जात नाहींत. पण ज्या ज्या मानानें समाजाची सुधारणा होत जाते त्या त्या मानानें विवाहाला एकप्रकारची नियमबद्धता प्राप्त होते. अशा प्रकारची नियमबद्धता प्राप्त होण्यापूर्वी विवाहसंस्थेला कांहीं अवस्थांमधून संक्रमण करावें लागतें. अशा अवस्था म्हणजे बहुपत्नीत्वाची चाल, बहुपतित्वाची चाल व एकपत्नीत्वाची चाल या होत. या सर्वहि अवस्था काश्मीरमध्यें अद्यापीहि आढळून येतात. उदाहरणार्थ, किस्तावर परगण्यातील कांहीं डोंगराळ जातींत लग्न होण्याच्या अगोदरच एखाद्या कुमारीला जर मूल झालें तर तें मूल अनौरस ठरत नाहीं. लदाख तालुक्यांतील व पदर इलाख्यांतील बौद्ध लोकांत बहुपतित्वाची चाल आढळते. एखाद्या कुटुंबांतील चारपांच भावांनां मिळून एकच बायको असते. या सर्वांपासून त्या बायकोला जी संतति होईल ती थोरल्या भावाची समजली जाते. या चालीच्या अस्तित्वाचें एक कारण म्हणजे या प्रांतात उपजीविकेचीं साधनें फार कमी असल्यामुळें, प्रत्येकानें स्वतंत्र बायको करून प्रजोत्पत्ति केल्यास त्यांना खाण्यास पुरेसें अन्न मिळत नाहीं हें होय. एखाद्या घरात एकच पुरुष असला तर तो एखाद्या पाहुण्याला आपल्या घरीं बोलावून त्याला भावासारखा मानतो व ते दोघेहि मिळून एकाच स्त्रीचा उपभोग घेतात. अर्थात या बहुपतित्वाचा परिणाम स्त्रिया धीट व निर्लज्ज होण्यात होतो. या बौद्ध लोकांतील स्त्रिया एखाद्या मुसुलमानावर त्यांचें प्रेम बसल्यास राजरोसपणें त्या धर्मांत जाऊन त्याच्याबरोबर लग्न लावतात. तरी पण अलीकडे या बौद्धामध्यें एकपत्नीत्वाची व एकभर्तृत्वाची चाल हळू हळू रूढ होत चालल्याचें दिसतें. तसेंच लग्नानंतर एखाद्या स्त्रीचें दुसऱ्यावर प्रेम जडल्यास ती त्याच्याबरोबर लग्न करते व नूतन पति हा पूर्वीच्या नवऱ्याला कांहीं रकम नुकसानभरपाई म्हणून देतो. ही चाल जम्मू प्रांतातील ठक्कर, मेघ, चमियार, या खालच्या जातींत आढळून येते.

काश्मीरमध्यें मुसुलमानांची लोकसंख्या अधिक असल्यानें येथें बहुपत्नीत्वाची चाल अतिशय रूढ असावी असें सकृद्दर्शनी वाटतें, पण तसा प्रकार विशेष आढळून येत नाहीं. याचें कारण येथील शेतकरी वर्ग फार गरीब असतो. दोन तीन बायकांचा सांभाळ करणें त्याला जड जातें. अर्थात विशेष अडचणींशिवाय येथील लोक एकाहून अधिक बायका करून घेत नाहींत. एखादी बायको वांझ असेल, अगर एखादीला जात्याच शरीरात व्यंग असेल तर मात्र दुसरी बायको करण्याची चाल आढळते. उच्च जातींत मात्र ही चाल प्रायः आढळते. सवर्णविवाह, असपिण्डविवाह इत्यादि निर्बंध काश्मीरी पंडीत अगर वरिष्ठ वर्णांचे लोक पाळतात. खालच्या वर्गांत हें बंधन पाळलें जात नाहीं. काश्मीरी मुसुलमानामध्यें हीं बंधनें अजीबातच पाळलीं जात नाहींत. गिलजितमध्यें सजातीय विवाह होतात. मामेबहिण अगर चुलतबहिण यांच्याशीं विवाह करण्याची जी पद्धत आहे ती गिलजितमधील मुसुलमानांत विशेष रूढ आहे.

हिंदुधर्मशास्त्रात आठ प्रकारचे विवाह सांगितले आहेत. तशाच स्वरूपाचे विवाह, थोड्या फार फरकानें इतर देशांतहि कोणत्या ना कोणत्या काळीं प्रचलित असत. पण त्याशिवाय प्रत्येक देशाच्या कांहीं विशिष्ट पद्धती म्हणून असतातच. काश्मीरमध्येंहि अशा कांहीं पद्धती आढळून येतात. जम्मूमध्यें अशी चाल आढळते कीं एखाद्या मनुष्यानें आपल्या मुलाचें लग्न एखाद्याच्या मुलीशीं ठरविलें असेल तर त्या मनुष्यानें आपली मुलगी मुलीच्या भावाला दिली पाहिजे. याला दानप्रतिग्रहपद्धति असें म्हणतात.

एखाद्याला फक्त मुलगा असला व मुलगी नसली तर दुसऱ्याची मुलगी विकत घ्यावी लागते अगर मुलगी नसल्याबद्दल आपल्या व्याह्याला पैशानें भरपाई करावी लागते लदखमधील मुसुलमानांतहि ही पद्धत आढळून येते उधमपूर जिल्ह्यांतील मेघ, ठक्कर, डोम वगैरे जातींत भावी वराला आपल्या सासऱ्याच्या घरीं मोफत चाकरी करावी लागते. या परिचर्येच्या अवधींत आपल्या भावी पत्नीशीं त्यानें प्रणयचेष्टा केल्या तरी त्याला बंदी करण्यात येत नाहीं उलट ती चांगलीच गोष्ट मानतात हीच चाल या जिल्ह्यांतील पहाडी व जाट लोकांत व भदरवह येथील मेघ व गद्दी या लोकांत आढळते पुर्टे होणाऱ्या मुलींचें लग्न ठरवून ठेवण्याचीहि चाल क्वचित् आढळून येते. कृत्रिम विवाहाची एक चाल यांच्यात आढळते मुलीचें लग्न एका सावाशीं अगोदर लावून नंतर तिचें नेहमीप्रमाणें लग्न करण्यात येतें पण हीच चाल विधवांच्या बाबतींतहि काहीं ठिकाणी आढळते. एखाद्याच्या दोन बायका लागोपाठ मेल्या तर तिसरा विवाह अशुभ मानला जात असल्यानें तो करण्यापूर्वी तो अर्क ( अर्क ) अगर मदर (मादार) नावाच्या झाडाशीं विवाह लावतो व नंतर चौथा विवाह म्हणून ( खरा विवाह तिसराच ) एखाद्या मुलीशीं लग्न होतें. सुमारें तीस चाळीस वर्षांपूर्वी जम्मूप्रांतांतील रैसी, रामनगर, बसोली, किश्टवर, भदरवह इत्यादि ठिकाणीं मुलींचा व्यापार करण्याची चाल फार प्रचारांत होती या ठिकाणच्या चांगल्या चांगल्या मुली, पंजाब, सिंध या ठिकाणीं नेऊन विकावयाच्या व नंतर त्या मुलींनीं एकदोन वर्षे आपल्या नवऱ्याच्या घरीं राहून पळून परत आपल्या मालकाकडे यावयाचें अशी पद्धत होती पण हल्लीं त्या पद्धतीचा आळा घालण्याचे प्रयत्न काश्मीर सरकार करीत आहे.

बौद्ध व मुसुलमान लोकांत व बाल्तिस्तानच्या लोकांत घटस्फोटाची चाल सरसहा आढळून येते. नवराबायकोनीं एक फडकें दोघांमध्यें धरून तें दोघांनीं ओढून फाडण्याची चाल आहे. व त्या योगानें नवरा व बायको यांचे परस्परांचें नातें नाहींसें होतें बायकोच्या अपराधामुळें हा घटस्फोट घडून आला असेल तर त्याबद्दल बायकोनें नवऱ्याला भरपाईदाखल, एक घोडा अगर २० रुपये द्यावयाचे व नवऱ्याकडे चूक असेल तर नवऱ्यानें १२ रुपये अगर एक गाय बायकोला द्यावयाची चाल आहे अनेक नवऱ्यांपैकीं एका नवऱ्यानें बायकोशीं घटस्फोट करावयाचें मनात आणलें तर तीन आपले चंबूगबाळें घेऊन दुसऱ्या घरीं रहावयास जातो.

काश्मीरसारख्या मागसलेल्या देशांत बालविवाहाची पद्धत फारीनें अमलात असली पाहिजे असें सकृद्दर्शनीं वाटण्याचा संभव आहे, पण हिंदुशिवाय इतर धर्मीयांत व शिरांत ही चाल आढळून येत नाहीं यांच्यामध्यें मुलींचें लग्न १६ ते २० च्या दरम्यान करतात व मुलांचें १८–२०च्या दरम्यान होतें. साधारणतः मुलापेक्षां मुलगी तीन चार वर्षांनीं तरी लहान असते लदखमध्यें मुलींचें वय मुलापेक्षां अधिक असतें. एखादा बौद्ध इसम म्हातारा झाला असला व त्याची मुलें अज्ञान असलीं तर त्या अज्ञान मुलांचें तो एका वृद्ध बाईशीं लग्न लावतो व तीं मुलें सज्ञान होईपावेतों ती वृद्ध बाई त्यांचें परिपालन करते

मूल जन्माला आलें म्हणजे कोणकोणते विधी करावयाचे त्याचा नामकरण विधि केव्हां करावयाचा इत्यादि विधींविषयीं निरनिराळ्या जातींत निरनिराळ्या तऱ्हा आहेत पण त्या विशेष महत्वाच्या नाहींत

**अविभक्त कुटुंब पद्धति**—ही पद्धत, डुगर, लदख, झन्सकर इलाख्यांत व काश्मीरप्रांतांत दिसून येते चिभल, बाल्तिस्तान व सरहद्दीवरील टेकड्यांमधील प्रदेशांत हिचा मागमूसहि नाहीं हिंदूमध्यें या पद्धतीचें अस्तित्व पूर्वापारच आहे व तें अद्यापीहि चालू आहे चरक रजपुतांमध्यें देखील हिचें अस्तित्व आहे, पण ठक्करलोकांत ही पद्धत विशेष रीतीनें पाळली जात नाहीं ब्राह्मण व क्षत्रिय या वर्णांत ही पद्धत आढळते, तर मेघ, डोम, चमिगर इत्यादि खालच्या वर्गांत विभक्त रहाण्याचीच चाल आढळून येते शेतकरी वर्गामध्यें ज्या त्या माणसाच्या परिस्थितीप्रमाणें विभक्त अगर अविभक्त राहाण्याची पद्धत आहे. लडखच्या बौद्धांत अविभक्तकुटुंबाची पद्धत आहे मुसुलमानांमध्यें या पद्धतीचें अस्तित्वच नाहीं हल्लींच्या युरोपीय संस्कृतीचा परिणाम हळू हळू येथेंहि दृग्गोचर होऊं लागला आहे व सुशिक्षित लोकांना विभक्त रहाण्याची आवड लागत चालली आहे

**धार्मिक चालीरीती**—काश्मीरमध्यें हिंदुधर्मीयांत मूर्तिपूजेचें फारच स्तोम आहे हिंदुधर्माच्या ज्या ज्या देवता आहेत त्यांची येथें पूजा होतेच पण जम्मूप्रांतांतल्या काहीं काहीं भागांत ग्रामदेवता व कुलदेवता यांचीहि पूजा करण्यात येतें ज्या घराण्यांतील बायका सति गेल्या असतील त्यांचीहि देवता समजून पूजा करण्यांत येते पण त्यांतल्यात्यांत जम्मू, जसोता, रैसी, मिरपूर, इत्यादि प्रदेशांत शिव, रघुनाथ, कृष्ण, महावीर, भैरवनाथ, राम इत्यादि देवतांची प्रामुख्यानें उपासना करण्यांत येते डोंगराळ प्रदेशांत नाग व काली यांची उपासना अधिक प्रचारांत आहे. काश्मीरप्रांतांत गणेशजी, गजधर, शारदादेवी यांची उपासना रूढ आहे प्राचीन वीर व सद्गुणी पुरुषांचीहि देवता म्हणून पूजा करण्यात येते. उदाहरणार्थ, मडलीक राजा मेर राजपुत्र, कलिवीरप्रधान, गोगराजा, बाबा जेनाथ, सिद्धगोरिया जोगी इत्यादि देवतांच्या प्रीत्यर्थ असंख्य यात्रा व उत्सवहि साजरे करण्यांत येतात. पण त्यांतल्यात्यांत अमरनाथाची यात्रा, त्रिकुटतीर्थ अगर विष्णुदेवीची यात्रा, चनेनीमधील शिवजीची यात्रा या यात्रा फार प्रसिद्ध आहेत. होळी, दिवाळी, दसरा या स शहराशिवाय इतरत्र फारसे दिसून येत

सर्वत्र साजरे करण्यात येतात.उदाहरणार्थ लोहरी,वसंतोत्सव, वैशाखी उत्सव इत्यादि

मुसुलमानामध्यें साधूंची पूजा फार प्रचारात आहे. सय्यद अबदुल कादर जिलानी हा काश्मीरी मुसुलमानाचा राष्ट्रीय संत होय त्याशिवाय पीर, मिय्या, पंजापीर इत्यादि पीराची पूजा जम्मूमध्यें थाटात करण्यात येते येथें पुष्कळ मशीदी प्रसिद्ध असून श्रीनगरची जुम्मामशीद फार प्रसिद्ध आहे. मुसलमानातहि पुष्कळ यात्रा व सण साजरे केले जातात. महंमदाची जयति फारच थाटानें साजरी करण्यात येते. काश्मीरमधील बहुतेक मुसुलमान मूळचे रजपूत असल्यानें त्याच्यामध्यें अद्यापि पुष्कळ हिंदु चालीरीतींचें अस्तित्व आढळतें.

पो षा ख.—काश्मीरी पंडित हे अंगात पैरण घालतात. काश्मीरी मुसुलमान तशाच स्वरूपाचा पोषाख परिधान करतात. काश्मिरी पंडित पागोटें घालतात. काश्मिरी शियापंथाचे मुसुलमानहि अशाच प्रकारचें शिरोवस्त्र धारण करतात बौद्ध लोक लोकरी कानटोपी वापरतात. फक्त या कानटोपीचीं खालचीं टोकें वर वळविलेलीं असतात काश्मिरी पंडिताच्या बायका, आपल्या झग्यावर कमरपट्टा बांधतात. सुनी जातीचे मुसुलमान फकीर पांढरा झगा व पांढरें पागोटें वापरतात तर शिया धर्मगुरू काळा झगा व काळें पागोटें वापरतात. हिंदू लोक शेंडी ठेवतात. शीख लोकांनीं लांब केस ठेवलेले आढळतात. बाल्तिस्तानामधील शियापंथी मुसुलमान लोक दाढी व मिशा राखतात व त्या नेहमीं विंचरून स्वच्छ ठेवतात. त्यांची प्रार्थना करण्याचीहि पद्धत निराळी आहे. सुनी व मौलवी बेंबीपाशीं हात जोडून प्रार्थना करतात. नूरबक्षी लोक छातीजवळ हात जोडतात व शिया लोक यापैकीं काहींच प्रकार करीत नाहींत.

घ रें.—डोंगरपठारावरील प्रदेशांतील घरें, आपल्या इकडील माळवदी घरासारखींच असतात. घरें मातीचीं बांधलेलीं असून त्यावरील छप्पर अगदीं सपाट असतें. उन्हाळ्यामध्यें या छपरावर निजण्याची पद्धत आहे. घराला एक धाकटासा दरवाजा असतो. डोंगरावरील प्रदेशांतील घरें थोडीशीं प्रशस्त बांधलेलीं दिसतात. प्रत्येक घराला देवडी असून अंगणहि ठेवलेलें असतें. बाकी घराची रचना डोंगरपठारावरील घराप्रमाणेंच असते पावसाळ्यात छपरावर मुद्दाम गवत वाढेल अशी तजवीज करण्यात येते. काश्मीरमधील घरें लाकडाचीं बांधलेलीं असतात. या लाकडाच्या आत माती भरलेली असते व त्यामुळें पावसाळ्यामध्यें घरात पाणी शिरत नाहीं. काश्मीरमधील घरें एकजात तिमजली असतात. क्वचित् चौमजली, पांचमजलीहि असतात. तळमजल्यात गुरेंढोरें बांधण्याची सोय केलेली असते. दुसऱ्या मजल्यावर स्वयंपाकगृहाची सोय असते. तिसऱ्या मजल्यावर दिवाणखाना व इतर धान्य वगैरे ठेवण्याची व्यवस्था केलेली घराभोंवतीं बागबगीचा क्वचितच आढळून येतो. पायखाने श्रीमंतांच्या घरांतच दृष्टीस पडतात. काश्मीरमधील लोकांत विशेषशी स्वच्छता आढळून येत नाहीं. धान्य ठेवण्यासाठीं काहीं लोक एक स्वतंत्र घरच बांधतात. लदाख वगैरे सरहद्दीवरील प्रांतात मातीचींच घरें बांधण्याची वहिवाट आहे तेथील घरांना लाकूड वापरलेलें आढळत नाहीं प्रत्येक घराला एक पटांगण असतें घरें फार लहान व कुंजी असतात. ही खेडेगावांतील घरांची स्थिति झाली पण शहरांतील घरें मात्र विटांचीं, दगडाचीं व चुनेगच्ची बांधलेलीं असतात. श्रीनगर येथील श्रीमंत लोकांच्या घरात बरेंच नक्षीकाम केलेलें दृष्टीस पडतें काश्मीर व जम्मू येथील राजवाडे उत्कृष्ट तऱ्हेचे बांधलेले आहेत व त्या ठिकाणीं वास्तुकलेचा उत्कृष्ट नमुना पहावयास मिळतो.

शा स न प द्ध ति —राज्यकारभार चालविण्याच्या दृष्टीनें काश्मीर संस्थानाचे तीन भाग पाडलेले आहेत. जम्मू, काश्मीर व सरहद्दीवरील प्रांत आणि मांडलिक संस्थानें असे ते तीन भाग अगर सुभे होत. या प्रत्येक सुभ्याचा कारभार सुभेदाराकडे असतो. या तिन्ही सुभ्यांचे मिळून दहा जिल्हे पाडण्यात आले आहेत. जम्मू प्रांताचे जम्मू, जसरोटा, उधमपूर, रेसी व मिरपूर हे पांच जिल्हे आहेत. काश्मीर प्रांताचे उत्तरकाश्मीर, दक्षिण काश्मीर व मुझफराबाद हे तीन जिल्हे आहेत व सरहद्दीवरील प्रांताचे लदख व गिलजित हे दोन जिल्हे आहेत. या प्रत्येक जिल्ह्यावर एक जिल्हाधिकारी नेमण्यात आलेला आहे. याशिवाय प्रत्येक जिल्ह्याचे पुष्कळ पोटविभाग उर्फ तहशीली केलेल्या आहेत. मांडलिक संस्थानाची संख्या ६ असून तीं संस्थानें म्हणजे पुनियल, इकोमन, यसीन, हुंझा, नगर व छिलस हीं होत. या संस्थानावर ब्रिटिश सरकारनें नेमलेल्या एका अधिकाऱ्याची देखरेख असते. पंच, भदरवह व चनेनि या तीन जहागिरी आहेत. तिबेट सरकारच्या ताब्यात असलेल्या प्रदेशांतील मनसर नावाचें एक खेडें हें काश्मीर संस्थानच्या सत्तेखालील असून लदखचा अधिकारी व ब्रिटिश कमिशनर हे दोघे मिळून त्याच्यावर देखरेख करतात.

महाराजा गुलाबसिंगाच्या कारकीर्दीत काश्मीर संस्थान अगदीं स्वतंत्र होतें म्हटलें तरी चालेल. पुढें महाराजा रणवीरसिंगाच्या कारकीर्दीत काश्मीरमध्यें जाऊं इच्छिणाऱ्या यूरोपीयन लोकांना पासपोर्ट देण्याकरितां एक खास अधिकारी ब्रिटिशसरकारनें नेमला व याच्याकडे काश्मीरदरबार व ब्रिटिशसरकार याच्यामधील हितसंबंधाचें रक्षण करण्याचें काम देण्यात आलें. इ.स.१८८५मध्यें हल्लींचे महाराजा गादीवर बसल्यानंतर पासपोर्ट देणाऱ्या अधिकाऱ्याच्या ऐवजीं ब्रिटिश सरकारनें एका रेसिडेंटची नेमणूक केली. इ.स.१८८८ मध्यें महाराजाच्या खास इच्छेवरून काश्मीरची राज्यव्यवस्था महाराजाचे बंधु, राजा सर अमरसिंग व दोन गोरे सिव्हिलियन यांचे कौन्सिल नेमून त्याच्याकडे सोंपविण्यात आली. या कौन्सिलचा अध्यक्ष रेसिडेंट हा असावा असें ठरलें.

१८९१ मध्यें या रेसिडेंटच्या बदलीं स्वतः महाराज हेच अध्यक्ष झाले. सन १९०५ सालीं कौन्सिल मोडण्यात येऊन महाराजानींच सर्व राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं. आपल्या हाताखालीं तीन अधिकारी व एक प्रधान नेमून त्यांच्याकरवीं त्यांनीं राज्यकारभार चालविण्याचा उपक्रम केला. पुढें तीन अधिकाऱ्यांऐवजीं दोनच अधिकारी ठेवण्यांत आले व तीच व्यवस्था हल्लीं चालू आहे.

न्यायखात्याच्या कामासाठीं प्रत्येक तहशीलीमध्यें एक कोर्ट स्थापण्यात आलें आहे. १९००–१९०१सालीं काश्मीरमध्यें ८१ कोर्टें होतीं. गुन्ह्याच्या बंदोबस्तासाठीं व तपासासाठीं पोलिसखातें निर्माण करण्यांत आलें आहे.

१८८० पर्यंत सरकारी सारा पैशाच्या रूपानें देण्याची वहिवाट नव्हती. १८८७ मध्यें सर्व जमिनीची मोजणी होऊन साऱ्याचा आकार ठरविण्यात आला. काश्मीरमध्यें इतर ठिकाणाप्रमाणें रयतवारी पद्धतीच अस्तित्वात आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें ९३ लाख रुपये आहे.

वै द्य क खा तें:—श्रीनगर व जम्मू येथें दोन दोन दवाखाने असून शिवाय जम्मू येथें लष्करी लोकांसाठीं एक स्वतंत्र रुग्णालय आहे. सत्वारी कँटोनमेंट याठिकाणींहि एक लष्करासाठीं रुग्णालय आहे. श्रीनगर येथें एक महारोग्यासाठीं दवाखाना आहे. इ.स. १९०१सालीं काश्मीरमध्यें एकंदरींत ६७ लहान मोठीं रुग्णालयें होतीं. याची व्यवस्था जम्मू व काश्मीर येथील वैद्यकखात्याच्या अधिकाऱ्याकडे असते. देवी काढण्याचें खातेंहि येथें स्थापन झालें आहे. काश्मीरमध्यें पटकीची साथ फार मोठ्या प्रमाणात आढळून येते. एकदां का ही साथ आली कीं ती तीन चार महिने सारखी टिकून रहाते व अशा वेळीं मृत्यूचें प्रमाण फारच वाढतें. इ. स.१९११सालीं १८,४४८ लोकाना पटकीचा आजार होऊन ९,२१८ लोक मरण पावले. पटकीच्या खालोखाल प्लेगचाहि येथें बराच प्रसार आहे व काश्मीरच्या लोकसंख्येची खच्ची करण्याच्या कामात त्याचा बराच वाटा आहे. उपदंश, खरूज, गलग्रंथि हे रोग काश्मीरी लोकात मोठ्या प्रमाणात आढळून येतात. इ. स.१९११ च्या खानेसुमारींत, वेडे, आंधळे, मुके, बहिरे व कुष्ठी यांचें प्रमाण लाखास अनुक्रमें ७८, ३०६, १९४ व ८५ असें पडलें. वेड्यांचें इस्पितळ काश्मीरमध्यें नसल्याकारणानें फार गैरसोय होते व अशा लोकांना पंजाबमध्यें जावें लागतें.

द ळ ण व ळ ण.—काश्मीरमध्यें दळणवळणाची सोय चांगल्या तऱ्हेनें होणें फार अवघड काम आहे तरी पण काश्मीरसरकारनें या कामीं शक्य तों सटपट चालू ठेवली आहे. अद्यापिहि असे कित्येक भाग आहेत कीं, पावसाळ्यामध्यें ज्या ठिकाणीं दळणवळणाचें कोणतेंच साधन रहात नाहीं. श्रीनगरपासून बारमुल्लापर्यंत व तेथून झेलम दरींतून अबटाबादपर्यंत व पंजाबमधील मरी शहरापर्यंत बैल गाडीचा रस्ता असून आतां श्रीनगर ते उधमपूरपर्यंतहि रस्ता झालेला आहे. विष्णुदेवीच्या यात्रेला जाण्याकरता कात्रापर्यंत टांगा जाण्याजोगा रस्ता झालेला आहे. झेलम नदींतून जलमार्गाची सोय करण्यांत आली आहे. इ. स. १९०१ सालीं काश्मीरसंस्थानात जवळ जवळ २,६०० मैल चांगला रस्ता तयार होता तो इ. स. १९११ सालीं ८,३०० मैलपर्यंत झाला आहे. काश्मीरसंस्थानच्या मालकीची आगगाडी अवघी १६ मैल असून ती नॉर्थवेस्टर्न रेल्वेच्या हद्दींत आहे. तारायंत्राची सोय सर्व काश्मीरभर झाली असून ११०० मैलांपैकीं जवळ जवळ ५७० मैल तारायंत्राची मालकी संस्थानची आहे. पोस्टखात्याची मालकी ब्रिटिशसरकारनें आपल्या हातीं ठेवली असून बहुतेक काश्मीरभर पोस्टाचें जाळें पसरलें आहे. तरी अद्यापि बऱ्याच ठिकाणीं पोस्टाची वाण भासत आहे

उ द्यो ग धं दे.—काश्मीरमधील लोकांचा मुख्य धंदा म्हणजे शेतीचा होय. शेतीचा धंदा करणारे लोक, लोकसंख्येच्या $\frac{3}{4}$ वर आहेत. इ. स. १९११ मधील खानेसुमारीत ३१ लाख लोकसंख्येपैकीं केवळ शेतकीचा धंदा करणारे लोक जवळ जवळ ११ लाख आढळून आले. याशिवाय शेतांत मजुरी करणाऱ्यांची संख्या निराळीच व तीहि कांहीं कमी नाहीं. काश्मीरसंस्थानात निरनिराळ्या भागात मोठमोठीं जंगलें आहेत. विशेषतः झेलम दरींतून तर फारच मोठीं व नयनरम्य जंगलें आहेत. या जंगलामध्यें निरनिराळ्या प्रकारचीं झाडें व वनस्पती यांची समृद्धि असल्यानें या जंगलामध्यें राहून पुष्कळ लोक आपली उपजीविका करतात. काश्मीरसरकारनें या जंगलांवर एक स्वतंत्र अधिकारी नेमला आहे. इ. स.१९११ सालीं या अधिकाऱ्याच्या ताब्यांत ४,२१४ चौरस मैल इतकें जंगल होतें. जंगलखात्याचें उत्पन्न दरवर्षी १७ लाख पर्यंत होतें व खर्च वजा जाता या खात्यात सरकारला चांगलीच बचत करता येते. खानेसुमारीवरून पहातां काश्मीर प्रातांत शेंकडा ८० व जम्मू प्रांतात शेंकडा ५० लोक या जंगलावर आपली उपजीविका करतात असें आढळून आलें. या जंगलात इमारतीला लागणारें सागवानी लाकूड, मुबलक गवत व चारा, शेतकीचीं औतें करण्यास व भांडीं करण्याला लागणारें लाकूड, औषधींना उपयुक्त अशा वनस्पती, कोळशाला लागणारें लाकूड, तरवडीची साल, इत्यादि अनेक वस्तू उपलब्ध होतात. सागवानावर मात्र सरकारी कर आहे. बाकीच्या सर्व वस्तू पाहिजे त्यानें सरकारी परवानगी घेऊन नेण्यास मुभा आहे.

शेतीचें उत्पन्न म्हणजे तांदूळ, मका, कापूस, केशर, तंबाखू, गहूं, कडधान्यें तीळ इत्यादि पिकें हिंवाळ्यात व गहूं, जोंधळा, इत्यादि धान्यें उन्हाळ्यांत होतात. सर्वांत मुख्य पीक तांदुळाचें असून शेतकरी याकडे विशेष लक्ष पुरवतात त्याच्या खालोखाल मक्यानें पीक होय. केशर नेंहि उत्पन्न दांडगें आहे. श्रीनगरच्या आसपास उत्पन्न होतें. डाल सरोवराच्या आसपास शर

बागाच्या बागा आहेत. या बागांमधून विविध प्रकारच्या भाज्या व वनस्पती पेरलेल्या आढळतात. नवलकोल ही काश्मीरी लोकांची आवडती भाजी होय. काश्मीरमध्यें अनेक प्रकारचीं फळें उत्पन्न होतात. काश्मीर हा फळांचा देश आहे असें म्हटलें तरी चालेल. अंजू नावाचीं फळें या ठिकाणीं मुबलक होतात व तीं काश्मीरबाहेर मोठ्या प्रमाणावर जातात. काश्मीर हें पूर्वी द्राक्षासाठीं फारच प्रसिद्ध होतें पण हल्लीं येथें *द्राक्षाची लागवड फारशी होत नाहीं.*

*काश्मीरमधील गुरें खुजी पण मोठीं काटक* असतात. त्याचा रंग सर्वसाधारण काळा अगर करडा असतो. मेंढ्यांची येथें समृद्धि आहे. या मेंढ्यांपासून पुष्कळच लोंकर तयार होते. खेचरेंहि पुष्कळ असून तीं फार खुरटीं पण दमदार असतात. लोलाब दरीमध्यें व इतरत्रहि कोंबडीं पुष्कळ आहेत. *बदकें, पारवे, हंस, हे पक्षी या ठिकाणीं आढळतात*

काश्मीर हें रेशमासाठीं फार प्रसिद्ध आहे. *याठिकाणीं* हवें तितकें व उच्च प्रकारचें रेशीम उत्पन्न करता येण्यासारखें आहे. या बाबतींत महाराजा रणबीरसिंगाच्या कारकीर्दीत सरकारनें लक्ष देण्यास सुरुवात केली व हल्लीं सरकारनें जवळ जवळ हा धंदा आपल्याच ताब्यांत घेतला आहे. श्रीनगर येथें सरकारी रेशमाचा कारखाना असून त्यात २४७६ माणसें काम करतात. काश्मीरची रेशमी शालीबद्दल अत्यंत प्रसिद्धि आहे. काश्मीरमध्यें उत्तम शाली तयार करणारी १४८ माणसें *खानेसुमारीत आढळून आलीं. गालिचे तयार* करण्याचा कारखाना श्रीनगरमध्यें असून तो यूरोपीयन लोकांच्या ताब्यात आहे.

*ख नि ज सं प त्ति.—काश्मीरमध्यें खनिज पदार्थांची वाण* आहे अशी अगदीं अलीकडील काळापर्यंत समजूत होती *पण ती समजूत चुकीची ठरून* काश्मीरमध्यें पुष्कळ खनिज संपत्ति सापडेल असें तज्ज्ञांना वाटूं लागलें आहे. सोनें, तांबें व लोखंड या धातूंच्या खाणी लडख प्रांतात आहेत असें तज्ज्ञांचें मत आहे. पण चांगल्या दळणवळणाच्या अभावीं *अद्यापि या खाणी खणण्याचें* काम लावणीवर पडलें आहे. गिलजितच्या आसपासच्या मुलखांतून सोनें काढण्याचा धंदा सुरु झाला आहे. पदर इलाख्यात नीलमण्याची खाण १८८२ मध्यें सापडली असून ती सरकारनें आपल्या ताब्यात ठेवली आहे. उधमपूर जिल्ह्यातील लड व अंजी याठिकाणीं कोळशाच्या खाणी सापडल्या असून तेथें ११ दशलक्ष टन कोळसा निघतो. दक्षिण काश्मीरमध्यें उत्तम लोखंड उपलब्ध होतें. येथें चुन्याच्या खाणीहि पुष्कळ सापडल्या आहेत.

का र खा ने.—रेशीम,गालीचे तयार करण्याचे कारखाने, तेलाचे कारखाने व दारू तयार करण्याचे कारखाने काश्मीरमध्यें आहेत. लोंकरीच्या व ब्लँकेटें तयार करण्याच्या गिरण्याहि काश्मीरमध्यें निघाल्या आहेत. नक्षीकाम करण्याचे कारखाने काश्मीरमध्यें पुष्कळ आहेत.

आ या त व नि र्ग तः—१९०४-५च्या दरम्यान काश्मीरमध्यें ११५ लाख रुपयांची आयात झाली, तर १९११ मध्यें १,८७,०८,४६० रुपयाची आयात झाली. आयात मालामध्यें धातु (२६०००), मीठ ( ३११००० ), साखर (६७६०००), चहा ( १५३००० ), तंबाखु ( ११३००० ), कापुस,व कापड (१६४८०००) हे जिन्नस होत. १९११ मध्यें १,५८,९२,४२ रुपयांच्या मालाची निर्गत झाली. निर्गत मालात गुरेंढोरें ( १६५००० ), धान्य ( ४०१५०० ), लोंकर व लोकरी कपडा ( १४६००० ), सागवान ( २५२१०० ), अफू ( ८५०० )व कातडीं ( २११००० ) रु. किं हे जिन्नस होते.

प्रा ची न का ळ चा इ ति हा सः—प्राचीन काळीं हिंदुस्थानात सुसंगत रीतीनें इतिहास लिहिण्याची कला हिंदूंना *अवगत नव्हती असें अर्वाचीन विद्वानांचें* म्हणणें आहे. त्या म्हणण्यात किती तथ्यांश आहे हें पहाण्याचें आपल्याला प्रयोजन नाहीं, पण काश्मीरच्या बाबतींत मात्र तें म्हणणें लागू पडत नाहीं हें निर्विवाद आहे. काश्मीरचा प्राचीनकाळचा इतिहास कल्हण नावाच्या एका १२ व्या शतकातल्या पंडितानें आपल्या 'राजतरंगिणी' नामक सुप्रसिद्ध ग्रंथात लिहिलेला आज उपलब्ध आहे. त्यावरुन आपल्याला काश्मीरच्या प्राचीन इतिहासासंबंधींची बरीच विश्वसनीय अशी माहिती मिळते. राजतरंगिणीच्या प्रस्तावनेंत कल्हणानें *आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या सुव्रत, क्षेमेंद्र, नीलमुनि, पद्म*मिहिर व हेलराज या नृपावलीकारांचीं नावें सांगितलीं आहेत, व त्याच्या ग्रंथांच्या व तसेंच दानलेख, शिलालेख व इतर प्रशस्ति-पत्रें याच्या आधारें आपण 'राजतरंगिणी' उर्फ काश्मीरचा इतिहास हा ग्रंथ लिहिला असें म्हटलें आहे. अर्थात *इतक्या परिश्रमानें लिहिलेला ग्रंथ विश्वसनीय मान*ण्यास मुळींच हरकत नाहीं. कल्हणानें या ग्रंथात इ.स.११४८ पर्यंतची काश्मीरची माहिति दिली आहे. त्याच्यानंतरचा १४२० पर्यंतचा इतिहास जोनराज नांवाच्या कवीनें लिहिला. श्रीधर कवीनें या इतिहासाचा धागा इ.स.१४८६ पर्यंत आणून भिडविला व प्राज्ञभट्ट नावाच्या कवीनें अकबरानें काश्मीर आपल्या ताब्यांत आणीतोंपर्यंतचा म्हणजे १५८८ पर्यंतचा इतिहास आपल्या राजवलिपताक ग्रंथात लिहिला. त्यानंतरचा इतिहास *आपल्याला फारसी व इंग्लिश ग्रंथकाराच्या* ग्रंथातून वाचावयास मिळतो.

राजतरंगिणीच्या प्रारंभीं असें म्हटलें आहे कीं, कल्पारंभापासून सहा मन्वंतराच्या काळांत हिमालयाच्या पोटातील भूमि पाण्यानें तुडुंब भरली असल्यामुळें तिच्यामधून शंकरांची प्रिया पार्वती ही आपल्या करमणुकीसाठीं नेहमी नौका चल्हवीत असे. तिला हें स्थान फार प्रिय वाटल्यामुळें या सरोवराला 'सतीसरोवर' असें नांव पडलें. या सरोवरात *जलोद्भव नावाचा राक्षस* रहात असे. तो या सरोवराच्या आसपासच्या भागाला फार उपद्रव देऊं लागल्यामुळें प्रजापती कश्यपानें या जलोद्भवाचा वध करून त्या ठिकाणीं

काश्मीर हा देश निर्माण केला पुढें या राक्षसाचा नाश नाहींसा झाल्यामुळें त्या ठिकाणीं लोकवस्ती होऊं लागली व नंतर छोटीं राज्यें निर्माण झालीं

अशा या पवित्र व निसर्गरमणीय प्रदेशावर गोनर्द नावाचा राजा फार प्राचीन काळीं राज्य करीत असे या राजाच्या वंशजांनीं काश्मीरावर कित्येक शतकें राज्य केलें काश्मीरमध्यें यावेळीं नाग नावाचे लोक रहात असत हे नागाची म्हणजे सर्पांची पूजा करीत असत त्याचप्रमाणें गंधारी, खश, दरद इत्यादि लोकांचीहि या ठिकाणीं वस्ती असे या ठिकाणीं ब्राह्मणीधर्म प्रचलित होता पुढें खि पू २४५ च्या सुमारास सम्राट अशोकानें काश्मीर येथें बौद्धधर्माचा उपदेश करण्याकरितां भिक्षुमंडळ पाठविलें या भिक्षूंनीं त्या ठिकाणीं बौद्धधर्माचा बराच प्रसार केला पण अशोकाच्या मरणानंतर बौद्धधर्माला उतरती कळा लागून काश्मीरमध्यें ब्राह्मणीधर्मानें पुन्हा वर डोकें वाढण्यास सुरवात केली ख्रिस्ती शकाच्या आरंभीं काश्मीरवर कुशान घराण्याची सत्ता चालू होती या कुशान घराण्यांतील हुविष्क, जुष्क व कनिष्क या राजांच्या अमदानींत काश्मीरमध्यें पुन बौद्ध धर्माची चलती झाली तरी पण ब्राह्मणी धर्मीहि एकसमयावच्छेदेंकरून या ठिकाणीं चालूच होता अशीच स्थिति काश्मीरमध्यें बरीच शतकें चालू होती

मध्यकाल कर्कोटक घराण्याचा उदय —गोनर्दानें चालू केलेल्या गोनर्दीय वंशांतील बालादित्य नावाचा शेवटचा राजा निपुत्रिक मरण पावल्यामुळें त्याचा वंश लयास गेला त्याच्या पाठीमागून त्यानें ठरवून ठेवल्याप्रमाणें त्याचा जावई दुर्लभ वर्धन हा ६०१ मध्यें गादीवर बसला हा दुर्लभवर्धन कर्कोटक वंशाचा होता या कर्कोटक घराण्याचें राज्य सुरू होण्या पूर्वी (सु रें शतक) बौद्धधर्माला उतरती कळा लागली होती गोनर्दीय वंशाचा राजा प्रवरसेन यानें हिंदुशाहीचें काश्मीरांत पुनरुज्जीवन करून शिवोपासनेची स्थापना केली होती दुर्लभ वर्धनाच्या कारकीर्दींत प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएनत्संग हा काश्मीरांत आला होता त्यावेळीं त्याला देशांतील बौद्धधर्माला उतरती कळा लागली असल्याचें आढळून आलें अशी स्थिति असल्यामुळें बौद्धधर्मांतील अहिंसादि तत्वांचा नायनाट झाल्यामुळें क्षात्रतेज लोकांत झळकूं लागलें होतें या संधीचा फायदा घेऊन दुर्लभवर्धनानें आपल्या राज्याचा विस्तार वाढविण्यास सुरवात केली हिमालयाच्या पायथ्या पासून तों मिठाच्या डोंगरापर्यंतचा पंजाबचा बहुतेक भाग त्यानें आपल्या सत्तेखालीं आणिला दुर्लभवर्धन हा ६३७ त मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा दुर्लभक हा गादीवर आला त्यानें प्रतापादित्य हें नवीन नांव धारण केलें हा अत्यंत न्यायप्रिय व प्रजाहिततत्पर असा राजा होता याच्या संबंधीं राजतरंगिणीमध्यें पुष्कळच कथा आल्या आहेत त्यानें आपल्या अमदानींत पुष्कळ मंदिरें बांधलीं दुर्लभकाच्या निधनानंतर त्याचा वडील मुलगा चंद्रापीड हा राज्यावर आला त्यानें सातआठ वर्षें राज्य केलें पुढें त्याचा धाकटा भाऊ तारापीड यानें त्याचा वध करवून राज्य बळकाविलें तारापीड हा फार जुलमी राजा होता त्यानें अवघीं चार वर्षें राज्य केलें त्याच्यानंतर चंद्रापीडाचा सर्वांत धाकटा भाऊ मुक्तापीड हा गादीवर आला

राज्यारूढ होतांना मुक्तापीड आपणाला 'ललितादित्य' म्हणवून घेऊं लागला तो अत्यंत महत्वाकांक्षी असल्यामुळें त्यानें दिग्विजय करण्याचें ठरविलें कनोजचा महापराक्रमी राजा यशोवर्मा याचा त्यानें पराजय केला त्यानंतर त्यानें गौडराजावर स्वारी करून त्याला जिंकलें त्याचप्रमाणें कलिंग, कर्णाट, कावेरी, कोंकण, सौराष्ट्र द्वारका, अवन्ती इत्यादि प्रदेशावर स्वाऱ्या करून ते सर्व प्रदेश अमलाखालीं आणिले नंतर त्यानें उत्तरेकडे आपलें लक्ष्य वळविलें उत्तरेकडील दरद व तिबेट हे देश त्यानें सहजरीतीनें जिंकून तुर्कांवर स्वारी केली व त्याचा तीनदां पराभव केला। अशा रीतीनें दिग्विजय केल्यामुळें त्याला अपार संपत्ति मिळाली व तिचा त्यानें फार चांगल्या रीतीनें उपयोग केला आपल्या अमदानींत मोठमोठीं देवालयें बांधलीं भूतेश नामक एका शिवमंदिरासाठीं त्यानें ११ कोट रुपये खर्च केले अद्यापीहि वास्तुकलेचा उत्कृष्ट नमुना म्हणून प्रसिद्ध असलेलें मार्तंडाचें ( सूर्याचें ) मंदिर, वितस्ता नदावरील पूल परिहासपूर नावाचें नगर, ५४ हात उंचीच्या अखंड पाषाणाच्या स्तम्भावर उभारलेला गरुड इत्यादि अनेक मंदिरें त्यानें बांधल्याबद्दलचा राजतरंगिणीमध्यें उल्लेख आढळतो त्याची शासनपद्धतिहि संस्मरणीय होती आपल्या प्रचंड साम्राज्याच्या कारभारासाठीं त्यानें महाप्रतिहारी, महासंधिविग्रहक (परराष्ट्रमंत्रि) महाश्वशल, महाभाण्डागार व महासाधनिक असे पांच अधिकारी नेमले होते त्यानें अनाथासाठीं अन्नछत्रें व पाणपोया जागोजागीं चालू केल्या होत्या हा उत्तरेकडे स्वाऱ्या करावयास गेला असतां मध्येंच मरण पावला

ललितादित्यामागून त्याच्या गादीवर अनुक्रमें कुवलयापीड व वज्रादित्य हे राजे बसल्यानंतर जयापीड हा गादीवर आला हा ललितादित्याचा नातू होता आपल्या आजाप्रमाणेंच यानेंहि दिग्विजय करण्याचें ठरवून तो पार पाडला जयापीड हा स्वत मोठा पंडित असून विद्वानांचा आश्रयदाता होता अमरकोशाचा प्रसिद्ध टीकाकार क्षीरस्वामी, साहित्यग्रंथाचा कर्ता उद्भट, व्याकरण व साहित्यशास्त्रावरील टीकाकार वामन, कुट्टिणीमताचा कर्ता दामोदर गुप्त इत्यादि अनेक विद्वान् त्याच्या पदरीं होते अशा रीतीनें आपल्या प्रथमारंभींच्या कारकीर्दींत तो फार चांगला राजा म्हणून प्रसिद्ध होता पण कोणत्या कारणानें असेल तें असो, त्याच्या स्वभावांत पुढें फार फरक पडून त्यानें आपल्या प्रजेवर जुलूम करण्यास सुरवात केली त्यामुळें सर्व प्रजा त्याच्यावर फार असंतुष्ट झाली तो ७८२ मध्यें मरण पावला त्याच्या पाठीमागें त्याच्या

घराण्यात दोन तीन राजे होऊन, नंतर उत्पल घराण्याची सत्ता काश्मीरवर चालू झाली. कर्कोटक वंशाचे एकंदर १७ राजे काश्मीरच्या राज्यावर बसले व त्यांनी एकंदर २५० वर्षे काश्मीरवर राज्य केलें. कर्कोटक घराणें शिवोपासक होतें. त्याच्या अमदानींत काश्मीरच्या राज्याचा मोठा विस्तार होऊन काश्मीर हें बलाढ्य राज्य बनलें. तसेंच त्याच्या कारकीर्दींत काश्मीरनें विद्येविषयींचा आपला नावलौकिक कायम ठेवला. त्यांनी आपल्या अमदानींत नाना प्रकारचीं देवालयें, विहार व इमारती बांधून काश्मीरला मनोहर सौंदर्य आणिलें.

उत्पल घराण्याची कारकीर्द:—कर्कोटक घराण्याची सत्ता नष्ट झाल्यानंतर उत्पल घराण्याची सत्ता काश्मीरवर सुरु झाली या उत्पल घराण्याचा आद्यपुरुष अवन्तिवर्मा हा होय. हा मोठा पराक्रमी व कर्तृत्वशील होता. त्याचा स्वभाव फार परोपकारी व धर्मशील होता. सुय्य नामक बुद्धिमान मंत्र्याच्या मदतीनें त्यानें वितस्ता व काश्मीरातील इतर नद्या यांना बंधारे घालून त्यापासून अनेक ठिकाणीं कालव्याचीं कामें करून घेतलीं. त्यामुळें शेकडों गावें नवीन अस्तित्वात येऊन हजारों एकर पडीक जमीन लागवडीखालीं आली. याच्या कारकीर्दींत काश्मीरमध्ये सुकाळ झाला असें कल्हणानें म्हटलें आहे. भगवद्गीतेचें पारायण करीत असतां त्यानें आपला देह ठेवला. त्याच्यामागून त्याचा मुलगा शंकरवर्मा हा गादीवर बसला. त्यानें दिग्विजय करावयाचा निश्चय करून निरनिराळ्या देशावर स्वाऱ्या केल्या. गुर्जर, दार्वाभिसार, त्रिगर्त, इत्यादि देशावर स्वाऱ्या करून ते देश पादाक्रांत केले. दिग्विजयाच्या स्वारींत त्याच्याबरोबर ९ लक्ष पायदळ व ३०० हत्ती होते असें कल्हणानें म्हटलें आहे. शंकरवर्मा हा आपल्या बापाप्रमाणें न्यायी व उदार नव्हता. तो दुर्वर्तनी असून लोकांना त्यानें फार त्रास दिला. तो ९०२ सालीं मरण पावला.

शंकरवर्म्याच्या मरणानंतर त्याच्या विधवा राणीनें आपल्या लहान मुलाच्या नांवानें राज्यकारभार चालविला. त्या कामीं तिनें तंत्री नामक सैनिकाचें साहाय्य घेतलें. या तंत्री नामक सैनिकांनीं पुढें शिरजोर होऊन चक्रवर्मा नावाच्या एका राजाला काश्मीरच्या गादीवर बसविलें पुढें या चक्रवर्म्यानें तंत्र्यांच्या त्रासाला कंटाळून डामर लोकांच्या मदतीनें त्यांना हाकून लाविलें. पण या डामर लोकांनीं त्याला जी मदत केली होती तद्दल कृतज्ञ न रहातां त्यानांहि त्रास देण्यास त्यानें सुरवात केली पुढें तो मरण पावल्यानंतर तंत्री व डामर या लोकामध्यें यादवी माजून तंत्री लोक विजयी झाले. तंत्रींचा पुढारी कमलवर्धन यानें ब्राह्मणांना काश्मीरच्या सिंहासनावर एक राजा निवडण्यास सांगितलें. तेव्हां सर्व ब्राह्मणांनीं मिळून यशस्कर नावाच्या एका गृहस्थाला राज्यावर बसविण्याचें ठरविलें व तो राजा झाला

यशस्कर हा कर्तृत्ववान् राजा होता. याच्या कारकीर्दींत प्रजेला फार सौख्य प्राप्त झालें. कल्हणानें याच्या कारकीर्दीचें फार वर्णन केलें आहे. याच्या राज्यांत कार्तांतिक, वैद्य, मंत्री, गुरु, पुरोहितदूत, न्यायाधिकारी इत्यादि सर्व लोक चांगले शिकलेले असत व त्यामुळें, राज्यकारभार चांगल्या रीतीनें चालण्याला राजाला मदत होत असे, असें कल्हण म्हणतो. यशस्कर हा फार वर्षे जगला नाहीं. तो इ. स. ९४८ त मरण पावला त्याच्या मागून संग्रामदेव व नंतर क्षेमगुप्त हा गादीवर बसला. या क्षेमगुप्तानें सिंहराजनामक लोहाराधिपतीच्या दिद्दा नावाच्या प्रसिद्ध मुलीशीं विवाह केला. क्षेमगुप्त मरण पावल्यानंतर या दिद्दा राणीनेंच राज्यकारभार चालविला. ही राणी फार वाईट चालीची होती. तिनें आपल्या भावाचा मुलगा संग्रामराज याला आपल्यामागें गादीचा वारस ठरविलें व ती इ. स. १००३ त मरण पावली.

लोहर घराण्याची कारकीर्द—लोहर घराण्याचा पहिला राजा संग्रामराज हा कर्तबगार असल्यामुळें त्याच्या कारकीर्दींत काश्मीरला भरभराटीचे दिवस लाभले. त्यानें तुर्कांविरुद्ध काबूलचा राजा त्रिलोचनपाल याच्या मदतीकरतां आपला सेनापति तुंग यास पाठविलें. पण त्रिलोचनपाल व तुंग या दोघांचाहि पराभव झाला. त्यामुळें तुर्कांना प्रोत्साहन मिळून त्यांनी भरतखंडावर व काश्मीरवर स्वारी करण्याची महत्वाकांक्षा धरली. संग्रामराजानंतर हरिराज व व त्याच्या पश्चात अनंतदेव हा राजा झाला. हा अनंतदेव व त्याची राणी सूर्यमती ही फार धार्मिक होतीं. त्यांनीं आपल्या कारकीर्दींत पुष्कळ शिवालयें बांधलीं. अनंतदेवानें वानप्रस्थाश्रम स्वीकारून आपला मुलगा कलश यास राज्यावर बसविलें पण या कलशानें त्यांना त्याच्या म्हातारपणीं अतिशय वाईट तऱ्हेनें वागविलें. कलशाच्या मागून हर्ष हा गादीवर आला. हा अत्यंत विद्वान असून विद्वानांचें आश्रयस्थान होता. पण अंतःस्थ यादवीमुळें त्याचे शेवटचे दिवस अत्यंत दुःखांत गेले. तो ११०१ मध्यें मरण पावला.

सातवाहन घराण्याची कारकीर्द.—हर्षानंतर सातवाहन घराण्याचा संस्थापक उच्छल हा गादीवर आला. त्यानें इ. स. ११०१ ते १११० पर्यंत काश्मीरावर राज्य केलें. त्याच्या मागून त्याचा भाऊ सुस्सल हा गादीवर आला. सुस्सलच्या कारकीर्दींत काश्मीरची पुन्हा भरभराट झाली. त्याच्यानंतर जयसिंह नावाचा त्याचा मुलगा गादीवर बसला हा फार सच्छील व रहाणी होता. याच्याच कारकीर्दींत राजतरंगिणीकार कल्हण हा झाला. या राजाच्या अमदानींत खान दलसा या तातर सरदारानें काश्मीरवर स्वारी करून श्रीनगर बेचिराख करून टाकलें होतें जयसिंहाच्या मागून त्याच्या सैन्याच्या अध्यक्ष रामचंद यानें गादी बळकाविली, पण

थोड्या वर्षानीच त्याच्या हाताखालील रैंचनशाहानें त्याचा वध करून काश्मीरचें राज्य हिरावून घेतलें. रामचंद याच्या कोटाराणी नामक मुलीशीं त्यानें लग्न केलें. त्यानें इस्लामी धर्माची दीक्षा घेतली होती. त्याच्या मरणानंतर जयसिंहाचा भाऊ उदयनदेव यानें काश्मीरवर आपली सत्ता स्थापन केली. त्यानें कोटाराणीशीं पुनर्विवाह लावला. उदयनदेवानें काश्मीरवर १५ वर्षे राज्य केलें. त्याच्या मरणानंतर कोटाराणीनें कांहीं काळ काश्मीरचा राज्यकारभार चालविला. पण त्यानंतरहि सुलतान इ काश्मीर या घराण्याच्या शमसुद्दिन नावाच्या एका शूर पुरुषानें काश्मीरचें तख्त बळकावलें. अशा रीतीनें इ. स. १३३९पासून काश्मीरवर मुसुलमानी घराण्याची सत्ता चालू झाली. इ. स. १३९४मध्यें सुलतान शिकंदर नावाचा एक जुलमी राजा काश्मीरवर राज्य करीत होता. हा मूर्तिभंजक असल्यामुळें आपल्या धर्मवेडाच्या भरांत काश्मीरच्या हिंदू राजांनीं बांधलेल्या अनेक देवालयांचा व रमणीय स्थानांचा त्यानें उच्छेद केला. एवढेंच नव्हे तर त्यानें काश्मीरमधील प्रजेला जुलमानें बाटविण्यासहि सुरवात केली. इ. स. १४२०मध्यें शिकंदराच्या मागून झैन उलआबिदीन हा गादीवर आला. हा धोरणी व धर्मसहिष्णु राजा होता. त्यानें ब्राह्मणांना फारशी भाषेचा अभ्यास करण्याला प्रोत्साहन दिलें. व हिंदूंचीं नष्ट देवालयें दुरुस्त करून दिलीं. त्याच्या शांततामय कारकीर्दीनंतर चक नांवाच्या घराण्यांतील लोकांनीं काश्मीरवर अंमल चालविला. पण याच्या हातूनहि शेवटीं अकबर बादशहानें काश्मीर प्रांत जिंकून इ. स. १४८६ मध्यें तो आपल्या राज्याला जोडला. अकबराच्या कारकीर्दीत तोडरमल्ल यानें काश्मीरची मोजणी केली. अकबराचा मुलगा जहांगीर याला काश्मीर देश फारच आवडत असे. त्यानें काश्मीरमध्यें ७७७ बागा बनविल्या. औरंगझेबाची स्वारी एकदाच या प्रांताला आली होती. पण तेवढ्यांत त्यानें हिंदू लोकांना बाटविण्याचें कार्य शक्य तितकें साधून घेण्याचा यत्न केला.

औरंगझेबाच्या पश्चात् मोंगलशाहीस उतरती कळा लागली. त्या समयीं १७५१ मध्यें काश्मीर हें पुन्हा स्वतंत्र झालें. पण थोड्याच काळांत त्यावर अफगाणी व दुराणी लोकांनीं आपला अंमल बसविला. त्यांच्या अमलाखालीं काश्मीरच्या प्रजेवर फारच जुलूम झाला. तेव्हां तेथील लोकांनीं नुकत्याच उदयास येत असलेल्या शीख राज्याचा संस्थापक रणजितसिंग यांच्याकडे मदत मागितली. रणजितसिंगानें त्यांना मदत करण्याचें कबूल करून काश्मीरवर इ. स. १८१४ मध्यें स्वारी केली; पण ती सिद्धीस गेली नाहीं. पुन्हा १८१९ मध्यें त्यानें आपला सेनापति मिसर दिवाणचंद याला काश्मीरवर पाठविलें. या स्वारींत रणजितसिंगाला जय मिळून काश्मीर हें शीखांच्या सत्तेखालीं आलें.

इ. स. १८१९ पासून तों १८४५पर्यंत काश्मीरवर पुष्कळ शीख सुभेदार येऊन गेले. १८४१ त इमामउद्दीन हा तेथील सुभेदार होता. याच सुमारास आणखी एक व्यक्ति उदयास आली होती. या व्यक्तीचें नांव गुलाबसिंग असें होतें. गुलाबसिंग हा डोग्रा जातीचा रजपूत होता. त्याचें जम्मू येथें लहानसें संस्थान होतें. तो अत्यंत कर्तृत्ववान असल्यानें त्यानें आसपासच्या डोंगराळ प्रदेशावर स्वाऱ्या करून तेथील लहान लहान संस्थानें आपल्या अंमलाखालीं आणलीं होतीं. १८४० च्या सुमारास त्यानें किस्तावर, लडख, बाल्तिस्तान इत्यादि परगणे ताब्यांत आणून काश्मीरच्या आसपास आपली सत्ता स्थापन केली होती. १८४६ सालच्या इंग्रज व शीखांच्या युद्धांत गुलाबसिंग तटस्थ राहिल्यानें इंग्रजांना जय मिळाला. याबद्दल इंग्रजांनीं गुलाबसिंगाला काश्मीर प्रांत दिला. तरी पण काश्मीर संस्थानांतील गिलगिट हा प्रांत अद्यापि शीखांच्या ताब्यांत होता. त्या प्रांतावर स्वारी करून तोहि प्रांत त्यानें आपल्या ताब्यांत आणला. नंतर त्यानें महाराजा हा किताब धारण केला. पण इ. स. १८५२ मध्यें त्याच्या सैन्यांत फितुरी झाल्यामुळें गिलगित प्रांत हा गुलाबसिंगाच्या ताब्यांतून गेला. पुढें गुलाबसिंग १८५७ मध्यें मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा रणबीरसिंग हा गादीवर आला. त्यानें १८५७ सालच्या बंडांत इंग्रजांना मदत केली. १८६० मध्यें त्यानें गिलगित प्रांत पुन्हां ताब्यांत आणला. रणबीरसिंग हा १८८५ सालीं मरण पावला. त्याच्यानंतर त्याचा पुत्र प्रतापसिंग (जी. सी. एस. आय. इत्यादि) हा गादीवर बसला. हेच हल्लीं काश्मीर व जम्मू संस्थानचे अधिपति आहेत.

[ संदर्भग्रंथ—बर्नियर-व्हॉयेजेस ( १६६५ ), व्हिग्नी-ट्रॅव्हल्स इन काश्मीर, लदख, इस्कार्डो ( १८४२ ), कनिंगहॅम-ॲन एसे ऑन दि आरियन ऑर्डर ऑफ आर्किटेक्चर, ॲज एक्झिबिटेड इन दि टेंपल्स ऑफ काश्मीर, ( १८४८ ); जे सिंप्सन-इंडिया ॲन्शंट ॲन्ड मॉडर्न; ड्रयू-जम्मू ॲन्ड काश्मीर टेरिटरीज ( १८७५ ); नाईट-व्हेअर थ्री एम्पायर्स मीट ( १८८३ ); लॉरेन्स-दि व्हॅली ऑफ काश्मीर ( १८९५ ), लिडेकेर-रेकार्डस ऑफ दि जीऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया ( १८९३ ), ड्यूक-काश्मीर हँडबुक ( १९०३ ), कल्हण-राजतरंगिणी; गो. चिं. भाटे-हिंदुस्थानचें नंदनवन ( १९११ ) ].

काश्मीरी—काश्मीर, पंजाब, व वायव्य सरहद्दप्रांत यांतून आढळणाऱ्या मुसुलमानांची जात. यांची हल्लीं काश्मीरमधील लोकसंख्या ७,६५,००० असून या जातीतील लोक मुसुलमानी धर्माचे आहेत. या जातीचें नांव जरी स्थानावरून पडलेलें आहे तरी निरनिराळ्या जातींतील व धर्मांतील फरक इस्लामी धर्मानें नाहींसा केल्यामुळें ही एक निराळी जात बनली आहे. काश्मीरमध्यें जुन्या संबंधें धर्मांतरित जरी असले तरी काश्मीरच्या बाहेर येथील लोकांना सामान्यतः ' काश्मीरी ' म्हणतात आणि इतर बोलण्यांतहि येणारे मुसुलमान ' काश्मीरी ' याच शब्दाखालीं

पंजाबातील काश्मीरींची लो. सं. १,७८,४४१ आहे. पंजाबात काश्मीरी लोक मुख्यतः मुसुलमान आहेत. हिंदू तेवढे काश्मीरी ब्राह्मण आहेत. काश्मीरी शेख हे मूळचे ब्राह्मण असून शीख लोकांचें राज्य असताना काश्मीरमध्यें गेलेल्या पंजाबी लोकांशीं रोटीबेटीव्यवहार करून भ्रष्ट झालेले हे लोक होत. काश्मीरी मुसुलमान मुख्यतः सर्व पंजाबमध्यें पसरलेले आहेत. तथापि ते रावळपिंडी व लाहोर प्रांतात जास्त प्रमाणात आढळतात. वायव्य सरहद्दप्रांतात काश्मीराची संख्या (१९११) २८,२३१ आहे [सेन्सस रिपोर्ट १९११. पु. १४ व २०; रोजची ग्लॉसरी, पु. ०]

काश्मीरी ब्राह्मण—काश्मीरातील सर्व हिंदू बहुधा ब्राह्मणच आहेत या ब्राह्मणांना 'पंडित' असें म्हणतात. भिक्षुक ब्राह्मणांना बचनत व गृहस्थ ब्राह्मणांना करकून असें म्हणतात. या दोन वर्गांत लग्नसंबंध होत नाहींत. काश्मीरी ब्राह्मण पूर्ण मांसाहारी आहेत. त्यांच्या शरीराची ठेवण व त्यांची चेहरेपट्टी उच्च आर्यवंशीय आहे. ते दिसण्यातहि गोरे व सुंदर असतात. पण या ब्राह्मणांचा फारशी चलती नाहीं कारण महाराष्ट्रीय ब्राह्मणाप्रमाणें हे कधीं राज्यकर्ते नव्हते; शिवाय काश्मीरांत ब्राह्मणांच्या खालचे वर्ण नसल्यानें यांना महाराष्ट्रीय ब्राह्मणाप्रमाणें कोणाकडून मान व द्रव्यप्राप्ति होत नाहीं.

काही लोक यांना सारस्वत समजतात, पण यांच्यांतीलच एक पंडित (पंडित रामकिशन) म्हणतो कीं, काश्मीरी सारस्वत नाहींत. ते कठ शाखेचे असून त्यांचें सूत्र लौगाक्षी आहे (क्रिस्तन-इंडियन कास्ट, पु. २ पा. १४५). यानें २२१ निरनिराळे वर्ग किंवा कुलें पैकीनें नांनिशीवार दिलीं आहेत. यांच्यात रोटीबेटीव्यवहार होतात. दौल नावाचा वर्ग सर्वांत उच्च मानला जातो. काहीं वर्ग तर मुसुलमान संस्कृतीचे वाटतात. मुसुलमानांचा काश्मीरांत प्रवेश झाल्यापासून हिंदूंत जो पूर्वी फक्त एक वर्ण (ब्राह्मण) होता त्याचे धंद्याप्रमाणें चार वर्ण झाले असें म्हणण्यास हरकत नाहीं. काश्मीरी ब्राह्मणांचा धंदा म्हणजे बहुधा लेखकाचा किंवा पुस्तक विकण्याचा होय. हे लोक फारशी उत्तम जाणतात.

काश्मीरी भाषा—काश्मीर प्रांत व त्याच्या आजूबाजूचे डोंगर यातून ही भाषा चालते. काश्मीरी भाषा बोलणारे एकंदर ११,८०,६३२ लोक आहेत; त्यांपैकी शुद्ध काश्मीर संस्थानांतच ११,७२,८८७ आहेत व पंजाबात ६४८० आणि राहिलेले इतर प्रांतातून आहेत. या भाषेचा उत्तरेस पिशाच भाषेच्या दर्द रूपाशीं होतो. पिशाच भाषेच्या निरनिराळ्या भागांमध्यें किंवा पोटभाषा किंवा लिपि आहे अशी एक काश्मीरी भाषा होय. शीना लोकांनीं काश्मीरमध्यें येऊन काश्मीरी भाषेचे मूळचें पिशाच स्वरूप पालटविलें व मिश्रण करून टाकलें. शिवाय काश्मीरमध्यें पुष्कळ शतकें पर्यंत संस्कृत भाषेचा अभ्यास चांगला चालू असे, त्यामुळे

१ शब्दसंग्रह व व्याकरण ही अलीकडे पुष्कळांनी

भारतीय बनलीं आहेत. हा फरक एवढा दांडगा आहे कीं, आज पुष्कळसे भाषापंडित काश्मीरीला पिशाचभाषावंशामध्यें न घालता, भारतीय-आर्य भाषांच्या वायव्यसंघामध्यें ढकलितात तथापि कोणत्याहि वंशामध्यें काश्मीरी भाषा ठेविली तरी ती चूक म्हणून गणण्याचें कारण नाहीं.

काश्मीरीमध्यें पोटभाषा फार थोड्या आहेत. काश्मीरच्या नैर्ऋत्येकडील डोंगरातून प्रचलित असणारी किश्तवारी एक प्रमुख पोटभाषा म्हणता येईल. पोगुल आणि रामबनी या लहान लहान पोटभाषाहि येथें उल्लेखिण्यायोग्य आहेत. मूळ काश्मीरी भाषा फार जुनी आहे. कल्हणाच्या संस्कृत राजतरंगिणींत शुद्ध काश्मीरी शब्द संरक्षिले आहेत. त्यांशीं तुलना करितां कल्हणानंतर भरपूर म्हणण्यासारखा बदल मूळ घटनेंत झालेला दिसत नाहीं. भाषाशास्त्राभ्यासकाच्या दृष्टीनेंहि ही भाषा फार महत्त्वाची आहे. शब्दांत एखादें अक्षर किंवा एखादा ध्वनि घालून स्वरव्यंजनाचे केलेले अनेक फरक व सर्वनामाच्या प्रत्ययांची योजना या दोन गोष्टी अभ्यासकाला नवीन वाटतील. भारतीय आर्य भाषांचा अभ्यास करितांना भाषा व वैशिष्ट्यें व त्यांचा इतिहास समजण्यास येणाऱ्या अडचणी या भाषेच्या अभ्यासानें दूर होण्यासारख्या आहेत. शीना, संस्कृत, फारशी व पंजाबातील भाषा यांतील शब्द काश्मीरी शब्दसंग्रहात शिरले आहेत. काश्मीरी बोलणारे बहुतेक मुसुलमान असल्यानें ते फारशी व अरबी शब्द सररहा वापरतात व जे काहीं थोडे हिंदू पंडित आहेत ते काश्मीरी लिहितां बोलतांना बरेचसे संस्कृत किंवा तद्भव शब्द घेतल्यावांचून राहात नाहींत. सुशिक्षित वर्ग बहुधा हिंदूच असल्यानें एकंदरींत काश्मीरी वाङ्मय सामान्य जनसमूहाची नेहमीची बोलण्याची भाषा मुळींच दर्शवीत नाहीं असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. तथापि काहीं मुसुलमानांनीहि थोडे चांगले काश्मीरी ग्रंथ लिहिले आहेत.

मुसुलमान लोक लिहितांना फारशी लिपी वापरतात व हिंदू शारदा लिपींत लिहितात. काश्मीरी स्वरांचे उच्चार शारदा लिपीद्वारें चांगले पटतात. शारदा टाईप नसल्यानें काश्मीरी पुस्तकें नागरी लिपींत छापवितात.

वाङ्मय.—काश्मीरींत बरेंच मोठें साहित्य आहे, पण तें कोणी फारसें अभ्यासिलेलें दिसत नाहीं. १८२१ त विल्यम करे या मिशनऱ्यानें शारदा लिपींत जो नवा करार प्रसिद्ध केला तेंच काश्मीरी भाषेंतलें पहिलें मुद्रित पुस्तक होय. १८८०त रेव्ह. जे. हिंटन नॉवेल्स यानें मुंबईत काश्मीरी वाक्प्रचार व म्हणी यांचा एक संग्रह प्रसिद्ध केला व १८५५ त के. एफ. बर्कहार्टनें यूसुफ आणि झुलेखा यांसंबंधी महमूदगामीचें काव्य छापून काढिलें. ही व इतर किरकोळ पुस्तकें हेंच काय तें प्रकाशित वाङ्मय होय. मुसुलमानांची काश्मीरी पद्यें शास्त्रास गामांचें काव्य वाचावें. हिंदू

वाङ्मयाभ्यासंबंधांत दीननाथ कृष्णाचा इतिहास उल्लेखिता येईल. 'ललादेवीचें ललावाक्य' हा या भाषेंतील उपलब्ध असा सर्वांत प्राचीन ग्रंथ होय. यांत शैवपंथाचा वेदांत भरलेला आहे. दुसरा महत्वाचा ग्रंथ म्हणजे कृष्णराजानक या विद्यमान लेखकाचा 'शिवपरिणय' ग्रंथ होय. वर उल्लेखिलेली व इतर बहुतेक पुस्तकें स्वतंत्र प्रतिभेचीं नसून संस्कृत ग्रंथाच्या नकला होत. बहुतेक ग्रंथकाराचा काळहि माहीत नाहीं.

[ संदर्भग्रंथ:—काश्मीरीचा शास्त्रीय अभ्यास नुकता सुरू झाला आहे. हींतील प्रसिद्ध कोश एकच असून तो डब्ल्यू. जे. एल्मुस्ली ( लंडन, १८७२ )नें केला आहे. रॉयल व्हिक्टोरियन अकेडमी ऑफ सायन्स ' ( १८८७–१८८९) च्या अहवालामध्यें वर्चेहार्डनें मुसलमानी पद्धतीचें व्याकरण दिलें आहे तें ग्रीयर्सननें 'इंडियन ॲंटिक्वेरी'मध्यें ( १८९५–९७) इंग्रजींत भाषांतरिलें आहे. ईश्वर कौलनें संस्कृतांत काश्मीरशब्दामृत नांवानें जें व्याकरण लिहिलें आहे तें ग्रीयर्सननें १८८८ त कलकत्त्यास प्रसिद्ध केलें. ]

**काश्मोर**—मुंबई इलाख्यांत सिंधमध्यें अप्पर सिंध फ्रांटियर ( वरच्या सिंध सरहद्दीवरील ) जिल्ह्यांतील तालुका. क्षे. फ. ५२१ चौ. मै. लो. सं. ( १९११ ) ४३,२६०. यांत ६२ गांवें आहेत. तालुक्याचें मुख्य ठिकाण काश्मोर.

**काश्यप** ( १ )—एक ऋषि.

**काश्यप** (२)—मांत्रिक ब्राह्मण. परीक्षित् राजास सर्पदंश होऊन तो मरणार असें यानें ऐकून, यानें आपल्या मंत्रसामर्थ्यानें त्यास सजीव करून द्रव्य संपादन करावें असें मनांत आणिलें व तो हस्तिनापुरास जाण्यास निघाला. हें वर्तमान तक्षकास कळून त्यानें यास मनुष्यरूपानें मार्गांत गांठून त्याच्या मंत्रसामर्थ्याची परीक्षा पाहिली. तेव्हां तक्षकाची खात्री झाली कीं, परीक्षित् राजास हा खचित सजीव करील. नंतर तक्षक यास म्हणाला, ऋषिपुत्रानें परीक्षितास दिलेला शाप मिथ्या करून तुला जो लाभ होणार त्याहून अधिक द्रव्य घे आणि परत जा; तक्षक तो मीच आहे. त्यावरून यानें तें द्रव्य घेतलें व तेथूनच माघारा फिरला. [ महाभारत आदि. ४३. ]

**काष्ठिन** ( झायलीन ) क $_8$ उ $_4$ ( कउ $_3$ )$_2$—याचें दुसरें नांव द्विमथिल ऊदिन ( डायमेथिल बेंझिन ) असें आहे. याचीं तीन समघटक रूपें ( आयसोमर्स ) आहेत. कोळशाच्या डामराचें पातन ( डिस्टिलेशन ) केलें म्हणजे जो हलक्या तेलाचा ( लाइट ऑइल ) भाग येतो त्यांत हे काष्ठिन असतात. या हलक्या तेलाचा १३६° ते १४१° श वर जो पातन भाग येतो त्यांत मितकाष्ठिन (मेटाझायलीन) सुमारें शेंकडा ७० भाग, परकाष्ठिन शेंकडा २० भाग आणि आसन(ऑर्थो) काष्ठिन शेंकडा १० भाग असतो. याच्या मिश्रणाचा द्रावक या नात्यानें उपयोग करितात.

हें मिश्रण शेंकडा ८० भाग गंधकाम्लाच्या द्रवानें हालविलें म्हणजे त्यांत मितकाष्ठिन ( मेटाझायलिन ) विद्रुत होतो. बाकी जो शेष राहतो त्यांत सामान्य तीव्र गंधकाम्ल घालून हलविलें म्हणजे आसन(ऑर्थो)काष्ठिनचें निष्कासन होतें, आणि खालीं पर( पॅरा )काष्ठिन राहतो. गंधकाम्लाच्या क्रियेनें काष्ठिनचें रूपांतर गंधकिकाम्लांत ( सल्फोनिक ॲसिड ) क $_6$ उ $_3$ (क उ $_3$ )$_2$गप्र$_3$प्रउ असें होतें. यामध्यें पाणी घालून पातळ करून त्याचें पातन केलें म्हणजे उज्ज कर्ब पातन पावतो. आसन( ऑर्थो )काष्ठिन १४० ° श ते १४१ ° श उष्णमानावर उकळतो, मितकाष्ठिन १३९ ° श वर उकळतो आणि परकाष्ठिन १३६ ° श वर उकळतो.

याचें प्राणिदीकरण केलें म्हणजे त्यांतील मथिल संघाचें अनुक्रमें कप्रप्रउ संघांत रूपांतर होतें व बोलाम्ल ( टोलुइक ॲसिड ) क $_6$ उ $_4$( कउ $_3$ ) ( कप्रप्रउ ) आणि क $_6$ उ $_4$ ( कप्रप्रउ )$_2$ थ्यलाम्ले ( थॅलिक ॲसिड ) तयार होतात. या प्रत्येक अम्लाचीं तीन समघटक रूपें असतात; तीं अनुक्रमें आसनकाष्ठिन, मितकाष्ठिन व परकाष्ठिन यापासून झालेलीं असतात. [ वॅट. कम पॉ. ]

**कास** ( खोकला ) निदान—वातजन्य, पित्तजन्य, कफजन्य, क्षतापासून व क्षयापासून, असे पांच प्रकारचे खोकले आहेत. हे एकापेक्षां एक उत्तरोत्तर बलवान आहेत आणि कोणत्याहि प्रकारचा खोकला असला तरी त्याची हयगय केली असतां तो क्षयावर जातो.

खोकला होण्यापूर्वी घशांत कंड सुटणें, अरुचि व घशांत धान्याचें कुस अडकल्यासारखें वाटणें हीं लक्षणें होतात. कोंडलेला वायु खालून वरच्या बाजूस उलटून छातींत येऊन घशांत अडकून मस्तकांतील शिरांत भरतो. त्यामुळें अंग वर फेंकल्यासारखें वाटतें व डोळे बाहेर फेंकल्यासारखे वाटतात. तो वायु पाठींत छातींत, व बरगड्यांत पीडा करून फुटक्या काशाच्या भांड्याच्या नादासारखा शब्द करीत तोंडांतून बाहेर पडतो हाच खोकला होय.

कारणभेदाप्रमाणें वेगानें बाहेर पडणाऱ्या वायूचे अघातही भिन्न भिन्न प्रकारचे होतात आणि म्हणूनच निरनिराळ्या खोकल्यांत पीडा व शब्द निरनिराळ्या प्रकारचे होतात.

वातुळ पदार्थांनीं कुपित झालेला वायु, छाती, घसा व तोंड यांना कोरड, हृदय, बरगड्या, छाती व डोकें यांत शूळ, मोह, अंत क्षोभ, स्वरक्षीणता व कोरडी ढास हा उत्पन्न करतो. त्या ढासेचा वेग, पीडा व शब्द हे जबर असतात, अंगावर रोमांच उभे रहातात आणि मोठ्या कष्टानें कोरडा कफ पडला म्हणजे वायूचा जोर कमी होतो.

पित्ताच्या खोकल्यांत कफ व डोळे पिवळे होतात तोंड कडू होतें, ताप, भ्रम, पित्ताची व रक्ताची उलटी, तहान, स्वर बिघडणें, घशांत धुरकटल्यासारखें वाटणें, आंबट ढेकर येणें आणि खोकल्याची मोठी उमळ आली म्हणजे डोळ्यांपुढें काजवे दिसणें हीं लक्षणें होतात.

कफाच्या खोकल्यात छातींत किंचित दुखणें, डोकें व हृदय ओलसर, थंड व जड होणें, पदार्थ चिकटा येणें, हातपाय गळणें पीनस, उलटी, अरुची येणें, रोमांच उभे रहाणें आणि दाट, चिकट व पांढरा कफ पडणें हीं लक्षणें होतात

कुस्ती वगैरे साहसाचीं कामें आपल्या शक्तीच्या बाहेर केल्यानें उरांत क्षत होतें; त्या योगानें वायु कुपित होऊन पित्ताच्या मदतीनें बलवान होऊन खोकला उत्पन्न करतो. त्यांत रक्तमिश्रित पिवळा, काळा, कोरडा, गाठाळलेला व कुजलेला असा पुष्कळ कफ पडतो. घसा दुखतो, छाती फाटल्यासारखी वाटते, तींत तीक्ष्ण सुया टोंचल्याप्रमाणें वेदना होतात, शूळ होतो, पेरीं फुटतात, ताप, दमा, तहान, स्वर बिघडणें व कंप येणें हीं लक्षणें होतात. पारव्याच्या शब्दासारखा घशातून आवाज निघतो, बरगड्या दुखतात, हळू हळू वीर्य, रुची, पचनशक्ति, ताकत व कांती हीं क्षीण होतात. आणि अशा तऱ्हेनें तो क्षीण झाला म्हणजे त्यास रक्तमिश्रित लघवी होते. आणि मग पाठ व कंबर धरते.

राजयक्ष्मानिदानांत सांगितलेल्या क्षयाच्या साहसादि कारणांनीं क्षयरोग्याचे कुपित झालेले वातप्रधान दोष खोकला उत्पन्न करितात. त्यांत घाणेरड्या पुवासारखा पिवळा, दुर्गंधी, हिरवा व तांबडा असा कफ पडतो. बरगड्या उपटून काढल्याप्रमाणें वाटतात, हृदय पडतेंच कीं काय असें वाटतें, कारणावांचून उष्णाची किंवा थंडाची इच्छा होते, रोगी फार खातो, शक्ति क्षीण होते, तोंड तुकतुकीत व प्रफुल्लित दिसतें आणि दांत व डोळे शोभिवंत दिसतात. त्यानंतर रोग्यावर क्षयाचीं सर्व लक्षणें दिसूं लागतात.

क्षयापासून व क्षतापासून होणारे हे खोकले क्षीण मनुष्यास झाले असतां त्याचा नाश करितात. बलवान मनुष्यास झाले असतां ते साध्य असतात, आणि नुकतेच झालेले असून जर वैद्य, औषध, रोगी व परिचारक यांची अनुकूलता असली तर साध्य होतात. एकदोषज खोकला साध्य आणि द्विदोषज व म्हातारपणामुळें झालेला खोकला याप्य होय.

खोकल्यावर औषधोपचाराची हयगय केल्यानें दमा, क्षय, वांती, आवाज बसणें इत्यादि अनेक दुर्धर रोग होतात म्हणून खोकला झाल्यास त्यावर शक्य तितका लवकर चांगला उपाय करावा.

चिकित्साः—केवळ वाताच्या खोकल्यावर प्रथम वातघ्न औषधांनीं सिद्ध केलेलें स्नेह, स्नेहयुक्त पेय, यूष, मांसरस वगैरे खाद्यपेय पदार्थ, लेह, धूमपान, अभ्यंग, घाम काढणें, परिषेक, व अवगाह हे उपचार करावे. मळाचा व वाताचा अवरोध असल्यास वातघ्न औषधांची बस्ती द्यावी.

पित्तयुक्त वातकासांत जेवणानंतर तूप व दूध यांचें पान आणि कफयुक्त कासांत स्निग्ध विरेचनें द्यावीं.

... अगर उसाच्या रसांत गेळफळ व ज्येष्ठमध कालवून उलटी होण्याकरितां द्यावा. कफ पातळ असल्यास मधुर औषधांशीं व कफ घट्ट असल्यास कडु औषधांशीं मिळवून निशोत्तराचें चूर्ण जुलाब होण्याकरितां द्यावें रेच होऊन दोष निघून गेल्यावर थंड, मधुर व स्निग्ध असा पेयादि क्रम सुरू करावा. आणि दाट असल्यास थंड, रुक्ष व कडु पदार्थमिश्रित पेयादि क्रम चालवावा

कफकासांत कफ पातळ असल्यास शमन व दाट असल्यास शोधनधूम प्यावा मनशीळ, हरताळ, जेष्ठमद, जटामांसी, नागरमोथे व हिंगणबेटाची साल यांचा विधियुक्त धूम प्यावा. नंतर गूळ घातलेलें कोमट दूध प्यावें हा धूम फार दिवसांचे जुने वाताधिक व कफाधिक खोकले तावडतोब नाहींसे करतो.

कफाच्या खोकल्यात पित्तासंबंधानें तमकश्वास उत्पन्न झाला असल्यास त्या त्या अवस्थेनुसार पित्तकासाची चिकित्सा योजावी. नुसत्या वातकासात कफसंबंध असल्यास कफहारक चिकित्सा करावी वातकासात व कफकासांत पित्ताचा संबंध असल्यास पित्तनाशक चिकित्सा करावी वातकफात्मक खोकला कोरडा असल्यास स्निग्ध व ओला असल्यास रुक्ष चिकित्सा करावी. पित्तयुक्त कफकासांत कडु औषधांनीं मिश्रित अशी चिकित्सा करावी.

उरःक्षतावर तावडतोब लाखेचें चूर्ण दूध व मध यांतून प्यावें. हें औषध जिरल्यावर साखर घालून दूधभात खावा. ज्याच्या कुशी व बस्ती वगैरेंत शूळ होत असेल आणि ज्याचें पित्त व अग्नि हीं मंद असतील, त्यानें मद्यांतून लाख घ्यावी. ज्यास शौच्यास पातळ होत असेल त्यानें नागरमोथा, अतिविष, पहाडमूळ व इंद्रजव यांच्या चूर्णांतून लाख घ्यावी. निरनिराळ्या मार्गांनीं रक्त जाऊं लागल्यास ते ते मार्ग बंद करण्याची रक्तपित्तावरील चिकित्सा करावी. .

ज्याचा अधोवायु बंद झाला असेल त्यानें बकऱ्याची चरबी सैंधव घालून दारूंत मिळवून प्यावी. कृश, क्षयी, उरःक्षती, ज्यास दोष कमी आहे व ज्याचा अग्नि प्रदीप्त आहे त्यानें दूध तापवून काढलेल्या सायीबरोबर तूप, मध व खडीसाखर घालून बकऱ्याची चरबी खावी. वातानें अंग दुखत असेल तर वातनाशक तेलें अंगास चोळावीं. प्रकृतींत पित्ताचा जोर असल्यास तूप चाटावें आणि वात अधिक असल्यास तें प्यावें. चाटलेलें तूप पित्ताची शांति करतें आणि तें थोडें असल्यामुळें अग्नि मंद करीत नाहीं. प्यालेलें तूप दपटपासरसें वायूस जिरून जठराग्नीस शमवितें. ज्याचा अग्नि मंद आहे त्याच्या उरःक्षतावर, क्षयावर सांगितलेली दीपक चिकित्सा करावी. शौच्यास पातळ होत असल्यास स्तंभक चिकित्सा करावी.

क्षयाच्या खोकल्यांत प्रथम बृंहण व अग्निदीपन करावें. दोष फार वाढलेले असल्यास स्नेहयुक्त हलकें विरेचन द्यावें. पित्त, कफ व रसादि धातू क्षीण झाले असतां क्षयकासी रोग्यानें काकडशिंगी, दूध, चिकणा व अतिबला या औषधांनीं सिद्ध केलेलें तूप प्यावें. त्वचेचा रंग बदलल्यास

किंवा मूत्रकृच्छ्र झाल्यास मुद्कोहळा किंवा कर्दंब व ताड याच्या फळांनीं सिद्ध केलेलें तूप किंवा दूध प्यावें. शिस्न, गुद, ढुंगण व जांघाडे यांत सूज व वेदना असल्यास हलकी अशी तुपाची निवळी किंवा तेलतुपाचें मिश्रण यांची स्निग्ध बस्ती द्यावी. यावर मांसभक्षक लांडगा, वाघ वगैरेंचें मांस खाण्यास द्यावें. हें क्रूर पशूंचें मांस स्रोतांस चिकटून बसलेल्या कफास सोडवितें व त्यायोगें स्रोतें मोकळीं होऊन त्यांतून अन्नरस चांगल्या रीतीनें वाहून पुष्टि देतो. कूष्मांडक रसायन (वा. चि. स्था. अ. ३) अगस्तिरसायन व च्यवनप्राशावलेह (वा. चि. स्था. अ. ३) हीं औषधें द्यावीं. क्षयकास झालेल्या रोग्यास वातघ्न औषधाच्या काढ्यांत सिद्ध केलेलें दूध, काट, किंवा विष्किर, प्रतुद व बिलेशय प्राण्यांच्या मांसाचे सुपें द्यावे. उरःक्षताच्या खोकल्यावर जे धूम व जी अनुपानें सांगितलीं आहेत ते धूम व तीं अनुपानें क्षयकासावरहि योजावीं. क्षयरोगावर जी बृंहण, अग्निदीपन आणि स्रोतसाची शुद्धि करणारीं औषधें आहेत तीं क्रम बदलून क्षयकासावर योजावीं. सारांश जेवढे कांहीं शक्तिवर्धक उपाय असतील ते सर्व यावर प्रशस्त आहेत. क्षयकास सन्निपातापासून उत्पन्न होतो व भयंकर असतो. म्हणून सन्निपातावरील चिकित्सा त्यावर दोषबलानुसार केली असतां हितकर होते.

खोकल्यांत पथ्याकरितां साठेसाळीचा भात, गहूं, उडीद, मूग, कुळीथ, शेळीचें दूध, तूप, वांगीं, मुळा, चाकवत या भाज्या; लसूण, द्राक्षें, लाह्या, ऊन पाणी, मध, हे पदार्थ द्यावे.

मैथुन, दिवसा झोंप, दहीं, पिष्टमय पदार्थ, धूम्रपान व खीर हे पदार्थ कुपथ्यकारक आहेत.

लवंगादिगुटी, उन्मत्तभैरव, ताम्रपर्पटी, हेमगर्भरस आणि नागवल्लभरस हीं योगरत्नाकरांतील औषधें खोकल्यावर गुणकारी आहेत. [वाग्भट; चरक; योगरत्नाकर.]

पा श्चा त्य वै द्य कां ती ल मा हि ती.—पाश्चात्य वैद्यक ग्रंथांत 'रोगाचें स्वरूप,कारणें,लक्षणें, चिकित्सा' याचाच विचार प्रायः केलेला आहे. तथापि जनतेमध्यें रोग कोणता व लक्षणें कोणतीं याविषयीं अज्ञान असतें. त्यांत लक्षणांसच रोग मानणें असा प्रकार वारंवार घडतो. तथापि कांहीं लक्षणाचा रोग म्हणूनच विचार करणें सोयीचें असल्यामुळे अग्निमांद्य, कावीळ इत्यादि रोगलक्षणांना या ग्रंथांत स्वतंत्र स्थान मिळालें आहे. अशा थोड्या परंतु महत्वाच्या लक्षणांपैकीं कास उर्फ खोकला होय.

खोकला म्हणजे घसा, कंठ, श्वासनलिका यांत दाह उत्पन्न करण्यासारखा कफ, श्लेष्मा, हे आगंतुक पदार्थ शिरतात व ते उच्छ्वासाच्या क्रियेनें बाहेर पडण्यास मदत व्हावी अशी निसर्गाची योजना आहे. म्हणून खोकला म्हणजे आगंतुक दाहकारक पदार्थ बाहेर निघेपर्यंत एकामागून एक (प्रायः रोग्याकडून दबल्या न जाणाऱ्या) अशा अनेक उच्छ्वासाची मालिकाच होय अशी याची सोपी व्याख्या आहे. खोकला म्हणजे केवळ थंडी, गारठा, वारा, पडसें इत्यादि कारणांमुळे येणारें दुखणें यापेक्षा त्याचें महत्व लोकांस माहीत नसतें. परंतु खोकल्याच्या तीव्र व जुनाट स्वरूपामध्यें कित्येकवेळां चिंताजनक व काळजी करण्यासारख्या भयंकर व चमत्कारिक रोगाचें बीज असतें व खोकला हें त्या रोगाचें केवळ बाह्य लक्षण होय. अशा भयंकर रोगांपैकीं दमा, फुफ्फुसदाह, हृद्रोग अगर हृदयरोग, मलमार्गविदाह फुफ्फुसावरणदाह, डांग्या खोकला, कफक्षय अगर राजयक्ष्मा या व इतर मुख्य रोगांचें वर्णन ज्ञानकोशांत त्या त्या सदराखालीं वाचावयास सांपडेल. या सर्व रोगांत खोकला हें त्याच्या प्रधान लक्षणांपैकीं एक लक्षण असतें. या रोगांतील खोकल्यास साध्या पडसें, सर्दीच्या खोकल्याप्रमाणें निरुपद्रवी मानून त्यावर उपचार करणें चुकीचें होईल. याखेरीज आणखी अनेक दुखण्यावस्थेमध्यें खोकला हें लक्षण म्हणून आढळतें. त्याचें वर्णन थोडक्यांत पुढें दिलें आहे:—(१) दीर्घकालीन मूत्रपिंडदाहामध्यें आगंतुक संकट म्हणून हृदय विकृत होतें व त्यावेळीं हृद्रोगजन्य खोकल्याप्रमाणें हृदयावर व मूत्रपिंडदाहरोगावर उपचार करावेत. ही माहिती त्या लेखाखालीं वाचावयास सांपडेल. (२) घटसर्प म्हणजे यूरोपीय देशांतील साथीचा म्हणून गणलेला, घसा व श्वासमार्गांत चिकट पापुद्रा उत्पन्न करून देवीप्रमाणें अतिशय प्राणहानि करणारा, पूर्वी असाध्य मानलेला परंतु हल्लीं लसीच्या तोडग्यामुळें व आधुनिक रोगप्रसारप्रतिबंधक उपायांमुळें बराच सुसाध्य झालेला असा ताप होय. हिंदुस्थान देशांत हा आढळत नसल्यामुळें त्याचा अधिक विचार कर्तव्य नाहीं या रोगांत श्वासावरोधानें उत्पन्न होणारें गुदमरणें टळण्यासाठीं कंठनाळछेद अगर श्वासनलिकाछेद या शस्त्रक्रिया एखादेवेळीं कराव्या लागतात. (३) कंठदाह, घसा व पडजीभ यांच्या दाहामुळें होणाऱ्या खोकल्यास ठराविक उपाय न करितां तदनुरूप चिकित्सा केली पाहिजे. (४) जठरामध्यें पचनसंबंधीं बिघाड उत्पन्न होऊन झालेल्या खोकल्यावर मूळ रोगाची चिकित्सा करावी. (५) बाह्यकान अगर कानांतील तेलकट मळाच्या गाठी बनून कधीं खोकला उत्पन्न होतो. त्यावर नेहमींचे इलाज फुकट जाऊन केवळ मळ मऊ करून थोडे दिवस कान धुण्यानें खोकला बरा होतो. (६) बद्धकोष्ठ, दंतोद्भव, अपचन, कृमी इत्यादि दाहजनक कारणामुळें आंतड्यांत दाहक्रियेस आरंभ होऊन खोकला झाल्याचीं उदाहरणें अपरिचित नाहींत. त्यावर तदनुरूप इलाज करून मूळ रोगावर प्रहार केला पाहिजे. यावर खोकल्याच्या ठराविक गोळ्या, चाटणें व मिश्रणें निरुपयोगी होत. (७) मज्जातंतुजन्य रोग व उन्माद रोग यामध्यें रोग्यास "विनाकारण रोदन, हास्य व अशाच इतर लहरींप्रमाणें दिसणाऱ्या लक्षणांबरोबर रोग्यास छातींत अगर इतर ठिकाणीं कांहीं विकृति नसून एकसारखी खोकल्याची टांस लागते. ती बरी होण्यास साध्या खोकल्यावरील इलाज न करितां उन्मादघातशामक उपचार करावे. अशांपैकीं बहुतेक स्त्रीरोगीच

असल्यामुळें गर्भाशय व तदनुषंगिक इंद्रियें विकृत झालीं आहेत की काय याची परीक्षा करून त्यावर इलाज केल्यानें हा रोग थांबतो.

या विवेचनावरून माथा खोकला व नानाविध रोगाचा सूचक म्हणून आलेला खोकला याची परीक्षा तज्ज्ञाकडून करण्याचें महत्त्व कळून येईल. दुसऱ्या प्रकारच्या खोकल्यात चांगल्या वैद्य, डॉक्टराच्या सल्ल्यानें उपचार करावे साध्या खोकल्यासाठी देशी अगर इंग्रजी वैद्यकांतील चाटणें, बडा तोंडात धरण्याच्या व ढास थांबणाऱ्या गोळ्या, घसा, पडजीभ, यावर लावण्याची तुरट व गोड औषधें या सर्व अगर गुरादुदुसऱ्या औषधाचा उपयोग करावा याशिवाय छातीवर मोहरी वाटून तिचा लेप फडक्यावर पसरून छाती लालसर होईपर्यंत लावावा टरपेंटाईन, कापूर, क्लोरोफार्म, मोहरी यांची वैद्य व डॉक्टर यांच्याकडून तयार झालेली तेलें छातीस चोळणें हाहि एक उत्तम उपाय आहे वाफाऱ्यानें कपडा ऊन करून त्या बोळ्यानें अगर जवसाच्या पोटिसानें खोकल्याच्या तीव्रतेप्रमाणें एकदोनदा अगर अधिक वेळा छाती शेकणें हाहि एक सुलभ व उत्तम घरगुती उपाय आहे वरचेवर खोकला येण्याची संवय जडलेल्या रोग्यानें आपली एकंदर प्रकृति सुधारण्यासाठी पौष्टिक औषधें व लोहयुक्त औषधें घ्यावींत जुनाट खोकल्यासाठीं कॉडमाशाच्या तेलापासून बनवलेलें श्वेतमिश्रण फार उपयोगी असतें. गरम कपडे, ताजी व मुबलक कोरडा हवा, समुद्रस्नान, समुद्रकांठची हवा यांपैकीं अनुकूल असतील ते इलाज रोग्यानें करावे.

**कासगंज तहशील.**—संयुक्त प्रांताच्या एका जिल्ह्यातील उत्तरेकडची तहशील. हींत उलई, बिलराम, पचलान, सोरोन, सिधपूर, सहावर–करसान व फैझपूर–बदरिया हे परगणे असून तिचें क्षे.फ ४९३ चौ मै. आहे. या तहशिलींत ४८६ खेडीं व सहा मोठीं गावें आहेत. पैकीं कासगंज ( तहशिलीचें मुख्य ठिकाण ), सोरोन व सहावर हीं सर्वांत मोठीं होत. एकंदर लोकसंख्या ( इ.स.१९११ ) २७४१९८.

**शहर.**—संयुक्त प्रांतातील एका जिल्ह्यामध्यें याच नावाच्या तहशीलीचें मुख्य ठिकाण. हें कानपूर–अछनेरा रेल्वेवर व मथुरा–बरेली रस्त्यावर आहे. कासगंजपासून सोरोनपर्यंत गंगेजवळ एक लहानसा आगगाडीचा फांटा गेला आहे. इ. स. १९०८ सालीं हा फांटा बरेलीपर्यंत वाढविण्याचें काम चालू होतें. जिल्ह्यातील व्यापाराचें हें मुख्य ठिकाण असून येथील लोकसंख्या ( इ. स. १९११ )१६,४२९ आहे. फरुकाबादचा नबाब महंमदखान, याच्या पदरच्या याकूतखान नामक खोजानें हें गाव वसविलें असें म्हणतात. पुढें तें मराठ्यांकडे चाकरीस असलेल्या कर्नल जेम्स गार्डनर याच्या हातीं गेलें त्यानें येथें बरीच मिळकत कमावली होती, परंतु त्याच्या वंशजांनीं ती उधळून टाकली. कासगंज हें डेपरप्पावर वसलेलें असून येथें एकमेकांना काटकोनांत कापणारे दोन सुंदर बाजार आहेत. टाऊन हॉल ( नगरभवन ), दवाखाना, तहशिली व मुन्सफी ह्या येथील मुख्य सार्वजनिक इमारती होत येथें मिशनरी सोसायटी व अमेरिकन मेथॉडिस्ट मिशन याच्या शाखा आहेत म्युनीसिपालिटीचें इ स १९०३–४ सालातील उत्पन्न २२,००० रु होतें. येथें साखर स्वच्छ करण्याचा धंदा चालत असून, गावात कापूस पिंजण्याचे व दाबण्याचे कारखानेहि आहे.

**कासरगोड, तालुका.**—मद्रास इलाख्यातील दक्षिण कानडा जिल्ह्याच्या अगदी दक्षिणेकडचा तालुका. क्षे. फ. ७६२ चौ मै यांत १ ४ गावें आहेत. एकंदर लो. सं. ( इ स १९२१ ) २,५६,९३१ या तालुक्याचा बहुतेक भाग डोंगरसपाटीचा व निर्वृक्ष आहे, परंतु दऱ्या खोल असून तेथें जमीन सुपीक व पाणी मुबलक आहे. विशेषतः तालुक्याच्या उत्तरार्धांतील जमीन पोफळीच्या लागवडीस फार चांगली आहे

**कासलपुरा**—मुंबई इलाखा. महीकांठ्यातील एक लहानसें संस्थान हें करोसन हद्दींत आहे येथील जहागीरदार कोळी असून ते गायकवाडाला खंडणी भरतात.वडील मुलाला वारसा देण्याचा किंवा दत्तक घेण्याचा अधिकार या घराण्याला नाहीं.

**कासव**—कासवाची ( प्राणी ) शास्त्रीय माहिती 'उरोगामी' या लेखात कूर्मगण सदरात( वि. ९ पा. ८०–८३.) दिलेली आहे. सरपटत चालणाऱ्या प्राण्यात कासव हा फार विलक्षण प्राणी आहे. हा आपलें डोकें, पाय व शेपूट प्रसंगविशेषीं आपल्या पाठीखालीं झाकून घेतो. चिलखत घातल्याप्रमाणें वरच्या व खालच्या दोन आच्छादनानीं याचें रक्षण होतें व सर्व अवयव वाटेल त्या वेळेस आकुंचित करण्याची शक्ति या प्राण्यास असते. फार मोठ्या आकाराचे कासव उष्णकटिबंधातील समुद्रात आढळतात; याच्याच पाटीचा मुख्यत्वेंकरून व्यापार होतो. ही पाठ साधारणपणें वजनात १०० शेराहून जास्त नसते. ( कासव अटलांतिक व हिंदी महासागरात सापडतात. कांहीं जातीच्या कासवाच्या पाटीवरील खवले फार सुंदर असून तांबूस व पिंवळया रंगाचे असतात. हिंदुस्थानात व इतर देशात पूर्वी कासवाच्या पाठीच्या ढाली करीत असत

पाठीवरील खवले काढण्याकरिता पाठ ऊन करून चाकूनें खरडून काढतात. खवले काढलेल्या खरवडीत पाठीस बरीच किंमत येते. चांगली पाठ असल्यास ती दरशेरीं ६०।६५ रुपयास विकली जाते. हल्लीं विलायतेस शिंगाप्रमाणें कासवाच्या पाठीचेहि अनेक पदार्थ करितात. लाखों रुपये किंमतीच्या पाठी इंग्लंडमध्यें सिंगापुराहून जातात.

**ढालीची कृति व उपयोग** -मिठाच्या पाण्यात कासवाची पाठ शिजवून नरम करितात व थंड होईपर्यंत दाबात घालून तिला चपटी करितात. ती खरडून व कानसून गुळगुळीत व स्वच्छ सारख्या जाडीची करितात एका पाटीपेक्षां जास्त

आकाराचा तुकडा पाहिजे असल्यास १ किंवा २ तुकडे गिनाप्रमाणे कापतात. पाटीच्या कडा सुमारें पाव इंच निरुंद कापून त्या एकावर एक ठेवून लोखंडी चापानें एकत्र दाबतात आणि चापासकट तो भाग कढत पाण्यात कांहीं वेळ बुडवितात. यामुळें दोन्हीं तुकडे ऊन पाण्यानें नरम होऊन दाबानें असे बेमालूम होतात कीं त्याचा सांधा दिसून येत नाहीं. कापून पडलेला चुरा, दुसरे तुकडे, व पूड गोळा करून त्यास उष्णता व दाब यांच्या योगें हवा तो आकार देता येतो. कासवाच्या पाठीच्या मागें धातूचा पत्रा लावून काम करतात; तेणेंकरून ढालीस सुबकपणा जास्त दिसतो.

*हिंदुस्थानातील कांहीं लोक कासवाचें मांस खातात, परंतु यूरोपियन लोकांना तें आवडत नाहीं.* कासवाच्या पाठी प्राचीन काळापासून शोभेकरितां ठेवतात. त्या अर्धप्रकाश, भेद व पिवळ्या रंगाच्या असून ज्यावर तपकिरी ठिपके असतात व ज्यांना सिरहई चांगली चढते अशा पाटी उत्तम समजतात. *चीनमध्यें* पाढऱ्या रंगाच्या व काळे ठिपके असलेल्या पाटीची महा विशेष होते. कासव मारल्यानंतर त्याची पाठ जोरानें ओढून काढतात, अथवा उकळत्या पाण्यात कासव टाकतात म्हणजे पाठ निराळी होते. नैसर्गिकरीत्या मेलेल्या अथवा कुजूं लागलेल्या कासवाची पाठ हलक्या *प्रतीची समजली जाते. हल्ली यूरोपात 'मुल मार्केट्री' नावाच्या* जडावाच्या कामाकरितां या पाठीचा उपयोग करतात. याशिवाय पाटीच्या लहान लहान पेट्या, चौकटी, चाकू, अथवा वस्तऱ्याच्या मुठी, फण्या वगैरे जिनसाहि करतात हिंदुस्थानात कासवाच्या *पाठीवरील सुंदर काम विजगापट्टण* येथें होतें.

कासवाची दुसरी एक जात आहे. तिला ब्रह्मदेशात लाइक प्येन-बोन अथवा लाइकक्यो आणि इंग्रजीत एडिबल टर्टल म्हणजे खाण्याचें कासव असें म्हणतात. हा प्राणी वनस्पत्याहारी असून त्याची अंडी व मांस ही खातात

**कासार**—हा शब्द तांब्या पितळेची भांडीं करणें व विकणें हे व्यापार करणारे आणि बांगड्यांच्या धंदा करणाऱ्या जाति यांना लावतात. यांची वस्ती मुंबई इलाखा, वऱ्हाड, मध्यप्रांत व मध्यहिंदुस्थान यांतून आहे. विशेषतः मुंबई इलाख्यात कासार वस्ती अधिक आहे. धंदा दोन प्रकारचा एका शब्दानें दर्शविला जातो. त्यापैकी एका प्रकारच्या म्हणजे भांड्यांच्या धंद्याला जातिवाचक दोन शब्द, यामुळें आकडे घोटाळ्याचे झाले आहेत इ. स. १९११ च्या खानेसुमारीत ३१,२२८ *तांबट नोंदले गेले, पैकीं* २६९१३ मुंबई इलाख्यात, ४५७२ वऱ्हाडमध्यप्रांतात व ५७१३ मध्यहिंदुस्थानात होते. यामध्यें बोगाराचा समावेश नसावा. संस्कृत कांस्यकार शब्दापासून कासार शब्द बनलेला असावा अशा व्युत्पत्ति कांहीं जणांनीं दिली आहे. *ती खरी असल्यास अशी कल्पना सुचते कीं पूर्वी* कांशाचें काम करणारा एखादा वर्ग असावा, तो भांडीं व बांगड्या करीत असावा व पुढें बांगडी करणारे आणि भांडीं करणारे निराळे झाले असावेत आणि त्यानंतर कांशाचीं भांडीं जाऊन पितळेचीं आलीं असावीत व कांशाच्या बांगड्या जाऊन कांचेच्या आल्या असाव्यात. जातींचे स्पष्टीकरण करण्यास थोडेंसें पृथक्करण केलें पाहिजे तें पुढीलप्रमाणें करता येईल.

( १ ) त्व ष्टा का सा र.—ही भांडीं करणारी जात. या जातींत समेळ, दाडेकर, पडु, लोंबर, ढगारे, गोंडावे हीं आडनावें येतात लोकसंख्या निश्चित नाहीं कदाचित् पांचपासून दहा हजारपर्यंत असावी. या जातीस तांबटहि म्हणतात. हा कारागिराचा वर्ग होय. ही जात निवृत्त मांस नाहीं

( २ ) *बोगार.*-या जातीचा धंदा भांडीं विकणें हा होय, करणें नव्हे, हा व्यापाऱ्याचा वर्ग होय, कारागिराचा नव्हे यांतलि कांहीं मंडळी जैन आहेत. कांहीं वैष्णव आहेत पण दोघांचा लग्नव्यवहार होतो. यांचा धंदा बांगड्या विकणेंहि आहे. बांगड्या विकणारास बांगडे म्हणतात कीं नेंश वर्षे *ही जात लोखंडाचाहि व्यापार करीत आहे यांत मणेरी* म्हणूनहि धंदा करणारे लोक आहेत ते शिवाय लागणारा माल विकतात. सुमारें दोनशें वर्षांपूर्वी यांत तटे झाले आणि त्यांच्या शाखा पडल्या, व त्यामधील लग्नव्यवहार थांबला त्यामुळें एक दुसऱ्यास ' तांबट " म्हणूं लागले व एक दुसऱ्यास आपले लोक कळे आहेत असें सांगूं लागले पण आज या संबंधाचा पुरावा नाहीं. या जातींत कडूले, राव, रासने, डांगरे, पुसलेकर, वेळापुरे, राणोळे अशीं आडनावें आहेत. ही जात निवृत्तमांस आहे ही नागपूरपासून पुण्यापर्यंत व दक्षिणेकडे सोलापूर बेळगावपर्यंत पसरली आहे. गोव्यातील कासार व हे कासार याच्यात एकी करण्याची खटपट चालू आहे.

( ३ ) पा चा ळ का सा र –ही निवृत्तमांस जात आहे या *जातीचीं घरें पुण्यामध्यें पांच पन्नास असतील हिचा धंदाहि* त्वष्टा कासाराप्रमाणें भांडीं घडविण्याचा आहे. या जातीमध्यें पंडित, भोकरे, जितकर, दस्तुरकर अशीं आडनावें आहेत. यांची वस्ती महाराष्ट्रात चार पांच हजाराहून अधिक नसावी. *या तिन्ही जाती कालिकादेवीस आपली देवी समजतात आणि कालिकापुराणात उल्लेखिलेली जात आपलीच असें मानतात.*

त्व ष्टा का सा र.—हे आपणाला त्वष्टाकासार म्हणवितात, व विश्वकर्म्यापासून आपली उत्पत्ति लावितात. कासार आपणाला ब्राह्मण म्हणवितात व पुष्कळ बाबतींत ब्राह्मणासारखे दिसतातहि हे *गळ्यात जानवीं घालतात. व ब्राह्मणी* गोत्रें मानतात आपल्या जातीचे भिक्षुक तयार करण्याची । यांची खटपट तांबट धंद्याच्या मोठ्या किफायतीमुळें फारशी सिद्धीस गेलेली दिसत नाहीं.

*कासारात कुळें व देवकें आहेत. एकच देवक असणाऱ्या* घराण्यांत परस्पर लग्नसंबंध होत नाहींत. दक्षिणेंत देवकाच्या ऐवजी गोत्रें रूढ आहेत. व सगोत्रविवाह निषिद्ध जातो. दक्षिणी कासारात मौंजीबंधन असतें,

कासारात तें नसतें. कुंकू लावणें, गडगनेर, सीमांतपूजन, घाणा, देवप्रतिष्ठा, वाङ्निश्चय, हस्तक व सप्तपदी या गोष्टी लग्नविधींत मुख्य होत. घटस्फोट मान्य नाहीं.

कासार हे कालीचे उपासक आहेत. वहिरीचंडिका, एकवीरा, कुमारिका, खंडोबा, महालक्ष्मी वगैरे यांच्या कुलदेवता असतात. सोलापूर वगैरे काहीं ठिकाणीं जैन कासार आढळतात. यांचा और्ध्वदेहिक विधि ब्राह्मणाप्रमाणेंच असतो. हे मद्यमांसाशन करितात; पण ब्राह्मणाखेरीज दुसऱ्या जातीच्या हातचें खात नाहींत.

ज्ञातीचें मुख्य वस्तीचें ठिकाण मुंबई व पुणें हीं शहरें होत. मुंबईंत आजमासें तीन चार हजार किंवा अधिक वस्ती असून पुण्यांत सुमारें दिड हजार वस्ती आहे. अलिबाग, भिवंडी, पेण पनवेल, वसई, नासिक व निझामचें राज्य यांतूनहि वस्ती आढळते. मुंबईंत, ज्ञातीच्या पंचायती आहेत आणि त्याचप्रमाणें गांवोगांवींहि आहेत. मुंबईंतल्या पंचायतीला विशेष महत्व आहे. पंचायतीचा अध्यक्ष मुंबईंत तीन वर्षांनीं निवडला जातो. तो वंशपरंपरेनें निवडला जात नाहीं. आणि हाच नियम बहुतकरून सर्व गांवीं लागू आहे मुंबईमध्यें पायधुणीवर कालीकादेवीचें देऊळ आहे. त्याशिवाय कादेवाडींत तीन चाळी आणि सोनापुरांत एक धर्मशाळा आहे. कालिकादेवीच्या सर्व चाळीच्या उत्पन्नाचा उपयोग ज्ञातीच्या धार्मिक, सामाजिक व इतर उपयुक्त बाबींकडे केला जातो. ह्या सर्व इस्टेटीची किंमत सुमारें तीन चार लाख होईल. त्याचप्रमाणें पुणें, सातारा, पनवेल, पेण, रत्नागिरी, उरण, निजामपुर, किहीम इत्यादि गांवांत ठिकठिकाणीं इस्टेटी आहेत. त्या सर्व इस्टेटींचें उत्पन्नाचा विनियोग लोकांच्या खासगी कामाकरितां होत नाहीं. ज्ञातीच्या हक्काचा पूर्वींपासून चालत आलेला ( म्हणजे एक मण ताब्यामागें )अर्धा पैसा हल्लीं ज्ञातींत एकी नसल्यानें वसूल होत नाहीं. पंचायतीचे निवाडे लिहून ठेवण्याची पद्धत आहे. परंतु ते फार वर्षांचे नाहींत. मध्यंतरीं असलें रेकार्ड विकून टाकिलें. पंचायतीचे निकाल अमलांत आणण्याकरितां बहिष्कृत ठेवणें हें साधन ज्ञातीच्या स्वाधीन आहे. परंतु तें फार दिवस टिकत नाहीं. कारण काहीं लोक मध्यस्थी करून ते रद्द करवितात. ज्ञातीच्या पंचायतीपुढें ज्ञातीच्या हिताचे प्रश्न येतात. ब्राह्मणाशिवाय इतर जातीबरोबर अन्नोदिक व्यवहार होत नाहीं. ज्ञातींत पोटजाती मुळींच नाहींत ज्ञातींत मुंज, विवाह इत्यादि संस्कार कोंकणस्थ व देशस्थ ब्राह्मण करितात. ज्ञातीचे प्रश्न जातच सोडविते आणि शास्त्राधारासंबधानें ब्राह्मणाचा सल्ला घेते पण अशी वेळ फार क्वचित येते. ज्ञातीचे सर्व संस्कार वेदोक्त धर्माप्रमाणें उपाध्यायाकडून करून घेतात. काहीं वर्षांपूर्वी आपण ब्राह्मण कीं क्षत्रिय असा प्रश्न निघाला होता पण त्यापासून काहीं निष्पन्न झालें नाहीं.

ज्ञातीच्या इतिहासासंबंधानें ज्ञातीची मंडळी येणेंप्रमाणें देतात.—या ज्ञातीचा जनक त्वष्टा होता. त्वष्टा हा विश्वकर्म्याचा मुलगा होता विश्वकर्मा हा भुवनाचा पुत्र व बृहस्पतीचा भाचा होता. तो आंगिरा वंशांतला होता. विश्वकर्मा रथकाराचा गुरु असून महातपस्वी होता. मनु, मय, त्वष्टा, शिल्पी व दैवज्ञ (विश्वज्ञ) हे पांच देवर्षी होते. हे सर्व विश्वकर्म्यांच्या मुखापासून झालेले होते. काष्ठ, सुवर्ण, शिल, लोह आणि ताम्र या पांच प्रकारचें शिल्पकर्म करणाऱ्या विश्वकर्म्याच्या पांच पुत्रास रथकार अशी संज्ञा होती. ह्यांनीं वैदिक कर्मानें संस्कार करावा व त्यांच्या वंशांत झालेल्यांचाहि उपनयन संस्कार करावा असा अधिकार होता. चार वेद आणि त्यांचीं सहा अंगें ह्या सर्वांना जाणणारे जे विद्वान ब्राह्मण असतात, त्यांचा जो धर्म वेदांनीं सांगितला तोच धर्म विश्वकर्म्यांचा आहे, व त्यांच्या वंशांत उत्पन्न झालेल्यांचाहि आहे" ( पंचाल ब्राह्मण्य निर्णय पुस्तक पृष्ट ८६, ८९, १०२ ). ज्ञातींमधील वृद्ध गृहस्थांच्या तोंडून परंपरागत जी हकीकत सांगण्यांत येते तीवरून पहातां कासार श्री कालिका देवीचे उपासक व सोमवंशी क्षत्रियकुलोत्पन्न आहेत. ह्या समजुतीला पुष्टि कथाकल्पतरु ग्रंथांतल्या हकीकतीवरून मिळते. हा ग्रंथ ओवीबद्ध मराठी भाषेंत असून ३०० वर्षांपूर्वी नाशिक क्षेत्रीं कृष्णयाज्ञवल्की नांवाच्या ब्राह्मणानें पुराणग्रंथांच्या माहितीनें लिहिला. त्यांत कार्तवीर्य सहस्रार्जुन ह्याचा पुत्र धर्मपाल व चोलराजाची कन्या चंद्रगुप्ता ह्या दोघांपासून जे पुत्र झाले तेच पुढें देवीच्या आज्ञेवरून कांस्य, ताम्र वगैरे धातू बनविण्याची कला शिकून त्या कलेचे प्रचारक झाले, व तेव्हांपासून ते कांस्यकार व कासार ह्या नांवानें लोकांत प्रख्यात झाले अशी कथा दिलेली आहे, व ही कथा पद्मपुराणांतर्गत कालिकामहात्म्यावरून लिहिली आहे, असें कर्त्यानें म्हटलें आहे. त्वष्टा ब्राह्मण आहेत ह्यासंबंधानें बराच ऊहापोह झाला होता म्हणून आज ज्ञातीचे लोक आपणाला त्वष्टाकासार असें म्हणवितात.

गेल्या तीनचारशें वर्षांत ज्ञातीचीं स्थलांतरें धंद्यापरत्वें झालीं परंतु तीं कायमचीं झालीं नाहींत. ज्ञातींत पुनर्विवाह होतो, परंतु तो धनिक किंवा संभावित कुटुंबें करीत नाहींत ज्ञातींत पुरुषास रखेल्यापासून झालेल्या मुलाची जात झालेली नाहीं. ज्ञातींतल्या स्त्रियास अधर्मव्यवहारानें सजातीय पुरुषापासून मूल झाल्याचें एकहि उदाहरण आढळून आलें नाहीं. यांचीं आडनांवें पुढील प्रमाणें आहेत. हजारे, दाडेकर, गोडावे (न्ये), आर्ते, लोंढर, कड्ड, पिंपळे, पुरोहित, वाडेकर, येडेकर, त्रिभुवने, शेटे, सोर्टे, तावडे, समेळ, वडके, गोडे, (ब्दे), मुळे, करडे, इनामदार, डेरे, कवळे, पारंगे, इश्वाद, तालीम, तांबट, शिर्भा, पोटफोडे, निजामपूरकर, साने, खुळे, बोसलोकर, डाखणे, तांबट, पाटील, पुसलेकर, साळवी, दवणकर, माडके, पारिंगे, लाजेकर, देशमुख, पोरे, मोरे, गंभीर, रणशिंगे, रात, बोधे व म्हशेटे.

गोत्रें.-यालभ्य, अंगीरा, भृगु, काश्यप, अत्रीय, भारद्वज, इत्यादि यांचीं गोत्रें आहेत.

दे व कें.— एकविरा, अहिरीभवानी, हालमाईनेमजाई, महालक्ष्मी, ममनाबाई इत्यादि कासाराचीं दैवतें होत.

का हीं प्र सि द्ध पु रु ष.—कै. नारायण भाई दांडेकर (शिक्षणखात्याचे पहिले नेटिव्ह डायरेक्टर, हे वऱ्हाडात होते). कै. बाळकृष्ण गोपाळ तालीम (कॉन्ट्रॅक्टर हैदराबाद संस्थान) कै. रामकृष्ण माणिकजी येडकर ( व्यापारी ). कै. रामकृष्ण पुरुषोत्तम धारूनोस ( इनामदार ). रा. रा. आनंदराव-वामन शेटे ( ऑनररी मॅजिस्ट्रेट ). भास्कर रामचंद्र आर्ते एम. ए. ( प्रोफेसर बडोदा कॉलेज ).

सं स्था.—त्वष्टकासार मिशनरीज को ऑपरेटिव्ह सोसायटी; त्वष्टकासार ज्ञाती संस्था मुंबई, कासार समाजोन्नति मंडळ मलकापूर (वऱ्हाड). ज्ञातीचे त्वष्टसेवक नामक मासिक ( संपादक, रामकृष्ण महादेव समेळ ).

या ज्ञातीतील बरेच सुशिक्षित लोक निरनिराळ्या धंद्यात व मोठ्या दर्जावरहि आहेत.

बो गा र.—ही जात बरीच मोठी आहे. या जातीतील जैन मंडळी; कासार जात सर्वच जैनधर्मी आहे असें भासविण्यासाठीं आणि सर्व कासारांनी जैन बनावें यासाठी खटपट करीत आहे. सर्व कासार मूळचे जैन पण पेशव्यांच्या जुलमामुळें ब्राह्मणानुयायी झाले अशीं मतें ते प्रतिपादन करीत आहेत. सोलापूरकर जैनकासार पंचमंडळीकडून पुढील महाराष्ट्रीय जैनकासार मंडळीची माहिती आली आहे. " खानेसुमारींत तावट लोकांनींहि कासार म्हणून लिहून दिलें आहे. सातारा, रत्नागिरी, पुणें, बेळगाव, सोलापूर, पंढरपूर, कर्नाटक, निजाम हैदराबाद, अहमदनगर, धुळें, वऱ्हाड वगैरे प्रांतांतील कासार पूर्वीपासून जैनधर्मी असल्यामुळें खानेसुमारींत आपली जात कांहींजणांनी ' जैन ' म्हणून लिहून दिली आहे; यामुळें लोकसंख्या बरोबर कळत नाही. कासार लोक सोमवंशी आहेत. कासार व बोगार एकाच जातीला म्हणतात. भांडीं विकणारास बोगार म्हणतात. कांकणें ( बांगड्या ) विकणारास कासार म्हणतात.

जातीच्या गावोगाव पंचायती आहेत. विशेष पंचायती धर्माधिकाऱ्याच्या हद्दींतील गावोगावचे पंच मिळून धर्माधिकाऱ्याच्या सल्लयानें करितात. धर्माधिकाऱ्यास भट्टारक म्हणतात. कासारांत भट्टारकाच्या तीन गाद्या आहेत. कारंजा मुक्कामीं एक गादी आहे. तेथील भट्टारकास देवेंद्रकीर्ति म्हणतात. दुसरी गादी मलखेड ( निजामराज्यांत ) येथें आहे. तेथील भट्टारकास रत्नकीर्ति म्हणतात. तिसरी गादी हुपस ( कर्नाटकांत ) येथें आहे. येथील भट्टारकास देवेंद्रकीर्ति म्हणतात. कांहीं ठिकाणीं जातीचा अध्यक्ष निवडला जातो. कांहीं ठिकाणीं तो वंशपरंपरेनें असतो. प्रत्येक गावांत जातीचीं देवळें आहेत. त्यांच्या व्यवस्थेकरितां घरें, जमीनजुमला व जंगम मालमत्ता आहे. त्यांच्यावर त्या गावच्या पंचाची सत्ता आहे त्या मालमत्तेची किंमत नक्की माहीत नाहीं. त्या त्या गावच्या व शहरच्या मानानें आहे. देवळांत पूजेकरितां पुजारी नेमलेला असतो. तो देवळाच्या व्यवस्थेकरितां योग्यतेनुसार वर्गणी वसूल करीत असतो. धर्माधिकारी वर्षासन वसूल करतात. गावचे लहानसहान निवाडे लिहून ठेवण्याची पद्धत नाहीं. धर्माधिकाऱ्याच्या समक्ष मोठी पंचायत झाल्यास तिचा निवाडा मठांत लिहून ठेवावयाचा पूर्वीपासून वहिवाट आहे. बहुतकरून गावचे निवाडे गावांतील अमलांत आणतात. जर ते कोणी ऐकले नाहींत तर धर्माधिकाऱ्याकडून दंड किंवा शासन म्हणजे बहिष्कारपत्र आणून ते अमलांत आणतात. धर्माधिकारी बहुमतानें नेमलेला असल्यामुळें तो जात पंचायतीच्या निवाड्याप्रमाणें शासन करण्यास पूर्ण अधिकारी आहे, सरकारच्या मंजुरीची जरूरी नाहीं. धर्मनियमाविरुद्ध कोणत्याहि व्यक्तीनें वर्तन केल्यास त्याबद्दल प्रश्न घेतात. महत्त्वाचे प्रश्न आलेले धर्माधिकाऱ्याच्या दरबारास मिळतात. या जातीच्या सदृश अशा पंचम, चतुर्थ, शेतवाळ इत्यादि जैनधर्मप्रमाणें वागणाऱ्या जाती दक्षिणेंत आहेत. इतर भिन्न जाती पुष्कळ आहेत. जैन जातींत पुष्कळ पोटजाती आहेत. त्यापैकीं पंचम व चतुर्थांबरोबर बेटीव्यवहार सुरू झाला आहे. जैन जातीबरोबर अन्नोदक व्यवहार चालतो. जातीमध्यें जैन उपाध्यायाकडून विवाहादिक संस्कार करितात. जातीचे कोणतेहि प्रश्न धर्मप्रमाणें सोडविले जातात. वैदिकधर्मी ब्राह्मणाच्या साह्याचा बिलकुल जरूरी पडत नाहीं. जातीच्या अगर व्यक्तीच्या उद्योगाप्रमाणें त्यांस चातुर्वर्ण्य व्यवस्थेंत स्थान मिळतें. पूर्वी कासार ही जात क्षत्रिय होती असें पुराणाच्या आधारें जातीचें म्हणणें आहे जातीचे कागदपत्र मलखेड, हुंबुज, कोल्हापूर येथील धर्माधिकारी व सातारा येथें रागोळे यांजकडे आहेत जातीचा इतिहास महापुराण, व कालिकापुराणावरून प्रमाणबद्ध आहे कालिकापुराण ग्रंथाचा शंभरसव्वाशें वर्षांचा हस्तलिखित पुरावा हजर आहे. गेल्या दोनतीनशें वर्षांत महाराष्ट्र व मध्यप्रांतांत पेशव्यांचा अमल असतांना ब्राह्मणाचें तेज या जातीवर पडून ही जात ब्राह्मणानुयायी झाली आहे. त्यावेळीं ब्राह्मणशाही असल्यामुळें जैनधर्माधिकाऱ्यांना महाराष्ट्रांत फिरणें, उपदेश करणें व आपली खंडणी वसूल करणें कारण बिकट झालें. त्यामुळें कासार लोक ब्राह्मणानुयायी झाले आहेत. याजबद्दल पुरावा साताऱ्याचे रागोळे यांच्या घराण्यांत मिळतो. मलखेडच्या धर्माधिकाऱ्यांनी साताऱ्यास जाऊन कासारांस " तुम्ही आमचे शिष्य आहांत व आम्हांस मानलें पाहिजे " असें सांगितलें. त्यानंतर सातारकरांनी कांहीं प्रश्न विचारले. त्यांनीं त्यास समर्पक उत्तरें देऊन मानपान स्वीकार करून घेतलें आहे. याबद्दल कोल्हापूर सरकारांत निवाडे झाले आहेत. याबद्दल सर्व कागदपत्र रा. रा. रामभाऊ रागोळे सातारकर ( हल्लीं मुक्काम बारामती ) यांजकडे आहेत. इंग्रजी राज्यापूर्वी पेशव्यांच्या

जैनधर्मावर गदा आली तिचा परिणाम अद्यापि दिसून येतो. अलीकडे थोडाबहुत जैनधर्माचा प्रकाश महाराष्ट्रांत कासार मंडळीवर पडत चालला आहे. १९१७ च्या कार्तिकमासीं मलकापूर (वऱ्हाड प्रांत) येथें कासार परिषद भरल्यावेळीं जैनधर्मी व अन्यधर्मी पुष्कळ कासार मंडळीमध्यें शरीरसंबंध, आप्तपणा व भाऊबंदकी जुळली. त्यावेळेस एका जातीमध्यें धर्म विरोध कां ? याबद्दल विचार उत्पन्न झाला. जैनधर्मी कालिकापुराण पुष्कळ मंडळींनीं घेऊन त्याचा विचार मनःपूर्वक चालविला आहे. तारीख ८।६।१८ रोजीं पुणें मुक्कामीं शेठ शंकरराव मुरुडकर यांचे अध्यक्षतेखालीं कासार लोकांची सभा भरली त्यावेळीं कासार समाजाचा पूर्व इतिहास सांगतेवेळीं आम्ही पूर्वी जैन होतो, तोच धर्म आमचा असावा वगैरे वाटाघाट झाली.

हल्लींच्या कालमानास अनुसरून पुनर्विवाह सुरू आहे. निराश्रित विधवा व मुलांची तरतूद जातीनें कांहीं केली नाहीं.

गु ज रा थ—गुजराथेंत तांबट लोक मुख्यतः मोठ्या शहरांतून दिसतात. सिधपुरांत तांबट नाहींत सिधपुरांत तांबें विकत नाहीं अशी म्हण आहे. अशी एक गोष्ट सांगतात कीं, पावागडास पांच बंधू राहत असत. ते कालिका मातेचे भक्त असत व ते तिची झांजा वाजवून पूजा करीत. देवी त्यांच्यावर इतकी प्रसन्न झाली कीं "तुम्ही धातू वाजवून किंवा ठोकून पोट भराल" असा तिनें त्यास वर दिला. पितळ ठोकण्यापासून पितळेचीं, तांब्याचीं व काशें या धातूंचीं भांडीं तयार करण्यापर्यंत यांची प्रगति झाली आहे. वगाय, चारमेय, भट्टी, इत्यादि ६ आडनांवें त्यांच्यांत आहेत. भट्टी, गोहेल व परमार या आडनांवावरून त्यांच्यांत रजपूत रक्ताचा अंश असावा असें दिसतें. कालिकामाता ही यांची कुलदेवता होय. चाम्पानेरी, मारु, सिहोर व विसनगरा हे यांच्यांत ४ पोटभेद आहेत. विसनगराशीं चाम्पानेरी तांबट रोटीबेटीव्यवहार करतात पण बाकीच्या वर्गांत रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. मारु व मारवाडी लोक जानवें घालतात. दिसण्यांत, पोषाखांत व चेहेऱ्यांत कंसारा लोक वाणी व कुणबी यांच्याप्रमाणेंच आहेत. बायका देखण्या आहेत पण त्या पातिव्रत्याविषयीं फारशी दक्षता बाळगीत नाहींत असें गॅझिटियरकार विधान करितात (मुं. गॅ. ९ भा. १). कच्छमधील कांहीं तांबट मासे व बकऱ्याचें मांस खातात व मद्यपानहि करतात. बाकीचे तांबट शाकाहारी आहेत. ज्या ज्या धातूचीं भांडीं हे घडवितात त्या त्या धातूवरून यांस नांव मिळतें, उदाहरणार्थ तांबाघड, पितळघड, व सोनार इत्यादि. हे लोक बहुतेक स्वतःच्याच घरीं कामें करतात व त्यांच्या बायकाहि चाती फिरवणें, झिलई देणें वगैरे कामांत त्यांस मदत करतात तांब्याचीं व पितळेचीं निरनिराळ्या आकाराचीं भांडीं ते घडवितात. काठेवाडांतील सिहोर येथील व उत्तर गुजराथेंतील कडी व वीसनगर येथील कंसारालोक आपल्या कामांत तरबेज असून नेहमींचीं भांडीं करून शिवाय टांक, दौती, पानसुपारीचे डबे, देवांच्या मूर्ती, दिवे, घंटा वगैरे वस्तूहि ते करतात. तांबटास भांड्याच्या वजनाप्रमाणें पैसे मिळतात. कल्हई लावणें, मोडीचीं भांडीं विकत घेणें वगैरे कामाकरितां हे लोक शहरभर हिंडतात.

कंसार लोक शांत व समाधानी असून त्यांस गुडगुडी ओढण्याचा नाद आहे व गाण्याचीहि आवड आहे. यांच्या बायका आश्विन शुक्लपक्षांत फेर धरून कांहीं गाणीं म्हणतात. या लोकांस समाजांत मान असून ते आपणास 'महाजन' म्हणवून घेतात. ते धार्मिक असून, रामानंदी, शैव, वल्लभाचार्य इत्यादि पंथाचे अनुयायी आहेत व सर्वजण कालिका मातेस अतिशय पूज्य समजतात. हिंदूंच्या देवांस भजतात व त्यांच्या देवळांतहि जातात. नेहमींचे उपासतापास, सणवार ते पाळतात. त्यांचा मुख्य सण म्हणजे आश्विन शु. ९ मी या दिवशीं होम करून रात्रीं एका हातांत कण्हेरीच्या फुलांची माळ व दुसऱ्या हातांत मशाला घेऊन ते नाचतात व उड्या मारतात. एखाद्याच्या अंगांत देवी येते व तो तरवारीनें आपली जीभ कापीन असें भय घालतो. चेटुक, जारणमारण व शकुन यांवर त्यांचा फारसा विश्वास नाहीं. गाय, उंदीर, हत्ती, साप व वाघ यांस ते पूज्य समजतात

व ऱ्हा ड–म ध्य प्रां त.—कांहीं जिल्ह्यांत यांस तांबेरा म्हणतात पण कांहीं जिल्ह्यांत तांबेरा व कासार यांच्या भिन्न जाती आहेत. सोनाराच्या खालोखाल यांचा येथें मान आहे.

रा. ब. सदाशिव जयराम देहाडराय यांनीं कासाराच्या उत्पत्तीची अशी कथा सांगितली आहे कीं, सहस्रार्जुनाचा मुलगा धर्मपाल हा यांचा पूर्वज होता. अर्जुन हा इक्ष्वाकूचा पणतू असून तो घोडी व नाग यांच्या संयोगापासून झाला होता म्हणून मराठी कासार स्वतःला अहिहयवंशीय म्हणवितात धर्मपालाची आई परशुरामकृत क्षत्रियवधाच्या वेळीं पळाली. दुसरी एक अशी कथा आहे कीं, एका सोमवंशी राजानें कामधेनू चोरिली होती. त्याच्या चार बायकांच्या पुत्रांनीं सूड घेण्याकरितां तप करून बाण मागण्याच्या ऐवजी चुकून 'वाण' मागितलें, त्यामुळें हे धातुपात्रें विकूं लागले. कांहीं कासार धर्मपालास रतनपूरच्या हैहय रजपुतांचा पूर्वज समजतात. उत्तरहिंदुस्थानांत व संयुक्त प्रांतांत थटेरा लोक आपलें मूलस्थान दक्षिणेंतील रतनपूर गांव सांगतात. यावरून रतनपूर हें काशाचीं भांडीं करण्याचें फार पुरातन काळचें स्थान असावें असें दिसतें. या लोकांत मराठी कासार देशकर, झाडे व अयोध्यावासी असे वर्ग आहेत. भरेवस वर्ग फार नीच समजला जातो त्याच्या व गोंडाच्या चालीरीतींत पुष्कळ साम्य आहे. यांच्यांत कांहीं स्वैर संबंधाच्या उत्पत्तीचे लोक आहेत. त्यास टकले, विदुर, लौंडी, बच्चे असें म्हणतात.

कासारांत अहिहय लोकांचीं सर्व गोत्रें प्रचारांत आहेत. उत्तरेकडील जिल्ह्यांत यांचीं नांवें राहण्याच्या गांवावरून

पडली असून असगोत्रविवाहाचीच चाल तेथें रूढ आहे. यांच्यात आत्ते, मामे व मावसभावंडांची लग्नें निषिद्ध आहेत. यांच्यात भवानी देवीची पूजा फार महत्त्वाची असते. 'मदी अमावास्या' (फाल्गुन वद्य) हा फार महत्त्वाचा सण आहे. त्या दिवशीं प्रत्येक कासार ज्ञातिभोजनात जेवावयास आलाच पाहिजे. न आला तर वर्षभर तो वाळींत पडतो. या अमावास्येस ते दुकान बंद करून आपल्या सर्व हत्यारांची व यन्त्रांची पूजा करतात.

मंडला व हट्टा येथें काशाची भांडीं अत्यंत चांगली होतात.

संयुक्त प्रांत.—या प्रांतमधील कासार लोकांना कासेरा असें म्हणतात. कासेरा जात संघटित दिसते. मिर्झापूरचे कासेरा लोक स्वतःस क्षत्रिय म्हणवितात. परशुरामानें क्षत्रिय-निर्दालन केलें तेव्हां हा धंदा स्वीकारणें आम्हांस प्राप्त झालें असें ते सांगतात. कासेराच्या सात पोट जाती आहेत त्या पुर्विया, च्यावन, गोरखपुरी, टाक, तगारा, भरिया व गोलार या होत. शिवाय भैसापरा, जौनपुरी कनौजीय, मणिपुरिया, असे कांहीं प्रांतिक भेदहि आहेत. अहारवन्सी, छत्री, टाक, सोमवन्सी इत्यादि नांवें कांहीं राजपूत टोळ्यांशीं त्यांचा संबंध दर्शवितात. कासेरा लोकांत असगोत्रविवाह रूढ आहे.

प्रतिष्ठित कासेरामध्यें बालविवाह रूढ असून साधारणपणें दहा किंवा बारा वर्षांच्या मुलींचीं लग्नें करितात. अविवाहित लोक किंवा विधवा व विधुर यामध्यें व्यभिचार झाला तर तो उपेक्षणीय गणला जातो व गुन्हेगाराला बहिष्कृत न करितां दंड करण्यांत येतो. पहिली बायको वंध्या असेल तर जितक्या बायका सभाळतां येतील तितक्या करण्याची यांच्यात मुभा असते. 'चढावा' व 'डोला' असे यांचे लग्नाचे दोन प्रकार असून 'डोला' गरीबांकरितां असतो. 'सगाई' प्रकारानें विधवांना लग्नें करितां येतात व नवरा मृत झाला तर त्याच्या धाकट्या भावाबरोबर किंवा अन्य पुरुषाशीं त्यांना लग्न करितां येतें. अन्य जातीशीं व्यभिचार केला तर नवऱ्याला बायको सोडतां येते. पालन केलें नाहीं किंवा धर्मत्याग केला म्हणून बायकोहि नवरा सोडूं शकते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रियांना त्याच जातींत पुनः लग्न करितां येत नाहीं.

साधारणपणें कासेरा लोक वैष्णव किंवा नानकपंथी आहेत. पांचोंपीर, पीर, दुर्गा अशा त्यांच्या देवता आहेत. तिवारी ब्राह्मण हे कासाराचे पुजारी असतात. मृतांची व्यवस्था नेहमींच्या रीतीनें करण्यांत येते. मृतांना पिंड देण्याचीहि चाल कासेरामध्यें आहे.

या लोकांच्या धंद्या संबंधीं बराच मतभेद आढळून येतो. जस्त, तांबें व कथील असल्या मृदु धातूंचें मिश्रण करून पेले, वाट्या व ताटें तयार करणें हा कासेराचा मुख्य धंदा असून त्यांनीं तयार केलेल्या भांड्यांवर नक्षी करणें व झिलई देणें या कला थथेरा लोकांच्या आहेत असा नेस्फील्डचा अभिप्राय आहे (ब्रीफ रिव्ह्यू २१). हे ई म्हणतो कीं कानपुरास पितळेचीं भांडीं करणाऱ्यांना थथेरा, कासेरा किंवा भरिया अशीं नांवें आहेत (मोनोग्राफ १९८). मिर्झापुरास पितळ किंवा मिश्र धातूंचीं भांडीं करणाऱ्यांना कासेरा म्हणतात. लसनींचा धालिया किंवा धालनेवाला हा कासेराप्रमाणेंच एक कारागीर आहे व त्याचा धंदा म्हणजे जस्ताचे दागिने करणें हा असतो. क्षत्रियाप्रमाणें आपणहि पूर्वीं जमीनदार होतों असा हे लोक बहाणा करितात. सर्व कासेरा लोक जानवें घालतात. मासे, मेंढ्या व बकरी यांचें मांस हे खातात पण दारू पीत नाहींत. अहीर, बारी, नाई, कायस्थ व कलवार खेरीज करून ब्राह्मण क्षत्रिय न वैश्य यांनीं शिजविलेली 'पक्की रसोई' ते खातात.

[क्रूक एन्थावेन रिस्ले आणि हिरालाल सेन्सस रिपोर्ट, सु. गं. त्वष्टा कासार ज्ञाती संस्थान (मुंबई) चे रिपोर्ट, त्वष्टासेवक मासिक, कासार मासिक (वेळापुरे)]

कासार-वाणी यांची संख्या सुमारें ८० हजार असून पैकीं निम्म्याहून अधिक वाणी संयुक्त प्रांतात आढळतात. बिहार, ओरिसा आणि वऱ्हाड-मध्यप्रांत यांतूनहि हे वाणी आहेत. कांस्यकार वणिक या शब्दावरून त्यांना हें नांव पडलें. त्यांचे ज्ञातिविषयक दोन पोटविभाग आहेत. पूर्वेकडील लोकांस पुरबैया व पश्चिमेकडील लोकांस पश्चिमवाह असें म्हणतात. यांशिवाय यांच्यात अनेक भेद आहेत. बिहारमध्यें १६ पोटजाती आहेत असें रिस्ले म्हणतो (हिंदु कास्ट्स् १६). पुरुषानें आपल्याच गोत्रांत लग्न करूं नये व त्यावेळीं पांच पिढ्या विचारांत घ्याव्या असा यांच्यात निर्बंध आहे. पांच सहा पिढ्यांपूर्वीं आपण कारा माणिकपुराहून आलों असें पूर्वभागांतील कसारवाणी सांगतात. बालविवाह रूढ असून पहिली बायको हयात असतांना तिच्या संमतीवांचून नवऱ्यास दुसरें लग्न करितां येत नाहीं. सगाई विधीनें विधवेला पुनर्विवाह करितां येतो व तिला नवऱ्याच्या भावाशीं लग्न करण्याची परवानगी असते पण सक्ति नसते. यांच्यांत काडीमोड नसली तरी नवऱ्यास दुर्वर्तनाबद्दल बायको टाकतां येते.

त्यांच्यापैकीं बरेचसे लोक रामानंदीसंप्रदायाचे असून ते पांचोंपीर व महावीर यांची उपासना करितात. हे लोक बहुधा वाणीच असून मीठ, धान्य, तंबाखु इत्यादि खाण्याचे पदार्थ विकतात. कांहीं पांचोंपीराचे उपासक मांसाशन करितात परंतु महावीराचे भक्त हा आहार वर्ज्य मानतात. त्यांनीं शिजविलेला कच्ची व पक्की ब्राह्मण आणि क्षत्रिय खात नाहींत. इतर बनिया लोक पक्की खातात, पण कच्ची खात नाहींत. पण त्यांच्याच पोटजातींपैकीं कोणी तरी एकानें जर कच्ची बनविलेली असेल तर ती खाण्यास हरकत नाहीं असें मानण्यांत येतें. त्यांनीं शिजविलेली कच्ची कहार व नाई लोक खातात (क्रूक).

**कासारबारी** ( द्वार )—हा घाट अथवा बारी पूर्व खानदेशांत सातमाळाचे डोंगरात आहे. पेरिप्लस ( २४० ) म्हणतो की, भडोचहून पैठण व नगर येथें जो व्यापार चाले तो खानदेशांतून चाले. खानदेशांतून पैठणकडे जाण्याचे जे तीन चार घाट होते त्यापैकीं कासारबारीचा हा एक घाट होता.खानदेशांतून निजामशाहींत जाण्यास ही बारी लागते. दक्षिणेतून उत्तरेकडे बऱ्हाणपूरच्या बाजूस जावयास हा राजरस्ता—सैन्य उतरेल असा—प्रसिद्ध होता. पेशवेकालीन कागदपत्रांत या बारीचा पुष्कळदां उल्लेख येतो. जवळच मालदीचा प्रस्थान ओढा आहे कासारबारी उतरून मोंगल ईमाम गुजराथेंतहि जाण्याचा रस्ता होता [ खान ग्याझे; राजवाडे खंड. १, ६, १०, ११ ].

**कासाला**—आंग्ल-ईजिप्शियन सुदानमधील एक शहर व प्रांत. हें शहर गश नदीवर वसलें आहे. याचे उ. अक्षांश १५°, २८' व पूर्व रेखांश ३६°, २४' आहेत. हें खार्टुमच्या पूर्वआग्नेय दिशेस २६० मैलावर आहे. येथील लोकसंख्या सुमारें २०,००० आहे. मोक्रॅम आणि कासाला ह्या घुमटाकाराच्या पर्वतांनीं व विपुल उद्यानांनीं शहराला फार शोभा आलेली आहे. मुख्य मुख्य इमारती विटांच्या बांधल्या असल्या तरी तद्देशीय लोक बहुतेक गवताच्या झोंपड्यांतूनच रहातात. या शहरापासून जवळच ' खाटमिया ' म्हणून एक स्थळ आहे. हें स्थळ मीरगानी कुटुंबाचें निवासस्थान होय. या कुळांतील लोक एका धार्मिक संप्रदायाचे मुख्य आहेत.

इ. स. १८४० त ईजिप्शियनांनीं कासाला शहराची स्थापना केली. स.१८८३ माहदीच्या सैन्यानें या शहराला वेढा दिला होता. स.१८९४ मध्यें इटालिअन सैन्यानें महदींच्या लोकांपासून हें शहर हिसकावून घेतलें व स. १८९७ त त्यांनीं तें ईजिप्तच्या स्वाधीन केलें. येथें ' हालेंगा ' अरबांची वस्ती फार आहे. येथें पाऊस फार थोडा पडतो.

**कासिया**—संयुक्त प्रांतांतील गोरखपूर जिल्ह्याचा पोटविभाग; यात पद्रौना तहसिलीचा अंतर्भाव होतो. पोटविभागाचें मुख्य ठिकाण कासिया हें देवरिया-पद्रौना व गोरखपूर-सिरघाट रस्त्यावर रामभार सरोवरापासून जवळ आहे. येथून थोड्या अंतरावर बिरानपूर येथें महत्त्वाचे जुने अवशेष आहेत. गौतमबुद्ध ज्या ठिकाणीं मरण पावला त्या कुशनगराचेच हे अवशेष असावेत असा पुष्कळ दिवस समज होता; परंतु चिनी प्रवाशांनीं कुशनगराच्या इमारतींचें दिलेलें वर्णन अवशेषांतील इमारतींशीं मुळींच जुळत नाहीं.

**कासीमबझार**—बंगाल इलाख्याच्या मुर्शिदाबाद जिल्ह्यांतील एका पोटविभागाचें प्रमुख ठिकाण. सध्या मोडकळीस आलेलें हें गाव भागीरथी नदीवर वसलेलें असून बहरामपूर म्युनिसिपालिटींत या गावाचा समावेश होतो. येथील लोकसंख्या (इ स.१९०१) १०६२ आहे.

ह्या गावाचें मुर्शिदाबादपेक्षांहि ऐतिहासिक दृष्टीनें अधिक महत्व आहे. मुर्शिदकुलिखानच्या अगोदरपासून कासीमबझार हेंच व्यापाराचें मुख्य केंद्र होतें व हिंदुस्थानाशीं व्यापार करणाऱ्या वेगवेगळ्या यूरोपीय राष्ट्रांच्या येथें वसाहतीहि होत्या. १९ व्या शतकाच्या आरंभीं तर इंग्रज लोक भागीरथी नदीस ' कासीम-बझार नदी ' म्हणत असत भागीरथी, पद्मा व जलंगी ह्या तीन नद्यांमधील त्रिकोनी भागास कंपनीचे लोक ' कासीम-बझारचें बेट' म्हणत असत. कोणी कासीमखानानें हे गाव वसविलें असें म्हणतात. १७ व्या शतकाच्या अगोदरचा ह्या शहराचा इतिहास उपलब्ध नाहीं. तरी पण जेव्हां ह्या शहरास महत्व आलें तेव्हां हें एकदम झटकपणें पुढें आलें. कलकत्ता शहराची स्थापना होण्यापूर्वी कासीमबझार फार मोठें व महत्वाचें शहर होतें. सन १६५८ सालीं कासीमबझार येथें एक इंग्रज व्यापारी एजन्ट नेमण्यात आला व येथील मुख्य अधिकाऱ्यानें तो कौन्सिलचा सभासद असावा असेंहि ठरविलें.

सन १६८६ सालीं नबाब शाइस्तेखानच्या हुकुमावरून बंगाल्यातील इतर वसाहतींप्रमाणे कासीमबझार येथील वसाहतहि सरकारजमा( खालसा ) करण्यात आली; पण पुढें दोन वर्षांनीं ती परत देण्यात आली व ह्या शतकाच्या शेवटीं शेवटीं तर कासीमबझार हें इंग्रजांच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण झालें. सन १६८९ सालीं कलकत्त्याची स्थापना करणारा जॉब चॉरनाक हा जेव्हां कासीमबझार येथें मुख्य होता तेव्हां ईस्ट इन्डिया कंपनीनें युद्ध बंगालकरतां दोन लक्ष तीस हजार रुपये अगदीं वेगळे करून ठेविले होते. तद्देशीय लोकांच्या सांगण्यावरून असें दिसतें कीं, त्यावेळीं कासीमबझार येथें मोठ मोठ्या इमारती असून शहर अगदीं भरभराटींत होतें. इंग्रजांच्या कासीमबझार येथील वखारीस एवढें महत्व येण्याचें मुख्य कारण म्हणजे जवळच मुसुलमानी राजधानी मुर्शिदाबाद इचें अस्तित्व होय. पण हेंच त्याच्या नाशासहि कारण झालें. जेव्हां कलकत्त्याच्या कौन्सिलशीं भांडण होई तेव्हां ही वसाहत सैन्य पाठवून नबाबास आपल्या ताब्यात घेता येत असे.

स. १७५७ सालीं नबाब सुराज उद्दौला ह्यानें इंग्रजांना बंगालच्या बाहेर हाकून देण्याचें ठरविलें व वॉरन हेस्टिंग्जला पकडून आणून मुर्शिदाबाद येथें कैदेत ठेविलें. प्लासीच्या लढाईनंतर कासीमबझारास पुन्हा महत्व प्राप्त झालें व येथें रेसिडेंट ठेविला, पण लवकरच रेसिडेंटचा अधिकार काढून घेण्यात येऊन तो मुर्शिदाबाद येथेंच राहणाऱ्या एजंटाच्या हातीं देण्यात आला. १९ व्या शतकाच्या आरंभापासून कासीमबझारच्या उतरत्या दशेस प्रारंभ झाला. भागीरथीच्या पात्रात एकदम बदल होतो त्याप्रमाणें तेव्हां झालें व ती पूर्वेकडचा पट्टा सोडून देऊन एकदम पश्चिमेकडून गावापासून तीन मैल दूर वाहू लागली. वॉरन हेस्टिंग्जचा हस्तक बनिया कान्त बाबू ह्याचा एक वंशज कासीमबझार येथें

असून त्यात कासीमखानाच्या महाराज म्हणतात येथे काही मन्द घाडे होते; त्याचे पडके अवशेष आहेत. वॉरन हेस्टिंग्जच्या पत्नीचा पायफोर्ड यडगें येथे आहे.

**कासूर**—पंजाबातील लाहोर जिल्ह्याचा पोटविभाग. यात कासूर व चुनियान ह्या तहशिली आहेत.

**त ह शी ल**—पंजाबात लाहोर जिल्ह्यांतील आग्नेय तहशिल. ही सतलज नदीच्या उत्तरतीराला असून तिचे क्षेत्रफळ ८१३ चौरस मैल आहे. पैकी दोनतृतीयांश भागाला माझा असे नाव आहे; त्यातून कालवे—दुआब कालवा जातो. उत्तर भाग सखल असून जुन्या बियासच्या खालच्या बाजूस आहे व त्यातून कटोर इनडेशन कॅनाल जातो. या तहशिलीत ३४२ खेडी व कासूर (तहशिलीचे मुख्य ठिकाण), खेमकरन व पट्टी ही मोठी गावें असून १९११ साली एकंदर लोकसंख्या २,८९,२५० होती. फिरोजपूर जवळ रणक्षेत्र याच तहशिलीत आहे.

**श ह र.**—पंजाबातील लाहोर जिल्ह्यामध्ये याच नावाच्या पोटविभागाचे व तहशिलीचे मुख्य ठिकाण हे जुन्या बियासच्या उत्तरतीराला नॉर्थवेस्टर्न रेल्वे व फेरोजपूर रस्ता यावर, लाहोर शहराच्या आग्नेयास ३४ मैलावर असून आगगाडीने कलकत्यापासून १२०९ मैल, मुंबईपासून १२३७ मैल व कराचीपासून ७७८ मैल आहे. लोकसंख्या (१९११) २४,७८३. पैकी तीनचतुर्थांश हिंदु व एकचतुर्थांश मुसलमान आहेत. श्रीरामाचा जेष्ठपुत्र कुश याने हे गाव वसवलें अशी दंतकथा आहे ती किंपत खरी आहे हे न समजलें तरी, गाव फार जुनें असून मुसलमानांच्या स्वाऱ्यापूर्वी त्यात रजपुतांची वस्ती होती ही गोष्ट निःसंशय आहे तथापि मुसुलमानी अमदानीत सिंधूच्या पूर्वेकडील पठाणांची वस्ती येथे होईपर्यंत इतिहासात या गावाचा उल्लेख आलेला नाही. पठाण लोक या ठिकाणी बाबरच्या अथवा अकबराच्या कारकीर्दीत येऊन त्यांनी सतलजच्या दोन्ही तीरामधील प्रदेश मिळविला. उदयोन्मुख शीख लोकांना कासूरच्या पठाणापासून बराच अडथळा पोचला; परंतु अखेर १८०७ त रणजितसिंगानें शेवटला पठाण सरदार कुतुबुद्दीनखान याचा पराभव करून कासूर लाहोरच्या राज्यास जोडलें. हल्ली गावात पठाणवस्ती फारच कमी आहे. येथील म्युनिसिपालिटीचे इ.स. १९०३–४ सालचें उत्पन्न ६,०४,००० रु होतें कासूर हे लाहोरच्या खालोखाल जिल्ह्यातील सर्वात मोठें गाव असून धान्य, कापूस वगैरेंच्या स्थानिक व्यापाराचें तें केंद्र आहे. येथून दरवर्षास धान्य व कापूस मिळून १० लक्ष रुपयांचा माल बाहेरदेशी रवाना होतो. गावात घोड्यांचें सामान व कातड्याचे इतर जिन्नस तयार होतात; येथे कापसाचे ४ जीन व २ प्रेस असून इंग्रजी हायस्कूल व दवाखाना वगैरे इमारती आहेत.

या गावी १९१९ साली रौलेट कायदा पास झाल्याबद्दल लोकांनी हरताळ पाडला व तेथील रेल्वे स्टेशनचें नुकसान करून पोस्ट व तार ऑफिस व मुनसफकोर्ट जाळलें, तेव्हां त्यांजवर गोळीबार करण्यात येऊन ता. १६ एप्रिलपासून १५ जूनपर्यंत लष्करी कायदा पुकारण्यात आला. त्यामुळे तेथील लोकांस विनाकारण बराच त्रास झाला.

**कासेगांव(१)**—मुंबई इलाखा.सोलापूर जिल्हा.हे सोलापूरच्या ईशान्येस८मैलावर आहे. गावांत कासेश्वराचें हेमाडपंती देवालय आहे येथे ता. २१।३।१७७४ रोजी रघुनाथराव दादासाहेब व बारभाईतर्फे त्र्यंबकराव मामा पेठे यांची लढाई होऊन तींत मामाचा पराभव झाला व मामा हे अतिशय जखमी झाले. मामाची फौज १८ कोसांची मजल चालून आल्यानें थकली होती. ' घोडीं, माणसें मादी झाली होती, (परंतु) गाठ पडल्यावर मागें सरूं नये ( सरता येत नव्हतें ) ' कासेगावच्या माळावर ही लढाई झाली. दादासाहेबाकडील गारद्यांनी व हुजरातीनें मामाच्या हुजरातीला पळवून लाविल्यानें व त्याची फौज हमल्याभागल्यानें त्याचा मोड झाला. जरीपटक्याचा हत्ती, नौबती वगैरे दादासाहेबांनी काबीज केले मामाना तीन जखमा झाल्या होत्या, ते पाडाव झाले आणि लगेच दुसऱ्या दिवशी वारले या अपजयाचें कारण बहुतेकांच्या मतें ' मामांनी उतावळी केली, यामुळें यश त्यास (दादासाहेबास) आलें असें आहे[खरे–ऐ. ले सं. भा , राजवाडे खंड ८. १०.११ ].

**कासेगांव**—मुंबई इलाख्यापैकी, सातारा जिल्ह्याच्या वाळवें तालुक्यातील येडें हे सातारा-कोल्हापूर रस्त्याजवळ कऱ्हाडच्या दक्षिणेस ११ मैलावर व पेठेच्या उत्तरेस ४ मैलावर आहे येथील लो सं ( १९०१ ) ५४८२ आहे. तालुक्यातील भरभराटीच्या गावापैकी हे एक आहे येथील व्यापारी सधन असून ते कोंकण प्रांताशी तंबाखू, मिरची व ऊंस या जिनसाचा व्यापार करितात येथील रहिवाशी भाडखोरपणाबद्दल व गुन्हे करण्याबद्दल प्रसिद्ध आहेत

**कॅस्टेलो ब्रँको**—पोर्तुगल देशात कॅस्टेलो ब्रँको विशपच्या अधिकारातलें एक शहर असून बैरा प्रांतातील एका जिल्ह्याचें मुख्य शहर होतें अब्रँटेस-गार्डा रेल्वेवर समुद्रसपाटीपासून १५६० फूट उंचीवर हें शहर वसलें आहे.येथील लोकसंख्या इ. स. १९०० साली ७२८८ होती. येथील बरेच रोमन अवशेष कॅस्टेलो ब्रँको फार प्राचीन शहर असल्याची साक्ष देतात. येथे एक पडित किल्ला आहे जुनाट भिंतींनी हें शहर वेढिलें असून येथील मुख्य इमारती म्हणजे बिशपच्या अधिकारातला महाल व प्रार्थनामंदिर ह्या होत. येथे कापड तयार होत असून बुचें, अर्क, दारू व ऑलिव्ह तेल ह्या वस्तूंचा स्थानिक व्यापार चालतो.

**कास्पियन समुद्र**.—यूरोप आणि आशिया यामधील अंतर्भौम समुद्र. उ. अ ३६° ४०' ते ४७° २०' व पू. रे. ४६° ५०' ते ५५° १०'. याची दक्षिणोत्तर लांबी ७६० मैल व रुंदी १०० ते २८० मैलापर्यंत आहे. याचें क्षेत्रफळ सुमारें १,६९,३३० चौरस मैल असून त्यापैकी ८६५ चौरस ... यांतील बेटांनी व्यापिलें आहे सामिशिअन

किंवा अरलो-कास्पियन खाच अशा नवानें कधीं कधीं संबोधिल्या जाणाऱ्या एका प्रचंड खाचेचा अतिशय खोल असा भाग हा समुद्र भरून काढतो सध्या या समुद्राचा पृष्ठभाग महासागराच्या पातळीहून ८६ फूट खालीं आहे व्होल्गा, उरल, टेरेक, सुलाक, कुरा आणि आरास या मोठ्या नद्या कॉस्पियनला मिळतात

या समुद्रात येणाऱ्या पाण्याचा प्रदेश पश्चिमेकडे व उत्तरेकडे फार दूरवर पसरला आहे याला मिळणाऱ्या सव नद्या दरवर्षी सुमारें १७,४०१ घन मैलाइतका पाण्याचा लोट यात आणून सोडीत असल्या पाहिजेत असें का शास्त्रज्ञानें गणितानें ठरविलें आहे जर बाष्पीभवनाची क्रिया बंद असती तर हा समुद्र दरसाल ५ ½ फूट उंच वाढला असता

प्राचीन युगात कास्पियन समुद्र वर असून फार विस्तृत होता सार्मेशिअन महासागराचा एक भाग म्हणून याची गणना करण्यास हरकत नाहीं असें भूशास्त्र म्हणतात यातील प्राणी आर्टिक समुद्रातल्याप्रमाणें वाटतात पण या दोन सागरामधील प्रत्यक्ष संबंधाचे निश्चित पुरावे अद्याप पुढें आले नाहींत महासागरातील पाण्यापेक्षा याचें पाणी बरेंच गोडें आहे व्होल्गा, उरल व टेरेक या नद्या ज्या भागात मिळतात तेथील पाणी तर पिण्याजोगें आहे

ऑप्शेरॉन द्वीपकल्पातला पट्रोलचा व्यापार वाढल्यापासून व ट्रॅन्स्कॅस्पियन रेल्वे सुरु झाल्यापासून (इ स १८८६) कास्पियन समुद्रावरचें दळणवळण फार वाढलें आहे फक्त रशियाचच एक ल्हान आरमार या समुद्रात असतें कोणत्याहि अतर्भाग समुद्रात यातील माश्याच्या समृद्धीइतकी समृद्धि नाहीं येथील माश्यापासून चागलीं आर्थिक द्रव्येंहि तयार होतात काळा समुद्र व कास्पियन समुद्र प्रत्यक्ष जोडून व्यापार वाढविण्याच्या योजना पुष्कळच होऊन गेल्या, पण अद्याप त्यापैकीं काहींच झालेलें नाहीं

**कास्पियन समुद्रावरील हिंदु देवालय**—रशियातील बकूपासून सुमारें १० मैल अतरावर सुरखनि नामक स्थळीं एक हिंदु देवालय आहे त्या देवालयात हिंदूंच्या मूर्ती असून आज कित्येक (अकरा शतकावर) शतकें 'मुल्तानी' लोक त्या देवालयाचें रक्षण व देवाची पूजा करीत आहेत सिंधूनदवर मुलतान शहर आहे यावरून या देवालयात असणाऱ्या हिंदु लोकांना मुल्तानी म्हणतात हिंदुस्थानातून आळीपाळीनें तेथें जाऊन लोक देवालयाचें काम करतात

या देवालयाच्या सभोंवार दगडाची एक उंच भिंत आहे त्या भिंतीला एक लाकडी फाटक आहे व त्यातून आत जाण्याचा मुख्य मार्ग आहे आणि राहण्यासाठीं भिंतीस लागून खोल्या बाधलेल्या आहेत १०० फूट व्यासाच्या वर्तुळाकार इमारतीच्या मध्यभागी एक गाभारा आहे या चतुष्कोनी ... बांधणी फार मजबूत आहे तीस किंवा चवदा फूट उंचीच्या घुमटापासून खालीं एक घाट बाधलेला आहे गणपती शिव व दुसऱ्या गृहदेवता याच्या तेथें मूर्ती आहेत गृहदेवताच्या मूर्ती चादीच्या अथवा मुलामा दिलेल्या धातूच्या केलेल्या आहेत या मूर्ती गाभाऱ्याच्या मध्यभागीं एका ल्हान व उंच अशा वेदीवर व्यवस्थित रीतीनें लावून ठेवलेल्या असतात

जमीनींतून वर येणाऱ्या पवित्र ज्वाला या देवालयाला प्रकाशित करतात देवळात सर्व ठिकाणीं नळ्या आहेत या नळ्या जमिनीपासून १ किंवा २ फुटावर आहेत आगकाडी ओढून या नळ्याच्या तोंडाशीं धरली म्हणजे कर्बवायूच्या प्रकाशाप्रमाण प्रकाश पडतो चुना जाळणें व विटा भाजणें या कामाकरिता खणलेल्या खदकातील पेटलेल्या कर्बवायूचा प्रकाश या प्रदेशात सर्व ठिकाणीं पडतो ही नैसर्गिक व भव्य दीपावलि अत्यद्भुत सृष्टिचमत्कारापैकीं एक आहे [इ अॅ पु १ पा १०९ १११]

**काहूत**—पंजाबातील एक जात लो स (१९११) १०६४८ ह मुख्यत मुसलमान असून झेलम जिल्ह्यामध्यें आढळतात हे शेतकरी असून रजपूत लोकाचे वंशज आहेत काहुता राजधानी असलेल्या आसपासच्या प्रदेशावर यानीं राज्य केलें आहे [सेन्सस रिपोर्ट, १९११ पु १४ रोजची ग्लॉसरी, २]

**काळपुळी**—त्वचेमध्यें एकाच ठिकाणीं एकदम दाह उत्पन्न होऊन त्वचेच्या खालच्या पापुद्र्यापर्यंत तो दाह जाऊन त्वचा कुजणें हीं या रोगाचीं मुख्य लक्षणें आहेत एवढ्या थोड्या जागेवर जरी हें दुःख असलें तरी त्याच्यापासून होणाऱ्या वेदना व ठणका विलक्षण असतो व प्रकृतींत एकदम फार बिघाड उत्पन्न होतो रोगाच्या आरंभीं तर हें दुःख अगदीं अल्प असतें ही पुळी बहुधा मानेच्या मागें, पाठीवर, तोंडावर किंवा हातापायावर असते हिचा आकार एखाद्या चपट्या व टणक गळवाप्रमाणें असतो न तिचा रंग मात्र अति लाल असतो नतर हा भोंवतालीं वाढत वाढत जाऊन एखादे वेळीं लहानशा ताटलीयेवढ्या घेराची होते हिच्या मधील भागास छिद्रें पडून त्यातून रक्त, रस, वगैरे पाणी झिरपत असते यातूनच कुजलेल्या त्वचेचे तुकडे व तंतू पिंवळे झालेले दिसत असतात ही गाठ व पुळी होण्याचें कारण कुजण्याची क्रिया उत्पन्न करणाऱ्या जंतूंचा येथें काहीं अकल्पित रीतीनें प्रवेश होतो हे होय मानसिक चिंतेनें अगर मूत्रपिंड फार बिघडून किंवा मधुमेहानें शरीर खगत जाऊन मग रोग्यास ही पुळी होण्याचा संभव असतो शेवटीं या गाठींत चोहाकडे पू होतो आणि क्लेश व दुःख सहन करावे लागल्यानतर हळूहळू आतील पीं, मगज व इतर नासक्या घाणीचा निचरा होत जातो

**उपचार**—हल्लीं प्रघात असा आहे कीं, रोग्यास भूल देऊन ही गाठ चिरतात व जेथपर्यंत सूज आहे तेथपर्यंत विस्तृत छेद करून आत कुजणाऱ्या तंतूंचा कुरकुट

झाला आहे असला भाग खरवडून काढून टाकतात. मात्र हें कृत्य गाठ उत्पन्न झाल्यावर जितकें लवकर करिता येईल तितकें चागलें. गाभा खरवडल्यावर त्या ठिकाणीं सौम्य जंतुघ्न औषध लावून तो जागा दोषरहित करितात. यानें दु:ख, ठणका हीं तावडतोब शमतात व या जंतूचें विषशोषण शरीरात होऊन मृत्यु यावयाचा तो टळतो व रोग्याची प्रकृति अधिक त्वरेनें पूर्ववत होत जाते.

**काळहोळ**—मुंबई इलाखा. बेळगाव जिल्हा. गोकाकच्या ईशान्येस सुमारें सात मैलावरील एक गाव. येथें एक जुनाट जैनमंदिर (बस्ती) असून त्यात इ. स. ११०५ सालचा एक शिलालेख आहे. डिसेंबर महिन्यात येथें एक जत्रा भरते. [बेळगाव गॅ.]

**काळाआजार**—हा रोग हिंदुस्थान, चीन, आसाम या देशात आणि ट्यूनेस, अल्जिरिया, अरबस्तान व मिसर-देश या देशात पहाण्यास सापडतो.

का र णें.—माशा, डास, ढेंकूण याच्या कोठ्यात जे प्राणिज जंतू सापडतात त्याच्या शोधकावरून नामाभिधान पावलेले लीशमन डॉनोव्हन नामक जतू या रोगाचा वरील कीटकांच्या सहाय्यानें प्रसार करतात.

ल क्ष णें.—अनियमित, सतत अशा कोणत्या तरी रीतीनें तापास सुरवात होऊन पंडुरोग उत्पन्न होऊन शरीर फार क्लिष्ट होतें. शरीर कृश होऊन शक्ति फार कमी होते आणि यकृत व प्लीहा मोठ्या होतात. नाक व हिरड्यातून रक्त कधीं कधीं येतें व त्वचेखालीं ठिकठिकाणीं रक्त फुटलेलें आढळतें. हातापायाच्या हाडाच्या टेकाळामध्यें दुखूं लागतें, तोंड व घोटे या ठिकाणीं कधीं सूज येते व संध्याकाळीं ती नाहींशी होते; व कधीं तर रोग्यास जलोदर होतें, व अशा वेळीं रोग्याचें यकृत फार मोठें वाढलेलें असतें. अतिसार, हगवण, कफ, श्वास, दमा, फुप्फुसदाह यापैकीं रोग बहुतकरून होतातच, व याच आगंतुक रोगामुळें किंवा अन्य आगंतुक दोषामुळें रोग्यास मरण येतें. रक्ताची एक टरीव विकृतस्थिति होऊन बसते. त्यातील लाल कण जवळ जवळ निम्मे नाहींसे होतात. व त्यातील लोहाचा अंश व पाढऱ्या कणाचें प्रमाणहि बरेंच कमी होतें.

रो ग नि दा न.—हात अगर पाय यातील रक्तातील पाटरे गोलक तपासावे पण या रीतीनें निदान करण्यास बराच वेळ लागतो. यकृतामधील रक्त सावधगिरीनें काढून तें तपासतात. या तपासामध्यें हा रोग हिंवताप अगर विषमज्वर नाहीं असें या रोगाच्या जंतूच्या अस्तित्वावरून व त्या रोगजंतूंच्या अभावावरून खात्रीपूर्वक सिद्ध होतें.

सा ध्या सा ध्य वि चा र.—रोगी कित्येक महिने जगतो. नंतर शेकडा ९० रोगी दगावतात असें आकड्यानीं सिद्ध झालें आहे.

उ प चा र.—कोयनेल जास्त प्रमाणात दिल्यानें उपयोग होतो असें रॉजर्स या डॉक्टरचें मत आहे. पण दुसरे कित्येक म्हणतात कीं त्याचा उपयोग रोगप्रतिबंध करण्याच्या कामींच विशेष होतो व किरयेकाच्या मतें त्यानें बिलकूल उपयोग होत नाहीं. ट्यूनिसमध्यें व मॅनसन या डॉक्टरानें दुसऱ्या देशात एटिमनीचें हें औषध गुणावह आहे असा अनुभव घेतला आहे. ॲंटिमनी टार्टेट या औषधाचा द्रव शिरान्त, मार्गे रक्तात घालून गुण येतो याची प्रचीति रॉजर्स व दुसऱ्या डॉक्टरानीं घेतली आहे. यासाठीं १०० भाग पाण्यात २ भाग ॲंटिमनी टार्ट्रेट या प्रमाणात द्रव करून पहिल्या दिवशीं ४ क्यूबिक सेंटिमिटर टोंचून रक्तात घालतात. नतर दोनतीन दिवसानीं ६ क्यूबिक सें. मी. औषध घालून पुन: दर दोनतीन दिवसानीं एक एक क्यूबिक सें. मी. औषध वाढवून त्याचें १० क्यू० सेंटिमीटर प्रमाण वाढेपर्यंत टोचून घालतात. मध्येंच ॲंटिमनी जास्त झाल्यानें ओकारी वगैरे झाल्याचीं चिन्हें दिसलीं तर औषध वाढविण्याचें तहकूब ठेवावें. ताप बंद होऊन पाणथरी नेहमींच्या आकारात येईतों औषध हळूहळू वाढवावें. २० क्यू० सेंटि० औषध त्रासाशिवाय पचल्याचीं उदाहरणें आहेत ताप कमी होण्यास पाचसहा पासून दहाबारा आठवडे लागतात परंतु पाणथरी कमी होण्यास मात्र तीन, सहा, अगर नऊ महिनेहि लागतात यानंतर रक्तातील तावड्या व पाढऱ्या गोलकाचें बाजवी प्रमाण पूर्ववत् येतें. पाणथरीतील रक्तात सापडणारे प्राणिज रोगजंतु नाहींसे होतात. हें औषध टोंचताना तें शिरेतच जाईल, बाहेर साडणार नाहीं अशी खबरदारी घेतली नाहीं तर सांडलेल्या जागीं सूज व दु:ख मनस्वी होतें. म्हणून निदान मुलाच्या बाबतींत ॲंटिमनीची अतिबारीक केलेली पूड लॅनोलीन या मलमात खलून त चोळावें म्हणजे बराच उपयोग होतो.

**काळा चौतरा**—याचें नाव काळा चबुना, काळा चौरा असेंहि आहे. औरगाबाद शहराबाहेर जवळच हें ठिकाण आहे. औरंगाबादेहून फौज बाहेर निघावयाची म्हणजे पहिला मुक्काम (डेरेदाखल) या ठिकाणीं होत असे. पुण्यास डेरेदाखल होण्याची जागा जशी गारपीर तशी ही असे. [राजवाडे. खंड १, खरे. ऐ. ले. सं.]

**काळा पहाड**—वायव्येकडील सरहद्दीवरच्या प्रांतात हजारा जिल्हा आहे त्याच्या वायव्यसरहद्दीवर ही डोंगराची रांग आहे. याच्या सीमा.—पूर्वेस अगोर व दक्षिणेस तनावाल. आहे. ही रांग दक्षिणोत्तर दिशेनें पसरली असून लाबी २६ ते ३० मैल व उंची सुमारें ८००० फूट. सिंधूनद उत्तर टोंकास लागून बरोबर दक्षिणेस वळला आहे. पश्चिमेच्या उतरणीवर युसुफझाइ पठाण व इतर भागात स्वाती लोक रहातात या रांगेपासून फाटे निघाले आहेत. व त्या फाट्यामधील सखल प्रदेशात वस्ती आहे. ओक, सिकामोर व हर्सचेस्टनट या झाडाचीं अरण्यें शिखरावर आहेत, पण उतरणीवर मुळींच झाडी नाहीं. इ. स १८५१ सालापासून तें १८९१ पर्यंत या

*लोकांनीं खालसा मुलखात दरवडे घालून अथवा इंग्रजी अधि*काऱ्यांना ठार मारून इंग्रज सरकारास मधून मधून उपद्रव देण्याचा क्रम चालू ठेविला होता. प्रत्येक वेळीं सैन्य पाठवून त्यांचें पारिपत्य करण्यात आलें. १८९१ पासून यांनीं शांततेचा *भंग केला नाहीं*

**काळा बाग**, जमीनदारी.—पंजाब इलाखा, मियानवाली जिल्हा व तहशिलींतील एक जमीनदारी. क्षेत्रफळ १०७ चौ. मै. काळाबागचे अवान मलिक याची ही जमीनदारी आहे. सुमारें ३०० वर्षांपूर्वी हे येथें आले. शिखांनीं इ. स. १८२२ त ही जमीनदारी खालसा केली. तथापि माउलिक या नात्यानें ती मलिक याजकडेच राहिली इ. स. १८५८ सालच्या बंडात याच्याकडे पेशावर शहराच्या एका दरवाजाचें रक्षण करण्याचें काम सोंपविण्यात आलें होतें. येथील *जहागिरदारास इतर उत्पन्नाशिवाय तुरटी तयार करण्याबद्दल* १००० रुपये मिळतात.

**गांव**—पंजाब मियानवाली जिल्हा. इसाखेल तहशिलींतील एक गाव. उ. अ. ३२° २८' व पू. रे. ७१° ३३' लोकसंख्या (इ. स. १९११) ६६६४. सिंधु *नदीच्या उजव्या तीरावर मिठाच्या डोंगराच्या पायथ्याशीं हा गाव वसलेला आहे. येथें* वारा मिठाच्या खाणी आहेत जवळपासच्या डोंगरात तुरटीहि सापडते. इ. स. १९०४ सालीं १००० मण तुरटी निघाली. उत्तरोत्तर या धंद्याचें महत्व कमी होत चाललें आहे. इ. स. १८७५ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-४ सालीं तिचें उत्पन्न ५६०० रुपये व खर्च ६७०० रुपये होता.

**काळा बाग छावणी**—वायव्येकडील सरहद्दीचा प्रांत. हजारा जिल्ह्यांतील ही एक लहानशी छावणी असून अबटाबाद आणि मरी यांच्या दरम्यान असलेल्या रस्त्यावरच आहे. उ. अ. ३४° ६' व पू. रे. ७३° २५'. हिंवाळ्यात रावळपिंडी येथें असलेला ब्रिटिश डोंगरी तोफखाना उन्हाळ्यात येथें असतो.

**काळासमुद्र**—काळ्या समुद्राच्या मर्यादा पुढीलप्रमाणें आहेतः उत्तरेस रशियाचा दक्षिणकिनारा असून पश्चिमेस रुमानिया, तुर्कस्तान व बल्गेरिया हे देश आहेत. दक्षिण व पूर्व दिशेस आशियामायनर आहे. उत्तरेस अझोव समुद्राचा भाग असून बास्फोरसमुळें काळासमुद्र व भूमध्यसमुद्र जोडले गेले आहेत. दार्दानेलीस व मार्मोराचा समुद्र यांच्या द्वारा हा संयोग घडून आला आहे. *मध्यानजीकची सर्वांत जास्त* खोली सुमारें १०२० पुरुष आहे. काळ्या समुद्रावरचें *वातावरण व स्थिति भूमध्य समुद्राहून फारच भिन्न* आहे. १०० पुरुषांखालीं आढळून येणारा गंधकयुक्त हैड्रोजन, कॅलशियम कार्बोनेटचा थर, इतका खोल पाण्यातील घुमकें पाणी व त्याशीं आढळून येणारा जीवनाभाव या सर्व गोष्टींमुळें भूमध्यसमुद्राशीं काळ्यासमुद्राची तुलना करणें अशक्य झालें आहे. अश्मीभूत वनस्पति (फॉसिलिफेरस), ड्रेइसेना व कार्डियम यांचे अवशेष तळापासून वर काढण्यात आले आहेत. त्यावरून असें दिसतें कीं, काळ्यासमुद्रावरील परिस्थिति हल्लींच्या कॅस्पि*यन समुद्राप्रमाणेंच होती. एन्. अँड्रू सॉव्हच्या मतें* काळासमुद्र व भूमध्यसमुद्र यांचा बास्फोरसद्वारा संयोग झाला त्यावेळीं बरेंच क्षारजल काळ्या समुद्रात शिरलें व त्यामुळें तेथें गंधकयुक्त हैड्रोजन उत्पन्न झाला उन्हा*ळ्यात हवामान व खारटपणा यांचें निरीक्षण करण्यात आलें त्यावेळीं पृष्ठभागावरील खारेपणा* शेंकडा १.७० ते २ अशा प्रमाणात पन्नास पुरुष खोल होता व अत्यंत *खोलींतील खारेपणा* शेंकडा २.२५ अशा प्रमाणात असतो. २५ ते ५० पुरुष *खोलीच्या दरम्यान शीतल थर असल्यानें* हवामानात फरक पडतो.

**काळी नदी**—(पूर्व) हिचें खरें नाव कालिंदी ही नदी संयुक्त प्रांतातील मुजफरनगर, मिरत, बुलंदशहर, *अलीगड, इटा आणि फरूकाबाद या जिल्ह्यांतून वहात जाते. ही कनोजजवळ गंगा नदीस मिळते. लोअर गँजिस कॅनालचें सांडपाणी हींत सोडलें आहे.*

**काळी सिंध**—राजपुताना आणि मध्यहिंदुस्थान या प्रांतातून वहात जाणारी व चंबळा नदीस मिळणारी नदी. विंध्याद्रि पर्वतात *बरशिरी सेंडयाजवळ उगम पावून कोटा* संस्थानातील पिपरा गावाजवळ चंबळा नदीस मिळते. तिची एकंदर लांबी २२५ मैल आहे. संस्कृत वाङ्मयात हिचा पुष्कळ वेळा उल्लेख आलेला असून अबुल फजलनें माळव्यातील ही एक महत्वाची नदी आहे असें लिहून ठेवलें आहे.

**किउंथल**—पंजाब. सिमल्याच्या भागातील *जीं डोंगराळ संस्थानें आहेत त्यांपैकीं* एक. या संस्थानचें क्षेत्रफळ ११६ चौरसमैल आहे. या संस्थानात २१२ खेडीं असून एकंदर लोकसंख्या १९११ सालीं २५३५४ होती संस्थानचें वार्षिक उत्पन्न १९०६ सालीं ६६००० रु. होतें. हल्लीं या संस्थानचा राजा रजपूतवंशी विजयसेन हा आहे. पूर्वी या संस्थानच्या राजाला 'राणा' या नावानें संबोधलें जात असे. पण १८५७ सालीं याला राजा हा किताब देण्यात आला. 'गुरखा युद्धा'नंतर गुरखे लोकांच्या ताब्यात या संस्थानचा जो मुलुख होता तो पतियाळाच्या *महाराजाच्या ताब्यांत देण्यात आला. यामुळें या संस्थानची जी नुकसानी झाली त्याकरितां* ब्रिटिशसरकारानें या संस्थानास खंडणीची सूट दिली. १८१५ सालीं धिओग, कोटी, घंड, मधान हीं छोटीं संस्थानें ह्या संस्थानच्या ताब्यात देण्यात आलीं व वरील संस्थानांनीं या संस्थानाला खंडणी द्यावयाचें ठरलें. सन १८७३ मध्यें *पुंगर हें देखील या संस्थानाकडेच देण्यात आलें*

**किओटो**-हें शहर जपानमधील यामाशिरो प्रांतांत आहे. हें जपानची जुनी राजधानी होतें. हें उत्तरअक्षांश ३५°

व पूर्व रेखांश १३५° ४६' वर आहे. याची लोकसंख्या १९१६ सालीं ५,३९,१५३ होती. येथें विवा तळ्यापासून ६२ मैल लांबीचा कालवा आणला आहे. या कालव्यानें येथील कारखान्यांस मुबलक पाणी मिळूं लागलें. येथें पुष्कळ भव्य देवालयें व मंदिरें असून शिल्पकलेच्या दृष्टीनें उत्कृष्ट बांधलेलीं स्मारकेंहि बरींच आहेत. यांशिवाय या शहरांत विशाल उत्सवमंदिरें व सुंदर बागाहि आहेत. या वर निर्दिष्ट केलेल्या सर्व ठिकाणीं जपानी कलेचें मोहक स्वरूप दृग्गोचर होतें. या शहराची चिनीमातीची भांडीं, कपड्यावरील भरतकाम, किनखाब, पंखे, लहान मुलांचे खेळ वगैरेकरितां फार पुरातन काळापासून प्रसिद्धि आहे. येथें अलीकडे उत्तम रेशमी कापड व रंगीबेरंगी सूत तयार होतें. येथील रेशमी कापडास व सुतास यूरोपांत व अमेरिकेंत बरीच मागणी आहे.

बौद्ध संप्रदाय या जपानी संस्कृतीवर झालेला परिणाम येथें चांगला दृष्टोत्पत्तीस येऊन त्याबरोबरच शिंतो पंथाच्या शुद्धतेचें व निलक्षण साधेपणाचें कौतुक वाटल्यावाचून रहात नाहीं. जपानी लोकांची नैसर्गिक सौंदर्यावद्दल गुणग्राहकता येथें विशेष प्रमाणांत नजरेस येते.

हें शहर इ. स. ७९३ मध्यें क्वाम्मू बादशहानें स्थापन केलें. पुढें ११ शतकें हें त्याच्या राज्याचें मुख्य शहर होतें. या बादशहानें या शहराची केलेली रेखीव मांडणी—लांबी ३॥ मैल रुंदी ३ मैल व आडवे उभे ९, ९ रस्ते—कांहीं प्रमाणांत अद्यापहि कायम आहे. याला साइकिओ म्हणजे पश्चिम राजधानी अशीहि संज्ञा आहे. जपानांतील चार विश्वविद्यालयांपैकीं किओटो येथें एक आहे.

१९२३ सालच्या सप्टेंबर महिन्यांत जपानांत भूकंपाचा भयंकर धक्का बसला व टोकियोसारखीं मोठमोठीं शहरेंहि जमीनदोस्त झाल्यासारखीं झालीं. या भूकंपानंतर मोठी तापाची साथ उद्भवली. जपानची राजधानी अशा रीतीनें नष्ट झाल्यावर पुन्हा ती कोठें प्रस्थापित करावी यासंबंधीं निरनिराळे विचार सुरू झाले. प्राचीन राजधानीचें शहर जें किओटो त्या जागीं नवी राजधानी स्थापावी कीं काय असा एक प्रश्न उपस्थित झाला. पण बहुमत या योजनेच्या विरुद्ध आहे.

**किंकर**—( १ ) कोणी एक राक्षस. विश्वामित्रानें आज्ञा केल्यावरून कल्माषपाद राजाच्या शरीरांत यानें प्रवेश केला होता.

( २ ) लंकेतील ऐशीं सहस्र राक्षसांच्या समुदायविशेषास हें नाव दिलेलें आहे. [वाल्मि. रामा. सुं. का; प्रा. कोश].

**किंकरी**—किंकर ( विलायती किंवा वेडी बाभूळ ). हें झाड मूळचें अमेरिकेंतील असून बहुतेक उष्ण प्रदेशांतहि तें आढळतें. हिंदुस्थानांत व ब्रह्मदेशांत याची लागवड झाली आहे. हिंदुस्थानांत या झाडास विलायती बाभूळ किंवा किंकरी, अथवा कंकरी गुजराथेंत पिशी बाभूळ, गायबाभूळ इत्यादि नांवें आहेत.

या झाडाचीं फुलें सुवासिक असल्यामुळें फ्रान्समध्यें त्याची लागवड बरीच होते. या झाडापासून गोंद व इतर पदार्थ उत्पन्न होतात, तरी गोंदापेक्षा फुलांमुळेंच याला विशेष महत्व आलें आहे. परंतु या झाडाच्या फुलांपासून अत्तर करण्याच्या प्रयत्नास अद्याप विशेष यश आलें नाहीं. कारण यापासून पोमेड तयार करण्यास लागणारी चरबी किंवा गोडें तेल खवट होऊं न देण्याविषयींची अडचण हिंदुस्थानांत उत्पन्न होते. तराई किंवा तिजवळच्याच ठेंगण्या टेंकड्यांत या झाडाची लागवड केल्यास चहा, बुंद किंवा नीळ याच्याबरोबर हेंहि आडपीक हिंदुस्थानांत काढतां येईल. [ वॅटकृत. प्रॉ ]

**किक्ली**—सातारा जिल्हा. हें लहान खेडें वांईच्या आग्नेयीस ६ कोस अंतरावर आहे. येथें एका आवारांत ३।४ जुनीं देवळें आहेत. हें आवार १२० फूट चौरसचौरस आहे. बहुतेक सर्व देवळें महादेवाचींच आहेत. एकांत भैरवाची मूर्ति आहे. देवळाच्या चवुथऱ्यावर पुसट अक्षराचा एक शिलालेख आहे. तो सिंघण देवराजाचा असावा असें वाटतें. कारण तें देऊळ त्यानें बांधलें होतें असें म्हणतात. त्या आवाराच्या एका कोपऱ्यांत एक जुनी विहीर आहे. नव्या देवळांतील मूर्ती औरंगझेबानें फोडल्या असें म्हणतात. मूळच्या देवळाचे दगड विजापूरचा सरदार अफझुलखान यानें वाईस आपला वाडा बांधावयास नेले असें म्हणतात. भैरवाची यात्रा दसऱ्याला भरते. या वेळीं येथील परटाच्या कुलांतील एक पुरुष भैरवाच्या भिंतीवर धडक मारून घेतो. ही चाल या परटाच्या कुळांत वंशपरंपरा आहे असें तेथील लोक सांगतात. बहुतेक देवळें पडकीं आहेत. फक्त एक जें शाबूत आहे, त्यांतील सभामंडपांत छतावरील व मधल्या चारीहि खांबावरील नकशीचें खोदीव काम फारच चांगलें आहे. असें कोरीव काम सातारा जिल्ह्यांतील कोणत्याहि देवळांत सांपडत नाहीं. कृष्णलीला व मारुतीचरित्र यांतील प्रसंग यांत दाखविलेले आहेत. देवळाची मांडणी स्वस्तिकाकार आहे. दगडी खांबाची टिटवी हीं मूर्तीची केलेली आहेत. हीं देवळें व गाव चंदनवंदन किल्ल्याच्या नजीक आहे. [ सातारा ग्या. ].

**किग्गतनाड**.—दक्षिण हिंदुस्थानांतील कुर्ग प्रांताचा दक्षिणेकडील तालुका. या तालुक्याचें क्षेत्रफळ ४२९ चौरस मैल असून याची लोकसंख्या १९११ सालीं ३९,०६७ होती. या तालुक्यात ९८ खेडीं असून पोनापेट हें या तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. या तालुक्याच्या दक्षिणेस ब्रह्मगिरी पर्वताची ओळ पसरली असून या पर्वताचे सुळके या तालुक्यांत गेले आहेत. याच्या पश्चिमभागांत हिरवें गार अरण्य आहे व त्याचप्रमाणें पूर्वेसहि बरेंच मोठें अरण्य आहे. या अरण्यांतून लक्ष्मणतीर्थ नांवाचा एक ओढा वहात जातो.

किंग्जटाउन—आयर्लंड. डब्लिन परगण्यातील बंदर; हें दक्षिण पार्लमेंटरी विभागांत डब्लिन उपसागराच्या आग्नेय टोकावर डब्लिनपासून डब्लिन ॲन्ड साउथ ईस्टर्न रेल्वेनें ६ मैल आग्नेयीस आहे. या शहराची लोकसंख्या ( १९०१ ) १७३७७ होती. हें मोठें बंदर व समुद्रकिनाऱ्यावरील आरोग्यकारक ठिकाण असून इ. स. १८२१ मध्यें चौथा जॉर्ज आयर्लंडमधून परत जातांना येथें उतरला होता म्हणून याचें किंग्ज टॉउन असें नाव पडलें. यापूर्वी या शहरास डनलेरी असें नाव होतें किंग्जटॉउन हें डब्लिन स्टीम पॅकेट कंपनीच्या होलीहेडला जाणाऱ्या मेल आगबोटींचें बंदर व लंडन ॲन्ड नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचें स्टेशन आहे येथून ग्रेट ब्रिटन व दुसऱ्या देशाशीं निर्गत व आयात व्यापार बराच चालतो. येथून गुरें बाहेर देशीं फार जातात, तसेंच धान्य वगैरेहि माल बाहेरून येतो.

येथें समुद्रांत मासे धरण्याचा मोठा धंदा चालतो येथें रॉयल आयरिश, रॉयल सेंट जार्ज व रॉयल ऑलफ्रेड हे तीन क्लब आहेत.

किंग्जलिन—इंग्लंडातील नारफोक परगण्यांतलें बंदर व म्युनिसिपल आणि पार्लमेंटरी बरो. हें मोठ्या औज नदीवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) २०,२०५. येथें जुन्या कोटाचे अवशेष असून १५ व्या शतकांतला दक्षिण-दरवाजा अद्यापि दृष्टीस पडतो. येथें प्रार्थनामंदिरें, नगरभवन, स्टॅनले ग्रंथालय वगैरे महत्वाच्या इमारती आहेत. येथील मासे धरण्याचीं ठिकाणें महत्वाचीं आहेत. दारू गाळण्याचे कारखाने, धान्याच्या चक्क्या, लोखंड व पितळ ओतण्याचे कारखाने शेतकीचीं आउतें, जहाजें वगैरेचे मह त्वाचे कारखाने आहेत. हा बरो कॉ पार्लमेंटांत एक प्रतिनिधि निवडला जातो. याठिकाणीं १ मेयर, ५ आल्डरमेन व १८ सभासद असतात. लिनचा इतिहास सॅक्सन काळापासून सुरू होतो. इंग्लंडच्या राजांनीं वेळोवेळीं लिनला सनदा व हक्क दिलेले आहेत. प्राचीन काळापासून लिनची गणना चांगल्या इंग्लिश बंदरांत होते.

किंग्स्टन—किंग्स्टन हें जमेकाची राजधानी व मुख्य बंदर आहे. याची लोकसंख्या १९११ मध्यें ५७,३७९ होती. हें शहर सर प्रांताच्या आग्नेय किनाऱ्यावर आहे. शहरांत मुख्य मुख्य सरकारी इमारती आहेत. जमेका ज्ञानवर्धक मंडळाचें एक सार्वजनिक ग्रंथसंग्रहालय, पदार्थसंग्रहालय व कलाचित्रसंग्रहमंदिर ( आर्ट गॅलरी ) अशा संस्था आहेत. येथील हवा उष्ण व निरोगी आहे भूकपानें पोर्ट रॉयलचा नाश झाल्यामुळें इ. स. १६९३ मध्यें किंग्स्टन शहर वसविण्यांत आलें. १७०३ व १८०२ सालांत हें अनुक्रमें व्यापारी व राजधानीचें शहर झालें. याचमुळें या शहराची पुष्कळच भरभराटी झाली. इ स. १९०७ मध्यें भूकपानें भयंकर घर्षण या शहरांत झालें होतें.

किचेनर लॉर्ड ( १८५०–१९१६ )—लॉर्ड किचेनर याचें नाव हरबर्ट असें असून याचा जन्म इंग्लंडांत १८५० मध्यें झाला. याचा बापहि एक लष्करी अधिकारी होता. हरबर्ट हा १८७१ त सैन्यांत दुय्यम लेफ्टनंट म्हणून दाखल झाला पुढें १८८३च्या सुमारास ब्रिटिशांच्या देखरेखीखालीं ईजिप्तच्या सैन्याची पुनर्घटना होत असतांना याला तिकडे नेमलें. याठिकाणीं तो पुष्कळ वर्षे राहिला. तेथें त्याला बढती मिळत मिळत तो तेथील इंग्रजी सैन्याचा मुख्य झाला. हें सैन्य महादीचें बंड मोडून खदिवाला मदत करण्यासाठीं ठेवलें होतें इ. स. १८८८ च्या एका लढाईत तो जखमी झाला होता. १८९२ मध्यें त्यानें खेदिवाच्या सैन्याची पुनर्घटना केली व सुदानवर स्वारी करून तेथील राज्यकारभाराची व्यवस्था उत्तम प्रकारची लावली याला सर्व इजिप्शियन ( यांत इंग्रजी सैन्यहि येतें ) सैन्याचा सरदार केलें होतें. यानें १८९६ मध्यें खारटूम येथें महादीचा पूर्ण पराभव केला. यामुळें त्याला खारटूमचा लॉर्ड बनविलें व ३० हजार पौंड बक्षीस दिलें. पुढें १ वर्षानें दक्षिण आफ्रिकेंतील लढायांत याला लार्ड रॉबर्टस याच्या हाताखालीं नेमलें. तिकडील प्रिटोरिया वगैरे लढायांत यानें भाग घेतला व तो १९०२ पर्यंत तेथें राहून परत आला. यावेळीं त्याला ५० हजार पौंड बक्षीस देऊन कांहीं पदव्या दिल्या. यानंतर त्याची नेमणूक हिंदुस्थानांत कमांडर-इन्-चीफ या जागेवर झाली. तो येथें ७ वर्षे होता. येथील सैन्याची त्यानें पुष्कळ दृष्टीनें सुधारणा व पुनर्घटना केली. त्यानें व्हाइसरॉयच्या कौन्सिलांत मिलिटरी मेंबर हा कमांडर-इन-चीफ हाच असावा, म्हणजे सरकारला लष्करी माहिती देण्याचा तो जबाबदार राहील असा हट्ट धरला. या बाबतींत व सैन्यसुधारणेच्या बाबतींत याचें व तत्कालीन व्हाइसरॉय कर्झन यांचें पटेना व स्टेट सेक्रेटरीनें किचनेरचा सल्ला ग्राह्य ठरविला व त्यामुळें कर्झननें राजीनामा दिला ( १९०५ )

लॉ. किचेनर इ. स. १९०९ सालीं इंग्लंडास परत गेला. तेव्हां त्याला फील्डमार्शल आणि भूमध्य समुद्रावरील सैन्य व आरमाराचें मुख्य केलें. तेथून त्यानें साऱ्या साम्राज्यांतील सैन्याची पाहणी करण्याकरितां दौरा काढला. त्यांत त्यानें कांहीं सूचना केल्या पुढें परत आल्यावर त्यानें वरील जागेचा राजीनामा दिला. इ. स. १९११ त याची ईजिप्तमध्यें कॉन्सल जनरल म्हणून नेमणूक झाली. पुढें १९१४ मध्यें महायुद्ध सुरू झालें तेव्हां याला युद्धखात्याचा सेक्रेटरी नेमिलें. त्यावेळीं यानें लष्कराची मांडणी व व्यवस्था उत्तम केली. पुढें रशियावर चढाई करून जात असतां ज्या लढाऊ वेडरजहाजांत हा बसून जात होता, तें ५ जून १९१६ रोजीं जर्मनीनें आपल्या सुरुंग पोटींनें बुडविलें व त्यांत हाहि बुडून मेला. [ स्मिथ-ऑक्स. हिस्टरी ईंडिया. ]

**किच्चौंचा**—संयुक्त प्रांतातील फैजाबाद जिल्ह्याच्या ताडा तहशिलींतील एक गाव. हें गाव टोन्दी नावाच्या एका लहानशा नदीच्या काठीं वसलेलें आहे. येथील लोकसंख्या १९११ सालीं २८९५ इतकी होती. हें गाव चौदाव्या शतकातील मखदुम अशरफ नावाच्या एका साधूकडे व त्याच्या वंशजाकडे होतें. स.१८५६च्या दहाव्या अॅक्टान्वयें या गावचा कारभार चालविण्यात येतो. येथें एक शाळा आहे.

**किट्स सेंट**—सेंट क्रिट्स अथवा सेंट खिस्तोफर हें बेट ब्रिटिश वेस्ट इंडीजपैकीं एक आहे. हें नेव्हिस व अँगिला मिळून लीवार्ड बेटांपैकीं एक इलाखा होतो. हें २३ मैल लांब असून याचें क्षेत्रफळ ६३ चौरस मैल आहे. बेटाला पाण्याचा चांगला पुरवठा असून तें सुपीक व निरोगी आहे. यात साखर, काकवी, रम, मीठ, कॉफी व तंबाखू यांचें उत्पन्न होतें. येथें प्राथमिक शिक्षण सक्तीचें आहे. यात ओल्डरोड व सँडी पॉइंट हीं मुख्य शहरें असून बासेतेरी राजधानी ( लो. सं. १०,००० ) नैर्ऋत्य किनाऱ्यावर आहे स्थानिक कायदेकौन्सिलात सहा सरकारी व सहा राजनियुक्त असे सभासद असतात. कोलंबसास १४९३ त हें बट सापडलें स. १६२३ त येथें ब्रिटिश वसाहत झाली. पाच वर्षांनंतर फ्रेंच व ब्रिटिश या दोघांची मालकी ह्या बेटावर चालू झाली. परंतु स.१७१३ च्या युट्रेक्टच्या तहानें हें बेट ब्रिटिशास मिळालें येथील लोकसंख्या २९७८२ असून बहुतेक निग्रो आहेत.

**किंडत, पो ट जि ल्हा**—उत्तर ब्रह्मदेशांतील अप्पर चिंदविन जिल्ह्याचा मध्यभाग. या भागात किंडत व ट्मू हे दोन पेटे आहेत.

**पे टा.**—अप्पर चिंदविन जिल्ह्यातील एक पेटा. हा पेटा चिंदविन नदीच्या काठीं पूर्वेस श्वेबो व पश्चिमेस गोम या जिल्ह्याच्या दरम्यान वसलेला आहे. या पेटयाचें क्षेत्रफळ १०८८ चौरस मैल आहे स.१९११ मध्यें या पेटयाची लोकवस्ती १५२२५ असून,पेटयात किंडत हें गाव व ३८खेडीं होतीं. हा पटा डोंगराळ असून यात पुष्कळ जंगलें आहेत. स.१९०३-४ सालात २१ चौरस मैल जमीन लागवडींत होती; व तिचा महसूल व शेतसारा मिळून ४२,००० रुपयांचें उत्पन्न होतें.

**श ह र.**—अप्पर चिंदविन जिल्ह्यातील किंडत पेटयाचें मुख्य ठिकाण. हें चिंदविननदीच्या डाव्या तीरावर वसलेलें आहे. या गावाची लोकसंख्या स १९२१ सालीं ३५९२ होती. या शहराच्या आसपास अरण्य आहे. उन्हाळ्यात नदीचें पाणी कमी झालें असता या गावाच्या व नदीच्या मध्यें मैलें वाळवंट पसरतें, तर पावसाळ्यात नदी गावाच्या एका बाजूला अगदीं चिकटते व दुसऱ्या बाजूला तलाव असल्यामुळें त्या ठिकाणीं दलदल होते. अशा तऱ्हेनें हें गाव चांगल्या तऱ्हेनें वसलेलें नाहीं. नदीच्या काठावर देशील लोकांची वस्ती आहे. त्याच्या उत्तरेस पोलिसचौक्या, तुरुंग, लष्कर वगैरे ठिकाणें आहेत पोस्ट ऑफिस व दवाखाना लोकवस्तीच्या भागातच आहे. बर्मी लोकाच्या सत्तेखालीं किंडत गाव हें सरहद्दीवरील महत्वाचें गाव होतें; तरी पण व्यापारीदृष्टया त्याला केंव्हाहि महत्व प्राप्त झालें नाहीं. या गावला म्युनिसिपालिटी देण्यात आलेली नाहीं. रस्ते व इमारती यथातथाच आहेत. गावात एक लहानशी अँग्लो-व्हर्नाक्युलर शाळा आहे.

**किंडर गार्टन.**—या जर्मन शब्दाचा अर्थ 'मुलाचा बाग' असा असून फ्रेडरिक फ्रोबेलनें मुलाच्या शारीरिक, नैतिक व बौद्धिक उन्नतीकरिता एक नवीन खेळण्याची शाळा काढिली निसर्गनिरीक्षणाची आवड व वृक्ष आणि वनस्पती यावरून सादृश्यें काढण्याचा नाद यामुळें बालपणास विशिष्ट महत्व त्यानें दिलें आहे. बालवयास अत्यंत महत्व देणारे पेस्टॅलोझीव कोमोनियस प्रभृतींना माता हीच खरी शिक्षक आहे असें वाटत असे. परंतु गरिबीमुळें मातेला मुलाच्या शिक्षणाकडे लक्ष्य पुरविण्यासहि अवसर नसतो. ह्या अडचण जाणून त्यानीं अर्भकाकरिता एक अनाथगृह काढिलें. अशा शाळाना नेदरलंडमध्यें स्कूल व इंग्लंडमध्यें इनफंट स्कूल असें म्हणतात. फ्रोबेलचें असें मत होतें कीं, मुलाना शारीरिक, नैतिक व बौद्धिक शिक्षण एकदमच दिलें पाहिजे. तसेंच शिक्षणाचें मूळ रहस्य योग्यमार्गदर्शित व स्वयस्फूर्त अशा कृतींत असून बालवयात सर्व व्यवसाय खेळ हाच काय तो असलापाहिजे. खेळ हाच महत्वाचा व्यवसाय मुलाना असला पाहिजे याबद्दल फ्रोबेल व गॉटिंग यांचें मतैक्य होतें 'दि मदर प्ले अँड चिल्ड्रेन्स सॉग्ज' या पुस्तकात फ्रोबेलनें खालील तत्वें ग्रथित केलीं आहेत. पहिलें तत्व सामर्थ्य व समतोलपणाचा नियम हें होय मुलाच्या वाढीचा नियम हें दुसरें तत्व, व फ्रोबेलचें तिसरें तत्व म्हणजे चिन्हाच्या द्वारा शिक्षण देण्याचा नियम हें होय. फ्रोबेलनें जे कांहीं खेळ शोधून काढिले आहेत त्या बहुतेकात साध्या खेळण्याचा समावेश आहे. सहा रंगीत चेंडू, एक लाकडी चेंडू, एक पंचपात्रासारखें भांडें, एक घन, आठ लहान पडतील असा बेताने कापलेला दुसरा एक घन, आठ तिकोन व चौकोन पडतील असा एक रंगीत लाकडाचा तिसरा घन, व नमुने तयार करण्याकरिता वर्तुळें काडी व लाकडी पट्या इतकें सामान ओळीनें मुलाच्या 'बक्षीस' संग्रहात असे. आधुनिक पद्धतींत वाळूवरील रेखाकला, माती व कागद यांचीं चित्रें काढणें, घड्या घालणें यासारख्या गोष्टींना महत्व दिलेलें असतें.

सन१८४० मध्यें रुडोलस्टॅडनजीक ब्लॅकेनबर्ग येथें पहिली किंडरगार्टन शाळा सुरू झाली. परंतु द्रव्याभावीं ती बंद करावी लागली. १८५१ मध्यें फ्रोबेलच्या तत्वानुसार चालणाऱ्या शाळाना बंदी करण्यात येईल असें प्रशियन सरकारनें फर्माविलें. परंतु असल्या संकटास न जुमानता फ्रोबेलचीं तत्वें चांगलीं मूळ धरून टिकलीं होतीं. पुढें १८५४ मध्यें प्रसिद्ध रॉजसनें फ्रोबेलची कल्पना इंग्लंडात प्रचलित केली.

वेरीनेस मारेन् होल्ट्झ् ह्या बाई फ्रोबेलच्या तत्त्वाची पुरस्कर्ती झाला व १८५५ पासून तिनें फ्रेंच सरकारचें लक्ष्य किंडरगार्टनकडे वेधून घतलं प्रसिद्ध मिचेलेट यानें तर असें प्रसिद्ध केलें कीं फ्रोबेलनें मानवी शिक्षणाचा प्रश्न सोडविला

इ स १८७० नंतर फ्रोबेलपद्धतीचा झपाट्यानें प्रसार झाला, व ता आता युरोपांतील सर्व सार्वजनिक शाळांतून सुरू करण्यात आली आहे अमेरिकेंतील संयुक्त संस्थानात ही पद्धति सुधारून सुरू केली आहे इ स १८१४ मध्ये हेन्री बर्नार्ड यानें या पद्धतीची फार वाखाणणी करून 'जर्नल ऑफ एज्युकेशन' मध्यें फार उत्तम अभिप्राय दिला आहे मिस एलिझाबेथ पीबॉडी नावाच्या बोस्टन येथील एका स्त्रीनें एक किंडरगार्टन शाळा काढली. १८७१ त बोस्टन येथें अमेरिकन फ्रोबेल यूनियन नावाची संस्था स्थापन झाली इ स १८८२ मध्यें डब्ल्यू एन हेलमन् यानें स्थापन केलेल्या फ्रोबेल इन्स्टिट्यूट ऑफ नॉर्थ अमेरिका या संस्थेत वरील फ्रोबेल यूनियनचा अन्तर्भाव करण्यात आला बहुतेक किंडरगार्टन शाळा खासगी असल्यामुळें आकडेवारी देणं शक्य नाहीं परंतु अमेरिकेंतील आकडेवारी खाली दिल्याप्रमाणें आहे इ स १८६३ त ७३ शाळा होत्या, १८८२ मध्यें ३४८ शाळा, १८९२ मध्यें १३१० शाळा व १८९८ मध्यें ४३६३ शाळा होत्या त्यापैकीं कमिशनर ऑफ एज्युकेशनकडून २८८४ शाळांचे अहवाल आले, त्यावरून त्या शाळांत ५७६४ शिक्षक व १,४३,७२० मुलें होतीं इ स १९०२–४ साली सार्वजनिक अशा २९९७ किंडरगार्टन शाळा असून त्यात ४५१४ शिक्षक व १,९१,८८२ मुलें होतीं १९०४–५ साली खासगी किंडरगार्टन शाळांतून १,०५,९३२ मुलें होतीं ही अमेरिकेंतील स्थिति झाली जपानकडे पाहिलें तर १९०१ मध्यें २५४ किंडरगार्टन शाळा असून ६७१ शिक्षक व २३६७१ मुलें शिकत होतीं असें दिसून येतें जगातल्या इतर देशांतली किंडरगार्टन पद्धति व तिची प्रगति 'रिपोर्ट ऑफ ए कन्सल्टेटिव्ह कमिटी अपॉन दि स्कूल अटेंडन्स ऑफ चिल्ड्रन बिलो दी एज ऑफ फाईव्ह' या ग्रंथात पाहावयास सापडेल हिंदुस्थानात स्वतंत्र किंडर गार्टन शाळा नाहींत पण प्राथमिक शाळांत किंडर गार्टन पद्धतीचा बराच अवलंब करतात [लिटरेचर–दि किंडरगार्टन इ ]

**किड बेंजामिन**— (१८५८) एक इंग्रज समाजशास्त्रज्ञ यानें "सोशल इव्होल्यूशन" या नावाचें पुस्तक इसवी सन १८९४ साली प्रसिद्ध केलें नैसर्गिक निवड व जीवनार्थ कलह यावर प्रगति अवलंबून असणें अपरिहार्य असून या कल्पनेशीं विरोधी असणाऱ्या मजूरवर्गाच्या अर्धशिक्षित दृष्टीमुळें उद्भूत झालेला समानसत्तावाद टिकणें शक्य नाहीं. तो पाडल्या सरकारी नियमनानें नष्ट होईल उत्पन्नाची वाटणी व कामगार दात हें सरकारी नियमन न येतां सर्व इतर दूर करून टाकण्यानें उत्पन्न होणाऱ्या स्पर्धेत तें दिसून येईल अशी तत्त्व वरील ग्रंथात प्रतिपादन केलें 'प्रिन्सिपल्स ऑफ वेस्टर्न सिव्हिलिझेशन" (पाश्चात्य संस्कृतिलक्षें) या पुस्तकात तो वाटेल तसा भरकटला आहे 'दि कंट्रोल ऑफ दि ट्रॉपिक्स" (उष्णप्रदेशावरील वर्चस्व) यात उष्णकटिबंधातील लोकास थंड प्रदेशातील लोकांनीं राबवावें हा यानें सृष्टीचा नैसर्गिक नियम म्हणून प्रतिपादिला आहे

**कित्तुर**— मुंबई इलाखा बेळगाव जिल्हा उ अ १५ ३५' व पू रे ७४° ५१' संपगावच्या दक्षिणेस सुमारें ७ कोसांवर हें एक जुनाट गाव आहे येथ दर सोमवारी आणि गुरुवारीं बाजार भरतो बाजारात गुरेंहि विकावयास येतात. येथें विणकामाचे व कांचेच्या बांगड्या तयार करण्याचे धंद चालतात येथ बसवाचें देऊळ असून त्यात इ स ११८८ सालचा गोव्याचा राजा जयकेशी तिसरा याच्या वेळचा एक शिलालेख आहे या शिलालेखात कित्तूरच्या एका देवस्थान जमीनीच्या भांडणाचा निकाल (दिव्य करून केलेला) खोदला आहे येथील लोकसंख्या सरासरी ६ हजार आहे, शाळा पोस्ट वगैरे येथें आहे

येथील किल्ला हल्ली पडका आहे तथापि एके काळीं तो फार महत्वाचा होता एकात एक असे दोन किल्ले आहेत बाहेरच्या किल्ल्याचा घेर बेळगावच्या किल्ल्याच्या घेराचा एक चतुर्थांश आहे त्याबाहेर दोन खंदक आहेत बालेकिल्ला बेळगाव किल्ल्याच्या एक दशांश घेराचा असून फार लहान आहे तट दगड व मातीचा आहे इंग्रजानीं कित्तुर राज्य खालसा केल्यानंतर या किल्ल्याची दुर्दशा झाली आतील सर्व इमारती पडून गेल्या आहेत पैकीं तेल्याचें देऊळ साधारण उभें आहे देवळाच्या सभ्यात अनेक मूर्ती कोरलेल्या आहेत त्यातच कित्तूरचा देसाई, त्याच्या दोन बायका व एक दिवाण याच्या मूर्ती आहेत कित्तूर यास गिजगण हळी (कोंटेगाव) असेंहि एक नाव आहे देसायांचा वाडा फार उत्कृष्ट होता त्याचा द्वारमंडप १०० फूट लांब व ३० फूट रुंद असून सागवानी सुंदर खांबांचा होता याचें छत कोरीव कामाचें होतें

वर उल्लेखिलेल्या शिलालेखात कित्तूर या गावाचा उल्लेख प्रथम आलेला आढळतो इ स १५३४ सालीं कित्तूर गाव बेळगावच्या असदखानाचा नोकर युसफखान नावाच्या तुर्क सरदाराला जहागीर होता सोळाव्या शतकाच्या अखेरीस विजापूरकराच्या सैन्याबरोबर हिरेप्पा आणि चिकाप्पा नावाचे दोन लिंगाईत मल्ल अज्ञातवासें गाऊ गावकारी करण्याकरिता या भागात येऊन संपगावास राहिले कित्तूरकर देसायांचे हेच मूळ पुरुष होत या दोघा भावांपैकी हिरेप्पानें रणांगणावर मोठें शौर्य दाखविल्यावरून त्यास हुबळी परगण्याची सरदेशमुखी व समशेर–जंग–बहादुर हा किताब मिळाला या कुळांतील पाचवा देसाई कित्तूर येथें स्थायिक झाला संपगाव व बिडी हीं दोन ठाणींहि

त्याच्याच ताब्यात होतीं सतराव्या शतकाच्या अखेरीस साऱ्या कर्नाटकांत कित्तुरकर मुडी मल्लप्पा देसाई हाच प्रख्यात देसाई होता

सावनूरचा नवाब रौफ खान यानें कित्तुरच्या देसायाशीं जे करारमदार केले त्यावेळीं हाच मुडी मल्लप्पा देसाई होता इ स १७४६ सालीं सावनूरच्या नवाब स इतर मुलुखाबरोबर कित्तुर मराठ्याच्या स्वाधीन करावा लागलें इ स १७७-सालीं हैदरानें खंडणी व इतर नजराणा देण्याच्या कबुलावर हा मुलूख कित्तुरकराकडे ठेवण्याचें कबूल केलें इ स १७५, सालापासून परसगड, संपगाव व बिडि हे परगणे कित्तुरकर देसायाकडे चालत आले होते इ स १७७८ सालीं त्यांनीं गोकाक ताब्यात घेतलें परंतु इ स १७७९ सालीं परशुरामभाऊनीं गोकाक सर केलें व देसायास कैद केलें इ स १७८५ सालीं टिपून कित्तुर, नरगुद, रामदुर्ग वगैरे काबीज करून कित्तुर येथें आपली एक सैन्याची तुकडी ठेवली होती पुढ टिपूचा नाश करण्याकरता मराठे व निजाम हे एकत्र झाले असता त्यांनीं कित्तुर येथ टिपूच्या बुऱ्हाणुद्दीन नावाच्या सरदारावर गणेशपंत बेहेरे व तुकोजी होळकर याच्या हात खालीं २५ हजार सैन्य देऊन पाठविलें त्यांनीं साऱ्या प्रातातून टिपूच्या सैन्यास हाकलून दिलें तथापि कांहीं काळ कित्तूरचा किल्ला टिपूच्या ताब्यात होता पुढें इ स १७८७ सालीं टिपूस कित्तुर व इतर प्रदेश मराठयाच्या हवालीं करावा लागला

तीन वर्षे (इ स १७८६-१७८९) कित्तुर टिपूच्या ताब्यात होत त्यावेळीं तेथील देसायाच्या जहागिरीचा सर्व कारभार टिपूचा सेनापति बद्र-उल-झमा हा पहात असे देसायास फक्त कांहीं रक्कम तनख्यादाखल खर्चास मिळे इ स १७९२ सालीं झालेल्या श्रीरंगपट्टणच्या तहान्वयें पूर्वी टिपूच्या राज्यात मोडणाऱ्या कित्तूरच्या देसायाचा हा प्रदेश पुन्हा मराठया कडे आला तो पुढें दरबारनें परशुरामभाऊ याना सरंजामात लावून दिला भाऊनीं कित्तुरास आपला एक मामलेदार ठेवून त ठाणें धारवाड सुभ्यात दाखल करून तेथील देसायास बेरामीस नेमणूक करून दिली या देसायानीं मराठयाना अतोनात त्रास दिला होता मराठयाचे शत्रू जे हैदर व टिपू त्याना हें मराठयाच्या विरुद्ध नेहमीं मिळत व मराठयाच्या मुलुखात आवडाव करीत असत म्हणून वरील योजना दरबारनें केली इ स १८०० सालीं धोंडया वाघानें मराठयाचे सेनापति धोंडोपंत गोखले याच्या पिछाडीवर कित्तुरजवळ आकस्मिक छापा घातला व धोंडोपंतास ठार मारलें याच धोंडोपंतानीं इ स १७९१ सालीं धोंडया वाघास पराजित केलें होतें कित्तुर परगणा धोंडया वाघाच्या ताब्यात बरेच महिने होता इ स १८०२ सालीं कित्तुरकर मल्लसरजच्या ( १७८२-१८१६ ) देसायाच्या ताब्यात कित्तूर सभोंवतालचा सालीना चार लाख रुपये उत्पन्नाचा मुलूख असून तो सालीना पेशव्यास ६० हजार रुपये खंडणी देत असे याच वर्षी जनरल वेलस्ली श्रीरंगपट्टणाहून पुण्यास बाजीराव पेशव्याच्या मदतीस जात असता या देसायानीं त्यास मदत केली होती त्यामुळें त्याचा सरंजाम कायम राहिला इ स १८०९ सालीं या देसायास पेशव्यानीं पुण्यास बोलाविलें होतें

त्यावेळीं झालेल्या ठरावान्वयें त्याची जहागीर त्याच्याकडे रहावी असें ठरलें व त्यास ' प्रतापराव ' हा किताब देण्यात आला याजबद्दल देसायानीं पेशव्याना सालीना एक लाख, पाच हजार रुपये खंडणी द्यावी असें ठरलें प्रतापराव किताब मिळाला याच्या स्मरणार्थ देसायानीं नदगडाजवळ प्रतापगड नावाचा एक किल्ला बाधला

इ स १८१७ व १८१८ सालीं झालेल्या धामधुमींत कित्तुरकर देसायानीं आपले यजमान जे पेशवे त्याच्या विरुद्ध इंग्लिशास मदत केली बेळगावच्या लढाईत त्यानीं इंग्रजाना लढाऊ सामान देऊन बरीच मदत केली इ. स १८२४ सालीं ह्यात असलेला देसाई निपुत्रिक मरण पावला, त्यावेळीं दत्तकाला जहागिरीची मालकी मिळावी असा प्रजेनें प्रयत्न केला परंतु धारवाडच्या कलेक्टरच्या सागीवरून इंग्रज सरकारनें दत्तकास मानलें नाहीं कलेक्टरच्या मनात सर्व जहागीर जप्त करून दत्तकाची चौकशी चालवावी असें होतें त्याच्या या म्हणण्याचा विचार सरकारात चालू असताच कित्तूरच्या प्रजेनें २३ आक्टोबर १८२४ रोजीं बंड केलें व कलेक्टर थ्याकरे यास कैद केलें परतु इंग्रजानीं वेढा घालून कांहीं दिवसानीं किल्ला घेतला व कित्तुर संस्थान खालसा केलें यावेळीं इंग्रजानीं किल्ल्यात जी लूट केली तींत १६ लक्ष रुपये रोख व ४ लक्षाचें जवाहीर, पुष्कळ घोडे, एक हजार उंट, किल्येक हत्ती, ३६ तोफा, पुष्कळ बंदुका, तरवारी व दारू गोळा वगैरे बराचसा माल होता

इ स १८२९ सालीं सागोलीच्या रायाप्पा पाटलानें देसायाच्या दत्तक मुलास पुढें करून पुन्हा बंड उभारलें परतु लवकरच त्याचाहि मोड करण्यात आला पहिल्या बंडात रायाप्पा सामील होता त्यासाठीं त्याच्या इनाम जमीनी इंग्रजानीं जप्त केल्या होत्या, हें बंडाचें कारण होतें रायाप्पाच्या सोबत्यानींच फितुर होऊन त्याला इंग्रजाच्या स्वाधीन केलें [ ज बॉ ब्रँ रॉ ए सो पु ९, बॉ गव्ह सिले पु १२, विल्क्स-साऊथ इंडि पु २, स्टोक्स-बेळगाव, डफ-हिस्टरी मराठा, खरे-ऐति ले स बेळगाव ग्याझि ]

**किंनगिन, तालुका.**—दक्षिण ब्रह्मदेशात हेंझाडा जिल्ह्यातील एक तालुका याचें क्षेत्रफळ २०८ चौ मै लो स ( १९११ ) ५०३२९ यात एक शहर व ६२ खेडीं आहेत तालुक्याचें मुख्य ठिकाण किंगिन १९०३-०४ सालीं लागवड क्षे फ ६० चौ मै कालीचें उत्पन्न ८२००० रुपये

**किनवत**—हैद्राबाद संस्थानामधील आदिलाबाद जिल्ह्याचा एक तालुका नरसापूर व निर्मल या तालुक्यामधील

उत्तरेकडील खेडीं मिळून हा एक नवीनच तालुका १९०५ मध्यें करण्यांत आला याचें क्षेत्रफळ १२१८ चौ मै असून लो स ( १९११ ) ९४,३०९ आहे तालुक्यांत शहर एकहि नसून खेडीं मात्र २४९ आहेत

**किनवत जंगल**—वऱ्हाड यवतमाळ जिल्ह्यांत हें आहे याचें क्षेत्रफळ १८० चौरस मैल असून तें पुसद तालुक्यांत आग्नेयास आहे हें जंगल बरेंच मोठें आहे [ यव ग्या क्षि ]

**किनु**—उत्तर ब्रह्मदेश श्वेबो जिल्ह्यातील पूर्वेकडील एक पेटा या पेट्याचें क्षेत्रफळ ३०९ चौरस मैल असून १९११ सालीं याची लोकसंख्या ४२,४०४ होती या पेट्यांत ८१ खेडीं आहेत किनु गाव हें या पेट्याचें मुख्य ठिकाण आहे १९०३–४ सालांत या पेट्यांतील ३९ चौरस मैल, जमीन लागवडीखालीं होती, व त्या सालीं जमीनमहसूल व शेत सारा मिळून ७५,९०० रुपये भरला

**किन्नर**—या नावाचा शब्दश अर्थ 'कोणती माणसें' असा होतो या पौराणिक व्यक्तींची शरीररचना विचित्र, तोंड घोड्याचें पण धड माणसाचें अशी याची ठेवण होती हे स्वर्गीय गायक असून कैलासावर कुबेर लोकांत रहात यक्षावरोबर यांचीहि ब्रह्मदेवाच्या अंगठ्यापासून उत्पत्ति झाली असें कांहीं पुराणांत लिहिलें असून दुसऱ्या कांहीं पुराणांतून काश्यपपुत्र असें म्हटलें आहे यांना अश्वमुख, तुरगवक्त्र, मयु अशींहि नावें आहेत

**किन्हई**—हें पंतप्रतिनिधीच्या ताब्यांतलें गाव कोरेगावच्या उत्तरेस ३॥ कोस अंतरावर आहे कोरेगावापासून पंढरपूरकडे जी सडक जाते तिच्यापासून एक फाटा किन्हईकडे जातो तो रस्ता पंतप्रतिनिधींनीं तयार केलेला आहे वसना नदीच्या एका ओहोळाच्या तीरावर हें गाव वसलेलें आहे येथील शेतजमीन चागली असून सभोंवार दाट आमराई आहे याच्या उत्तरेस व वायव्येस उच टेंकड्या आहेत पैकीं एकीवर नदगिरी नावाचा जुना किल्ला आहे ( ३०३७ फूट उंच) याच्या आग्नेयेस दोन लहान टेंकड्या असून त्याच्यावर यमाई देवीचें देऊळ आहे या टेंकडीची उंची ४०० फूट आहे टेंकडीवर जाण्यास पायऱ्या आहेत मंगळवार व शुक्रवार या दिवशीं देवीच्या दर्शनास फार गर्दी असते. महाद्वार पश्चिमाभिमुखी असून वर नगारखाना आहे उत्तरेस एक दीपमाळ आहे देवळाचें बांधणी साधी आहे

ही देवी पंतांची कुलस्वामिनी आहे देवळास तटबंदी केली असून ह्या तटाचे बुरूज २५।३० फूट उंचीचे अस ल्यामुळें हे सा या कोरेगाव तालुक्यांतून दिसतात गावांतील रस्ते रुंद आहेत यांत पंतप्रतिनिधींचा मोठा वाडा आहे एक मराठी शाळा व महादेवाचें देऊळ आहे देवळासमोर नदीस घाट आहे, प्रतिनिधी हे किन्हईचे वंशपरंपरागतचे कुळकर्णी आहेत परशुराम त्र्यंबक हे मूळचे येथलेच रहाणारे हल्लीं हें गाव ठाण्याचें आहे येथील वसूल पाच हजाराचा आहे [सातारा ग्या, प्रति घरा इति]

**किन्हळ**—रत्नागिरी जिल्हा दापोली तालुका दापोली दाभोळ रस्त्यावरील एक हवाशीर खेडेगाव

**किंपुरुषवर्ष**—जबुद्वीपाच्या नऊवर्षसंज्ञक भागांतील एक भाग याच्या चतुःसीमा, उत्तरेस हेमकूट पर्वत दक्षिणेस हिमालय आणि पूर्व पश्चिम दिशाकडे क्षारसमुद्र, याप्रमाणें आहेत. यास हैमवतवर्ष असें नामांतर असून, येथें किनरांची वस्ती असे आग्नीध्रपुत्र किंपुरुष येथील अधिपति होता ( भार भीष्म० अ० ६ )

**किंवमरो**—मध्यप्रांतांत भंडारा जिल्ह्यांत भंडाऱ्या पासून दीड कोसावर वैनगंगा नदातीरीं सुमारें १६०० लोकवस्तीचें हें खेडे आहे गावाजवळील टेंकडीवर एक जुनें देऊळ आहे त्याच्या दरवाजावर पूर्वी एक वाचता न येण्या जोगा एक शिलालेख होता परंतु दुरुस्तीच्या वेळीं गिलावा करतांना तो साफ नाहींसा झाला आहे टेंकडाच्या बाजूस व गावाच्या दक्षिणेस एक लेणवजा महादेवाचें देऊळ आहे देवळांत जाण्याचा रस्ता इतका ठेगणा आहे कीं, माणसास जमतेम सरपटत आत जाता येतें आसपासचे लोक नेहमीं येथें पूजेकरितां येतात [ भंडारा ग्या भ ग अ ]

**किंबर्ले**—दक्षिण अफ्रिकेंतील केप तांतील शहर किंबर्ले हें पश्चिम ग्रीक्वालँडच्या हिऱ्यांच्या व्यापाराचें केंद्रस्थान असून रेल्वेनें केपटाऊनच्या ईशान्येस ६४७ व जोहान्सबर्गच्या नैर्ऋत्येस ३१० मैल आहे इ स १९०४ सालीं येथील लोकसंख्या ३४,३३१ होती हें शहर मॉडर आणि व्हॉल या नद्यांमध्यें असून समुद्रसपाटीपासून ४०१२ फूट उंच आहे बाजारचौकाभोवतीं कोर्ट, पोष्ट–तारखातें याच्या कचे या व नगरभवन आहे डु टॉइट्स पॅन राडवर सार्वजनिक वाचनालय व एक इस्पितळ आहे इ स १८९९– ९०० च्या न्यूटभऱ्या वेढ्यांत पडलेल्या लोकांचें एक स्मारक चौकांत बसविलें आहे सार्वजनिक बगीच्यांत व्हिक्टोरिया राणी व सेसिल ऱ्होड्स याचे पुतळे आहेत

या शहराला हिऱ्याच्या खाणींमुळें मोठें महत्व आलें आहे बाजारचौकापासून किंबर्ले खाण जवळ आहे किंबर्लेच्या पूर्वेस १ मैलावर डॉबीयर्स खाण आहे बिकाय वल्टफॅटीन, डुटाइट्स् पॅन व वेसेलटन या प्रमुख खाणी आहेत बीकन्सफल्ड हें गाव हिऱ्याच्या व्यापारामुळें भरभराटींत आहे. हें शहर १८७० सालीं वसविलें गलें १८७१ सालीं एका शतांत डी बायर्स व कॉलेसबर्ग कोपजे या जागीं हिरे सापडले कॉलेसबर्ग कोपजे खाणीसच वसाहतींचा चिटणीस किंबर्ले याच्या नावावरून किंबर्ले हें नाव मिळालें व त्याच सालीं किंबर्लेच्या व्यवस्थेखालीं सर्व खाणी ब्रिटनच्या संरक्षणाखालीं आल्या ज्या जागीं खोदकामाकरितां तळ पडला, त्या शहराला किंबर्ले म्हणू लागले ज्या शतांत प्रथम हिरे सापडले तें ठाण सरकारनें इ स १८७० सालीं १,००,०००

पौंडाला विकत घेतलें इ.स.१८८० सालीं हें शहर केपकॉलनीस जोडलें गेलें दरसाल सरासरी ४५,००,००० पौंडाचे हिरे येथील खाणींतून निघतात.

१८८५ सालीं केपटौऊन किंबर्ले रेल्वे सुरू झाली. १८९९ सालच्या आंग्लो बोअर युद्धात बोअर लोकांनीं या शहरास वेढा दिला. पण सर जॉन फ्रेंचनें तो १९०० सालीं उठविला. वेढ्यातील लोकात सेसिल –होड्स हा होता. १९०८ सालापासून हें रेल्वेचें मुख्य ठिकाण झालें.

**किमेदि जमीनदार**-हल्लीं गंजमजिल्ह्यामध्यें पर्ले किमेदि, पेद्द किमेदि व चिन्न किमेदि अशा तीन जमीनदारी आहेत. येथील जमानदार एकाच वंशातले नाहित. यांचा वंश फार प्राचीन असून ते आपणास ओरिसाच्या केसरी राजाचे वंशज म्हणवितात. पण याच्याबद्दल विशेषतः पेद्द किमेदि व चिन किमेदि याबद्दल मुळींच माहिती मिळत नाहीं मि सी. एफ. मॅकर्थि यानीं या जमिनदारीबद्दलच्या कागदावरून तयार केलेली पर्ले किमेदि घराण्यातील पुरुषांची यादी पुढें दिली आहे [ द. हिं. घराणीं ]

कपिलदेव (१२२७-१२४५)
|
नरसिंहदेव (१२४५-१२६५)
|
मदनदेव (१२६५-१२९०)
|
नारायणदेव (१२९०-१३०९)
|
आनंददेव (१३०९-१३१७)
|
अनंतरुद्रदेव (१३१७-१३२५)
|
जयरुद्रदेव (१३२५-१३६७)
|
लक्ष्मीनरसिंह भानुदेव (१३६७-१३९२)
|
मधुकर्णदेव (१३९२-१४२३)
|
मृत्युंजय भानुदेव (१४२३-१४५७)

पुढें चालू

|
माधवमदनसुंदर भानुदेव (१४५७-१४९४)
|
चंद्रवेताल भानुदेव (१४९४-१५२७)
|
सुवर्णलिंग भानुदेव (१५२७-१५६६)
|
शिवलिंग नारायणदेव (१५६६-१५९०)
|
सुवर्णकेसरी नारायणदेव (१५९०-१६३०)
|
मुकुंदरुद्र नारायणदेव (१६३०-१६५६)
|
मुकुंददेव (१६५६-१६७४)
|
अनंत पद्मनाभ नारायणदेव (१६७४-१६८६)
|
सर्वज्ञ जगन्नाथ नारायणदेव (१६८६-१७०२)
|
नरसिंहदेव दुसरा (१७०२-१७२९)
|
वीरपद्मनाभ नारायणदेव (१७२९-१७४८)
|
वीरप्रतापरुद्र नारायणदेव (१७४८-१७६६)
|
जगन्नाथ नारायणदेव (दत्तक) (१७६६-१८०६)
|
गौरचंद्र गजपति नारायणदेव (१८०६-१८३९)
|
पुरुषोत्तम गजपति नारायणदेव (१८३९-१८४३)
|
जगन्नाथ गजपति नारायणदेव (१८४३-१८५०)

पुढें चालू
वीरप्रतापरुद्रगजपति नारायणदेव
(१८५०)
|
गौरचंद्र गजपति नारायणदेव
(मृ. १९०५)
श्रीकृष्णचंद्र गजपति नारायणदेव
(विद्यमान)

प र्ल कि मे दि.—हें घराणें प्राचीन कलिंगराज घराण्याचे वंशातील आहे हें वर सांगितलेंच आहे गंगा ते कृष्णा याच्या दरम्यानचा पूर्वेकडील प्रदेश एकेवाळीं (कमजास्ती प्रमाणानें) याच्या ताब्यात होता. या घराण्याचा जो वंशवृक्ष ११ व्या शतकात तयार झाला त्यात याचा वंश उत्तरहिंदुस्थानांतील चंद्रवंशी एका रजपूत राजपुत्रापासून सुरु झाल्याचें दिल आहे या राजपुत्रास गंगेच्या प्रसादानें एक पुत्र झाला, त्यामुळें त्याचें नाव गांगेय ठेविलें आणि याच्या वंशजाना पुढें गंगराजे असें नाव पडलें पुढें या वंशातील एका धाडशी पुरुषानें पश्चिमहिंदुस्थानात गंगवाडी नावाचें राज्य स्थापून त्याची राजधानी कोल्हालपूर ही केली काहीं पिढ्यानंतर कामार्णवदेव नावाच्या राजानें आपलें राज्य आपल्या चुलत्याच्या स्वाधीन करून आपल्या चार भावासह तो मुखलिंगिरीस निघाला. देश जिंकीत जिंकीत तो महेंद्र देशास आला व तेथील वालादित्यराजाचा पराभव करुन त्यानें त्या कलिंगदेशावर आपलें गंगराज्य स्थापिलें. ही गोष्ट आठव्या शतकाच्या प्रारंभीची आहे. या राज्याची राजधानी कलिंगनगर होती. हल्लींचें कलिंगपट्टम् नावाचें बंदर हेंच कलिंगनगर म्हणून पुष्कळजण समजतात, परंतु ती चूक असून हल्लीं हें गाव म्हणजे या गंगवंशातील पर्लकिमेदि या जमीनदाराच्या ताब्यातील वामस्तधारा नदीच्या काठावरील मुखलिंगम् नावाचें लहान खेडें व त्या भोंवतालची जागा होय. कलिंगनगर ही राजधानी पुढें तीन शतकें होती. तेथें त्या काळात मोठमोठ्या, सुंदर व कलाकुसरीच्या इमारती बाधल्या गेल्या; त्यापैकीं हल्लीं तीन जीर्णावस्थेत उभ्या आहेत; पैकीं एक नवव्याव दोन दहाव्या शतकात बाधलेल्या आहेत. याशिवाय, राज्यात दुसरीकडेहि त्यानीं इमारती बाधल्या. या गंग राजानीं जे पराक्रम केले, ऐश्वर्य भोगलें, देव व ब्राह्मणाचा जो सत्कार केला व दानें दिलीं त्याची माहिति, त्या भागात सापडणाऱ्या या राजाच्या शिलालेखावरून व ताम्रपटावरून बरीच समजते. या घराण्यातील राजराजदेव या राजानें इ स.१०७५ मध्यें राजेंद्र चोल व वेंगीराज विमलादित्य याचा पराभव केला आणि किमेदि, कोसल व ओड्रदेश याच्या राजाना जिंकिलें. याचा मुलगा अनंतवर्मा चोड गंगदेव यानें ११ व्या शतकाच्या अखेरीस ओरिसा प्रांत काबीज केला. हाच कलिंगनगर येथील शेवटचा अभिषिक्त

य.

यानंतर राजधानी ओरिसा प्रांतात गेली, यावेळची बहुतेक हकीकत, सर. डब्ल्यू. डब्ल्यू हंटर याच्या अनॉलिसिस् ऑफ ओरिसा या पुस्तकात आढळते. तेथील सर्व राजे गजपती हें उपपद धारण करीत असत व आजहि पर्लकिमेदीचा जमीनदार आपणास गजपति म्हणवीत असतो. बाराव्या शतकात या वंशातील कपिलेंद्रदेव नावाच्या राजानें किमेदि प्रांतावर स्वारी केली पुढें त्याच्या नरसिंह नावाच्या वडील मुलानें भावाच्या भांडणामुळें ओरिसा सोडून किमेदी येथें स्वतंत्र राज्य स्थापिलें.

ही वरील सारी हकीकत दंतकथेच्या आधारानें दिलेली आहे. परंतु किमेदीचें गजपती घराणें ही ओरिसाच्या मुख्य गंगवशाची शाखा आहे याबद्दल, प्रतापरुद्राच्या मुलाच्या खुनानंतर ओरिसा शाखेचें तथलें अस्तित्व नाहींसें झाल्याबद्दल व त राज्य गोविंदविद्याधर या प्रधानानें काबीज करून इ स १५४१ त स्वत. राज्यपद स्वीकारल्यानतर, हें किमेदीचें घराणेंच काय ती गंगवंशाची अवशिष्ट शाखा राहिल्याबद्दलचा काहीं पुरावा आढळतो. या किमेदि घराण्यानें तीनचार शतकें गंजम व विजगापट्टम् या प्रांतावर स्वतंत्रपणें राज्य केलें. पुढें विजयानगरकर व मुसलमान यानीं याना माडलिक बनविलें. यावेळीं त्याच्याकडे जो थोडा प्रांत राहिला तो अत्यंत डोंगराळ असल्यामुळें शत्रूचा उपसर्ग तेथें त्याना झाला नाहीं. पुढें इंग्रजी झाल्यानंतर, या राजानीं व त्या प्रांतातील काहीं जमीनदारानीं इंग्रजाच्या विरुद्ध थोडीशी उचल केली होती. परंतु इंग्रजानीं ती दाबून टाकून व राजाला पदच्युत करुन जवळ जवळ एक शतकपर्यंत तेथील कारभार आपल्या एजन्सीमार्फत चालविला.

श्रीकृष्णचंद्र गजपती नारायणदेव ( गजपती नारायणदेव हें या घराण्याचें बिरुद आहे ) हे हल्लींचे जमीनदार राजे आहेत याचा जन्म ता. २६ एप्रील१८९२ रोजीं झाला. याचे वडील गौरचंद्र हे इ स. १९०५ मध्यें वारले कृष्णचंद्र याचें शिक्षण मद्रासेस झालें संस्थान ६१८ चौरस मैल क्षेत्रफळाचें व सहा लाख रुपये उत्पन्नाचें आहे विद्यमान राजे हे २६ एप्रिल १९१३ रोजीं गादीवर बसले संस्थानात एफ सेकंड ग्रेड कॉलेज (वसतीगृहासह), दोन मुलींच्या शाळा, एक संस्कृत पाठशाळा, एक सराई असून पर्लकिमेदी लाईट रेल्वे आहे. ह्या आगगाडीचा रस्ता गौरचंद्र यानीं बाधला. तो बंगालनागपूर-रेल्वेच्या नौपाडा स्टेशनपासून सुरू होऊन पर्लकिमेदीस संपतो, याला आठ लाख रुपये खर्च आला. या घराण्याचें ब्रीदवाक्य "विश्वास व बळ" असें आहे. महायुद्धात संस्थानानें इंग्रजाना शक्तीप्रमाणें पैशाची मदत केली. विद्यमान राजाना, मल्लविद्या, शिकार व मैदानी खेळ याची आवड आहे. [ रा. नित्यानंद पट्टनाईक, पर्लकिमेदीचे राजवाड्याचे व्यवस्थापक यानीं पाठविलेल्या माहितीवरून ]

**किरगेरी**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. कोडच्या आग्नेयीस सुमारें १४मैलावर तुंगभद्रेच्या वामतीरीं हें एक खेडें असून येथें सुमारें ३०० वर्षांपूर्वी बांधलेलें हनुमानाचें एक देऊळ आहे.

**किरवंत**— 'श्रमवंत' पहा.

**किरवळे**—मुंबई इलाखा. बेळगाव जिल्हा. यास गोरखनाथ डोंगर असें दुसरें नाव आहे. डोंगरावर कानफाट्या साधूचा एक मठ असून तेथें काहीं कानफाटे गोसावी रहातात. डोंगरावर पाण्याचा एक झरा आहे.

**किराईत**—या वनस्पतीस लॅटिनमध्यें अगॅथोटीस चेराइटा; संस्कृतमध्यें किरात, भूनिंब, किराततिक्त, मराठींत काडेचिराईत, किराईत; हिंदींत व गुजराथींत चिरायता इत्यादि नांवें आहेत.

यात दोन जाती आहेत. एक काडेकिराईत व दुसरी पालेकिराईत. किराइताचीं झाडें लहान हात दीड हात उंच असून पानें लहान व लांबट असतात. पालेकिराईत हिंदुस्थानांत बागांतून होते. काडेचिराईत नेपाळकडून कलकत्त्याच्या मार्गानें मुंबईस येते. याची चव फार कडू असते.

उ प यो ग —याचीं वाळलेलीं पानें, फुलें, मुळें व काड्या याच्या अंगीं पौष्टिक, ज्वरनाशक व सारक धर्म आहेत. बोंडें चांगलीं झाल्यावर झाड मुळासकट काढून विक्रीकरितां पाठविनात. नेपाळांतून या झाडाचे गठे कलकत्त्यास जाऊन तेथून सर्व हिंदुस्थानस्थानभर व जगाच्या कित्येक भागांत त्याची रवानगी होते.

आमवात,जीर्णज्वर व सर्व प्रकारच्या ज्वरावर किराईत,सुंठ व डिकेमाली याचा अष्टमांश काढा करून ठेवावा व सकाळीं तिसऱ्या प्रहरीं व सायंकाळीं याप्रमाणें तो तीन वेळ घ्यावा. आम्लपित्तावर किराईत व माका यांचा काढा करून त्यांत मध घालून द्यावा. हरताळाच्या विषावर किराइताचा काढा द्यावा.

**किराकत**—संयुक्त प्रांतांतील जोनपूर जिल्ह्यातील पूर्व भागामधील एक तहशील. या तहशिलीचें क्षेत्रफळ २४३ चौरस मैल असून हींत दर्यापार, बियालसी हे परगणे व चंडवाक, पिसारा, गुझारा हे टप्पे (पेटे) आहेत. लोकसंख्या १९११ सालीं १९०१५८ होती. या तहशिलींत ४५९ खेडीं आहेत. किराकत गाव या तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. इ स.१९०३-४ सालीं या तहशिलींतील जमीनीचा महसूल १,८०,००० असून इतर कर ३६००० रुपये वसूल झाला. या तहशिलीच्या अगदीं मध्यभागातून गोमती नदी वहात जाते. १९०३-४ सालीं या तहशिलींत १६१ चौरस मैल लागवडीखालीं जमीन होती व तीपैकीं ९५ चौरस मैलांना पाणी मिळण्याची सोय केली होती. या तहशिलींत तळीं अगदीं थोडीच आहेत पण विहिरी मात्र जागजागीं आढळतात.

**किरात**—ही एक प्राचीन अशी अनार्य जात होय. ही डोंगराच्या पायथ्याशीं रहात असे. किरात जातीसंबंधीं वैदिक माहिती विभाग ३ पृ. २५८ मध्यें पहा. हल्लींचें टिपरा संस्थान हा पूर्वीचा किरात देश होय असें म्हणतात. आर्यावर्ताच्या नैर्ऋत्येस व ईशान्येस हा प्रदेश असून तेथें या नावाची जाति रहात असे व त्याच्या राजाचें नावहि किरातराज होतें असें बृहत्संहितेंत म्हटलें आहे. विष्णुपुराणात हे लोक भरताच्या पूर्वेस रहात असा पुरावा मिळतो. (विष्णुपुराण ७. ३०). महाभारतात याना जागला बरोबर उल्लेखिलें आहे या लोकाचा मुख्य धंदा पारध हा असे. अर्जुन पाशुपतास्त्र मिळविण्याकरितां तपश्चर्या करीत असता शंकरानीं किरातानें रूप घेऊन त्याच्याशीं लढाई केली होती हें प्रसिद्धच आहे. भारत व भागवत यामध्येंहि किराताचा उल्लेख येतो. इंद्रप्रस्थ मध्य धरून त्याच्या पूर्वेस, पश्चिमेस व उत्तरेस तीन किरात देश होते असें म्हणतात व त्यापैकीं उत्तर किरातात धवलगिरी व चंद्रगिरी अशीं हिमालयाचीं दोन शिखरें येत आणि पूर्वकिरातात त्रिपुरी (टिपरा?) शहर येई असा एके ठिकाणीं उल्लेख आहे [बृ संहि. अ. ९ ११,१४: भागवत स्कं.२, ९, इंडि. अँटि. पु. ५,अर्वा. कोश. प्रा. कोश ]

**किरार**—किराड. एक शेतकरी जात. याची एकंदर लो. सं (१९११) १,५१,०५२ आहे पैकीं मध्यहिंदुस्थानात ८९९२२, वऱ्हाड-मध्यप्रांतात ४७७९३, राजपुतान्यात ११८०४ व संयुक्तप्रांतात १९३३ आहे. किरार व किरात एकच होत असें एक मत आहे. इतर दस्यू जातींबरोबर किरात हे क्रियालोपामुळें व ब्राह्मणाशीं संबंध न ठेवल्यामुळें वृषल किंवा जातिबाह्य झाले असें मनू म्हणतो. (१०. ४३-४४). आर्यांप्रमाणें त्याच्याच मार्गानें नाग, किरात व खश हे हिंदुस्थानात आले. इ. स. च्या पहिल्या शतकात किरात यमुनेपर्यंत आले होते असें दिसतें. त्यानीं नेपाळखोऱ्यात प्राचीनकाळीं वस्ती केली होती अशी नेपाळात आख्यायिका ऐकू येते. नेपाळच्या स्थानिक इतिहासात किरातवंशीय राजाचीं २९ नावें आहेत (अट्किन्सन–हिमालयन गॅ. राईट–नेपाळ). नेपाळ सिक्किम सरहद्दीवरचे किरात मंगोलियन वंशाचे मानतात. पण वर सांगितलेल्या किराताशीं किराराचा कितपत संबंध आहे हें नक्की सागता येत नाहीं.

खोऱ्यात औरंगजेबाच्या वेळेस झाली असावी असें पुष्कळ अंशीं वाटतें. किराड, गुजर व रघुवंशी लोक एकाच वेळेस वसाहतीस आले असावे असें त्यांच्यात एकमेकांचा उष्ट हुक्का चालतो यावरून दिसतें किराड लोक स्वतःला पतित झालेले रजपूत म्हणवितात व यांत कांहीं तरी सत्यांश असावा असें वाटतें. विधवाविवाह सुरु केले म्हणून आपणास नीच स्थिति प्राप्त झाली असें हे सांगतात. किराड शब्दाच्या अनेक व्युत्पत्ती सुचविल्या आहेत. हे नदीच्या काठावरच शेती करीत असल्यामुळें यास हें नाव पडण्याचा संभव आहे. याच्यात उपवर्ग अजून चांगल्या रीतीनें बनले नाहींत. गोलक किराडाचा एक वर्ग सावनेरिया किंवा विदुर या नावानें छिंदवाड्यांत आढळतो धाकड किराड त्यांच्याशीं विवाह करीत नाहींत यांचीं कांहीं नांवें स्थानावरून पडलीं आहेत. व कांहीं धंद्यावरून पडलीं आहेत त्या नावांवरून यांत कुरमी रजपूत वगैरेंचें मिश्रण झालें आहे असें दिसतें

धाकड किरार.—ही जात आपणास क्षत्रीय सोमवंशी म्हणवितें कारण जातींत धारष्ट्रक क्षत्रियास किरार क्षत्रिय असें म्हणतात. धारष्ट्रक शब्दाचा अपभ्रंश धाकड असा झाला. धाकड किरारांत दोन भेद आहेत. दुर्मद व धारष्ट्रक, दुर्मदापासून झाले ते दशेळ किरार धारष्ट्रक ( धाकड ) क्षत्रीय किरार यांचीं उपनावें खालीं लिहिल्याप्रमाणें.—

ससनोदिया, खाडोदेनात, प्रयार, नंदगया, दोलदह्या, भेडोलीया, परिहारन, खुरगर्ये, मेंदोलीया, टेहुरीया, धाटोरिया, रोतवार, कुराने, सोलंकरा, निमोनिया, पुलोलिया, खजुवा, रदनीया, लड्नीया, सिलधरीया, गवइया, डंगरोलीया, धरोलीया, कुननीया, सोजर, मंगलिया, सेडंड्या, मधुरीया, गलद्या, फत्तेपुरिया, नरोटिया, चागोलिया, सेटवा, खुटबोलीया, बासोटीया, उलडीया, लोसिंगनीया, गसोनीया, बदरथीया, रोगर, नगोलीया, बेरवार इ.

जातींत पंचायत आहे. दर गावचे लोक आपापल्या गावची पंचायत करतात. पंचायतीचा अध्यक्ष नसतो. जातीचीं मंदिरें आहेत. रगवनसी ( रघुवंशी ) व बगेले रजपूत हे या जातीच्या सदृश पण भिन्न जाती आहेत. लग्नात सप्तपदी ( भावरी ) कन्यादान वगैरे ब्राह्मणाकडून होतात. लग्नांत वधूवराच्या हातीं कट्यार असते लग्नांत यज्ञोपवीत देतात. यांची मूळ भाषा हिंदी, त्यांत मराठी भाषेचा बराच समावेश झाला आहे. [ उमरावती जिल्ह्यातील पथरोटचे प्रीथीरामसिंग बिसनसिंग किराड यांच्याकडून आलेल्या माहितीवरून ].

लग्नास निघताना नवरामुलगा हातांत कट्यार किंवा आडकित्यासारखें शस्त्र घेतो ही चाल त्याचें क्षत्रिय बीज दाखवितें. लग्नसमारंभात किरार फार खर्च करितात. विधवाविवाहांत यांच्यात मोकळीक आहे. विधवेनें थाकट्या दिराबरोबर किंवा इतर कोणाबरोबर विवाह करावा. नायकोनें व्यभिचार केला किंवा तिचा स्वभाव नवऱ्याशीं जुळला नाही तर काडी मोडतात हे देवीचे विशेष पूजक आहेत. वैशाख ज्येष्ठांत हे नागाची पूजा करतात; लग्नात मयत मालगुजाराची पाटीलदेव म्हणून पूजा करतात व पाटिलकी करणें ही मानाची जागा समजतात.

हे जातिबाह्यास आपल्या जातींत घेत नाहीत. गुजर व रघुवंशी यांच्या हातची पक्की रसई खातात. नागपुरात महाराष्ट्र ब्राह्मणाच्या हातची " कच्ची " रसई खातात.

विजातीय पुरुषाबरोबर व्यभिचार करणारणीस अजीबात जातीबाहेर काढतात. मध्यप्रांतीय किरारांची उंची चांगली असते, दिसण्यात ते सुंदर व गोरे दिसतात. पुरुष डोकीस पगोटे घालतात. बायका कासोटा न घालता उत्तर हिंदुस्थानातल्याप्रमाणें पोशाख करतात स्त्रियांनीं वडील दिराचें नाव घेऊं नये किंवा त्याच्या कपड्यास स्पर्शंहि करूं नये व त्याचें उष्टेंहि काढूं नये अशी समजूत आहे. नागपुरास हे चांगले शेतकरी आहेत अशी ख्याती आहे. पण उत्तरेकडील जिल्ह्यात यांची तशी ख्याती नाहीं हे बागाईत व उंसाची शेती करतात. [ क्रूक, रसेल व हिरालाल; से. रि. ].

**किरीटी**—(१) पंडुपुत्र अर्जुनाच्या दहा नावांपैकीं एक नाव [ म भा.]

(२) अनागोंदी येथें राज्य करणारा व इ. स. १५६४ मध्यें हयात असणारा आणि ज्यानें पंढरपुरचा विठोबा अनागोंदीस नेला व जो परत भानुदासानें(एकनाथ,चा पणजा) परत आणिला अशी कथा आहे असा जो रामराजा त्याला किरीटी हें टोपण नाव होतें. त्याचें सबंध नाव किरीटी रामराज हें होतें [ ज्ञ कोश ]. परंतु ही गोष्ट शंकास्पद दिसतें कारण त्यावेळीं भानुदास जिवंत नव्हता. हा किरीटी रामराजा म्हणजेच विजयानगरचा शेवटचा रामराज खालून होय ( विजयानगर पहा ).

(३) त्रावणकोरचा किरीटी रामराजा हा टिपूच्या वेळीं हयात होता. याचा पक्ष घेऊन इंग्रजानीं टिपूवर स्वारी केली होती ( डफ ).

**किरौली**—संयुक्तप्रांतातील आग्रा जिल्ह्याच्या वायव्यभागातील एक तहशील. या तहशिलीचें क्षेत्रफळ २७२ चौरस मैल आहे. १९११ मध्यें या तहशिलीची लोकसंख्या १,१०,१८२ होती. या तहशिलींत फत्तेपूरशिक्री व अच्छनेरा हीं मोठीं गावें असून १६८ खेडीं आहेत. तहशिलीच्या दक्षिण सरहद्दीवरून उत्तमगन नदी वहाते. या तहशीलीच्या मध्यभागातून खारी नदी वहात जाते. या तहशिलीचा पूर्वेकडील भाग सपाट असून पश्चिमभाग डोंगराळ आहे. या भागातील जी महत्त्वाची डोंगराची ओळ तिच्यावर फत्तेपूरशिक्री वसलेलें आहे. या ओळीला समांतर अशा लहान लहान ओळी खारी नदीच्या उत्तरेस पसरलेल्या आहेत. या सर्व ओळींमधून तांबड्या वाळूचे खडक सापडतात. १९०३–४ मध्यें या तहशिलींत २१० चौरस मैल

मारा शेतीला उपयुक्त अशी होती तीपैकीं ६, चौरस मैल जमीनीला पाणी मिळण्याची सोय झालेली होती.

**किर्घी**—तुर्क राष्ट्र जातीच्या एका दूरवर पसरलेल्या *मोठ्या समूहाला किर्घी म्हणतात.* यांच्या कारा-किर्घी (काळे) व कझाक किर्घी (रशियाच्या माळरानांत रहाणारे) अशा दोन शाखा आहेत. हे पश्चिमेकडे कुलजा पासून व्होल्गा नदीच्या खालच्या भागापर्यंत व दक्षिणेकडे आव नदीपासून पामीर व तुर्कोमन प्रदेशापर्यंत पसरलेले आहेत. मानववंशशास्त्रावरून त्यांचा मंगोल महावंशाशीं संबंध होता असें दिसतें व भाषेवरून त्यांचा तार्तर राष्ट्रजातीशीं संबंध असावा असें दिसतें. शरीरानें हे मध्यम बांध्याचे व *मजबूत असून त्यांचे* केंस काळे व लांब, नाक व तोंड पसरट व लहान असतें. त्यांच्या गालाचीं हाडें वर आलेलीं असून त्यांचे हातपाय फार लहान असतात. त्यांचा वर्ण पिंगट व क्वचित पिवळसर असतो. या त्यांच्या गुणधर्मांवरून ते मंगोल महावंशाचे असावे असें दिसतें. त्यांच्या भाषेंत मंगोलियन इराणी व अरबी शब्द बरेच असून इतर भाषेंतीलहि शब्द आढळतात.

का रा कि र्घी —(कारा म्हणजे काळा) हें नांव *रश लोकांच्या तंबूच्या रंगावरून* महावंशांतील सर्व लोकांत पडलेलें आहे हेच विशेष शुद्ध बीजाचे असून किर्घीज हें राष्ट्रीय नांव वास्तविकरीत्या यानाच लावण्यात येतें. दंतकथेंत वर्णिलेल्या किर्घी नामक सरदाराच्या नावावरून ह्या जातीचें हें नाव पडलें असावें असें म्हणतात. जाफेथचा वंशज ओघझखान यापासून झालेल्या दंतकथेंतील किर्घी सरदाराच्या नावावरून या राष्ट्रजातीचें नाव पडलेलें आहे.

*कारा किर्घी* लोक भटकणारे असून ढोरांची पैदास हा यांचा मुख्य धंदा आहे. गहूं, जव वगैरे धान्यें ते पिकवितात. येथील लोक चीन, तुर्कस्तान, रशिया वगैरे देशांतील व्यापाऱ्यांना गुरें देऊन त्यांच्या मोबदला इतर जिनस त्यांच्यापासून खरेदी करतात.

*कारा किर्घी लोकांतील राजांना मनप म्हणतात,* व *त्यांची सत्ता अमर्याद अशी असते. प्रजेपैकीं* कोणालाहि विकण्याचा अगर ठार मारण्याचाहि त्यांना अधिकार असतो. त्यांचीं धार्मिक मतें व विधी कझाक लोकांहून मुळींच भिन्न नाहींत म्हटलें तरी चालेल.

क झा क.—रशियाच्या माळरानांत रहाणाऱ्या किर्घी लोकांना बहुधा कझाक असें म्हणतात. हे लोक चांगले घोडेस्वार असून लुटारूपणाचा धंदा करीत व यावरूनच पुढें त्यांच्यासारख्या इतर लुटारू लोकांनाहि कझाक असें म्हणत असत. दक्षिण रशियांत अद्यापहि हा शब्द "कोसॅक" या रूपांत प्रचलित आहे. कोसॅक व कझाक यांच्यामधील भिन्नत्व स्पष्ट करण्याकरितां १८ व्या शतकापासून रशियन लोक किर्घी-कझाक या संयुक्त नावाचा उपयोग करूं लागले.

कझाक प्रामाणिक, विश्वासू परंतु आळशी व रित (दुर्मुखलेले) असतात. हे भटकणारे असून तंबूंत रहातात. घोड्यावर बसणें हा त्यांचा करमणुकीचा खेळ असून ते घोड्यावर बसण्यांत पटाईत असतात. ते काटक व दीर्घायुषी आहेत तथापि त्यांची रहाणी घाणेरडी आहे.

कझाक हे सुनी पंथाचे मुसुलमान असून फारसे धर्मवेडे नाहींत. त्यांनीं मुसुलमानी धर्म १६ व्या शतकांत स्वीकारला परंतु त्यांच्यापैकीं फारच थोडे मक्केला जाऊन आलेले आहेत. त्याऐवजीं ते पूर्वतुर्कस्तानांतील साधुसंतांच्या समाधींच्या (थडग्यांच्या) दर्शनास जातात. त्यांच्यामध्यें शिक्षणाचा इतका अभाव आहे कीं, ज्याला नुसतें लिहावयास येतें त्याला विद्वान् समजतात व मूळ कुराण वाचावयास येत असलें तर तो महापंडितच बनतो. तथापि गायनाची व कवितेची त्यांना मुळचीच गोडी आहे. त्यांचा धंदा गुरढोरें पाळण्याचा असून कातडें कमावणें, लोकर कातणें व रंग देणें हीं कामें सुद्धां ते करतात. रशियाच्या अमलाखालीं गेल्यापासून त्यांच्या बेकायदा वर्तनाला आळा बसला आहे.

**किर्चाफ, गुस्टाव राबर्ट** (१८२४–१८८७)—या जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रवेत्त्याचा जन्म प्रशियांतील कोनिग्स्बर्ग गांवीं झाला व तेथील विश्वविद्यालयांतील शिक्षण घेऊन त्यानें सन १८४७ सालीं पीएच्. डी ची पदवी मिळविली. सन १८५० सालीं तो ब्रेस्ला येथें पदार्थविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर झाला पुढें त्यानें हायडलबर्ग आणि बर्लिन येथें प्रोफेसराचें काम केलें तो बर्लिन येथें प्रोफेसराच्या जागेवर असतांनाच १८८७ त वारला. किर्चाफ यानें जे शोध लावले ते विशेषतः प्रयोगावरून लावलेले नसून गणिताच्याच आधारावर लावले. त्यानें गणितात्मक पदार्थविज्ञानशास्त्रांत पुष्कळच भर घातली आहे. निरनिराळ्या आकाराच्या वाहकांतून कोणकोणत्या प्रमाणांत विद्युत् जाते याविषयीं त्यानें अनेक नियम बसविले आहेत. ओहमच्या नियमाविषयीं त्यानें बरीच नवीन माहिती उपलब्ध केली. सामुद्रिक तारायंत्र आणि चुंबकत्व यांच्या विषयींहि पुष्कळ नवीन माहिती त्यानें उपलब्ध केली. लोहांतून उष्णतावहन, स्फटिकांतून होणारें वक्रीभवन आणि परावर्तन, द्रावणासंबंधानें गत्युष्णात्मक ज्ञान इत्यादि विषयावर त्यानें नवीन माहिती उपलब्ध केली. विसर्जनासंबंधानें त्यानें जें काम केलें आहे त्यायोगानें त्याचें नांव जास्त प्रसिद्धीस आलें आहे. विसर्जनाकरितां गणित करीत असतांना त्यानें प्रकाशपृथक्करणशास्त्रांतील एक फार महत्त्वाचा शोध लावला. सूर्य व इतर तारे यांच्या प्रकाशाच्या पृथक्करणाच्या योगानें त्या तेजस्वी ज्योतींत पृथ्वीवरील कोणकोणतीं द्रव्यें असतात यासंबंधीं ज्ञान उपलब्ध करून देणारें साधन त्यानें तयार केलें. या दिशेनें दुसऱ्यांनीं त्याच्या पूर्वी कांहीं कार्य केलें होतें. परंतु त्या झालेल्या कार्यासंबंधानें त्याला ज्ञान नसल्याकारणानें

त्यानें हें सर्व ज्ञान स्वसामर्थ्यावर उपलब्ध केलें व या योगानें त्याची बुद्धिमत्ता उत्तम प्रकारें दिसून आली.

**किर्मीर**—हा एक राक्षस असून तो बकासुराचा भाऊ होता. हा वैत्रकीय नावाच्या ( वेताच्या ) वनात रहात असे. पांडव हस्तिनापुराहून निघून काम्यकवनात आले असता आपल्या भ्रात्यास भीमसेनानें मारलें म्हणून त्याचा सूड उगविण्याकरिता हा त्या वनात आला, व त्यानें पांडवाचा मार्ग चोहोंकडून रोखून धरला त्यावेळीं भीमसेनाशीं याचें घोर युद्ध होऊन त्यात हा भीमाच्या हातून मरण पावला [ महाभा. वन. अ. ११ ]

**किर्लोस्कर**, बळवंत पांडुरंग उर्फ अण्णासाहेब—याचा जन्म सन १८४३ त मार्चच्या ३१ तारखेस धारवाड जिल्ह्यातील गुर्लेसूर येथें झाला. लहानपणींच हे हनुमानजयंतीसारख्या उत्सवाच्या वेळीं खेळगडी जमवून नाटकें करीत आण्णाचें बारा वर्षांपर्यंतचें शिक्षण मराठी व कानडी भाषेतून घरींच करून घेण्यात आलें होतें. त्यानंतर इंग्रजी दोन इयत्ता कोल्हापुरास पूर्ण झाल्या. चौदाव्या वर्षी त्याचा विवाह झाला व पुढील अभ्यास त्यांनीं धारवाडास केला व तेथें मुलकी परीक्षा दिली.

कविता करण्याचा नाद त्याना लहानपणापासून जडला. अण्णाचे वडील उत्तम संस्कृतज्ञ असल्यानें अण्णानीं त्याजवळ संस्कृत रघुवंश व शाकुंतल वाचलें होतें. हरिदासास कथेला उपयोगी अशीं पदें ते करून देत.

इ. स १८६३ मध्यें त्याच्या आजोबानीं त्याना पुण्यास विद्याभ्यासास पाठविलें पुण्यास अण्णा विश्रामबागेतील शाळेंत जात असत पण या वेळीं त्यानां स्वच्छंदानें रहाण्याची संवय होऊन ते नाटकें पाहू लागले व नाटकमंडळ्याना पदें करून देऊं लागले, अशा पदापैकीं " समुद्रमंथन " " विक्रमचरित्र " हीं पदें आहेत. अभ्यास सोडून व घरच्या मंडळींना थाप देऊन त्यानीं पुण्यास आपली एक नाटककंपनी उभारण्याचा उद्योग चालविला व त्याप्रीत्यर्थ जवळचे दागिने विकून व कर्ज काढून काहीं पैसा उभा केला. त्याच्या मंडळींत काहीं मोठीं घरंदाज चागलीं मुलें होतीं. तेव्हा पहिला प्रयोग पुण्यास न करता नगरास करण्याचें ठरवून त्याप्रमाणें तेथें " विक्रमचरित्र " " बाजीराव याचा फार्स" वगैरे खेळ केले. त्याच्या कंपनीचें नाव " भरतशास्त्रोत्तेजक" असें होतें. पुढें सारी मंडळी फुटली व अण्णानाहि घरच्या माणसाचा दपटशा आला, तेव्हा ते गुर्लेसुरास परत गेले. ही गोष्ट १८६६ सालीं म्हणजे त्याच्या २३ व्या वर्षीं घडली.

घरीं बसल्या बसल्या त्यानीं " शिवाजी " वर १०० आर्या रचून त्या " दक्षिणाप्राइझ कमीटी "कडे परीक्षणार्थ ...तून दिल्या. कमीटीचा त्यावर उत्तम अभिप्राय मात्र ...ला, बक्षिस लाभलें नाहीं.

यापुढें अण्णा धारवाडास वकीलीच्या अभ्यासाकरिता राहिले, पण तीहि परिक्षा हुकली. तेव्हा बेळगावास एका इंग्रजी शाळेंत शिक्षकाची जागा त्यानीं पतकरली पण त्याच्या नाटकी व्यवसायामुळें तें काम त्याच्या हातून योग्य प्रकारें पार पडेना तथापि आठ वर्षे त्यानीं बेळगावास काढलीं. त्या अवधींत त्यानीं नाट्याभ्यासात बरीच प्रगति केली १८७३ सालीं त्यानीं ' श्री शांकरदिग्विजय " नावाचें शंकराचार्यांवर एक गद्य नाटक लिहिलें

शाळेच्या नोकरीला कंटाळून, त्यानीं पोलीसखात्यात जमादारीचा नोकरी धरली, पण लवकरच तीहि सोडून रेव्हेन्यू कमिशनरच्या ऑफिसात ते गेले या ऑफिसात असता १८८० मध्यें ते फिरतीवरोवर पुण्यास आले व तेथें त्याना पारशी कंपनीचें उर्दू नाटक पहाण्यास मिळालें त्यातील ऑपेरापद्धतीचें नृत्य, गायन, अभिनय, देखावे वगैरे पाहून आपल्या भाषेंत असेंच एक नाटक बटवावें असें त्याच्या मनानें घेतलें व त्याप्रमाणें त्यानीं शाकुंतलाचें मराठी भाषातर करण्यास सुरुवात केली याच सुमारास पुढें प्रसिद्धीस आलेली मोरोबा वाघोलीकर, बाळकोबा नाटेकर, नाना शेवडे यासारखी मंडळी त्यानीं आपल्यात ओढली व शाकुंतल नाटकाची चार अंकी रंगीत तालिम १३ आक्टोबर १८८० या मुहूर्तावर केली. लवकरच हा प्रयोग नाटकगृहात झाला व उत्पन्नहि चागलें आलें सुरुवातीला यश आलेलें पाहून आण्णानीं सर्व शाकुंतलाचें पूर्ण भाषातर करून संपूर्ण नाटकाची तालीम करून दाखविली.

ऑफीसच्या दौऱ्यावर ज्या वेळीं ते पुण्यास येत त्या वेळीं तेथें या नाटकाचे जाहीर प्रयोग होत पुढें त्यानीं केवळ नाटकाकरिताच म्हणून सहा महिन्याची रजा घेतली, व " संगीत सौभद्र " हें नाटक बसविलें. अण्णाची कंपनी इंदूर, देवास वगैरे ठिकाणीं फिरली. होळकर सरकारनें तिला चागला आश्रय दिला. त्यानीं पुन्हा लेखणी हातात धरून " रामराज्यवियोग " हें नाटक रंगविण्यास सुरुवात केली ( १८८४ ) पण दुर्दैवानें हें सर्वोत्कृष्ट नाटक त्याना पुरें करता आलें नाहीं.

रेव्हेन्यू कमिशनरच्या ऑफीसातून आपली बदली करून घेऊन ते इंदूर सरकारचे कायम नोकर बनले, पण तेथें फार दिवस नोकरी करण्याचें त्याच्या कपाळीं नव्हतें. आपल्या कंपनीला सुस्थिति आणून देण्याच्या कामात त्यांना बरेच श्रम पडून ते आजारी झाले तेव्हा विश्रांतीकरिता मंडळींना रजा देऊन व आपणहि रजा घेऊन ते गुर्लेसुराला परत गेले. तेथें त्याची प्रकृति अधिकच क्षीण होत जाऊन ता २ नोव्हेंबर १८८५ रोजीं त्याचा अंत झाला

अण्णाचा स्वभाव दिलदार व मनमिळाऊ असे ते फारच थट्टेखोर असत असें म्हणतात. त्याना पाठीमागें बायकोशिवाय कोणी नव्हतें. ती नुकतीच ( १९२१ ) मृत्यु पावली. [मासिक मनोरंजन सप्टेंबर १९२२, मराठी रंगभूमि].

या चरित्रनायकाची महती कोणती असा प्रश्न विचारणारा महाराष्ट्रीय आज आढळणार नाहीं अण्णाची महाराष्ट्र नाट्य सृष्टींतील कृति पुढें आहेच महाराष्ट्रनाट्याला मोहक व उच्च स्वरूप देणाऱ्यात अण्णाचा दर्जा निःसंशय फार वरचा लागेल. वत्सलाहरण, सुरतसुधन्वा, वगैरेंसारखीं ललितस्वरूपी नाटकें १८८० च्या पूर्वी होत, त्यात मधुर गायन, अभिनय, शृंगार यांचा पूर्ण अभाव असून रंगभूमीवर दोनर्तन तास धागडधिंगा घालण्यापर्यंकडे व असंस्कृत मनाची निकृष्ट प्रकारची करमणूक करण्यापेक्षा त्यांचा जास्त उपयोग नसे कला या दृष्टीनें पाहता तीं गचाळ म्हणून टाकावीं लाग-तील यात शंका नाहीं तेव्हा महाराष्ट्रनाट्यसुंदरीला गाव टळवणा सोडावयाला लावून अण्णांनीं तिला उत्तम प्रकारें नटविली त्यांचें पहिलें शाकुंतल नाटक भाषांतरित असलें तरी भाषा, पद व अभिनय यांनीं त्या वेळच्या प्रेक्षकवर्गास इतकें मोहित केलें कीं,नाटकगृहाकडे झुंडीच्याझुंडी रळू लागल्या "सौभद्र" नाटक स्वतंत्र असून त्य दृष्टीनें पहाता त्याचा दर्जा फार वर लागेल त्यातील पदें इतकीं लोकप्रिय झालीं कीं, ज्याच्या त्याच्या तोंडीं, किंबहुना कर्थतून हि तीं ऐकूं येऊं लागलीं भाऊराव, मोरोबा, नाटेकर यांच्यासारखीं एकावर एक नट पात्र रंगभूमीवर आलीं शिवाय "च सुंदरि करु कोपा' यासारखीं कानडी चालीवर रचलेलीं पदें तर प्रेक्षकांचीं अंतःकरणें धरारून सोडीत अण्णांचें तिसरें नाटक "संगीत रामराज्यवियोग अंक १" हें होय हेंहि सौभद्राप्रमाणेंच स्वतंत्र पौराणिक नाटक असून त्यांतील अभिनय करावयास फार कठिण आहे मंथरेचा नट कै भाऊरावासारखा असल्यावाचून नाटकाला रंग चढणार नाहीं असें भाऊरावांचें उर्फ भावड्याचें काम पाहिलेल्या नाट्यप्रेमींचें मत आहे हें नाटक अपूर्णआहे अण्णा आपल्या मंडळींत नटाचें कामहि करीत शाकुंतलमधील त्यांचें शार्ङ्ग रवाचें काम इतकें प्रेक्षणीय असें कीं, डॉ किल्हॉर्न साहेब सुद्धा एक वेळीं तें पाहून खुष झाले होते एकदा शकु-तलेस ( भावड्यास ) ' भीता वेपते " करण्यासाठीं शार्ङ्गरवानें ( अण्णांनीं ) रंगभूमीवरच काठी मारली होती बहुधा अण्णा मुख्य पात्रांचीं कामें स्वतःकडे घेत नसत अण्णांनीं नाटककंपनीची रहाणी भिकार न ठेवता एखाद्या संस्थानाप्रमाणें तिचा खर्च चालविला तीच पद्धत हल्लीं मोठमोठ्या कंपनींतून दृष्टीस पडते याप्रमाणें अण्णा किर्लोस्कर म्हणजे आधुनिक महाराष्ट्रीय नाट्याचें जनक म्हणता येतील अण्णा किर्लोस्कराचें एक सुंदर चरित्र रा मुजुमदार यांनीं लिहिलें आहे अण्णांची किर्लोस्कर कंपनी १९१३ सालापर्यंत विशेषतः रा राजहंस ( बालगंधर्व ) यांच्या अस्तित्वामुळें महाराष्ट्रात पहिल्या दर्जाची नाटककंपनी म्हणून चालली होती रा मुजुमदार यांकडे त्याचें बरेंच श्रेय येतें. पण पुढ कंपनी फुटून तिच्या अनेक शाखा झाल्या तरी रा मुजुमदारांनी अद्यापि मूळ किर्लोस्कर कंपनी चालविली आहे पुणें येथील किर्लोस्कर थीएटर हें अण्णांचें स्मारकच आहे

**किलकिल यवन**—यांना दुसरें नाव कैकिल यवन असेंहि आहे. मध्यकालीन युगात हिंदुस्थानात यवनाचें एक राज्य होतें भाऊ दाजींच्या मतें अजिंठ्याच्या लेण्याच्या आसपास हें राज्य असावें ओरिसातून या यवन राजाना ५ व्या शतकात केसरी घराण्यानें हाकून दिल्यावर तें आंध्रदेशात आले व ६ व्या शतकात त्यांनीं वाकाटकाचें राज्य घेऊन तेथें ( मध्यप्रातात ) आपलें राज्य स्थापन केलें ( ५७० ) तिकडे आंध्रदेशात तर हे यवन लोक इ स ९६३ पर्यंत म्हणजे चारशें वर्षे राज्य करीत होते त्यावेळीं त्यांच्या राज्यात बौद्धधर्म प्रबल होता हे यवन म्हणजे आयोनियन ग्रीक होत हे कोंकणात ९८० च्या सुमा-रास आले असावेत हे इ स पू नवव्या शतकात प्रथमत सिंधू नदाकडून हिंदुस्थानात घुसले ओरिसातील या राजांनीं जैनधर्माचा स्वीकार केला होता एकंदरींत मध्यप्रात व आंध्र-देश यावर राज्य करणाऱ्या यवन घराण्याचा उत्कर्ष इ स ५७५ ते ९०० पर्यंत चालू असून त्याच्या सत्तेचा कळस ७८२ च्या वेळीं झाला होता तुळुव व खालिमपूर येथील लेखात याचा उल्लेख आहे हें यवन राज्य कनोजच्या साम्रा-ज्याचें मांडलिक होतें भागवतात ( स्क १२ अ १ ), व विष्णुपुराणात ( भाग ४ अ २४ ) या कैंकिल यवनाचा उल्लेख स्पष्ट आहे परंतु त्यातील वंशावळ व अजिंठ्याच्या लेण्यातील शिलालेखात आलेली या यवनाची वंशावळ यात बराच फरक आहे मध्यप्रांतातील हे यवन राजे आठ असून ते धर्मानें बौद्ध होते त्यांनीं धर्म बदलला व कांहीं शतकानीं भाषाहि बदलली. [ रा ए सो ज मुं पु कनिंगहॅम हंटर, स्मिथ, ओरिसा, अ कोश, म भारत ]

**किल सैफुल्ल**—बलुचिस्तानमधील झोब जिल्ह्याच्या अप्पर झहाब पोटजिल्ह्याची एक तहशील ही तहशील झहोब नदीच्या खोऱ्याच्या मध्यभागीं वसलेली आहे या तहशिलींत काकर खोरासान पर्वताच्या तोब काकर रांगेचा कांहीं भाग पसरलेला आहे या तहशिलीचें क्षेत्रफळ २३९८ चौरस मैल व लोकसंख्या १९११ सालीं १७८२० होती १९०३-४ च्या दरम्यान या तहशिलींतील जमीनींचा महसूल ४४००० होता या तहशिलीचें मुख्य ठिकाणाचें किल सैफुल्ल हें गाव असून या तहशिलीत ६१० खेडीं आहेत यातील बरेच लोक सफर खेल काकर या जातीचे असून त्याचा धंदा शेतकीचा व मेंढपाळीचा आहे झहोबमधील जोगीझाई नावाचें प्राचीन राजघराणें या तह शिलीत आहे. या तहशिलींत कोळशाच्या खाणी असाव्या असा भूगर्भशास्त्रवेत्त्याचा तर्क आहे कोळ्याच्या कातड्याचा व्यापार येथें चालतो

**किल सोभ सिंघ**-पंजाबमधील सियालकोट जिल्ह्याच्य पस्रूर तहशिलींतील एक शहर हें शहर डेग नदीच्या तीरावर

वसलेलें आहे. १८ व्या शतकांत भाग सिंघ अहलुवालिया या शीख सरदारानें हें गाव वसविलें, व या ठिकाणीं किल्ला बांधून त्याला सोभासिंग या आपल्या मुलाचें नाव दिलें. या गावाची लोकसंख्या १९०१ मध्यें ३३३८ होती. या गावांत काश्मीरी विणकऱ्यांची बरीच वस्ती असून ते पश्मीशाली विणतात. पांढऱ्या धातूंची भांडींहि येथें चांगलीं तयार होत असत. पण हल्लीं हा धंदा व शाली विणण्याचा धंदा हे दोन्हींहि डबघाईस आलेले आहेत. १८६७ मध्यें या गावाला म्युनिसिपालिटी देण्यांत आली. म्युनिसिपालिटीचें उत्पन्न १९०३–४ सालांत ४४०० रुपये होतें व खर्च ३७०० रुपये होता. येथील जिल्हाबोर्डातर्फे एक व्हर्नाक्युलर मिडल स्कूल स्थापन झालेलें आहे.

**किलार्ने**—हें आयर्लंडच्या केरी परगण्याचें बाजारचें शहर पूर्व पार्लमेंटरी विभागांत डब्लिनपासून नैर्ऋत्येस सुमारें १८५ मैलावर ग्रेट सदर्न अँड वेस्टर्न रेल्वेवर आहे या शहराची लोकसंख्या (१९०१) ५६५६ होती. या शहराजवळील देखावा फार मनोरम असल्यामुळें येथें प्रवासी लोक पुष्कळ येतात. येथें रोमन कॅथोलिक प्रार्थनामंदिर व बिशपचा महाल ही सर्वांत उत्तम इमारत आहे. शहराजवळ केनमेरच्या अर्लचा राजवाडा आहे. येथें शिल्पकलेची व हस्तकौशल्याची शाळा आहे. येथें मजेदार ( फॅन्सी ) जिनसा तयार करण्यांत येतात. किलार्ने सरोवर शहरापासून सुमारें १॥ मैलावर आहे. लॉफलीनजवळ रॉस दुर्गाचे अवशेष व 'स्वीट इनिसफालनचे' अवशेष प्रेक्षणीय आहेत. याशिवाय मॅक् गिलीकडीज रीक्स व टार्क आणि पर्पल पर्वत, हुनलोची खिंड, टॉर्क आणि डेरीकुनिहांचे धबधबे वगैरे फार मनोरम देखावे आहेत. इनलेच्या आंपाम गुहेंत शिलालेख आहेत. सरळच्या नदींत ट्राउट व सालमन मासे सापडतात. येथील वनस्पती वनस्पतिशास्त्रदृष्ट्या फार प्रेक्षणीय आहेत ओडानेघे या पौराणिक वीराचा या गावाशीं पुष्कळसा संबंध दर्शवितात.

**किलिमनूर**—मद्रास इलाख्यांतील त्रावणकोर संस्थानच्या चिरयिंकिल तालुक्यांतील एक छोटीशी जमीनदारी. हिची लोकसंख्या १९०१ सालीं ३०५३ होती ही जमीनदारी पूर्णपणें इनाम आहे. या जमीनदाराचे मालक कोइल टंपुरान घराण्यांतील आहेत. या घराण्याचा त्रावणकोरच्या राणीच्या घराण्याशीं संबंध आहे. कोइल टंपुरान नावाच्या एका पुरुषानें त्रावणकोरच्या राणीचा व बालराजाचा शत्रूपासून बचाव केल्यामुळें, इ. स. १७२८ मध्यें त्याला हें छोटेंसें राज्य बक्षीस म्हणून देण्यांत आलें.

**किलिमांजारो**—पूर्व आफ्रिकेंत हा एक मोठा पर्वत आहे. याचा मध्यभाग द. अ. ३° ५' व पू. रे. ३७° २३' वर आहे. या खंडांत याचें शिखर सर्वांत उंच आहे. समुद्राच्या सपाटीपासून याची उंची १९३२१ फूट पर्यंत गेली आहे. याच्या उत्तरेस २०० मैलावर केनिया पर्वत व पश्चिमेस २५ मैलावर मेरु पर्वत आहे. ह्या पर्वताची ओळ पूर्वेकडून पश्चिमेकडे गेली असून पश्चिमेस किबो व पूर्वेस मावेंझी अशीं दोन शिखरें आहेत. किबो उंच आहे किबो हें थोड्याच दिवसापूर्वी ज्वालामुखी होतें पण आतां त्याचें मुख बंद झालें आहे त्याचप्रमाणें मावेंझीचें मुखहि बंद आहे किबो शिखर सुमारें २०० फूट उंचीच्या बर्फाच्या थरानें आच्छादिलेलें असतें अशींच आणखी तीन शिखरें बर्फाच्छादित असून ह्यांतील मध्यभागाच्या सर्वांत उंच शिखराला कायसर विल्हेल्म स्पिट्झ हें नाव दिलें आहे ह्यावर तीन बर्फाच्या नद्या असून त्यांपैकीं एक ज्वालामुखीच्या तोंडास मिळाली आहे. ह्या पर्वताच्या उतारावर ४०० झाडें पासून ६००० फुटापर्यंतच्या उतारावरील झाडी दाट असून येथें शेतीहि करितात. येथील झाडें व प्राणी बाकीच्या आफ्रिकेंतील पर्वतावरच्या, झाडांच्या व प्राण्यांच्या जातींचेच आहेत. रोंबेझी नामक शिखराला पूर्वी रौप्यपर्वत म्हणत असें वाटतें. ओहानेस, रेबमान, वॅरन, डेकन आदिकरून बऱ्याच प्रवाशांनीं हा पर्वत शोधिला आहे. डॉक्टर हान्समेअर यानें ह्या पर्वतावर चार वेळां प्रवास करून बरीच माहिती मिळविली आहे. इ. स. १८८८ पासून गेल्या महायुद्धापर्यंत हा पर्वत जर्मनांच्या ताब्यांत होता. पण १९१८ सालापासून सर्व जर्मन पूर्वआफ्रिकेबरोबर हाहि ब्रिटिश आधिपत्याखालीं आला आहे. [ जॉन्स्टन—दि किलिमांजारो एक्सपिडिशन. फ्राफ्ट्झ्हल्स इन् ईस्ट आफ्रिका. ]

**किल्लेकोट व तटबंदी**—देशाच्या किंवा प्रांताच्या रक्षणार्थ किल्ले अगर गड वगैरे बांधण्याची चाल बरीच जुनी आहे. वेदामध्येंहि किल्ले या अर्थी पुर शब्द योजिला आहे, ( ज्ञानकोश विभाग ३ पृ. ३४७ पहा ). त्यावरून वेदकालीं किल्ले असावेत असें दिसतें. रामायणांत तर लंकेचें वर्णन देतांना तिच्या तटबंदीचें, बुरुजांचें, वेशींचें वगैरे किल्ल्याच्या स्वरूपाचें वर्णन दिलेलें आहे; त्यामुळें रामायणकालीं किल्ल्याची कल्पना चांगलीच अस्तित्वांत होती असें ठरतें रामायणांतील सुवेळा, निकुंभिला, किष्किंधा हीं ठिकाणें तटबंदीचीं होतीं. महाभारतांतील युद्धाच्या वर्णनात; किल्ल्याचा उपयोग सांगितला आहे, तो असाः—"राजानें प्रथम आपल्या मुख्य दुर्गाचा आश्रय करावा; श्रीमंत लोक जेथें जेथें असतील तेथें आणून ठेवावे व तेथें फौजेचा पहारे ठेवावे. किल्ल्याभोंवतालचें सर्व जंगल तोडून टाकावें, किल्ल्यावर टेहळणीच्या उंच जागा कराव्या व मारा करण्यासाठीं सुरक्षित जागा व छिद्रें करावीं; किल्यांतून बाहेर पडण्याचे गुप्त रस्ते असावेत; दरवाज्यावर यंत्रें व तफारी रोंगून ठेवाव्यात; नवीन विहिरी पाडाव्यात; रात्रीं फक्त अग्न दिसावें" ( शांतीपर्व अ. ६९ ) श्रीकृष्णाच्या द्वारकेला तटबंदी फार दृढ होती, जरासंधाच्या

राजधानीसारखी तशीच होती. त्याच्या राजधानींत कृष्ण, भीम व अर्जुन या तिघांनी प्रवेश केला तो तटावरून चढून केला व तटावरील दुंदुभी फोडल्या असें त्या वेळचें वर्णन आहे. द्वारकेवर शाल्वानें हल्ला केला त्यावेळच्या वर्णनांत तट, बुरूज, मोर्चे वगैरेंचा उल्लेख येतो. चाणक्याच्या अर्थशास्त्रांत किल्ल्याचें महत्व वर्णिलेलें आहे. राज्याच्या सरहद्दीवर प्रत्येक दिशेस मजबूत किल्ले असावेत असें त्याचें म्हणणें आहे. त्यानेंहि औदक ( जंजिरा ), पार्वत ( गड ), धान्वन ( भुईकोट ) व वनदुर्ग असे प्रकार सांगितले आहेत. किल्ल्याचे आकार गोल, लंबचौरस व चौरस असून भोंवतीं खंदक, नदी किंवा कालवे असावेत, खंदक एकापुढें एक असे तीन ठेवून त्यांतील अंतर ६ फूट व खंदकाची रुंदी १०, १२, १४ फूट असावी व खोली रुंदीच्या निम्मी असावी; खंदकांत सुसरी, मगर व कमळाचे वेल असावेत (याची गुंतागुंत फार असते, त्यामुळें या वेलांत माणूस अडकल्यास लवकर बाहेर पडत नाहीं ). तट व पहिला खंदक यांत २४ फूट अंतर ठेवून, तटाची उंची ७२ फूट व रुंदी ३६ फूट ठेवावी आणि पायऱ्याशीं निवडुंग व काटेरी झुडपांची लागवड करावी व पुढें खड्डे, उंचवटे ठेवावेत. तटावर १२ हातागणीक जंग्या ठेवाव्यात. बुरूज चौकोनी असावेत (खिस्तपूर्व व खिस्ती शकांतील पहिल्या काळच्या रोमन व ग्रीशियन किल्ल्यांनांहि बुरुज चौकोनी होते असें त्यांच्या चित्रावरून दिसतें ). किल्ल्यात तटाइतकी उंच अशी एक शिडी तयार करून ठेवावी. दोन बुरुजांत अंतर १८० फूट असावें. तटावरील मार्ग झाकलेला असावा. या मार्गावर इंद्रकोष म्हणून झाकलेल्या उंच बैठका असाव्यात ( यावरून बहुधा तोफांचा अगर बाणांचा मारा शत्रूवर करीत असावेत ). तटांत एक गुप्त जिना व एक बाहेर पडण्याचें गुप्त द्वार व एक विहीर असावी ( याचें प्रत्यक्ष उदाहरण पुण्याच्या शनिवारवाड्याच्या दक्षिणेच्या पहिल्या बुरुजांत दृष्टीस पडतें ). किल्ल्याच्या महाद्वाराला हत्तीनें तें फोडूं नये म्हणून २४ अंगुळांचे अणकुचीदार लोखंडी इंद्रकील ( खिळे ) असावेत. त्याला चार अडसर असावेत, दाराची रुंदी ५ हात असावी. दारावर एक मनोरा ( नगारखाना? )सुसरीच्या आकाराचा असावा. किल्ल्यास एकंदर बारा वेशी असाव्यात. तटाच्यावर कुमारीदेवीचें एक देऊळ असावें व पाण्याचे लहान लहान पाट व एक कमळांनीं भरलेलें कुंड असावें. या पाटांत ( लपवून ठेवण्यासाठीं? ) शस्त्रें ठेवावीं, तीं म्हणजे कुदळी, कुऱ्हाडी, दगड, मुद्गर, सोटे, चक्र, यंत्रें, शतघ्नी ( तोफा ), भाले वगैरे. किल्ल्यांत इमारती बांधतांना प्रथम पूर्वपश्चिम व दक्षिणोत्तर असे तीन तीन राजमार्ग चोवीस फूट रुंदीचे तयार करावेत. फौजेसाठीं जे रस्ते असतात त्यांची रुंदी ४८ फूट ठेवावी. किल्ल्यांत मजबूत जागीं चारी बाजूंस इतरांचीं घरें ठेवून उत्तरदिशेस उत्तराभिमुखी अगर पूर्वाभिमुखी किल्ल्यांतील सर्व जमीनीची १/९ जमीन व्यापणारा असा राजवाडा बांधावा. पुरोहित, यज्ञशाळा, पाण्याचा खजिना, प्रधानाचीं घरें, मुद्रकखाना, गजशाळा, कोठी हीं राजवाड्याच्या डाव्या कडे असावीं. व्यापारी, कारागीर, वैद्य, खजीना, खजीनदारकचेरी, इतर अठरा कारखाने, दारुगोळ्याचें कोठार, सेनापतीचें घर वगैरे राजवाड्याच्या उजव्या कडे असावीं. याच्या शिवाय उष्ट्रखाना, रथशाळा, अश्वशाळा, शस्त्रशाळा, दवाखाने, दुकानें, गोशाळा, राजधानीची पुरदेवता ( तिचें देऊळ ) वगैरे इमारती किल्ल्यांत असाव्यात. वेशींचीं नांवें ब्रह्मा, इंद्र, यम, सेनापति अशीं असावीं. प्रत्येक दहा घरांस एक विहीर खोदावी. सरकारी लष्करी अधिकारी, निरनिराळ्या खात्यावरचे अनेक ( एकाच खात्यांत अनेक) असावेत. तसे असले म्हणजे एकमेकांचा एकमेकांवर दाब असतो व ते सहसा फितूर होत नाहींत. किल्ले घेतांना सुरुंगाचा उपयोग करावा खंदक भरून काढून हल्ले करावे ज्यांचीं घरटीं किल्ल्यांत असतील अशा पक्ष्यांना पकडून त्यांच्या शेपट्यांस स्फोटक द्रव्यें बांधून त्यांना आंत सोडावें. तसेंच किल्ल्यांत नौकर म्हणून आपले लोक ठेवावेत अगर फितूर करून त्यांच्याकडून मुंगूस, वानरें, माजरें, कुत्रीं यांच्या शेपट्यांना स्फोटक द्रव्यें बांधवून आंतील गवती छपराच्या घरांवर सोडावीं. ( येथें स्फोटक द्रव्याच्या गोळ्यांत कोणतीं द्रव्यें कशीं घालून गोळे तयार करावेत तें चाणक्यानें दिलें आहे ) व अग्नीचे बाणहि सोडावेत. यापुढें हल्ले कसे व केव्हां करावेत, फितूर कसा करावा व किल्ला काबीज केल्यावर काय करावें यासंबंधानेंहि चाणक्यानें बरेंच विवेचन केलें आहे.

मध्ययुगांत कालंजर, कनोज, मान्यखेत दिल्ली मधुरखण्डि, कपिश, त्रैकूटक, उज्जनी, राजगृह वगैरे किल्ले अगर तटबंदीच्या राजधान्यांचीं नांवें आढळतात. रजपुतान्यांतील प्रसिद्ध चितोडगड याच्या नंतरच्या काळांत बांधला गेला. मुसुलमानी अंमलाच्या प्रारंभीं उत्तर हिंदुस्थानांत प्रख्यात किल्ले थोडे होते. मुसुलमानी अंमल झाल्यानंतर व त्यांचें आणि रजपुतांचें व इतर हिंदूंचे युद्ध सुरू झाल्यानंतर रजपुताना, पंजाब, काश्मीर, बंगाल, बहार व ओरिसा इकडे किल्ले जास्ती बांधले गेले उत्तरहिंदुस्थानांत डोंगर थोडे असल्यानें डोंगरी किल्ले फार थोडे असून भुईकोट किल्लेच फार आहेत. दक्षिणेंत तसें नाहींत. इकडे सह्याद्री, सातपुडा, चांदवड वगैरे डोंगर असल्यानें बहुतेक किल्ले डोंगरीच होते आणि त्यामुळें मुसुलमानांना जितक्या लवकर सपाट उत्तरहिंदुस्थान जिंकितां आला, तितका डोंगराळ दक्षिणहिंदुस्थान जिंकितां आला नाहीं व जरी जिंकिला तरी सतत तो त्यांच्या ताब्यांत राहिला नाहीं. दक्षिणेंतील-त्यांतल्या त्यांत महाराष्ट्रांतील-किल्ले फार बळकट असत. भोजराजांनीं, शिलाहारांनीं व चालुक्यांनीं हे किल्ले बांधिले होते. सिंहगड, पन्हाळा, विशाळगड, सातारा,

माहुली, तोरणा वगैरे प्राचीन किल्ले असून शिवाजीमहाराजांनी व इतर मराठी राजसत्ताधाऱ्यांनी अनेक नवीन किल्ले बांधिले.

डोंगरी व भुईकोट या किल्ल्याच्या दोन प्रकाराप्रमाणेंच जंजिरा–पाणकिल्ला–हाहि एक तिसरा प्रकार होता. शिवछत्रपतींनें सिंधुदुर्ग हा प्रख्यात पाणकिल्ला बांधिला होता. त्यास मराठे 'शिवलंका' असें मोठ्या अभिमानानें म्हणत. मराठ्यांनीं अर्नाळा, विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, अलिबाग व हबशानें जंजिरा हे किल्ले बांधल्याचें प्रसिद्धच आहे. हे जलदुर्ग फार थोडे होते. मराठी राज्यांतील या जलदुर्गांचें व आरमाराचें आधिपत्य प्रथम आंग्रे व नंतर धुळप या सरदाराकडे होतें.

राज्यव्यवहारकोशांत दुर्ग, गड व जंजिरा असे तीन प्रकार सांगितले आहेत. किल्ल्याच्या संरक्षणासाठीं तट बांधीत. तटास मधून मधून मजबुतीसाठीं व युद्धोपयोगी सामान ठेवण्यासाठीं बुरुज बांधीत या बुरुजांना व तटाला मोकें (याना जंगी म्हणत) ठेवून त्यांतून शत्रूंवर बंदुकांच्या गोळ्या सोडीत असत. बुरुजावर तोफा असत काहीं किल्ल्यांना दोन दोन तट असून किल्ल्याच्या आंत बालेकिल्ला असे. किल्ल्याच्या निरनिराळ्या भागांना फांजी, रेवण, पडकोट, चर्मी, ओंभ, अर्गळा, मेट, सफेली वगैरे नांवें असत. तटाच्या पुढें (भुईकोट किल्ला असल्यास) खंदक असे, खंदकावर एक लाकडी पूल असे; त्यास साकू म्हणत. किल्ल्यांत धान्य सांठविण्याचीं कोठारें, पाण्याचीं टाकीं, विहिरी, पागा, राहण्याच्या कोठड्या, राजवाडा, दारूगोळा ठेवण्याचा दारूखाना वगैरे जागा असत.

भुईकोट किल्ले गंगा व सिंधुनदीच्या कांठीं बरेच आहेत. दिल्ली, आग्रा, प्रयाग, भरतपूर वगैरे किल्ले विस्तारानें फार मोठे व मजबूत आहेत, पण ते सारे भुईकोट आहेत. यांच्या भोंवतीं खंदक अगर नद्यांचें पात्र आहे. आग्र्याच्या किल्ल्यांत राजवाडे दिवाणई–खास व आम आणि मशिदी वगैरे आहेत. विजापूरच्या आर्क किल्ल्यांतहि अद्यापि मोठमोठे पडके राजवाडे पहावयास सांपडतात. हाहि भुईकोटच आहे. किल्ल्याचें महाद्वार ओलांडल्यावर, दुसरी वेस जी असे ती उजवी अगर डावीकडे ठेवीत; महाद्वाराच्या समोर केव्हांहि ठेवीत नसत. किल्ला एकाएकीं हस्तगत होऊं नये म्हणून ही खबरदारी असे. रस्तेहि नागमोडी व त्यावर तोफा रोखलेल्या असे असत. खंदकाच्या पुढें काटेरी निवडुंग अगर बाभूळ वनेंहि लावीत असत. त्यामुळें शत्रूंच्या तोफेचा मारा निकामी होई.

किल्ल्याच्या खालील १०।१५ कोसांचा भोंवतालचा मुलूख त्या किल्ल्याच्या दिमतीस असे. त्या प्रांताचा वसूल किल्लेदारानें गोळा करून आपल्या (किल्ल्याच्या फौजेच्या इतर) खर्चापुरता ठेऊन बाकीचा मुख्य सरकारकडे पाठविण्याची चाल असे. किल्ल्यावर मुख्य किल्लेदार हा असून त्याचे हाताखालीं जामदार, कारखाननीस, हवालदार, मुजुमदार, सबनीस वगैरे लष्करी व मुलकी अधिकारी असत. किल्ल्याच्या महत्वाप्रमाणें कमजास्ती फौज असे. किल्ल्यामुळें शत्रूंपासून बचाव व शत्रूला अडथळा या दोन्ही गोष्टी करितां येतात. तोफा निघण्यापूर्वी (बाणाच्या युद्धकालांत) डोंगरी किल्ल्याचें महत्व फार असे, कारण बाणाचा मारा इतक्या उंचीवर जात नसे. परंतु हल्लीं लांब पल्ल्याच्या प्रचंड तोफा व अगदीं अलीकडे निघालेलीं विमानें यांच्यापुढें या भुईकोट व डोंगरी किल्ल्यांचें महत्व फारसें राहिलें नाहीं हें परवाच्या यूरोपीय महायुद्धांत सिद्ध झालेंच आहे. तोंपर्यंत जगांतील अजिंक्य समजले जाणारे नामूर, अँटवर्प, मेत्झ, वगैरे किल्ले जर्मन लोकांनीं हॉविट्झर तोफांच्या व विमानांच्या साहाय्यानें अगदीं अल्पावधींत काबीज केले. सारांश यापुढील काळांत किल्ल्यांचें महत्व कमी होत जाईल असें दिसतें.

किल्ला बांधितांना पुढील गोष्टी लक्षांत ठेवाव्या लागतात; लढायांत उपयोगांत येणारीं हत्यारें, जमीनीची पहाणी, शत्रूची व आपली ताकत, पाण्याची व दाण्याची सोय, चोर मार्ग वगैरे लक्ष्यांत न घेतल्यास फार दिवसाच्या वेढ्यानें आंतील लोकांचें नुकसान होतें. किल्ले बांधण्यापूर्वी नुसता तटहि गांवाभोंवतीं घालीत. अशा प्रकारें निनेव्ही आणि बाबिलोन येथील तटबंदी होती. मात्र ती फक्त संरक्षणाच्या (बचावाच्या) स्वरूपाची होती. शत्रूस तोंड द्यावयाचें झाल्यास आंतील सैन्यास या तटाबाहेर यावें लागे. चीनमधील प्रचंड भिंतहि तटबंदीचें एक अलौकिक उदाहरणच होय. हिंदुस्थानांत व यूरोपमध्येंहि मध्ययुगांत जहागीरदार व सरंजामदार हे लहान लहान गढ्या बांधून आपल्या जहागिरीचें (त्यांतील रस्ते, नदीचे उतार, पूल वगैरे) संरक्षण करीत असत. तोफा उपयोगांत आल्यानंतर १७ व्या व १८ व्या शतकांत या यूरोपियन जमीदारांच्या गढ्यांचें महत्व संपलें. आपल्या इकडे महाराष्ट्रांत खुद्द शिवाजी महाराजांनीं, हे जमीदार गढ्या बांधून शिरजोर होतात म्हणून, त्यांच्या गढ्या पाडून टाकिल्या. मध्यवर्ती सरकारास या बंडखोरांपासून त्रास होतो म्हणून त्यांनीं कोण्याहि इनामदारास गढी बांधूं दिली नाहीं. हल्लीं लष्करीदृष्ट्या नाजूक व महत्त्वाचीं ठाणीं जेथें असतील तेथें किल्ले बांधितात. उदाहरणार्थ राजधानी, लष्करी कोठारें, दर्यावरील गोद्या, आगगाडीचीं जंक्शनस्टेशनें वगैरे.

किल्ल्यांच्या कल्पनेपूर्वी प्रथम कांट्याचीं कुंपणें गांवाभोंवतीं ठेवीत असत. शिकंदरानें हिरण्यानिभन लोकांच्या सैन्याभोंवतीं असलीं कुंपणें असल्याचें लिहिलें आहे. हल्लीं अरबस्तानांत व हिंदुस्थानांत कर्नाटकांत निवडुंगाचें कुंपण असलेलीं खेडीं आढळतात. यानंतर मातीचा तट बांधण्याची युक्ती निघाली. जर्मनींत मध्ययुगांत हे तट

मातीचे होते आपल्याकडे जुने तट दुसऱ्या मातीचे बांधलेले कोटे कोटे आढळतात यात तोफेचा गोळा घुसला तरी (दगडी बांधकामाच्या तटापेक्षा) फारच थोडे नुकसान होते भरतपूरच्या किल्ल्याचा प्रसिद्ध तट व कुंभेरीचा तट मातीचाच आहे असे म्हणतात मातीच्या भिंतीनंतर दगड विटांचा बांधीव तट उपयोगात आला तट उंच (म्हणजे शत्रूस शिड्या लाविता येऊं नयेत इतका) व रुंद (म्हणजे आपल्याला त्यावर सामानासह सुरक्षितपणे फिरता येईल असा) असावा तटानंतर बुरूज प्रचारात आले याचा उपयोग शत्रूवर मारा करण्यास होई मागें सांगितलेल्या निनेव्हीचा तट १०० फूट उंच व ३० फूट रुंद व १५०० बुरुजांचा असून तो खि. पू. २ हजार वर्षांपूर्वी बांधलेला होता असल्या तटांना शिड्या लावून किल्ले काबीज करीत से नच जमल्यास तटास सुरुंग लावीत व तट उडवून देत क्वचित (सिंहगडसारख्या) प्रसंगी घोरपडीचाहि उपयोग करीत, अगर समोरासमोर मोर्चे देऊन सतत तोफांचा मारा करून तो जमीनदोस्त करीत असत यरुशलेमवर झालेल्या खि. पू. ८ व्या व ६ व्या शतकातील शत्रूच्या हल्ल्यांत ३०० शेर वजनाचे दगडी गोळे फेंकणारी यंत्रें, तोफा, झुलते घण यांचा उपयोग केला होता रोमन लोकांनीं ही कला ग्रीक लोकांपासून घेतली रोमन किल्ले बहुधा उंच ठिकाणीं बांधिलेले असत. याचें कारण त्यांचे तट ३० फूट रुंदीचे असत, त्यावेळच्या तटबंदीचीं काहीं वर्णनें आढळतात कारकासोने येथील बुरूज, मेलाज येथील किल्ला, मॉन्टार्गी वगैरे किल्ला यांचीं प्रत्यक्ष पाहून लिहिलेली वर्णनें आहेत, त्यावरून त्यांच्या बांधणीची कल्पना येते यानंतर १५ व्या शतकात जेव्हां तोफांचा व दारूगोळ्याचा प्रचार सुरू झाला तेव्हां किल्ल्यांच्या प्राचीन बांधणींत फरक पडू लागला यूरोपांत प्रथम फ्रान्समध्यें या शस्त्राचा मारा करण्यास सुरुवात झाली स. १४२८ त इंग्रजांनीं ऑर्लिअन्सला घातलेल्या वेढ्यात किल्लेदारांनीं तोफांच्या माऱ्यानेंच इंग्रजांचा पुरता फडशा पाडला पुढें १४५० त सातव्या चार्लसनें तोफांच्या जोरावर नार्मंडींतील सर्व इंग्रजी किल्ले पादाक्रांत केले

या शास्त्रावर यूरोपमध्यें डूरर, पेगन मार्टिनी, सेबास्टियन ग्यालो, स्पेकल, म्याकिआव्हेली वगैरे लोकांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत पुढें १७ व्या शतकांत रेखागणिताच्या आधारावर किल्ल्यांची बांधणी करण्यास सुरुवात झाली याचा पुरस्कर्ता मार्ची नावाचा एक इटालियन होता अठराव्या शतकात कॉर्मान्टेन म्हणून एका फ्रेंच माणसानें तटबंदी व खंदक यांत काहीं सुधारणा केल्या त्या फ्रँको-जर्मन युद्धापर्यंत (१८७०) अमलांत होत्या जर्मनींत फ्रान्सच्या सरहद्दीवर मोठमोठ्या किल्ल्यांत जी एक नवीन (निरनिराळे १०।१२ किल्ले मिळून एक मोठा किल्ला बनविणें) रीत उपयोगात आलेली गेल्या महायुद्धात दृष्टीस पडली, ती ब्हाउमन नावाच्या एका फ्रेंचानें मूळ शोधून काढलेली आहे (१७००) मात्र तिचा विस्तार जर्मनांनीं केला असल्या प्रकारचे किल्ले म्हणजे अँटवर्प, पोसेन, पोर्टआर्थर, मेट्झ, व्हर्डुन वगैरे होत यात मुख्य किल्ल्याभोंवतीं अनेक लहान लहान किल्ल्यांची एक रांग (माळ) असते अँटवर्पच्या मुख्य किल्ल्याभोंवतीं असे सतरा किल्ले आहेत मुख्य किल्ल्यापासून किती अंतरावर (त्रिज्या) हे छोटे किल्ले असावेत तें त्या त्या ठिकाणच्या जमीनीच्या स्वरूपावर अवलंबून असतें पारीसच्या मुख्य किल्ल्यापासून हे छोटे किल्ले १८ हजार यार्डांवर आहेत व्हर्डुन येथील हें अंतर १२ पासून २॥ हजार यार्ड, मेट्झ येथें २॥ ते ४॥ हजार यार्ड व स्ट्रासबर्ग येथें ५ ते १० हजार यार्ड अंतर आहे या किल्ल्यांच्या संरक्षणार्थ अर्थात् सैन्य जास्त लागतें मात्र त्याबरोबरच शत्रूला पुष्कळ दिवस थोपवूनहि धरता येतें पण गेल्या महायुद्धात विमानांनीं व मोठ्या हॉविट्झर तोफांनीं व ४० शेरी गोळ्यांनीं या किल्ल्यांचा भ्रम फेडला असे किल्ले हिंदुस्थानात काहीं आहेत पुरंधर, जिंजी, राजमाची, पन्हाळा, ग्वाल्हेर, पेशावर, चितोड, वगैरे किल्ले साधारणत वरील जातीचेच (थोड्या प्रमाणात) होत. असल्या किल्ल्यामध्यें आंत लहान तोफा ठेवण्याची व मैदानी व महाकाळी (हॉविट्झर) तोफांच्या व त्यांच्या किल्ल्यांच्या बाहेर (छपवून) ठेवण्याची चाल सांप्रत प्रचारात आहे मुख्य किल्ल्यांचा संबंध या लहान लहान किल्ल्यांशीं आगगाडी अगर पायरस्त्यांनीं (झाडांनीं आच्छादित असा) जोडलेला असतो बाँबपासून नुकसान होऊं नये म्हणून जातेच्याजवळ अगर किल्ल्यात वाळूच्या पोत्यांचे धमधमे तयार करतात शत्रू रात्रीं सुरुंग वगैरे खोदीत असल्यास शोधकदीप (सर्च लाइट) उपयोगात आणतात या शोधकदीपापासून नफ्याबरोबर तोटेहि होतात, शत्रूला आपलीहि जागा दाखविली जाते तसेंच युद्धात यांचा काहीं उपयोग होत नाहीं इ. स. १८५० च्या पुढें क्रिमियन लढाई व यांत्रिक तोफा यांच्यामुळें किल्ल्यांच्या बांधणींत पुन्हां सुधारणा झाली किल्ल्यांचें संरक्षण जसें इतर साधनसामुग्रीवर अवलंबून असतें तसें किल्लेदारावरहि असतें तो विश्वासू व शूर असला तर आणि अन्नपाण्याचा मुबलक पुरवठा असला तर, शत्रूस किल्ला घेण्यास फार प्रयास पडतात मुरारबाजी (पुरंदर), विसाजीराम (धारवाड), परशुराम त्र्यंबक (सातारा), राजाराममहाराज (जिंजी), चांदबिबी (नगर), मादण्णापंत (गावळकोंडा) लक्ष्मीबाईसाहेब (झांशी), मुरारराव घोरपडे (गुत्ती), संगराणा (चितोड), टॉडलेबेन (सेबास्टोपोल), फेनविक (कार्स), उस्मानपाशा (प्लेव्हना) हीं असल्या शूर किल्लेदारांचीं नांवें होत यांनीं कसांत दिलेले किल्ले अनेक दिवस लढविले होते आपल्या महाराष्ट्रातील असल्या किल्ल्यांचीं व किल्लेदारांचीं (मराठी साम्राज्यात) उदाहरणें अनेक आढळतील किल्लेदाराच्या फितुरीनें अजिंक्य किल्ले शत्रूच्या हस्तगत

झाल्याचीहि उदाहरणें आढळतात सूर्याजी पिसाळ(रायगड), सुभानजी लावघरे ( सातारा ), कानवेलनें वेढा दिलेल्या व्हेंचिगडचा किल्लेदार ( १६४१ ) ही असली उदाहरणें होत. किल्यांतील सर्व शिपाई गरेपर्यंत शत्रूच्या हातीं किल्ला पडूं द्यावयाचा नाहीं अशा गोष्टी रजपुतान्या व मराठ्यांच्या इतिहासांत अनेक घडलेल्या आहेत. यूरोपमध्यें असलें उदाहरण क्वचित आढळतें. खडें सैन्य पुष्कळ व युद्धोपयोगी सामुग्रीनें ज्यास्त तयार असलें तर हल्लींच्या काळीं या किल्याचा फारसा उपयोग होण्यासारखा नाहीं. म्हणून कांहीं तज्ज्ञांच्या मतें किल्याच्या फायद्याप्रमाणें थोडे तोटेहि ( हल्लींच्या काळीं ) पदरांत पडतात. किल्ल्यांत जो असंख्य पैका घातला जातो तितक्याचा उपयोग, सैन्य व साधनसामुग्री सर्व जय्यत ठेवण्यांत केल्यास भागण्यासारखें आहे, असें यांचें म्हणणें आहे.

[ संदर्भग्रंथ— शामशास्त्री —कौटिल्य अर्थशास्त्र; डूरर, स्पेकल, फ्रिट्च, पेगन, कार्नाट, वस्टों, विलनॉन्ट, बूनर, क्रांक, वगैरे ग्रंथकारांचे ग्रंथ; एन्सायक्लो ब्रिटा. व्हॉ. १ : वाल्मिकिरामायण, महाभारत, भागवत; मराठी रियासत ]

किल्हार्न डॉ. फ्रा.—एक प्राच्य-विद्या-विशारद जर्मन पंडित. किल्हार्न इ. स. १८६२ मध्यें पुण्याच्या "डेक्कन कॉलेजांत" पौरस्त्य भाषांचा प्रोफेसर म्हणून आला. हिंदुस्थानांत असतांना त्यानें येथील पंडितांची मैत्री संपादन केली. त्यानें मॅक्समुल्लरला सायणटीकेसह ऋग्वेदाची पहिली आवृत्ति काढण्याच्या कामीं मदत केली. हिंदुस्थानांत यानें पंडितांजवळ व्याकरणाचा अभ्यास केला. याच्या पुस्तकांवरून हा चांगला वैय्याकरणी होता असें दिसतें. यानें 'पतंजलीचें महाभाष्य' व नागोजीभट्टाचें "परिभाषेंदुशेखर" या पुस्तकांच्या विद्वत्तापूर्ण आवृत्त्या काढल्या व व्याकरणविषयक निबंधहि पुष्कळ लिहिले.

हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास उपलब्ध करणाऱ्या अंकित लेखांचा अर्थ लावण्याच्या कामींहि यानें बरीच मेहनत घेतली व याच्याच अविरत व निःस्वार्थी श्रमामुळें प्राचीन हिंदुस्थानचा बराच इतिहास उपलब्ध झाला आहे.

हा हिंदुस्थानांतून जर्मनींत गॉटिन्जन् विश्वविद्यालयांत संस्कृतचा प्रोफेसर म्हणून गेला. व इ. स. १९०८ च्या मार्च महिन्यांत निधन पावला.

किशनगंज, पोटविभाग—बिहार-ओरिसा इलाख्यांतील पूर्णिआ जिल्ह्याचा ईशान्य भाग. हा पोटविभाग नेपाळच्या सरहद्दीस भिडला असून याचें क्षेत्रफळ ११६६ चौरस मैल आहे. हा सुपीक व वालुकामय प्रदेश आहे. याची लोकसंख्या १९११ सालीं ६०६६८८ होती. या पोटविभागांतील बहुतेक लोक मूळ राजवंशी जातीचे असून त्यांपैकी पुष्कळसे लोक मुसुलमान झाले आहेत. किशनगंज शहर, पुरा[illegible], बिगिंज, गंधर्वगंगा व इस्लामपूर येथें [illegible] पोलीस ठाणीं आहेत.

शहर.—किशनगंज पोटविभागाचें मुख्य ठिकाण. या शहराची लोकसंख्या १९११ मध्यें ५६६३ होती. हें शहर महानंदा नदीच्या पूर्वेस गंगा दार्जीलिंग रस्त्यावर वसलेलें आहे. या शहराला १८८७ मध्यें म्युनिसिपालिटी देण्यांत आली. म्युनिसिपालिटीचें वार्षिक उत्पन्न १९०३-४ सालीं जवळ जवळ १२००० रु. असून खर्च ८००० रुपये होता. या शहरीं एक छोटासा तुरुंग आहे. या ठिकाणीं दरवर्षी एक जत्रा भरत असून तींत लाखों यात्रेकरू जमतात. हत्ती, उंट, खेचरें, म्हैस्या, गाई, इत्यादि जनावरें विकण्याचें हें ठिकाण आहे. तांदूळ व ताग हे जिन्नस येथून मोठ्या प्रमाणांत निर्गत होतात.

किशनगड संस्थान.—राजपुतान्याच्या मध्यभागांतील एक संस्थान. या संस्थानचें क्षेत्रफळ ८६८ चौरस मैल आहे. या संस्थानच्या मर्यादाः—उत्तरेस व वायव्येस जोधपूरचें संस्थान, पूर्वेस जयपूरचें संस्थान; पश्चिमेस व आग्नेयीस ब्रिटिशांच्या ताब्यांत असलेला अजमीरचा मुलूख व दक्षिण टोंकाला शहापुरा जहागिरी. या संस्थानचे नैसर्गिक रीतीनेंच दोन भाग पडलेले आहेत. यांपैकीं उत्तरेचा भाग हा दक्षिण भागापेक्षां मोठा असून तो बहुतेक वालुकामयच आहे. या वालुकामय प्रदेशांतून अरवली पर्वताच्या तीन रांगा एकमेकांस समांतर रेषेनें, नैर्ऋत्येकडून ईशान्येकडे पसरलेल्या आहेत. या रांगांचीं पुष्कळ शिखरें असून त्यांपैकीं सर्वांत मोठें शिखर २०८१ फूट उंच आहे. दक्षिणेकडील भाग सपाट असून सुपीक आहे. या संस्थानांत तीन नद्या असून पुष्कळ ओढे आहेत. रूपनगर ही नदी ईशान्य दिशेनें वहात जाऊन सांबर सरोवराला मिळते. माशी नदी व दैन नदी या पूर्वगामी होऊन बनास नदीला मिळतात.

भूस्तर.—या पर्वताच्या रांगामध्यें व दऱ्यामध्यें स्फटिकाचे रंगीबेरंगी दगड सांपडतात. आग्नेय व दक्षिणेकडील सपाट प्रदेशांत अंबर दगड आढळून येतात. सरवारजवळ अभ्रकाचे दगड विपुल सांपडतात व तसेच मोठमोठ्या सुंदर व रंगीत जातीचे चुनखडीचे दगड आढळतात. किशनगडच्या राजधानीनजीक निरनिराळ्या प्रकारचे सोडालाइटचे दगड सांपडतात. हे अंधारांत कांहीं दिवस ठेवल्यास गुलाबी रंगाचे बनतात. पण त्यांना सूर्यप्रकाश दाखवितांच ते पुन्हा रंगविहीन होतात. दक्षिणेंतील मैदानवजा भागांत वज्रतुंड दगडांची विपुलता आहे.

प्राणी.—या संस्थानांत काळवीट, हरीण, रानडुकरें व नीलगाई हे प्राणी विशेष आढळून येतात. याशिवाय डोंगरांत चित्ते, तरस व लांडगे हेहि पुष्कळ आहेत.

हवामान.—येथील हवा कोरडी व निरोगी आहे. पण आक्टोबर—नोव्हेंबर महिन्यांत मात्र हिंवतापाची साथ पसरविणारी हवा असते. उत्तरेकडील भागांत पावसाचें प्रमाण फार कमी आहे. दक्षिण भागांत मात्र पाऊस बरा पडतो. पावसाचें सरासरी प्रमाण २०.२१ इंच इतकें आहे.

संस्थानामधील शहरें व खेडीं यांची संख्या एकंदर २२१ आहे. १९०१ मध्यें संस्थानची लोकसंख्या ९०,९७० होती. पण १८९१ मध्यें १,२५,५१६ इतकी होती. म्हणजे १० वर्षांमध्यें शेंकडा २७ या प्रमाणात लोकसंख्येचें मान उतरलें. याचें मुख्य कारण म्हणजे १९०० या सालात येथें भयंकर दुष्काळ पडल्यामुळें येथील पुष्कळ लोक परस्थळीं निघून गेले व याच वर्षी तापाची साथहि जोरांत सुरु झाल्यानें पुष्कळ माणसें दगावलीं हें होय. १९११ त ८७,१९१ आणि १९२१ त ७७,७३४याप्रमाणें पुढील दोन दशकातहि झपाट्यानें वस्ती कमी झाली. संस्थानच्या उत्तर भागाचे अरैन, चादर सिंद्री, किशनगड व रूपनगर असे चार जिल्हे असून दक्षिण भागात सरवार हा एकच जिल्हा आहे. या संस्थानात किशनगड, रूपनगर व सरवार हीं तीन शहरें असून या तिन्ही शहराना म्युनिसिपालिट्या आहेत.

१९११ च्या खानेसुमारींत ही लोकसंख्या भरली तींत ७६,६४२ हिंदु, ७६८५ मुसलमान व ३१०६ जैन अशी वर्गवारी झाली. हिंदुधर्मीयामध्यें वैष्णवपंथी लोकांचाच भरणा अधिक आहे. प्रसिद्ध निंबार्क संप्रदायाचा मुख्य गुरु हा रूपनगर जिल्ह्यामधील सलीमाबाद या गावीं राहतो.संस्थानांत ढुंढारी हीच भाषा मुख्यतः प्रचलित आहे. पण उत्तरेकडील भागात पुष्कळ लोक मारवाडी भाषा बोलणारेहि आढळतात.

येथें हिंदूंच्या पुष्कळ जाती असून त्यापैकीं जाट, महाजन, ब्राह्मण, गुजर व रजपूत या जाती प्रमुख होत. या संस्थानच्या राजधानींत 'दि युनायटेड फ्री चर्च ऑफ स्कॉटलंड मिशन' याची एक लहानशी शाखा असून, शिवाय रूपनगर येथें 'दि अमेरिकन मेथडिस्ट चर्च' या मिशनचा एक नेटिव्ह धर्मगुरु रहातो.

संस्थानातील मुख्य धंदा शेतकी हा आहे. संस्थानांतील शेंकडा ४५ लोक केवळ शेतीवर उदरनिर्वाह करणारे आहेत. संस्थानच्या निरनिराळ्या भागात निरनिराळी शेतकीची स्थिति नजरेस येते. उत्तरेकडे म्हणजे ज्या ठिकाणीं पर्जन्याचें मान कमी आहे व जमीनहि विशेष सुपीक नाहीं त्या ठिकाणीं वर्षांत खरीपाचें तेवढें एकच पीक काढण्यात येतें. या खरीपाच्या हंगामात ज्वारी, बाजरी मूग, इत्यादि धान्याचें उत्पन्न होतें. संस्थानच्या मध्यभागात पर्जन्य उत्तरभागापेक्षां अधिक पडत असल्याकारणानें या ठिकाणीं दोन पिकें काढून घेण्यात येतात. खरीपाच्या हंगामात मका, तीळ इत्यादिकांचें पीक काढण्यात येतें व रब्बीच्या हंगामात गहूं, चणे, कापूस इत्यादींचें पीक काढलें जातें. दक्षिणेकडील भाग जास्तच सुपीक व त्यातच पर्जन्यहि पुष्कळ पडत असल्यामुळें दोन्ही हंगामांत चांगलीं पिकें येतात. १९०३–४ सालीं एकंदर १५३ चौरस मैल जमीन लागवडीखालीं होती. त्यापैकीं जवळ जवळ निम्म्या जमीनीला विहिरी, तलाव व इतर साधनांनीं पाणी मिळण्याची व्यवस्था होती. पाणीपुरवठ्याच्या प्रश्नासंबधान योग्य ती तरतूद करण्याचे दरबारनें प्रयत्न चालविले आहेत.

**गुरें ढोरें.**—संस्थानातील गुरें गुजराथमधील गुरांच्या सारखीं मध्यम ठेवणीचीं पण काटक अशीं आहेत. गुरांची निपज अधिक चांगली व्हावी यासाठीं हिस्सार व नागौर येथून खोंड आणविण्यात आले आहेत. गुरांची निगा ठेवण्याला उत्तेजन यावें यासाठीं दरवर्षी ऑगस्ट महिन्यात रूपनगर शहराजवळ सुरसर गांवीं गुरांचें प्रदर्शन भरविण्यात येतें. मेंढरांच्या निपजीबद्दलहि १९०१ सालीं प्रयत्न करण्यात आले पण ते तितके फलद्रुप झाले नाहींत. शेळ्या, मेंढ्या यांची समृद्धि येथें असून त्यांचा उपयोग, लोंकर दूध, मांस याच्यासाठीं करण्यात येतो.

संस्थानात जंगल असें फार थोडें आहे. अवघें ४१ चौरस मैल जंगल राखीव आहे. त्यातून सागवान गवत व इतर किरकोळ जिन्नस मिळून अंदाजें १८,००० रुपयाचें वार्षिक उत्पन्न होतें व खर्च ४००० रुपयापर्यंत होतो. किशनगड शहरनजीक सिलोरा दगडाच्या खाणी असून त्यांच्या उत्तम फरशा तयार होतात. या फरशाचा तक्तपोशी व छप्पर याच्यासाठीं उपयोग करण्यात येतो. ह्या खाणी खास संस्थानच्या मालकीच्या आहेत. टोंरा गावानजीक पांढऱ्या संगमरवरी दगडाच्या खाणी आहेत. नारवार नजीक तांबूस रंगाच्या व इतर काहीं ठिकाणीं काळ्या रंगाच्या संगमरवरी दगडाची पैदास होते. एका काळ्या धातूपासून रंग काढण्याचा प्रयत्न साध्य झाला असून त्या रंगाचा उपयोग जोधपूर–बिकानेर रेल्वेच्या आगगाडीच्या डब्यांना व रजपुताना माळवा रेल्वेच्या डब्याना लावण्यात येतो.

**व्यापार.**—संस्थानात चिटाचें कापड, इतर निरनिराळ्या रंगाचीं कापडें, किनारी पाणी पिण्याचीं भांडीं व गवतापासून तयार होणाऱ्या चाटल्या हा माल तयार होतो. सामायिक भांडवलाच्या तत्वावर गिरण्या व कारखाने काढण्यासाठीं सरकारकडून नेहमीं उत्तेजन देण्यात येतें. खुद्द संस्थानच्या मालकीच्या दोन वाफेवर चालणाऱ्या कापसाचे गठ्ठे करण्याच्या गिरण्या आहेत. शिवाय सूत काढण्याची व विणण्याची एक गिरणी व साबणाचा कारखाना हे किशनगड शहरात आहेत. कापूस, लोंकर, तूप, ओवा, जिरें वगैरे जिन्नसाची निर्गत होते व साखर, मीठ, धान्य याची आयात होते.

**दळणवळण.**—संस्थानच्या उत्तर भागातून रजपुताना माळवा रेल्वेचा फाटा गेलेला आहे. या संस्थानच्या हद्दींत या रेल्वेची १३ मैल लांबी आहे. किशनगड हें एक या हद्दींतील स्टेशन आहे. संस्थानातील रस्ते काहीं खडीचे व काहीं साधे आहेत खडीचा रस्ता ३१ मैल असून बिनखडीचा ८० मैल आहे. येथें एकंदर ४ ब्रिटिश पोस्ट ऑफिसें आहेत खुद्द दरबारनेंहि आपलं स्वतंत्र पोस्ट

खातें ठेवलें असून संस्थानात १३ठिकाणीं पोष्टें आहेत. पोस्ट खात्याचें वार्षिक उत्पन्न अदांजें २४०० रुपयांचें असून खर्च १००० रुपयापर्यंत आहे.

दु ष्का ळ.—संस्थानात दुष्काळ वरचेवर पडतात व त्यामुळें महागाई प्राप्त होते. साधारणत दर आठ दहा वर्षांनी एकदा तरी दुष्काळाचा प्रादुर्भाव होतोच. १८९९–१९०० या सालात मोठा दुष्काळ पडला. त्यावेळीं दुष्काळनिवारणार्थ पुष्कळच प्रयत्न करण्यात आले. बेकार व अनाथागत झालेल्या मजुराना कामें देऊन त्याना अन्नवस्त्र पुरविण्यात आलें. १९०१–२ या सालातहि पुन्हा दुष्काळ पडला. यावेळींहि सरकारनें वरील उपाय अमलात आणले.

शा स न प द्ध ति.—संस्थानचा राज्यकारभार स्वत महाराज हे दोन दिवाणाच्या मदतीनें चालवितात. किशनगड जिल्ह्याची व्यवस्था फडणीस नावाच्या एका अधिकाऱ्याकडे सोंपविण्यात आली असून इतर जिल्ह्यावर स्वतन्त्र अधिकारी नेमण्यात आले आहेत. या अधिकाऱ्याना हाकीम असें नाव आहे. यशिवाय प्रत्येक जिल्ह्यात करवसुली करता तहशीलदार व नायब तहशीलदार नेमण्यात आले आहेत. संस्थानानें न्यायखात्यासाठीं आपले स्वत चे स्वतन्त्र कायदे केले आहेत. हाकिमाना सेकंडक्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार दिलेले आहेत. एका हाकिमाला मात्र थर्डक्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार दिलेले आहेत. या हुकीमासमोर सर्व प्रकारचे दिवाणी कज्जे चालतात. जे फौजदारी कज्जे याच्या अधिकाराबाहेरचे असतील ते कज्जे किशनगड जिल्ह्याच्या फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेटपुढें चालतात. किशनगड जिल्ह्यातील दिवाणी काम स्मालकाज कोर्टांत व सदर दिवाणी कोर्टात चालतें. अपील कोर्टाला अपिलें ऐकण्याचा अधिकार असून शिवाय सेशन्स जज्जाचे अधिकारहि या कोर्टाकडेच आहेत. कौन्सिल हें सर्वांत वरिष्ठ कोर्ट असून त्याच्यापुढें स्पेशल अपिलें चालतात. महाराजाना फाशी देण्याचाहि अधिकार आहे.

संस्थानचें वार्षिक उत्पन्न अदांजें ८ लाख रुपये असून खर्च ५ लाख आहे. उत्पन्नाच्या बाबी म्हणजे जमीनमहसूल, जकात, न्यायखातें, स्टँप, कापसाच्या गिरण्या, व कारखाने या होत व खर्चाच्या बाबी शासनखातें, खाजगी, लष्कर पोलिस व पब्लिक वर्क्स खातें या होत. यावरून संस्थानची स्थिति समाधानकारक आहे असें दिसून येतें. संस्थानची टांकसाळ असून तेथें संस्थानात चालणारी नाणीं पाडण्यात येतात. पण ब्रिटिश नाण्यांनी याचा विशेष मेळ बसत नसल्यामुळें विनाकारण अडचण उत्पन्न होते.

जहागिरी, मुआफी व खालसा अशा तीन तऱ्हेची जमीनदारी पद्धत येथें आहे. जहागीरदाराना महाराजाच्या वाढदिवसाच्या प्रसंगी, आपआपल्या सरंजामाचे दरबारला हजर रहावें लागतें. या जहागिरी ... चालणाऱ्या असून वारसाच्या अभावीं महाराजाच्या संमतीनें दत्तक घेण्याची जहागिरदाराना परवानगी आहे. संस्थानला अपायकारक असें वर्तन केल्यास जहागिरी जप्त करण्याचा महाराजाना हक्क आहे. मुआफी म्हणजे खासगी इनाम होत. खालसा म्हणजे खास दरबारच्या मालकीची जमीन. यावद्दल शेतकऱ्याकडून सारा घेण्याचा दरबारला हक्क आहे. हा सारा पैशाच्या रूपानें घेण्यात येत नसून, शेतातील धान्याच्या रूपानच घेण्यात येतो. उत्पन्नाच्या $\frac{1}{4}$ ते $\frac{1}{3}$ इतका सारा घेण्यात येतो. काहीं बाबतींत मात्र पैशाच्या रूपानें सारा वसूल केला जातो.

रजपुतान्यातील वीस संस्थानात या संस्थानाचा शिक्षणाच्या बाबतींत चौथा नंबर लागतो. या संस्थानातील सुशिक्षितांचें प्रमाण शेकडा ४.६ आहे. येथें २९ शिक्षणसंस्था असून पैकीं १७ सरकारी, दोन मिशनऱ्यांनीं चालविलेल्या व बाकीच्या खासगी आहेत. माध्यमिक शिक्षणाची अशी एकच सरकारी शाळा आहे.

संस्थानमध्यें एक मोठा दवाखाना व तीन छोटे दवाखाने आहेत. देवी काढण्याच्या बाबतींत हें संस्थान मागासलेलें आहे.

इ ति हा स.—किशनगड संस्थानचे अधिपती हे रजपुताच्या राठोड कुळांतील असून ते जोधपूरच्या राजा उदयसिंगाचे वंशज आहेत.

किसनसिंग कच्छवाह हा जोधपूरचा राजा उदेसिंग याचा नववा पुत्र होय. यानें किशनगड हें संस्थान इ. स. १६१३ मध्यें नवीन स्थापिलें. हा कच्छवाह कुळातील होता. हा जहांगीरच्या हाताखालीं नोकरीस होता. यानें आपली बहीण जहांगीर यास दिली होती. तिच्याच पोटीं शहाजहान झाला. खुर्रम (शहाजहान) यानें बाप (जहांगीर) विरुद्ध बंड उभारलें असता किसनसिंगानें त्याला सहाय्य केलें. प्रथम त्यानें जोधपुरच्या राण्याकडे—गजसिंगाकडे (हा किसनसिंगाचा पुतण्या होय) मदत मागितली, परंतु त्यानें दिली नाहीं. तेव्हा त्याचा दिवाण गोविंददास याजकडे मागितली, त्यानेंहि दिली नाहीं. त्यावर किसनसिंगाकडे मागितली. प्रथम किसनसिंगानें गोविंददासाचा खून केला व मग मदत केली. यावद्दल तो बक्षीस मागू लागला तेव्हा त्याला स्वतन्त्र संस्थान स्थापण्याची परवानगी मिळाली. त्यानें मारवाडच्या हद्दीबाहेर स्थळ पाहून तेथें एक नवीन शहर वसविलें आणि त्याला आपलेंच नाव दिलें. याचा प्रांत ओसाड असून त्यात जाट लोकांची वस्ती जास्त होती. याचा खून गुरजसिंग यानें केला असें म्हणतात (इसवी सन १६१५). याला सहसमल, जगमल व भारमल असे तीन पुत्र होते. भारमलचा मुलगा हरिसिंग व नातू रूपसिंग होय. या रूपसिंगानें रूपनगरचें राज्य स्थापिलें. [ टॉड–राजस्थान, इंपीरियल गॅझेटियर, एतद्देशीय राज्यें इति. बील–ओरि. बॉयो. डिक्श. ]

किसनसिंगाच्या मृत्यूनंतर आतापर्यंत त्याचे १६ वंशज गादीवर बसले. इ. स. १६४४ मध्यें रूपसिंग नावाचा एक

वंशज गादीवर बसला; तो शहाजहानचा फार आवडता असून त्यानें शहाजहानला त्याच्या स्वाऱ्यांत पुष्कळच मदत केली व त्यामुळें शहाजहाननें त्याला मांदलगड वगैरे बरीच जहागीर व ५००० सैन्याची सरदारकी दिली. किशनगडच्या गादीवर बसणारा सातवा राजा राजसिंग (१७०६-४८) यानें शहाआलम बहादुरशहा याला पुष्कळ मदत केल्यानें त्याला मालपूर, सलार इत्यादि जिल्हे बक्षीस मिळाले. पुढें बहादुरसिंगानें इ. स. १७६४-१७८१ पर्यंत राज्य केलें. या गादीवर बसणारा तेरावा राजा कल्याणसिंग (१७९७-१८३२) हा होय. याच्या कारकीर्दीत हें संस्थान ब्रिटिशांच्या आधिकारांत आलें. कल्याणसिंग हा अर्धवट माणूस असल्यानें त्याचें व त्याच्या हाताखालील सरदारांचें बिनसून तो दिल्लीला पळाला. पुढें ब्रिटिश सरकारनें त्याला अनेक प्रकारच्या धमक्या देऊन किशनगड येथें आणलें व त्याच्यामध्यें व सरदारांमध्यें कसाबसा सलोखा केला. इ. स. १८३२ मध्यें कल्याणसिंगानें आपल्या मुलाला (मोहकमसिंगाला) राज्य दिलें. मोहकमसिंगाच्या मागें त्याचा दत्तकपुत्र पृथ्वीसिंग हा राज्यावर बसला. हा मोठा धोरणी राजा होता. त्यानें आपल्या कारकीर्दीत संस्थानांत पुष्कळच इष्ट सुधारणा केल्या. पुढें पृथ्वीसिंगामागून शार्दूलसिंह हा गादीवर आला व त्यानें आपल्या बापाचें स्तुत्य धोरण पुढें चालू ठेवलें. इ. स. १८९२ मध्यें त्याला जी. सी. आय. ई. हा किताब मिळाला. तो १९०० सालीं वारल्यानंतर त्याचा मुलगा मदनसिंग हा गादीवर बसला. हाच हल्लीं संस्थानाधिपति आहे. सध्याच्या किशनगडच्या महाराजाला १७ तोफांची व के. सी. एस. आय. आणि के. सी. आय. ई. या पदव्या आहेत. दत्तक घेण्याचा अधिकार त्याला आहे. इ. स. १९१४-१५ सालीं मदनसिंग फ्रान्सच्या रणभूमीवर लढण्यास गेला होता.

श ह र.—किशनगड संस्थानच्या राजधानीचें शहर. हें राजपुताना-माळवा रेल्वेवरील स्टेशन असून अजमीरच्या ईशान्येस १८ मैलांवर आहे. किशनसिंगानें १६११ मध्यें हें शहर वसविलें. १९११ मध्यें या शहराची लोकसंख्या १०,४१८ भरली. गुंडोलाव सरोवराच्या काठीं हें शहर व याच नावाचा किल्ला वसलेला असून या सरोवराच्या मध्यभागीं मोहकम विलास नांवाचा बाग आहे. महाराजाचा राजवाडा किल्ल्यामध्यें असून तेथून आसपासच्या सर्व प्रदेशाचें निरीक्षण करतां येतें. सन १८८६ सालीं या शहराला म्युनिसिपालिटी देण्यांत आली. म्युनिसिपालिटीकडे शहराची दिवाबत्तीची तजवीज, आरोग्यरक्षणाची व्यवस्था व कत्तलखान्याची व्यवस्था सोंपविण्यांत आली आहे. शहरांत एक पोस्ट व तारायंत्र ऑफिस असून, दोन तुरुंग आहेत. शहरांत एकंदर ११ शाळा असून त्यांतील तीन सरकारी व २ मिशनऱ्यांनीं चालविल्या आहेत. सरकारी हायस्कूल, अलाहाबाद विश्वविद्यालयाला जोडलेलें आहे. शहराजवळ हल्लींच्या महाराजाच्या नावाची एक छोटीशी वसाहत वसली असून तिचें नाव मदनगंज आहे. या मदनगंजांत एक वाफेनें चालणारी कापसाच्या गठ्ठ्यांची व कापूस वठण्याची व विणण्याची गिरणी आहे. दोन साबणाचे कारखाने आहेत. याशिवाय चित्रकाम, रंगकाम, रत्नांना पैलू पाडण्याचें काम, पाणी पिण्याच्या भांड्यांचा कारखाना, इत्यादि कारखाने या शहरांत चालतात.

किशनचंद—हा दिल्लीचा रहाणारा असून कवि होता. काव्यांत यानें आपलें नांव इखलास असें दिलें आहे. याच्या बापाचें नांव अचलदास असून जात खत्री होती. याच्या घरीं विद्वानांची नेहमीं बैठक असे. यानें "हमेश बहार" (सततवसंत) नांवाचा तझकिर (चरित्रें) ग्रंथ इ. स. १७३३ त केला असून त्यांत जहांगीरपासून महंमदशहापर्यंतच्या कारकीर्दींत झालेल्या हिंदुस्थानांतील साधारण २०० कवींचीं अकारविल्हे चरित्रें दिलेलीं आहेत. याचीं इखलासखान अगर इखलासकेश अशीं हि नांवें आहेत. फारशींत हा निष्णात असून आलमगीरच्या हाताखालीं नोकर होता. त्यानेंच याला वरील पदवी दिली. फरुखसियरनें याला सातहजारी सरदार बनविलें. यानें त्या शहाची 'बादशहानामा' नांवाची एक बखर लिहिली आहे. [बील-ओरिएंटल बॉयाग्रा. डिक्श.].

किशोरगंज पो ट वि भा ग—पूर्वबंगाल व आसाम इलाख्यांतील मैमनसिंग जिल्ह्याचा आग्नेय भाग. या किशोरगंज पोटविभागाचें क्षेत्रफळ ९८५ चौरस मैल आहे. लोकसंख्या (१९११) ८,२२,७१९ होती. या पोटविभागांत किशोरगंज व बाजितपूर हीं दोन शहरें असून १५२८ खेडीं आहेत. हा अत्यंत दलदलीचा व वालुकामय प्रदेश आहे. मेघना नदी व तिला मिळणाऱ्या नद्या यांना पूर आल्यामुळें चोहोंबाजूला गाळ सांचून त्याचे थरच्याथर तयार होतात. हा गाळ फार सुपीक असतो. या पोटजिल्ह्यांत भैरवबाजार, करीमगंज व कातियादी या प्रसिद्ध बाजारपेठा आहेत.

श ह र.—किशोरगंज पोटविभागाचें मुख्य ठिकाण. हें कुंडालीखाल नांवाच्या नदीच्या काठीं वसलेलें आहे. याची वस्ती १९११ सालीं १८०७६ होती. किशोरगंज शहरीं जुलैच्या १५ तारखेपासून पुढें एक महिनापर्यंत कृष्णाच्या स्मरणार्थ झुलनजत्रा नांवाची एक मोठी जत्रा भरते. या शहराची तेथें होणाऱ्या मलमलीबद्दल फार प्रसिद्धि होती. ईस्ट इंडिया कंपनीची या ठिकाणीं एक वखार होती. १८६९ मध्यें शहराला म्युनिसिपालिटी देण्यांत आली. या शहरांत एक छोटासा तुरुंग आहे.

किष्किंधा.—तुंगभद्रेवरील अनागोंदी म्हणून जें प्रख्यात राजधानीचें शहर तेंच प्राचीन किष्किंधा होय असा सर्व साधारण लोकसमज आहे. परंतु सुग्रीवानें सीताशोधार्थ दक्षिणेकडे वानर पाठविले असतां त्यांस सांगितलें कीं, "विंध्यपर्वत, नर्मदानदी व दशार्ण हे देश शोधा." यावरून विंध्यपर्वताच्या उत्तरेस किष्किंधा असावी असें दिसतें. परंतु

विंध्य हें सामान्य नाम तत्काली दक्षिणेकडील बहुतेक पर्वतास लावीत असें वाटतें. दंडकारण्याच्या शेवटीं हा देश होता हें मात्र निश्चित आहे. भारतातील सहदेव दिग्विजयावरून किष्किंधा ही माहिष्मती ( नर्मदेवरील महेश्वर कीं म्हैसूर ? )च्या उत्तरेस होती असें ठरतें. येथें रामाच्या वेळीं वानरांचें राज्य होतें. वाली व सुग्रीव याच्या राज्यव्यवस्थेवरून व हनुमान आणि अंगद याच्या चातुर्यावरून वानर हा एक बराच सुधारलेला लोकसमाज होतासें दिसतें. पांडवांच्या वेळीं येथें मैंद व द्विविद हे वानर राजे होते असा उल्लेख आहे रामाच्या वेळींहि मैंद व द्विविद होतेच. कदाचित् त्या कुळातील राजे पांडवकालपर्यंत राज्य करीत असतील ह्युएनत्संग ज्या कोंकणपुराचें नाव ( कोंकण देशची राजधानी म्हणून ) देतो, तें दिशा व अंतर यावरून अनागोंदी ( किष्किंधा ) हेंच होय असें म्हणतात. अल्बेरूणीनें किष्किंधेस वानराचा देश म्हटलें आहे. मोनिअर विल्यम्सनें, वाली राजाच्या राज्याची राजधानी किष्किंधा असून तें राज्य ओढ्र ( उडिया ) देशात होतें असें म्हटलें आहे. बृहत्संहितेंत, आग्नेयीकडील प्रदेशात किष्किंध नावाचा एक पर्वत होता असें म्हटलें आहे. सारांश, अनागोंदी म्हणजे किष्किंधा होय अनेकांचें मत आहे [ प्रा कोश, बृ. संहि. अ १४; महा. भार. सभा प, अर्वा. कोश, भार सुवर्णन ]

**किसान**—यांची एकंदर संख्या ( १९११ ) ३,१३,८३६ आहे. बहुतेक किसान संयुक्त प्रांतातच आहेत. बंगाल बिहार-ओरिसामध्यें सुमारें ८० हजार आढळतात संस्कृत कृषाणम्हणजे नांगऱ्या यावरून हा किसान शब्द झाला असावा. किसानाचा धंदा शेतीचा असून संयुक्त प्रांतात ते गंगायमुनेच्या दुआबात आढळून येतात. हे लोक कुर्मी, कोएरी व कच्छी लोकांचे संबंधी आहेत. फरुकाबाद येथें त्यांना किसान महार म्हणतात व अयोध्या प्रांतात महातीय म्हणजे पुढारी म्हणतात. त्याच्या एकंदर ९ पोटजाती आहेत. त्या बाथाम, गद्दार, ढींढिय,हलदी, जारिय,खागी, ळोवा, पनारिया व सकसेन या होत.

पोटजातींतच लग्न केलें पाहिजे असा निर्बंध आहे. त्याच प्रमाणें बालविवाह व प्रौढविवाहहि रूढ आहेत. बहुपत्नीत्वास मुभा आहे. परंतु पहिल्या बायकोस संतति नसेल तरच ही सवड देण्यात येते. लग्नाचे एकंदर तीन विधी अथवा प्रकार आहेत. भनवार म्हणजे अग्नीच्या भोंवती प्रदक्षिणा घालणें हा प्रकार उच्च मानला जातो. डोला लग्नविधींत सर्व समारंभ नवऱ्याच्या घरींच करण्यात येतात. तिसरा प्रकार धारौण हा विधवाकरिता असतो. विधवेला नवऱ्याच्या धाकट्या भावाशींच पुनर्विवाह करतां येतो.

किसान हे हिंदु असल्यानें हिंदुदेवतांचीच पूजा करितात. परंतु आमदेहाच्या मियासाधूलाहि ते भजतात देवी व मिया यांना बकरीं अर्पण करून मास पाहिरांना व धानुकांना वाटतात. श्राद्ध करण्याचीहि त्यांच्यांत चाल आहे हे बकरीं,मासे व शेळ्या यांचें मास खातात पण हे लोक अन्यजातींबरोबर अन्नव्यवहार करीत नाहींत. ऊंस, तंबाखू व इतर धान्यें पिकवून ते आपला शेतकीचा धंदा आपल्या दर्जाप्रमाणें चालवितात.

बुदाउनमध्यें आढळणाऱ्या खागी नावाच्या पोटजातींतील लोक आपणास चौहाण रजपूत समजतात. परंतु ही गोष्ट वादग्रस्त आहे. अशी एक दंतकथा आहे कीं, कागा, व महेश असे दोन चौहाण रजपूत दिल्लीच्या बादशहाचे सुभेदार होते. सारा वसूली देण्याचें त्यांनीं नाकारल्यामुळें लढाई होऊन तींत ते मरण पावले. त्याच्या बायकांनीं रूढी विरुद्ध पुन्हा लग्नें केलीं पुनर्विवाहाला याच्यात ' काज ' असें स्थानिक नाव आहे, त्यावरून या पुनर्विवाहित संततीला खागी असें नाव पडलें. खागी हा संस्कृत खड्ग शब्दापासून झालेला शब्द आहे अशीहि कोणी व्युत्पत्ति लावितात. खेर नावाचा जुना किल्ला व लखापेरा नावाची आमराई ही जुनीं स्मारकें या लोकांचें प्राचीन वैभव दाखवितात खागी हे उत्तम शेती करणार असून मोठे उद्योगी आहेत [ क्रुक, सेन्सस रिपोर्ट ]

**कीकट**—एक प्राचीन राष्ट्र. ऋग्वेदात फक्त एकाच ऋचेंत ( ३. ५३. १४ ) या लोकांचा उल्लेख सापडतो त्या ठिकाणीं कीकट हे भरतशत्रू असून त्याचा अधिपति प्रमगंद होता असा कांहींच्या मतें अर्थ लागतो सायणासारखे कांहीं टीकाकार प्रमगंद म्हणजे व्याजखोराचा मुलगा असा अर्थ घेतात. यास्क म्हणतो कीं, कीटक हें एका अनार्य देशाचें नाव आहे ( निरुक्त ६. ३२ )

पुढील काळीं कीकट हें मगधाचें दुसरें नाव आहे असें समजूं लागलें वेबरचें म्हणणें असें पडतें कीं कीकट मगधातले पण अनार्य नसून आर्य होत. हे कीटकआर्य इतर आर्यांपेक्षा कांहींसे निराळे व पाखंडी मताचे असावेत ( इंडिश स्टुडिआ, १.१८६; इंडियन लिटरेचर, ७९ टीप ) ओल्डनबर्ग व हिलेब्रँट यांना ही वेबरची विचारपद्धति मान्य नाहीं.

रा. दा. पा. पंडित एका निराळ्याच भागाला कीकट देश म्हणत असून आपल्या वेदार्थयत्नात ( ऋ ३ ५३, १४ वरील टीपेंत ) पुढील उल्लेख करतातः ' बसईपासून उत्तरेला निर्मळ गावीं कार्तिक वद्य १०, ११ व १२ या तीन दिवशीं यात्रा भरते ती तेथें शंकराचार्यांनीं समाधि घेतल्याचें स्थळ आहे त्या स्थळीं भरते. ती समाधि घेतलेला देश कीकट होय असें म्हणतात.” पण हे मत कोणाला पटण्यासारखें नाहीं. कीकट म्हणजे मगध हेंच मत बहुमान्य आहे. याच कीकट (मगध) देशात गौतमबुद्धाचा जन्म झाला व बौद्ध संप्रदाय विकास पावला ( 'मगध पहा' ).

कीकटाचा आचार कसा प्रकार होता हें रा. चांदोरकरांनी बुद्धाच्या चरित्रात दिलें आहे ( बुद्धोत्तर जग, पृ. १४३-४४ ). कीकट म्हणजे कैकाडी असें रा वि का. राजवाडे

# कीटक




कीटकांची रचना.



कोळी.










कोळयाच्या शरीरातील विणकर.

(१ विणकरीरहित पोटाचा खालचा भाग. (अ) पूर्व, (आ) मध्य, व (इ) पार्श्वभागीय विणकर. २ मध्य-विणकरीतील एक (अ) बारीक विणण्याच्या नळ्या. (आ) नळ्यांतून बाहेर आलेले रेशमी तंतू.)




रेशमाचा किडा.



खरजेचा किडा.

[न-नर. म-मादी. आ-अळी. को-कोश. ग-कोशगर्भ.]

# कृमिसमूह



टेपकृमि.



जळू.



टेपकृमीचें डोकें.



नारू.



जंत.

याच्या प्रमाणें रा. चांदोरकरादि समजतात कीकट हा जिप्सी लोकांचा मूळ देश असें रा. राजवाडे म्हणतात.

**कीचक**—पूर्वी मत्स्यदेशाचा राजा जो विराट त्याचा कीचक हा सेनापति होता विराटाची राणी सुदेष्णा हिनें याला आपला ( मानीव ) भाऊ म्हणविलें होतें. हा केकय देशांतील असून सूत जातीचा होता असें त्याला द्रौपदीनें सूत या नांवानें भारतात संबोधिलें आहे त्यावरून दिसतें. याला १०५ कीचक ( अनुकीचक ) या नांवाचे भाऊबंद होते. हा शक्तिमान् व शूर होता. अज्ञातवासांत पांडव विराटाच्या घरीं होते त्यावेळीं द्रौपदीनें सैरंध्रीचा वेष घेऊन ती सुदेष्णेची दासी म्हणून राहिली होती. तिजवरील अतिप्रसंगा-मुळें यास भीमानें मारलें.

**कीचक जात**—कीचक या नांवाची एक जात आसामांत आहे. तेथील या जातीची लोकसंख्या सारी पाचशेच्या आंत आहे. ढाका जिल्ह्यांतील भग्याचीहि हीच जात आहे. या जातींतले लोक आरंभीं दरोडेखोर होते असें म्हणतात त्यांची वस्ती शिवसागरकडे असून हल्लीं ते चहाच्या मळ्यांत मजुरी करतात [सेन्सस् ऑफ इंडिया १९११, पृ. ३]

**कीटक अथवा षट्पद**-संघ संधिपाद वर्ग. सबंध प्राणिशास्त्रांत हा वर्ग अत्यंत मोठा आहे. झुरळें, टोळ, चतुर, माशा, पिसवा, पतंग, पिंगळ, पोरकिडे वगैरे सर्व प्राणी या वर्गांत मोडतात. सहा पाय ही या वर्गांतील प्राण्यांची विशेष खूण असल्यामुळें यांना षट्पद असें नांव देण्यांत आलें आहे. या वर्गांतील प्राण्यांच्या मुख्य खुणा म्हटल्या म्हणजे शीर्ष, वक्ष आणि उदर असे शरीराचे स्पष्ट रीतीनें व्यक्त असलेले तीन प्रदेश होत. शीर्षावर पृष्ठभागीं शृंगें व खालीं दंष्ट्रा, प्रथम पार्श्वौष्ठ व द्वितीयपार्श्वौष्ठ असे भाग लागलेले असतात. वक्ष पृष्ठावर पंखांची एक जोडी अथवा दोन जोड्या बहुधा असतात. श्वासोच्छ्वासाकरितां वातनलिकांचा व्यूह सर्व शरीरांत पसरलेला असतो.

परिपूर्णतावस्थेंतील रूपांतरें या वर्गांतील प्राण्यांत सामान्यतः दिसून येतात. ज्यांत अगदीं प्रथमावस्था म्हणजे अंडीं, त्यानंतर अळी अथवा सुरवंट, (ही सुरवंटावस्था अत्यंत खादाड असते ) पुढें कोश, या अवस्थेंत अळी स्वतःभोंवती कांहीं आवरण तयार करून त्यांत रहाते शेवटीं पूर्णावस्था. हीं रूपांतरें सर्व प्राण्यांत दिसून येतात असें नाहीं. झुरळ, टोळ, मखरया ( प्रेइंग मँटिस ) इत्यादि प्राण्यांत यांचा मागमूसहि नसतो.

कीटक वर्गांतील प्राणी जल, स्थल, आकाश वगैरे सर्व ठिकाणीं असतात.

कीटक वर्गाची सामान्य शरीररचना पूर्णपणें कळण्यास झुरळ याची शरीररचना पाहिलेली बरी. कारण झुरळ हा प्राणी त्या वर्गाचा प्रतिरूप मानल्यास वावगें होणार नाहीं. झुरळाविषयीं पूर्ण विचार केल्यावर या वर्गांतील इतर प्राण्यांतील फरक सहज समजण्यासारखे आहेत.



**झुरळ**—हा प्राणी सर्वत्र आढळून येतो. आपल्या इकडे स्वयंपाकघरांत, दुधदुभत्याच्या फडताळांत, अडगळींत, पुस्तकें, कपडे इत्यादींच्या पेट्यांत, संडासांत हा प्राणी आढळतो. झुरळाच्या निरनिराळ्या जाती आहेत किंत्येकांना पंख असतात तर कित्येकांना नसतात. कित्येक अगदीं सुरटी असतात.

एखादें झुरळ हातांत घेऊन पाहिलें असतां असें आढळून येईल कीं झुरळांत उभयपार्श्वसादृश्य दिसून येतें. अवयवांची जोडी असून पाय सहाच आहेत. झुरळवर्गाच्या प्राण्यांची हीच विशेष खूण आहे म्हणून यांना 'षट्पद' असें म्हणण्यांत येतें.

शीर्षाच्या पृष्ठावर एक जोड, चालावयाच्या संयुक्त पादांच्या वक्षाच्या उदरतलावर तीन जोड, उदरावर श्वसनरंध्रें आणि शरीराचे वक्ष, शीर्ष, उदर असे तीन भाग हीं यांचीं सामान्य लक्षणें होत.

झुरळांच्या सुमारें हजार जातींचें वर्णन केलें गेलें आहे. यांपैकीं साधारण पांच सहाच माणसाळलेल्या म्हणजे मनुष्यवस्तींत सांपडणाऱ्या आहेत. झुरळांची प्रवास करण्याची शक्ति अपूर्व आहे असें म्हणतात इलिझाबेथच्या कारकीर्दीपर्यंत इंग्लंडांत एक देखील झुरळ आढळून येत नसे आतां अमेरिकन, जर्मन व हिंदुस्थानांतील अशीं सर्व प्रकारचीं झुरळें तेथें आढळून येतात

मुंबईत या सर्व जातींची भरपूर वस्ती आढळते पुण्यांतहि हीं बरींच आहेत. रानटी जाती तर पुष्कळच आहेत. पंख नसलेली मोठी जात अथवा पंखांची जात सोडून विशेष चांगली अर्थात् पुढील वर्णन या जातीनाच लागू पडेल

झुरळें हीं निशाचर आहेत दिवसा फटींतून वगैरे लपून बसून रात्रीं भक्ष्यशोधनार्थ हीं बाहेर पडतात हीं इतकीं खादाड असतात कीं त्यांना सर्वभक्षक असें नांव दिल्यास कांहीं वावगें होणार नाहीं. वनस्पती, जोडे, पुस्तकें, कपडे वगैरे कांहीं त्यांच्या तडाक्यांतून सुटत नाहीं.

झुरळ हें कीटकवर्गाचीं जीं आठ अथवा नऊ निरनिराळीं कुळें ठरविलेलीं आहेत त्यांपैकीं 'ऋजुपक्ष' ( ऑर्थॉप्टेरा ) या कुळांत येतें. या 'ऋजुपक्ष' कुळास कीटकसृष्टींत ज्या चार रूपांतराच्या स्थिती अथवा आश्रम असतात ते आढळून येत नाहींत. कोश, अळी वगैरे भेद यांच्यांत आढळून येत नाहींत. झुरळाच्या अंड्याचा एखादा तपकिरीच्या डबीसारखा लहान कोश असतो. या कोशांतून पांढरें परंतु पूर्ण अशा स्थितींतच झुरळ बाहेर पडतें. त्यानंतर कांहीं वेळानें पूर्ण असें झुरळ लालसर तपकिरी रंगाचें बनतें.

*झुरळाची अन्न वगैरे खाण्याची क्रिया पहावयाची असल्यास थोडेसें अन्न घालून एका लहानशा काचेच्या पेटींत कांहीं झुरळें ठेवावीत. म्हणजे प्रथम शृंगानीं ( अँटेनी ) नंतर प्रथमपार्श्वौष्ठावरील स्पर्शेंद्रियांनीं ( मॅक्सिलरी पल्प ) तें चाचपून पहातात. मानंतर खाण्याची क्रिया दंष्ट्रांनीं .*

दोन्ही बाजूंनी कशी करतात हें पहावें. ही खाण्याची क्रिया आपल्याप्रमाणें अथवा उंदीर, ससा, बेडूक यांच्याप्रमाणें वरून खालीं जबडा मिटून होत नाहीं, तर दाराच्या फळी-प्रमाणें दोन्ही बाजू मिटून सेंकडा, झिंगे वगैरे प्राण्याप्रमाणें असते.

यानंतर श्वसनक्रिया पहाण्याकरितां उदराकडे वळावें. आपली जशी छाती श्वासोच्छ्वासामुळें लहान मोठी होत असते तसें झुरळाचें उदर लहानमोठें होत असतें. उदरातून हा श्वासोच्छ्वास होत असल्यामुळें ही उदराची खालींवर होण्याची क्रिया सुरू असते. झुरळाला हीं श्वसनरंध्रयुग्में एकंदर दहा असतात.

झुरळ मारावयाचें असल्यास त्यास प्रथम रुंद तोंडाच्या बाटलींत अथवा कांचेच्या पेल्यांत घालावें व नंतर क्लोरो-फार्म, पेट्रोल किंवा मेथिलेटेड स्पिरिट् याचे थोडेसे थेंब त्या बाटलींत टाकावेत म्हणजे थोड्याच वेळांत गुदमरून तें मरतें.

मेलेलें झुरळ हातांत घेऊन पाहिलें म्हणजे त्याच्या शरी-राचें कवच आपल्याला कठिण असें आढळून येईल. उदराचे भाग दहा असून ते वलयांकित असल्याचें दिसेल. झुरळाचें जें वरचें कवच तेंच त्याच्या अस्थी होत. झुरळ हा प्राणी अपृष्ठवंशांतील होय, आणि अपृष्ठवंशांतील प्राण्यांत एका मासळीशिवाय कोणालाच अंतरास्थी नसतात. सेंकडा वगैरे प्राण्यांत या बाह्यास्थी चुन्याच्या द्रव्याच्या असतात, तशा मात्र त्या झुरळांत नसतात.

येणेंप्रमाणें सामान्य विवेचन झाल्यावर आतां आपण झुरळाचे जे मुख्य तीन भाग त्यांपैकीं पहिल्या प्रथम उदर घेऊन तपासावयास लागूं.

उदराचे दहा वलयांकित भाग असतात हें पूर्वी सांगि-तलेलेंच आहे. आतां या प्रत्येक वलयाचे दोन भाग पडतात-पाठीकडील व पोटाकडील. पृष्ठाकडील भागाला पृष्ठवलयार्ध ( टर्गम ) व पोटाकडील भागाला अधो-वलयार्ध ( स्टर्नम ) असें म्हणतात. हीं वलयें मागील वलयांत पुढील वलय म्हणजे पोटक्यांत फोलाप्रमाणें बसलेलीं असतात. हे वलयांकित भाग जेथें एकमेकावर जातात त्या सर्वांमधील, त्याचप्रमाणें पृष्ठवलयार्ध व अधो-वलयार्ध ज्या ठिकाणीं संलग्न होतात तेथील बाह्यास्थींचे भाग मऊ असतात. पृष्ठवलयार्ध व अधोवलयार्ध यामधील या संधीस मृदंग असें म्हणतात.

उदर जरा ओढून वर करून पाहिलें असतां मृदंगांत असलेलीं श्वसनरंध्रें स्पष्ट दिसतील. उदरावर याचीं आठ युग्में असून वक्षावर दोन युग्में असतात.

कांहीं झुरळांत हीं दहाहि वलयें स्पष्टपणें दिसून येतात. कांहीं झुरळांत विशेषत: मादींत आठवा आणि नववा वलयां-कित भाग हे सातव्या वलयांकित भागाखालीं इतके दडून जातात कीं छेदनाशिवाय अगर ताणून पाहिल्याशिवाय ते दिसणें जवळ जवळ अशक्य असतें. दहावा म्हणजे शेवटचा वलयांकित भाग उचलून पाहिला म्हणजे गुदद्वार दिसून येतें. गुदद्वाराच्या दोन्ही बाजूस जे कठिण झालेले भाग असतात त्यांना गुदपत्रें अगर गुदपर्णें (पॉडिकलफ्रेट्स) असें म्हणतात. कांहीं जीवशास्त्रज्ञ या गुदपर्णांना अकरावा वलयांकित भाग मानतात. दहाव्या पृष्ठवलयार्धाच्या खालील बाजूनें दोन गुदस्पर्शक रोम (अ‍ॅनल सर्सी) बाहेर आलेले असतात. गुद-स्पर्शक रोम नर व मादी या दोघांतहि असतात.

अधोवलयार्धांतील प्रथमवलयार्ध अगदीं आदि-स्वरूपांत असतें. नरांत हीं नऊच दृष्टीस येतात. अधो-वलयार्धांतील नवव्यास बारीक असंयुक्त असे दोन 'कटक' झालेले असतात. हे कटक फक्त नरांतच सांपडतात; मादीला हे नसतात. गुदपर्ण व दहावा पृष्ठवलयार्ध भाग हे छेदिले म्हणजे आंत सूक्ष्म आंकडे असलेला असा भाग दिसतो तो दहाव्या अधोवलयार्धाची बाह्य वाढ असावी असें दिसून येतें. या वाढीचा उपयोग संयोगीकरण होतांना मादीचें जननेंद्रिय उघडण्याकडे होतो.

मादींत फक्त सातच अधोवलयार्धं दिसून येतात. बाकीचीं तीन जननविवर होण्याकरितां सातव्याखालीं झाकलेलीं असतात. सातवें अधोवलयार्ध मोठें असून बोटीच्या आका-राचें असतें. याचे दोन भाग उभे झालेले असतात. संयोगी-करणांत याचा उपयोग होतोच. शिवाय चिकटून बीजकोश ठेवण्यास नीट जागा सांपडेपर्यंत तो घट्ट धरून ठेवण्याकडेहि याचा उपयोग होतो. पुष्कळ वेळा हा बीजकोश जननविव-रांत धरून ठेविलेल्या स्थितींत दृष्टीस पडतात. नेहमीं झुरळाचें निरीक्षण केलें तर हा प्रकार सहज नजरेस येण्याजोगा आहे.

आठवा आणि नववा वलयांकित भाग सातव्याखालीं झाकला गेल्यामुळें त्याचे पृष्ठवलयार्धांचे भाग अत्यंत अरुंद झालेले असतात. मादींत आठव्या वलयांकित भागाच्या अधोवलयार्धावर एक उभें छिद्र असतें. हेंच बाह्य-योनीछिद्र होय. नववा अधोवलयार्ध भाग म्हणजे लहानशी बाकडी तबकडी असून हिच्यावर शुक्रकोश असतो. या शुक्रकोशांत नरामधील शुक्राचा संचय केला जातो. बीजकोश बाहेर येतांना या शुक्रकोशाजवळून जातो व तो तसा जात असतांना त्यांत शुक्रांतील सूक्ष्म शुक्रबीज प्रवेश करतात व नंतर फलद्रुपता होते.

अखिल कीटकवर्ग घेतला तरी त्यांत वक्षाचे तीन भाग असलेले आपणांस आढळून येतील. शीर्षाकडील प्रथम भागाला 'पूर्ववक्षवलय' असें म्हणतात. त्याच्या जवळचा भाग 'मध्यवक्षवलय' व नंतर उदराजवळचा जो वक्षाचा भाग त्याला 'अपरवक्षवलय' किंवा 'पश्चिमवक्षवलय' असें म्हणतात. उदराच्या वलयाप्रमाणें या वक्षाच्या वलयामध्येंहि दोन भाग दिसून येतात. पाठीकडील भागाला 'अधोवलयार्ध' असें म्हणतात. पूर्ववक्षवलयाच्या पृष्ठवलयार्ध

तिन्ही पृष्ठवलयार्धामध्यें सर्वांत मोठा असून पूर्वभागीं शीर्षावर पसरलेला असतो व पश्चिमभागीं मध्यवक्षवलयाच्या पृष्ठवलयार्धाला झांकून टाकतो. मध्यवक्षाच्या पृष्ठवलयार्धाच्या बाजूस प्रथमपक्ष असतात. ही पहिली पंखाची जोडी बरीच बळकट असून ती निव्वळ उडण्यास उपयोगी पडणारी अशी जी दुसरी पंखाची जोडी असते तिला झांकून तिच्या संरक्षणाचें कार्यहि ही प्रथमपक्षाचीच जोडी करते. दुसऱ्या पंखाची जोडी अपरवक्षपृष्ठवलयार्धाला चिकटलेली असते. ही पंखाची जोडी अगदीं पातळ व लिबलिबीत असून हिच्यावर ' शिरांचें ' अगदीं जाळें झालेलें दिसतें. छत्रीच्या काड्या ज्याप्रमाणें छत्रीला उपयोगी पडतात, त्याचप्रमाणें हें जाळें या पंखाना उपयोगी पडतें. उडत नसताना हे पंख घडीच्या पंख्याप्रमाणें एकमेकांवर झाकले जाऊन प्रथमपक्षाच्या जोडीखालीं ठेवले जातात.

या ठिकाणीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, या पंखावर जें आपण शिरांचें जाळें म्हटलें आहे त्याची ' सपृष्ठवंशांतील ' प्राण्याच्या शिरांशीं अगदीं तुलना करता यावयाची नाहीं. कारण या शिरा जरी रुधिरमार्ग म्हणून उगम पावलेल्या असल्या तरी त्याच्या बहुशः वातनलिका स्थापित झालेल्या असतात.

पंखाची उत्पत्ति प्राणिशास्त्रवेत्यानीं वायुनलिकेपासून ठरविलेली आहे. झुरळ चिरून पाहिलें म्हणजे श्वसनरंध्रानां जोडून असलेल्या ज्या वायुनलिका दृष्टीस पडतात व त्याचा जसा आकार, पोकळी इत्यादि सूक्ष्मदर्शकातून दिसतात, त्याचप्रमाणें पंखातील शिराच्या जाळ्याची रचना स्पष्ट दिसून येते. यावरून वरील म्हणण्यास बरीचशी पुष्टि येते. शिवाय उडावयाच्या वेळीं पंखात अशी हवा भरली गेली म्हणजे उडणें अर्थातच तितकें सोपें जाणार आहे.

आता प्रत्येक पक्षाच्या अधोवलयार्धावर एक एक पायाची जोडी असते. पूर्ववक्षाचा अधोवलयार्ध फार लहान असतो. मादीमध्यें पूर्णपणें व नरामध्यें अल्पांशानें मध्यवक्षाचा अधोवलयार्ध उभा दुभागलेला असतो. अपरवक्षाचा अधोवलयार्ध मात्र दोहोंमध्येंहि विभागलेला असतो.

सर्व कीटकवर्गांमध्यें फक्त सहाच पाय आढळून येतात. यावरून याला षट्पादवर्ग असें म्हणण्यात येतें. यापैकीं प्रत्येक पायाची जोडी वक्षाच्या प्रत्येक वलयाला एक एक याप्रमाणें जोडलेली असते. या पायाना चलनवलन करता यावें म्हणून ठिकठिकाणीं सांधे असतात.

पायाचे साधारणतः पांच विभाग असतात. पहिल्या भागाला कटिसंधि ( कोक्सा ), दुसऱ्यास द्वितीयसंधि (ट्रोकँटर ) व तिसऱ्यास उरुसंधि ( थाय ) व चवथ्यास जंघासंधि ( टिबिआ ) असें म्हणतात. शेवटीं अगदीं तळाशी अथवा कूर्चसंधि येतो. तळव्याचे सहा भाग असून गुळगुळीत भागावरहि झुरळास चालता यावें म्हणून त्यास काटेरी गिरद्या असतात. तळव्याच्या अगदीं शेवटच्या भागास नखाचा एक जोड असतो. व त्यामध्यें एक लहानशी गिरदी असते.

येथवर उदर व वक्ष याविषयीं विवेचन झालें. आता आपण राहिलेल्या भागाकडे वळूं. हा राहिलेला भाग म्हणजे शीर्ष होय.

वक्ष व उदर याचे निरनिराळे वलयांकित भाग आपणास नेत्रानीं सहज दिसण्याजोगे असतात. त्याप्रमाणें शीर्षामध्यें मात्र ते नसतात. पूर्णावस्थेंत तर हे भाग सहज दिसून येणें शक्य नसतें. गर्भाची वाढ होत असतानाच हे भाग स्पष्टपणें दिसून येणें शक्य असतें. आणि हें निरीक्षण करूनच प्राणिशास्त्रवेत्यानीं शीर्षाचे सहा भाग ठरविले आहेत ते असेः—( १ ) पहिल्या भागावर म्हणजे शृंगाच्या पुढें नेत्र असतात. ( २ ) शृंगें असलेला भाग. ( ३ ) पूर्वदंष्ट्राभाग--हा भाग गर्भवाढ होत असतानाच नाहींसा होतो. ( ४ ) दंष्ट्राचा भाग. ( ५ ) प्रथमपार्श्वोष्ठाचा भाग. ( ६ ) द्वितीयपार्श्वोष्ठाचा भाग.

सदरहूप्रमाणें डोक्याला आच्छादणारा जो कठिण भाग असतो त्यास ऊर्ध्वकपालकवच ( एपिक्रेनियम ) असें म्हणतात. या शीर्षकवचावर इंग्रजींतील वाय् या अक्षराप्रमाणें मधोमध संधिरेषा असते. मात्र ही संधिरेषा उलटी असते. म्हणजे तें अक्षर उलटें करून त्याचा जसा आकार होईल तसा ह्या संधिरेषेचा आकार असतो. या संधिरेषेचे खालील जे दोन पाय अथवा फाटे असतात त्याच्या दोन्ही टोकास दोन पांढरे वर्तुलाकृति अवयव असतात. या अवयवाचें कार्य काय असावें याविषयीं निश्चित असें कांहींच सांगता येत नाहीं. कित्येकाच्या मतें हे झुरळाचे साधे नेत्र असावेत तर कित्येक हें त्याचें घ्राणेंद्रिय आहे असें प्रतिपादितात.

संधीरेषेच्या खालील शीर्षाचा जो भाग असतो त्यास पुरःकपालकवच ( क्लायपिअस ) असें म्हणतात. या पुरःकपालकवचाच्या खालील बाजूस एक पदर जोडलेला असतो त्यास उर्ध्वोष्ठ ' असें म्हणतात. नतर नेत्राच्या मागें व खालीं असा आलेला जो भाग असतो त्यास ' कपोल ' असें म्हणतात.

शीर्ष हें वक्षाला अत्यंत लहान अशा मानेनें जोडलेलें असतें शीर्षाच्या दोन्ही बाजूस दोन काळसर भाग दिसतात ते दोन संयुक्त नेत्र होत. निरनिराळ्या नेत्राचा हा समूह असल्यामुळें यास संयुक्त नेत्र असें म्हणतात. यातील प्रत्येक नेत्र जर सूक्ष्मदर्शकातून पहिला तर त्याचा आकार षाट्कोनी पट्कोनी असल्याचें दिसून येतें

वरच्या बाजूनें उर्ध्वकपालकवच, खालच्या बाजूनें पुरःकपालकवच व बाहेरील बाजूनीं नेत्र याच्यामध्यें शृंग लागलेलें असतें. याचे सत्तर ते नव्वद संधिभाग असतात.

शाच्यावर पुष्कळ काटेहि असतात याचा उपयोग स्पर्शेंद्रियासारखा होतो काहीं शास्त्रज्ञ त्याचा उपयोग घ्राणेंद्रिय व कर्णेंद्रिय याच्याप्रमाणेंहि आहे असे म्हणतात साधारणत. सबंध कीटकसृष्टींत या शृंगाची एकापेक्षा अधिक जोडी आढळून येत नाहीं पुष्कळ वेळा नर की मादी हा भेद या शृंगावरून ठरविता येतो केवळ दृष्टीनें पाहू गेलें तर झुरळाच्या वरून कांहींच ठरविता येणार नाहीं तरी पण सूक्ष्म निरीक्षणानें हें शृंग नराला मादीपेक्षा लांब असल्याचें आढळून येईल. शिवाय या शृंगाच्या तळापासून तिसरा संधिविभाग मादींत नराच्या दुप्पट लांब असतो. शीर्ष, वक्ष व उदर या तिन्ही भागाचें बाह्य पर्यालोचन आता संपलें आता छेदनक्रियेकडे आपणाला वळावयाचें आहे.

प्रथमत आपण तोंडांतील निरनिराळ्या भागाकडे वळू तोंडाची पूर्वमर्यादा दर्शविणारा भाग म्हटला म्हणजे ऊर्ध्वोष्ठ ( लेब्रम ) होय त्याच्या खाली, दाढांची जोडी व त्याच्या खाली दडलेली प्रथमपार्श्वोष्ठाची जोडी खालीं झालेल्या आहेत त्यावरी पश्चिममर्यादा दर्शविणारा भाग म्हणजे द्वितीयपार्श्वोष्ठाची जोडी होय हे भाग नीटपण काढता येण्यास झुरळाचें तोंड वर पेल पाहिजे एवढ्याकरिता झुरळ चें आपण ज्या वर्डीत छेदन करणार ( अशा वडा पॅराफिन् अथवा मेण घालून केलेल्या असतात ) तींत त्याला उलटें टेकावें व पूर्ववक्षाच्या दोन्हीं बाजूंस पत्रवलयांपलीकडील दोन टाचण्या थोड्या तिरप्या ( त्यांची वरची टोकें शरीरावर येणार नाहींत अशा तऱ्हेने ) टोंचाव्यात नंतर तोंड थोडें ओढून अर्थात् मानेला थोडा ताण देऊन तिच्याहि एका अगर दोन्ही बाजूंना—ज्याप्रमाणें सोयीस्कर पडेल त्याप्रमाणें— टाचण्या टोंचाव्यात, म्हणजे तें त्याच स्थितींत स्थिर राहील नंतर धाकटा चिमटा घेऊन ( ज्या चिमट्याची टोंकें बारीक असतात ) त्यानें ऊर्ध्वोष्ठाच्या पुढून तो आंत घालून तो अवयव शक्य तितक्या सावधगिरीनें बाहेर आढून काढावा यापेक्षा प्रथम ऊर्ध्वोष्ठ चाकूच्या मदतीनें चिमट्यानें सोडवून घेतल्यास चांगलें यानंतर प्रथमपार्श्वोष्ठ ( फर्स्ट मॅक्सिला ) व दाढा ( मँडिबल्स ) सोडवून घ्यावींत ही सोडवून घेतल्यावर करसूक्ष्मदर्शकानें अथवा छेदनसूक्ष्मदर्शकांतून यांचे निरीक्षण करावें या दाढा ( मँडिबल्स ) म्हणजे झुरळाच्या दाढा होत. यामध्यें निरनिराळे विभाग नसतात त्या अत्यंत बळकट असून त्यांच्या आतील कडेला सहा अथवा सात दाते असतात त्या पुरःकपालफलक व ऊर्ध्वकपालफलकाच्या खालील टोंकाशी जोडलेल्या असतात

दोन्हीं पार्श्वोष्ठ पांचा तुकड्यांचे बनलेले असतात त्या प्रत्येकाला दोन भागाचा मूलसंधि ( प्रोटोपोडाइट ) असून त्याच्यापुढें अंतःप्रसर ( एंडोपोडाइट ) व बहिःप्रसर ( [illegible] ) मिळून त्याचे तीन विभाग असतात

मूलसंधि म्हणून जो भाग आपण म्हणतों त्याच्याच अंतःप्रसर व बहिःप्रसर या फांद्या असल्याचें दिसतें अंतःप्रसर भाग दोन अवयव मिळून झालेला असतो त्यास ' गॅलिआ लॅसिनिआ ' व 'लपार्सानिआ' असें म्हणतात मूळ संधीच्या भागाचे दोन उपभाग असतात त्यास सवसंधि ( कार्डो ) व ' स्तंभसंधि ( स्टिपिओ ) असें म्हणतात यातील ग्यालीआचा आकार गोल चपटा झालेला असून त्यावर कठिण असे केस असतात या ग्यालिआच्या योगानें लॅसिनिआचीं तीक्ष्ण टोंकें असतात त्यांचें सरंक्षण होतें बहिःप्रसर लॅसिनिआ व गॅलिआ जेथून निघतात त्याच्याजवळूनच म्हणजे स्तंभापासूनच निघतो याचे फिरून पांच तुकडे असतात प्रथमचे जे दोन भाग असतात ते फार लहान असतात व पुढचे तीन लांब लांब असतात या सर्व भागावर लहान लहान केंस असतात

द्वितीय पार्श्वोष्ठाकडे (सेकंड मॅक्सिलि) आता आपण वळू द्वितीयपार्श्वोष्ठ साधारणतः प्रथमपार्श्वोष्ठासारखाच असतो याचे मूळसंधिभाग मात्र एकत्र सांधलेले असतात त्यांचा दोन तुकड्यांची एक तबकडीच झालेली असते असें म्हटल्यास चालेल या तबकडीच्या भागांना ऊर्ध्वहनु (सबमेंटम्) व हनु (मेंटम्) अशीं नांवें आहेत हनु (मेंटम्) लहान असून त्यालाच अंतःप्रसर व बहिःप्रसर हे भाग जोडलेले असतात दोन्हीं अंतःप्रसरांना कधीं कधीं एकदम जिव्हिका ( लिगुला ) असें नांव देण्यात येतें यातहि लॅसिनिआ व पॅरोग्लॉसी असे प्रथमपार्श्वोष्ठाप्रमाणेंच दोन भाग असतात. बहिःप्रसराचे तीन तुकडे असून त्या भागाला ओष्ठस्पर्शेंद्रिय (लेबिअल् पल्प) म्हणतात

छेदनास आरंभ करण्यापूर्वी झुरळाचे पंख व पाय अजीबात कापून टाकून त्याचा पृष्ठभाग वर करावा व दोन्ही बाजूंनीं टाचण्या टोचून मेण घातलेल्या ताटलींत अथवा बुचाच्या लांब पसरट तुकड्यावर त्याला घट्ट बसवावें पुष्कळ वेळा मेण थोडें वितळवून त्यात खालचा भाग चिकटवून बसवितात या मेणात काजळ घातल्यास चांगलें कारण मागील बाजू काळी झाल्यामुळें झुरळाचे भाग स्पष्ट दिसून येतात. अशा रीतीनें झुरळ घट्ट बसल्यावर मग छेदनास आरंभ करावा पहिल्या प्रथम पृष्ठवलयार्ध व अधोवलयार्ध यामध्यें जी फट असते ती अगदीं हलक्या हातानें चिरून घ्यावी ही फट उदर व वक्ष यांच्या दोन्ही बाजूनें घ्यावी नंतर हलकेंच एकामागून एक तुकडा सोडवून टाकावा ही सर्व छेदनक्रिया पाण्यांत केल्यास फार चांगलें पाण्यात सर्व भाग जागच्या जागेवर राहून स्पष्ट दिसतात शिवाय वलयाचे भाग काढून टाकताना त्याच्याखालीं असलेलें हृदय जाऊं न देण्याची खबरदारी घ्यावी

ही पांच्या अर्धाकडील म्हणजे पृष्ठवलयार्धाकडील सर्व अर्धवलयें काढून टाकलीं म्हणजे झुरळाचें अंतःकपाट

होत जाताना हळूहळू त्याच्यात कल्क अथवा बलक जमत जाऊन चैतन्यकेंद्र दिसतासें होतें. या सर्व नलिका वरच्या बाजूनें बारीक धाग्यांशीं एकत्र मिळालेल्या असतात. अंडकोशातसें लहान असून आठव्या अधोवलयाधांरील योनींत तीं उघडतात. अंडकोशतसें एकत्र मिळण्याच्या पुढील भागीं म्हणजे नवव्या अधोवलयावर एक लहानशी पिशवी असते हाच शुक्रकोश होय शेवटच्या ज्ञानकेंद्राच्या जोडीजवळच मागील बाजूस हा असतो.

या शुक्रकोशाच्या मागील बाजूस पुष्कळसे फांटे फुटलेले व पांढरके असे तुकणपिंड असतात. याच्यांतून बीजकोश ज्या पदार्थाचा बनलेला असतो तो पदार्थ स्रवतो. यांतील डावीकडचा भाग उजव्यापेक्षा मोठा असतो.

ज्ञानेंद्रियव्यूह:—कीटकवर्गांतील ज्ञानेंद्रियव्यूह सामान्यपणें गांडूळ अथवा खेकडा या प्राण्यांतील व्यूहरचनेप्रमाणेंच असतो म्हणजे प्रत्येक भागाला दोन ज्ञानकंदाचे मणी असून त्यांतून ज्ञानरज्जू जात असतात. प्रत्येक वलयाला ज्ञानकेंद्राचा मणी बहुशः असतोच. मात्र कित्येकवेळा काहीं मणी एकत्र संघटित झालेले असतात

शीर्षामध्यें अन्ननलिका पार्श्वज्ञानरज्जूंच्या कमानीनें वेष्टित असते. हे पार्श्वज्ञानरज्जू मेंदूवत शीर्षज्ञानकेंद्राच्या जोडीपासून निघून अन्ननलिकेच्या खालील बाजूस दोहोंबाजूनें मिळतात. हे पहाण्याकरितां पुरःकपालकवच व उर्ध्वकपालकवच हे शीर्षावरील भाग चाकूनें कापून घेतले पाहिजेत. नंतर कपोल, दंष्ट्रा व पार्श्वोष्ठाचे काहीं भाग काढून टाकावेत. म्हणजे अन्ननलिकेसभोंवतालची कमान दिसून येईल.

हे सर्व भाग नीटपणें पहावयाचे असतील तर आलकोहलमध्यें घालून ज्याचे सर्व भाग कठिण झाले आहेत असें झुरळ घेतल्यास चांगलें

मेंदूवत शीर्षज्ञानकेंद्राची जोडी दोन ज्ञानकेंद्राचे गोलक बनून झालेली असते. या गोलकापासून नेत्र, शृंग वगैरेंना ज्ञानरज्जू जात असतात. यातूनच खालील बाजूनें ऊर्ध्वोष्ठाला ज्ञानरज्जू जातात. एवढ्यावरून मेंदूवत शीर्षज्ञानकेंद्राची जोडी तीन ज्ञानकेंद्राच्या जोड्या संयुक्त होऊन झालेली असावी असें अनुमान निघतें

मेंदूमधून निघणाऱ्या दोन्ही बाजूंच्या ज्ञानरज्जू अन्ननलिकेच्या खालीं येऊन एकत्र मिळतात. तेथें अन्ननलिकाधोज्ञानकेंद्राची जोडी असते. यांमधून तोंडाचे मागील भाग, दंष्ट्रा, पार्श्वोष्ठाच्या दोन्ही जोड्या यांना ज्ञानतंतू जात असतात यावरून हा ज्ञानकेंद्राचा गोलक देखील तीन भाग मिळून झाला असावा असें शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. यानंतर वक्षाच्या ज्ञानकेंद्राच्या गोलकांना सुरुवात होते.

छेदनानंतर ही ज्ञानकेंद्राची साखळी नीट दिसावी म्हणून पचनेंद्रियें व जननेंद्रियें वगैरे काढावीत. त्याचप्रमाणें स्नायू वगैरे भरडून टाकावेत अशा रीतीनें वक्ष व उदर याच्या खालच्या बाजूनें जाणारी ज्ञानकेंद्रांची साखळी स्पष्ट दिसूं लागेल.

वक्षाच्या प्रत्येक वलयांत ज्ञानकेंद्राच्या गोलकांची एक जोडी असते. उदरांत फक्त सहाच जोड्या सांपडतात. शेवटली जोडी सातव्या अधोवलयाधांवर असते. व हिच्यांतूनच मागील भागांना फांटे जातात.

उदरांतील निरनिराळ्या भागांना जाणारें देखील ज्ञानरज्जूचें एक जाळें असतें.

श्वसनेंद्रियें:—झुरळाच्या उदर व वक्ष यांच्यावर श्वसनरंध्रें असतात हें आपणास माहीत आहेच. या श्वसनरंध्रांना जोडून असणाऱ्या वातनलिका सर्व शरीरभर पसरलेल्या असतात. या वातनलिका शरीरांतून भागाभागांतून गेलेल्या असल्यामुळें प्राणवायूचा पुरवठा सर्व भागांस अगदीं प्रत्यक्षपणें मिळत असतो. या नलिकाहि एकमेकांत मिळून त्यांचें एक सर्व शरीरभर जाळेंच पसरलेलें असतें. अशा रीतीनें प्राणवायूचा पुरवठा असल्यामुळें रुधिराभिसरणाचा व्यूह अथवा शिरा धमन्यांचें जाळें असण्याची जरूरी नाहीं आणि याच कारणामुळें हृदयाशिवाय इतर रक्तवाहिन्या झुरळांत दिसून येत नाहींत

वातनलिका परिपूर्णतावस्थेंतील बाह्यास्तरापासून झालेल्या असतात. अर्थात चिटिनचें लवचिक व नागमोडी रीतीनें बनलेलें अंतरवेष्टन त्यांत झालेलें असतें. याच्यामुळें त्यांना ताठ उघडें रहातां येतें.

सूक्ष्मदर्शकांतून एखादी वातनलिका पाहिल्यास हें नागमोडी अंतर्वेष्टन स्पष्ट दिसून येतें.

जनन अथवा प्रजोत्पादन:—संयोगानंतर शुक्र मादींतील शुक्रकोशांत साठविलें जातें. अंडें ५ मि मि. लांब असून त्याला लालसर तपकिरी कवच असतें; व त्याच्या कडेच्या बाजूस अत्यंत सूक्ष्म अशीं छिद्रें असतात. योनींतून अंडीं बाहेर जातांना शुक्रकोशांतून शुक्रबीज येऊन या बारीक छिद्रांतून आंत जातात व गर्भाभिवन होतें.

एका वेळीं सोळापर्यंत अंडीं घातलीं जातात. हीं संयोगआकड्याच्या मध्यें पकडलीं जाऊन तुकणपिंडांतील तुकणाच्या साहाय्यानें त्यांच्या भोंवतीं एक कोश बनविला जातो. प्रथम हा बीजकोश मादी जननविवरामध्यें आठवड्यापर्यंत धरून ठेविते. नंतर चांगलीशी निवाऱ्याची जागा पाहून तेथें तो चिकटविते.

उत्तरयुरोपांत अंडीं एक वर्षपर्यंत उबलीं जात नाहींत परंतु हिंदुस्थानांत बीजकोश घातल्यानंतर एक महिन्याच्या आंत झुरळें बाहेर आलेलें दृष्टीस पडलें आहे. शैशवावस्थेंत याचा रंग पांढरा असतो. परंतु लवकरच तीं काळसर पिंगट अथवा तांबडीं व्हावयास लागतात. पंखाशिवाय त्याचे सर्व भाग मोठ्या झुरळाशीं जुळतात सर्व आयुष्यांत तीं सात वेळा कात टाकतात काहीं शास्त्रज्ञांच्या मतें हिंदुस्थानी झुरळें पूर्णावस्थेस येण्यास चार वर्षें लागतात परंतु हा सर्व परिस्थितीचा

प्रश्न आहे थंड हवेत पूर्णावस्था प्राप्त होण्यास उष्ण हवेतील कालापेक्षा जास्त काळ लागतो

वर्गीकरण —कीटकवर्गाचे एकंदर आठ गण पाडलेले आहेत, ते असे —

(१) हीनपक्ष (ॲप्टेरा)यास पख नसतात अगावर खवले अथवा केस असतात रूपातर अगदी होत नसतें क्वचित नेत्रहि नसतात उदराच्या शेवटी कित्येकाना लाब दान तीन केस असतात उदाहरण-कसर

ऋजुपक्ष (आर्थोप्टेरा) यास पखाच्या दोन जोड्या असून पुढल्याच्या खाली मागली जोडी झाकलेली असते पहिली जोडी कठिण असून दुसऱ्या म्हणजे उडण्याच्या उपयोगी असणाऱ्या पखाच्या जोडीचे रक्षण करण्याचे काम तिच्याकडे असतें. रूपातर अर्धवट होत असतें तोंडात चावून खाण्याच्या दाढा असतात उदा —टोळ, झुरळ, नाकतोडा

(३) शिराल पक्ष ( न्यूरोप्टेरा ). पातळ लवचिक पखाच्या दोन जोड्या, पखावर पुष्कळशा शिरा, तोंडात चावून खाण्याजोगी रचना रूपातर कधी पूर्णपणे होतें तर कधी अपूर्ण असतें. उदा -चतूर, वाळवी

(४) कवचपक्ष —(कोलिओप्टेरा ) याची पखाची पहिला जोडी अत्यत कठीण झालेली असते तोंडात चावून खाण्याची योजना केलेली असते रूपातर पूर्णपणे होत असतें उदा पिसू

(५) विरलपक्ष( हिमेनोप्टेरा) -पंख अत्यत पातळ तोंडात चावून चाटण्याजोगी रचना रूपातर पूर्ण होतें उ मधमाशी, गांधीलमाशा, मुगी

(६) अर्धकवचपक्ष -( हेमिप्टेरा ) तोडात टोचून शोषून घेण्याजोगी व्यवस्था पख कधी सारखे कधी विषम रूपातर अपूर्ण उदा ढेकूण, ऊवा

(७) द्विपक्ष ( डिप्टेरा ) -पखाची एकच जोडी तोंडात निव्वळ चावून शोषण्याजोगी रचना रूपातर पूर्ण उदा डास, माशी, पिसू इत्यादि

(८) सशल्क पक्ष ( लेपिडोप्टेरा )—पंखाच्या दोन जोड्या त्यावर चित्रविचित्र खवले पाखरांची चावचलाव नळीसारखी शुडा बनणें रूपातर पूर्ण उ पतंग [ लेखक— प्रो व्ही एन हाटे, प्रे टी जी यवलेकर ]

**कीटस् जॉन**—( इ स. १७९५—१८२१ ) एक इग्रजी कवि कीट्स या इग्लिश कवीचा जन्म लडन येथें झाला त्यानें लहानपणी थोडाबहुत वैद्यकीचा अभ्यास केला परतु काव्याकडे त्याचा लहानपणापासूनच फार कल होता त्याच सुमारास त्याची ली हट व शेले या कवींशी ओळख झाली व या ओळखीनें त्याला काव्यस्फूर्ति होऊन तो कविता करू लागला त्यानें प्रसिद्ध केलेली पहिली दोन पुस्तकें लोकाना फारशी पसत पडली नाहींत परतु त्याच्या तिसऱ्या पुस्तकाच्या प्रसिद्धीपासून त्याची उत्तम इंग्लिश कवींत गणना होऊं लागली तरी ' एडिंबिअन 'वरच ब्लॅक वुड व क्वार्टर्ली रिव्ह्यू या नियतकालिकातून फार कठोर टीका झाली त्यानें लिहिलेलें 'लॅमिआ' हें काव्य त्यातील लहान सहान दोषाकडे दुर्लक्ष केल्यास इग्लिश भाषेतील काव्यात फारच उत्तम ठरतें हायपेरिअन हें काव्यहि लॅमिआइतकेंच सरस आहे त्यानें लिहिलेल्या चतुर्दश चरणात्मक काव्यात ' ऑन फर्स्ट लुकिंग इन्टु चॅपमन्स् होमर ' हे सर्वांत उत्तम आहे ' ऑटम ' ' नायटिंगेल ' व 'मेलँकली ' हीं त्याच्या बोधपर लघुकाव्यात चागली समजतात. त्याच्या ' ओथो दि ग्रेट ' या खेळात अस लेल्या काही भे चीवरून या कवीला शेक्सपियरच्या बरोबरीचा म्हणण्यात फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं रसात्मक काव्यें या जगात पुष्कळ आहेत, परतु कीटसची काव्य या सर्वांत फारच मनोवेधक आहेत हा कवि निसर्गसौंदर्यप्रिय असून ग्रीक भाषेतील काव्याप्रमाणें याच्या काव्यातील विषय लोंउपता मर्यादित आहे

त्याच्या काव्यातील वैशिष्ट्य म्हणजे प्रबल वैषयिक कल्पना आणि सौंदर्यप्रेम फार चागल्या रीतीनें वर्णन करण्याची हातोटी आणि अतिशय कर्णमधुर अशी पद्यरचना हीं होत गरीबी प्रेमसबधात झालेली निराशा व आनुवशिक क्षयरोग यामुळें लहान वयातच याला मृत्यु आला याचा कविमित्र शेले यानें त्याच्या मृत्यूवर एक ॲडोनिस नावाचें काव्य लिहिलें आहे

**कीन चार्लस सॅम्युएल**—( इ स १८ ?-१८९१ ) सॅम्युएल ग्राउन कीन नावाच्या सॉलिसिटरचा मुलगा चार्लस कीन हा मोठा कलाभिज्ञ म्हणून प्रसिद्ध आहे इप्स-विचच्या शाळेंत शिकत असतानाच त्याचा कल, कलेकडे असलेला दिसून आला बापाच्या मृत्यूनतर लडन येथील एका वकिलाकडे त्यास पाठविण्यात आलें परंतु तो धदा त्यास कंटाळवाणा वाटला म्हणून पिलकिंगटन नावाच्या एका शिल्पज्ञाकडे तो शिकावयास राहिला तेथें हा फावल्या वेळेत ऐतिहासिक व नौकाविषयक चित्रें पाण्याच्या रगानें काढीत असे त्याच्या आईच्या खटपटीमुळें लाकडी खोदीव कामें करणाऱ्या मडळीकडे त्यानें पाच वर्षे उमेद वार म्हणून राहिलें ' दि ॲडव्हेंचर्स ऑफ डिक चाल्ड हिरोइन सर्व्ह ऑफ हिज अकल " या नावाच्या पुस्तकाचें दर्शनी चित्र हें चार्लसचें पहिलें चित्र होय पुढे त्यानें एक प्रकाशलेख्यगृह ( स्टुडिओ ) भाड्यानें घेतलें व ' इल-स्ट्रेटेड लंडन न्यूज " काढण्याच्या तो तयारीस लागला या वेळी तो क्रिपस्टन रस्त्यातील कलाभिज्ञ मडळीचा एक सदस्य होता १८५१ साली ' पच " पत्रातून तो प्रथमच लोकापुढें आला समव्यवसायी लोकात आनद व नैराश्य अशा सवेदना अगदीं एकाच वेळीं उत्पन्न करणारे त्याचे सर्वोत्कृष्ट गुण तो उमेदवारीच्या स्थितींत असतानाच दिग्द-र्शित होत असत १८७१ साली " वन्स ए वीक " या

नावाचें पत्र सुरू करताच कीनच्या चित्रांची सर्वत्र मागणी होऊं लागली. वरील पत्रांतील त्याची प्रसिद्ध चित्रें म्हटलीं म्हणजे चार्लस रीडच्या 'क्लॉइस्टर अँड दि हार्थ' आणि जॉर्ज मेरिडिथच्या 'इव्हॅन हॅरिंगटन्' नावाच्या पुस्तकामधील प्रसंगाचीं विविध चित्रें होत. कीनचा स्वरहि मधुर असल्यानें १८५८ सालीं जुन्या पद्धतीच्या गाण्याचा तो भाग्या बनला. ॲमेन चेंड किंवा मोरेमिन्स्ट्रल्स या संस्थेचा तो या नादामुळें सभासदहि झाला. पचवेणुवाद्य (बॅगपाइप) वाजविण्यातहि तो कुशल होता. १८६३ मध्यें आर्टीस क्लब स्थापन झाला त्यावेळीं कीन हा उत्पादकांपैकीं एक होता. १८६१ त जॉन लीच हा मोठा कलाभिज्ञ वारल्यामुळें कीनचा 'पंच' जास्त लोकप्रिय होऊं लागला. १८७२ त कीनचा जोसेफ क्रॅहॉल्स्टी ओग्स्टा सालीं या गृहस्थास येणत्याहि पाहि लेल्या किंवा ऐकिलेल्या विनोदात्मक प्रसंगाचीं टिपणें करून ठेवण्याची सवय होती. कीनला हीं टाचणें मिळालीं. 'पंच' मधील सुमारें २५० प्रसंगचित्र वरील स्फूर्तिजनक टिपणांवरून कीननें काढलीं आहेत. १८८१ सालीं अवर पीपल नावाचा एक ग्रंथ मॅक वरी अँड ॲग्न्यू कंपनीनें प्रसिद्ध केला. त्यात कीनचीं पंचमधील प्रसिद्ध चित्रें आहेत. १८८३ सालीं कीनला अजीर्ण व रक्तपित्त असे विकार झाले. १८८९ पर्यंत हे रोग वळवत गेल्यामुळें त्यास अति दुःख भोगावें लागलें, परंतु तें त्यानें धैर्यानें सोसलें. १८९१ च्या जानेवारीच्या पहिल्या तारखेस हा अविवाहित वृद्ध वारला. कीनला कसलेंच मार्गदर्शी पद्धतशीर शिक्षण मिळालें न हुतें तरी सुद्धां त्यास कलाभिज्ञाचा अग्रेसर असें म्हणता येईल इतकी कलाभिज्ञानमध्यें त्याचें उच्च स्थान आहे यांत शंका नाहीं. बहुजनसमाजाला त्याचीं कामें फारशीं आवडत नाहींत याचें मुख्य कारण कीननें वर्हाच्या बाबतींत दिसून येणारें रविदास्यविमोचन हेंच होय. जगाला काय रुचेल हें न पहाता दिसेल त्याची आहे त्याच स्थितींत हुबेहूब करावी असें कीनचें धोरण असे. चोहोंकडे सौंदर्य व अद्भुतता पसरली आहे असें त्याला स्पष्ट दिसत असे व दृष्टींतील गूढ विनोदाची प्रासंगिक छटा 'पंच' मधील त्याच्या चित्रांत उमटलेली दिसून येते. कुंचला व पेन्सिल यांत तो प्रवीण होताच परंतु खोदकामांत व टसे करण्याच्या कामांतहि त्याचें प्रावीण्य दिसून येतें.

कीफ, प्रांत — हा रशियाच्या नैर्ऋत्य भागांत आहे याचें क्षेत्रफळ १९,६८८ चौरस मैल आहे. हा प्रांत उच्चपठाराचा प्रदेश असून याची उंची पश्चिम भागात ५०० ते १००० फूट आहे. या प्रांतात पुष्कळ उपयुक्त खनिज द्रव्यें भूमीमधून काढली जातात. मध्य रशियांत ह्यासारखा समृद्धीचा प्रांत नाहीं. सन १९०४ मध्ये येथील लोकसंख्या ४०,४२,५२६ होती. येथील १,२६,००,००० एकर जमीनीपैकीं १,११,००,००० जमीन लागवडीखाली आहे. गहूं, राय, ओट, जव वगैरे धान्यें येथें मुख्यत्वेंकरून पिकतात. शेतीकरितां येथें उंटाचा उपयोग करितात. येथील मुख्य कारखाने साखरेचे व दारू गाळण्याचे आहेत. साखरेच्या कारखान्यांत सुमारें ८५,००० पासून ११,५०,०००टन साखर होते. आगगाडीचे दोन मुख्य रस्ते या प्रांतांतून आहेत. निपर व तिला मिळणाऱ्या दुसऱ्या नद्या यांतून जहाजें येतात. येथें व्यापार फार चालतो. फक्त नद्यांवरील वार्षिक व्यापार १ ००,००० स्टर्लिंगचा आहे.

शहर — कीफ हें रशियातील शहर असून त्याच नावाच्या प्रांताचें मुख्य ठिकाण आहे. हें नीपर नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर वसलेलें आहे. हे मास्कोच्या नैर्ऋत्येस आगगाडीनें ६२८ मैल आहे. या ठिकाणीं नीपर नदीची रुंदी ४०० पासून ९०० यार्ड असल्यामुळे येथें ती नाव्य आहे. या शहराच्या दक्षिण भागाच्यासमोर नीपर नदीवर एक तरता पूल असून त्याची लांबी अर्धामैल व रुंदी ५१॥ फूट आहे. कीफ हें रशियांतील अतिशय सुंदर शहरांपैकीं एक आहे. येथील शिक्षणसंस्थांची मध्यवर्ती दोन राजधान्यांच्या खालोखाल आहे. येथील विश्वविद्यालय १८३४मध्यें व्हिल्नाहून येथें आणण्यांत आलें. यांत २५०० विद्यार्थी असून येथें प्रयोगशाळा, वेधशाळा, व वाचनालयें चांगलीं आहेत. रशियाच्या साखरेच्या धंद्याचें हें मुख्य केंद्र असून त्या प्रदेशांतील सर्वसाधारण व्यापाराचेंहि हें ठिकाण आहे. हें स्टेनका या यात्रेकरितां प्रसिद्ध आहे. येथें दर वर्षी सुमारें २,५०,००० यात्रेकरू येतात. सन १९०२ मध्यें येथील लोकसंख्या ३,१९,००० होती.

८६४ सालीं कीफ शहर कि, रोक व खोरीव या बंधूनीं वसविलें. त्याच्या मृत्यूनंतर दोन व्हेरेंजिअनानीं त्याच वर्षांत घेतलें. ८८९ सालीं ओलेग यानें हें शहर घेऊन आपल्या राज्यधानीचें मुख्य शहर केलें. प्रिन्स व्लॅडिमर यानें ९८८ मध्यें आपल्या लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. ३०० वर्षे पर्यंत तें स्वतंत्र शहर होतें. ८० वर्षे पर्यंत (१२४०—१३२०) तें मंगोल लोकांच्या ताब्यांत होतें. २४९ वर्षे (१३२०—१५६९) हें लिथुॲनिअन संस्थानच्या ताब्यांत होतें व पुढें ८५ वर्षे पोलंडच्या ताब्यांत असून सन १६८६ मध्यें हें कायमचें रशियाला जोडण्यांत आलें.

कीर — एक शेतकरी जात. एकंदर हिंदुस्थानांत कीरांची ३५,७२९ संख्या (१९११) आहे. तीपैकीं निम्म्याहून जास्त राजपुतान्यांत आहे. यानंतर मध्यप्रांत व मध्यहिंदुस्थान यांतून प्रत्येकीं ६।७ हजार वस्ती आहे.

याचा महाभारतांत उल्लेख आढळत नाहीं. पुराणांतील ईशान्य विभागांतील एक राष्ट्र म्हणून यांचा उल्लेख आहे याचा येथील दानपत्रांत सातदेवानें कीर लोकांना जिंकलें असा उल्लेख आहे.

मध्यप्रांतांतील कीर स्वतःस रणथंभोराहून आलो असें म्हणवितात आणि तेथें वस्ती करून गेले. अनेक जिल्ह्यांत त्यांच्या

तरी यांनीं आपली मारवाडी भाषा कायम ठेवली आहे. किराडाचा व यांचा निकट संबंध आहे. इ. स. १९०१ च्या खानेसुमारींत यांचा किराडांतच समावेश केला होता. यांच्यात १२ गोत्रें आहेत. तीं नमचुरिया, दैमा, बनिया, बामन, नायर, जाट, हुवाड, गाड्डी, लोहारिया, हेकऱ्या, मोचीं व माळी हीं होत. भाट हें अर्थें गोत्र समजलें जातें. यांच्या निरनिराळ्या धंद्याच्या नांवारून यांचीं गोत्रें पडलीं व जात तयार झाली. स्वतःच्या किंवा आईच्या गोत्रांत विवाह करूं नये असा यांच्यांत नियम आहे.

यांच्यांत बालविवाहाची चाल आहे अत्यंत गरीब माणसांच्या मुलींच्या लग्नास वर्गणी करून मदत देतात. यांच्या लग्नाच्या दिवशीं वर रेड्यावरून वधूकडे जातो. विधुरास प्रथमवराच्या दुप्पट लग्नखर्च करावा लागतो. यांच्यांत पुष्कळ बायका केल्या तरी चालतात विधवाविवाहासहि मोकळीक आहे. पंचास भोजन व विधवेस दागाने व नवीं वस्त्रें देऊन विधवाविवाह होतो.

हे भैरव व देवीची पूजा करतात. यांचें प्रत्येक गोत्र देवीच्या निरनिराळ्या स्वरूपाची आराधना करतें. व आपल्या देवतेची प्रतिमा ताईतात कोरून गळ्यांत घालतात. हे गाईची व पिंपळाची पूजा करतात. कीर आपली गाय घसायास विकीत नाहींत. यांचा मंत्र व जादू वगैरेवर विश्वास आहे. भारणी टाकून हे देवाकडून व सर्पाकडून आपली कामें करून घेतात असें ऐकण्यांत आहे. दिवाळींत शीतला आंठ म्हणजे अष्टमीस यांचा मोठा सण असतो. कीर लोक प्रेतें दहन करतात. मुलांचें नांव सातव्या दिवशीं ब्राह्मणाकडून ठेवतात. मूल झालें म्हणजे लहान दीर बाळंत भावजयीचा लहंगा धरून बसतो व ती त्याला कांहीं रुपये देई पर्यंत तो सोडीत नाहीं. या चालीचा जर कांहीं अर्थ असला तर तो असा असावा कीं पूर्वी सर्व भावांची एकच बायको असण्याची चाल मोडत चालली तेव्हां दिराने हें मूल माझेंच आहे असा तंटा न करावा म्हणून त्याला संतुष्ट करण्याकरितां कांहीं तरी लांच देण्याचा हा प्रकार आहे. हे दर्यारिया नम्हणाच्या हातचेंच जेवतात व बोकडाचें मांस व मासे खातात. जातींचेचालीकडे साधारण तटे मोडण्याचें काम असतें. कीर लोक नदीकाठीं राहतात. यांना बाजरी फार आवडते व हे रेड्यावर बसण्याचे शौकी आहेत [ रसेल व हिरालाल ].

**कीरतपूर**—संयुक्त प्रांतांतील बिजनोर जिल्ह्याच्या नजीबाबाद तहशीलींतील एक गांव बिजनोर शहरापासून उत्तरेस दहा मैलांवर वसलेलें आहे या गांवाची लोकसंख्या १९०१ सालीं १३,९०२ इतकी होती. कीरतपूर खास व कीरतपूरवसी असे या गांवाचे दोन भाग असून कीरतपूर खास हा भाग १५ व्या शतकांत बहलोल लोदीनें वसविला व कीरतपूरवसी हा भाग १८ व्या शतकांत पठाणांनीं वसवून तेथें एक किल्लाहि बांधला या किल्ल्याच्या मोडकळीस आलेल्या भिंती अद्यापिहि येथें आहेत व या भिंतींच्या आंत एक सुंदर मशीद आहे. येथें व्यापार विशेष नाहीं पण लाखेचें रोगण लावलेल्या खुर्च्या व पेट्या येथें तयार होतात. येथें डिस्ट्रिक्ट बोर्डातर्फे एक शाळा सुरू आहे. शिवाय सहा खासगी शाळा आहेत अमेरिकन मेथॉडिस्ट मिशन या संस्थेची येथें एक शाखा आहे.

**कीरथर**—ही पर्वताची रांग असून सिंध व बलुचिस्तानातील झलवान देश यांच्यामधील सरहद्द बनलेली आहे. जेथून मूळ नदी कच्छच्या मैदानांत वहात जाते त्या पर्वताची रांग आपल्या अंकाशी समांतर अशा शाखांसह १९० मैल दक्षिणेकडे गेलेली आहे. मधूनमधून इतर पर्वताच्या रांगा हि यांच्यामधून गेलेल्या आहेत. या पर्वताच्या रांगेचे मुळके आमेरीकडे कराची जिल्ह्यांत गेलेले आहेत. तरी पण कांहीं टेंकड्या केप मॉन्झेपर्यंत पसरलेल्या आहेत. या पर्वताची सर्वांत मोठी रुंदी म्हणजे २० मैल आहे व यांचें सर्वांत उंच शिखर झरदक असून त्याची उंची ७४३०फू. आहे. दुसरें सुंदर शिखर कुत्ताकबर (कुत्र्याचें थडगें) या नांवाचें असून त्याची उंची ६८७८ फूट आहे या पर्वताची मुख्य शाखा म्हणजे 'लखी' ही होय करियर पर्वताच्या रांगामधून कोलाची अगर गाज ही नदी वहात गेल असून त्यामुळें या पर्वताची मोठमोठीं खोरीं बनलेलीं आहेत व दूरबाव, फशी, रोहेल, व गरे हे मोठमोठे घाट आहेत या पर्वताच्या टेंकड्यांच्या प्रभागावर नारी व गाज नद्यांच्या मधील पाषाण तृतीययुगांतील असून शिवाय येथें राठोळे खडूचे दगड देखील भरपूर सांपडतात नारी नदीमधील तृतीययुगांतील पाषाण नाड खडूचे बनलले आहेत व गाज नदीमधील पाषाण काळसर निळसर खडूच्या दगडाचे बनलेले आहेत. कीरथर रांगेमध्यें मरी, जमाली, बरोच, जमोट, छूटजाट हे लोक असून शिवाय खिद्रानी व सासोली नाहुइ जातीचे लोकहि येथें आढळतात. यांचा धंदा मेंढपाळी असून शिकार हे यांच्या आवडीचा धंदा आहे. सापडणाऱ्या 'राजताड' याची निगा करतात. शिवसर्प आढळतात 'ऐबक' यांच्याची जात व डोंगराळ बकरीं हीं या पर्वतांत मुबलक आहेत. तसेंच काळीं अस्वलें व चित्तेहि मधून मधून आढळून येतात.

**कीर्तन**—भक्तीच्या ज्या नऊ पायऱ्या ('श्रवणं कीर्तनं विष्णोः' इत्यादि) सांगितल्या आहेत. त्यांपैकीं कीर्तन ही दुसरा पायरी आहे कीर्तन करणें ही एक उपासनाच आहे असें 'सततं कीर्तयन्तोमां' या वाक्यावरून म्हणण्यास हरकत नाहीं. भगवंताची भक्ति करून त्याच्या चरित्राचें गायन करणें हें जरी कीर्तनाचें मुख्य अंग असलें तरी जगाला सन्मार्गाला लावणें, त्याला यथायोग्य उपदेश करून हें प्रवर्तित झालेलें अनादि चक्र यापुढेंहि तसेंच चाललें पाहिजे अशी व्यवस्था करणें, हाहि कीर्तनाचा एक प्रधान हेतु आहे. तो हेतु साधण्याकरितां म्हणून कीर्तनांत देवाच्या व भक्तांच्या

निरनिराळ्या कथांचा आदर्श पुढें ठेवण्याची रीत पडली आहे.

हा संप्रदाय फार प्राचीन आहे. याचे आद्यगुरू नारद होत. भक्तांत भगवद्भक्त ध्रुव, प्रल्हाद इत्यादिकांचे नारद हे गुरु होत. कीर्तनपरंपरा महाराष्ट्रांत जितकी रुजली इतकी ती इतरत्र हिंदुस्थानांत रुजलेली आढळत नाहीं.भजन करण्याची रीत मात्र सर्वत्र आहे. वारकरी संप्रदायानें ही चाल जास्त जोरानें उचलून धरिली. तत्पूर्वी मध्यकालांत ती असल्याचा ऐतिहासिक दाखला आढळत नाहीं या संप्रदायांतील ज्ञानेश्वर, नामदेव, भानुदास हे पहिले कीर्तनकार होत. नामदेवाचें कीर्तन फार प्रेमळ असे. 'नामदेव कीर्तन करी, पुढें नाचे पांडुरंग' हा अभंगचरण यास आधार आहे. नामदेवाच्या पुढें तुकारामानें कीर्तनाचा प्रसार जास्त केला. श्रीसमर्थ रामदास व त्यांचे बहुतेक शिष्य कीर्तन करीत असत. इतर शिष्यांचें असो, पण खुद्द शिवछत्रपति यांनीं एकदा कीर्तन केल्याचा उल्लेख आढळतो मराठी मुलखांत कांहींनीं कीर्तन केल्याचा दाखला सांपडतो. महादजी शिंदे, परशुरामपंत प्रतिनिधि, सदाशिव माणकेश्वर यांनीं कीर्तन केलं होतें.

बंगालमध्यें "कीर्तन" म्हणजे एक निराळीच चीज आहे. एक पुढारी दोन चार शब्द उच्चारतो व इतर मंडळी त्याचा पुनरुच्चार करतात. महाराष्ट्रांतील कीर्तनांत ईश्वरस्तुति, भक्ति व वेदांत यांचें विवेचन व विशिष्ट कथेचें निरूपण हे विषय असतात. कीर्तनानें स्वतः पवित्र होऊन जगास वळण लाविता येतें. सामान्य जनसमूहाला स्वकर्तव्याची जाणीव करून देण्यास उत्तम कीर्तन करणाऱ्या हरिदासाची फार जरूरी असते. कीर्तन हें एक लोकजागृतीचें अत्यंत सुलभ व सद्यः फलदायी असें साधन आहे. सांप्रत वर्तमानपत्रें, मासिकें, व्याख्यानें हीं जी लोकांना ज्ञान करून देण्याचीं साधनें आहेत तसें पूर्वीच्या काळीं कीर्तन हें एक प्रमुख साधन होतें. हल्लींहि त्याचा उपयोग वरील वर्तमानपत्रादि साधनापेक्षां जास्त होतो. वर्तमानपत्र वगैरेंचा उपयोग सुशिक्षित (परंतु अत्यंत अल्प) समाजासच होतो, परंतु अशिक्षित समाजाला कीर्तनासारख्या व पूर्वीपासून आपल्यांत असल्यामुळें परिचयाच्या असलेल्या कीर्तनसंस्थेचा फार उपयोग आहे.

हरिदास मात्र बोलण्याप्रमाणें वागणारा पाहिजे, नव्हे आधीं वागून मग तसें बोलणारा पाहिजे, म्हणजे त्याच्या सांगण्याचा परिणाम श्रोत्यांवर होतो. तो अल्पसंतुष्ट असावा, व वर्तनानें अत्यंत निर्मळ असावा 'अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ' असा तो असावा. त्यानें मोलानें कीर्तन करूं नये विष्णुभक्ताला कीर्तनांतील विद्यांची जरूरी नसावी. कारण मोल घेऊन केलेल्या उपदेशाला महत्व रहात नाहीं असें सांगण्यांत येतें. पेशवाई नष्ट होण्यापूर्वी हरिदासांची साधारण प्रवृत्ति मोलाशिवाय कीर्तन करण्याकडे होती. हल्लीं परिस्थितिभेदामुळें हरिदास बिदागी घेऊं लागले आहेत. पण त्यामुळें निस्पृहता सुटते व दात्याच्या कलाप्रमाणें उपदेश करावा लागतो.

कीर्तनाला कोणत्या उपांगाची जरूरी आहे, तीं अंगें समर्थांनीं सांगितलीं आहेतः 'कथा अन्वय लापणिका । नामघोष करतालिका " तसेंच "तालमृदंग हरिकीर्तन । संगीत नृत्य तानमान । नाना कथानुसंधान । तुटोंचि नेदावें" म्हणजे कीर्तन सर्वांगपूर्ण असावें. त्यांत सर्व रसांचा यथायुक्त परिपोष करावा. शृंगाररस असल्यास हरकत नाहीं, मात्र तो तारतम्य सांभाळून सभ्य रीतीचा असावा. पूर्व व उत्तररंगाची जुळणी बेमालूम असावी. श्रोते तल्लीन होतील असा रंग भरला पाहिजे. 'श्रोत्यांचीं श्रवणपुटें, आनंदें भरावीं' असा समर्थांचा आदेश आहे. तालसुराचें ज्ञान नसणाऱ्यानें कीर्तन करूं नये. तसेंच संस्कृत भाषा, न्याय व्याकरण, वेदांत, अलंकार, पुराणें, मराठी कवींच्या कविता, थोडेंबहुत हिंदी काव्य (आणि आधुनिक हरिदासास तर) कार्लाइल, कान्ट, स्पेन्सर वगैरे पाश्चात्य तत्वज्ञांचें तत्वज्ञान, बायबल, कुराण वगैरे धर्मग्रंथांची माहिती व प्रचलित सामाजिक, राजकीय व धार्मिक विषयांची ओळख, इतिहासाचें-विशेषतः स्वदेशाच्या—ज्ञान इत्यादि बाबींची माहिती हरिदासाला आज अवश्य पाहिजे. यावरून हरिदासाचा अधिकार मोठा आहे हें उघड दिसतें. 'वक्तृत्वाचा अधिकार, अल्पास न घडे सत्योत्तर, वक्ता पाहिजे साचार, अनुभवाचा' असें हरिदासवर्णन समर्थांनीं केलें आहे. हरिदास हा या प्रकारें एक देशाचा सेवकच असल्यानें त्यानें देशपर्यटण करण्यासाठीं स्वतःचें शरीर मजबूत ठेवलें पाहिजे. जुन्या ऐतिहासिक गोष्टी सांगून व त्या वर्तमान परिस्थितींत कोठें व कशा लागू पडतात हें दाखवून चालू स्थिति कशी पालटली पाहिजे हें सुलभपणानें हरिदासानें श्रोत्याच्या मनावर बिंबविलें पाहिजे.

श्री. बाळासाहेब पंतप्रतिनिधी हे (शके १८४३ तील) सहाव्या कीर्तनसंमेलनाचे अध्यक्ष असतांना त्यांनीं केलेली 'सार्वजनिक हितासाठीं सार्वजनिक खर्चानें प्रत्येक जिल्ह्यांत निदान चार तरी हरिदास नियोजित करून त्यांच्या द्वारां जिल्ह्यामध्यें सर्वत्र उपदेशाचें काम करविल्यास फार मोठें कार्य होईल,' ही सूचना लक्षांत घेण्यासारखी आहे.

गेल्या शतकांत महाराष्ट्रांत पुढील नामांकित कीर्तनकार होऊन गेले. अनंतफंदी, रामजोशी, विठोबा अण्णा दफ्तरदार, श्रीपतीबुवा, मदनाळकर, सांगलकर, नाशिककर, व अगदीं अलीकडील प्रसिद्ध हरिदास गणेशशास्त्री मोडक, रामचंद्रबोवा काशीकर,रामदीक्षित अफळे माहुलीकर,नारायणबोवा फलटणकर व काशीनाथबोवा मसूरकर व चाफेकर हे होत. रामदीक्षितांचें प्रासादिक कीर्तन, नारायणबोवांचें श्रवणमधुर गायन व काशीकरांचें जोड भाऱ्यांनीं कीर्तन हीं महाराष्ट्रीय श्रोत्यांच्या स्मरणांतील आहेत. मदनाळकर

या हरिदास घराण्यापैकी यशवंतबोवा मल्हनाळकर यांनी मुंबईस 'हरिकीर्तनालय' नावाची एक संस्था स्थापन केली होती व कीर्तन नावाचें एक मासिकहि चालू केलें होतें. परंतु यशवंतबोवा वारल्यामुळें तें बंद पडलें.

सध्या महाराष्ट्रांत एक कीर्तनसंस्था असून तिचीं संमेलनें बहुधा दरवर्षी भरत असतात. कीर्तन हें लोकसमाजास उपयुक्त कसें होईल या प्रकारचें शिक्षणहि सदर संस्थेंत देण्यांत येतें. दक्षिणेकडे तेलंगणांत व कर्नाटकांतहि कीर्तनांची चाल आहे. ती तिकडील आळवार या पंथांतील साधूंनीं प्रचलित केली असें म्हणतात.

**कीर्तने, निळकंठ जनार्दन.**—हे विनायक जनार्दन कीर्तने याचे धाकटे बंधु होते. यांनीं देवास संस्थानची दिवाणगिरी केली यांना मराठ्याच्या इतिहासाची फार कळकळ असे. ग्रांट डफ साहेबाच्या इतिहासावर सरसरीत टीका यांनीं केली आहे. मन्हार रामराव कृत शिवाजींचें सप्तप्रकरणात्मक चरित्र यांनीं प्रसिद्ध केलें. व न्या. रानडे यांना मराठ्याचा इतिहास लिहिण्यास सामग्री मिळवून दिली. हे मोठे विचारी लेखक होते. सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांत याचे कांहीं निबंध आहेत. मृत्यु १८९६.

**कीर्तने, विनायक जनार्दन.**—सन. (१८४०–१८९१) कऱ्हाडे ब्राह्मण. जन्म राजुरी (पुणें जिल्हा) येथें. याचें प्राथमिक शिक्षण कोल्हापूर येथें झालें. वयाच्या १९ व्या वर्षी यांनीं एक निबंध लिहिला, व त्याची फार तारीफ झाली, १८५६ त हे मुंबईस शिकावयास आले. १८५९ त हे प्रवेशपरीक्षा पास झाले. पुढें अपयश आल्यानें यांनीं शिकणें सोडलें व शाळाखात्यांत नोकरी पत्करली. यांनीं १८७० मध्यें थोरले माधवराव व दोन वर्षांनीं जयपाळ हीं नाटकें लिहिलीं. जयपाळाचें संविधानक 'ओल्ड टेस्टॅमेंट' मधील जॉबच्या चरित्रातून घेतलेलें दिसतें. हीं दोन्हीं नाटकें मराठींत पहिलीं म्हणून गणलीं जातात. पण हें सर्वांशीं खरें नाहीं. १८६५ त कीर्तने इंदुरास जाऊन युवराज शिवाजीराव याचे शिक्षक झाले, १८७२ त दिवाण सर टी. माधवराव याच्या वशिल्यानें ते दुसरे न्यायाधीश झाले. १८७५ त माधवरावाबरोबरच ते बडोद्यास नायब दिवाण म्हणून गेले. १८७७ त यांना रावबहादुरची पदवी मिळाली. बडोद्यास दिवाणगिरी मिळेलसें दिसेना तेव्हा यांनीं बडोदें सोडलें. यावेळीं शिवाजीराव इंदूरच्या गादीवर बसले होते. त्यांनीं दिवाणगिरीचीं वस्त्रें आपल्या गुरुजीस देऊं केलीं. तेव्हा १८८८ त पुन्हा इंदुरास दिवाण म्हणून हे आले. १८९० त होळकराचा आणि याचा बेबनाव होऊन यांनीं इंदूर सोडलें व पुण्यास वस्ती केली. त्या ठिकाणीं शारीरिक व मानसिक दुःखानें क्षंगत जाऊन १८९१ च्या डिसेंबरांत ते वारले. वीस एकवीस वर्षांच्या उमेदींत जयपाळ व थोरले माधवराव हे जे ग्रंथ त्यांनीं लिहिले त्याहून सरस अशी ग्रंथरचना पुढें त्याच्या हातून झाली नाहीं. मालकमच्या 'मध्यहिंदुस्थान' या ग्रंथाचें कीर्तन्याचें भाषांतर अगदीं नीरस वठलें अशी टीका रा. वि. मो. महाजनी करतात. [वि. विस्तार, पु. ३८ पा. ९२.]

**कील**—बाल्टिक समुद्रावर असलेलें जर्मनीचें मुख्य आरमारी बंदर. लोकसंख्या (१९१०) २,११,६२७. हें कील बंदराच्या दक्षिण टोंकास रमणीय जागीं वसविलेलें असून हॅम्बर्गच्या उत्तरेस आगगाडीच्या रस्त्यानें ७० मैलावर आहे. कसब्यामध्यें १३ व्या शतकांत बांधलेला एक राजवाडा आहे. ह्याला १८ व्या शतकांत वाढवून मोठा केला इ. स. १८३८ मध्यें आग लागून हा जळून गेला होता, तरी हा पुन्हा बांधला. उत्तरेस उपसागराभिमुख असें १६६५ त स्थापलेलें क्रिश्चन आल्बर्टिना नावाचें एक विश्वविद्यालय आहे ह्याला जोडून २,४०,००० ग्रंथ असलेलें एक ग्रंथसंग्रहालय, प्राणिसंग्रहालय, दवाखाना, वनस्पतींचा बाग व मंगलखात्याची पाठशाळा हीं आहेत विश्वविद्यालय वैद्यकाकरतां प्रसिद्ध असून तेथें सुमारें १००० विद्यार्थी व १०० अध्यापक असतात. येथील इतर शिक्षणसंस्था म्हटल्या म्हणजे विश्वविद्यालयाच्या जुन्या इमारतींतील राष्ट्रीय पुरातन वस्तूंचा अजबखाना, १६ व्या व १७ व्या शतकांतील लाकडावरील खोदीव कामाचें 'थॉलो', पदार्थसंग्रहालय, आरमारी विद्यापीठ, आरमारी शाळा व शिल्पकलेची शाळा ह्या होत.

कीलला हल्लीं जें इतकें महत्व आलें आहे तें तेथें असलेल्या प्रचंड बंदरामुळें होय. पाण्याची खोली सर्वत्र जवळ जवळ ४० फूट असून किनाऱ्याजवळ ती २० फूट आहे. त्याची लांबी ११ मैल असून रुंदी उत्तरटोंकास पाव मैल, व मुखापाशीं ४॥ मैल आहे. संरक्षणाकरितां बंदराच्या मुखापासून पांच मैलावर ज्या ठिकाणीं (फ्रीडरिकसार्ट येथें) कालव्याचे किनारे जवळ जवळ आले आहेत तेथें पश्चिमेस २ व पूर्वेस ४ असे सहा किल्ले बांधले आहेत. ह्याशिवाय संरक्षणाच्या दुसऱ्या कित्येक सोयी असल्यामुळें ह्या बंदरास व्यूहरचनेच्या दृष्टीनें फार महत्व आलें आहे सरकारी गोद्या व जहाजें बांधण्याचे कारखाने पूर्वेच्या बाजूस नगराभिमुख आहेत ह्याचीं पात्रें इतकीं मोठीं व खोल आहेत कीं, त्यांत मोठमोठीं लढाऊ जहाज सहज राहूं शकतात. सरकारी कारखान्यांत ७००० मजूर काम करीत असतात. ह्याशिवाय जर्मानिआ (क्रप्स) व हॉवाल्डस् नावाचे जे दोन मोठे खाजगी कारखाने आहेत त्यांत ७००० माणसें कामावर असतात. ज्याला आपण कील कालवा म्हणतों त्या "कैसर विल्हेल्म कालव्या"चें बाल्टिक समुद्राला जोडणारें पूर्वेकडील मुख कीलपासून १॥ मैलावर उत्तरेस विक येथें आहे. हा कालवा बाल्टिक समुद्र व उत्तरसमुद्र (ब्रुन्सबुटेल येथें) यांना जोडतो. जून महिन्यांत येथें जी बोटींची मोठी शर्यत होते तिच्यांत सर्व देशांतील लोक भाग घेतात. हें व डेन्मार्कचें कॉर्सोर याच्यामध्यें उतारूंच्या आगबोटी रात्रंदिवस जात येत असतात. येथले मुख्य उद्योगधंदे म्हटले म्हणजे

कुकी—आसामातील एक जात याची एकंदर लोकसंख्या (१९११) ८८३०० आहे पैकी सुमारें ११ हजार बंगालमध्यें आहेत या डोंगरातील राष्ट्रजातीचे लोक उशाई लोकांचे जातेवर्ईत असून त्यांची वस्ती काचार, मणीपूर व नागा टेंकड्यांतून आहे बहुतेक कुकी वन्यधर्मीय आहेत त्यांच्या दोन जाती आहेत त्या जुने कुकी व नवे कुकी या होत

जुने कुकी—हे शरीरानें सव जातींत बळकट असतात हे पोशाख नीटनेटका करतात आणि बराच विनय दाखवितात हे दागिन्याचे फार शोकी आहेत पुष्कळ आगट्या, कडीं, दडकडीं वगैरे अलंकार हे घालतात ते कानाना भोक न पाडता त्यांच्या पाळ्यांतून पाटेळ्या जागेचें मास काढून टाकतात व त्या ठिकाणीं एक लहानसें बांबूचें व दोळें करून घालतात त्यामुळें ती जागा व त्याबरोबर कानान्या पाळीचा घर ४।५ इंचपर्यंत वाढतो नन्तर एक बाद्राच कडें तेथें बसवून त्यामध्यें व कानामध्यें पुष्कळ सुवर्णी वगैरे दागिने अडकवितात याच्यामध्यें लग्नाची वव धार्मिक समजली जाते या वेळीं 'खलिम' (गावचा पाटील) हा हजर असला पाहिजे खलिम हा सव गावच लोक जमले असता मध्यभागीं ठेवलेल्या एका दगडावर एक एक पाय ठेऊन उभ्या असलेल्या वधूवरास आशीर्वाद देतो याच्यामध्यें व नवीन कुकींमध्यें लग्नापूर्वी सासऱ्याकडे चाकरी करण्याची चाल आहे या लोकांत प्रीतिविवाह होतात एखादा तरुण आपल्या प्रियतमेच्या पित्याकडे आपल्या मित्रास मद्य घेऊन पाठवितो आणि तो तें प्याल्यास लग्न जमत मात्र त्यानें तें नाकारल्यास त्या तरुणास दुसरी तरुणी पहावी लागते यावरून लग्नास बापाची संमति अवश्य दिसते या लोकांच्या पुष्कळ देवता असून त्यांपैकीं काहीं दुष्ट आहेत याच्यामध्यें बालविवाह नाहीं ते आपल्या देवताना फार भितात

नवे कुकी—हे लोक ठेंगणे पण मजबूत बांध्याचे असतात याच्या बायका याहून खुज्या पण बळकट असतात. याच डोळे लहान असून बदामाच्या आकाराचे असतात यांचें नाक लहान व चपटें असून नाकपुड्या मोठाल्या असतात यांच्या चाली जुन्या कुकींपेक्षा किंचित् भिन्न आहेत याना लग्नाप्रीत्यर्थ कमीतकमी ३० रुपये खर्च येतो अथवा दोनतीन वर्षे चाकरी करावी लागते याच्यामध्यें लग्नविधि असून त्यावेळीं श्रीमंत लोक मेजवान्या वगैरे देतात याचा धर्म अथवा उपाध्याय मंत्र म्हणून वधूवरास एक मद्यपात्र देतो व पात्रातून तीं दोघें मद्य प्राशन करतात नतर वधूच्या गळ्याभोंवतीं दोन व वराच्या गळ्याभोंवतीं एक असे दोर उपाध्याय बांधतो. हे दोरे कुजें आपोआप तुटून जातात, ते पुन्हा बदलीत नाहींत नतर उपाध्याय वधूवराच्या हातात एक एक लहान फणी देतो व मंत्र म्हणतो याप्रमाणें लग्नविधि होतो या लोकामध्यें बायकोस टाकून देता येते मात्र अशा वेळीं तिला नवऱ्याचें नेसण्याचें वस्त्र व त्याचें पांघरूणाचें भाडें याशिवाय सर्व वस्तू घेऊन जाण्याचा अधिकार असतो परंतु साधारणत याच्या बायका यांच्या गुलामाप्रमाणें असतात त्याना विकता किंवा गहाण टाकता येतें मरणोत्तर स्थितीची याना कल्पना आहे याचा मुख्य देव आणि सृष्टिकर्ता पुथेन हा आहे याच्या बायकोस नगी व याच्या पुत्रास खिल म्हणतात खिल याची बायको नमु ही असून तीं लहानसहान दुखणीं आणते यांच्या उपचारामध्यें धार्मिक भाग असल्यामुळें याचे वैद्य म्हणजे उपाध्यायच असतात आणि ते औषधावरोबर देवाचे अंगारे वगैरेहि देतात (इं. सेन्सस रिपोर्ट, इ.)

**कुंकुमवृक्ष**—या झाडास लॅटिनमध्यें मॅलोटस फिलिपिनेन्सिस संस्कृतमध्यें कुंकुमवृक्ष, इतर भाषांत कमल, सिंदरी, शेंदी, पुनाग इत्यादि नावें आहेत

या झाडापासून उत्पन्न होणारा महत्वाचा जिन्नस म्हटला म्हणजे कुंकुम चूर्ण होय रेशमास वगैरेंना शेंदरी रंग देण्याकरिता विशेषेकरून या चूर्णाचा उपयोग करतात याचीं पिकलेलीं फळें पिशवींत घालून त्याच्या गाठींत असलेला पूड बाहेर येईपर्यंत त्याना झोडपून काढतात कित्येक भागांत फक्त हाताच्या तळव्यात फळें चोळून काढतात किंवा जमीनीवर पायांनीं तुडवितात पुष्कळदा बाजारात अस्सल माल मिळत नाहीं कारण व्यापारी लोक चांगल्या मालात हिणकस मालाची भेसळ करून विकीत असतात हें झाड पुढील ठिकाणीं आढळतें —

बंगाल पुरी व सिंगभुम येथील जंगलात या झाडाना काहीं तोटा नाहीं परंतु यांखेरीज इतरत्र हें झाड फारसें दृष्टीस पडत नाहीं खुल्या जागेंत याची वाढ होण्याचा जितका संभव असतो तितका दाट जंगलात असत नाहीं दाट अरण्यात या झाडाला फुलें व फळें अल्प येतात डिसेंबर महिन्यात हें झाड फुलावऱ्यास येऊन जानेवारी ते फेब्रुवारीपर्यंतच्या काळात फळें परिपक्व होतात संयुक्त प्रांतातील झाडांपेक्षा बंगाली फळें मोठीं असतात

संयुक्त प्रांत—कुमाऊन, गऱ्हवाल व गंगेकाठच्या उपहिमालयातील अरण्य प्रदेशांत हें झाड आढळतें कित्येक भागात तर या झाडाखेरीज इतर झाडें क्वचित दृष्टीस पडतात या ठिकाणीं या झाडाचें इतकें वैपुल्य असताहि तेथें रंगाचा मुळींच व्यापार नाहीं ही आश्चर्याची गोष्ट आहे

पंजाब—नुरपूर येथील जंगलात या झाडाचा सुकाळ आहे दरवर्षी नुरपूर येथून सुमारें ३० मण 'कुंकुमचूर्णाची' निर्गत होते. नुरपूर येथें हें १ रुपयाला ४ शेर प्रमाणें विकण्यात येतें अमृतसर येथें मणास ३० रुपये द्यावे लागतात या भावामध्यें वारवार बदल होतो होशिआरपूर जिल्ह्यातून रावळपिंडी येथें या चूर्णाची निर्गत होत असते

मुंबई.—रंगाचा संचय करणारा मुख्य जिल्हा म्हणजे बेळगाव होय. येथील दर वर्षाची स्थानिक विक्री सुमारें ५००० पौंडाची म्हणजे ६० मणाची असते.

मद्रास.—गंजम जिल्ह्यातील गमसर तालुक्यांत हीं झाडें पुष्कळ सापडतात. वर्षाला सुमारें ४०० मण चूर्ण निघतें. खुद्द मद्रासेंत याला मागणी नाहीं व म्हणून गंजम येथील सर्व रंग यूरोपकडे पाठविला जातो.

ब्रह्मदेश.—'खालच्या' ब्रह्मदेशापेक्षा 'वरील' ब्रह्मदेशांत हीं झाडें जास्त आहेत.

कपडे रंगविण्याची रीत.—हूपर यानें बेळगाव येथें कोणत्या प्रकारें कापड रंगविण्यांत येतें याचें सविस्तर वर्णन लिहून ठेवलें आहे. दोन पौंड रेशीम व एक पौंड सिधु-कार्बेत ( कार्बोनेट ऑफ सोडा ) पाण्यानें भरलेल्या पात्रांत घालून थोडा वेळ उकळूं देतात. रेशीम मऊ होतांच तें काढून घेण्यांत येतें. नंतर त्याच पाण्यांत २० तोळे 'कुंकुमचूर्ण' २॥ तोळे 'जिंजेली' (तिळाचें) तेल, अर्धा पौंड तुरटी व एक पौंड सिधु-कार्बेत इत्यादि पदार्थ घालतात. हें मिश्रण पाव तासपर्यंत उकळूं देतात. नंतर त्यांत रेशीम घालतात. पाऊण तासपर्यंत तें उकळून झाल्यावर रेशीम काढून घेण्यांत येतें. यावेळीं रेशमाचा रंग दाट पिंवळा होतो. मध्यप्रांतांत 'तसर रेशमाला' रंग देण्याची निराळीच रीत आहे. प्रथम कुंकुमचूर्ण हिरडा, बेहडा व आवळकाठी यांच्या रसांत भिसळतात. नंतर तें मिश्रण पाण्यांत घालून गाळ खालीं बसला म्हणजे पाणी दुसऱ्या भांड्यांत घालतात. या पाण्यांत तसर रेशीम सहा तासपर्यंत भिजूं देतात. नंतर तें बाहेर काढून वाळून झाल्यावर फिरून भिजत घालतात व पुनः बाहेर काढून वाळविल्यावर फिरून भिजूं देतात. कापडाला पाहिजे तशी छटा येईपर्यंत ही क्रिया चालू असते.

या कुंकुमचूर्णाचा 'नारूचा नाश करण्याकडेहि' उपयोग होतो असें म्हणतात. या झाडाच्या बियांतून शेंकडा ८०.८१ इतकें तरमासारखें चोपदार तेल निघतें. [ वॅट. ].

कुकुर.—या देशाचा अथवा राष्ट्राचा उल्लेख महाभारतांत भीष्मपर्वांत ( अ ९१ ) आढळतो. तसेंच बृहत्संहिता ( १४.५ ) व भागवत ( १.११,११ ) यांतहि याचा उल्लेख आढळतो. नाशिकच्या शिलालेखांत व रुद्रदामन् याच्या जुनागड येथील शिलालेखांतहि याचा उल्लेख आढळतो.

कुंकू.—हें तांबड्या रंगाचें एक चूर्ण असून हिंदुस्थानांतील पंजाबखेरीज बहुतेक सर्व प्रांतांतील सौभाग्यवती स्त्रिया व कुमारिका कपाळावर लावतात. कुंकू लावण्याचा प्रघात महाभारतकालींहि असावा असें रा. चिं. वि. वैद्य यांनीं ग्रंथकर्त्यांनीं म्हटलें आहे. हळदीपासून बहुधा तयार होणारें हें कुंकू समजतें. कुंकवाचे असे निरनिराळे उपयोग होत असल्यामुळें त्याचा खपहि फार होतो. कुंकवास 'पिंजर' असें दुसरें नांव आहे. कुंकू करण्याच्या कृती पुढीलप्रमाणें आहेत.—

कृति पहिली:—एक शेर हळकुंडें १॥ शेर पाण्यांत भिजत घालावीं. तीं बरींच भिजल्यावर त्यांच्यावरील साल किंवा खवा चाकूनें खरडून काढावी. नंतर पुटें दिलेल्या रसाचीं त्यास पुटें द्यावीं. विशेष तांबडा रंग करण्यास जास्त पुटें द्यावीं. इच्छित पुटें दिल्यानंतर तीं हळकुंडें सुकवावींत व पूर्ण वाळल्यानंतर तीं खलबत्त्यांत बारीक कुटावीं व वस्त्रगाळ करावीं म्हणजे कुंकू तयार झालें. चार पासून सात पुटें दिल्यास गंधाचे खवे तयार होतात.

पुटें देण्याचा रस तयार करण्याची कृति.—२ तोळे पापडखार, २ तोळे सवागी हीं एकत्र कुटून वस्त्रगाळ करावीं, व त्याचा लिंबाच्या रसांत खल करावा म्हणजे पुट देण्याचा रस तयार झाला. हें मिश्रण कल्हई केलेल्या भांड्यांत किंवा काचेच्या भांड्यांत वापरावें.

पुटें देण्याची रीत:—साल काढून ठेवलेलीं हळकुंडें वर लिहिलेल्या रसांत भिजवून सावलींत सुकूं द्यावीं. तीं सुकलीं म्हणजे एक पुट बसलें. याप्रमाणें प्रत्येक वेळीं रसांत भिजवावीं व सुकवावीं. जितक्या वेळ ही क्रिया होईल तितकीं पुटें बसलीं असें समजावें. पुटें दिलेल्या हळकुंडास आपण गंधाचे खवे म्हणतो.

कृति दुसरी.—५ भाग पाण्यांत १ भाग गंधकाम्ल घालून त्या मिश्रणांत भिजतील इतक्या बेताचे हळकुंडाचे लहान लहान केलेले तुकडे भिजत घालावे. दोन दोन दिवसांनीं पाणी बदलून दुसऱ्या रांजणांत भिजत ठेवावे. भिजल्यानंतर तसल्याच पाण्यांत बेताचा पापडखार विरवून त्यांत ते भिजवून वाळवावे, म्हणजे उत्तम लाल हळकुंडें तयार होतात.

कृति तिसरी.—हलक्या प्रतीचें स्वस्त कुंकू तयार करण्यासाठीं दुसऱ्या कृतींत सांगितलेल्या पाण्याच्या मिश्रणांत सडी भिजत घालतात. नंतर तीं पूर्णपणें भिजून मऊ झाल्यावर शिजवून उन्हांत वाळवितात.

रंगोत हळकुंडें अगर सडी वरील कृतीप्रमाणें तयार झाल्यावर मुसळ्यांनीं कुटून बारीक करितात. नंतर ती पूड मोठ्या जाळ्यांतून २ वेळ दळून काढितात म्हणजे पिंजर किंवा कुंकू तयार होतें. सडीच्या कुंकवास हलकें "सडी" कुंकू असें नांव आहे. हळकुंडाचें वरील कृतीप्रमाणें केलेलें कुंकू उत्तम समजतात. हा धंदा चालविणें बरेंच खर्चाचें व मेहनतीचें आहे. [ खानापूरकर—कलानिधि; वैद्य—महाभारत-उपसंहार ]

कुक्षी—मध्यहिंदुस्थानांतील धार संस्थानच्या परगण्याचें मुख्य ठिकाण. हें विंध्य पर्वताच्या पायथ्याशीं समुद्रसपाटीपासून १०४६ फूट उंचीवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) ६२४८. हें इ. स. १८४८ पासून धार संस्थानच्या ताब्यांत आलें. हें गुजराथ आणि माळवा यांच्या जुन्या व्यापारी मार्गावर असल्यामुळें फार महत्त्वाचें होतें. पण रेल्वेमुळें जुना व्यापारी मार्ग बंद झाला व याचें महत्त्व

ल्यास गेलें. पडरीणीपासून बाग व अमरेराकडे जाणारी पक्की सडक या गावातून जाते.

इ. स. १८९४ त अग्निप्रलयामुळें गावाची नासाडी झाली. येथें इस्पितळ, शाळा, डाक व तारघर, कापूस दाबून गाठी बनविण्याचा कारखाना व रेस्टहाउस ( विश्रांतिगृह अथवा धर्मशाळा ) आहेत

**कुक्सहॅवन**—एल्ब नदीच्या मुखाच्या पश्चिम दंडास वसलेलें हॅम्बर्ग संस्थानांतील जर्मनीचें एक बंदरी शहर. लोकसंख्या (१९००) ६८९८ हें बंदर चांगलें असून सुरक्षित असल्यामुळें तुफान चाललें असताना पुष्कळ वेळा जहाजें येथें आश्रयाकरिता येतात १८९१-१८९५ त येथें २६ फूट खोलीचें एक नवीन बंदर बांधलें, त्याचा पुढचा भाग १००० फूट लांब व ८०० फूट रुंद आहे. हॅम्बर्ग-अमेरिकन लाइनच्या बोटी येथपावेतों येतात व येथूनच सुटतात. हें बंदर जकातीच्या मर्यादेबाहेर आहे. येथें कोळसा, पिठ व इमारती लाकूड हे जिन्नस परदेशातून येतात व येथून मासे परदेशीं रवाना होतात हॅम्बर्गचे लोक ह्या ठिकाणीं समुद्र-स्नानाला येतात येथें दीपगृह असून पाण्यात पडलेल्यांचे जीव वाचविण्याकरिता नौका व जलमार्गदर्शक तयार असतात १८७२ मध्यें दोन गेडीं एकत्र करून हें शहर बनलें आहे ही खेडीं १३९४ पासून हॅम्बर्गकडेच होतीं.

**कुम्भकोण**—मद्रासच्या मध्यदेशांत हुबळी जिल्ह्यांतील एक तहशील. हिचें क्षेत्रफळ ४३८ चौ. मै असून खेड्याचा संख्या १२९ आहे. मुख्य ठिकाण कुम्भकोण याची लो सं १९११ सालीं ८१३४९ होती १९०३-०४सालीं लागवडीचें क्षेत्रफळ २६७ चौ मै. असून काळीचें उत्पन्न ५,२५,००० होतें.

**कुंच, तहशील**—संयुक्त प्रांतात जालौन जिल्ह्यातील एक तहशील हिचें क्षेत्रफळ ३०१ चौ मै आहे. १९११ सालीं लो. सं १,०४,९०७ होती तहशिलीत एक शहर व १९७ खेडीं असून जमीनमहसूल सुमारें तीन चार लाख आहे १८९५-९६ सालीं मोठा दुष्काळ पडला होता.

**शहर**—संयुक्त प्रांत. जालौन जिल्ह्यामधलि कुंच तालुक्याचें मुख्य ठिकाण येथें जी. आय पी. रेल्वेच्या एका शाखेचें स्टेशन आहे याची लो सं. १९११ सालीं १६४८० होती. अकबराच्या अमदानींत कुच हें एका महालाचें मुख्य ठिकाण होतें. १८०४ साली कुंचपासून ५ मैलावरील, 'अमत मलाय " किल्ला घेण्याकरिता इंग्रजांनीं प्रयत्न केला होता. परंतु पेंढाऱ्यांची मदत किल्ल्यावरील शिबंदीला मिळाल्यामुळें तो फसला. बंडाच्या वेळीं कुंच हें गाव कित्येक वेळा बंडवाल्यांच्या ताब्यात गेलें होतें शहराचे पूर्व व पश्चिम असे दोन भाग असून पश्चिम भागीं किल्ल्यांत तहशीलकचेरी व पोलिस ठाणें असतें पूर्वभागीं एक मोठा जुना तलाव असून अलीकडे त्याची बरीच सुधारणा झाली आहे. मध्यभागीं बाजाराची जागा आहे. येथील म्यु. कमिटी इ.स १८६८ सालीं स्थापन झाली. जालौन जिल्ह्यात कुच हें सर्वांत मोठें व्यापाराचें ठिकाण असून येथून धान्य परगावीं जातें. येथें गुरांचा मोठा बाजार भरतो. बाहेरून येणाऱ्या पदार्थांत साखर तंबाखु व तांदूळ हे मुख्य होत

**कुचबिहार, संस्थान**—हें उत्तर बंगालांतील एक संस्थान आहे व यात कोच जातीचें वास्तव्य असल्यामुळें या संस्थानास हें नाव मिळालें आहे. याचें क्षेत्रफळ १३०७ चौरस मैल आहे याच्या उत्तरेस जलपायगुडी जिल्हा असून पूर्वेस गोलपाडा जिल्हा आहे व दक्षिणेस रंगपूर असून पश्चिमेस रंगपूर व जलपायगुडी हे जिल्हे आहेत या संस्थानांतील प्रदेश सखल मैदानाचा असून त्यामधून पुष्कळ नद्या वहात जातात, परंतु या नद्यांचा कालव्याकडे उपयोग होत नाहीं या नद्यांपैकीं मुख्य म्हटल्या म्हणजे, तिस्ता, सकोश, धर्ला, तोरसा, कालजानी, रईदाक वगैरे होत. या सर्व नद्या हिमालयांत उगम पावून ब्रह्मपुत्रेस जाऊन मिळतात

या संस्थानातील जमीन नद्यांतून वाहून आलेल्या गाळाची बनलेली असल्यामुळें तींत उत्तर बंगालमधील सर्व पिकें होतात. येथें पीक काढीत नाहीं तेथें थोडीशी नैसर्गिक झाडी आहे या प्रदेशात फारशीं झाडें नसून त्याचा बहुतेक भाग गवतानें व्यापिला आहे या प्रदेशांतील झाडांपैकीं मुख्य आंबा, शिंदू बांबू, ताड व सुपारी हीं झाडें होत. या प्रदेशात चित्ते, अस्वल, हरीण, डुकर वगैरे रानटी जनावरें आहेत.

याचें उष्णमान ९३° अंशापेक्षा कधीं अधिक नसतें. उष्णतेचें प्रमाण अगदीं कमी म्हटलें म्हणजे ४९° असतें व मध्यम ७८ ° असतें. येथील हवा फार दमट असल्यामुळें प्रकृतीवर तिचा अनिष्ट परिणाम होतो या संस्थानात दरवर्षी १२३ इंच पाऊस पडतो

या संस्थानात १८८० सालीं तुफान होऊन बरेंच नुकसान झालें पुढें १८९७ त धरणीकंप झाला मधून मधून पावसाळ्यात पुरानेंहि गावाचा थोडाबहुत नाश होतो.

**इतिहास**.-पुरातन काळीं या संस्थानाचा कामरूप राज्यांत समावेश होत असे १५ व्या शतकात यांच्यावर सेन घराण्याचें राज्य होतें या घराण्याचा शेवटचा राजा नीलांबर याला गौरचा नबाब अल्लाउद्दीन हुसेन यानें १४९८ त गादीवरून काढून आपल्या मुलास गादीवर बसविलें पण त्याचा तेथें फार दिवस टिकाव लागला नाहीं यानंतर कांहीं दिवस या प्रदेशात सर्वत्र अंदाधुंदी माजून राहिली होती, व जिकडे तिकडे लहान जहागिरी दृष्टीस पडत होत्या. पुढें १५१० त या संस्थानावर चंदन नावाच्या कोच घराण्यांतील पुरुषानें आपलें राज्य स्थापन केलें चंदनाच्या पाठीमागून त्याचा चुलतभाऊ विसवासिंग गादीवर आला यानें करतोया नदीपासून बर्नादीपर्यंतचा सर्व मुलुख काबीज केला. पुढें

केलेली असते. वरील अहलकार व सेशनजज्ज हे न्यायनिवाडे करतात. अखेरचा निकाल संस्थानिक मंडळ देतें.

या संस्थानांत जोतदारामार्फत जमीनीचा सारा वसूल करण्याची वहिवाट आहे पण हल्लीं संस्थानातील कांहीं भागात सारा कायमचा ठरविण्यात आला आहे. यातील अबकारी खात्याची व्यवस्था इंग्रजी अमलाखालील प्रदेशाप्रमाणे आहे. संस्थानात आयात मालावर व मिठावर पूर्वी जकात नव्हती. कुचबिहार येथें व इतर विभागाच्या मुख्य ठिकाणीं सरकारी व बिनसरकारी सभासदाच्या गावसभा असून त्याच्याकडे म्युनिसिपालिटीचें काम असतें. या सभावर मंडळाची ( कौन्सिलची ) देखरेख असते. [ इंपी. ग्या. भाग १०; बंगाल अॅडमिनि. रिपोर्ट. १९२१–२२ ]

**कुचला**—हें एक मध्यम आकाराचें गळनशील झाड आहे. ह्यास इंग्रजींत स्नेकवुड; लॅटिनमध्यें नक्स व्हॉमिका किंवा स्ट्रिक्नाइनचें झाड व मराठींत, काजरा, कुचला, निर्मळ वगैरे नावें आहेत. संस्कृतमध्ये ह्यास विषमुष्टि व कारस्कार हीं नावें आहेत.

उत्तरहिंदुस्थानात गोरखपूरचीं जंगलें, बंगाल, ओरिसा, व दक्षिण हिंदुस्थानात मद्रास इलाख्यात व ब्रह्मदेश सिलोनमध्ये हें आढळतें.

कुचल्याच्या बिया वाटोळ्या असून चपट्या किंवा एका बाजूनें रोलगट व दुसऱ्या बाजूनें फुगीर असतात. त्यावर पांढरकी लव असल्यामुळें त्याचा रंग रुपेरी दिसतो कुचल्याचीं फळें गोळा करून धुवून त्यांतील बिया काढतात व उन्हात वाळवितात. जमिनीवर पडलेल्या बिया गोळा केल्यास त्याना बाजारात फारशी किंमत येत नाहीं. हिंदुस्थानातून मुख्यतः मद्रास, मुंबई व कोचीन येथून बियांची निर्गत होते. लंडनच्या बाजारात कुचल्याच्या बिया सामान्यतः दर हंड्रेडवेटास ६ ते १८ शिलिंग या भावानें विकतात. १९१२ सालीं ५ शिलिंग हा भाव व १९१८ त १८ शिलिंग भाव होता.

या बिया फार औषधी असून त्यापासून स्ट्रिक्नाइन व ब्रुसाइन नावाचे दोन महत्वाचे अल्कलॉइड तयार करतात. बियाचें तेलहि औषधी आहे. शिवाय त्यापासून एक प्रकारचा रंगहि तयार होतो. त्यानें सुती कापडावर फिकट तपकिरी छटा येते. निलगिरीवरील डोंगरी लोक मासे मारण्याकरिता या विषाचा उपयोग करतात. कुचल्याची साल व लाकूडहि औषधी आहे. ब्रह्मदेशात कुचल्याच्या लांकडाच्या गाड्या, शेतकीचीं आउतें व लहान लहान पेट्या करितात.

१९१८–१९सालीं६२१०८हंड्रेडवेट वजनाचा १८ शिलिंग दराचा ५७६०६ पौंडाचा कुचला परदेशीं रवाना झाला. कुचला इंग्लंड, बेल्जिअम, जर्मनी, हालंड, फ्रान्स वगैरे देशांत जातो. कोकोनाडा येथून तो माल परदेशीं पाठवितात.

*कुचल्याचा मद्यार्क.*—एक औंस तीव्र मद्यार्क घेऊन त्यात ४ ग्रेन स्ट्रिक्निया विरघळूं द्यावा. नंतर ब्लॉटिंग-पेपरमधून गाळून घ्यावा हा अर्क देण्याचें प्रमाण ३ पासून १० थेंबपर्यंत शक्तिप्रमाणें ठेवावें. शुद्ध केलेल्या कुचल्याचें चूर्ण अर्ध्या पासून २॥ गुंजापर्यंत द्यावें. सूक्ष्म प्रमाणानें कुचला घेतल्यास ( १ ग्रेनचा सोळावा भाग ) कुचल्याचे सत्व हृदयास उत्तेजक व सूक्ष्म वाहिन्यांचा स्तंभ करणारें आहे. कुचल्याचें विषारी सत्व बियात २ व सालींत १ या प्रमाणानें रहातें.

*कुचल्याच्या विषाचीं लक्षणें*—हें विष चढलें असता बहुतकरून धनुर्वाताचीं लक्षणें होतात. विष पोटात गेल्यापासून ५ मिनिटापासून अर्ध्या तासाच्या आंत विषाचीं लक्षणें दिसूं लागतात. कधीं कधीं १०।२० मिनिटाच्या आतच मृत्यु येतो. फार तर ५।६ तासपर्यंत मनुष्य वाचूं शकतो. कुचल्याची भुकी १॥ मासा किंवा स्ट्रिक्निया अर्ध्या गव्हा इतका घेतल्यानें मनुष्य मरतो. कुचल्याची बी सालीसकट सबंध पोटात गेल्यास तशीच शरीरास अपाय न करिता पोटातून बाहेर पडते. कारण तिच्यावरची साल चिवट असल्यानें ती न पचता बाहेर पडून जाते.

*औषधी उपयोग*—जनावरास जखम झाल्यास काजऱ्याची बी किंवा मुळी जखमेवर उगाळून लावावी म्हणजे विकार दूर होईल.

*कुचल्याच्या विषावर*—कुचल्याच्या बिया तुपात परतून त्या रोज क्रमवृद्धीनें सेवन कराव्या. संधिवात झाला तर त्याजागीं कुचल्याची बी उगाळून वर लावावी. घुशी, उंदीर कमी व्हावयास कुचल्याच्या बियाचें चूर्ण करून तें पिठात मिसळावें व त्या पिठाच्या गोळ्या करून उंदीर खातील अशा ठिकाणीं ठेवाव्यात. बाळंत रोग, हिवताप, जाऊन शक्ति यावयास शुद्ध केलेल्या कुचल्याच्या बियाचें चूर्ण ।२ गुंजा मधातून द्यावें [ वॅट; फॉटन. पदे. ]

**कुंचावन**— राजपुतान्यामध्यें जोधपूर संस्थानच्या सांबर जिल्ह्यातील याच नावच्या जहागिरी इस्टेटीचें मुख्य ठिकाण. हें जोधपूर बिकानेर रेल्वेच्या नारायणपूर स्टेशनपासून ८ मैल उत्तरेस आहे. येथें एक मजबूत तटबंदी किल्ला असून गावात बंदुका, तरवारी वगैरे तयार करतात व त्याच्याकरिता गावाची प्रसिद्धि आहे. जवळच सांबर सरोवराचें लहान स्वरूपच कीं काय असें एक खाऱ्या पाण्याचें तळें आहे. त्यातील मीठ अगदीं पांढरें असतें.

या इस्टेटींत १४ खेडीं असून तीं रजपूत राठोडच्या मर्तिया जातीच्या ठाकुराकडे आहेत. येथील ठाकूर कधीं कधीं संस्थानच्या कौन्सिलचे सभासदहि असतात.

**कुंजपुर**—पंजाबात कर्नाळ जिल्हा व तहसील यातील एक जहागीर. ही मोंगल बादशहाच्या वेळीं पठाण सरदार नजाबतखान यानें स्थापिली आहे. नजाबतखानानें यमुना नदीच्या दलदलींत एक किल्ला बांधून बादशहाच्या विरुद्ध बंड

केलें. १७३९ त तो नादिरशहाच्या बाजूला असल्यामुळें नादिरशहानें त्याला कुंजपूरचा नवाब म्हणून मान्य केलें. सदाशिवराव भाऊनें दिल्ली घेतल्यावर कुंजपुऱ्यावर जाऊन अबदालीचा मार्ग रोखून धरण्याचा बेत केला. त्याप्रमाणें ता. १७।१०।१७६० रोजीं कुंजपुराचा पाडाव केला व अब्दुस्समदखाना( नजाबतखान ? )चा शिरच्छेद करविला. १७८७ सालीं शिद्यानें जिंद राजाला कर्नालवरून हाकलून दिलें. पुढें १० वर्षांनीं जनरल पेरॉन यानें गुलशेरखान यास कुंजपूरचा नवाब म्हणून मान्य केलें. त्याचा मुलगा रहिमतखान हा ब्रिटिशांच्या संरक्षणाखालीं गेला. सन १८४६ त कुंजपुरच्या नवाबाची सत्ता नाहींशी झाली. तेव्हापासून त्याच्यामध्यें एकसारखे कज्जे सुरू आहेत. साम्प्रतचे नवाब १८८६ त गादीवर बसले. ३८ खेड्यांची त्याना जहागीर आहे. वार्षिक उत्पन्न सुमारें ६०,००० रु. चें आहे.

**कुंजर**—ह्या वनस्पतीस लॅटिनमध्यें कोलोसिआ ॲरिस्टट व मराठींत कुंजर हीं नांवें आहेत. ही जंगली भाजी आहे. ही बाजरी जोंधळ्याच्या शेतात, बांधावर व ओसाड जागेत आपोआप पडलेल्या बियांपासून उगवते. हें झाड आघाड्यासारखें पण कमी उंच वाढतें. हिच्या पानाची कोंवळेंपणीं व कोंवळ्या शेंड्याची भाजी करितात. [वनौ. गुणा.]

**कुंजा**— पंजाब प्रांत. गुजराथ तहशिलींतील एक गाव. हें गुजराथ शहरापासून ७ मैल आहे. १९११ सालीं याची लो. सं. ७०९० होती. काश्मीरचे सुभे दिवाण कृपाराम याठिकाणीं काहीं दिवस रणजितसिंगाच्या अमदानींत रहात होते. येथें एक शाळा व दवाखाना आहे. व्यापार वगैरे काहीं एक नाहीं.

**कुंजुरी**—कुंजुरी किंवा मालकांगोणी ह्या वनस्पतीच्या वेली असतात हींचीं संस्कृतमध्यें ज्योतिष्मती, गुजराथींत मालकांगोणी,इंग्रजींत ब्लॅक ऑइल प्लॅन्ट इत्यादि नांवें आहेत. ह्या वेलीस पर्जन्यकाळीं बारीक फळाचे मोठे घोंस येतात. पहिल्यानें फळाचा रंग हिरवा असतो. परंतु पिकल्यावर पिंवळा होतो. आणि तीं उकलून फुटलीं म्हणजे त्याचा लाल भडक रंग दिसतो. ही वेल समुद्रसपाटीपासून ४००० फूट उंचीवरील जागेत पूर्वबंगाल, बिहार, दक्षिणहिंदुस्थान, ब्रह्मदेश आणि सिलोन ( लंका ) या ठिकाणीं आढळते. झेलम व आसाम यामधील भागातहि हे वेल आढळतात.

उ प यो ग.—या फळाच्या बियांपासून गर्द शेंदरी किंवा पिंवळ्या रंगाचें तेल निघतें. या तेलाचा अंगाला लावण्याच्या औषधामारखा उपयोग करतात. तें कधीं कधीं दिव्यातहि जाळितात व काहीं धार्मिक विधींच्या वेळीं तें उपयोगी पडतें. या तेलाचें महत्व मुख्यत्वेंकरून त्यापासून निघणाऱ्या ऑलिअमनिग्रम नावाच्या औषधामुळें आहे. र, लवंगा, जायफळ, वगैरे पदार्थांसह या तेलाचें ऊर्ध्व- केल्यास हें औषध मिळतें. दहापासून पंधरा थेंब पर्यंत या तेलाचें सेवन केल्यास तें उत्तेजक व स्वेदोत्पादक असतें. हें तेल उत्तरसरकारांत तयार होतें. विजगापट्टण व एलोर येथील तेल तर फार अप्रतिम असतें. या वेलीच्या लाल बिया व पानें याचा देशी औषधांतून उपयोग करतात. एक पौंड बियांना सुमारें दोन आणे पडून एक हंड्रेडवेट तेलाची किंमत अजमासें २० रुपये असते. बियांच्या अंगीं बुद्धिवर्धनाचा गुण आहे असें काहीं लोकांचें मत आहे.

औ ष धी उ प यो ग—अफूच्या विषावर मालकांगोणीच्या पाल्याचा रस पाजावा. खरजेवर बियांचें तेल लावावें. [ वनौ. गु; पदे. ].

**कुंजा**.—यांची वस्ती बिहार–ओरिसा, संयुक्त प्रांत व इतर प्रांतांमध्यें आढळते. एकंदर लो. सं. (१९११) २ ७९,२५७ आहे. पैकीं ८९३ च कायते हिंदु आढळले. बिहार–ओरिसामध्यें सुमारें दोन लाख वस्ती आहे. संस्कृत कुंज शब्दावरून हा शब्द आला असावा. या जातीचा धंदा म्हणजे भाजी व फळें विकणें हा होय. मेवाफरोश, सब्झ–फरोश व सब्झी-फरोश असेंहि त्यास म्हणतात. भाजी व फळेंविक्रयाचा धंदा करणाऱ्याना लखनौमध्यें कुंजा, कबारी व खाटिक म्हणतात मुराव, कच्छी व काबुली व्यापारी हे त्यांना माल आणून देतात. कुंजा जातीला अरैन अथवा बागवान असेंहि म्हणण्यात येतें. बंगालच्या काहीं भागात कुंजा हा अपशब्द असून ते लोक स्वतःस मेवाफरोश, सब्झ फरोश अथवा बेपारी असें म्हणवून घेतात.

मिर्झापूर येथें त्याचे ज्ञातिविषयक दोन पोटभेद आहेत. व त्यांना कलकत्तिया व मिर्झापुरीया म्हणतात. खानेसुमारीच्या आकड्यावरून कुंजा जातीचे ९४ वर्ग आहेत असें दिसतें. गोरखपुरी, जैसवारा, जैसपुरिया काश्मिरी, कोल्हापुरी, पुरभैया, सर्वोशिया, उत्तराह असे याचे स्थानिक विभाग आहेत. बागवान, माळी, कबरिया, तंबाखूवाला असे धंद्यावरून झालेले वर्ग आहेत. भूदनहारी, चौहाण, कहारिया, लोधी, मेहतरीया, राजपूत वगैरे वर्ग प्रसिद्ध जातीवरून झाले आहेत. अशा तऱ्हेचे वर्ग असले तरी कुंजा लोकांत आपसात विवाह होतात. या जातींत असगोत्रविवाहच रूढ आहेत. बहुपत्नीत्वास मुभा असून दुसऱ्या लग्नास पंचाकडून परवानगी घ्यावी लागते. वधूवराची १२व१४ व्या वर्षी लग्नें होतात. चार हौआ हा एक लग्नविधि असून त्यात मुसुलमानी 'शराह' गायिले जातात. सगाई प्रकारामुळें विधवाना लग्नें करता येतात पण तें लग्न स्वज्ञातीयाशीं होणें जरूर असतें.

कुंजा हे सुनी पंथाचे मुसुलमान होत. त्याच्या देवता, गाजीमियान व पीर अशा आहेत. या देवतास ते फळें, मिठाइ व सरबत अर्पण करतात. मृतास ते इमामबारा येथें पुरतात. ईदच्या दिवशीं ते शेवया व दूध वाटतात व 'शबेबारात'च्या वेळीं हलवा, मिठाई व भाकर हे पदार्थ मृतात्म्यास अर्पण करण्याची त्यांची चाल आहे. असें म्हणतात कीं,

शहरांतील त्यांच्या स्त्रियांचा सौंदर्यांबद्दल फार लौकिक असतां गिऱ्हाइकांना आकर्षिणाऱ्या सुस्वरूप स्त्रिया या आपल्या दुकानांत निर्भीडपणें मालविक्रीकरितां बसतात हे लोक दारू पितात व गायी, शेळ्या वगैरेंचें मांस खातात मेहतरखेरीज सर्व मुसुलमानांबरोबर ते जेवतात व तवाखू ओढतात हल्लीं त्यांच्यांतील कांहींजण शेती करू लागले आहेत साधारणपणें कुञ्जा जात मोठी उद्योगी व सदाचरणी असते [ मुक ]

मध्यप्रांतात यांना कुजडे म्हणतात ही जात मुसुलमान आहे यांची संख्या १६०० आहे पण यांच्या पुष्कळ चाली हिंदुसारख्या आहेत मुसुलमानाप्रमाणें दुधाचा संबंध असलेल्यांत विवाह होत नाहीं वाङ्‌निश्चयाच्या वेळीं मुलाच्या हाताला लावण्यास मेंदी पाठवितात वर घोड्यावर बसून लग्नमंडपांत जातो पण लग्न मुसुलमानी निकाविधीनें लागतें लग्न सकाळीं ४ वाजतां होतें सासरा मुलीला मेहेर म्हणून कांहीं रुपये देतो लग्नानंतर एक पेला सरबत वरास देतात, तो अर्धे पिऊन अर्धे वधूला देतो विधवाविवाह करतां पडून खजूर वाटून करतात घटस्फोट मुसुलमानी तलाक पद्धतीनें करतात कांहीं मुसुलमानी सण हे लोक पाळतात मुलांचें नांव जन्मदिवशींच ठेवतात व त्याकरतां कधीं कधीं ब्राह्मणासहि बोलावतात. मुलें वाचत नसलीं तर एका मुलाला शेंडी ठेवतात यांच्या बायका फार भांडखोर असतात दोन बायका भाडूं लागल्या तर त्यांच्या नवऱ्यांना निमूट बसावें लागतें ते मध्यें पडले तर त्यांना जातींतून बाहेर काढतात हे लोक प्रेतें पुरतात तिसऱ्या व चाळिसाव्या दिवशीं जातिभोजन घालतात [ रसेल व हिरालाल ]

**कुटकी**—या वनस्पतीस संस्कृतांत कटुकी, तिक्तरोहिणी, मत्स्यपित्ता, लॅटिनमध्यें पिक्रोरिझा कुर्वा, मराठींत कुटकी, बाळकडू, हिंदींत काळी कुटकी, गुजराथींत कडू इत्यादि नांवें आहे

कुटकीची उत्पत्ति हिमालय पर्वताच्या उतरणीवरील कुमाऊन प्रांतात विशेष होते या वनस्पतीचीं मुळें तेथून हिंदुस्थानांत येतात. काश्मीरपासून सिक्कीमपर्यंत ११००० पासून १५००० फूटाच्या उंचीवर ही वनस्पति विपुल सांपडते ही बहुवर्षायु आहे

मुळांपैकीं कांहीं भाग नरम व कांहीं भाग काष्ठमय असतो पानें दीर्घवर्तुळ, बुडख्याकडे बारीक असून टोंकाकडे रुंदावत जाणारीं, व साधारणतः गुळगुळीत असून त्याचे काठ कातरलेले असतात या झाडास गहिऱ्या निळ्या रंगाच्या फुलांचे दाट गुच्छ येतात या वनस्पतीचीं मुळें औषधांत वापरलीं जातात वरील साल काढली म्हणजे आंतील भाग काळ्या रंगाचा असतो यावरून हीस काळी कुटकी हें नांव पडलें असें दिसतें

**औषधी गुण**—कुटकी हें सौम्य रेचक आहे पित्तज्वरावर कुटकी, ज्येष्ठमध, द्राक्षें, व कडू निंबाची साल प्रत्येकीं सहा मासे याचा ३२ तोळे पाण्यात ¼ काढा उरवून घेतला असतां पित्तज्वर नाहींसा होतो पाणथरावर ४ पासून ८ मासेपर्यंत कुटकीचें चूर्ण रोज सकाळीं किंवा रात्रीं द्यावें जलोदरावर कुटकीचा अष्टमांश काढा दिवसांतून ३।४ वेळ दिल्यानें मलमूत्रद्वारें खूप पाणी निघून जाऊन पोट हलकें होऊन सूज उतरतें

वावींल रोगावर कुटकीचें चूर्ण साखरेंतून द्यावें [ पदे. वैद्यक शब्दसिंधु सेनगुप्त —आयुर्वेदिक सिस्टिम ऑफ मेडिसिन ]

**कुटासा**—वऱ्हाड जिल्हा अकोला तालुका अकोट अकोटच्या आग्नेयीस दहा मैलावर हें खेडेगांव आहे लोकसंख्या ( १९०१ ) १८६६ पूर्वी हा गांवद हिंदाडा परगण्याचा तर्फ होता या ठिकाणीं ४० मिठाच्या विहिरी आहेत. त्यांतून दरवर्षी प्रत्येकीं १००० रुपयांचें मीठ पूर्वी निघत असे येथें पांच पाटील असून प्रत्येकाची निरनिराळी गढी आहे येथें एक कोटेश्वराचें ( महादेवाचें ) हेमाडपंती देऊळ असून यावरूनच या गांवास कुटासा हें नांव पडलें आहे असें म्हणतात या देवळाच्या एका खांबावर देवनागरी लिपींत एक लहानसा शिलालेख आहे परंतु त्याचा अर्थ कोणाला अजून कळला नाहीं अक्षराखालीं डोकें मागें झुकलेलें आहे,व हातांत तलवार घेतलेली आहे अशा एका स्त्रीचें चित्र कोरलेलें आहे गांवकऱ्याकडून देवळास ३२ एकर जमीन इनाम आहे चैत्र वद्य ७ स उत्सव होतो पूर्वी येथें ५००० लोकांची वस्ती होती असें म्हणतात

येथील तलावाऱ्या बांधावर मलंगशहा मिया यांचें थडगें असून तें चांगल्या स्थितींत आहे येथें एक दादा महाराज ब्रह्मचारी यांचें देऊळ नुकतेंच बांधिलें आहे हा साधू काशी व पंढपूर येथ रहात होता याविषयीं विशेष माहिती उपलब्ध नाहीं

**कुटुंब**—या शब्दाची व्याख्या काय करावी असा प्रश्नच येतो सांपत्तिक दृष्ट्या म्हणजे कांहीं वस्तूंच्या मालकीचें अधिष्ठान या दृष्टीनें व्याख्या करूं लागलों तर विवाहित अविवाहित असा भेद करावा लागेल शिरोगणतीकारांनीं एकत्र वस्ती हें कुटुंबाचें मुख्य लक्षण मानून हॉटेल हें एक कुटुंब धरलें आहे येथें स्त्रीपुरुषाची कायदेशीर संयुक्त स्थिति हीच कल्पना घेऊन त्या दृष्टीनें कुटुंबसंस्थेच्या विकासाचें विवेचन करण्यांत येत आहे

या विषयासंबंधानें यूरोपमध्यें जे विचार प्रचलित होते आणि अर्वाचीन समाजशास्त्रज्ञांकडून जे विचार बदलले गेले त्यांचा थोडक्यांत परामर्श घेतला पाहिजे यूरोपांतील सामान्यतः प्रचलित कल्पना जेथून उगम पावल्या तीं स्थळें येणेंप्रमाणें —

एक विचाराचा उगम बायबलापासून होय यांत सर्व मनुष्यमात्राची उत्पत्ति एका कुटुंबापासून दाखविली आहे आणि त्या कुटुंबाचें स्वरूप सध्याच्या हिंदु कुटुंबापासून फारसें भिन्न नाहीं म्हणजे बायबलावर भक्ती ठेवणाऱ्या

युरोपियन लोकांची अशी कल्पना होती कीं, सध्याचें कुटुंबाचें जें स्वरूप आहे तें जवळ जवळ अनादि व सनातन आहे. फरक येवढाच कीं, पूर्वी अनेक बायका एक नवरा करीत असत, परंतु तें सध्या प्रचलित नाहीं.

ॲरिस्टॉटलच्या कल्पना हा युरोपिअन विद्वान लोकांचा विचाराचा आणि माहितीचा दुसरा उगम होय. ॲरिस्टॉटलची कल्पना अशी कीं, कुटुंबापासून ग्राम झाला व ग्रामापासून राष्ट्र झालें व कुटुंबाची उत्पत्ति मालमत्ता, दासदासी इ. याचें आश्रयस्थान या एका घटकामुळें व मनुष्याचा स्त्रीशीं संबंध या दुसऱ्या घटकामुळें झाली. थोडक्यात सांगावयाचें म्हटलें म्हणजे जवळजवळ एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत म्हणजे नवीन संशोधक येऊन विचारावर हल्ला करीपर्यंत लोकांची अशी समजूत होती कीं आज कुटुंबाचा जो प्रकार आढळून येत आहे तो पूर्वापार आहे. जुन्या कल्पनांवर ज्या शास्त्रज्ञांनीं मोठा आघात केले त्यामध्यें मॅक्लेनन बाकोफन मॉर्गन आणि वेस्टरमार्क यांच्या नावांचा विशेष उल्लेख केला पाहिजे. घराण्याच्या शासनासंबधानें दोन शब्द प्रथमतः प्रचारांत आले. एक शब्द म्हणजे जनकराज्य ऊर्फ पेट्रिआर्की हा होय आणि दुसरा शब्द म्हटला म्हणजे मातृराज्य मेट्रिआर्की म्हणजे मातृकन्यापरंपरा हा होय.

विवाह हा संस्था स्थापन होण्यापूर्वी सर्व पशुप्रमाणें अनियंत्रित व्यवहार होता असें मत १८६१ पासून १८८० पर्यंत व्यक्त झालें. यांत मॅक्लेनन वगैरे ग्रंथकारांनीं असें दाखवून दिलें कीं, आज ज्याप्रमाणें बापाच्या मार्फत नातें ओळखतां येतें व मानलें जातें त्याप्रमाणें पूर्वी मानलें जात नसून केवळ आईमार्फत मानलें जात असे. आईमार्फत नातें मानण्याची चाल पाहून अशी कल्पना काढली गेली कीं मुलाचा बाप कोण हें जेव्हां अनिश्चित असेल तेव्हांच आईमार्फत नातें ओळखण्याची प्रवृत्ति पडावयाची. आज यन्याच अशी ही पद्धति मलबार येथें आहे हें सांगितलें पाहिजे. कारण मलबारमध्यें बापाच्यामार्फत नातें लक्षांत घेत नाहींत. नंबुद्री ब्राह्मणास ब्राह्मणीपासून झालेला मुलगा आपल्या सावत्र बहिणीबरोबर म्हणजे आपल्या बापाचा ज्या बाईबरोबर ‘संबंध’ झाला असेल त्या बाईच्या मुलीशीं पुन्हां ‘संबंध’ करूं शकतो. मुलाची आई कोण याचें ज्ञान प्रत्यक्ष होणें शक्य आहे परंतु मुलाचा बाप कोण हें केवळ अनुमान आहे. अशा प्रसंगीं आई ही घराण्याची मुख्य समजली जावी हें स्वाभाविक आहे, आणि आई ज्यावेळीं घराण्याची मुख्य असेल त्यावेळेस दुरून अवलोकन करणारास ती परिस्थिति अनियंत्रित व्यवहारासारखी वाटावी यांत नवल नाहीं. आणि मातृशासित घराण्यात अनेकपतित्व हेंहि असणें स्वाभाविकच आहे. तेव्हां ज्यास अनियंत्रित व्यवहार असें म्हणतां येईल त्या परिस्थितींत आणि मातृशासित-समाजांत फारसें अंतर नाहीं. त्याअर्थी समाज मातृशासित होता असें म्हणणें काय आणि स्त्रीपुरुषव्यवहार अनियंत्रित होता असें म्हणणें काय जवळजवळ सारखेंच. स्त्रीपुरुषांचा परस्पर व्यवहार जरी पूर्णपणें अनियंत्रित असला तरी त्याच्या अस्तित्वाबरोबरच मातृशासनाची कल्पना करावयास पाहिजे. कां कीं मातृशासनाशिवाय अनियंत्रित स्त्री-पुरुषव्यवहार देखील अशक्य आहे.

ज्या विकसित संस्कृतीविषयीं आपणांस काहीं ज्ञान आहे, त्या सर्वांत पितृशासित कुटुंबपद्धतीच चोहोंकडे अगदीं ज्ञात कालापासून प्रचलित आहे. याला फक्त मलबारचें उदाहरण अपवाद आहे. मातृशासित कुटुंबपद्धति आज केवळ प्राचीन अवशेषाच्या अनुमानानें काढली आहे. पितृसत्ताक कुटुंबपद्धतींत दिवसानुदिवस फरक एवढाच झाला कीं स्त्रियांच्या व्यक्तित्वाची जाणीव अधिकाधिक होऊं लागली व ती जसजशी होऊं लागली तसतशी अनेकपत्नीपद्धति कमी होऊं लागली. स्त्रियांना गृहव्यवहारांत कसें वागवावें याविषयींच्या कल्पना अधिकाधिक उज्वल होऊं लागल्या. गुलामासारखी जी स्थितींत होती ती धाकट्या भागीदारासारखी झाली.

चालू कुटुंबपद्धतींत फारसा फरक पडणें शक्य नाहीं. स्त्रीपुरुष यांची समता पूर्णपणें स्थापिली जाणें शक्य नाहीं. कां कीं स्त्रियांस गर्भारपण व त्यामुळें परावलंबन उत्पन्न होतें. स्त्रियांची पुरुषापेक्षां प्राप्ती करण्याची शक्ति कमीच असते. जेव्हां ती अधिक असते तेव्हां कुटुंबांत सर्व पुढारीपण स्त्रियांसच येतें. तथापि केवळ द्रव्यार्जनावरून कुटुंबव्यवस्थेमध्यें अखेरचा निर्णय ठरविण्याचा अधिकार उत्पन्न होत नाहीं. ज्या स्त्रिया धंदा करीत आहेत आणि त्यामुळें अनतेस जबाबदार आहेत त्या स्त्रियांस विवाह करण्यास उत्तेजन म्हणून मातृसत्ताककुटुंबपद्धतींत कांहीं सुधारणा करून ती पद्धति पितृसत्ताक कुटुंबपद्धतीबरोबरच अर्वाचीन समाजांत चालू करावी अशा तऱ्हेचे विचार प्रगट होऊं लागले आहेत पण त्या विचाराकडे स्त्रीवर्गाचेंहि लक्ष ओढलें जात नाहीं. [ कुल, गोत्र, देवक, “ प्रजापति संस्था ” मातृकन्यापरंपरा ” ‘ युवावस्था ” हे लेख पहा ]

भा र ती य कु टुं ब प द्ध ती चा इ ति हा स — भारतीय कुटुंबपद्धतीमध्यें विशिष्टपणा असा कांहीं नाहीं. आजचें भारतीय वैशिष्ट्य विवाहविषयक नियमांत आहे कुटुंबविषयक नियमांत नाहीं. वेदकालापासून आजपर्यंत सर्व समाज पितृसत्ताक कुटुंबाचाच आहे. प्राचीन धर्मशास्त्र पहातां त्यांत अनेक प्रकारचे मानलेले पुत्र ( पहा ) यांत कदाचित् थोडं वैशिष्ट्य आढळेल तथापि स्त्रीस्वातंत्र्यनिषेध, नवऱ्याचें महत्व, पिनाकचें महत्व इत्यादि गोष्टींमध्यें काहीं वैशिष्ट्य नाहीं हें सर्वच ठिकाणीं दिसून येतें. आजच्या परिस्थितीसंबंधानें एवढेंच म्हणतां येईल कीं, उद्योगधंद्याच्या अवनतीमुळें येणारी वैयक्तिक जबाबदारी आणि वैयक्तिक अधिकार यांचा अपूर्ण विकास ज्यांत झाला आहे, आणि व्यक्तीस मदत करणाऱ्या दानसंस्था वृद्धिंगत न झाल्यामुळें

संयोगेनाचा अन्योन्याश्रय ज्यात आज अधिक कायम आहे, असा आजचा समाज आहे. अजून कांहीं ठिकाणीं एका घराण्यातील २५।३० कुटुंबें घवित एकाच वाड्यात रहातात.

समाइक कुटुंबपद्धति रूढ असूनहि घराच्या संख्येशीं कुटुंबाच्या संख्येचें निकट साद्दश असलेलें दिसून येतें. येथें कुटुंब म्हणजे पतिपत्नी, त्यांची मुलें व आश्रित असा अर्थ यूरोपीय कुटुंबपद्धतीप्रमाणें विवक्षित आहे. हिंदुस्थानात घराची संख्या ६२.० लक्ष असून पंधरा किंवा अधिक वयाच्या विवाहित स्त्रियांची संख्या ६४.८ लक्ष आहे. एकंदर लोकसंख्येच्या मानानें अल्प असलेल्या उच्च जाती सोडून दिल्या तर समाइक कुटुंबपद्धति जितकी सर्वत्र रूढ आहे अशी जी जनसमजूत आहे तितकी ती नाहीं असें दिसून येईल. मुसुलमान, रानटी टोळ्या व हिंदूंच्या हलक्या जाती यामध्यें ही पद्धत क्वचितच आढळते. या सर्व वर्गांत अशी चाल आहे कीं, लग्नें होण्याबरोबर किंवा मुलें होऊं लागताच तरुण पुरुष आपला स्वतंत्र संसार थाटतात, आणि एकत्र राहिलेले असले तरी कुटुंबातील कर्ता मयत होताच ते वतनतोंच विभक्त होतात. शिवाय बायकांचे अंत कलह, आपल्या नवऱ्याच्या पैशावर इतरांस आधार मिळतो, याबद्दल त्यांच्यात दिसून येणार असहिष्णुता आणि सासुरवासातून मुक्त होऊन स्वतंत्र होण्याची नैसर्गिक वांछा इत्यादि कारणामुळें समाइक कुटुंबपद्धतींतहि एक प्रकारची विध्वंसक प्रवृत्ति वावरत असते. एखाद्या कुटुंबाची इस्टेट अथवा मालमत्ता समाईकच असते पण चुली मात्र वेगळ्या होतात. जमीनदार व व्यापारी यांच्यात हा प्रकार असलेला आढळतो. एखादें कुटुंब समाइक पद्धतीचें असूनहि पुष्कळदा असें घडून येतें कीं, त्या कुटुंबातील कोणी तरी घरातून दूर जाऊन आपला संसार करतो व अशा रीतीनें त्या मूळ कुटुंबाचीच तीन किंवा ४ घरेंहि होऊं शकतात. दुकानें किंवा तसल्याच वस्ती नसलेल्या इमारतींना घरें असें खानेसुमारींत धरलें आहे. कारण त्या इमारतींची काळजी वहाणारा त्या स्थळीं रात्रीस वस्तीस असतो. दर घरीं सरासरी लोकसंख्या ४.९ इतकी आहे. स्कॉटलंडात ती ४ ८ असून इंग्लंड व वेल्स येथें ५ २ इतकी लोकसंख्या आहे.

कित्येक प्रांतिक अहवालावरून असें मत बनत कीं, समाइक कुटुंबपद्धतीची विभक्त व स्वतंत्र होण्याकडे दिवसेंदिवस जास्त प्रवृत्ति होऊं लागली आहे. व्यक्तिस्वतंत्रतेची प्रवृत्ति, एकंदर रहाणींत होणारी वाढ व त्यामुळें एकत्र रहाण्याची आर्थिक स्थितीमुळें अशक्यता, आगगाड्यांमुळें वाढत्या प्रमाणात होणारें स्थलांतर, इत्यादि कारणांमुळें समाइक पद्धति अशक्य ठरूं पहात आहे. खालील आंकड्यांवरून या गोष्टीची कल्पना होईल परंतु आंकड्यावर जास्त विश्वास ठेवणेंहि योग्य आहे. दर घरीं सरासरी लोकसंख्या (१८८१) ५.८, (१८९१) ५.०, (१९०१) ५.२, (१९११) ४.९ होती.

[ संदर्भग्रंथ.—लेखात सर्व आले आहेत. ]

कुडापरान्तक—अपरान्तात जे अनेक भाग प्राचीन काळीं होते त्यांपैकीं एकाला कुडापरान्त किंवा कुडापरान्तक म्हणत. अपरान्त म्हणजे कोंकण. कुड हा शब्द कुडाळ या शब्दातील कुड या शब्दाचा पूर्वगामी दिसतो तेव्हां दक्षिण कोंकणातील जो कुडाळदेश तोच कुड या शब्दानें प्राचीन किंवा मध्यकालीं प्रथित होता. अन्तक हा उपशब्द आहे यासच पुढें ११ व्या शतकात ( एका ताम्रपटात ) कुडुवलपत्तन असें नाव आहे मुसुलमाना ( बहामनी ) अमलात कुडाळ हें नाव प्रचारात आलें (कुडाळ पहा) ( भा. इ. सं. मं वा. इ. १८३६ )

कुठार—हें पंजाब प्रांतांत सिमल्यापाशीं डोंगरी संस्थानांपैकीं एक संस्थान आहे क्षेत्रफळ २० चौ. मै. आहे १९२१ सालीं लो. सं. ३८४१ होती. जम्मूंतील रजपूत घराण्यांपैकीं एकानें हें संस्थान स्थापिलें. संस्थानचें वार्षिक उत्पन्न सुमारें २७५५० आहे यांतून १००० रुपये ईंग्रजास खंडणी म्हणून जाते सांप्रतचे राणा अजजित चंद हे १८९६ सालीं गादीवर आले.

कुडची —मुंबई इलाखा बेळगाव जिल्हा अथणीच्या नैर्ऋत्येस सुमारें १० कोसावर हा गाव आहे येथें सतरज्या चांगल्या होतात हें सदर्न मराठा रेल्वेचें स्टेशन आहे. येथून जमखिंडीला जाण्याचा रस्ता आहे गाड्या, मोटारी वगैरे भाड्यानें मिळतात. गावाच्या पूर्वेस सुमारें अर्ध्या कोसावर कृष्णा नदींतील बेटावर बाभूळ व चिंच यांच्या गर्द झाडींत शेख महमद पीर दादी या मुसुलमान फकीराचा दर्गा आहे या फकिरानें अनेक शिष्य केले. त्यांत वल्लरची राजकन्या मसपली ही एक होती. ही राजकन्या आपल्या गुरूबरोबर हिंदुस्थानात येऊन पुष्कळ परोपकाराची कामें करून येथें मरण पावली हिचा दर्गा येथें आहे. पीरदादी फकीर हा कलबुर्गा येथें मरण पावला. तेथें त्याला पुरलें परंतु त्याचा दर्गा मात्र येथें राजकन्येच्या दर्ग्याजवळ बांधला आहे येथें दर वर्षी उरूस भरतो. महमद तघलखानें बहामनी राज्याचा संस्थापक हसन गंगु यास जी पहिली जहागीर दिली होती तींत कुची–कुडची–गाव होतें असें फेरिस्ता म्हणतो. येथें शाळा व पोष्ट आहे. येथें मुसुलमानवस्ती बरीच आहे. येथील इनामदार १४ व्या शतकापासून आपली वस्ती येथें झाल्याचें सांगतात. [ ब्रिग्ज–फेरिस्ता. पु १, बेळ ग्याझि.]

कुंडल—मुंबई सातारा जिल्हा. हा गांव पंतप्रतिनिधीच्या जहागिरींत स. म. रेल्वेचें स्टेशन आहे. हल्लीं स्टेशनचें नाव किर्लोस्करवाडी ठेविलें आहे पुराणात सांगितलेलें कौंडिण्यपूर हेंच असून या ठिकाणीं हिंगणदेव राजाची राजधानी होती असें म्हणतात. हिंगणदेव हा बहुतकरून देवगिरीच्या यादवराजांपैकीं पहिला सिंघण ( ११०९ ) किंवा दुसरा ( १२०९–१२४७ ) सिंघण राजा असावा गावास तट आहे. गावाजवळील टेंकड्यात ११ ब्राह्मणी लेणीं ती जमीनीपासून ३०० फूट उंचीवर आहेत.

चढताना ३ दरवाजे लागतात व नंतर १५ फूट उंचीची चुनेगची भिंत लागते. तिच्या पलीकडे वीरभद्र नावाच्या महादेवाच्या गणानें मंदिर आहे.त्याच्या पश्चिमेकडील भागात दालिम देवीचें देऊळ असून, त्याच्या समोरच महादेवाचें एक देऊळ आहे. वीरभद्राच्या देवळाच्या पूर्वेस पाण्याची दोन कुंडें आहेत. पलीकडे राम, लक्ष्मण, सीता, शंकर, पार्वती व गंगा यांच्या मूर्ती असलेली लेणीं आहेत. टेकडीचा खडक ठिसूळ व पिंगट रंगाचा आहे. याचा एक दरवाजा कुंडलच्या बाण्यानें अगदीं अलीकडे बांधला. या ठिकाणीं कार्तिकांत यात्रा भरते. या देवळांपैकीं पूर्वेकडील देवळें वैष्णवांचीं व पश्चिमेकडील शैवांचीं आहेत. प्रतिनिधींच्या जहागिरींत या नावाचा तालुका आहे व त्याचें मुख्य ठिकाण कुंडल आहे. तालुक्याची लो. सं. १७३२० आहे. [ सातारा. ग्याझे. ].

कुडलगी—या गावास कुडाळ, कुडली, शृंगेरी अशींहि दुसरीं नांवें आहेत. हा गाव म्हैसूर संस्थानांत शिमोगा जिल्ह्यांत शिमोग्यापासून ईशान्येस ४ कोसांवर तुंग व भद्रा नद्यांच्या संगमावर वसलेला असून त्यास क्षेत्रत्व प्राप्त झालेलें आहे. येथें स्मार्त, माध्व, अद्वैत इत्यादि पंथांचे मठ आहेत. प्रसिद्ध शृंगेरीमठ म्हणून शंकराचार्यांचें जें दक्षिणेकडील पीठ आहे तें येथेंच आहे. स. १७९१च्या एप्रिलांत परशुरामभाऊ पटवर्धन यांनीं टिपूवर जी स्वारी केली त्यावेळीं त्यांच्या लष्करांतील पेंढाऱ्यांनीं हा शृंगेरीच्या आचार्यांचा मठ लुटला होता. ती बातमी भाऊंना कळताच त्यांनीं पागा पाठवून लुटारू धरून आणिले. परंतु " लुटारू हे माझ्या लष्करांतील आहेत, त्यांच्या गुन्ह्याची चौकशी मी करीन " असें रघुनाथराव पटवर्धन कुरुंदवाडकर यांनीं म्हटल्यावरून ते त्यांच्या हवालीं केले. पुढें गडबडींत हें काम तसेंच राहिलें. शृंगेरीच्या भोंवतालच्या प्रांतातल्या धनिकांनीं आपलें वित्त व कुटुंबें घेऊन मठांत तळ दिला होता. त्यामुळें पेंढाऱ्यांनीं मठ लुटला. या पेंढाऱ्यांच्या कृतीबद्दल भाऊंस सर्वांशीं जबाबदार धरणें हें त्या काळच्या सैन्याची शिस्त ध्यानांत आणिल्यास योग्य होणार नाहीं. येथें ब्रम्हेश्वर, रामेश्वर, नृसिंह वगैरे देवांचीं देवळें आहेत. [ खरे–ऐ. ले. सं. पृ. ९, इंपि. गॅ. पु. १६ ].

कुडवक्कल—मुंबई इलाख्यांतील एक शेतकरी जात. या जातीचे लोक विशेषत; बेळगाव, विजापूर, धारवाड, सोलापूर व दक्षिणमहाराष्ट्र या ठिकाणीं आहेत. १९११ सालीं त्यांची संख्या २१२०९ असून पैकीं १०७५४ पुरुष व १०४५५ स्त्रिया होत्या. कुडवक्कल हा कानडी शब्द असून ह्याचा अर्थ कुदळ वापरणारा शेतकरी असा आहे.कुडवक्कल हें एका मूळ पुरुषाचें नाव असून त्याची मूळ वस्ती कुर्गांत होती असेंहि म्हणतात. रेड्डी नांवाच्या एका शेतकरी वर्गाशीं या जातीचा पूर्वी एकदा संबंध आलेला असावा हेंहि शक्य दिसतें.

हिंदु व लिंगायत असे दोन भेद कुडवक्कल जातींत आहेत. लिंगायत कुडवक्कलांचें पंचमसाली लिंगायतांशीं धर्म व चालीरीतींच्या बाबतींत ऐक्य असून फरक आहे तो एवढाच कीं, लिंगायत कुडवक्कल शेंडी ठेवतात व त्यांना एखादा ब्राह्मण आपलीं लग्नें लावण्याकरितां जरूर बोलवावा लागतो. हिंदु व लिंगायत या दोन पंथांपैकीं लिंगायत कुडवक्कलावर लिंगायत धर्माचा बराच पगडा बसलेला आहे. कां कीं, ते कोणत्याहि तऱ्हेचें अशौच पाळीत नाहींत. त्यांच्या चार जाती आहेत व या चार जाती परस्परांत रोटीव्यवहार करतात. परंतु बेटीव्यवहार करीत नाहींत. या चार जाती म्हणजे दंडावती, मिनिगडीक, तहंदि ( मूर्ख ) व यत्तिराक अशा आहेत.

समान गोत्रजामध्यें लग्नें करण्याची यांच्यांत मनाई आहे. कुडवक्कल जातींत बहुपत्नीत्वाची वहिवाट असून विधवाविवाह व काडीमोड या गोष्टींस प्रतिबंध आहे. वयांत येण्यापूर्वींच मुलींचीं लग्नें होतात. लग्नाचा मुहूर्त जंगम किंवा ब्राह्मण ठरवितो व लग्नांतील धार्मिक विधी ब्राम्हणाकडून करविण्यांत येतात. देवकार्य, सीमांतपूजन, लग्नकंकणधारण, वरात वगैरे सर्व समारंभ केले जातात. कुडवक्कल हिंदु व लिंगायत धर्माचे असून बसवण्णा, वीरभद्र व यल्लव्वा या त्यांच्या कुलदेवता आहेत. द्यामाव्वा, दुर्गाव्वा वगैरे त्यांच्या ग्रामदेवता आहेत. सर्व हिंदूसण पाळून तुळजापूर व विजापूर जिल्ह्यांतील गोलागिरिलिंग वगैरे ठिकाणीं हे लोक यात्रेला जातात. गुलकव्वा व चंगलकव्वा या देवींची पुजा मुख्यतः स्त्रियाच करतात. ज्येष्ठी पौर्णिमेस ' करहुनवी ' नांवाचा बैलाचा सण पाळला जातो. त्यावेळीं बैलास सजवून व त्यांची मिरवणूक काढून दायेतीनें ' कर ' तोडण्यात येते.

शेती हाच या जातीचा मुख्य धंदा असून काहीं जण चांगले जमीनदारहि असतात. त्यांच्या स्त्रिया दूध, लोणी, दहीं वगैरे विकतात. कुडवक्कल जातीचे लोक मद्यमांसाहार करीत नाहींत.

कुडवासल—मद्रास इलाख्यांत तंजावर जिल्ह्याच्या नानिलम् तालुक्यांत डेप्युटी तहसिलदाराचें ठाणें. येथें जनानी रेशमी वस्त्रें विणलीं जातात. कुडवासल व कुम्भकोणम् हीं दोन्हीं नांवें ' भांडें किंवा पात्र ' या अर्थाच्या तामिळी शब्दापासूनच निघालीं असल्याचें सांगतात. ( कुड = भांडें वासल = तोंड ) व दोन्हीं गावांसंबंधीं दंतकथा आहेत. असें सांगतात कीं, विष्णुवाहन जो गरुड तो अमृतकुम्भ ( पात्र ) घेऊन जात असतां त्या कुंभाचें तोंड येथें पडलें व पात्राचा दुसरा भाग कुंभकोणम् येथें पडला.

कुडळा—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. हनगलच्या ईशान्येस १२ मैलांवर धर्म आणि वरदा या नद्यांच्या संगमावर हें खेडें आहे. येथील संगमेश्वराच्या देवळांत एक शिलालेख असून देवाप्रीत्यर्थ मोठी वार्षिक जत्रा भरते.

**कुडा**.—या झाडास संस्कृतमध्यें कुटज,मराठींत कुड्याचें झाड, गुजराथींत इंद्रजव, हिंदींत कोरैया वगैरे नांवें आहेत. हें रानझाड सहा सात हातांपेक्षा उंच होत नाहीं. याचीं पानें लंबोडीं असतात कोंकणात या पानाच्या पत्रावळी करतात. याच्या फुलाची भाजी होते. या झाडाच्या शेंगा बारीक व लांब असतात. व त्या भाजी व लोणच्याच्या कामीं उपयोगी पडतात. शेंगांतून जवाच्या आकृतीच्या लांबट बिया निघतात त्यास "इंद्रजव" म्हणतात. त्या बिया व ह्या झाडाचें मूळ हीं कडू असतात. मुळापासून पाक तयार करतात. त्यास कुडेपाक म्हणतात. कुड्याच्या पांढरा व काळा अशा दोन जाती आहेत.

*कुड्याचा औषधी कामात फार उपयोग होतो. पोटातील* कृमीवर कुड्याचें मूळ पाण्यात उगाळून नुसतें अथवा वाव-*डिंगाच्या चूर्णाबरोबर द्यावें. अतिसारावर कुड्याच्या सालीचा* अंगरस काढून तो द्यावा. जीर्णज्वरावर कुड्याच्या मुळाची *साल व गुळवेल याचा काढा द्यावा किंवा साल रात्रीं पाण्यात* भिजत ठेवून तें पाणी सकाळीं द्यावें.

**काळा कुडा**.—ह्या झाडास दुधी काळा कुडा, पाळ, सिरणी वगैरे नांवें आहेत. हें गलनशील झाडांपैकीं असून *दक्खन, कर्नाटक, मुंबई इलाखा, राजपुताना, बाण्डा आणि* ब्रह्मदेशांत सांपडतें.

*ह्यापासून अशुद्ध रबर तयार करतात. त्यात पाणी गोंद* वगैरे शेकडा २५·८, राळ (रेसीन) ४५·८ कौचाकश शें २८·४ *प्रमाणानें सांपडतात. दुसऱ्या काहीं पदार्थांबरोबर रंगाच्या* कामीं याचा उपयोग होतो पुष्कळ दिवसापासून दक्षिण *हिंदुस्थानांतील लोक या झाडाच्या पानाचा नीळ किंवा निळा* *रंग करण्याकडे उपयोग करीत आहेत ह्या झाडाचें लाकूड* साधारण हस्तिदंतासारखें दिसतें; त्याच्या बाहुल्या व प्रसिद्ध चेन्नपट्टण खेळणीं तयार करतात. [ पदे; वॅट ].

**कुंडापूर** *तालुका.—मद्रास इलाखा दक्षिण कानडा* जिल्हा. कुडापूर पोटविभागांतील तालुका. क्षेत्रफळ ६११ *चौरस मैल. १९२१ सालीं लोकसंख्या ११९३५० होती.* ह्या तालुक्यामध्यें १०३ खेड्यांचा समावेश होत असून *त्यापैकीं कुंडापूर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे.* *तालुक्याच्या* पूर्वसीमेवर सह्याद्रि पर्वताची रांग असून तो पर्वत उत्तरेसहि ६ मैल आहे. ह्या भागांतून सह्याद्रींत उगम पावलेल्या तीन नद्या वहात असल्यामुळें प्रदेश फार सुपीक आहे. ऊंस व तांदूळाचें पीक फार छान होतें. नारळीचें उत्पन्नहि बरेंच आहे. तालुक्याच्या डोंगराळ भागात दाट जंगल आहे. तालुक्याच्या उत्तरभागांत खैराचीं झाडें पुष्कळ आहेत. जमीनमहसूल सुमारें ३॥ लाख रुपये आहे.

**गांव**.—*कुंडापूर तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या* (१९०१) ३९८४. बेदनूरच्या राजाच्या कारकीर्दीत हें बंदर होतें. १६व्या शतकांत पोर्तुगीज लोकांनीं येथें येऊन वसाहत केली व किल्ला बांधिला. येथून जवळच एक गोड्या पाण्याचें तळें आहे व त्यात वेगवेगळ्या तऱ्हेचे तीन तीन फूट लांबीचे मासे आहेत. टिपू सुलतान ज्यावेळीं म्हैसूरवर राज्य करीत होता त्यावेळीं त्यानें युद्ध स्वतःकरितां-स्वतः खाण्याकरितां-हे मासे पाळले होते असें सांगतात. व त्याकरितां त्यानें हें तळें मुद्दाम निर्माण केलें होतें.

**कुडालोर** *तालुका.*—मद्रास दक्षिण अर्काट जिल्ह्याचा एक पोटविभाग व तालुका. हा बंगाल उपसागराच्या किनाऱ्यावर आहे. तालुक्याचें क्षे.फ. ४४८ चौ. मै. असून लोकसंख्या (१९२१) ३५८०२१ आहे. कुडालोर, पनरुति, व नेल्लिकुपम् *हीं तीन गावें असून शिवाय २२४ खेडीं आहेत.* येथील जमीन सुपीक आहे. मध्यें एका ठिकाणीं डोंगरसपाटी *असून तेथें विनिपिकाची लाल जमीन आहे. तालुक्याचा* जमीनमहसूल सुमारें ६ लाख रुपयाचा आहे.

**शहर**.—*कुडालोर तालुक्याचें मुख्य ठिकाण. रेल्वेनें* मद्रासहून दक्षिणेस १२५ मैल व पाँदेचरीच्या दक्षिणेस १२ मैल पडतें. हा गाव पुष्कळ पुरे मिळून झालेला आहे. कुडालोर ( नवें शहर ) मध्यें शिवाचें देवालय असलेला *तिरुपा पुलियूरचा भाग, यात मञ्जकुप्पम् व युरोपिअन* लोकांचे बंगले ह्यांचा समावेश होतो. देवनापट्टनम् ( सेन्ट-*डेव्हिड्चा मोडका किल्ला येथें आहे ) व कुडालोर ( जुनें* शहर ) ह्या गावातून पोन्नेयार व गाडिलम् ह्या दोन नद्या *समुद्रास जाऊन मिळतात*

लोकसंख्या ( १९२१ ) ५०५२७. म्युनिसिपालीटीचें १३ चौ मैल घेराचें *अधिकारक्षेत्र असल्यामुळें त्यात* लहान लहान १८ खेड्यांचा समावेश होतो. जिल्ह्याचें *मुख्य ठिकाण असल्या कारणानें कोर्टें व कचेऱ्या येथेंच* *आहेत.*

*दक्षिणअर्काटमध्यें कुडालूर हें पहिल्या प्रतीचें बंदर* आहे. येथील हवा फारच निरोगी आहे रेशमी व सुती कपडा येथें तयार करतात. तुरुंगामध्यें कैदी लोक सतरंज्या व टावेल्स तयार करतात. येथें चार हायस्कूलें व एक सरकारी ट्रेनिंग स्कूल आहे. तीन मिशनरी संस्था येथें आहेत.

कुडालोरमध्यें सन १६८२ सालीं ब्रिटिशांचा प्रवेश झाला. ह्या वर्षी कंपनीनें जिंजीच्या खानाजवळून येथें वसाहत उभारण्याकरितां परवानगी मागितली. पुढें १०।१२ वर्षांत व्यापाराची इतकी वाट झाली कीं, त्याच्या रक्षणार्थ कंपनीनें तेथें सेन्ट डेव्हिड नावाचा किल्ला बांधला. १७४६ सालीं मद्रास हातचें गेल्यावर सेन्ट डेव्हिड्चा किल्लाच इलाख्याचें १७५२ पर्यंत मुख्य ठाणें होऊन बसला होता.

**कुडाळ**.—पोर्तुगीज वसाहतींपैकीं गोव्याच्या वसाहतींत ह्या प्रांत सांप्रत मोडतो. प्राचीन कुडाळ देशाचें नाव कुड अथवा कुडापरान्त असें होतें. व तो परान्त आणि अपरान्त या कोंकणच्या दोन भागांपैकीं अपरान्तात होता. यापैकीं

काहीं भाग हल्लीं सावंतवाडी संस्थानांत सामील झाला आहे, व कुडाळ या नावाचें एक शहरहि संस्थानांतील एका भागाचें मुख्य ठिकाण आहे. प्राचीन कुडाळ प्रांतापैकीं काहीं भागाला इ. स. च्या १८ व्या शतकापासून सावंतवाडा संस्थान असें म्हणूं लागले पूर्वींच्या कुडाळ प्रांतांत १२ तर्फा ( जिल्हे ), २ कर्याती ( तालुके ) एक विलायत (विलायत = मूळ प्रदेश, जिल्हा) व एक बंदर ( वेंगुर्लें )हीं होतीं. सांप्रतच्या देवगड तालुक्यांतील साळशीमहाल, मणेरी, पेडणें, डिचोली, फोंडा, सांखळी हे पांच महाल, इतक्या प्रदेशाचा समावेश होत होता. सांप्रत वरील पंचमहाल पोर्तुगीजांच्या ताब्यांत आहे. साळशीमहाल व वेंगुर्लें बंदर इंग्रजांच्या मुलुखांत आहेत. कर्यात पाटगांव हा कोल्हापूरकराकडे आहे व बाकीचा सारा मुलुख सावंतवाडीकराकडे आहे. तो मुलुख म्हणजच सारें वाडीसंस्थान होय.

या प्राचीन कुडाळ प्रांतावर ११ व्या शतकापूर्वी कदंब व चालुक्य यांची सत्ता होती. ११व्या शतकापासून १४ व्याच्या मध्यापर्यंत ब्राह्मण ( कुडाळ देशकर ) सावंत घराण्याची प्रथम अनुक्रमें कदंब ( बनवासीचे ) व यादव ( देवगिरीचे ) यांचे मांडलिक या नात्यानें आणि नंतर स्वतंत्रपणें सत्ता होती. या सामंतांनीं १३ व्या शतकांत त्या प्रांतास कारवार, अंकोला व मिरजन हा भाग जोडला. कदंबाच्या वेळचा 'नऊसें इरिदिगे' नांवाचा प्रांत हाच वरील कुडाळ प्रांत असावा. पंधराव्या शतकाच्या पुढें मुसुलमानी झाली. तेव्हां सामंताच्या राजवटींत अधिकारी असलेल्या त्याच्याच जातीच्या प्रभु घराण्याची सत्ता मांडलिक म्हणून सरदेसाई या अधिकाराखालीं बहामनी व आदिलशाही राजवटींत या प्रांतावर झाली. या प्रभु सरदेसायाच्या हाताखालीं वरील बारा महालांचे बारा देसाई अगर नाईक होते. सतराव्या शतकाच्या मध्यांत वरील बारा नाइकांपैकीं माणगांव महालचा लखम सावंत नांवाचा नाईक यानें तत्कालीन ब्राह्मण प्रभु सरदेसायाच्या दुर्बळपणाचा फायदा घेऊन कुडाळ प्रांताच्या बऱ्याच भागावर दांडगाईनें अमल बसविला. एवढेंच नव्हे तर सरकारी दप्तरावरून असेंहि दिसतें कीं, त्यानें समकालीन प्रभु सरदेसायाला ठार मारिलें. पुढें या लखमाच्या वंशांतील खेम सावंतानें प्रभु घराण्यांतील जोगण प्रभु नांवाच्या सरदेसायाला लढाईत ठार मारून त्याचा सर्व कुडाळ प्रांत पूर्णपणें हस्तगत करून घेतला ( १६९६ ).

इ. स. १५८० च्या सुमारास वरील प्रभुसरदेसायांनीं गोव्यांतील कांहीं शेणवी ब्राह्मणांस आणून त्यांना कुडाळ प्रांतात कुळकर्णपणावर नेमिलें होतें. याच वेळीं शेणवी ब्राह्मणांचा कुडाळ देशांत प्रवेश झाला.' याच शेणवी लोकांनीं प्रभुसरदेसायाविरुद्ध वाडकरसावंतांला मदत केली. या कारणावरून त्या दोन जातींमध्यें द्वेष उत्पन्न झाला." कुडाळकर ब्राह्मण ( प्रभु ) सरदेसायांचें मूळ वतनी गांव वालावली आहे, व तेथील नारायणदेव हें त्यांचें कुलदैवत आहे. या गांवीं वाडकर ( मराठे ) सावंत रात्रीं वस्तीस रहात नाहींत असें म्हणतात. "तसेंच वाडकरसावंत हे आपल्याला सरदेसाई म्हणवीत असूनहि तसा त्यांचा अधिकारदर्शक शिक्का आढळत नाहीं, व जे इतर शिक्के आहेत ते स्वतः सावंत सरदेसाई आपल्या हातानें न करतां एखाद्या ब्राह्मणाच्या हातून करवितात व आपलें राज्य देवाब्राह्मणाचें आहे असें म्हणतात," असें ऐकण्यांत आहे. वरील ब्राह्मण प्रभुघराण्यांतील जोगणप्रभु हा वाडकर ( मराठे ) सावंतास प्रहर ( ब्रह्मसमंध ) रूपानें त्रास देई, म्हणून त्याच्या ( झारीरूपी ) मूर्तीची पूजाअर्चा हे वाडकर सावंत ब्राह्मणाकडून करवितात असें एका कैफियतींत म्हटलें आहे.

मुसुलमानी अमलांत या प्रांताची राजधानी गोव्यास गेल्यानें कुडाळ गांवाचें महत्व थोडें कमी झालें, तथापि प्रभुसरदेसायांनीं आपलें ठाणें कुडाळासच ठेविल्यामुळें तें बरेंच टिकून राहिलें. वाडकर सावंत हे अद्यापि आपल्या नांवापुढें 'सरदेसाई प्रांत कुडाळ व महालनिहाय' असा मायना जोडतात.

कुडाळांत वरील ब्राह्मणकालीन राजवटींतील पुढील अवशेष आहेत. ( १ ) शहराच्या पश्चिमेचा भुईकोट किल्ला, ( २ ) त्यांतील घोडबाव या पायविहिरीची खोली ४० फूट व घेर १०० फूट असून घोडेस्वार ( घोड्यावरून न उतरतां ) थेट खालीं पाण्यापर्यंत जाऊं शकतो. ही अद्यापि सुस्थितींत आहे, ( ३ ) नदीवरील संध्याघाट, ( ४ ) गावाभोंवतालचा पडका कोट. कुडाळ व गोमांतक हे दोन्ही प्रांत जरी एकमेकांशेजारीं आहेत तरी त्यांची भाषा भिन्नभिन्न आहे. कुडाळ प्रांतांतील भाषेला कुडाळी भाषा म्हणतात. तसेंच कुडाळी माप कुडाळी रिरस्ता इ॰हि स्वतंत्र आहेत. याबद्दलची जास्त माहिती जर्व्हिस यानें लिहिलेल्या कोंकणावरील पुस्तकांत आढळेल [ हचिन्सन-मेमॉयर्स ऑन सावंतवाडी, पिंगुळकर-सावंतवाडीचा इतिहास, जर्नल अँथ्रॉपॉलॉजिकल सोसायटी व्हॉ. ८, रा. वासुदेव अनंत धावडेकर यांचा लेख ]

**कुडाळदेशकर ब्राह्मण**—यांचें दुसरें नांव आद्यगौड ब्राह्मण असें आहे. मूलतः हे उत्तरेकडील असून कोंकणांत केव्हां व कसे आले याबद्दल जी माहिती मिळते ती पुढें दिल्याप्रमाणें :—

महंमुद गिझनीकरानें उत्तरहिंदुस्थानांत स्वाऱ्या करून धुमाकूळ घातला त्या सुमारास ( इ. स. १०१७ ) गंगायमुनांच्या प्रदेशावर गौडेश्वरपाल राजांचें साम्राज्य होतें. त्यांच्या मांडलिकांत गंगायमुनांच्यामधल्या भागांत 'सामंत' नांवाचें एक ब्राह्मण संस्थानिक होते. यांच्या राज्याची धाताहत महंमुदाच्या वेळीं झाल्यामुळें हें घराणें तेथून निघून दक्षिणेस कोंकणांत

१



२





३



४



५

(१) शक १२१७ चा मठगांवचा शिलालेख (२) नामदेव सामंत याचा मुद्रा व लखनावधि (३) मानजी प्रभु सरदेसाई याचा मुद्रा (४) वालावल येथील श्रीनारायणदेव याचा मुद्रा (५) मानजी प्रभु याचा मोडी सही (पृष्ठ ५२८–१२२)

सध्यांच्या देवगड तालुक्यातील " हिंदळे " या गावीं तत्का-लीन कोंकणच्या कदंब राज्याच्या आश्रयास येऊन राहिले याचें गोत्र काश्यप असून त्याच्या बरोबर आणखी तेरा गोत्रांची दुसरीं ब्राह्मण घराणीं कोंकणात आलीं होतीं. येथून कुडाळदेशकर ब्राह्मण ज्ञातीच्या इतिहासास सुरुवात होते.

यापूर्वी निदान १०० वर्षे तरी प्रांतभेदानें तत्कालीन ब्राह्मणांचा नामनिर्देश होऊं लागला असावा असें वाटतें. तत्पूर्वी शिलालेखांत अगर ताम्रपत्रांत गोत्रभेदानें ब्राह्मणांचा उल्लेख येतो. त्यानंतर प्रांतवाचक उल्लेख येऊं लागला. आणि त्यामुळें पुढील काळांत या प्रांतवाचक निरनिराळ्या ब्राह्मणांत विवाहसंबंध होईनासा झाला असावा. उत्तरेकडील सर्व ब्राह्मण यजुर्वेदी असल्यानें वरील सामंत घराणें व बाकीचीं तेरा घराणीं हीं सारीं यजुर्वेदीच होतीं. सामंत हें नांव प्रथम मांडलिक राजसत्तादर्शक होतें. परंतु पुढें आडनांवाचा प्रघात पडल्या-वर तें तद्दर्शी झालें. ( तत्पूर्वी आडनांवें प्रचारांत नसावीं ). कुडाळदेशकर ब्राह्मण हे मूळचे यजुर्वेदी असून हल्लीं त्यांच्यांत ऋग्वेदी कसे आढळतात असा एक प्रश्न आहे. त्यास उत्तर असें कीं, ते दक्षिणेंत आल्यानंतर त्यांची वसाहत जेथें झाली त्या भागांत कऱ्हाडे ब्राह्मणांचें साहचर्य त्यास निकट अस-ल्यानें व ते ऋग्वेदी असल्यामुळें हेहि ऋग्वेदी बनले यास पुढील उदाहरण आहे. चित्पावन ब्राह्मण हे मूळचे हिरण्य-केशी यजुर्वेदी असून पुढें त्यांच्यापैकीं बरेच ऋग्वेदी बनले.

आडनांवाचा प्रघात पडल्यानंतर तो कुडाळ देशकर ब्राह्म-णांतहि सुरू झाला. त्यांच्यातील जुनीं व नवीं आडनांवें अशीं आहेत. सामंत प्रभु, नायक, ठाकूर, पंडित, पाटील, जोशी, महाजन, सरदेसाई, देसाई, नाईक, देशपांडे, सरना-ईक, मतकरी, जुवळे, वेंद्रे, टिकल्ये, नगारे, गिते, गोसावी, डिंगे, कोले, साठकुंभे, वेर्वे, वाघ, संत इत्यादि.

याशिवाय धंद्यावरून व गांवावरून पडलेलीं अनेक नांवें आहेत. ब्राह्मण ज्ञातींत ' सामंत ' हें नांव कुडाळ प्रांतांतच नव्हे तर सबंध महाराष्ट्रांत फक्त याच ( कुडाळ देशकर ) जातींत आढळतें; दुसऱ्या कोणत्याहि ब्राह्मण जातींत तें आढळत नाहीं. ' प्रभु ' उपनांवहि कुडाळ प्रांतांत मुख्यत्वें-करून याच जातींत आढळतें. त्या प्रांतांतील शेणवी ब्राह्मण-जातींत तर मुळींच आढळत नाहीं; कऱ्हाडे ब्राह्मणांत ( प्रभुदेसाई ) फारच विरळ आढळतें; चांद्रसेनीय कायस्थ प्रभु ( ही जात " प्रभु " हें उपनांव म्हणून कधींच लावीत नाहींत)त्या प्रांतांत कधींहि नव्हते व सध्या नाहींत. (कुडाळ प्रांताबाहेर ' प्रभु ' हें उपनांव कांहीं जातींत क्वचित आढ-ळतें; पण तें बहुतांशीं " परब " या अपभ्रंशाच्या रूपानें.) यावरून कुडाळ प्रांतांतील प्रभु हे नामांकित राज्याधिकारी या कुडाळ देशकर जातीचेच होत असें विद्वानांचें म्हणणें आहे. त्यांचे वंशज आज अस्तित्वांत आहेत.

कदंबाच्या राजवटींत या जातीला राजाश्रय होता. या जातींतील बहुतेक घराणीं पुढें तत्कालीन परिस्थितीमुळें क्षात्रवृत्तीचीं बनलीं. यादवाच्या वेळीं या जातींतील कांहीं घराणीं त्यांचीं मांडलिक बनलीं. या मांडलिकांत ' जोगदेव ' उगीदेव, मायीदेव, ( माइन्देव ) वगैरे नांवाजण्यासारखे पुरुष झाले. सम्राट सिंघण यादवाच्या काळीं माइन्देव हयात असून त्याला महाप्रधान, सर्वाधिकारी, महापरम विश्वासी अशा उपाधी होत्या. या माइन्देवाच्या हाताखालीं हेम्म ( हेम्मेय ) नायक नांवाचा एक शुंकाधिकारी ( शुंक—एककर ) बनवासी प्रांतावर होता. माइन्देव फार शूर अस-ल्यानें त्याला रणलक्ष्मीविधुवर व मेगमहीपति असें म्हटलेलें आहे. त्यानें बरेच प्रांत जिंकल्याचें आढळतें. ' माग्लाब्ध्य-महेश्वर ' असाहि त्याचा उल्लेख एका शिलालेखात आहे. त्या-वरून सिंघणाच्या पश्चात माइन्देव हा स्वतंत्र झाला असावा असें वाटतें यापेक्षा त्याला सांगीचा पुरावा मिळत नाहीं. या घराण्यांत हेम, भैरवदेव, फाई( फाइन )देव आणि नागदेव या राजांचीं नांवें प्रामुख्यानें पुढें येतात. या नाग-देवाचा एक ताम्रपट प्रसिद्ध आहे. तसेंच हेमराजाचाहि एक ताम्रपट उपलब्ध झाला असून अद्यापि अप्रकाशित आहे.

पुढें १५ व्या शतकाच्या पूर्वी बहामनी राजांनीं कोंकण घेतलें त्यावेळीं हीं सामंत घराणें नष्ट झालें. या घराण्यापैकीं आज फक्त दोन शाखांचाच शोध लागतो. पैकीं एका शाखेंत त्यांच्या पूर्वजांच्या पाषाणांच्या मूर्ती पूजेंत ठेविल्या आहेत. परंतु त्यांना आपल्या घराण्याच्या इतिहासाची फारशी ओळख नाहीं. या मूर्ती राजाच्या पालखींत बसविलेल्या अशा दाखविलेल्या आहेत. यादव राजे राज्य करीत असतां पूर्वीच्या जैन व लिंगायत धर्मांचा त्यांनीं उच्छेद करून पुन्हां वैदिक धर्माची आपल्या राज्यांत सर्वत्र स्थापना केली. त्या कामांत माइन्देव, हेमदेव व भैरवदेव यांनींहि भाग घेतला होता. त्यामुळें या धर्मप्रस्थापक सम्राट ( यादव ) व मांड-लिक ( सामंत ) राजांच्या मूर्ती पालखींत बसलेल्या अशा कुडाळ प्रांतांत बऱ्याच आढळतात.

मुसुलमानी अमदानींत सामंत घराण्याचें प्रधानकीचें किंवा सेनापतीचें काम करणाऱ्या जामदग्न्यवत्सगोत्री प्रभु उपनांवाच्या ब्राह्मण घराण्याकडे ( ते कदंबाच्या वेळेपासून देशमुखीहि करीत असल्यामुळें व त्यावेळीं या ब्राह्मण जातींत हेच प्रमुख असल्यानें त्यांच्याकडेच ) बहामनी शहांनीं कोंक-णांतील या प्रांताची व्यवस्था सोंपविली. हे प्रभु त्यावेळीं जहागीरदार बनले. या काळींच कुडाळाचें महत्त्व जाऊन तें गोव्यास प्राप्त झालें ( गोवें बंदरांत किंवा जवळच सामंताची एखादी राजधानी असावी असें इ. स. १३९१ च्या विजय-नगरताम्रपटांतील ' गोवाभिधा कोंकण राजधानी ' या पदा-वरून वाटतें ). त्यावेळीं गोवें बंदराचें महत्त्व फार असल्यानें बहामनी शहांनीं तें जिंकण्यासाठीं बरेच प्रयत्न

प्रभु घराण्यांत ( बखरीच्या आधारें ) चंद्रभान

ही दोन जुनीं नावें आढळतात. त्याचा नक्की काळ समजत नाहीं. परंतु १४ व्या शतकाच्या सुरुवातीस हे असावेत असें जैन वाङ्मयातील उल्लेखावरून म्हणता येतें. हें प्रभु घराणें शेवटपर्यंत मुसुलमानांचें व मध्यंतरीं काहीं काळ विजयानगरकरांचें मांडलिक होतें. कारवार, अंकोला व मिरजन हा भाग या घराण्याकडे प्रथमतः विजयानगरकरांतर्फे आला असें दिसतें. या घराण्याकडे गोमप्रभु, रामप्रभु, वायाजीप्रभु, मानजीप्रभु, बाबाजीप्रभु, जोगणप्रभु हे प्रसिद्ध पुरुष होऊन गेले. इ. स. १४६० ते १६४० पर्यंत हें घराणें सुस्थितींत होतें. इ. स १६९६ साली प्रस्तुतच्या वाडकर (मराठे) सावताच्या पूर्वजांनीं या प्रभूस जिंकून या घराण्याचा शेवट केला. शिवाजीमहाराजाची स्वारी होण्यापूर्वी काहीं वर्षे या प्रभु सरदेसायाच्या अंमलाखालीं पंचमहाल कुडाळ (४१३ गावें), साळशीमहाल (८४ गावें) व कारवार, अंकोला आणि मिरजन हे महाल इतका प्रदेश होता शिवाय तर्फ चादगड परगण्याचा काहीं भागहि होता असें दिसतें.

या प्रभु घराण्यानें विहिरी, घाट, देवळें वगैरे बांधून व ब्राह्मणांना व अग्निहोत्र्यांना वगैरे उत्तेजन देऊन ब्राह्मणी धर्माचें संरक्षण केलें पुढें शिवाजीमहाराजाच्या वेळीं या जातींतील लोकांनीं त्यांना थोडेंफार साहाय्य केलें यांनीं कोल्हापूरकर व सातारकर छत्रपति आणि पेशवे, आंग्रे, वाव-डेकर वगैरे दरबाराचा आश्रय केला होता. याच्या आश्रया-मुळेंच पुढील अवनत काळात ही जात जिवंत राहूं शकली व वाडीच्या सावंतांनीं या जातीच्या जमिनी, इनामें व देव-स्थानें काबीज करुन त्याच्यावर "बामणदंड" नावाचा कर जुलमानें लादला यामुळे व वरील इतर परि-स्थितीमुळें कुडाळ प्रांतातील शेकडो कुटुंबें तो देश सोडून दुसरीकडे गेलीं असें या जातीचें म्हणणें आहे. या वसाहती विशेषतः आजरें, वसई, अर्नाळा, बेळगाव, धारवाड, विजापूर, गोकर्ण, मोगरनाड, बारकोर येथें झाल्या आहेत वाडीच्या सावं-तांच्या पदरीं या जातीचे लोक नोकर म्हणून फारसे नाहींत. शेणवी ब्राह्मणांना कुडाळदेशकर ब्राह्मणांनीं पूर्वी ते त्यांचे नोकर असतांना जमीनी वगैरे दिल्या होत्या. परंतु उलट 'या जातीचा त्यांनीं छळ केला" असें शेणवी म्हणतात इंग्रजी अंमलात हा छळ कमी झाला, याबद्दल कै. रा. राजाराम राम-कृष्ण भागवत यांनींहि आपला अनुभव विविधज्ञानविस्तारात लिहिला आहे. या जातींत शिक्षणप्रसार बरा झाला असून सरकारी व एतद्देशीय संस्थानांतील मोठ्या दर्जाच्या नोकऱ्या या लोकांनीं केल्या आहेत. व्यापाराच्या क्षेत्रांतहि त्यांचें पाऊल पुढें पडत आहे. तरी ही ज्ञाति म्हणण्यासारखी सधन नाहीं.

या ज्ञातीच्या हल्लीं पुढील पाच संस्था आहेतः–(१) कुडाळ देशस्थ गौड ब्राह्मण विद्यावृद्धि समाज, (२) गौड ब्राह्मण सभा, (३) कुडाळ देशकर आद्य गौडब्रह्ममंडळ, (४) ... गौडब्राह्मण निराश्रित साहाय्यकारी फंड, (५) कुडाळदेशकर आद्य गौडब्राह्मण महामंडळ पहिल्या संस्थेचें भांडवल आज एक लाख रुपयांवर आहे व ती २०।२२ वर्षे विद्यार्थ्यांना मदत करीत आहे. दुसरीचें काम वाङ्मयात्मक व सामाजिक (ज्ञातीचें) कार्य करणें हें होय. तिसरी ज्ञाति-संघटण करणारी. चौथीचें भांडवल १५ हजार असून पांचवी सर्व ज्ञातीची प्रातिनिधिक संस्था आहे. ज्ञातींतील धनाढ्य गृहस्थ कै. वा. अनंत शिवाजी देसाई, टोपीवाले यांनीं परदेशीं जाऊन विद्या शिकण्याऱ्याकरितां तीन लाखांचा फंड उभारला आहे.

या जातीचें शंकराचार्यान्वयी गुरुपीठ ५१६ शें वर्षांचें जुनें असून तें या ज्ञातीच्या राजवटींत कुडाळ शहराच्या कोटापासून ३ मैलावर सोनवडें (स्वर्णवट) गावीं स्थापन करण्यात आलें. हा प्राचीन मठ नंतर (वाडकर) सावं-तांच्या अमदानीच्या सुरुवातीस शेणवी ज्ञातीनें ताब्यात घेतला (या मठासंबंधीं प्रकरणात कै वा. गणपतराव पर-ळेकर वकील, यांनीं आपल्या 'कुडाळदेशकर' नामक पुस्त-कात ३ ऱ्या प्रकरणात निस्तृत आणि मार्मिक विवेचन केलें आहे, तें वाचनीय आहे). मध्यंतरीच्या काळात चिंदर व गोळवण हे मठ स्थापन होऊन शेवटीं सुमारें १७५ वर्षांच्या पूर्वी सध्याचें दाभोली हें मठसंस्थान स्थापन कर-ण्यात आलें.

या जातींत गोपाळ बोध गोसावी मळगावकर, पूर्णानंद चिदानंद, विमलानंद, श्रीधर स्वामी उर्फ मौनीबुवा, शुक-देव, हरिचरण गिरी, भगवान गिरी, दत्तगिरी, रुक्माजी बुवा, उमाजी बुवा, अंबरनाथ, गंबरनाथ, काननाथ, रामदासी संप्र-दायातील रघुनाथ बुवा आणि अनंत बुवा (यांचे कुडाळ प्रांतात दोन मठ आहेत), केशवबुवा द्वादशीकर, वारकरी संप्रदायात गेल्या ६०।७० वर्षांपूर्वी प्रसिद्ध असलेले अजरेकर संतबाबा महाराज, गोविंददादा, पद्मनाभतीर्थ (वाडमठ) इत्यादि साधू संत होऊन गेले. यांत गोपाळ बोध, चिदा-नन्द, पद्मनाभतीर्थ हे कवी म्हणूनहि प्रसिद्ध आहेत

या जातीची एकंदर लोकसंख्या सुमारें ३५ हजार आहे. याची नोंद धर्मगुरूच्या संस्थानात मिळते. जातींत पूर्वी पंचायत होती, हल्लीं महामंडळ स्थापन झालें आहे. याचा कायमचा अध्यक्ष धर्मगुरु (शंकराचार्यान्वयी मठपति) असून लोकनियुक्त उपाध्यक्ष बहुतेक कामें करितो. ज्ञातीचा कर वसूल करण्यासाठी मंडळ्या (कमिट्या) नेम-लेल्या आहेत ज्ञातींत शरीरसंबंधानें किंवा इतर कोण-त्याहि सम्ब्रंधें बाहेरचीं माणसें समाविष्ट होत नाहींत. अलीक-काळच्या मानानें ज्ञातीचीं पूर्वींचीं शास्त्रविहित कर्में शिथिल होत चालली आहेत त्यामुळें धर्मगुरु व पंचायत यांच्या शासनाधिकाराचा उपयोग क्वचितच होतो. या जातींत पूर्वी १४ गोत्रें होतीं, परंतु त्यांपैकीं चार नाहींशीं झालीं. बाकीच्या १० गोत्रांतीलहि कित्येक घराणीं जीं बाहेर गेलीं, त्याच्या दोन जाती बनल्याची समजूत जुनीच आहे.

पैकीं एक पेडणेकर ही होय अर्थातच ते आपल्यास गौड ब्राह्मणच म्हणवितात यांची वसाहत गोव्यांतील पेडणें महालांत (हा महाल पूर्वी कुडाळ प्रांतांत मोडत असे) जास्त आहे या भेदास ३५० वर्षे झालीं असावीं त्यांत सध्या प्रभु उपनावाचें एक धनाढ्य घराणें पोर्तुगीजांचे व्हायकाउंट आहे

या ज्ञातीनें उपनयनविवाहादि धार्मिक संस्कार याच ज्ञातीचे अगर कऱ्हाडे ज्ञातीचे उपाध्याय करितात ज्ञातीचे प्रश्न जात सोडविते. शंकराचार्यांचा किंवा इतर कोणत्याहि ब्राह्मण जातीचा सल्ला घेण्यांत येत नाहीं चातुर्वर्ण्यांत या ब्राह्मणांना इतर दशविधांचेंच स्थान आहे ज्ञातीसंबंधीं कागद धर्मगुरूच्या संस्थानांत व पंचाच्या प्रमुख घराण्यांत आहेत ज्ञातीचीं स्थलांतरें (वरील कारणामुळें झालेलीं) गेल्या तीनचारशें वर्षांतील आहेत एकंदर बहुजनसमाज पुराणमताभिमानी असा आहे ज्ञातींत विधवेचा पुनर्विवाह झाल्याचें एकहि उदाहरण आढळत नाहीं विधवा व निराश्रितांची तरतूद ज्ञातिफंडांतून होते या जातींतील पुरुषास रखेल्यापासून झालेल्या मुलांची गणना सर्वसाधारण शूद्र वर्गांत करितात. अशा ज्ञातीपासून उत्पत्ति झाली ही गोष्ट दर्शविणारें असें स्वतंत्र नाव त्यांना नाहीं देवळी या नावाचा एक बराच मोठा वर्ग त्या प्रांतांत मशहूर आहे त्या वर्गांतील स्त्रियांस भावणी (संस्कृत भाविनी) म्हणतात पण या जातीवर आतां कोणत्याहि विशिष्ट जातीला हक्क सांगतां येईल असें वाटत नाहीं

ज्ञातीचें मूळचें नाव गंगाकिनाऱ्यावरील गौडप्रांतांतील राहणारे म्हणून आद्य गौड अगर गौड असें आहे, पण कोंकणांत सर्वसाधारण लोक अलीकडे या जातीला 'कुडाळदेशकर ब्राह्मण' असें म्हणतात हें नाव क्वचित १७ व्या शतकाच्या सुरवातीपासून व सन १६९६ पासून पुढील कागदांत विशेषतः रूढ झाल्याचें आढळतें कुडाळ देश यांनीं वसविला म्हणून हे कुडाळदेशकर होत अशी जी व्युत्पत्ति एका पुस्तकांत आढळते ती बरोबर नाहीं कारण हे कुडाळाकडे येण्यापूर्वीपासून कुडाळ (कुद्यपरान्तक) प्रांत अस्तित्वांत होताच दुसरा असा एक विचित्र तर्क आहे कीं, देशावरील (वाईजवळच्या) कुडाळामध्ये यांनीं प्रथम वसाहत केली आणि दुर्गादेवीच्या दुष्काळाच्या सुमारास (कदाचित् दुष्काळामुळें) त्यांनीं कोंकणांत येऊन वसाहत केल्यानंतर 'देशावरील कुडाळाहून' आले म्हणून त्यास 'कुडाळदेशकर' असें नाव पडून त्या नवीन वसाहतीस 'कुडाळ' असें नाव पडलें पण हा तर्क जितका विचित्र आहे तितकाच तो निराधार खोटाहि आहे असें रा. या. अ. वावर्डेकर म्हणतात कारण दुर्गादेवीचा दुष्काळ सन १३९६ त पडलेला नसून, तो रा. राजवाडे यांनीं अस्सल कागदावरून सन १४६८–१४७५च्या दरम्यानच्या काळांत पडल्याचें निर्विवाद सिद्ध केलें आहे (सरस्वतीमंदिर मा. पु.) आणि या सालापूर्वी (१४३६), रा. वावर्डेकर यांच्या पूर्वजांनीं कुडाळ प्रांतांतील त्यांच्या गांवच्या देवस्थानासंबंधीं दिलेल्या इनाम जमिनींचा त्यांनीं स्वीकार केल्याचा उल्लेख ज्यांत आहे, असा एक कागद रा. वावर्डेकरांपाशीं आहे त्यावरून ही जात दुर्गादेवीच्या दुष्काळाच्या पूर्वीपासूनच या प्रांतीं आहे हें उघड होतें त्याला इतिहासाचा इतर पुरावा आहे तो वेगळाच तसेंच या प्रांताचें नाव दुर्गादेवीच्या दुष्काळापूर्वीच 'कुडाळ' असें होतें हें त्यापूर्वीच्या एका बहामनी बादशहाच्या फर्मानांत 'कुडाळ' असें नाव असल्यावरून सिद्ध होतें

या ज्ञातींतील लोकसंख्येची वाढ असावी त्या मानानें बरीच कमी दिसते यास पुढील कारणें असावीं —(१) वामपदादि आपत्तींमुळें भर पडलेली सतत दोन अडीच शतकांची अशांत स्थिति (२) तत्कालीन राजकीय परिस्थितीमुळें स्वार्थाला बळी पडून कांहीं घराण्यांनीं परजातींत स्वतःस समाविष्ट करून घेतलें पण यांतूनहि शिल्लक राहिलेली सर्व लोकसंख्या मठांतील यादीप्रमाणें सुमारें ३५ हजार असतां आणि त्यांतील मोठा भाग मुंबईइलाख्यांत असतां १९२१ च्या सरकारी खानेसुमारीमध्यें मुंबई इलाख्यांतील संख्या ५।६ हजारच दाखविली गेली आहे यांचें कारण या जातींतील कांहीं माणसें चुकीनें गौडसारस्वत या जातींत समाविष्ट झालीं असावीं हें होय

हल्लीं प्रसिद्ध झालेल्या (१९२०) एन्थॉवेनकृत 'ट्राइब्ज अँड कॉस्ट्स् ऑफ बॉंबे' या पुस्तकांत दाक्षिणात्य गौडब्राह्मण म्हणून समजल्या जाणाऱ्या जातींना सारस्वत, गौडसारस्वत आणि शेणवी अशा त्रिविध नावाच्या एकाच प्रमुख सदरांत गोंविलें असून माहिती देतांना फक्त शेणवी ब्राह्मणाच्या मूळकथा सांगून त्यांतच सर्वांचा समावेश केला आहे याबद्दल रा. वावर्डेकर म्हणतात — 'ह्या मूळ कथा सह्याद्रि खंड आणि स्कंदा महात्म्यांतल्या म्हणून कोणी तरी साहेबमजकुरास पुरविलेल्या आहेत पण मुळीं त्या तशा वरील महात्म्यांत आणि सह्याद्रिखंडांत नाहींतच परशुरामानें 'सारस्वत उर्फ शेणवी' ब्राह्मणास आणिलें असें या ग्रंथांत म्हटलेलें नसून नुसतें 'गौडब्राह्मण' आणिले असें म्हटलें आहे तसेंच या ग्रंथांत ब्राह्मणांचीं नुसतीं ६६ कुलें (कुल पद्धति) आणिलीं असें आहे पण एन्थॉवेन हे त्यांत ९६ कुलें दिलीं आहेत असें सांगून त्यावरून शहाण्णवें = शेणवी हें नाव पडल्याचें नमूद करितात ग्यॅझेटिअर व शेणव्यांच्या ज्ञातिसंबंधाच्या पुस्तकांतून शिळी झालेली शेणवी शब्दाची ही व्युत्पत्ति १९२० सालीं एन्थॉवेनच्या पुस्तकांत नमूद व्हावी हा आश्चर्याची गोष्ट होय ! शिवाय परशुरामाच्या वेळीं (४।५ हजार वर्षांच्या सुमारास) ब्राह्मणांत ज्ञाती नव्हत्या वगैरे गोष्टी सह्याद्रिखंडकारास कदाचित् माहीत नसतील परंतु या साहेबांसारख्या ज्ञातिविषयावर लिहिण्यास प्रवृत्त झालेल्यांना व त्यांना वरील माहिती पुरविणाऱ्यांना तरी त्या माहीत असाव्या

पाहिजेत. तसेंच परशुरामानें आपणास आणिलें असें कोंकण आणि मलबार किनाऱ्यावरील कित्येक ब्राह्मणजाती सांगतात. त्यात ऐतिहासिकपणाचा अंश काहीं नाहीं हें या एथ्नॉग्रफीकार एन्थॉवेन साहेबास कळावयास हवें. सह्याद्रीखंड हें इतिहासकारास आता विश्वसनीय वाटत नाहीं. या खंडाच्या उत्तर खंडातले पाहिले तीन चार अध्याय वाचून असें निश्चित म्हणता येतें कीं, गोव्याची, तेथील देवतांची व ब्राह्मणांची त्यात दिलेली माहिती ही अगदीं अलीकडे म्हणजे दीड पावणेदोनशें वर्षांच्या आत किंवा इ. स. १८७७ सालाच्या पूर्वी काहीं वर्षें, डॉ. डकुन्हानीं तें काम हातीं घेतल्यावर, शेणवी म्हणविणाऱ्या लोकांपैकीं कोणी तरी त्यात घुसडून दिलेली दिसते. शेणवी या ज्ञातिवाचक बनलेल्या नावात काहीं हीनत्व आलें असें ज्यावेळीं त्या लोकास वाटलें त्या वेळेपासून त्यांनीं असल्या कथा रचण्यास सुरुवात केलेली दिसते. आणि एथ्नॉग्रफीशास्त्रज्ञतेचा टेंभा मिरविणाऱ्या एन्थॉवेनसाहेबांनीं असल्या गोष्टी खुशाल प्रसिद्ध कराव्या यापेक्षा त्या पुस्तकाची (या बाबीपुरती तरी) अनुपयुक्तता आणखी ती काय सिद्ध करावयास पाहिजे? वरील दहा ब्राह्मणांचीं ६६ कुलें झालीं असें लिहिणारा व हे श्लोक घुसडणारा कोणी तरी साष्टीकर असला पाहिजे असें सह्याद्रीखंडाच्या त्या (१८७७ च्या) प्रतींतील प्रस्तावनेंत जीं त्यांचीं नांवें दिलेलीं आहेत त्यावरून अनुमान काढता येतें. त्यांपैकीं एक केणी उपनावाचे शास्त्री (हे गौडसारस्वत म्हटलेल्या जातींतील साष्टीकर या भेदाचे) यांनी इ. स. १८७१ सालीं हुबेहुब सह्याद्रीखंडांतील भागाप्रमाणें 'दशप्रकरण' नावाचें एक श्लोकबद्ध संस्कृत पुस्तक शाणवी सारस्वत उर्फ कोंकणे ब्राह्मण या नावाच्या ज्ञातीच्या माहितीचें रचिलें होतें. त्यात सुद्धा स्वज्ञाति( साष्टीकर आणि शेणवी हे आता रोटीबेटीव्यवहारानें एक झाल्यासारखे आहेत )संबंधीं बनावट माहिती दिली आहे एन्थॉवेन यांनीं आधारभूत म्हणून स्वीकारिलेले हे ग्रंथ(सह्याद्रि खंड आणि मंगेशमाहात्म्य)मुळींच विश्वासास पात्र नाहींत. त्यांना आधारास घेऊन सारस्वत, गौडसारस्वत उर्फ शेणवी या लावलेल्या नावाच्या जातीच्या दिलेल्या कथा निव्वळ खोटया आहेत. त्या इतिहासाच्या कसोटीला टिकण्यासारख्या नाहींत. असल्या भाकड कथा ज्या जातीच्या म्हणून लिहिल्या त्या पुस्तकात कुडाळदेशकर ब्राह्मणाच्या नावाचा संबध साहेब मजकुरानीं विनाकारण जोडलेला आहे. मात्र एथ्नॉग्रफीच्या दृष्टीनें कुडाळदेशकरांची जात वर लिहिलेल्या निरनिराळ्या नावाच्या जातींहून भिन्न दिसत असल्यानेंहि साहेब मजकुरानीं आपल्या पुस्तकात नमूद केलें आहे."

कै वा. गणपतराव पडळेकर वकील यांनीं आपल्या "कुडाळदेशकर" पुस्तकात पर्यायानें आपल्या ज्ञातीचा संबध ।८।५०।।७ मार्गे सांगितलेल्या गौडब्राह्मणांशीं जोडण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु रा. बावडेकर यांना तो मुळींच मान्य नसून हास्यास्पद वाटतो. त्यांच्या मतें सह्याद्रिखंडाच्या रचनेचा काळ त्यास जोडलेल्या परिशिष्टावरून व त्यातील अत्यंत विसंगत कथानकांवरून सन १५००ते१५५० पर्यंतचा असून सध्या उपलब्ध असलेल्या खंडाच्या प्रतींत ज्याना संधि मिळाली त्यांनीं घुसडाघुसड केल्यामुळें पुराणाची शुद्ध प्रत मिळू शकत नाहीं. त्याचप्रमाणें रा. पडळेकरांनीं आपल्या पुस्तकान 'कोंकणाख्यान' या ज्या एका पोथीचा उपयोग केला होता तीहि पोथी कुचकामाची आहे"

[संदर्भग्रंथः-सिलेक्शन ऑ. ग्व्हा रेकार्ड्स पु १०; हचिन्सनकृत सावंतवाडी मेमॉयर्स, जर्नल ऑफ ए. सो. बा पु. ८,१०; देवनृपतीचा ताम्रपट. मठगावचा शिलालेख. मालवणच्या प्रभुदेसायाची जुनी कैफियत; रिपोर्ट वेस्टर्न म्युझिअम आर्कि‍ऑ-कोंकण, बॉं. ग्याझेटिअर पु. १०, पिंगुळकरकृत सावंतवाडी संस्थानचा इतिहास, पडळेकरकृत 'कुडाळदेशकर' पुस्तक रा. वासुदेव अनंत बावडेकर याचा लेख ]

**कुडाळसंगम**—कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांच्या संगमाला कुडाळसंगम असें म्हणतात. या ठिकाणीं पूर्वीपासून अनेकवार लढाया झाल्या आहेत. चोल व चालुक्याच्या झटापटी येथेंच होत. वीरराजेंद्र चोल व विक्रमादित्य चालुक्य याच्यात येथें तीन वेळा लढाया होऊन चोलांच्या पक्षपाती लिखाणात त्यांनीं चालुक्याचा प्रत्येक वेळीं पराभव केला व चालुक्याच्या पक्षपाती वाङमयांत विक्रमादित्यानें चोलाचा पराभव केला असे उल्लेख आढळतात. वीरराजेंद्रानें तर तुंगभद्राकाठीं आपल्या विजयाचा एक स्तंभ उभारला आहे. या लढायाचें साग्र वर्णन एका शिलालेखात आलें आहे. तसेंच वीरसोलीयम् या तामीळ व्याकरणग्रंथात त्याच्या कर्त्यानें(बुद्धमित्र)नें वीरराजेंद्राचा व या कुडाळसंगमावरील लढायाचा उल्लेख केलेला आहे. साराश लढायासाठीं ही जागा फार मोईची आहे [ अय्यर-प्रा. हिंदुस्थान; बिल्हण-वि च, द. हिं. शिला. पु. ३०,२० ]

**कुंडिनपुर**—कौण्डिण्यपूर पहा.

**कुडुमी**—लो सं ८२०७. हे कोंकणातील शूद्र होत हे गोव्याकडून पोर्तुगीजांच्या छळामुळे इकडे आले. अम्पलवासी लोकांप्रमाणें हे देवालयातील कामें करितात. व विशेषतः कोंकणी ब्राह्मणाचे नोकर म्हणून राहातात काहीं मजूर व नावाडीहि आहेत. यांची वस्ती कोचीन (१२,३७१) व त्रावणकोर (४०२७) या संस्थानातून आहे तेथें त्यास कुडुमीचेट्टी म्हणतात. त्यांची मल्याळीमिश्रित कोंकणी भाषा म्हणजे काहीं विलक्षण आहे. मुप्पन व इतायन असे याचे दोन पोटवर्ग आहेत. यातील मुप्पन लोकाचा उडवावयाची दारू तयार करण्याचा धंदा आहे व इतायन लोकाचा तांदूळ सडण्याचा आहे. मक्कथायम (पिता-पुत्र) वारसाहक्काचा कायदा हे पाळतात. बालविवाहपद्धति चालू आहे. १६ वर्षांच्या वरील मृत मनुष्यास दहन

करतात. सुतक १५ दिवस पाळिलें जातें. कोंकणी ब्राह्मण याचे उपाध्याय असतात. यांचीं वेगळीं देवालयें नाहींत. स्थानिक शूद्र व कुडमी यांच्यांत अनन्यव्यवहार होत नाहीं. कुडुमी हे मराठीची जी कोंकणी पोटभाषा तीच घेडींवाकडी बोलतात.

कुडें—मुंबई इलाख्यातील कुलाबा जिल्ह्यापैकीं माणगाव तालुक्यामध्यें, माणगावापासून ६॥ कोसांवर हें ५०० लोकवस्तीचें खेडें, राजपुरी खाडीपासून १ कोसावर आहे. येथें साधारण २५० फू. उंचीच्या एका टेंकडींत बौद्धांचीं २६ लेणीं व ११ पाण्याचे हौद ( कुंडें ) आहेत. पहिलीं १५ लेणीं खालीं असून त्याच्यावर ४० फू. उंचीवर दुसरीं ११ लेणीं आहेत. लेण्याच्या समोर २॥ कोस रुंदीची राजपुरी खाडी असून तिच्या दोन्ही भागात २०० ते ६०० फूट उंचीच्या टेंकड्या आहेत. पूर्वेस तळें व उत्तरेस घोसाळें हे किल्ले आहेत. फक्त ६ व्या लेण्याशिवाय बाकीचीं सारीं लेणीं साधीं व बिन नकशीचीं आहेत. या २६ पैकीं ५ चैत्य असून त्यात दागोबा आहेत. बाकीचीं २१ हीं रहाण्याचीं आहेत. त्यांत असलेल्या शिलालेखात त्यांना लेणीं हा शब्द लाविला आहे. प्रत्येक लेण्यात साधारणतः पुढील गोष्टी असतातः— एक पडवी व दार, पाठीमागील भिंतींत एक खिडकी, आंतील खोली ( एक अथवा दोन, तीन ) व त्यात निजण्याचे दोन तीन दगडी ओटे. दाराच्या दगडी चौकटींना भोकें, नरमाद्या वगैरे ज्या खुणा शिल्लक आहेत त्यावरुन तेथें लाकडाचीं दारें होतीं व हीं लेणीं केव्हा तरी वापरण्यांत होतीं असें ठरतें. खोल्यांतील बहुतेक दगडी भिंतींना मातीचा व भाताच्या तुसाचा गिलावा केलेला आहे. एवढेंच नव्हे तर, काहीं भिंतींवर त्यावेळीं काढलेलीं चित्रें अद्यापिहि शाबूत आहेत. पुष्कळ लेण्यात शिलालेख आहेत. एकट्या सहाव्या लेण्यात तर सहा लेख आहेत. यापैकीं ५ लेख हे इ. स. च्या ५ व्या अगर ६ व्या शतकातील असून, बाकीचे बहुतेक खि. पू. १ ल्या शतकातील आहेत. त्यांत दात्याचें नाव व देणगीचें ( लेणें अगर हौद किंवा चैत्य याचें ) नाव दिलेलें आहे. बहुतेक दात्याचीं नावें बायकाचीं आहेत. त्यातीत एक तर ब्राह्मणाची स्त्री आहे. दात्याच्या नावामध्यें पुष्कळ ठिकाणीं शिव हा शब्द आलेला आहे हें आश्चर्यकारक आहे. लेणें नंबर १ याचा उपयोग हल्लीं गोठ्यासारखा होतो. येथील पडवींत दोन अष्टकोणी व चौकोनी खाब असून त्यावर चंद्र किंवा दोन शिंगें कोरलेली आहे. ही खूण ( अगर दागिना ) फार प्राचीन ( खि. पू. १००–इ. स. २०० ) काळच्या असून, ती कान्हेरी व इतर पश्चिम हिंदुस्थानातील लेण्यात आढळते. आंत एक खोली आहे व एक दिवाणखाना आहे. त्यापलीकडे एक गाभाऱ्याची गोली असून तिच्या भिंतीचा गिलावा शाबूत आहे. येथें १५×१४॥चौ. फुटाचा साधा असा दागोबा आहे. या लेण्यातील पडवीच्या डाव्या अंगास खोलीच्या दारावर एक ठळक अक्षरांचा शिलालेख आहे. त्यांत ' महाभोज सद्गेरी विजय याचा मुलगा जो महाभोज मंदपालित मंडव त्याचा लेखक व सुलसदत्त आणि उत्तरदत्ता याचा पुत्र शिवभूति यानें व त्याची बायको नंदा हिनें हें लेणें बांधिलें' असा मजकुर आहे. दुसरें लेणें पहिल्यासारखेंच आहे, फक्त यात दागोबा व लेख नाहीं. तिसरें दुसऱ्यासारखेंच असून डाव्या हाताच्या भिंतीवर पुढील संडलेख आहे ' भूतीचें लेणें '. चवथ्या लेण्यात पहिल्या लेण्याप्रमाणें दोन अष्टकोणी व दोन चतुष्कोणी नकशीचे खाब आहेत. यात एक लहानशी गर्ची व एक ३४ फूट चौरसचौरस दिवाणखाना आहे. पांचव्या लेण्यांतील भिंतीचा व छताचा गिलावा शाबूत आहे. पुढील पडवींत एक मोठें कुंड ( पाण्यानें भरलेलें ) आहे. आत काहीं दगडी ओटे व पाच खोल्या आहेत. यात एकंदर तीन लेख आहेत. पटागणात उजव्या बाजूस पुढील अस्पष्ट लेख आहे ' दोन कुंडाची देणगी '. यातच दुसरा लेख आहे, त्यात शिवदत्त व सातिमिता हीं दात्यांचीं नावें आलीं आहेत. तिसऱ्या लेखात पदुमनिका, नागनिका, थेर भदंत, पाटिमित, भदंत आगीमिता, बोधी व असाल्हमिता हीं नावें येतात. सहाव्यात प्रथम एक पटागण व दोन हत्ती आहेत. त्याची उंची ११ फूट आहे. डावीकडील हत्तीच्या मागें एक लहान बुद्धमूर्ति कमळावर पाय ठेवून बसलेली आहे. खालीं ( धर्म ) चक्र, सहा हरिणें व नागाच्या मूर्ती आहेत. या बुद्धाच्या दोहोंबाजूस चवरी वारणारे आहेत. डावीकडचा अवलोकितेश्वर आहे. बुद्धाच्या डोक्यावर मुकुट धरलेले दोन विद्याधर आहेत. खालीं अगदीं अस्पष्ट असा एक संस्कृत लेख आहे. संस्कृत लेखावरुन असें दिसतें कीं हे लेख महायानपंथीयांनीं कोरलेले असावेत. पडवींत दोन अष्टकोनी खाब आहेत. डावीकडील खाबावर एक बुद्धमूर्ति, चौरंगावर बसलेली ( बाकी बहुतेक वर दिल्याप्रमाणें ) आहे. खाबाच्या खालीं एक लेख आहे, त्यात व्याघ्रका हें दान करणाऱ्या बाईचें नाव आहे. याच खाबाच्या मागील बाजूस वरील व खालील नकशीकामास एक ८ इंची व दुसरी ११ इंची अशा दोन बुद्धाच्या मूर्ती आहेत. उजव्या खाबावरहि, माथ्यावर २ बुद्धमूर्ती साध्या आसनावर बसलेल्या व त्याखाली तिसरी सिंहासनावर बसलेली ( वर सांगितल्याप्रमाणें चवरीवाले विद्याधर, हरिणें कमळें वगैरेसहित ) अशा आहेत. याखालींच एक लेख आहे. त्यातील दात्याचेंच नाव अस्पष्ट असल्यानें लागत नाहीं. पडदींतील डाव्या बाजूस एक सात ओळींचा शिलालेख आहे. हा जुना असून पालीभाषेंतील आहे. यात आलेलीं नावें शिवम्, शिवभूति, विजया, शिवपालित, शिवदत्त, सपिल, सपा, शिवपालिता, शिवदत्ता व सुलसदत्ता हीं असून, शिवाय पहिल्या लेण्यात आलेलीं ( लेखांतील ) हि सर्व नावें आहेत. या पडवीच्या पलीकडे चौकोनी दिवाणखाना आहे. त्याच्या भिंतीवर ५ व्या किंवा ६ व्या शतकात

खोदलेलें खोदकाम आहे. डावीकडील भिंतींत वरती चार बैठ्या बुद्धमूर्ती आहेत. त्या ध्यानस्थ ( ज्ञानमुद्रेच्या ) आहेत. त्याखालीं आणखी २ मूर्ती याच लेण्यांतील ( पटांगणातील हत्तीच्या मागें असलेल्या ) मूर्तींप्रमाणें आहेत. येथेंच आणखी एक २.८ इंच उंचीची कमळावर बसलेली बुद्धाची मूर्ती आहे; तिच्याभोंवतीं नागाशिवाय बाकीच्या मूर्ती वर सांगितल्याप्रमाणें आहेत याच्यावर एका उठावदार नकसकामात एक दागोबा व एक ज्ञानमुद्रांकित ( ध्यानस्थ ) बुद्ध आहे. या डाव्या भिंतींतील बहुतेक ( तिन्हींहि ) खोदकामात लाविलेला रंग अद्यापि थोडा फार शाबूत आहे. उजव्या भिंतीवर डाव्या बाजूला कमळासनावर बसलेला २॥ फूट उंचीचा बुद्ध आहे. त्याच्या जवळ चवरीवाले, विद्याधर व नाग हे आहेत. त्याच्या खाली डाव्या बाजूस एक संस्कृत भाषेतील ५ व्या ६ व्या शतकांतील शिलालेख आहे; त्यात बुद्धसंघाचें दाता म्हणून नाव आहे. जवळच वरीचशीं नागाचीं व चवरीवाल्याचीं चित्रें आहेत. त्याखालीं असलेल्या लेखात संतदेवाचें नाव येतें. पुढें आणखी एक बुद्धाची मूर्ति कोरलेली आहे. दिवाणखान्याच्या पाठीमागें असलेल्या अष्टकोणी खांबावर मागें सांगिल्याप्रमाणें चंद्र कोरलेले आहेत. जवळच आंतील खोलींत जाण्याचा रस्ता आहे. त्याच्या कर्टिजनावर पुढील आकृती कोरलेल्या आहेत. शार्दूल, माणसाळलेचा वाघ, वाघाचा पेटा, बैल, जंगली वाघ, हत्ती, काळवीट वगैरे. या बहुतेकाच्या मागें एक बद्धमूर्ति याना हाकीत आहे असें दाखविणारी आकृति कोरलेली आहे. या भिंतीवर दोन स्त्रीपुरुषाच्या ( द्वारपाळाप्रमाणें ) मूर्ती आहेत. डाव्या कोपऱ्यात अशींच स्त्रीपुरुषाचीं आणखी चित्रें आहेत याचीं डोक्यावरील आच्छादनें व हात, पाय, कान वगैरेमधील अलंकार पाहण्यासारखे आहेत. पुष्कळाना कमरपट्टेहि आहेत. आतल्या खोलींत दगडी ओटे आहेत. या खोलीच्या आत दुसरी खोली असून तींत अगदीं साधा असा दागोबा आहे. त्याच्यावर एक छत्री कोरलेली आहे. या लेण्यातील भिंती, छत व खाब वगैरेवर सर्वत्र गिलाव्याच्या व रंगाच्या खुणा आढळतात. सातव्या लेण्यात एक पाण्याचें कुंड व दोन अष्टकोणी खाब पडवींत आहेत. येथील भिंतीवर थोडा गिलावा आहे. भिंतीच्या डाव्या शेवटास एक लेख आहे. त्यात एका वैद्य घराण्यातील सोमदेव, मामकवेजीय, इसिरखित, नाग, सिवघोष, इसिपालिता, पुसा, धम्मा व सपा इतकीं नावें येतात. या लेण्याच्या बाहेर दुसरें एक कुंड असून त्यावर एक अस्पष्ट लेख असून कुंडव कुमाराचा त्यात उल्लेख आहे. लेणें ८ यात दगडी ओटे, दार व खोल्या वगैरे नेहमींसारखेंच आहे, विशेष काहीं नाहीं. लेणें ९ यात एक साधा दागोबा आहे. भिंतीवर गिलावा दिसतो. पडवीच्या उजव्या टोंकास असलेल्या लेखात ब्राह्मण उपासक अयीतिलुची बायको ब्राह्मणी भयिला इच्या देणगीचें चेतियघर ( चैत्यगृह ) हा मजकूर आहे. लेणें १० यातील खिडकीजवळील लेखात बधुक माळ्याचा मुलगा शिवपिरित याचें नाव आहे. हें लेणें साधें आहे. लेणें ११ हेंहि साधें आहे. याच्या आतल्या खोलींत एक लेख आहे. त्यांत मंडवच्या महाभोजाच्या मुलीचें नाव आहे लेणें १२ हेंहि साधें आहे. याच्या पडवींत भिंतीवर एका सिंहाच्या चित्राजवळ राजमंत्री हालची मुलगी गोयम्मा हिचें नाव असलेला लेख आहे. १३ व्या लेण्यात पडवीच्या मागील भिंतीवर महाभोज सदकर सुदमसन याचें नाव असलेला एक लेख आहे. चौदावे लेणें साधें असून डाव्या बाजूच्या भिंतीवर खिडकीपाशीं लेख असून त्यात करहाकड ( कऱ्हाड ) च्या सहिक लोहाराचा उल्लेख आहे जवळच कुंड असून त्यावरील लेखात वासुलचें नाव कोरलें आहे याच्याहि पुढें पडकीं अशीं दोन कुंडे आहेत. त्यापैकीं एकावर एक लेख आहे, तो अस्पष्ट असल्यानें लागत नाहीं, लेणें १५ यात ४ अष्टकोणी खांब आहेत. याच्या आत एक दागोबा आहे. भिंत, छत व खांब यावरील रंग व गिलावा अजून थोडा बहुत आहे पाठीमागील भिंतींत डाव्या हाताच्या दरवाजावर एक लेख आहे, रामदत्त, अधगळक, अहिल, वेलिदत, कोंचो, वेलिदता या चैत्य कोरणाराचीं नावें आहेत. १६ व्यात दोन कुंडें व दोनचार खोल्या आहेत. येथें तीन लेख आहेत. दरवाजा व खिडकी याच्यामध्यें ( मागील भिंतीवर ) एक लेख आहे, यात सपिला, विजय, लोहिता, वेनहुया व बोधी हीं नावें येतात. दुसरा लेख डावीकडील कुंडावर व तिसरा उजवीकडील कुंडावर असून त्यात मुगुदा माळ्याचें नाव येतें. १७ वें लेणें बहुतेक १६ व्या सारखेंच आहे. पुढील खोलींत मागील भिंतीवरील लेखात व्यापारी नागाचें नाव येतें. लेणें १८ च्या भिंतीवर गिलावा आहे. पडवींत लेख आहे, त्यात व्यापारी वसुलनक असें नाव आहे. लेणें १९ यात विशेष काहीं नाहीं. लेणें २० वें हें बहुतेक पडलें आहे. लेणें २१ यातील काम अपुरें आहे. त्याच्या दाराच्या डावीकडील कुंडावर लेख आहे, त्यात १८ व्या लेण्याच्या लेखातील वसुलनकचें नाव आहे. लेणें २२ यात पाण्याचें कुंड आहे. बाकी साधें आहे. २३वें यात एका खोलींत डावीकडील खिडकीवर लेख असून त्यात पुसनक, वेहमित व सिवदता हीं नावें येतात. लेणें २४ हें १३ व्या लेण्याप्रमाणें आहे. याच्या दाराच्या उजव्या बाजूस असलेल्या लेखात अचलदास व असालमित हीं कोरणाराचीं नावें आहेत. २५ वें लेणें पडकें आहे विशेष काहीं नाहीं. लेणें २६ हें २५ ला लागून आहे. दोहांतील भिंत पडली असून पडवींतील उजव्या बाजूस एक ओटा आहे. मागील भिंतींत दरवाजा व एक खिडकी असून त्यापलीकडे एक साधी लहान खोली आहे. याप्रमाणें या लेण्याची माहिती आहे [बर्जेस–आर्किऑलॉजिकल सर्व्हे, वेस्ट. इंडिया व्हा. ४; केव्ह टेंपल्स; कुलाबा ग्या. ].

वितात. याबद्दल त्याला दोनपासून पाच रुपयापर्यंत देणगी मिळते. पाचव्या दिवशीं संबंध नाळ कापतात. पाचीची पूजा नेहमीप्रमाणें सर्वसाधारणच असते. दहाव्या दिवशीं जरी सोहेर फिटला तरी मुलाच्या बाबतींत ३५ दिवस व मुलीच्या बाबतींत ३० दिवसपर्यंत अशुद्ध मानतात ३५ व्या अथवा ४०व्या दिवशीं बाळंतीण शुद्ध होते. मुलीचा बाप आपल्या नातवास पाळणा वगैरे देतो. नाव ठेवण्याचा विधि यांच्यात नसतो ब्राम्हण उपाध्याय सांगेल त्यावेळीं, सहाव्या किंवा बाराव्या दिवशीं किंवा पहिल्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या महिन्यातील शुभ दिवशीं नाव ठेवतात बहुतेक कुणब्यांच्या गळ्यात तुळशीच्या मण्याची माळ असते अलीकडे खेडा आणि भडोच जिल्ह्यातील पाटीदार लोक जानवीं घालूं लागले आहेत. सात पासून अकराव्या वर्षाच्या आत लहान मुलांच्या गळ्यात जातीच्या गुरूकडून माळ बांधवितात लग्नामध्यें मागणीचा प्रकार दोन्हीकडून होतो. वाङ्निश्चय वराच्या बापाकडून जर मोडला गेला तर वधूच्या बापानें जो पैसा पूर्वी दिलेला असतो तो त्याला परत मिळतो परंतु मुलीच्या बापानें वाङ्निश्चय मोडला तर मात्र पैसा परत मिळत नाहीं. हुंडा हा कुळिआ अथवा अकुळिआ ( कुलवान अथवा अकुलवान ) घराण्यावर अवलंबून असतो. वर कुलवान असला तर १ हजारापासून २ हजारापर्यंत हुंडा मिळतो, आणि अकुलवान असेल तर पांचशें पासून हजारापर्यंत मिळतो. पाटीदार लोक अकरा वर्षाच्या आत, आणि साधे कुणबी ११ ते १६ च्या आत लग्नें लावितात. लग्न ठरल्यानंतर मुलीचा बाप उपाध्यायाबरोबर लग्नपत्रिका देऊन मुलीच्या बापाकडे पाठवितो. व त्याच्या आईला देण्यासाठीं एक रुपया देतो. लग्नापूर्वी तिसऱ्या अथवा चवथ्या दिवशीं गणपतिपूजन आणि दोन दिवसापूर्वी ग्रहशांति हीं दोन्ही घरीं करतात. लग्नदिवशीं नवऱ्याचा मामा त्याला आणि नवरीचा मामा तिला दागदागिन्यांचा आहेर करितात. मुलीच्या घरीं शमीचा मांडव घालतात. नवरदेव लग्नाला निघण्यापूर्वी त्याच्या डोळ्यात काजळ घालून आणि कपाळाला कुंकवाचा टिळा लावून त्याच्या ओंजळींत तांदूळ, सात सुपाऱ्या, दोनतीन विड्याचीं पानें आणि एक रुपया देतात ज्वारी, विड्याचीं पानें, मीठ व पैसे वगैरेंनीं त्याची दृष्ट काढतात. पाटीदार लोकामध्यें नवरदेवाच्या मार्गे बायका ( खुद्द त्याची आईसुद्धा ) नसतात. इतर कुणब्यामध्यें या मिरवणुकींत बायका असतात. वरमाईच्या हातात दिवा असतो, सीमांतपूजनाच्या नवरदेवाला व त्याच्या वऱ्हाडाला गूळ पाणी देण्याचा हक्क न्हाव्याचा असतो लग्नमंडपापाशीं नवरदेव आल्यानंतर नवरीची आई त्याला आत घेऊन जाते व नागर, घाण, रवी हा तेथें ठेवलेल्या वस्तू त्याला दाखविते व मंडपात घेऊन जाते. नंतर दोन्हीकडील गणपतिपूजन झाल्यावर नवरदेवाच्या उजव्या आंगठ्याची पूजा वधूचे आईबाप करतात. नवरा आणि नवरी याच्या गळ्यामध्यें तावड्या दोऱ्याच्या माळा घालतात. त्याचे हात जोडून त्यावर एक कापडाचा तुकडा घालून परस्पराच्या वस्त्राची गाठ मारतात. नंतर वधूच्या आईनें केलेली गुळपापडी ही वर आणि वधू याना खाऊ घालतात. त्यानंतर नवरदेव हा आपल्या सासूचा पदर धरतो व कांहीं देणगी मिळाल्याशिवाय तो सोडीत नाहीं यानंतर वधूवर गणपतीची पूजा करतात व येथे लग्नविधि संपतो. लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं नवरीकडील पुरुषमंडळी नवरदेवाच्या घरीं जाऊन कुसुंबा ( अफूचें पाणी ) पानविधि करितात. जे कुसुंबा पीत नाहींत त्यांना केशराचें पाणी प्यावयास देतात पुढ मुलीचा बाप उपाध्याय, न्हावी, माळी आणि कुंभार याना बक्षिसें देतो. त्यानंतर तिसऱ्या दिवशीं नवरीच्या घरच्या मांडवाची पूजा करून नवरदेव नवरीला घरीं घेऊन जातो

नात्र अथवा पाटाची चाल सर्व कुणब्यात आहे,पण खानदानींच्या लोकामध्यें ती क्वचितच उपयोगात येते. खंबायत प्रांतात लेवा, कडवा आणि पट्टणी या कुळ्यामध्यें धाकट्या दिराशीं पाट लावण्याची चाल आहे. विधवेच्या बापाला २५ पासून ७५ रुपयापर्यंतची रक्कम भावी ( दुसरा ) नवऱ्याकडून मिळते. रविवार आणि मंगळवार याच दिवशीं रात्रीं पाट लावितात. विधवेला तिच्या घरून नवऱ्याच्या घरीं नेण्यासाठीं पाच आप्त लोक येतात. वधूवर एकमेकाकडे तोंड करून बसल्यानंतर दोघांच्यामध्यें मातीच्या परळ्यात एक दिवा ठेवतात, आणि त्याना त्या परळाकडे खालीं पहाण्यास सांगतात. ते तसे पाहू लागले असता एकमेकाचीं डोकीं लागलीं म्हणजे हा विधि संपतो. त्यानंतर नवऱ्यानें दिलेल्या बांगड्या ती बाई हातांत घालते. यानंतर कांहीं ठिकाणीं पाण्यानें भरलेली पितळेची घागर डोकीवर ठेवून ती बाई आपल्या नवऱ्याच्या घरात प्रवेश करते.

वाण्याप्रमाणें आणि इतर पांढरपेशा वर्गाप्रमाणें याच्यातहि पुढील अनेक धार्मिक पंथ आहेत. बीजमार्गी, दग्दूपंथी, कबीरपंथी, माधवगणी, प्रणामी, रामानंदी, स्वामीनारायण आणि वल्लभाचार्यी. कांहीं थोडे फार जैनहि आहेत. मुसुलमान अवलियानाहि हे मानतात आपापल्या पंथाच्या देवाची हे पूजा करतात. हे ब्राह्मणाला श्रेष्ठ मानून त्याचा मान ठेवितात. हे आपल्या धर्मगुरूला लग्न वगैरे प्रसंगीं एक रुपया, आणि कंठी( माळ )धारण प्रसंगीं सव्वा रुपया दक्षणा देतात. याचा जादूटोणा आणि पिशाच्चादिकावर भरंवसा असल्यामुळें आजारीपणात अथवा संकटप्रसंगीं कोळी, वाघ्री अथवा ब्राह्मण जातीच्या देवर्षाचा सल्ला वगैरे घेतात. हे अक्षय्यतृतीयेच्या दिवशीं शेतीच्या कामाला प्रारंभ करतात. विहीर खणताना किंवा पहिला नांगरट करताना हळदी कुंकवानीं जमिनीची

पूजा करतात. पागास प्रथम पाणी देताना विहिरीतल्या पाण्याची पूजा करून विहिरीजवळ एक दिवा ठेवून तीत मोरें टाकतात. पक्ष्यामध्यें नीळकंठ (चास) याला ते पवित्र मानतात. आश्विनांतील वसुबारशीच्या दिवशीं कुणब्याच्या बायका गाईची पूजा करून गाईच्या शेणात सापडण रें धान्य गाईच्या दुधात मिसळून खातात. यांचीं तीर्थयात्रेचीं ठिकाणें इतर प्रस्तांत हिंदू क्षेत्रें आहेतच पण त्याशिवाय त्या प्रांतांतील आबाजी, बहुचराजी, डाकूर, द्वारका आणि उनाई या तीर्थांना ते पवित्र मानतात.

*मनुष्य मृत्युपंथास लागला म्हणजे कुलोपाध्यायाच्या ( हा बहुधा औदीच्य ब्राह्मण असतो ) हातून अथवा इतर ब्राह्मणाच्या हातून तुपाचा दिवा त्या माणसाच्या* उशागाजवळ ठेवतात. प्रेताची हजामत करण्याची चाल यांच्यात आहे. प्राण गेल्यानंतर जवळचे नातेवाईक मोठ्यानें शोक करतात. त्याला प्राणपोक ( मृत जीवाला परत बोलावणें ) म्हणतात. अहमदाबादकडील पाटीदार लोकांमध्यें मेलेल्या माणसाचें नाव कोळशानें वीटवर लिहून भंग्याच्या हातीं मेलेल्याच्या आप्ताकडे ( तो प्रसंग कळविण्यासाठीं ) पाठवितात. मृताच्या तिरडीला चारी कोपऱ्याला चार नारळ बांधतात. तिरडीपुढें चालणाऱ्याच्या हातात मडकें किंवा तांब्याचें भांडें असतें. प्रेतामागून बायका हि काहीं अंतरापर्यंत जाऊन एके ठिकाणीं थांबून आपली छाती बडवितात व नंतर घरीं येऊन स्नान करतात. चितेवर प्रेताचें डोकें उत्तरेकडे करतात. सर्व प्रेत जळून गेल्यानंतर अग्नीमध्यें थोडेंसें तूप ओततात. तिसऱ्या दिवशीं रक्षा भरल्यानंतर चितेच्या जागीं पाण्यानें भरलेलें एक मडकें ठेवतात. नंतर घरीं आल्यावर एक पाण्याचें मडकें त्यात थोडेंसें दूध घालून तें घराच्या छपरावर ठेवतात. दहाव्या दिवशीं सर्व पुरुष क्षौर करतात. १२ व्या व १० व्या दिवशीं होणारें श्राद्ध कायतिया ब्राह्मणाच्या हातून करवितात. दहाव्या दिवसापासून तेराव्यापर्यंत भाऊबंद व मित्र यांना आणि बाराव्या व तेराव्या दिवशीं सर्व जातीला जेवण घालतात. मेलेला माणूस जर वृद्ध असेल तर जातींतील बायका त्याच्या घरीं सकाळ आणि संध्याकाळ रडण्यासाठीं म्हणून एक महिना जातात, आणि तरुण असेल तर सहा महिने जातात.

अंजना कुणब्याशिवाय बाकीचे कोणतेहि कुणबी मद्यमांस खात नाहींत.

सर्वसाधारण कुणब्याचा धंदा शेतीचाच आहे. काहींजण मात्र कोष्ट्याचा, कापड आणि धान्य विकण्याचा, सरकारी नोकरीचा, व्यापाराचा आणि सावकारीचा धंदा करतात. पुष्कळजण खेड्याचे मुखीया ( पोलीस पाटील ) असून त्याना त्याबद्दल रोख अथवा जमीनीच्या रूपानें मुशाहिरा मिळतो. मुखी हे मतादार अगर वतनदार या वर्गांतून नेमतात. गुजराथी कणबी हे लष्करात नोकरी करीत नाहींत. कणब्यांपैकीं कडवा आणि लेवा हे दोन वर्ग मालगुजारी करतात.

अंजना कुणबी.—यांच्यासंबंधीं माहिती ज्ञानकोश विभाग ७ पान ७७ मध्यें पहा.

डंगा कणबी.—यांचें ठिकाण महीकांठा. मूळचे अंजनाच असून त्यांचा यांचा पंगत होते पण लग्नें होत नाहींत. भिल्लांची भाषा आणि पोषाख यांनीं उचलल्यामुळें यांचा दर्जा कमी झाला आहे.

गुजर कणबी — हे पूर्व आणि पश्चिम खानदेशात आढळतात. यांच्यात आठ पोटभेद आहेत. ते ( १ ) अनाल, ( २ ) दाळे, ( ३ ) दोरे, ( ४ ) गरी, ( ५ ) कडवा ( ६ ) कापर, ( ७ ) लोंढारी, किंवा वाड. ( ८ ) रेवा अथवा लेवा. दाळे यांची वस्ती तापीच्या कांठीं शहादे, तळोदे आणि रावेर या तालुक्यात व नन्दुरबारकडे आहे. जामनेरचा देशमुख हा गरी गुजर आहे असें म्हणतात. परंतु तो स्वतःस रेवा गुजर असें म्हणवितो. इकडील रेवा अथवा लेवा हे गुजराथेंतील लेव्यांपैकींच असावे ते आपल्याला श्रेष्ठ म्हणवितात आणि फक्त ब्राम्हणाच्या हातचें खातात. कडवा, अनाल आणि दाळे हे लोक खानदेशात फार थोडे आहेत कडवा हे गुजराथेंतील कडव्यांपैकींच असून त्यांच्याप्रमाणेंच बारा वर्षांतून एकदां लग्न करण्याची चाल यांच्यात आहे जे कापूस लोंढतात ( कापसातली सरकी चरकातून काढतात ) त्याना लोंढारी असे म्हणतात. कापर हो तुळा थोडाशी हलकी मानतात

कडवा.—अमदाबाद आणि कडी ( बडोदे संस्थानांतील एक तालुका ) या दोन प्रांतात यांची वस्ती आहे. लेव्यांचा व ह्यांचा निकटचा संबंध आहे. एका दंतकथेवरून कडवा हे सीता आणि राम यांचा मुलगा कुश याचे अनुयायी किंवा वंशज होते व दुसऱ्या दंतकथेवरून पार्वतीनें केलेल्या मातीच्या चित्रात शंकरानें जीव घालून सजीव केलेल्या प्राण्यापासून यांची उत्पत्ति मानतात. शंकरानें यांना अहमदाबादेच्या उत्तरेस २० कोस असलेलं उंझा गाव वस्तीस दिलें. त्या ठिकाणीं एक पार्वतीचें देऊळ बांधलेलें आहे. सर्व कडवा कुणबी या देवळाला आणि खेड्याला आपल्या जातीचें मूलस्थान मानतात आणि आपले नवस फेडण्यासाठीं दूरदूर ठिकाणाहून येथें येतात. त्यांच्या जातीच्या नांवावरून त्यांचें म्हणणें असें आहे कीं, आपण कापूगडून पंजाबामधून गुजराथेंत आलों. यांच्यात लालगुडावाला ( यांच्या बायका लाल पागडया वापरतात ), पाचाचुभायला आदि

याच्यामध्यें मूळच्या ५२शाखा असून त्यांची नावें पंजाबातील त्या त्या गावावरून पडलीं आहेत. या शाखामध्यें गावातल्या गावात परस्पर बेटीव्यवहार होत नाहीं हल्लीं सुद्धा हे कडवे आपल्या गावाच्या बाहेरील दुसऱ्या शाखेशीं लग्न करितात, आणि आपल्याला गावाचेंच नाव धारण करितात: जसें नरोद गावचे ते नरोदिया.

याप्रमाणें नव्या नव्या शाखा उत्पन्न होणें सुरूच आहे. या एकंदर शाखाचीं नावें ज्याना पहावयाचीं असतील त्यानीं ती एन्थोवेन याच्या ट्राइब्स् अॅन्ड कास्ट्स् ऑफ बॉंबे या पुस्तकाच्या दुसऱ्या भागाच्या १४६, १४७, १४८ या पृष्ठावर पहावीं याच्यात सामाजिक चालीरीती पुष्कळ आहेत. थोड्या वर्षांपूर्वी ११ महिन्याच्या, एवढेंच नव्हे तर गर्भांतीलहि मुलाचे वाङ्निश्चय लावीत असत. गर्भारशा बायका खरोखरच मांडवातील बोहल्याभोंवती प्रदक्षणा घालून वाङ्निश्चयाचा विधि पार पाडीत याच्यात लग्नें वर सांगितल्याप्रमाणें वार्षिक मुदतीचीं असल्यानें योग्य नवरा मिळण्यास पंचाईत पडते त्यासाठीं पुढील प्रकार उपयोगात आणतात सामान्य लग्नाच्या मुहूर्तावर मुलीचें लग्न एका फुलाच्या गुच्छाशीं लावतात व मग तो गुच्छ विहिरींत अथवा नदींत फेंकून देतात यावर ती मुलगी विधवा बनते. यानंतर सवडीप्रमाणें मग तिचें दुसरें (नावाचें) लग्न किंवा नात्र (पाट) करितात. एखाद्या विवाहित पुरुषाशीं, त्याला थोडेसे पैसे देऊन तिचें लग्न लावितात, परंतु त्याच्याकडून लागलीच तिचा घटस्फोट करून घेतात. लग्नापूर्वीं उंजा येथील उमेची पूजा प्रथम करितात. नंतर जोशी लग्नासाठीं मुहूर्त पहातो. तो फाशानें पाहतो. ज्या वर्षांवर फासा पडेल तें अथवा त्यापुढील वर्ष लग्नासाठीं ठरवितात. या वर्षांत बहुधा वैशाखातच लग्न लावतात

ले वा —हे गुजराथी कुणब्यात सर्वांत जास्त आहेत. हे सर्वत्र गुजराथेंत (विशेषतः आनंद, नडियाद व बोरसद इकडे) पसरलेले आहेत. कच्छमध्येंहि हलाई व वाघदिआ या नावाखालीं ते आहेत. गुजराथेंत याचे पाटीदार व व कणबी असे दोन भाग आहेत. पाटीदार हे आपल्या मुली कणब्यांना देत नाहींत, त्याच्या मात्र वरतात. पुन्हा पाटिदारात कुळी व अकुळी असून कुळी हे अकुळ्याना मुली देत नाहींत, याच्या बायका बाहेर (बुरख्याशिवाय) पडत नाहींत, तसेंच याच्यात पाटाची चाल नाहीं. याच्यात लग्नास,वाण्याप्रमाणें गोल (खेड्याचा समूह) आहेत. एकाच गोलात लग्नव्यवहार होतो पूर्वी हे कुळी पाटीदार शेतकरी व सरकार याच्यात मध्यस्त असून कर वसूल करण्यात रयतेस फार त्रास देत असत. याच्यातील लग्नात अतोनात खर्च करण्याच्या पद्धतीमुळें हे कर्जबाजारी असत उत्तम कुळाशीं संबंध जोडण्यासाठीं फार चढाओढ व पुष्कळ पैसा खर्च होई

म ति आ.—मत या शब्दापासून मतिआ हें नाव पडलें. हे लोक जलालपूर आणि बार्डोली या तालुक्यात असून धर्मानें अर्धवट हिंदू व अर्धवट मुसुलमान आहेत याच्यातील अडनावावरून व पूर्वीच्या लेवा कणब्याशीं आढळलेल्या नात्यावरून हे मूळचे हिंदू लेवा कणबी होत असें ठरतें सरासरी तीनशें वर्षांपूर्वी लेवा कणब्याची एक टोळी काशीयात्रा करण्यास जात असता अहमदाबादजवळील गरमठ या गावीं मुक्कामास राहिली तेथें इमामशहा नावाचा एक मुसुलमान फकीर होता त्यानें चमत्कार करून काशीचें दर्शन त्या टोळीला बसल्या जागींच करून दिलें. त्यामुळें तिच्यापैकीं पुष्कळानीं त्या फकिराला आपला गुरु केलें अशी दंतकथा आहे हल्लीं याच्यात वैष्णव व पिरान असे दोन भेद आहेत वैष्णव मतिआनीं रामानंदी व दादूपंथ हे दोन पंथ स्वीकारले आहेत. हे सामान्य हिंदू उपास तापास पाळतात व यात्रा करतात. वैष्णव मतिआ यानीं सर्व मुसुलमानी चालीरिती सोडून ते लेवाप्रमाणें वागतात. परंतु लेवा हे त्याच्यावरोबर भोजन करीत नाहींत. आणि लग्नेंहि लावीत नाहींत. पिरान हे भापा व पोषाख लेवा याच्याप्रमाणें करितात. याच्यात विधवा ही धाकट्या दिराशीं पाट लावते. पहिल्या वराला प्रथम शमीशीं लग्न लावल्याशिवाय घटस्फोट केलेल्या स्त्रीशीं अथवा विधवेशीं लग्न करता येत नाहीं. याच्या लग्नात मोध ब्राह्मण लागतात. मतिआ बाईला मूल झाल्यानंतर १२ व्या दिवशीं ती जवळच्या विहिरीची पूजा करून तिच्याजवळ दोन गवऱ्या एका दोरीला बांधून ठेवते. ती बाई ४० दिवस अशुद्ध असते व घरातील कोणत्याहि वस्तूस शिवत नाहीं. ४० व्या दिवशीं बाळंतिणीच्या खोलीतील जमीनसुद्धा खरडून काटितात, आणि त्याच दिवशीं मुलाचें नाव ठेवितात.

हे स्वतःस अथर्ववेदी म्हणवितात हे सत्पंथी मताचे अनुयायी आहेत. पिरान, अहमदाबाद वगैरे ठिकाणच्या मुसुलमानी पिराची पूजा करितात. पिरानचा इमामशहा याचें शिक्षापत्री हें धार्मिक पुस्तक ते पूज्य मानतात, आणि ते ज्याना पाठ येतें त्याना काका म्हणतात. हे काका ह्या पंथाचीं सर्व धार्मिक कृत्यें करितात. याच्यात पंचिआ (सुरभाईचे अनुयायी) सतिआ (महमूदचे अनुयायी,) आठिया (बाकर अलीचे अनुयायी) असे तीन भेद आहेत. पापनाशार्थ 'लाहेउतारणी' हा विधि करतात. या विधीची साग्र माहिती वर दिलेल्या एन्थोवेनच्या पुस्तकात आहे. प्रत्येक मतिआ शेतकरी या काकाच्या तर्फे आपल्या गुरूला अर्धामण धान्य व एक रुपया दर एक नागरापाठीमागें पाठवितात. हे लोक रमजानचे उपवास व इतर मुसुलमानी सण पाळतात. मतिआ लोक आपलीं प्रेतें पुरतात. ते प्रेताला मुसुलमानी धरतीच्या तिरडीमधून नेतात आणि मुसुलमानाप्रमाणेंच त्या प्रेताचें मातींत दफन करतात.

नंतर देवाची प्रार्थना हिंदु व मुसुलमान दोन्ही पद्धतीची करितात हे हिंदूप्रमाणें दहा दिवस सुतक पाळतात तेराव्या दिवशीं भेलेल्याचा निकट आप्त पल्हाणपूर, नवसरी वगैरे ठिकाणच्या त्यांच्या पंथाच्या मुख्य पीरांना कपडेलत्ते वगैरेंचे नजराणे पाठवितो हे मद्यमांसनिवृत्त आहेत

मो म ना.—यांची मुख्य वस्ती कच्छमध्यें आहे हे मूळचे हिंदू असून यर अलेल्या इमामशहानें यांना मुसुलमान केलें इ स १६९१ तील मोमनांचे गुजराथेंत बंड झाल्यानंतर कच्छ प्रांतामध्यें रहावयास गेले यांना मोमीन असेंहि म्हणतात यांच्यातील एका पंथाचा इमाम सदुद्दिन होता हे लोक दाढी ठेवितात व गुजराथी भाषा बोलतात, पण यांचा पेहराव मुसुलमानी असतो हे लोक शेती आणि मजुरी करितात हे नावाचे शिया पंथी आहेत यांच्या सर्व चालरीती व आचारविचार हिंदूप्रमाणेंच आहेत हे गोकुळअष्टमी, दिवाळी वगैरे सण पाळतात व एकमेकांना भेटण्याच्या वेळीं रामराम करतात यांच्या जातींतील सर—पंच भुजबाळच्या मानकुव गांवीं रहातो याचे जातीविषयक सर्व तंटे तोच तोडतो हे लोक मुसुलमानांत मिसळत नाहींत, मांस खात नाहींत आणि रमजानचे उपास पाळीत नाहीत हे आपल्या स्वतःला लेवा कणबी असें म्हणवितात यांना मुसुलमान म्हटलेलें खपत नाहीं यांपैकीं हल्लीं पुष्कळ स्वामीनारायणपंथी बनले आहेत यांच्या लग्नांत बोहोलें किंवा होम वगैरे नसून वधूवराच्यामध्यें एका चौरंगावर तीन दिवे ठेवितात त्यांना ब्रह्मा, विष्णु व महेश मानून त्यांच्यासमक्ष जातीचा मुखी ( मुख्य ) हा लग्न लावितो या विधीला दुव असें म्हणतात पाटहि याच रीतीनें लावतात घटस्फोट फक्त नवऱ्यालाच करता येतो यांच्या देवळाला खान असें म्हणत असत परंतु हल्लीं ते धर्मशाळा म्हणू लागले आहेत या धर्मशाळेंत एका पाटावर एक मातीचा घट ठेविलेला असून त्यात पिरान येथील माती व पाणी भरलेलें असतें हे लोक प्रेतें पुरतात, जाळीत नाहींत भाद्रपदमासीं इतर हिंदूप्रमाणें पितृपक्ष करितात हे शाकाहारी असून मुसुलमानांबरोबर जेवीत नाहीत रजपूत दर्जी व लोहार हे यांच्या हातचें खातात

उ दा—उदा नावाच्या एका भगताचे हे अनुयायी असल्यानें यांना उदा असें म्हणतात. हे कबीरपंथी आहेत या एकदर गुजराथी कणब्याची सख्या सं॰ा गळ लाख आहे [ बडोदा सेन्सस रिपोर्ट १९०१ ]

म रा ठी कु ण बी—यांची एकंदर लो स वीस लाखापर्यंत आहे मराठी कुणबी हे जातीनें बहुतेक मराठे व काहीं क्षत्रिय आहेत मराठे म्हणजे गृहस्थ, त्या त्या गांवच्या जातीचे हात तळेरी किंवा कोंकणी कुणबी हे आपल्यास क्षत्रिय न म्हणविता शूद्र म्हणवितात

यांच्यात ( १ ) मराठा, ( २ ) कोंकणी, ( ३ ) खानदेशी ( ४ ) तळेरी म्ह ा ठाणे जि ा तील व ( ५ ) बानडा- ताल काळे, असे पांच भेद आहेत या सर्वांत अकरमाशे ही एक स्वतंत्र शाखा आहे हल्लीं मल्हारी कोळीहि आपल्यास कुणबी म्हणूं लागले आहेत

कुणब्यांपैकीं थोडेसे लोक दक्षिणेंत पाटील व देशमुख आहेत, काहीं उच्च सरकारी नोकर आहेत, पुष्कळजण सैन्यात शिरले आहेत हे लोक पैशाच्या दृष्टीनें सुखी आहेत मात्र जे शेतकरी आहेत ते गरीब आहेत हे बायाईन उत्कृष्ट करितात कामांत त्यांना त्यांच्या बायकामुलांची मदत होते पुष्कळजण शेतीवर मजुरी करतात. त्यांना साला( वर्षा )वर पगार ठरवितात दूध, दहीं, तूप वगैरे विकण्याचाहि धंदा हे करतात हल्लीं या जातींतील पुष्कळ लोक मुंबईस गिरण्यांत मजूर म्हणून राहू लागले आहेत

मराठा कुणबी —यांच्या दंतकथेवरून हे मराठे जातीचे आहेत असें दिसते यांच्यात ५ या अंकाला फार शुभ मानतात मराठा व मराठा कुणबी यांत फारसा भेद नाहीं व असला तरी तो सागता येत नाहीं इतका सूक्ष्म आहे पुण्याकडे ' कुणबी माजला, मराठा झाला " अशी एक म्हण आहे त्यावरून चांगला ऐपतदार कुणबी व मराठा एकच अशी समजूत दिसते गरीब मराठा व श्रीमंत कुणबी यांच्यांत सोयरीक होते कुणब्यांतील अगदीं खालचा गरीब वर्ग हा मूळच्या जातींपैकीं असावा असें काहींचें म्हणणें आहे या जातींतील पुरुष व स्त्रिया शरीरानें धट्टे कट्टे असतात घराबाहेर यांचा पोषाख चांगला असतो पावसाळ्यांत हे घोंगडी वापरतात. यांची भाषा मराठी आहे बहुतेक प्रत्येक कुणब्यास एक उपाध्यायानें ठेविलेलें ( रास नाव ), एक घरांतील माणसांनीं ठेविलेलें व एक टोपण अशीं तीन नावें असतात राशनावें अशीं —अम्रुत्या, बाचाजी, रावजी, सखु, भागु इ घरांतील नावें वडील माणसें ठेवतात तीं, रखु, पाडु, रघु, काशा, पार्वती अशीं असतात टोपण किंवा आवडतीं नावें बाप अगर मामा ठेवितो तीं आपा, बापू, बाई, ताई अशीं ठेवितात यांच्यांत जातगंगा असते व तिचा मुख्य व ती जातिविषयक तंटे तोडतात हा सरपंच लोकनियुक्त असतो पैशाचा दंड व जातीस जेवण ही शिक्षा असते एकाच कुळांत व देवकांत सोयरीक होत नाहीं मावसबहिणीशीं लग्न लावीत नाहींत, मात्र मामेबहिणीशीं लावितात सख्या बहिणी सख्या जावा होतात मुलींचीं लग्नें ३ ते १२ व मुलांचीं १५ ते २ वयाच्या दरम्यान करतात परंतु प्रसंग आल्यावर सुद्धा मुलीचें लग्न होतें बहुधा विधुरच विधवेशीं पाट लावतो पाटाच्या मुलांना लग्नाच्या मुलाइतका हिस्सा मालमत्तेत मिळत नाहीं मूल जन्मल्यानंतर त्याची नाळ कापल्यावर ती त्याच्या तोंडात घालून मग ती पुरतात पाचवी, सहावी व बारशाचा पूजा इतरांप्रमाणेंच असते बाळंतिणीस १२ दिवस कोण्याहि पुरुषाचें

तोंड पाहू देत नाहींत सहावीच्या दिवशीं जातीस जेवणहि घालतात. बाराव्या दिवशीं सर्व घर झाडून सारवून स्वच्छ करतात. एक बकरें मारून त्याच्या रक्तांत ऊन पाणी व मसाला मिसळतात, याला रक्ती म्हणतात. हाडें व मांस एका भांड्यांत व काळीज दुसऱ्या एका भांड्यांत शिजवितात. नंतर बाळंतीण गांवाबाहेर जाऊन त्याचा नैवेद्य सटवाईस दाखविते. मुलाचें नांव ठेवण्यास ब्राह्मण जोशी लागतो. बाळंतिणास तिसऱ्या महिन्यांत मुलानें मान सावरावी म्हणून एक बकऱ्याचें मुंडकें शिजवून घालतात व मुलाच्या गळ्यांत वजरवट्टू व ताईत बांधतात. बाळबाळंतीण देवाच्या दर्शनास जातात तेव्हां दरीपुढें महार किंवा मांगाकडून एक बकरें मारवितात. त्याचें मुंडकें व चार तंगड्या देवीपाशीं ठेवून बाकीचा भाग प्रसाद म्हणून शिजवून खातात. मुलाचें जावळ एक वर्षानंतर काढतात. मुलगा सातव्या वर्षी आपल्या बापाबरोबर गुरें चारणेंस व शेतांत काम करावयास जाऊं लागतो. लग्नाचा मुहूर्त जोशी ठरवितो. मुलाचा बाप गरीब असेल तर त्याला १०० ते १५० रु. वधूदक्षणा द्यावी लागते. लग्नविधि बहुतेक मराठ्याप्रमाणेंच होतो. हळद दळणें यांच्या कामांत स्त्रियाप्रमाणेंच पुरुषहि भाग घेतात. वराला स्नान घालण्याच्या वेळीं जोशी हजर रहातो. लग्नापूर्वी नवरदेवाचा निकटचा आप्त व त्याची बायको हीं एक कुऱ्हाड व १२ ते १५ हात लांबीचा दोर व जं देवक असेल तें घेऊन मारुतीच्या देवळांत जाऊन पाच पालवींचा विधी करतात. लग्न लावण्यास ब्राह्मण लागतात. लग्न झाल्यानंतर सुतवणें हा विधि करितात व त्यानंतर कन्यादान होतें, तें मामा करतो. लग्नाच्या तिसऱ्या चवथ्या दिवशीं वराचा बाप गांवांतील बलुतेदारांच्या बायकांना सण किंवा पैसा देतो. पुढें वर व वधु यांचे आईबाप परस्परांस पोटमाळणीचा अहेर करितात. झालीच्या वेळीं नवरदेवाच्याकडील एक माणूस झाल पळवून नेतो, त्यास वधूकडील माणसें बाटें फेंकून मारतात. यावेळीं वर वधूच्या देवघरांतील एखादा देव चोरून घेतो व सासऱ्यानें कांहीं बक्षिस दिल्याशिवाय तो परत करीत नाहीं. नवरीला घरीं आणल्यानंतर वराच्या घरीं खंडोबाची तळी भरतात व गोंधळ करितात. पाटाची चाल हलकी मानतात. पाट लावणाऱ्या नवऱ्यासहि कमी लेखतात. पाट शेतांत व अंधाऱ्या रात्रीं लागतो. त्यावेळींहि तो ब्राह्मण लावतो. वधूवर पश्चिमेकडे तोंड करून उभीं रहातात व ब्राह्मण मंगलाष्टकें म्हणून पाट लावतो. त्या रात्रीं तें जोडपें शेतांतील झोंपडींतच राहतें. ब्राह्मण त्यानंतर सचैल स्नान करतो. बहुतेक कुणबी माळकरी अगर वारकरी आहेत. सर्व हिंदू देवतांची ते पूजा करितात. शिवाय ग्रामदेवतांचे टाक करून ते पुजतात. हे भैरवाला कौल लावून बरेंवाईट पाहतात. वर्षांतून दोनदां पेरणी-कापणीच्या वेळीं हे भैरवाची पूजा करितात व कोंबडें अगर बकरें मारितात. याचप्रमाणें देवीचीहि पूजा करितात व भग(बळी)देतात.

गुरांवर अगर माणसांवर रोग पसरविणाऱ्या जखाई, जोखाई अशा कांहीं देवी आहेत व त्यांना संतुष्ट ठेवल्यास त्यांच्यापासून भीति नसते असें हे मानतात. खंडोबा हेंहि यांचें एक प्रमुख दैवत आहे. कोण्या शत्रूवर रोग घालवावयाचा असेल अगर त्याचें वाईट व्हावें असें वाटल्यास, हे लोक म्हसोबास तसें संकट घालतात व हेतु पुरा झाल्यावर कोंबडें अगर बकरें कापतात. म्हसोबाप्रमाणेंच वेताळालाहि शत्रूच्या मागें लावतात. त्याची जत्रा महाशिवरात्रीस असते. सर्व हिंदू सण हे पाळतात. कुणबी लोकांचा नागपंचमी हा मोठा सण आहे. त्या दिवशीं त्या सापाच्या वारुळापाशीं जाऊन त्याची पूजा करून त्याभोंवतीं फेर धरून नाचतात व गातात. पुरुषांत पोळ्याचा सण मोठा असतो. नांगरण्यापूर्वी जमीनीची पूजा करितात. भाताच्या पेरणीच्या वेळीं भैरोबाची पूजा करून जातिभोजन घालतात. पेरणीपूर्वी प्रत्येक मंगळवारीं एखादें कोंबडें मारून शेतांत त्याचें रक्त शिंपडतात. तसेंच तिवड्याच्या खालीं ते आपापलीं देवकें पुरतात. आणि सात दगड (पांच पांडव व दोन वनदेव) मांडून त्यांची पूजा करितात. भात कापण्यापूर्वी, त्याची मळणी घातल्यावर व तें झोडल्यावर अशा प्रत्येक वेळीं, या सात देवांना कोंबड्या बकऱ्यांचा बळी देतात. धान्य मोजण्याच्या वेळीं व वरील सर्व वेळीं बहुधा उपाध्याय हजर असतो व त्याला त्यावेळीं दक्षणा देण्यांत येते. जेजुरी, नरसोबाची वाडी, पंढरपूर वगैरे ठिकाणीं हे यात्रेस जातात. यांचा मंत्र, जादु टोणा, भुतेंखेतें मुहूर्त, शकुन यांवर विश्वास आहे. साथी दुखणीं हीं त्यामुळें येतात असें ते मानतात. त्याबद्दल देवास कौल लावणें, जाणत्या (मांत्रिका)ची आज्ञा ऐकणें, कळ्याच्या हातचें पाणी पिणें वगैरे उपाय करितात. भूत, डाकीण व हडळ यांची यांना (आपल्या गुराढोरांस व बायकामुलांस त्रास होईल म्हणून) फार भीति वाटते. कुणबी कधींहि दुसऱ्या कुणब्याच्या ऐश्वर्याचा, गुराढोरांची किंवा सुंदर स्त्रियांची स्तुति करीत नाहींत, कारण, तसें केल्यास नेहमी वावरणारीं भुतेंखेतें ती ऐकून त्यांच्या पाठीस लागून त्यांचा नाश करितील. यांचा उपाध्याय देशस्थ ब्राम्हण व गुरु बहुधा गोसावी असतो. हे प्रेतें जाळतात. प्रेताच्या तोंडावर गुलाल व विड्याचीं पानें ठेवतात आणि शेजारीं भात, एक पैसा व चतकोर भाकरी ठेवून मग नेहमीप्रमाणें प्रेत स्मशानांत नेतात, विसाव्याच्या जागीं प्रेत ठेविल्यावर वरील भात, पैसा व भाकरीचा तुकडा सर्व दिशांस फेंकतात व एक दगड उचलून त्यास जीवखडा म्हणतात. वाकीचा विधि सर्वसाधारण असतो. दुसऱ्या दिवशीं हे लोक रास भरतात व तेथें २ भाकऱ्या व दोन मडकीं पाण्यानें भरून ठेवितात. तिसऱ्या दिवशीं खांदेवाल्यांना खोबरें खावयास देऊन त्यांच्या खांद्यास तेल चोळतात. दहाव्या दिवशीं व पुढें मराठ्यांप्रमाणें सर्व क्रिया करतात. ब्राह्मणांत जसा अस्मा असतो तसा यांच्यांत वरील जीवखडा असतो.

तेराव्या दिवशीं उपाध्यायास दक्षिणा देऊन कावळ्यास भात सार्ळे घालतात दर महिन्यास एक माणूस ( पितर म्हणून ) पाच महिन्यापर्यंत जेवावयास घालून पाचव्या महिन्यानंतर आप्तेष्टास जेवणावळ देतात हे मांसाहारी व मद्यपी असून बकरीं, मेंढ्या, ससा, हरिण व मासे वगैरे खातात. यांचें मुख्य अन्न म्हणजे ज्वारी, तांदूळ व नाचणी हें होय.

कोंकणी कुणबी —मुख्यतः रत्नागिरी व कुलाबा या जिल्ह्यांत हे आहेत यांना सामान्यतः तिळोरी असें म्हणतात. ते आपण क्षत्रिय असल्याचा प्रौढी मिरवत नाहींत, क्षुद्र त्यातच समाधान मानतात यांच्या बायका जास्त काटक असतात. भाषा कोंकणी मराठी यांच्यात पोटभेद नाहींत. एकाच आडनावाच्या घराण्यात लग्नें होत नहींत हे पाटाची चाल कमी मानीत नाहींत, मात्र घटस्फोटाची चाल बंद आहे. लग्न मराठा कुणब्याप्रमाणेंच होतात. पाट मात्र भावी नवऱ्याच्या घरीं लागतो यांच्या बहिरी, झुगाई, नवलाई वगैरे कोंकणी मुख्य देवता आहेत भूतपिशाच्चावर यांचा भरंवसा आहे. यांचे उपाध्याय चित्पावन, कऱ्हाडे अगर देवरुखे ब्राह्मण असतात. ह्यांचें मुख्य अन्न नागली व वरी होय. हेहि मराठा कुणब्याप्रमाणें मद्यमांसाहारी असून त्यांच्याच सारखे बकरीं मासे वगैरे खातात

काळे कुणबी—हे वर्णानें काळे असल्यानें यांना हें नाव मिळालें असून हे बेळगाव व कानडा जिल्ह्यांत आहेत. यांना कोंकणी असेंहि म्हणतात. हे मूळचे गोव्याकडील असून पोर्तुगीजांच्या धर्मच्छळामुळें हे या प्रांतात ( १६ व्या शतकात ) आले असें सांगतात यांची भाषा कोंकणी आहे यांच्या वस्तीच्या प्रत्येक गांवीं एक मिराशी व एक गावडा असतो. मिराश्याचें काम धार्मिक व गावड्याचें सामाजिक असतें. प्रथम मिराशी आपल्या शेतात नांगर घालील तेव्हा बाकीचे गावांतील सारे कुणबी नांगर घालतात व त्यापूर्वी मिराशाला नारळ वगैरे देतात तसेंच कुणब्यानें मारावयाच्या प्राण्याची मान कापण्याचा हक्क या मिराशाचा असतो. गावड्याच्या वर ( १०।१५ खेड्यांचे गावडे मिळून ) एक करियदी गावडा असतो. या करियदी गावड्यावर एक प्रधान गावडा व दुसरा सर किंवा राजगावडा असे २ अधिकारी असतात. किरकोळ सामाजिक गोष्टी जातसभा करियदी गावड्याच्या अध्यक्षतेखालीं भरवून निश्चित करतात मोठ्या भानगडीच्या गोष्टी व तंटे मोठी सभा राजगावड्याच्या अध्यक्षत्वाखालीं भरवून निकालात काढतात राजगावडा हा निकालाच्या बाबतींत अखेरचा अधिकारी आहे. त्यानें दिलेला निकाल वादीप्रतिवादींना कळविण्याचें काम प्रधानगावड्याचें असतें यांच्यात पुष्कळ कुळें आहेत त्या प्रत्येकाची देव देवता निराळी आहे एका कुळांत सोयरीक होत नाहीं. यांच्यात लग्नांत लिंगायत किंवा ब्राह्मण उपाध्याय असतो वराचा बाप वधूच्या बापास १२ ते २० मण धान्य व पोषाख देतो वधूवरांनीं जोडलेल्या हातावर पाण्याची धार सोडली म्हणजे त्याला धारे म्हणतात व हाच लग्नातील मुख्य बंधनकारक समारंभ होय हे पाटाला कमी लेखतात. घटस्फोटाची बंदी आहे यांचा धर्म बहुतेक पिशाचपूजेवर अवलंबून आहे स्वर्गनरकादि कल्पना यांना ठाऊक नाहींत मृत्यूनंतर प्रत्येक माणूस त्याच्या पापपुण्याप्रमाणें वाईट अगर चांगलें भूत बनतो असें त्यांचें मत आहे. यांना नैवेद्य देणें झाल्यास मिराशी व धाडी यांच्या हातून दाखवितात सर्व दुःखें या भुतांपासून होतात असें ते मानतात. यांच्यापैकीं काहींवर लिंगायतपंथाचा पगडा बसला असल्यानें ते जंगम उपाध्ये नेमतात व बसव आणि नंदी यांची पूजा करतात प्रेतें बहुधा पुरतात गर्भारशी अगर बाळंतीण मेल्यास तिला रहात्या खेड्याच्या बाहेर दूर पुरतात कारण तिचें भूत जबरदस्त असतें तिला पुरल्या जागेपासून घरापर्यंत भाजलेले तांदूळ अगर दुसरें धान्य फेकतात याचें कारण त्या भुताला सांगतात कीं 'जोपर्यंत हें धान्य उगवणार नाहीं तोपर्यंत तू खाड्यांतून उठू नको' वास्तविक तें धान्य भाजलेलें असल्यानें केव्हांच उगवणार नाहीं व त्या जबरदस्त भुतानेंहि आपल्या खाड्यांतून केव्हांच उठू नये असा हेतु असतो यांचें सुतक ३ दिवसच असतें हे वन्यपशुपक्षी यांचें मांस खातात, पाळीव जनावरांचें खात नाहींत बदकें, कोंबडीं वगैरेंना हे फार अशुद्ध मानतात त्यांना स्पर्श झाला तर हे स्नान करतात किंवा अंगावर गोमूत्र शिंपडतात हे मद्यपान मुळींच करीत नाहींत फक्त ब्राह्मणाच्या हातचें हे खातात

तलहेर कुणबी —ठाणें जिल्ह्यांत तळघाटाखालीं यांची मुख्य वस्ती आहे तेथें ते तलहेरी होत यांच्यात काहीं स्थानिक, व काहीं गुजराथेंतून व महाराष्ट्रांतून आलेले असे दोन वर्ग आहेत स्थानिक कुणबी यांच्यात व सोनकोळ्यांत फारसा फरक नाहीं देवकावरून व चालीरीतींवरून मराठे व कुणबी ओळखूं येतात. यांच्यात रोटीबेटीव्यवहार होतो

खानदेशी कुणबी —यांच्यांत सात शाखा आहेत (१) घाटोळे, हे अजंठाघाटावरून आले हे तिरोळेवरोबर जेवतात पण लग्नें लावीत नाहींत (२) लोणी, यांना मूळचे रहिवासी ( अनार्य ) मानतात व ते गिरणा व तापी काठीं रहातात हे तिरोळे, पाजणे, गुजर व वाणी यांच्या हातचें खातात. मात्र आपआपल्यातच लग्न करतात (३) कुंभार, ही शाखा फार थोडी व अतिशय दरिद्री आहे (४) बंजारी, हे मूळचे चारण वणजारी जातीचे होते पण हल्लीं बरींच वर्षें त्यांनीं इकडे वस्ती करून व शेती करून आणि यांच्या चालीरीती उचलून स्वतःस कुणब्यात गणून घेतलें आहे (५) पाजणे, यांच्यात चार पोटभेद आहेत ते कंडारकर, नवघरी, रेवे व थोरगव्हाणे हे होत यात मुख्य रेवेच असून यांच्या तिघांशीं उत्पत्ति भाऊबंदकीमुळें झाली आहे. सावदे

तालुक्यातील थोरगव्हाण या गावचे ते थोरगव्हाणे व भुसावळ तालुक्यातील कंडारी गावचे ते कंडारकर होत. मुख्य जातींतून फुटलेल्या नऊ घराच्या वंशजांपासून नवघरी निघले हल्लीं ते या जिल्ह्यांत सर्वत्र थोड्याथोडे आहेत (६) तिडोळे किंवा तिरोळे, हे मूळचे उत्तरहिंदुस्थानातील असून दादर पवार या जातीचे वंशज होत असें म्हणतात (७) मदराज ही सातवी शाखा आहे या सातीहि शाखा एकमेकांच्या हातचें खातात, पण आपलीच शाखा इतरांपेक्षा श्रेष्ठ आहे असें मानून परस्परांत लग्नें मात्र लावीत नाहींत ज्ञानेश्वरींत 'कुणबट कुळवाडी' हा शब्द येतो

व ऱ्हा डी कु ण बी—मध्यप्रांतांत व वऱ्हाडांत यांची लो. सं. १४ लाखावर असून गोंडाच्या खालोखाल यांचीच वस्ती त्या प्रांतांत फार आहे. हे गुजराथेंतून खानदेश व खानदेशांतून या प्रांतांत पुष्कळ वर्षांपूर्वी आले (१८ वें शतक). मराठी राज्य झाल्यावर यांची भरती फारच झाली. इकडील कुणब्यांत पुढील शाखा आहेत (१) झाडे, हे अगदीं प्रथम आलेले असून यांच्यांत गोंड रक्ताचें मिश्रण आढळतें (२) मानवा, हे चांद्याकडे आढळतात, यांच्यांत माना लोकांचें मिश्रण सांपडतें हे लग्नकार्यांत ब्राह्मणास बोलावीत नाहींत यांच्या बायकांचा पोषाख गोंड बायकांप्रमाणें असतो. (३) खैरे व (४) धानोरे (धनगरांपासून झालेले) यांना इतरे हलक समजतात. (५) तिरोळे, हे उच्च जातीचे असून यांच्यांतच देशमुखादि वतनदार आहेत. (६) छिंदवाड्यांत गाढव जातीचे कुणबी आहेत. हे पूर्वी गाढवें पाळीत. नेमाडांत गुजर कुणबी आहेत या कुणब्यांत लग्नप्रसंगीं न्हावी व धोबी यांचें फार महत्त्व असतें. न्हावी वधूवरांचे पाय धुवून सर्व वऱ्हाडाला कुंकू लावतो तिरोळे जातींत हगरे, आगलावे वगैरे ६६ कुळें आहेत नवरदेव लग्नास निघाला म्हणजे त्याच्या हातीं शिदोरी बांधलेली एक कुदळ असते. थाटाच्या लग्नास लालब्याह व गरीबीच्या लग्नास सफेदब्याह म्हणतात नेमाडमधील कारधा कुणबी हेहि गुजराथी कुणब्याप्रमाणें १२ वर्षांनीं एकदाच घरांतील व जातींतील सारीं लग्नें उरकून घेतात. सिंहस्थांतच लग्नें झालीं पाहिजेत असा त्यांचा नियम आहे. लग्नाच्या दिवशींच एखादी बाई बाळंत होऊन तिला मुलगी झाली तर त्या जन्मलेल्या मुलीचें लग्न तिच्या १२ व्या दिवशींच करतात. कुमारीनें व्यभिचार केल्यास प्रायश्चित्तानें ती शुद्ध होते. तिरोळ्यांत व वादेकरांत राग ठेवण्याची चाल आहे. पाट लावण्याच्या वेळीं भार्या वर आपल्या उजव्या पायानें चौरंगावर (विधवेच्या पहिल्या नवऱ्याच्या नांवानें) ठेवलेली एक सुपारी उडवितो व मग न्हावी ती अडकित्त्यानें फोडतो यानें पहिल्या नवऱ्याच्या पिशाच्याचा कांहीं अडथळा होत नाहीं असें ... मूल होईनासें झाल्यास यांच्या बायका अनेक ... करतात. हे लोक प्रेतें जाळतात व पुरतातहि. विधवा आपलें मंगळसूत्र तोडते. मात्र १२ व्या दिवशीं पुन्हां बांगड्या भरते. पोळ्याचा सण हा यांच्यांत मुख्य आहे यांच्यांत मुसुलमानी चाली बऱ्याच शिरल्या आहेत. यांचीं घरें बहुधा कुडाचीं असतात. हे पावसाळ्याचे ४ महिने खेरीजकरून बहुधा नेहमीं शेतांत निजतात हे मांसभक्षक आहेत मध्यप्रांतांतील पोटजाती आपापसांत बेटीव्यवहार करीत नाहींत [ बॉंबे ग्याझे पु ... ८ ट्राईब्स ॲंड कास्ट्स् ऑफ बॉंबे व्हा. २, सी पी इ ]

**कुतउलआमारा**—मेसापोटेमिया अमारा व कुत अशीं वेगवेगळीं गांवें आहेत या दोन गांवांमध्यें तैग्रीस नदी आहे. बसरा व बगदाद या दोन्ही शहरांमध्यें जाणायेणाऱ्या आगबोटींचें कोळसा घेण्याचें हें एक ठिकाण आहे तैग्रीसच्या खालील भागावर हुकमत ठेवणारें असें हें एक महत्त्वाचें ठाणें आहे. अमाऱ्यास घरें फार सुंदर बांधलेलीं आहेत येथें एक दोन सुरेख मशिदी व प्राचीन खिस्ती देवालय आहे. कुत हें लहानसें खेडें आहे. येथें गेल्या महायुद्धांत इंग्रजांचा सेनापति टौनशेंड हा वेढ्यांत सांपडून त्यास तुर्कांस शरण जावें लागलें (१९१६) या जयाबद्दल तुर्कांनीं कुत येथ एक स्मारक उभारलें. पण पुढल्याच वर्षी ब्रिटिशांनीं हें काबीज केलें.

**कुंतनहसहळ्ळी**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. हनगलच्या ईशान्येस सुमारें दोन मैलावर असलेलें एक खेडें. येथील बसप्पाच्या देवळांत इ. स. ११४७ सालचा एक शिलालेख आहे.

**कुंतल**—दक्षिणापथांतील एका प्राचीन देशाचें नांव. महाभारतांत कुंतल हें नांव उत्तरेकडील व दक्षिणेकडील अशा दोन्ही देशांच्या यादींत आलेलें आहे, म्हणजे आर्यांच्या अंमलाखालील प्रांताच्या यादींत तें असून शिवाय दक्षिणेकडील अनार्यदेशांतहि तें होतें कदाचित तें दोघांच्या सरहद्दीवर असल्यामुळें असा प्रकार झाला असेल. कृष्णेच्या उगमाजवळ कुंतलदेश होता असें दुसऱ्या ठिकाणीं आढळतें. कुंतल देशापर्यंत म्हणजे कृष्णानदीपर्यंत आर्यांचा दक्षिणेंत प्रवेश झाल्यावर येथें त्यांना अटकाव झाला. तुंगभद्रेपलीकडे त्यांना जातां आलें नाहीं कारण तुंगापार द्रविड, चोल, पाण्ड्य वगैरे महाभारतकालीन देश होते. राजकेसरी वर्मन् राजेंद्रचोलदेव यानें (१०७१) कुंतल (कोंडल) येथील राजाचा (सोमेश्वर दुसरा याचे सेनापती विक्रमादित्य आणि जयसिंह यांचा) पराभव केल्याचा उल्लेख एका शिलालेखांत आढळतो. कुंतलवंशीय (पश्चिम चालुक्य) राजावर विक्रमादित्य चालुक्यानें जय मिळविल्याचें विक्रमांकदेवचरितांत आढळतें. पश्चिम चालुक्यांचें नेहमीं "कुंतल प्रभु" असें वर्णन येत असतें. बृहत्संहितादि ग्रंथांत या देशाचा नामनिर्देश येतो

बाराव्या शतकांतील बदनिके (शिकारपुर तालुका, म्हैसूर राज्य) शिलालेखांत कुंतलदेशावर मौर्यांचें राज्य

असून याचा उल्लेख आहे. तत्कालीन कुंतल म्हणजे हल्लींचा साधारण भीमा व वेदवती यांच्यामधील व पश्चिमेकडे घाटापर्यंतचा शिमोगा, चितळदुर्ग, बल्लारी, धारवाड, विजापूर इत्यादि हा प्रांत होय. याच्या नैऋत्येस केरल देश होता. चंद्रहास राजा येथील होता असें भारतांत म्हटलें आहे. अजिंठ्याच्या शिलालेखांत याचा उल्लेख आहे. अदवानी जवळच्या दक्षिणेंतील हा भाग होता असें डासन लिहितो. [ बृ संहिता १०, आर्कि सर्व्हे पु ४, म भा भीष्म पर्व फ्लीट—द हिं शिला, अप्यर—एन्शन्ट इंडिया, म्हैसुर ग्या स्मिथ, वग्य, डौसन—हिंदु क्लासिकल डिक्शनरी]

कुंताप—ऋग्वेदापैकीं परिशिष्टासारख्या निगदसंग्रहास कुंताप अध्याय असेंहि म्हणतात. पृष्ठ्यषळह, द्वादशाह इत्यादि क्रतूंच्या सहाव्या दिवशीं ब्राह्मणाच्छंसी नामक ऋत्विजानें पठण करावयाच्या वृषाकपि नामक शस्त्रांत या निगदाचा समावेश श्रौतसूत्रकारांनीं केला आहे. अथर्ववेदांतील विसाव्या कांडांत ब्राह्मणाच्छंसी नामक ऋत्विजाच्या शस्त्रसंबंधी मंत्राचा संग्रह असल्यामुळें तेथें कुंताप निगदाचा संग्रह केलेला आहे ( अथर्व २ १२० )

कुंति—एक राष्ट्र. कुंति लोकांनीं पांचालाचा पराभव केल्याचा उल्लेख काठक संहितेंत आहे ( २१ १ ) महाभारतांत याचा बरेच वेळां उल्लेख आहे ( २ १४,५९०, ७ ७०,२४३५, ८ ६ १५२ ) कुंति या नावाच्या बऱ्याच पौराणिक व्यक्ती दिसतात. उदा यदुपुत्र सहस्रजिताच्या वंशांतील हैहय कुलांत जन्मलेल्या नेत्र राजाचा पुत्र याचा पुत्र सोहंजि होता. यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्यामघकुलोत्पन्न मथ राजाचा पुत्र, याचा पुत्र धृष्टि यदुकुलोत्पन्न कृष्णास सत्यभामेपासून झालेला पुत्र

कुंतिभोज—कुंतिदेशाचा राजा. हा यदुकुलोत्पन्न शूर राजाचा परम मित्र असून अनपत्य असल्यामुळें, शूराचें प्रथम अपत्य दत्तक घ्यावें असा यानें निश्चय केला होता त्याप्रमाणें शूरास प्रथम झालेली पृथा नामक कन्या यानें दत्तक घेतली ( म भा आदि अ ६७ ) व तिचें नाव कुंती असें ठेवलें. पुढें यास पुरुजित नावाचा औरसपुत्र झाला. हा भारतीयुद्धांत पुत्रासह्वर्तमान पांडवांकडे होता (उद्योग अ १७२ ) पुढें याच युद्धांत हा द्रोणाचार्याशीं युद्ध करीत असतां मरण पावला ( कर्णपर्व अ ६ ) यास भोज असेंहि म्हटलें आहे

कुंतियान—मुंबई काठेवाड, जुनागड संस्थानांतील एक गाव हें भादर नदीवर असून पोरबंदरपासून २४ मैल दूर आहे. येथील लो स १९११ सालीं ११,३९६ होती. येथें एक किल्ला असून पूर्वी येथें सुभ्याचें मुख्य ठाणें होतें. जुनें गाव सध्याच्या गावच्या पश्चिमेस असून किल्ल्याचे कांहीं अवशेष अद्याप त्या ठिकाणीं सांपडतात. सरासरी १२०० सालपर्यंत तें येथिराज होतें. नंतर साप्रतचें शहर वसलें हेंच कुंडिनपूर असून कृष्णाचा सासरा भीष्मक या गावीं रहात होता अशा कथा सांगतात. येथील जमीन अतिशय सुपीक असून शिवाय पाण्याखालची आहे चारण जातीची कुंती नावाची स्त्री होती म्हणून या गावानें नाव कुंतियान असें पडलें. कुंतियानाच अपभ्रंशरूप सध्याचें कुतियान असें पडलें. येथें भाद्र व कर्ली पुष्कळ होऊन गले असी प्रसिद्धि आहे. मुसलमान या गावाला मुझफ्फराबाद म्हणत कारण गुजराथचा सुलतान मुझफ्फर याला हें गाव फार आवडे. येथील लोक फार स्वतंत्र असून आपला अधिकारी निवडीत किंवा वाईट राजाला दूर करून त्याच्या जागीं दुसरा नेमीत इ स १८०२ मध्यें हें अखेरीस जुनागडच्या ताब्यांत आलें. गावांत नागनाथ महादेवाचें एक देवालय असून श्रावण वद्यांत येथें २ दिवस यात्रा भरत असते

कुंती—यदुकुलोत्पन्न शूर राजाची कन्या पृथा, तिलाच कुंतिभोजानें दत्तक घेतल्यावरून हें नाव पडलें होतें. ही कुमारी असतां कोणी ऋषि ( दुर्वास असावा ) कुंतिभोज राजाच्या घरीं आला होता, तेव्हां राजानें त्यास राहून घेऊन हिला त्याच्या सेवेंत ठेवलें. कुंतीनें उत्तम प्रकारें त्याची सेवा केली त्यावरून त्यानें जातांना प्रसन्न होऊन सूर्य यमधर्म, वायु इंद्र आणि अश्विनीकुमार या देवतांचे हिला मंत्र देऊन सांगितलें कीं तुला जेव्हां पुत्र असावेत असें वाटेल तेव्हां तू यांतून ज्याचा जप करशील तो देव प्रगट होऊन तुला पुत्र देईल. एकदा हिच्या मनांत या मंत्राचा प्रत्यय पहावा असें येऊन हिनें पहिला सूर्याचा मंत्र जपून त्याचें आव्हान केलें. तों सूर्य लागलाच हिच्यापुढें मूर्तिमान उभा राहून भोग मागूं लागला. तेव्हां नाइलाजास्तव कुंतीला सूर्याशीं रत व्हावें लागलें. पुढें हिला गर्भ राहिला व ती कवचकुंडलयुक्त अशा दैदिप्यमान पुत्रास प्रसवली. तेव्हां लोकलज्जेस्तव तो पुत्र हिनें पेटींत घालून नदीमध्यें सोडून दिला. ताच पुढें कर्ण या नावानें प्रख्यात झाला ( कर्ण पहा )

काहीं कालानें स्वयंवरांत हिनें पंडुराजाला वरलें. परंतु तो शापामुळें स्त्रीसंग करण्यास असमर्थ होता. कुंतीनें पंडुराजाच्या आज्ञेनें पूर्वी ऋषीच्या वरामुळें प्राप्त झालेल्या मंत्राच्या योगानें एकेका देवाचें आव्हान करून युधिष्ठिरादिक पुत्र निर्माण केले. तिची सवत माद्री हिच्या मृत्यूनंतर कुंतीनें नकुल सहदेवाचें चांगलें रक्षण केलें. पुढें पांडवांचा द्वेष दुर्योधन करूं लागला. ही पांडवांसमागमें वनवासांत नव्हती. कुरुयुद्धानंतर विदुर, धृतराष्ट्र आणि गांधारी महाप्रस्थानास निघाली त्यांसमागमें हीहि गेली व एका वणव्यांत जळून मेली [ महाभारत वन ३०३—३०८ आदि ११२ ]

कुतुबदिया—बंगाल चितगाव जिल्ह्यांतील एक बेट याचें क्षेत्रफळ ३८ चौ मै लो स (१९०१) १०,६९३ या बेटाचें संरक्षण व्हावें म्हणून सरकारनें आपल्या खर्चानें बेटाच्या

मर्भोवार धक्का बांधला होता. परंतु १८९७ सालीं जें भयंकर वादळ झालें त्या योगानें त्या धक्क्याचा नाश झाला व पुष्कळ मनुष्यें मेलीं. हल्लीं बहुतकरून सर्व बेट सरकारी मालकीचें झालेलें असून याच्या पश्चिम किनाऱ्याला एक दीपगृह आहे.

**कुत्तालम्**—हें मद्रास इलाख्यांत तिनेवल्ली जिल्ह्यामध्यें तेनकाशी तालुक्यांतील एक हवा खाण्याचें ठिकाण असून शिवाय येथें प्रसिद्ध धबधबा आहे. हें तिनेवल्लीपासून ३६ मैल व तेनकाशीहून ३ मैल दूर आहे. येथील लो.सं.१९०१ सालीं ११९७ होती. कुत्तालम समुद्रसपाटीपासून ४५०फूट उंच असून येथील हवा उत्तम व सृष्टीचा देखावा मनोहर आहे. चित्तार नदीचा धबधबा याच ठिकाणीं आहे. हिंदू लोक या स्थळाला फार पवित्र मानतात. कुत्तलनाथ स्वामींचें एक देवालय अवश्य असून जिल्ह्याचे अधिकारी व इलाख्यांतील लाच खाणारे पुष्कळ सधन लोक येथें येतात. येथें बंगले व आरामगृहें पुष्कळ असून हिंदु लोकांची चांगलीच सोय होते. त्रावणकोरचे महाराज व त्रावणकोर कोचीनचे रेसिडेंट यांचे बंगले येथें आहेत.

**कुत्बमिनार**—ही गगनचुंबित इमारत दिल्लीपासून ११ मैलावर आहे. या इमारतीस भूकंप व विद्युत्पात यांच्या योगानें थोडासा धक्का पोहोंचला आहे. पॅरिस येथें 'एफेल टॉवर' नामक जो प्रचंड लोखंडी मनोरा पॅरिस प्रदर्शनाच्या वेळीं तयार करण्यांत आला होता तो सोडून दिला असता जगामध्यें इतका उंच मनोरा दुसरा कोणताहि नाहीं. ही इमारत जमीनीपासून २३८ फूट व १ इंच आहे. तिच्या पायाचा व्यास ४७ फूट २ इंच आहे आणि शिरोभागाचा व्यास ९ फूट आहे. या मनोऱ्याचा अगदीं तळमजला दोन फूट उंचीच्या ओट्यावर असून मधली इमारत २३४ फूट १ इंच आणि शेवटच्या घुमटाचा पाया दोन फूट उंच मिळून वर लिहिलेली एकंदर उंची येते हा मनोरा पूर्वी ३००फूट उंच असून त्यावर एकंदर सात मजले होते असें म्हणतात. परंतु सांप्रत त्याच्या अगदीं शेवटच्या मजल्यासह एकंदर पांच मजले आहेत.

'कुत्बमिनार' ही इमारत मुसुलमान बादशहांनीं बांधली हें खरें, परंतु तिचें अवाढव्य काम मुसुलमान कारागिरांनीं केलें किंवा हिंदु कारागिरांनीं केलें हा मोठा प्रश्न आहे. मिनारचें पुष्कळ नक्षीकाम हिंदूंच्या देवालयाचें असण्याचाहि फार संभव आहे. कलकत्त्याचे प्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधक पंडित डॉ. राजेंद्रलाल मित्र यांनी यासंबंधानें वाद उपस्थित केला होता, व त्यांनीं ही लोकोत्तर इमारत हिंदु लोकांचें स्मारक आहे असें सिद्ध केलें होतें. या मिनारवर कांहीं नागरी भाषेंत मजकूर कोरलेला आहेत. त्यावरून या इमारतीच्या रचनेंत हिंदु शिल्पकारांचा हात होता असें म्हणण्यास पुष्टि मिळते.

कुत्बमिनार इ. स. १३२५ मध्यें पूर्ण झाला. कुत्बमिनारच्या मुख्य मनोऱ्यावर उभें राहून त्याच्या घुमटांत भागीं दृष्टि फेंकली म्हणजे दहा कोस विस्ताराचें जें प्राचीन दिल्ली शहर होतें, त्यांतील विध्वंस पावलेल्या सहस्रावधि इमारती दृष्टीस पडतात. सर्व जगांतील कबरींमध्यें ज्याप्रमाणें ताजमहाल सर्वश्रेष्ठ, त्याप्रमाणें सर्व मनोऱ्यांमध्यें कुत्बमिनारहि सर्वश्रेष्ठ आहे.

याचा पहिला ( तळ ) मजला मात्र कुत्ब-उद्दीन ऐबक यानें बांधला व त्यावरील सर्व मजले इल्तुतमिश ( अल्तमश ) यानें बांधले (१२३८) असें स्मिथ म्हणतो. कांहींच्या मतें ( मिनारवरील शिलालेखावरून ) सर्व मिनार कुत्ब ऐबक यानेंच बांधला. [ स्मिथ—ऑ हि इं. ].

हा मनोरा जरी इतका उंच आहे तरी त्याच्या आंतील जिना फार चांगला आहे. पांच मजल्यापर्यंत मिळून त्यास एकंदर ३७९ पायऱ्या आहेत. आंतील बाजूस हवा व उजेड यांची सोय चांगली असल्यामुळें व प्रत्येक मजल्यावर वेगवेगळी ग्यालरी असल्यामुळें प्रेक्षकास जागोजाग विश्रांति घेण्याची सोय आहे. प्रत्येक मजल्यावरील ग्यालरीच्या योगानें ह्या इमारतीच्या सभोंवती जागोजाग कंबरबंद बांधले आहेत असें वाटतें. त्यामुळें इमारतीस अप्रतिम शोभा आली आहे. ह्याशिवाय ह्या इमारतीवर अनेक शिलालेख असून त्यामध्यें कुराणांतील वाक्यें व परमेश्वराची नाममालिका लिहिलेली आहे [ पारसनीस—दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ. ].

**कुत्बशहा**—( सन १४५१–१४५८ )—गुजराथचा शहा महंमदशहा हा मरण पावल्यावर त्याचा पुत्र कुत्बउद्दीन तख्तनशीन झाला. माळव्याचा सुलतान महमद खिलजी यानें कुत्बशहावर स्वारी करून त्याचा पराभव केला. पुढें उभयतांनीं तह करून दोघांनीं मिळून मुसुलमानी धर्म वाढविण्याची खटपट करण्याचें ठरविलें. परंतु हा ठराव अंमलांत आला नाहीं. मेवाडचा कुंभ राणा त्यावेळीं हिंदु राजांत अत्यंत शूर, प्रबळ व चतुर होता. त्यानें रजपुतान्यांत अनेक किल्ले बांधिले. कुंभराण्याच्या प्रतापापुढें या आसपासच्या मुसुलमानी राजकर्त्यांचें कांहीं चाललें नाहीं. तथापि कुंभराण्यास बुडविण्यास सर्व मुसुलमान टपून बसले होते. नागोर येथें कुत्बशहानें कुंभराण्याचा स. १४५८ त पराभव केला असें म्हणतात. नंतर कुत्बशहाहि त्याच वर्षीं मरण पावला. ( मे १४५९ ). [ मु. रि. पान ३२२ ].

**कुत्बशाही**—हें राज्य म्हणजे प्राचीन वरंगळचें काकतीयांचेंच राज्य होय. सें १४२३ मध्यें अहमदशहा बहामनी यानें बुडविलें. हा प्रदेश गोदा व कृष्णा यांच्यामधील होय. पूर्वेस बंगालचा उपसागर व पश्चिमेस बेदरीराज्य ही त्याची हद्द होती. प्रदेश मूळचा फार सुपीक होता, हिंदु व मुसुलमान राजांनीं कालवे खणून जास्त सुपीक केला. बाबरावर इराणांत जन्मलेल्या एका तुर्की सरदाराला महंमद गवान यानें सुभेदार नेमिलें. याचें नांव कुलीकुत्ब ( कुत्बउल मुल्क, ) याला इराणांतून इकडे आल्यानंतर प्रथम महंमदशहा बहामनीनें आश्रय दिला. पुढें बादश

वाडत कुत्ब उल् मुल्क हा वर सांगितल्याप्रमाणें सुभा झाला. याला १४९३ त जामकोंडाचा किल्ला घेण्यास पाठविलें असतां तेथें तो मेला. त्यानंतर त्याचा मुलगा सुलतान कुली याला याच्या पदव्या व अधिकार मिळाले व गोवळकोंड्याची जहागीर मिळाली. मवानला अन्यायानें फांसावर चढविल्यावर यानें बेदरचा संबंध सोडला आणि १५१८ त स्वतंत्र होऊन सुलतान कुलिकुत्बुशहा ही पदवी घेतली व कुत्बशाहीचा संस्थापक झाला. हा पराक्रमी व महत्वाकांक्षी होता. यानें राज्यविस्तार बराच केला. गोवळकोंडा येथें त्यानें राजधानी केली. प्रथम हें लहान खेडें होतें तें त्यानें वाढविलें. मुसुलमानी धर्माचा तो अभिमानी होता व त्यामुळें तो हिंदु प्रजेस त्रासहि देई. त्यावरून कमामेत कंडापिली व ओंढ्या या प्रांताच्या हिंदू राजांशीं त्याच्या लढाया होत. विजयानगरच्या कृष्णानें याचा १५१६ त पराभव करून त्याचा पुष्कळ देश काबीज केला होता. बेरिदशहा व आदिलशहा यांच्यांशींहि त्यानें लढाया मारल्या. होत्या शेवटीं शेवटीं त्याचा मुलगा जमशीद यानें बंड केलें असतां त्यास यानें कैदेंत ठेविलें. एकदां शहा एका मशीदीची बांधणी पहात असतां जमशीदच्या सांगण्यावरून कोतवाल हमदानी यानें जंबियानें त्याचा खून केला. त्यावेळीं तो ९० वर्षांचा होता; त्यानें साठ वर्षें ( १६ वर्षें सुभेदारी व ४४ वर्षें स्वतंत्र ) राज्य केलें. याची कारकीर्द १५१२–१५४३ च्या दरम्यानची होय.

ज म शी द.—( १५४३–१५५० ) यानें वडील भावास कैदेंत टाकून व त्याला आंधळें करून तख्त बळकाविलें. यानें आदिलशहावर स्वारी केली. तींत याचा पराभव झाला, त्यामुळें पुढें तो स्वाऱ्यांच्या भानगडींत पडला नाहीं. तो बहुधा विलासांत निमग्न असे. शेवटीं हा १५५० त मेला. याच्या कारकीर्दीत जगदेवराव ( निंबाळकर ! ) हा मराठा सरदार फार पुढें आला. जमशीदनंतर त्याचा मुलगा सुभान गादीवर आला. परंतु थोडक्याच दिवसांत तो पदच्युत झाला.

इ ब्रा हि म.—( १५५०–१५८० ) हा जमशीदचा भाऊ; जमशीदच्या धाकानें विजयानगरच्या राजाजवळ आश्रयास होता. याला जमशीदच्या मरणानंतर दरबारी मंडळीनें ( सुभानला काढून ) गादीवर बसविलें. हा कृतघ्न होता. ज्या विजयनगरकरांनीं त्याला आश्रय दिला त्याच रामराय राजाविरुद्ध हा इतर मुसुलमान शहांना सामील होऊन त्यानें विजयनगर बुडविलें. व उपकारकर्त्यांचें ऋण अशा रीतीनें फेडलें. हुसेन निजामशहाचा हा स्नेही होता.

यानें १५६४ त राजमहेंद्रीवर चढाई केली. परंतु तेथील हिंदु राजांनीं त्याचा पराभव केला. प्रथम रामराजाचा व आदिलशहाचा स्नेह होता, पण तोहि शेवटीं रामराजाच्याविरुद्ध गेला. इब्राहिमनें बेरिदशहावर अपराधावाचून स्वारी केली असतां रामरायानें त्याचा निषेध केला होता. तें शल्य त्याच्या मनांत सलत होतें. मागें सांगितलेल्या जगदेवरायानें याला गादीवर बसविण्यांत श्रम केल्यानें त्याला यानें दिवाण केलें त्याच्या हाताखालीं रायाराव नावाचा एक प्रख्यात मराठा सरदार होता. यावेळीं राज्यांत मराठ्यांचें प्रस्थ फार माजलें होतें तें मुसुलमान लोकांना न रुचून त्यांनीं जगदेवाबद्दल शहाचे कान भरले. तेव्हां शहाची त्याच्यावर गैरमर्जी झाली. जगदेव गोवळकोंड्याहून निघून शहाचा प्रांत उध्वस्त करीत वऱ्हाडपर्यंत गेला. बुऱ्हाणच्या निजामानें त्याला आश्रय दिला; परंतु पुढें तेथून तो निघाला व पुन्हां कुत्बशाहींत लुटालूट करूं लागला. त्याच्या पदरीं आरबी, इराणी, हबशी, मराठे वगैरे फौज होती. इब्राहिमला त्याच्याशीं सामना देववेना. इब्राहिम व हुसेन निजाम यांनीं आदिलशहावर स्वारी केली. तेव्हां जगदेव व विजयानगरकर रामरायाचा भाऊ व्यंकटाद्रि हे आदिलशहाला मिळून त्यांनीं या स्वारी करणाऱ्याचा पराभव केला. जगदेवानें पुढें तर कुत्बशहाचे बहुतेक किल्ले व प्रांत घेतले. तेव्हां नाइलाजानें इब्राहिमनें त्याच्याशीं तह केला. इब्राहिमनें यानंतर ओढ्या, चंद्रवार व कंडदेव पल्ली येथील हिंदु जमीनदारांना आपले मांडलिक बनविले. याचा दिवाण मुरारराव म्हणून होता. त्यानें प्रजेस फार त्रास दिला. शहा १५८० त मेला. त्याला एकंदर तीस मुलें झालीं. त्यानें लढाया बऱ्याच मारल्या. तो विद्वान होता व प्रजाहिततत्पर होता. त्यानें बऱ्याच सुंदर इमारती बांधल्या. गोवळकोंड्याचा तट इब्राहिमबाग, फुलबाग, इब्राहिमतला, हुसेनसागर, वड्वलचा बंधारा, पाठशाळा वगैरे कामें यानें केलीं. व्यापारास यानें चांगलें उत्तेजन दिलें. न्यायहि तो बरा करी. यानें वडील मुलास वीष देऊन मारलें होतें.

म हं म द.—( १५८०–१६११ ) हा इब्राहिमचा तिसरा पुत्र. १२ व्या वर्षी गादीवर बसला. यानें विजयानगरकराची एक शाखा पेनकोंड्यास होती ती बुडविण्याकरितां पुष्कळ मोहिमा केल्या; पण त्या व्यर्थ गेल्या. यानें आपली बहीण आदिलशहास देऊन या दोन राज्यांत सख्य केलें. याच्या वेळीं गोवळकोंड्याची वस्ती दाट होऊन पाणीपुरवठा चांगला नसल्यामुळें पांच कोसांवर चांगली जागा पाहून यानें तेथें एक नवीन शहर वसविलें. याची भागवती ( भागमती ) नांवाची एक आवडती स्त्री होती. तिचें नांव त्यानें या नव्या राजधानीस ठेविलें. त्याचा मुलगा हैदर यानें भागानगरचें हैदाबाद असें नांव पुढें बदललें. महंमदनें भागानगरास पाणीपुरवठा उत्तम केला. जुम्मामशीद, चार मिनार, दवाखाने, हमामखाने, बगीचे वगैरे त्यानें तयार केले. यानें फारशी युद्धें केलीं नाहींत. याच्या दरबारीं इराणचा वकील राहिला होता. इराणचा शहा अब्बास यानें आपली मुलगी याच्या मुलास देण्याचा विचार केला होता. याच्या कारकीर्दीत प्रख्यात मीर जुम्ला किंवा अमीर उलमुल्क हा दिवाण होता (मीरजुम्ला पहा). हा शहा चौतीस वर्षें राज्य करून १६२६ त मेला. यानें लोको-

पयोगी सामान अडीच कोटी रुपये खर्च केले हा विद्वान होता यानें 'कुलिआत् कुत्बशाह' म्हणून एक फारशी, हिंदी व दक्षिणी कवितांच मोठें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे

अब्दुल्ला हुसेन—(१६२६-१६७२) हा महमदचा पुत्र यानें शांततेनें राज्य केलें या वेळीं शहाजहाननें निजामशाही बुडविली आणि आदिलशहापासून खंडणी घेतली नंतर याच्यावर शहाजहान चालून आला असता यानेंहि खंडणी कबूल केली (१६३४) याचाहि वजीर मीरजुम्ला होता औरंगझेब हा दक्षिणचा सुभेदार झाला असता व मीरजुम्ल्याचें व शहाचें वाकडें आलें असता मीरनें औरंगझेबचा आश्रय घेतला *औरंगझेबास गोंवळकोंड्याची संपत्ति पाहिजे होती आणि* औरंगझेबानें कांहीं तरी निमित्त काढून व मागण्या मागून त्या नाकारल्याबद्दल गोंवळकोंड्यास वेढा दिला

अखेरीस शहाजहानच्या सक्तीच्या हुकुमावरून नाइलाजानें औरंगझेबनें वेढा उठविला व तह केला, कुत्बशहाची मुलगी सुलतान महमदला दिली त्यानें अमीनला बंधमुक्त करून जुम्ल्याची संपत्ति व जहागीर सोडली मोंगलाला थकलेली खंडणी देऊन रामगीर जिल्हाहि दिला या स्वारींत मोंगलाला फारसा फायदा झाला नाहीं असें औरंगझेबानें बापास कळविलें मात्र सारी लूट स्वतः दाबून ठेवून उलट २० लाखांचें कर्ज त्यानें बापास दाखविलें यानंतर १६६६ त कुत्बशहानें समयसूचकता जाणून औरंगझेबाविरुद्ध आदिलशहास मदत केली या सुमारास शिवाजी छत्रपति याचा धुमाकूळ सुरू झाल्यानें यानें त्याच्याशीं सालीना पांच लक्ष खंडणी देण्याचें ठरवून तह केला (१६६८) पुढें त्यानें मराठ्यांना त्रास दिल्यामुळें महाराजांनीं १६७२ त ह्याच्यावर स्वारी केली व बरीच संपत्ति काबीज करून त्याचा मोड केला (अबदुल्ला कुत्बशहा पहा ज्ञानकोश विभाग ६) याच वर्षी शहा मरण पावला

अबू हसन—अबदुल्ला निपुत्रिक होता म्हणून त्याचा जावई अबु हसन (१६७२-१६८७) हा गादीवर आला हा गादीवर येण्यापूर्वी बराच विषयासक्त व मद्यपी होता गादीवर बसविण्यांत याला मादण्णा (मदन) पंतानें बरीच मदत केल्यानें त्याला यानें दिवाणपद व त्याचा भाऊ अकण्णा (एक्काय) पंतास सेनापतिपद दिलें मादण्णाच्या कारकीर्दींत राज्यात फार सुधारणा झाल्या यावेळीं आदिलशाही दुर्बळ झाल्यानें व मोंगल आपल्या नाशावर टपलेला पाहून यानें मादण्णाच्या संमतीनें शिवाजी महाराजांशीं प्रथम मैत्रीचा व नंतर मांडलिकीचा तह केला (१६७६) संभाजी छत्रपतींशीहि तोच तह त्यानें कायम ठेवला शिवाजी छत्रपति हे कर्नाटकच्या मोहिमेवर गेले असतां यानें त्यांना सैन्याची मदत दिली होती पुढें (१६७७) मोंगलांचा दिलेरखान व विजापूरकरांचा अबदुल करीम हे एकत्र होऊन गोवळकोंड्यावर आले, तेव्हां मादण्णानें त्यांचा पराभव केला १६८३ त स्वतः औरंगझेब दक्षिणेंत चालून आला या वेळीं हसनशहाची तयारी चांगली होती त्याचें सैन्य व संपत्ति पुष्कळ होती मादण्णाची कारकीर्द सर्व हिंदूंना प्रिय झाली होती मात्र मुसुलमान सरदार त्याच्या विरुद्ध शहाचे कान भरीत, परंतु त्यानें तिकडे लक्ष दिलें नाहीं नंतर (१६८५) संभाजी छत्रपतीस शहानें खंडणी दिली एकमेकांचे दोस्त व शत्रू एकच व परस्परांनीं परस्परांस साहाय्य करावें असा तह शिवाजी महाराजांपासून अमलांत होताच औरंगझेबच्या मनांत आतां गोंवळकोंडें खालसा करावयाचें आलें कारण कुत्बशहा हा वेळीं आदिलशहास मदत करतो, तेव्हां आधीं गोंवळकोंडें घेतल्याशिवाय विजापूर *पडत नाहीं असें ठरवून कांहीं कुरापती काढून त्यानें* स्वारी केली त्यापूर्वी आपल्या वकिलाकडून त्यानें कुत्बशहाचे अनेकदां अपमान केले होते त्याची त्याला सांगीच होती कीं, तू कुत्बशहाचा नेहमीं अपमान करीत जा म्हणजे तो हा तरी तो तुझा अपमान करील व असें झालें म्हणजे मला लढाईस कारण सांपडेल ' सारांश, शहानें १६५५ चा तह पाळला नाहीं खंडणी वेळेवर देत नाहीं, शिवाजी संभाजी सारख्या काफरांना खंडण्या देतो ' वगैरे बाह्य कारणें दाखवून औरंगझेबानें लढाई पुकारली

त्याचे सरदार सादतखान व खानजहान गोंवळकोंड्यावर आले (१६८६) मादण्णानें सेनापति इब्राहिमला त्याच्यावर पाठविलें मलखेड येथें लढाई होऊन तींत मोंगलांचा पराभव झाला, तेव्हां औरंगझेबानें सुलतान मुअज्जमला मदतीस पाठविलें त्यावेळीं इब्राहिमनें फितूर होऊन त्यांना अडविलें नाहीं मोंगल हैद्राबादेस आला तेव्हां मादण्णाचा *सल्ला न ऐकतां भिऊन शहा गोंवळकोंड्यास गेला तिकडे* इब्राहिमला औरंगझेबानें लांच देऊन फोडलें त्यामुळें मोंगलांचा सुखासुखी हैद्राबादेंत प्रवेश झाला. या गडबडींत मादण्णाचा खून त्याच्या मुसुलमान शत्रूंनीं केला परंतु सैन्याची तयारी चांगली करून ठेविली होती त्यामुळें विजापूरला मदतीची अपेक्षा असल्यानें औरंगझेबानें हैद्राबाद पडलें तरी दोन कोटींची खंडणी घेण्याचें ठरवून कुत्बशहाशीं तह केला व खंडणीवसुलीस मुअज्जमला तेथें ठेविलें (१६८६) यानंतर विजापूर पडलें तेव्हां गोंवळकोंडें घेण्याचें नक्की ठरवून ... कुल्गुरूयांच्या एका फकीराच्या पडग्याच्या दर्शनाचें निमित्त करून तो कुत्बशाहींत उतरला तत्पूर्वी कर्नाटक, अदवानी इत्यादि मदत गोंवळकोंड्यास येऊन पोहोंचूं नये म्हणून त्या बाजूस त्यानें गाजीउद्दीन यास पाळतीवर ठेविलें (१६८७) व सादतखानाकडून गोंवळकोंड्याच्या सैन्यांत फितुरी माजविली तसेंच घाटेल त्या नीच युक्त्या अमलांत आणून व भाकदपटशहा दाखवून त्यानें कुत्बशहाचा पैसा उपटण्याचा क्रम अव्याहत चालविला शेवटीं तर शहानें आपल्या बायकोच्या अंगावरील दागिने सुद्धां दिले तरी औरंगझेबाला त्याची दया आली नाहीं दोघां मदण्णांचा धर्मप्रेमीपणा, कारभारी ब्राह्मण नेमणें व मूर्तिपूजक संभाजी छत्रपतीशीं दोस्ती

करणें वगैरे आरोप त्याच्यावर उघडपणें ठेवून औरंगझेबानें लढाईस सुरवात केली. कुत्बशहा या कृत्यामुळें चिडला असतां विश्वासू लोकांसह तो हैद्राबादहून गोवळकोंड्याच्या किल्ल्यात गेला यावेळीं माद्ण्णाची त्याला फार आठवण झाली. औरंगझेबानें किल्ल्याला वेढा दिला त्यावेळीं सारे अमलदार फितूर झाले. पण कांहीं बाजूंनी औरंगझेबानें रिता केला होता आठ दहा महिने वेढा दिला असताहि शहानें मोठ्या शौर्यानें किल्ला लढविला अखेर वरील सर्व कारणे एकवटून व विश्वासघात होऊन मोंगलांनी किल्ला घेतला अबुहसन कुत्बशहा औरंगझेबाच्या हातीं पडला ( १६८७ सप्टेंबर ). त्याला त्यानें कैद करून दौलताबादेच्या किल्ल्यावर कैदेंत टाकिलें, तेथें तो मरेपर्यंत होता याच्या बदफैलीपणाबद्दल मोंगल इतिहासकारांनीं अवास्तव वर्णनें दिलीं आहेत. राज्यावर आल्यानंतर यानें आपलें वर्तन सुधारलें त्याला पकडून नेल्यानंतर त्याच्यासाठीं त्याची प्रजा फार हळहळली त्याच्या शौर्याच्या व न्यायाच्या अनेक गोष्टी अद्यापि त्या प्रांतीं ऐकूं येतात या घराण्यानें १७५ वर्षे राज्य केलें त्यांत सहा सुलतान झाले त्यांनीं बांधलेल्या इमारती व काम अद्यापि शिल्लक आहेत हे सुलतान रयतेची काळजी घेणारे होते यामुळें दंगेधोपे झाले नाहींत या घराण्यातील शहांच्या कबरी बहुधा गोवळकोंड्यास आहेत [ मुसुलमानी रियासत, काफीरखान, द हिं घराणीं, मोडक, बील ]

कुत्बुद्दीन-ऐबक ( १२०६-१२१० ) याचें नांव मूळ ऐबक, हा जातीचा तुर्क निशापूर (खुरासान) मध्यें प्रथम हा एका श्रीमंताचा गुलाम होता तेथें हा विद्या शिकला मालक मेल्यावर याला शहाबुद्दीन घोरीस नजर करण्यात आलें याच्यावर शहाबुद्दीनची मर्जी फार बसली हा प्रामाणिक व युद्धचतुर होता शहाबुद्दीनची रायपिठोरावरील स्वारी(अजमेर ११९० ) झाल्यावर याला त्यानें हिंदुस्थानांत आपला प्रतिनिधि म्हणून ठेविलें

यानें ११९२ त मीरत, दिल्ली, बनारस, कालिंजर, बीना, ग्वालेर वगैरे ठिकाणें काबीज करून दिल्लीस आपलें वास्तव्य केलें तेव्हांपासून आजपर्यंत दिल्ली हें राजधानीचें ठिकाण म्हणून चालूच आहे. शहाबुद्दीन १२०६ त मेल्यावर त्याचा पुतण्या गियासुद्दीन महमद यानें कुत्बुद्दीन याला राजचिन्हें ( छत्र, मुकुट, तख्त वगैरे ) पाठवून देऊन सुलतान ही पदवीहि दिली तेव्हां कुत्बनें २७ जून १२०६ रोजीं दिल्लीस तख्तारोहण केलें यानें गझनीच्या मोठमोठ्या सरदार घराण्यांशीं संबंध जोडले यानें यापुढें जास्त मुलूख काबीज न करतां न्यायानें व शांततेनें राज्य केलें हा या गुलाम घराण्याचा मूळ पुरुष होय यानें चार वर्षे राज्य केलें, हा १२१० त लाहोर येथें घोड्यावरून पडून मेला हा हिंदुस्थानाचा पहिला मुसुलमान शहा होता याच्या वेळीं उत्तरहिंदुस्थानांत नाना प्रकारचीं बंडें व दंगधोपे चालू होते व स्वस्थता फारशी नव्हती याच्या मागून याचा मुलगा आराम गादीवर आला कुत्बमिनारजवळील जामामशीद ( उर्फ कुवत-उल-इस्लाम ) हें पूर्वीचें हिंदु देऊळ असून यानें त्याची मशीद बनविली व तिचा मशिना म्हणून कुत्बमिनार बांधण्यास प्रारंभ केला हा मिनार आल्तमश व अल्लाउद्दीन खिलजी यांनीं पुढें पुरा केला असें म्हणतात ( कुत्बमिनार पहा ) [ मु रियासत, बील पृ ३२० ]

कुत्रा—हा माणसाळलेला प्राणी लांडग्याच्या कुळातला असावा असें कांहीं श्वानशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे पण प्राणिशास्त्रांतील तज्ज्ञ अजून याविषयीं साशंक आहेत कुत्र्याचा इतिहास मानवेतिहासाइतकाच प्राचीन असेल कारण कुत्रा व मनुष्य यांची सांगड फार पूर्वीपासूनची दिसते यासंबंधांत वैदिक वाङ्मय चाळल्यास पुढील माहिती लागते श्वान हा माणसाळलेला प्राणी होता ( ऋ २ ३९, ४ ) तो चोर व परकी माणसें यांच्यापासून घराचें रक्षण करी(७ ५५, ५) डुकराची शिकार करण्यास याचा उपयोग होई ( १० ८६, ४ ) पण सिंहाशीं टक्कर देण्यास हा असमर्थ ठरे ( अथर्व ४ ३६, ६ ), यास यज्ञांत अपवित्र मानीत ( ऋ ९ १०१, १ ) असतां अनाथ दशा आली म्हणजेच कुत्र्याचें मांस खात ( ऋ ४ १८, १३ ) इंद्राची सरमा नावाचा प्रख्यात कुत्रा असे पुराणांतून तर कुत्र्याच्या बऱ्याच कथा सांपडतात युधिष्ठिराबरोबर स्वर्गद्वारापर्यंत एकटा कायतो कुत्राच उरला असें महाभारतांत दाखवून कुत्र्याचा इमानीपणा वर्णिला आहे इजिप्ती लोक कुत्र्याला फार मान देत घरांत कुत्रा मेल्यास कुटुंबातील माणसें सुतकाचें चिन्ह म्हणून श्मश्रू करवीत असें हिरोडोटस सांगतो एथिओपियांत कुत्र्याला राजा म्हणून निवडीत ज्यू लोक कुत्र्याचा तिरस्कार करीत जुन्या व नव्या करारांत कुत्र्यासंबंधीं आलेले उल्लेख चांगले नाहींत ग्रीकलोक कुत्र्याचा शिकारीस उपयोग करीत

शिवाजी महाराजापाशीं एक विश्वासू कुत्रा होता असें म्हणतात व रायगडास त्याची एक समाधि दाखवितात शाहु छत्रपतींचा एक आवडता खंड्या नावाचा कुत्रा होता त्याला पोषाख व जडजवाहीर घालीत त्याला पालखीची तैनात होती असें म्हणतात त्याचें कारण त्यानें एकदां महाराजांचे प्राण वांचविले होते त्यांना शिकारीचा फार नाद असे एके वेळीं ते शिकारीसाठीं गेले असतां, शिकारी लोकांची व त्यांची चुकामूक होऊन ते एकटेच पुढें गेले तेव्हां लपून बसलेल्या वाघानें त्यांच्यावर उडी घातली त्यांनीं उडी चुकविली व इकडे खंड्यानें वाघाशीं झोंबी घेऊन त्याला ठार केलें महाराजाची स्वारी निघाली कीं खंड्याचा पालखी बरोबर असे पुढें महाराज वारल्यावर त्यांचें दहन केलें तेव्हां या इमानी प्राण्यानें चितेंत उडी टाकून आपला प्राण अर्पण केला हल्लीं संगममाहुलीस जेथें महाराजांची समाधि आहे तेथेंच याचीहि एक समाधि असून त्याची एक प्रतिमा बनविलेली आहे ' हा गोष्ट बखरींत आढळते.

कुत्र्याचें डोकें लांबोळें असतें. त्याला आपला जबडा बाजूला हालविता येत नसून वरखालीं मात्र हालविता येतो. छाती रुंद असते. त्याला चांगलें पोहता येतें. अग झाडलें की पाणी सर्व निघून जातें. याचे पाय बारीक पण बळकट असतात. त्यामुळें त्यास जलद चालता येतें. त्याचीं बहुतेक सर्व ज्ञानेंद्रियें तीक्ष्ण असतात आणि झोंपहि गाढ नसते. याच्या नाकावर दोन कळे असतात. शेपूट वाकडें असतें. त्यामुळें त्यास वळून वळण्यास मदत होते. शेपटी हालवून तो राग, दुःख इ. मनोविकार व्यक्त करतो. हा पुढील पाय उभे करून बसतो.

त्याच्या प्रत्येक जबड्यात पुढचे ६-६ दात असतात. वर खालीं २।२ लांब, बळकट व तीक्ष्ण असे सुळे असतात व मागें २६ दात असतात. ह्यानीं तो हाडें फोडतो व चघळीत बसतो सुळ्यानीं मांसाचे तुकडे तोडून गिळून टाकतो व स्वस्थ झोंप घेत पडतो. याची जीभ मऊ असते. थकला म्हणजे हा जीभ बाहेर काढतो व त्यामधील घाम बाहेर निघतो.

त्याच्या पायाचे तळवे मऊ असतात. पुढच्या पायास ४ नखें असतात. नखें आंत ओढून घेता येत नाहींत, त्यामुळें चालताना थोडा आवाज होतो. चपलता, बल व घ्राणेंद्रियाची तीक्ष्णता या गुणांमुळें कुत्रा हा मनुष्याचा पक्का दोस्त बनला आहे व तो मनुष्याला इतर प्राण्याविरुद्ध मदत करतो. कुत्र्यानें मालकाचा जीव वांचविल्याचीं अनेक उदाहरणें आहेत.

सर्व कुत्रे मूळ एकाच कुळातले पण हवामान, अन्न व संकरजनन यामुळें त्याचे निरनिराळे वर्ग पडले हें म्हणणें असंभवनीय नाहीं. मानवसंस्कृतीच्या प्रगतीमुळेंहि कुत्र्यामध्ये भेद पडतात. रानटी जातींत एकाच जाताचे कुत्रे आढळतात व सुधारलेलीं माणसें आपआपल्या गरजाप्रमाणें नवीन नवीन जाती उत्पन्न करतात. याच कारणामुळें सर्व देशांतील रानटी कुत्रे बहुधा सारखेच दिसतात; पण पाळलेल्या कुत्र्यात फार फरक असतात. कुत्र्यांचं वर्गीकरण निरनिराळ्या पद्धतींनी केलें जातें. मुख्य वर्ग दोन. शिकारी व बिनशिकारी. पुढील वर्गीकरणहि लक्षात घेण्याजोगें आहे.

( अ ) मनुष्याला शिकार पाडून देणारे पण स्वतः न मारणारे कुत्रे; उदा. पॉइंटर, सेटर, स्पॅनिएल. ( आ ) माणसानें शिकार पाडून दिल्यावर मग मारणारे; उदा. इंग्लिश ग्रे हाऊंड. ( इ ) शिकार पडणारे व मारणारे कुत्रे. उदा. ब्लड-हाऊंड, फॉक्स हाऊंड, टेरिअर. ( ई ) मनुष्यानें विद्ध केलेली शिकार हुडकून आणणारे उद. रिट्रीव्हर, डीयरहाऊंड. ( उ ) मनुष्याचे उपयुक्त सहवासी—मॅस्टिफ, न्यूफाउंडलंड, सेंट-बर्नार्ड, बुलडॉग, व्हीपडॉग इ. ( ऊ ) स्त्रियांचे नेळणें होऊन [illegible]णारे कुत्रे उदा. किंग चार्लस स्पॅनिएल, ब्लेनहीम, पग, [illegible], चायनीज, जपानीज स्पॅनिएल इ. पाश्चात्य देशात कुत्र्यावर स्वतंत्र ग्रंथ व नियतकालिकें निघतात व वार्षिक प्रदर्शनें भरतात. इंग्लंडांतील केनेल क्लब नावाची श्वानसंस्था कुत्र्याचीं प्रदर्शनें भरवून व कुत्र्याच्या जोपासनेचा प्रश्न पुढें मांडून या प्राण्याला बरेंच महत्त्व आणून देते. निरनिराळ्या प्रदेशांतूनहि या संस्थेच्या अनेक शाखा आहेत. संस्थेचें गॅझीट आहे व त्याच्या अध्यक्षानें एक कुत्र्यावर ज्ञानकोशहि रचिला आहे. यूरोपांतील बरींच पत्रें आपले काहीं रकानें कुत्र्यासंबंधींच्या बातम्याकरिता राखून ठेवितात. याप्रमाणें यूरोप व अमेरिकाखंडांतून श्वप्रेमी लोकांची संख्या मोठ्या झपाट्यानें वाढत आहे. हिंदुस्थानांत मात्र हिंदू व मुसुलमान लोकांत कुत्र्यावरील प्रेम फारसें आढळून येत नाहीं. कुत्रा हा गलिच्छ व अस्पृश्य असा प्राणी आहे असें पुष्कळ हिंदू मानतात सोंवळ्यात कुत्रा चालत नाहीं एवढेंच नव्हे तर बायकाना त्याचा विटाळ होतो म्हणून पुष्कळ हिंदू कुत्रा पाळीत नाहींत. प्रत्येक हिंदू व मुसुलमान देशात ख्रिस्ती किंवा यूरोपियन लोकाना अगदीं घाणेरडी शिवी द्यावयाची झाल्यास 'कुत्रा कुत्ता' म्हणतात असें ब्रिटानिका सांगते.

**कुत्रु**—बस्तर संस्थानांतील सर्वांत मोठी जमीनदारी. उत्तर अक्षांश १८° ८ं' ते १९° २८'व पूर्वरेखांश ८०° २५' ते ८१° १५'. क्षेत्रफळ १३६२ चौ. मै. लोकसंख्या सुमारें १२ हजार. टाकोळी ४६०० रु. हिचा ईशान्येकडील भाग डोंगराळ आहे. या भागांतून इंद्रावती व तिला मिळणाऱ्या कोर्का व बेरुडी नद्या वहातात. मुख्य गाव कुत्रु. येथें पोलिसचौकी, शाळा व डाकघर हीं आहेत. जंगलात साग विपुल आहे.

**कुत्स.**—एक वैदिक ऋषि व सूक्तद्रष्टा. ऋग्वेदात या द्रष्ट्याचें नांव पुष्कळदा आढळतें. पण त्यासंबंधीं काहीं माहिती मिळत नाहीं. यावरून हा वेदकालापूर्वीचा असून वैदिक ऋषींना बराच अज्ञात असावा. कुत्साला बऱ्याच वेळा आर्जुनेय म्हटलें असून ( ऋ. ४. २६, १; ७. १९, २; ८. १, ११ ), शुष्ण दैत्याचा पराभव करण्याच्या कामीं व सूर्याला जिंकण्यात हा इंद्राबरोबर आढळतो ( १. ६३, ३, १२१, १९; १७४, ५; १७५, ४; ४. ३०, ४; ५. २९ ९, ६. २०, ५; ७. १९, २; १०. ९९, ९ ). स्मदिभ, तुग्र व वेतसू याना कुत्सानें जिंकिलें ( १०. ४९, ४ ), पण अतिथिग्व आणि आयु यांच्याबरोबर इंद्रानें यालाहि जिंकिलें असें बरेच वेळा सांगितलें आहे (१. ५३, १०; २. १४, ७; ८. ५३, २. ). तूर्वयाणामुळें कुत्साचा पराभव झाला असें एका ऋचेंत आहे ( १. ५३, १० ). इतर काहीं स्थलांवरून अतिथिग्वाबरोबर कुत्सहि इंद्रमित्र होता असें दिसतें ( १. ५१, ६; ६. २६, ३ ) याची आणखी माहिती 'बुद्धपूर्व जग ' या विभागात ( पा. ७२ आणि ४८० ) आली आहे. पुढील वाङ्मयातून कुत्साचा क्वचितच उल्लेख येतो ( अथर्व. ४. २९, ५; पंचविंशब्राह्मण १४. ११. २६ ).

ब्राह्मण ग्रंथांतून कुत्सानें इंद्राला बांधल्याची कथा आढळते (पंचविंश ब्रा. ९. २, २२; जैमि. ब्रा. १.२२८). इंद्र व कुत्स याच्या रूपांत इतकें साम्य होतें कीं, एकदा इंद्रानें त्याला आपल्या घरीं नेलें असता शचीला आपला पति कोणता हें ओळखितां आलें नाहीं.

**कुंदकुंदाचार्य**—सरस्वतीगच्छांतील जैन यति. हा वीरसंवत् ४९ मध्यें जन्मून ११ वर्षे गृहस्थ, ३३ वर्षे यति व ५१ वर्षे, १० महिने १० दिवस सूरी होऊन वयाच्या ९५ व्या वर्षी मृत्यु पावला. यानें कांहीं ग्रंथरचना केली आहे. त्यापैकीं शिवकुमार महाराजाकरितां पंचास्तिकाय हा ग्रंथ यानें लिहिला असें त्यावरील टीकेवरून दिसतें. यानें षट्प्राभृत हा एक ग्रंथ केला असून त्यावर श्रीश्रुतसागरानें टीका लिहिली आहे. याच्या गुरूचें नांव विद्यानंदिन् असें होतें. याचा तिसरा ग्रंथ तत्वार्थदीपिका हा होय.

**कुंदगोळ**—मुंबई इलाख्यांत जमखिंडी संस्थानांतील याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. याची लोकसंख्या सुमारें अडीच हजार. येथें सभोंवतालीं कापूस पिकतो. कुमठा, कारवार व हुबळी या ठिकाणीं येथून कापूस जात असतो.

**कुद्रेमुख**—" अश्वमुख " ( कानडी भाषेंत कुद्रे = घोडा ) पश्चिमघाट ऊर्फ सह्याद्रि पर्वताच प्रसिद्ध शिखर. हें मद्रासच्या दक्षिणकानडा जिल्ह्याच्या व म्हैसूरच्या कडूर जिल्ह्याच्या सरहद्दीवर ६२१५ फूट उंच आहे. याच्या समुद्राकडील आकाराचें हें वर्णनात्मक नांव असून हे नाविकास प्रसिद्ध मार्गदर्शक आहे. म्हैसूरकडील बाजूनें यावर जाण्याचा रस्ता सामसेजवळून असल्यामुळें यास सामसेपर्वत असेंहि म्हणतात. दक्षिणकानडांतील अधिकारी उन्हाळ्यांत या शिखरावर रहाण्यास जातात.

**कुंदा टेंकडी**—मद्रास इलाख्यांत निलगिरी जिल्ह्यांतील डोंगराची रांग. निलगिरी पठाराच्या नैर्ऋत्येस कुंद टेंकड्या सरहद्द बनलेल्या आहेत. पहाडी प्रदेशाच्या दोन्ही बाजूंनें हिरवेंगार जंगल असून उत्तरेकडील उतरणीवरून कुंदा नदी वाहात जाते. कुंदा नदीपलीकडे भवानी नांवाची दरी आहे उटकमंडपासून कुंदा टेंकड्या फार रमणीय दिसतात.

**कुंदा तहशील**-संयुक्त प्रांतांत, प्रतापगड जिल्ह्यांतील एक तहसिल. या तहसिलींत रामपूर, माणिकपूर, बिहार व धिंगवस परगण्याचा समावेश होतो. हिचें क्षेत्रफळ ५४० चौ. मै. असून लो. सं. १९११ सालीं ९,१४,६४४ होती. तहसिलींत ७६२ खेडीं असून माणिकपूर हें तहसिलीचें मुख्य ठिकाण आहे. १९०३–०४ सालीं जमीनमहसूल ४,८०,००० रु. होता. गंगानदीच्या ईशान्येस ही तहसील असून गंगेच्या कांठचा उंच प्रदेश सुपीक आहे. १९०३–०४ सालीं लागवडीचें क्षेत्रफळ २८१ चौरस मैल होतें.

**कुनिगल**—म्हैसूर संस्थान. तुमकूर जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ३८२ चौ. मैल असून १९११ सालीं लो. सं. ८३८१२ होती. यांत एक शहर व २८४ खेडीं आहेत. मुख्य गांवें कुनिगल (तालुक्याचें ठिकाण) व हुलियूदुर्ग. अमयेस भद्दगिरि नांवाचा डोंगर असून त्याची उंची समुद्रसपाटीपासून ३०८० फूट आहे उत्तर व पश्चिम भागाची जमीन सुपीक असून लागवडीस येते. बाकी सर्व भाग रानटी व जंगली आहे नवव्या शतकांत राष्ट्रकूट राजाच्या अमदानींत या तालुक्याचें नांव कुनिगल असेंच होतें.

**कुनिहार**—पंजाबांत सिमल्याच्या डोंगरी संस्थानांपैकीं एक संस्थान. हें सिमल्यापासून पश्चिमेस १५ मैलांवर असून याचें क्षेत्रफळ ८० चौ. मै. आहे. १९२१ सालीं लो. सं. १९६५ होती. जम्मू येथील रजपूत रघुवंशी घराण्यांतील एका पुरुषानें सदरहू संस्थानची स्थापना केली. सांप्रतचे महाराज ठाकूर हरदेवसिंग नांवाचे आहेत संस्थानचें उत्पन्न सुमारें ६००० रुपयांचें असून इंग्रजसरकारास १८० रुपये खंडणी द्यावी लागते.

**कुन्डट** —या जर्मन शास्त्रज्ञाचा जन्म १८३९ मध्यें श्वेरीन येथें झाला त्याचें शिक्षण लायप्झीग आणि बर्लिन येथें झालें बर्लिनच्या विश्वविद्यालयांतून पदवी घेतांना त्यानें विष्कंभवनावर एक उत्तम निबंध लिहिला त्यानें झुरिक, वुर्झबर्ग, स्ट्रासबर्ग आणि बर्लिन इतक्या स्थळीं पदार्थविज्ञानशास्त्राच्या प्रोफेसरचें काम केलें मे १८९४ मध्यें त्याचा मृत्यु झाला कल्पकशास्त्रज्ञ या नात्यानें त्यानें शास्त्रीय क्षेत्रांत पुष्कळ काम केलें आहे. विशेषतः ध्वनिशास्त्र आणि प्रकाशशास्त्र या दोन शास्त्रांत त्यानें पुष्कळच परिश्रम घेतले आहेत. एखाद्या नलिकेंत ध्वनीची प्रकंपनें उत्पन्न झालीं असतां त्या नळींत अगोदर पसरून ठेवलेल्या सूक्ष्म भुकणीवर त्या प्रकंपनाचा परिणाम होऊन कांहीं विशिष्ट अंतरावर त्या भुकणीच्या रेषा पडतात, व त्यायोगानें कंपनक्षेत्रांतर (लहृन्यन्तर) मापतां येतें; व याचाच उपयोग करून भिन्न वायूंतील ध्वनीची गति मापतां येते. कुन्डट यानें प्रकाशशास्त्रांत विकिरण ( डिस्पर्शन )संबंधानें बरीचशी नवीन माहिती उपलब्ध केलेली आहे. चुंबकप्रकाशशास्त्रासंबंधानें त्यानें पुष्कळ परिश्रम घेतले आहेत, व फाराडे याला जें चुंबकराकृत द्रवीभूत लहृन्यन्तर प्रकाशपरिवर्तन शोधून काढतां आलें नाहीं तें त्यानें शोधून काढलें. किंत्येक वायू आणि बाष्प यांच्यांत बलवत्तर चुंबकक्षेत्र त्यानें शोधिलें घनीभूत प्रकाशाचें परिवर्तन होतें असें त्यानें अनेक प्रयोग करून दाखवून दिलें.

**कुन्नमकुलम्**—मद्रास इलाख्यांत कोचीन संस्थानांतील तलपिल्ली तालुक्यांतील एक गांव. १९११ सालीं याची लो. सं. ८३३६ असून त्यांत ५०६१ ख्रिस्ती आहेत कोचीन ... ख्रिस्ती मिशनऱ्यांचें हें एक प्रमुख ठिकाण.

मजिस्ट्रेटची कचेरी, एक दुय्यम शाळा, ख्रिश्चियन ( वरिष्ठ ) हायस्कूल इत्यादि संस्था याठिकाणीं असून सुपाऱ्याचा व्यापार थोड्या प्रमाणात चालतो

**कुन्नूर ता लु का** —मद्रास इलाख्यात नीलगिरी जिल्हा मधील एक पूर्वेकडील ताउका त्यात जुन्या परगणा नाद व मेकानाद भागाचा समावेश होतो याचें क्षेत्रफळ २४१ चौ मै व लोकसंख्या ( १९२१ ) ५८, ४१ कुन्नूर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे वेलिंग्टन येथें छावणी आहे ह्या तालुक्यात १९ खेडीं आहेत कुन्नूरच्या नैऋत्येस ६ मैलांवर रमणीय कार्टेरीचा धबधबा आहे व जवळच अरवण घाट येथें विजेचा कारखाना आहे ईशान्ये कडील पावसाचे वारे ज्यावेळीं वहातात त्यावेळीं ह्या तालुक्यात खूप पाऊस पडतो कुन्नूर व कोटगिरी येथें काफीची लागवड करितात त्याचप्रमाणें पूर्वेस व कोटगिरी येथें चहाचे मळे आहेत बार्लियार येथें सरकारी बगीचा आहे

**गा व** —मद्रास इलाख्यात नीलगिरी जिल्ह्यामधील ह कुन्नूर तालुक्याचें मुख्य ठाण व हवा खाण्याचें ठिकाण असून निलगिरीच्या डोंगराच्या सपाटीच्या आग्नेयीस आहे हें मद्रासपासून रेल्वेनें ३४५ मैल दूर आहे लोकसंख्या ( १९२१ ) १२५१५ उटकमंडच्या खालोखाल थंड हवेचें ठिकाण कुन्नूर हेंच आहे मकताल्याच्या खोऱ्यात हें गाव वसलेलें असून भोंवताली टेंकाडें व जंगली प्रदेश आहे हवा थंड व मनाला आल्हाद देणारी अशी आहे पाऊस सरासरी ५५ इंच पडतो उष्णमान ६०°—७०° अंश असतें लेडी कॅनिंग सीट, लॅम्स रॉक, पाश्चूर इन्स्टिट्यूट व सिम्स पार्क हीं येथील पाहाण्यासारखीं स्थळें आहेत सेंट जोसेफ कॉलेज, स्टेनीज यूरोपियन हायस्कूल सेंट जोसेफ कान्व्हेंट व हेवार्न गर्ल्स स्कूल या शिक्षणसंस्था आहेत येथें म्युनिसिपालिटी आहे चहा कॉफी, भाजी, बटाटे व फळें हीं येथील पिकें व उद्योगधंद्याचें जिन्नस होत जंगली लोकांस काम देण्यास ठीं म्हणून जाम व लोणचीं करण्याचा सरकारी कारखाना अलीकडे येथें निघाला आहे

**कुन्हळ**—उत्तर ब्रम्हदेशात श्वेबो ( स्वेबा ) जिल्ह्यातील वायव्येकडील तहशील ही मू नदीपासून चिंदविन जिल्ह्यापर्यंत पसरलेली आहे इचें क्षेत्रफळ ९८८ चौ मै आहे लो स (१९११) ९३७८२ खेडीं ३९ तहशिलीचं ठाणें कुन्हल १९०३—०४ सालीं लागवडीचें क्षेत्रफळ ९८ चौ मैल व धाऱ्याचे उत्पन्न २९,००० रु होतें

**कुमुम ता लु का** —मद्रास इलाख्यातील कर्नूल जिल्ह्याचा अगदीं पूर्वेकडचा तालुका क्षेत्रफळ १०६० चौ मै लो स ( १९२१ ) ११९६२१ तालुक्यामध्यें कुम्मुम नावाचें एकच गाव असून १०१ खेडीं आहेत तालुक्याचा बहुतेक भाग डोंगराळ आहे डोंगराच्या खोऱ्यातुन गुंडलकम्मा, जम्पलेरु आणि सगिलेरु ह्या नद्या वहातात व त्या पेनर नदास जाऊन मिळतात येथील व मुख्यत्वेंकरून पुललचेरुवू भागांतील सृष्टीसौंदर्य फारच मनोवेधक आहे दोन्ही बाजूस डोंगर असलेल्या नद्यांस बांध घालून पाणी अड विण्याची व अशा रीतानें तलाव तयार करण्याची येथें फारच उत्तम सोय आहे, व गुंडलकम्मा नदीचें पाणी अडवून असें तळें तयार केलेंहि आहे जमीन बहुतेक लालसर रंगाची हवा रोगकारक असून मलेरिया ज्वराची साथ गावांत असते पाऊसपाणी २५ इंच अर्ध्यां अधिक तालुक्यांत राखून ठेवलेलें जंगल असून कुरणेंहि पुष्कळ आहेत रस्त्यापासून तालुका दूर असल्यामुळें दळणवळणाची सोय फारशी नाहीं तालुक्याच्या पश्चिम व उत्तर भागात तर पावसाळ्यात जाण्याची सोय नसते

**गा व** —मद्रास इलाख्यामध्यें असलेल्या कर्नूल जिल्ह्यातील कुम्मुम तालुक्याचें मुख्य गाव लो स (१९११) ६३८८ पूर्वी येथ मदतनीस कलेक्टर व तहशीलदार रहात असत व येथं छावणीहि होती. येथील हवामान फारच रोगकारक आहे येथें उत्तम पक्क्या रंगाच्या सतरंज्या तयार होतात गुंडलकम्मा नद्यास बांध घालून तयार केलेलें तळें महाप जमदग्नि यांनीं बाधलें अशी आख्यायिका आहे १५ व्या शतकांत कलिंगाच्या गजपतीनें त्यात सुधारणा केली असें सांगतात विजयानगरच्या राजकन्येनें ( नाव वरदराजम्मा ) त्याची पूर्णता केली असें सांगतात

**कुबेर**—दुष्ट प्राण्याचा अथवा पिशाचाचा पुढारी म्हणून वेदात कुबेराचा उल्लेख केलेला आहे हा ग्रीक प्लुटोप्रमाणें पृथ्वीवरील संपत्तीचा अधिपति असून वैश्रवण असं त्याचें पैतृकनाम आहे गुह्यक व यक्ष याचा अग्रणी आणि रुप त्याचा स्वामी या उभयअर्थी त्यास देव असें म्हणण्यात येतें विश्रवस व इडाविडा याचा पुत्र असूनहि यास कधीं कधीं पुलस्त्य ( विश्रवसचा पिता ) याचा पुत्र म्हणून संबोधिला जातो महाभारताप्रमाणें पाहिलें तर कुबेर हा पुलस्त्याचा मुलगा होय पण ब्रह्मस्तुति केल्यावरून तो ऋषि कुबेरावर रागावला व विश्रव्यास जन्म दिला या विश्रवसूचे पुत्र रावण वगैरे होत अलका, प्रभा, वसुधरा व वसुस्थली अशीं कुबेराच्या हिमाचलातील नगरींचीं नावें आहेत मेरु पर्वताच्या शृगापैकीं मंदर नावाच्या स्थलीं चैत्ररथ नावाची त्याची उद्यानवाटिका असून त्याठिकाणीं किन्नरगण त्याची मार्गप्रतीक्षा करीत असतात काहीं आधारावरून असेंहि दिसतें कीं, त्याचें निवासस्थान कैलास पर्वतावर विश्वकर्मा निर्मित राजमंदिरात असावें कुबेर हा रावणाचा सावत्र बंधु होता रामायण व महाभारतावरून असं दिसतें कीं, सिंहलद्वीपातील विश्वकर्मारचित लंका नगरी त्याच्या ताब्यात प्रथम होती व तथून त्यास पुढें रावणानें घालवून दिलें हजारों वर्षे उग्र तपश्चर्या केल्यावरून ब्रह्मदेवापासून आपण अमर व्हावं, जगाचा रक्षक व्हावें व आपण सर्व संपत्तीचा स्वामी व्हावें अशा तीन वराची त्यास प्राप्ति झाली तो

उत्तर दिशेचा अधिपति आहे. सोनें, रुपें, माणिक, मोती आणि पृथ्वीचें सर्व भांडार व नवनिधी याचाहि तो मालक आहे. ब्रह्मदेवानें त्याला पुष्पक विमान दिलें आहे. यक्षी कावेरी अथवा कौबेरी अशीं त्याच्या पत्नीचीं नावें असून ती मुर दैत्याची कन्या होय. मणिग्रीव, अथवा वर्णकवि आणि नलकुबेर अथवा मयुराज असे त्याचे दोन पुत्र असून मीनाक्षि नावाची कन्या आहे. कुबेराचा श्वेतवर्ण असून तो शरीरानें व्यंगी आहे. त्याला तीन पाय व आठ दात आहेत. कुबेर ( कुत्सितं वेरं यस्य सः अथवा कु+तु ) हा शब्द त्याच्या कुरूपतेलाच अनुलक्षून आहे. धनपति, इच्छावसु, यक्षराज, मयुराज, राक्षसेंद्र, रत्नगर्भ, राजराज व नरराज अशीं त्याचीं नावें आहेत. वैश्रवण, पौलस्त्य, ऐडविड अथवा ऐलविल असेंहि त्यास म्हणतात. शिवाचा विशेष मित्र म्हणून त्यास ईशसखि' असें अभिधान आहे. हॉप्किन्सनें ग्रीक कॅबीरॉस व भारतीय कुबेर यांची तुलना करण्याचा प्रयत्न केला आहे [ ए. ओ. एस. पु. ३३ ]

**कुब्ज विष्णुवर्धन**—हा बदामीच्या चालुक्यघराण्यातील पहिल्या कीर्तिवर्म्याचा पुत्र व या वंशातील अत्यंत पराक्रमी सम्राट जो दुसरा पुलकेशी त्याचा धाकटा भाऊ असून याला विषमसिद्धि व विट्ट अशीं दुसरीं नावें होतीं. कुब्ज या दोषण नावावरून हा कदाचित् कुबडा असावा ( कुब्ज याचा अर्थ ठेंगिया असाहि आहे, त्यावरून याचें मुख्य शस्त्र तें होतें कीं काय? ) पुलकेशीनें याला आपला युवराज केलें होतें ( ६१५ ) पुढें याला सातारा-पंढपूर या प्रांताचा सुभेदार नेमिलें ( ६१७ ). नंतर पुलकेशीचें साम्राज्य फार वाढल्यानें व बदामी येथून सर्व साम्राज्यावर देखरेख ठेवणें अशक्य झाल्यानें पुलकेशीनें याला युवराज या अधिकारावर असतानाच पूर्वेकडील ( कृष्णा व गोदा दुआबातील ) वेंगी प्रांतावर सुभेदार म्हणून पाठविलें. नंतर दोघा भावांत पूर्वी ठरल्याप्रमाणें म्हणा किंवा विष्णुवर्धनानें बंड केलें म्हणून म्हणा ( काय होतें तें नक्की समजत नाहीं ), इ. स. ६३२ च्या पूर्वी विष्णुवर्धनानें वेंगी येथें आपलें स्वातंत्र्य पुकारलें आणि बदामीचें आधिपत्य झुगारून देऊन तो स्वतंत्र राजा बनला. याचा काल सातव्या शतकाचा मध्यकाल होय. याच्या वंशजानीं पुढें केव्हांहि बदामीशीं आपला संबंध न ठेवितां स्वतंत्र राज्य चालविलें ही शाखा 'पूर्व चालुक्य शाखा' म्हणून इतिहासांत प्रसिद्ध आहे. हिनें ( बदामीच्या ) पश्चिम चालुक्यशाखेपासून अगदीं शेवटपर्यंत वेगळें राहून, पाच शतकें आपलें स्वातंत्र्य राखिलें [ इंडियन अँटिक्वारि. व्हॉ. १२, १९, २०, जर्नल बॉंबे ब्रँच रॉ. ए. सोसायटी. व्हॉ. २; बॉंबे प्रेसिडेन्सी ग्याझे. व्हॉ. १. पार्ट २ ].

**कुब्जा**—कंसाची दासी. ही तीन ठिकाणीं वाकडी होती कृष्ण आणि बलराम या दोघांस ज्या वेळेस मथुरेस धनुर्यागार्थ कंसानें आणविलें, त्या वेळेस कृष्णप्रसादानें ही सरळ झाली. ( भागवत. स्कंध १० अ. ४२ व ४८ ) कैकयीची दासी मंथरा हिलाहि कुब्जा म्हणत असत.

**कुंभ**—दिल्लीचा शेरशहा ( सुर घराण्यातील ) यानें रजपुतावर मोहीम केली ( १५४३-४५ ) त्यावेळीं मारवाडच्या मालदेवाशीं तो लढत असतां मालदेवाच्या पुढें त्याचा काहीं टिकाव लागेना. सर्व रजपूत राजे तेव्हां एकदिलानें लढत होते. त्यावेळीं शेरशहानें एक बनावट पत्र तयार करून त्या सर्व राजांत आपापसांत फूट पाडली, तेव्हां मालदेवास हें कपट न समजल्यानें तो युद्ध सोडून गेला, पण त्याचा सरदार कुंभ यानें हा कावा समजून रणांगण सोडलें नाहीं. त्यानें मालदेवाची पुष्कळ समजूत केली, पण त्याची खात्री होईना. अखेर एकट्यानेंच लढून रजपुतांचें नाव राखण्याचा कुंभानें निश्चय केला. शेरशहाजवळ ऐंशीं हजार तर कुंभाजवळ बारा हजार फौज होती. तरी त्यानें जिवावर उदार होऊन इतक्या निकरानें हल्ला केला कीं, शहाचा बहुतेक पराभव झाला. इतक्यांत त्याला नवीन मदत आल्यानें कुंभाचा पराभव झाला.परंतु शहाचें या लढाईंत अत्यंत नुकसान झालें. त्यानें स्वतःच म्हटलें आहे कीं 'मूठभर दाणे मिळविण्याच्या कामांत सर्व राज्य गमावण्याचा प्रसंग आला होता होता' [ तारीखे शेरशाही इ. डॉ. पु. ४; मु. रि. ]

**कुंभकर्ण**—पुलस्त्यपुत्र जो विश्रवा ऋषि त्यास केकसी नामक भार्येपासून झालेला पुत्र. हा रावणाचा कनिष्ठ भ्राता होता आपणास अपार ऐश्वर्य व बल प्राप्त व्हावें या उद्देशानें त्यानें उग्र तपश्चर्या आरंभली. दहा सहस्र वर्षे तप झाल्यानंतर ब्रह्मदेवानें प्रसन्न होऊन कुंभकर्णास वर मागण्याची आज्ञा केली. इंद्रपद मागण्याचें कुंभकर्णाच्या मनांत आलेलें समजून देवांनी कुंभकर्णाच्या जिव्हाग्रीं सरस्वतीची योजना करून वराचा उच्चार होतांना इंद्रपदाच्याऐवजी निद्रापद असा उच्चार करविला या वराप्रमाणें कुंभकर्ण सहा सहा महिने निद्रिस्त असे. म्हणून हल्लीं फार झोंपाळू माणसाला कुंभकर्णाची उपमा देतात. याचें शरीर फार प्रचंड व आहार अतिशय मोठा असे. निद्रेंतून जागा झाल्यावर त्यास अन्नाच्या राशीच्या राशी व मद्याचे असंख्य कुंभ भक्षावयास लागत असत, असें वर्णन आहे. रामचंद्रानें एकदा रावणाचा पराभव केला असतां रावण लंकेस परत आला. तेव्हां त्यास कुंभकर्णाचें स्मरण होऊन त्यास उठविण्याची त्यानें राक्षसांना आज्ञा केली महत्प्रयासानंतर तो जागा झाला व आपणास उठविण्याचें कारण विचारूं लागला. रावणास एक भयंकर संकट आलें आहे असें त्यास कळतांच तो त्वरेनें रावणाच्या सभेंत गेला. तेव्हां रावणानें त्याचा गौरव करून आलेलें संकट त्यास कथन केलें. तेव्हां कुंभकर्णानें 'मी राम-लक्ष्मणास तावडतोब ठार करतो. प्रतिज्ञा केली व तो युद्धाकरितां निघाला. वराच

त्यानें घनघोर युद्ध केलें व असंख्य वानरांचा फुव्वा उडविला. हें पाहताच वानर भयभीत होऊन पळूं लागले. परंतु रामचंद्रानें उत्तेजनपर भाषणानें त्यांना परत वळविलें व कुंभकर्ण आपल्यावर चाल करून येत आहे असें पाहून रामानें त्याचे भुज व मस्तक तोडलें [वा. रामायण, युद्धकांड, महाभारत वन. अ. २६८–८० ]

**कुंभकोणम्, तालुका.**—मद्रास इलाख्यातील तंजावर जिल्ह्यातील एक पोटविभाग व तालुका. याचें क्षेत्रफळ २११ चौरस मैल असून लोकसंख्या १९२१ सालीं २६९५५१ होती. तालुक्याचें मुख्य ठाणें कुंभकोणम आहे. खेड्यांची संख्या १०० आहे. तालुक्याचा बराच भाग कावेरी नदीमुळें सुपीक झाला असून लोक सुस्थितींत आहेत. या तालुक्यात तांदूळ, केळीं व सुपारी हीं मुख्य पिकें असून तांबें पितळेचीं भांडीं आणि रेशमी व सुती कापड तयार होतें.

**शहर.**—मद्रास इलाख्यात तंजावर जिल्ह्यामध्यें कुंभकोणम् तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें कावेरी नदीच्या कांठीं मद्रासपासून १९४ मैलावर साउथ इंडियन रेल्वेवर आहे. १९२१ सालीं याची लोकसंख्या ६०७०० होती. उत्तरोत्तर कुंभकोणम् आकारानें वाढत असून हल्लीं तें मद्रास इलाख्यात ६ वें शहर आहे. कुंभकोणम् हें दक्षिण हिंदुस्थानातील अगदीं जुन्या शहरांपैकीं एक आहे. सातव्या शतकात चोलाची राजधानी कुंभकोणम् येथें होती. हें ब्राह्मणीधर्माचें व संस्कृतीचें माहेरघर होतें. शंकराचार्यांनीं येथें एक मठ स्थापन करून हस्तलिखित संस्कृत ग्रंथांचा मोठा संग्रह येथें ठेवलेला आहे. नागेश्वर व सारंगपाणी यांचीं देवालयें प्राचीन असून प्रेक्षणीय आहेत. येथें दरवर्षी होणाऱ्या 'महामघम्' उत्सहाच्या वेळेस गंगेचें पाणी जमिनींतून महामघम् टाक्यात येतें असें म्हणतात.

शिवाचीं १२ व विष्णूचीं ४ अशीं १६ मोठीं देवळें कुंभकोणास आहेत. व्यवस्था पहाण्यास देवस्थान कमिटी आहे. येथें इंग्रजी शाळा, संस्कृत शाळा, वेदशाळा, औद्योगिक शाळा व कॉलेज या शिक्षणसंस्था आहेत. दोन नियतकालिकें निघतात.

तांबें, पितळ, शिसें यांचीं भांडीं, रेशमी व सुती कापड, त्याप्रमाणेंच साखर, नीळ व मातीचीं भांडीं वगैरे जिन्नस येथें तयार होतात. पैकीं धातुकाम जास्त प्रसिद्ध आहे.

**कुंभराणा**—हा मेवाडचा महाराणा होय. याच्या बापाचें नाव मोकलसिंह ( मुकुलसिंह ). त्याचा खून कुंभाच्या सावत्रभावांनीं ( लेकवळे ) केला. त्याचा सूड यानें प्रथम घेतला. आणि त्यानंतर (१४१९) हा गादीवर बसला. त्यावेळीं भावात भांडणें वगैरे काहीं झालीं नाहींत. याचा व मारवाडच्या राजाचा स्नेह होता यावेळीं मेवाडचा भाग्यसूर्य माध्यान्हीं तळपत होता. त्याचे बहुतेक सारे शत्रू नामोहरम झाले होते; अल्लाउद्दिनानें केलेल्या लुटारूपणास दीडशेंवर वर्षें होऊन गेलीं होतीं; चितुरानें पुन्हा आपलें वैभव धारण केलें होतें; तेथें जोहार केलेल्या कुळांत नवीन वीर पुन्हा उत्पन्न झाले होते. हमीरची चढाई, लाखाची कलाप्रियता व मुत्सद्दीपणा हे गुण अंगीं असल्यामुळें प्रत्येक कार्यांत यश मिळविणाऱ्या कुंभाचें शौर्यनिशाण सर्व राजपुतान्यात नाचूं लागलें. दिल्लीच्या मुसलमानी सत्तेचें जूं झुगारून ते स्वतंत्र झाले होते. त्यांपैकीं माळवा व गुजराथचे शहा हे त्यावेळीं प्रबळ झाले होते. त्या दोघांनीं एकजुटीनें कुंभावर ( १४४० ) स्वारी केली. तेव्हां माळव्यात उतरून कुंभानें एक लाख घोडदळ व पायदळ आणि चौदाशें गजदळासह त्यांचा पुरा पराभव केला व माळव्याच्या खिलजी शहास कैद करून चितोडास पाठविलें. परंतु पुढें शहा महिन्याचे काहीं एक खंडणी न घेतां मोठ्या औदार्यानें त्यानें त्याला सोडलें याबद्दल अबुलफझल यानें त्याची स्तुति गायली आहे. कुंभानेंच चितोडचा जयस्तंभ ( वरील प्रसंगानंतर अकरा वर्षांनीं ) बांधला. त्यास पुरा होण्यास दहा वर्षें लागलीं या स्तंभावर कुंभाच्या जयाबद्दलचे लेख कोरलेले आहेत. यानंतर दिल्लीच्या घोरी बादशहाविरुद्ध नागल्याच्या मुसलमानानें कुंभास मदत केली आणि दोघांनीं मिळून दिल्लीकरांचा झुंझनू येथें मोठा पराभव केला. मेवाडातील ८४ किल्ल्यांपैकीं एकट्या कुंभानें ३२ किल्ले बांधले आहेत. त्यांपैकीं चितोडच्या खालोखाल कुंभोमेर ( कोमल-कुमळमीर )चा किल्ला मजबूत आहे. कुंभानें मुसलमानांपासून नागोर काबीज केलें. अबूच्या शिखरावर त्यानें बांधलेल्या एका किल्ल्यांत कुंभाची एक तांब्याची मूर्ति असून तिची पूजा नेहमीं होत असते; इतकी त्याच्याबद्दल लोकांत भक्ति होती. मारवाड मेवाडच्या सरहद्दीवरहि यानें किल्ले बांधले. अबूवरील कुंभोशाम व सद्री घाटातील ऋषभदेव हीं दोन मंदिरेंहि त्यानें बांधलीं. हीं अत्यंत कुसरीचीं कामें असून यांतील दुसऱ्यास आठ लाख रु. खर्च आला. यांत जैनधर्मीय प्रसिद्ध पुरुषांच्या मूर्ती आहेत. कुंभ हा कवि होता. यानें गीतगोविंदावर एक टीका केली आहे. याची बायको मेर्त येथील राठोर घराण्यातील प्रख्यात मीराबाई होय. ती सुंदर, दयाळू, भक्तिमान व कृष्णभक्त होती. तिनें भक्तिरसपर पुष्कळ कविता केलेल्या आहेत कुंभानें झालवाडाच्या राजकन्येस राक्षसविधीनें पळवून नेऊन तिच्याशीं लग्न केलें. तेव्हां तिच्या पूर्वीच्या वाग्दत्त वरानें ( मंदोरचा राठोड ) त्याच्यावर स्वारी केली परंतु तींत त्याचा पराभव झाला. कुंभानें जवळजवळ ५० वर्षें राज्य केलें व प्रजेस सर्व तऱ्हेनें सुख दिलें. त्यानें आपले सारे शत्रू नामोहरम केले. देशांत किल्ले बांधून त्याला सुरक्षितपणा आणला व मंदिरें बांधून सुशोभितपणा आणला. अखेरीस आपल्या राज्यारोहणाचा पन्नासावा समारंभ करीत असतां त्याच्या उदयसिंह नावाच्या मुलानेंच खंजीर खुपसून त्याचा अंत केला ( १४६९ ). या उदयसिंहाला पुढें 'हत्यारा' असें ओंडनाव पडलें मीराबाईच्या भक्तियोगाच्या आड कुंभराणा येत असे एकदा त्यानें तिला विष दिलें (व तें तिच्या ठाकूरजीच्या अंगीं भिनलें) वगैरे दंतकथा

प्रचलित आहेत. परंतु त्या खऱ्या नसाव्यात. [ टॉड; मु. रि. ].

**कुंभळगड**—रजपुतान्यात उदेपूर संस्थानाच्या पश्चिम सीमेवरील एक किल्ला. हा उदेपूर शहरापासून ४० मैल दूर असून समुद्रसपाटीपासून ३५६८ फूट उंच आहे. मारवाड व अरवली पर्वताचा देखावा या किल्ल्यावरून फार मनोहर दिसतो. किल्ल्याच्या सभोंवती तट असून आत कित्येक घुमटाचीं घरें आहेत. पैकीं 'बादलमहाल' नावाची इमारत सर्वांत उंच आहे. इ. सन १४४३त राणा कुंभ यानें हा किल्ला बांधला व त्याचेंच नाव किल्ल्यास देण्यात आलें आहे. १५७६ साली अकबराचा सरदार शाबासखान यानें कुंभळगड किल्ला सर केला असें म्हणतात. मराठ्यांच्या धामधुमीच्या वेळीं कुंभळगडच्या सभोंवतीं गोसाव्यांनीं बंड केलें परंतु राजपुतान्यातील कॅप्टन टॉड नावाच्या रेसिडेंटनें तें मोडून हा किल्ला महाराण्याच्या स्वाधीन केला.

**कुंभा**—या झाडास लॅटिन कारिया अरबोरिया, संस्कृत कुंभी, कमुदिका; गुजराथी कायफळ अशीं नावें असून मराठींत या झाडाच्या सालीस कायफळ म्हणतात व झाडास कुंभा किंवा वायकुंभा म्हणतात.

हें एक मोठें व जलद वाढणारें झाड असून तें यमुनेच्या पूर्वेस बंगाल, ब्रह्मदेश, मध्यहिंदुस्थान, दक्षिण व पश्चिम हिंदुस्थान व सिलोनमधील दमट भागांतून आढळतें सुमारें ५००० फूट उंचीपर्यंतच्या प्रदेशात हें आढळतें. या झाडाचा विस्तार मोठा असून तोफांच्या बंदुकीचे दस्ते बनविण्यास याचें लाकूड फार उपयोगी पडतें त्याचीं पानें हिवाळ्यात तांबडीं होतात. या झाडापासून गोंद निघतो व सालींच्या तंतूपासून दोऱ्या व तरटें करतात. कातडीं कमाविण्यात व एक प्रकारचा रंग तयार करण्यात सालीचा उपयोग होतो स्तंभक औषध म्हणूनहि सालीचा उपयोग करितात.

या झाडाचीं फुलें बाळंतपणानंतर बायकांना शक्तिवर्धक म्हणून खावयास देतात. या फुलाचे वाळकोश बाजारात खोकल्यावर व सर्दीवर औषध म्हणून विकतात.

याचें लाकूड फार टिकाऊ व मजबूत असल्यामुळें इमारती करता व शेतीचीं आउतें करण्यात त्याचा उपयोग करितात. पाण्यात हें लाकूड कुजत नाहीं चाकाच्या आसाकरता तें फार उपयोगी पडतें. गंजम जिल्ह्यातील विशेष सौंवळे लोक याच्या सालींचीं वस्त्रें नेसतात. रानटी डुकरांना या साली फार आवडतात व त्यांना पकडण्याकरता पारधी या सालींचा उपयोग करितात.

औ ष धी उ प यो ग.—खोकल्यावर कुंभ्याच्या सालीचा रस व मध एकत्र करून ७ दिवस देतात. व्रणाच्या शुद्धीकरता कुंभ्याच्या सालीचा काढा करून त्यात तो व्रण धुतात. दंतरोगांवर कुंभ्याच्या सालीचा काढा करून त्याच्या गुळण्या केल्या म्हणजे दंतशूल दूर होऊन दांत मजबूत होतात असें म्हणतात. [ वॅट; वनौषधिगुणा. ].

**कुंभार**—मातीचीं भांडीं घडविणारी ही धंदेवाईक जात हिंदुस्थानांतील सर्व प्रांतातून व संस्थानातून आढळते. इ. स. १९११ च्या खानेसुमारीत याची एकंदर संख्या ३४,२४,८३१ भरली. सर्वांत जास्त संयुक्तप्रांतात (७,२६,३६१), त्याखालीं पंजाबात, त्याच्या खालोखाल बिहार—ओरिसामध्यें, त्याहून कमी रजपुतान्यात (३,०३,२३४) अशी ती उतरत गेलेली संख्या दृष्टीस पडते. कुंभारात सर्व धर्मांचे लोक सापडतात. सुमारें ३० लाख हिंदू व ४ लाख मुसलमान कुंभार आहेत व २५००० पर्यंत शीख असून जैन सारे दहा वीस सापडतील

संस्कृत कुंभकार शब्दावरून कुंभार, कोंहार व कोनहार असे शब्द बनले आहेत. मातीचीं भांडीं करणाऱ्या या जातीच्या कुळासंबंधीं अनेक दंतकथा प्रचलित आहेत. ब्रह्मवैवर्तपुराणात त्याची उत्पत्ति वैश्य स्त्री व ब्राह्मणपिता यापासून झाली आहे असें लिहिलें आहे. पराशरसंहितेवरून मालकार ( माळी ) पुरुष व चमार ( चांभार ) स्त्री यांकडे त्यांचें जनकत्व जातें कुंभाराची उत्पत्ति, तेली स्त्री व पट्टिकार (विणकर) याच्यापासून झालेली आहे असें पराशरपद्धति सांगते मॉनियर विल्यम्सच्या संस्कृत कोशावरून पाहता ब्राह्मण व क्षत्रिय स्त्री हेच या जातीचे उत्पादक मानलेले दिसतात प्रचलित असलेल्या अनेक दंतकथा सोडून दिल्या तरी ऋग्वेदात मातीच्या भांड्याचा उल्लेख आहे त्यावरून कुंभाराचा धंदा अत्यंत प्राचीन काळीहि होता एवढी गोष्ट सिद्ध आहे महाराष्ट्रातील कुंभार अनेक प्राचीन राष्ट्रांतून आले आणि त्यांचें पूर्वीचें राष्ट्रीय पृथक्त्व हल्लीं भिन्नपोटजाती या स्वरूपात आहे. यांची मुंबई इलाख्यातील लोकसंख्या सुमारें २ लाख ४० हजार आहे. यांच्यात पुढील २३ कुळ्या आहेत अहीर किंवा लहानचाके, बळदे, भांड, चाणभेस, गवते, गुजर, गोरेमराटे, हातघडे, किंवा भोंडे किंवा भोंवकर, हातोंडे, कडु, कन्नड, कर्नाटक अथवा पंचम किंवा लिंगायत, खंभाटी, कोंकणी, लाड किंवा थोरचाके, लाडभुजे, माळवी, मराठा किंवा घाटी, परदेशी, रजपूत, सोरटिआ, वरिआ आणि वाटलिआ. हे मराठा, कोंकणी, गुजराथी, व परदेशी या चार प्रकारात समावतात. २३ कुळात आपापसात रोटीबेटीव्यवहार मुळींच होत नाहीं काहींचीं नावें कोंकणी, खंबाटी इत्यादि प्रांतावरून पडली आहेत. परदेशी, रजपूत व माळवी हे त्या त्या प्रांतातून इकडे आले आहेत. लहान चाकावर काम करणारे म्हणून अहीर कुंभारांना ( अहीर हे मोठ्या अहीर जातींतील होत ) लहानचाके म्हणतात. हातानें जे काम करितात ( चाकानें नव्हे ) ते हातघडे होत. दक्षिण गुजराथचे ( लाट देशचे ) ते लाड. हे थोर ( मोठ्या ) चाकावर काम करतात. पंचम हे गळ्यात लिंग बाळगतात व लिंगायतपंथी आहेत, हे बहुधा कर्नाटकी असतात वाटलिआ हे ब्राह्मण बाप व कुंभार आई या जोडप्यापासून उत्पन्न झाले असें म्हणतात. कडिया म्हणजे गवंडीकाम करणारे. मराठा कुंभार हे बहुतेक साऱ्या

दख्खनमध्यें पसरलेले आहेत कोंकणी हे कोंकण व कानडा, लिंगायत हे सोलापूर, धारवाड व बेळगाव येथें. खानदेशात अहीर व लाड, कानड्यात कानडे व परदेशी हे पुणें, नाशिक, सोलपुर आणि बेळगाव येथें, भाडु हे कोल्हापूर—पन्हाळा व वाकींचे गुजर, कडिया वगैरे जाती गुजराथ व कोंकणात आढळतात याचा मुख्य धंदा म्हणजे कौलें, विटा, मडकीं व प्राण्यांचीं चित्रें वगैरे करणें हा होय. कानडा जिल्ह्यात मातीच्या देवाच्या मूर्ती हे लोक करितात पुण्याकडे हे लहान मुलांचीं मातीचीं खेळणी बनवितात अहमदाबाद—पाटण येथील मडकीं, लाखलोटे फार सुरेख, चकचकीत, नक्षीदार व निरनिराळ्या नमुन्याचे असतात कुंभार हा एक बारा बलुत्यांपैकीं असून तो ग्रामसंस्थेस मडकीं वगैरे पुरवितो व ह्याबद्दल त्याला इनाम जमीन असते, अगर कापणीच्या वेळीं धान्य मिळतें हल्लीं याचे उपाध्याय ब्राह्मण आहेत पूर्वी कोंकणी व कानडी कुंभार उपाध्याय होते व अद्यापिहि काहीं ठिकाणीं आहेत काहीं स्थानिक देवतांचे हे पूजारी आहेत अस्पृश्यांशिवाय बाकीच्या सर्व्या शूद्रांचें अंत्येष्टिकर्म कानडी कुंभार करितात, त्यास कुंभारक्रिया म्हणतात

हिंदुस्थानात पुढीलप्रमाणें निरनिराळ्या प्रांतातून कुंभार आढळतात.—

पं जा ब —येथील कुंभार हिंदु, शीख व मुसुलमान आहेत ते पंजाबात सर्वत्र आढळतात व विटा तयार करणें वगैरे कुंभाराचीं कामें करितात पश्चिम व मध्य-पंजाबात ज्या ठिकाणीं जमिनीला पाणी मुबलक आहे त्या ठिकाणीं रहाटाकरिता हे मातीचीं भांडीं पुरवितात व म्हणून तेथें शेतकी कामाकरिता याची फार जरूरी आहे

सं यु क्त प्रां त —येथें त्याच्या अनेक पोटजातींपैकीं बर्दिया व बर्टिया या मुख्य जाती आहेत चारवैस, गधेरे, गोला, कनौजिया, कासगर, महार व मथुरीय या पोटजाती प्रसिद्ध आहेत याशिवाय, सैरिह, सुरिह, अधारिह, ह्यतेलिया चौद्दानियमिश्र, परोडिय, पहारिय, दक्षिणाह, चमारिय इत्यादि पोटजाती आहेतच अशा तऱ्हेचे हिंदूंचे व मुसुलमानांचे पोटवर्ग सपाटून आढळून येतात

आपआपल्या वर्गातच लग्नें करण्याची त्याची चाल असून ते एकपत्नीव्रतावर जोर देतात काहीं अटीवर विधवा-विवाहास मोकळीक असून दोळा, सगाई वगैरे लग्नविधी पाळण्यात येतात पाचोनपीर, भवानी व हर्दिया वगैरे त्याच्या देवता असून त्यास निरनिराळ्या महिन्यात प्रसाद पुष्पं अर्पण करण्यात येऊन अजापुत्राचें बलीहि देण्यात येतात लग्नकार्यांत व मुहूर्त पाहाण्यास ब्राह्मणाना बोलावण्यात येत पितृपक्ष व पिंडदान वगैरे त्याच्यात करण्याची चाल आहे. चक्र हें श्रीकृष्णाचें व प्रजापतीचें निदर्शक असून उत्पत्तीच तें एक चिन्हच होय असें श्रद्धेनें मानण्यात येतें. कोपाभगत् नावाच्या साधूला ते मान देतात व सीतळा, ·· वगैरे देवतांना भजतात.

खेड्गावातील कुंभार मडकीं देऊन धान्य वगैरे मोबदला घेतात गाढवें पाळून ते सामानाची नेआण करितात. त्याचा सामाजिक दर्जा चांभाराच्या वरचा व लोहाराच्या खालचा असा असतो पावसाळ्यात काम नसल्यामुळें ते शेती वगैरे इतर किरकोळ धंदेहि करतात काहीं कुंभार भट्टी करण्यात मोठे कसबी असतात बकऱ्याचें मास व मासे हे लोक खातात कुंभार हे मोठे उद्योगी व शांतताप्रिय असल्यानें कोर्टाची पायरी ते क्वचितच चढतात.

आ सा म —येथें याजातींची लो सं (१९११) १७,९१३ आहे या लोकाचा धंदा बहुधा कुंभारकामाचा असून बंगाल-मधील या जातीचे लोक नवशा लोकांपैकीं आहेत सिल्हट व कामरूप येथें ह्याची वस्ती दाट असून तेथील त्याचा लोकसंख्या अनुक्रमें १८,१४६ व ७४४१ होती ब्रह्मपुत्रा खिंडीत मातीचीं भांडीं करणाऱ्या कलिता जातीच्या लोकानाच कुम्हार म्हणत असावेत असें गेट साहेबाचें मत आहे.

म ध्य प्रां त —याच्यात निरनिराळ्या उपजातींचीं नावें स्थानावरून पडलीं आहेत याच्यातल काहीं जाती केवळ धंद्यावरूनच झाल्या आहेत जसें —कोणी केवळ हातानेंच मडकें करणाराचा हातघडिया जात पाढरी किंवा लाल मडकीं करणाराची गोरिया जात व चाकावर भांडीं करणाराची चके जात असे ते भेद झाले आहेत लुटकिया व रखोटिया हे गोत्र्क वर्ग आहेत मुलींचीं लग्नें लहानपणींच करतात चादा येथें ऋतु प्राप्त झाल्यावर लग्नें करतात लग्नें ब्राह्मणाकडूनच करवितात पण वेतलात वधूच्या आतेचा नवरा लग्न लावतो लग्न झाल्यावर वधूवराच्या हातात कणकीचे गोळे देतात व ते एकमेकाला हिसकण्यास सागतात . कुंभारात घटस्फोट व पुनर्विवाह होतात. कुमारिकेनें स्वजातीयाबरोबर व्यभिचार केला तर सवा रुपया दंड, ५ वेस तोडण्याची शिक्षा आणि जातास जेवण घालतात.

हे लोक गाढवें पाळतात म्हणून नीच समजले जातात पण बंगाल्यात याची इतकी नीच स्थिति नाहीं सागर जिल्ह्यात लग्नाच्या वेळीं वधू कुंभाराकडे जाते व कुंभारीण तिला चाकावर बसवून सात वेळ फिरविते आणि सात नवीं भांडीं देते या भांड्याचा विवाहात उपयोग करतात उत्तर सरकाराच्या वेळीं कुंभारानें १३ मडकीं स्मशानात आणलीं पाहिजेत याच्यापैकीं काहीं जाती डुक्कर पाळतात व त्यामुळें ते फार अपवित्र समजले जातात

म रा ठा कु भा र —हे दिसण्यात मराठा कुणब्याप्रमाणें असून तसाच पोषाख करितात, याची भाषा मराठी बेकायदे-शीर संततीला ते कडू असे म्हणतात याच्यात बरेचसे कडू आहेत याच्यात पुढील आडनावें आहेत अटाव, भालेराव, बुद्धिवान, चौगुले, दळवे, देशमूख, देवन्नासे, दिवटे, गाढवे, गाईकवाड, जाधव, जगदळे, जोंधळे, जोरवेकर, काळे, कापडे, लोणकर, मानमोडे, म्हेत्रे, पवार, रोकडे, सासवडकर,

शिरसाट, शिंदे, सोनवण, वाघचौरे, वाघुळे, वाघमारे इ यांची देवकें प्रातवारीनें पुढीलप्रमाणें आहेत —

पुणें जिल्हा —मर्यादवेल, कुभारांचें थापटणें किंवा फळ, कुदळ सातारा जिल्हा -आंबा, आंबूळ, वट सोलापूर जिल्हा -थापटणें, पांचपालवी नगर, खानदेश व नाशिक हे जिल्हे -पांचपालवी पांचपालवी पूर्वी यांचें एकच देवक असे परंतु ही जात अशी सुधारत गेली व एकच आडनांवाची सोयरीक जसजशी बंद होत गेली तसतशी ही पांचपालवीची रीत पडली अहीर कुंभारांत प्रत्येक कुटुंबाचें देवक स्वतंत्र असतें उदा॰ हिरकराव हिरांचें झाड, मोन्याचें मोराचें पीस व न घाचें अननाचें झाड होय एकाच देवकनावांत सोयरीक होऊं शकते परंतु एकाच आडनांवान्यांत होत नाहीं मुलांचें लग्न ५ ते २० व मुलींचें ५ ते १२ वर्षांच्या आंत करितात पाटाची चाल आहे विधवेला आतेभाऊ, मावसभाऊ व मामेभावाशीं पाट लावितां येत नाहीं प्रथमवराला विधवेशीं पाट लावावयाचा असेल तर प्रथम रुईशीं लग्न लावावें लागतें यांचीं कुलदैवतें,शिंगणापुरचा महादेव, सातारा जिल्ह्यांतील जगदंबा, सोनारीचा भैरोबा, तुळजापुरची देवी व जेजुरीचा खंडोबा हीं आहेत सोलापूर जिल्ह्यांतील कुंभार आपलें प्रेत लिंगायत पद्धतीच्या धर्तीवर पुरतात यांचे बाकीचे (जन्म-लग्न-और्ध्वदेहिकादि) संस्कार मराठा कुणब्याप्रमाणेच असतात हे मद्यमांसभक्षक असून कोष्टी, धनगर, न्हावी, कोळी, मराठे व कुणबी यांच्या हातचें खातात व हे वरील लोकहि या मराठा कुंभारांच्या हातचें जेवतात असें म्हणतात

कों क णी कु भा र —हे आपणास मूळचे मराठे म्हणवितात यांच्यापैकीं पुष्कळजण पूर्वी ग्रामदेवतांचे पुजारी असत अशीं देवळें (हरी हि) कारवार जिल्ह्यांतील अस नोटी गांवचें रामनाथाचें व दुसरें कद्रिनबिर गांवातील हीं होत ठाणे जिल्ह्यांत खालच्या वर्गांत कुंभारांना देवदर्शनाचा व भेट करावयाचा मान आहे तसेंच एखादा कुणबी आपल्या नातलगांपासून दूरच्या गांवीं मेला असेल तर त्याची और्ध्वदेहिक क्रिया हा कुंभार करतो हा वैद्यकीचाहि धंदा करतो या लोकांची अंबा, उंबर, आंबूळ, (ठाणें जिल्हा), कळंब, कोंच, पाटल्याची माती, मोराची पिसें (रत्नागिरी जिल्हा) हीं देवकें आहेत यांच्यांत अधीकर, कल्याणकर व निगवेकर हीं आडनांवें आहेत रत्नागिरी जिल्ह्यांत एकच गांवीं राहणाऱ्या कुंभारांचा एक एक गट मानतात त्यांच्या परस्परांत सोयरीक होत नाहीं मामाच्या बहिणीशीं सरासरीवती होऊं शकतात ठाणें जिल्ह्यांत घटस्फोटाची चाल नाहीं, दुसरीकडे आहे मात्र घटस्फोट झालेल्या स्त्रियांस पहिल्या घरचा नवरा जिवंत असेपर्यंत पाट लावितां येत नाहीं अभिवादन गांविरहितच ही शिक्षा आहे नातीचा मुख्य अंतर त्या त्रा स्त्रवाघाशीशिवाय पाट लावितां येत नाहीं दरएक जागानें भावी नवऱ्याकडून सात रुपये कर वसूल करतात गांवाबाहेर आंब्याच्या झाडाखालीं रात्रीं पाट लागतो विधवा स्नान करून व पाटरें पातळ नेसून उपाध्यायाच्या मदतीनें गणपति व वरुण यांची पूजा करीते, नंतर एका पांढऱ्या कापडाच्या तुकड्यांत तिचा पाट लावितात नंतर ती तो तुकडा भावी नवऱ्यास देते व नवरा तो आपल्या पागोट्यामोंवती गुंडाळतो पुढें ती त्याच्या कपाळास कुंकू लावते व त्याला ओवाळते,नंतर उपाध्याय दोघांच्या पदरास गांठ देतो याप्रमाणें हा विधि येथे संपतो हा ठाण्याकडील विधि झाला रत्नागिरीकडे निराळी चाल आहे प्रथम भावी नवऱ्यानें पाठविलेली साडीचोळी नेसून व बांगड्या लेऊन विधवा तयार होते नंतर तिच्या मेलेल्या नवऱ्याच्या घरीं तिचा भावी नवरा १० ते २० रुपये पाठवितो व मग तिच्या मेलेल्या नवऱ्याची भूतबाधा तिला होऊं नये म्हणून तिच्या तोंडावरून एक कोंबडा ओंवाळतो, व मग तीं दोघे शेजारीं बसतात नंतर दुसरी एक विधवा त्या विधवा नवरीच्या कपाळीं व नवरदेवाच्या गुडघ्याला कुंकू लाविते म्हणजे हा विधी संपतो यांच्या सुतकानंतरच्या ११ व १२ व्या दिवशींच्या क्रियामध्यें ठाणें व रत्नागिरी जिल्ह्यांतील रीतींत फरक आहे या क्रियेला डाकक्रिया म्हणतात डाक म्हणजे एक ढोलासारखें वाद्य ठाण्याकडे पुढील रीत आहे —एका पुढील एक फुलाचा हार टांगतात, त्याच्या खालीं पाण्यानें भरलेली व तोंडावर नारळ ठेवलेली एक तांब्याची घागर ठेवतात तिच्या शेजारीं कापसाच्या झाडाच्या काड्या (पळसकाठ्या) ची एक लहान तिरडी करून तीवर मेलेल्या माणसाची एक कणिकेची प्रतिमा ठेवतात नंतर दुसरा एक कुंभार जवळ बसून तें डाकवाद्य वाजवून गणपति व इतर साधुसंतांचें भजन करतो नंतर तिरडी नेऊन नदींत बुडवितात रत्नागिरी जिल्ह्यांत पुढील रीत आढळते — तिकडे हा विधि बाराव्या रात्रीं होतो ज्याच्या घरीं मर्तिक झालें असेल त्याच्या घरीं सहा सात कुंभार जमतात माजघरात गाईच्या शेणानें जागा सारवून, तेथें एक केळीचें पान मांडतात त्यावर तांदूळ पसरून वर पाण्याची घागर ठेवतात तिच्या तोंडात आंब्याचीं पानें व त्यावर नारळ ठेऊन त्यावर फुलाची माळ ठेवती वाघरतात घागरीशेजारीं तेरा विड्यांचीं पानें व १२ सुपाऱ्या मांडतात शेजारीं दुसरें एक केळीचें पान मांडून त्यावर पडु, गणपति, नारायणस्वामी (दोन प्रतिमा), हरिण, वैतरणा (गाय), मोर, गरुड, फूल, चंद्रसूर्य, नाग, इत्यादि कणिकेचे केलेले लहान पुतळे ठेवितात या प्रतिमेच्या चारी दिशांना कणकीचे चार दिवे लावितात नंतर जमलेल्यांपैकीं एक कुंभार त्या घागरीची व प्रतिमांची पूजा करतो काहीं मत म्हणतो त्याला पडुक्रिया असें म्हणतात हे आटोपल्यावर मेलेल्याचा मुलगा किंवा क्रिया करणारा हा तेथें जवळच ठेवलेल्या मेलेल्या माणसाच्या कणिकेच्या प्रतिमेच्या तोंडात पाणी सोडतो व ती प्रतिमा वैतरणा

पुतळ्याच्या शेपटीकडे सरविकतो. त्यावेळी तो तोंडानें वैतरण नावाचें गाणें म्हणतो व दुसरीकडे ढाक वाद्य वाजविलें जातें. ही वैतरणा ( गाय ) त्या मेलेल्या माणसाला स्वर्गांत नेते असा याचा अर्थ आहे. यानंतर त्या सर्व प्रतिमा नदींत किंवा समुद्रांत विसर्जन करतात. कोंकणी कुंभाराचे उपाध्याय ब्राह्मण असतात कुणबी, न्हावी, आगरी, ठाकूर व कोळी वगैरे लोकें यांच्या हातचें खातात.

क ना ड कुं भा र.—हे कानडा जिल्ह्यात मुख्यतः आहेत यांची राहणी व आचारविचार बहुतेक कोंकणी कुंभाराप्रमाणे आहेत. अम्मा(माता)व जटग किंवा जत्तिग(एक मल्ल)यांची हे फार करून पूजा करतात. यांच्या कुलदेवता कुमठे येथील दुर्गा व हळदीपूरची देवी या होत. यांचे उपाध्याय हविक ब्राह्मण असतात. हे मद्य पीत नाहींत; मांसाशन मात्र करतात.

गु ज रा थी कुं भा र.—यांना घडघडे, ओझा किंवा प्रजापति असेंहि म्हणतात. हे आपल्याला दक्षप्रजापतीचे वंशज म्हणवितात. काहींजण स्वतःस क्षत्रिय समजतात. हे तिकडील कणब्यासारखे दिसतात. यांच्यात यादव, चुडासमा, चोहान, भट्टी, राठोड वगैरे रजपुतांसारख्या कुळ्या आहेत, यांच्यापैकी सोरठिया कुळींत धाकट्या दिराशीं पाट लावितात. यांच्यात नवरदेव लग्नाच्या वेळी कट्यार किंवा संजीर हातांत घेतो. हे बहुतेक सारे वैष्णवपंथी आहेत. यांच्यापैकीं काहीं कुळींत अकालीं मेलेल्या माणसाची पिंपळाच्या लाकडाची प्रतिमा करून घरात एका कोनाड्यात ठेवितात. त्याला सुरधन म्हणतात सोरठिया यांच्यात लाकडाऐवजी एक खंबी नावाचा दगड ठेवितात.

प र दे शी कुं भा र.—यांना गवंडी असें दुसरें नाव आहे. यांच्यापैकी पुष्कळजण गवंडी काम करितात. हे पुणें, सातारा व नगर जिल्ह्यांत बरेच आहेत. हे उत्तरेकडून २० वर्षांपूर्वी इकडे आले. हे घरात हिंदी भाषा बोलतात व उपाध्याय उत्तर हिंदुस्थानी ब्राह्मण नेमतात. यांच्यात बलदेगरे वगैरे चार पोटभेद असून बसनीवाल, बलवाल, जलिंदे करोळे पिपुडे इ. ११ आडनांवें आहेत प्रत्येक कुळाची निरनिराळी कुलदेवता असून तिला धीरदी असें म्हणतात. हीच धीरदी त्यांचें देवकहि असते. उंदरानें मारलेला मातीचा नाग, बेलफळ, नारळ, सुपारी, वगैरे या धीरदी होत. या देवात ठेऊन त्यांची पूजा करितात. दरवर्षी दसऱ्यास व लग्नकार्यांत या बदलतात. मुलींचें लग्न १६ वर्षांच्या आत करितात कुमारीनें जातींतील माणसाशीं जारकर्म केल्यास दंड किंवा जातीस जेवण दिलें व त्या व्यभिचारी माणसानें त्या कुमारीशीच लग्न लाविलें कीं, तिची शुद्धि होते. बहुपत्नीत्वाची चाल यांच्यात आहे. लग्नापूर्वी गांवांतील, ५सवाष्णी गावाबाहेर जाऊन चक्रिस्थाची पूजा करून त्यांतील माती आणतात व मग लग्नमंडप घालतात आणि त्यात ती मॅाती मंडपात ... ात. मांडवाच्या मुहूर्तमेढीस गुरु असें म्हणतात. मांडवाला लाकडी पाच चिमण्या बांधतात. यांचीं लग्नें रात्रींच होतात. वर हा वधूच्या मांडवात गेल्यावर व सासूनें त्याला ओंवाळल्यावर, तो त्या लाकडी चिमण्यांना काठीनें मारतो. मग होम करतात आणि त्याभोंवतीं वधूवर प्रदक्षिणा घालतात म्हणजे लग्न आटोपलें. यांच्यात घटस्फोटाची चाल नाहीं [एन्थॉवेन—ट्राइब्ज अँड कास्टस ऑफ बाँबे व्हा. २ ] महाराष्ट्रांतील परदेशी कुंभार आपणास कुमावत क्षत्रिय म्हणवितात. रजपूत चव्हाण शाखेपैकीं राजकुमार नावाची जी शाखा तीच पुढें कुंभार या अपभ्रष्ट नावानें ओळखण्यात येऊं लागली असें सांगतात. किंवा मेवाडच्या कुंभ राण्याचे वंशज त कुंभोज कुंभोजपासून कुंभावत व नंतर कुमावत अशी कुमावत जाति नामाची व्युत्पत्ति लावण्यात येते आपण अस्सल रजपूत असल्या विषयीं कुमावत सिद्ध करूं पाहतात ( रा. नाइक यांचें ' आमची जात ' हें पुस्तक पहा. पा. ५२५६ ) कुंभापासून वंशवृद्धि होऊन आज माणसें किती होतील याचाहि हिशोब असली कल्पना मांडताना केला नाहीं. कुमावतांतील काहीं आडनांवें व रजपूत कुलनामें सारखी आहेत. लग्नातल्या काहीं चालीहि रजपुती दिसतात. या ज्ञातींतील कै. जॅा. बी. नाईक यांनीं आपल्या ज्ञातिसंबंधानें पुढील माहिती थोडक्यात दिली आहे. जातीची मुख्य वस्ती मेवाड व रजपुताना. मुख्य ठिकाण जयपूर व त्याच्या आसपास. या ठिकाणीं सुमारें ३५००० वस्ती आहे. जातींत ठिकठिकाणीं स्थानिक पंचायती आहेत. सर्वसामान्य अशी मुख्य पंचायत नाहीं. पंचायतीचा अध्यक्ष साधारणतः वंशपरंपरेनें असतो परंतु अलीकडे कोठें कोठें निवडणुकीची प्रवृत्ति दिसत आहे. मेवाड, राजपुताना व डेक्कन वगैरे ठिकाणीं मिळून जातींतील गृहस्थांनीं सुमारें ५० देवळें बांधिलीं आहेत त्यास खर्च अजमासें रु १,५०,००० वर जहाला असावा. वरील देवालयाचीं मालकी सार्वजनिक आहे. काहीं ठिकाणी जातीच्या ताब्यात काहीं काहीं घरें आहेत पण उत्पन्न म्हणण्यासारखें नाहीं. जातीचा कर लग्नावर ठरविलेला आहे व तो लग्नप्रसंगीं वसूल केला जातो. पंचायतीचे निवाडे लिहून ठेवण्याची वहिवाट नाहीं. पंचायतीचे निकाल अंमलात आणण्यासाठीं वाळीत टाकणें हेंच शासन आहे. पंचायतींतील नित्य प्रश्न म्हटले म्हणजे खाण्यापिण्यासंबंधानें, रूढिबाह्य आचरण अगर एखाद्यानें दुसऱ्याचें आमंत्रण बंद करणें, हे होत महत्वाच्या नैमित्तिक प्रश्नाचा दाखला नाहीं स्वजातीशिवाय अन्य वर्गाशीं अन्नोदक व्यवहाराची वहिवाट नाहीं. या जातींत पोटजाती नाहींत. जातींतील विवाहादि संस्कार राजपुतान्याकडील गौड ब्राह्मण चालवितात. परंतु त्याच्या अभावीं स्थानिक ब्राह्मणाकडून ही ते चालविले जातात. साधारणतः सामाजिक प्रश्न पूर्व रूढीनुरूप जातच सोडविते व धर्मसंबंधीं प्रश्न ब्राह्मणाचा सल्ला घेण्यात येतो. या जातींत मोठमोठे बांधकाम करणारे कान्ट्राक्टर झाले आहेत.

म द्रा स इ ला खा.—याना तेलगूंत कुमार, उरियात कुंवारो व कानडींत कुंवार म्हणतात. यांचें समाजात स्थान उच्च शूद्र म्हणून आहे. तेलगू कुम्मर प्राचीन राजाजवळ स्वयंपाकी म्हणून असत अद्यापहि शूद्राच्या घरातून पुष्कळसे कुम्मर स्वयंपाकी आहेत. कुम्मरानाच कुमपन म्हणतात. उरिया कुंवारो शुद्ध वैष्णव आहेत. याच्यातच फक्त विधवाविवाह निषिद्ध नाहीं. कुंवारात कानडी व तेलगू असे दोन भेद आहेत. तेलगू कुंवार हे आपणाला शालिवाहनचे वंशज समजतात व गळ्यात जानवें घालतात. हे मास खात नाहींत. याच्यात शैव व वैष्णव असे दोन्ही पथ आहेत. लिंगायत कुंवाराचे उपाध्याय जंगम असतात. म्हैसुरी कुंवारात नीलघर (रंगारी जात) ही पोटजात येते. दक्षिण कानडातील कुंवारात पुष्कळसे तुळुभाषा बोलतात वारसा अळियसंतान ( मातृकन्यापरंपरा ) पद्धतीन जातो. तामिळी कुंभाराप्रमाणें हे लोक जानवें घालीत नाहींत. [क्रूक, रसेल व हिरालाल थर्स्टन. एन्थोवेन, सेन्सस रिपोर्ट, जी. वी. नाईक—आमची जात, कुमावत—क्षत्रिय-मित्र मासिक, वगैरे ]

कुंभारकाम—वेदकालापासून कुंभारकामाची माहिती आर्यांना होती हें प्रसिद्ध आहे. श्रौतप्रकरणातील अग्निचयन विधानात निरनिराळ्या आकृतींच्या विटांच्या वेदींचीं वर्णनें आली आहेत. विटाप्रमाणेंच शेगड्या बोळद्या, मडकीं, माठ, परळ, वगैरे कुंभारकामें त्यावेळीं प्रचारात होतीं ( ज्ञानकोश-प्र. खं, वि. दुसरा वेदविद्या, पृ. १२४-२५-२६ पहा ) हिंदूंच्या अनेक धार्मिक विधींत मातीच्या पात्राची गरज लागते. मुंज, विवाह, व और्ध्वदेहिकप्रसंगीं हीं पात्रें लागतात.

असुरिय प्रमाणें बाबिलोनियातहि ६ हजार वर्षांपूर्वीच्या प्राचीन लेख कोरलेल्या विटा सापडतात त्या मातीच्या वाळवून भाजलेल्या असून फार मजबूत व टिकाऊ आहेत. या शहराच्या जुन्या ( तट, मनोरे, राजवाडे वगैरेंच्या ) अवशेषात या विटाचे ढीगच्याढीग आढळतात. आसपासचे लोक आपापलीं घरें बांधण्यास या विटा आज अनेक शतकें नेत आहेत. बाबिलोनियन व असुर लोक रंगीत व मिना कामाच्या विटा करण्यात प्रख्यात होते. त्याचा उपयोग ते शोभेसाठीं करीत असत. चिनी लोक आपल्याला या असुर लोकाच्याहि पूर्वीच वीट कामात दर्दी म्हणवितात पण कांहींचे म्हणणें ही कला चिनी लोकानी हिंदुलोकापासून घेतली असें आहे. प्रख्यात चिनी अजस्र भिंत ही भाजलेल्या व कच्च्या अशा दोन्ही विटाची बांधलेली आहे. परतु ही अर्लकडे ( सुमारें ख्रि. पू. २२० ) बांधलेली आहे. इस्रायल लोकातहि विटाचें काम प्राचीन काळीं होत होते. मात्र ते विटा न भाजता उन्हात सुकवीत. याची माती नदीच्या गाळाची असे. त्यात गवत किंवा उन्हाळे घालीत. हल्लींहि ईजिप्तमध्यें असल्या विटा पाडतात. ग्रीक लोक तीन प्रकारच्या विटा पाडीत असें प्लिनीनें म्हटलें आहे. रोमन लोक ही कला पौरस्त्यापासून शिकले; आणि त्यानींच ती सर्व पश्चिम यूरोपमध्यें पसरविली. इंग्लंडमध्यें १५ व्या शतकात विटा उपयोगात येऊं लागल्या. फ्लँडर्समधून ही कला इंग्लंडमध्यें या सुमारास आली परंतु १६६६ च्या प्रख्यात प्लेगापर्यंत विटाचीं घरें अगदींच थोडीं असत. यापुढें मात्र विटाचा उपयोग बराच होऊं लागला. तेथील सरकारनें इ. स. १७८४ मध्यें प्रत्येक हजार विटामागें ४ शि. ७ पे. चा कर बसविला होता अमेरिकेत पहिली विटाची इमारत १६३२ त झाली. मध्ययुगात यूरोपमध्यें मुख्यत: डच व जर्मन हेच विटा तयार करणारे होते इटालियनानीं १५ व्या शतकात रंगीत विटा तयार केल्या

मडकीं, विटा, कौलें वगैरे स्वस्त पदार्थांना चिकणमाती लागते. अधिक उंची भांडीं करण्यास ( बरण्या, चहाचे पेले, बशा व चित्रें वगैरे ) चागल्या प्रकारची चिनी माती लागते. मूस करण्याची माती गोंडवनाच्या ज्या भागात दगडी कोळशाच्या खाणी आहेत त्या भागात सापडते

विटा, कौलें करण्याचे कारखाने अलीकडे यूरोपियन लोकानीहि इकडे काढले आहेत इ स १८६६ राणीगंज येथें एक कारखाना निघाला व तेथें विलायती धर्तीच्या विटा पाडूं लागले, पण थोड्याच दिवसात तो धदा बुडाला यूरोपियन लोकानीं या कामात आपल्यापेक्षां जास्त लक्ष घातलें आहे. न्हाणीघरात वापरण्यात येणाऱ्या झिलईच्या सपाट विटा व दुसऱ्या आर्द्रतारोधक निळ्या व अनेक रंगाच्या विटा या यूरोपीयन कारखान्यात तयार होतात. मुसलमानी अमलात आपल्याकडेहि अशा मिन्याचें काम केलेल्या विटा तयार करीत असत, हें ठठ्ठाची मशीद, विजापूरच्या जुम्मामशिदींतील प्रसिद्ध रंगीत कमान वगैरे इमारती पाहिल्या म्हणजे समजतें किल्ल्याच्या व प्राचीन इमारतींच्या विटा लांब, रुंद पण कमी जाडीच्या असत. असुरिया देशात तर या विटावरच इतिहासलेखन करीत असत. त्या विटा ख्रि पू तीन चार हजार वर्षांच्या आहेत असें म्हणतात त्या एक हात औरस चौरस असत डॉ स्टीननें हिंदुस्थानांतील कांहीं जुन्या विटा ( इ. स. च्या ७ व्या, ८ व्या शतकातील ) शोधून काढिल्या होत्या. दक्षिणेंत तिनवेल्ली, मदुरा व मलबार भागात डॉ. पोप याला जमीनींत धडगीं खोदताना इ स. च्या ८ व्या शतकातील मातीचीं निरनिराळ्या प्रकारचीं भांडीं आढळलीं. अकबरानें आपल्या कारकीर्दींत कच्च्या, पक्क्या विटाच्या किंमती निरनिराळ्या ठरविल्या होत्या. हल्लीं गरीब लोकाचीं घरें कच्च्या विटाचीं असतात. पूर्वी बंगाल्यात नक्षीदार विटा तयार होत असत. दिनाजपुरजवळील कतनगड, चंद्रनगर व हुगळी येथील देवळात विटा आढळतात. लाहोरकडेहि या नकशांच्या विटा होत असत कलकत्त्याकडे विटाचे कारखाने बरेच आहेत. तिकडील अकरा गावचा कारखाना सर्व हिंदुस्थानात मोठा

आहे असें म्हणतात. हल्लीं महाराष्ट्रांतहि बऱ्याच ठिकाणीं कारखाने काढले आहेत. बडोद्यासहि एक कारखाना आहे. विटांत साध्या, कमानींच्या, वाटोळ्या वगैरे प्रकार असतात. विटांप्रमाणेंच कौलांचाहि खप असल्यानें त्यांचे कारखाने हिंदुस्थानांत लहानमोठ्या प्रमाणावर सर्वत्र आहेत. मात्र मंगलोरकडील कौलांचे कारखाने जास्त भरभराटलेले आहेत. याचें कारण तिकडील माती मूळचीच चिकणी असल्यानें साध्या मातींत चिकणाई उत्पन्न करण्याला इतर भागांतील कारखान्याला जो प्रारंभीचा बुडितखर्च करावा लागतो, तो तिकडे वाचतो त्या प्रांतांत पूर्वी यूरोपियन लोकांनीं कारखाने काढले होते परंतु हल्लीं हिंदी भांडवलाचे व व्यवस्थेचे कांहीं कारखाने सुरू झाले आहेत हिंदुस्थान देश साधारण उष्ण असल्यानें छपरावर घालण्यांत येणाऱ्या कौलांत पुढील गुण असले पाहिजेत. त्याच्यांत उष्णता साचवून ठेवण्याची व ती खालीं वाहून न जाईल अशी शक्ति पाहिजे. तसेंच कौल हलकें पाहिजे व मजबूत पाहिजे. त्याचे साधे एकमेकांत घट बसले पाहिजेत म्हणजे चुकूनहि एखादा फट रहातां कामा नये, नाहींतर पावसाळ्यांत त्यांतून गळण्याचा संभव असतो. असलीं कौलें हातानें तयार केल्यास तीं परवडत नाहींत म्हणून यंत्रानें तीं पाडावीं लागतात. त्याच्यांतहि साधीं, डाण्याचीं, कोंपऱ्यावरचीं, खालीं उजेड व हवा जाणारीं वगैरे निरनिराळ्या आकारांचीं व आकृतींचीं कौलें असतात. पूर्वीचीं साधीं नळीच्या आकाराचीं व चापट आकाराचीं कौलें असत. अद्यापिहि खेड्यांत व शहरांत हीं कौलें बरींच प्रचारांत आहेत. मंगलोरी कौलें फार महाग पडत असल्यानें त्यांचा प्रसार सर्वत्र होत नाहीं. टिकाऊपणाच्या बाबतींत तीं साध्या कौलांपेक्षा जास्त सरस असतात टिकाऊ सुबक व हलकीं आणि एक साचाचीं कौलें करण्यास यंत्राचें साहाय्य अवश्य आहे. अद्यापिहि उत्तम कौलें, फरशीचीं कौलें व विटा यूरोपमधून इकडे येतात इकडे राणीगंज, जबलपूर, अलीगड, बरेली, मंगलोर ग्वालेर, बडोदें, कल्याण वगैरे ठिकाणीं विटा, कौलें व चिनीमातीचीं भांडीं, खेळणीं इत्यादि तयार करण्याचे कारखाने आहेत. या धंद्यांत कोठें कशी माती मिळते याचा व तिच्या गुणधर्मांचा शोध ठेवणें जरूर असतें. हूपरनें ३३ प्रकारच्या मातींची परीक्षा केली होती. मुशीची माती निर्मळ पाहिजे तिच्यांत क्षारयुक्त द्रव्य (अलकलाईन) नसावें. असल्यास ती लवकर वितळते चिलमीची माती (पाईप क्ले) ही वाळूच्या कणांविरहित असल्यास फार चिकणी असते. अशी माती सेराणी व करई या प्रदेशाच्या दरम्यान सापडते, असें मूर म्हणतो मद्रासेकडील जंगलांतहि ही आढळते

चिनीमातीचीं भांडीं वगैरेस लागणाऱ्या मातीचे तीन वर्ग आहेत. (१) चिनी ( केऑलिन ) माती, (२) साधी पांढरी माती किंवा झिलईचीं भांडीं करण्याची व (३) लाल ...ौ कौलें किंवा कुंड्या करण्याच्या चिनी मातीचा उपयोग कागदाच्या कारखान्यांत कागद तयार करितांना होतो हिचे पांढरे किंवा पिवळट रंगाचे गोळे बाजारांत मिळू शकतात फेल्स्पार नावाच्या दगडावर हवा व पाणी यांची क्रिया होऊन ही माती तयार होते हिच्यांत मुख्यत्वें करून अल्युमिनम सिलिकेट असतो ही हिंदुस्थानांत बहुतेक ठिकाणीं सापडते.

मातीच्या ज्या भांड्यांत द्रव पदार्थ ठेवावयाचा असेल त्यालाच फक्त झिलई देण्यापासून फायदा असतो झिलई-पेक्षां लाख लावणें स्वस्त पडतें हिंदुस्थानांतहि झिलईचीं मडकीं वगैरे फार पूर्वीपासून वापरीत असत पेशावर, वेलोर, अर्कोटकडे प्राचीन काळचीं भांडीं सापडलीं आहेत हा काल म्हणजे बौद्धकाळ होय उत्तरहिंदुस्थानांत कुंभार मडकीं वगैरे तयार करतो व कुझगार ( हा मुसुलमान असतो ) त्यावर नकशीकाम खोदतो चिनीमातीचीं भांडीं परदेशांतून बरींच येतात. ही आयात इंग्लंड, बेल्जम, जर्मनी येथून होते त्यांत इंग्लंड शेंकडा पन्नासप्रमाण माल पुरवितें. हिंदुस्थानांतून विटा, कौलें, भांडीं वगैरे माल थोडा फार सीलोन व स्ट्रेटसेटलमेंटमध्यें जातो सिंध प्रांतांत टट्टा व हाल येथें नकशीच्या विटा व चिनीमातीच्या बरण्या प्रख्यात आहेत गुजराथेंत पट्टण येथें मातीचे सुजे व हुक्के होतात. दिल्ली, मुलतान येथें चिनी नकशीदार भांडीं होतात. तसेंच भांड्यावर नाना तऱ्हेचे रंग व रोगण इकडे चांगलें चढवितात. गुजराणवाला व भावलपूर येथें कागदासारखीं पातळ मडकीं तयार होतात आजमगड येथील ( वायव्यप्रांत ) सुजे, लखनौच्या बशा, पेले, सुर्जा (बुलंद जिल्हा) येथील मडकीं, अलीगड, अमरोहा सहारणपुर येथील पातळ व वर्ख चढविलेलीं भांडीं हीं नावाजण्यासारखीं आहेत. हल्लीं पुणें जिल्ह्यांत तळेगाव दाभाडें येथें पैसाफंड काचकारखान्यानें हें काम हातीं घेतलें आहे ग्वालेर येथील काम नुकतेंच सुरु झालें आहे

विटांच्या मजबुतीचें एक कोष्टक पुढील प्रमाणें आढळतें. हातानें तयार केलेल्या विटा दर चौरस इंचावर ०.४ ते ०.९ टन वजन ठेवल्यास फुटतात तर यंत्रानें तयार केलेल्या विटा दर चौ इंचावर ०.७ ते १.३ टन वजन ठेवल्यास फुटतात आणि खंगर विटा दर चौ इंचावर २.० ते ३.८ टन वजनानें चुरडतात [ रिपोर्ट जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया १९०५, अबवरी. कॅट-कमर्शि. प्रॉडक्ट्स, ]

**कुंभारडी डोंगर**—मुंबई इलाखा. बेळगाव जिल्हा. खानापूरच्या आग्नेयीस सतरा मैलावर असलेला एक डोंगर. डोंगरावर कानफाटा साधु हंडीभडंगनाथ याचा मठ आहे.

**कुंभेर**—हें राजपुतान्यांतील भरतपूर संस्थानामधील एका तहसिलीचें मुख्य ठिकाण असून तें भरतपूरच्या उत्तरेस ५ कोसावर आहे. लोकसंख्या जवळजवळ ५ हजार आहे. येथें डाक व तारहपीस, प्राथमिक शाळा, दवाखाना वगैरे संस्था आहेत भरतपूरचा जाट राजाच येथील मालक आहे. एके

**कुमारखली**—बंगाल प्रांत नदिया जिल्हा कुष्टिया पोट विभागातील गाव हें गराय नदीच्या डाव्या तीरावर वसलेलें आहे याची लो सं. इ स १९११ साली ३७६९ होती हें पूर्व बंगाल रेल्वेवर स्टेशन असून येथें व्यापाराची धडामोड चांगली होते इस्ट इ कंपनीच्या अमदानींत कंपनीचा प्रेसि डंट कुमारखली येथें राहत असून येथें रेशमाचा मोठा व्यापार चालत होता त्यावेळच अवशेष म्हणजे एक स्मशानभूमि व काहीं थडगीं हे आढळतात

**कुमारजीव**—एक बौद्ध ग्रंथकार हा चौथ्या शत काच्या प्रारंभीं होऊन गेला वसुबंधूचा हा समकालीन होता, असें म्हणतात यानें इ स ४०४ च्या सुमारास शतशास्त्र आणि बोधिचित्तोत्पादनशास्त्र या दोन ग्रंथाचें भाषांतर केलें मात्र दंतकथा असें म्हणते कीं, याचा भाषांतरकर्ता वसुबंधु होता, परंतु तें खरें न हा असें विद्वा- नाचें मत आहे खुद्द वसुबंधूचेंच चरित्र कुमारजीवानें लिहिलें आहे पण डॉ टाकाकुसू यास तें कबूल नाहीं चीनच्या सिन् या राजघराण्याच्या वेळीं हयात असलेल्या लु कॉंग् या सेनापतीनें कच्छ देश जिंकल्यानंतर कुमारजी- वास चीनमध्यें नेलें तिकडे कुमारजीव हा लु कॉंग जवळ इ स ४०१ पर्यंत राहिला होता त्यानं ४०२ पासून ४१० पर्यंत बऱ्याच ग्रंथाचें चिनी भाषेंत भाषांतर केलें त्यांत सुखावतीव्यूह व वज्रच्छेदिका या छोट्या ग्रंथाचाहि समावेश होतो त्याचा मृत्युकाल निश्चित नाहीं, परंतु यान ती राजाच्या कारकीर्दींत सुमारें ४१५ च्या सुमारास तो गेला असावा [ बौद्ध वाङ्मय, जर्नल रॉयल ए सो १९०५ वॉटर्स १, स्मिथ ]

**कुमारदेवी**—हा लिच्छवी घराण्यातील राजकन्या व गुप्तघराण्यातील पहिल्या चंद्रगुप्ताची राणी हिचें लग्न चंद्र गुप्ताशीं झाल्यामुळें ( ३०८ ) तो पूर्वी जो एक साधारण जहागीरदार होता, तो तिच्या प्रासामुळें पुढें एक मोठा राजा बनला हा लिच्छवीवंश बौद्ध धर्मांत पूर्ण प्रख्यात होता त्यानीं नेपाळांत राज्य स्थापिलें होतें ( १११ ) चंद्रगुप्त हा मूळचा पाटलीपुत्राच्या जवळाल एका लहान प्रांताचा राजा होता, या लग्नामुळ महत्वाचा राजकीय फेरफार घाला. यावेळीं लिच्छवीराज कुमारदेवाचा बाप हा पाटलीपुत्राचा अधिकारी होता हुद्यामध्यें हें शहर चंद्रगुप्ताला मिळाल आणि त्यामुळें पुढें तो सान्या मगधदेशाचा सम्राट झाला [ स्मिथ लेव्ही–नेपाळ ]

**कुमारधारी**—दक्षिण हिंदुस्थानांत कुर्गच्या वायव्य भागातील एक नदी इचा उगम सुब्रह्मण्य टेंकडीवर होऊन पश्चिमेकडे वाहत गेल्यावर दक्षिण कानडयांत ही नेत्रवती नदाला मिळते व नेत्रवतीनदा मंगलूर जवळ समुद्रास मिळते

**कुमारपाल**—हा चालुक्य ( सोळुखी ) वंशीय अनहिल पट्टणचा राजा प्रख्यात सिद्धराज जयसिंह यास संतति नस- ल्यानें त्याच्या पश्चात कन्हदेव प्रधानाच्या मदतीनें हा गादी- वर वसला सिद्धराजाचा दत्तकपुत्र वाहड म्हणून होता, त्याला गादीवर बसविण्याची कुमाराविरुद्ध खटपट सिद्धराजाचा जावई सपादलक्ष( अजमीर )चा राजा अर्णोराज यानें केली, परंतु पुढें झालेल्या लढ ईंत अर्णोवचा पराभव झाला असावा कारण पुढें दोघात सधि होऊन वाहड हा अर्णोव राजाच्या आश्रयास गेला व कुमारपालानें आपली बहीण देवलदेवी ही अर्णोवराजास दिली कुमारपाल हा सिद्ध राजाचा चुलतभाऊ जो त्रिभुवनपाल, त्याचा पुत्र होय. याचा राज्यारोहण समारंभ काल मेरुतुंगाचार्यानें शके १०६४ कार्तिक शु १० ( इ स ११४२ ) हा दिला आहे यानें अर्णोवराजाचा पहिला पराभव अबूच्या पहाडात केला ( ११४३ ) पुन्हा एकदां या दोघाची लढाई झाली ( ११५० ), तिचें कारण अर्णोवाची राणी देवला हिला तो वाईट रीतीनें वागवी व एकदा तिच्या देखत त्यानें भाषणात कुमारपालाचा अपमान केला होता, त्याबद्दल सूड म्हणून कुमारपालानें त्याच्यावर चढाई केली होती गुजराथचे इति हासकार यापैकीं फक्त पहिलीच लढाई देतात, परंतु अली कडे सापडलेल्या शिलालेखावरून या दोन लढाया झाल्या असें स्पष्ट ठरतें अबूचा परमारराजा विक्रमसिंह हा कुमार पालाचा माडलिक असून या लढायात होता पुढें याला राजद्रोहामुळें काढून टाकून, कुमारपालानें आपला पुतण्या यशोधवल याला अबूच्या ( चंद्रावती ) गादीवर बसविलें ( ११४६ ) कुमारपालानें शाकंभरीच्या राजाचा पराभव केल्यानंतर तो शालीपूर व चित्रकूट ( चितोड ) इकडे केला नंतर तेथून मेवाड, मोरवन इकडे तो गेला माळ व्याचा राजा बल्लाळ याच्यावराहि त्यानें स्वारी केली होती. अर्णोवराजाची मुलगी जल्हाणा ही कुमारपालाची राणी होती (?) कुमारला गादीवर बसविण्यात अनेक जैन धर्मीयानीं मदत केल्यामुळें पुढें त्यानें त्या धर्माला राजाश्रय देऊन आपणहि स्वत जैनधर्मी झाला त्याचा गुरु हेमचंद्रसूरि हा होता कुमारपालानें आपल्या प्रजेस बलात्कारानें जैनधर्मी कर ण्याचा प्रयत्न केला या कृत्यामुळें राणीला फार वाईट वाटलें त्याबद्दल पुढील एक गोष्ट एकण्यात येते —राजमहा लाच्या रस्त्याकडील खिडकीस चिकाचा पडदा लावून त्याच्या आड उभी राहून ती नेहमीं पुढील अर्धा श्लोक म्हणे '' किं करोमि क्व गच्छामि को वेदानुद्धरिष्यति '' याप्रमाणें क्रम चालू असता, एके दिवशीं तिनें हा अर्धा श्लोक म्हण- ण्यास व जैन वेषानें शहरात फिरणारा वेदप्रबोध नावाचा वेदमतानुयायी विद्वान गौड ब्राह्मण तिच्या खिडकी खालीं येण्यास गाठ पडून त्यानें तो श्लोकार्ध ऐकिला त्यावरून त्याला आनंद होऊन त्यानें खालून पुढीलप्रमाणें तिला उत्तर दिलें " मा विषीद वरारोहे भट्टाचार्योऽस्ति भूतले" हें तिनें ऐकताच त्याला बोलावून त्याचा सत्कार करून, राजाचें कृत्य त्यास सांगितलें त्यावर त्यानें तिला आश्वासन देऊन तात्काळ राजसभेंत जाऊन जैनपंडिताचा

वादांत पराभव करून, राजास पुन्हा वैदिक धर्मी बनविलें. कुमारपालानें आसपासच्या राजांशी पुष्कळ युद्धप्रसंग केले. कोंकणावरहि त्यानें स्वारी केली होती. त्यानें पुष्कळ जैन मंदिरें व इमारती बांधिल्या, विद्वानांस आश्रय दिला व पुस्तकालयें स्थापिलीं. पाटण येथें हीं पुस्तकालयें अद्यापि कायम आहेत. हेमचंद्रसूरीचा व याचा काल थोड्याच दिवसांच्या अंतरानें झाला. याला याचा पुतण्या अजयपाल यानें विष पाजून ठार मारिलें ( ११७० ). याची साग्र माहिती व्याश्रयकाव्य व प्रबंधचिंतामणी यांत पहावयास सांपडेल. यानें प्राणिहिंसा बंद केली व मांसविक्रीहि बंद केली आणि त्याऐवजीं नुकसानीदाखल ३ वर्षांचें उत्पन्न आगाऊ दिलें. बेवारशी माल सरकारजमा करण्याची त्याची रीत नव्हती. त्यानें केदारेश्वर व सोमनाथ या देवळांचा जीर्णोद्धार केला. यानें अनहिलपट्टण येथें पार्श्वनाथाचीं देवळें बांधलीं आणि राजधानींत कुमारपालेश्वराचें देऊळ बांधलें. अहिंसाधर्माचे नियम मोडणारास तो देहदंड करीत असे. तो विद्वान, शूर व साहसी होता.

[संदर्भग्रंथ.—द्व्याश्रय, काव्य प्रबंध चिंतामणि आर्यविद्यासुधाकर, रासमाला, जिनमंडन, अजारी, चितोड व पालरीखेड येथील शिलालेख, टॉड, भा. २; पृथ्वीराजविजय, इं अँ भा. ११. स्मिथ ]

**कुमारराज**—हा आसामचा प्राचीन राजा होय. ह्युएनत्संगच्या वेळीं कामरूप ( आसाम ) देशचा हा राजा होता. याला भास्करवर्मा असेंहि म्हणतात. हा हर्षाचा सहकारी मित्र होता. याच्या संबंधानें बाणकवि व ह्युएनत्संग या समकालीन लेखकांनीं लिहून ठेवलेलीं वारीकसारीक वर्णनें सुद्धां तंतोतंत जुळतात. ह्युएनत्संग म्हणतो. " येथील गादीवरचा राजा ब्राह्मण असून नारायणदेवाचा वंशज आहे याच्या वंशाकडे कामरूपचें राज्य एक हजार पिढ्यापासून चालत आलें आहे. हा विद्येचा मोठा भोक्ता असल्यानें येथें विद्याभ्यास करण्यासाठीं लांबलांबून बुद्धिमान लोक येतात. हा स्वतः बौद्ध नाहीं परंतु विद्वान बौद्ध श्रमणांना तो मानतो. " याच्या बापाचें नांव सुस्थितवर्मा. वर्मा या नावावरून हा क्षत्रिय असावा असें वाटतें. परंतु तसें नसून तो ब्राह्मण होता. तत्कालीन क्षत्रियांचा धंदा स्वीकारणारे ब्राह्मण क्षत्रिय नांवें धारण करीत असें आढळून येतें. हर्षानें कर्णसुवर्ण ( मुर्शिदाबाद ) येथील राजा शशांक हा मेल्यानंतर तें ( बंगालचें ) राज्य कुमारपालाला दिलें [ ढाका रिव्ह्यू १९१२; म. भा, हर्षचरित्र. ]

**कुमारिलभट्ट**—पूर्वमीमांसा शास्त्रावरील वार्तिककार व कर्ममार्गाचा प्रवर्तक विद्वान गृहस्थ. यानें बौद्ध मतास विरोध करून वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन केलें. विद्यारण्य कृत शांकरदिग्विजयांत हा स्कंदाचा अवतार म्हणून पृथ्वीवर येऊन त्यानें सौगताचें म्हणजे बौद्धाचें खंडन केल्यावर प्रत्यक्ष शिव शंकराचार्य या रूपानें अवतार घेईल इत्यादि वर्णन उपोद्घातांत केलें आहे. यानें बौद्धाचा पराजय करून कर्ममार्गाचें प्रवर्तन केलें. याचाच फायदा घेऊन पुढें प्रख्यात आद्य शंकराचार्यांनीं अद्वैत मताचा प्रसार केला. भट्टाच्या चरित्राची खरी माहिती फारच अल्प आहे. याला भट्टपाद असेंहि म्हणत. याच्या कालाबद्दलहि एकवाक्यता नाहीं. याचे ग्रंथ उपलब्ध आहेत. परंतु त्यांत त्याने स्वतविषयीं चारित्रपर असे उल्लेख आढळत नाहींत इतकेंच नव्हे तर हे आपल्या मतविवेचनांत इतके गढून गेलेले दिसतात कीं, तत्कालीन सामाजिक,नैतिक व राजकीय परिस्थितीचा गंधहि त्याच्या लेखांत स्पष्ट आढळून येत नाहीं. तत्कालीन शिलालेख, ताम्रपटादिकांचे आधारहि याच्या बाबतींत सांपडत नाहींत. म्हणून त्याच्या असामान्य कामगिरीची खरी कल्पना आणून देतां येत नाहीं. याची अतिशय महत्त्वाची कामगिरी म्हणजे, बौद्ध मताचा पाडाव व वैदिक मताची पुन्हा स्थापना होय. शंकराचार्यांपेक्षां वरील कामगिरीचें खरें श्रेय भट्टानाच दिलें पाहिजे. एका दंतकथेप्रमाणें खुद्द शंकराचार्यांनीं भट्टाची भेट, ते अग्निप्रवेश करीत असतांना घेतली असतां, त्यांना " श्रुत्यर्थधर्मविमुखान् सुगतान् निहन्तुं " ( वैदिक धर्मोच्छेदक पाखंडी बौद्धांचा नाश करणारे ) असें विशेषण दिलं आहे. हर्षवर्धनाच्या कार्की बौद्धधर्माचा ऱ्हास होण्यास प्रारंभ झाला होता. तो पुरा करण्याचें श्रेय भट्टांनी घेऊन पुढील वैदिक धर्मस्थापनेच्या कामगिरीचा मार्ग आचार्यांस सुलभ करून ठेविला. वेद व वेदविषयक आचारावरील समाजाचा उडालेला विश्वास भट्टांनीं पुन्हा बसविला. या कारणावरून त्याचा काल हर्षानंतर ( इ स. ७०० ) मानतात व तो बरोबर असावा. रा. चिंतामणराव वैद्याच्या मतें भट्ट व आचार्य हे समकालीन नसून त्यांच्यांत एका शतकाचें अंतर होतें, आणि इ स ७०० हा भट्टाचा निधनकाल होय. भट्टाच्या कालाप्रमाणें त्याच्या वसतीच्या देशाबद्दलहि भिन्न मतें आहेत. आसाम,द्राविड व आर्यावर्त हे तीन देश त्याची जन्मभूमि सांगण्यांत येतात. त्याच्या तंत्रवार्तिकांत फक्त आर्यावर्त देशाचीच महती जास्त गायिली आहे व इतर प्रांतांची निंदा केली आहे. यावरून ते तिकडचे रहाणारे होते असें वाटतें. आर्यावर्त म्हणजे भट्टाच्या मतें, हिमालय व विन्ध्य यामधील प्रांत होय. त्यांना संस्कृताखेरीज द्राविडादि इतर भाषा अवगत होत्या. द्राविड, पारसिक, बर्बर, रोमक आणि यवन इत्यादि भाषांच्या त्यांनीं केलेल्या उल्लेखावरूनहि ते ७ व्या शतकांत झाले असावेत असें दिसतें. कारण द्राविडीशिवाय बाकीच्या वरील भाषांचा लोप, हिंदुस्थानांत ७ व्या शतकानंतर झालेला आहे. तत्पूर्वी ह्युएनत्संगासारखे बाह्यदेशीय इकडे येत व आपल्या देशची भाषाहि बोलत. असल्या परकीय बौद्धांच्या परकीय म्लेच्छ भाषा त्यावेळीं इकडे बऱ्याच प्रचलित होत्या, अर्थात् दुभाष्येहि बरेच असत. भट्टांनीं या दुभाष्यांचा ( द्वैभाषिक ) उल्लेख केला आहे. त्यांनीं बौद्ध धर्माचा अभ्यास बौद्ध भिक्षूंपाशीं केला होता.

महाराष्ट्रांतील मातुलकन्याविवाहाचा त्यांनीं निषेध केला असल्यानें ते महाराष्ट्रीय नसावेत असें म्हणतात; तसेंच त्यांनीं स्त्रियांच्या पोषाखाच्या बाबतींत अन्तरीय व उत्तरीय अशा दोन वस्त्रांचा निर्देश केला आहे तो महाराष्ट्रीय स्त्रियांना लागू पडत नसून उत्तरेकडील स्त्रियांना अनुरूप आहे, त्याशिवाय यज्ञक्रियेंतील ब्राह्मणाच्या पशुहिंसेचा त्यांचा उल्लेखहि उत्तरेकडील ब्राह्मणाचा वाचक खात्रीपूर्वक नाहीं. दक्षिणेंत पशुहिंसा (यज्ञांतील) कधींच बंद झाली नव्हती. सारांश, भट्ट हे उत्तरेकडील रहिवासी होते त्याच वेळीं राजे लोक चारहि वर्णांचे होते, असें भट्ट म्हणतात. साधारणतः इ स ६०० ते ७५० हा भट्टाचा काल असावा हे न्यायमीमांसाशास्त्रांत अत्यंत पारंगत होते वार्धक्यांत त्यांनीं आपला देह अग्नीस समर्पण केला. यावरून त्यावेळीं वृद्धपणीं अग्निकाष्ठें भक्षण करण्याचा प्रघात असावा असें दिसतें पुढें पुढें तो मोडल्यामुळें या भट्टाच्या कृतीला पुढील भ्रामक कारण सांगण्यांत येऊं लागलें. त्यांनीं छद्मवेषानें परधर्मीय बौद्ध भिक्षूंजवळ परधर्माचा ( बौद्ध धर्माचा ) अभ्यास केला, म्हणून पुढें त्याची निष्कृति म्हणून त्यांनीं स्वतःस जीवंतपणीं जाळून घेतलें यांचें कर्मप्राधान्य पुढें शंकराचार्यांनीं मोडून काढिलें याची सारी भिस्त वेदावर असून अग्निहोत्र व यज्ञादिकर्में हेच उपासनामार्ग ते प्रवर्तन करीत. त्यांना संन्यासमार्ग मुळींच पसंत नसे. परंतु लोकांत जैन–बौद्धधर्मानें हिंसेविषयीं तिटकारा व संन्यासाविषयीं आवड उत्पन्न झाल्यामुळें भट्टाचा हिंसाक्रियान्वित कर्ममार्ग फारसा रूढ झाला नाहीं. त्यातल्या त्यांत दक्षिणेंत हीं मतें मुळींच रुजलीं नाहींत ज्या दाक्षिणात्यांनीं पुष्कळ काळापासून मांसाशन वर्ज केलें होतें त्यांच्यांतूनच शंकराचार्य निर्माण होऊन त्यांनीं भट्टाचा अनुयायी जो मंडनमिश्र त्याचा पराभव करून त्याला आपला शिष्य केले, येथें यज्ञसंस्थेच्या उत्कर्षासाठीं शेवटचा प्रयत्न लुप्त झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

माधवाचार्यांनीं शांकरदिग्विजयांत याचा उल्लेख केला आहे. आत्मपुराणाच्या प्रस्तावनेंतहि यांच्याबद्दल थोडीशी माहिती आहे. यांनीं प्रथम जैमिनिसूत्रभाष्य व मग जैनमतभंजन हे ग्रंथ लिहिले असें म्हणतात

जैन लोकांच्या ग्रंथांत याची माहिती पुढीलप्रमाणें मिळते असें अर्वाचीन कोपकार ग्रंथाधार न देता सांगतात "आंध्र व उत्कल या देशाच्या सरहद्दीवर महानदीकांठच्या जयमंगल गांवीं, तैत्तिरीय यजुर्वेदी घराण्यांत, तैलंग जातीच्या यज्ञेश्वरभट्ट नांवाच्या ब्राह्मणाच्या पोटीं याचा जन्म झाला. याच्या आईचें नांव चंद्रगुणा असून, याचा जन्म वैशाखी पौर्णिमेस रविवारीं, माघ्यान्हीं, युधिष्ठिर शक २११० या वर्षीं झाला. हा कार्तिकस्वामीचा अवतार होता व वेदोक्त कर्मकांडाचा वादी, श्रुत्यभिमानी व जैन लोकांचा द्वेष्टा यम होता यांनीं निकेतन या जैनाचार्य ( बौद्धाचार्यां) जवळ छद्मवेषानें राहून जैनमत समजावून घेतलें, व पुढें त्या गुरूला घात केला. याचा साह्यकर्ता सुधन्वा राजा हाहि प्रथम जैन होता, परंतु पुढें याच्या शिकवणीवरून त्यानें जैनाचा फार छळ केला. कुमारीलभट्ट यांनीं अग्निप्रवेश केला. तो प्रमाथी संवत्सरीं माघी पौर्णिमेस वयाच्या ६३ व्या वर्षी केला". या जैनकथेवरून आचार्यांनीं सुधन्व्याकडून वैदिक कर्ममार्गाचा स्वीकार व प्रसार करविला असावा. शांकरविजयांत जी कथा आहे, तिचा सारांश असा — सुधन्व्याच्या सभेंत भट्टानीं बौद्ध व जैन पंडिताचा पराभव केला, व राजानें सांगितल्यावरून पर्वतावरून ' जर वेद खरे असतील, तर मला कांहीं एक होणार नाहीं ' असें म्हणून उडी मारली, परंतु ते सुखरूप राहिले. पुढें आणखी परीक्षा घ्यावी म्हणून एका घागरींत सर्प घालून राजानें प्रश्न केला असता, बौद्ध जैनानीं आंत सर्प आहे असें सांगितलें, परंतु भट्टानीं शेषशायीची मूर्ति आहे असें सांगून देवाची प्रार्थना केली. घागर मोकळी केल्यावर आंतून शेषशायीचीच मूर्ति निघाली. त्यामुळें राजानें आपल्या पदरच्या व राज्यांतील बौद्ध व जैन या पंडिताचा व धर्मानुयायांचा नाश केला ( विद्यारण्यकृत शां. दि. सर्ग १ ) भट्टाच्या तामीळ भाषेशीं परिचयाबद्दल बर्नेलनें एक आधार दिला आहे. तंत्रवार्तिकांत एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, ' आन्ध्रद्राविड भाषायाम् ' या शब्दांतील समभ्यंत-प्रत्ययावरून गोंधळून, हा तामीलभाषानिदर्शक कांहींतरी शब्द असावा, असा त्यानें शेरा मारला आहे. डॉ. स्टेन कोनो म्हणतो कीं, हा शब्द आन्ध्र व द्राविड या दोन्हीं भाषांकरितां घातला असावा. परंतु हा सारा व्यर्थ वाद आहे. कारण तंत्रवार्तिकाच्या ( हस्तलिखित व छापीलहि ) तेलगु प्रतींत ' अथ द्राविडादि भाषायाम् ' असा प्रयोग आहे.

म्लेच्छशब्दग्रहणाबद्दल भट्ट म्हणतातः—आर्य लोक जेव्हां म्लेच्छ शब्द संस्कृतांत घेतात, तेव्हां त्याचें मूळ रूप बदलून व त्याला नवीन स्वर जोडून किंवा असलेला स्वर गाळून दुसरें रूप देतात. यांनीं पुढील पांच उदाहरणें त्यांनीं दिलीं आहेत.

| मूळ तामीळ | भट्टमतें तामीळ | संस्कृतीकरण | अर्थ |
|---|---|---|---|
| चोरु, शोरु | चोर | चोर | अन्न |
| पाबु | पाप् | पाप | सर्प |
| वयिरु | वैर | वैरि | पोट |
| अम्माळ | माल् | माला | स्त्री |
| अदर | अतर | अतर | रस्ता |

यावर पी टी. श्रीनिवास आय्यंगार (विजगापट्टणकर) यांचें म्हणणें असें आहे कीं कुमारिलानीं घेतलेले हे तामीळ शब्द बरोबर नाहींत अदर हा जुन्या तामीळ भाषेंत आहे. हल्लीं तो प्रचारांत नाहीं. माल् शब्दहि चुकीचा घेतला आहे. बर्नेलच्या उताऱ्यांत अतर शब्दाऐवजीं नडे शब्द आहे द्राविडादिभाषा

या पदांतील आदि हा उपसर्ग कुमारिलांनीं कोढून घेतला हें अय्यंगार यांनां समजत नाहीं. [ शांकरदिग्वि; आरमपुराण; अर्वाचीनकोश; मध्य. भारत; लिंग्विस्टिक सर्व्हे. इंडिया. व्हा.४; इंडि. ॲंटि. व्हा.,४२. ]

कुयली—या वनस्पतीस लॅटिनमध्यें मुकुना प्रुरिएन्स; मराठींत कुहिरी, कुयली, कांटेकुयली, खाजकुयली, संस्कृतांत मर्कटी; गुजराथींत कौचो वगैरे नावें आहेत. ही कोंकणांत व मावळांतील जंगलांत सांपडते. हिचे वेल दुसऱ्या झुडुपाच्या आधारानें वाढतात. ते घेवड्यासारखे असतात. त्यांस निळीं फुलें येतात. शेंगाचे झुपके ( घड ) येतात. शेंगांवर केंसासारखी लव असते; ती अंगास लागल्यास अंगास खाज सुटून अंगाची आग होते. कांटेकुयलीची भाजी खाण्याकरिता करीत नाहींत. परंतु औषधाकरिता तिच्या शेंगांची भाजी करतात. हीस रेडेकुयलीहि म्हणतात.

कुयलीची सुधारलेली दुसरी जात आहे. तिला "व्हेल्व्हेट-बीन" (मखमालीशेंगा)किंवा गोडी कुयली असा संज्ञा आहेत. या जातीचे वेल घेवड्याप्रमाणें झुडपावर अगर माडवावर चढवितात. हिची घेवड्याप्रमाणेच मशागत करितात. वेल उगवल्यापासून दोन महिन्यात नीळसर फुलाचे झुबके येतात व मग त्यास शेंगा धरतात. त्या प्रथम हिरव्या असून पुढें काळ्या होतात. कोंवळ्या शेंगाची भाजी होते. त्या जून झाल्या म्हणजे आंतील दाण्याची उसळ होते. बीं घेवड्यासारखें पण मोठें व वाटोळें असतें. कित्येक देशात जनावरांस चाऱ्याकरिता या जातीचे वेल मोठ्या प्रमाणावर लावितात. महाराष्ट्रात ही जात फारशी माहीत नाहीं. पण त्या जातीचा फैलाव होणें इष्ट आहे. खाजकुयलीच्या शेंगावरील कुसीचा जंतावर फार चांगला उपयोग होतो. कुयलीच्या बियांस "कवचबीज" असें म्हणतात [ पदे ].

कुरकुंब—पुणें जिल्ह्यांत जेजुरी जवळील एक गाव. थोरले बाजीराव पेशवे मधून मधून येथें रहावयास येत. एकदां नानासाहेब व चिमाजीआप्पा यांनीं मस्तानीला जबरदस्तीनें श्रीमंतापासून दूर करून ठेविली असता श्रीमंत या गावीं रागानें येऊन राहिले होते. येथें फिरंगाई नावाची देवी असून तिचे भक्त बरेच आहेत. तिची यात्रा भरत असते. थोरले माधवरावहि या देवीच्या दर्शनास जात असत. [राजवाडे खं. ६ ]

कुरंगगड-अलंगगड—हे किल्ले नाशिक जिल्ह्यात नाशीक-अहमदनगर याच्या सरहद्दीवर इगतपुरी स्टेशनच्या आग्नेयीस ५ कोसावर आहेत. हे दोन्ही किल्ले एकमेकापासून ओध व पद्दा किल्ल्याप्रमाणें एक कोस अंतरावर असून अलंग हा किल्ला अहमदनगर जिल्ह्यात आहे. याच्यावर जाण्याची वाट मोडून टाकल्यामुळें याच्या माथ्यावर जाणें कठिण झालें आहे. या दोहोंच्यामध्यें मदनगड नावाचा किल्ला असून त्याच्यावर जाण्याचाहि मार्ग ( सन १८१८ ) पाडून टाकण्यात आला आहे. तो एका उभ्या खडकांत पायऱ्या खोदून केलेला होता. अलंग किल्ल्यावर नाशीक जिल्ह्यातील कुलंगवाडी गांवाकडून महत्प्रयासानें व धोक्याच्या मार्गानें चढतां येतें. या पर्वताच्या रांगेचे सर्वच माथे नीट सुळक्यासारखे आहेत. अलंग किल्याच्या पूर्वेस नवरानवरी नांवाचा दोन अगदी उभ्यासुळक्यांतून गेलेला एक घांट आहे या घाटातून पायरस्ता आहे पण तो फार विकट आहे. वरील दोनें सुळक्यांच्या दोन्ही बाजूस नगर व नाशिक जिल्हे आहेत हे किल्ले कोणी बांधिले याबद्दल कांहीं आधार सापडत नाहीं. हे १७६० मध्यें कावनई किल्ल्याबरोबरच निझामाकडून पेशव्यास मिळाले असावेत. जव्हारकरांनीं अलंगगड पेशव्याना दिला असाहि एक उल्लेख आहे [ ट्रान्झ्या, बॉम्बे जिऑ सोसा. पु. १;नाशिक ग्या. ].

कुरडू —या वनस्पतीस लॅटिनमध्यें कोलोसिआ अर्जेंटिआ; संस्कृतमध्यें भुरुंडा; मराठींत कुरडू हीं नावें आहेत.

ही एक माठाच्या वर्गांतील जंगली भाजी आहे.हिचें झाड बाजरीजोंधळ्याच्या शेतात व गवती रानात तसेंच ओसाड जागेत पावसाळ्यात उगवतें. हें झाड, आघाडा अथवा राजगिऱ्यासारखें वाढतें. तें तीन ते पांच फूट उंच होतें. फुलें शोभिवंत, पाढरा, गुलाबी, व तांबडा रंग असलेलीं लाव तुऱ्यासारखीं असतात. बीं काळें राजगिऱ्यासारखें चकचकित असते कोंवळ्या पाल्याची व शेंड्याची रुचकर पालेभाजी होते. ही भाजी मूत्रविकारानें व्यथित माणसास वैद्य लोक खाण्यास सागतात. बियाचें चूर्ण करून खाण्यापासूनहि भाजी सारखाच गुण येतो.

"नव्याच्या पुनवेस" म्हणजे आश्विन शुद्ध पौर्णिमेस कुडूंचीं फुलें व नव्या झालेल्या धान्याचे ( कोंकणात भात व देशावर बाजरी) तुरे व कुर्डुच्या फुलांचें तोरण करून देव घरावर व घरातील मुख्य दारावर शोभेकरिता बांधतात.

मुतखड्यावर-कुरडूचें बीं एक मासा व खडीसाकर एक मासा एकत्र करून घ्यावें मूत्र बंद झाल्यास २ किंवा ३ वेळ हें औषध घ्यावें. [ वनौ. गुण. भाग २ ]

कुरम एजन्सी—हा प्रदेश वायव्य सरहद्दीवरील प्रांतात असून कुरम नदीच्या थडीवरील प्रदेशाचा यांत समावेश होतो. याचें क्षेत्रफळ १२७८ चो मै. आहे. याच्या उत्तरेस सफेत कोह ( श्वेत पर्वत ), दक्षिणेस उत्तर वझिरिस्तान; नैर्ऋत्येस व पश्चिमेस खोस्ट जिल्हा व पूर्वेस झैमुस्ट या जंगली लोकाची वस्ती आहे.

कुरम नहागिरीत मुख्य पर्वत 'सफेत कोह.' त्याचें सर्वांत उंच टोंक शिखरम् नावाचें असून समुद्रसपाटीपासून ते १५,६२० फूट उंच आहे. या एजन्सींत कुरम ही एकच नदी आहे. तिला उत्तरेकडून व दक्षिणे कडून लहान लहान पुष्कळ नद्या मिळतात. उत्तर कुरम व दक्षिण कुरम असे या प्रदेशाचे दोन भाग केलेले आहेत. दक्षिण भागचा नदीकाठ खेरीज करून, बाकीचा प्रदेश नापीक, खडकाळ आहे. नदीकाठचा भाग लागवडीस

आणलेला आहे म्हणून हिरवा दिसतो. उत्तरकुरम हा प्रदेश बाबत. फार सुंदर असून जरी त्यावर लागवड नाहीं तरी जंगलातील हिरवीं झाडें व सपाट विस्तीर्ण कुरणें यांच्या योगानें निसर्गत तो प्रदेश फार रमणीय दिसतो हिवाळ्यात दक्षिणकुरमची हवा अतिशय थंड असून वारा फार वाहतो व उन्हाळ्यात हवा उष्ण असून कोरडी असते. उत्तर कुरमची हवा उन्हाळ्यात असह्य उष्ण असून हिवाळ्यात कित्येक आठवडेपर्यंत जमीन बर्फमय असते.

इ ति हा स — येथील प्रदेशाचा इतिहास वास्तविक ११४८ पासून सुरु होतो सैफुद्दीन घोरीनें गिझनीच्या बहराम शहाचा पराभव केल्यानंतर तो ( बहराम ) कुरमकडे निघाला व तेथून कुमक घेऊन त्यानें गझनी घेतली महंमद घोरी ज्या ज्या वेळीं हिंदुस्थानात येत असे त्या त्या वेळीं किरमान येथें मुक्काम केल्याशिवाय रहात नसे. ताजुद्दीन गादीवर असेपर्यंत राजधानी किरमान येथेंच होती. शेवटीं मुलतान महंमुदन त्याला किरमान शहरातून हाकून दिलें पुढें लवकरच तो प्रदेश मोंगलाच्या ताब्यात आला. पुढें इ. सन १२३५ सालीं सैफुद्दीन हसन यानें गझनी, किरमान व बन्नु हस्तगत केले. परंतु १२३९ त मोंगलानीं त्याला हाकून लाविलें. अकबराच्या अमदानींत बंगप लोकाचें ठाणें येथें असून साप्रत त्यात कोहत जिल्हा मोडतो. जहागीरनें बंगप लोकाना जरी हाकून लाविलें तरी कुरम प्रात मोंगलाच्या अंमलात पूर्णपणें केव्हाच आला नाहीं. तो बंगप लोकाच्याच ताब्यात होता. व मोंगल बादशाही नष्ट झाल्यावर कुरम अफगाणिस्तानचा भाग होऊन राहिलें होतें. कोहत जिल्हा ब्रिटिश मुलुखास जोडल्यानंतर मिराझी सरहद्दीवर तुरी लोक फार उपद्रव देऊं लागले. व १८५४ मध्यें जरी त्याजबरोबर करारमदार झाले तरी दंगे धोपे चालू होते. इंग्रजांनीं त्याच्या प्रदेशात लष्कर पाठवून पाहिलें तरी कांहीं परिणाम झाला नाहीं. अफगाणिस्तानच्या अमीरानें खंडणीची मागणी केली असता पहाडी भागातून त्यानीं पळ काढला.१८७८ साली जनरल रार्बर्ट्सनें कुरममधील लोकास कांहीं शिस्त लावली व १८९२ त इंग्रजाकडे ह्या सर्व प्रदेशाचा राज्यकारभार तुरी लोकांनीं आपण होऊन दिला.

यात खेडीं १६६ असून पारचिनार हें मुख्य शहर आहे. १९११ सालीं लो. सं. ९८,६९२ होती लोकसंख्येंत पठाण लोकाचा भरणा विशेष आहे.लोकाची सामान्य भाषा पश्तु(स्तु) असून हिंदु लोक हिंदी भाषा बोलतात. धंद्यात शेतकी हा मुख्य धंदा आहे. येथें अजूनहि रेशीम पुष्कळ उत्पन्न होत असून त्याचे पुष्कळ जिन्नस तयार होतात.

ज्या ठिकाणीं पाण्याचा पुरवठा आहे त्या ठिकाणीं शेतीचें उत्पन्न चागलें निघतें परंतु येथें शातता असावी तशी नाहीं; म्हणून राज्यकारभार सुयंत्र चालत नसून एकंदर जमि. । पद्धतशोर लागवड होत नाहीं. पावसाळ्यात तादूळ मका व गळिताचीं धान्यें उत्पन्न होऊन हिवाळ्यात गहूं, जव, हीं पिकतात. शिवाय फळझाडें उत्पन्न करण्यात येथील लोकाची पूर्वापार प्रसिद्धि चालत आलेली आहे. कुरम प्राताला दुष्काळ कसा असतो हें माहीत नाहीं. नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचा एक फाटा खुशालगड—कोहतवरून गेला आहे. त्यामुळें कोहतपासून कुरमला सहज जाता येतें. रेल्वेवरील अखेरच्या स्टेशनापासून पारचिनार ·८ मैल आहे. तेथपर्यंत टाग्याची सोय आहे. मध्यें सडकेवर किरमान नदी असून तिजवर पूल बाधलेला आहे पारचिनारपासून पुढें कच्ची सडक लागते

रा ज्य व्य व स्था. — कुरम प्राताचे दोन भाग आहेत म्हणून वर सांगितलें आहे. वरचें कुरम व खालचें कुरम या भागावर एकेक नायक 'कमींग' असून ते अनुक्रमें पारचिनार व सद्द येथें रहातात पोलिटिकल एजंट सर्वांवर मुख्य असून त्याच्या हाताखालीं एक रेव्हिन्यु अधिकारी दिलेला आहे अफगाण राजाच्या वेळीं जमीनमहसुलाचा दर सुमारें अर्ध्या एकरला 'जरीव' रु.१ते २ रुपये असे. याशिवाय इतर कर पुष्कळ आहेत. साऱ्याचा वसूल इंग्रज सरकार अफगाण पद्धतीवर करीत असून जमाबंदी१० वर्षांकरता केलेली आहे. एकंदर उत्पन्न कामुली ६७,३०० रुपये होतें अलीकडे साऱ्याचें उत्पन्न वाढलेलें आहे.

एकंदर लोकसंख्येंत ९८७ पुरुष व २५ स्त्रिया साक्षर होत्या. शिक्षण शाळेंतून देत असून शिवाय कामी लोक मशिदींत निमाज पढण्याच्या अगोदर अगर नंतर एक–अर्धा तास मुलाना शिक्षण देत असतात शिक्षणात एकंदर हा प्रदेश मागसलेला आहे.

**कुरम नदी**—वायव्य सरहद्दीवरील प्रातातील एक नदी. ही अफगाणिस्तानात रोखियन दरींत उगम पावून अफगाणिस्तानातील खोस्ट जिल्हा ओलाडल्यानंतर उगमापासून ४० मैलावर तुरी प्रदेशात शिरते व ५५ मैल वहात येऊन मियानवालासमोर सिंधुनदाला मिळते कुरम प्रदेशातून वाहत असता सफेतकोह पर्वतावरून येणारे पुष्कळसे नाले कुरम नदीला मिळतात. त्यात किरमान व कुरमान हे मुख्य होत.

**कुरमवार**—याची वस्ती वऱ्हाड मध्यप्रातात असून तेथें लोकसंख्या (१९११) ३७९२ आहे. हे चादा जिल्ह्यात तामीळ व तेलगू धनगराचेच भाईबंद म्हणून रहातात. हे आपणास जुन्या पल्लव घराण्याचे वंशज समजतात. यांनी एकंदर संख्या सुमारें ४७०० असावी. याची भाषा कानडीचें एक स्वरूप आहे. याच्यात मुलीचें लग्न ऋतुप्राप्तीपूर्वीच झालें पाहिजे असें आहे पूर्वी तसें न झाल्यास नदीकाठीं झोपडींत तिला नेऊन ठेवीत व पूर आला म्हणजे तिला नदीला अर्पण करीत पण आता झोंपडींत ठेवण्याचें सोंग करून नदी देवतेला कांहीं नैवेद्य दाखवून परत आणतात वधूची निवड नेहमीं डोक्यावरील केसातील भोंवरे पाहून करतात. चागले

शुभ मोंवरे असले तर मुलगी पसंत करतात. वर्षांत लग्न होण्याचे दिवस फक्त चार ठरले आहेत, ते फाल्गुनातील दोन्ही चतुर्थ्या, फाल्गुन वद्य १० व वैशाख शुद्ध तृतीया हे होत कावळे विणण्याच्या घोटयावर बसून लग्न होतात. एका लहान वाहुलीला झोका देऊन ती वधू नवल देतात. वधू ती नवऱ्यास देते. नंतर तो म्हणते की, हिला संभाळ मी स्वयंपाक करते. नवरा कधी कधी ती परत तिला देतो व म्हणतो की, मी कावळे विणतो तूंच संभाळ. याच्यात बायकोनें व्यभिचार केला तरी घटस्फोट होत नाहीं. बायको जर माहेरी जाऊन बसली तर तिला परत आणण्याचा मात्र नवऱ्याचा कोणताच उपाय चालत नाहीं. हे आपल्या धंद्याच्या सामानाची गणेश चतुर्थीस पूजा करतात. मल्हाना देव व मल्हानी देवींची बर्यास पूजा करतात. हे प्रवासांत निघाले म्हणजे पानावर अन्न ठेवून ते चाटून खातात. व पाणी पितांना नदींतून किंवा तळ्यांतून तोंड लाऊन बैलासारखें पितात. हे कांबळयाच्या टोप्या घालतात व काळ्या लोकरीचा दोर कंबरेस धोतरावरून बांधतात.

**कुरमी**—शेती करणारी ही कुरमी अथवा कुणबी जात आहे. एकंदर हिंदुस्थानात यांची वस्ती ३७,३५,६११ आहे. मुंबई इलाखा सोडून सर्व प्रांतांतून ती विखुरलेली दिसते. संयुक्तप्रांत व बिहार-ओरिसा यांतून ती फारच आहे. कुटुंब व कृषि या संस्कृत शब्दावरून कुरमींची व्युत्पत्ति लावण्यांत येते. पृथ्वीस धारण करणाऱ्या कूर्मावतारांतील, कूर्म म्हणजे कासव या शब्दावरून कुरमी शब्द झाला असावा असेंहि कोणी अनुमानितात. पश्चिमेकडील कुरमी लोक आपण भारतीय युद्धांतील कौरवकुलोत्पन्न आहों, असें समजतात. कांहीं कुरमी आपण ब्राह्मण आहों असें समजून यज्ञोपवीत धारण करितात. कर्नल डाल्टन म्हणतो कीं, बिहारचे कुरमी हे बंगालमधील पहिले आर्यवसाहतवाले असावे; परंतु रिस्लेच्या मतें, छोटानागपूर व ओरिसामधील कुरमी हें नांव धारण करणारी जात भिन्न असून चेहऱ्यावरून हे द्राविडी जातीपैकींच असावे असें आहे. एकंदरीत या कुरमी लोकांच्या कुळासंबंधीं तीन समर्थनीय पक्ष म्हणजे (१) कुरमी ही जात आर्य किंवा द्राविडी वंशापासून झालेली आहे, (२) सर्वच जाती आर्यांपासून झालेल्या असून भिन्न कर्म व संकर यामुळें त्यांच्यांत बदल झाला व (३) तिसरा पक्ष असा कीं, सर्वच जाती द्राविडी वंशापासून झाल्या असून ज्यांचा आर्यांशीं संबंध आला ते सुधारले व बाकीचे मूळ रानटी अवस्थेंतच राहिले निरनिराळे धंदे करणारी कुरमी ही एक जात असून कोइरी, कच्छी, साहूणी व माळी अशा जाती तिच्यापासून झाल्या आहेत.

खानेसुमारीवरून पाहतां कुरमी लोकांचे ज्ञातिविषयक एकंदर ११ मुख्य वर्ग आहेत. घाईश्वर, बार्डिया, गंगापारी, गुजराथी, जईश्वर, कनौजिया, खरेविंध, पटारिया, राइ, सेंटवार, सिंगरार या जाती प्रमुख आहेत यांशिवाय माल्ह, पाटनवार, छाकारिया, सेकारवा, उमरान, भंडारी, हरिद्वार, मन्वा, कोरी, इत्यादि अनेक जाती आहेत. पांचशें वर्षांपूर्वी शावाजी नावाच्या एका फकीराचे बनिया, अहीर व कुरमी लोक अनुयायी झाले व त्यामुळें त्याना जातिबहिष्कृत व्हावें लागलें असें म्हणतात. या अनुयायांच्या चन्धाच चाली रीती मुसलमानांसारख्या आहेत.

बहुपत्नीत्वाची मुभा याच्यांत चालू असली तरी अलीकडे पुष्कळ बायका करण्याची चाल बंद पडत चालली आहे. बालविवाह रूढ असून, वयांत आल्यानंतर कुमारिकेचें लग्न न करणें हा मोठा दोष मानला जातो. हुंड्याचा चाल फारशी प्रचारांत नाहीं. तथापि देणगी म्हणून उभयपक्षांत बरीच देवघेव होते दुराचारी स्त्रीला समाजाकडून शासन केलें जातें. परंतु सगाई विधीनें तिला लग्नहि करतां येते. पुनर्विवाह करण्याची व नवऱ्याच्या धाकट्या भावाबरोबर लग्न करण्याची विधवेला मोकळीक असते. एखाद्या गतभर्तृकेस मूल असल्यास तें दुसऱ्या नवऱ्याच्या घरी, त्याच्या कुटुंबांतीलच एक व्यक्ति म्हणून मानलें जातें. प्रत्यक्ष लग्नसमारंभात फारसे विधी नाहींत. तथापि वधूचें प्रथम पिंपळ वृक्षाशीं लग्न लावण्यांत येतें पायपूजा, कन्यादान, सेंदुरदान वगैरे समारंभ लग्नांत करण्यांत येतात

सर्व धार्मिक विधी ब्राह्मणद्वारा करण्यांत येतात. साधारणतः सरयुपारी व कनौजिया ब्राह्मण हे यांचे उपाध्याय असतात. महावीर, ठाकुरजी व सीतलादेवी अशा त्यांच्या देवता आहेत कांहीं लोक गुरुमंत्राची दीक्षा घेतात. महावीराशिवाय बाबीपीर यांचीहि उपासना हे करतात.

कुरमींचा सामाजिक दर्जा मान्यतेचा आहे. कांहीं ब्राह्मणाच्या हातचेंहि कच्चें खात नाहींत रजपुतांच्या स्वारीच्या पूर्वी आपण जमीनदार होतों असें हे म्हणतात. कांहीं लोक महादेवाची व कुर्मीयानीनाथ यांची पूजा करितात. टिका नावाच्या एका खेडेगावांतील तलावानजीक कुरमी स्त्रिया सती जात असत असे सांगतात. या जातीपैकीं पुष्कळजण भगत असल्यानें मद्यमांसाशन करीत नाहींत. त्यांचा प्रमुख धंदा शेती हाच असतो. कुरमी स्त्री अत्यंत कष्टाळू असते अशी प्रसिद्धि आहे. स्त्रियांच्या उद्योगनिरततेवरून त्यांच्या समाजांत कांहीं म्हणीहि पडून गेल्या आहेत.

बिहारमधील ह्या जातीच्या लोकांचा समाजांतील दर्जा उच्च आहे, परंतु छोटा-नागपुरमधील हे लोक पक्षिभक्षक व शेतांतील उंदीर खाणारे आहेत. ते मद्यपी असल्यामुळें ब्राह्मण त्यांच्या हातचें पाणी घेत नाहींत. ते आसामांत मजुरी करितात.

मध्यप्रांतांत यांच्या रक्तांत बरीच भेसळ झाली आहे. कारण एक तर यापैकीं मराठी प्रांताजवळ राहणाऱ्या लोकांचे व कुणबी लोकांचें मिश्रण झालेलें आहे व होत आहे. शिवाय यांच्यांत अगारिया, लोन्हारे, नेरा इत्यादि इतर जातींची

कुळें आहेत यावरुन या नावाचे लोक पूर्वी आपल्या जातींतून कुरमी जातींत शिरले हे स्पष्ट आहे

कुरमी लोकांत पूर्वी हर्वेलिया नावाची एक श्रेष्ठ जात होती हे लोक गोंड राज्यांत उत्कृष्ट शेतकरी असून फार संपन्नस्थितींत असत पण आता हे लोक सांपडत नाहींत उलटें म्हणून आतां जी जात आहे ती या जागीं स्थापन झाली आहे किंवा होऊं पहात आहे. हे लोक मद्यमांसास स्पर्श करीत नाहींत छत्तीसगडांत व जबलपुरांत चंद्नाहे हा एक मोठा वर्ग आहे. शिनोरें हे प्रयागाल्या शिवूर गावचे आहेत. प्रत्येक उपजातींत आणखीहि पोटभेद आहेत ते परस्पर विवाह करतात. या लोकांमध्ये आदरातिथ्य पुष्कळ असतें. हे लोक ब्राह्मणास किंवा वैराग्यास गुरु करतात. धर्म बदलला, नीच माणसाशीं संभोग केला, किंवा गोमांस भक्षिलें तर अजीबात बहिष्कार घालतात. ('कुणबी' पहा) [क्रूक, रसेल व हिरालाल, सेन्सस रिपोर्ट]

**कुरवा**—कोरवा, कोरआ, कोरमा याची (जात) लो. सं. (१९११) २,४२,२१.पैकीं मद्रास इलाख्यांतच १,१०,१५७ कुरवा आहेत. बाकी त्रावणकोर, म्हैसूर व मुंबई या भागांतून आहेत महाराष्ट्रांत या लोकांना कैकाडी म्हणतात. हे लोक निरनिराळ्या नावांनीं ओळखले जातात. अर्काट जिल्ह्यांत कोरवा, कोरचा आणि येरुकाला या तीन नावांनीं ते ओळखले जातात. कलकत्ता येथे ते 'वैदू'चा धंदा करतात. काहीं कोरवा लोक वेला म्हणून समजले जातात. पळी, कवराइ, इडाइयन् व रड्डी अशींहि त्यांचीं नांवें आहेत. कटक, मिदनापूर, पुरी, तिनेवेल्ली, मुंबई, पाटणा, तंजावर वगैरे ठिकाणीं काहीं कोरवा जातीचे लोक वस्ती करून राहिले आहेत. केपमारीप्रमाणेंच कोरवा जातीपैकीं काहींचा धंदा चोऱ्या करणें, घर फोडणें, दरवडे घालणें अशा प्रकारचा आहे. साधारणत मूळव्याधीसारखे रोग बरे करण्यासंबंधीं त्यांची प्रसिद्धि आहे. काहीं लोक शेती व मजुरी करतात, काहीं ज्योतिष सांगतात. ते एकमेकांस कुद अथवा कुरा असें संबोधतात. कोरवा व येरुकाला यांच्या भाषेंत कानडी, तेलगू व तामीळ या शब्दांचाच मुख्यतः भरणा असतो. येरुकाला जातीच्या भाषेस ओड्डा अथवा ओरिया म्हणतात. यावरून ते उत्तरेकडून आले असावे असें दिसतें. परैयन, यानाडी, मंगला, व साकल या जातींखेरीज इतर जातींच्या लोकांना कोरवा लोक आपल्यांत घेतात. सातेपाटी, कावडी, मैद्रागुट्टे व मानपाटी असे कोरवा जातीचे चार मुख्य वर्ग आहेत व त्यांपैकीं पहिले दोन श्रेष्ठ दर्जाचे आहेत पद्यपू व धूरपू असे दोन वर्ग येरुकाला जातीचे आहेत. कोरवा जातीमध्ये नानाविध पंथ असून प्रत्येक पंथाचीं निरनिराळीं दैवतें असतात. कोनेटी व समुद्राल असेहि पंथ असून शेवटचे समुद्रालाचे देवक असतें. रामेश्वरी पथाचे लोक कासव खात नाहींत. कित्येक कोनेटी लोक विशिष्ट प्रसंगीं तें मुद्दाम खातात.

पूर्वी कोरवा व्यापारी चिंच, गूळ, मीठ इत्यादि पदार्थांच्या गोण्या बैलाच्या किंवा गाढवाच्या पाठीवर लादून फिरस्तेगिरी करीत असत मिठाचा व्यापार करणाऱ्यांना उप्पु कोरवा म्हणतात कुचू नावाचे लोक जंगलांतील मुळ्या गोळा करून त्याचे कोष्ट्याच्या उपयोगाकरितां कुंचले तयार करतात. हे लोक शिकारी म्हणूनहि फार प्रसिद्ध आहेत काहीं लोक जंगलांतील वेळू तोडून आणून दुसऱ्यास विकतात त्यांच्या स्त्रिया गोंदण्याचाहि धंदा करतात मासे, विंचू, किडे, वगैरे इत्यादि भाकूनी शरीरावर मोठ्या कौशल्यानें हे गोंदतात. भविष्य वर्तविण्याच्या कामीं कोरवा स्त्रिया फार वाकबगार असतात कोणातहि भविष्य सांगण्यापूर्वी त्या व्यक्तीचा स्वभाव व इतर माहिती हेरून ठेवण्याच्या कामीं त्या फार चतुर असतात. पूर अथवा खेडेगांवांतील कोरवा लोकांनीं रानटीपणा सोडून देऊन शेती करण्याचें अलीकडे मनावर घेतलें आहे असें दिसतें यांपैकीं पुष्कळ लोक हल्लीं पोलीस, जंगल वगैरे खात्यांत आहेत पामुला नावाचे लोक गारुड्याचा धंदा करतात काहीं टोपल्या विणतात पुत्तलवाडू, उप्पलवाडू, काडुकुट्टिरावर इत्यादि अनेक नांवें निरनिराळ्या धंद्यावरून पडलीं आहेत. कुट अथवा कोड्डी लोक नीतिबाह्य मार्गानें उपजीविका करतात त्यांच्यांतील स्त्रियांचीं नर्तनाबद्दल प्रसिद्धि आहे मुलींना पळवून नेण्याचीहि प्रवृत्ति त्यांच्या आहे.

कोरवाचे घरगुती देव विष्णु व शिव हेच होत शिव, कुमार, सुब्रह्मण्य यांचीहि कोरवा उपासना करतात. लक्ष्मीव्यंकटेशस्वरुपी विष्णूची उपासना येरुकाला लोक करतात मारिअम्मा कोल्हापुरी अम्मा, पेरमालस्वामी अथवा तिरुपतीचा व्यंकटेश्वर या देवतांचीहि उपासना करण्यांत येते. गुन्हेगार कोरवा जातीची मुख्य देवता मोथेवी नावाची असते. पुष्कळ लोक या निद्रादेवतेला दरवडेखोरींत यश यावें म्हणून आळवितात. भविष्य सांगतांना कोल्हापुरी अम्मा व पोलेरम्मा या देवतांची प्रार्थना करण्यात येते.

लग्नाचा मुहूर्त ठरविण्याचें काम ब्राह्मणावर सोंपविण्यात येतें आणि जातिभ्रष्टांची शुद्धि चेट्टी लोक करतात. पंचायतीची सभा अशा प्रसंगीं भरते व तेथें गुन्हेगारास क्षौर करावयास लावतात व त्याची गाढवावरून धिंड काढतात नंतर त्यानें दिलेल्या दक्षिणेपैकीं काहीं भाग चेट्टी घेतो. गुन्हेगारास भोजनार्थ जातीस बोलवावें लागतें विधवेशीं किंवा परजातीशीं गमन करणाऱ्या अपराध्यालाच वरील शासन करण्यात येतें.

कोरवा जात जुन्या वेडगळ समजुतींना चिकटून राहणारी असून तिच्यांत अनेक धर्मभोळेपणाचे मासले असलेले आढळतात. चोरी करण्यास निघण्यापूर्वी बरेवाईट शकुन पाहण्यांत येतात. एखादें बकरें कोल्हापुरी अम्मा किंवा पेरमाल यास बळी देऊन नारळ फोडण्यांत येतात. बकरें मारण्यापूर्वी तें कापूं लागलें तर तो शुभशकून समजला जातो. कोंबडे मारण्याचाहि त्यांचा प्रघात आहे. गुन्हेगारीस बाहेर पडताना विधवादर्शन, दुधाची भांडी, कुत्र्याचा मूत्रोत्सर्ग, वैतवाहक

आणि वृषभगर्जना इत्यादि गोष्टी अपशकुन म्हणून मानल्या जातात. प्रत्यक्ष घर फोडताना बैल डुरकला तर तो शुभ शकुन होतो चोरीस निघताना बैलास झोडपीत असलेला मनुष्य पाहिला तर तो शुभशकुन होतो. घरें फोडण्यापूर्वी त्यावर मूत्र शिंपडण्यात येते. दुष्ट भाषेनें होणारा अपशकुन टाळण्यास चिरलाया एक मनुष्य करून त्याच्या तोंडात काटे भरण्यात येतात. सात हा अंक अपेशी असा मानला जातो. रविवार, सोमवार, बुधवार व शनिवार हे वार अशुभ मानले जातात.

वडील माणसाकडून साधारणपणें लग्नें ठरविण्यात येतात. वराचा बाप वधुसंशोधन करितो व त्यास योग्य अशी वधू सापडल्यास उभय पक्ष प्रथम ताडीच्या दुकानात प्रवेश करतात व त्याठिकाणीं भावी व्याही वधूवरांचें कल्याण चिंतून यथेच्छ सुरापान करतात. लग्नात वधूच्या मामाचा मोठा मान असतो व कन्याविक्रयाची रकम त्यासच द्यावयाची असते.

वधूवराना एका कांबळ्यावर उभे करून वराकडून काळ्या मण्याची माळ वधूच्या गळ्यात घालवितात व अक्षता टाकून धार्मिक समारंभ पूर्ण होतो. तालीबंधन, कंकणबंधन, मिरवणूक व मेजवानी वगैरे गोष्टी करण्यात येतात उत्तर अर्काटमध्यें अविवाहित मुलींना गहाण टाकण्यात येते असें म्हणतात. (कास्टस अँड ट्राइब्ज ऑफ इंडिया, पान ४८७). चिंगलपेट व तंजावर येथेंहि ही चाल आहे. मद्रास येथें कोरावा लोक आपल्या बायका गहाण ठेवून कर्ज काढितात. ( कित्ता पान ४८८ ) वारंवार विधवा होऊन किंवा काडीमोड करून एकाच जन्मात सात नवरे करणाऱ्या स्त्रीस 'येझावोम्रिसानी' असें म्हणतात व ती प्रतिष्ठित बाई म्हणून लग्नकार्यांत मानली जाते.

नामकरणप्रसंगीं मुलाच्या खांद्याच्या जवळ डाग देतात. अल्बेरूणी यानें इ. स. १०३९ मध्यें त्याची ही चाल नमूद करून ठेविली आहे. तो म्हणतो कीं, जेव्हां मूल जन्मतें तेव्हां त्याच्या बापाकडे कोरवा लोकाचें जितकें लक्ष्य जातें तितकें तें आईकडे जात नाहीं. रेव्हरंड. जे केन साहेब म्हणतो कीं, जेव्हां एखाद्या स्त्रीस प्रसववेदना होऊं लागतात त्यावेळीं तिचा नवरा कपाळास मळवट फासून व लुगडें पांघरून बाजेवर जाऊन पडतो. मूल जन्मताच तें बापाच्या बाजेवर ठेवितात. बाळंतिणीप्रमाणें बापासहि सर्व औषधें घ्यावीं लागतात. बापानें हे सोहाळे का भोगावे याबद्दल कोरवा जातीत बऱ्याच दंतकथा आहेत. कोरवा मुलास लहानपणीं ' मला माहीत नाहीं. ' या वाक्याचा ओनामा शिकवितात. नंतर चोरीच्या विविध पद्धतींचें त्यास शिक्षण देऊन भिंतीतून, खिडकीतून व दारातून घरात प्रवेश कसा करावा ही विद्याहि त्यास शिकवितात.

तामीळ भाषेंत अशी म्हण आहे कीं, मृत वानर व मृत कोरवा हे अद्याप कोणीच पाहिलेले नाहींत. वानराप्रमाणें कोरवा लोक मृताची तत्काल व्यवस्था लावितात. त्यांच्यात सुतक पाळणें, पिंड देणें वगैरे प्रकार आहेत असें म्हणतात. म्हैसूर येथील कोरवा जातीच्या लोकात अशी चाल आहे कीं,विधवेशीं त्याच दिवशीं कोणी तरी प्रथम लग्न करून नंतर तिच्या नवऱ्याचें प्रेत जाळण्यास न्यावयाचें असतें.

मलबार, कोचीन, त्रावणकोर येथें रहाणारे कोरवा. मलयालम् भाषा बोलणारे आहेत. काहीं लोक दोरावर नाच करून पैसे मिळवितात. काहीं शेती करितात. कित्येक गवताच्या टोपल्या तयार करतात त्यांच्या स्त्रिया ज्योतिषपणा व मुलींचे कान टोंचण्याचा धंदा करतात. १८८५ सालीं या जातीला सुधारण्याचे प्रयत्न करणाच्या कामी स्टीव्हन्सन यानें फार मेहनत घेऊन त्यांची एक वसाहतहि स्थापिली. परंतु त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. १९०७ च्या पोलीस खात्याच्या रिपोर्टावरून दिसतें कीं, असल्या फिरत्या गुन्हेगार टोळ्यांना जमीनी देऊन सुधारण्याचा यत्न करून पाहण्यात येत आहे. [ थर्स्टन से. रि. ]

मुंबई इलाख्यात कोरवा हे बेळगाव, विजापूर, धारवाड या जिल्ह्यात मुख्यत्वेंकरून आढळतात यामध्यें रजस्वला बायकांचा विटाळ कानडी लोकाप्रमाणें मानीत नाहीत प्रेतें पुरलीं जातात हे लोक फक्त मोठाले हिंदुसण पाळतात दिव्यें करून गुन्हा शाबित करण्याची चाल यामध्यें आहे. याच्या भाषेंत तेलगु, तामीळ व कानडी या भाषाचें मिश्रण आहे. याचे ९ पोटभाग असून त्यामध्यें कानडी पोटभागातील लोक सर्वांत श्रेष्ठ मानिले जातात. यामध्यें चार कुळें आहेत. काहीं परिस्थितींत पुनर्विवाहहि करिता येतो. घटस्फोट मात्र करिता येत नाहीं असें म्हणतात. हे मांस खातात व दारूहि पितात. मारुती, यल्लामा, मारायाम्मा, व दुलीगेव ह्या त्यांच्या देवता आहेत.

प्रत्येक खेड्यात व शहरच्या प्रत्येक पेठेस एक पंचायत असून या पंचायतींत ४ सभासद व सरपंच हे असतात. सामाजिक खटल्याचे निकाल पंचायतींत दिले जातात. एका पंचायतींत एकमतानें निकाल न झाल्यास तो खटला दुसऱ्या पंचायतीकडे जातो. [ सेन्सस रिपोर्ट ( मुंबई ) १९११. एन्थावेन ]

कुरसँग, पो ट वि भा ग — बंगाल इलाख्यात दार्जिलिंग जिल्ह्यांतील एक पोटविभाग व तालुका. याचें क्षेत्रफळ १८५ चौ.मै.असून १९११ सालीं लो सं.एक लक्ष१०हजारांवर होती. खेड्याची संख्या ४९ आहे.यात कुरसँग हें एकच शहर आहे. याठिकाणीं पूर्व बंगाल रेल्वे व दार्जिलिंग हिमालय रेल्वे मिळतात.

श ह र.—कुरसँग पोटविभागाचें मुख्य ठिकाण. दार्जिलिंगच्या दक्षिणेस २० मैलावर हें असून समुद्रसपाटीपासून ४८६० फूट उंच आहे. १९११ सालीं येथील लोकसंख्या ५५७४ होती हें दार्जिलिंगसारखें पहाडी स्थळ असून येथील हवा उत्तम नसते. दार्जिलिंग-हिमालय रेल्वेवर

कुरसेंग हू एक स्टेशन असून येथें चहाचा व्यापार फार मोठा चालतो. १८७९ सालीं येथें म्यु. कमिटी स्थापन झाली. येथें मामुली सार्वजनिक कचेऱ्या आहेत, शिवाय एक लहान तुरुंग, दवाखाना, यूरोपियन व युरेशियन मुलांकरिता व मुलींकरिता शाळा आहेत, सेंट मेरीज कॉलेज व डौहिल ट्रेनिंग कॉलेज येथें आहे.

**कुराण.** प्रा स्ता वि क.—कुराण हा जगातील कमींत-कमी वीस कोट मुसलमान लोकांच्या इस्लाम धर्माचा मूलभूत धर्मग्रंथ असून त्यास ते परमेश्वराची प्रत्यक्ष वाणीच समजतात व ख्रिस्ती राष्ट्रांतून होत असलेल्या बायबलच्या प्रसारालाहि मागें टाकणारा याचा सामाजिक प्रार्थनामंदिरांत व शाळांमधून होणारा व होत असलेला प्रसार पाहून या ग्रंथास जगांत सर्वांत जास्त वाचक लाधलेला ग्रंथ असें मानण्यांत येतें. निदान एवढ्या कारणासाठीं तरी तो आपल्या धार्मिक अगर तात्विक दृष्टीस भितपत उतरतो हा विचार बाजूस ठेवून देखील आपणास त्याकडे लक्ष्य दिलें पाहिजे. शिवाय हा महमदानें लिहिलेला असून त्या अत्यंत यशस्वी व धर्मसंस्थापक अशा सत्पुरुषाच्या आध्यात्मिक उन्नतीवर प्रकाश पाडणारा आहे. हा ग्रंथ जरी फारसा मोठा नाहीं तरी पहिल्या निरीक्षणाच्यावेळीं परक्या वाचकाला यात सर्वत्र सावळा गोंधळ आहेसें वाटतें यांत शंका नाहीं परंतु अरबी संस्कृतीच्या साहाय्यानें याची पृथक्करणपूर्वक परीक्षा केली असता हें मत थोडेसें बदलतें.

कुराणाला मुसुलमान लोक प्रत्यक्ष परमेश्वराचा शब्द मानतात व ग्रंथातहि तोच प्रकार आढळतो. , कारण स्वतः महंमदानें अगर देवदूतानें केलेल्या प्रथमपुरुषवाचक विवक्षित भाषणाखेरीज इतर सर्व ठिकाणीं स्वतः परमेश्वरच बोलणारा असून त्यानें काहीं ठिकाणीं ' मी ' अशा एकवचनाचा तर दुसऱ्या काहीं ठिकाणीं 'आम्हीं' या बहुमानाच्या शब्दाचा उपयोग केला आहे ईश्वरी स्फूर्ति मिळालेल्या वेळीं मानवी व्यक्तित्वाची जाणीव ईश्वरी आदेशाच्या भावनेआड अदृश्य होते. पण मोठमोठ्या हिंदु ज्ञानी पुरुषांची वाणी लवकरच मानवी ममत्वाचा आश्रय करिते, पण कुराणांत मात्र दैवी ममत्वच उमटलेलें दिसतें. एकंदरीत महंमदाला आपण ईश्वराचे प्रेषित आहों असें वाटत असे. ही त्याची भावना प्रथम भितकी स्पष्ट दिसते तितकी पुढें दिसत नाही हें खरें असलें तरी ती कायमची नष्ट कधींच झाली नाहीं. कसेंहि असलें तरी नैतिकदृष्ट्या त्याच्या हृदयांत उत्पन्न दिसून येणाऱ्या स्थित्यंतरांच्या बाबतींत देखील आपल्याला त्याच्या शुद्ध श्रद्धेविषयीं शंका घेतां येणें शक्य नाहीं. सर्वांत महत्वाची सांगावयाची गोष्ट ही की, शेवटपर्यंत तो आपल्या ईश्वराविषयीं तसेंच आपल्या लोकांच्याच काय पण सर्व मानव जातीच्या मुक्तीविषयीं आस्था बाळगणारा होता व आपल्या दैवी अवतारकृत्याच्या भविष्य निश्चयापासून तो लवमात्रहि कधीं ढळला नाहीं.

ग्रंथाच्या आविष्करणाची उपपत्ति कुराणातच जी आहे ती अशीः—

"मूळ संहिता स्वर्गांत आहे ( ग्रंथमाता,—गूढग्रंथ, संरक्षित पत्रिका ) ' अध-प्रवर्तनाच्या ' पद्धतीनें एकामागून एक उतारे प्रेषितास सांगण्यांत आले. मध्यस्थ एक देवदूत असून त्याला कधीं 'पिशाच्च' तर कधीं 'जिब्रिल' असें म्हटलें आहे. हा देवदूत ईश्वरी आदेश महंमदास कथन करीत असे. विचाराचा प्रादुर्भाव मनांत कसा झाला याच्या या घोंटाळ्याच्या वर्णनाचा वस्तुस्थितीशीं अगदीं पूर्ण मेळ बसत नाहीं यांत नवल नाहीं. हे नेहमीं लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, महमदाची ईश्वराविषयींची अत्युच्च कल्पना ही प्रेषिताच्या ईश्वराविषयीं प्रत्यक्ष मुलाखतीच्या विचारास सोडून आहे.

ईश्वरानें कुराण सर्व एकदम न सांगता सावकाश थोडथोडें सांगितलें असें पुस्तकाच्या प्रत्यक्ष रचनेवरूनहि दिसतें. या प्रत्येक भागास कुराण ( पाठ, वाचन अगर पाठसंग्रह ग्रंथ ), किताब (लेखन) किंवा सुर (लेखमाला) असें म्हणत यापैकीं शेवटचें नाव हें महंमदाच्या हयातींतच संकलित ग्रंथापासून विवक्षित भागांचें पृथक्त्व दाखविण्याकरिता उपयोगांत येऊं लागलें व तें कुराणांतील भिन्न भिन्न अध्यायाचे वाचक होऊन बसलें. यापैकीं काहीं अध्याय लहान व काहीं मोठे आहेत. लहान अध्याय अथवा सुरापैकीं काहीं पूर्ण आहेत यावरून जे मोठे आहेत ते अनेक प्रकटीकरणाच्या संमिश्रणानें बनलेले असावेत अशी साहजिक कल्पना होते. या कल्पनेस पुढील गोष्टींनीं बळकटी येत. निरनिराळ्या परंपरातून मोठ्या सुरांतील विचाराची माला ठिकठिकाणीं तुटलेली दिसते. आणि वास्तविक मोठ्या सुरांतील अनेक भाग मुळांत वेगळे होते असें दाखवावयास पाहिजे. लहान सुरांत देखील काहीं भाग मुळांत नसताना आलेले आहेत. परंतु हें मत चोंहोकडे लावता कामा नये. कारण १० व्या अध्यायांत आरंभीं थोडी प्रस्तावना, नंतर जोसेफच्या इतिहासाचा भाग, त्यानंतर उपसंहारात्मक थोडासा भाग अशी सुंदर रचना व विसाव्या अध्यायांत मोझेसच्या इतिहासाविषयीं स्वयंपरिपूर्ण भाग पाहून हे अध्याय प्रथम पासूनच इतके लांब होते असे दिसतें अठराव्या अध्यायांत प्रथम "सात निद्रित" मोझेसची हकीकत वगैरे. निरनिराळ्या विषयाचा उपक्रम केलेला दिसतो. पण शेवटीं ते सर्व जोडले जातात. पृथक कथाभागांत देखील कुराणांत एका विषयावरून दुसऱ्यावर कशा उड्या मारलेल्या आहेत, विचाराचा संदर्भ राखण्यांत किती निष्काळजीपणा दाखविला आहे, अगदीं आवश्यक असलेले मागचे भाग कसे गाळलेले आहेत हे आपणास चांगलें पाहतां येतें. यासाठीं कुराणांत कोठेंहि असंबद्धता दिसल्यास आपणांस असें म्हणतां येणार नाहीं कीं येथें तें तुटलें आहे व मागाहून कोणी तरी ठिगळ देण्याचा प्रयत्न केला आहे. जुन्या अरबी

कवितेंत हा नेहमींचाच प्रकार आहे. नव्या विषयास सुरुवात केल्यानंतर मध्येंच एकाएकीं जुन्या विषयावर येणें ही गोष्ट कुराणांत फार आढळते. थोडक्यांत सांगावयाचें तर रचनेच्या दृष्टीनें कुराणांत कितीहि उणीवा असल्या तरी बहुतेक हल्लींचे सूर मूळ सुरांना धरून आहेत.

महंमदाच्या मनामध्यें प्रकटीकरण कसें झालें याचा विचार करणें म्हणजे कवीच्या मनःप्रवृत्तीचें पृथक्करण करण्यासारखें आहे. त्याच्या प्रथम वयांत व क्वचितप्रसंगीं पुढेंहि हीं प्रकटीकरणें मनाच्या आवेगाबरोबर एकदम उसळून बाहेर आलीं असलीं पाहिजेत, व त्यामुळें तीं दैवी स्फूर्तीशिवाय अन्यथा अन्तर्लिपीं त्याला वाटणें शक्य नसावें. शांत चित्तानें पद्धतशीर शुद्ध विचार करणारा तो नसून मौलिक बळ नसलेला व धर्मभोळेपणांत वाढलेला असा कल्पनाविहारी होता, शिवाय पाखंडी वृत्तीची उणीव त्याच्या स्वभावांत नसल्यामुळें विरोध उत्पन्न होतांच, चिडणारा व ज्याचें चित्तांत विचारामुळें विशिष्ट भावनांचें प्राबल्य वाढलें आहे असा होता. यामुळें धार्मिक कल्पनाचित्रें डोक्यांत भरतांच देवदूत आपणास अमुक अमुक म्हणावयास सांगतो आहे असें त्यास साहजिकच वाटे. कांहीं भाग त्याच्या तोंडून कोणीच ऐकिला नाहीं तर कांहीं तो विसरला असें कुराणांतच म्हटलें आहे. यांतील बराच मोठा भाग भावनाप्रधान आहे व कांहीं भाग शुद्ध बौद्धिक स्वरूपाचा आहे.

कुराणाचें लेखन.—कुराण कसें लिहिलें गेलें हें निश्चित नाहीं. महंमदानें स्वतः कांहींच लिहिल्याचें माहीत नाहीं. त्यास आधीं लिहितां वाचतां येत होतें किंवा नाहीं याविषयीं मुसुलमान लोकांत अद्याप वाद चालतो. पण तो जरी लेखनाच्या बाबतींत अगदींच अज्ञ नव्हता तरी संवयीच्या अभावीं कोणी लेखक नेमणें सोयीच्या दृष्टीनें अधिक बरें असें त्यास वाटलें असावें असें मानण्याकडे लोकांचा कल हल्लीं होत आहे. इ. स. ६२२ मध्यें मदिनेस पळून आल्याच्यावेळीं कांहीं तुकडे विशेषतः तंट्याचे निकाल लावतांच मुद्दाम नेमलेल्या लेखकाकडून लिहिण्यांत आले. यावरून मक्केंत असतांनाच त्यानें आपलीं वचनें लिहिण्यास सुरुवात केल्याचा संभव दिसतो. तसेंच जुन्या अध्यायांत नवीन भर घालणें वगैरे गोष्टींवरून कुराणाचे मोठमोठे भाग पूर्वींपासून लिहिले गेले होते असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण जरी कांहीं अध्याय त्यानें निरनिराळ्या प्रसंगीं थोड्याशा फरकानें निरनिराळ्या लोकांना सांगितले तरी सगळे लांब लांब अध्याय त्याला अगदीं बिनचुक पाठ येत असतील असें समजतां कामा नये. असे पाठभेद उत्पन्न करण्यांत जुन्यांत सुधारणा करण्याचा त्याचा हेतु असेल व अर्थास न दुखवितां जेथपर्यंत नुसत्या भाषेचा फरक पडत असतो तेथपर्यंत त्याच्या अनुयायांत घोटाळा उडत नाहीं; कारण दैवी संदेशाच्या भाषेच्या शुद्धतेविषयीं शंका उपस्थित करण्याची प्रवृत्ति त्याच्यांत नाहीं. तरी कित्येक ठिकाणीं हा फरक उपेक्षा करण्यासारखा नाहीं. म्हणून कुराण स्वतः न कबूल करतें कीं नास्तिक लोक उपहासानें महंमदास, ईश्वर कधीं कधीं एका कवितेच्या जागीं दुसरी कविता दडपून देतो असें म्हणतात (१६।०३). एका प्रसंगीं खुद्द महंमदाच्या दोघा अनुयायांत महंमदानेंच सांगितलेल्या दोन भिन्न पाठांपैकीं खरा कोणता याविषयीं वाद चालला असतां कुराण सात पाठांत प्रकट झालें असा महंमदानें खुलासा केला असें म्हणतात. या अस्सल वचनांतील सात हा शब्द फक्त मर्यादित संख्येचा निदर्शक आहे. परंतु यामुळें मुसलमान धर्मशास्त्रज्ञांना आपल्या हटवादी मताशीं त्याचा मेळ घालतांना केवढे प्रयास पडले असतील! पाठभेदाबद्दल अनेक उदाहरणें आढळतात व त्यांपैकीं कांहीं शुद्ध प्रेषिताचा आधार दाखवितात; आणि कुराणाच्या विवरणांत महंमदाच्या कल्पना बोधणाच्या वचनास अग्रस्थान देण्यांत येतें. एक अगदीं लाडकें पण तितकेंच असमर्थनीय समर्थन आहे तें असें कीं, हे सात पाठ म्हणजे अरबी भाषेचे सात पोटभेद होत.

रद्द झालेले पाठभेद.—अशा परिस्थितींत साहजिकच महंमदाला एकच सर्वमान्य पाठ असावा असें वाटत असावें, पण तसें करण्यांत त्यानें श्रम घेतले नाहींत इतकेंच. व त्याच्या व्यावहारिक बुद्धीला पुढच्या काळांतील धर्मशास्त्र्यांच्या इतका काटेकोरपणा ग्राह्य वाटला नाहीं. तथापि क्वचित कांहीं प्रकरणें किंवा कविता रद्द समजून विसरून जावयास त्यानें आपल्या अनुयायांस सांगितलेलें आहे. एक ध्यानांत ठेवण्यासारखें उदाहरण म्हणजे ५३ व्या अध्यायांतील दोन कविता होत. यांत तीन पाखंडी देवतांना त्यांचें ईश्वराजवळ वजन असल्यामुळें महंमदानें मोठी मान्यता दिली आहे. यांत अल्लाचा मोठेपणा कायम राहून शिवाय आपल्या देशबांधवांवर छाप बसवितां येणार होती. हा त्याचा उद्देश सिद्धीस गेला परंतु पुढें त्याचें मन खाऊं लागलें तेव्हां त्यानें हे शब्द सैतानाच्या प्रेरणेमुळें निघाले असें प्रसिद्ध केलें.

रद्द ठरलेले नियम.—कुराणांत वारंवार आढळणाऱ्या मुसुलमानांसंबंधींच्या कायद्याच्या व नियमाच्या बाबतींत निराळाच प्रकार आढळून येतो. महंमदाच्या ईश्वरविषयक कल्पनेस तफावत पडण्यासारखें यांत कांहीं नाहीं. त्याच्या दृष्टीनें ईश्वर म्हणजे सर्वसत्ताधारी, कोणत्याहि गोष्टीचा बरेवाईटपणा बेफिकीरपणें स्वतःच्या जबरदस्तीच्या हुकुमानें ठरविणारा, स्वेच्छेनुसार आज्ञा फिरविणारा, ख्रिस्ती, ज्यू व मुसुलमान यांना वेगवेगळे कायदे लावणारा असा आहे. उदाहरणार्थ कुराणांत निरनिराळ्या प्रसंगास अनुसरून मूर्तिपूजकांना मुसुलमानांकडून मिळणाऱ्या प्रायश्चित्तांसंबंधीं भिन्न भिन्न आज्ञा आढळतात. त्या रद्द करण्याचा विचार महंमदास शिवला असल्याचें दिसत नाहीं. पुढील पिढ्यांतील लोकांना यांतील रद्द भाग सहज निश्चित करतां

येणार नाहींत. ही गोष्ट महंमदाच्या ध्यानात आली नसावी कारण साहजिकच त्याची नजर आपल्या धर्माच्या लोकाच्या भविष्यकालापर्यंत पोंचूं शकली नाहीं. प्रकटीकरणात प्रासंगिक गोष्टी तशाच कायम राखण्यात आल्या आहेत. मदिनेंत असताना अत्यंत जरूरीच्या प्रश्नावर ईश्वराकडून तावडतोब उत्तर मिळण्याचे प्रसंग इतके वारंवार आले कीं श्रद्धाळू लोकाना त्याबद्दल सानंदाश्चर्य वाटलें. खलीफ (उस्मान)नें देखील एकदा असें म्हटलें आहे कीं, 'जर प्रवक्ता आज ह्यात असता तर या मुद्द्यासबधीं कुराणात नवी आज्ञा प्रकट झाली असती.' तसेंच महंमदाच्या पट्टशिष्यानीं सुचविलेल्या विचाराशीं ईश्वरी आज्ञा मिळल्या झाल्याचीं उदाहरणेंहि थोडीं नाहींत एक आख्यायिका अशी आहे कीं, पुष्कळदा उमरचें एक प्रकारचे मत असें व नंतर त्यास अनुसरून कुराण प्रकट होई.

कुराणात काय काय आहे :—कुराणाच्या निरनिराळ्या भागात अगदीं भिन्न भिन्न विषय आलेले आहेत. पुष्कळ प्रकरणातून धार्मिक व नैतिक विषयाचा ऊहापोह केलेला आहे ईश्वराचा मोठेपणा, भलेपणा व पुण्यशीलता याचें भक्तास वारवार स्मरण दिलें आहे. ईश्वर हा एक असून सर्वशक्तिमान आहे. अशी त्याची श्रेष्ठता दर्शविली आहे. प्रवक्ता ख्रिस्त अशासारख्या मनुष्यास अगर मूर्ति वगैरेंना देवत्व देण्याची कल्पना अत्यंत निंद्य मानिली आहे. स्वर्गीय सौख्यें व नरकातील क्लेश याचें अगदीं स्पष्ट शब्दचित्र काढलें असून शेवटचा जगाच्या न्यायाचा दिवस येण्याच्या प्रसंगींच्या सर्व विश्वाच्या भयप्रद स्थितींचेंहि वर्णन आहे. आस्तिक लोकाच्या करता त्यात नैतिक नियमाचे पाठ असून विशिष्ट प्रसंगीं उपयोगीं पडणाऱ्या सूचनाहि आहेत. निरत्मात्यांची निर्भर्त्सना केली आहे; शत्रूंना भयंकर शिक्षेची धमकी दिली आहे व नास्तिकास इस्लामाचें सत्यत्व पटविण्याचा प्रयत्न केला आहे. कुराणात काहीं ठिकाणीं उपदेशाची भाषा आहे व काहीं ठिकाणीं सामान्य आज्ञा केल्याप्रमाणें अथवा एखादी गोष्ट जाहीर केल्याप्रमाणें भाषायोजना आहे. दिवाणी कायद्यापासून तों महंमदाच्या जनानखान्यापर्यंत व्यवस्था करणाऱ्या आज्ञा बऱ्याच मोठ्या भागात आहेत. एका अध्यायात प्रार्थना आहे, दोहोंत जादूचें तंत्र आहे, कांहींत एकच विषय प्रतिपादिलेला आहे तर बाकीच्यात अनेक विषय आणले आहेत.

कथा भाग —कुराणातील ऐतिहासिक भाग सागण्यात महंमदाचा हेतु दुष्टाना शासन व शिष्टाना लाभ कसा होतो हें दाखविण्याचा दिसतो. महंमदाच्या वेळीं अरब लोक ज्या देवताची पूजा करीत त्याच्या नावाचा उल्लेख करून कुराणांत नोहाला त्याविरुद्ध भांडावयास लाविलें आहे. अशा तोंडी घातलेलें भाषण स्वतः महंमदाचें अगर "ईश्वराचें असें वाचकास वाटतें. दुसऱ्या कांहीं कथा केवळ मौजेखातर दिल्या आहेत. कुरेश लोक या कथाना फारसा मान देत नसत.

जुन्या व नव्या करारांशीं कुराणाचें नातें.—वरील कथा पुराणातील व विशेषतः जुन्या करारातील व्यक्तींच्या आहेत पण ग्रंथ नुसता ऐकून त्यातील कथा घेताना होणाऱ्या फरकासारखे फरक पुष्कळ झाले आहेत. अगदीं अज्ञानी ज्यूचा देखील हामन हा कोणाचा प्रधान हीं गोष्ट, अगर मोझेसची बहीण (मेरिआमा) व ख्रिस्त माता मेरी याविषयीं घोंटाळा झाला नसता या चुकाना भर घालण्यासाठींच की काय दुसरेहि पुष्कळ तऱ्हेवाईक फरक महंमदाच्या अज्ञानामुळें झाले आहेत. १२ ६९ मध्यें तो ईजिप्तची सुपीकता पावसावर अवलंबून आहे असें म्हणतो.

यातील अलेक्झांडरच्या वृत्तात ज्यू अगर ख्रिस्ती ग्रंथातून घेतला गेला हें निश्चित नाहीं यातील त्याच्या शिंगाचा उल्लेख अगदीं अलीकडील शोधाप्रमाणें इ स ५१४-१५ च्या सीरियन दंतकथेशीं जुळविता येईल ज्यू व ख्रिस्ती इतिहासाखेरीज यात अरबी प्रवक्त्याच्या कथा असून त्याच्यात याहूनहि अधिक फेरफार करण्यात आला आहे.

लिखित माहितीपेक्षा ऐकीव माहितीवरच महंमदाची भिस्त आहे असें वर म्हटलेंच आहे. जुन्या किंवा नव्या करारांशीं क्वचित् जेथें प्रत्यक्ष साम्य सापडूं शकतें तेथें म्हणजे जुना करार (२१. १०५ तसेंच साम ३७ २९; ६. ५ व ३७ ११ पहा) किंवा नवाकरार (७. ४८ व ल्यूक १६. २४, ४६ १९ व ल्यूक १६. २६). याठिकाणीं एखाद्या ज्यूचा अगर ख्रिस्त्यावरोबर झालेल्या संभाषणातील सहज लक्षात ठेवलेल्या गोष्टींपेक्षा अधिक सापडत नाहीं. ज्यास वरील परिस्थितीचें यत्किंचित ज्ञान असेल त्यानें हे तोंडी भाषणातील उतारे मानूं नये तथापि जेथें पाणी मिळणार नाहीं तेथें वाळूचा उपयोग करा अशी तलमुदशीं जुळणारी आज्ञा पाहून आपणास महंमदाला तालमुद देखील माहित असलें पाहिजे असें म्हणावें लागेल. याकोन्या बाबतींत असें म्हणता येईल कीं, ग्रंथ या संज्ञेस शोभेल असें कुराणाच्या पूर्वी अरबी भाषेंत वाङ्मय असणें अगदीं असंभवनीय आहे.

भाषाशैली —भाषाशैलीच्या दृष्टीनें कुराणाचे निरनिराळे भाग निरनिराळ्या योग्यतेचे आहेत निर्विकार मनाच्या वाचकास त्याची सौंदर्यग्राहकतेची तृषा शमविण्यासारखा फारच थोडा भाग आढळेल, तरी त्यास मनोविकाराचा जोर व कल्पनाशक्तीचा प्रभाव दिसून येतो. स्वर्गाच्या वगैरे वर्णनात कवित्व दिसून येत असून ९१ अध्यायामध्यें तर भरपूर प्रसाद दिसून येतो. कुराणाचा बराच मोठा भाग गद्यात्मक आहे, व त्याची भाषा बोजड आहे. वारसासंबंधींच्या वगैरे नियमाची भाषा गद्यात्मक असावी हें ठीक आहे, पण महंमदानें स्वतःच्या व श्रोत्याच्या आवडीस अनुसरून प्रथमतः

पत्करलेल्या गद्यपद्यात्मक भेसळीच्या भाषापद्धतीस चिकटून राहण्याचा त्याचा हट्ट चुकीचा आहे कारण गद्य भाषेस योग्य असे विषय त्यानें कवितेत व्यक्त केल्यामुळे ग्रंथात विरूपता आढळून येते कदाचित् जे दोन तीन पाठ एकदाच वाचतांना आज आपणांस त्रासदायक असे वाटतात ते मक्केच्या तत्सदृश उपदेशपद्धतीनें म्हणून दाखविले जात असतां त्याचा श्रोत्यावर अगदीं निराळा परिणाम होत असेल कारण आपल्या ध्यानात मुद्दा न येणाऱ्या अनेक गोष्टी त्यांना सार्थ अशा असतील. तीन चार वर्षांत पावसाचें दर्शनहि ज्यांना लाभत नाहीं अशा अरबांना महंमदानें केलेलें मेघ उत्पन्न करून ते रखरखीत प्रदेशावर पाडून त्यास फलपुष्पांनी समृद्ध करणाऱ्या ईश्वराच्या थोरपणाचें वर्णन खास हृदयस्पर्शी वाटत असेल.

*अलंकारयुक्त स्वरूप व कविता.*—पहिल्यापहिल्या अध्यायात कवित्वविषयक शब्द असल्यामुळें मक्केतील लोक महमदास प्रासादिक कवि म्हणत असले तरी महमद स्वतःस दैवी स्फूर्तीचा प्रवक्ता समजत असल्यामुळें त्याला ती पदवी सोडावी लागली. पण आपण सुद्धा त्याला कवित्वाच्या आरोपातून मुक्त करूं. कट्टया धार्मिक लोकांप्रमाणें त्यासहि काव्यसौंदर्याची ग्राहकता मुळीच नव्हती. यावरून कुराणाची भाषा काव्यमय नसून अलंकारिक आहे असें ठरतें. व त्याचा जो विलक्षण परिणाम आपणावर होतो तो काव्यामुळें नसून अलंकारिक भाषेमुळें होतो. स्वाभाविक यमकें फार थोड्या ठिकाणी आढळतात. तरी यमकें साधण्याचा सर्वत्र प्रयत्न केलेला आहे. यमकाची कविता त्यावेळच्या अरबांना फार आवडे, व म्हणून महमदानें ती पत्करली होती. यानें जरी थोडी शोभा आली तरी कित्येक ठिकाणी ती निवळ ओझ्यासारखी भासते. काहीं काहीं ठिकाणीं यमकासाठीं क्रियापदाचीं भलतींच रूपें घातलेलीं मुसुलमानांना देखील कबूल आहेत अर्थहानीहि कित्येक ठिकाणीं केलेली आहे. एरवीं ईश्वराच्या सिंहासनासभोंवार देवदूतांची संख्या सांगतांना ( ६९. १७ ) केवळ यमकास जुळल्यामुळें घातलेला आठाचा आकडा त्यानें घातला असता असे नाहीं. तसेंच ४५ व्या अध्यायात स्वर्गातील दोन बाग, त्यात दोन झरे, दोन प्रकारचीं फळें हीं सर्व या सबंध अध्यायात प्रामुख्यानें असलेल्या यमकास शोभणारा द्विवचनाचा प्रत्यय असल्यामुळेंच घातलेलीं असावींत पुढील पुढील भागांत नुसतें यमक पूर्ण करण्यासाठीं महमद असंबद्ध धार्मिक वाक्यें घालतो.

*निरनिराळे भाग व त्यांचा काल.*—भाषासौंदर्याच्या दृष्टीनें बराच भाग जरी उत्तम आहे तरी साहित्यदृष्ट्या पुस्तक पहिल्याप्रतीचें वाटत नाहीं. घडलेल्या हकीकतींतील किंवा प्रवचनातील अगदीं जरूर असलेले दुवे गाळले गेले आहेत, यामुळें त्या हकीकती ज्यांनीं पूर्वी ऐकिल्या त्यांच्यापेक्षा आम्हांस त्या दुसरीकडून माहीत झाल्यामुळें चांगल्या कळतात.

*वेगवेगळ्या भागांचा काळ*—हल्लींच्या कुराणापैकीं काहीं मक्केच्या वेळचें ( इ. स. ६२२ पूर्वी ) व काहीं मदिनेच्या पलायनानंतरचें ( इ. स. ६२२ च्या सुगीपासून ८ जून ६३२ पर्यंत ) आहे. मक्केंत महंमद एका लहानशा समाजाचा आचार्य म्हणून होता पण मदिनेंत प्रथम तो एका जोरदार पक्षाचा पुढारी होता व पुढें सर्व अरबस्तानचा शास्ता झाला या फरकाची छाया कुराणावर पडलेली असून मदिनेंतील अध्याय मक्केच्या अध्यायांशीं मिसळलेले असतांहि स्पष्ट उघडकीस येतात. मदिनेंतल्या प्रकटीकरणाचा आपल्यास माहीत असलेल्या गोष्टींशीं संबंध आल्यामुळें व त्याच्या तारखा साधारणतः बरोबर माहीत असल्यामुळें त्याचा काळ आपल्यास निश्चित ठरविता येतो मुसुलमानाच्या परंपरेचाहि येथें बराच उपयोग होतो तरी बऱ्याच भागाविषयीं अनिश्चितता रहाते डॉ स्नूक हुर्ग्रोंजे यानें आपल्या निबंधात दर्शित केलेली इब्राहिमची दंतकथा ही एक मक्केंतील वेगवेगळे अध्याय केव्हां झाले याची उत्तम कसोटी आहे त्या दंतकथेंत ज्यू लोकांशीं झालेल्या वादानंतर इब्राहिम सर्वांत पहिला महमदाचा मदिनेंतील पुरस्कर्ता झाला, नंतर पहिला मुसुलमान व नंतर 'काबा'चा संस्थापक झाला एक परंपरा सर्व अध्यायांची कालाच्या दृष्टीनें संगति लावणारी आहे पण ती परंपरा हल्लींच्या अध्यायांतील फुटकळ भाग वेगवेगळ्या काळीं झाले असें मानीत नसल्यामुळें व दुसरीं अनेक शंकास्थानें असल्यामुळें तितकी ती विश्वासार्ह वाटत नाहीं एक तर महंमदाच्या वेळची कोणी अशी यादी तयार करील असें वाटत नाहीं, व कोणी प्रयत्न केला असल्यास मक्केंतील अध्यायांची विश्वसनीय माहिती त्यास मिळाली असणेंहि अशक्य आहे तेव्हां यात खरी परंपरा नसून महमदाच्या कालानंतर शेंकडों वर्षांनीं झालेल्या एखाद्या सखोल मुसुलमान शोधकानें तयार केलेली असावी.

*मक्केंतील अध्याय*—मक्केंत व्यक्त झालेल्या प्रकटीकरणात बहुतेक अगदीं लहान लहान अध्याय असून त्यांची रचना किंवा रोख मदिनेंतील अध्यायाहून अगदीं भिन्न आहे. यांतील विशिष्ट भाषासरणी पूर्णपणें एकसारखी असल्यामुळें त्यांचा वेगळा वर्ग आपण मानूं याच्या उलट दुसरा एक वर्ग असा पडतो कीं, त्याचें मदिनेंतील अध्यायांशीं पूर्ण साम्य आहे यावरून पहिल्या वर्गास आपण जुना वर्ग व या दुसऱ्या वर्गास नवा वर्ग असें मानूं या दोन वर्गांच्या दरम्यान तिसरा एक वर्ग असून त्यांतील अध्याय पहिल्या वर्गांतून अखेरच्या वर्गांत झालेल्या फरकाचे निदर्शक आहेत. प्रोफेसर वीलनें दर्शविलेल्या या पृथक्करणांत स्पष्ट अंतर दिसून येणें शक्य नाहीं व काहीं अध्याय कोणत्या वर्गांत पूर्णपणें पडतील याचा ठाम निश्चय होत नाहीं, किंवा या वर्गांतील अध्यायांचा कालाच्या दृष्टीनें क्रम लावणेंहि तसेंच अशक्य आहे. याकरितां योग्य

अभावीं आपण महमदाच्या मानसिक प्रगतीच्या अनुरोधानें या अध्यायाचा क्रम लावावा अर्थात् असें करताना कल्पनेवर जास्त भिस्त ठेवावी लागेल वस्तुस्थिति अशी आहे कीं, महमदाच्या पलायनापूर्वीची कांहींच माहिती नाहीं, तो प्रवक्ता बरोबर कधीं झाला हे देखील उपलब्ध नाहीं बहुधा हा काळ इ स ६१० असावा तिसऱ्या वर्गापैकीं अध्याय ३० १ पासून पुढील भागात आलेला उल्लेख इ स ६१४ च्या वसंतऋतून दमास्कसपासून ज्वळच पर्शियनानीं बिझान्शिअम वर मिळविलेल्या जयाचा असाव अशी एक परंपरा मानत. यावरून पाहता हा निसरा वर्ग मक्केतील कारकीर्दीचा बराच भाग व्यापून असावा आवेशयुक्त स्वरूपाचा पहिला वर्ग थोड्याच काळातील असावा हेंहि असंभाव्य नाहीं व इ स. ६१५—१६ मध्यें उमर मुसुलमान झाला त्यावेळीं दुसऱ्या वर्गात मोडणारा २० वा अध्याय लिहून तयार होता या म्हणण्यासहि वरील विधानानें बाध येत नाहीं तथापि कालाच्या दृष्टीनें क्रम लावण्यासारख्या पुराव्याच्या अभावीं आपणास मक्केतील अध्यायाच्या या तीन मोठ्या वर्गाचा तरी निश्चित क्रम लावता आला येवढ्यात आपण समाधान मानलें पाहिजे

मक्केतील जुन्यांत जुने अध्याय—पहिल्यानें महमदाच्या क्षुब्ध मन प्रवृत्तींचा जोर इतका वाढत असे कीं त्यास शब्द सुचत नसत यावेळच्या त्याच्या वचनावरून आपणास जुन्या राज्ञी भविष्यवाद्याचा आठवण होते कारण त्याच्या भाषापद्धतीच्या नकला हल्लीं आपणास पहावयास मिळतात त्याच्याशीं यांचें बरेंच साम्य आहे यावेळेचे अध्याय लहान, यातील वाक्यें लहान व साधारण शुद्ध पण सारखी बदलणारी वृत्तरचना यांनीं युक्त असून, कांहींच्या आरंभीं असणाऱ्या शपथा भविष्यवाद्याच्या शपथा प्रमाणेच आहेत कांहीं शपथांचे अर्थ समजत नाहींत व कांहींना समजण्यासारखा अर्थच नसावा कारण सर्व प्रकारचे चमत्कार या अध्यायांतून भरलेले आहेत ठिकठिकाणीं महमदास साक्षात्कार झालेले आहेत व त्याच्या डोळ्यापुढें देवदूत प्रत्यक्ष दिसलेले आहेत शेवटच्या दिवसाचीं व पुनरुत्थानाचीं स्पष्ट वर्णनें आहेत, तर दुसरीकडे स्वर्गातील सुखाचीं व नरकातील दुःखाचीं वर्णनें आहेत तथापि सगळेच जुने अध्याय असे नसून कांहीं अधिक शांत अवस्थेमध्यें प्रकट झालेले आहेत सगळ्या कुराणात जुन्यांत जुना भाग ९६ व्या अध्यायाच्या प्रारंभास असलेला होय असें एका सुप्रसिद्ध परंपरेनें मत आहे या परंपरेचा संबंध महंमदाच्या आवडत्या बायको (आयेषे)कडे पोहोंचतो परंतु ज्यावेळीं हा अध्याय झाला त्यावेळीं ती जन्मली नव्हती व ही गोष्ट महमदानें तिला मागाहून कित्येक वर्षांनीं आठवण म्हणून सांगितलेली असावी शिवाय हा की दावा विश्वासार्ह नसून दुसरेहि कांहीं भाग सर्वांत जुने असल्याबद्दल अनेक मतें आहेत एकंदरींत ज्यात महमदास देवदूतानें सांगितलेलें प्रकटीकरण पाठ म्हणावयास आज्ञा झालेली आहे तो ९६ १ पासून पुढील भाग सर्वांत जुना असला पाहिजे यात ईश्वराचें सर्वशक्तिमत्त्व व कृपादृष्टि यांचें उदाहरण म्हणून मांसाच्या गोळ्यापासून मनुष्याची उत्पत्ति व लेखनकला या दोन गोष्टी येऊन चुकल्या आहेत या आवेशयुक्त अध्यायांतून ईश्वराचें एकत्व वगैरेंचा थट्टा करणाऱ्याना भयंकर धमक्या महमदानें दिल्या आहेत १११ व्या अध्यायात त्यान आपल्या अबू लाहाब नावाच्या चुलत्याला व त्याच्या बायकोला त्यानें दांडगाईनें प्रतिकार केल्याबद्दल नरकात घालविलें आहे या काळीं झालेल्या अध्यायांपैकीं बहुतेक हल्लींच्या कुराणाच्या शेवटास आहेत व प्रथमत ते पुष्कळच असून नंतर त्यातील कांहीं लुप्त झाले असावेत असें वाटतें

महमदाचा सत्र जोर व्यवस्थित तत्त्वविवेचनापेक्षा आवेशयुक्त कल्पनाशक्तीवर अधिक असल्यामुळें तीच ज्यात अधिक दृष्टीस पडते अशा या भागावर आपली नजर असणें अधिक योग्य होय दुसऱ्या वर्गातील अध्यायात कल्पनेचा भाग कमी कमी होत जाऊन त्यातील ध्वनि नीरस होत गेला आहे नवीन तत्त्वाची सिद्धता जुन्याच उत्तरानीं केलेली आहे, अध्याय लांब लांब झाले आहेत, प्रतिस्पर्ध्यांच्या थट्टेच्या टीकेला देखील पुळचट उदाहरणानीं उत्तरें दिलीं आहेत ज्या जुन्या तत्त्ववेत्त्याचे पूर्वी उल्लेख आलेले होते त्याचाच लांबलचक इतिहास सांगितला आहे व एकंदरींत भाषापद्धतीची मौज गेली आहे असें म्हणावें लागतें.

फातेहा—दुसऱ्या कालातील अगर पहिल्या कालाच्या अखेरचा असा कुराणाचा पहिला अध्याय असून हा फार महत्त्वाचा आहे त्यात मुसुलमानाची ईश्वरास प्रार्थना असून त्याची मदत व ( हुद्दा ) योग्य मार्गाची जाणीव या गोष्टी मागितल्या आहेत अल् फातेहा अध्यायातील वाक्यें खालीं दिल्याप्रमाणें आहेत

"( १ ) परम दयाळू ( व ) कृपाळू ईश्वराच्या नावानें ( मी आरंभ करितों ), ( २ ) सर्व जगाचा पालनकर्ता जो ईश्वर त्यालाच सर्व स्तुति ( योग्य होय), ( ३ ) ( तो ) परम दयाळू ( आणि ) कृपाळू ( आहे ), ( ४ ) निर्णयाच्या दिवसाचा धनी आहे ( ५ ) ( हे परमेश्वरा ) तुझेंच पूजन आम्ही करितों व तुझेंच साहाय्य मागतों ( ६ ) तू आम्हास सन्मार्गास लाव. ( ७ ) ज्या ( लोका )वर तूं कृपा केली आहेस त्यांचा मार्ग ( दाखव ) ज्याच्यावर तुझा अनुग्रह पण ज्याच्यावर ( तुझा ) कोप झालेला आहे त्याचा ( मार्ग ) नको आणि आडमार्गी भटकणाऱ्याचाहि नको

वरील विधानात याची एकहि नवी कल्पना नाहीं यातील सात वाक्यांपैकीं पाच वाक्यांचा ख्रिस्ती व ज्यू उपासनापद्धतींतील गोष्टींच्या उक्तीशीं उघड संबंध पोहोंचतो. सहवी उके सम ७ ११ शीं शब्दश जुळते ईश्वराच्या

दयाळुत्वाचें दर्शक ' रहमान ' हें नाव ज्यूंच्या ' रहमाना ' याहून भिन्न नाहीं दक्षिण अरबस्तानांत महमदापूर्वी ईश्वरा बद्दल हें नाव बराच काळ अस्तित्वांत होतें ( उदा. सांविअन इन्स्क्रिप्शन्स ग्लेसर, ओळ ३२, ६१८ ओळ २ )

मूर्तिपूजकांनीं ' अल्ला ' या उपपादांत आणलेल्या नावा-ऐवजीं ' रहमान ' हें नाव ईश्वराबद्दल योजावें असा महम दाचा कांहीं काळ हेतु असावा असें दिसतं हा उद्देश पुढें त्यानें सोडून दिला तरी दुसऱ्या काळांतील अध्यायांत 'रहमान' या नावाचा वारंवार उपयोग केला गेला आहे यावरून जरी आपणास हा अध्याय दुसऱ्या काळांत घालता येतो तरी तो मक्केंतील कारकीर्दीच्या आरंभाचा होता किंवा त्यांतील ' ईश्वराच्या नावानें ' हें प्रारंभवाक्य मूळचें त्यांतील होतें किंवा कसें हें आपणास ठरवितां येत नाहीं अर्थात् जुन्या परंपरेच्या दृष्टीला कालविषयक विकल्प दिसत नाहीं व ' फातेहा ' हा कुराणाचा अत्युच्च भाग मानला जाऊन प्रत्येक मुसुलमान पांच प्रार्थनांत मिळून वीस वेळां त्याचा उच्चार करतो

म र्के तील अ खे र चे अ ध्या य —ह्यांच्या कुराणां-तील मोठा भाग व्यापून टाकणारे तिसऱ्या काळांतील अध्याय अगदीं नीरस आहेत बहुतेक प्रकटीकरणें लांब लांब आहेत, व त्यांतील उक्तीहि लांब आहेत त्यांची भाषा प्रवचनवजा आहे हे अध्याय अगोदरच वश झालेल्या मनाची धर्मबुद्धि वाढविणारे असतील पण नवाल्या मनुष्यावर त्याचा कांहीं परिणाम होणार नाहीं। परंतु इस्लामाचा प्रसार होण्याच्या कामीं हेच लांब अध्याय विलक्षण परिणाम-कारक झालेले आहेत कारण महंमदाचे अनुयायी तार्किक विचाराची ओळख नसलेले व जुना धर्म टाकून दिलेले असे होते

म दि नें ती ल अ ध्या य —मदिनेंतील अध्यायांचा ऐतिहासिक क्रम लावणें सोपें आहे कारण मदिनेंतील महं-मदाच्या इतिहासाचें आपणास पुरेसें ज्ञान असून कांहींचे ऐतिहासिक प्रसंग स्पष्ट आहेत तर कांहींच्या परिस्थितीवरून त्यांचा काळ ठरवितां येणें शक्य आहे तथापि थोडा भाग राहतो तो मदिनेंतील आहे येवढेंच आपणास म्हणतां येतें

मक्केंतील अखेरच्या अध्यायाप्रमाणें यांचीहि भाषा गद्य असून मधून मधून अलंकारिक व कांहीं प्रसंगीं तेजस्वी अशी आहे लढाईस आमंत्रण करणें, पूर्वीच्या जयापजयाबद्दल विचार प्रकट करणें, श्रद्धाहीनत्वाबद्दल कानउघाडणी करणें वगैरे अनेक वेगवेगळ्या बाबतींत महमदास मुसुलमानांना निरोप सांगावयाचे असत कांहीं लोक श्रद्धा व अश्रद्धा यांच्या दरम्यान असत, अशा लोकांना तो स्वत 'शकेजोर' म्हणत असे या सर्वांचा एक मेळ नसे व प्रसंग प्राप्त झाल्या-वर सगळेच मार्गे रहात मदिनेंतील ज्यू लोकांवरोवर त्याच्या नेहमीं कलागती होत व त्या विकोपास जात असत मक्कें-तील इतर अध्याय सामान्य कायदेकानूविषयीं व प्रासंगिक प्रश्नाविषयीं असून ते प्रथम लहान होते तरी मागाहून कमी अधिक महत्वाच्या माहितीची भर पडल्यामुळें ते आतां मोठ्या अध्यायांत मोडतात सगळ्या कुराणांत मोठ्या वादाचा भाग म्हणजे महमदाचें स्त्रियासंबंधीं नातें दाखवि णारा होय

वरील माहितीवरून कुराणाचें बरेचसें अंतरंग कळून येईल हें एक अठरा धान्याचें कोडबोळें आहे यांतील धर्मविषयक, तत्वज्ञानविषयक व मुसुलमानांच्या कायद्याविषयींचा भाग येवढे भाग एकत्र केले असतांहि पुरण्यासारखें आहे सर्वच भाग एकत्र गोळा केले गेले ही लोकांच्या दृष्टीनें दुर्दैवाची गोष्ट आहे योग्य धार्मिक बुद्धि ठेवून वाचणारा वाचक मक्केंतील चालीरीतींवर टीकात्मक असलेला भाग उच्च नीतिविषयक भागापेक्षांहि अधिक मन पूर्वक वाचतो कारण त्यास यांच्या इतके ते भाग समजत नाहींत

गू ढ अ क्ष रें —एकोणतिसांच्या अध्यायांच्या आरंभीं कांहीं प्राथमिक अक्षरें असून त्यांचा अर्थ लावण्याचा अनेक विद्वा-नांनीं प्रयत्न केलेला आहे परंतु निश्चित असा निकाल यूरो-पीय अगर मुसुलमान विद्वानांनाहि अद्याप पर्यंत देतां आला नाहीं सामान्य लोक त्या अक्षरांचा अर्थ फक्त ईश्वरासच माहीत आहे अशी दूरदर्शीपणाची समजूत करून घेऊन संतुष्ट असतात

कु रा णा चे प्र व र्त न —ईश्वरी आज्ञा लोकांस पोहोंच-विण्याचें आपलें कर्तव्य आहे असें वाटल्यानंतर महमदानें मक्केंतच प्रकटीकरणें लिहून ठेवण्यास सुरवात केली असली पाहिजे महमदाच्या मरणानंतर कुराण विस्कळित तुक-ड्यांच्या स्वरूपांत होतें निरनिराळे भाग अनेक मुसलमा नांना तोंडपाठ येत असत पण संबंध ग्रंथ कोणासच माहीत नव्हता तोंडातोंडीं असलेल्या भागांत नवीन भर पडणें अगर त्यांतील कांहीं गहाळ होणें फार संभवनीय होतें तशांत महमदाच्या मृत्यूनंतर अरब लोकांशीं झालेल्या मोठमोठ्या झगड्यांत कुराण पाठ म्हणणारे अनेक मुसलमान बळी पडू लागल्यामुळें उमर यास काळजी पडून त्यानें अबूबकर नांवाच्या पहिल्या खलीफास कुराणाचे निरनिराळे भाग एकत्र करावयास लावलें त्यानें तें काम महमदाच्याच एका मदिनेंतील सय्यद इब्न थाबित नावाच्या लेखकावर सोंप-विलें त्यानें सपाट दगडावर, चर्मपत्रावर, ताडपत्राच्या दांड्यावर व अशाच दुसऱ्या पदार्थांवर लिहिलेल्या मजकुरा-वरूनच पण मुख्यत 'माणसाच्या हृदयापासून' म्हणजे लोकांच्या तोंडीं असलेल्या माहितीवरून एक प्रत तयार करून ती अबूबकर यास दिली व त्याजकडून पुढें ती उमर याजकडे आली त्यानें ती आपली हफसा नांवाची मुलगी—जी महमदाची विधवा स्त्री—तिला दिली या कुरा णाच्या मूर्त स्वरूपाला प्रारंभापासून धर्मशास्त्रविषयक प्रामाण्य नव्हतें व त्याची अंतस्थ रचनाहि केवळ तर्कागम्यच होती

उस्मानचें कुराण.—कुराणाच्या प्रती सर्वत्र एकप्रकारच्या नसल्यामुळें विद्वान लोकांत मतभेद उत्पन्न झाले व त्यामुळें त्याच्या अनुयायांत भांडणें सुरू झालीं. अशीं भांडणें होणें घातक आहे ही गोष्ट ६५०–५१ मध्यें झालेल्या युद्ध प्रसंगीं नेहावींदच्या वीर होधैफ याच्या ध्यानांत येऊन त्यानें उस्मान यास सर्वमान्य अशी एकच निश्चित प्रत करण्याविषयीं विनविलें हेंहि काम सय्यदावरच सोंपविण्यांत आलें व त्यानें तीन कुरेश लोकांच्या साहाय्यानें मिळण्यासारखीं सर्व पुस्तकें एकत्र करून सर्व मुसुलमानांना प्रमाण अशी एक प्रत पुनः तयार केली व पुनः घोंटाळा होऊं नये म्हणून बाकीचे सर्व पाठभेद जाळून टाकले. यांतून हफसाच्या जवळची प्रत उरली होती तीहि पुढें मदिनेचा सुभेदार मेरवान यानें जाळून टाकली. यामुळें संशोधनाच्या दृष्टीनें जरी बरेंच नुकसान झालें असलें तरी राजकीय व सामाजिक सोयीकरितां ही गोष्ट अपरिहार्य होती

याप्रमाणें मोठ्या मेहनतीनें तयार केलेला हा कुराणाचा भाग आपल्या हातीं असून त्याच्या पूर्वतयारीची मात्र आपणास फारशी माहिती नाहीं. अरब लोकांतच चिकित्सक पंडितवर्ग निघेपर्यंत संशोधनहि शक्य नाहीं. सय्यदानें पूर्वीच्या प्रतींवरून वाचावें व त्याच्या सहकाऱ्यांनीं लिहावें अशा तीन प्रती एका विश्वसनीय परंपरेच्या माहिती प्रमाणें दमास्कस, बसरा व कुफा येथें खलिफानें मुख्य प्रती म्हणून पाठविल्या असाव्या व एक मदिनेस राहिली असावी.

वेगवेगळ्या प्रकरणाच्या रचनेंत विषयवारी लावणें अशक्य आहे. कारण एकाच अध्यायांत अनेक विषय आलेले आहेत. कालानुक्रम ठरविणें ही गोष्ट तर बोलावयासच नको, कारण जुन्या अध्यायाचा काल अनिश्चित आहे. वरील व्यवस्थित पद्धतीकडे दुर्लक्ष्य करून फक्त मोठे अध्याय प्रथम व लहान अध्याय मागाहून अशी रचनेची दृष्टी ठेविली असून तीस देखील क्वचित् फाटा दिला आहे. ११३ व ११४ या जादुगारीच्या अध्यायांना त्यांच्या विषय-वैशिष्ट्याबद्दल शेवटीं स्थान मिळालें आहे. तसेंच पहिला अध्याय देखील त्यांतील विषयासच अनुसरून आरंभास आला आहे. सय्यदानें ज्याच्या मूळ प्रतीवरून आपली रचना केली त्याना अनुसरून व कांहीं स्वेच्छेनें अशी निरनिराळ्या तुकड्यांची रचना करण्यांत आली आहे. अध्यायाची विभागणी फक्त "ईश्वराच्या नांवें" वगैरे वाक्यांनीं करण्यांत आली आहे व तीं वाक्यें फक्त नवव्या अध्यायांत नाहींत. अध्यायांची नांवें व उक्तींची संख्या वगैरे दुसरे मथळे आद्य प्रतींत नव्हते व ते कुराणाचा महत्वाचा भागहि नव्हेत.

पूर्ण झालेलें कुराण.—उस्मानचें कुराण अपूर्ण आहे. मूळच्या कुराणांतील कांहीं भाग सय्यदनें न घेतलेले असे आहेत. स्वतः महंमदानें त्यांपैकीं कांहीं क्वचितच टाकले असते. सय्यदानें हे मुद्दाम गाळले असतील असें वाटत नाहीं. महंमदाच्या शत्रूंच्या नांवांपैकीं कांहीं नांवें त्यांचे वंशज चांगले निघाल्यामुळें त्यानें गाळली असावींत असा तर्क आहे. पण आपला दत्तकपुत्र सय्यद व शत्रू (चुलता) अबू लाहाब याच्या नांवांशिवाय दुसरीं नांवें महमदानें कुराणांत घातलींच नाहींत. उलट नवीन कांहीं भाग कुराणांत घुसडण्याचा प्रयत्न सय्यदानें केल्याचेंहि दिसत नाहीं. यावरून उस्मानचें कुराण अगदीं शुद्ध असून पाश्चात्य पंडिताचा त्यांतील प्रक्षिप्त भाग शोधण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले आहेत.

उस्मानच्या कुराणाच्या चार निरनिराळ्या प्रतींत 'व' 'आणि' यासारखे लहानसान फरक आहेत पण कोठेंहि अर्थास बाध येत नाहीं. मागील सर्व प्रती त्याच्याच नकला होत.

कुराणाच्या इतर आवृत्ती.—परंतु कुराणाचे दुसरे पाठ एकदम नाहींसे झाले नाहींत. उबय इब्न काबची एक अशी प्रत आहे. तींतील अध्यायाच्या अनुक्रमाची यादी जर बरोबर असेल तर त्यावरून हल्लींच्या कुराणांतील बहुतेक तोच विषय त्यांतहि आलेला दिसतो. यानें सय्यदाच्या मूल संग्रहाचा उपयोग केला असावा. इब्न मसूद याच्या संग्रहाचा देखील तोच प्रकार आहे. मोठे अध्याय लहान अध्यायाच्या आधीं घालण्याचें तत्व सय्यदपेक्षा यानें अधिक चांगलें पाळलें आहे. पहिला व शेवटचा हे दोन अध्याय यानें गाळलेले आहेत. उलट उबयनें आणखी दोन लहान प्रार्थना अधिक घातलेल्या आहेत; त्या महंमदाच्या मानाव्यात. कुराणांत असे सिद्धांत असावेत किंवा नाहीं याबद्दल मतभेद असणें साहजिक आहे, असें कोणासहि वाटेल. हे दोन्ही पाठ व इतरहि अनेक प्राचीन पाठभेद संभाळून ठेवण्यात आले आहेत. त्यांतील कांहीं नीरस तर कांहीं सामान्य व कांहीं सरस असे आहेत.

इब्न मसूद.—उस्मानच्या कुराणाच्या सामान्य उपोद्घातास मनापासून विरोध करणारा इब्नमसूद हाच एकटा होय. तो महंमदाचा जुना शिष्य असून त्याच्या तैनातीस होता. तो जरी मुसुलमानी धर्मशास्त्राच्या बाबतींत प्रमुख होता, तरी त्याची दृष्टि संकुचित होती त्याच्या विरोधास यश मिळालें नाहीं. महंमदाच्या तोंडून प्रत्यक्ष कुराण ऐकलेले मुसुलमान त्याकाळीं होते ही गोष्ट लक्षांत घेता, व इतर बाबतींत उस्मानला झालेला विरोध व त्रास पाहता, कुराणाच्या बाबतींत कोणाच्यानेंहि त्यास दोष देववला नाहीं किंवा सय्यदानें जुळविलेल्या कुराणास कोणासहि अमान्य करता आलें नाहीं ही गोष्ट उस्मानच्या कुराणाचें महत्व सिद्ध करते.

पुढील इतिहास.—अरबी भाषेंतील उच्चारवैचित्र्यामुळें कुराणाचे अनेक वाचनसंप्रदाय उत्पन्न झाले. पुढें त्यांतील सात मुख्य ठरून बाकीचे लुप्त झाले. त्यांतहि हफस व नाफी हे दोनच सध्या आफ्रिकेमध्यें ईजिप्तच्या पश्चिमेस प्रसिद्ध आहेत.

कु रा णा च्या पो थ्या.—यूरोपीयन लायब्रऱ्यांतून कुराणाचीं कांहीं जुनीं पानें सांपडतात. उस्मानानें स्वत लिहिलेल्या म्हणून कांहीं पोथ्या दाखविण्यांत येतात अशी एक प्रत इंडिया ऑफिसच्या लायब्ररींत आहे. या जरी जुन्या काळच्या असल्या तरी स्पष्ट बनावट आहेत तसेंच वरील लायब्ररींत असलेली अलीच्या हातची म्हणून दाखविली जाणारी प्रत देखील त्याच वर्गांतील होय. अलीकडे कुराणाच्या प्रती शिळाप्रेसवर छापण्यांत आलेल्या आहेत

कु रा णा व री ल टी का का र—महंमदानंतर लौकरच कुराणाचे अर्थ लावण्यास सुरवात झाली. यावेळीं शब्दाचे अर्थ न लावता संबंध वाक्याचा अर्थ लावण्यात येत असे व अर्थ लावणारे फारशा योग्यतेचे नसत. व त्याच्या अर्थांत असत्य गोष्टींचा भरणा असे. ह्या टीका बिरकोळ भागावर झालेल्या होत्या. पहिली संपूर्ण टीका ( इ. स. ८३९ ते ९२३ ) मधील ताबरींची होय. ही वरीच विस्तृत आहे. परंतु अनेक गोष्टींचा खुलासा अपेक्षेप्रमाणें तींत झालेला नाहीं.

दुसरी मोठी टीका झमखशरी याची इ. स. १०७५–११४४ मधील होय. ही १८५९ त फलकरयास नेसौलीज यानें छापली. तिसरी फ्लाशेर यानें (लिपझिग १८४६–१८४८ ) छापलेली बैदावी याची इ. स १२८६ मध्ये तयार केलेली होय. याशिवाय आणखी अनेक टीका झालेल्या असून त्यांना जरी फारसें महत्व नाहीं. तरी यूरोपीय पंडितांना अर्थ लावण्याच्या कामीं त्या फार उपयोगी पडलेल्या आहेत.

कु रा णा चीं भा षां त रें —आज जसें पाहिजे तसें कुराणाचें भाषांतर एकाहि यूरोपीय भाषेंत झालेलें नाहीं त्यांतल्यात्यांत इंग्रजींतील भाषांतरें उत्कृष्ट असून त्यांत अनेकदां छापलेलें जार्ज सेल याचें, १८६१ त झालेलें राडवेलचें व १८८० तील पामरचें याचा अंतर्भाव होतो. याशिवाय जर्मन भाषेंत झालेलें उलमानचें तसेंच हेनिंगचें (लिपझिक) वगैरे भाषांतरें साधारण आहेत. किरकोळ भागाचीं भाषांतरेंहि कांहीं आहेत त्यांचा उल्लेख येथें करीत नाहीं. डॉ. मीर मोहमद याकुबखान या विद्वान मौलवी साहेबांनीं १९१५ त कुराणाचें मराठी भाषांतर करून प्रसिद्ध केलें याच भाषांतरांतील उतारे वुद्धोत्तर जग या विभागांत आलेच आहेत. आणखी कांहीं उतारे पुढें देत आहों

कु रा णां ती ल उ ता रे —इस्लामी धर्म हें खूळ नव्हे असें पुढील वाक्यांत सांगण्याचा प्रयत्न केला आहे.—
"( मुसलमानांनो ! या लोकास सांगा कीं आम्हीं तर ) परमेश्वराच्या रंगांत ( रंगले गेलों )आणि परमेश्वराचे ( रंगा ) पेक्षा आणखी कोणाचा रंग अधिक उत्तम होणार? आणि आम्हीं त्याचीच भक्ती करित आहों ( हे पैगंबरा! तूं या लोकास ) सांग कीं तुम्हीं का परमेश्वराचे संबंधीं आम्हांशीं तंडतां। आणि खरें पाहतां, तोच आमचाहि पालनकर्ता व ( तोच ) तुमचाही पालनकर्ता होय. आणि आम्हाला आमचीं कर्में व तुम्हाला तुमचीं कर्में, व आम्हीं निखालस त्यालाच मानितो. अगर तुम्हीं असें म्हणता कीं इब्राहीम व इस्माईल व इस्हाक व याकुब आणि ( याकुबचीं ) कुळें ( हे लोक ) यहुदी वा खिस्ती होते ( हे पैगंबरा! तू त्यास ) सांग कीं ( बरें, ) तुम्हीं अधिक जाणणारे आहां कीं परमेश्वर? आणि जो कोणी परमेश्वराकडून (आलेली)ग्वाही त्याच्या पाशीं (हजर असून तो ती) लपवील त्याच्यापेक्षांहि अधिक जुलमी ( आणखी ) कोण होणार? आणि जें कांहींहि तुम्हीं करीत आहां, परमेश्वर त्याकडून गाफिल नाहीं हे लोक (आपआपल्या वेळीं) होऊन गेले, त्याचें केलें सवरलें त्यांना, व तुमचें केलें सवरलें तुम्हाला आणि जें कांहीं ते करून गेले आहेत तुम्हास त्याची विचारपूस केली जाणार नाहीं.

ज्या लोकांची अक्कल मारली गेली आहे ते तर म्हणतीलच कीं मुसलमान ज्या किबल्याकडे ( पूर्वी ) होते ( म्हणजे पॅलेस्टाईन ) त्यापासून त्यांच्या ( काबागृहाकडे ) वळण्यास काय कारण झालें? ( हे पैगंबरा! तू हा ) जबाब दे कीं पूर्व व पश्चिम ( सर्व ) परमेश्वराचीच होय तो ज्याला इच्छितो त्याला ( धर्माचा ) सरळ मार्ग दाखवितो" ( अ २ १३७–१४१ )

ई सा—ये शू ची मा ता कु मा री म र्य म ( मे री ) हि च्या ज न ना ची क था —एके काळीं इमरानच्या पत्नीनें(परमेश्वरा हुजूर ) विनवणी केली कीं हे माझ्या पालनकर्त्या ! माझ्या पोटीं जें ( मूल ) आहे तें मीं ( संसार– ) मुक्त करून तुला समर्पण करित्ये तर तूं मजकडून ( हें समर्पण ) मान्य कर, कीं तूं ( सर्वांचें ) ऐकतोस ( व सर्वांचे मनोगत ) जाणतोस मग जेव्हां ती मुलगी प्रसवली आणि परमेश्वराला हें खूप ठाऊक होतें कीं, ती कोण योग्यतेची ( मुलगी ) प्रसवली आहे ( व ती तिच्या हकीकतीशीं वाकब नव्हती ) तेव्हां ती म्हणूं लागली कीं हे माझ्या पालनकर्त्या ! ( आतां मी काय करूं ? ) मीं तर ही मुलगी प्रसवली आहे; आणि मुलगा हा मुलगीप्रमाणें ( दुर्बळ ) नसतो आणि मीं तिचें नाव मर्यम ठेविलें आहे, व मी तिला व तिच्या संततीस धोंडमार केलेल्या सैतानां ( च्या बहकविण्या ) पासून तुझ्या आश्रयांत देते तर तिच्या पालनकर्त्यानें ( तिचें समर्पण म्हणजे ) मर्यम इला चांगल्या मान्यतेनें स्वीकारलें व तिला चांगल्याप्रकारें वाढवून मोठी केली व तिनें तिला जकरीयाच्या हवाली केलें जेव्हां जेव्हां जकरिया मर्यम ( ला पाहण्यास्तव तिच्या ) जवळ ( तिच्या राहत्या ) खोलींत जाई तेव्हां तेव्हां मर्यमजवळ ( फळफळादि पैकीं कांहींना कांहीं ) खाण्याचा पदार्थ त्याला आढळून येई ( म्हणून त्यानें एके दिवशीं मर्यमला ) विचारिलें कीं अगे मर्यम हा ( खाण्याचा पदार्थ ) तुजजवळ कोठून ( येतो ) ? ( मर्यम ) म्हणाली, हा परमे-

श्वराकडून ( येतो ).' परमेश्वर ज्याला इच्छितो त्याला बेसुमार देतो. ( अ. ३; ३४-३६ )

खि स्ता ची सा मा न्य ता.—मरयमचा पुत्र ख्रिस्त हा तर केवळ एक पैगंबर होय एवढेंच. याच्या पूर्वीहि (अनेक) पैगंबर होऊन गेले आहेत. आणि याची मातोश्री ( मर्यमही परमेश्वराची एक ) सात्विक ( सेविका ) होती. ( इतर मनुष्याप्रमाणें हीं ) उभयता ( मायलेंकरें ) अन्न खात होतीं. ( हे पैगंबरा ! ) पहा तर खरें, की आम्ही ( आपलीं ) प्रमाणें या लोकास कशीं स्पष्ट करून सांगतों ! व नंतरहि पहा कीं ( सैतानाचे बहकविण्यानें ) हे लोक कोठेंच उलटे भटकत चालले जात आहेत ! [अध्याय ५ वा. ७४-७५]

खि स्ती व य हु दी लों कां चा पा खं डी प णा.—अहो मुसुलमानानो ! ज्यांनीं तुमच्या धर्माला हंशी व खेळ बनवून ठेविला आहे, म्हणजे ( यहुदी व ख्रिस्ती ) कीं ज्यांना तुमच्यापूर्वी पुस्तक दिलें जाऊन चुकलें आहे त्याना व नास्तिकाना ( आपले ) मित्र बनवूं नका. आणि जर तुम्ही ( खरे ) मुसलमान आहा तर परमेश्वराला भीत रहा. आणि जेव्हां तुम्हीं ( नमाजीची बांग पुकारून लोकास ) नमाजीसाठीं बोलविता तेव्हां हे लोक नमाजीला हंशी व खेळ बनवितात. ( आणि ) हें ( गैरशिस्त कार्य यांच्या-हातून ) ह्यासाठीं ( घडून येतें ) कीं हे असे ( बेवकूब ) लोक होत कीं ( बिलकुल ) समजत नाहींत. [ अध्याय ५ वा. ५६—५७ ].

बेवकूब व आत्मविश्वास नसलेल्या मुसुलमानाना परकीयाशीं लढण्याला उत्तेजन देणारा पुढील भाग आहेः-"आणि ( मुसुलमानानों ! ) तुम्हाला झालें तरी काय कीं तुम्ही परमेश्वराच्या मार्गांत व ( तसेंच ) दुर्बल पुरुष व स्त्रिया व मुलें यांच्या प्रीत्यर्थ शत्रूंशीं लढत नाहीं, कीं तीं ( अगदीं काकुळतीस येऊन परमेश्वरास ) प्रार्थना करतात कीं हे आमचे पालनकर्त्या ! आम्हाला ह्या वस्ती (म्हणजे मक्के)तून ( कोठें ) बाहेर ने, कीं येथील रहिवाशी ( आम्हावर ) जाच जुलूम करीत आहेत. आणि तूंच ( खुद ) आपल्याकडून कोणालाहि आमचा पुरस्कर्ता बनीव व ( खुद ) आपल्याकडून कोणालाहि आमचा मदतगार बनीव."

जे विश्वास बाळगतात ते तर परमेश्वराच्या मार्गांत लढतात; आणि जे ( इस्लाम धर्मास ) नाकारतात ते सैतानाचे मार्गांत लढतात. तर ( मुसुलमानानों ! ) तुम्हीं सैतानाच्या पक्षकाराशीं लढा; ( आणि त्याच्या बहुसंख्येची काहीं पर्वा करूं नका; का कीं, ) सैतानाचे ( जितके ) डावपेंच असतात ( तितके सर्व ) पोंचट. [ अध्याय. ४. ७४-७५ ].

ऐ हि क मा र्गा ला व ळ ले ल्या लो कां चीं अ व स्थाः—आणि ( हे पैगंबरा तूं ) या लोकास आम्ही ज्या मनुष्याला आपले चमत्कार दिले होते व मग त्यानें ती कात फेंकून ...ंच सैतान त्याच्या पाठीस लागला ( व त्यानें त्याला बहकवलें ), तेव्हां तो बहकलेल्या (लोकां)त जाऊन सामील झाला. अशा त्या मनुष्याची हकीकत वाचून ऐकीव. आणि जर आम्ही इच्छितों तर त्याच ( चमत्काराच्या ) प्रतापानें आम्ही त्याला उच्च पद देतो परंतु तो भूलोका(च्या अधोगती)कडेच झुकुन राहिला व आपल्या मनोवासनेच्या नादीं लागून गेला तर त्याची उपमा कुत्र्याच्या उपमेसारखी होऊन गेली कीं जर तूं त्याला रिदडशील तर तो जीभ बाहेर काढील, अगर तूं त्याला ( त्याच्याच स्थितीवर) सोडून देशील तरीहि तो जीभ बाहेर काढील. ज्या लोकानीं आमच्या निशाण्यास पाखंड म्हटलें त्याचीहि ( स्थिती तरी ) वाईट गत होय! आणि ( त्याच्या या पाखंड म्हणण्यानें ) ते आपणच आपलें नुकसान करीत राहिले आहेत." (अ. ७-१७४-१७६ ).

पु ण्य वा न व पा पी लो कां ना मृ त्यू नं त र मि ळ णा रें शु भा-शु भ फ ळ-"परमेश्वराचे खास निःसीम सेवक,हे असे(सुदैवी) असतील कीं त्याचा रतीब बाधलेला असेल. आणि रतीबहि असलेतसले नाहींत, (तर ) मेवे, आणि त्याचें आदरातिथ्य केलें जाईल. ( ते ) ऐषआरामाच्या बागान ( ठेवले जातील ) ( आणि ते ) तख्तावर समोरासमोर ( बसलेले ) असतील. त्याच्यात स्वच्छ मद्याचा पेला ( चौंफेर ) फिरविला जात असेल. ( तें मद्य ) पांढरें शुभ्र ( असून ) पिणारास ( फार ) रुचि देईल. त्यात बुद्धिविभ्रम होणार नाहीं व व त्याने निशाधुंद होऊन ते बडबडणारहि नाहीत. आणि याच्यापाशीं खालीं नजर राखणाऱ्या मोटमोठ्या डोळ्याच्या ( अप्सरा ) असतील. त्याच्या गोऱ्यागोऱ्या रंगात हलका हलका पिवळेपणा असा झळकत (असेल ) कीं जणूं त्या ( शहामृगाचीं ) अंडीं होत कीं तीं ( संभाळून ) पडद्यात ठेवलेली होत. मग हे ( स्वर्गवासी ) एकमेकाकडे वळून ( व संबोधून ) आपसांत प्रश्न करतील. याच्यातून एक बोलणारा बोलेल कीं ( जगात ) माझा एक जिवाचा सोबती होता. ( तो आश्चर्यानें ) विचारीत होता कीं जे लोक ( पुनरुत्थानास ) खरें म्हणून मानतात. का तूंहि त्याजपैकींच आहेस? कां खरोखरीच आम्ही मरून जाऊं आणि माती व हाडें होऊन जाऊं, तेव्हां का ( खचितच आम्ही पुन्हा उठवून उभे केले जाऊं व ) आम्हाला (आपल्या कर्मांचा) बदला मिळेल! ( मग तो आपल्या इतर सोबत्यास ) म्हणेल ( कीं मी तर त्या सोबत्यास पाहूं इच्छितो ) का तुम्हींहि ( त्याला खालीं ) डोकावून पाहूं इच्छिता? असें म्हणून तो ( वरून नरकात ) डोकावील तों, तो ( आपल्या ) त्या ( सोबत्या )स पाहील ( कीं ) नरकाच्या मधोमध ( पडलेला आहे ). ( तो त्याला त्या स्थितींत पाहून ) असे उद्गार काढील कीं परमेश्वराची शपथ ! तूं माझा जवळजवळ घातच केला होतास ! आणि जर माझ्या पालनकर्त्याची कृपा ( मजवर ) नसती तर ( आज ) मीहि ( शिक्षेत ) पकडून हजर केलेल्या लोकांपैकींच असतो. या आम्ही ( स्वर्गवाशांची ही स्थिति, नाहीं.

कीं पहिल्यांदा मरावयाचें होतें ( तें मरून चुकलों ), आतां पुढें आम्हाला मरावयाचें नाहीं व शिक्षेंतहि पीडित राहणार नाहीं. ( अध्याय ३७. ३९–५७ )

नरकपुरी व स्वर्गपुरी.-"यांत संशय नाहीं कीं (परलोकीं) 'जक्कूम' निवडुंगाचें झाड ( महा ) पापी ( म्हणजे नास्तिक ) याचा आहार होईल, जसें वितळलेलें तांबें ( व ) तें पोटांत असें उकळेल. जसें कढ आलेलें पाणी उकळतें ( याशिवाय आम्ही - दूतास आज्ञा करूं कीं,) याला धरा आणि ओढीत ओढीत याला नरकाग्नीच्या मधोमधपर्यंत घेऊन जा मग [ याला ही शिक्षा द्या कीं याच्या डोक्यावरून उकळी आलेलें पाणी ओता. [ मग आम्ही त्या नरकवासाच्या क्लेशाची वृद्धि करण्यासाठीं त्याला हिणवून म्हणूं कीं घे या शिक्षेची गोडी ] चाख, [ कारण ] तूंच तर तो सामर्थ्यवान [ व ] अनुदार होतास. हाच तर तो [ नरकाग्नि ] होय कीं ज्याविषयीं शंका करीत होता. [ राहिले परमेश्वराला ] भिऊन वागणारे [ तर ते ] अभयाच्या स्थलीं [ म्हणजे बागेंत ] व झऱ्यांत असतील, ते तलम रेशमाचीं व साटीनचीं वस्त्रें परिधान करून [ एकमेकांच्या ] समोरासमोर बसलेले असतील. [ होईलहि ] असेंच. आणि [ या व्यतिरिक्त ] मोठमोठ्या व काळ्या डोळ्यांच्या अप्सरांशीं आम्ही त्यांचे जोड लावून दिलेले असतील. ते तेथें निश्चित होऊन हरतऱ्हेचे मेवे मागवून [ मागवून खात ] असतील पहिला मृत्यु [ जो ते या लोकीं चाखून चुकले ] त्याशिवाय तेथें त्यांना मृत्यू [चा कटु स्वाद ] चाखावाच लागणार नाहीं, आणि परमेश्वर त्यांना नरकाग्नीच्या शिक्षेंतून वांचवून घेईल [ अध्याय ४४. ४२–५६ ]

आस्तिक्याचें फळ.-नास्तिकां( च्या बोध घेण्या )साठीं परमेश्वर, 'नूह' ची बायको व 'लूत' ची बायको यांचा दृष्टांत सांगतो कीं, या ( दोघी स्त्रिया ) आमच्या सेवकांपैकीं दोन पवित्राचरणी सेवकांच्या विवाहांत होत्या मग त्या दोघींनीं त्यांस दगा दिला ( कीं आपल्या पतीच्या विरुद्ध नास्तिकांशीं मिळून राहिल्या ), तर दोघींचे पती ( पैगंबर असूनहि ) परमेश्वरापुढें त्यांच्या कांहींहि कामा आले नाहींत, आणि ( या दोघी स्त्रियांस ) हुकूम दिला गेला कीं ( जेथ ) आणखीहि लोक ('जहन्नमी' त ) दाखल झाले आहेत ( तेथें ) त्यांच्याबरोबरच तुम्हीहि नरकाग्नींत ( दाखल ) व्हा. आणि ( खऱ्या ) मुसुलमानां(च्या सांत्वना)साठीं परमेश्वर ( एक तर ) 'फिरऔन' ची बायको ('आसिया') हिचा दृष्टांत देतो कीं त्या बाईनें प्रार्थना केली कीं हे माझ्या पालनकर्त्या ! माझ्याकरितां स्वर्गांत आपल्यापाशीं एक घर बनीव, आणि मला 'फिरऔन' व त्याच्या ( दुष्ट ) कर्मांपासून सुटका दे व ( तशीच ) मला ( या ) जालीम लोकांपासून सुटका दे. आणि ( दुसरा दृष्टांत ) 'इमरानची' मुलगी 'मरयम' हिचा, कीं, जिनें आपली लाज संभाळली. तर आम्ही तिच्या ( पोटा )त आपल्या आत्म्या( म्हणजे सामर्थ्या )नें फुंक मारली, व ती पालनकर्त्याच्या शब्दांचें व त्याच्या पुस्तकाचें सत्यत्व पटवीत राहिली, आणि ती ( आमच्या ) आज्ञाधारक ( सेविकांपैकीं होती. ) ( अध्याय ६६. १०-१२. )

पुनरुत्थानाचा दिवस.—ज्यावेळीं सूर्या (च्या प्रकाश पटला)स गुंडाळलें जाईल, व जेव्हां तारे झडून पडतील, आणि ज्या वेळा पर्वत ( आपल्या जागेवरून ) चालविले जातील, व जेव्हां दहा महिन्याच्या गर्भिणी सांडण्या मोकळ्या फिरतील; ( व कोणीहि त्यांचा राखणदार नसेल, ) आणि ज्यावेळीं रानटी जनावरें ( भयानें वस्तींत ) येऊन भरतील व जेव्हां समुद्रास ऊत येऊन ते एक होऊन जातील, आणि ज्यावेळीं आत्मे ( आपापल्या शरीराशीं ) जोडले जातील, व जेव्हां जिवत पुरून टाकलेल्या मुलीस विचारिलें जाईल, कीं जिला कोणत्या अपराधाबद्दल ठार केलें गेलें ! आणि ज्यावेळीं ( लोकांचे ) कर्मपट उघडले जातील, व जेव्हां आकाशाचें कातडें काढलें जाईल आणि ज्यावेळीं नरकाग्नि धगधगविला जाईल आणि जेव्हां स्वर्ग जवळ आणिला जाईल, ( त्यावेळीं) प्रत्येक जीवाला त्यानें जें कांहीं ( पुढच्या सामुग्रीदाखल ) आणून हजर केलें आहे तें ( प्रत्यक्ष ) कळून येईल. ( अ. ८१; १–३ )

पैगंबराच्या शत्रूचा नाश कसा होतो हें पुढील अध्यायांत पैगंबराचा चुलता अबुलहब याचें उदाहरण घेऊन सांगितलें आहे. "( जसें 'अबुलहबनें' पैगंबरास गालिप्रदान केलें होतें तसें उलट ) 'अबुलहब' चेच दोन्ही हात तुटून गेले. आणि तो ( आपणहि ) नाश पावला त्याची धनदौलत व त्यानें जें कांहीं संपादन केलें तें कांहींच त्याच्या कामां आलें नाहीं. तो लवकरच ( नरकाच्या ) डोंब घेणाऱ्या अग्नींत जाऊन दाखल होईल, आणि ( त्याच्या संगतीं ) त्याची बायकोहि, कीं जी लाकडें वाहून आणिते, तिच्या गळ्यांत खजुरीच्या तंतूंची पीळ दिलेली दोरी असेल."

[ संदर्भग्रंथ.—यूरोपांत कुराणावर लिहिलेल्या ग्रंथाची यादी व्ही. चौव्हिननें १९०७ सालीं लीज येथें प्रसिद्ध केली आहे. कुराणाचें विवेचन करणारे वील, नोलडेके वगैरे जर्मन पंडितांचे बरेच ग्रंथ आहेत ब्रिटानिका, ए. रि. ए यासारख्या कोशांतून कुराणावर टीकात्मक लेख आहेत. ज्ञानकोश, विभाग ४ यांतील १३ व्या प्रकरणांत महमदाचा कुराणाशीं येणारा संबंध व्यक्त केला आहे व कुराणांतील कांहीं उतारेहि दिले आहेत. ]

कुरावर—राजपुतान्यांत उदेपूर संस्थानांत कुरावर जहागिरीचें मुख्य ठिकाण हें गोडी नदीच्या डाव्या किनाऱ्यावर वसलेलें असून उदेपूर शहरापासून २० मैलांवर आहे १९०१ सालीं येथील लोकसंख्या १७६३ होती. जहागिरींत एकंदर खेडीं ६९ आहेत. जहागीरदार मेवाडचे पहिल्या वर्गाचे सरदार असून रजपूत (सिसोदिया) या घराण्यांतील

चौंडावत कुळातले राऊत या उपनावाचे आहेत. जहागिरीचें (कुल) एकंदर उत्पन्न ५०,००० वर असून ब्रिटिश दरबाराला खंडणी द्यावी लागत नाहीं.

**कुरिग्राम**, पो ट वि भा ग.—बंगाल. रंगपूर जिल्ह्यातील एक पोटविभाग. हा ब्रह्मपुत्र नदीच्या उजव्या किनाऱ्यावर असून याचें क्षेत्रफळ ९२४ चौरस मैल आहे. या विभागात कुरिग्राम व आणखी तीन तालुके आहेत. १९११साली लोकसंख्या ५,८९,५२० होती. खेड्यांची संख्या २००५ आहे. मोठें गाव कुरिग्राम ब्रह्मपुत्र नदीवर चिलमारी येथें मोठी यात्रा भरते.

श ह र.—पोटविभागाचें मुख्य ठाणें. हें धरला नदीच्या काठीं वसलेलें असून १९११ सालीं याची लोकसंख्या ३४१९ होती. ईस्टर्न बंगाल स्टेट रेल्वेचें हें स्टेशन असून येथें काहीं सरकारी कचेऱ्या आहेत. शिवाय एक लहानसा तुरुंग आहे.

कुरु—एक प्राचीन राष्ट्र कुरुवंशावद्दलची वैदिक माहिती ज्ञानकोश विभाग ३ मधील 'दाशराज्ञ युद्ध' या प्रकरणात आलीच आहे. ऋग्वेदात कुरुवंशाचें स्मरण करुन देणारे फक्त दोनच शब्द दिसतात ते कुरुंग व कुरुश्रवण हे होत. पुरु, तृत्सु, भरत व कुरु हीं राष्ट्रें पुढे मागें एकच झालीं असावींत असें वैदिक वाङ्मयावलोकनानें वाटूं लागतें. महाभारतात वर्णिलेल्या कुरुवंशातील पुरु, भरत, देवापि, शन्तनु यासारखे प्राचीन पुरुष ऋग्वेदात सुद्धा उल्लेखिलेले आहेत असें एक मत प्रदर्शित झालें आहे पण तें आमच्या मतें चुकीचें आहे. अथर्ववेद (२०. १२७, १), शाखायनसूत्र ( काहीं प्रतींत १२. १४,१ ) इत्यादि वैदिक ग्रंथात ज्याला कौरम म्हटलें आहे त्याचेंच प्रतिरुप कौरव आहे. ज्ञा. विभाग ३ यात वेदकालातील शब्द सृष्टि या प्रकरणात (पा. ३६७-३६८ ) ब्राह्मण-उपनिषद्-वाङ्मयात कुरु व कुरुपांचाल याची जी माहिती मिळते ती सविस्तर दिलेली आहे. तींत भारतकथातील अनेक बीजें सापडतील. कुरुंचा पांचालाशीं निकट संबंध असल्यानें त्यांचे एकत्र उल्लेख आढळतात.

महाभारतात कुरुवंशीय संवरणपुत्र जो कुरुराजा त्याच्या वंशजाना सामान्यतः कुरु हें नाव देतात. पण विशेषतः पांडवशत्रू जे धृतराष्ट्राचे पुत्र व त्याचे अनुयायी यानाच कुरु किंवा कौरव म्हणण्यात येतें. कुरुराजापासून जनमेजयापर्यंत कौरव वंशात किती पिढ्या झाल्या व प्रत्येक पिढीचे समकालीन असे इतर घराण्यातील राजे कोणकोणते होऊन गेले तें 'बुद्धपूर्व जग' विभागातील सूतसंस्कृति-प्रकरणांत कोष्टकानुरोधानें दाखविलें आहे.

कुरु देशाची राजधानी हल्लींच्या दिल्लीजवळ असलेलें इंद्रप्रस्थ शहर होय. याच्या पूर्वेस पांचाल व दक्षिणेस मत्स्य लोकांची वस्ती होती.

**कुरुजांगल**—कुरुदेशाच्या पश्चिमेस असलेला अरण्यमय प्रदेश. याचा महाभारत, भागवत व इतर पुराणात अनेक ठिकाणीं उल्लेख आढळतो. याच देशात काम्यकवन होतें.

**कुरुंद**—यास लॅटिनमध्यें कोरंडम, इंग्रजींत एमरीस्टोन, मराठींत कुरुंद इत्यादि नावें आहेत. नैसर्गिक स्फटयुक्त व कठिणपणाबद्दल प्रख्यात असलेले दगड, सुंदर रंगाचीं व पारदर्शक अशीं माणिक व इंद्रनील मणी हीं रत्नें कुरुंदाच्याच जातींचीं होत. कुरुंदाचे स्फटिक पट्कोनी पद्धतीचे असतात.

हिऱ्याच्या खालोखाल कुरुंद हें सर्वांत कठिण खनिज आहे. त्याच्या काठिण्याचें मान साधारणपणें ९ आहे. सामान्य कुरुंदापेक्षा माणिक व माणिकापेक्षा इंद्रनीलमणी जास्त कठिण असतो. घड्याळातील खड्याकरिता व वैद्युत यंत्रातील आवर्ण करण्याकरिता कुरुंदाचा ( माणिक किंवा इंद्रनीलमण्याचा ) उपयोग करितात.

रत्नाकरिता योग्य असा रंगीत कुरुंद सिलोन, ब्रह्मदेश, सयाम व मोंटाना येथें सापडतो. नेहमीचा कुरुंद हिंदुस्थानात, मद्रास इलाख्यात, सालेम जिल्ह्यात व म्हैसूर आणि रेवा या संस्थानात सापडतो. कुरुंदाची भुकटी लाखेत मिसळून जवाहिऱ्ये लोक जवाहीर घासण्याकरिता त्याच्या कांड्या करितात. अमेरिकेंत व दुसऱ्या कित्येक ठिकाणीं कुरुंद पुष्कळ सापडतो.

पूर्वी धातूच्या पदार्थास झिलई देण्याच्या कामी कुरुंदाचा उपयोग करीत असत; परंतु हल्लीं त्याच्या ऐवजी कृत्रिम कुरुंदाचा उपयोग होऊं लागला आहे. अमेरिकेंतील संयुक्तसंस्थानात विद्युत् शक्तीनें प्रतिवर्षी १७०० टन कुरुंद कारबोरंडम् तयार करतात. तेथील नैगारा प्रांतांत कृत्रिम कुरुंद तयार करण्याकडे बॉक्साईटचा उपयोग करितात. त्याचप्रमाणें कुरुंदाच्या ऐवजीं कोठें कोठें पोलादाच्या किसाचाहि उपयोग केला जातो. हिंदुस्थानात नैसर्गिक कुरुंद, खडकाच्या साच्यामध्यें कोठें कोठें सापडतो. पूर्वी शस्त्रकार व जवाहिरवाले लोक या कुरुंदाचा उपयोग फार करीत असत. परंतु अलीकडे कृत्रिम कुरुंद फार थोड्या किंमतींत मिळूं लागल्यामुळें नैसर्गिक कुरुंदाचा उपयोग पूर्वीइतका केला जात नाहीं. कुरुंदाचा दगड मुख्यत्वेंकरुन म्हैसूर व मद्रास या प्रदेशात सापडतो. १८९८ मध्यें म्हैसूरमध्यें २९३७ हंड्रेडवेट कुरुंद निघाला व त्याची किंमत ६९८ पौंड होती. १९०२ मध्यें याच प्रांतात ५७४ हंड्रेडवेट कुरुंद निघून त्याची किंमत १०८ पौंड झाली. आसाम, द. हैदराबाद, पंजाब इ. प्रांतातहि कुरुंद सापडतो. ब्रह्मदेशांतील कुरुंदामध्यें लाल सापडतात. काश्मीरमध्यें १८८२ पासून कुरुंदाच्या दगडात पुष्कळ इंद्रनील मणी सापडले. कुरुंदाच्या विक्रीचे आकडे बरोबर मिळत नाहींत. कारण खेड्यापाड्यांतील लोक सुद्धा याचा व्यापार करतात.

हिंदुस्थान देशांत गंध उगाळावयाच्या सहाणा; धान्य दळण्याचीं जातीं; चाकू, वस्तारे वगैरे हत्यारास धार देण्याचीं चाकें इत्यादि जिन्नस शुद्ध कुरुंदाचे करितात. तसेंच कुरुंदाची पार बारीक पूड करुन वस्गाळ करितात व शांत

सरस, चपट्यलाख किंवा गंधकमिश्रित रबर घालून तें मिश्रण साच्यात घालून त्याची भार लावण्याचीं चाकें, शाई काढण्याचें रबर, हिरे कापण्याचीं चाकें, पॉलिश करण्याचे कागद, पालिश कापड इत्यादि उपयुक्त जिन्नस तयार करितात. [ वॅट. कमर्शी. प्रॉ. ]

**कुरुंदवाड**—कोल्हापूरच्या पो. एजंटच्या देखरेखीखालचें एक संस्थान. येथील संस्थानिक पटवर्धन आडनांवाचे कोंकणस्थ ब्राह्मण असून संस्थानच्या थोरली पाती व धाकटी पाती अशा दोन शाखा आहेत. थोरल्या पातींत कुरुंदवाड हें शहर व इतर १७ गावें आहेत. सदरहु जहागीर पशव्यांनीं लष्करी सरंजामासाठीं पटवर्धनास दिली होती. इ. स. १८११ सालीं कुरुंदवाड व शेडबाळ असे या संस्थानचे दोन विभाग झाले होते; पैकीं शेडबाळला वारस नसल्यानें तें इ.स. १८५७ त खालसा झालें. थोरल्या पातीचें क्षेत्रफळ १८५ चौ. मै. असून लोकसंख्या ४३ हजारापर्यंत आहे. संस्थानांत मका, तांदूळ, गहूं, हरभरा व कापूस यांचें उत्पन्न असून हातमागाचा धंदा चालू आहे. इंग्रजसरकारास सालिना ९६१९ रु. खंडणी द्यावी लागते. संस्थानास न्यायदानाचे सर्व अधिकार आहेत. संस्थानिक हे दक्षिणेंतील पहिल्या वर्गाचे सरदार आहेत. उत्पन्न अडीच लाखांचें आहे धाकट्या पातीचें क्षे. फ. ११४ चौ. मै. असून लो. सं. ३४ हजार व उत्पन्न पावणे दोन लक्ष आहे. कुरुंदवाडास पंचगंगा नदी असून जवळच तिचा कृष्णेशीं संगम झाला आहे. शहरची लो. सं. साडेदहा हजार आहे. येथेंच दोन्ही पातींचे अधिपती रहातात. सरकारी वाड्याखेरीज पद्दाण्यासारखें असें एक विष्णूचें देऊळ व नरसिंहवाडी जवळील कृष्णेचा घाट होय.

पटवर्धन घराण्याचे मूळ पुरुष हरभटबाबा यांचे तिसरे पुत्र त्रिंबकपंतआप्पा हे या संस्थानचे संपादक होत. हे प्रथम अक्कलकोटकर भोंसले यांच्या पदरीं होते. पुढें कापशीकर राणोजी घोरपड्यानें आप्पाकडून कर्ज घेऊन फेडीस कुरुंदवाड गांव लावून दिला ( इ. स १७३६ ). तेव्हापासून आप्पा व त्यांचे पाचहि भाऊ ( सर्व पटवर्धन मंडळी ) येथेंच राहूं लागले. स. १७५१ नंतर निरनिराळ्या गावीं ही मंडळी रहावयास गेली. तरी पण सरदारी वडील माणसाच्याच तंत्रानें चालत असे. पुढें कापशीकरानीं दिलेल्या कुरुंदवाड गावाची इनामाची सनद करवीरकर छत्रपतींकडून स. १७८४ त पटवर्धनांनीं करून घेतली.

त्रिंबकरावास नीळकंठराव व कोन्हेरराव नांवाचे दोन शूर पुत्र होते. नीळकंठराव हैदरवरील १७७१ च्या स्वारींत आणि कोन्हेरराव सांवशीच्या लढाईंत इ. स. १७७७ त सरकारकामास आले. सरकारी सरंजाम नीळकंठरावाच्या नावें होता. नीळकंठरावास रघुनाथराव व शिवराव हे दोन मुलगे होते. या दोघांनींहि बऱ्याच लढायात काम केलें. रघुनाथराव हे तर परशुरामभाऊंच्या बरोबर दरेक लढाईंत हजर असत. यांना अनेक जखमा झाल्या होत्या. यानींच वरील विष्णूचें देऊळ इ. स. १७९५ त बांधिलें व घाटहि बांधिला. शिवराव याना ( तसेंच कोन्हेरराव यानाहि ) सुभेदार म्हणत असत. रघुनाथरावास त्रिंबकराव नांवाचा मुलगा होता.रघुनाथराव याच्या नावानें कोल्हापूरकर छत्रपतींनीं कुरुंदवाड गावची सनद करून दिली होती. दरम्यान रघुनाथराव व शिवराव याच्यांत तंटा लागून पेशवे सरकारानीं त्यांना जहागीर वाटून दिली. शिवराव याच्याकडे शेडबाळ वगैरे पाच हजाराचीं गावें गेलीं. कोन्हेररावाच्या मुलानाहि वाटणी मिळाली व या मूळच्या जहागिरीचे वाटे पुढीलप्रमाणें झाले त्रिंबक रघुनाथ हे कुरुंदवाडकर (सरंजाम १लक्ष २८ हजार), गणेश कोन्हेर हे कागवाडकर ( १ लक्ष ७० हजार रुपये) व कृष्णाजी शिवराव हे वाडीकर शारीचे मुख्य बनले त्रिंबकराव याच्या नावें स १८०० मध्ये २,४७,२८४ रु. चा सरंजाम कायम झाला. शिवराव याच्या कृष्णराव व कोन्हेरराव या दोन मुलात १८८२ मध्यें वाटणी झाली. त्रिंबकराव याचा मुलगा केशवराव यानें इंग्रजाशीं तहनामा केला.हा मिरजकराशीं झालेल्या तहाप्रमाणेंच होता. त्रिंबकराव१८२७त वारला.त्याला चार पुत्र होते, ते रघुनाथ, हरिहर, विनायक व त्र्यंबक.हे होत. हे अज्ञान असता याच्या मातोश्रींनीं मोठ्या दक्षतेनें कारभार केला. मातोश्रींचें नाव लक्ष्मीबाई. त्यांच्याबद्दल, इंग्रज सरकारनें स्तुतिपर उद्गार काढले होते रघुनाथरावाना १८३७ त अधिकार मिळाला याच्यावेळीं संस्थानास कर्ज वगैरे झालें तेव्हा या चार भावात स. १८५६ त जहागिरीच्या वाटण्या झाल्या. एकंदर पाच वाटण्या केल्या. दोन हिस्से रघुनाथराव यास व बाकीचे तीन तिघाकडे. हे त्रिवर्ग एकत्र एके ठिकाणीं राहू लागल्यानें या तिघाच्या जहागिरीस धाकटी पाती व रघुनाथरावाच्या घराण्यास थोरली पाती म्हणूं लागले, याना शिकारीचा फार नाद होता. रघुनाथराव वारल्यानंतर त्यांचे पुत्र चिंतामणराव हे गादीवर आले. ते स. १९०८ मध्यें वारले हेहि बापासारखे धिप्पाड व व्यायामशास्त्राचे अभिमानी होते त्याच्या मागें त्यांचे वडील पुत्र श्री. भालचंद्रराव अण्णासाहेब हे राज्यावर आले असून हल्लीं तेच संस्थानिक आहेत. धाकटे पुत्र श्री. केशवराव बाबासाहेब हे मिरज मळ्याचे ( दत्तक जाऊन ) अधिपति आहेत.

पटवर्धनाचें दैवत गणपति आहे. कुरुंदवाडास गणेश चतुर्थीचा उत्सव थाटाचा होतो. चिंतामणरावानीं प्राथमिक व दुय्यम शिक्षणाचा फैलाव करून दवाखानें, पोलीस, न्याय, जमीनमहसूल वगैरे खात्यांची रचना चागली केली त्यांचें वक्तृत्व उत्तम होतें त्यानीं एकदा कुरुंदवाडास पुनर्विवाहाच्या संबंधीं झालेल्या व्याख्यानसत्रात पुनर्विवाहाचें खंडण केलें होतें. औद्योगिक बाबतींतहि त्यानीं संस्थानात कामें सुरू केलीं होतीं. यांचें दातृत्व प्रख्यात होतें. हे मुंबई कायदेकौन्सिलात स. १८९५ व स १९०३ मध्यें दोन वेळा

( दक्षिणेंतील संस्थानिकांतर्फे ) सभासद झाले होते हल्लींचे संस्थानिक श्री अण्णासाहेब हे बी ए असून संस्कृत भाषेच्या प्रावीण्याबद्दल त्यांनीं बक्षिसें मिळविलीं आहेत यांनीं आपल्या राज्यांत प्राथमिक शिक्षण मोफत केलें आहे हजार वस्तीच्या गांवीं प्राथमिक मुला-मुलींची शाळा, व पांच हजार वस्तीच्या गांवीं इंग्रजी तीन इयत्तेच्या शाळा त्यांनीं उघडल्या आहेत लोकलफंडातील [1] रकम शिक्षण व आरोग्य खात्यीं खर्च होते प्रजेनें वर्गणी करून व श्रीमंतांनीं पुष्कळशी भर घालून एक 'मालवद मेमोरियल हॉल' म्हणून इमारत बांधिली आहे सार्वजनिक वाचनालयास श्रीमंतांनीं बरीच मदत केली आहे परस्पर सहाय्यकारक संस्था, पिण्याच्या पाण्याची व्यवस्था, शेतीकरितां पाण्याची योजना वगैरे सुधारणा संस्थानांत झाल्या आहेत पूर्वीपेक्षां संस्थानांत असल्या सुधारणा पुष्कळ झाल्या आहेत श्री अण्णासाहेब हेहि वडिलांप्रमाणें १९१२ सालीं मुंबई कायदे कौन्सिलचे नामदार झाले होते

थोरल्या पातीमधील हरिहरराव हे वारल्यानंतर त्यांचे पुत्र बापूसाहेब हे गादीवर आले त्यांनीं संस्कृत व प्राकृत ग्रंथांचा संग्रह फार केला हे कवि होते यांचे गणेशपुराण, आर्याभट्टदशकाव्य व गंगावर्णना हे काव्यग्रंथ प्रसिद्ध आहेत पंचवटी स्थलनिर्णयासंबधानें कै वामन दाजी ओक यांच्याशीं यांनीं दोन हात केले होते यांनीं इंग्रजी नाटकांचाहि अभ्यास केला होता व कांहींचें भाषांतरहि केलें त्यांनीं देशी व्यापार व उद्योगधंदे यांना मदत केली होती कुरुंदवाडास रेशमी व सुती कापडाचे हातमाग त्यांनीं च सुरू केले होते व एक ज्योतिषशाळाहि स्थापिली होती ते चित्रकारहि होते हल्लीं यांचे पुत्र श्री माधवराव भाउसाहेब हे धाकट्या पातीचे अधिपति आहेत

धाकट्या पातीबद्दल दुसरे विनायकराव हे इंग्रज सरकारचें सरकारदरबारीं काम करीत असत संस्थानचे दिवाणी फौजदारी अधिकार हेच चालवीत हे इ स १८६८ मध्यें मुंबई कायदे कौन्सिलचे नामदार सभासद होते सरदारांचें एक कौन्सिल असावें व त्यामार्फत सर्व जहागिरदार, संस्थानिक यांनीं आपले हक्क वगैरेंचें संरक्षण करावें अशी त्यांनीं एक योजना तयार केली होती त्यांना व्यायामाचा नाद होता त्यांचे पुत्र हरिरराव, यांना पांच पुत्र झाले पैकीं वडील श्री विनायकराव हे हल्लीं सर्व कारभार पाहतात

धाकट्या पातींतील तिसरे त्रिंबकराव हे निपुत्रिक होते त्यांनीं आपण होऊन आपला हिस्सा आपल्या दोघा बंधूंस ( हरिहरराव व विनायकराव यांस ) दिला

वा डी क र घ रा णें —रघुनाथ नीळकंठ व शिवराव नीळकंठ यांनीं १७९२ त परशुरामभाऊच्या विद्यमानें वांटण्या केल्या त्यावेळीं पेशव्यांनीं दिलेल्या सरंजामावरील हक्काचा शिवरावांनीं राजीनामा देऊन अक्कलकोटकराकडून प्रारंभीं मिळालेला गांव व कांहीं नेमणूक घेऊन वडील भावाचा पोटसरंजामदार म्हणून रहाणें कबूल केलें व कुरुंदवाडाजवळ वाडी या गांवीं ते राहूं लागले यांच्या वंशजांस वाडीकर म्हणूं लागले इ स १८२१ त शिवराव यांच्या मुलांनीं कुरुंदवाड जहागिरींतील हिस्सा मिळविण्याची खटपट केली होती पण ती फुकट गेली ह तीन भाऊ कृष्णराव, नीळकंठराव व कोन्हेरराव नांवाचे होते पैकीं नीळकंठराव हे निपुत्रिक होते, त्यांचा हिस्सा इंग्रजांनीं खालसा केला कृष्णरावास चिंतामण व त्र्यंबक हे दोन पुत्र होते चिंतामणराव वारल्यावर त्यांचाहि हिस्सा इंग्रजांनीं खालसा करून फक्त इनाम गांव वंशजाकडे चालू ठेविलीं शिवरावाचे तिसरे पुत्र कोन्हेरराव हे मिरजेस रहात त्यांना तीन मुलगे, वडील नीळकंठराव, हे कोन्हेररावांच्या पश्चात् दोन वर्षांनीच वारले यांचे चिरंजीव गंगाधरराव हे वारल्यानंतर यांचे पुत्र श्री गणपतराव हे गादीवर आले हल्लीं हेच वाडीचे संस्थानिक आहेत हे वाडीकर मिरज येथेंहि रहातात वाडी संस्थानचें उत्पन्न अगदीं थोडें आहे व संस्थानहि लहान आहे, तरी पण यांना दिवाणीफौजदारीचा अधिकार आहे कोन्हेर शिवराव यांचे दुसरे पुत्र श्री विनायकराव हे पुण्यास असतात यांनीं वाडी संस्थानांत वांटा न मागतां नक्त नेमणूक मागितली, ती त्यांना मिळते

का ग वा ड क र घ रा णें —( कागवाड या लेखाखालीं थोडीशी माहिती दिली आहे ती पहा, तिच्या शिवाय जास्त माहिती येथें देतां ) त्रिंबक हरि यांचे पुत्र कोन्हेरराव यांस गणपतराव नांवाचा मुलगा होता तो पेशवाई बुडाली तेव्हां हयात होता यास व कुरुंदवाडकर केशवराव रघुनाथ या उभयतांस कुरुंदवाडचा सरंजाम वांटून दिला होता त्यांत कागवाडची वांटणी गणपतरावाकडे आल्यानें ते येथ राहूं लागले इंग्रजांनीं केशवरावाशीं ज्या प्रकारचा तह केला होता तसाच गणपतरावाशींहि केला होता यांना २० हजार रुपयांची जातीची तैनात मिळाली होती तसेंच नौकरीच्या स्वारांबद्दल १६१२ रु ची नेमणूक ठरली होती स १८२१ त गणपतरावांनीं कृष्णराव वाडीकरांचा मुलगा त्रिंबकराव यास चापलीनच्या संमतीनें दत्तक घेतलें त्यास आपल्या पश्चात् जहागिरदार करण्याबद्दल इंग्रजांस त्यांनीं थैली पाठविली होती परंतु त्यावेळीं इंग्रजसरकारनें तें कबूल केलें नाहीं गणपतराव १८४५ त वारले. त्रिंबकराव अज्ञान, म्हणून संस्थानचे कारभारी व त्र्यंबकरावाचे जनक वडील कृष्णराव यांना कारभार पहाण्यास नेमून इंग्रजांनीं त्रिंबकरावास जहागिरदार मान्य केलें पुढें कारभार चांगला चालला नाहीं कृष्णरावानें कर्ज करून, गांव सावकाराकडे गहाण टाकले त्रिंबकराव प्रौढ झाल्यावर व त्यांच्या हातीं कारभार आल्यावर त्यांच्यानेंहि कारभार चांगला चालेना संगत वाईट लागल्यानें उधळपट्टी होऊं लागली त्यांना गाण्याचा व कविता करण्याचा नाद होता कर्ज जास्त झालें, रयतेवर जुलूम होऊं लागला त्यांनीं दत्तकाची परवानगी मागितली असतां

इमजानें दिली नाहीं ते इ स १८५७ त वारले तेव्हां सर्व दौलत इंग्रजसरकारनें खालसा केली, ते ( नरगुदकराच्या ) बंडात सामील होते असें ठरवून जहागीर खालसा केली असा एक तटस्थ लोकापवाद आहे, मात्र त्यांच्या दोन बायकांकडे ८० हजाराची जिंदगी ठेवून त्यांना नक्त ११ हजाराची नेमणूक करून दिली सन १८६१ त यांची धाकटी बायको वारली तेव्हां इंग्रजांनीं तिची नेमणूक खालसा केली याप्रमाणें १ लक्ष १२ हजार वसुलाचा मुलुख खालसा झाला या मुलुखात ५६ गावें बेळगाव जिल्ह्यांतील, १५ सोलापूर जिल्ह्यांतील व ३ पुणें जिल्ह्यांतील होती कागवाडचा वाडा गणपतरावांनीं बांधिला, गणपतीचें देऊळ त्र्यंबकरावांनीं बांधिलें व त्याचा सभामंडप त्यांच्या कुटुंबा( पार्वतीबाई )नें बांधिला त्र्यंबकराव हे गाणपत्य होते त्यांना दृष्टांत झाल्यावर ( व २१ वर्षें सेवा केल्यावर ) त्यांनीं मांदाराचे मुळाशीं सापडलेल्या गणपतीची स्थापना सदर देवळात केली देवळाला व देवाच्या सर्व सेवेकऱ्यांना त्यांनीं इनामें दिलीं आहेत श्री सवाई माधवरावसाहेबांनीं दिलेलें इनामगाव चोरगाव हें यांच्या ताब्यांत आलें होतें यांना नारायणराव म्हणून औरस पुत्र होते, परंतु ते निवर्तल्यामुळें यांनीं गणपतराव म्हणून एक दत्तक पुत्र घेतले हे गणपतराव १८९१ त वारले त्यांचे पुत्र श्री त्र्यंबकराव हे हल्लीं विद्यमान आहेत सभामंडप बांधणाऱ्या पार्वतीबाई ह्यांच्या त्र्यंबकरावाची आजी होय यांचें माहेर रामदुर्ग होतें त्यांना चोळी बांगडीकरितां रामदुर्गकरांनीं गोणागर हें गाव इनाम दिलें होतें तो गाव हल्लीं श्री त्र्यंबकराव यांच्याकडे चालत आहे यांनीं वाचनालयें वगैरेस मदत केली आहे

कागवाडची देणगी इ. स १७४१च्या पूर्वींची आहे असें म्हणतात कीं, इंग्रजसरकारानें सरंजामासंबंधीं जे नियम केलेले आहेत त्यांत असा स्पष्ट उल्लेख आहे कीं, स १७५१ *च्या पूर्वीं जे सरंजाम बहाल झालेले आहेत, ते वंशपरंपरेनें* चालवावेत, असा प्रकार असता व हा सरंजाम १७४५ ते १८०७ पर्यंत चालला असता पुढें बंद का केला तें स्पष्ट समजत नाहीं [ इपि ग्याझे पु १२, गो वि आपटे—पटवर्धन घराण्याचा इतिहास ]

कुरुंदवाडकर घराण्याची वंशावळ खालीं दिली आहे त्यांत ज्या व्यक्तीचा वंश खुटला त्या व्यक्तीच्या खालीं ० अशी खूण दिली आहे

## कुरुंदवाडसंस्थानची वंशावळ



त्यांची स्वतंत्र देवळें असून धार्मिक बाबतींत कुरुंबनांशीं त्यांचा संबंध येत नाहीं. नायक जात निबिड अरण्यात वस्ती करून रहाते. परंतु कुरुंबनाचा यूरोपीयन मेळ्यावाल्यांशीं संबंध येऊं लागला आहे. कुरुंबनाला नायकाचा मोठा दरारा वाटतो. दोन्ही जातींच्या भाषा कानडीपासून झालेल्या असल्या तरी नायक व कुरुंबन याच्या भाषांत थोडा भेद आढळून येतो. या दोन्ही जातींचे पुजारी एकच असतात. त्यांच्यातील विरोध अलीकडे कमी होऊं लागला आहे असें दिसतें. [ थर्स्टन. से. रि; डुमेल–पल्लव; एटना. सर्व्हे. पु. १ ].

वनवासी कदंब लोक हेच कुरुंबा होत असें काहीं म्हणतात. कुरुंबासंबंधानें दुसरी अशी समजूत आहे कीं दक्षिण प्रांतातले यादव घराणें यापैकींच होतें. दक्षिणेंतील धनगर, बंगालमधील सोंधल व अहीर जातीशीं याचा संबंध होता एवढीच गोष्ट विचार करण्यासारखी आहे. पण त्या बाबतींत दुसरा पुरावा नाहीं. हटगर लोकांची एक शाखा धनगरात आढळते तींत काहीं कुरुंबा सापडत असून खिल्लारी नावाची दुसरी एक जात नजरेस येते. ही खिल्लारी जात आपले बकऱ्याचे कळप घेऊन एका ठिकाणापासून दुसऱ्या ठिकाणीं अशी फिरत असते

मुंबई इलाख्यातील कुरुंबाचे मुख्य २ वर्ग आहेत ते हत्ती कंकण व उनीकंकण हे होत. या दोघात रोटीव्यवहार चालतो; बेटी व्यवहार मात्र नाहीं. हत्ती कंकण लोक सुती माल व उनीकंकण लोकरी माल करणारे असतात. तिसरा एक वर्ग याचा आढळतो त्याला हुंडे कुरुंबा किंवा हुंडे वजीर असें नाव असून ते लिंगायत पंथाचे असतात व ते मास खातात. हत्तीकंकण धनगराच्या मुलीशीं त्याचें लग्न होऊं शकतें. परंतु लग्न झाल्यावर मुलीला पुनरपि आपल्या आईबापाच्या घरीं कधींच पाठवीत नाहीत. हत्तीकंकण धनगरांत खिल्लारी, सेंगर, व हटकर अशा जाती असून त्यात रोटीबेटीव्यवहार चालतात.

कानड्यात व्यभिचारी बायका, विधवा व ज्याना नवरे मिळत नाहीत अशा मुली हलक्या जातींतल्या मनुष्याजवळ बायको म्हणून रहातात. अशा बायकाना कटिगर अथवा बेरया म्हणतात. [ सेन्सस रिपोर्ट मुंबई १९११ ]. या बायका जातींत असून त्यांच्या मुलाचीं लग्नें कुरुंबा धनगराच्या मुलीशीं जुळतात. लग्नाची मागणी कोणत्याहि पक्षाकडून होते. कुरुंबा धनगर गाईचें व डुकराचें खेरीज करून बाकीचें मास खातात व दारु पितात. याच्या देवाचें नांव बीराप्पा असून त्याचे पुजारी जरी कुरबन धनगरांपैकीं असतात तरी त्यांना वडेर म्हणतात व हे कुरबन धनगराचे पिढीजाद गुरु होत. याच्यात मृतासंबंधीं विधी आहेत तेच बहुधा कदंब लोकात प्रचारात असतात. याच्यात जातपंचायती आहेत. [ एन्थावेन ].

**कुरुंब्रनाड**—मद्रास इलाख्यात मलबार जिल्ह्यातील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ५०५ चौ. मै. असून यात १०४ खेडीं आहेत. १९२१ साली येथील लो. सं. ३,५६,९०७ होती. १९२१–२२ सालीं सान्याचें उत्पन्न सुमारें ५ लाख होतें. बदगर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. कुरुंब्रनाड व कालिकत तालुक्याच्या सरहद्दीवरून कोरपुला नदी वाहत गेलेली आहे. याच्या पूर्वेस व्यानद तालुका आहे. पहाडाची रांग जवळच असल्यामुळें एकंदर प्रदेश मोठा रमणीय दिसतो. एकंदर जमीन सुपीक आहे. मात्र समुद्रकिनाऱ्यावरील जमिनीचा भाग पिकाला योग्य नाहीं.

**कुरुयुद्ध**—हें महायुद्ध कौरव व पांडव (पांडवहि कुरुवंशातील असल्यानें एक प्रकारें कौरवच होत) याच्यामध्यें झालें. पांडवाचें राज्य त्यानीं प्रतिज्ञा पुरी केल्यानंतरहि त्याच्या हवाली करण्यास कौरव तयार होईनात म्हणून हें युद्ध उपस्थित झालें. तत्पूर्वी शिष्टाचारप्रमाणें श्रीकृष्ण हे शिष्टाई करण्यास कौरवाकडे गेले होते; परंतु ती निष्फळ झाली व त्यामुळें युद्धाशिवाय दुसरा उपाय (पांडवाना) उरला नाहीं. महाभारताचा मुख्य विषय हें युद्ध आहे व या युद्धास भारतीयुद्धहि म्हणण्याचा प्रघात आहे [ महाभारत पहा.]

**युद्धाचें सत्यत्व.**—हेंच काहींच्या मतें सिद्ध होत नाहीं. का कीं वैदिक वाङ्मयात धृतराष्ट्र, कौरव, परीक्षिति व जन्मेजय इत्यादिकाचा उल्लेख असून कुरुयुद्धाचा तेवढा उल्लेख नाहीं. तथापि या युद्धावर जें अनेक प्रकारचें वाङ्मय निर्माण झालें त्यावरून हें युद्ध झालें असावें असें गृहीत धरता येईल. शिवाय असेंहि शक्य आहे कीं वैदिक संस्कृतींतील *म्हणजे मात्र संस्कृतींतील सुशिक्षित वर्ग भारतीयुद्धानंतर* कुरुक्षेत्रीं पूर्णपणें स्थापन झाला असावा व त्यामुळें धार्तराष्ट्राचा किरकोळ उल्लेखच वैदिक वाङ्मयात शिरला असावा.

**कुरुयुद्धकाल.**—या युद्धाच्या काळाविषयीं अनेक मतें प्रसिद्ध आहेत. कै. मोडकांचें मत वगळून इतर मतें पाहिलीं असता ख्रि. पू. १५०० व ख्रि. पू. ३००० या दोन मध्यांच्या आसपासचे काल भिन्न संशोधकानीं मांडले आहेत. मुख्य कालनिश्चयाचीं अशीं पांच मतें आहेत तीं थोडक्यात अशीं(१) कै. मोडक याचें मतः—ख्रि. पू. ५००० वर्षे. या युद्धाच्या वेळीं ग्रहांची स्थिति निरनिराळ्या दोन नक्षत्रावर ( महाभारतात) सांगितली आहे, तेव्हा एक नक्षत्र सायण व दुसरें निरयन मानलें पाहिजे, यावरून त्यावेळीं वसंतसंपात पुनर्वसू नक्षत्रात होता. या हिशेबावरून गणित करून पाहता युद्धाचा काळ ख्रि. पू. ५००० हा येतो. (२) आर्यज्योतिष्याचें मत–ःख्रि. पू. ३१०१. या वर्षी " प्राप्तं कलियुगं विद्धि " ( कलियुग लागलेंच असें जाण ) अशा ( शल्यपर्वांतील ) श्रीकृष्णाच्या वाक्यावरून युद्ध झाल्यावर लवकरच चैत्रात कलियुग लागलें असें धरलें, आणि कलियुग सर्व आर्यज्योतिष्याच्या मतें ख्रि. पू. ३१०१ या वर्षी लागलें; अर्थातच तोच काल या मह,

कुरुनेगॅला—कुरुनेगॅला हें सीलोनच्या वायव्य प्रांतातील मुख्य शहर आहे. याची लोकसंख्या ६४८३ व जिल्ह्याची लोकसंख्या १,४९,४२९ आहे. इ. स. १३१९ पासून १३४७ पर्यंत हें शहर सीलोनच्या राजाचें रहाण्याचें ठिकाण होतें. हें तांदूळ, नारळ, चहा, कॉफी व कोकायान्या लागवडीचें मुख्य ठिकाण आहे.

कुरुपांचाल—कुरुदेशास पूर्वदिशेकडून लागून असलेला प्रथम देश जो पांचाल त्यासच हें नाव आहे. त्यास हें नाव देण्याचें कारण आणखी दुसरा एक पांचाल आहे त्याशीं याचा संकर होऊ नये [ज्ञानकोश वि. ४, पा. १७७ व वि. ३ पा. ३१७ पहा.]

कुरुंबा—कुरुबा, कुरमा. मद्रास, म्हैसूर हैदराबाद व कुर्ग या भागांतून यांची वस्ती आहे. एकंदर लो. सं. (१९११) ९४७६१९. कांचीच्या पल्लव राजान्या सैन्यात याचा विशेष भरणा असे. जंगलात रहाणार कुरुबा आणि धनगराचा व कोष्ट्याचा धंदा करणारे कुरुबालोक यामध्यें असलेल्या संबंधाविषयीं वाद असला तरी खानेसुमारीच्या रिपो र्टावरून कुरुवा, कुरुबा व कुम्म ही सर्व नावें थोड्या फरकानें बहुधा एकाच जातीचीं वाचक होत असें दिसून येते. म्हैसूरच्या रानटी कुरुबा लोकाचे दोन वर्ग आढळतात. बेट्टा अथवा डोंगरावर राहणारे कुरुबा आणि जेनू अथवा मध काढणार कुरुबा. बेट्टा वर्ग जेनूपेक्षा जास्त सुखी दिसतो. बेट्टा जातीचा धंदा शेती करणे हा आहे. बेट्टा लोक केस वाढवितात, जेनू केस काढतात. बेट्टा स्त्री अगमर वस्त्र धारण करिते, पण गरीब जेनू त्या बाबतींत दरिद्री असलेली आढळते. बेट्टा व जेनूमध्यें विवाहसंबंध होत नाहींत. बेट्टा जात माहुताच्या धंद्यात प्रवीण असते. काडू कुरुब हे झोंपड्या बांधून रहातात ते शेती करितात तथापि हत्ती पकडण्याच्या कामीं ते फार प्रवीण आहेत. सच्चेपणा हा गुण या जातीचा विशेष असल्यामुळें ते विश्वासाई झाले आहेत.

वायनाड, कालिकत व मलबारचे एरनाड तालुके येथें असणाऱ्या कुरुबाचे मुल्लू, जेन व ऊराळी असे तीन विभाग असून मुल्लूचा धंदा शेती आहे व जेना चा धंदा टोपल्या तयार करणें हा आहे. हे सर्व लोक धनुष्यबाण वापरतात. जेन कुरुबाची देवता मस्ति नावाची आहे. धर्म व वागणूक यासंबंधीं ऊराळी जातीचे लोक मुल्लू व जेन याहून थोडे भिन्न आहेत.

निलगिरी व वायनाड येथील कुरुबात मुल्लू, बेट्टा, ऊराळी, टेन व टच्च-दन मूप्पन असा पोटजाती आहेत यापैकीं पहिली व शेवटची जात मल्याळी भाषा बोलणारी आहे. इतर जातीचे लोक कानडी बोलतात. निलगिरी डोंगरानजीक असलेलीं कुरुबाचीं खेडीं म्हणजे चार पाच झोपड्यांचा एक एक गट्ट होय. जमिनींत धान्य वा लागवड करून शिवाय जंगलांतील मध, डिंक इत्यादि वस्तू देऊन ते लोकांशीं ते फेरमोबदल्याचा व्यवहार करतात. कांहीं लोक कॉफीच्या कारखान्यात काम करून मजुरी मिळवितात. कांहीं बागबगीचाचाहि धंदा करितात. कांहीं लोक पिल्या विणून उपजीविका करितात. त्यांच्या स्त्रिया घरगुती कामाशिवाय अन्य व्यवसाय करीत नाहींत.

कांहीं कुरुबा लोक शिवाची उपासना करितात, व त्यांच्या स्त्रिया कपाळास शिवाचा तिलक लावितात. कांहीं कुरियन नावाच्या देवतेची उपासना करितात. मुस्नी नाव धारण करणाऱ्या शिवपत्नीचीहि उपासना करण्यात येते. हिरीयादेव नावाच्या पाषाणमूर्तीस कांहीं भजतात. या देवास बकरें अर्पून प्रसाद पुजाऱ्यास दिला जातो. पोनी येथील डोंगरावर एक देवता असून त्या ठिकाणीं प्रतिवर्षी लोक यात्रेस जातात.

निलगिरी येथील कुरुबामध्यें कित्येक भावात एकच समाईक बायको करितात अशी माहिती सापडते (कास्ट्स ॲन्ड ट्राइब्ज ऑफ इंडिया, पान १६९) त्यांच्यात लग्नसंस्कार असा नाहींच असेंहि सांगण्यात येतें. तथापि नवरा बायको यानीं परस्परावर जलसिंचन करणें, मेजवान्या होणें व सोळा नामकर गतीत रूढ असल्याप्रमाणें बधून तंबाखूच्या पानाची विडी उभय पक्षाकरिता तयार करणें इत्यादि प्रकार रानटी लोकाच्या लग्नसंस्काराचें प्राथमिक स्वरूप व्यक्त करितात.

औषधी मुळ्या व वनस्पती यांचें ज्ञान कुरुबन लोकांना चांगलें असते. जंगली कुरुबन व नगरवासी कुरुबन याच्यात वैमनस्य असतें व त्यांना कुरुबनाच्या जादुगिरीचा व भुताटकीचा मोठा धाक असतो. कोणतीहि साथ, अपमृत्यु, रुग्णावस्था किंवा आपत्ति आली असता या सर्व गोष्टी कुरुबनामुळें घडून येतात असा सर्वत्र समज झालेला आहे. तोडा नावाच्या जातीला तर याचा दहशतच बसली आहे. कुरुबन जातीचा दुसरा नाद म्हणजे मधमाशांची पोळीं जमा करून मध काढणें हा होय. आपल्या तीक्ष्ण दृष्टीनें ते अगदीं अडचणीच्या जागेंतील पोवळें अचुक शोधतात व त्या ठिकाणीं दोन काठ्या पुरून ठेवतात. या काठ्या पाहिल्या नंतर त्या पोवळ्याकडे पाहण्याचासुद्धा इतरास छाती होत नाहीं. मद्य व तंबाखू यांचें ते सेवन करितात व काळोख्या रात्रीं दिवट्या घेऊन एखाद्या गव्याचा वध करतात व त्याचें मांस खातात. म्हैसूर येथील अरण्यात राहणारे कुरुबन हे घर्षणानें अग्नि उत्पन्न करतात. तोडा जातीचे लोक ज्या रीतीनें विस्तव तयार करितात तीच रीत याचीहि असते. चकमकीनें विस्तव करण्यास जीं उपकरणें लागतात तींच साधारणत याच्यात वापरलीं जातात.

वायनाड येथील सोन्याच्या खाणींत कुरुबन लोकांचा चांगला उपयोग झाल्याची प्रसिद्धि आहे. निलगिरीच्या आसमंतात असलेले नायक लोक व कुरुबन याच्यात फरक आहे. त्या दोन्ही वर्गांत रोटीबेटीव्यवहार होत नाहींत. नायक लोक स्वत:स कुरुबनापेक्षा उच्च दर्जाचे समजतात.

त्यांची स्वतंत्र देवळें असून धार्मिक बाबतींत कुरुंबनांशीं त्यांचा संबंध येत नाहीं. नायक जात निबिड अरण्यात वस्ती करून रहाते. परंतु कुरुंबनाचा यूरोपीयन मेव्हेवाल्यांशीं संबंध येऊं लागला आहे. कुरुंबनाला नायकांचा मोठा दरारा वाटतो. दोन्हीं जातींच्या भाषा कानडींपासून झालेल्या असल्या तरी नायक व कुरुंबन यांच्या भाषांत थोडा भेद आढळून येतो. या दोन्ही जातींचे पुजारी एकच असतात. त्यांच्यातील विरोध अलीकडे कमी होऊं लागला आहे असें दिसतें. [ थर्स्टन. से. रि; डुमेल-पल्लव; एटना. सर्व्हे. पु. १ ].

वनवासी कदंब लोक हेच कुरुंबा होत असें कांहीं म्हणतात. कुरुंबासंबंधानें दुसरी अशी समजूत आहे कीं दक्षिण प्रातांतलें यादव घराणें यांपैकींच होतें. दक्षिणेंतील धनगर, बंगालमधील सोंधल व अहीर जातीशीं यांचा संबंध होता एवढी गोष्ट विचार करण्यासारखी आहे. पण त्या बाबतींत दुसरा पुरावा नाहीं. हरगर लोकांची एक शाखा धनगरात आढळते तींत कांहीं कुरुंबा सांपडत असून खिल्लारी नावाची दुसरी एक जात नजरेस येते. ही खिल्लारी जात आपले बकऱ्याचे कळप घेऊन एका ठिकाणापासून दुसऱ्या ठिकाणीं अशी फिरत असते.

मुंबई इलाख्यातील कुरुंबाचे मुख्य २ वर्ग आहेत ते हत्ती कंकण व उनीकंकण हे होत. या दोघांत रोटीव्यवहार चालतो: बेटी व्यवहार मात्र नाहीं. हत्तीकंकण लोक सुती माल व उनीकंकण लोंकरी माल करणारे असतात. तिसरा एक वर्ग याचा आढळतो त्याला हुंडे कुरुंबा किंवा हुंडे वर्गार असें नाव असून ते लिंगायत पंथाचे असतात व ते मास खातात. हत्तीकंकण धनगराच्या मुलीशीं त्यांचें लग्न होऊं शकतें. परंतु लग्न झाल्यावर मुलीला पुनरपि आपल्या आईबापाच्या घरीं कधींच पाठवीत नाहींत. हत्तीकंकण धनगरांत खिल्लारी, संगर, व हटकर अशा जाती असून त्यात रोटीबेटीव्यवहार चालतात.

कानड्यात व्यभिचारी बायका, विधवा व ज्याना नवरे मिळत नाहींत अशा मुली हलक्या जातींतल्या मनुष्याजवळ बायको म्हणून रहातात. अशा बायकाना कटिगर अथवा वेश्या म्हणतात. [ सेन्सस रिपोर्ट मुंबई १९११ ]. या बायका जातींत असून त्यांच्या मुलाचीं लग्नें कुरुंबा धनगराच्या मुलीशीं जुळतात. लग्नाची मागणी कोणत्याहि पक्षाकडून होते. कुरुंबा धनगर गाईचें व डुकराचें खेरीज करून बाकीचें मास खातात व दारू पितात. यांच्या देवाचें नाव बीराप्पा असून त्याचे पुजारी जरी कुरबन धनगरांपैकीं असतात तरी त्याना वडेर म्हणतात व हे कुरबन धनगराचे पिढीजाद गुरु होत. यांच्यांत मृतासंबंधीं विधी आहेत तेच बहुधा कदंब लोकात प्रचारात असतात. यांच्यात जातपंचायती आहेत. [ एन्थोवेन ].

कुरुंबनाड—मद्रास इलाख्यांत मलबार जिल्ह्यातील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ५०५ चौ. मै. असून यांत १०४ खेडीं आहेत. १९२१ सालीं येथील लो. सं. ३,५६,९०७ होती. १९२१–२२ सालीं साऱ्याचें उत्पन्न सुमारें ५ लाख होतें. बदगर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. कुरुंबनाड व कालिकत तालुक्याच्या सरहद्दीवरून कोरपुला नदी वाहत गेलेली आहे. याच्या पूर्वेस व्यानद तालुका आहे. पहाडाची रांग जवळच असल्यामुळें एकंदर प्रदेश मोठा रमणीय दिसतो. एकंदर जमीन सुपीक आहे. मात्र समुद्रकिनाऱ्यावरील जमिनीचा भाग पिकाला योग्य नाहीं.

कुरुयुद्ध—हें महायुद्ध कौरव व पांडव ( पांडवहि कुरुवंशातील असल्यानें एक प्रकारें कौरवच होत ) यांच्यामध्यें झालें. पांडवाचें राज्य त्यानीं प्रतिज्ञा पुरी केल्यानंतरहि त्यांच्या हवाली करण्यास कौरव तयार होईनात म्हणून हें युद्ध उपस्थित झालें. तत्पूर्वी शिष्टाचारप्रमाणें श्रीकृष्ण हे शिष्टाई करण्यास कौरवाकडे गेले होते; परंतु ती निष्फळ झाली व त्यामुळें युद्धाशिवाय दुसरा उपाय ( पांडवाना ) उरला नाहीं. महाभारताचा मुख्य विषय हें युद्ध आहे व या युद्धास भारतीयुद्धहि म्हणण्याचा प्रघात आहे [ महाभारत पहा.]

युद्धाचें सत्यत्व.—हेंच कांहींच्या मतें सिद्ध होत नाहीं. का कीं वैदिक वाङ्मयात धृतराष्ट्र, कौरव, परीक्षिति व जन्मेजय इत्यादिकाचा उल्लेख असून कुरुयुद्धाचा तेवढा उल्लेख नाहीं. तथापि या युद्धावर जें अनेक प्रकारचें वाङमय निर्माण झालें त्यावरून हें युद्ध झालें असावें असें गृहीत धरता येईल. शिवाय असेंहि शक्य आहे कीं वैदिक संस्कृतींतील म्हणजे मात्र संस्कृतींतील सुशिक्षित वर्ग भारतीयुद्धानंतर कुरुक्षेत्रीं पूर्णपणें स्थापन झाला असावा व त्यामुळें धार्तराष्ट्राचा किरकोळ उल्लेखच वैदिक वाङ्मयात शिरला असावा.

कुरुयुद्धकाल.—या युद्धाच्या काळाविषयीं अनेक मतें प्रसिद्ध आहेत. कै. मोडकाचें मत वगळून इतर मतें पाहिलीं असता ख्रि. पू. १५०० व ख्रि. पू. ३००० या दोन मध्याच्या आसपासचे काल भिन्न संशोधकानीं मांडले आहेत. मुख्य कालनिश्चयाचीं अशीं पाच मतें आहेत तीं थोडक्यात अशीं(१) कै. मोडक याचें मतः—ख्रि. पू. ५००० वर्षे. या युद्धाच्या वेळीं ग्रहांची स्थिति निरनिराळ्या दोन नक्षत्रावर ( महाभारतात) सांगितली आहे, तेव्हा एक नक्षत्र सायन व दुसरें निरयन मानलें पाहिजे; यावरून त्यावेळीं वसंतसंपात पुनर्वसू नक्षत्रात होता. या हिशेबावरून गणित करून पाहता युद्धाचा काळ ख्रि. पू. ५००० हा येतो. (२) आर्यज्योतिष्याचें मत—ख्रि. पू. ३१०१. या वर्षी "प्राप्तं कलियुगं विद्धि" ( कलियुग लागलेंच असें जाण ) अशा ( शल्यपर्वांतील ) श्रीकृष्णाच्या वाक्यावरून युद्ध झाल्यावर लवकरच चैत्रात कलियुग लागलें असें धरलें, आणि कलियुग सर्व आर्यज्योतिष्याच्या मतें ख्रि. पू. ३१०१ या वर्षी लागलें; अर्थातच तोच काल या महा

युद्धाचा होय (३) वराहमिहिर, काश्मीरी पंडित (विशेषत बिल्हण) व आर्यसमाजाचे काहीं विद्वान सभासद -खि पू २४४८ या वर्षी त्याच्या मतें कलियुग सुरु झाल्यावर ६५३ वर्षांनीं युद्ध झालें (४) रमेशचंद्रदत्त वगैरे पौर्वात्य व अनेक पाश्चात्य पंडित -खि पू १४०० कारण पुराणात बृहद्रथवंशा तील पांडवाचा समकालीन मगधराजा याच्यापासून नंदा पर्यंतचा जो काल दिला आहे त्यावरुन हा काल निश्चित होतो (५) बिळंडी अय्यर -आक्टोबर तारीख १४, खि पू. ११९४ (कार्तिक वद्य ११ चित्रा नक्षत्र)

या पाच कालाबद्दल निरनिराळ्या विद्वानाचीं मतें काय आहेत तीं थोडक्यात सागतों भारती युद्धापासून कलियुगाला प्रारभ झाला अशीं वचनें महाभारतांत दोन तीन ठिकाणीं आलीं आहेत तीं (१) प्राप्त कलियुग विद्धि'-शल्यपर्व (२) 'एतत्कलियुग नाम अचिरात् प्रवर्तते'-वनपर्व (३) अन्तरे चैव सप्राप्ते कलिद्वापरयोरभूत् । स्यमतपचके युद्ध कुरुपांडवसेनयो'-आदिपर्व यावरून हें युद्ध कलियुगारभीं झालें ही समजूत महाभारतकार सौति याच्या वेळीं (खि पू ३००) पक्की रूढ होती कुरुयुद्धकाल म्हणजे जसा श्रीकृष्णाचा काळ येतो तसाच कलियुगाचा प्रारभकालहि येतो तेव्हा हे दोन्हीं काल ठरले म्हणजे आपोआपच युद्धकाल ठरेल असें या पक्षाचें म्हणणें आहे श्रीकृष्णाचा काल ठरविण्यास एक महत्वाचें बाह्य साधनाचें प्रमाण उपलब्ध आहे, त पुढील प्रमाणें माडण्यात येतें -चद्रगुप्त मौर्याच्या दरबारात यवन (ग्रीक) मेग्यास्थिनीस हा वकील होता, त्यानें त्यावेळीं शोध करून श्रीकृष्णाच्या कालाबद्दल लिहून ठेविलें आहे ती ऐकीव माहिती खरी धरून कृष्णकाल काढण्याचे काहींनीं साहस केलें आहे मेग्यास्थिनीस म्हणतो " सँड्रकोट्स (चद्रगुप्त) व डॉयानिसॉस (याच्या भारतीय तुल्यार्चे नाव काय तें समजत नाहीं दाक्षायण मनु?) याच्यामध्यें १५३ पिढ्या झाल्या व वर्षे ६०४२ झालीं डॉयानिसॉस पासून हिराक्लीज (हरिकृष्ण, शौरीकृष्ण) हा १५ पिढ्या अलीकडे झाला " म्हणजे १५३-१५ = १३८ पिढ्या श्रीकृष्ण व चद्रगुप्त याच्या दरम्यान झाल्या. दर पिढीस २० वर्षे धरल्यास १३८x२० = २७६० वर्षांचा हा ठोकळ काळ येतो चद्रगुप्ताचा काळ खि पू ३१२ असा ठरला आहे तेव्हा २७६०+३१२ = ३०७२ खि पू हा काल श्रीकृष्णाचा ठरतो हा खि पू ३१०१ या कलियुग कालाशीं जुळता आहे हा कलियुगारभाचा काळ (तारीख १७ फेब्रुवारी खि पू ३१०१, मिति फाल्गुन कृष्ण अमावास्या गुरुवार मध्यरात्र) सूर्यसिद्धांताप्रमाणें काढिला आहे वरील मेग्यास्थिनीसचा पुरावा फार प्राचीन (खि पू ३१२) असल्यानें त्याला विशेष किंमत आहे रा ब वैद्यानीं वरील प्रमाणें हिशोब देताना बरीच वैदुगिरी केली आहे मेग्यास्थिनीसनें १५३ पिढ्या सागितल्या आहेत तेवढेंच खरें धरायाचे आणि त्यानीं सागितलेलीं वर्षे मात्र खरीं धरावयाचीं नाहींत या प्रकारच्या विवेचनपद्धतीची किंमत कशी ठरवावयाची?

वराहमिहिरानें जो काल दिला आहे तो सर्व ज्योतिष्याच्या मताच्या विरुद्ध व महाभारतातील प्रत्यक्ष वचनाच्या विरुद्ध गर्गाचार्याच्या " षड्द्विकपचद्वियुत शककालस्तस्य राज्ञस्य" या वाक्यावरुन दिला आहे परंतु हें वचन गर्गा या नावाचर कोणी तरी रचिलें असावें कारण शककालापूर्वी एवढेंच नव्हे तर (महाभारतात त्याचें नाव प्रत्यक्ष येतें, त्यावरून तर) महाभारतापूर्वीच गर्ग होऊन गेला कदाचित् गर्गानें २५२६ हा आकडा आपल्या एखाद्या समकालीन राजातील व युधिष्ठिरकाल अतराचा निदर्शक म्हणूनहि दिला असेल परंतु याचा समाधानकारक खुलासा होत नाहीं मात्र हा अक त्यानें एखाद्या राजवंशावळीवरून तयार केला असावा कारण अशा वंशावळी त्यावेळीं सर्वत्र तयार ठेवीत असत (राजतरंगिणी पहा) सारांश इतर ज्योतिष्याच्या मताविरुद्ध (विशेषत खुद्द महाभारतातील वचनाविरुद्ध) या एकट्या वराहमिहिराच्या वचनास मान्यता देता येत नाहीं, " असें चिंतामणराव वैद्य म्हणतात त्याच्या मतें रोहिणी किंवा मृग नक्षत्रीं मार्गशीर्ष शुद्ध १३ या तिथीस युद्ध सुरु झालें आम्हीं ह्या गर्गवचनाचा अनादर करण्यास तें वचन गर्गाचें नव्हे असें सिद्ध करण्याच्या भानगडींत पडत नाहीं गर्ग संहिताकार गर्गशकोत्तर नसेल कशावरून? आम्हीं असें म्हणणार कीं शालिवाहनकालीन मनुष्यानें हजार दोन हजार वर्षांपूर्वीची झालेल्या गोष्टीची नक्की तारीख सांगितली तर त्यानें केवळ "बाबा वाक्य प्रमाण" म्हणून स्वीकारलेली गोष्ट आहे असें म्हणून ती अजाबाद खोटी धरणार

रमेशचद्र दत्तादिकाचा खि पू १४०० चा काळ, मुख्यत्वें विष्णुपुराणावरुन ठरविलेला आहे त्यात पुढील वाक्य या कालाचें मूळ म्हणून दर्शविलें जातें —"यावत्परीक्षितो जन्म यावन्नंदाभिषेचनम् । एतद्वर्षसहस्र तु ज्ञेयं पचदशोत्तरम् ॥" (असाच श्लोक भागवतातहि आहे) या श्लोकात परीक्षिताच्या जन्मापासून नंदाच्या अभिषेकापर्यंत १०१५ वर्षे झालीं असें म्हटलें आहे परीक्षिति हा युद्धानतर ४।५ महिन्यानीं जन्मला तेव्हा युद्ध तो नदाभिषेक १०१५ + त्या पुढील नऊ नंदाचीं १०० वर्षे+ चद्रगुप्ताची ३१२ मिळून एकंदर = १४२७ खि पू हा भारतीयुद्धाचा काल आला पण विष्णुपुराणातील हेंच वचन (अश ४ अध्याय २४) विष्णुपुराणातीलच दुसऱ्या (अध्याय २३) एका वचनाच्या विरुद्ध आहे त्यात भारतीयुद्धातील जरासधपुत्र सहदेव याचा वंश १००० वर्षे राज्य करील व नंतर प्रद्योतवंश १३८ वर्षे व त्यानतर शिशुनागवंश ३६२ वर्षे राज्य करील असें म्हटलें आहे म्हणजे एकदर १०००+१३८+३६२ = १५०० वर्षे होतात तेव्हा या १५०० चा व पूर्वीच्या १०१५ चा मेळ मुळींच बसत नाहीं पुराणकारांची माहिती ठोबळ स्वरूपाची आहे म्हणून या

वियानाकडे अधिक सूक्ष्मतेनें पाहिलें पाहिजे तथापि तेवढ्या असंगतीवरून विष्णु, भागवत वगैरेमधील या पुराणोक्त विरोध व वगैरे याचा पुरावा मेग्यास्थीनीसच्या पुराव्यासमोर टिकत नाही असें जें चिंतामणरावांनीं माडलें आहे त्याचा मुळींच स्वीकार करता येणार नाहीं मेग्यास्थीनीसच्या पुराव्याला महत्व यावयाचें म्हणजे त्यास आपणापेक्षां अधिक साहित्य निश्चितपणें खरें असलेलें उपलब्ध झालें होतें व त्या साहित्यावरून त्यानें केलेला हिशोब अगदीं चिनचूक होता असें धरलें पाहिजे आणि तसें धरण्यास आधार काय ?

ऋग्वेदातील दोन उल्लेखावरून कुरुयुद्धाचा काल ख्रि पू ३१०० च्या पेक्षाच निघतो असेंहि मांडण्यात आलें आहे ऋग्वेदात देवापि या ऋषीचें नाव येतें तेथें त्यास वेदार्थ स्पष्टीकरण करणारांनीं-वेदांनीं नव्हे—'कौरव्य शंतनु' याचा भाऊ म्हटलें अहे महाभारतात, शंतनूचा वडील भाऊ म्हणून देवापीचें नाव येतेंच. तेव्हा शंतनु ( अथवा देवापि )-विचित्रवीर्य-पंडु-पाडव मिळून १०० वर्षें होतात ऋग्वेदांत दुसऱ्या एका ठिकाणीं सोमक साहदेव्य याचा उल्लेख आला आहे. महाभारतात द्रुपदाचा पूर्वज सोमक असें म्हटलें आहे सहदेव-सोमक-जतु-पृषत-द्रुपद मिळून १०० च वर्षें होतात म्हणजे ऋग्वेदानंतर १००, १५० वर्षांनीं भारतीयुद्ध झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं यजुर्वेदात कुरु व पांचाल यांचीं नावें येतात तसच काठक ब्राह्मणात धृतराष्ट्र वैचित्रवीर्य याचा उल्लेख येतो आणि शुक्लयजुर्वेदांतर्गत शतपथ ब्राह्मणात जनमेजय पारीक्षिताचा उल्लेख आहे. या सर्व उल्लेखावरून त्या त्या वेद व वेदांगापूर्वी भारतीय युद्ध झालें हें स्पष्ट आहे शतपथ ब्राह्मणात कृत्तिका या थेट पूर्वेस उगवतात असें एक ( वर्तमानकालवाचक ) वचन आहे कै शं बा दीक्षित यांनीं गणित करून कृत्तिकेचा हा काळ ख्रि पू ३००० असा काढला आहे तेव्हा शतपथापूर्वी ( जनमेजय-परिक्षिती-अभिमन्यु-अर्जुन ) निदान ६०।७५ वर्षें तरी भारतीय युद्ध झालें शतपथापूर्वी कित्येक वर्षें ऋग्वेद तयार होत होता तेव्हा ख्रि पू ३२०० हा ऋग्वेदाचा शेवटचा काळ धरण्यास हरकत नाहीं वर सांगितल्याप्रमाणें या कालानंतर १०० वर्षांनीं युद्ध झालें म्हणजे ख्रि पू ३१०० हाच काल युद्धाचा येतो (याकोबी यानें ऋग्वेदाचा काळ ज्योतिषप्रमाणावरून ख्रि पू ४ हजार वर्षें ठरविला आहे ) तसेंच यजुर्वेदाचा काळ ३००० या धरतात. त्यावरूनहि युद्धाचा काळ वरीलच निघतो

चांद्रमान हिशेबानें पाडवांनीं आपला वनवास पुरा केला असें महाभारतात वर्णन आहे ही चांद्रमानाची पद्धत (पाच वर्षांनी दोन महिने एकदम अधिक धरण्याचा संप्रदाय ) तैत्तिरीय संहिता व ब्राह्मणकाळीं होती व तीच भीष्मानें दुर्योधनाच्या शंकेस उत्तर म्हणून सांगितली अर्थात् तै सं व ब्राह्मणकालीं कुरुयुद्ध झाल या प्रकारच्या माडणींतील गुणदोष येणेंप्रमाणें :—शतपथ ब्राह्मणापूर्वी भारतीयुद्ध झालें हें मत स्वीकारता येईल तथापि देवापि व शंतनु यांचें बंधुत्व हें उत्तरकालीन कथाप्रमाणेंच दिसतें म्हणून धरता येणार नाहीं द्रुपद पूर्वज सोमक व ऋग्वेदोक्त सोमक हे एकच होत याला आधार काय तर दोघांचेंहि नांव सोमक होतें हाच ! ।

उरलेल्या कृत्तिका वादाचा परामर्श यापुढें घेतला आहे. आमच्या मतें त्या उल्लेखावरून शतपथाचें प्राचीनत्व सिद्ध होत नाहीं वेदांगापूर्वी भारतीयुद्ध झालें हें सांगण्यांत तात्पर्य काय ? बरीचशीं वेदाग तर फारच अर्वाचीन आहेत. मीमांसेंत तर बौद्धाचा उल्लेख येतो एवच रा. चिं वि वैद्यानीं इमारत अगदीं कच्च्या पायावर उभारलेली आहे रा वैद्य मोडकांच्या मताचें खंडण करण्यासाठीं माडणी करतात ती अशी :—

कै मोडक यानीं उद्योगपर्वामध्यें व भीष्मपर्वामध्यें आलेल्या ग्रहस्थितीच्या वर्णनावरून युद्धकाल ठरविला आहे तीं वचनें पुढीलप्रमाणें आहेत ( १ ) श्रीकृष्ण हे कार्तिक महिन्यात रेवती नक्षत्रीं शिष्टाईस निघाले ( २ ) हस्तिनापुरास कर्णानें त्याची भेट घेतली त्यावेळीं त्यानें, शनि हा रोहिणीस पीडा देत आहे, महापात चित्रेला पीडा देत आहे, राहु सूर्याला ग्रासतो आहे, उग्रपणाचा मंगळ वक्री होऊन अनुराधेशीं संगत होतो आहे, असें वर्णन केलें आहे ( ३ ) दुर्योधनानें पुष्य नक्षत्रीं प्रयाण केलें ( ४ ) कार्तिकात वद्य पक्षात श्रीकृष्ण परतले त्या पक्षात १३ च दिवसाचा पंधरवडा होता ( भीष्मपर्व ) व सूर्यग्रहण आणि चंद्रग्रहण अशीं दोन्हीं ग्रहणें या महिन्यात पडलीं ( ५ ) युद्धारंभदिनास चंद्र मघा नक्षत्रीं होता ( ६ ) बलराम म्हणतो, मी पुष्य नक्षत्रावर यात्रेस गेलों आणि आज ( युद्धाच्या शेवटच्या १८ व्या दिवशीं ) श्रवणावर परतलों, इत्यादि वचनावरून कै. मोडकांनीं काळ काढिला आहे तो ख्रि पू. ५ हजार वर्षें हा होय पण हें अनुमान काढतांना मुख्य अडचण येते ती ही कीं, सौतीनें भारत वाढविल्यामुळें मूळातील वचनें कोणतीं तें समजणें अशक्य आहे तसेंच काहीं वचनें कूटार्थी असतात, हीं वचनें बहुधा सहदेवेवर जास्त रचिलेलीं आहेत, त्यामुळें वरील अनुमान निःशंकपणें मानता येत नाहीं मात्र कार्तिकी अमावास्येस ( शुक्रवारी ) सूर्यग्रहण पडलें होतें, असें म न ग्रहीत धरून हें गणितानें सिद्ध होत आहे व त्यावरून जो काळ निघतो तो ( म्हणजे शके ३१८० ) आर्यज्योतिषाच्या नेहमीच्या काळालाच अनुसरून म्हणजे ख्रि पू ३१०२ येतो तेव्हां या दृष्टीनें हा पुरावाहि मजबूत आहे मोडकांचा पाच हजारांचा काळ युक्त नाहीं भारतातील ही ग्रहस्थिति इतकी अनिश्चित आहे कीं, तीवरून कोणत्याहि काळ काढणें शक्यच नाहीं असें कै दीक्षित यांचेंहि मत आहे

कै व्य गु काळे यानीं भारतीय युद्धाची रोजनिशी म्हणून एक लेख छापला आहे ( विविधज्ञान विस्तार

जुलै १९१२). त्यांत वरील ग्रहस्थितीच जमेस धरून, युद्ध मार्गशीर्षी पौर्णिमेला सुरू होऊन, पौष शुद्ध द्वितीयेला संपलें असें ठरविलें आहे. पुराणनिरीक्षण या ग्रंथात त्यांनी युद्धकाल खि. पू. १२६३ दिला आहे.

रा. केशवराव दप्तरी यांनीं या विषयावर वि. ज्ञा. वि. च्या १९१८सालच्या अंकात लेख लिहिले आहेत. त्यांचें म्हणणें कीं, "भारतांतील वाक्यें परस्परविरोधी असूनहि त्यांपैकीं ग्राह्य कोणतीं व त्याज्य कोणतीं हें ठरविण्याचा कोणींच प्रयत्न केला नाहीं; त्यामुळें त्यांचे प्रयत्न फसले, मी तो प्रयत्न केला आहे व तो सिद्धीस गेला आहे असें वाटतें" युद्धदिनाबद्दल त्यांचें मत, गणितानें येणाऱ्या कार्तिकाच्या अमावास्येस, परंतु वास्तविक मार्गशीर्ष शुद्ध द्वितीयेस ज्येष्ठा किंवा मूळ नक्षत्रीं युद्ध सुरू झालें असें आहे. युद्धकालासंबंधीं लिहितांना, त्यांनीं भारतात सांगितलेल्या उत्तरायणारंभकालावरून तो काल काढला आहे आणि तो खि. पू. ११९७ हा होय.

रा. करंदीकर हे युद्धाचा काल १५०० पूर्वी एक दोन शतकें इतका नेतात पण त्यांच्या विधानातहि ज्योतिर्विषयक विधानावर अवलंबून रहाणारामध्यें सापडणारे दोष सापडतात. युद्धाच्या कालाविषयीं इतकी अनिश्चितता असता युद्धदिननिर्णयासाठीं प्रयत्न झाले आहेत.

रा. ज. स. करंदीकर यांनीं भारतीय युद्धदिननिर्णय अथवा गीताजयंति या आपल्या [ चित्रमयजगत्, जानेवारी १९२१च्या] लेखात पुढील निष्कर्ष काढला आहे. यांनीं रा. वें. बा. केतकरांचें म्हणणें कीं "मार्गशीर्ष शु. पौर्णिमा मृग किंवा आर्द्रा नक्षत्रीं युद्धास सुरुवात झाली." हें खोडून काढलें आहे. कारण हा आरंभदिवस धरल्यास जयद्रथवधाच्या दिवशीं अमावास्या येते; परंतु भारतांत त्या दिवशीं पहाटे चंद्रोदयाचें वर्णन आहे म्हणून केतकरांचें म्हणणें चूक आहे. म्हणजे जयद्रथवधवर्णनावरून आमावास्याच निघते तर तें वर्णन किंवा त्या वर्णनावरून निघणारा निष्कर्ष अमान्य करून त्यावेळचें चंद्रोदय वर्णन हें मात्र अप्रक्षिप्त व प्रमाण असें रा.करंदीकर समजतात मिलर्डी यांचें म्हणणें कीं, "कार्तिक कृ. ११ चित्रा नक्षत्रीं" आरंभ झाला हेंहि करंदीकर यांनीं खोडून काढलें आहे. कारण तो दिवस धरल्यास भीष्मनिर्याणाच्या दिवशीं ५८ वा दिवस येत नाहीं व युद्धारंभ मघानक्षत्रीं व युद्धशेवट श्रवण नक्षत्रींहि येत नाहीं व इतरहि प्रसंग जुळत नाहींत. रा. दप्तरींची वर दिलेली तिथीहि करंदीकरांनीं खोडली आहे. कारण दप्तरी यांनीं तिथि व चंद्रोदयकाळ बरोबर ठरविले नाहींत; तसेंच दप्तरी यांची तिथि ग्राह्य धरल्यास अश्वत्थाम्याचा छापा मार्गशीर्ष वद्य ५ ला म्हणजे लखलखीत शुभ्र चांदण्यात पडल्याचें मानावें लागतें; व बलराम श्रवण नक्षत्रीं परत आल्याचेंहि जुळत नाहीं. नीलकंठ चतुर्धर व रा. चिंतामणराव वैद्य यांचें म्हणणें 'मार्गशीर्ष शु. त्रयोदशी रोहिणी किंवा मृग नक्षत्र" हेंहि जुळत नाहीं कारण त्रयोदशीस मृग नक्षत्र येत नाहीं व घटोत्कचवधाची परिस्थिति जुळत नाहीं. व भीष्मनिर्याणाला ५८वी रात्र येत नाहीं. रा. करंदीकरांचें स्वतःचें मत "मघाविषयगः सोमः" या वचनावरून मघांचे अधिपती पितर, त्यांचा विषय-वसति-यमलोक हा यम आहे विषय ज्याचा तें भरणी नक्षत्र, या भरणी नक्षत्रीं युद्ध सुरू झालें आणि त्या दिवशीं तिथि मार्गशीर्ष शु. ११ होती असें आहे याच दिवशीं श्रीकृष्णांनी गीता सांगितली म्हणून गीताजयंतीहि याच दिवशीं येते असें ते म्हणतात आणि उद्योगपर्वांत व भीष्मपर्वांत जीं जीं नक्षत्रें क्रूर ग्रहांनीं विद्ध झालीं असें सांगितलें आहे त्या त्या नक्षत्रीं कौरवांचा भयंकर संहार कसा झाला हेंहि त्यांनी वरील तिथी व नक्षत्रें धरूनच दाखवून दिलें आहे या त्यांच्या पद्धतीनें भीष्मनिर्याण माघ वद्य ४ स येतें म्हणजे मार्गशीर्ष वद्य ५ ते माघ वद्य ४ पर्यंत ५८ दिवस होतात हल्लीं माघ शु ८ ही तिथी धरली जाते ती चांद्रमानानें धरली जाते असें त्यांचें म्हणणें आहे.

एकंदरींत या कुरुयुद्धाच्या कालाबद्दल अनेकांचीं अनेक मतें आहेत आणि त्यांची एकवाक्यता जशी आज होत नाहीं, तशी यापुढेंहि होणें शक्य नाहीं असें दिसतें. कारण अनेकक्षेपयुक्त महाभारतातील अस्पष्ट व असंदिग्ध व परस्परविरुद्ध अशा श्लोकावरून हा कालनिर्णय करावयाचा आहे;तेव्हा साहजिकच जो तो आपल्या मताप्रमाणें त्याचा अर्थ लावून काल काढणार.

लो. टिळक यांनीं गीतारहस्यात (परिशिष्ट भाग ५), हल्लींच्या गीतेचा काल या सदराखालीं पुढील माहिती दिली आहे:—(१) जावा व बली बेटात शके ४०० पूर्वी महाभारत गेलें होतें; (२) शके ३६७ च्या एका गुप्त राजाच्या शिलालेखात महाभारताचा उल्लेख आहे; (३) भासाच्या बऱ्याच नाटकांना भारताचा आधार आहे. भासाचा काल इ. स. चें २ रें शतक; (४) अश्वघोषानें बुद्धचरित्र व सौंदरानंद यात महाभारतीय कथांचा उल्लेख केला आहे. त्याचा काल इ. स. चें पहिलें शतक होय (५) आश्वलायन गृह्यसूत्रात महाभारताचा स्पष्ट उल्लेख आहे व बौधायन धर्मसूत्रांत महाभारतातील श्लोक आहेत. बौधायनाचा काल खि. पू. चौथें शतक. (६) महाभारतात राशींचा उल्लेख नाहीं आणि नक्षत्रगणना आहे ती श्रवणादि (श्रवण नक्षत्रापासून उत्तरायणास सुरवात होणें) आहे. हा काल गणितानें शकापूर्वी१५००येतो.(७)वेदांगज्योतिषाच्या व परिक्षितीच्या जन्मापासून नंदाभिषेकापर्यंत १११५ (किंवा १०१५) वर्षें होतात." या वचनाच्या आधारें खि. पू. १४०० वर्षें श्रीकृष्ण व भारतीययुद्ध यांचा काल होय.

प्रत्येक मताची साधकबाधक विधानें तपासण्यास येथें अवकाश नाहीं तथापि महत्वाच्या विधानाचा परामर्श मधून मधून घेतलाच आहे.

भारतीय युद्धाचा काल काढण्यासाठीं जे प्रयत्न संशोधकांकडून झाले त्याचे एकंदर तीन वर्ग पडतात.

( १ ) ज्योतिषविषयक प्रमाणांस कमी महत्त्व देऊन आणि परीक्षिताच्या जन्मापासून नंदाभिषेकापर्यंत १११५ वर्षे होतात या विधानास व त्याचप्रमाणें पुराणातील राजांच्या यादीस महत्त्व अधिक देऊन कालनिर्णय करण्याचा मार्ग.

(२)दुसरा मार्ग असा कीं राजांच्या याद्यांकडे दुर्लक्ष करून ज्योतिर्विषयक विधानांपैकीं कलियुग भारतीयुद्धाच्या अंताला सुरू झालें एवढेंच घेऊन ज्योतिष्यांनीं प्रारंभविषयक कलियुग जें लिहिलें आहे तें घेऊन त्यात अत्यंत ग्राह्य मत शोधण्याचा मार्ग. या प्रयत्नांत महाभारताच्या आत जे इतर ज्योतिर्विषयक उल्लेख आले आहेत ते अग्राह्य व अप्रमाण धरले आहेत; हा मार्ग रा. वैद्यांनीं स्वीकारला आहे. व हा स्वीकारताना राजावलीचें प्रमाण दुर्लक्षिण्यास व ज्योतिषविषयक अंतर्गत विधानें दुर्लक्षिण्यास रा. वैद्य जीं कारणें माडतात तीं अपुरीं वाटतात. तें मार्ग दाखविलेच आहे.

(३)कलियुग कुरुयुद्धातीं सुरु झालें या मतास कमी महत्त्व देऊन अंतर्गत ज्योतिर्विषयक विधानास महत्त्व देऊन त्यापासून काल काढण्याचा मार्ग. या मार्गाप्रमाणें शोधप्रयत्न करणारात अनेक मतें निघालीं आहेत. ज्योतिर्विषयक प्रमाणात परस्परविरुद्धता आल्यामुळें त्यात अनेक मतें निघणें स्वाभाविक आहे. आणि ही परस्परविरुद्धता अनेक क्षेपांच्यामुळें उत्पन्न झाली असेल. पहिल्या प्रकारचा मार्ग पतकरणाऱ्यांनीं आपल्या मतास अनुकूल तेवढे ज्योतिषाचेहि पुरावे घेतले आहेत.

वरील तीन पद्धतींपैकीं संशोधनास जास्त उपयुक्त कोणती तें पाहूं.या तीनहि मार्गांपैकीं स्थूलपणानें एवढें सागता येईल कीं कलियुगप्रारंभाचा काल तोच कुरुयुद्धांताचा काल होय असें धरून व कलियुगविषयक ज्योतिषाची कल्पना घेऊन युद्धाचा काळ काढणें अप्रयोजक आहे. कां कीं, कलियुगविषयक कल्पना जमत जमत तयार झालेली. भारतीय युद्ध आटपल्यानंतर आता दिवस वाईट आले म्हणून केवळ कवीनें जें म्हटलें त्याचेंच युद्धांतीं कलियुग सुरू झालें हें उत्तरकालीन रूपांतर होय.ज्या वेळेस युगकल्पना मुळींच वृद्धिंगत झाली नव्हती व अमुक युग संपत आलें आहे व आता दुसरें युग सुरू होणार अशा तऱ्हेची कल्पना त्या वेळच्या लोकाना असणें जरूर नाहीं. अनेक ग्रह एका राशीवर होते त्या कालापासून कलियुग सुरू झालें ही ज्योतिषाची कल्पना मागाहून तयार झालेली व ती आपल्या कालगणनेस कोणता तरी प्रारंभबिंदु असावा या भावनेनें तयार झालेली. जो काल ( प्रारंभबिंदू ) गणितज्ञानीं गणिताच्या साहाय्यानें शोधून काढला त्याच कालात नेमकें युद्ध झालें अशी कल्पना करणें म्हणजे संशोधकवृत्तीस अभीयात फाटा देणें होय. आता वाईट दिवस सुरू झाले म्हणजे कलियुग सुरू झालें असें एक विधान व ज्योतिषांनीं ज्योतिषशास्त्र वाढविल्यानंतर कलियुगविषयक केलेलें गणित ही अगदींच निराळी बाब. या दोन गोष्टींचा भिन्न जन्म लक्षात घेतला असता कलियुगविषयक विधानावर कुरुयुद्धाच्या कालगणनेची तयारी करणें अप्रयोजक आहे असें दिसून येईल.

ज्योतिषविषयक विधानें लक्षात घेतलीं असता व त्यातील एकमेकाशीं असंगति पाहिली असता आणि महाभारत ही अनेक क्षेपाची संहिता आहे ही गोष्ट लक्षात घेतली असता ज्योतिर्विषयक उतारे बरेच काळजीपूर्वक वापरले पाहिजेत. अमुक गोष्ट झाल्यानंतर रात्र झाली पुढें अमुक गोष्ट झाल्यानंतर चंद्रोदय झाला इत्यादि प्रकारची थोपट व काल्पनिक वर्णनें कवि कालविषयक विचार विशेष मनात न आणता चालू लागतो. आणि त्या प्रकारच्या विधानाचा आधार घेऊन म्हणजे सामान्य वर्णनाशीं गुरफटलेले आधार अजीबात बाहेर काढून कालशोधन निराळें झालें पाहिजे. तें तसें आज झालें नाहीं "मासाना मार्गशीर्षोहं ऋतूना कुसुमाकर." येवढ्यावरून त्या काव्यात मार्गशीर्षांत वसंत येत असें एकदम उडी एकदम घेता यावयाची नाहीं. त्याप्रमाणेंच ऋतूंमध्यें वसंतास प्रामुख्य असलें तरी वसंतामुळेंच मार्गशीर्षास प्रामुख्य होत हें कोठें सागितलें आहे त्यावेळेत मार्गशीर्ष हा आज काहीं अज्ञात असलेल्या सामाजिक किंवा राजकीय कारणानीं प्रामुख्य पावला असेल

कृत्तिका या थेट पूर्वेस उगवतात म्हणून वर्तमानकाल वाचक जे उल्लेख आहेत त्यावरून फारसें निश्चित काहींच अनुमान काढता येत नाहीं. हें वाक्य केव्हांचें तरी जुन्या कालचें असणें शक्य आहे याज्ञवल्क्य तर इतका रागीट दिसतो व सामान्य लोकाच्या व थोड्याच्या संस्कृत भाषेच्या ज्ञानाविषयीं त्यास इतका तिरस्कार होता कीं तो कावळ्याच्या मंत्राचा विनियोग कुत्र्याच्या कामीं करीत आहे; तर तो जुनें एखादें वाक्य त्यात वर्तमान काल वाचक प्रयोग आहे म्हणून बदलण्याच्या फिकीरींत कशास पडतो.

ज्योतिर्विषयक असे महाभारतावर निश्चित प्रकाश पाडणारे पुरावे कायेन् अतल्यामुळें शेवटीं पौराणिक राजावलीची यादी एवढीच कुरुयुद्धाच्या कालगणनेस ऐतिहासिक महत्त्वाची सामुग्री आहे असें आम्हीं समजतों व त्या पद्धतीनुसार काढलेला काल सुमारें खि. श पूर्वी १५०० हा ग्राह्य भरतो.

कुरुयुद्धांत कोणकोणतीं राष्ट्रें सामील होतीं याचा एक नकाशा आम्ही ज्ञानकोशाच्या प्रस्तावनाखंडाच्या तिसऱ्या विभागातील ५०८ व्या पानावर दिला आहे. तो पाहिला म्हणजे युद्धमान राजांचीं ( देशवाचक ) नावें आपोआपच लक्षात येतील

**कुरुवर्ष**—आग्नीध्रानें आपल्या जंबुद्वीपाचे नऊ भाग करून नऊ पुत्रास दिले, त्यात कुरु नावाच्या पुत्रास दिलेला वर्ष ( प्रदेश ). हा शृंगवान् पर्वत आणि क्षारसमुद्र यांच्यामध्यें

भरतवर्षाप्रमाणेंच धनुष्याकार आहे ( "धनुर्वत्संस्थिते ज्ञेये द्वे वर्षे दक्षिणोत्तरे )" यांस उत्तरकुरु व ऐरावतवर्ष अशीं नामांतरें आहेत [ भारत भीष्मपर्व. अ. ६; मत्स्य. पु. अ. ११२; भागवत स्कं. ५ अ. २ ].

**कुरुपाल**—बस्तर संस्थानांत जगदलपूर तालुक्यांत चित्रकोट धबधब्याजवळ हें लहान खेडें असून येथें पुष्कळ शिलालेख आहेत. त्यांपैकीं बरेच इ. स. १०१७ तील नागवंशी घराण्यांतील सोमेश्वर देव याच्या वेळचे आहेत.

**कुरुक्षेत्र**—हिंदुस्थानांतील एक प्राचीन देश. हा ब्रह्मावर्ताच्या पश्चिमेस होता असा उल्लेख आहे. श्रीकृष्ण आनर्त देशास जात असतां प्रथम कुरुदेशांतून निघाल्यानंतर त्यास ब्रह्मावर्ताच्या पुढें व मत्स्याच्या अलीकडे कुरुक्षेत्र लागल्याचें भागवतांत म्हटलें आहे. येथें कौरवांचा मूळ पुरुष कुरु या राजानें तप केलें व इंद्र त्याला प्रसन्न झाला आणि त्याच्या प्रसादानें हें स्थळ पवित्र झालें अशी कथा आहे. याच्या चतुःसीमा एके ठिकाणीं पुढील प्रमाणें दिल्या आहेत.—"तरंतुरु व अरंतुरु यांच्यामधील आणि रामह्रद व मचक्रुक यांच्यामधील असा जो प्रदेश तो". येथें दिशा सांगितलेल्या नाहींत. उत्तरवेदी, अंतर्वेदी, धर्मक्षेत्र, विनशनक्षेत्र अशीहि यास दुसरीं नांवें आहेत. सरस्वती व दृषद्वती यांच्या दुआबांत ( दृषद्वतीच्या उत्तरेस व सरस्वतीच्या दक्षिणेस ) हें आहे. याचा परिघ ८० कोस आहे. ह्युएनत्संगनें हें पाहिलें होतें. त्यानें याला धर्मक्षेत्र म्हटलें आहे. हल्लीं हें कर्नाळ जिल्ह्यांत आहे. महाभारतकाळीं हें व पुष्कर अशीं दोन तीर्थें फार प्रख्यात होतीं. महाभारतांत याच्यासाठीं सबंध एक अध्याय खर्ची पडला आहे. ( वनपर्व अ. ८३ पहा ). 'कुरुक्षेत्रांत राहीन' असें नुसतें म्हणणारा सुद्धां निष्पाप होतो असें म्हणतात. या क्षेत्रांत शेंकडों तीर्थें असून त्यांत तीन मुख्य आहेत. ( १ ) पृथूदकः ( २ ) स्यमन्तपंचक, हे पांच तलाव परशुरामानें क्षत्रियांचा नाश करून त्यांच्या रक्तानें भरल्याची कथा आहे; ( ३ ) सन्निहती, या तीर्थांत सूर्यग्रहणाच्या वेळीं स्नान करणारास १०० अश्वमेधाचें पुण्य लागतें. या तीर्थांत सर्व तीर्थें आलीं म्हणून तें सन्निहती होय. येथें एका सूर्यग्रहणप्रसंगीं कौरव, पांडव, यादव व गोपाळ हे एकत्र जमा झाल्याचें वर्णन भागवतांत आहे. अजूनहि सूर्यग्रहणांत तेथें मोठी यात्रा भरते. कुरुक्षेत्रांत युद्धांत मरणारा स्वर्गास जातो अशी त्यावेळीं समजूत होती; म्हणून येथें भारतीय युद्ध झालें. परंतु एवढें मोठें सैन्य येथें राहिलें असेल हें संभवनीय नाहीं. कुरुक्षेत्राला मध्य धरून दोन्ही फौजा फार विस्तीर्ण प्रदेशांत पसरल्या होत्या असें महाभारतांतच म्हटलें आहे. त्यावरून पंजाबचा कांहीं भाग व कुरुजांगल, रोहितकारण्य, मरुभूमि म्हणजे अहिच्छत्र ( रामपूर ), कालकूट, गंगापूर, वारण, वाटधान या अर्वाचीन प्रदेशांत, शंभर कोस लांब व पन्नास ते शंभर कोस रुंद या मोठ्या भूप्रदेशावर हें युद्ध झालें असावें. [ वैद्य-भारत उपसंहार; भागवत. स्कं. १, ३, ७, ९; इंडि. अँटि. पु. १. ५; अ. कोश; प्रा. कोश; महाभारत, शल्य. प, इंपी. ग्याझि. पु. १६ ].

इ. स. १७५४ मध्यें पेशव्यांनीं क्षेत्र गया व कुरुक्षेत्र हीं दोन्ही क्षेत्रें दिल्लीच्या पातशहापासून आपल्याकडे घेतलीं होतीं ( राजवाडे खं. ६ ले. ३२८ ).

**कुर्तकोटी**—मुंबई इलाखा धारवाड जिल्हा. गदगच्या नैर्ऋत्येस सुमारें ८ मैलांवर हा एक गांव आहे. येथील गौरेश्वराच्या देवळाजवळ इ. स. १२४४ सालचा एक, केरी बसप्पाच्या देवळांत इ. स. १०८२ सालचा एक, शंकरलिंगाच्या देवळांत इ. स. ११३२ आणि ११३८ सालचे दोन आणि विरूपाक्षाच्या देवळांत इ. स. १०८७ सालचा एक असे पांच शिलालेख आहेत. इ. स. १८३५ च्या सुमारास कुर्तकोटी येथील एका घराचा पाया खणीत असतां एक ताम्रपट सांपडला असून तो इ. स. ६१० सालचा आहे असें दिसतें. तथापि तो त्या सालचा नसून नवव्या किंवा दहाव्या शतकांतील आहे व त्यामुळें तो ताम्रपट बनावट आहे असें फ्लीटनें सिद्ध केलें आहे [ इं. अँ. पु. ७; २१७. मुं. गॅ. ]

**कुर्दिस्तान**—कुर्द लोकांच्या देशाला कुर्दिस्तान म्हणतात. यतमनसु वोहतन-सु वगैरे तैग्रीसला मिळणाऱ्या नद्या वहात असलेला प्रांत व ग्रेट व लिटल झाब नद्या वहात असणारा डोंगराळ मुलूख इतका प्रदेश कुर्दिस्तानांत मोडतो.

कुर्दिस्तानमधील लोकसंख्या २५ लाख असून त्यांपैकीं १६॥ लाख तुर्की कुर्द, ८० हजार इराणी व ५० हजार रशियन आहेत. कुर्द लोक माकरिआ नदीपासून उर्मिया सरोवरापर्यंतच्या मुलखांत पसरलेले आहेत. भटकणारे कुर्द सर्वांत श्रीमंत व स्वावलंबी असून ते उन्हाळा डोंगरावर व हिंवाळा तैग्रीस नदीच्या कांठच्या मुलखांत घालवितात.

कुर्द लोकांना बाहेर रहाणें आवडतें. यांची भाषा तुर्क लोकांच्या भाषेहून भिन्न असल्यामुळें व त्यांचा धर्म पर्शिअन लोकांच्या धर्माहून भिन्न असल्यामुळें त्यांना सर्वत्र अविश्वासानें वागवितात व ते सत्ताधारी लोकांशीं नेहमीं झगडत असतात. हे लोक अतिशय रानटी असून इतर लोकांवर लुटालूट करून जुलूम करतात. या लोकांना आपल्या कुळांचा अभिमान असतो. हे लोक बुद्धिमान असतात. कांहीं सुशिक्षित कुर्द वजिराच्या जागेवरहि असत. कांहींनीं बायबलचें तुर्की भाषेंत भाषांतर करण्यास व कांहींनीं वर्तमानपत्र चालविण्यास मदत केली आहे. यांच्या बायकांना गोषा नसून त्यांना बरेंच स्वातंत्र्य आहे. कुर्द लोक गर्विष्ठ परंतु विश्वासू व आतिथ्यपर आहेत. त्या लोकांत क्षात्रतेज दृष्टोत्पत्तीस पडतें; परंतु लष्करी शिस्तीचा त्यांना फार तिटकारा आहे.

कुर्द लोकांची भाषा ही जुनी अझाणी लोकांची इराणी भाषा असून उत्तर भागांत तिच्यांत खाल्डी शब्द मिसळ-

लेले आहेत व दक्षिण भागात तुराणी शब्द मिसळलेले आहेत बरेच कुर्द लोक सुनी व शाफी पथाचे असून काहींच कोणत्याच धर्मात समावेश होत नाहीं

इ ति हा स –फार प्राचीन काळीं असुरियाच्या जवळचे पर्वत गुतु नावाच्या लोकाच्या ताब्यात होते असुरियन भाषेत गुतुचें गद अथवा कर्दु असे रूपातर झालें होतें गतु लोक तुराणी वशाचे होते सायरसनें कुर्द लोकांना जिंकलें पुढें ते अनुक्रमें मॅसिडोनिअन, पार्थिअन, सस्सन सत्तेखाली आले बगदादच्या खलीफाच्या सत्तेखालीं असता कुर्द लोक बडाळी करीत असत

इ स ८३८ व ९०५ सालीं या लोकानीं बडे केलीं १२ व्या शतकात सुलतान सलादीनन कुर्द लोकाना सर दारपद दिल्यामुळे त्याना थोडी ऊर्जितावस्था आली आशियात पुढें मगल व तार्तर सत्तेखाली कुर्द लोक स्वस्थ होते

इ स १५१४ सालीं सुलतान पहिला सेलिम यानें आर्मे निया व कुर्दिस्तान हे प्रात आपल्या राज्याला जोडले व तेथील कारभार इद्रिस याजकडे दिला त्यानें त्या प्राताचे लहान लहान भाग पाडून ते कुर्द आर्मीनियन व अरब सर- दाराकडे सोपविले इद्रिस यानें केलेली राज्यव्यवस्था इ स १८२९ पर्यंत तशाच होती राजधानीपासून दूर असल्या मुळे व तुर्क सत्तेचा ऱ्हास होत चालल्यामुळे कुर्द लोक प्रबळ झाले व त्यानीं तुर्क सत्तेपासून बाजू होण्याचे प्रयत्न केले परतु ते निष्फळ झाले इ स १८७७–७८ च्या रुसो–तुर्क युद्धानतर शेख अबदुल्ला यानें निराळें कुर्द राज्य स्थाप ण्याचा प्रयत्न केला परतु तोहि व्यर्थ गेला कुर्द व आर्मेनियन लोक तुर्क सत्तेला नाखुष होते वरील युद्धानतर आर्मेनि याला रशियाकडून उत्तेजन मिळाल्यामुळे त्याच्यात जाति द्वेष उद्भवला इ स १८९१ सालीं कुर्द लोकाचें पलटण उभारलें यामुळ लुटालूट करण्यास व जातिद्वेष उगविण्यास त्याना सवड मिळाली त्यानीं इ स. १८९४–९६ सालीं आर्मीनियन लोकाची कत्तल करण्यात पुढाकार घेतला

कुर्ली—मुबई इलाखा ठाणे जिल्हा साष्टी तालुक्यातील एक गाव साष्टी बेटाच्या पूर्व टोकावर असून जी आय पी रेल्वेचे स्टेशन आहे येथें कापडाच्या २ मोठया गिरण्या आहेत १९११ सालीं येथील लो स १५०८१ होती येथें म्यु कमिटीची स्थापना १८७८ सालीं झाली

पोर्तुगीजाच्या अमलाखालीं ह्या गावाला बरेंच महत्त्व चढलें १७४० त मराठयानीं त्याना हुसकावून लाविल्यावर साष्टीच्या मुख्य उपाध्याय कडे तें आलें १८०८ त मुबई सर कारनें मुबईतील अपोलो पीयर गेटाजवळील जमीनीच्या तुकड्याच्या मोबदला होर्मसजी बमनजी वाडिया या पारशी गृहस्थाला इतर पाच गावाबरोबर कुर्ला देऊन टाकिलें अर्दे शर होर्मसजी वाडिया या मुबईच्या व्यापाऱ्याकडे १८८२ त तें होतें सीव व कुर्ला गाव जोडणारा एक बाधाचा रस्ता १८०५ त सुरू झाला व पुढें १८२५ त ता चागला दुरुस्त करून मोठा केला

कुन्हा—वऱ्हाड उमरावती जिल्हा चादूर तालुक्यातील एक गाव लोकसख्या २७७० येथे वारी, मुसुलमान, कुणबी, माळी आणि रजपूत इतक्या जातींची वस्ती आहे येथें एक मशीद असून तिला १५० एकर जमीन इनाम आहे येथील तलाव फार चागला आहे चादूर आणि तिवसा या गावाच्या दरम्यान हा गाव आहे हा चादूर–तिवसा रस्ता इ स १९०० च्या दुष्काळात तयार केला प्रसिद्ध वडखोर नदू हा येथील रहिवासी होता

कुन्हाडखुर्द—पूर्व खानदेश जिल्ह्यामध्यें माहेजीच्या आग्नेयीस २॥ कोसावर हें गाव असून येथें एक जुनें हेमाड पती महादेवाचें देऊळ आहे देवळावर शिलालेख वगैर काहीं नाहीं देवळाची बाधणी एकात एक असलेल्या कोनानी आहे [ खानदेश ग्या ]

कुल—ज्या जमानीस वहाण्यासाठीं सहा वैलानी ओढल जाणारे असे दोन नागर लागतात त्या जमिनास कुल अस कुल्लूकभट्ट आपल्या मनुस्मृतीवरील टीकेंत (अ ७ श्लोक ११९ ) म्हणतो यावरून सामान्यत एका कुटुबाच्या पोष णास लागणारी जमीन असा प्रथम कुल या शब्दाचा अर्थ असून लक्षणेनें तो शब्द पुढें कुटुब दाखवू लागला असावा कुल शब्दाच्या या अर्थाशीं कुणवी या शब्दाचा सबध लावण्यात आला आहे विशिष्ट जमीन एकाच कुटुबात एकामागून एक व्यक्तीच्या हातात गेल्यामुळ विशिष्ट जमीनीचा उपभोग घेणाऱ्या एकाच कुटुबाच्या अनेक पिढ्यानाहि कुल ही सज्ञा प्राप्त झाली कुटुब हें एखाद्या कुलाची विशिष्टकालीन स्थिति दर्शविते तर कुल हें एखाद्या कुटुंबाची परपरा दर्शविते

ही परपरा दोन प्रकारची असू शकते एक पितापुत्र पर परा व दुसरी मातृकन्या परंपरा जेथें कुटुंबातील मुख्य व्यक्ति पुरुष अथवा पिता असतो तेथें पितापुत्रपरपरा ही कुलपरपरा असते व जेथें स्त्रीकडे कुटुबाचें नेतृत्व व कुटु बाच्या सपत्तीची मालकी असते तेथें मातृकन्या परपरा ही कुलपरपरा असते आपणाकडे या दोन्हीहि कुलपरपरा दृष्टीस पडतात मातृकन्यापरपरा मुख्यत्वेंकरून मलबारात आढळते इतरत्र पितापुत्र परपरा आढळते वधूच्या प्रथमसभोगाची चाल जेव्हा रोमन कॅथोलिक पाद्र्यानीं सुरू केली तेव्हांहि त्या ख्रिस्ती प्रदेशात मातृकन्या पर परा सुरू होत होती मात्र हा प्रकार हिंदुस्थानात आला नाहीं

रोमन लोकामध्यें पिता हाच कुटुबातील मुख्य व सर्व स्वाचा धनी असल्यामुळें रोमन लोकात पितापुत्र परपरा हीच कुलपरपरा होती लेवियन लोकात प्रारंभीं मातृकन्या परपरा असावें पौराणिक स्त्रीराज्य, अमेझॉन स्त्रियांचें राष्ट्र यामध्यें मातृकन्यापरपरा असणें सभवनीय आहे

समाजाच्या पाल्यावस्थेंत विवाहसंस्था अस्तित्वांत येण्यापूर्वी विशिष्ट अपत्याचा जनक कोण यासंबंधीं जेव्हां संशय असे तेव्हां अशीं मुलें आपल्या मातांच्या नावानेंच प्रसिद्ध असत. अशा वेळीं मातृकन्यापरंपरेचीं कुलें असण्याचा संभव आहे. मातेच्या नावावरून ज्ञात [illegible]शा अनेक ऋषींचीं नावें शतपथ ब्राह्मणांत आढळतात.

ज्याप्रमाणें कुल कुटुंबपरंपरा दाखवितें त्याप्रमाणेंच एकाच कुलांत एकाच वेळीं अनेक कुटुंबांचा समावेश होतो हीं कुटुंबें एकमेकांशीं सपिंड, समानोदक वगैरे संबंधानीं निगडित असतात.

सध्याच्या गोत्र या संस्थेंत अनेक कुलें येतात. ( गोत्र पहा ). कुलांचा परस्परसंबंध कृषिप्रधान आयुष्यक्रम असेल तेथें बराच काळ टिकतो. परंतु व्यापार उद्योगधंद्यांची वाढ व परप्रांतांत अगर परदेशांत वसाहती करण्याच्या व वाहतुकीच्या सोयी वाढत गेल्यामुळें समाजामध्यें कुलाचें महत्व कमी कमी होत जातें व कुटुंब हाच मुख्य घटक बनतो.

**कुलपहार**, ता लु का.—संयुक्त प्रांतांत हमीरपूर जिल्ह्यांतील नैर्ऋत्येकडील तालुका. क्षेत्रफळ ५५८ चौ. मै. यांत कुलपहार, ( तालुक्याचें मुख्य ठिकाण ) व जैतपूर हीं दोन गांवें व १२१ खेडीं आहेत. यांत पुष्कळशा टेंकड्या व मोठालीं अरण्यें आहेत. उत्तरेकडील जमीन काळी असून दक्षिणेकडील जमीन हलकी आहे. तींत भूपृष्ठाच्या बराच जवळ खडक आहे. यांत विहिरी व तळीं असून त्यांतून लहान पाटानें पाणी देतात.

श ह र.— संयुक्तप्रांत हमीरपूर जिल्ह्यांतील कुलपहार तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें जी. आय्. पी. रेल्वेनजीक असून येथील लो. सं. १९११ सालीं ५२९२ होती. जैतपूरचा राजा जगत्राज यानें या शहराची स्थापना केली असें म्हणतात. जगत्राज बुंदेलखंडाचा पुढारी छत्रसालचा मुलगा होता. छत्रसाल राजाला ८ मुलगे होते. प्रत्येकानें आपापल्याकरितां एक राजवाडा बांधला होता. त्याचे अवशेष अद्याप अस्तित्वांत आहेत. १७९० सालीं बांद्याचा राजा अली बहादूर यानें येथील किल्ला सर करून घेतला, व इंग्रजानीं १८०५ सालीं त्याचा तट पाडून टाकला. येथें तहशीलकचेरी व शाळा आहे. येथें कापूस व धान्याचा व्यापार चांगला चालतो. कापूस दाबण्याचा व गवताचे गठ्ठे बांधण्याचा असे दोन कारखाने येथें आहेत.

**कुलशेखर**—हा श्रावणकोरच्या राजघराण्यांत जन्मला होता. यानें फार चांगल्या रीतीनें राज्य केलें व याच्या कारकीर्दींत जबरदस्तीपासून दुबळ्या लोकांस पीडा होत नसे. नंतर तो ईश्वराची सेवा करूं लागला. त्यानें धार्मिक ग्रंथांचा फार मेहनतीनें अभ्यास केला व विशेषतः त्याला रामायण फार आवडत असे. १४००० राक्षसांशीं राम लढावयास निघाला हा कथाभाग वाचून तो सैन्यासह रामाच्या मदतीस निघाला परंतु त्याच्या प्रधानानें रामाच्या विजयाचा कथाभाग वाचून दाखविल्यावर तो स्तब्ध राहिला.

या राजानें तिरुपति व श्रीरंग येथील यात्रा केल्या व नरसेवा म्हणजे ईश्वरसेवा करणें होय असें आपल्या चारित्र्यानें दाखविलें. यानें तामीळ व संस्कृत या दोन्ही भाषांत ग्रंथ लिहिले. याचा 'तेटहंदिरल' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे ('आळवार' पहा).

**कुलशेखरपट्टणम**—मद्रास इलाख्यांत तिनेवेल्ली जिल्ह्यांतील श्रीवैकुंठम् तालुक्यांतील समुद्रकांठचें गांव येथें थोड्या प्रमाणावर चांगल्या प्रतीचें मीठ काढण्यांत येतें. येथून तेल, पेंड, गूळ व तंबाखू वगैरे माल बाहेर जातो.

**कुलाची**, ता लु का.—वायव्येकडील सरहद्दीच्या प्रांतांतील डेराइस्माइलखान या जिल्ह्यांत १५०९ चौरस मैल क्षेत्रफळाचा तालुका. साधारणतः डेराइस्माइलखान तालुक्याप्रमाणेंच याचें स्वरूप आहे. मात्र याच्या पश्चिमसरहद्दीकडे खरखरीत ओसाड डोंगराची रांग आहे. सपाट प्रदेश बहुतेक खडकाळ आहे. पण त्यांतून डोंगरावरून येणारे नाले वगैरेंच्या प्रवाहाच्या पाण्याचा मोठ्या कौशल्यानें (कालव्यांतून) शेतीकरितां उपयोग करून घेतला आहे. मुख्य ठिकाण कुलाची.

गां व.—वायव्येकडील सरहद्दीवरच्या प्रांतांतील डेरा इस्माइलखान जिल्ह्यांतील याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें लुनी नदीच्या काठावर वसलें आहे. हें संपूर्ण असें गांव नसून जवळ जवळ १६ वाड्यांचें ( लहान गांव ) एक गांव बनलें आहे. डोंगरी 'वझिर' लोकांशीं या गांवचा मोठा व्यापार चालत होता. हें गांव ब्रिटिश राज्यास जोडण्यापूर्वी तो जरा खालावला होता पण त्यानंतर पुन्हा पूर्ववत् जोरांत आहे.

**कुलाबा**, जि ल्हा.—मुंबई इलाख्याच्या दक्षिण भागांतील एक जिल्हा. याचें क्षेत्रफळ २१६९ चौरस मैल आहे. याच्या उत्तरेस मुंबई बंदर, कल्याण व मुरबाड तालुके; पूर्वेस पश्चिम घाट, पुणें, सातारा जिल्हे व भोर संस्थान, दक्षिणेस व आग्नेयीस रत्नागिरी जिल्हा व पश्चिमेस जंजिरा संस्थान व अरबी समुद्र आहे.

कुलाबा जिल्ह्याचा मुलूख खडकाळ असून पश्चिम घाट व समुद्र यांच्यामध्यें हा प्रदेश असल्यानें या ठिकाणीं पुष्कळशा टेंकड्या, शिखरें व डोंगराचे तुटलेले कडे दृष्टीस पडतात. पश्चिमघाट म्हणजे या जिल्ह्याची एक भिंतच आहे. याशिवाय बोरघाटापासून ईशान्येस, माथेरान व प्रबळगडापर्यंत एक टेंकड्यांची माळच लागलेली आढळते. पनवेल तालुक्याच्या मधून अशीच एक टेंकड्यांची माळ गेलेली असून ती दक्षिणेस कर्नाळा टेंकडीला मिळते. पश्चिमेस पारसिक टेंकड्यांची ओळ असून दक्षिणेस जी टेंकड्यांची रांग गेली आहे तींत माणिकगड नांवाचें एक सदरंदीचें शिखर आहे. या शिखराची उंची १८०० फूट आहे. मुंबई बंदराच्या दक्षिणेस

व आग्नेयीस असीर एक रांग गेली असून त्या रांगेतील अगदीं उत्तरेकडील शिखर म्हणजे कनकेश्वर असून ( उंची १००० फूट ) दक्षिणेस सागरगड ( उंची ११६४ फूट) आहे. या जिल्ह्यातील सर्वांत उंच शिखर म्हणजे रायगड हें होय. या ठिकाणीं शिवाजीनें किल्ला बांधला व आपल्या राज्याची राजधानी केली.

या जिल्ह्याचा समुद्राभिमुख भाग, नारळी पोफळींच्या झाडांनीं आच्छादिलेला आहे. याच्या पाठीमागील मुलूख सपाट असून त्यांत भाताचें पीक येतें. या जिल्ह्यातील खाड्यांच्या तीरावर पुष्कळ मिठागरें आहेत. जिल्ह्याच्या पूर्वभागात लहान लहान अशा बऱ्याच नद्या असून त्या जिल्ह्यामधून वहात जाऊन समुद्राला मिळतात. या नद्यांपैकीं महत्वाच्या न । म्हणजे उल्हास,पाताळगंगा अंबा,कुंडलिका, मादाड व सावित्री या होत. उर्वे अगर पनवेल, अंट, नागोठणा, कुंडलिका, रोहा अगर चौल, मादाड, बाणकोट, या प्रमुख खाड्या आहेत पेणच्या खाडींतून नेहमीं ७ टनांची व भरतीच्या वेळेस ३५ टनांचीं गलबतें जाऊं शकतात. जिल्ह्याच्या किनाऱ्याच्या बाजूनें बऱ्याच ठिकाणीं धक्के बांधण्यात आले आहेत. नागोठण्याच्या जवळ अन्हेरी येथें व महाड तालुक्यात शीण व कोंडिवरी येथें ऊन पाण्याचे झरे आहेत.

या जिल्ह्यातील खडक काळ्या फत्तराचा पण सपाट असा आहे; पण टेंकड्यावरील दगड सपाट व गुंड या दोन्ही प्रकारचे आहेत. या खडकाचा पृष्ठभाग, धूसर असतो व त्यावरून त्यात लोखंडाचे कण असल्याचें दिसून येतें.

कुलाबा जिल्ह्याच्या जंगलात निरनिराळ्या प्रकारचीं झाडें आहेत. त्यापैकीं साग, ऐन, जांब, किंजळ, हीं मुख्य होत. आपट्याचीं पानें विडीसाठीं उपयोगात आणतात. खैराच्या झाडापासून बैलगाड्यांचीं चाकें तयार करतात. येथें भिंवेचींहि झाडें मरीच आढळतात. आंब्याचें लाकूड तसेंच तिवर, फलशी, कण्हेरी, कुसर, गरुडवेल, इत्यादींचीं लाकडें सरपणासाठीं उपयोगात आणतात. याशिवाय,राहूर शापसन, मातीसूल, शिकेकाई यांचींहि झाडें बरींच आहेत.

कुलाबा जरी डोंगराळ मुलूख आहे तरी त्यात शिकारीला योग्य असे प्राणी फारच कमी आढळतात. चित्ते व वाघ हे क्वचित् आढळून येतात. पण तरस व कोल्हे हे या जिल्ह्यात पुष्कळच आहेत. याशिवाय गवा, सांबर, चितळ इत्यादि पशूहि थोडे थोडे आहेत. मृगयेला योग्य असे पक्षी बरेच आहेत, त्यापैकीं मुख्य म्हणजे पाणलावे होत. याशिवाय बदकें, पारवे, तितिर, लावे इत्यादि बरेच पक्षी आहेत. साप पुष्कळ आहेत पण विविध प्रकारचे व विषारी नाहींत. बंदरामवळील रेवास्यात राहणारे कोळी मासे पकडून ते खाडीमधून मुंबईस पाठवतात. या माशावर उपजीविका करणारे लोक या जिल्ह्यात सहा ते सात हजारपर्यंत आहेत.

हवा व पर्जन्यमान—येथें जूनपासून पावसाळा सुरू होऊन आक्टोबरपर्यंत टिकतो. पावसाळ्यातील हवा फार निरोगी असें मानण्यात येतें. आक्टोबर व नोव्हेंबर महिन्यात येथील हवा अर्धवट दमट व उष्ण असते डिसेंबर ते मार्चच्या दरम्यान थंडी पडते व मार्चपासून जूनपर्यंत येथें उन्हाळा असतो. उन्हाळ्यात कर्जत तालुक्यात तर फारच उष्णता असते. मे महिन्यात उष्णतेचें प्रमाण ९२० असतें. समुद्रकिनाऱ्यापेक्षा आंतील भागात पाऊस पुष्कळ पडतो. पण सर्वसाधारण पर्जन्याचें मान ८८ इंचांपर्यंत आहे.

इतिहास—कुलाबा जिल्ह्यावर आतापर्यंत पुष्कळ निरनिराळीं राज्यें झालीं.प्राचीन काळीं कुलाब्यावर छोटेंसंस्थानिक राज्य करीत असत. ख्रिस्ती शक सुरू होण्याच्या सुमारास व त्यानंतर आंध्रवंशीय राजानीं कुलाब्यावर आपली सत्ता बसविली. हे राजे सर्व कोंकणपट्टीवर व दख्खनवर आपला अंमल चालवीत होते सुमारें ख्रिस्ती शकाच्या १५० च्या सुमारास ग्रीक भूगोलवेत्ता टॉलेमी हा हिंदुस्थानात आला होता. त्यानें त्यावेळीं आंध्रवंशीय राजे कुलाब्यावर अगर त्यावेळचे 'चौल' यावर राज्य करीत असत असें म्हटलें आहे. सहाव्या शतकात, चालुक्य राजानीं कुलाबा व उत्तरकोंकण या भागावर आपली सत्ता प्रस्थापित केली. पुढें तेराव्या शतकात देवगिरीच्या यादवांचें राज्य या प्रदेशावर सुरू झालें. १३४७-१४८९ या अवधींत बहामनी राजानीं कुलाबा जिल्ह्यातील चौल वगैरे ठिकाणें जिंकून आपल्या ताब्यात आणली. नंतर गुजराथच्या राजानीं या प्रदेशावर आपलें वर्चस्व बसविलें १५०७-१६६० या अवधींत पोर्तुगीज लोकांचेंहि राज्य या जिल्ह्यावर सुरू झालें याच वेळीं कुलाबा जिल्ह्यातील बराचसा मुलुख मुसुलमानानीं बळकावला होता पुढें १६३२ सालीं शहाजीराजे भोसले यानीं मोंगलाना हाकून लावून हा मुलुख आपल्या ताब्यात आणला शिवाजी महाराजानीं या जिल्ह्यातील घोसाळें व रायगड येथें मजबूत किल्ले बांधले सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग येथील किल्ल्याची दुरुस्ती केली व रायगड हें राजधानीचें ठिकाण केलें. १६८० मध्यें शिवाजी महाराज वारल्यानंतर हा जिल्हा पुन्हा मोंगलाच्या ताब्यात गेला. पुढें १६९० सालीं आंग्रे यानीं तो प्रदेश मुसुलमानांपासून बळकावून घेतला ( आंग्रे पहा ) कान्होजी आंग्रे हा अत्यंत शूर होता. त्यानें शाहू, जंजीऱ्याचा शिद्दी, ब्रिटिश लोक यांपासून मोठ्या शौर्यानें आपल्या प्रदेशाचें रक्षण केलें पण इ. स १७३१ मध्यें कान्होजी मरण पावल्यानंतर त्याच्या दोघा मुलात कलह माजला. त्यामुळे आंग्र्यांच्या सत्तेला उतरती कळा लागण्याला सुरुवात झाली. कान्होजीचा ज्येष्ठ पुत्र संभाजी हा शूर व धाडसी होता त्यानंतर त्याचा मुलगा तुळाजी हा गादीवर बसला. याच्या कारकीर्दींत १७५८ मध्यें ब्रिटिशांनीं विजयदुर्ग किल्ला जिंकून घेतला. पुढें हा किल्ला ब्रिटिशांनीं पेशव्यानां

दिला १८१८ साली पेशवाईचा ऱ्हास झाल्यावर ब्रिटिशांकडे कुलाबा आला व आंग्रे हे ब्रिटिशांचे मांडलीक बनले. १८४० मध्यें दुसरा कान्होजी वारल्यानंतर, कुलाबा जिल्हा मुंबई सरकारनें आपल्या राज्यास जोडून घेतला, तेव्हांपासून आतापर्यंत तो त्याच्याकडे तसाच चालू आहे.

ऐ ति हा सि क स्थ ळ.—या जिल्ह्यांत पाले, कोल, कुडें, कोंडाण, अंबिवली या ठिकाणीं बौद्धांचीं लेणीं आहेत. घारापुरी येथील "एलाफंटा" लेणीं ब्राह्मणी आहेत. पोर्तुगीज लोकांनीं या जिल्ह्यांत पुष्कळ प्रार्थनामंदिरें व किल्ले बांधले आहेत. शिवाय मराठ्यांनींहि व आंग्र्यांनींहि पुष्कळ किल्ले बांधविले त्यांपैकीं रायगड, कुलाबा, बीरवाडी, लिंगाणें, खांदेरी व उंदेरी इत्यादि प्रमुख किल्ले आहेत

१९२१ सालीं कुलाबा जिल्ह्याची लोकसंख्या ५,६२,९४२ होती. या जिल्ह्यामध्यें अलीबाग, कर्जत, महाड, माणगाव, पनवेल, पेण, रोहा हे सात तालुके असून खालापूर, उरण, नागोठणें, हे पेटे आहेत कुलाबा जिल्ह्यात शहरें व खेडीं मिळून १०६१ गांवें आहेत त्यांपैकीं ४ शहरें ५००० वर लोकसंख्येचीं आहेत, १५ गांवें २००० ते ५००० दरम्यान लोकसंख्येचीं आहेत, ७७ खेडीं १००० लोकसंख्येवर असून २१८ खेड्याची लोकसंख्या दर खेड्यास ५०० वर आहे. ५०० खालच्या लोकसंख्येचीं खेडीं २१४७ आहेत. उरण, पेण, पनवेल, अलीबाग हीं मुख्य शहरें आहेत.

कुलाबा जिल्ह्यांत हिंदू, मुसुलमान, ज्यू, ख्रिश्चन या लोकांची वस्ती आहे. हिंदू लोकांचें प्रमाण शेंकडा ९४ असून मुसुलमान शेंकडा ३ आहेत १९११च्या खानेसुमारींत या जिल्ह्यांत हिंदू ५,६०,२२६, मुसुलमान २८८७६, जैन १४११, ज्यू २०४१, ख्रिश्चन १२५८, पारशी ३०३, व चीना १ होते. हिंदूंमध्यें ब्राह्मणांची संख्या २२,१७६ असून त्यांत ११९०८ कोंकणस्थ व ३६५२ देशस्थ आहेत. मोठाल्या बागा व ताडाचीं वनें यांच्या मालकीनें असून ते संपन्न आहेत. दक्षिण भागांत पुष्कळ सोनार आहेत. याशिवाय प्रभूंची संख्या ६००० सबंध आहे. वाणी लोक ४४५४असून त्यांचा व्यापार हा धंदा आहे. आगरी१०८११, हे मीठ तयार करण्याचा धंदा करतात. मराठे १५६७६० व कुणबी ४३,३७५ यांचा धंदा भात पिकवण्याचा आहे. २०६११ कोळी लोक नावाडी असून शिवाय मासे धरून त्यावर उपजीविका करतात. भंडारी ५१,३३, यांचा धंदा ताडी तयार करण्याचा आहे व ११२६१ माळी लोक बागांची मशागत करतात. ठाकूर २००८८ व कातकरी ११३११ या डोंगराळ जाती आहेत. हे लोक दुबळे, कुरूप व ठेंगणे असतात. हे लोक फार प्रामाणिक असतात हे व यांच्या बायका दिवसभर राबत असतात व ज्यावेळी त्यांना शेतीचा धंदा नसतो त्यावेळी ते मोलमजुरीचा अगर इतर धंदा करतात. कातकरी लोक हे शेतीवर व मजुरीवर आपला उदरनिर्वाह करतात. कातकरी लोक वर्णानें इतर डोंगराळ लोकांपेक्षा अधिक काळे असून फार गलिच्छ असतात. गाय व वानर याशिवाय बाकी सर्व प्रकारचें मांस ते खातात. दारू पिण्याचें व्यसन त्यांच्यांत फार आढळून येतें. वडार व घंजारी या भटक्या जाती आहेत. ते जात्या उमंट असतात जातीं व हातचक्क्या करण्यांत हे कुशल आहेत बेनी इस्रायल अगर यहुदी लोक हे तेल्याचा धंदा करतात. ते घरीं मराठी भाषा बोलतात. उरण पेट्यांतील करंज बेटांत ख्रिस्त्यांची वस्ती आहे. येथें १५१५ च्या सुमारास तीन प्रार्थनामंदिरें होतीं 'दि युनैटेड फ्रीचर्च" 'मिशन ऑफ स्कॉटलंड"व अमेरिकन मिशन यांच्याहि येथें संस्था आहेत पहिल्या संस्थेनें एक हायस्कूल, दोन मुलींच्या शाळा व अस्पृश्यांकरितां तीन शाळा चालविल्या आहेत.

शा स न प द्ध ति —जिल्ह्याचा मुख्य अधिकारी कलेक्टर हा असतो जिल्ह्यांतील भागाचा अधिकारी असिस्टंट कलेक्टर अगर डेप्युटी कलेक्टर असतो हा जिल्हा ठाण्याच्या सेशन्स भागांत मोडतो ठाण्याचा डिस्ट्रिक्ट जज्ज हा कुलाब्यांतील दाव्यावरील अपीलें ऐकतो पावसाळ्यांत डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटला सेशन्स जजाचे अधिकार असतात जिल्ह्यांत पांच सबॉर्डिनेट जज्ज आहेत. प्रत्येक तालुक्यास मामलेदार, फौजदार व सबरजिस्ट्रार व प्रत्येक पेट्यास महालकरी, फौजदार, सबरजिस्टर हे कामगार आहेत. या जिल्ह्यांत अलीबाग, पेण, रोहाअष्टमी, महाड, पनवेल, उरण व माथेरान या ठिकाणीं म्युनिसिपालिट्या आहेत. याशिवाय डिस्ट्रिक्ट बोर्ड, तालुका बोर्डेंहि स्थापन करण्यांत आलीं आहेत. जिल्ह्यांतील पोलिसखातें डिस्ट्रिक्ट सुपरिंटेंडेंटच्या ताब्यांत असतें. त्याच्या हाताखालीं एक पोलिस इन्स्पेक्टर असतो. या जिल्ह्यांत एकंदर १२ पोलिस स्टेशनें आहेत. या जिल्ह्यांत नऊ दुय्यम तुरुंग आहेत

१९०३-४ सालामध्यें जिल्ह्याचा एकंदर वसूल२४६३००० इतका झाला त्यांत १३,५८,००० इतका जमीनीचा महसूल झाला.

व्या पा र व द ळ ण व ळ ण.—पेरणीचा हंगाम ज्यावेळी नसतो त्यावेळीं बहुतेक शेतकरी मीठ तयार करण्याचा धंदा करितात. पेण व पनवेल या तालुक्यांत मीठ बरेंच तयार होतें. जिल्ह्यांत एकंदर १५५ मिठागरें असून त्यांतून २० लक्ष मण मीठ दरवर्षी तयार होतें. चौल येथें रेशमी कापड विणण्याचा व्यापार चालतो. पण तो हल्लीं जवळ जवळ बसलेला आहे. तीळ, भुईमूग, नारळ यांच्यापासून तेल काढण्याचा धंदाहि येथें बऱ्याच मोठ्या प्रमाणावर चालतो. पनवेल येथें बैलगाड्यांचीं चाकें तयार करण्याचा कारखाना आहे. उरण येथें दारू तयार करण्याचा धंदा चालत असून तो पारशी लोकांच्या ताब्यांत आहे.

पेण, पनवेल, कर्जत, नागोठणें, रेवदंडा, रोहा, गोरेगाव व महाड हीं व्यापारी गावें आहेत. येथून तादूळ, मीठ, सरपण, गवत, सागवान, माज्या, फळें, व सुकें मासे हीं बाहेरगावीं जातात मलबारी साग पितळेचीं भांडीं, खजूर, धान्य, तेल, तूप, लोणी, साखर, बटाटे, कापड, हळकुंड इत्यादि वस्तूंची आयात होते. जिल्ह्यामध्यें पाच बंदरें आहेत. या बंदरातून १९०३-४ सालीं एकंदर १५३ लाख रुपयाच्या मालाची नेआण झाली. त्यात आयात ३२ लाख रुपयाची व निर्गत १२१ लाखांची झाली. याशिवाय या जिल्ह्यात तीस ठिकाणीं बाजार भरतो व वार्षिक जत्राहि भरतात.

या जिल्ह्याच्या कर्जत तालुक्यातून व खालापूर पेटयातून ग्रट इंडियन पेनिन्सुला रेल्वेचा फाटा गेलेला आहे मुंबईहून धरमतर, उल्वा वगैरे ठिकाणीं बोटी चालू आहेत. तसेंच बोरघाट, फिट्झगिराल्ड, व वरंधा घाटातून गाडीरस्ता गेला आहे. या जिल्ह्यात एकंदर ८५ मैल खडीने रस्ते आहेत, व १६० मैल साधे रस्ते आहेत.२७ मैल रस्त्याच्या बाजूनें झाडें लावण्यात आलीं आहेत माणगांव, नागोठणा इत्यादि ठिकाणीं पूल आहेत.

जं ग ल—कुलाब्यात उत्कृष्ट प्रकारचीं जंगलें आहेत. या जंगलात जें सागाचें लाकूड मिळतें तें मलबार सागाच्या खालोखाल आहे. येथील काहीं झाडाचा नावा बाधण्याकडे उपयोग होतो. १९०३-४ मध्यें एकंदरींत ४५८ चौरस मैल जंगल होतें. त्यापैकीं ४४९ मैल राखीव होतें बहुतेक सर्व जंगलें डोंगरपठारावर अगर डोंगराच्या उतरणीवर आहेत. उत्तरेकडील भागात कर्जत येथें व मार्थेरान-तवली या रागेमध्यें मोठीं जंगलें आहेत. पनवेल येथेंहि जंगल आहे. तसेंच मध्यभागात पेण, अलीबाग, रोहा या ठिकाणीं व महाड व माणगाव तालुक्यातहि मोठीं जंगलें आहेत. या सर्व जंगलातून सागाची निपज फार मोठी आहे. त्याच्या खालोखाल शिसवीचीं झाडें,ऐन, जांब, व किंजळ याची पैदास होते. याशिवाय, आपटा, आवळा, चिंच, हिरडा, महु, नारळी, इत्यादि झाडेंहि बरीच आहेत

कुलाब्यात फक्त लोखंड धातूच आढळते. माथेरानच्या टेकड्यातून क्वचित्, ॲल्युमिनियम आढळतें पण तें फार नाहीं. इमारतीला लागणारा दगड मात्र सर्व जिल्ह्यांभर मुबलक सापडतो. वाळू, चुना, हेंहि विपुल आहेत.

शे त की .—या जिल्ह्यातील जमीनीचे चार प्रकार आढळतात. या जिल्ह्याचा निम्म्याहून अधिक भाग, गही जमीन आहे व त्यात चुन्याचेंहि मिश्रण झालेलें आढळतें. डोंगराच्या उतरणीवरचा अगर पायथ्याचा भाग, कुंदं व पाला फत्तर हें उखडून काढल्यानें जी जमीन तयार होते तसल्या जमीनीनें युक्त असून, या जमीनींत नागली, वरी, इत्यादि धान्यें पेरण्यात येतात. ही जमीन फार भुसभुशीत असते तिसरा जमीनीचा प्रकार म्हणजे 'खारपाट' हा होय. खडकावर माती साचून जी जमीन बनलेली असते तिला खारपाट असें म्हणतात. चवथा प्रकार म्हणजे समुद्रकाठच्या जमीनीचा होय. ही जमीन बागाइतीसाठीं फार उपयुक्त आहे. जिल्ह्याचें मुख्य उत्पन्न तादुळाचें होय. पिकाऊ जमीनीच्या ⅔ भागाहून अधिक जमीनींत तादूळ पेरला जातो. तादुळाचा तावडा व पाढरा अशा दोन जाती आहेत याच्या खालोखाल नागली, वरी, हरीक, वाल इत्यादि धान्यें पेरलीं जातात. महाड, माणगाव व रोहा इत्यादि ठिकाणीं तूर, मूग व उडीद याचेंच विशेष उत्पन्न असून, चणे वगैरे माणगाव, पनवेल, कर्जत या ठिकाणीं पिकतात. ताडमाडाच्या बागाच्या बागा या जिल्ह्यात आहेत. १९०३-४ मध्यें पेराऊ जमीनीपैकीं तीन चौरसमैलाच्या जमीनीला विहिरी व तलाव याच्यामुळे पाणी मिळत होतें. या जिल्ह्यातील गुरेंढोरें साधारण खुजींच असतात. महाराष्ट्रातू, शेळ्या व मेंढ्या या जिल्ह्यात बऱ्याच प्रमाणावर येता।. त्याचप्रमाणें महाराष्ट्रामधूनच धनगर व वंजारी लोक खेचरें आणतात. दुधासाठीं मुसलमान लोक शेळ्या पाळतात. या जिल्ह्यात रयतवारी पद्धत सुरू आहे. खोत व इजारदार याच्या ताब्यातच जिल्ह्यातील बरीचशी जमीन आहे. १९०३-४ सालीं ११७१ चौरस मैल जमीन लागवडीखालीं होती व त्यापैकीं ७५० चौरसमैल खोत व इजारदार लोकाच्या ताब्यात होती.

**कुलाबा किल्ला**—हा किल्ला कुलाबा(अलिबाग)जिल्ह्यांत आहे. अलिबागच्या किल्ल्याचेंच नाव कुलाबा आहे, व तेंच नाव सर्व प्रातास लागू आहे. येथें मराठी आरमाराचें मुख्य ठाणें प्रथम शिवछत्रपतींनीं केलें तें मराठा साम्राज्याच्या अखेरीपर्यंत कायमच होतें येथें त्यावेळीं मोठया गोद्या असून त्यात मोठमोठीं गलबत ( लष्करी व व्यापारी ) बाधीत असत. राजाराम छत्रपतींच्या वेळीं सर्व मराठी साम्राज्याच्या आरमाराचें आधिपत्य आंग्र्याच्याकडे आलें हे आंग्रे कुलाब्यासच रहात असत या किल्ल्याजवळ समुद्र खडकाळ व उथळ असून बंदरात येण्याचा मार्ग अरुंद असून सापडण्यास कठिण असल्यामुळे आंग्र्यांचें आरमार या बंदरात सुरक्षित असे.

**कुलित्तलइ**—मद्रास इलाख्यात त्रिचनापल्ली जिल्ह्यातील तालुका. क्षेत्रफळ ३०१ चौ. मैल यात १२९ खेडीं असून मुख्य ठिकाण ' कुलित्तलई ' हें खेडें आहे लो. सं. ( १९११ ) २,०५,१४८. यातून अमरावती नदी वायव्येकडील भागातून जाते. तिच्या पाण्याचा काहीं खेडीं पाटानें उपयोग करून घेतात. कावेरी उत्तर सरहद्दीवर असून तिच्या काठचा प्रदेश फार सुपीक आहे याशिवाय इतर भागातील जमीन हलकी आहे. जमीनमहसूल सुमारें तीन लाख आहे यातील दक्षिणेकडील मरंगपुरी व कदवूर या दोन जमीनदाऱ्या व आणखी ३२ सरकारी खेडीं मिळून पूर्वीचा जुना मनप्पारै तालुका होता. तो मदुरा

जिल्ह्यातून ह्या तालुक्यास इ स १८५६ त जोडण्यात आला

**कुलइन्सूर अथवा कुटेश्वर**—बस्तर संस्थानातील जगदळपुरच्या दक्षिणेस २१ मैलावरील लहान खेडें गुमीर किंवा गुप्तेश्वर या नावाच्या काहीं गुहा येथें सापडल्या असून त्यात एक प्रकारचे स्तंभ आढळले आहेत काहीं स्तंभाचा आकार शिवलिंगाप्रमाणे दिसत असल्यामुळें लोक त्यास देव समजून त्याची पूजा करितात गुहेत जाण्याकरिता ५ फूट उंच चढून जावें लागतें गुहेंत ५ वेगवेगळ्या खोल्या सर्वांत माहित असून आणखाहि कित्येक असतील यात झाकलेल्या विहिरी आहेत

**कुलु तहशील**—पंजाब प्रातात कांग्रा जिल्ह्यातील एक तहशील हिचें क्षेत्रफळ १३४२ चौ मै असून १९११ साली लो स १,८४,८०२ होती इंत खेडीं ६७ आहेत तालुक्याचें मुख्य ठिकाण सुल्तानपूर येथें आहे १९० ०४ साली सायांचें उत्पन्न ८२,००० होतें

कुलू तहसिलींत लाहूल व सिटी या वजिराती आहेत या प्रदेशातून बियास नदी वहात जाते नदीच्या सभोंवती डोंगराळ प्रदेश १८००० फूट उंच आहे बियास नदीचा उगम कुलू तहसिलींत रोहटकच्या शिखरावर १३३२६ फूट उंचीवर झाला असून ५० मैल वहात गेल्यावर ती नदी संस्थानात शिरते शस्सी गावाजवळ बियास नदीवर झुलता पूल असून नदीचा देखावा भव्य आहे येथील दर सालचें पर्जन्यमान ३१ इंचापासून ४२ इंचपर्यंत असतें रावी व सतलज नद्यामधील जीं रजपूत संस्थान आहेत त्यात कुलू हें एक लहानसें होतें जालंधरच्या राजघराण्यापैकी एक घराणें कुलूस येऊन राहिलें होतें ह्युएनत्संग हा प्रवासी कुलूसंबंधीं बरीच माहिती देतो या प्रदेशावर अनेक राजे व राजघराण्यानीं सत्ता चालविली १८४६ साली प्रथम शीख युद्ध सुरु झालें, त्याच्या अगोदर कित्येक वर्षें गुरखा व शीख यामध्यें नेहमीं झटपटी चालू असत शेवटचा राजा ठाकूर सिंग होता १८९२ सालीं रायमेघसिंग नावाचे महाराज जहागीरीवर होते त्याना जहागिरींत मॅजिस्ट्रेट व मुनसफाचा अधिकार दिलेला असतो

**कुलुहा**—बंगाल हजारीबाग जिल्ह्यातील हा एक टेकडी असून हियावर बुद्धाच्या वेळच्या इमारतीचे व देवालयाचे अवशेष पुष्कळ आढळतात ब्राह्मण लोकांनीं हा भाग बौद्धाकडे सोपविला असून टेकडीच्या वरच्या भागावर एक कुलेश्वरी नावाचें दुर्गेचें देवालय आहे चैत्रमासीं व आश्विनमासीं येथें यात्रा भरते

**कुवम**—मद्रास इलाख्यातील एक नदी चिंगलपट जिल्ह्यातील कार्जीवरम् तालुक्यात कुवम म्हणून एक खेडें आहे त्या खेड्यातील तळ्यापासून निघणाऱ्या पाण्याचा ओघ व [illegible] राळीच्या पाण्याचा ओघ याचा संयोग होऊन ही नदी झाली आहे ही नदी मद्रास शहरातून वहात जाऊन शेवटीं सेन्ट जॉर्ज किल्ल्याजवळ बंगालच्या उपसागरास जाऊन मिळते मद्रास शहरातील सर्व कचरा व घाण ह्या नदींत आणून सोडतात

**कुवलयापीड**—कंसाचा हत्ती हा सहस्र गजाइतका बलवान असे धनुर्यागनिमित्तानें कृष्ण मथुरेस आला असता कंसानें अडवून यास त्याच्या अंगावर घालविलें तेव्हां हा कृष्णाच्या हातून मेला [ भाग स्क १ अ ४३ ]

**कुवलाश्व**—सूर्यवंशातील एक राजा यास कुवलयाश्व असेंहि नाव आहे यास २१,०० पुत्र होते असें विष्णुपुराणात सांगितलें आहे परंतु हरिवंशात त्यास फक्त शंभरच पुत्र होते असा उल्लेख आढळतो उज्जालक समुद्रात राहून उत्तंक नामक सत्वशील ऋषीचा छळ करणाऱ्या अशा धुंधु नामक असुरावर त्यानें आपल्या पुत्रासह हल्ला केला आणि त्यास त्याच्या आश्रयस्थानातून बाहेर काढून ठार मारिलें ह्या पराक्रमाबद्दल कुवलाश्वास धुंधु-मार ( धुंधुस मारणारा ) असें विशेषण मिळालें परंतु तीन पुत्राशिवाय त्याच्या सव पुत्राचा धुंधूच्या नाकातून श्वासाबरोबर येणाऱ्या ज्वालाच्या योगें नाश झाला [ भारत वनपर्व अ २०१–२०४ ]

**कुश**—या नावाचे तीन चार पौराणिक राजे आहेत व या सर्वात रामपुत्र कुशच प्रसिद्ध आहे वाल्मीकीनें याची रक्षा कुशमुष्टीनें केला म्हणून यास असें नाव पडलें लहान असतानाच यानें रामाचा अश्वमेधीय घोडा हरण करून रामसेनेबरोबर मोठें युद्ध करून सर्वांना पराजित केलें अशी वा रामायण उत्तर सर्गात कथा आहे यास चंपिका आणि कुमुद्वती अशा दोन स्त्रिया होत्या त्यातून पहिलीस चंपकमालिनी इ नऊ कन्या व दुसरीस अयिति इ आठ पुत्र होते विंध्य पर्वतावर यानें दक्षिण कोसलाची राजधानी कुशावती किंवा कुशस्थली स्थापिली

**कुशद्वीप**—पृथ्वीवरील सप्तद्वीपातील चौथें याची रुंदी आठ लक्ष योजनें असून तितक्याच रुंदीच्या घृतसमुद्राच यास वेष्टन आहे येथें अग्नीप्रमाणें देदिप्यमान ईश्वरनिर्मित कुशस्तंभ असल्यामुळे ह्यास कुशद्विप असें नाव पडलें प्रियव्रत राजाचा पुत्र हिरण्यरेता येथील अधिकारी असून त्यानें याचे वर्षसंज्ञक सात भाग वसु, वसुदान, दृढरुचि नाभिगुप्त, स्तुत्यव्रत विविक्त आणि वामदेव अशा सात पुत्रास दिले व त्यांचींच नावें त्या त्या वर्षास क्रमानें दिलीं या द्वीपात चक्र, चतु शृंग, कपिल, चित्रकूट, देवानीक, ऊर्ध्वरोमा आणि द्रविण असे सात पर्वत व रसकुल्या, मधुकुल्या मित्रविंदा, श्रुतविंदा, देवगर्भा, घृतच्युता आणि मंत्रमाला अशा सात नद्या आहेत [ भाग स्क ५ अ २० देवीभाग स्क ८अ १२ ]

**कुशध्वज**—र्हस्वरोमा नावाच्या जनकाच्या दोन पुत्रातील दुसरा सीरध्वज जनकाचा कनिष्ठ बधु हा इक्षुदेशाच्या साकाश्या नामक राजधानींत राज्य करीत असे यास माडवी आणि श्रुतकीर्ति दोघी कन्या असून, त्या यानें

दशरथपुत्र भरत आणि शत्रुघ्न यांना दिल्या होत्या सीरध्वजास पुत्र नव्हता म्हणून ह्याच पुढें मिथिलेचा राजा झाला होता, यास पुत्र होता त्याचें नांव धर्मध्वजजनक (वाल्मिकी रा बाल स ७०)

**कुशनाभ**—(सोमवंश) विजयकुलोत्पन्न कुश अथवा कुशिक राजाच्या चार पुत्रांतील चवथा यानें महोदय पुरी स्थापिली होती यांच्या शंभर कन्या वायूच्या कोपानें वक्र झाल्या असतां काम्पिलपुरीच्या चुलिपुत्र ब्रह्मदत्त राजास दिल्यावर सरळ झाल्या परंतु देशास कान्यकुब्ज जें नांव पडलें तें पडलेंच (वाल्मीकी रा बाल स ३२-३३)

**कुशलगड**—हा रजपुतान्यांत बांसवाडा संस्थानच्या आग्नेयीस एक लहानशी जहागीर आहे हिचें क्षेत्रफळ ३४० चौरस मैल असून खेड्यांची संख्या २८९ आहे १९११सालीं खेड्यांसह लो स २२००० होती खुद्द कुशलगडची लो स ?१९४ आहे येथें एक दवाखाना, एक शाळा व एक पोस्टऑफीस आहे

येथील जहागिरदार राठोड रजपूत असून जोधपूर शहर स्थापन करणारा जोधसिंग हा याचा मूळ पुरुष होता अठराव्या शतकांत राठोड रजपुतांनीं कुशलगडचा प्रदेश घेतला यास खुशालगड असेंहि म्हणतात

येथील मूळचे रहिवासी भिल्ल असून खुशालसिंग नांवाच्या मनुष्यानें भिल्लापासून सदरहू प्रदेश घेतल्यामुळें याला खुशाल गड हें नांव पडलें परंतु खुशालगडची माहिती निराळी आहे ते म्हणतात कीं अमुक राजानें खुशाल नांवाच्या भिल्लापासून तो प्रदेश घेतला, सबब खुशालगड असें त्याला नांव दिलें आहे सूर्त खुशालगड जहागीर बांसवाडापासून स्वतंत्र आहे वार्षिक खंडणी बक्षीर दिली म्हणजे झालें, परस्पर दोघांचा कांहीं संबंध नाहीं साधारण गुन्ह्यांची चौकशी महाराज स्वतः करतात फांशी व जन्मठेप या शिक्षा देण्याकरितां एजंटाची मंजुरी अवश्य असते

**कुशस्थली**—सूर्यवंशोत्पन्न रैवत राजा यानें स्थापलेली नगरी हिलाच पुढें द्वारका असें नांव पडलें हा आनर्त राष्ट्राची राजधानी असून रैवत ब्रह्मलोकास गेला असतां पुण्यजनां(यक्ष राक्षसां)नीं हें नगर उध्वस्त केलें

कुशानें स्थापलेल्या दक्षिण कोसलाच्या राजधानीचेंहि कुशस्थली हें नांव होतें ('कुश' पहा)

**कुशान**—यूएची हे हिंदुस्थानांत आल्यानंतर कांहीं शतकें राहिले व पुढें त्यांनीं जेव्हां हिंदुत्व स्वीकारलें तेव्हां त्यांनाहि कुशान हें नांव मिळालें [बुद्धोत्तर जग पृ २५२ पहा] कुशानाच्या कालाबद्दल अद्यापि एकमत नाहीं स्मिथनें दिलेला या राजांची वंशावळी हा त्याचा ख्यालाच संशयास्पद वाटत आहे कडफिसेस (पहिला) हा या वंशाचा पहिला राजा (इ स २०) होय याचें राज्य उत्तर हिंदुस्थानांत होतें. यूएची व मोंगल यांच्या शारीरिक लक्षणांत बराच भेद आहे त्यांच्या चालीरीती हिऊंगनु यांच्यासारख्या होत्या त्यांची एकंदर संख्या १० लक्षापर्यंत असावी (ख्रि पू १६०) यांचें मूळ ठिकाण वायव्य चीनांतील कानसूचें हाय तथून कांहीं काळानंतर ते तक्लमकान प्रांतांत येऊन, तेथील वूसून लोकांचा पराभव करून व थोडीं वर्षे तेथें राहून, पुढें शकांचाहि पराभव करून ते उत्तरेकडील पठारीं हिंदुस्थानांत उतरले (ख्रि पू १५०) याच सुमारास त्यांनीं बॅक्ट्रिया जिंकला त्यानंतर हे भटकये न राहतां स्थाईक झाले तरी पण यांचा तत्कालीन इतिहास नक्की आढळत नाहीं यांचा प्रख्यात राजा कडफिसेस (पहिला) म्हणून झाला तो गादीवर साधारणतः इ स १५ मध्यें बसला कडफिसेस हें युरोपियन लोकांनीं दिलेलें नांव आहे त्यांच्या नाण्यावर कोझोल कडफेस, कोझोलकड फिसेस आणि कुजुलकरकडफिसेस अशीं नांवें कोरलेलीं आहेत चिनी प्रधान कीएयू-त्सीएयू-कीओ असें नांव येतें परंतु या सर्व नांवांचा काय अर्थ होतो हें अद्यापि कोणासच समजलें नाहीं कदाचित् या पदव्याहि असतील कुशान राजे लौकिक शक मानीत असत खरोष्ठी लिपींत दीर्घ स्वर नसल्यानें असें नांव असावें असें स्मिथ म्हणतो परंतु चिनी व ससानियन पुराव्यावरून कुशान असेंच नांव होतें हें ठरतें, 'रव्वा कुशान असें नांव दुसऱ्या हार्मिज्दच्या नाण्यावर स्पष्ट आहे कडफिसेसनें काफिरिस्तान व काबूल प्रांत बॅक्ट्रिआ व पार्थिआ म्हणजे इराणपासून सिंधुनदापर्यंतचा सारा प्रदेश जिंकला (इ स २२) व इंडो-पार्थिअन् व इंडो-ग्रीक यांना हाकलून दिलें त्याचा मुलगा कडफिसेस दुसरा हा नंतर गादीवर आला (इ स ४५) यानें बहुधा पंजाब प्रांतावर स्वारी करून तेथें एखादा आपला लष्करी सुभेदार कांहीं काळपर्यंत ठेवला असावा असें तत्कालीन कांहीं नाण्यांवरून दिसतें या नाण्यांवर राजाचें नांव नसून, हीं काबूलपासून काशीपर्यंत व कच्छ काठेवाडांतहि आढळतात या दुसऱ्या कडफिसेसचें नाण्यांवरील नांव विम (ऊएमो) असून चिनी नांव येन-काओ-चिन असें आहे याच्या नंतर कनिष्क हा गादीवर आला या कुशानवंशांत कनिष्क (पहा) हाच कायतो प्रख्यात राजा झाला यानें आपलें राज्य बरेंच वाढविलें नंतर त्यानें चिनी बादशहाकडे त्याच्या मुलीबद्दल मागणी घातली त्यामुळें त्याला राग येऊन त्यानें आपलें सैन्य कनिष्कावर धाडिलें (९०) कनिष्कानेंहि आपला सेनापति सी यास ७० हजार सैन्यासह त्याच्यावर धाडिलें परंतु त्याला ताशकुर्गानच्या पर्वतांतून जातां जातां फार त्रास झाला व अखेर यारकंद प्रांतांत त्याचा चिनी सैन्याकडून पूर्ण पराभव झाला त्यामुळें कनिष्कानें चिनी बादशहाला खंडणी दिली कडफिसस (दुसरा) यानें सोन्याचें नाणें हिंदी पद्धतीचें सुरू केलें होतें, त्यांत कनिष्कानें सुधारणा केली कनिष्काचें नांव तिबेट, चीन, मंगोलिया, हिंदुस्थान यांत फार प्रसिद्ध असून त्याचें चरित्र मात्र अगदींच थोडें उपलब्ध आहे त्यांतहि त्याचा कालानुक्रम तर सर्वच शंकित आहे स्मिथच्या मतें

"कनिष्क हा इ स ७८ मध्ये गादीवर आला, म्हणून हल्ली जो शालिवाहन शक सुरु आहे, तो कनिष्काच्या राज्यारोहणापासूनच सुरु झाला असावा." चिनी वाङ्मयात याचा उल्लेख येतो, परंतु तो ऐतिहासिक दृष्ट्या येत नसून, बौद्ध-धार्मिक वाङ्मयातून येतो; त्यामुळे त्याची ऐतिहासिक किंमत कमी आहे कनिष्काचा संबंध असलेले असे जवळ जवळ २० शिलालेख आतापर्यंत आढळले आहेत व त्यात कालनिर्देशहि आलेला आहे परंतु आश्चर्याची गोष्ट ही की, त्या कालाच्या आकड्यावद्दलच विद्वानात मतभेद आहे त्यावरून कोणी त्याचा राज्यारोहणकाल खि पू. ५८ देतात, तर कोणी इ स ७८ देतात काहींचे म्हणणे विक्रमसंवत हा त्याचा राज्यारोहणाचा काल होय परंतु नुकतीच तक्षशिला नगरी खोदून काढल्यावर, तेथील एकंदर प्राचीन अवशेषांचे निरीक्षण करून डॉ. मार्शल, कनिष्क हा बहुधा खि श. च्या दुसऱ्या शतकात झाला असावा असे ठरविले आहे. कनिष्क हा कडफिसेस (दुसरा) याचा मुलगा नव्हता. त्याच्या बापाचे नाव वझेशक ( वझेशष ) होय कनिष्काचे राज्य वायव्य हिंदुस्थानात पसरलें होतें त्या प्रदेशास तत्काली गांधार हें नाव होतें. ह्युएनत्संगहि हा गांधारचा राजा होता असेच म्हणतो याने सन ९९ त रोम येथे आपला वकील पाठविला होता त्याने काश्मीरप्रांत हस्तगत करून तेथे अनेक स्तंभ उभारून आपल्या नावचे कनिष्कपूर (हल्लींचे विहार नदीवरील बारामूला व श्रीनगर रस्त्यावरील कानीसपूर ) शहरहि वसविलें दंतकथा सांगते की, त्याने अश्वघोष नावाच्या बौद्धपंडिताला आश्रय दिला होता.(याचा अर्थ ते समकालीन होते एवढाच येथे घ्यावयाचा.) महाराष्ट्रांतील नहपान क्षहरात व उज्जेनचा चष्टण सत्रप हे बहुधा कनिष्काचे मांडलिक असावेत असें वाटतें कनिष्क हा म्हातारपणात बौद्धधर्मीय झाला याची राजधानी पुरुषपुर (पेशावर) होती तेथें याने एक स्तंभ उभारला होता. त्याला तेरा मजले असून, त्याची उंची ४०० फूट होती तो सर्व नकशीदार लाकडाचा असून त्याचें शिखर मात्र मजबूत लोखंडाचें होतें. सहाव्या शतकारंभीं संगयून हा चिनी प्रवासी इकडे आला असता त्याने लिहून ठेविलें आहे की, "हा स्तंभ तीन वेळ जळाला होता व तितकेहि वेळा श्रद्धाळू राजांनीं तो पुन्हा बांधून काढला होता" त्याच्या जवळच एक बौद्धमठ होता तो नवव्या शतकापर्यंत चांगला भरभराटींत होता त्यावेळीं सुद्धा तेथें बौद्धधर्माची एक पाठशाळा होती, असें नालंदविद्यापीठाचा कुलपति वीरदेव याने म्हटलें आहे (८५०) स्तंभाबद्दल ह्युएनत्संग व अलबेरुणी हेहि माहिती देतात अलबेरुणी त्याला कनिष्कचैत्य म्हणतो. मठाबद्दलहि ह्युएनत्संग माहिती देतो हल्लीं ही जागा उकरून पाहिली. त्यात तेथें जुने अवशेष पुष्कळ सापडले त्यापैकीं महत्वाचा म्हणजे कनिष्काचा करंडा होय. त्यावर त्याची मूर्ति असून एक शिलालेखहि आहे कनिष्काचा एक पुऱ्या उंचीचा पुतळा मथुरा जिल्ह्यातील मात गावीं आहे. हल्लीं त्याचें मस्तक मात्र त्यावर नाहीं. त्याच्या अंगात लांब पायघोळ अंगरखा असून त्याच्या आत गुडघ्याइतका दुसरा अंगरखा आहे व त्यावर कमरपट्टा बांधलेला आहे गळ्यात मोत्याची माळ असून, उजव्या हातात कमरेपासून पायापर्यंत पोहोंचणारी म्यानबंद तरवार आहे डाव्या हातात कमरपट्ट्यात अडकविलेली व घोट्यावर येईल इतक्या लांबीचा दुसरी एक तरवार आहे पायात चढाव असून, ते टाचेखालून घोट्याजवळ बंदांनी बांधलेले आहेत पायात विजार असावी असें दिसतें असो, वर सांगितलेल्या कनिष्काच्या स्तंभाच्या कायमचा निकाल महमुद गिझनीकरानें लावला. कनिष्कानें काशगर, यारकंद, खोतन, या चिनी साम्राज्यातील प्रांतावर पहिली स्वारी केली, तींत मागें सांगितल्याप्रमाणें त्याचा पराभव होऊन त्याला चीनच्या बादशहास खंडणी देणे भाग पडलें होतें (९०) परंतु पुढे दुसरी स्वारी करून व चिनी सैन्याचा पराभव करून हे प्रांत त्यानें काबीज केले या प्रांतातील काहीं चिनी राजपुत्र त्यानें ओलीस ठेऊन घेतले त्याच्या रहाण्यासाठीं त्यानें काबूलजवळ जे बौद्धमठ बांधिले होते तेच दिले उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा या तिन्ही काळात त्याना निरनिराळ्या तीन मठात ठेवीत. या राजपुत्रांनीं मठातील बौद्ध भिक्षूंना पुष्कळ देणग्या दिल्या होत्या. कनिष्कानें बौद्धधर्म स्वीकारण्याचें कारण दंतकथा सांगते कीं, त्यानें लढायात फार माणसें मारल्यानें त्याला पुढें पश्चात्ताप झाला. व मग तो या धर्माचा अनुयायी झाला. परंतु ही गोष्ट अशोकाच्या गोष्टीची नक्कल दिसते. त्याच्या नाण्यावरून एवढें ठरतें कीं, तो राजा झाल्यानंतर पुढें बौद्ध झाला असावा. त्याच्या पहिल्या पहिल्या नाण्यावर ग्रीक लिपींत व भाषेंत लेख असून त्यावरील सूर्यचंद्राचीं नावेहि ( हेलिओस व सेलेने अशीं ) ग्रीक भाषेंतीलच दिलीं आहेत. त्यापुढील नाण्यावर ग्रीक लिपी मात्र ठेऊन भाषा जुनी इराणी योजली आहे ग्रीक, इराणी व हिंदु लोक ज्याची पूजा करीत आहेत असे काहीं देव तेथें कोरले आहेत.

यापुढील नाण्यावर मात्र बुद्धाची मूर्ती असून त्याचें नाव ग्रीक अक्षरात लिहिलेलें असतें. तरी पण तो बौद्ध कधीं झाला याचा नक्की शोध लागत नाहीं. याच्या वेळीं महायान पंथाचा बराच उत्कर्ष झाला होता त्यामुळ गौतमबुद्धाला तेव्हा देवत्व प्राप्त झालें होतें. कनिष्कानें आपल्या राजवटींत एक बौद्धधर्माची मोठी समिति भरविली होती असें चिनी, तिबेटी व मंगोलियन दंतकथा सांगतात सिंहली बखरींत अगर ग्रंथात याबद्दल काहींच उल्लेख केला नाहीं. या धम्मसंगीतीचा अध्यक्ष वसुमित्र व उपाध्यक्ष अश्वघोष होता कनिष्काचा गुरु पारस्व यानें ही सर्व तयारी केली पाचशें भिक्षु जमले होते. ते सर्व सर्वास्तिवादी ( हीनयान ) पंथा चेच होते सभा काश्मीरात कुंडलवन येथें भरली. तींत

त्रिपीटकांतील वस्तुतः सर्व भागांचें शुद्धीकरण करून त्यावर "महाविभाषा" नांवाच्या टीका तयार करून त्या ताम्रपत्रावर कोरून एक स्तूपांत ठेवल्या. अद्यापि त्या स्तूपाचा शोध लागला नाहीं. पुढें मागें दैवगत्या शोध लागल्यास बौद्ध धर्माबद्दलची बरीच नवीन माहिती उजेडांत येईल. ही सभा बहुधा इ. स. १०० मध्यें भरली असावी. नंतर त्यानें सर्व काश्मीर प्रांताचें उत्पन्न या धर्माच्या कार्यास लावून दिलें. त्याच्या मृत्यूसंबंधीं पुढील एक दंतकथा आहे – त्यानें पुष्कळ प्रांत जिंकले असतांहि त्याची राज्यलालसा सुटेना व लष्कर तर कंटाळून गेलें, तेव्हां लष्करानें कट करून त्याला ठार मारलें (इ. स. १२३). कनिष्काच्या नंतरच्या राजाची फारच थोडी माहिती आढळते. कनिष्काला वासिष्क व हुविष्क (हुष्क) असे दोन मुलगे होते. पैकीं वासिष्क बहुधा बापाच्या देखतच मेला असावा. त्याचें अद्यापपर्यंत एकहि नाणें सांपडलें नाहीं. हुविष्काचीं नाणीं फार सांपडतात. बापाच्या नंतर हा गादीवर आला. याचें राज्य काबूल, काश्मीर व मथुरा या प्रांतीं होतें. खुद्द मथुरेस त्यानें बांधलेला एक बौद्धविहार होता. हा धर्मानें बौद्ध होता. परंतु कट्टा नव्हता. याच्या नाण्यावर हिराक्लाज (हरिकृष्ण) सरपीज, स्कंद, विशाख, फरो वगैरे ग्रीक, इराणी व हिंदु देवता कोरलेल्या असतात. मात्र बुद्धाची मूर्ति मुळींच नसते. साधारण तत्कालीन हे शकराजे बुद्धाचे अगदीं कट्टे अनुयायी नसत. त्यावेळीं बौद्धधर्म फार श्रीमंत व वजनदार होता. त्यामुळें कोणाहि तत्कालीन मुत्सद्दी राजानें त्याला वरवर अनुमति देऊन त्याच्या या परिस्थितीचा फायदा घेण्याचें सोडलें नाहीं, आणि त्याप्रमाणें कनिष्क व हुविष्क हे त्याला अपवाद नव्हते. त्यानें काश्मीरांत बारामुल घाटांत हुविष्कपूर म्हणून एक शहर वसविलें. तें त्या काळीं व्यापाराची फार मोठी उतारपेठ होती. तिला "पश्चिमवेस" असें साधें नांव मिळालें होतें. ह्युएनत्संग या ठिकाणीं गेला होता त्यावेळीं तेथें एक विहार होता. हल्लीं याचें नांव उष्कूर असून तेथें प्राचीन स्तूपाचा अवशेष आहे. हुविष्काचें चित्र जें नाण्यावर खोदलें आहे त्यावरून त्याच्या स्वरूपाचा बोध होतो. हा इ. स. १४० त मेला असावा. याच्यानंतर (याचा पुत्र?) वासुदेव हा गादीवर आला. त्याच्या या हिंदु नांवावरून या वाग्यशकावर तत्कालीन हिंदु संस्कृतीची छाप किती दाट बसली होती हें उघड दिसून येतें. त्याच्या नावाप्रमाणेंच त्याच्या नाण्याचें स्वरूपहि पूर्णपणें हिंदु आहे. त्याच्या नाण्याच्या पाठीवर नंदीसह शंकर असून शिवाय पाश व त्रिशूळ हींहि हिंदु राजचिन्हें आहेत. मथुरेस त्याचा जो शिलालेख आहे त्यावरून त्यानें २५ वर्षें राज्य केलें असें दिसतें. त्याच्या उत्तरकालीं त्याच्या राज्यास उतरती कळा लागली व त्याच्या मृत्यूनंतरहि तें राज्य मोडलें व निरनिराळे सुभेदार स्वतंत्र झाले, तरीहि पुढें बरेच दिवस नाण्यांवर त्याचाच छाप असे. याच सुमारास (इ. स. १६०) सर्व मध्यभागांत प्लेग सुरू झाला होता. बाबिलोनिया, रोमन व पार्थियन या साम्राज्यांतहि तो चालू होता. नीबूहरच्या मतें प्राचीन जगाला या प्लेगमुळें जो जबरदस्त धक्का बसला त्यांतून तें पुन्हां धडपणें बाहेर पडलेंच नाहीं. बहुधा ही साथ 'वासुदेवाच्या वेळीं त्याच्या राज्यांत पसरली असावी.

यानंतरचा पुढील इतिहास फारच अंधुक आहे. ससानियन लोकांचा धागा या सुमारास थोडासा उत्तरहिंदुस्थानांत लागलेला (नाण्यावरून) दिसतो. परंतु त्या लोकांनीं स्वारी केली होती कीं काय व केली असल्यास त्यांनीं इकडे किती दिवस अधिकार गाजविला वगैरे माहिती (शिलालेख, नाणीं वगैरे वरून) कांहींच स्पष्ट आढळत नाहीं. एवढें खरें कीं उत्तरेकडे कुशान व दक्षिणेकडे आंध्र, या दोन्हीहि साम्राज्यांचा पत्ता एकाच वेळीं नाहींसा होऊन तेथें सर्वत्र अंधार दिसतो. बहुधा या तिसऱ्या शतकाच्या वेळीं सर्वत्र लहान लहान स्वतंत्र संस्थानें असावींत. पुराणांत यावेळीं आभीर, गर्दभील, शक, यवन, बाल्हीक या लोकांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या असा उल्लेख आहे. परंतु त्यांची साग्र व सुसंगत माहिती आढळत नाहीं. रा. द. बानर्जींच्या मतें वासुदेवानंतर दुसरा कनिष्क, दुसरा वासुदेव व तिसरा वासुदेव हे गादीवर आले. काबूलमध्यें मात्र हे कुशान राजे पांचव्या शतकापर्यंत होते. त्यानंतर त्यांना श्वेतहूणांनीं हाकलून दिलें. चौथ्या शतकाच्या प्रारंभीं या कुशान राजांपैकीं एकानें आपली मुलगी इराणच्या (दुसऱ्या) होर्मज्दला दिली होती व इ. स. ३५० त (दुसऱ्या) शापुरला काबूलच्या एका राजाची मदत (रोमन स्वारींत) झाली होती असे उल्लेख आढळतात. पंजाबांतहि कांहीं ठिकाणीं हे कुशान बरेच दिवस टिकून होते. मात्र त्यांचें महत्त्व बरेंच कमी झालें होतें व ते इराणच्या ससानिअन वंशाच्या छापेखालीं बरेच गेले होते असें दिसतें. सारांश कुशान व आंध्र यांचा लय (इसवी सन २२०) व गुप्तांचा उदय (इ. स. ३२०) यामधील एक शतकाचा हिंदुस्थानचा इतिहास सर्व अंधारांत बुडालेला आहे. जेव्हां त्याचा पत्ता लागेल तेव्हां खरें.

[संदर्भग्रंथ-स्मिथ-अर्ली हिस्टरी, वैद्य मध्य भारत, अय्यर-एन्शन्ट इंडिया. जर्नल ऑ. रा. ए. सोसायटी १८८२, १०३१, १९०३ ते १९०८, १९१२ ते १३, चवनेज-तुर्क, हिरोडोटस ३, हुईन, ज. अ. ट्रोम, ७, वॉटर्स, स्टीन-राजतरंगिणी कनिंगहॅम—न्यूमिस्म्याटिक क्रॉनालजी १८९२, कॅट कॉइन्स इंडियन म्युझियम पु. १, डग्लस-चीन, स्टीन-खोतन, तुर्कस्तान, ड्रेगो—ल्याटर हूणाज्, इंडि. ॲंटि. १९०३, १९०८, एपि. इंडिका पु. ८, प्रोसिडिंग्ज एशियाटिक सोसा. बंगाल १८९५, प्रिंसेप-लेख, पु. १ रोमचा इतिहास पु. ५, मॅक्क्रिंडल-एन्शन्ट इंडिया, मेरिव्हेल-रोमचा इति., लेव्ही, फौचर-एन्शन्ट गंधार, तारानाथ, बील-रेकॉर्ड पु. १ फाहीन, सचौ-अल्बेरूणी पु. २ रॉलिन्सन पार्थिआ,

इलियट-हिस्टरी ईंडिया पु १, सलेत नचफोलजर.पृ ११५, टाकाकुसुलेन्व, इत्सिग, परमार्थ-वसु बरि, एशियाटिक रिस• चस पु १०, शिफनर, ग्रुडंमर-ब्रिटिश म्युझि, कॅटलाग ऑफ एशियाटिक सोसायटी बंगाल, १९०८, ज्ञानकोश प्र ख वि ८ ]

**कुशाव**—( सो व ) विजयकुलोत्पन्न कुश अ कुशिक राजाच्या चार पुत्रांतील पहिला यास कुशाबु असेंहि म्हणत असत यानें स्थापिलेल्या नगरीचें नाव कौशाम्बी असें असून याच्या पुत्राचें नाव गाधि असें होतें

**कुशावर्त**—प्रियव्रतवंशीय ऋषभदेवास जयन्तीच्या ठायीं झालेल्या शभर पुत्रांतील जे नवखंडाधिपति पुत्र त्यांतील ज्येष्ठ याचा खंड याच्याच नावानें प्रसिद्ध आहे

**कुशिनगर**—( कुशनगर किंवा कुशिनारा ) या नगराचें अत्यंत प्राचीन नाव कुशावती हें असून याचा संबंध ५३१ व्या जातक कथेशीं आला आहे व याचा राजा ओक्काक ( इक्ष्वाकु ) याचा पुत्र कुश हा असल्याचें सांगितलें आहे बौद्ध आख्यायिकाप्रमाणें शाक्यमुनि गौतमबुद्ध यांचें ( कुशिनारा ) या ठिकाणीं निर्वाण व दहन झालें व यामुळें बौद्ध यात्रेकरूंचें हें एक महत्वाचें यात्रेचें स्थान झालें आहे

बुद्धनिर्वाणाच्या वेळीं म्हणजे खिस्तपूर्व ४८७ किंवा ४८८ च्या सुमारास कुशिनारा हें एक लहान खेडें असावें असें उल्लेख आहेत परंतु बुद्धाच्या निर्वाणप्रसंगाशीं या स्थानाचा संबंध आल्यामुळें पुढें साहजिकच त्यास जास्त महत्व प्राप्त झालें ख्रिस्तशकाच्या ५ व्या शतकाच्या आरंभीं फाहिआन या चिना प्रवाशानें हें स्थळ पाहिलें यानंतर इ स ६३७ च्या सुमारास ह्युएनत्संग यानें या स्थळास भेट दिली, दोघा प्रवाशांनीं या स्थळासंबंधीं दिलेली माहिती बहुतेक सारखीच आहे दोघांनींहि लुंबिनी उद्यानापासून या स्थाना-पर्यंतचें दिलेले अंतर सारखेंच म्हणजे १२ योजनें आहे फक्त दोघांनीं सांगितलेल्या दहनस्तूपापासून या स्थळाच्या दिशेंत अंतर पडतें फाहिअनच्या मतें कुशीनगर हें या स्तूपाच्या पूर्वेस व ह्युएनत्संगाच्या मतें ईशान्य दिशेस आहे

या पुराव्यावरून देखील अद्याप संशोधकाचा या स्थळा बद्दल निश्चय झाला नाहीं स्मिथनें यावरून असा तर्क केला आहे कीं, हें स्थळ नेपाळमध्यें रापती व गंडकी या नद्यांच्या संगमाच्या जवळ हिमालयाच्या पायथ्याशीं आहे परंतु या दोन्हा प्रवाशांनीं कुशिनारापासून वैशाली वाराणसी या नगरांचीं दिलेलीं अंतरें वरील ( स्मिथच्या ) नेपाळांतील स्थानाशीं जुळत नाहींत

कनिंगहॅम याचें म्हणणें कीं, सांप्रत गोरखपुर जिल्ह्यांतील कशिया गांवाजवळील प्राचीन अवशेष हे कुशिनाराचेच असावेत ह्युएनत्संगानें वर्णन केलेली कुशिनारा येथील बुद्धाची निर्वाणकालची प्रतिमा व सांप्रत कशिया येथील प्राचीन अवशेषांत सापडलेली प्रतिमा यांत बरेंच साम्य आहे

मुकुटबंधन मठांतील मुद्रेशिवाय इतर पुष्कळ ( महापरि निर्वाण मठासंबंधीं ) मुद्रा जीर्ण स्थितींत सापडल्या आहेत त्यांत एक वेठद्वीप अगर विष्णुद्वीप मठांतील मुद्रा आढळून आली तीवरून कशिया हें विष्णुद्वीप असावें अशी जबरदस्त शंका येते

प्रख्यात सम्राट अशोक यास त्याचा गुरु उपगुप्त यानें येथें यात्रेस आणिलें होतें ( इ ए १०९-१० ) खड्गसम शेरजंग बहादूर याच्या मतें नेपाळांतील अचिरावति व हिरण्यवती या दोन नद्यांच्या संगमावर हें गाव आहे पार्गि टेरनें कशिया येथील बुद्ध प्रतिमेच्या निर्वाणदेवळाच्या मागील मोठ्या स्तूपांत सापडलेल्या एका ताम्रपटांतील मजकुरावरून [ ( परिनि ) र्वाण-चैत्य-ताम्रपट इति ' ] कशिआ हेंच गाव प्राचीन कुशिनगर होय असें ठरविलें आहे या स्तूपास तेथें माथकुवारका कोट ( मृत कुमार स्तूप ) असें हल्लीं म्हणतात सांप्रत हें खेडें गोरखपूर जिल्ह्यांत पूर्वेकडे आहे [ स्मिथ दि रिमन्स निअर कसिआ जर्नल रायल एशिआटिक सोसायटी १९०२, १३ गार्योनिअर-?६ । २ । १९०४ महापरिनिब्बान सुत्त जातकें, फाहियान-ट्रॅव्हेल्स, ह्युएनत्संग-बुद्धिस्ट रेकार्डस ऑफ दि वेस्टर्न वर्ल्ड मार्टिन-इस्टर्न इंडिया कनिंगहॅम-आर्किआ सर्व्हे ]

**कुष्ठ-पाश्चात्य विवेचन**—या स्पर्शसंचारी रोगामध्यें त्वचा, श्लेष्मावरणत्वचा व मज्जातंतु यांच्या ठिकाणीं बारीक गांठींच्या रूपाची विकृति उत्पन्न होते हॅन्सन यानें या रोगाच्या जंतूचा शोध लाविला आहे ते जंतू विकृत शरीराच्या भागांत सापडतात दिसण्यांत ते क्षयाच्या जंतू प्रमाणें पण अधिक सरळ दिसतात या जंतूची ज्यांत वाढ केली आहे असें मिश्रण माकडा या शरीरांत टोंचून घातल्यानें थोडे दिवस टिकणारा त्वचेचा रोग उत्पन्न होतो पण तसा इतर प्राण्यांना होत नाहीं मानवी रोग्यामध्यें रोगजंतू रक्त, त्वचा, श्लेष्मावरण, मज्जातंतु, अन्तरसग्रंथि, कंठ, यकृत, प्लीहा, वृषण, मूत्रपिंड व क्वचित् वेळीं फुप्फुसें इतक्या ठिकाणीं सापडतात परंतु अस्थी, स्नायु व सांधे याठिकाणीं मात्र सापडत नाहींत एक प्रकारच्या पूय जंतूचा शोध-जे या रोगांत होणाऱ्या पुटकुळ्यांत आढळतात-कांहीं मोठ्या जंतुशास्त्रज्ञाकडून लावला गेला आहे व त्याच्या मतें या मूळजंतूनें हॅन्सन यानें शोधून काढलेला जंतू ह्या रूपांतर असावें असा तर्क करणें गैरवाजवी होत नाहीं

**रोगाचें कारण**—हा रोग आप या देशांत बरेच पसरलेला आहे. ख्यात सत असून शिवाय ब्रह्मदेश, सयाम, चीन, जपान, आफ्रिकेचा ईशान्य भाग, केप आफ गुड होप, वेस्ट इंडीज वगैरे, मध्य व दक्षिण अमेरिका, मेक्सिको व पासिफिक

मद्रासगारातील कांहीं बेटें इतस्या ठिकाणीं आढळतो. यूरोपमध्यें नॉर्वे देशाखेरीज दुसऱ्या कोणत्याहि देशात हा रोग आढळत नाहीं. मात्र इंग्लंडांतील जे लोक आशिया अगर वर सांगितलेल्या ठिकाणीं जाऊन आलेले असतील व त्यास स्पर्शसांनिध्य दोषानें कारण होऊन हा रोग होत असल्याचीं उदाहरणें क्वचित् घडतात. परंतु हा रोग अमुक देशात वृद्धि पावतो अगर अमुक प्रकारची हवा त्याच्या वृद्धीस अनुकूल व दुसऱ्या प्रकारची प्रतिकूल असा कांहीं नियम या रोगासंबंधानें बाधता येत नाहीं. परंतु एवढें खचित कीं हा रोग तीस उमरीच्या अगोदर होतो. परंतु अगदीं बालवयात होत नाहीं; व त्यातल्या त्यात स्त्रियांपेक्षा पुरुषांना अधिक प्रमाणात होतो. या रोगात आनुवंशिक रोगप्रवृत्ति फारशी दिसून येत नाहीं; व उपजतच मुलास हा रोग असूं शकत नाहीं. ज्या ज्या देशात हा रोग प्रचलित आहे तेथें सर्व लोकाना याची स्पर्शसंचारी प्रवृत्ति ठाऊक झाल्यामुळें तेथें रोग्यास पृथक् ठेवण्याची थोडी फार चाल आपोआप रूढ झालेली असते. कारण हा रोग स्पर्शसंचारी आहे असें जनतेस कित्येक शतकाच्या अनुभवावरून पूर्ण परिचित झालेलें आहे. आता सावधगिरी बाळगल्यानें परिचारक मंडळी या रोगाच्या आतुरालयात कित्येक वर्षे कांहीं एक विकृति न होता राहिल्याचीं उदाहरणें बरींच असली तरी एखादे वेळीं रोग्याच्या स्पर्शानेच केवळ रोग झाला असें मानता येण्यासारखीं उदाहरणेंहि कित्येक घडून येतात व त्याचप्रमाणें या रोगाचें बीज एखाद्या माणसाच्या प्रयोगाखातर टोंचून घातलें तर हा रोग होतो असा अनुभव आहे. ज्या नवीन शोध लागलेल्या देशात पूर्वी मानवी वस्ती नसून तेथें नवीन वसाहत झाली आहे अशा ठिकाणीं जर कांहीं महारोगी नेऊन सोडले तर क्रमाक्रमानें अधिक महारोगी त्या देशांत आढळूं लागतात हें मारिशियस व क्यालिडोनिया या दोन वसाहतींच्या उदाहरणावरून चांगलेंच सिद्ध होतें.

या जंतूंचा प्रवेश शरीरात इंद्रियद्वारा होत असावा याविषयीं पुढील एक किंवा अनेक स्थलें संभवनीय दिसतात तीं अशीं:—नाक, घसा इत्यादि श्वसनमार्ग, तोंड, मुख, गलग्रंथि, त्वचेंतील जखमा व कदाचित जननेंद्रियमार्ग. अळीकडे ढेंकूण, डास असले कीटक देखील या रोगप्रसारास मदत करीत असतील असा सयुक्तिक व शक्य कोटींतील तर्क विचारार्ह समजण्यात येतो. कारण या प्राण्याच्या शरीरांत असले कांहीं जंतू सापडतात. परंतु हे जंतू माती, धुरळा, हवा, पाणी व अन्न या पदार्थांत मिश्र झाल्याचें कधींहि आढळून आलेलें नाहीं.

रोगाचीं लक्षणें:—थोडा ताप येऊन अगर वरें वाटेनासें होऊन या रोगास आरंभ होतो त्वचा बिघडण्यास प्रारंभ झाला आहे हें सूचित करणारें बाह्य लक्षण जे लालसर किंवा लाल पिंगट वर्णाचे डाग ते प्रथम हातावर किंवा छातीवर अगर पाठीवर दिसूं लागतात. त्याचा आकार वर्तुळ किंवा कधीं अनियमित आकृतीप्रमाणें असून त्याचा व्यास अर्ध्यापासून तीनचार इंचपर्यंत असतो व ते दिसण्यात जरा फुगीर दिसतात. कित्येक वेळीं त्यातील मधला भाग बरा होऊन कंकणाकृति डाग तेवढे मागाहून शरीरावर रहातात. ताप बरा झाल्यावर हे कंकणाकृति डागहि कदाचित् पुष्कळ फिके तरी होतात अगर त्याचे अनेक अवशेष असे काळे किंवा कधीं पाढरे डाग मागें रहातात. याप्रमाणें पुनःपुनः ताप, नंतर असे डाग अंगावर उठणें व ते मावळून त्याचे अवशेष मागें रहाणें हा क्रम कांहीं कालपर्यंत चालूं रहातो. महारोगातील विशेष लक्षण हें कीं, हे डाग दिसूं लागण्याच्या वेळीं किंवा कधीं मागाहून त्वचेमध्यें वाटाण्यायेवढी अगर त्याहून कधीं मोठ्या आकाराची एखाद-दुसरी गाठ किंवा अनेक गाठी उत्पन्न होऊन त्वचेखालीं त्या उमटलेल्या दिसतात; व बरेच दिवस राहून त्या पुढें नाहींशा होतात, पण त्या ठिकाणीं डाग रहातात किंवा त्वचा फुटून तिचे थोडा व पातळ पू येत असलेले लहान लहान व्रण बनतात हे उंचवटे व या गाठी ( व्रण ) चेहरा आणि हाताचे पंजे व पावलाचे पृष्ठभाग व अन्य ठिकाणीं दिसून येतात. त्यामुळें भिवया, नाक, गाल व कानाच्या पाळी जाड व व्रणित होऊन चेहरा भेसूर दिसतो. या विकृत चेहऱ्याचें सिंहाच्या चेहऱ्याशीं थोडें साम्य असल्यामुळें रोगाच्या या अवस्थेस "केसरीमुखावस्था" असें नाव दिलें आहे. पापण्याहि जाड होऊन त्यावर व त्यात क्षतें पडून डोळ्याच्या पापुद्र्यासहि इजा होण्याचा सुमार येतो. परंतु नेत्रांतील वीक्षणमज्जातंतु, दृष्टमज्जास्थान, डोळ्यातील सूर्यकांत काच, व काचमय रसधातु याना मात्र बिलकुल धक्का लागत नाहीं. तोंड, हिरड्या, टाळूं व नाक इत्यादि श्लेष्मावरणयुक्त जागीं देखील वरीलप्रमाणें पुटकुळ्या येतात. म्हणून आवाजहि घोगरा, खरखरीत पिंजरा येतो. यापासून पडणारीं क्षतें स्नायू, अस्थि, वगैरे स्थलें आत खोल ठिकाणापर्यंत पोखरीत जाऊन त्यामुळें सांध्यावर जे स्नायूरज्जू असतील ते झिजून सांधे उकलतात. या महारोगाच्या प्रकारामध्यें पुटकुळ्या येणें हें प्रधान अंग असल्यामुळें त्यास गंडप्रधान भेद असें म्हणतात. दुसरा स्पर्शसंज्ञाहीन नावाचा या रोगाचा एक प्रकार आहे. या भेदामध्यें मुख्यतः मज्जातंतूंच्या स्पर्शज्ञान, पोषण वगैरे शक्तींचा ऱ्हास होऊन शिवाय यात वरील भेदाप्रमाणें पुटकुळ्या येऊन, क्षतें पडणें हा शरीर पोखरण्याची क्रिया सुरू असतेच. आरंभावस्थेमध्यें हात, पाय, पाठ, छाती व पोट वगैरे ठिकाणीं निरनिराळ्या जागीं झिणझिण्या येणें, आग होणें हीं लक्षणें प्रथम होऊं लागतात. पण त्यातल्या त्यात कोंपरापासून खालीं व गुडघ्यापासून खालीं पावलापर्यंत हीं लक्षणें विशेष जास्त

होतात. नंतर त्याच भागामध्ये जडत्व, बधिरत्व, वेदना, शीतोष्णस्पर्शादि ज्ञानशून्यता हीं मुख्य लक्षण स्पष्टपणें निरनिराळ्या जागीं आढळून येतात. व त्या जागीं आगीमुळें दु:ख होतें अशा स्पर्शसंज्ञाहीन जागेवर वरील भेदामुळें अगर या भेदामुळें पाढरे किंवा कधीं श्यामवर्णाचे डाग पडलेले दिसत असतात, व त्यावर केश असतील तर ते निस्तेज, वर्णहीन व बारीक असून तेथील त्वचा मऊ, तुकतुकीत व अंमळ फुगीर अशी दिसते. काहीं कालानें रोग्याचे हात अगर पाय तपासून पाहिले असता तेथील मज्जातंतू-जाड झालेले वैद्याच्या हातास स्पष्ट लागतात. त्या भागातील इतर सर्व स्नायू व विशेषत: पावलाचे व पंजाचे स्नायू अगदीं क्षीण व रोडावत व रुक्ष होत असलेले दिसून येतात व त्यामुळें हिंस्र पक्ष्याच्या पंजाप्रमाणें बोटें दिसतात. अगर मनगटामध्यें जडत्व अगर लुलेपणा येऊन तीच गति पायाच्या घोटयाचीहि पण होते वरील भेदामध्यें हाडें व स्नायू पोखरणारीं क्षतें पडतात तशीच क्षतें हाताच्या व पायाच्या बोटामधील बारीक बारीक साध्यावर पडून ते साधे उकलून नाश पावल्यामुळें अगोदर हातापायाचीं बोटें व नंतर मनगटें व बोटें यातील बारकीं हाडें झडून जाऊन गळतात. नखाच्या जवळील बोटाचे शेवटले भाग मात्र कधीं कधीं मोठ्या चमत्कारानें रहातात असें म्हणतात व उरलेल्या हातापायाना त्याच्या व्रणाची जखम भरून येऊन चिकटून रहातात फार विकोपास गेलेल्या रोग्याच्या रक्तातील नानाप्रकारच्या लाल रक्तपेशींची संख्या फारच कमी होऊन रोगी पाढरा, पिंवळा, अति निस्तेज असा दिसतो.

येणंप्रमाणें कधीं रोग कमी तर कधीं जास्ती अशीं लक्षणें होतात. परंतु रोगी खरोखर बरा होण्याची बिलकुल आशा नसते. त्यामुळें कालावधीनें रोग्याकडे नुसत पाहिलें तरी शिसारी येईल अशी त्याची शोचनीय स्थिति बनते. यानंतर तो फार दिवस जगत नाहीं, कारण त्यानतर त्याची भूक मंद होऊन आहारादि जीवनक्रियेंत व्यत्यय येऊन रोगारंभापासून पाच, दहा, पंधरा अगर अधिक वर्षानंतर क्षय, मूत्रपिंडदाह, आमाश यानीं व क्षतातील पुवामुळें अन्य इंद्रियास पू होऊन अगर तीं इंद्रियें सडून किंवा दुसऱ्या एखाद्या फुप्फुसदाहासारख्या आगंतुक दुखण्याचें निमित्त होऊन अगर महारोगामुळेंच कंठामध्यें क्षतें पडून श्वसनमार्ग त्यायोगें बंद होऊन रोग्यास मृत्यु येतो.

रो ग वि कृ ती चें स्व रू प:—या रोगात पुटकुळ्या येतात त्या त्वचेखालीं उत्पन्न होऊन त्यात निघालेले पापुद्रे खालील शरीराच्या स्नायू वगैरे भागात घुसतात. यामध्येंच महारोगाच्या रक्तातील पाढऱ्या पेशीपेक्षा तिप्पट मोठे पेशी असून त्यातच काहीं रिक्तस्थानें व पुष्कळ जंतु असतात. या जंतूंचे पुंजके असतात. स्पर्शसंज्ञाविहीन भेदामध्यें मज्जातंतू बिघडतात असें वर आलेंच आहे. ते नेहमीपेक्षा दुप्पट किंवा तिप्पट मोठे होऊन त्यातील संदेशवाहक गाभ्याचे तंतू रुक्ष किंवा क्षीण होतात पण बाहेरील वेष्टणत्वचा मात्र फुगून तंतू हातास जाड लागतात असे जाड तंतू त्वचेखालीं, कोपरें किंवा गुडघ्याच्या ठिकाणीं बोटानीं चाचपून तपासता येतात.

रो ग नि दा न —शरीरात रोग पूर्ण प्रगट झाल्यावर तो ओळखणें फार कठिण जात नाहीं. पुटकुळ्यातील थोडीशी लस किंवा व्रणातील पुवाचा थेंब किंवा नाकातील चिकट स्रावाचे थेंब घेऊन तो सूक्ष्मदर्शक यंत्रानें तपासल्यानें या महारोगाचे जतू दृष्टीस पडतात

उ प चा र —वस्तुत: हा रोग बरा होत नाहीं. म्हणून जेथें हा रोग नसेल अशा गावापासून अंमळ एकीकडच्या ठिकाणीं रोग्यास ठेऊन त्याचे मज्जातंतूंस पुष्टि आणण्यासाठीं काडमाशाचे तैलमिश्रित औषधें द्यावीत व क्षतें पडत गेलीं तर त्यास साध्या मलमाची पट्टी बाधीत जावी कवठीचें तेल किंवा चौलमुग्रा तेल २० थेंब ते २ ड्राम या प्रमाणात कढत दुधात पारदर्शक वेष्टनाच्या तयार गोळ्याच्या रूपात देतात पण त्यापासून थोडाबहुत फायदा होण्यासाठीं तें तेल निदान दोन वर्षें तरी घेतलें पाहिजे याच्या रोगजंतूंना मारक असें नॅस्टिन नावाच स्निग्ध औषध या महारोगाच्या जंतूंपासूनच तयार करितात तें औषध दर आठवड्यास टोंचल्यानें पुटकुळ्या लहान होऊन रोगाची प्रगति थाबते असें म्हणतात. विल्यम्स या शोधक डॉक्टरानें ही एक लस तयार केली आहे व तिजपासून चागला गुण येण्याचीं चिन्हें दिसत आहेत.

आ यु र्वे दी य नि दा न —अयोग्य आहार व विहार केल्यानें, परस्पर विरोधी गुणाचे पदार्थ सतत सेवन केल्यानें, साधूंची निंदा व वध, परद्रव्य हरण करणें इत्यादि पाप कर्माच्या योगानें प्रेरित झालेले दोष दूषित होऊन ते शरीरातील तिर्कस जाणाऱ्या शिरात शिरून त्वचा, लस, रक्त व मास यास दूषित व शिथिल करून नंतर बाहेर निघून त्वचेचा रंग पालटवितात व त्वचा बिघडून टाकितात या रोगास कुष्ठ असें म्हणतात.

याची हयगय केली असता हें काहीं काळानें सर्व शरीर तोडून खाऊन टाकितें आणि सर्व धातूंत शिरून त्यास व्यापून व चिघळवून स्वेद, क्लेद व कोथ ( सडणें ) यानीं युक्त असे बारीक पण फार भयंकर कृमी उत्पन्न करितें. ते कृमी अनुक्रमें केस, चामडी, स्नायु, शिरा व कोंवळीं हाडें यांस खाऊन टाकितात

श्वित्रात हा प्रकार नसतो म्हणून त्याचा कुष्ठांत समावेश न करिता तें याहून निराळें काढलें आहे.

कुष्ठ सात प्रकारचें आहे. वात, पित्त, कफ, वातपित्त, कफपित्त, वातकफ व सन्निपात असे ते ७ प्रकार होत. जरी सर्वच कुष्ठें त्रिदोषापासून होतात तरी त्यात जो दोष अधिक असतो त्या दोषावरून त्यास नाव दिलें जातें. वातापासून कापाल, पित्तापासून औदुंबर, कफापासून मंडल व विचर्चा;

वातपित्तापासून ऋक्षजिव्ह, वातकफापासून चर्म, एककुष्ठ किटिभ, सिध्म, अलस, व विपादिका, कफपित्तापासून दद्रु, शतारु, पुंडरीक, विस्फोट, पामा व चर्मदल, आणि सन्निपातापासून काकण नावाचें कुष्ठ होतें त्यापैकीं कापाल, औदुंबर मंडल, दद्रु, काकण, पुंडरीक, व ऋक्षजिव्ह, हीं सात महाकुष्ठें आहेत

अंग अतिशय मऊ लागणें किंवा खरखरीत लागणें, घाम अतिशय येणें किंवा मुळींच न येणें, चामडीचा रंग पालटणें, दाह होणें, खाज सुटणें चामडी बधिर होणें, टोंचल्यासारखी पीडा होणें, अंगावर गांधी उठणें, श्रमावांचून थकवा येणें, व्रण झाले असल्यास ते फार दुखणें, व्रण लवकर उत्पन्न होणें व फार दिवस राहाणें, ते भरून आले तरी रूक्ष असणें आणि यत्किंचितहि कारण ( खाजवणें वगैरे ) घडल्यास पुन्हा उमटणें, रोमांच उभे राहाणें आणि रक्त काळें होणें हीं लक्षणें कुष्ठ होण्यापूर्वी होतात

वातापासून होणारें कापाल कुष्ठ काळ्या किंवा तांबूस खापरासारखें रूक्ष, बधिर, खरखरीत, पातळ, पसरलेल्या व वेड्यावाकड्या कडांचें, दूषित केंसांनीं भरलेलें, लवकर पसरणारें असें असून त्यांत टोंचणी फार असते व खाज कमी असते

ज्याच्या वरची चामडी व केंस पिकलेल्या उंबराप्रमाणें तांबूस असतात, जें पांढऱ्या शिरांनीं भरलेलें असतें, जें जाड असून ज्यांतील लस व रक्त हीं दाट असतात, ज्यांत आग व ठणका हीं फार असतात आणि जें लवकर उत्पन्न होऊन लवकर फुटतें व ज्यांत लौकरच कृमी उत्पन्न होतात तें उदुंबरकुष्ठ जाणावें

स्थिर, दाट, जड स्निग्ध, पांढरें किंवा तांबडें लवकर न पसरणारें, एकमेकांस लागलेलें वर उचललेलें व वाटोळें असून ज्याच्या कडा गुळगुळीत व पिवळवट असतात आणि ज्यांत खाज, स्राव, व कृमी हे फार असतात तें मंडलकुष्ठ समजावें

विचर्चिका कुष्ठ सांवळें, धूसर रंगाचें असून त्यांतून लस फार वहाते आणि खाज व पुळ्या असतात खरखरीत, पातळ व मध्यभागीं पांढरें असून कडांनीं लाल असलेलें, वर उचललेलें, टोंचणी, दाह व वेदना होत असलेलें छिद्रयुक्त खरबरीत, पुळ्यांनीं भरलेलें, पुष्कळ कृमी असलेलें आणि ऋष्य नांवाच्या निळ्या अंगाच्या हरिणाच्या जिभेसारखें जें ( आकारानें ) असतें त्यास ऋक्षजिव्ह म्हणतात हत्तीच्या चामड्यासारखें खरखरीत असतें तें चर्मकुष्ठ होय एकाख्य कुष्ठ फार पसरलेलें, आकारानें माशाच्या अंगावरच्या खवल्यासारखें असतें व त्या जागीं घाम येत नाहीं

किटिभ कुष्ठ रूक्ष घट्ट्याप्रमाणें खरबरीत घट्ट व काळें असून त्यास फोड सुटते सिध्म कुष्ठ—ज्यास शिबें म्हणतात तें—बाहेरून रूक्ष व आंतून स्निग्ध असून चोळलें असतां भूस पडतें तें हातास गुळगुळीत लागतें, पातळ असतें आणि रंगानें भोपळ्याच्या फुलासारखें तांबूस पांढरें असतें तें बहुतकरून गळ्यापासून कंबरेपर्यंत होतें अलसक कुष्ठांत पुष्कळशा लाल गांठी असून त्यास फार खाज सुटते

विपादिका कुष्ठांत हातापायांवर चिरा पडतात, तीव्र पीडा होते, थोडी खाज सुटते आणि पुष्कळशा लाल पुळ्या उठतात. ज्याचे तांबे दूर्वेसारखे लांब पसरलेले असतात ज्याचा रंग आळशीच्या फुलासारखा निळा असतो, ज्याचीं मंडलें वर उभारलेलीं व एकमेकांस लागून पसरलेलीं असून ज्यास खाज सुटते त्यास दद्रुकुष्ठ म्हणतात ज्याचीं मुळें मोठीं असतात, ज्यांत दाह व वेदना होतात, जें तांबूस काळसर असतें, ज्यांत व्रण असतात, ज्यांत लस व कृमी फार असतात आणि जें बहुतकरून ढांगेच्या सांध्यावर होतें तें शतारु होय

ज्याच्या कडा लाल असून मध्यभाग पांढुरका असतो, ज्यांत खाज, दाह व ठणका असतो, जें उभारलेलें असतें, ज्यावर कमळाच्या पानाप्रमाणें पुष्कळशा लाल शिरा असतात, ज्यांतून दाट व पुष्कळ अशी लस व रक्त वहातें आणि जें लौकर फुटतें तें पुंडरीककुष्ठ होय पातळ त्वचेचे पांढरे तांबूस रंगाचे फोड ज्यांत पुष्कळसे असतात तें विस्फोट कुष्ठ होय

बारीक व धूसर पिंगट रंगाच्या पुळ्या बहुतकरून कुले, हात व कोपरें यांवर पुष्कळशा येतात, त्यास पामा म्हणतात यांत खाज, लस व ठणका हीं फार असतात चर्मदल कुष्ठांत फोड असतात त्यास हात लाववत नाहीं, खाज सुटते, चुरचुर, टोंचणी व दाह हीं होतात तें लाल असतें व फुटतें काकणकुष्ठ प्रथम गुंजेप्रमाणें तांबडें व काळें असून त्यांत कुष्ठाचीं सर्व लक्षणें उत्पन्न झालीं म्हणजे मग अनेक प्रकारचे रंग उत्पन्न होतात यांत दाह व वेदना हीं फार तीव्र असतात कुष्ठांत कोणता दोष अधिक आहे हें दोषांच्या लक्षणांवरून व कर्मावरून ठरवावें सान्निपातिक, विकृतिविज्ञानीय अध्यायांत सांगितलेलें आणि हाडें मज्जा व वीर्य यांच्या आश्रयानें राहिलेलें कुष्ठ असाध्य समजून सोडून द्यावें मेदोगत कुष्ठ याप्य असतें, वातपित्तज, कफपित्तज, रक्ताश्रित व मांसाश्रित हीं कुष्ठें कृच्छ्रसाध्य असतात कफ वातजन्य त्वचेंत असलेलें व एकदोषात्मक कुष्ठ सुखसाध्य असतें

कुष्ठ त्वचेंत असतां टोंचणी, विवर्णता व रूक्षता उत्पन्न होते रक्तांत गेलें असतां घाम, बधिरता, व सूज उत्पन्न होते मांसांत असतां हातापायांवर फोड उत्पन्न होतात

मांसावर असतां त्यांतून लस फार वहाते मेदांत गेलें असतां हातांचीं बोटें सडतात त्या त्या अवयवाची गती बंद होते व ते फाटतात हाडांत व मज्जेंत गेलें असतां नाक सडतें डोळे लाल होतात, स्वर क्षीण होतो व दांतांत किडे पडतात वीर्यांत गेलें असतां बायको व मुलें यांस त्याचा उपद्रव होतो रक्तादिकांत कुष्ठ गेलें असतां त्याच्या पूर्वींच्या धातूंत कुष्ठ गेलें असतां जीं लक्षणें होतात तींहि होतात

म्हणजे मांसाश्रित कुष्ठांत त्वचेंतील, रक्तांतील व मांसांतील कुष्ठाचीं लक्षणें होतात. मेदांत गेलें असता मेदाची व वरील तीनहि धातूंत कुष्ठ गेलें असता होणारीं लक्षणें होतात.

श्वित्र म्हणजे पांढरें कोड हें कुष्ठाच्याच कारणांनीं उत्पन्न होतें. श्वित्रासच किलास व दारुण अशीं नांवें आहेत. वातिक श्वित्र, पैत्तिक श्वित्र, व कफजन्य श्वित्र असें तीन प्रकारचें श्वित्र असतें. वातिक श्वित्र रूक्ष व पिंगट रंगाचें असतें.

पित्तज श्वित्र तांबूस व कमलाच्या पानासारखें असून त्यांत दाह होतो व त्यावरचे केंस गळून पडतात. कफजन्य श्वित्र पांढरें दाट, जड, वर खाजणारें असतें.

हीं श्वित्रें क्रमशः रक्त, मांस व मेद यांत रहातात. दोष व वायु या दोहोंच्या योगानेंच यांचे असे रंग होतात.

हीं श्वित्रें क्रमशः उत्तरोत्तर कष्टसाध्य होत. ज्याच्या वरचे केंस पांढरे झाले नाहींत, जें फार दाट नाहीं, जें एकमेकांत मिळालेलें नाहीं, जें नवें एक वर्षाच्या आंतलें आहे व जें विस्तवानें भाजल्यानें झालेलें नाहीं असें श्वित्र साध्य असतें. याहून निराळ्याप्रकारचें तें असाध्य समजावें.

सर्व प्रकारच्या कुष्ठांत रोग्यानें प्रथम स्नेहपान करावें. त्याकरितां चरकोक्त तिक्तघृत उपयोगांत आणावें. स्निग्ध झालेल्या अशा रोग्यास निशोत्तर, बाहवा वगैरे रेचक औषधें द्यावीं. कपाळ, हात व पाय यांच्या शिरा तोडून रक्त काढावें. थोडें कुष्ठ असल्यास फांसण्या टाकून रक्त काढावें आणि योग्य वाटेल त्याप्रमाणें तुंबड्या, जळवा वगैरे लावाव्या.

कुष्ठ झालेल्या रोग्याचें रक्त काढल्यानें व त्यास रेच झाल्यानें त्याचा कोठा रिकामा होऊन वायूपासून त्याच्या शरीरास विघात होण्याचा संभव असतो तो दूर व्हावा म्हणून त्यास मधून मधून कुष्ठनाशक स्नेह पाजून शक्ति लवकर आणावी.

कुष्ठी रोग्यानें ब्रह्मचर्य पाळून मध व रक्तचाबोळ यांच्याबरोबर गंधक खावा. किंवा खैर व असाण्याच्या झाडाच्या काढ्यांतून समभाग तूप घालून गंधक खावा. हा कुष्ठनाशक आहे.

याप्रमाणें उपाय करून अंतस्थ दोषाचें शमन झालें म्हणजे मग बाह्य दोषांचें शमन करण्याकरितां लेप वगैरे लावणें हितावह होतें. कारण देह अशुद्ध असता तीक्ष्ण लेप लावल्यानें दोष चवताळून अधिक कुष्ठ वाढतें.

ज्या कुष्ठांतील चकदळीं स्थिर व टणक असतील त्यास पुरचुंडीनें शेकून तें वर उचललें म्हणजे शस्त्रानें खरवडून वर लेप लावावे. ज्या स्पर्शज्ञान नसलेल्या भागावर शस्त्र चालत नाहीं तेथील रक्त व दोष यांचा स्राव करून वर क्षार लावावा. अतिशय कठिण, खरखरीत, बधिर, स्थिर व जुनें अशा कुष्ठावर प्रथम विषघ्न औषधें पिऊन विषांचा समनक लेप लावावा आणि नंतर विषघ्न औषधाचा लेप करावा. स्तब्ध, अत्यंत बधिर, ज्यास घाम येत नाहीं व कंड फार सुटते अशा कुष्ठाचीं चकदळें गोवरी, समुद्रफेण किंवा शस्त्र यानीं घांसून नंतर त्यावर लेप लावावे.

नागरमोथे, त्रिफळा, गेळफळ, करंज, बाहवा, इंद्रजव, सातवीण, कोष्ठ, गव्हला, दारुहळद व पांढरे शिरस यांच्या पाण्यानें स्नान करावें. यांचा काढा ओकारी व रेच होण्याकरितां घ्यावा. व या औषधाचा लेप करावा. यांच्या अंतर्बाह्य उपयोगानें कुष्ठ बरें होतें. ज्या कुष्ठांत आग होत असेल त्यावर तिक्तघृतें व शतधौतघृतें लावावीं. रस फार वहात असल्यास चंदन व ज्येष्ठमध यांनी तयार केलेलें तेल लावावें.

अंगाची आग, विस्फोटक व चर्मदल यांवर थंड लेप, थंड व द्रव औषधांनीं धुणें व घड्या ठेवणें, शिरा तोडणें, रेचकें व कडू औषधांनीं तयार केलेलें तूप यांचा उपयोग करावा. वातकुष्ठावर तूप, कफकुष्ठावर वमन आणि पित्तकुष्ठावर रक्त काढणें व रेचक हे सर्वोत्कृष्ट उपाय आहेत.

कोठा शुद्ध करून व रक्तदोष काढून टाकून नंतर जे लेप कुष्ठावर केले जातात त्यांचा फार लौकर गुण येतो.

ज्याचे दोष फार वाढले असतील त्यास त्याची शक्ति राखून वरचेवर बेताबातानें विरेचन देत असावें. अर्थात् त्याचे दोष थोडथोडे काढून टाकावे. एकदम जबरदस्त शोधन दिल्यास अतिशय दोष निघून जाऊन त्या अशक्त झालेल्या माणसास तावडतोब वायु होऊन तो मरेल. पंधरा दिवसांनीं वमन, महिन्यामहिन्यानें रेचक, तीन दिवसांनी नस्य आणि सहा सहा महिन्यांनीं रक्त काढणें या प्रमाणें हे उपाय करावे.

ज्या कुष्ठी मनुष्यास वमनविरेचन नीटपणीं लागू पडलें नसेल तो जबरदस्त दोषांनीं व्यापला जाऊन निःसंशय असाध्य होय. म्हणून दोष काढणें ते पुरतेपणीं काढावे.

व्रतें, इंद्रियदमन, मनोनिग्रह, दान, सुशीलपणा, ब्राह्मण, देव, गुरु यांची पूजा, सूर्याची उपासना हे उपाय केल्यानें दोष व पाप यापासून उत्पन्न झालेलें कुष्ठ समूळ नाहींसें होतें.

साळी, सातू, गहूं, हरीक, राळे, मूग, मसुरा, तुरी, कडूभाज्या, जांगलमांस, त्रिफळा, कडू पडवळ, खैर, कडूलिंब व बिब्बे यांनीं युक्त असें अन्नपान, औषधमिश्रित मद्यें व बावच्यानें चूर्ण घातलेला मद्य अशा प्रकारचें खाणें पिणें कुष्ठावर हितकर आहे. आंबट, खारट व तिखट अन्नपान कुष्ठावर हितकर नाहीं आणि, दहीं, दूध, गूळ, पाण्यांतील प्राण्यांचें मांस, तीळ व उडीद हे पदार्थ सर्वथा वर्ज करावे.

याप्रमाणें जीं मोठीं सात कुष्ठें त्यांची चिकित्सा करावी. कोरडी व ओली खरूज, शिब, गजकर्ण, नायटे, वगैरे जीं अल्पकुष्ठें तीं याच सदरांत घातलीं आहेत. त्यांवर सामान्य

रेचकें देऊन गंधक, मोरचूत, शेंदूर, गुग्गुळ, वगैरे औषधांचा लेप करावा अगर यांनीं तयार केलेलीं तेलें लावावीं. करंजेल अथवा शिरशेल हीं तेलें लावावीं. विशेषेकरून पू शुद्ध होऊन त्वचा मऊ राहील असे उपाय करावे. हा रोग स्पर्शसंचारी आहे म्हणून कुष्ट झालेल्या रोग्यानें दुसऱ्यास स्पर्श करूं नये.

कोड हें कुष्ठापेक्षांहि निंद्य असून त्यापेक्षा असाध्यहि लौकर होतें. म्हणून तें बरें करण्याविषयीं तावडतोब यत्न करावा. त्यावर विशेषेकरून प्रथमच रेचक द्यावें. यावर उत्तम रेचक म्हणजे बावचाच्या काढ्यातून त्रिफळा निंबतुंगाचा चोक हें आहे. हें रेचक घेऊन अंगास तेल लावून बसवेल तितका वेळ उन्हात बसावें आणि रेच झाल्यावर तीन दिवसपर्यंत तहान लागली असतां कण्हेरी प्यावी. उन्हात बसल्यानें कोडाच्या जागेवर जे फोड येतील ते काट्यानें फोडून त्यांतील पाणी काढून टाकावें आणि नंतर तीन दिवसपर्यंत सकाळीं पळसाचा क्षार काकवींतून प्यावा.

याशिवाय कुष्ठावरचेहि उपाय करावे. हत्तीचें कातडें जाळून त्याची राख तेलात खलून लावावी. मेंगुळ किडा वाहत्याच्या क्षाराच्या पाण्यात खलून लावावा. मोराच्या पित्ताचा लेप करावा, रेचकें, रक्त काढणें, रुक्षण, सातू खाणें या उपायांत एखाद्याचें मनुष्याचें कोड बरें होतें. [वाग्भट; चरक; योगरत्नाकर]

**कुप्तगी**—हैदराबाद संस्थानात, रायचूर जिल्ह्यांत एक तालुका. क्षेत्रफळ ७१४ चौ. मै. लो. सं. १९११ सालीं ९२५६७. खेड्याची संख्या २१८. १९०१ सालीं सारांचें उत्पन्न १०९ लक्ष. मुख्य गाव कुप्तगी. तालुक्याची जमीन काळी व सुपीक आहे.

**कुष्टिया पोटविभाग**—बंगालइलाख्यांत नडिया जिल्ह्यांतील एक पोटविभाग. हा फार सुपीक प्रदेश असून याच्या उत्तरेकडून पद्मा नदी वहाते व दक्षिणेस माताभांग वाहते. स. १९११ सालीं याची लो. सं. ५५६६८५ होती. नडिया जिल्ह्यात कुष्टिया पोटविभागाची वस्ती अतिशय दाट आहे. यात दोन मोठीं गावें आहेत. मुख्य ठिकाणें कुष्टिया व कुमारखली.

गाव—बंगाल इलाखा. हें नडिया जिल्ह्यांतील कुष्टिया तालुक्याचें मुख्य ठिकाण होय. हें पद्मा नदीच्या उजव्या तीरावर वसलेलें आहे. याची १९११ सालीं लो. सं. ६०९५ होती. पूर्व बंगाल रेल्वेवर हें स्टेशन असून येथें व्यापार फार मोठा चालतो. १८६९ सालीं येथें म्यु. क. स्थापन झाली. तिचें १९०३-४ सालीं १०००० रुपये उत्पन्न व ८००० रुपये खर्च झाला. येथें मामुली सरकारी कचेऱ्या असून शिवाय एक लहान तुरुंग आहे.

**कुसवन.**—मद्रास इलाख्यांतील एक कुंभार जात. याची कुंभार या लेखात सामान्य माहिती दिलीच आहे. या जातीची केवळ विशिष्ट माहिती पुढें ग्रथित केली आहे. हे जानवें घालतात. त्यांचे धार्मिक समारंभ वेळाळ जातीप्रमाणेंच असतात. शैव व वैष्णव या दोन्ही संप्रदायांचे ते अनुयायी असून त्यांच्यात मांसाशनास मुभा आहे. परंतु विधवाविवाह मात्र वर्ज्य मानला जातो. काहीं कुसवन पिडारी देवालयांत पुजाऱ्याचें काम करितात. उदयन व वेलान अशीं त्यांचीं नावें आहेत. खानेसुमारींत कुलालन व कुसवन हीं नावें समानार्थी म्हणून देण्यात येतात. चोल, चेर आणि पांड्य असे कुसवनाचे प्रादेशिक वर्ग असून, ब्रह्मदेवाचा मुलगा कुलालन याच्या तीन पुत्रांपासून हे वर्ग निघाले अशी समजूत आहे ब्राह्मण व शूद्री यांपासून कुंभाराप्रमाणेंच त्यांची उत्पत्ति आहे अशा सन्देही एक दंतकथा सांगतात.

पुजारी नावानें ओळखले जाणारे कित्येक कुसवन जातीचीं मेंढक चित्रें करण्यात व त्यास रंग देण्यात मोठे कसबी असतात. संततीची इच्छा असणारे, पटकी, देवी वगैरे साथींतून बरे झालेले आजारी पडूं नये म्हणून आगाऊच खबरदारी घेणारे व ग्रामाचें रक्षण व्हावें अशी इच्छा करणारे लोक हीं चित्रें घेऊन निरनिराळ्या देवतांना अर्पण करितात. (ऐयनर पहा) या लोकांत काडीमोड, पुनर्विवाह, बालविवाह वगैरे प्रचलित असून वराच्या बहिणीनें तालीबंधन करण्याची चाल आहे. हाडें मोडलीं किंवा निखळलीं असल्यास त्यावर उपचार करण्यात हे मोठे पटाइत असतात अशी प्रसिद्धि आहे. मदुरा येथें कुसवन लोकांना वेलाण असें म्हणतात. ['कुंभार' पहा. शिवाय थर्स्टन, मद्रास सेन्सस रि १८९१ मदुरा जिल्हा गॅ.]

**कुसाजी भोसले**—हे शाहुमहाराजाचे लेकवळे होते. हे शूर असल्यानें यांना मोहिमांवर नेहमीं धाडण्यांत येई सातारा प्रांतानजीकचा शिराळ्याचा सुभा याजकडे असे. पुढ कर्नाटक प्रांतावर बाबूजी नाईकाची नेमणूक झाली असता, त्याजकडे अर्धा कर्नाटक दिला, व अर्धा या कुसाजीकडे दिला. "सारे महाल कर्नाटकाचे, त्यात निमे बाबूजी नाईक व शेसाजी (हा हि शाहुछत्रपतीचा लेकवळा) व कुसाजी भोसले निमेत, शिबंदी, खर्च, रसद, मोकासा, बाबती, स्वराज्य (हे) अंमल निमे सरकार व सात लक्ष रुपये (निव्वळ) रसद भोसले यांनी द्यावी." शिराळे येथें हल्लीं जे भोसल्यांचें घराणें आहे त्याचे हे संस्थापक होत. या घराण्यानें स्वराज्यांत बरेंच काम केलें आहे. कोल्हापूरकर व सातारकर छत्रपतींच्या राज्याच्या सरहद्दीवर (सातारा राज्यांतील) हें शिराळें गाव असल्यानें तेथें नेहमीं करवीरकराचा उपसर्ग होई. त्यासाठीं तेथें एक लष्करी ठाणें जय्यत ठेवावें लागे व त्याचबरोबर वंशपरंपरेचा एक शूर ठाणेदारहि ठेवावा लागे. तें काम या घराण्याकडे असे [शाहु-महाराज बखर, म. रि. म. वि.].

**कुसुगल**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. हुबळीच्या ईशान्येस सुमारें ६ मैलावरील एक गाव. येथील किल्ला इ. स. १७५० सालीं सुस्थितींत होता व त्याची बांधणी जरा शास्त्रीय पद्धतीवर केली होती. इ. स. १७९१-९२ सालीं धारवाड सर केल्यावर मराठ्यांनीं हाहि किल्ला लवकरच सर केला. इ. स. १८१७ च्या पुणें येथें झालेल्या तहा-न्वयें जो भाग पेशव्यांनीं इंग्लिशांस तोडून दिला त्यांत हा भाग होता. इ. स १८७०-७५ सालीं येथें 'न्यू ऑर्लिन्स' नावाच्या जातीचा कापूस पेरण्याचे मोठ्या प्रमाणावर प्रयोग केले; परंतु ते यशस्वी न झाल्यामुळें इ. स १८७६ तें प्रयोग पुढे चालू ठेवण्याचे बंद केले

**कुसुंबा** ( करडी )—या झुडपास लॅटिनमध्यें कार्थे मस् आक्सिआकथा इंग्रजींत सॅफफ्लावर, संस्कृतांत अग्निशिखा इतर भाषेंत कुसुंब, करडई, कुसुंबा, कुझुराय, धरेझा व करर, पोलियान, पोलि, कांडियारा, मियान् कलाय वगैरे नावें आहेत.

स्पेन. जर्मनीचा दक्षिण भाग, इटली,हंगेरी, इराण. ईजिप्त, दक्षिण अमेरिका, दक्षिणरशिया, व हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांत हीं झुडपें होतात पेशावरमध्यें विशेषतः हीं वरींच आढळतात.

उ प यो ग —या झुडपाच्या फुलापासून रंगाचें द्रव्य व बियापासून तेल निघतें आफ्रिडी मेणकापड करण्याकरितां लागणाऱ्या वस्तूंपैकीं हें मुख्य द्रव्य आहे फुटलेली काच सांधण्यांत त्याचा लुकणासारखा उपयोग करितात.

लागवड केलेल्या करडईला बॅस्टर्ड सॅफ्रॉन, नकली केशर, कार्थेमाइन् रंग, कुसुंबा इत्यादि अनेक नावें रूढ आहेत

इ ति हा स.—कुसुंब्याच्या बिया रेचक म्हणून लोक खातात. संस्कृत ग्रंथावरून कुसुंब्याचा हा उपयोग हिंदु लोकांना माहीत होता असें सिद्ध झालें आहे. कुसुंब्याचें तेलहि औषधी असून त्याचा उपयोग इजिप्तमध्यें एरं-डेलाच्या ऐवजीं करीत असत असें प्लिनीच्या ग्रंथावरून दिसतें. इजिप्त देशांतल्या मम्मींच्या शरीराचे अंगावरील कपडे कुसुंबाच्या रंगानें रंगविलेले असतात असें आढळून आलें आहे चीनमधील लोकांना इ स. पूर्वी दोन शतकां-पर्यंत कुसुंबा माहीत नव्हता व चीनमधून नंतर हें झाड जपानमध्यें गेलें असा समज आहे.

करडईचें झाड कंबरेइतकें उंच वाढतें. याचीं पानें लांबट असतात. त्यास बारीक कातरा असतो. करडईस पिवळ्या रंगाचें फूल येतें. त्यांत केशराप्रमाणें तंतु असतात. या फुलाच्यामागें सुपारीएवढें बोंड येतें. त्यास टोंक असतें. व बोंडांत करडईचे दाणे असतात. करडई देशावर फार पिकते. करडईत दोन जाती आहेत. एक कांटयाची व दुसरी बिनकांटयाची. बिन कांटयाच्या करडईचीं फुलें वाळवून त्यांना कुसुंबा रंग करितात. करडी अहमदनगर, पुणें, सातारा, सोलापूर, विजापूर, धारवाड, बेळगाव येथें जास्त होते. वऱ्हाडांत बुलढाणा, यवतमाळ व अकोला येथें हिचा पेरा होत असून निझामच्या राज्यांत मराठवाड्यांत हिचें पीक पुष्कळ होतें. चीन देशांत हिचा लागवड जास्त असते व तेथील रंग नावाजलेला आहे.

करडी रब्बी पिकाशीं मिसळून पेरितात. परंतु गुजरा-राथेंत मात्र याचीं स्वतंत्र शेतें आढळतात. करडईचे शाळू, जोंधळा, गहूं व हरबरा यांत पाटे घालितात किंवा मिसळून पेरितात. याच्या स्वतंत्र पेऱ्यास दर एकरीं वीस पौंड बी लागतें व मिसळीच्या पिकांत तें दोनतीन पौंड पुरतें. पीक फेब्रुवारी व मार्च महिन्यांत कापून त्याचे ढीग ( कडपे ) घालितात व वाळल्यानंतर खळ्यांत नेऊन कडपे काठ्यांनीं झोडितात, व बी तयार करितात.

स्वतंत्र पिकाचें सरकारी दर एकरीं उत्पन्न ५०० ते ८०० पौंड व मिसळीच्या पिकाचें द. ए. उत्पन्न १०० ते १२५ पौंड असतें करडईचें तेल काढितात. तें स्वयंपाकांत व इतर कामीं उपयोगास येतें. करडईचें तेल लवकर खवट होत नाहीं, म्हणून तें फार दिवस टिकतें गुरांस पेंड खाण्यास व खतासाठीं उपयोगी पडतें करडीच्या कोंवळ्या पाल्याची भाजी करितात. गुजराथेंत करडईच्या पाकळ्याचा रंग करि-तात. फुलें जानुवारी, फेब्रुवारी महिन्यांत काढितात. पाकळ्या एक दोन दिवस ठेऊन त्या तिळाच्या तेलाबरोबर चोळितात. एक पौंड पाकळ्यांना एक तोळा तेल लागतें. चोळलेल्या पाकळ्या तीन दिवस सावलींत वाळवितात. वाळल्यावर त्या मळून अगर ठोकून त्यांचें पीठ करितात व चोळतात म्हणजे रंग तयार झाला. रंगाच्या वड्या दर रुपयास दोन तीन पौंड मिळतात.

ते लः—तेल काढण्यासाठीं कुसुंब्याची लागवड मुंबई इलाख्यांत करतात. परंतु फुलासाठीं लागवड केलेल्या कुसुं-ब्याच्या बियाचाहि पूरक उत्पन्न म्हणून उपयोग करि-तात. मुंबई इलाख्यांत याची लागवड अजमासें ५००००० पासून ६००००० एकर जमिनीवर करितात व गळिताच्या धान्यांत करडई हें मुख्य पीक समजतात. अहमदनगर, पुणें, सातारा, विजापूर, धारवाड व बेळगाव हीं करडईच्या उत्पन्नाकरितां प्रसिद्ध आहेत. मध्यप्रांतांत तेलाकरितां कुसुं-ब्याच्या लागवडीचें प्रमाण कमी होत आहे.

ते ल का ढ ण्या च्या कृ ति.–बियापासून तेल काढण्याच्या दोन तऱ्हा आहेत.–

पहिली:—फळाचें टरफल काढून उष्णता न लावतां तेल काढणें. किंवा यंत्राच्या साह्यानें तेल काढणें. यंत्रानें तेल जास्त निघतें खरें परंतु त्यामुळें तीं पेंड निकस झाल्यामुळें जनावरें आवडीनें खात नाहींत व ती जास्त द्यावी लागते.

दुसरी:—एका मडक्यांत बिया घालून तें मडकें दुसऱ्या एका जमिनींत पुरलेल्या मडक्याच्या तोंडावर पालथें ठेवतात

त्या दोन मडक्यामध्यें भोकें पाडलेला पत्रा ठेवितात. नंतर उपल्या मडक्याच्या बुडावर व सभोंवती जाळ करितात. कांहीं वेळानें बियातून तेल निघूं लागतें, व तें जमिनींत पुरलेल्या मडक्यात जमा होतें. पहिल्या तऱ्हेनें काढलेलें तेल लोक खाण्याकरिता वापरितात. तीळ व कुसुंब्याचें बीं मिळून काढिलेलें तेल मुंबई इलाख्यात गोडें तेल म्हणून विकतात. याच प्रकारचें पण हलक्या प्रतीचें तेल लोक जाळतात. दुसऱ्या रीतीनें काढलेलें तेल खाण्याच्या किंवा जाळण्याच्या उपयोगी पडत नाहीं. परंतु दोराना चरबीसारखें लावण्याकरिता व कानव्याचे पोदरे मढविण्याकरिता त्याचा चागला उपयोग होतो. हें तेल म्हणजे एक तऱ्हेचें रोगणच होय.

जंगली कुसुंब्याचें तेल.—उत्तर हिंदुस्थानात व सुरहदीकडून पेशावर येथ रोगण निराळ्याच तऱ्हेनें तयार करितात. कुसुंब्याचें बीं दाबून काढलेलें तेल मातीच्या भांड्यातून सारखें १२ तास कढवितात. तेल कढताना त्यातून जाणारी वाफ फार असह्य असते. म्हणून हें तेल कढविण्याचें काम मनुष्यवस्तीपासून दूर करितात. तेल चागलें कढल्यावर तें कढत असतानाच थंड पाण्याच्या पसरट भांड्यातून ओततात. तें नंतर निवाल्यावर जो एक पदार्थ बनतो त्याला रोगण म्हणतात. मग तें जस्ताच्या डब्यात भरून बाजारात विकतात.

मेणकापडः—'अग्रिकल्चरल लेजर' (१९०१. नं. १२ ३९३–४१४ ) व ' दि इंडियन आर्ट ॲट दिल्ली ' ( १९०३ २२१–३४ ) या पुस्तकावरून येथें खनिज रंग गोठलेल्या तेलात मिसळून तऱ्हेतऱ्हेचा रंग बनवीत असें दिसतें. अशा रीतीनें तयार केलेला रंग कापडाला देऊन त्याचें मेणकापड करितात. बंगाल एरंडीच्या तेलाचें व कच्छमध्यें जवसाच्या तेलाचें रोगण करितात. कलकत्ता येथील तागाच्या गिरण्यातून या पद्धतीनें मेणकापड तयार होतें.

बिया व पेंडः—कुसुंब्याच्या बिया भाजून खातात. पाळीव पक्ष्यास कुसुंब्याच्या बिया खावयास घालितात व त्याची पेंड गुराना चारतात. या पेंडीला घुरशी येत नाहीं व त्यापासून उत्तम खत तयार होतें.

कुसुंब्याचा रंगः—या झाडाच्या फुलापासून दोन जातीचे पिवळे रंग व एक तांबडा रंग असे तीन रंग मिळतात. या तांबड्या रंगात कारथेमिक ॲसिड असतें. कुसुंब्याच्या फुलात पाणी व तेल घातलें म्हणजे पहिला पिवळा रंग निघतो. या पिवळ्या रंगास वायव्येकडील लोक "पुजन" म्हणतात. हा रंग पाण्यात विद्राव्य आहे. हा रंग शेकडा २६ ते ३६ प्रमाणानें फुलात सापडतो. व तांबडा रंग शेकडा ३ ते ६ या प्रमाणात सापडतो. दुसरा पिवळा रंग अल्कलाईन द्रावणांत मात्र विद्रवण पावतो. पाण्यात विद्राव्य होणारा पहिला पिवळा रंग काढून कुसुंब्यात ॲसिटिक ॲसिड मिसळलेलें पाणी घालून परीक्षा करण्यासाठीं प्रथम शिशाचा क्षार व नंतर अमोनिया त्यात घातला म्हणजे दुसरा पिवळा रंग शिशाच्या क्षारासह तळीं बसतो. अलकलाईनच्या संयोगानें शुद्ध तांबडा रंग काढता येतो. अलकलीच्या ऐवजीं आपल्याकडील रंगारी सज्जी मट्टी घालतात.

कुंहरसेन—पंजाबात सिमल्याच्या डोंगरी संस्थानांपैकीं एक संस्थान. याचें क्षेत्रफळ ९० चौ. मै. व लो. सं. १९२१ सालीं १२२२७ होती. संस्थानची राजधानी कुंहरसेन खेडें. हें सिमल्यापासून ४० मैलावर हिंदुस्थान-तिबेट रस्त्यावर आहे. हल्लींच्या संस्थानिकाचें नाव राणा गिधारसिंग आहे. संस्थानचें वार्षिक उत्पन्न ४० हजार रु आहे. पैकीं २००० रुपये खंडणी द्यावी लागते. नार्कंद ( नागकंद ) नावाचें ठिकाण ९०१६ फूट उचीवर असून सिमल्याचे रहिवासी हवा खाण्यास तेथें येतात.

कुळकर्णी—महाराष्ट्राच्या प्राचीन ग्रामसंस्थेंतील कुळकर्णी हा एक अधिकारी असून प्राचीन काळापासून सामान्यतः करून तो ब्राह्मणवर्गापैकीं असतो एकदर जमिनीचा एकपचवीसाशावा हिस्सा पाटील, कुळकर्णी व चौधुले याना साऱ्यावाचून इनाम देण्याची तत्कालीन वहिवाट असून याशिवाय त्याना आपल्या गावात दुसरे कित्येक हक्क असत.

गावच्या वसुलाचा हिशेब ठेवणें हें कुळकर्ण्याचें मुख्य काम होतें. कुळाचा जो करणीक तो कुळकरणीक ( कुळकर्णी ). कुळकर्ण्याच्या हिशेबात त्याच्या गावाच्या सरहद्दींतील एकंदर जमिनीच्या क्षेत्रफळाची नोंद केलेली असे. यातून लोकवस्तीनें व्यापलेली जागा, रस्ते, कुरणें, पडित व इनाम जमीनी या काढून टाकून बाकी राहिलेल्या लागवडीखालीं असलेल्या जमीनीवर, उत्पन्नाच्या मानानें सरकारसारा आकारण्यात येई.

शिवकालीन कुळकर्ण्यांना काय हक्क बाबी असत त्या खालीं दिल्या आहेतः —

धनगराकडून वार्षिक दोन चवाळीं, चाभाराकडून एक जोडा, मोमिनाकडून एक मुंडासें, कोष्ट्याकडून एक पासोडी, साळ्याकडून एक धोतरजोडा, दवणाकडून रुमाल, तेल्याकडून दर आठवड्यास दर घाण्यास तेल नऊ टाक, खाटीकाकडून एक रुका (पै), तांबोळ्याकडून पंचवीस पानें, हलवायाकडून दोन पैसे, बकालकडून एक सुपारी, माळ्याकडून मालाप्रमाणें गूळ दर बैलास सव्वाशेर, दर पाटीस पावशेर; केळीं दर बैलास पाच.

याशिवाय पुढील हक्क असत ते —कतबा अगर तकारीचे अर्ज लिहिल्यानंतर वादी व प्रतिवादी यांच्याकडून दोनदोन आणे. ( २ ) गावात लग्न किंवा पाट झाल्यास धान्य व शिधा १० रु. पर्यंत. ( ३ ) कागदाबद्दल सालिना १२ रु. याप्रमाणें या हक्काच्या रकमेची रोख किंमत ४२५ रु येते. शिवाय मुशाहिरा असे ताः—गावातील प्रत्येक शेतकऱ्यापासून धान्याच्या दरखंडीस दीड रु. प्रमाणें रक्कम. मोहतर्फा ( कारागीर ) लोकाकडून.

एकंदरीत मुशाहिरा व हक्कलाजिमा मिळून सालिना सहाशें रुपयापर्यंतची प्राप्ति कुळकर्ण्यांस होई ( मा. इ. मं. तृ. सं. वृ.). हल्लीं सरकारनें वतनदार कुळकर्णी काढून टाकून त्याच्या जागीं पगारी तलाटी नेमले आहेत व वतनाबद्दल त्यास रोख वर्षासनें ठरवून दिलीं आहेत. कोल्हापूर संस्थानात कुळकर्णीवतनें राखला गेल्यामुळें कुळकर्णी वर्गांत बरीच जागृति उत्पन्न झाली आहे त्याच्या दरसाल परिषदा भरतात.

*कुळिथ*.—यास संस्कृतमध्यें कुलित्थ, ताम्रबीज, तालवृत, लॅटिनमध्यें डोलिकॉस बायफ्लोरस, मराठींत कुळीथ हुलगे, हिंदींत कुल्ति, इंग्रजींत हॉर्सग्रॅम, गुजराथी, कुलथी कानडींत, हुरळे. हिंदी–कुरथी इत्यादि नांवें आहेत.

या धान्यास देशावर हुलगे असें म्हणतात तृण धान्यात जसा हरीक केवळ गरिबाचें धान्य समजलें जातें तसें द्विदल धान्यात हुलगा हें धान्य आहे हें सर्वत्र होतें याचें झाड लहान असून शेवटीं वेलासारखें वाढतें. याची उंची सुमारें एक हात उंच असते. याची शेंग किंचित् वाकलेली व चपटी असते व तीवर बारीक कुसळें असतात. कुळीथाचा रंग तांबूस काळा व पांढरा असतो. कुळीथ घोड्यास व दुभत्या गुरास खावयास घालतात.

कुळीथ हें धान्य हलक्या जमीनीवर येत. या धान्यास फार पाऊस लागत नाहीं. हें बाजरी व कारळ्यावरोबर मिसळून पेरतात. घाटमाथ्यावर व देशावर नगर जिल्ह्यात व कोंकणात व मध्यप्रांताच्या डोंगरी भागात हें पीक स्वतंत्र करतात. कोंकणात हें वालाप्रमाणें भातखाचरात रब्बींत पेरतात. कोंकणात हातानें बी फेंकून पेरतात. स्वतंत्र पिकास दर एकरीं १२ते१८ पौंड बी लागतें व मिसळीच्या पिकास १॥ ते २ पौंड पुरतें. खरीफ पीक आक्टोबर, नोव्हेंबरात तयार होतें व रब्बी मार्च महिन्यात होतें. उत्पन्न सरासरी दर एकरी ५००–७०० पौंड स्वतंत्र, व ७५–१०० मिसळीचें.

या धान्याचा माणसाना व गुराना फार उपयोग होतो. कुळीथ शिजवून घोड्याना व बैलाना खावयास घातल्यानें ते पुष्ट होतात कुळीथाचें पीक तागाप्रमाणें करून जमीनीत नांगरून टाकल्यास जमीन सुधारते. याचें पिठलेंहि चांगलें असतें.

**कूका.**—शीख लोकांचा एक धार्मिक पंथ. लुधियानाच्या आग्नेयास सुमारें ७ मैलावर असलेल्या भैनी नावाच्या खेडेगावात रामसिंग या नावाचा सुतार रहात असे. त्यानें कांहीं दिवस शीख सैन्यात नोकरी केली. तें सैन्य मोडल्यावर तो घरीं आला व पुन्हा सुतारकाम करूं लागला. पुढें त्यानें रावळपिंडीपासून मरीपर्यंतच्या सडकेचें कंत्राट घेतलें. नंतर तो घरी गेल्यावर त्यास साक्षात्कार झाला असें म्हणतात. नंतर तो शीख धर्म ज्यास्त पवित्र करण्याकरिता गुरु झाला. प्रथम त्याच्या कल्पना व आचार फार मोठ्या नव्हत्या, व त्याप्रमाणें त्याचा शिष्यवर्गहि बेताचाच होता. शीख लोकामध्यें दहा गुरुंप्रमाणें १० तत्वें आहेत. पैकीं पहिला पाच 'क' पुढीलप्रमाणें आहेत —करा, कच्छ, करपाल, कोंधी, केस. ( लोखंडाचे दागिने, आखूड पायजमा, हत्यार, फणी, केस )

*पाच नकारार्थी तत्वें आहेत तीं.*—नरिमर, कुरिमर, धीरकस, सुनेलकस, धिरमलीअ. ( धूम्रमान न करणें, कन्यावध न करणें, शिरानष्टाबरोबर संगति न ठेवणें अथवा त्यावर विश्वास न ठेवणें, त्याप्रमाणें सुन्ता केलेल्याबरोबर वागणें, त्याप्रमाणेंच करतरपूर येथील गुरूच्या अनुयायाबरोबर वागणें ) यावरून शीखधर्मीय हिंदूंचें विशेषतः मुसुलमानधर्मांशीं वैमनस्य होतें असें दिसत. रामसिंग यास शीखधर्मांची त्यावेळीं रूढ असलेली तत्वें अमान्य असून गुरु नानक याच्या वेळीं जो शीखधर्म प्रचारात होता त्याचीं तत्वें थोड्या फार फरकानें अमलात आणावयाचीं होतीं.

*तत्वें*:—कूकपंथी लोक हिंदु शास्त्रें मानित नाहींत. त्याचे लग्नविधि व मृतसंस्कार निराळे आहेत हे मद्य पीत नाहींत, मांस खात नाहींत व स्नान करण्यापूर्वी कांहीं खात नाहींत हे लोक फेटा कानावर न बांधता कान उघडे ठेवून वरच्या बाजूला बांधतात हे दोनदा स्नान करितात. त्याच्या धर्माप्रमाणें पूर्णपणें सत्यच बोललें पाहिजे. हे कूका लोकांखेरीज इतराच्या हातचें खात नाहींत. हे गाईला फार पूज्य मानतात याच्या धर्माची दीक्षा देण्याचा प्रकार म्हटला म्हणजे, स्नान केल्यावर एक लोंकरीच्या दोऱ्यास गाठी मारलेली माळ देणें व एक मंत्र कानात सांगणें. हा मंत्र ते इतर कोणालाहि सांगत नाहींत. हा मंत्र आदिग्रंथातील प्रथमाक्षरें "सतनमुकर्ते पूर्खे" हा असावा. परंतु अद्याप कोणत्याही कूका मनुष्यानें ही फोडली नाहींत. याच्या पंथात व मंडळीमध्यें स्त्रियास येण्यास मुभा आहे, व नाचण्याचीहि पूर्ण मुभा आहे. यामुळें हे एकत्र मिळाले असता अतिशय गोंगाट करतात.

*पंथाची वाढ.*—प्रथम रामसिंग यास फार थोडे अनुयायी मिळाले. परंतु हळू हळू हा पंथ इतका वाढला की रामसिंग याच महत्व फार वाढून त्यानें आपल्या मदतीकरिता कांहीं अधिकारी नेमले. तो घोड्यावर बसून फिरत असे. त्याचे अनुयायी 'अकाल' 'अकाल' म्हणून ओरडून त्यास रस्ता करून देत. शेवटीं त्याच्या मनात शीख लोकाचा दहावा गुरु होण्याची महत्वाकांक्षा उत्पन्न झाली. त्यानें आपल्या सुभ्याची संख्या दिल्लीच्या साम्राज्याप्रमाणें २२ पर्यंत वाढविली; आणि पंजाब व सतलज नदीच्या आजूबाजूच्या प्रदेशामध्यें धर्मप्रसार सुरू केला. याच्या धर्मांत बहुतेक सर्व सुतार, गवंडी, कोष्टी व कांहीं जाट येऊन मिळाले. परंतु सर्व शीख राजे या धर्मास प्रतिकूल होते. त्याप्रमाणें शीख समाजहि प्रतिकूल होता. कारण शीख लोकांस नाच व गाणें यापेक्षां मिळाल्यास मद्य व मांस फार आवडतें.

स्वा भा वि क व र्ण नः—कॉफीचे मळे, लागवडीकरिता तयार केलेला प्रदेश, व पुष्कळ खोरीं याशिवाय बहुतेक सर्व प्रदेश अरण्याच्छादित आहे. मोठीं गावें किंवा खेडीं मुळींच नाहींत. फक्त कोठें कोठें झाडाआड लपलेलीं व घरामुळें कळून येणारीं गवतीं घरें दिसतात. साधारणपणें डोंगरमाथ्यावर गवत, खोऱ्यात हिरवें गार वन, डोंगराच्या उतारावर झाडांचीं रानें असून त्यातून लहान लहान ओढे वाहत असतात. या देशाचें स्वरूप सर्व ठिकाणीं सारखें आहे असें मात्र नाहीं. सोमवारपेठेच्या जवळ उत्तरेस डोंगराच्या उतारावर मधून मधून उघडा प्रदेश व रानझाडांचे समूह असल्यामुळें तेथें एखाद्या बागेप्रमाणें शोभा दिसते. मर्कारापाशीं टेकड्या जवळ जवळ असून दऱ्या खोल आहेत. फ्रेजरपेठकडील मुलूख सपाट असून त्यात टेकड्या तुरळक आहेत. वेप्पुनाड व कडेतनाड येथील प्रदेश खुले असून तेथील जंगलहि दाट व उंच नाहीं. कावेरी व लक्ष्मणतीर्थ या नद्यामधील पूर्व सरहद्दीवरच्या भागात एकसारखें जंगल आहे. पश्चिमघाटाची मुख्य रांग वायव्येस सुब्रम्हण्यपासून दक्षिणेस ब्रम्हगिरीच्या पश्चिम टोकावर सुमारें ६० मैल लांब पसरली आहे. या रांगेपासून पूर्वेस व पश्चिमेस पुष्कळ लहान रांगा गेलेल्या आहेत. त्यांचीं कांहीं शिखरें येणें प्रमाणें:— सुब्रह्मण्य किंवा पुष्पगिरि ( ५६२६ फू. ), मर्काराच्या उत्तरेस ९ मैलावर कोटिबेटा ( ५३७५ फू ), ताडियादमोल ( ५२७९ फू. ).

कूर्ग प्रांतातील मुख्य नदी कावेरी ही पश्चिम घाटात ब्रम्हगिरीमध्यें उगम पावते व सिद्दपूर प्रदेशांत दक्षिणेकडून वहात जाऊन सिरंगालमधून वहात गेल्यावर म्हैसूर प्रांतात शिरते. हिला हेमावती, लक्ष्मणतीर्थ, कक्के, कडनुरहोले, कुम्मेनहे, ले मुत्तरमुदी चिक्कहोले आणि हत्ती किंवा हारंगी या नद्या मिळतात. पावसाळ्यात नद्याना पूर येतो व होड्याशिवाय पलीकडे जाता येत नाहीं. परंतु पावसाळा संपल्यावर पाणी कमी होऊन उतार पडतो.

सर्व रानात, व विशेषतः पूर्वसरहद्दीकडे हत्ती पुष्कळ आहेत. येथील देवटच्या राजानें जुलै १८२२ पासून एप्रिल १८२४ पर्यंत २३३ हत्ती मारल्याचा व १८१ पकडल्याचा उल्लेख एका शिलालेखात केलेला आहे. हल्लीं हत्तींची शिकार करण्याला कमिशनरचा परवाना घ्यावा लागतो. याशिवाय वाघ, चाप, चित्ते, अस्वलें, मबादी मांजरें, काळीं व रानटी मांजरें, रानटी कुत्रे वगैरे श्वापदें रानात आढळतात. सांबर व हरणांच्या निरनिराळ्या जाती, नाग, साप, माकडें हे प्राणीहि येथें आहेत.

कुर्गची हवा समशीतोष्ण व दमट आहे. मर्कारा येथें वार्षिक पाऊस सरासरी १३३ इंच पडतो. पावसाचा भर ऐन मे महिन्यात असून त्यावेळीं एका महिन्यात ४२ इंच पाऊस होतो. मर्कारा येथें मे महिन्यात उष्णमान ७२° व जानेवारींत ६७ असतें.

इ ति हा स—कावेरीमाहात्म्य नावाच्या पुराणात कावेरीच्या उगमाचा इतिहास दिलेला आहे. कावेर मुनीला ब्रम्हदेवानें एक मुलगी बक्षीस दिली. हिचें मूळचें नाव लोपामुद्रा असें असून ती विदर्भ राजाच्या घरीं वाढली होती. परंतु कावेर मुनीची ती कन्या झाल्यामुळें तिला कावेरी असें नाव प्राप्त झालें. सर्व लोकांवर कल्याण करण्याकरिता तिनें नदी होण्याचा निश्चय केला होता. एकदा अगस्त्य मुनींच्या दृष्टीस पडली असता त्यांनीं तिला आपली पत्नी होण्याविषयीं विचारिलें, तेव्हां मुनींनीं केव्हांहि एकटें टाकल्यास आपणास वाटेल तिकडे जाण्याची मोकळीक असावी या अटीवर तिनें अगस्त्य मुनींशीं विवाह केला. दिलेल्या वचनाचा विसर पडून मुनी एकदा कनके नदीवर स्नानाकरिता गेले असता, कावेरीनें तळ्यात उडी घेतली व तेथून ती नदीच्या रूपानें बाहेर पडली. मुनीच्या शिष्यांनीं तिला अडविण्याचा प्रयत्न केल्यामुळें ती जमीनींत गुप्त होऊन भागंदक्षेत्र येथें वर आली व पुढें वलंबुरीकडे वाहूं लागली. अगस्त्य मुनी परत आल्यावर त्याना फार वाईट वाटलें. तेव्हा मुनींचें मन दुखविणें व आपला विचार बदलणें या दोन्ही गोष्टी टाळाव्या म्हणून ती अर्धभागानें मुनीजवळ राहिली, व दुसरा अर्ध नदीरूपानें कायम राहिला. या पुराणात कूर्ग लोकाना उग्राचे वंशज (म्हणजे क्षत्रियाला शूद्र स्त्रीपासून झालेली संतती ) असें म्हटलें आहे. मत्स्यराज सिद्धार्थ याचा कनिष्ठ पुत्र चंद्रवर्मा ( याच्या नावावरून व दुसऱ्या इतर गोष्टींवरून हा कदंब राजपुत्र असावा.) हा दक्षिणेंतील यात्रा केल्यावर ब्रम्हगिरी येथें आला. त्यानें पार्वतीची स्तुति करून तिला संतुष्ट केल्यावर देवीनें त्याला एक शूद्रपत्नी व त्या प्रदेशातील राज्य दिलें, व स्वतः नदीरूपानें तेथें अवतार घेऊन जगदुद्धार करण्याचें कबूल केलें. या शूद्र पत्नीपासून चंद्रवर्म्याला ११ पुत्र झाले. त्यांनीं विदर्भ राजाला शूद्र स्त्रियांपासून झालेल्या कन्यांशीं विवाह केले. प्रत्येक राजपुत्राला शंभरापेक्षा जास्त मुलगे झाले. त्यांनी आजूबाजूचा बराच प्रदेश साफ करून लागवड केली. जमीन तयार करण्याचें काम ते रानडुकराप्रमाणें करीत गेले म्हणून या प्रदेशाला क्रोड किंवा कोडगु म्हणजे वराह देश असें नाव पडलें.

देवकांत या ज्येष्ठ पुत्राला गादीवर बसवून व पार्वती लवकर अवतार घेणार आहे असें सांगून चंद्रवर्मा निघून गेल्यावर, तुळ संक्रमणाच्यापूर्वी दोन दिवस, देवकांताला स्वप्नात पार्वतीचें दर्शन होऊन, तिनें त्याला सर्व लोकास वलंबुरी येथें जमण्यास सांगितलें. त्याप्रमाणें सर्व लोक जमल्यावर दरीतून कावेरी नदीचा प्रवाह जोरानें आला, त्यात सर्व लोकांनीं स्नान केलें. प्रवाह फार जोराचा असल्यामुळें स्त्रियांच्या पदराच्या गांठी पाठीकडे गेल्या; त्या

संरक्षणाकरिता कोटेच्या चिरक्कल राजाकडे गेला. परंतु तेथें त्याचें स्वागत न झाल्यामुळें वेष पालटून फक्त चार नोकरासह तो उत्तरेस पळून गेला. अखेरीस हरिहर येथें तो पकडला गेला आणि हैदरानें पट्टण येथें त्याच्या सर्व कुटुंबासह त्याला ठार मारलें. याप्रमाणें होरमले शाखेचा शेवट झाला. लिंग राजाकडून २४ हजार रु. खंडणी देण्याचें कबूल करवून, कूर्ग व वायनाडचा कांहीं भाग हैदरानें त्याच्याकडे ठेवला, आणि अमरसुल्य, पंजे, बेळारे आणि ग्रेलुसावीर हे आपणाकडे घेतले. १७८० त लिंग राजा मरण पावल्यावर त्याची मुलें ( वीरराज व लिंगराज ) वयात येईपर्यंत सांभाळण्याच्या मिषानें हैदरानें सर्व कूर्गचा ताबा घेतला. राजपुत्राना कावेरी नदीच्या कांठीं गुरुरूच्या किल्यात ठेवून कूर्गच्या सुबरय्या नावाच्या ब्राह्मण खजिनदाराला सुभेदार नेमण्यात आलें व मर्कराच्या किल्ल्यावर मुसुलमान शिबंदी ठेवण्यांत आली. प्रजेला हें सहन न होऊन त्यानीं १७८२ त बंड करून मुसुलमानाना घालवून दिलें हैदर त्या वेळीं कर्नाटकात अर्काटकडे इंग्रजाशीं युद्ध करण्यात गुतला होता व पुढें लवकरच ( १७८२ ) मरण पावला, त्यामुळें बडाचें पारिपत्य होऊं शकलें नाहीं.

पुढें १७८४ त टिपूनें ज्यावेळीं नगर येथें इंग्रज सेनापति माथ्यू व त्याचे अधिकारी याना पकडलें व मंगलोर घेतलें, त्यावेळीं पट्टनास तो परत जाताना त्यानें कोडगु लोकाचें शांतवन केलें त्यावेळीं वरील दोन राजपुत्र व राजकुटुंब हें पेरिया पट्टणास कैदेंत होतें. तेथें त्याचा छळ होत असे त्यामुळें पुन्हा प्रजा खवळून तिनें बंड केलें टिपूनें १५ हजार सैन्य त्याच्यावर धाडलें पण तिनें त्याचा पुरा मोड केला. तेव्हा टिपू स्वतः चालून आला व तह करण्याच्या मिषानें त्यानें मुख्य सरदाराना तलेकावेरीस बोलाविलें व ते तेथें आले असता त्याना विश्वासघातानें कैद करून त्यांना व त्याच्या बायकामुलानां पट्टणास पाठवून दिलें तेथें त्याना व पुष्कळशा ( एकंदर ७० हजार ) कोडगू लोकाना त्यानें बळजुलुमानें बाटविलें व सापडेल तेथें कोडगू लोकाना बाटविण्याच्या किंवा ठार मारण्याच्या अटीवर सारा कूर्ग प्रांत त्यानें मुसुलमान सरदाराना जहागीर दिला, आणि मर्कारा, कुशाळगड वगैरे ठाण्यात शिबंदी ठेविली आणि नागप्पा यास दिवाण केलें. पुढें त्याच्यावर लाच खाल्याचा आरोप आल्यावरून तो पळून गेला

याप्रमाणें देशाची स्थिति असता, १७८८ त (डिसेंबर ) वीर राजेंद्र वोडेयर यानें आपली बायकामुलें व लिंग राजा आणि अप्पाजी हे दोघे भाऊ यासह प्रियपट्टण येथून आपली ( सहा वर्षांच्या तुरुगवासानंतर ) सुटका करून घेतला. लागच कूर्ग लोक त्याच्या भोंवती जमा झाले व सर्व प्रदेश त्याच्या ताब्यात आला. त्यानें आपलें कुटुंब कर्वी नावाच्या एका सुरक्षित जागीं ठेविलें होतें व तो मुसुलमानावर स्वाऱ्या करीत होता. परंतु त्याचा शत्रु कोटी आरास यानें त्या कुटुंबावर वेरड वगैरे पाठवून त्याचा सत्यनाश केला. टिपूनें कूर्गवर गुलामअलीबरोबर मोठें सैन्य पाठविलें. त्यानें तिकडे पुष्कळ जाळपोळ केली इतक्यात पश्चिम किनाऱ्यावर मल्याळी राजानीं बंड केल्यामुळें गुलामअली तिकडे गेला.

परत जाताना गुलामअलीच्या सैन्याचा बराच नाश वीरराजेंद्रानें केला तेव्हा टिपूनें बद्रीजमाल याला पुष्कळ सैन्यानिशीं राजावर धाडलें. परंतु त्यालाहि अडचणीच्या मार्गांत गाठून राजानें त्याच्या सैन्याचा नाश केला तेव्हा तो कसा तरी मर्कारा येथें जाऊन पोहोंचला. याच वेळीं टिपूवर इंग्रज–मराठे–निजाम चालून आले होते त्यामुळें तो मोठ्या संकटात अडकला होता मुंबईचा इंग्रज ॲबरक्रॅंबी हा जलमार्गानें पट्टणावर येत होता घाटावरील रस्ता कुर्गच्या राजाच्या हद्दींतून होता. त्यामुळें इंग्रजाला त्याच्या साह्याचा अतिशय जरूरी भासली. तसेंच वीरराजालाहि टिपूविरुद्ध कोणाची मदत पाहिजे होती यावेळीं तेलिचेरी येथें ॲबरक्रॅंबी होता व वीरराजाचा एक हस्तक मधुभट म्हणून तेथें होता. त्याच्या बरोबर इंग्रजानें राजास आपली मैत्री असावी म्हणून विनंतीपत्र पाठविलें. राजानें तें कबूल केलें व तेलिचेरी येथें इंग्रज व राजा यात स १७९० च्या आक्टोबरात तह झाला. त्यात पुढील मजकुराचें पहिलें कलम होतें " जोपर्यंत सूर्य चंद्र आहेत तोपर्यंत तह करणाऱ्या उभय पक्षाकडून आपापलें वचन कधींहि मोडलें जाणार नाहीं. " बाकीच्या कलमाचा सारांश असा:– ( १ ) टिपूचा नाश करण्यास राजानें इंग्रजास सर्वप्रकारें मदत करावी.( २ ) दुसऱ्या टोपीवाल्याशीं संबध ठेवू नये. ( ३ ) कुर्गच्या राज्याचें स्वातंत्र्य रक्षण करण्यास कुंपनी जामीनदार आहे. टिपूशीं इंग्रजाचा सल्ला झाला तरी त्याच्यापासून राजाचें व राज्याचें रक्षण कुंपनी करील तोपर्यंत कुटुंबासुद्धा राजानें तेलिचरीस रहावें इ इ यानतर राजानें इंग्रजास बरेचसे घोडे ( दीड हजार ) व जनावरें आणि दाणागोटा पुरवून आपल्या राज्यातून जाण्यास परवानगी दिली, व स्वतः हेगला घाटानें सैन्य पार करून घेऊन आपण इंग्रजाबरोबर थेट पट्टणापर्यंत गेला. तेव्हा टिपूनें आपला वसूली खात्याचा अंमलदार पूरनय्या याजबरोबर स्वदस्तुरचें पत्र राजास पाठविलें कीं, इंग्रजास सोडून आपल्याला मदत करावी त्यास राजानें नकाराचें उत्तर पाठविलें.

यावेळीं टिपूनें बंदींत ठेविलेल्या १२००० कोडगु लोकानीं आपली सुटका करून घेऊन आपला देश परत मिळविला तेव्हा टिपूला मराठे, निजाम व इंग्रजाशीं तह करणें भाग पडून आपल्या राज्यातील अर्धा मुलूख त्याना द्यावा लागला व कूर्गवरील त्याची सत्ता नाहींशी झाली मात्र वीरराजा इंग्रजाचा कायमचा मांडलीक बनला ती हकीकत अशी –इंग्रजानें राजास सांगितलें कीं, आम्ही तुमचें टिपूपासून रक्षण केल्याबद्दल यापुढें तुम्हीं आम्हास

दरसाल खंडणी द्यावी. हें ऐकून राजास राग आला. झालेल्या तहांत असें कलम नव्हतें. शिवाय राजा हा टिपूचा माडलिकहि नव्हता. तेव्हां तडजोड म्हणून ऑबरक्रॉंबीनें पुढील करारपत्र कंपनीच्या तर्फे लिहून दिलें (१७९३):- " कूर्ग संस्थान स्वतंत्र असून त्यानें टिपूस खंडणी दिली नव्हती; परंतु तेथील राजा स्वतःच कंपनीनें आपलें टिपूपासून रक्षण केल्याबद्दल कंपनीस सालीना ८ हजार पागोडा (१ पागोडा म्हणजे ८ आणे) उत्पन्न देण्यास तयार आहे. कंपनीहि कुर्गच्या राज्यात ढवळाढवळ करणार नाहीं व त्रास देणार नाहीं. " याप्रमाणें इंग्रजानें पहिला तह मोडून राजास आपला माडलिक बनविलें व नाइलाजानें राजा त्यास कबूल झाला.

ज्या ठिकाणीं वीरराजाची इंग्रज सेनापति ऑबरक्रॉंबी यांशीं प्रथम गाठ पडली त्याठिकाणीं त्यानें वीरराजेंद्र पेठ हें गाव वसविलें. नाटकनाडू येथें त्यानें राजवाडा बांधला. पुढें १७९४ त दुसरें लग्न केलें, टिपूनें वीरराजाचा खून करविण्याचे पुष्कळ प्रयत्न केले पण ते सर्व निष्फळ झाले. टिपूशीं झालेल्या शेवटच्या युद्धांत वीरराजानें इंग्रजास सामान पुरविण्याच्या कामीं चांगली मदत केली. कूर्गमध्यें इंग्रजांनीं अन्नाच्यासाठीं इस्पितळें उघडलीं. याबद्दल श्रीरंगपट्टण पडल्यानंतर त्याला काहीं जयचिन्हें मिळाली (या लढाईंत तो स्वतः लढत होता). परंतु प्रियपट्टण त्याच्या हातचें गेल्यामुळें त्याला वाईट वाटलें. दक्षिणकानडामधील बेळारी व पंजे हे प्रदेश मात्र त्याला मिळाले. यापुढें इंग्रजांनीं राजाकडून खंडणी न घेता हत्ती घेण्याचें ठरविलें. १८०७ मध्यें त्याची बायको निपुत्रिक वारल्या मुळें, आपल्या गादीला वारस उत्पन्न होण्याची त्याची आशा खुंटून त्याचा स्वभाव चिडखोर व रागीट बनला.

त्यामुळें त्यानें पुष्कळ अमर्याद कृत्यें केलीं. आपल्याला कोणी विष घालील म्हणून तो नेहमीं सावध असे. त्यानें १८०७ मध्यें आपल्या घराण्याचा इतिहास लिहविला. त्याचें इंग्रजी भाषांतर ऑबरक्रॉंबीनें केलें आहे. राजानें रागाच्या भरात आफ्रिकन शिपायाकडून पुष्कळांचे वध करविले; यामुळें राजवाड्याच्या रक्षकांनीं व सैन्यातील कामगारांनीं त्याला मारण्याचा कट केला. परंतु वेळींच त्याला त्यासंबंधीं सूचना मिळून त्यानें आपल्या गादीवर लोड ठेऊन त्यावर पांघरूण घातलें व आपण दुसरीकडे गेला. इकडे मारेकऱ्यानां राजा निजला आहे असें वाटून त्यांनीं लोड कापून काढिला. पण राजा निसटून गेला आहे असें त्याना कळून येताच ते गर्भगळित होऊन गेले. मग राजानें आपल्या आफ्रिकन शिपायाकडून किल्ल्याचे दरवाजे बंद करवून तीनशे कूर्ग लोकांची कत्तल करविली. या कृत्यामुळें इंग्रजाचें आपल्यासंबंधीं मन वाईट होईल अशी राजास भीति पडली. आपल्या पाठीमागून राज्याचा वारसा आपल्या मुलीकडे जावा अशी आपली इच्छा असल्याचें त्यानें गव्हर्नर जनरलास कळविलें, परंतु तिकडून उत्तर येण्यास विलंब लागल्यामुळें मुलींना राज्य मिळण्यास अडचण पडूं नये म्हणून त्यानें आपल्या भावास मारण्याकरिता मारेकरी पाठविले, परंतु लवकरच शुद्धीवर येऊन लिंगराजाला मारण्यापूर्वी त्यानें आपला हुकूम परत घेतला. अप्पाजी त्याच्या अगोदर मारला गेला होता. तो भ्रमिष्ट झाला असावा. कारण त्यानें स्वतः १२ वेळ आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला होता व एके वेळीं विषप्राशनहि केलें. त्यावेळीं त्यानें एक वारसपत्र लिहून ठेवलें. त्यात म्हटलें होतें कीं मी मेल्यावर माझें राज्य माझ्या लेकवळ्यांपैकीं राजशेखर व शिशुशेखर यास द्यावें.पण त्यानंतर त्याला आणखी मुली झाल्या. त्याला एकंदर चार मुली होत्या. तेव्हां लेकवळ्याना राज्य न देता या मुलींच्या मुलाना वडिलकीच्या अनुक्रमानें राज्य द्यावें व घराण्याचें संरक्षण इंग्रजानें करावें असें मृत्यूपत्र त्यानें तयार करून ठेविलें शेवटपर्यंत तो अस्वस्थच होता. मृत्युपत्राची नक्कल करून त्यानें ती खजिन्यात ठेवली होती. सरतेशेवटीं १८०९ मध्यें जूनच्या नवव्या तारखेस त्यानें आपली लाडकी मुलगी देवम्माजी हिजपाशीं राज्याचा शिक्का मोर्तब दिला पुढें तो लवकरच मरण पावला

मध्यंतरी लिंगराजानें इंग्रजाच्या मदतीनें कूर्ग लोकांचे पाठबळ मिळवून देवम्माजीकडून राज्य बळकाविलें (इ स १८११) वास्तविक वीरराजानें मृत्युपत्रात ठरविल्याप्रमाणें इंग्रजानीं देवम्मा हिला गादीवर बसवावयाचें होतें परंतु तें त्यांनीं केलें नाहीं. वेलस्लीनें तसें कबूल केलें होतें, परंतु तें कागदपत्रातच राहिलें त्या प्रांतातील धार्मिक चालीरीतीप्रमाणें मुलीचा हक्क वारसदार म्हणून चालत असे. वीरराजानें देवम्माजीकरिता मुंबई व कलकत्ता येथें इंग्रजाजवळ ठेवलेल्या ठेवींच्या रकमा (५॥ लाख रु) मिळविण्याचा त्यानें प्रयत्न केला परंतु इंग्रजांनीं त्या रकमा न देता त्याचें व्याज मात्र त्यास द्यावयाचें कबूल केलें. तो १८५० त मरण पावला. यानें आपला दिवाण कुशरीआपा याच्या मदतीनें प्रथम पुष्कळ मसलती केल्या. परंतु पुढें त्याला काहीं आरोप ठेवून त्याच्या आप्तेष्टासह व बऱ्याचशा लोकांसहि राजानें ठार मारिलें. वीरराजाप्रमाणें यालाहि विषप्रयोगाची भीति वाटे. कदाचित त्याला कोणी विषप्रयोग केलाहि असेल. कूर्गप्रांतात जारणमारण विषप्रयोग नेहमीं होत असत. लिंगराजा कर्तबगार असून त्यानें किल्ल्याची डागडुजी व जमिनींची मोजणी करविली होती. त्याची प्रजा त्याला अतिशय भीत असे. त्याच्या परवानगीशिवाय त्याच्या हद्दींत कोणासहि शिरता येत नव्हतें. इंग्रजाचें व कोडगू लोकांचें त्यानें दळणवळण बंद केलें होतें त्याच्या राणीनें हिरकणी खाऊन आत्महत्या केली.

लिंगराजानंतर त्याचा मुलगा वीर राजा गादीवर बसला. हा दुर्व्यसनी व अत्याचारी होता. कुंतबसव या प्रधानाच्या सल्ल्यानें तो चालत असे. देवम्माजी व आपल्या घराण्यापैकीं उरलेलीं दुसरीं सर्व नातेवाईक माणसें त्यानें मारविलीं. त्यानें १८३२ त एक स्त्रियांची पलटण उभारली होती. त्याचें व इंग्रजांचें वाकडें आलें तेव्हां त्यानें आपल्या राज्यांत सर्वत्र जाहिरनामे लाविले कीं, इंग्रज हे हिंदुस्थानांत येऊन हिंदु व मुसुलमान या उभयतांच्या धर्मांचा नाश करीत आहेत, तर सर्वांनीं एकत्र होऊन हालेरीवंशाचें संरक्षण करून इंग्रजांस हाकलून द्यावें. यानंतर १८३४ त ब्रिटिश फौज कूर्ग प्रांतावर चाल करून गेली व राजा नलकनाद येथें निघून गेल्यामुळें व त्यानें लढाई तहकूब केल्यामुळें कूर्ग प्रांत इंग्रजांनीं बंदुकीचा एकहि आवाज न काढतां आपल्या राज्यास जोडला. दिवाण बापू यानें शरण होऊन राजधानी इंग्रजाच्या हवालीं केली (१८३४ एप्रिल १० ) फक्त वेप्पाडच्या सुभा अप्पाचन्ना यानें इंग्रजाच्या एका फौजेचा पराभव करून तिचा मुख्य मिलर यास ठार केलें. एवढीच काय ती लढाई झाली. कूर्ग प्रांत ७ मे १८३४ रोजीं खालसा केला. वास्तविक राज्य खालसा करण्याचें कांहीं कारण नव्हतें. राजा पदच्युत करून त्याचा मुलगा गादीवर बसविला असता तर चाललें असतें. ज्या वीरराजानें इंग्रजांना टिपूच्या मोहिमेंत संकटकाळीं मदत केली त्याच्या नंतर तिसऱ्या पिढींतच ती मदत विसरून इंग्रजांनीं हें राज्य खालसा केलें

पुढें राजाला वेल्लोर येथें पाठविण्यांत आलें व नंतर बनारस येथें रहाण्याची परवानगी त्यास मिळाली. १८५२ त तो आपली मुलगी गौरम्मा हिच्यासह विलायतेस गेला. तेथें त्यानें आपल्या मुलीला ख्रिस्ती धर्म देवविला व पुढें तिचा विवाहहि एका इंग्रजाबरोबर करून देण्यांत आला होता. हिला एक मुलगी होऊन ही १८६४ त मरण पावली. हिच्या मुलीचें लग्न १८८२ त क्याप्टन यार्डले याच्याशीं झालें परंतु लग्नानंतर मुलगी व तिचा बाप क्यांवेल हे नाहींसे झाले. याप्रमाणें या घराण्याचा शेवट झाला. कादीस ठेवलेल्या वीरराजाच्या मुलांची पुढील हकीकत समजत नाहीं. वीरराजा १८६३ त मरण पावला व त्याला लंडन येथें केन्सल ग्रीन स्मशानांत पुरण्यांत आलें

१८३३ मध्यें वीरप्पा नावाचा एक तोतया मनुष्य पुढें आला होता. संन्याशाच्या वेषांत अपरंपर हें नांव धारण करून लोकांना बंड करण्याला चिथावीत असल्यामुळें पकडला जाऊन, १८७० त तो बंगलोरच्या तुरुंगांत मरण पावला १८७७ त गौडांचें एक लहानसें बंड झालें होतें पण तें लवकरच शांत झालें.

१८८१ पासून कूर्ग प्रांत म्हैसूरच्या रेसिडेंटच्या ताब्यांत असून त्याला कूर्गचा चीफ कमिशनर असें म्हणतात. कूर्ग प्रांतांत पुढील तालुके, गांवें व खेडीं आहेत. एकंदर प्रांताची लोकसंख्या मागें सांगितलीच आहे

| तालुक्याचें नांव | क्षे. फ. चौ. मै. | लोकसंख्या(स.१९०१) |
|---|---|---|
| मर्कारा | २१६ | २८६२० |
| नंजराजपट्टण | ३५५ | ४२७२० |
| पादिनालकनाद | ४०० | २८६२० |
| येदेनालकनाद | २०१ | ४३४१२ |
| किग्गतनाद | ४१० | ३७२३५ |
| एकंदर | १५८२ | १८०६०७ |

मर्कारा, वीरराजेंद्र पेठ, सोमवारपेठ, फ्रेजर पेठ व कोडली पेठ या ठिकाणीं म्युनिसिपालिटया असून येवढींच कायतीं मोठीं गांवें आहेत. कूर्गमधील बहुतेक गांवें फार लहान असून त्यांची लोकसंख्या सरासरी ३५० ते ४०० पर्यंत पडेल.

१९०१ मध्यें बायकांचें पुरुषांशीं प्रमाण १०१ त १००० असें होतें. याचें कारण देशांत पुरुष मजुरांची संख्या बरीच होती हें होय. ख्रिस्ती, मुसुलमान वगैरे लोकांत हें प्रमाण निरनिराळें आहे कूर्ग लोकांत १००० पुरुषास ९७९ स्त्रिया व लिंगायतांमध्यें १०३८ स्त्रिया असें प्रमाण आहे. [ कोडगू लोकांच्यासंबंधीं माहितीकरितां "कोडगू" पहा. ]

शे त की.—कूर्गमधील जमीन सुपीक असून तेथें मुख्य पीक तांदुळाचें होतें. पाऊस बराच पडत असून ओढे व नाले पुष्कळ असल्यामुळें पाणी देण्याची कृत्रिम सोय करण्याची जरूरी नसते. पूर्वीं तांदुळाच्या खालोखाल वेलदोड्यांचें उत्पन्न महत्वाचें होतें व शेतकऱ्याकडून ठराविक दरानें सर्व माल सरकार खरेदी करीत असे. हल्लींहि शेतें सरकार खंडानें देतें. हल्लीं वेलदोड्याची किंमत फार उतरल्यामुळें जे लोक वेलदोड्याच्या मळ्यावर अवलंबून असत, ते फार गरीब झाले आहेत. घाटमाथ्यावर व दऱ्यातील मळ्यामध्यें हीं झाडें आपोआप होतात मोकळ्या जागेंत एखादें मोठें झाड फेब्रुवारी किंवा मार्च महिन्यांत पाडलें असतां जमिनीच्या हादरण्यामुळें लहान झाडांना कोंब फुटून तिसऱ्या वर्षीं बोंडें येतात व सप्टेंबर किंवा आक्टोबरमध्यें पीक मिळतें. या झाडापासून ६१७ वेळ चांगलें पीक घेतां येतें. पुढें त्या झाडांत जोर येण्याकरितां त्याच्यावर पूर्वीप्रमाणें मोठें झाड पाडावें लागतें.

गेल्या ५० वर्षांत कूर्ग प्रांतांत कॉफीच्या लागवडीला बरेंच महत्व प्राप्त झालें आहे. नलकनादजवळ मोपला लोकांनीं कॉफीची लागवड प्रथम सुरू केली असावी. यूरोपियन लोकांनीं पहिला मळा १८५४ त मर्कारा येथें सुरू केला. कॉफीच्या मळ्यापासून खात्रीनें व सहज पैसा मिळवितां येईल या समजुतीनें पुष्कळ लोकांनीं हा धंदा स्वीकारिला. त्यावेळीं तद्देशीय रहिवाशापासून विकत किंवा सरकारकडून मुदतें विचारिलें असतां जमिनी मिळत; त्यामुळें कॉफीच्या लागवडीकरितां लाखो रुपये खर्च होऊं लागले. कॉफीस एक प्रकारचे किडे व दुसऱ्या नैसर्गिक अडचणीमुळें बराच त्रास

झाला, तरी पण म्हैसूर व इतर भागातून मजुराना पुरवठा लागला झाल्यामुळें या धंद्याची बरीच वाट झाली. अलीकडे ब्राझिलमधून कॉफी येऊं लागल्यामुळें येथील कॉफीचा भाव उतरला व पुष्कळांना आपले मळे सोडून द्यावे लागले.

केळीं व नारिंगें हीं येथील मुख्य फळ होत. पाळीव जनावरांना येथील हवा चांगलीशी मानवत नाहीं. म्हैस, डुक्कर, गाढव, बकरा वगैरे प्राणी येथें चांगले असतात, परंतु घोड्याला मात्र हवा मानवत नाहीं.

भाताच्या जमीनीला दर एकरीं १ रु. ८ आ. ते ४ रु. ८ आ. व कॉफीच्या जमीनीला दर एकरीं ८ आ. ते २ रु. ४ आ. पर्यंत सारा पडतो.

**जंगलें.**—राखलेल्या जंगलाचें क्षेत्रफळ जवळजवळ ५०० चौरसमैल असून दुसरीं संरक्षित जंगलें आहेत तीं येणें प्रमाणें—घाट जंगलें, देवरकाडू (पवित्र रान), उरुवे (रानडे-गावीं जंगलें) व पैसारी (सरकारी ओसाड भाग).

**धंदे व व्यापार.**—मोठे कारखाने कूर्गमध्यें मुळींच नाहींत. कूर्गमध्यें होणाऱ्या सुऱ्या साधारण बऱ्या असतात. उत्तर भागात जाडेभरडें कापड व सनिवारसंटे येथें चांगलें कापड होतें. सोमवार पेठ व कोडली पेठ येथें थोडाबहुत व्यापार चालतो. दक्षिण कूर्गमध्यें गोणिकोप्पल, अम्मात्ति व सिद्दापूर, आणि उत्तर कूर्गमध्यें सुंटिकोप्प व सनिवारसंटे येथें मोठे बाजार भरतात. येथील मुख्य आयात माल—गुरें, हरभरा, तांदूळ, डाळी, साखर, मीठ, तेल व कापड. निर्गत माल—कॉफी, वेलदोडे, तांदूळ, नारिंगें, चंदन, इमारती लाकूड व कातडीं.

**दळणवळण.**—म्हैसूरमध्ये पेरियापट्टणपासून एक रस्ता पश्चिमेकडे फ्रेजरपेठ व मर्कारावरून, संपाजी घाटांतून मंगलोरकडे गेलेला आहे, व दुसरा रस्ता, सिद्दापूर आणि वीर राजेंद्रपेठवरून, पेरंबाडी घाटांतून तेलिचेरी पर्यंत जातो. या दोन मुख्य रस्त्यांशिवाय दुसरे लहान लहान रस्ते आहेत. म्हैसूरपासून मर्कारापर्यंत रोज मोटार जाते. माणशीं आठ रुपये भाडें पडतें.

**राज्यकारभार.**—हा प्रांत प्रत्यक्ष हिंदुस्थान सरकारच्या हाताखालीं असून म्हैसूरचा रेसिडेंट हाच येथील चीफ कमिशनर असतो. त्याचें मुख्य ठाणें बंगलोर येथें आहे. खुद्द कूर्गवर एक कमिशनर असून तो मर्कारा येथें राहतो. नंजराजपट्टण, मर्कारा, पाडिनालकनाड, येदेनालकनाड, व किग्गटनाड असे कूर्गचे ५ तालुके असून त्यांवर सुभेदार नेमिलेले आहेत. तालुक्याच्या विभागाना नाड, नाडाच्या विभागाना मागनी, व मागनीच्या विभागाला ग्राम असें म्हणतात.

**शिक्षण.**—स. १९११ त येथें मुलांच्या ९१ शाळा व मुलींच्या ७ शाळा होत्या. शिवाय सरकारी एक हाय स्कूल, एक ज्यूनिअर सेकंडरी स्कूल, व मर्कारा येथील ट्रेनिंग स्कूल असून बाकी सर्व शाळा प्राथमिक शिक्षणाच्या आहेत. उच्च शिक्षणाकरिता म्हैसूर, बंगलोर किंवा मद्रास येथें जावें लागतें. येथील लोकांच्या चालीरीतींत मागासलेपणा बराच आहे. कोडगूमध्यें स्त्रीशिक्षण वगैरे वाढलें आहे.

**वैद्यकीय.**—मर्कारा व वीरराजेंद्रपेठ येथें सरकारी दवाखाने व नपोक्लु, गोणीकोप्पाळ, सोमवार पेठ, सुंटिकोप्प, सिद्दापूर आणि पोन्नंपेट येथें लोकलफंडातून चालविलेले दवाखाने आहेत. ताप व फुफ्फुसविकार हे येथील मुख्य रोग होत.

**मोजणी.**—पहिली मोजणी केवळ भूगोलविषयक असून १८१७ त झाली. १८०२ ते १८७४ या वर्षांच्या दरम्यान मद्रासच्या मोजणीखात्यानें या प्रांताची स्थलवर्णनविषयक मोजणी व कॉफीच्या मळ्याची मोजणी केली. १९०२ त या प्रांताची मोजणी व जमाबंदी झालेली होती.

[संदर्भ ग्रंथ — राईस-कूर्ग ग्याझे. रिचर्ड-एथनॉग्राफिकल कास्ट्स ऑफ कूर्ग. मेमॉयर ऑफ कोडगू सर्व्हे. ग्याग्लिंग-कूर्ग मेमॉयर. हार्डी-रिपोर्ट ऑन कूर्ग. कूर्ग सेन्सस रि. १९११. स्मिथ-ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया. कॅलओरि वाया डिक्शनरी. गजेंद्रगडकर व नरगुंदकर-कूर्ग प्रांताचा खरा इतिहास.]

**कूर्म**—विष्णूचा एक अवतार. या अवताराचें मूळ शतपथ ब्राह्मणात सांपडतें. प्रजापतीनें कूर्म (कासव) हें रूप धारण करून प्रजोत्पत्ति केल्याची कथा त्या ग्रंथात आहे. नंतरची कथा म्हणजे सत्ययुगात विष्णूनें विश्वप्रलयाच्या वेळीं हरवलेल्या कांहीं अमोलिक वस्तू परत मिळविण्यासाठीं कूर्माचा अवतार घेतला व मंदराचलाखालीं क्षीरसमुद्रात अढळ राहिला. मग देवदैत्यांनीं वासुकीचा दोर मंदराभोवतीं गुंडाळून समुद्रमंथन केलें. तेव्हां १४ रत्नें निघालीं. कूर्मावताराचें कूर्मपुराण स्वतंत्र विवेचिलें आहे. कासवासंबंधानें अर्थशास्त्रीय व प्राणिशास्त्रीय विवेचनासाठीं उत्तरोगामी विभाग ९ पृ. ८३ व 'कासव' विभाग ११ पृ. ४७२ पहा.

**कूर्मदास**—हा पैठण येथील रहिवासी असून जातीचा ब्राह्मण होता. हा जन्मल्या दिवसापासून पांगळा व थोटा असे म्हणून याच्या मनात पंढरीस जाऊन पहावें असें आलें. पुढें हा एका कार्तिकी एकादशीस पंढरीस जाण्याच्या हेतूनें सुरडत सुरडत निघाला. अशा रीतीनें जाता जाता कार्तिक शु० १० स लऊळ म्हणून करमाळें तालुक्यात त्याच्या आग्नेय दिशेस एक गाव आहे तेथें येऊन पोहोंचला. येथून पंढरपूर ९ कोस आहे. तेव्हां त्यानें पाहिलें कीं, आता एकादशीकरिता आपलें जाणें पंढरीस होत नाहीं म्हणून यानें मनात देवाची प्रार्थना केली, आणि भक्तिपूर्वक वारकऱ्यांबरोबर देवास निरोप सांगून धाडिला कीं, कृपा करून येथें येऊन मला दर्शन द्यावें. या निरोपाप्रमाणें असें सांगतात कीं, यास विठोबानें तेथें येऊन दर्शन दिलें. भक्तिविजयात (अ. १६) याची कथा वर्णिली आहे. याची समाधी हल्लीं लऊळ येथें आहे. याचा काल सुमारें शके १२३० चा होय. याची स्फुट कविता आहे. [भक्तिवि. स. क. सू.]

कूर्मपुराण-अष्टादश पुराणांपैकी पंधरावें.समुद्रमंथनाच्या वेळीं ज्या ऋषींनीं विष्णूची स्तुति केली त्या ऋषींना विष्णूनीं आपल्या कूर्म (कासव) अवतारांत हें पुराण सांगितलें म्हणून याला कूर्मपुराण असें म्हणतात. कांहीं अंशीं विष्णुपुराणांतल्या प्रमाणेंच पुराणांतील मुख्य पांच विषयांची माहिती याहि पुराणांत दिली आहे. शिवाय विष्णूच्या अवताराच्या अनेक कथा दिल्या आहेत, आणि मधूनमधून शिवाच्या कथा व स्तोत्रेंहि दिलीं आहेत. या पुराणाचे दोन भाग आहेत पैकीं पहिल्या भागाच्या शेवटीं शिवाच्या २६ अवतारांचें वर्णन आहे. या पुराणाचें नांव व आरंभ यावरून हें वैष्णव पुराण असावें असें प्रथम एखाद्यास वाटतें, पण तसें नसून एकंदर हें पुराण शिव आणि दुर्गा यांच्या भक्तिपरच आहे. शिवाच्या शक्तींना स्त्रीदेवतें कल्पून त्यांच्या पूजेचे विधी या पुराणांत दिले आहेत.या गोष्टीवरून हें आज उपलब्ध असलेलें पुराण फार प्राचीन नाहीं असें उघड दिसतें. तसेंच अनेक पाखंडमतांपैकीं वाममार्गीय म्हणजे स्त्रीतत्त्वाचे पूजक आणि स्त्रीदेवतांचे पूजक यांची माहिती या पुराणांत दिली आहे आणि या पंथाचा धार्मिक ग्रंथ 'यामलतंत्र' याचीहि माहिती यांत आहे.

पवित्र क्षेत्रें काशी (काशीमहात्म्य) व प्रयाग (प्रयागमहात्म्य) यांचें वर्णन व महत्त्व बऱ्याच मोठ्या प्रमाणांत पहिल्या भागांत दिलें आहे. दुसऱ्या भागाच्या आरंभीं ईश्वरगीता ( भगवद्गीतेसारखी ) सांगितली आहे. तींत ध्यानयोगानें परमेश्वर शिवाचें ज्ञान कसें होतें तें सांगितलें आहे. या गीतेनंतर व्यासगीता दिली आहे; तींत व्यास ऋषी सांगतात कीं, सर्व संस्कार व पवित्र आचरण केल्यानें सर्वश्रेष्ठ ज्ञान प्राप्त होतें आणि म्हणून गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी यांच्या धर्मा (कर्तव्यकर्मा)बद्दल विवेचन केलें आहे. कांहीं भागांत सर्व पापांबद्दलच्या प्रायश्चित्तविधींचें वर्णन दिलें आहे व पातिव्रत्यधर्माचा उल्लेख आला आहे. व त्याच्या समर्थनार्थ पुढें एक सीतेची गोष्ट ( ही रामायणांत नाहीं. ) सांगितली आहे. तींत अग्निदेवानें रावणाच्या हातून सीतेची कशी सुटका केली तें दिलें आहे.

या पुराणांतच सांगितलें आहे कीं, त्याच्या चार संहिता (ब्राह्मी, भागवती, सौरी, वैष्णवी) आहेत, पण ६०००श्लोकांची ब्राह्मी संहिता मात्र आज उपलब्ध आहे. नीलमणी मुखोपाध्यायांनीं ती प्रसिद्ध केली आहे कलकत्ता (१८९०)याची श्लोकसंख्या १७००० आहे असा भागवतांत उल्लेख असून हीच संख्या १८००० असल्याचा-मत्स्यपुराणांत उल्लेख आहे. [ विंटरनिट्झ, विल्सन—कूर्मपुराण ].

कृतवर्मा—सात्वत कुळांतील हृदिक राजाचा तिसरा पुत्र. भारती युद्धानंतर दुर्योधनाकडील जे तीन वीर वांचले त्यांनीं रात्रीच्या वेळीं पांडवशिबिरावर हल्ला केला त्यां[त] हा एक होता. कृष्णाच्या अवतारसमाप्तीपूर्वी यादवां[त] परस्पर कंदन झालें त्यांत हा सात्यकीच्या हातून मरण पावला. [ महाभारत स्त्रीपर्व अ. ११; मौसल अध्याय ३ ]

कृति—पूरुकुलोत्पन्न हस्तिपुत्र देवमीढ अथवा द्विमीढ याच्या वंशांत जन्मलेल्या सन्नतिमान् राजाचा पुत्र. यानें हिरण्यनाभापासून प्राच्य सामाच्या सहा संहिता संपादल्या होत्या. प्राच्य सामाचा उल्लेख वैदिक ग्रंथांत आढळत नाहीं. याचा पुत्र नीपराजा [ भाग स्कं. ९, अध्याय २१ ]

कृत्तिका—एक नक्षत्रपुंज. यांत बारीक बारीक सात तारा आहेत यांचा एक झुबकाच दिसतो. कार्तिकांत या आवळीस उगवतात आणि त्या मावळावयास गेल्या म्हणजे पहाट होते फेब्रुवारींत या आवळीस माध्यान्हीं येतात व तेव्हां स्वस्तिकाच्या किंचित उत्तरेस दिसतात. कृत्तिकांची आकृति देशी वस्तऱ्यासारखी दिसते. सहावी व सातवी या तारा मिळून वस्तऱ्याच्या मुठीचें टोंक होतें आणि बाकीच्या तारांचें पातें होतें.

कृत्तिकांच्या सात ताऱ्यांचीं नांवें तैत्तिरीय ब्राह्मणांत आलेलीं आहेत ( ज्ञानकोश वि. ३ बुद्धपूर्वजग पृष्ठ १९० पहा ). सांप्रत सातांपैकीं सहा तारा चांगल्या दिसतात व सातवी फार बारीक दिसते. पुराणादिकांत कृत्तिकासंबंधानें कथा आलेल्या आहेत त्यांत त्या सहा आहेत. कालांतरानें कांहीं ताऱ्यांच्या तेजांत फरक पडतो त्याप्रमाणें वेदकालांत सातवी तारा चांगली स्पष्ट दिसत होती. पण ती पुढें बारीक झाली यामुळें पुराणग्रंथांतील कथांत ती नाहींशी झाली; किंवा वेदकालापासूनच ती बारीक असावी. एका कोणास दिसते, न दिसते, म्हणून कांहीं कथांत सात आल्या व कांहींत सहा आल्या असें असेल. यांविषयींच्या पौराणिक उल्लेखांत कार्तिकस्वामीची कथा फार प्रसिद्ध आहे. सहा कृत्तिका या त्याच्या माता होत म्हणून त्यास ' षाण्मातुर ' म्हणतात. सहांपासून त्यास सहा मुखें प्राप्त झालीं, म्हणून त्यास षडानन हें नांव पडलें [ ज्योतिर्विलास ].

कृत्तिवास—बंगाली रामायण कर्ता. बंगाली रामायणांपैकीं अत्यंत लोकप्रिय रामायण कृत्तिवासकृत होय. आपल्या स्वतःसंबंधीं बरीच माहिती कृत्तिवासानें दिली आहे, त्यावरून त्याचा जन्म इ. स. १३४६ मध्यें चोवीस परगण्यांतील फुलिया नामक गांवीं झाला असून त्याचा आजा मुरारी ओझा हा श्रीहर्ष याच्या वंशांतील १९ वा पुरुष असून कृत्तिवासाचा बाप वनमाली नामक होता. कृत्तिवासानें आपले चुलते, भाऊ वगैरेंसंबंधीं बरीच माहिती दिली आहे. अकराव्या वर्षापासून तो एका शाळेंत जाऊन संस्कृत व्याकरण व काव्य शिकूं लागला. शिक्षण पुरें झाल्यावर पंडितांकडून मान्यता मिळविण्याकरितां त्यानें संस्कृत पांच श्लोक रचून राजाकडे पाठविले. राजा खुष होऊन त्यानें कृत्तिवासास रामायण बंगाली भाषेंत आणण्याविषयीं सांगितलें व अशा रीतीनें बंगाली रामायणाचा जन्म झाला. तुलसीदासाच्या रामायणाची जशी लोकप्रियता उत्तरहिंदुस्थानांत

आहे तशी कृत्तिवासाच्या रामायणाची बंगाल्यात आहे. [दिनेशचंद्रसेन-हिस्टरी ऑफ बंगाली लिटरेचर.]

कृप—गौतमकुलोत्पन्न शरद्वान् ऋषीचा तपोभंग व्हावा म्हणून इंद्रानें जानपदी नावाची अप्सरा त्याच्याकडे पाठविली. तिच्या दर्शनानें त्याचें रेतपतन पावलें व त्यापासून जुळीं मुलें झालीं. या मुलाचें शंतनु राजानें कृपेकरून पालन केलें म्हणून कन्येस कृपी व कुमारास कृप (शरद्वत ऋषीचा पुत्र) अशीं नांवें पडलीं म्हणून यास शारद्वत व गौतमकुलोत्पन्न म्हणून गौतम असें म्हणत असत. कृपी द्रोणाचार्यास दिली होती. कृप हा पुढें धनुर्विद्येंत निपुण झाला, म्हणून कृपाचार्य हें नांव त्यास मिळालें. कौरवपांडवांस द्रोणाचार्यांपूर्वी हाच धनुर्विद्येचें शिक्षण देत असे. भारती युद्धांत हा दुर्योधनाकडे होता व सर्व कौरव मरण पावल्यावर यास पांडवांनी आपल्या जवळ आश्रय दिला होता.

हा चिरंजीवी असून पित्याच्या शरद्वान् या नांवानेंच सावर्णि मन्वंतरांत सप्तर्षीपैकीं एक होणार आहे [भाग. स्कं. ९ अ २१. भारत आदिपर्व अ. १३०; कर्णपर्व. अ ५४, सौप्तिकपर्व अ. १०; शल्य. अ. ४ वगैरे]

कृपाराम—(१) एक गणितज्ञ. बीजगणित, मकरंद, यंत्रचिंतामणि या ग्रंथांवर याच्या टीका आहेत वास्तुचंद्रिका या नांवाचा याचा एक स्वतंत्र ग्रंथ आहे हा कृपाराम शके १४८० च्या सुमाराचा असावा [दीक्षित-भारतीय ज्योतिषशास्त्र]

(२) लाला कृपाराम या नांवाचा हा हिंदुस्थानी कायस्थ ब्राह्मण जयपूरकर सवाई जयसिंगाच्या पदरीं हुषार मुत्सद्दी म्हणून नावाजलेला होता यानें थोरले बाजीराव पेशवे व सवाई जयसिंग यांचा स्नेह घडवून आणला. तसेंच खानडौरान वजीर बाजीरावावर चालून आला असता (१७३७) यानें परस्परांचा कज्जा होऊं दिला नाहीं वगैरे कारणावरून याला जयपुरास मराठ्यातर्फे वकिलीच्या कामगिरीवर नेमलें याचा मुलगा (तुळजाराम), नातू (सेवकराम) व पणतू (चिमणलाल व गुलाबराय) हेहि अखेरपर्यंत मराठ्यांचे वकील म्हणून निरनिराळ्या दरबारीं काम करीत होते याची जात हिंदुस्थानी कायस्थ ब्राह्मण म्हणून रियासतकार देतात पण त्यांच्या या जातिनिर्देशाचा अर्थ लागत नाहीं [मराठी रि म. वि.]

कृमिसमूह—(वर्म्स) कृमि किंवा वळवळणारे जंतू ह्यांचा एक फार मोठा समुदाय बनलेला आहे हा कृमिसमुदाय अनेक भिन्नजातीय कृमिवर्ग मिळून झालेला आहे व परस्पर भिन्न असे १२ वर्गांचे कृमी ह्यांचा समावेश यांत करण्यांत येतो. परंतु या वर्गांच्या प्राण्यांचा आपापसांतील संबंध अजून पूर्णपणें उलगडलेला नाहीं 'कृमि' म्हणून संबोधिलेल्या सर्वसामान्य प्राण्यांचे दोन कृत्रिम भाग करतात. एका भागांत वर निर्दिष्ट केलेले १२ वर्ग येतात. यांतील प्राण्यांच्या शरीराची ठेवण अशी बनलेली असतें कीं, त्याचें शरीर एकामागून एक अशीं लागलेलीं वलयें अथवा लहान लहान खंड यांचें झालेलें नसून तें सरसकट सपाट अथवा वर्तुलाकार अखंड असें झालेलें असतें दुसऱ्या भागांत मोडणाऱ्या कृमिवत् प्राण्यांचें शरीर हें एकामागून एक अशी लागलेलीं वलयें अथवा लहान लहान खंड मिळून झालेलें असतें व तीं वलयें किंवा ते खंड आपणाला बाह्यतः मोजतां येतात. ह्या दुसऱ्या कृमिवत् प्राण्यांचा एक स्वतंत्र वर्ग 'वलयांकित शरीरप्राणी' (ॲन्युलाटा अथवा ॲनेलिडा) असा करण्यांत येतो. कृमि ह्या प्रकरणांत पहिल्या प्रतीच्या म्हणजे अखंड शरीराच्या कृमिसमूहाचा विचार करावयाचा आहे.

पृथ्वीच्या पाठीवर जे थोडे प्राणी अगदीं पहिल्यानें उदयास आले त्यांचीं शरीरें आकारशुद्ध असून त्यांच्या शरीररचनेमध्यें तारकितांगसादृश्य प्राधान्येंकरून आढळून येतें. परंतु ह्याच प्राण्यांपैकीं कांहींनीं ती आपली आकारशुद्धता गमाविली व ज्यांचें कृमींमध्यें रूपांतर झालें त्यांनीं आपल्या शरीराचा एखादा एक विशिष्ट भाग एकाच दिशेनें नेहमीं पुढें पुढें सरकविण्याचा प्रयत्न केला व त्यामुळें जरी त्यांचे तारकितांगसादृश्य नाहींसें झालें तरी त्यांना दुसरा एक अमूल्य फायदा झाला तो हा कीं, त्यांच्या शरीराला शीर्ष व पार्श्वभाग हे प्राप्त झाले. या पुढच्या भागावर किंवा शीर्षावर साहाजिकच आजूबाजूच्या व सभोंवारच्या पदार्थांचा पहिल्यानें संस्कार होऊन त्या भागांत ज्ञानग्राहक ज्ञानपेशी विशेष पूर्णतेस आल्या व त्या भागांत शीर्षज्ञानकेंद्रा (सेरिब्रल गॅंग्लिअन) चा उदय झाला या अमल्या क्षुद्र कृमींच्या शीर्षज्ञानकेंद्राची उत्पत्ति व मेंदूचा आरंभ यांच्यांत साम्य दिसून येतें हें सुज्ञ वाचकाच्या ध्यानांत आलेंच असेल कारण डोकें पुढें पुढें हलविण्याची ही फायदेशीर संवय व मेंदूची घटना ह्यांचा परस्पर निकट संबंध आहे असें दिसून येतें.

कृमिसमूहामध्यें आणि त्याच्या नंतरच्या सर्व वरिष्ठ प्राणिवर्गामध्यें दोन विशिष्ट गोष्टी आढळून येतात त्या दोन गोष्टी आद्यजंतु (प्रोटोझोआ), समुदित सच्छिद्र (पोरिफेरा) व शारीरांत्रिक गूहक (कोलेन्टेराटा) ह्या तिन्ही वर्गांमध्यें मुळींच आढळून येत नाहींत. या दोन गोष्टी म्हटल्या म्हणजे कृमी व त्यांच्या वरिष्ठ वर्गांतील सर्व प्राण्यांमध्यें सांपडणारें मध्यास्तर (मेसोब्लास्ट) व शरीरगुहा (कोलोम) ह्या होत बाह्यास्तर (एपिब्लास्ट) आणि अंतरास्तर (हायपोब्लास्ट) यांच्यामध्यें उत्तम प्रमाणावर दिसणारें मध्यास्तर आणि पचनेंद्रियनलिकेपासून निराळी अशी शरीरगुहा आपणास यापुढें ह्यांच्यापेक्षा वरिष्ठ प्राण्यांच्या समुदायांत सदोदित आढळण्यांत येतील. कृमिसमूहामध्यें त्या दोन गोष्टी हळू हळू दृश्यमान होत जातात. अगदीं कनिष्ठ दर्जाच्या कृमिकुलांत मध्यास्तर आणि शरीरगुहा बहुतेक नसतातच असें म्हटल्यास चालेल कृमिसमूहांतील दोन संघांचा

येथें विचार करूं. हे दोन संघ म्हटले म्हणजे एक पर्णकृमि ( प्लॅटिहेल्मिंथीस ) आणि दुसरा वर्तुलाकार कृमि ( नेमाथेल मिंथीस ) हे होत. या दोन संघाचा वलयांकित शरीरप्राणि ( अन्युलाटा )संघाशीं कांहीं संबंध नाहीं; कारण या दोन संघातील कृमी अखंडशरीर असतात म्हणजे त्यांच्या शरीरात वलयासारखे विभाग दिसून येत नाहींत

पर्ण कृमि संघ—(प्लॅटिहेल्मिन्थीज) पर्णकृमि या संघात प्राण्याचें शरीर बहुतेक चपटलेलें असतें. ह्या संघ परंपरा असलेल्या तीन मुख्य वर्गांचा मिळून झालेला आहे व त वर्ग टर्बिलेरियन्स ट्रिम्याटोडस व सेस्टोडस हे होत याच्यात मध्यास्तराचा भाग वरून खाली किंवा पृष्ठोदरतलरीत्या पॅरेंकायमा नावाच्या घट्ट पेशिसमुच्चयाचा बनून झालेला आहे. याच्यात शरीरगुहा अशी बनलेली नसते, शीर्षाच्या भागात मेंदुवत शीर्षज्ञानकंदाचा आरंभ नुकताच झालला आढळतो. मलोत्सर्गाचें इंद्रिय शरीराच्या दोन्ही अंगाला दोन नळ्याच्या रूपानें बनलेलें असून त्या नळ्यांना लहान लहान असंख्य फाटे फुटलेले असतात आणि या फाट्याच्या शेवटीं चमत्कारिक पेशी बनलेल्या असतात त्यांना ज्योतपेशी (फ्लेमसेल्स) म्हणतात ह्या संघातील बहुतेक सर्व कृमी उभयलिंगी आहेत. ह्या तीन वर्गांतील कृमींविषयीं कांहीं गोष्टी लक्ष्यात ठेवण्याजोग्या आहेत त्या या कीं, बहुतेक सर्व टर्बिलेरियन कृमी जमिनीमध्यें अगर पाण्यामध्यें स्वतंत्र पर्णे राहतात. परंतु सर्व ट्रिम्याटोड वर्गातील कृमी परोपजीवी आहेत. म्हणजे त्यांचें स्वतःचें पोषण व उपजीविका दुसऱ्या एखाद्या प्राण्यावर अवलंबून असते. याच्यातील कांहीं कृमी दुसऱ्या प्राण्याच्या शरीराला बाह्यतः घट्ट चिकटून असतात तर कांहीं कृमी दुसऱ्या प्राण्याच्या शरीरात प्रवेश करुन तेथेंच आपला काळ कंठितात असले दोन्ही तऱ्हेचे बाह्य व अंत परोपजीवि कृमी ट्रिम्याटोड वर्गात आढळतात. सेस्टोड वर्गांतील कृमी दुसऱ्या प्राण्याला बाहेरून चिकटलेले नसतात, परंतु ते त्या प्राण्याच्या शरीराच्या आतील भागीं कायमचें ठाणें देऊन बसलेले आढळतात. म्हणून सेस्टोड कृमींना अंतःपरोपजीवी (इन्टर्नल पॅरासाइट) कृमी म्हणतात.

विशालकृमिसंघातील सर्व कृमींमध्यें ज्योतपेशी आढळतात. मलोत्सर्जक नळ्याच्या बारीक फाट्याचें प्रत्येक टोंक एका पोकळ पेशीमध्यें शेवट पावतें व त्या पेशीच्या तळाला आतून हालणारे नाजूक केस लागलेले असून ते एकसारखे दिव्याच्या ज्योतीप्रमाणें हालत असतात. म्हणूनच ह्या पोकळ पेशींना " ज्योतपेशी " म्हणून संबोधण्यात येतें.

वर्ग पहिला, टर्बिलेरिया, लक्षणें:—यातील कृमी अखंड शरीर असतात म्हणजे त्यांच्या शरीराचे बाहेरून वलयं किंवा दुसऱ्या तऱ्हेचे खंड झालेले असे विभाग पडलेले दिसत नाहींत. त्यांच्या शरीराचा आकार पर्णासारखा अथवा पानासारखा असतो. हे कृमी गोड्या किंवा साठलेल्या अगर खाऱ्या पाण्यात सापडतात. दलदलीच्या ओल्या जागेंतहि हे कधीं कधीं आढळतात. हे कृमी मांसाहारी आहेत. याच्यातील क्वचितच एखादा कृमि परोपजीवी असा आढळतो. ह्या कृमींच्या शरीराच्या रचनेंत विशेषतः पहिल्यानेंच उभयाग्रसादृश्य आढळून येतें. बाह्यत्वचेवर केसाची लव बनलेली असून त्यात पुष्कळ वेळा पिंडपेशी बनलेल्या असतात व " ऱ्हावडाइट " नावाचे लहान लहान दांडेहि झालेले असतात

हे दाडे कृमीला डंवचल्यास बाहेर बाणासारखे उडतात. शरीराच्या पूर्वभागात ज्ञानकंदाची (ग्यांग्लियन) जोडी बनलेली असते; व त्या ज्ञानकंदापासून दोन ज्ञानरज्जू निघून शरीरात पसरतात. पचनेंद्रिय(फूड कॅनाल)नलिकेला बाहेर पडूं शकेल असें मांसल गलविवर ( फॅरिंक्स ) असतें व तिला पुष्कळ फाटे फुटलेले असतात परंतु नलिकेच्या शेवटीं गुदद्वार झालेलें नसून तीं वद्द असते. या कृमींच्या शरीरात रक्तवाहिन्या अगर श्वसनेंद्रियें आढळून येत नाहींत. शरीरगुहा जवळ जवळ झालेली नसतेच असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. मलोत्सर्गेंद्रिय ( एक्सक्रीटरी सिस्टिम) दोन उभ्या नळ्यांच्या रूपानें झालेलं असतें व त्या नळ्यांना असंख्य फाटे फुटलेले असतात व प्रत्येक फाट्याच्या शेवटीं " ज्योतपेशी " लागलेली असते. ह्या वर्गांतील बहुतेक सर्व कृमी उभयलिंगी असतात. यांचीं अंडीं कवचानें अगर कोशानें झाकलेलीं असतात व परिपूर्णतावस्थेत त्यांची वाढ होत असताना त्यांच्यात वेळेवर रूपांतरें होत असलेलीं आढळून येतात. याच्यातील कांही प्राण्यामध्यें प्रजाजनकत्व प्राणी विभागून जाऊन होत असतें. ह्या टर्बिलेरिआ कृमींमध्यें व शारीरानैक गुहकामध्ये कांहीं आप्तसंबंध असावा असें दिसतें व विशेषकरुन याच्यात व ककतसमगात्रजीवामध्यें तो जास्त असावा.

वर्ग दुसरा ट्रिम्माटोडा लक्षणें:—यातील कांहीं कृमी पर्णाकृति असतात व कांहीं नळकंड्यासारखे गोल असून ते बाह्य किंवा अंतःपरोपजीवी कृमी आहेत. त्यांच्या या परोपजीवी राहणीमुळें त्यांच्या आगावर केंसासारखी लव आढळून येत नाहीं, पुन्हा दुसऱ्या प्राण्यांना बिलगून राहता येईल अशा तऱ्हेच्या तुंबडीवजा कित्येक चोषणतवकड्या लागलेल्या असतात व कित्येक वेळा या तवकड्यांना आकडे बनलेले असतात. यास जाड असें बाह्यत्वचावरण बनलेलें नसतें व बाह्यत्वचाहि पुढें बहुतेक नामशेष होते. इंद्रियबोध होणारे अवयवहि झालेले नसतात. या वर्गांतील कृमी, त्यांचे पूर्वज जे टर्बिलेरिया या वर्गांतील स्वतंत्र कृमी याच्याप्रमाणेंच असावेत असा अंदाज आहे. कारण टर्बिलेरिया कृमींप्रमाणें ट्रिमाटोड कृमींमध्यें शरीर अखंड असतें, शीर्षज्ञानकंद व त्याच्यापासून पूर्व व पश्चिम शेवटीं जाणाऱ्या दोन ज्ञानरज्जू असतात. शरीरगुहादि अस्पष्ट असते व मलोत्सर्जक नळ्या व त्यांचे असंख्य फाटे

फुटणें या क्रिया आढळून येतात. तसेंच ट्रिमाटोड कृमी उभयलिंगी असून त्यांचीं जननेंद्रियें गुंतागुंतीचीं बनलेलीं असतात. तथापि यांच्यामध्यें जननेंद्रियें, मलोत्सर्ग-इंद्रियें व ज्ञानेंद्रियें टर्बेलेरिया कृमींच्यापेक्षा जास्त पूर्णत्वानें विकास पावतात. पचनेंद्रियनलिका बहुतकरून दुभागून जाते व तिला पुष्कळ वेळा फाटे फुटतात व ती पश्चिमशेवटीं बंद असते. या वर्गांतील सर्व कृमी परोपजीवी असतात हें सांगितलेंच आहे. ते बाह्यपरोपजीवी अगर अंत:परोपजीवी असतात व ते एखाद्या सपृष्ठवंश प्राण्याला किंवा अपृष्ठवंश प्राण्याला चिकटलेले आढळतात. या वर्गांतील पुष्कळ असे आहेत कीं ते स्वतः स्वतंत्र रीतीनें फलद्रुप होऊं शकतात, तर दुसऱ्यामध्यें फलद्रुपता एकमेकांचा संयोग झाल्याशिवाय घडून येत नाहीं. बाह्यपरोपजीवी कृमी परिपूर्णतावस्थेंत सरळ सारखे विकास पावत नाहींत, व बहुतकरून त्यांचा दर पिढींत थोडा फार विकार होत असतो. ज्या कृमींचा सरळ सारखा विकास होत नाहीं व ज्यांची वाढ पूर्ण होण्यास दोन बाहेरचे परजीव लागतात ते कृमी आपल्या आयुष्याचा परिपूर्णतावस्थेंतील थोडा काल पुष्कळ वेळा एखाद्या अपृष्ठवंश प्राण्यामध्यें घालवितात.

ह्या कृमिवर्गांत यकृत-कृमी वगैरेसारखे प्राणी मोडतात. हे यकृत-कृमी मेंढराच्या यकृतात व पित्तस्रोतसात आढळतात. त्यांच्यामुळे मेंढराची फार हानि होते. या कृमींच्यामुळें होणाऱ्या रोगाला नुसत्या ग्रेटब्रिटनमध्यें १० लाख मेंढरें प्रतिवर्षी बळी पडतात. हे कृमी घोड्यांमध्यें, हरणामध्यें, उंटामध्यें व इतर गुरामध्यें देखील आढळतात.

*व र्ध ति स र:*—सेस्टोडा या वर्गांतील कृमी दुसऱ्या प्राण्याच्या शरीराच्या आत रहाणारे परोपजीवी प्राणी होत. यांच्या आयुष्यक्रमांत दोन स्थित्यंतरें होत असतात. पहिल्या स्थित्यंतराला प्रोस्कोलेक्स म्हणजे फुग्याची अवस्था म्हणतात. या सुमाराला हा कृमि अपृष्ठवंश अथवा सपृष्ठवंश यांपैकीं एखाद्या प्राण्यामध्यें सांपडतो. दुसरें स्थित्यंतर म्हटलें म्हणजे स्ट्रोबीला म्हणजे नाडीकृमि अथवा फीतकृमिअवस्था होय. ह्या अवस्थेंत असलेला कृमि एका अपवादाखेरीजकरून सपृष्ठवंशांतील प्राण्यामध्येंच तेवढा आढळतो. ह्या वर्गांतील कांहीं कृमींमध्यें शरीर अखंड असलेलें आढळतें. तर दुसऱ्यांत बाह्यतः शरीर अखंड दिसतें तरी आतून त्यांचीं जननेंद्रियें ओळीनें क्रमशः बनलेलीं आढळतात. दुसऱ्या पुष्कळ कृमींत शरीर साखळीप्रमाणें अनेक तुकड्यांचें बनलेलें असून त्या तुकड्यास प्रोग्लॉटीडिझ् म्हणतात व प्रत्येक प्रोग्लॉटीडमध्यें जननेंद्रियांचें जोड झालेले असतात. तेव्हां ह्या वर्गांत अखंड शरीरांतून खंडसहित शरीरांत संक्रमण होत असलेले कृमी आढळतात. तरी पण या शेवटल्या प्रकाराच्या कृमींत शरीराचे खंड स्पष्ट रीतीनें बनलेले नसतात.

या वर्गांतील मुख्य उदाहरण म्हटलें म्हणजे लांब जंत हें होय. हा कृमि फितीसारखा लांबलचक असतो. ह्याचें शरीर म्हटलें म्हणजे अनेक खंडांची मिळून झालेली माळ होय. या प्रत्येक खंडाला प्रोग्लॉटीड म्हणतात. व त्या प्रत्येक खंडांत जननेंद्रियें बनलेलीं असतात. ह्या फितीसारख्या दिसणाऱ्या कृमीचें शरीर उभयागसदृश असतें. शरीराच्या पूर्वशेवटीं शीर्षाप्रमाणें भाग असून त्याला आकडे अगर सांखण्या असतात. तसेंच चोषणचक्त्या लागलेल्या असतात. आकड्यांच्या व चकत्यांच्या साहाय्यानें ह्या कृमींना दुसऱ्या प्राण्याच्या पचनेंद्रियनलिकेला चिकटून राहतां येतें. शरीरावरण अथवा शरीरभित्ति ही काही धातूंचे थर मिळून बनलेली आहे. तिचा बाह्य थर हा ज्ञानतंतुमय बाह्यत्वचेचा बनलेला असून त्यावर पातळ त्वक्पापुद्रा ( क्यूटाइड ) आलेला असतो. त्याच्या आंतील थर सारख्या लव व रंद पेशीनिर्मित संयोजक धातूचा झालेला असतो व पुष्कळ वेळां याच्या पृष्ठावर चुनखडीक्षाराचें मिश्रण झालेलें असतें या संयोजक धातूच्या थराच्या खालीं उभे व आडवे अशा रीतीनें लागलेल्या बिनपट्ट्यांच्या स्नायूंचा दुहेरी थर झालेला असतो. ज्ञानेंद्रियसमूह हा दोन अगर अधिक उभ्या ज्ञानरज्जूंचा मिळून झालेला असतो व त्या रज्जू पूर्वशेवटीं आडव्या ज्ञानरज्जूंच्यामुळें जोडल्या जातात. या प्राण्यांत विशिष्ट ज्ञानेंद्रियें बनलेलीं नाहींत. ह्याला पचनेंद्रियनलिका नसते व तिची त्याला गरजही नाही. कारण हा कृमि दुसऱ्या प्राण्याच्या शरीरांतील पचन झालेल्या अन्नरसांत तरंगत असतो, व हा आपल्या शरीराच्या सर्व भागांनीं तो अन्नरस शोषून घेतो. रक्तवाहिन्यासमूह किंवा श्वसनेंद्रियें ह्या कृमींमध्यें सांपडत नाहींत. या प्राण्यांत शरीरगुहा म्हटली म्हणजे सारख्या लांब रुंद पेशीनिर्मित संयोजक धातूच्या त्या पेशींतील विस्कळीत अंतरचिरा ह्यांचीच बनलेली आहे. या शरीरगुहेमध्यें मोठें कोठें ज्योतपेशी असलेल्या आढळून येतात. ह्या ज्योतपेशी मलोत्सर्जक इंद्रियाच्या नळ्यांच्या अगदीं बारीक फाट्यांच्या शेवटीं लागून असतात. ह्या मलोत्सर्गनलिका शीर्षामध्यें एकमेकांशीं आडव्या वर्तुलाकार नलिकेनें जोडल्या जातात. तसेंच एका आडव्या नलिकेनें त्या शरीराच्या प्रत्येक खंडामध्यें जोडल्या जातात व शरीराच्या शेवटीं एक किंवा अधिक रंध्रांनीं उघडतात सर्व प्रकारचे लांब कृमी उभयलिंगी आहेत व बहुतेकांमध्ये अंडीं स्वतःच्या शरीरांतच स्वतःच्या शुक्रबीजांशीं संयोग पावून फलद्रुपता पावतात पसरट असें बनलेलें मुष्क एक शुक्रस्रोतस व त्याचा बाहेर काढतां येण्याजोगा अंतिम शेवटचा भाग, ज्याचा शिश्नाप्रमाणें उपयोग होतो तो, असे मिळून पुंजननेंद्रिय झालेलें आहे. स्त्री... मध्यें दोन अंडकोश, पलकपिंड, कवचपिंड, ज्याच्यामध्यें शुक्रबीजाचा प्रवेश होतो तो, शुक्राशय

मध्यें शुक्रबीज साठलें जातें तेंच गर्भाशयाचा भाग, ज्याच्यात अंडी विकास पावतात तो, इतक्याचा समावेश होतो. फलद्रुप झालेल्या अंड्यापासून गर्भ तयार होतो व तो प्रोस्कोलेक्स अथवा फुग्याची अवस्था हात स्थित्यंतर पावतो. ही अवस्था त्याला दुसऱ्या विवक्षित प्राण्याच्या शरीरात प्राप्त होते व ह्या अवस्थेत शीर्षाचा भाग घडला जातो. ही प्रोस्कोलेक्स अथवा फुग्याची अवस्था पावलेला कृमिगर्भ ज्या प्राण्याच्या शरीरात वसतो तो प्राणी दुसऱ्या एखाद्या प्राण्याकडून खाल्ला गेल्यास त्या दुसऱ्या प्राण्याच्या पोटात ह्या कृमीची दुसरी मागाम येणारी अवस्था पूर्णत्व पावते. ह्या दुसऱ्या स्थित्यंतरास स्कोलेक्स म्हणतात व त्यापासून लावकृमि अथवा नाडीकृमि बनून तयार होतो. एकंदरीत हे कृमी अंतःपरोपजीवी प्राणी असल्याकारणानें याच्यात बाह्यवस्तूला अडकून रहाण्याची अवयवरूपी साधनें बनले ली असतात. तसेंच त्याच कारणामुळें याच्यात विशिष्ट ज्ञानेंद्रियें झालेली नसून ज्ञानेंद्रियसमूह थोडासा गुंतागुंतीचा बनलेला असतो. तरी तो खालच्या दर्जाचा आहे. याची पचनेंद्रियनलिका बनलेली नाहीं व ह्या प्राण्यात फलद्रुपता विपुलतेनें आढळून येते.

लाव जंत —(टीनिआसोलियम) लावजंत अथवा नाडीकृमि याला इंग्रजी भाषेत टेपवर्म म्हणतात. हा कृमि वर सांगितल्याप्रमाणें फितीसारखा लवलवक असतो. याचा रंग पांढरा असतो. पूर्ण वाढ झाल्यावर याची लांबी सहा फूट भरते. ह्या कृमीचें शीर्ष मनुष्याच्या पचनेंद्रियनलिकेच्या आंत्राच्या भिंतीला रोवलेलें आढळतें. मनुष्यप्राण्याला ह्या कृमीमुळें फार त्रास पोंचतो व विशेषतः डुकराचें मांस खाणाऱ्या लोकांना ह्याचा मुख्यत्वेंकरून उपद्रव होतो. ह्या कृमीला त्याचा आयुष्यक्रम पुरा करण्यास त्याच्या आयुष्यात दोन निराळ्या जातीच्या सस्तन प्राण्याचा आश्रय करावा लागतो. कांहीं काळपर्यंत हा कृमि डुकराच्या पोटामध्यें अथवा मांसामध्यें सांपडतो व नंतर तो मनुष्याच्या पोटामध्यें पूर्णावस्थेत आढळतो. ह्या कृमीचें शरीर साखळीप्रमाणें असून त्या साखळीची प्रत्येक कडी ही ह्या कृमीच्या शरीराचा एक स्वतंत्र भाग किंवा खंड होय. ह्या भागाला अथवा खंडाला प्रोग्लॉटीस म्हणतात. पुढेंदेवटीं शीर्ष असतें. शीर्षाच्या चौहों अंगाला चोषणचषकें असतात. व त्याच्या वरच्या अंगाला एक आकड्याचें चक्र बनलेलें असतें. या आकड्याच्यामुळें तो आपलें डोकें मनुष्याच्या अंगाच्या भिंतीत खुपसतो. प्रत्येक प्रोग्लॉटीस खंडामध्यें जननेंद्रियाचे सर्व भाग पूर्णपणें झालेले असतात. याच्या शरीराच्या पश्चिम शेवटाचीं प्रोग्लॉटीस खंडें कांहीं वेळानें तुटून निराळीं पडतात व हीं निराळीं झालेलीं खंडें मनुष्याच्या पचनेंद्रिय नलिकेंतून मलद्वारावाटे बाहेर टाकलीं जातात. ह्या प्रोग्लॉटीस खंडात लहान लहान अंडीं तयार होतात व तीं फलद्रुप होऊन त्यापासून अपक्व गर्भ टणक अंडकवचानीं आच्छादित असे बनले ल्या; व अशा अनेक टणक अंडकवचानीं तो प्रोग्लॉटीस फुगला जातो. जेव्हां हा फुगून ताणलेला खंड फुटतो तेव्हां हीं अपक्व गर्भानें भरलेलीं अंडकवचें मोकळीं होतात. जर हीं अंडकवचें विष्टाहारी डुकराच्या खाण्यात आलीं तर डुकराच्या पचनेंद्रियनलिकेंत पाचक रसाच्या क्रियेनें त्यांचीं कवचें विरघळून जाऊन त्यातील अपक्व गर्भ, ज्यांना बहुतकरून सहा आकड्याचें चक्र लागलेलें असतें असे, तेथें मोकळे होतात. हे सहा आकड्याचे अपक्व गर्भ लागलेच त्याच्या आकड्याच्या मदतीनें डुकराच्या आंत्राच्या भिंतीला आरपार भोंक पाडून त्यातून बाहेर पडतात व डुकराच्या मांसात अथवा स्नायूंत किंवा दुसऱ्या अवयवात जाऊन तेथें स्थिरता पावतात, व त्याच्या सभोंवतीं एक आवरण बनतें. येथें कांहीं वेळानें त्याची पुढील वाढ होण्यास सुरवात होते. त्याचे सहा आकडे गळून पडतात व ते आकारानें वाढूं लागतात. नंतर ते अचल राहून त्यांचेंहि फुग्याच्या अवस्थेंत स्थित्यंतर होतें व या अवस्थेंत लिंगभेद झालेला नसून ते नुसते वाढते फुगे असे झालेले असतात. ह्या फुग्याच्या अथवा 'प्रोस्कोलेक्स' अवस्थेंत त्याच्या अंतःपृष्ठापासून एका ठिकाणीं एक कोंब निघून तो फुग्याच्या पोकळींत वाढूं लागतो व त्या कोंबाचें पुढें शीर्षामध्यें रूपांतर होतें. ह्या स्थितींत त्याला फुगा असलेला कृमि म्हणतात. व अशा स्थितीप्रत पावलेले हे फुगा-कृमी डुकराच्या मांसांत वास्तव्य करून राहतात. ज्या डुकराच्या मांसात हे फुगाकृमी आहेत अशा डुकराचें दूषित मांस नकळत एखाद्या दुर्दैवी मनुष्याच्या खाण्यात आलें तर ह्या फुगा-कृमीला आपली वाढ पूर्ण करून घेण्यास संधि मिळते. ती अशी कीं त्या मनुष्याच्या पचनेंद्रियनलिकेंत या फुगा-कृमीचा शीर्षाचा भाग बाहेर पडतो. हा आकडासा कृमि त्याच्या शीर्षाच्या पाठीमागें थोड्या आखूड मानेच्या भागानें त्या मोठ्या फुग्याला चिकटलेला असतो. नंतर हा फुग्याचा भाग निराळा पडून नाहींसा होतो. का कीं तो कोणत्याही प्रकारें महत्वाचा नसतो व शीर्षाचा भाग आंत्रात येऊन त्याच्या आकड्यानीं आंत्राच्या भिंतीला चिकटून राहतो. येथें त्या शीर्षाला अन्नरसाचा पुरवठा पूर्ण मिळूं लागून तो सारखा वाढूं लागतो. त्याची पुढें वाढ होते. म्हणजे शरीराचे खंड एकामागून एक शीर्षाच्या भागापासून तयार झाले असतां पाठीमागें ढकलले जातात, व हे पाठीमागें सारलेले जुने खंड जितके शीर्षापासून लांब असतील तितके ते पक्व दशेंत येऊं लागतात, व त्यांच्यांत जननेंद्रियाची वाढ होऊं लागते. वर सांगितल्याप्रमाणें हे अगदीं शेवटले खंड त्याच्यात अंडी फलद्रुप झाल्यावर निराळे पडतात व मनुष्याच्या विष्टेबरोबर बाहेर निघतात. ही विष्ठा डुकरानें खाल्ली असता त्याच्या शरीरात त्याचा प्रवेश होतो व पुढें वर वर्णन केल्याप्रमाणें त्याची वाढ होते. त्याच्यापासून मनुष्याला उपद्रव होतो. म्हणून ह्याच्या विषयींची माहिती महत्वाची आहे. ह्या जंताचा उपद्रव होण्यास मध्यस्थी प्राणी डुकर होय. डुकराचें मांस

शिजविल्यावर त्यांच्यांत एखादा कुणाकृमि जिवंत राहिला तर तो ते मांस खाणाऱ्या मनुष्यामध्यें छूटकून वाढून त्याला उपद्रव करितो.

टीनिआ मिडीओकॅनेलाटा हा जातिविशेषहि वरच्याप्रमाणेंच " टेपवर्म " ह्या नांवानें संबोधिला जातो, व तो मनुष्याच्या अंगामध्यें वाढतो. ह्याच्या शीर्षाला आंकडे नसतात. ह्या जंताचा उपद्रव होण्यास मध्यस्थ प्राणी म्हटले म्हणजे गाई, बैल हे होत. गाईच्या किंवा बैलाच्या मांसांत ह्याचे कुणाकृमि बनतात व गाईचें किंवा बैलाचें मांस खाणाऱ्यास ह्याचा उपद्रव होतो. ग्रेटब्रिटनमध्यें ह्याचा उपद्रव फार होतो.

टीनिआ ईकायनोकॉकस म्हणजे कुत्र्यात व लाडग्यात सापडणारा " टेपवर्म " होय. त्याच्या शरीराला चार खंड असतात व चवथा खंड सर्वांत लांब असतो ह्याच्यापासून मनुष्याला उपद्रव होतो. मनुष्याच्या यकृतामध्यें किंवा दुसऱ्या अवयवात पुळीचा विकार ह्याच्या गर्भाच्या फुग्याच्या स्थित्यंतरामुळें होतो. दूषित पाणी प्याल्यानें हे अपक्व गर्भ कवचाच्छादित अंड्याच्या रूपानें मनुष्याच्या पचनेंद्रियनलिकेमध्यें शिरतात. पाण्यातहि अशा तऱ्हेचीं अंडीं कुत्र्याच्या किंवा लाडग्याच्या विष्ठेतून प्रवेश करितात. पर्वतावरील पाण्याचें डबकें ओहोळ वगैरे अशा रीतीनें दूषित झालेले असतात तेव्हा तेथले पाणी पिणें फार धोक्याचें आहे. हा कृमि कुत्रा किंवा लाडगा ह्याच्या शरीरात विकास पावतो व मनुष्य हा त्याचें स्थित्यंतर होण्यास लागणारा मध्यस्थ प्राणी होय.

व र्तु ला का र कृ मि सं घ ( नेमॅथेल्मिंथिस ).—ह्यातील कृमी आकारानें बहुशः लंबवर्तुलाकार असतात. म्हणून त्याना वर्तुलाकार कृमी म्हणतात. या संघातील खऱ्या वर्तुलाकार कृमींचा एक वर्ग आहे त्याला वर्तुलाकारकृमि किंवा जंत म्हणतात व या वर्गातील जंत काहीं अंतःपरोपजीवी आहेत तर दुसरे पुष्कळ जंत स्वतंत्रपणें गोड्या किंवा खाऱ्या पाण्यात वावरणारे कृमी आहेत.

व र्तु ला का र कृ मि व र्ग.—( नेमॅटोडा ) ह्या वर्गातील कृमी शरीरानें अखंड असून त्यापैकीं काहीं परोपजीवी आहेत तर काहीं स्वतंत्रपणें कालक्रमणा करणारे आहेत. ह्या कृमींच्या शरीराच्या त्वचेवरील त्वक्पापुद्रा पुष्कळ वेळा घट्ट किंवा जाड असा बनलेला असतो व पुष्कळवेळां तो झडून पडतो किंवा टाकिला जातो. याच्या शरीरातील स्नायूंची रचना लायट मांसपेशी उभ्या बनून झालेली असते व पार्श्वभागीं दोहोंकडे त्याच्यामध्यें अंतर राहून दोन पट्टीरेषा ( लॅटरल लाइन्स ) झालेल्या दिसतात. अन्ननलिकेसभोंवतीं ज्ञानरज्जूंचें एक वलय झालेलें असतें, व त्यापासून सहा ज्ञानरज्जू शरीराच्या पूर्वभागीं जातात व सहा पश्चिमभागीं जातात. पचनेंद्रियनलिका चांगली विकास पावलेली असते व तिला मुख व गुदद्वार झालेलें असून तिचे तीन विभाग आढळून येतात. रक्तवाहिनीसमूह व श्वसनेंद्रियें बनलेलीं नाहींत व शरीरातील पोकळी ही शरीरगुहा नव्हे. मलोत्सर्गाच्या इंद्रियाची रचना विलक्षण असून ती दोन बाजूंवर बनलेली असून त्या दोन्ही वाहिन्या पूर्वशेवटीं एकच सामान्य छिद्रानें उघडतात. ह्या कृमींमध्यें बहुश: लिंगभेद झालला असतो, ते क्वचितच उभयलिंगी आढळतात. जननेंद्रियें जरी साध्या प्रकारचीं बनलेलीं असलीं तरी नर व मादी ह्यामध्यें ठळक भेद दिसून येतो. ह्या कृमींचा एकंदर आयुष्यक्रम गुंतागुंतीचा असतो विशेष लक्षात ठेवण्यासारख्या काहीं गोष्टी आढळून येतात त्या ह्या कीं, त्याच्यामध्यें शुक्रबीज मंदगति कामरूप पेशीप्रमाणें असतें. केशरूपी लव मुळींच झालेली नसते व फिरत्या रक्तश्वेतपेशी ( मायग्रेटरी फॅगोसाइट्स ) बनलेल्या नसतात

जं त (अस्केरिस लुंब्रिकॉइड्स):–हे जंत मनुष्याच्या तन्वांत्रात बहुश: सापडतात. ह्याच जातीचे दुसरे जंत घोड्यामध्यें बैलामध्यें आणि डुकरामध्यें सापडतात. दोन्ही शेवटीं निमुळती झालेली नलिका असते त्याप्रमाणें ह्याच्या शरीराची आकृति बनलेली असते. व ह्याच्या कातडीला कोणताच दुसरा रंग नसतो. फक्त ती पांढरी असते पकारेडो म्हणजे प्राऊस ह्या पक्ष्याच्या नोचात्रात अगदीं बारीक जंत असतात ते जिवंतपणीं पारदर्शक असल्याकारणानें दिसून येत नाहींत. याच्यात नर मादीपेक्षा लहान असतो, व त्याच्या पुच्छाचा भाग अर्धवर्तुलाकार कमानीप्रमाणें वळलेला असतो, व त्याला दोन शृंगमय कंटक लागलेले असून त्याच्या पृष्ठावर पुष्कळ इंद्रियबोधक उंचवटे झालेले असतात. मादीमध्यें अंडीं अतोनात तयार होतात व तीं तिच्या गर्भाशयाप्रमाणें असणाऱ्या अंडस्रोतसाच्या भागात शुक्रबीजाशीं संयोग पावून फलद्रूप होतात फलद्रूप झाल्यानंतर त्या प्रत्येक अंड्यासभोंवतीं एक कवच तयार होतें व अशा स्थितींत तीं मनुष्याच्या विष्ठेबरोबर बाहेर पडतात. हीं अंडीं विकास पावून त्यापासून जंत कसे तयार होतात ह्याबद्दल संपूर्ण निश्चित माहिती प्रथित नाहीं. तथापि काहीं प्रयोगाच्या परिणामावरून इतकें निश्चितपणें म्हणण्यास हरकत नाहीं कीं ह्याचा मनुष्याला संसर्गदोष होतो तो स्वतन्त्रपणेंच होतो ह्याच्या मध्यें व मनुष्यामध्यें ज्याच्यापासून त्याचा त्याला संसर्ग जडेल असा कोणी दुसरा मध्यस्थ प्राणी नसतो. बहुतकरून परिपूर्तितावस्थेतील वाढ होत असलेलें व ज्याच्यात अपक्व गर्भ झालेला आहे असें अंडे पाण्यातून पाणी पित असताना किंवा मातीतून चुकून व मातीच्या बरोबर मनुष्य आपल्या पचनेंद्रियात घेतो व तेथें तो अपक्वगर्भ कवचापासून मोकळा होऊन पूर्णता पावतो अशा रीतीनें जंताचा उपद्रव होतो. मुलांना माती खाण्याची संवय असते त्यामुळें जंताचा उपद्रव त्यांनां विशेष होतो. ह्या कृमीमुळें बहुधा प्राणहानि होत नाहीं. तरी हे जंत

श्वासनालेंत अगर पित्तस्रोतसांत जर शिरले तर त्याचा परिणाम भयंकर होतो.

ऑक्सियुरिस व्हर्मिक्युलेरिस — ह्या सामान्यतः आढळून येणाऱ्या कृमीला तंतुकृमि (थ्रेडवर्म) म्हणतात. मादी $\frac{1}{2}$ इंच व नर $\frac{1}{6}$ इंच लांबीचे भरतात सर्व देशांत याचा विकार होत असलेला आढळतो. मुलांना यांच्यापासून विशेष त्रास होतो. हा कृमि बहुतकरून बृहदांत्रांत व विशेषकरून गुदामध्यें वास्तव्य करून असतो. रात्रीच्या प्रहरीं यांच्या इतस्ततः संचारानें मलद्वाराला अतिशय कंड सुटते तसेंच जननेंद्रियांतहि कंड सुटते.

फिलेरिया सँग्विनिस होमिनिस अथवा फिलॅरिया बॅनक्रॉफ्टी फी ब्रान्कॉफ्ट्राय हा कृमि आस्ट्रेलिया, चीन, हिंदुस्थान, ईजिप्त आणि ब्राझिल ह्या देशांत आढळतो. परिणामीं हा फार भयंकर आहे हा कृमि तीन किंवा चार इंच लांब असून बारीक केसाप्रमाणें असतो, व याचे जथे बनतात लसिका पिंडामध्यें हे वास्तव्य करून राहतात. याचे गर्भ कवचयुक्त असून रक्तामध्यें रात्रीच्या प्रहरीं सांपडतात. हे गर्भ मच्छर रात्रीं मनुष्याला चावले असता त्याच्या रक्ताच्या द्वारें मच्छराच्या शरीरांत शिरतात. म्हणून मच्छर हा प्राणी याचा मध्यस्थ होय. या कृमीच्या संसर्गामुळें हत्तिरोग, एलिफंटिआसिस) वारूळ अथवा त्वग्रोग होतो शिवाय लघवींतून रक्त पडतें. याचा उपद्रव मुख्यतः हिंदुस्थानांत व उष्ण कटिबंधांतील प्रदेशांत होतो.

ड्रॅकन्क्युलस ( फीलेरिआ ) मेडीनेन्सीस -ह्या कृमीला नारू म्हणजे गीनिवर्म म्हणतात. याचा प्रसार हिंदुस्थानांत किरहुना एशिया, आफ्रिका, ईजिप्त देशांत आहे. ह्या कृमीमध्यें नर बहुशः आढळून येत नाहींत. मादी १३ इंचापासून ३० इंचापर्यंत लांब असते. शरीर नलिकाकार गुळगुळीत असून रंग पांढरा असतो. ती त्वचेच्या खालीं संयोजक धातुमध्यें व विशेषेंकरून पायाच्या भागांत वास्तव्य करून राहते. यामुळें त्या भागाला सूज वगैरे येते व पुळी होऊन भोंक पडतें व दुसरे शारीरिक परिणाम घडून येतात. त्या भोंकांतून पू बाहेर पडतो त्या पुवाबरोबर मादीनें घातलेली अंडीं व त्यापासून अपक्व तयार झालेले डिंब बाहेर पडतात. हे डिंब जर पाण्यांत गेले—व तसें होणें अवश्यक आहे—तर ते पाण्यांत वावरणाऱ्या सायक्लॉप्स नांवाच्या एका जातीच्या सूक्ष्म संधिपाद प्राण्यांत शिरतात. उन्हाळ्यांत ह्या प्रकारचे सायक्लॉप्स असलेलें पाणी मनुष्याच्या पोटांत गेलें असतां हे डिंब वाढूं लागतात व हा रोग त्याच्यांत उद्भवतो. तेव्हां सायक्लॉप्स हा येथें मध्यस्थ प्राणी होय. हा रोग खेड्यापाड्यांत विशेष होतो. ह्याचें कारण खेडेगांवचीं माणसें अशुद्ध पाणी गरम केल्याशिवाय तसेंच पितात हें होय. [ ले. रा. भाटावडे व प्रो. दाटे ].

आयुर्वेदीय कृमि विज्ञान —कृमी ( शरीरांत उत्पन्न होणारे किंवा बाहेरून आलेले जंतु ) दोन प्रकारानें स्थूलभेदानें आहेत. एक त्वचेवर होणारे व दुसरे शरीराच्या आंत होणारे. ते सर्व कृमी कारणभेदानें चार प्रकारचे मानिले आहेत. बाहेरचे (घाम वगैरे मळांत), कफांत, रक्तांत व विष्ठेंत होणारे. त्यापैकीं बाहेरचे मळांत म्हणजे घाम वगैरेंत उत्पन्न होणारे कृमी हे तिळाएवढालेच असून रंगानेंहि तिळासारखेच असतात. त्यास पाय पुष्कळ असून अतिशय बारीक असतात. त्यांची लिखा, व उवा अशीं नांवें आहेत. हे डोक्यांत, केसांवर व अंगावरहि होतात. यापासून गांधी, पुळ्या, कंड व मोठ्या गांठी होतात.

हे कृमी मलिन वस्त्रें पांघरणाऱ्या व घामट असणाऱ्या माणसास होतात. किंवा कांहीं शारीरिक कारणांनीं ( अजीर्ण, ताप, इत्यादि ) शरीरांतून बाहेर पडणारे मळ ( घाम वगैरे ) यामुळें स्वच्छतेनें रहाणाऱ्या माणसासहि होतात.

कृमी होण्याचीं कारणें खालीं लिहिल्याप्रमाणें —अन्न जिरलें नसतां जेवणें, गोड व आंबट फार व नेहमीं खाणें, पातळ पदार्थ जास्त खाणें, पिठाचे पदार्थ व गूळ जास्त खाणें, दिवसा झोंप घेणें, व्यायाम न करणें, दूध व मासे असे निषिद्ध संयोगी पदार्थ खाणें, हीं सामान्यतः कृमींचीं कारणें होत. विष्ठेंत होणारे कृमी उडीद, पिठाचे पदार्थ, आंबट व खारट रस व गूळ आणि भाज्या यांनीं होतात. मांस, मासे, गूळ, दूध, दहीं, आंबलेले पदार्थ यांच्या सेवनानें कफांत कृमी होतात.

विरुद्धसंयोगी जेवण, अजीर्ण, भाज्या फार खाणें इत्यादि कारणांनीं रक्तांत कृमी होतात.

ताप, तोंडाचा रंग बदलणें, पोट दुखणें, हृदयांत दुखणें, आग पडणें, भोंवळ, भात न आवडणें, अतिसार ( शौचास पातळ होणें ) हीं रक्तांत कृमी झाले असतां होणारीं लक्षणें आहेत.

कफामुळें आमाशयांत कृमी होऊन ते वाढले म्हणजे सर्व आंतड्यांत पसरतात. ते फार मोठे, चामड्याच्या वादीसारखे लांब किंवा कांहीं गांडुळासारखे किंवा धान्याला आलेल्या मोडाएवढे लहानहि असतात. ते रंगानें पांढरे, तांबूस असतात. अंत्राद, उदरावेष्ट, हृदयाद, महागुद, चुरु, दर्भकुसुम व सुगंध अशीं त्यांचीं अन्वर्थक नांवें आहेत. मळमळणें, लाळ सुटणें, अपचन, अरोचक, बेशुद्धि, ओकारी, ताप, पोट फुगणें, कृशता, शिंका येणें, व पडसें हे विकार कफजन्य कृमींनीं होतात. रक्त वाहणाऱ्या शिरांत रक्तांतील कृमी होतात. ते फार बारीक, पाय नसलेले, वाटोळे व तांबडे असतात. त्यापैकीं कांहीं इतके बारीक असतात कीं ते डोळ्यांनीं दिसत नाहींत.

केशाद, रोमविध्वंस, रोमद्वीप, उदुंबर, सहमातर, सौरस मातर अशीं त्यांचीं सहा नांवें आहेत.

विष्ठेपासून झालेले कृमी पक्वाशयांत होतात. व ते गुदद्वारांतूनच बाहेर येतात. क्वचित प्रसंगीं ते फारच वाढले

नर ते अमाशयाकडे वळतात त्यानेही रोग्याचे श्वासोच्छ्वास, ढेकर यात विष्ठेची घाण येऊ लागते ते कृमी जाड, वाटोळे किंवा चपट असतात त्यांचा रंग तांबूस, पिंवळा, पांढरा व काळा असा असतो ककेरुक, मकेरुक, सौसुराद, वसुल आणि लेलिह अशीं त्यांचीं पांच नांवें आहेत यांच्यामुळें शोषाल पातळ होणें, पोट दुखणें पोट फुगणें, कृशता, पांडुरपणा, तेजोहानता, रोमांच उभे राहणें, अग्निमांद्य, गुदद्वारास कंड सुटणें हीं लक्षणें होतात

उपचार. पोटात कृमी झाले असतील त्यांचें स्नेहन व स्वेदन करून त्यास गूळ, मांस, दूध वगैरे खाऊं घालून त्यांचा कफ व कृमी हे चाळवून रात्रीं तसेंच निजून दुसऱ्या दिवशीं सकाळीं गोमूत्रांत निम्मे पाणी घालून त्यात सुरसादि गणांतील औषधांचा काढा करून त्या काढ्यात पिंपळी, गेळफळ, व वावडिंगें याचा कल्क आणि तेल व सज्जीखार हीं घालून त्याचा बस्ती द्यावा नंतर पिंपळी, त्रिशोत्तरांचें रेचक द्यावें पोटातील कृमी बाहेर निघून जाण्याकरिता ओकारी, रेचक व बस्ती हे उपाय आहेत ओकारीचीं व रेचक औषध दिल्यानंतर सुंठ, पिंपळमूळ वगैरे दीपन औषधांनीं तयार केलेली कण्हेरी, भात वगैरे द्यावें तिखट, कडू व तुरट औषधांच्या काढ्याचें पोटावर सेचन करून अग्नि प्रदीप्त झाल्यावर अनुवासन ( तेलाचा ) बस्ती द्यावा उंदीरकानीचा पाला पिठांत मिसळून त्याच्या पोळ्या भाजून खाव्या सैंधवमिश्रित ताक प्यावें पोटांतील जंत पडून गेल्यानंतरहि महिना पंधरादिवस कडू, व तिखट औषधांचें सेवन करावें म्हणजे पुन्हा कृमी होत नाहींत डोक्यांतील कृमावर नस्यें द्यावीं रूक्ष भोजन करावें रक्तांतील कृमींवर कुष्ठावरील औषधें द्यावीं सर्व प्रकारचें दूध, मांस, तूप, गूळ, दहीं, पालेभाज्या आणि गोड व आंबट पदार्थ हे वर्ज करावे [ माधवनिदान ]

**कृषिकर्म किंवा शेती**—कृषिकर्म हा शब्द कृष् म्हणजे नांगरणें या धातूपासून झाला आहे यावरून या धंद्यास नांगर हें मुख्य साधन आहे हें उघड दिसतें फार प्राचीन काळीं रानटी स्थितींत मनुष्य असतां जंगलांतील श्वापदें मारून त्यावर तो निर्वाह करीत असावा त्यानंतर कंद, मुळें, झाडांचीं फळें व धान्य यांच्याकडे त्याचें लक्ष जाऊन त्यावर तो उपजीविका करूं लागला नंतर सभोंवतालीं उगवणारीं धान्यें याच सत्वर काहीं कृत्रिम उपायांनीं–जमीन नांगरून खतें वगैरे घालून–केलें असता पीक जास्त येऊन धान्याची जात सुधारत जाते हा शोध त्यास लागला असावा या प्रवृत्तीमुळेंच विविध शेतकी, व बागायतीचीं आऊतें मनुष्याच्या कल्पक बुद्धीमुळें निर्माण झालीं मिसरदेश, बाबिलोन व इतर प्राचीन राष्ट्रें शेतकींत प्रवीण होतीं असें इतिहासावरून दिसून येतें नाईलनदीला पूर आल्यावर केवळ लाकडी नांगराच्या साहाय्यानें जमीन नांगरून ईजिप्तमध्यें पिकांची लागवड

फार प्रीत असा शोध लागला आहे आर्यांचा अतिशय प्राचीन ग्रंथ जो ऋग्वेद त्यात कृषिविषयक पुष्कळ उल्लेख सापडतात

अक्षैर्मा दीव्य कृषिमित्कृषस्व वित्ते रमस्व बहुमन्यमान
( ऋ. मं १० सूक्त ३४ ऋचा १३ )

"हे द्यूतक्रीडा करणारे जन हो, माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवा, तुम्ही द्यूतक्रीडा करणें सोडून द्या आणि उत्तम प्रकारची शेती करून त्यापासून प्राप्त होणाऱ्या धान्य, गाई इत्यादि संपत्तीचा उपभोग घ्या, त्या संपत्तींत रममाण व्हा. त्याच व्यवसायामध्यें गवादि संपत्ति आणि भार्यापुत्रादि गृहसौख्य प्राप्त होतें असें सर्व जगत्प्रेरक अशा भगवान् सवित्यानें मला सांगितलें "

तसेंच खालीं दिलेल्या ऋचेंत तर त्याहूनहि स्पष्ट शेतकामाच व त्याकरितां लागणाऱ्या बैल, नांगर आदिकरून सामुग्रीचें वर्णन आलें आहे —

शुनं वाहाः शुनं नरः शुनं कृषतु लाङ्गलम्। शुनं वरत्रा बध्यन्तां शुनमष्ट्रामुदिङ्गय ॥ ( मं ४ सू ५७ ऋ. ४ )

शुनं नः फाला विकृषन्तु भूमिं शुनं कीनाशा अभियन्तु वाहैः।
शुनं पर्जन्यो मधुना पयोभिः शुनासीरा शुनमस्मासु धत्तम्॥
( मं ४ सू ५७ ऋ ८ )

"हे नांगरास जोडलेले बैल नांगर उत्तम रीतीनें ओढोत त्याचप्रमाणें नांगर हाकणारे शेतकरी आणि नांगर हे जमीन नांगरण्याचें कार्य आनंदानें करोत बैलांच्या गळ्यास बांधावयाच्या दोऱ्या त्रासदायक न होतील अशा रीतीनें बांधल्या जावोत आणि बैलास मारण्यास घेतलेल्या प्रातें दाचा योग्य रीतीनें उपयोग केला जावो

'हे आमचे नांगराचे फाळ जमीन उत्तमप्रकारें नांगरोत त्याचप्रमाणें नांगर ओढणाऱ्या बैलांना शेतकरी आनंदानें हाकोत आणि शेतीला उपयुक्त अशा प्रकारची सुखकर पर्जन्यवृष्टि होवो शुनासीरदेवता आम्हांस सुख प्राप्त करून देवोत "

वैदिक कालानंतर तयार झालेलें कौटिल्याचें अर्थशास्त्र या ग्रंथांत शेतकीसंबंधानें उल्लेख असून त्या खात्यावर निरनिराळे अधिकारी असत असें वर्णन आहे

महाभारतांतील सभापर्वांत नारदांनीं युधिष्ठिरास केलेल्या प्रश्नांत शेतकीसंबंधानें राजाचें कर्तव्य उत्तम रीतीनें वर्णिलें आहे

× × × ॥ कच्चित्तुष्टाः कृषीवलाः ॥ ८०

कच्चिद्राष्ट्रे तडागानि । पूर्णानि च बृहन्ति च

भागशो विनिविष्टानि । न कृषिर्देवमातृका ॥ ८१

' हे राजा, तुझ्या राज्यांतील शेतकरी संतुष्ट आहेत ना' तसेंच तुझ्या राज्यांत तलाव, विहिरी, कालवे परिपूर्ण असून त्यांचें पाणी शेतीला विभागलं गेल्यामुळें केवळ नैसर्गिक पावसावरच शेतें अवलंबून नाहींत ना?

शेतकी या शब्दाचा अर्थ जमीनीची मशागत करून तींत पीक काढणें असा केला जातो. परंतु या शब्दाची अर्थमर्यादा इतकी आकुंचित नसून पाश्चात्य देशात ती बरीच विस्तृत आहे. जीं धान्यें व फळें आपण खातों, जीं वस्त्रें प्रावरणें आपण वापरतों, जे रंग आपण उपयोगात आणतों अशा अनेक गोष्टी मनुष्यप्राण्यास उपयोगाच्या आहेत त्या सर्व आपणास वनस्पती व प्राणी यांपासून मिळतात ज्वारी, भात, गहूं, कापूस, नीळ, साखर हीं जमीनीची लागवड केल्यानें तयार होतात व दूधदुभतें, लोणी, रेशीम, लोंकर व चामडीं हीं प्राण्यापासून पैदा होतात म्हणून शेतीकरितां व दुधासाठीं गुरें बाळगणें, लोंकरीसाठीं बकऱ्या, मेंढ्या बाळगणें मधाकरिता मधमाशा पाळणें, रेशमाकरिता रेशमाचे किडे व त्याच्या पोषणाकरिता तुतीची व एरंडाची लागवड करणें या सर्व गोष्टींचा शेतींत समावेश होतो शिवाय कोंबडीं पाळणें वगैरेसारख्या बाबीहि शेतीत गणल्या जातात. एकंदरींत अंग मेहनतीनें अगर प्राण्याच्या किंवा यंत्राच्या सहाय्यानें जमीन कसून तींत मनुष्यांच्या व पाळीव जनावराच्या पोषणार्थ थोड्या खर्चात फायदेशीर रीतीनें जमीनीला फारसा धक्का न बसता पिकें तयार करणें याला शेती अथवा कृषिकर्म म्हटलें असता वावगें होणार नाहीं.

फुलझाडें वगैरे लावून मौजेकरिता बगीचा करतात त्याचाहि शेतींत अंतर्भाव होतो. शेतींत जिराईत, बागाईत असे दोन भाग आहेत. जिराइतात पुन्हा खरीप व रब्बी असे दोन प्रकार करतात जिराईत शेतीपेक्षा बागाईत शेतीची शेतकरी लोक जास्त काळजी घेतात कारण या शेतीला कायमचें पाणी, जास्त खर्च, पुष्कळ खतमूत व अति मेहनत लागते व याबद्दल थोड्या क्षेत्रात उत्पन्नहि जास्त येतें.

कृषिकर्माचें वर्गीकरण खाली दिल्याप्रमाणें करता येईल.— मुख्य कृषिकर्माचे दोन भाग, शेती व बागबगीचे, पैकीं शेतीचे जिराइती व बागाइती असे दोन भेद असून जिराइतीचे खरीप व रब्बी असे दोन पोटभेद आहेत. बागाइतींत विहिरीच्या किंवा पाटाच्या पाण्यावर भाजीपाला, फूलबाग, फळफळावळ हीं पिकें होतात. बागबगीच्यांत आंबराया, केंळ्याच्या बागा, पेरूंच्या बागा व फुलझाड वगैरेंचा समावेश होतो.

शे ती चा प्रा ची न इ ति हा स.—फार प्राचीन काळापासूनच शेती हा धंदा महत्वाचा आहे. या धंद्याचें महत्त्व उत्तम शेती, मध्यम व्यापार व कनिष्ठ नोकरी या फार जुन्या म्हणीवरून सहज लक्षात येईल. या धंद्याविषयीं लिहितांना पुढें नमूद केलेल्या गोष्टींसंबंधीं थोडथोडी माहिती देण्याचें योजिलें आहे. पूर्वकाळीं लोकांना देश म्हणजे चराऊ रानें, संपत्ति म्हणजे गुरें व मुख्य अन्न म्हणजे दूध असें समजलें जात असे. हल्लींसुद्धा अशा पशुपालवृत्तीवर रहाणाऱ्या अनेक जाती आढळतात गुजराथेंतील रबारी, मारवाड व चारण सातपुड्यांतील बंजारी व खिलारी; व देशावरील धनगर व कानडे लोक हे यापैकीं होत पुढें समाज वाढल्यानें जमीन कसण्यास सुरवात झाली. ती पद्धत म्हणजे जंगल जाळून त्या राखेंत धान्य पेरणें ही होय. अशी पद्धत हल्लीं डोंगरकड्यावर चालू असू॰ तिला कुमरी किंवा डाली असें म्हणतात. अशा पद्धतीनें कातवडी, वारली, कोळी वगैरे जाती लागोपाठ चार पाच वर्षे नाचणी, वरी, हरिक, काळ्या वगैरेसारखीं पिकें घेऊन ती आपोआपच सुधारावी म्हणून ८-१० वर्षें पड टाकतात ही झाली डोंगरी भागातील शेतीची स्थिती. अशा प्रकारानें शेती करणारे लोक एके ठिकाणीं स्थाइक रहात नाहींत यापुढील सुधारलेल्या शेतीची पायरी म्हणजे एके ठिकाणीं काहीं विवक्षित क्षेत्र घेऊन त्यावरच वर्षानुवर्षे शेती करणें हें होय. निरनिराळ्या धंद्यावरून जशा निरनिराळ्या जाती झाल्या आहेत. त्याचप्रमाणें निरनिराळीं पिकें करणारे लोक देखील विशिष्ट असतात जसें कोरडवाहू किंवा जिराइत पिकें कुणबी करतात, माळी फुलबागा, बागाइत पिकें, भाजीपाला व फळफळावळ करतात. पुणें, सातारा व सोलापुराकडे तिरगूळ लोक पानमळे करतात. हें काम मध्यप्रांतात बारी लोक करतात या जाती आपआपल्या धंद्यात हुषार असतात.

दिवसेंदिवस जंगलातील जमीन लागवडीस कशी येत आहे हें पुढें दिलेल्या अगदीं अलीकडील आकड्यावरून सहज लक्षात येईल. इ. स. १८९१–९२ सालीं ब्रिटिश हिंदुस्थानात १८ कोटी ७७ लक्ष एकर जमीन लागवडीस असून लोकसंख्या २४ कोटी १० लक्ष होती. तीच वीस वर्षांनंतर म्हणजे १९१०–११ सालीं २२ कोटी ३० लक्ष एकर जमीन लागवडीखालीं आली असून लोकसंख्या २४ कोटी ४० लक्ष झाली आहे व दाट अरण्याचा संहार करून जमीन लागवडींत आणण्याचा क्रम चालू आहे. मनुष्यवस्ती जसजशी वाढत गेली तसतशी कित्येक भागात जमीनीची फार टंचाई पडत चालली. पुढें जमीन सुधारण्याचे उपाय सुचले. कोठें समुद्र हटवून खारी तयार केल्या कोठें तळी, विहिरी बांधून लहान लहान ओढे अडवून शेजारच्या जमीनी बागाईत बनविल्या. हालंड देशात फार श्रम व पैसा खर्च करून समुद्र हटवून मोठमोठ्या मजबूत ताली घालून जमीनी काढलेल्या आहेत. मुंबई इलाख्यात कुलाबा व ठाणें जिल्ह्यात समुद्र खाड्या हटवून मोठमोठ्या खारी काढल्या आहेत. अशा अनेक तऱ्हेनें शेतकीची जमीन वाढवून ती सुधारण्याकरिता व उत्पन्न वाढविण्याकरिता आजपर्यंत प्रयत्न झाले आहेत व ते अद्यापि पुढें चालू आहेत.

हल्लीं जमीनीची मशागत करण्याकरिता प्रचारात असलेलीं आउतें लाकडाच आहेत. सर्व आउतात नांगर हा मुख्य आहे. नांगराचें उत्पत्तिस्थान काठी असावें काठीपासून कुदळ व कुदळीचा नांगर झाला असावा लांकडी कुदळींचा कातवडी व हेटकरी लोक डोंगरी भागांत अद्यापि

नाचणी, वरी वगैरे ठोकण्या ( पेरण्या ) करितां उपयोग करतात. हल्लीं उपयोगांत असलेले लहान व मोठे नागर हे मूळ कुदळीपासून सुधारणा होऊन झाले असावे असें वाटतें.

ह्याप्रमाणें प्राचीन काळीं खतांची किंमत लोकांना पूर्ण अवगत होती. ते शेणखत, मासळी, शेळ्यामेंढ्याच्या लेंड्या, राख, राब, राडोंडा व टहाळ (कोंवळा झाडपाला) यांचा खताकडे उपयोग करीत असत.

मुसुलमान, रजपूत वगैरे राजांच्या कारकीर्दींत ज्यावेळीं सुस्थिति असे त्यावेळीं आपापल्या समजुतीप्रमाणें त्यांनीं ( राजांनीं ) शेती सुधारण्याचे थोडेबहुत प्रयत्न केले होते. फिरोजशहा तघलख यानें विहिरी, तलाव, कालवे इत्यादि लोकोपयोगी कामें पुष्कळ केलीं. त्यानें यमुना नदीचा बांधलेला कालवा अद्याप चालू आहे.

मुसुलमानापूर्वी हिंदुस्थानमध्यें तलाव, कालवे वगैरे बांधिले जात असत. पाटबंधाऱ्याचीं कामेंहि पण त्याप्रमाणेंच कित्येक प्रांतांतून केलेलीं आढळतात. नाशिक, तैलंगण, गुजराथ व कर्नाटक या ठिकाणीं तलाव व बंधारे फार जुन्या काळापासून बांधीत आले आहेत व त्यांतील कित्येक अद्याप अस्तित्वांत आहेत.

मध्यप्रांतांत विशेषतः चांदा, भंडारा व बालाघाट या भागांत मालगुजारी गांवांतून तेथील मालगुजारांनी मोठमोठीं तळीं बांधून त्यांचें पाणी आपल्या शेतास व गांवांतील लोकांस देण्याची वहिवाट फार जुन्या काळापासून चालू आहे. चांदा जिल्ह्यांतील नवेगांव नांवाच्या गांवीं टेंकडीच्या मध्यभागीं एक जुना तलाव आहे. त्या तलावाचें पाणी निरनिराळ्या उंचीवर सोडण्यासाठीं पायऱ्या करून त्यामध्यें व टोंकीं सुमारें ४-६ इंच व्यासाचीं भोंकें ठेविलेलीं आहेत. त्यांचा उपयोग तळ्यांतील पाण्याच्या खोलीप्रमाणें करण्यांत येतो. हल्लीं मोठमोठ्या नद्यांना धरणें बांधून त्यांतून कालवे काढून दुष्काळी भागांत जमीनीला पाणी देऊन ती सुपीक करण्याचें काम चालू आहे. भात, सातू, गहूं, राळे, हरभरा, उडीद, मसूर, मूग, वाल, कुळीथ, तीळ, सरसव, कारळा, सुपारी, विड्याचीं पानें, मिरीं कापूस, नीळ, ऊंस, भाग, गांजा वगैरे पिकें, नारळ, केळीं महाळुंग, डाळिंब, फणस, आंबे, सत्रीं वगैरे फळफळावळ फार जुन्या काळापासून म्हणजे सुमारें ३००० वर्षांपूर्वींपासून माहीत असावी. कारण वरीलपैकीं कांहीं नांवें वेदांत आलीं असून संत्र्याखेरीज बाकी सर्व नांवें वाग्भटाच्या अष्टांगहृदयांत आलीं आहेत व त्यांचे गुणदोषहि त्यांत सांगितलेले आहेत. वाग्भटाचार्यांचा काळ २०१० वर्षांच्या सुमारें असावा असें दिसतें. वाग्भटाचार्यांचा अष्टांग हृदय हा स्वतंत्र ग्रंथ नसून तो आकारग्रंथ म्हणजे त्यांत तत्पूर्वीच्या चरक, सुश्रुतादि ग्रंथांचा संग्रह आहे म्हणजे चरक, सुश्रुत वगैरे आचार्यांच्या वेळींहि (सुमारें ३००० वर्षांपूर्वी) वरील सर्व नांवें माहिती होतीं. इतकेंच नव्हे तर ऊंसाची पेरीं खाण्यापासून तों त्याचा रस, राब, काकवी, गूळ, बारीक साखर व खडीसाखर अशी परंपरा लावून गुणामध्येंहि उत्तरोत्तर श्रेष्ठ असें वर्णनहि त्यांत दिलें आहे. यावरून हिंदुस्थानांत शेतीची व तिच्या आउताची माहिती फार प्राचीन काळापासून,—म्हणजे वेदकाळापासून म्हटलें तरी चालेल—होती असें सिद्ध होतें. अकबरास बागबगीचे करण्याची फार हौस होती. मुसुलमानांनीं अमलांत फळांच्या व फुलांच्या बागा वाढून त्यांत बरीच सुधारणा झाली. पोर्तुगीज राजाच्या अमदानींत पश्चिम हिंदुस्थानांत उत्तम आंब्याच्या जाती व चिकू वगैरे फळें आलीं. कॉफी पहिल्यानें इ. स. १६०० सालीं अरबस्तानांतून हिंदुस्थानांत आली. हल्लीं कॉफीचे जे मळे म्हैसुरांत आहेत. त्यांची लागवड सन १८३० सालीं सुरू झाली. तंबाखू जहांगिराच्या वेळीं पाश्चात्य देशांतून आली असावी. अकबराचा मुख्य प्रधान अबुलफझल यानें १९ वर्षांच्या दप्तरांतील माहितीवरून उत्पन्नाच्या आकड्यांची सरासरी तयार केलेली आहे. या कोष्टकावरून पहातां तत्कालीन दर बिघ्यास सरासरी उत्पन्न भात १०३२ पौंड, गहूं १०३६ पौंड, ज्वारी ८२७ पौंड व कच्चा कापूस ६०० पौंड वजनाचा याप्रमाणें येत होता असा अंदाज आहे.

इ. स. १८४५ पर्यंत हिंदुस्थानांतून यूरोपखंडांत साखर जात असे. इसवी सन ६२७ ते ६५० या सालांच्या दरम्यान चीनचा बादशहा टाइटसंग यानें आपले कांहीं इसम साखर करण्याची कला शिकण्याकरितां बहार प्रांतांत पाठविले होते असा इ. स. १५५२ सालीं लिहिलेल्या चीनच्या ज्ञानकोशांत उल्लेख आहे. हिंदुस्थानांतून परदेशाशीं कालिको ( छिटाचें कापड ) कपड्यांचा मोठा व्यापार चाले व ढाक्याला उत्तम तन्हेची मलमल तयार होई या दोन्ही गोष्टी जगप्रसिद्ध आहेत. गाई व बैल यांना पूर्वी फार महत्व होतें व हल्लींहि आहेच. हैदरअली हा अमृतमहाल जातीचे बैल तोफखान्यास लावीत असे असें नमूद आहे. गुराचा देवघेवींत उपयोग करीत व तीं दानहि देत. गोप्रदानाची चाल अद्यापि अस्तित्वांत आहे. पंचमहाल जिल्ह्यांत भिल्ल लोक हल्लीं लग्नकार्यांतील हुंडा बैल व गाई या रूपानें देतात. मुसुलमानी राज्यांत गोशाळा, अश्वशाळा, व उष्ट्र( उंट )शाळा होत्या. पेशव्यांच्या वेळीं पुणें जिल्ह्यांत आळेगांव येथें घोड्यांच्या उत्पत्तीसाठीं मोठ्या पागा होत्या. व्यापारी लोकांनीं गोमातेच्या संरक्षणासाठीं पूर्वापार जागजागीं पांजरपोळ काढिले आहेत. पूर्वी जनावरांची उत्पत्ति वाढविण्यासाठीं खेडोंपाडीं पोळ सोडलेले असत व ते अद्यापिहि कोठें कोठें आढळतात.

पूर्वी वसुलाचे मक्ते देण्याची चाल होती ती अकबरानें बंद केली. अकबर बादशहाचा मुख्य प्रधान राजा तोडरमल यानें शीरशहानें घालून दिलेल्या पद्धतीवर जमीनीची मोजणी करून प्रतबंदी केली व महसुलाचे निरख ठरविले. तीच पद्धत थोड्या फार फरकानें आजतागाईत हिंदुस्थानांत चालू आहे.

दक्षिणमध्यें मलिकंबरनें मोजणी करून धारापद्धत सुरू केली. तिला ' तनखा ' अशी संज्ञा होती. जमीनीचे मक्ते देण्याची पद्धत जरी वाईट अशी मानली जात असे तरी ती इतर राजाच्या कारकीर्दीत चालू होती. ती ब्रिटिश अमदानीच्या सुरवातीस बंद झाली. लॉर्ड कॉर्नवालिस यानें बंगाल्यात ' कायम धारा ' पद्धत सुरू केली व इतर प्रांतात बहुतेक ठिकाणीं ' रयतवारी ' पद्धत चालू आहे.

अकबराच्या वेळीं दुष्काळ वगैरे पडेल त्यावेळीं शेतकऱ्यास मदत करण्यास उपयोगी पडावें म्हणून दर बिघ्यामागें १० शेर धान्य दरसाल वसूल करून तें जागोजागीं साठविण्यात येई असा ऐने-इ-अकबरींत उल्लेख आहे या धान्याचा व्यय पुढें नमूद केलेल्या गोष्टींकडे होई ( १ ) सरकारी गुराना खुराक, (२) गरीब शेतकऱ्यास बी बियाण, (३) दुष्काळाच्या सालीं शेतकऱ्याना स्वस्त दरानें धान्याचा पुरवठा करण्याच्या कामीं व ( ४ ) जागजागीं अन्न शिजवून गरीब लोकास देणें वगैरे.

हल्लीं दुष्काळ पडल्यास बीभरणासाठीं, बैल विकत घेण्यासाठीं, विहिरी खोदण्यासाठीं आउतें विकत घेण्यासाठी तगाई देतात व साऱ्याची सूट व तहकुबी पिकाच्या अंदाजाकडे लक्ष देऊन द्यावी असे कायदे आहेत. अशी पद्धत शिवाजीच्या वेळींहि होती. सारा वसूल करण्याचे नियम रयतेस सोइस्कर असेच होते. लोकांची फार अडचण दिसल्यास सूट देण्यात येई. शेतकीचीं साधनें जवळ नसल्यास शेतीचें काम नडतें असें दिसून आल्यावर सरकारातून थोड्या व्याजानें किंवा बिनव्याजानें पैसे देण्यात येत.

इंग्रजी राज्य झाल्यावर लॉर्ड डलहौसीच्या कारकीर्दीत सन १८५६ सालीं दुष्काळनिवारणार्थ आगगाड्यांच्या कामास सुरवात झाली सन १८७६–७७ च्या दुष्काळात बरीच प्राणहानी झाली असावी. सन १८९६ व सन १९००–१९०१ या सालचे दुष्काळ बऱ्याच क्षेत्रावर पसरले होते. तरी आगगाडीच्या सोईमुळें धान्याचा पुरवठा इकडून तिकडे असा सहज करिता आला. हल्लीं कालव्याचा व आगगाडीचा जास्त प्रसार झाला असल्यामुळें एकंदरींत दुष्काळ कमी प्रमाणात भासूं लागला आहे; कारण धान्य व चारा हे दोन्हीं जिन्नस इकडून तिकडे सहज नेता येतात.

सहकारिता.—जुन्या काळीं प्रत्येक खेड्यात सहकारितेचें तत्त्व आढळून येई. बलुतेदार सर्व शेतकरी लोकास सहकारितेच्या तत्त्वावर मदत करीत व खेड्यातील सावकार देखील खेड्याचा एक घटकावयव समजला जात असे. तसेंच जातीजातींतील लोक एकमेकास कमी व्याजानें रकमा देत असत. हा प्रकार गुजराथेंत अद्याप आढळून येतो. पूर्वी ग्रामपंचायतीपद्धतीमुळें वसूल करणें सुद्धा सोईचें होतें. शेतीच्या कामीं गरीब शेतकऱ्याचें एखादें शेत गावातील बरेच शेतकरी एक दिवस जाऊन नांगरून देत. अद्यापीहि ही चाल कोठें कोठें आढळते. या पद्धतीस ' बिराभिक ' असें म्हणतात.

शेतीचा अर्वाचीन इतिहास.—हिंदुस्थानात शेतीचा धंदा जरी फार जुन्या काळापासून चालत आला आहे, तथापि शास्त्र या दृष्टीनें गणित वगैरे विषयाप्रमाणें या विषयावर स्वतंत्र ग्रंथ नाहींत. बहुतेक सर्व ज्ञान अनुभवानें व परंपरेनें आलेलें आहे. म्हणून येथील शेती ' शेतकी शास्त्र ' या संज्ञेस पूर्णपणें पात्र नाहीं. परंतु पाश्चात्य राष्ट्रांनीं प्रयोगाच्या योगानें शेतकी पूर्णशास्त्राच्या दर्जास पोंहोचविली आहे. परंतु मुख्य गोष्ट लक्षात ठेवण्याची म्हणजे शेतकी हा धंदाच इतका व्यापक आहे कीं शेतकीचें ज्ञान म्हणजे एक लहान शास्त्र असें नाहीं शेतकी शास्त्र पूर्णपणें बनण्यास त्यास इतर किती तरी शास्त्रांची मदत व्हावी लागते. त्यापैकीं महत्वाच्या शास्त्रांचें स्वरूप येथें देतों (१) भूस्तरशास्त्र, (२) पदार्थविज्ञानशास्त्र, (३) वनस्पतिशास्त्र, (४) रसायनशास्त्र,(५) कीटकशास्त्र, (६)जंतुशास्त्र, (७) पशुवैद्यकशास्त्र,(८)पशुसंगोपनशास्त्र,(९) कृषियंत्रशास्त्र व (१०) वातावरणशास्त्र.

( १ ) भूस्तरशास्त्र.—याच्या साहाय्यानें कोणकोणत्या तऱ्हेचे खडक कोठें असतात व त्यापासून जमिनी कशा तयार होतात हें समजतें तसेंच कोणकोणतीं खनिजद्रव्यें निरनिराळ्या ठिकाणीं असतात त्याचेंहि ज्ञान मिळतेंच त्यापैकीं कांहीं द्रव्यें खताकरिता उपयोगी पडतात.

(२) पदार्थविज्ञानशास्त्र.—जमिनीवर उष्णता, थंडी, निरनिराळ्या प्रकारचे वारे व हवा यांचे परिणाम कोणत्या प्रकारचे व कसे घडतात याचें ज्ञान पदार्थविज्ञान शास्त्रानें होतें

(३) वनस्पतिशास्त्र.—यानें झाडें कशीं वाढतात, निरनिराळ्या जाती कशा उत्पन्न करिता येतील, असलेल्या पिकात कोणत्या सुधारणा करिता येतील,वनस्पतींचें पोषण व त्यांची फलद्रुपता या गोष्टी कशा प्रकारें घडतात याचें ज्ञान होतें.

(४) रसायनशास्त्र.—या शास्त्राच्या ज्ञानानें शेतीच्या जमिनीचें पृथक्करण, तसेंच खताचें, पाण्याचें व गुराच्या चाऱ्याचें पृथक्करण करिता येतें व यामुळें कोणकोणतीं द्रव्यें कमी अधिक प्रमाणात आहेत तें समजतें. तसेंच खतें कोणतीं व का घालावीत, तीं किती घालावीत, झाडें कशीं पोसतात,गुराना खाणें योग्य कोणतें व तें किती घालावें वगैरेबद्दल ज्ञान होतें.

(५) कीटकशास्त्र.—कीटकशास्त्रानें सर्व प्रकारें उपयोगी पडणारे कीटक व वनस्पतींना त्रासदायक कीटक कसे उत्पन्न होतात त्याबद्दलची माहिती व त्यावर उपाय याचें ज्ञान होतें.

(६) जंतुशास्त्र.—हे दृष्टीनें न दिसणारे असे जे बारीक जीव वनस्पतींवर अगर प्राण्यावर उत्पन्न होतात, त्यासंबंधीं वगैरे परिणाम व त्यावरील उपाय यांबद्दल माहिती देतें.

(७) पशुवैद्यक शास्त्र.—हें जनावरांच्या जाती, त्यांचे आहार, निगा, आरोग्य, व आजार व त्यावर उपाय या गोष्टींविषयीं सर्व माहिती देतें. त्याचप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेच्या कामासाठीं गुरांत कोणत्या गुणधर्मांची आवश्यकता असते वगैरे माहिती या शास्त्राच्या अभ्यासानें मिळते

(८) प्राणिसंगोपन शास्त्र.—हें जनावरांची व पक्ष्यांची निपज, निगा, वगैरेबद्दल माहिती देतें

(९) स्थापत्य शास्त्र —या शास्त्राच्या साहाय्यानें शेतीसंबंधीं हरएक प्रकारचीं आउतें, शेतीसंबंधीं जनावरांचे गोठे व धान्याचीं कोठारें बांधणें, शेतीच्या उपयोगीं पडणारे रस्ते वगैरे करणें यांचें ज्ञान होतें.

(१०) वातावरण शास्त्र.—या शास्त्राच्या योगानें हवेंतील फेरफार, पाऊस आणणारे अगर घालविणारे वायूचे प्रवाह, दर्यांतील तुफानें व त्यामुळें जमिनीवर होणारे फेरफार, अतिवृष्टि, अनावृष्टि व त्यापासून वनस्पतींवर होणारे परिणाम यांचें ज्ञान होतें. या ज्ञानानें पुष्कळ वेळा नुकसान टाळतां येतें.

याशिवाय अर्थशास्त्र वगैरे शास्त्रांचा शेतकीशीं बराच निकट संबंध येतो. वर दिलेल्या सर्व शास्त्रांच्या विवेचनावरून असें वाटूं लागेल कीं, शेतकी हा धंदा फायदेशीर करणें हें फार कठिण व गूढ आहे. परंतु त्यांतील मुख्य मुख्य सिद्धांत कित्येक पिढ्यांच्या अनुभवानें चांगल्या शेतकऱ्यांस साधारणपणें माहीत असतात व त्या माहितीस जर वर लिहिलेल्या शास्त्राची जोड मिळाली तर या धंद्यांत झपाट्यानें प्रगति होईल. चांगली जमीन, उत्तम बीबियाणें, जनावरांची नीट जोपासना व द्रव्याची अनुकूलता या गोष्टीहि पण इतर गोष्टींप्रमाणेंच साध्य झाल्या पाहिजेत व त्या सर्व असूनहि स्वतःची देखरेख शेतीवर व जनावरांवर जातीनें राहून केल्यासेरीज शेती फायदेशीर होणार नाहीं एवढेंच नाहीं तर वेळप्रसंगीं थोडी थोडकी अंगमेहनतहि करण्याची मालकाची तयारी असली पाहिजे म्हणजे त्या धंद्याचें इंगित कळून हा धंदा फायदेशीर करितां येईल.

शेतींत सुधारणा होण्यास पुष्कळ अडचणी आहेत. त्यांपैकीं एक मुख्य म्हणजे शेतकरीवर्गांत शिक्षणाचा अभाव व त्यांची पुराणप्रियता ही होय. परंतु हल्लीं जी शेतकींत सुधारणा दिसत आहे तिलाहि इतिहास आहे. या इतिहासाचे ठोकळ मानानें दोन भाग करितां येतील ते असे:—(१) शेतकी खातें निघण्यापूर्वी शेतीच्या सुधारणेसंबंधानें झालेले प्रयत्न व (२) त्यानंतरचे प्रयत्न. ईस्ट इंडिया कंपनीकडे हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें होतीं तेव्हां जागोजागीं ॲग्रिकल्चरल व हॉर्टिकल्चरल सोसायटीज स्थापन झाल्या. या संस्थांचे बागबगीचे असत. त्यांपैकीं मुंबई इलाख्यांत पुणें जिल्ह्यांत हिंवरें व दापुडी, खानदेशांत धुळें, खेडा जिल्ह्यांत नडियाद, उत्तर हिंदुस्थानांत मीरत, गोरखपूर, कुमाव, कलकत्ता वगैरे अनेक ठिकाणीं बागा होत्या. त्यांचें काम नानातऱ्हेचीं पिकें, औषधी वनस्पती, फळझाडें, फुलझाडें, भाजीपाला व इतर व्यापारोपयोगी पिकें यांचें बीं आणून त्यापासून चांगलें पीक करणें व त्या पिकाचा फैलाव संस्थेच्या मंडळामार्फत शेतकऱ्यांत करणें हें असे. खेड व जुन्नर येथें बटाट्याचा प्रसार होण्याचें श्रेय हिंवरें येथील बागेला असावें. भुइमूग, बटाटे, रताळीं, तंबाखू, मका, श्रावणघेवडा, कोबी, नोलकोल, कॉलिफ्लॉवर, टमाटो, गिनीगवत, लसूणघास, मॉरिशस (पुंड्या) ऊंस वगैरे पिकांचा इकडे विशेष प्रसार झाल्याचें श्रेय या बागांकडेसच असावें. अशा रीतीनें गेल्या शंभर दोनशें वर्षांत पोर्तुगीज, फ्रेंच, डच, इंग्लिश वगैरे पाश्चात्य लोकांचा सहवास घडून आल्यापासून अनेक तऱ्हेचीं पिकें परदेशांतून येऊन तीं स्थानिक झालीं आहेत.

प्राचीन काळीं शेतकींत सुधारणा करण्याचे प्रयत्न एखाद्या विवक्षित पिकासंबंधींच असत. असे प्रयत्न म्हणजे परदेशी लांब धाग्याच्या कापसाचें बीं आणून शेतकऱ्यांस वाटणें. उदाहरणार्थ.—अमेरिकन, ईजिप्शियन व बोरबोन कापूस, रेशमाचे किडे वगैरे. या पूर्वीच्या प्रयत्नांस यावें तसें यश आलें नाहीं. अमेरिकन कापूस मात्र थोड्या प्रमाणावर धारवाड जिल्ह्यांत जीव धरून राहिला आहे.

या नवीन पिकांपैकीं सांपत्तिक दृष्ट्या फार महत्त्वाचीं अशीं कापूस, तंबाखू, भुइमूग व ऊंस हीं पिकें होत. नंतरचे प्रयत्न सन १८८१मध्यें होऊन दुष्काळी कमिशनच्या शिफारशींवरून सर्व हिंदुस्थानांत प्रांतनिहाय शेतकीखातीं स्थापन करावीं असें ठरलें तथापि या खात्यांना मूर्तस्वरूप लॉर्ड कर्झन साहेबांच्या कारकीर्दींत आलें पहिल्यानें सर्व हिंदुस्थानाकरितां पुसा येथें फिप्स साहेबांच्या उदार देणगीच्या व्याजांतून एक मध्यवर्ती कॉलेज काढून त्यांत प्रत्येक शेतकी विषयाचा एकेक तज्ज्ञ नेमून त्या सर्वांवर सन १९०१ सालीं इन्स्पेक्टर जनरल ऑफ ॲग्रिकल्चर अशी नेमणूक करण्यांत आली. सन १९०५ सालापासून हिंदुस्थानसरकार या खात्याच्या सुधारणेसाठीं दरवर्षी २० लक्ष रुपये प्रयोगसंशोधन, प्रात्यक्षिकें व शेतकीशिक्षण याकरितां वेगळे काढून ठेऊं लागलें; व भारतमंत्र्यांनीं खालीं नमूद केलेल्या शिफारशी शेतकीखात्याकरितां करण्यांत आल्या.

(१) प्रत्येक प्रांतांत स्वतंत्र शेतकीकॉलेज व प्रयोगक्षेत्र असावें, (अ) या कॉलेजांत शेतकी, वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र, कीटकशास्त्र व जंतुशास्त्र या विषयांचे तज्ज्ञ असावे, व त्यांत संशोधनाची सोय असावी. (ब) वादग्रस्त प्रश्नांचा शोध व खल प्रयोगशाळांत व प्रयोगक्षेत्रांत व्हावा. (क) शेतकीखात्यासाठीं स्वतंत्र डायरेक्टर असावा

(२) प्रत्येक प्रदेशानिहाय एक प्रयोगक्षेत्र असावें.

(३) भागानिहाय प्रयोगक्षेत्रांच्या देखरेखीसाठीं शेतकीचौकशी, संस्थांस सल्ला देण्याकरितां, प्रदर्शनें भरविण्यास

निवडक बीं वाटण्यासाठीं व सुधारलेल्या आउताचा प्रसार करण्यासाठीं व शेतकीविषयक पत्रव्यवहार करण्यासाठीं एक सुपरिंटेंडेन्ट ऑफ दि फार्मस् असा अधिकारी असावा.

( ४ ) प्रयोगक्षेत्रात उपयुक्त ठरलेल्या गोष्टी शेतकऱ्याच्या नजरेस आणण्यासाठीं जागोजाग प्रात्यक्षिकें स्थापन करावीं.

सदरहू सूचनेप्रमाणें प्रांतानिहाय शेतकीचे डायरेक्टर अशा अधिकाऱ्याच्या नेमणुका झाल्या, कांहीं कांहीं प्रांतात पूर्वीं डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर आणि सेटलमेन्ट अशा नेमणुका झाल्या होत्या.

इसवी सन १८८४ सालीं मुंबई इलाख्यात शेतकीखातें स्थापन झालें असून मध्यप्रांतात १८८३सालीं व निझामच्या राज्यांत ( फसली १३२४ ) इ. सन १९१४—१५ सालीं स्थापन झालें. अगदीं पूर्वीं या खात्याचें काम लोकस्थिती संबंधीं आकडे गोळा करणें हें असून शेतींत सुधारणा घडवून आणण्याकडे त्यांनां फारसें लक्ष देता येत नसे डायरेक्टराला जास्त कामें झाल्यामुळें शेतकी कामाकरिता डेप्युटी डायरेक्टराची नेमणूक करून त्याच्या देखरेखीखालीं जागजागीं प्रयोगशाळा स्थापन केल्या मुंबई इलाख्यात सन १९०५ सालीं शेतकीखातें अगदीं स्वतंत्र झालें. या वेळेपासून शेतकीखात्याचें काम ज्यास्त व्यवस्थित रीतीनें व जोरानें चालू झालें. प्रयोगाचीं शेतें व त्याचप्रमाणें अनुभवदर्शक क्षेत्रें ही वाढलीं. याप्रमाणें सर्व दिशेनें काम वाढल्यामुळें प्रत्येक प्रदेशाकरिता वेगवेगळाले डेप्युटी डायरेक्टर नेमून प्रत्येक भागाकरिता एक डिव्हिजनल सुपरिंटेन्डेंट याची नेमणूक झाली. त्याच्या हाताखालीं जिल्हानिहाय ओव्हरसियर नेमून त्याच्याकडे शेतकऱ्याच्या शेतातील चालू असलेल्या प्रयोगाची देखरेख सोंपविण्यात आली. याप्रमाणेंच बहुतेक प्रांतोप्रांतीं व्यवस्था आहे. प्रत्येक डायरेक्टराच्या देखरेखीखालीं अनेक पोटखातीं सुरू झालीं तीं येणेंप्रमाणें:—प्रयोग क्षेत्रें आणि अनुभवदर्शनक्षेत्रें. पशुवैद्यक खातें. शेतकीशिक्षण शेतकऱ्यांना भांडवलाचा पुरवठा ( परस्पर सहकारी ) खातें. शेतकीसंस्था. शेतकरी वर्गांत सुधारणेचा प्रसार इत्यादि.

शेतकींत कोणतीहि सुधारणा घडवून आणण्यापूर्वीं त्याविषयीं रासायनिक प्रयोगशाळेंत व प्रयोगक्षेत्रात पूर्ण छाननी झाली पाहिजे. ही छाननी त्या त्या प्रांतात रयतेच्या उपयोगी पडेल अशा पिकासंबंधीं किंवा शेतीच्या पद्धतीसंबंधीं झाली पाहिजे. ही पुरी झाल्यानंतर मग सुधारणा घडवून आणणें शक्य आहे किंवा नाहीं याचा विचार करावा लागतो. निरनिराळ्या प्रांतात हवा पाणी वगैरे निरनिराळीं असल्यामुळें तेथील विकट प्रश्नाच्या संशोधनाकरितां रासायनिक प्रयोगशाळा व प्रयोगक्षेत्रें वेगवेगळ्या परिस्थितींत स्थापन झालीं आहेत. प्रयोगक्षेत्र स्थापन झाल्यावर तेथील प्रयोग सफळ किंवा निष्फळ आहेत हें ठरण्यास बरींच वर्षें लागतात.

हीं प्रयोगक्षेत्राची कल्पना फार वर्षांची जुनी आहे. हिंदुस्थानांत पहिलें प्रयोगक्षेत्र इ. सन १८१४ सालीं कानपूरनजीक बिठूर येथें मि. राव्हेन्स क्राफ्ट कानपूरचे त्या वेळचे कलेक्टर यानीं काढिलें होतें.

निरनिराळ्या प्रांतातील प्रयोगक्षेत्राची संख्या सन १९१७—१८ सालीं पुढें नमूद केल्याप्रमाणें होती. बंगाल ११, बहार ओरिसा ३, संयुक्तप्रांत१९पंजाब ४वायव्येकडील प्रांत २, मुंबई २२, मद्रास १२, मध्यप्रांत १५, आसाम ५, ब्रह्मदेश १६, म्हैसूर ३ व बडोदें ४.

मुंबई इलाख्यात इसवी सन १८६९ सालीं खानदेश जिल्ह्यात भडगाव येथें सुमारें १२०० एकर जमीन घेऊन तेथें सरकारी शेताची स्थापना केली. हें शेत कापसाची सुधारणा करण्याकरिता घेण्यात आलें होतें. सन १८९० सालीं पुण्यानजीक खडकी येथें शेतकीखात्यानें दुधाची डेअरी काढली. ही हिंदुस्थानातील पहिली डेअरी होय. हल्लीं सर्व हिंदुस्थानात हजारों डेअऱ्या स्थापन झाल्या आहेत. सन १८९४ सालीं मांजरी येथें उंसाकरिता स्वतंत्र शेताची स्थापना झाली. सन १९१७-१८ सालीं मुंबई इलाख्यात एकंदर २२ प्रयोगक्षेत्रें होतीं. यापैकीं गुजराथेंत सुरत, नडियाद व दोहद येथें; मध्यभागात धुळें, जळगाव, कोपरगाव, गणेशखिंड, मांजरी, व खडकी येथें; कर्नाटकात गोकाक, धारवाड, गदग व तेगूर येथें; सिंध प्रांतात मिरपूर खास, सक्कर, लारखाना व वलाडी येथें आहेत.

गुजराथ प्रांतातील प्रयोगशाळेंत मुख्यत्वेंकरून कापूस, जोंधळा, तंबाखू, बाजरी, मका वगैरे पिकें, मध्यभागात कापूस: मांजरी येथें उसास खत, पाणी, फेरपालटाचीं पिकें, नवीन जाती आणून लावणें, वाफेच्या यंत्रानें रस काढणें, चुलाणात सुधारणा वगैरे; खडकी येथें दूधदुभतें, गुराची उपज निपज वगैरे; गणेशखिंडींत फळफळावळ, कर्नाटकात कापूस व कोंकणात भात वगैरेसंबंधीं प्रयोग चालले आहेत.

मध्यप्रांतात व वऱ्हाडात एकंदर १५ प्रयोगक्षेत्रें होतीं. अकोला ( मुख्यत्वेंकरून कापूस ), हुशंगाबाद ( पावरखेडा-गहूं ); नागपूर ( शेतकी कॉलेज फॅार्म ) रायपूर ( लंभाडी-भात ). तेलंगखेडी ( डेअरी-दुभत्याचें प्रयोगक्षेत्र ) बोरगाव, यारसा, सिंधवाही, चांदखुरी, बिलासपूर, दग, बडदिवणी, खावर्या, आयतांळ आणि रोवी. बैतुल, व दमोह येथें प्रयोग क्षेत्रें स्थापन झालीं आहेत.

निझामच्या राज्यात महबूबनगर ( मुख्यत्वेंकरून कापूस व रेशमाचे किडे ), आलेर ( जिल्हा नालगोंडा—कापूस व एरंडीवरील रेशमाचे किडे,) कमरेड्डी ( जिल्हा निझामाबाद ऊंस) व परभणी ( मराठवाडा कापूस) वगैरे मिळून नवीन चार क्षेत्रें स्थापन झालीं आहेत.

ह्या प्रयोगक्षेत्रात त्या त्या प्रदेशातील महत्वाचीं पिकें व कांहीं नवीन पिकें, नवीन तऱ्हेचीं खतें, आऊतें, सुधारलेलीं पाणी काढण्याचीं साधनें पिकें करण्याच्या सुधारलेल्या पद्धती वगैरे गोष्टींचा प्रत्यक्ष अनुभव घेण्यात येतो, व त्यापैकीं फायदेशीर ठरतील त्या पद्धतींचा, बियांचा, खतांचा, आऊतांचा वगैरे इतरत्र फैलाव होण्याचा प्रयत्न करण्यात येतो सरकारनें काढलेल्या या प्रयोगशाळा लोकांनीं येऊन पाहाव्या म्हणूनच आहेत

पशुवैद्यक खातें व गोशाळा —या सदराखाली शिक्षण देण्याकरिता मुंबई, मद्रास, बंगाल, पंजाब व ब्रह्मदेश या प्रांतात कॉलेजें स्थापन करण्यात आलीं आहेत जनावराचीं पैदास, गोपासना व वाड्याप्रीत्यर्थ मुंबई इलाख्यात गुजराथेंत चारोडी येथें नार्थकोटगोशाळा व धारवाड जिल्ह्यात तेगूर येथें गोशाळा आहेत मध्यप्रांतात तेलन,खेडी, चादखुरी, पावरखेडा, बोरगाव व थारसा येथें गोशाळा स्थापन झाल्या आहेत या गोशाळेंत जे गोऱ्हे उत्तम व खात्रीचे निपजतील ते ठेव्यात ठेऊन गुराची सुधारणा करण्याचे प्रयत्न चालू आहेत याशिवाय चागल्या जातीचे पोळ वेळोवेळीं तगाईरूपान किंवा लोकलबोर्डांतून विकत घेऊन खेड्यात ठेवण्यात येतात

सन १९१५–१६ सालच्या पशुवैद्यक खात्याच्या रिपोर्टा वरून चागली अवलाद तयार करण्याकरिता सरकारातून ९० व लोकलबोर्डातून ११११ साड ( पोळ ) ठेविले होते असें दिसून येतें याखेरीज सन १९१५–१६ सालीं १९३ घोडे, ११३ गाढवें अशीं या खात्यातून उत्पत्तिकरिता ठेविलीं होतीं

शेतकी सर्वस्वीं चागल्या जनावरावर अवलबून आहे गुराच्या रोगावर उपाय करण्यासाठीं व जागोजागीं मोफत दवादारू देण्यासाठीं सर्व हिंदुस्थानात ४१६ दवाखाने असून त्याची सख्या मुंबई इलाख्यात सिंध प्रांतसुद्धा ६५ व मध्यप्रांत व वऱ्हाडात ७९ होती या सर्वांवर पशुवैद्यक खात्याची देखरेख असते दवाखान्यातील डाक्टर वेळोवेळीं खेडोंखेडीं फिरतात व शेतकरी लोकाना गुरासबधीं योग्य सल्ला देतात एखादे वेळीं स्पर्शजन्य रोगाचा उद्भव खेड्यात झाल्यास त्याना खबर मिळताच ते तेथें जाऊन रोगप्रतिबंधक उपाय योजून शिवाय गुरें लशीनें टोंचतात या सा याचा खर्च वर्षानुवर्ष वाढत्या प्रमाणावर आहे हें खालीं दिलेल्या आकड्यावरून स्पष्ट होईल

१९०४–५ सालीं रुपये १०८२३५३ १९१०–११ सालीं रुपये २०२९४९७,आणि १९१५–१६सालीं रुपये ३१७२६२५ याप्रमाणें खर्च झाला

शेतकी शिक्षण —शेतकऱ्यात ज्ञानाचा प्रसार होणें हा शेतकीच्या प्रगतीचा पाया आहे भौतिक शास्त्रें व शेती याची सांगड कशी घालावयाची हें शेतकऱ्यामध्यें ज्ञानाचा प्रसार झाल्याशिवाय कळणें शक्य नाहीं सदरहू शास्त्राचें शिक्षण देण्याकरिता खालीं दिलेल्या ठिकाणीं कॉलेजें स्थापन करण्यात आलीं आहेत , १ ) पुणें मुंबई, ( २ ) नागपूर, मध्यप्रांत, ( ३ ) कोईमतूर ( मद्रास ), ( ४ ) कानपूर ( सयुक्त प्रांत, ( ५ ),साबूर ( बहार व ओरिसा ) व (६) लायलपूर (पजाब) याशिवाय देशी भाषेंतून या विषयाचें प्रोढक शिक्षण देण्यासाठीं कित्येक ठिकाणीं प्रयोगक्षेत्रास जोडून शेतकीचे वर्ग काढिले आहेत देशी भाषेच्या द्वारें शेतकीशिक्षण देण्यासाठीं शाळा मुंबई इलाख्यात पुण्यानजीक लोणी, धारवाड जिल्ह्यात देवीहोसूर, ठाणें जिल्ह्यात जाभूळ, कुलाबा जिल्ह्यात अलिबाग, पचमहाल जिल्ह्यात गोध्रा व सिंध प्रांतात मिरपूर खास येथें काढिलेल्या आहेत हल्लीं मध्यप्रांतात चादखुरी व पावरखेडा येथें अशा तऱ्हेच्या शाळा काढण्याचें ठरलें आहे या विषयासबधीं जास्त माहिती शेतकीशिक्षण या विषयाखालीं मिळेल

शेतकऱ्यास भांडवलाचा पुरवठा —शेतकरी वर्गास त्याच्या कामाकरिता भांडवलाची अतिशय जरूरी असते तें भांडवल कमी व्याजानें मिळावें म्हणून सन १९०४ सालीं हिंदुस्थान सरकारनें सहकारी पतपेढ्याचा कायदा केल्यापासून खेडोंखेडीं परस्पर सहकारी पतपेढ्या स्थापण्यास सुरवात झाली सदरहु सस्थेत गावातील कांहीं निवडक माणसें घेऊन त्याच्या हमीवर गावात मिळविलेल्या थोड्या भांडवलास सरकारमार्फत कांहीं रकम कमी व्याजान मिळते ह्या पेढ्यातून सभासदास लागणारा पैसा कमी व्याजानें मिळतो सन १९१७–१८ सालीं अशा खेड्यातील लोकाना भांडवल पुरविणाऱ्या पतपेढ्याची सख्या २३,७४२ असून त्यात ८,५१,४०७ सभासद होते व एकदर भांडवल ६८९० रुपये होतें मुंबई इलाख्यात १३९० पतपेढ्या असून सभासद १,०१,३१३ होते भांडवल ७१९९ लाख रुपयाचें होत त्याचप्रमाणें मध्यप्रांतात ३४१८ पतपेढ्या होत्या सभासदाची सख्या ५५,०७२ असून भांडवल ५७६३ लाख रुपयाचें होतें या रकमेपैकीं शेकडा ७४ उचल आऊत, बैल, बीं बियाणें, शेतखर्च, विहिरी खणणें व ताली घालणें यासाठीं होती मुंबई इलाख्यात २१ खत विक्रीसाठीं, ८ कापूसविक्रीसाठीं, ८ बीं बियासाठीं, १० सुधारलेलीं आऊतें विकण्यासाठीं व १० उत्तम गुराची पैदास करण्यासाठीं सस्था होत्या याशिवाय सर्व हिंदुस्थानात गुराचा विमा उतरण्यासाठीं ३९९ सस्था होत्या त्यापैकीं ३७९ फक्त ब्रम्हदेशात असून मुंबई इलाख्यात त्याची सख्या चार होती अशा अनेक प्रकारांनीं शेतकीच्या धंद्यात सहकारितेचा प्रसार होऊ लागला आहे भांडवलाप्रीत्यर्थ सरकारनें अग्रिकल्चरल रिलीफ ॲक्ट, ( शेतकरी ऋणमोचन कायदा ) अग्रिकलचरल इंप्रुव्हमेन्ट ॲक्ट ( शेतीच्या सुधारणेसाठीं तगाई देण्याचा कायदा ) व अग्रिकल्चरल लान्स ॲक्ट ( शेतकऱ्यास तगाई वगैरे देऊन मदत करणारा कायदा )

असे कायदे केले आहेत. या कायद्यान्वयें शेतकऱ्याला ताली घालणें, विहिरी खोदणें, बैल, बीं वगैरे विकत घेणें वगैरेकरितां तगाईच्या रूपानें पैसा दिला जातो. त्याचप्रमाणें हल्लीं ऑईल एन्जिन व पंप, उंसाचे घाणे, लोखंडी नागर वगैरे विकत घेण्यासाठीं तगाई मिळते.

शेतकी संस्था.—शेतकऱ्याच्या अडचणी दूर कराव्या व त्यांच्या गरजा मागविण्याबद्दल त्यास सल्ला द्यावा या-करितां जागोजागीं शेतकीसभा स्थापन झाल्या आहेत. अशा सभा सर्व हिंदुस्थानांत असून त्या महाराष्ट्रांतहि आहेत. पुणें येथील मध्यवर्ती डेक्कन आग्रिकलचरल असोसिएशन या-नावाच्या सभेच्या विद्यमानें शेत व शेतकरी या नावाचें शेती-संबंधीं माहितीनें भरलेलें मासिक प्रसिद्ध होत असतें. अशाच तऱ्हेचीं मासिकें गुजराथी व कानडी भाषेंत शेतकी संस्थेमार्फत भडोच व धारवाड येथें प्रसिद्ध होतात. मध्यप्रांतांत नागपूर येथें शेतकी खात्यातून "किरसानी समाचार" नामक मासिक पुस्तक हिंदी, मराठी व इंग्रजी अशा तीन भाषांत प्रसिद्ध होतें. निजामच्या राज्यात अशाच प्रकारचें एक मासिक पुस्तक उर्दूत निघत असतें. शेतकी कॉलेजातून व पुसा येथून तिमाहि पुस्तकें शेतकी विषयावर इंग्रजींत प्रसिद्ध करण्यात येतात

या शेतकीसभा वेळोवेळीं सभा भरवून व्याख्यानद्वारा शेतकऱ्याच्या शेतींत ज्ञानाचा प्रसार करीत असतात. कांहीं ठिकाणीं या सभांनीं निवडक बीं, सुधारलेलीं आउतें व त्याचे भाग व खतें पुरविण्यासाठीं डेपो काढलेले आहेत. शेतकीचें ज्ञान गरजू शेतकऱ्याला वेळेवर मिळावें म्हणून शेतकी खात्यानें प्रत्येक जिल्ह्यांत फिरस्ते ओव्हरसियर नेमिले आहेत. त्यांच्याबरोबर व फार्म सुपरिन्टेन्डेंट यांच्यांशीं पत्रव्यवहार केल्यास त्यांच्याकडून शेतीसंबंधीं तावडतोब माहिती मिळावी अशी योजना आहे.

शेतकरी वर्गांत सुधारणेचा प्रसार.—पहिल्या सदरांत लिहिलेल्या ठिकाणीं जे शोध उपयुक्त ठरतात त्याचें ज्ञान शेतकऱ्यास मिळावें म्हणून हस्तपत्रकें प्रसिद्ध करून गावोगाव शेतकीचीं प्रदर्शनें व प्रात्यक्षिकें भरतील त्या ठिकाणीं तीं वाटण्यांत येतात. अशीं पत्रकें मुंबई इलाख्यांत सन १९१८ अखेर १०८ निघालीं असून मध्यप्रांत व वऱ्हाडांतहि पुष्कळ निघालीं आहेत. या पत्रकांत पिकाची लागवड, त्यास उत्तम ठरलेली रीत, नवीन सुधारलेलीं आउतें धान्य व जनावरांचे रोग, पिकांवरील कीड घालविण्याचे उपाय, आउताची व दुभत्या जनावरांची जोपासना वगैरे संबंधीं माहिती दिलेली असते. याशिवाय प्रत्येक प्रयोग-शाळेचे वार्षिक रिपोर्ट प्रसिद्ध करण्यात येतात. विवक्षित विषयावर इत्थंभूत माहितीचीं लहान लहान पुस्तकें व टिपणें काढून शेतकीखात्यातून तीं वेळोवेळीं छापून प्रसिद्ध करण्यात येतात.

शिवाय दरवर्षी शेतीसंबंधीं सप्रयोग ज्ञान शेतकऱ्यांना मिळावें यासाठीं जेथें मोठे बाजार व जत्रा भरतात त्या ठिकाणीं शेतीचीं व गुरांचीं प्रदर्शनें व प्रात्यक्षिकें भरविण्यात येतात व या प्रदर्शनात चढाओढीचीं बक्षिसें देण्यात येतात. सन १९१५-१६ सालीं सर्व हिंदुस्थानात घोड्यांचीं २५ व गुरांचीं १४२ दर्शनें भरलीं होतीं. त्यांपैकीं मुंबई इलाख्यात गुरांचीं ३, मध्यप्रांतात ५, वऱ्हाडांत १३ व निझामच्या राज्यात ९ प्रदर्शनें व प्रात्यक्षिकें भरविण्यात आलीं होतीं. प्रदर्शनाच्या वेळीं उपयुक्त ठरलेलीं आउतें प्रत्यक्ष चालवून दाखविण्यात येतात. याशिवाय जमलेल्या शेतकऱ्यास निरनिराळ्या विषयावर तज्ज्ञ माणसाकडून व्याख्यानें देण्यात येतात. त्याप्रमाणें निरनिराळ्या जिल्ह्या-तून शेतकरी लोकास सरकारी खर्चानें आणून त्यांना प्रयोग-शाळेंत उत्तम ठरलेले प्रयोग, उभीं पिकें व इतर उपयुक्त आउतें वगैरे दाखवितात.

इसवी सन १९१७-१८ सालीं शेतकी खात्याप्रीत्यर्थ सर्व हिंदुस्थानात किती खर्च झाला त्याचा तपशील खालीं दिला आहे.:—

| स्थलाचें नाव | | खर्च रुपये |
|---|---|---|
| पुसा व मध्यवर्ती कॉलेज व संशोधनशाळा | | ५८१७२३ |
| मुक्तेश्वर ब्याक्टिरिऑलॉजिकल लॅबोरेटरी | | ३३६०८१ |
| मुंबई शेतकी खातें | | ९९०८६१ |
| मद्रास | " | ७७६२३६ |
| बंगाल | " | ३९६४२९ |
| बहार, ओरिसा | " | ३६३९०० |
| संयुक्तप्रांत | " | ७८४८४० |
| पंजाब | " | ७५६३४४ |
| ब्रह्मदेश | " | २३९०९५ |
| मध्यप्रांत | " | ६०६७९७ |
| आसाम | " | २४८०९३ |
| वायव्य सरहद्दीवरील प्रांत | | ३६७९७ |
| बलुचिस्तान | " | १४५०७५ |
| एकूण | | ६१३२२३५ |

शेतीचा प्रसार.—हिंदुस्थान हा देश फार प्रचंड आहे. तो जर्मनीच्या सातपट, जपानच्या दसपट व ब्रिटिश बेटाच्या पंधरापट मोठा आहे. हिंदुस्थानात मोठाले नऊ व लहान पांच असे एकंदर १४ प्रांत आहेत. शिवाय अनेक एतद्देशीय संस्थानें आहेत. हिंदुस्थानची दक्षिणोत्तर लांबी सुमारें २००० मैल असून रुंदी १९०० मैल आहे. सन १९१४-१५ सालीं प्रसिद्ध झाल्याप्रमाणें एकंदर क्षेत्रफळ १७,९९,००० चौरस मैल अथवा १,१,५,१४,७४,००० एकर आहे. इ. स. १९११ सालीं झालेल्या खानेसुमारी प्रमाणें लोकसंख्या अदमासें ३१ कोटी ५० लक्ष आहे. याची विभागणी पुढें दिल्याप्रमाणें:—

[ एकर व लोकसंख्या याने आंकड हजाराचे आहेत ]

| देशाचें नाव | एकर | लोकसंख्या |
|---|---|---|
| ब्रिटिश हिंदुस्थान ( काहीं संस्थाना सुद्धा ) | ७४९११६ | २६७१६४ |
| हिंदुस्थान सरकाराशीं प्रत्यक्ष संबंध असणारीं संस्थानें | ३१६३८७ | ४४७६७ |
| शानसंस्थानें ( ब्रह्मदेश ) वायव्य सरहद्दीवरील प्रांत वगैरे | ५९२२५ | २७३८ |
| ब्रिटिश बलुचिस्तान | ३४७०६ | ४१४ |
| एकूण | ११५९४७४ | ३१५०८३ |

शे ती चा प्र सा र व म ह त्व—राष्ट्रातील धंदा या दृष्टीनें पण शेती महत्वाची आहे. व परदेशीं दळणवळणाचीं साधनें नसत त्यावेळीं प्रत्येक देशास स्वत:च्या निर्वाहाकरितां पुरेसें धान्य करणें भाग असे, व यूरोपखंडातील लढायामध्यें नुकतेंच असें अनुभवास आलें आहे कीं राष्ट्रातील इतर उद्योगधंदेच नव्हे परंतु प्रजेचें जीवनहि शेतीवर अवलंबून आहे, व प्रत्येक राष्ट्रानें अत पर तरी शेतीस धंदा या दृष्टीनें पूर्ण महत्व दिलें पाहिजे

इ. सन १९१४-१५ सालीं लागवडींत व पड वगैरे असलेलें क्षेत्र प्रांतवार दाखविणारा तक्ता खुलाशासाठीं पुढें दिला आहे कोष्टकातील आकडे हजाराचे आहेत व जमिनीचें मान एकरांत दिलें आहे. एकूण संख्या दिलेल्या आकड्याची बेरीज नसून खऱ्या आकड्यांची बेरीज आहे व तींतील हजाराचे आकडे वगळले आहेत.

## लागवडीच्या व पडित जमीनींचें प्रांतवार कोष्टक

| प्रांत | सर्वकागदा बरहुकूम एकदरक्षेत्र | संस्थानाच क्षेत्र वजा | निव्वळ क्षेत्र. मोजणी प्रमाणें | निव्वळ क्षेत्र. गावकागदाप्रमाणें | लागवडीत असलेलें निव्वळ लागवडीचें | लागवडीत असलेलें पड टाकलेलें | लागवडीस न आलेले लागवडीस योग्य | लागवडीस न आलेले लागवडीस अयोग्य | जंगल खातीं |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| बंगाल | ५३९३१ | ३४५२ | १०४८० | ५०४८० | २५२०८ | ४५७१ | ५२९५ | ११२७७ | ४२५८ |
| मद्रास | ९७८३९ | ६७९२ | ९१०८७ | ८९४९१ | ३४६९२ | ८४७६ | १०९२० | २२३६४ | १३०८१ |
| मुंबई इलाखा | ८५६१५ | ३६९७१ | ४८६४३ | ४८६४४ | २५७११ | ७२९३ | १३४३ | ६७०६ | ५५८९ |
| सिंधप्रांत | ३३९६१ | ३८७२ | ३००८९ | ३००८९ | ४५०० | ४८८४ | ६३२२ | १३५९० | ७९३ |
| आग्रा | ५७३४२ | ४३४५ | ५२९९६ | ५२७७९ | २६८७७ | १९१६ | ७५५६ | ७७०२ | ८७२८ |
| अयोध्या | १५३०७ | ... ... | १५३०७ | १५४७७ | ९२९० | ५१४ | २८५४ | २२०५ | ६१३ |
| बहार व ओरिसा | ७१५३५ | १८३३४ | ५३२०० | ५३२०० | २५०२७ | ४३७२ | ८०११ | १००५६ | ४७३२ |
| पंजाब | ८६३६७ | २४५११ | ६१८५५ | ६०८८० | २६५८२ | २०४९ | १६८३३ | १२४४३ | २९७२ |
| ब्रह्मदेश उत्तरभाग | ५७१७८ | ३३७५ | ५३८०३ | ५३८०३ | ५१२२ | ४२०१ | १०५६६ | २१३४१ | १२५७२ |
| ब्रह्मदेश दक्षिणभाग | ५५०७८ | ... ... | ५५०७८ | ५१०७८ | ९२४१ | ६४७ | १४६३२ | २३४०० | ७१५७ |
| मध्यप्रांत | ७२५५२ | १९९६० | ५२५९१ | ५२५९४ | १८०९१ | २३३७ | १३३९९ | ४०५८ | १४७०७ |
| वऱ्हाड | ११३७४ | ... ... | ११३७४ | ११३७४ | ७०२१ | ११२३ | १४० | ५४९ | २१४२ |
| असाम | ३९२७५ | ७९६९ | ३१३०६ | ३१३०६ | ५८८९ | २६९९ | १४४२२ | ५५११ | २७८४ |
| वायव्यसरहद्दीवरील प्रांत | ८५७९ | १४० | ८४३८ | ८५७३ | २६२३ | ३२४ | २६३३ | २६२४ | ३६७ |
| अजमीर-मारवाड | १२७१ | ... ... | ११७० | १७७१ | ६७४ | ३०४ | १४९ | ८४७ | ९६ |
| दिल्ली | ३६८ | ... ... | ३६८ | ३६८ | २१६ | १५ | ६० | ६९ | ७ |
| कुर्ग | १०१२ | ... ... | १०१२ | १०१२ | १३९ | १७१ | १० | ३३४ | ३५८ |
| मणिपूर परगणा | ३१ | ... ... | ३१ | ३१ | ७ | ३ | ७ | ३ | १६ |
| एकूण गुमारें | ७४९११६ | १२९७२४ | ६½ लक्ष | ६½ लक्ष | २२७६११ | ४५८९७ | ११५०८० | १४५४२० | ८२९३६ |

हिंदुस्थानात शेतीवर अद्याप शेंकडा ८० लोक अवलंबून आहेत शहरांत रहाणाऱ्या लोकांना या धंद्याचें महत्व नीटसें कळत नाहीं परंतु खेडेगावांत हाच कायतो मुख्य धंदा असतो. एकंदर देशांत यावर किती माणसें अवलंबून आहेत हें पुढील आकड्यावरून दिसून येईल सन १९११ सालीं झालेल्या खानेसुमारीवरून पहातां सर्व हिंदुस्थानांतील शहरांतील लोकसंख्येचें खेडेगांवातील लोकसंख्येशीं प्रमाण येणें प्रमाणें आहे—

शहरांत रहाणारे लोक —२,९७,८८,२२८

खेड्यांत रहाणारे लोकः—२८,५४,०८,१६८

नगरस्थाचें खेड्याच्या लोकसंख्येशीं प्रमाण १·८ आहे या प्रमाणामध्यें प्रत्यक्ष स्वत चीं शेती करणारे, दुसऱ्याचें खंडानें करणारे, शेतावर मजुरी करणारे, व शेतीवर [illegible] लहान लहान धंदे अवलंबून आहेत त्या सर्वांचा [illegible] होतो यावरून या धंद्याचा निर्वाहाचें साधन म्हणून [illegible] किती उपयोग होतो हें दिसून येतें इंग्लंड देश [illegible] करिता असें दिसून येतें कीं इंग्लंड देश [illegible] माहेरघर असल्यामुळें तेथें शेंकडा ५८ लोक इतर धंद्यात गुतलेले असून व फक्त [illegible] करितात परंतु हिंदुस्थानांत शेती हा [illegible]

तींत शेंकडा ७१ लोक गुंतलेले असून शेंकडा १२ उद्योगधंदे, ५ व्यापार, २ घरगुती नोकरी, शेंकडा अर्धा वकिली, डॉक्टरी, वैद्यकी, भिक्षुकी वगैरे धंदा व शेंकडा अर्धा सरकारी नोकरी व लष्करी नोकरी वगैरे करितात.

अजून शेंकडा ७० लोकांचे पोट प्रत्यक्ष शेतीवर चालतें, आणि शेंकडा ९० जणांची धाव शेती कोणत्या रीतीनें तरी संपादन करण्याकडे जात आहे. रावापासून रंकापर्यंत सर्वांचा व्यवहार शेतीच्या साहाय्यानें सुखाचा होतो हें सर्वश्रुत आहे. सर्व धंदे, नानातऱ्हेचे उदीम व्यापार व निरनिराळे कारखाने हे देखील शेतकीवरच अवलंबून आहेत इतकेंच नव्हे तर सर्व तऱ्हेचे भिकारी, गोसावी, बैरागी, भिक्षुक, वकील व बलुतदार वगैरे अठरापगड जाती या सर्वांचा उदरनिर्वाह शेतकऱ्याच्या उत्पन्नावर अवलंबून आहे म्हणून शेती हा धंदा सर्वांत श्रेष्ठ व महत्त्वाचा मानिला पाहिजे

शे त की द ष्ट्या मु ख्य वि भा ग —शेतकी दृष्ट्या विचार करितांना हिंदुस्तानचे अगदीं तीन वेगवेगळाले भाग करिता येतात. पहिला भाग हिमालय पर्वत, दुसरा भाग हिमालय पर्वताच्या पायथ्यापासून दक्षिणेकडे पसरत गेलेला आहे. हिमालयांतून निघणाऱ्या मोठमोठ्या नद्या या भागांतून वहात गेलेल्या आहेत. तिसरा भाग वरील मैदानाच्या दक्षिण सीमेपासून पुन्हा वर चढत गेला आहे. हा एक त्रिकोणाकृति उंच सखल प्रदेश आहे.

हिमालय पर्वतातील पाण्याचा साठा खालील सपाटीच्या उष्ण प्रदेशाना उपयोगी पडतो. हिमालयाच्या दक्षिण बाजूस पाऊस इतका पुष्कळ पडतो कीं, तेणेंकरून नद्यास महापूर येतात व यामुळें त्याच्या उतरणीवरील प्रदेशात पीक फार चांगलें येतें. तेथें जव, वरग, नाचणी वगैरे किरकोळ धान्यें व बटाटे मुबलक पिकतात. हीं पिकें रानटी व डोंगरी लोक जंगलास आग लावून त्या राखेंत सोरी व कुदळी यांच्या साहाय्यानें जमीन तयार करून जागोजागीं खाली घालून फार मेहनतीनें काढितात. हिमालयांतून निघणाऱ्या नद्या ज्या विस्तीर्ण प्रदेशांतून वाहतात तो दुसरा भाग होय. या प्रदेशाचा विस्तार बंगालच्या उपसागरापासून हिंदी महासागरापर्यंत पूर्व-पश्चिम आहे. हा भाग अत्यंत सधन व दाट वस्तीचा आहे. या प्रदेशाला पश्चिमेकडून सिंधु, पूर्वेकडून ब्रह्मपुत्रा व मध्यभागीं गंगा आणि तिला मिळणाऱ्या नद्या ह्यांच्या पाण्याचा पुरवठा होऊन गाळ साचून येथील प्रदेश सुपीक झाला आहे. ह्या भागात बंगालचा खालचा प्रदेश, आसाम, संयुक्तप्रांत, पंजाब, सिंध, रजपुताना आणि इतर एतद्देशीय संस्थानें यांचा समावेश होतो.

बंगालांतील नदीकांठच्या सपाट प्रदेशात कित्येक ठिकाणीं दोन व कित्येक ठिकाणीं भाताचीं तीन पिकें एक वर्षात येतात. अंतर्वेदीत एकसारखीं भाताचीं शेतें व त्याच्या भोंवतीं बांबूचीं हिरवीगार बेटें, नारळी, पोफळी व दुसरे ताडमाडाचे बन दृष्टीस पडतात. या भागात जूटची लागवड विशेष आहे. उत्तरभागात गहूं, जव, ज्वारी, गळिताचीं धान्यें, कापूस, तंबाखू, नीळ वगैरे पिकें होतात. दक्षिण बंगालात रेशमाची लागवड विशेष करितात. जंगलात रेशमाचे कोश उत्पन्न होतात आसामात मुख्यत्वेंकरून चहाची लागवड पुष्कळ आहे.

तिसरा भाग म्हणजे त्रिकोणाकृति आकाराचा हिंदुस्थानचा पठाराचा प्रदेश होय. पूर्वी याला 'दक्षिण' व हल्ली या भागाला 'डेक्कन' असें म्हणतात. या प्रदेशाच्या उत्तरेस अरवली, विंध्याद्रि व सातपुडा हे डोंगर असून पूर्व-पश्चिम बाजू घाट या नावानें प्रसिद्ध आहेत सबंध देश डोंगराच्या रांगा व शिखरें ह्यांनीं भरलेला आहे ह्याच्या मधून मधून मात्र लागवड केलेलीं व उववटयाचीं अनेक मैदानें आहेत पूर्वघांटाचे तुटक तुटक मुलूखे आणि रांगा ह्या मद्रास इलाख्याकडून खालीं गेल्या आहेत. मुंबई इलाख्याला समुद्राच्या बाजूनें पश्चिमघाटाची एक मोठी भिंतच आहे. त्या घाटाच्यामध्यें व समुद्रकिनाऱ्यामध्यें फक्त चिंचोळी पट्टी आहे त्याला कोंकण म्हणतात ह्या भागात मध्यप्रांत, वऱ्हाड, मुंबई इलाखा, मद्रासइलाखा, म्हैसूर व निझामचें राज्य व इतर मांडलिक संस्थानें ह्याचे मुलूख येतात.

महाराष्ट्रातील शेती या विषयावर विचार करण्यापूर्वी महाराष्ट्रामध्यें कोणकोणत्या प्रांताचा समावेश होतो याचा विचार करूं. महाराष्ट्र देशाची मर्यादा येणेंप्रमाणें —

उत्तरेस नर्मदा नदी व सातपुडा डोंगर, पूर्वेस वाइन गंगा आणि प्राणहिता या दोन नद्या, त्याच्या आग्नेय दिशेस माहूर गावापासून गोव्यापर्यंत त्याची पूर्व मर्यादा वाकडी आहे आणि पश्चिमेस अरबी समुद्र आहे. महाराष्ट्राचा आकार काटकोन त्रिकोणी आहे. त्याची उत्तरेकडील बाजू सुमारें २०० कोस आहे. आणि पश्चिमेकडील व उत्तर-दक्षिणेकडील साधारण तितकीच आहे पश्चिमेकडील भागाला कोंकण व पूर्वेकडील भागाला देश असें म्हणतात. मध्यभागीं सह्याद्रि पर्वतावरील जो प्रदेश त्याला घाटमाथा असें म्हणतात. या देशापैकीं पूर्वेकडील एक भाग मोंगल सरकाराकडे आहे. व दक्षिणेकडील एक लहानसा भाग ( गोवें व भोंवतालचा प्रदेश ) पोर्तुगालच्या स्वाधीन आहे या देशातच कोल्हापूरचें राज्य व दुसरे अनेक संस्थानिक राजे यांचे देश मोडतात. इसवी सन १८६१ सालीं महाराष्ट्र देशाचा वसूल सुमारें दीड कोट रुपये होता. महाराष्ट्रात खालील प्रांताचा समावेश होतो.

( १ ) कोंकण प्रांतः —यात ठाणें, कुलाबा, रत्नागिरी व कारवार जिल्हे.

( २ ) गोवें प्रांत.—यात दहा महाल आहेत—ते इलयस (जंजिरा गोवा ), साष्टी, बारदेश ( बारा देसायाचा गाव ). भतग्राम, ( डिचोली ). फोंडें, पेडणें, सांगें, केपें, काणकोण व सत्तरी हे होत.

( ३ ) देश.—यात पश्चिमखानदेश, पूर्वखानदेश, नाशिक, अहमदनगर, पुणें, सोलापूर व सातारा.

( ४ ) कर्नाटकः—यांत बेळगाव, धारवाड व विजापूर.

( ५ ) निझामच्या राज्यामध्येः—मराठवाडा, औरंगाबाद, बीड, परभणी, बेदर, नांदेड, गुलबर्गा.

( ६ ) मध्यप्रांतांपैकीं नागपूरभागः—यात नागपूर, भंडारा, चांदा, वर्धा, बालाघाट.

( ७ ) वऱ्हाडप्रांतः—यात उमरावती, अकोला, बुलडाणा व यवतमाळ.

एतद्देशीय संस्थानेंः—यात कोंकण—डाग, सुरगणें, जव्हार, जंजिरा सावंतवाडी. देश—यात औंध, फलटण भोर, अक्कलकोट, जत, डफळापूर.

दक्षिणमहाराष्ट्र.—यात कोल्हापूर, सांगली, मिरज, कुरुंदवाड, जमखंडी, मुधोळ, रामदुर्ग व सावनूर.

कों क ण—सह्याद्रीपर्वताच्यायोगानें महाराष्ट्राचे दोन विभाग झाले आहेत. त्यातील सह्याद्रि व अरबीसमुद्र यामध्यें दक्षिणोत्तर जी अरुंद पट्टी आहे तिला कोंकण असें म्हणतात. या प्रदेशाची दक्षिणोत्तर लांबी सुमारें ४५० मैल आहे व रुंदी ३०—६५ मैल पावेतों आहे. पूर्वभागातून सह्याद्रि पर्वत गेल्यानें हा फार डोंगराळ भाग आहे. व पश्चिमभाग साधारणपणें सपाट आहे. सह्याद्रिच्या घाटमाथ्यावरील भागास मावळ म्हणतात. मावळात सरासरी १२५ इंचावर व कोंकणात १०० इंचापावेतों पाऊस पडतो. उत्तर कोंकणात पावसाचें मान कमी व दक्षिण कोंकणात जास्त आहे. कोंकणातील हवा उष्ण व दमट आहे. येथील मुख्य पीक भाताचें होय.

कोंकणप्रांताचें क्षेत्रफळ १३६६२ चौरस मैल आहे, व लोकसंख्या ३१,१०,६६१ आहे

गो वा प्रां तः—दक्षिणकोंकणात गोमांतकाचा समावेश होतो. पूर्वेस सह्याद्रि व पलीकडे उत्तरकारवारातील सुपा तालुका, पश्चिमेस हिंदीमहासागर, दक्षिणेस कारवार जिल्हा, उत्तरेस तेरेखोलची नदी व सावंतवाडी संस्थान. इ. स. १५१० सालीं पोर्तुगीज लोकांचा सरदार वास्को दि गामा यानें पहिल्यानें गोंवा बेट हस्तगत केलें व १७६३ पावेतों वेळोवेळीं आणखी प्रांत काबीज केले. गोमांतकाची दक्षिणोत्तर लांबी ६१ मैल, व पूर्वपश्चिम रुंदी ४१ मैल आहे. क्षेत्रफळ सुमारें १०६२ चौरस असून लोकसंख्या ५,४१,०७४ आहे.

गोंवाप्रांत समुद्रसपाटीपासून सुरु होऊन तो ३५०० फुटापर्यंत उंच उंच होत गेलेला आहे. समुद्रकांठीं हवा खारी, घाम आणून थकवा आणणारी पण डोंगराच्या बाजूला वर जावें तों साधारण बरी होत जाते. एकंदरींत हवा ओलसर, दमट व उष्ण आहे. या प्रांतात पावसाळा भरपूर व खात्रीचा आहे. येथील मुख्य पिकें भात, नारळ व सुपारी हीं होत.

दे श व क र्ना ट क.—यांत एकंदर १० जिल्हे आहेत. हा प्रदेश उत्तरेस सातपुडा पर्वतापासून सुरु होऊन दक्षिणेस म्हैसूर संस्थानापावेतों पसरलेला आहे. याच्या पश्चिमेला दक्षिणटोंकापावेतों सह्याद्रि पर्वताची ओळ आहे. या प्रदेशाचे स्थूलमानानें तीन भाग करता येतात.

प श्चि म पट्टीः—सह्याद्रिपर्वताला लागून असलेला २०—२५ मैल रुंदीचा प्रदेश हा अगदीं डोंगराळ आहे. यातील मुख्य पीक भात होय.

मध्यपट्टी.—यात पश्चिम पट्टीच्या पूर्वेकडे १५—२० मैल रुंदीचा प्रदेश मोडतो. येथें डोंगर थोडे आहेत व पाऊस सधारण ३० इंच पावेतों पडतो. हवा मध्यम प्रतीची उष्ण आहे. गहूं, बाजरी, व ज्वारी हीं मुख्य पिकें होत. कापूसहि या भागात पिकतो.

पूर्वपट्टीः—ही संज्ञा मध्यपट्टीच्या पूर्वेकडील सपाट प्रदेशास देतात. या भागात डोंगर व टेंकड्या थोड्या आहेत या प्रदेशात पाऊस कमी असून सुमारें २० इंच पावेतों पडतो. या पूर्वपट्टीपैकीं अगदीं पूर्वेकडील जिल्ह्यात ( अहमदनगर, सोलापूर, व विजापूर येथें ) पावसाचें बहुतेक दुर्भिक्ष असतें. या भागात हवा उष्ण असते. यात मुख्य पिकें ज्वारी, थोडी बाजरी, कापूस, गहूं व गळिताचीं धान्यें हीं होत देश या विभागाचें ३७,२५१ चौरस मैल क्षेत्र असून लोकसंख्या ९३,८,७०६४ आहे.

क र्ना ट कः—हा प्रदेश मुंबई इलाख्यातील दक्षिण टोंक होय याचे मुख्य दोन भाग करिता येतात. पश्चिमेकडील मलाड अगर मलनाड ( मळी = पाऊस, नाड = भाग ) व पूर्वेकडील देशी भाग. मलाड भाग डोंगराळ असून त्यातील हवा थंडगार असते. येथें ५०—१०० इंचापावेतों पाऊस पडतो. तो नियमित व पुरेसा असतो तेथील मुख्य पीक भात असून डोंगराळ भागात नाचणी, वरी वगैरे पेरितात. या भागात लहान तळीं बरींच आहेत. पूर्वेकडील काळ्या कोरडवाहू जमीन असलेल्या भागाला देश म्हणतात. यात हवा उष्ण असून पाऊस सुमारें २३—२६ इंचापावेतों पडतो. या भागातील महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजे पाण्याचा तुटवडा ही होय. तळीं उन्हाळ्याच्या आरंभींच आटतात या भागातील मुख्य पिकें कापूस, ज्वारी, गहूं आणि गळितांचीं धान्यें होत. बहुतेक सर्व विजापूर जिल्हा या भागात मोडतो. पूर्व व पश्चिम याच्या दरम्यान धारवाड व बेळगाव जिल्ह्यात जो भाग आहे त्याला संक्रमणपट्टी म्हणतात. या भागाला पावसाळा जून महिन्यात सुरू होणाऱ्या पावसाचा व आक्टोबर महिन्यात सुरु होणाऱ्या मद्रासच्या पावसाचा या दोहोंचा पूर्ण फायदा मिळतो. या भागातील हवा पाणी, पाऊस, काळी जमीन वगैरे कांहीं मलाड व कांहीं देशासारखी आहे. या भागात सर्व तऱ्हेचीं पिकें होतात. कर्नाटकाचें क्षेत्रफळ १५९२१ चौरस मैल असून लोकसंख्या २८,१२,७९८ आहे.

नि झा म चें रा ज्य—हें राज्य विस्तारानें आणि माच्या मानानें सर्व संस्थानांत जास्त आहे. हें

पठाराच्या मध्यभागीं आहे. याची सर्वांत मोठी लांबी ९०२ मैल असून सर्वांत मोठी रुंदी ७६२ मैल आहे. या पठाराची उंची औरंगाबादेजवळ २००० फूट असून तीं कर्नूलजवळ अवघी ९०० फूट आहे. एकंदरींत सरासरीनें या पठाराची उंची १२५० फूट आहे. या राज्याचे गोदावरी व मांजरा नद्यांनें दोन विभाग होतात. उत्तरेकडील व पश्चिमेकडील भागात काळा खडक असून दक्षिण व पूर्वेकडील भागात ग्रानाइट व शाहाबादी धोंड्याच्या खाणी आहेत. पश्चिमेकडील काळ्या खडकाच्या भागाला मराठवाडा अशी संज्ञा असून पूर्वेकडील ग्रानाईटच्या बहुतेक भागाला तेलंगण म्हणतात. तेलंगणात ओढ्यांना धरणें बांधून केलेले हजारों तलाव आहेत. सह्याद्रींतील बऱ्याच नद्या या भागातून वहात जातात व त्यांचा पुष्कळ फायदा त्याला मिळतो.

*निझामच्या राज्यात सरासरीच्या मानानें ३०–३५ इंचापर्यंत* पाऊस पडतो. तेलंगणात मुख्य पीक भाताचें आहे. मराठवाड्यात व कर्नाटकात गोदावरी, भीमा, कृष्णा, तुंगभद्रा या मोठ्या नद्यांच्या आजूबाजूस, गाळाच्या काळ्या खोल जमिनी असून त्यात ज्वारी (खरीप, रब्बी) कापूस, बाजरी, तूर, हरभरा, वाटाणा, लाख, तीळ, जवस, करडई इत्यादि जिन्नस विपुल पिकतात. पठारावर जेथें जमीन सपाट असते, तेथें गव्हाची लागवड जास्त होते. तंबाखू व ऊंस यांची लागवड जागजागीं आढळते. तेलंगणात एरंडीचा पेरा पुष्कळ होतो. औरंगाबाद जिल्हा फळफळावळीच्या बागाबद्दल प्रसिद्ध आहे.

येथील हवा समशीतोष्ण आहे. दक्षिण भागाची हवा उत्तरेपेक्षा अधिक उष्ण आहे. मराठवाड्यातील हवा शरीर प्रकृतीस जास्त मानवते. एकंदरींत मार्चपासून जून पावेतों हवा रुक्ष व गरम असते व इतर दिवसांत बरी असते.

निझामच्या राज्याचें एकंदर क्षेत्रफळ ८२,६९८ चौरसमैल असून लोकसंख्या १,३३,७४,६७६ आहे व उत्पन्न सरासरीनें *तीन कोट आहे.*

**व ऱ्हा ड प्रां त.**—ह्या प्रांताला पूर्वी विदर्भदेश म्हणत असत. हा प्रांत साधारणपणें हिंदुस्थानच्या मध्यभागीं आहे. याची पूर्वपश्चिम लांबी १५० मैल व रुंदी १४४ मैल आहे. या प्रांताच्या उत्तर सीमेवर सातपुडा पर्वत असून पश्चिम सीमेवर खानदेश व निझामचें राज्य आहे इ. स. १६६७ सालीं वऱ्हाड प्रांताचें ऐनेइ अकबरींत मोंगलाचा एक सुपीक प्रांत असें वर्णन केलेलें आहे. वऱ्हाडच्या स्वाभाविक रचनेवरून त्याचे दोन भाग करिता येतात. सखल प्रदेशास पेनघाट म्हणतात व उंच प्रदेशास मेळघाट म्हणतात. सखल प्रदेशांतील जमीन उत्तम काळी व गोल आहे. ही जमीन फार सुपीक असून उत्तम जातीचा कापूस याच प्रदेशात होतो. याशिवाय येथें गहूं, जोंधळा, हरभरा, जवस, तूर व दुसरीं कित्येक पिकें होतात. पूर्णा काठच्या जमिनींत बराच क्षार आहे व येथें बऱ्याच लोण्याच्या जमिनी आहेत. बालाघाट (दक्षिणेकडील अजिंठ्याचे डोंगर) पट्यात जमिनी मध्यम प्रतीच्या आहेत. येथें खरिपात कापूस, ज्वारी, तूर, तीळ, मुद्मूग वगैरे पिकत असून रब्बींत गहूं, जवस व हरभरा, हीं मुख्य पिकें होतात.

एकंदरींत हा प्रांत उष्ण व रुक्ष आहे. पेनघाट खेरीज करून हवा साधारण देशासारखी आहे. पेनघाटांत मात्र उन्हाळ्यात हवा अति उष्ण असते. रात्रीं बहुतकरून गारठा असतो. पावसाळ्यात हवा दमट व साधारण गार असते. या प्रांतांत सरासरीनें ३३–३५ इंचापावेतों पाऊस पडतो. पेनघाटापेक्षा बालाघाटात पाऊस जास्त पडतो व मेळ( गावीलगड )घाट म्हणून जो साधारण जंगलमय भाग आहे तेथें पाऊस फार पडतो. या प्रांताचें क्षेत्रफळ १७७६६ चौरस मैल असून लोकसंख्या ३०,५७,१६२ आहे.

**म ध्य प्रां तः**—यांत डोंगर व खोरीं आहेत. उत्तरेकडील प्रदेश विशेष डोंगराळ आहे. या प्रांताचा सरासरीनें एक चतुर्थांश भाग जंगलांनें व्यापिलेला आहे. येथील मुख्य नद्या नर्मदा, महानदी, वर्धा, वैनगंगा ह्या होत. या प्रांतात जबलपूर पासून हरद्यापावेतों बहुतेक भागांतील जमीन गाळाची बनलेली आहे. सागर, जबलपूर, मंडला, शिवनी, छिंदवाडा, नेमाड, नागपूर व वर्धा जिल्ह्यांतील बऱ्याच भागात काळा खडक असून गोंडावणी खडक नागपूर, वर्धा, चांदा वगैरे जिल्ह्यात सांपडतो. शिवाय हा बिलासपूरच्या जमीनदारी भागातहि आहे. वाळूचे व चुन्याचे खडक सागर व दमोह जिल्ह्यात आहेत. नीस व ग्रानाईट, नागपूर व छत्तीसगड भागात आढळतात.

ह्या प्रांतात सरासरीनें ३५–४८ इंच पाऊस पडतो. हवा एकंदरींत उष्ण आहे. मंडला, चांदा, भंडारा, बालाघाट छत्तीसगड या जिल्ह्यात वैनगंगा नदीच्या पूर्व काठच्या प्रदेशात मुख्यत्वेंकरून तांदुळाचें पीक फार होतें. नागपूरकडच्या पश्चिम भागात, वर्धा जिल्ह्यात व छिंदवाड्याच्या दक्षिणेस मुख्य पिकें कापूस व ज्वारी हीं होत. उत्तरेकडील प्रदेशात गहूं पुष्कळ पिकतो. शिवाय तूर, हरभरा, गळिताचीं धान्यें वगैरे बरींच होतात. तंबाखू व ऊंस यांचेंहि थोडेंसें उत्पन्न होतें. नागपूर भागांत बोरं, संत्रीं आणि केळीं चांगलीं होतात मध्यप्रांतात पानमळे बऱ्याच ठिकाणीं आढळतात, परंतु रामटेकच्या पानाची विशेष प्रसिद्धि आहे.

**ज मी नी चे प्र का र व त्या ती ल पि कें.**—शेतकी दृष्ट्या हिंदुस्थानातील एकंदर जमीनींपैकीं गाळाच्या जमीनीचा पसारा फारच मोठा आहे. सिंध प्रांतापैकीं बहुतेक भाग, मुंबई इलाख्याचा उत्तर भाग ( गुजराथ ), रजपुताना, पंजाब, संयुक्त प्रांत, बंगाल इलाखा, मद्रास इलाख्यांतील गोदावरी, कृष्णा आणि तंजावर जिल्हे व आसाम आणि मध्यदेशांतील बराच प्रदेश वगैरे गाळाचा आहे. दक्षिण हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावरील पट्टी व पूर्वपश्चिम घाटाच्या

सोंच्यातील जमीना या सर्व वरील प्रकारच्याच होत. शिवाय असल्या प्रकारच्या जमीनी मोठमोठया नद्यांच्या दोन्ही थड्यांना बनलेल्या आहेत कृष्णा आणि गोदावरी यांच्या मुखा जवळील जमीनीचा रंग काहींसा काळसर आहे. उत्तर हिंदुस्थानातील गंगाथडीच्या जमीनीचा रंग, भुरकट, पिंवळसर व काळसर असा असतो कित्येक ठिकाणीं जमीन वालुकामय, तर कित्येक ठिकाणीं ती इतकी चिकण व घट्ट असते कीं, पाणी बिलकुल निचरून जात नाहीं. कित्येक ठिकाणीं सोडा मॅग्नेशियाचे क्षार बसून लोणा आलेला आहे. पूर्वेकडील व मुख्यत्वेंकरून बंगाल्यातील जमीन पंजाब व संयुक्त प्रांतातील जमीनीपेक्षा फारच बारीक कणाची झालेली आहे. या बारीक कणाच्या जमीनींत कित्येक ठिकाणीं चुनखडी असून काहीं ठिकाणीं तिच्या पोटीं चुनखडीचे थर बनलेले आहेत. बहुतेक ठिकाणीं जमीनींतील थर अगदीं खालीं वाळू, तिच्यावर चिकण जमीन व अगदीं वरील थर लापणजमीन असे असतात. गंगाकाठीं विहिरी फारशा खोल नसतात. परंतु पंजाब व संयुक्त प्रांतातील विहिरींना पाणी फार खोलीवर लागतें. ज्या मळई-या जमीनी भुसभुशीत असून स्वाभाविक निचऱ्याच्या असतात, त्यात पाणभरती पिकें चांगलींच होतात. उत्तरेकडील मळईच्या प्रदेशातील जमीनी सुपीक असून बहुतकरून पाऊस वेळाचा व नियमित पडत असल्यामुळें यांत अनेक तऱ्हेचीं खरीक व रब्बी पिकें होतात या मळईच्या जमीनींत सेंद्रिय पदार्थ व नायट्रोजन फारच थोडा सापडतो.पोटयाश पुरेसा असून हिंदुस्थानातील इतर जमीनीपेक्षा फास्फरिक ॲसिडचें प्रमाण बरेंच जास्त असतें चुना आणि मॅग्नेशिया ही पुरेशीं असून लोखंड व अल्युमिना यांचें प्रमाण बरेंच जास्त असतें हें प्रमाण मुख्यत्वेंकरून चिकण जमीनींत असतें. दक्षिणेंतील काळवथरी दगड ( डेक्कन ट्रॅप ) या खडकाचा प्रसार अजमासें दोन लक्ष चौरस मैल आहे या खडकानें मुंबई इलाख्यांतील बहुतेक भाग व्यापला असून शिवाय तो वऱ्हाड प्रांत व मध्यप्रांताच्या पश्चिमेकडील तिसरा हिस्सा व निजामशाहीच्या पश्चिमेकडील अर्धा भाग यांतहि पसरला आहे या सर्व प्रदेशात जमीनी अनेक तऱ्हेच्या आढळत असून त्यात होणाऱ्या पिकाचें प्रमाण कमजास्त असतें. या प्रदेशांतील जमिनी सारख्या सपाट नसून उंचसखल असतात डोंगराच्या उतारावरील जमिनी उथळ व हलक्या असून यांत पाऊस वेळेवर पडल्यास पिकें चांगलीं येतात. पायथ्याकडील जमिनी खोल, काळ्या रंगाच्या असतात या वर्षानुवर्ष डोंगरावरील गाळ येऊन सुधारत असतात. या प्रदेशातच कापसाला योग्य अशा काळ्या, खोल व सपाट जमिनी आहेत. तापी, नर्मदा, गोदावरी व कृष्णा या नद्यांच्या काठच्या भारी काळ्या जमिनी कित्येक ठिकाणीं वीस वीस फूट पावेतों खोल असतात. पावसाळ्यात या इतक्या चिकण होतात, कीं त्यात त्यावेळीं मार्ग दुरापास्त होत असल्यामुळें त्यात गहूं, जवस, हरभरा व शाळू-सारखीं रब्बी पिकें करतात ज्या काळ्या जमिनींत जोंधळा व कापसासारखीं पिकें खरीप हंगामात घेतात त्या जमिनी चार पांच फूट खोल असून त्यात चुनखडीचे व मुरमाचे तुकडे मिसळलेले असतात। या काळ्या जमिनींची तळजमीन भुसभुशीत व चुनखडीनें मिश्रित असल्यामुळें तींतून पाण्याचा निचरा चांगला होतो. काळ्या जमिनीचे रंग, रूप, पोत व सुपीकता यामध्यें जरी बराच फरक आढळतो, तरी तिच्या अंगीं ओलावा राखून ठेवण्याची शक्ति असते. उन्हाळ्यात या जमिनी आवळतात व त्यामुळें त्या फार खोलपर्यंत भेगाळतात या जमिनी पाणभरती पिकें करण्यास फारशा उपयोगी पडत नाहींत. पण त्याच कमी खोलीच्या आणि मिसळीच्या असल्या म्हणजे त्यात २५ ते ३० फूट खोलीवर पाणी लागत असून विहिरीच्या पाण्यावर उत्तम पिकें होतात. दक्षिणेंतील ट्रप प्रदेशाच्या बाहेरहि काळ्या जमिनी आढळून येतात. उदाहरणार्थ मुंबई इलाख्यांतील सुरत, भडोच जिल्ह्यातील जमिनी, मद्रास इलाख्यात बल्लारी, कर्नूल व कडप्पा जिल्ह्यातहि याच प्रकारच्या काळ्या जमिनी आहेत. पण या सर्व जमिनी मळईच्या आहेत या निराळ्या तऱ्हेच्या काळ्या जमिनींत लोखंड, अल्यूमिनिअम व म्यागेनीज ही बरीच असतात. चुन्याचें प्रमाण कमीजास्त असून तो कार्बोनेट व सिलीकेट या दोन्ही रूपात सापडतो मॅग्नेशिआ जास्त प्रमाणात असून पोटयाश बहुतेक पुरेसा असतो. फास्फॉरिक ॲसिड, नायट्रोजन, व सेंद्रियपदार्थ यांची बहुतेक तूट असते.

तिसरा महत्वाचा प्रदेश म्हणजे प्रस्तरीभूत ( ग्रानाइट ) खडकाचा होय मद्रास इलाख्यातील बहुतेक प्रदेशात, म्हैसूर संस्थानात, मुंबई इलाख्याच्या गदगकडील भागात, निजामशाहीच्या पूर्वेकडील अर्ध्या व मध्यप्रांताच्या पूर्वेकडील दोनतृतीयांश भागात, ओरिसा व छोटा नागपूरकडे, बंगाल्यातील सताळपरगण्यात व बिरभूम जिल्ह्यात, संयुक्त प्रांतातील मिरझापूर, झांशी आणि हमीरपूर जिल्ह्यातील कांहीं भागात आणि राजपुतान्यातील पूर्व भागात हा खडक आढळतो. याच प्रकारच्या खडकाची एक लांब पट्टी दक्षिण ब्रह्मदेशाच्या पूर्व भागात सापडते. या जातीच्या खडकापासून झालेल्या जमिनी भिन्न भिन्न प्रकारच्या असतात काहीं अगदीं उथळ, खडकाळ व पांढरट रंगाच्या जमिनी डोंगरकडयावर सापडत असून त्यात अगदीं हलक्या दर्जाचीं पिकें होतात. अशा जमिनी म्हैसूर संस्थानात व मद्रास इलाख्यात बऱ्याच प्रमाणावर आढळून येतात तांबूस व तांबूसकाळसर व चिकण लापण जमिनी या पायथ्याशीं आढळत असून त्या सुपीक असतात. या दोहोंच्या मिश्रणानें झालेल्या मध्यम प्रतीच्या जमिनी पाणभरती पिकें करण्यास योग्य असतात. अशा जमिनींत कालव्याच्या पाण्याची सोय असलेल्या ठिकाणीं मुख्य पीक भाताचें करतात. या भागात तळीं व विहिरी रगड असून

त्यात अनेक तऱ्हेचीं चांगलीशी पिकें करतात.बेळगांव, धारवाड आणि उत्तर कानडा या जिल्ह्याच्या पश्चिमेकडील भागांत जांभा खडक ( लाटेराईट ) आढळतो. त्याच्यापासून होणाऱ्या जमिनीचा रंग पिंवळा, तांबडा अथवा लालसर काळा असतो. तांबूस जमिनी चांगल्या निचऱ्याच्या असतात. तेथें पुष्कळ तऱ्हेचीं पिकें करितात. साध्या व हलक्या जमिनींतील मुख्य पीक भाताचें होय. बेळगांव, धारवाडकडील तांबड्या जमिनींत व तशा तऱ्हेच्या म्हैसूरकडील जमिनींत सर्व जातींचीं फळझाडें चांगलीं होतात. आंबे तर उत्तमच होतात. या खडकापासून झालेल्या जमिनींत फास्फॉरिक ॲसिड, नायट्रोजन व सेंद्रिय पदार्थ यांची वाण आढळून येते.

हवामानः—साधारणपणें हिंदुस्थान देश समशीतोष्ण कटिबंधात व अंशतः उष्ण कटिबंधात असून तो विषुववृत्तापासून फार जवळ आहे. हिंदुस्थानात तीन प्रकारची हवा आढळून येते.उष्ण व दमट अशी मद्रास इलाख्यातील दक्षिण भागात, ओरिसा, बंगाल व आसाम प्रांतात आढळते. उष्ण व कोरडी हवा राजपुताना, पंजाब, संयुक्तप्रांत व सिंधचा उत्तर भाग यांत आढळते. मध्यम उष्ण व कोरडी पंजाब व संयुक्त प्रांताचा कांहीं भाग, माळवा, मुंबई इलाखा, निझामचें राज्य व मध्यप्रांत यांत आढळते. सामान्य रीतीनें दक्षिणेकडून उत्तरेकडे जातांना जसजसें समुद्रापासून अंतर वाढत जातें तसतसें हिंवाळ्यांतील थंडीचें मान व उन्हाळ्यांतील उष्णतेचें मान यांत बराच फरक पडत जातो. पूर्वेकडील किनारा व उत्तरहिंदुस्थानातील वाळवंटाचा प्रदेश यांत उन्हाळा फार कडक असतो.

हिंदुस्थानांत नैर्ऋत्य व ईशान्य अशा दोन दिशांनीं पाऊस येतो. पहिले मान्सून वारे एप्रिलपासून आक्टोबरपर्यंत वहात असतात, व हे हिंदी महासागरावरून येतात. हा पाऊस मुंबई इलाख्याच्या बहुतेक भागात पडतो. परंतु सह्याद्रीचा पश्चिम भाग सोडून जों जों पूर्वभागात जावें तों तों पाऊस कमी होत जातो. शिवाय हा पाऊस पंजाबचा ईशान्य भाग, गंगाकांठ, पूर्वबंगाल व आसाम,सह्याद्रीच्या पश्चिमेकडील आणि पूर्व घाटाच्या पूर्वेकडील प्रदेश, पश्चिम किनारा व पूर्व किनारा यास लागून असलेला प्रदेश व बंगाल यांत पडतो दख्खनचा बहुतेक भाग, सिंध, राजपुताना, पंजाब येथें पाऊस अनिश्चित असतो. पूर्वबंगाल, आसाम, मध्यप्रांत, कोंकण व मावळ या भागांत तो खात्रीचा असतो. ईशान्येकडून नैर्ऋत्येकडे वहाणारे मान्सून वारे आक्टोबरपासून मार्चपर्यंत वहातात. बंगालच्या उपसागरावरून वहाणारे वारे अशाच पैकीं होत. यामुळें पूर्वेकडील प्रदेशात नोव्हेंबर व डिसेंबर महिन्यात बराच पाऊस बहुतेक निझामच्या राज्यातील कांहीं भागात, मद्रास इलाख्यात, दक्षिण महाराष्ट्रात ( कर्नाटकात ), दख्खनच्या पूर्व भागात, मध्यप्रांतांत व वऱ्हाडात पडतो. हा पाऊस गहूं, हरभरा, जवस, शाळू [illegible] रब्बी पिकांना फार महत्वाचा आहे. उत्तर हिंदुस्थानांत नैर्ऋत्येकडील पावसानें खरीप पिकांना मदत होते व नोवेंबर ते मार्च महिन्यातील पावसानें रब्बी पिकास उपयोग होतो. हाच पाऊस संयुक्त प्रांतात मार्च व मेच्या दरम्यान पुष्कळ पडतो. व त्यामुळें येथें पेरे लवकर होतात. यावेळीं केव्हां केव्हां दक्षिण हिंदुस्थानात आल्याच्या हंगामात पाऊस पडतो. निरनिराळ्या प्रांतांतील पावसाचें सरासरी मान खालीं दिलेल्या कोष्टकात नमूद केल्याप्रमाणें असतें.

| प्रांताचें नाव | पाऊस इंच | प्रांताचें नाव | पाऊस इंच |
|---|---|---|---|
| वायव्य स. हृ. वरील प्रांत | १६·१ | राजपुताना | |
| पंजाब-पूर्व व | | पश्चिम भाग | १३·१ |
| उत्तर भाग | २३·१ | पूर्व भाग | २५·२ |
| –दक्षिण व | | | |
| पश्चिम भाग | ९·२ | मुंबई–गुजराथ | ३२·२ |
| सिंध | ६·५ | " कोंकण | १०९·३ |
| संयुक्तप्रांत–पूर्व- | | " डेक्कन देश | ३०·८ |
| भाग | ३९·२ | | |
| " पश्चिम | | मध्यप्रांत— | |
| भाग | ३७·९ | पश्चिम भाग | ४५ ४ |
| बहार–ओरिसा | ५६ ८ | पूर्व भाग | ५२ १ |
| छोटा नागपूर | ५१·९ | वऱ्हाड | ३२·२ |
| बहार | ४८·६ | | |
| बंगाल–पूर्वभाग | | हैद्राबाद उ.भा | २४·९ |
| " पश्चिम | ७४·८ | " द. भा. | ३०·६ |
| आसाम | ९८·८ | | |
| ब्रह्मदेश–उत्तर | | मद्रास.मलबार | १२७·६ |
| भाग | ४५·२ | " दक्षिण व पूर्व | ३५·० |
| "द भाग. | १२९·२ | " डेक्कन | २४ ४ |
| मध्य हिंदुस्थान | | " उ किनारा | ३९·५ |
| पश्चिम भाग | ३३·६ | म्हैसूर | ३६·१ |
| पूर्व भाग | ३८·७ | | |

सह्याद्रीवर कित्येक ठिकाणीं २५० पासून ४०० इंचापावेतों पाऊस पडतो. आसामातील चेरापुंजी या ठिकाणीं ४६० इंचापर्यंत पाऊस पडतो.

वनस्पतीची पुनरुत्पत्ति करण्याचे प्रकार.-हल्लीं जी पिकें शाकभाज्या, फळफळावळ वगैरे वापरण्यांत येतात, त्यांची पूर्वपीठिका पाहिल्यास त्यांचे मूळचे प्रकार अंगलात आपोआप बी, मुळें, व डोळे वगैरेंनीं होत असत. मनुष्य प्राण्यानें आपल्या कल्पनेनें फांद्याचे व खोडाचे तुकडे करून लागण करणें, कलमें करणें, डोळे बांधणें, बियांची निवड करणें, मिश्रण किंवा संकर करणें वगैरे फेरफार करून जास्त व चांगल्या उत्पन्न देणाऱ्या वनस्पती तयार करण्याचे प्रयत्न केले आहेत. ज्याप्रमाणें रानटी मनुष्य शहरात आला म्हणजे त्याच्या स्वभावात व चालचालणुकींत फरक होतो त्याप्रमाणें

रानात होणारी पिकें, भाज्या, फळें, शेतात व मळ्यात लाविल्यास, त्याचा रानटी निबरटपणा लोपून जाऊन तीं आकारात मोठीं, कोमल व रुचकर होतात. भेंडी, काकडी, दोडका, वागें, भोपळा, वगैरे अनेक भाज्या रानटी स्थितींत काटेरी, कडु, उग्र अशा असतात, त्यात मनुष्यानें निवड, मिश्रण, कलमें वगैरे युक्त्यांनीं सुधारणा घडवून आणिली आहे. परंपरा वाढविण्याचे जरी असले अनेक प्रकार आढळून येतात, तथापि शेतींतील बहुतेक पिकांची वाढ बियापासून केली जाते असे म्हणण्यास हरकत नाहीं. निदान तृण व कडधान्य हीं जीं खाण्याचीं मुख्य धान्यें होत त्याची वाढ बियापासून होते. गोराडू, बटाटे, सुरण वगैरेंची वाढ तुकडे करून ते लावून करितात. रताळ्याची वाढ त्याच्या वेलापासून अगर रताळ्याचे तुकडे लावून करितात. पानवेलींची वाढ वेलाचे तुकडे लावून करितात फळझाडाची वाढ करण्यात कलमें करणें, बांधणें वगैरे पद्धतींचा जास्त उपयोग करण्यात येतो.

पि कें.—कोणत्याहि भागातील पिकें सर्वस्वी जमिनीच्या मगदुरावर अवलंबून असतात, पण त्यातले त्यात पाऊस काळ, उष्णता, दैव व हवेंतील ओलावा यावर विशेषतः तीं फार अवलंबून असतात. पिकें करण्याचे मुख्य दोन हंगाम आहेत. एक खरीप व दुसरा रब्बी. याचे पुन्हा दुसरे तीन भाग करता येतात. एक जून ते सप्टेंबरपर्यंत पावसाळा, आक्टोबर ते डिसेंबरपावेतों हिवाळा व मार्च ते मेपर्यंत उन्हाळा. खरीप हंगामाचा पेरा जून ते जुलईपर्यंत होतो; व त्याची कापणी सप्टेंबरपासून डिसेंबरपर्यंत होते. रब्बी पिकाना खरीप पिकापेक्षां पाऊस कमी लागतो उत्तर हिंदुस्थानात या पिकाना दहिंवरापासून बराच फायदा होतो. रब्बी पिकाची पेरणी आक्टोबर व नोव्हेंबरात होऊन कापणी मार्च एप्रिलमध्ये होते. तांदूळ, ज्वारी, बाजरी, व गहूं हीं हिंदुस्थानातील लोकाच्या खाण्यात येणारीं मुख्य धान्यें होत. यापैकीं ज्वारी, बाजरी, खाणारे लोक दक्षिण हिंदुस्थानात फार असून उत्तरहिंदुस्थानात गहूं खाण्याची फार चाल आहे. तांदूळ खाणारे लोक थोड्या बहुत प्रमाणात सर्वत्र आहेत. तथापि बंगाल, आसाम, ब्रह्मदेश व मद्रास या प्रांतात तांदूळ हें खाण्याचें मुख्य धान्य होय. तांदूळ पिकण्यास उष्ण व दमट हवा, भरपूर पावसाळा किंवा पाण्याचा भरपूर पुरवठा लागतो. यामुळे बंगाल, आसाम, ब्रह्मदेश, मद्रास पूर्व व पश्चिम किनाऱ्याजवळील प्रदेश, ओरिसा व संयुक्तप्रांतातील कांहीं भाग यात तांदूळ पुष्कळ पिकतो. गहू हें रब्बी पीक आहे. याला सुपीक जमीन व कडक थंडी किंवा कोरडी हवा लागते म्हणून उत्तर हिंदुस्थानात, संयुक्त प्रांत, पंजाब, सिंध, माळवा, राजपुताना व मध्यप्रांतातील कांहीं भाग यात गहूं पुष्कळ पिकतो. ज्वारी दोन प्रकारची असते. एक खरीप व दुसरी रब्बी. जेथें उत्तम जमीन असून पहिल्या हंगामातील पाऊस बेताचा पडतो, परंतु रब्बी हंगामात थोडा जास्त पडतो, तेथें रब्बी शाळूचें पीक करतात. खरीप जोंधळा दक्षिण गुजराथ, खानदेश, सातारा, धारवाड व बेळगाव या जिल्ह्यांत जास्त होतो. निझामच्या राज्यात मराठवाड्यांत जोंधळा पुष्कळ पिकतो. मध्यप्रांतातहि जोंधळ्याचा पेरा पुष्कळ आहे. बाजरीला साधारणपणें हलकी जमीन व बेताचा पाऊस लागतो. बाजरी व जोंधळा हीं पिकें मुख्यत्वेंकरून मुंबई इलाखा, मध्यप्रांत, निझामचें राज्य, व मद्रासपैकीं कांहीं भाग यात होतात.

कडधान्यें.—तुरीचें पीक सर्वत्र होतें. तथापि जेथें थंडी फार व पाऊसहि फार, तेथें तीं चांगली होत नाहीं. हरभरा हें रब्बी हंगामातील पीक असून ज्या ठिकाणीं गहूं होतो तेथें हरभरा उत्तम होतो. उत्तर हिंदुस्थानात हें पीक महत्वाचें आहे.

ऊंस.—थोड्याबहुत प्रमाणात ऊंस सर्वत्र होतो. परंतु या पिकाला बारा महिने पाण्याचा भरपूर पुरवठा लागतो. उत्तर हिंदुस्थानात जमीन सुपीक असून पाण्याचा पुरवठा चांगला आहे तेथें व मद्रास इलाख्यात कृष्णा, गोदावरी, या नद्यांच्या मुखाजवळील प्रदेशात व मुंबईइलाख्यात कालव्याखालीं ऊंस बराच पिकतो.

वर नमूद केलेल्या खाण्याच्या धान्याखेरीज निरनिराळ्या तऱ्हेचा भाजीपाला, निरनिराळ्या प्रकारची फळफळावळ, दूधदुभतें, अंडीं, कोंबडीं, बदकें, मेंढ्या व शेळ्या वगैरे जिनसाचा खाण्याच्या पदार्थांत समावेश होतो याखेरीज विवाक्षित जातींच्या आहाराकरिता गाई, वासरें, म्हशी वगैरे गुरें मारिलीं जातात.

समुद्रकिनाऱ्याच्या पट्यात नेहमीं असंख्य मासे सापडतात. त्यापैकीं कांहींचा उपयोग खताकडे होतो तथापि कोळी, खारवी वगैरे बऱ्याच लोकाचा उदरनिर्वाह माशावर होतो. खारवलेल्या माशाचा धाटावर बराच व्यापार चालतो. मद्रास व बंगाल इलाख्यात माशात सुधारणा घडवून आणण्यासाठीं व त्याचें उत्पन्न वाढविण्यासाठीं शेतकी खात्याची स्वतंत्र शाखा उघडण्यात आली आहे.

भाजीपाला:—दररोजच्या खाण्याच्या पदार्थांमध्य शाकभाजीचा कोणता तरी पदार्थ अवश्य होऊन बसला आहे. व शाकाहारी लोकात तर तो अवश्यच आहे. मांसाहारी लोकातहि आठवड्यातून कांहीं दिवस शाकभाजीचा उपयोग करणें अवश्य मानिलें जातें.

खेड्यापाड्यात पावसाच्या पाण्यावरच भाज्या करतात. पाऊस संपल्यानंतर पाण्याचा साठा असेल तर व खतहि मिळाल्यास दुसऱ्या ऋतूतहि त्याचे दुसरे प्रकार करता येतात खेड्यापाड्यात भाज्याचा खप फारसा नसल्यामुळें त्या करण्यापासून फायदा होत नाहीं. शहराच्या आसपास अशा भाज्या जास्त खर्च करून केल्यास त्याचा खप होतो, म्हणून भाज्याचे मळे बहुतकरून मोठ्या ( त्याच्याशीं सोईचें दळणवळण असलेल्या

भाजीपाला करणें ही फायद्याची बाजू असल्यामुळें परप्रांतातून व परदेशातून निरनिराळ्या जातींचें बीं, हल्लीं पुष्कळ घस सोसून मळेवाले आणितात व त्यांतून हवापाण्यास योग्य असे प्रकार कोणते आहेत हें अनुभवानें ठरवून त्या जातींची वाढ करितात. ही वाढ लोकांच्या अभिरुचीवर अवलंबून असणार, परंतु त्याशिवाय हवापाण्याची योग्यता हें मुख्य कारण आहे. हिंदुस्थानात आलेल्या कांहीं विलायती भाज्या दक्षिणेकडील लोकांस फार आवडतात. परंतु त्या दक्षिणेतील हवेंत होतच नाहींत, म्हणून त्यांचें बीं इकडे आणून लागवड करीत नाहींत परंतु या स्थितींतहि सुधारणा होत आहे.

ज्याप्रमाणें थंड देशांतील मनुष्य व इतर प्राणी उष्ण देशांत रहाण्यास परिस्थितीच्या बदलण्यानें योग्य होतात त्याचप्रमाणें अतिशय थंड देशांतील भाज्या मध्यम थंड देशांत आणिल्या असतां थोड्या फरकानें तेथें तयार होऊं लागतात. मध्यम थंड देशांतील बियाणें समशीतोष्ण हवेंत कांहीं दिवसांनीं व्हावयास लागतें, व अखेर पूर्ण ऊष्ण हवेंतहि थंड हवेच्या देशांतील भाज्या तयार होऊं लागल्या आहेत. कोबी, कॉलीफ्लावर वगैरे थंड देशांतील भाज्यांच्या जाती हिंदुस्थानांतील उष्ण भागांतहि होऊं लागल्या आहे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील वांगीं, भेंड्या, वेलवांगी वगैरे भाज्या विलायतेंत हवेची परिस्थिति बदलून करतां येतात.

यूरोपच्या दक्षिण भागांतील बियाणें आणिल्यास हिंदुस्थानांत त्यांच्यापासून भाज्या बऱ्या होतात. त्यांहीपेक्षां मध्य अमेरिकेंत व उत्तर अमेरिकेंतील दक्षिण भागांतील हवामान उत्तर हिंदुस्थानांतील हवेशीं मिळतें, म्हणून तिकडील मूळ अमेरिकन बेण्यापासून दक्षिणेंत झालेलें बेणें परदेशी बेण्यापेक्षां जास्त फलद्रूप होतें असाहि अनुभव आहे. अमेरिकेंत वसाहत झाल्यानंतर तिकडे यूरोपातून निरनिराळ्या भाज्या गेल्यावर तेथील हवेंतील परिस्थितीप्रमाणें त्यांत फरक झाला. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील हवेच्या परिस्थितीनुरूप त्यांत फरक झाला आहे.

वरील सर्व गोष्टी ध्यानांत घेतां हल्लीं भाजीपाल्याची जी स्थिति आहे, तीपेक्षां भविष्यकाळीं पुष्कळ निरनिराळे फेरफार दृष्टीस पडतील असें अनुमान करणें गैर होणार नाहीं. क्वचित थोड्या प्रकाराचा लोपहि होत आहे. भेंडी, वांगें, दोडका व वेलवांगे, बटाटा, कोबी, फुलवर, घेवडा, श्रावणघेवडा, भोपळा, काकड्या, मिरच्या, वाटाणे यांच्यात गेल्या २५—३० वर्षांत किती फरक झाले आहेत. सर्वच गोराडु व पांढरी रताळीं कांहीं ठिकाणीं नामशेष होत चाललीं आहेत. याचा सूक्ष्म विचार केला असतां असें अनुमान निघतें कीं दळणवळणाचे प्रकार ( मार्ग ) सुलभ होत आहेत, त्यामुळें चारीहि खंडांत होणाऱ्या निरनिराळ्या जातींच्या भाज्यांत अधिक अधिक प्रकार निष्पन्न होतील हें साहजिकच आहे.

फळ फळ्या व फळें.—लहानापासून मोठ्यांना फळ ही वस्तु फार प्रिय वाटते कोणालाहि भेट पाठवावयाची असल्यास फळफळावळीचा विचार अगोदर केला जातो. मोंगल बादशहांच्या वेळीं त्यांच्याकरितां फार दूर ठिकाणाहून आंबे जात असत. फळें जरी सर्वांना प्रिय असलीं तरी तीं सर्वांना घेणें परवडत नाहीं, युरोपियन लोकांमध्यें फळें खाण्याची वहिवाट बरीच आहे. त्यांच्या मागून पारशी, बोहरी, मुसलमान भाटे वगैरे लोकांनीं त्यांचें अनुकरण केलें आहे. परंतु पांढरपेशे लोकांमध्यें फक्त उपासाचे दिवस खेरीज करून फळें खाण्याची वहिवाट बरीच कमी आहे. याचें मुख्य कारण त्यांना तीं घेणें परवडत नाहीं हें होय

फळें दोन प्रकारचीं असतात वाळलेलीं फळें म्हणजे बदाम, खारीक वगैरे, हीं महाराष्ट्रांत फारशीं होत नाहींत व ओलीं ताजीं फळें. हीं न शिजवितांच खातात, हीं लुसलुशींत, मऊ, रसाळ व मधुर असतात, व या गुणामुळेंच तीं सर्वांस प्रिय असतात हीं पाचक व सारक असल्यामुळें खाद्य पदार्थांमध्यें यांना महत्व बरेंच देतात. लोकांच्या वाढत्या अभिरुचीबरोबर फळांना मागणी फार येत आहे व त्यांच्या बागाहि सर्व ठिकाणीं जास्त प्रमाणावर लाविल्या जात आहेत. सर्वच फळझाडें सर्व ठिकाणीं होणें शक्य नाहीं कारण प्रत्येक झाडाची विशिष्ट परिस्थिति ही त्याला मिळालीच पाहिजे. उदा पपया, अननस, संत्रा, मोसंबे, डाळिंब, अंजीर वगैरे झाडांना पाण्याचा अतिशय चांगला निचरा व कोरडी हवा पाहिजे. केळ, पेरू, द्राक्ष, यांना जरा कमी निचऱ्याच्या जमिनी चालतात. सुपारी, फणस, नारळ, केळ वगैरेंना हवा फार दमट पाहिजे. स्ट्रॉबेरी, पीच वगैरे झाडास समुद्रसपाटीपासून बरीच उंच जागा लागते चिकू, संत्रा, मोसंबे, द्राक्षे वगैरे झाडांच्या बागा करण्यासाठीं फार मोठें भांडवल लागत नाहीं. डाळिंब, आंबा, संत्रा, नारळ वगैरे झाडांचे कीटक शत्रु फार आहेत. पण पपया, केळ, अननस, सुपारी यांना कीटकापासून फारशी भीति नसते द्राक्षे, सुपारी, संत्रा, मोसंबे वगैरे झाडांचे वनस्पतीजन्य रोगां-( अळिंब )पासून फार नुकसान होतें अंजीर, रामफळ, सिताफळ, पेरू, द्राक्ष वगैरे फळें फार वेळ न टिकणारीं असल्यामुळें यांना गिऱ्हाईक वेळेवर व जवळ मिळालें पाहिजे. आंबा, संत्रा, मोसंबे, चिकू वगैरेचीं रोपें विकत घेतेवेळीं फार काळजी घ्यावी लागते. नाहीं तर तीं खोटीं व वाईट लागण्याचा फार संभव असतो. यावरून फळझाडांच्या लागवडीला बरेंच धोरण व त्यासंबंधीं सर्व प्रकारची माहिती मालकाला असणें अत्यंत जरूर असतें. कारण हीं बहुतेक झाडें फार वर्षे टिकणारीं असल्यामुळें एकदा झालेली चूक पुढें सुधारतां येणें बहुधा शक्य नसतें. झाडाची वरणी-खुरपणी, छाटणी, खत देणें, रोगांवर उपाय वगैरे गोष्टी मालकाला स्वतःला माहीत असून त्यानें आपल्या गड्यामाणसांना शिकवून त्यांच्याकडून वेळेवर त्या करून घेतल्या पाहि-

जेन हिंदुस्थानात फळझाडांची लागवड वाढत असली तरी बाहेरून फळें आणावीं लागतातच. विशेषतः डाळिंबें, संत्रीं हीं इतर प्रांतांतून फार येतात. परंतु ही स्थिति जाऊन आपल्या इकडे भरपूर फळफळावळ तयार होऊन तीं सर्वांना मिळाली पाहिजेत, इतकेंच नव्हे तर टिकाऊ फळें बाहेरच्या देशांत पाठवून तेथील गिऱ्हाईक पटकावण्याची हिंदुस्थानची ताकद असूनहि योग्य ती शास्त्रीय माहिती, धाडस, भांडवल, उद्योग, व राजाश्रय यांच्या अभावीं सर्व गोष्टी कल्पनासृष्टींतच रहातात.

जो माल तयार होईल त्याला पुरेसें गिऱ्हाईक मिळत नसल्यास त्यापासून रस, तेल, अॅसिडें वगैरे जिन्नस तयार करून माल खपविण्याची खटपट झाली पाहिजे. आंब्याचा रस बाटल्यांत भरणें, आंब्याचें लोणचें करणें, पडीच्या आंब्याची आयोशी करणें, कागदी लिंबापासून नायट्रिक आसिड करणें, पेरूपासून जेली करणें, वगैरे रीतींनें पक्का माल तयार करणें ही फळझाडाच्या लागवडीच्या धंद्यांतील परिणत स्थिति होय.

इसवी सन १९१४-१५ सालीं मुख्य खाण्याच्या धान्या-खालीं व इतर पिकाखालीं पुढें नमूद केल्याप्रमाणें क्षेत्राची वाटणी होती.

खाण्याचीं धान्यें

भातः—सात कोटी ऐंशी लक्ष एकर.

गहूंः—दोन कोटी साठ लक्ष एकर.

जवः—ऐंशी लक्ष एकर.

ज्वारीः—दोन कोटि दहा लक्ष एकर.

बाजरीः—एक कोटि साठ लक्ष एकर.

नागली ( नाचणी )—चाळीस लक्ष एकर.

मकाः—साठ लक्ष एकर.

हरभराः—एक कोटि पन्नास लक्ष.

इतर तृण व कडधान्येंः—तीन कोटी दहा लक्ष एकर.

एकूण खाण्याच्या धान्याखालीं एकंदर जमीन वीस कोटी पन्नास लक्ष एकर होती.

ऊसः—सवीस लक्ष एकूणसाठ हजार एकर.

गळिताचीं धान्यें—पन्नास लक्ष एकर.

ज्यूट.—तेहतीस लक्ष एकर.

इतर तंतुपिकें—नऊ लक्ष शहात्तर हजार एकर.

नीळः—एक लक्ष रेचाळीस हजार एकर.

अफू—एक लक्ष एकूणऐंशी हजार एकर.

चहाः—पांच लक्ष चौऱ्यायशी हजार एकर.

काफीः—सत्यायशी हजार एकर

तंबाखूः—दहा लक्ष छप्पन्न हजार एकर.

सिंकोना.—पांच हजार एकर.

गांजाः—दोन हजार एकर

इतर औषधी व वैद्यकी पिकें —एक लक्ष तेहतीस हजार एकर.

चाऱ्याचीं पिकें—( ओट, गिनी गवत, लसूण, घास वगैरेसह ). त्रेसष्ट लक्ष त्रेसष्ट हजार एकर.

फळफळावळ व भाजीपालाः—एकूणसाठ लक्ष, एकनीस हजार एकर.

सन १९१४-१५ सालीं ब्रिटिश हिंदुस्थानांत २६ कोटी १० लक्ष एकर जमीन लागवडीखालीं होती. त्यांपैकीं शेंकडा दहा गव्हाखालीं, शेंकडा ३० तांदुळाखालीं आणि शेंकडा ३८ तीं इतर खाण्याचीं धान्यें (डाळी साळी वगैरे) यांच्याखालीं क्षेत्र होतें. शेंकडा ६ क्षेत्र गळिताच्या धान्याखालीं असून शेंकडा ७ कापूस, ताग व इतर तंतुपिकाखालीं होतें. याशिवाय ऊस, चहा आणि तंबाखू ह्या महत्त्वाच्या पिकाखालींहि बरेंच क्षेत्र होतें.

पाश्चात्य देशांतील दर एकरीं उत्पन्नाच्या आंकड्यांचें निरीक्षण केल्यास येथील पिकाचें उत्पन्न वाढविण्यास अद्यापि पुष्कळ वाव आहे असें वाटतें.

इ स. १९१६-१७ सालचें दर एकरी सरासरी उत्पन्न पुढील कोष्टकांत दिलें आहेः—

| प्रांताचें नाव | पिकाचें नाव | दर एकरी सरासरी उत्पन्न पौंड | एकंदर लागवडींत असलेल्या क्षेत्राशीं शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| | भात | | |
| बंगाल | हिंवाळी, | १०३६ | २६·३ |
| | उन्हाळी | ११७९ | |
| | पावसाळी | ८७१ | |
| मद्रास | एकंदर | १३८५ | १४·१ |
| बहार | हिंवाळी | १२३४ | २०५ |
| ओरिसा | पावसाळी | ८०० | |
| | उन्हाळी | ८०० | |
| ब्रह्मदेश | | | |
| उत्तरभाग | | १०३४ | २·७ |
| दक्षिणभाग | | १०८३ | १०·६ |
| मुंबई | एकंदर | १२३० | २·२ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ,, | ६२४ | ६·४ |
| | गहूं | | |
| पंजाब | पाणभरते | ९६४ | ३७·६ |
| | कोरडवाहू | ६०६ | |
| संयुक्तप्रांत | पाणभरते | १२५० | २८·७ |
| | कोरडवाहू | ८५० | |
| मध्यप्रांत | एकंदर | ६०० | १४·६ |
| मुंबई | पाणभरते | १२५० | ६·३ |
| | कोरडवाहू | ५१० | |
| | ज्वारी | | |
| मुंबई | पाणभरते | १५१० | ३२·७ |
| | कोरडवाहू | ६७० | |

( पृष्ठ ६३७ वरून पुढें चालू )

| | | | |
|---|---|---|---|
| मद्रास | कोरडवाहू | ६९६ | २४३ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | एकंदर | ६६४ | २९६ |

बाजरी

| | | | |
|---|---|---|---|
| मुंबई | एकंदर | ४०० | ३२९ |
| मद्रास | ,, ,, | ६२४ | २२५ |
| पंजाब | पाणभरते | ५६८ | १७० |
| | कोरडवाहू | ४१६ | |
| संयुक्तप्रांत | एकंदर | ५५० | १९६ |

इतर पिकाचे दर एकरी सरासरी उत्पन्न

| पिकाचें नाव | उत्पन्न पौंड | पिकाचें नाव | उत्पन्न पौंड |
|---|---|---|---|
| भात | १०६२ | हरभरा | ७२० |
| गहूं | ८३० | जवस | ३५७ |
| सातू | १०४७ | तीळ | २८० |
| ज्वारी | ७९७ | सरस व मोहरी | ४६७ |
| बाजरी | ५०२ | | |
| नाचणी | १०५९ | गूळ | २७५४ |
| मका | १०२५ | कापूस | १०२ |
| तूर | ८४० | ज्यूट (ताग) | १२९२ |

**कीटक शास्त्र**—या शास्त्रासंबंधीं थोडीबहूत माहिती प्रत्येक शेतकऱ्यास असणें जरूरीचें आहे. भातावर, ज्वारीवर व कपाशीवर पडणारे किडे, उंसातील मर,बटाट्यावरील अळी, मावा, वाळवी वगैरे किड्यांपासून दरसाल लाखों रुपयांचें नुकसान होत आहे. यासाठीं या विषयाचें शेतकीदृष्ट्या फार महत्व आहे. कारण हें शास्त्र अगदीं आधुनिक असल्यामुळें त्यासंबंधीं माहितीचा प्रसार व्हावा तसा अद्यापि झालेला नाहीं. शेतकऱ्यांना कीटक हे प्राणी कोणते, त्यांची रचना कशी असते, त्यांची वाढ कशी होते, रूपांतर आणि जडावस्था कशा होतात, तसेंच त्यांचें अन्न कोणतें, त्यांचा एकंदर आयुष्यक्रम कसा चाललेला असतो यांची माहिती झाली पाहिजे. म्हणजे हल्लीं एखाद्या पिकाला कीड पडली किंवा रोग झाला म्हणजे शेतकऱ्यांना ही एक दैविक आपत्ति आपणावर ओढवली आहे, किंवा हे रोग देवानें आभाळांतून किंवा स्वर्गांतून पाठविले आहेत ही समजूत त्यांच्या मनांतून नाहींशी होईल. पिकावरील किडे अनेक प्रकारचे असतात. फुलपाखरें, मधमाशा, कठिण पंखाचे किडे, ढेकूण, मुंग्या, पिसा वगैरे प्राणी जे आपल्याला आढळतात, त्यांचे आकार खाणें, पिणें, वाढ वगैरे मोठ्या प्राण्याहून अगदीं भिन्न असतात. कित्येक किड्यांना आपलें भक्ष्य खाण्याकरितां दाभाडे असतात. कित्येक तें चावून खातात. कित्येकास सोंड असते. मावा व पिकावरील अनेक जातीचे किडे, माशा, डास वगैरे आपलें भक्ष्य सोंडेनें शोषून घेतात.

कीटकांत एकंदर चार अवस्था असतात त्या अंडें, अळी, कोष पूर्ण कीटक. ज्यांत रूपांतर नसतें त्यांत कोशावस्था नसते. बहुतेक किडे अंडीं घालतात. कित्येक वेळीं तीं वेगवेगळालीं व कित्येकवेळीं त्यांचे चिकटलेले पुंजके असतात कित्येकाचीं अंडीं चार पांच ते वीस दिवसांत फुटतात, तर कित्येकांना अनेक महिने लागतात. अंडीं फुटून आल्या व किडी बाहेर पडल्या म्हणजे भक्ष्याचा शोध करतात व तें मिळाल्याबरोबर अधाशाप्रमाणें खाऊं लागतात. किड्याच्या आकारमानानें ते इतर प्राण्यापेक्षा जास्त खातात. म्हणून पिकावर कीड पडली म्हणजे ते त्याचा फन्ना उडवितात. किडे मोठे झाले म्हणजे त्यांना कोशावस्था प्राप्त होते या स्थितींत प्राणी बहुतकरून कांहीं खात नाहींत व हालचाल करीत नाहींत. अशा स्थितींत कांहीं १०–१५ दिवस तर कांहीं महिनाभरहि रहातात कोशेट्यांतून पतंग बाहेर पडणें यासच रूपांतर म्हणतात म्हणजे आळीचा पतंग होतो. पण असें टोळांत होत नाहीं. अंड्यांतून बाहेर पडणारा प्राणी आळीसारखा असून लहान टोळच असतो. दिवस भरले म्हणजे तो कोशेटा फुटून त्यांतून पतंग, फुलपाखरू वगैरे बाहेर पडतें. ह्या स्थितींत ते प्राणी कांहीं खात नाहींत, व पिकाची खराबीहि करीत नाहींत परंतु नर मादी यांचा संयोग होऊन अंडीं घालतात, व दोन्हीं मरून जातात. दुसऱ्या पिढीस ह्या अंड्यापासून सुरवात होते ह्या अंड्यापासून निघालेल्या सुरवंटासारख्या किड्याच्या अवस्थेमध्येंच पिकाची नुकसानी होते. पिकें निघाल्यानंतर किडे दुसरें पीक येईपर्यंत जडावस्थेंत पडून राहतात.त्यावेळीं त्यास खाण्यास कांहीं लागत नाहीं. ही अवस्था चार पांच महिन्यापासून एक वर्षपर्यंत सुद्धां असते. वर नमूद केल्याप्रमाणें कीटकाचा आयुष्यक्रम व निरनिराळीं स्थित्यंतरें यांची माहिती झाली म्हणजे शेतकऱ्यांना त्यांचे निर्मूलन करण्याकरितां कोणते उपाय व ते केव्हां योजावे हें त्यांच्या लक्षांत सहज येईल. उपाय तीन प्रकारांनीं करतां येतात, प्रतिबंधक, निवारक व मारक. या उपायांची सविस्तर माहिती सांसर्गिक व पोटांत गेलीं असतां मारक होणारीं विषें कोणतीं, तीं कोणत्या प्रमाणांत व केव्हां वापरावीं, तीं शिंपडण्याचीं यंत्रें, फवारे वगैरे केव्हां व कशीं उपयुक्त आहेत वगैरेसंबंधीं सविस्तर माहिती या विषयावरील स्वतंत्र लेखांत दिलेली आहे. होतां होईतों उपद्रवी कीटकासंबंधीं उपायासह माहिती दर पिकाखालीं दिलेली आहे. याखेरीज कोठारांतील व साठविलेल्या धान्यांना कीटकांपासून किती नुकसान होतें त्याचा प्रसार कसा होतो, त्याचा प्रतिकार करण्याकरितां कोणते उपाय योजावे, जनावरांस गोचिड, उवा, गोमाशा, वगैरेपासून कसा उपद्रव होतो हें सांगून त्यावर उपाय सुचविलेले आहेत.

**उपयुक्त किडे.**—रेशमाचे किडे, मधमाशा,लाख बनविणारे किडे वगैरेसंबंधीं सविस्तर माहिती त्या त्या स्वतंत्र लेखाखालीं दिलेली आहे.

**परोपजीवी वनस्पतीव त्यापासून पिकास होणारे रोग.**—मनुष्यास व जनावरांस जसे रोग होतात तसेच

अनेक प्रकारचे रोग वनस्पतींतहि होतात. हे रोग पुष्कळ वेळा इतके अकस्मात होतात का ते झाल्यावर थोडयाच अवकाशांत सर्व देशभर पसरून भयंकर नुकसान होतें. पाश्चात्य देशांत परोपजीवी वनस्पतींच्या रोगासंबंधीं संशोधनास सुरुवात होऊन सुमारें ८० वर्षे झालीं, तथापि एवढ्या अवधींत मिळालेल्या ज्ञानानें तिकडे शेतकरी वर्गास पुष्कळ फायदा झाला आहे. जमीनींतील व हवेंतील दोष, किडे व परोपजीवी वनस्पती वगैरे वनस्पतींना रोग होण्याचीं मुख्य कारणें होत.

परोपजीवी वनस्पतींचे दोन वर्ग करिता येतात. एक डोळ्यास स्पष्ट दिसणाऱ्या उदा. बांडगूळ, टारफुला अथवा टवळी, अमरवेल किंवा निमोळ वगैरे. दुसऱ्या सूक्ष्म आकाराच्या वनस्पतींच्या वर्गांत दोन प्रकार आहेत. एक शिलींध्र अगर अलिंग वर्ग, यांत कुज्याची कर्णी, पुरा, मुरी वगैरे रोग येतात. दुसऱ्या प्रकारात जंतुजन्य रोग येतात. जसें बटाट्याची बागडी अगर चक्री

गव्हावरील तांबेरा, ज्वारीवरील काजळ्या अगर काणी व द्राक्षावरील भुरी हे शिलींध्र वर्गांत मोडतात. बटाट्यावरील चक्री किंवा बागडी ही जंतुवर्गांत येते. प्रत्येक शिलींध्रकापासून असंख्य रेणू उद्भवतात व ते हवेंतून व पाण्यातून इकडून तिकडे वाहून जातात. जमीनीवरील व झाडावरील रेणू वाऱ्यानें, पशुपक्षी व विशेषतः कीटक यांच्या साहाय्यानें योग्य स्थानास पोंचविले जातात. कांहीं रेणू रुजून ते आपले जाळें पोषक वनस्पतींवर पसरितात व कांहींची शोषणेंद्रियें पोषकाच्या त्वचेंतून आंत शिरतात व अन्न शोषून घेतात. अशा रोगाची पिकास बाधा झाली म्हणजे त्यांची पानें पिंवळीं पडतात, कित्येकांवर ठिपके व डाग पडतात, कित्येक पिकांत फायावर गव्हवासारखी वाढ होते, कित्येकांत वाढ खुंटणें, फळें न देणें किंवा गळून पडणें असें होतें. कित्येकांत धान्याऐवजीं रोग, रेणूचे झुबके येणें वगैरे प्रकार होतात. अशा या शिलींध्ररूपी रोगानीं पिकाचें दरवर्षी अतोनात नुकसान होतें. गव्हावरील "तांबेऱ्या" पासून हिंदुस्थानात दरवर्षी कमींत कमी चार कोटी रुपयांचें नुकसान होत असावें असें अनुमान काढलेलें आहे. दुसरें ठोबळ उदाहरण म्हणजे काणी अगर काजळ्या रोगाचें होय. या रोगापासून दरसाल फक्त मुंबई इलाख्यातच सुमारें २ कोटी रुपयांचें नुकसान होत असावें असा तज्ज्ञ माणसाचा अजमास आहे.

वरील हकीकतीवरून रोगाचें विशेषतः शिलींध्रजन्य रोगाचें अस्तित्वच आधीं रोगानें सर्व काम करून टाकिल्यानंतर उघडकीस येत नाहीं. याकरिता नजरेस आल्यावर रोगावर उपचार करणें जवळ जवळ अशक्य असल्यामुळें तो न होऊं देण्यास प्रतिबंधक उपायांची योजना करणें हें फार सोपें आहे. प्रतिबंधक उपाय येणेंप्रमाणें.—

जमीन काळजीपूर्वक तयार करणें, पाण्याच्या निचऱ्याची सोय करणें, फाजील पाणी न देणें; पिकात फेरफार करणें, बीं तपासून लावणें, रोगांस न जुमानणारे व निवडक बीं पेरणें, निरोगी जात प्रयोग करून उत्पन्न करून तिचेंच बीं पुढें उपयोगात आणणें, शेत स्वच्छ ठेवणें व झाडांत दाटी न होऊं देणें; शिलींध्रघातक द्रव्यात बीं पेरण्यापूर्वी भिजवून नंतर पेरणें, रोग झाल्यावर किंवा पूर्वी शिलींध्रघातक विषारी पदार्थांचे मिश्रण पिकावर योग्य वेळीं शिंपडणें, जरूरीप्रमाणें व प्रमाणानें रोगप्रतिबंधक औषधें लावणें वगैरे.

हल्लीं परोपजीवी वनस्पतिजन्य रोगापासून गव्हांवरील तांबेरा, ज्वारीवरील काणी, द्राक्षावरील भुरी, ऊंस गहूयात रंगणें, बाजरी, ज्वारीवरील केवडया किंवा गोसावी, सुपारीवरील गळ किंवा कोळे रोग बटाट्यावरील चक्री किंवा बागडी हे परोपजीवी वनस्पतिजन्य रोग मुख्य पिकावरील असून त्यापासून दरवर्षी कोट्यवधि रुपयांचें नुकसान होत आहे याकरिता वर नमूद केलेल्या रोगप्रतिबंधक उपायानीं योग्य वेळीं तजवीज केल्यास शेतकऱ्यास हल्लींपेक्षा बराच जास्त फायदा होईल यांत संशय नाहीं. रोगासंबंधीं चिकित्सा व त्यावरील उपाय यासंबंधीं इत्थंभूत माहिती या विषयावरील स्वतंत्र लेखांत पहावी

शे ता चीं ख तें :—जमीन निकस होऊं नये म्हणून शेतकी चांगली मशागत करणें, शेत पड टाकणें, पिकांत फेरबदल करणें पिकें मिसळून करणें जमीनींत खत घालणें व बेवड करणें वगैरे अनेक योजना करण्यात येतात. त्यापैकीं खत घालून जमीनीची सुपीकता राखणें ही बाब फार महत्त्वाची आहे सर्व शेत कसणारास खताचें महत्त्व अवगत आहे. हिंदुस्थानात मुख्य खत म्हणजे शेणखत होय. गुराच्या मुताची किंमत शेणखताइतकी किंबहुना जरा जास्तच असून देखील तें राखून ठेवण्याची वहिवाट नाहीं. तें बहुतेक वाया जातें.

शहरात रस्त्यावर, गल्लींत, व जिकडे जिकडे गुरें चरत असतांना किंवा फिरत असतांना शेण पडेल तेवढें गोंवऱ्यासाठीं किंवा सारविण्यासाठीं गोळा करण्यात येतें. शेतकऱ्याच्या घरीं सुद्धां बऱ्याच शेणाच्या गोंवऱ्या लावून वाळवून त्याचा सर्पणाकडे उपयोग करितात, किंवा त्या शहरात नेऊन विकतात. शेणखताचा असा अपव्यय होणें म्हणजे जमीनीचें मोठें नुकसान आहे. याचें मुख्य कारण लागवडी खालीं असलेल्या क्षेत्रात सर्पणाचा तुटवडा होय. जें थोडें बहुत शेणखत राहील त्याचा उपयोग ऊंस, पानमळे, फळफळावळीच्या बागा व भाजीपाला यासारख्या बागाईत पिकाकडे होतो. शेणखताखेरीज घरातील केरकचरा राख, गावठाणातील माती, तळ्यातील गाळ, निरनिराळ्या प्रकारच्या पेंडी, मासळी, सोन्याची माती, सोरा वगैरे जिनसांचा खताकरिता उपयोग करितात. गोव्याकडे खारी माती नारळींना घालितात. मद्रास इलाख्यात कांहीं ठिकाणीं जुन्या घरांतील वापलांची धीट व डुकराची विष्ठा खतासाठी

वापरितात. बऱ्याच ठिकाणीं गुरें शेतात बांधतात. मोठमोठ्या शहरात म्युनिसिपालिटी सोनखत तयार करिते त्याचा बागाइताकडे फार चांगला उपयोग होतो.

ज्या ठिकाणीं ड्रेनेज चालू आहे त्या ठिकाणीं सांडपाण्यावर उत्तम पिकें येतात, असा अनुभव आहे.

हिंदुस्थानात द्विदल धान्यें पुष्कळ आहेत. तीं बहुतेक इतर पिकांबरोबर पेरितात त्यांच्या मुळ्यांचा व पाल्याचा जमीनीची सुपीकता राखण्याकडे पुष्कळ उपयोग होतो ताग,कुळिथ, सारखीं पिकें करून तीं फुलवऱ्यात आल्यावर किंवा पूर्वी जमीनींत गाडतात. बहार, ओरिसा व मद्रास इलाख्यात जेथें निळीची वरीच लागवड करतात, तेथें नीळ काढून घेतल्यावर जो झाडाचा भाग रहातो त्याला सीट असें म्हणतात. तो जमीनींत गाडतात त्याचा हिरवाळ खताकरिता चांगला उपयोग होतो. भातशेतींत मद्रासेकडे धाइनच्याचें ( लाल देंठांनीं शेवरी ) पीक करून तें शेतास गाडून टाकतात. याशिवाय तिकडे करंज, मोंगली एरंड, निरगुडी, अडुळसा, रुई वगैरे झाडांचा पाला आणून तो लावणीपूर्वी भातजमीनींत टाकतात. तो कुजला म्हणजे त्याचें चांगलें खत होतें. मुंबई इलाख्यात पुष्कळ पाऊस पडणाऱ्या भागात भाताचें रोपटे (तरवे) पेरण्यापूर्वी त्यात निरनिराळ्या प्रकारच्या झाडांचे टाहाळ आणून ते जाळतात.त्याला राबभाजणें असें म्हणतात.

कृत्रिम खताचा उपयोग मुख्यत्वेंकरून चहा, कॉफी, रबर वगैरे पिकें करणारे युरोपियन मळेवाले आज वरीच वर्षे करीत आहेत तथापि त्यापैकीं सल्फेट ऑफ अमोनिया,नायट्रेट ऑफ सोडा, सुपर फॉस्फेट, सल्फेट ऑफ पोटॅश, झाडांची पूड, पेंडी, मासळी वगैरे खताचा कमीजास्त प्रमाणात बागाईत पिकात उपयोग होऊं लागला आहे. हल्लीं साकची येथील टाटाच्या कारखान्यात थोड्या प्रमाणात सल्फेट ऑफ अमोनिया तयार होऊं लागला आहे. चांगली मशागत व भरपुर खत दिलें असता वर्षोंवर्ष गव्हाचें उत्पन्न कसें येतें हें खालीं दिलेल्या रादमस्टेड येथील प्रयोगाच्या आकड्यावरून लक्षात येईल

| सन | वार्षिक सरासरी दर एकरी उत्पन्न ( बुशल ) | | वार्षिक सरकारी बुशलाचें वजन पौंड. | |
|---|---|---|---|---|
| | बिन खतवलेली जमीन. | दर वर्षी दर एकरी १४ टन शेणखत घातलेली ज | खत न घातलेली जमीन | दर वर्षी दर एकरी १४टन शेणखत दिलेली जमीन. |
| १८५२-६२ | १५·२ | ३४·५ | ५५·९ | ५९·० |
| १८६३-७२ | १३·३ | ३६·० | ५९·३ | ६१·० |
| १८७३ | ११·८ | २९·८ | ५७·० | ५७·१ |
| १८७४ | ११·५ | ३९·२५ | ... | ६०·२५ |

वरील आंकड्यावरून पहाता असें दिसून येतें कीं चांगली मशागत केली असता दर एकरी सरासरी १०.९७ बुशल अगर ७४४·२१ पौंड उत्पन्न आलें; व खतविलेल्या जमीनींतील उत्पन्न ३४·१४ बुशेल अथवा २०३० पौंड आलेलें आहे. या आकड्यावरून खताची जरूरी किती आहे व तें भरपूर मिळाल्यास उत्पन्न किती वाढेल हें विचार करण्यासारखें आहे

शे ती चीं आ उ तें.—मशागतीचे दोन भाग करता येतात. एक बीं पेरण्यापूर्वीचा व दुसरा नंतरचा. जमीन नागरणें, कुळवणें, ढेकळें फोडणें वगैरे कामें पहिल्या प्रकारांत येतात दुसऱ्या प्रकारात खुरपणी, कोळपणी वगैरे कामें मोडतात चांगल्या मशागतीनें खालील मुद्दे साध्य झाले पाहिजेत.

( १ ) जमीन मऊ, बारीक व भुसभुशीत करणें; असें केल्यानें झाडाच्या मुळ्या पसरण्यास व त्याना पोषक द्रव्यें घेण्यास सोपें जातें.

( २ ) जमीनींत ओलावा घेऊन तो राखून ठेवण्याची शक्ति वाढविणें

( ३ ) जमीनींत हवा खेळवून तींतील पोषक द्रव्यें झाडास घेता येतील अशा स्थितींत आणणें

( ४ ) तणाचा, किडयाचा, त्यांच्या अंड्याचा व वनस्पतिजन्य रोगाचा नायनाट करणें.

वरील चारी मुद्दे देशी आउतानीं साध्य करून घेता येतात. नागर, कुळव, मैद, पेटारी, पाभर, कोळपें हीं शेतीचीं पूर्वापार मुख्य आउतें आहेत. नागर लहानमोठे असून ते २ ते १६ बैलानीं ओढतात. भातशेतींत टोणग्याचा उपयोग करतात.

हिंदुस्थानातील शेतीचीं आउतें लाकडाचीं, फारच थोडीं, साधीं, थोड्या खर्चांत होणारी व खेड्यातील कारागिराकडून होण्यासारखीं आहेत. सर्व आउतात नागरास अग्रस्थान दिलें पाहिजे.

नागराचे प्रकारः—पूर्वी कुदळ, नंतर हातनागर नागर, त्यानंतर बैलाच्या आकारमानानें व शक्तीच्या प्रमाणानें व जमीनीच्या मगदुराप्रमाणें देशपरत्वें ( बंगाल, आसाम, गुजराथ, कोंकण, तेलंगण, देश, कर्नाटक, वऱ्हाड वगैरे)नागरात फरक होऊन निरनिराळ्या आकाराचे नांगर प्रचारात आले आहेत. हे निरनिराळे फरक नागराचे भाग लहानमोठे करण्यात झालेले नसून त्याच्या आकृत्यात, हलसींत, रुमण्यात, फाळात फाळकांर्थात व सुताराच्या भरणींत थोडाबहुत फरक झालेला आहे.कोंकणात नागर ओढण्यास दोन बैल लागतात. पण देशावर सोलापूर,धारवाडकडे १२ ते १६ बैल लागतात. मोठ्या नागराचा उपयोग जमीन खोल नागरून कुंदा, हरळी, लव्हाळा, काशा वगैरे तणाचा नायनाट करण्याच्या कामीं मुख्यत्वेंकरून करतात. उथळ नागरट करण्यास नागरांचा उपयोग करतात. त्याचप्रमाणें काही भागांत ( तापी काठीं, पंचमहालात, मध्यप्रांतातील गव्हाळी भागात नागरीला नळी व चाडें बांधून तिचा बीं पेरणीकडे उपयोग करतात.

कुळवः—कुळवाचा उपयोग नागरट झाल्यावर किंवा जेथें जेथें नागरट करणें परवडत नाहीं तेथें तेथें कुळवाच्या अगर वखराच्या पाळ्या घालून जमीन तयार करतात. बहुतेक हिंदुस्थानांतील शेतीची मशागत याच आउतावर चालते. कुळवानें जमीन बारीक भुसभुशीत होते. वाळलेलें तण उपटून पडतात. शिवाय कुळवाचा उपयोग बी पेरल्यानंतर रासण्या घेण्याच्या कामींहि करतात. कुळवांतहि देशपरत्वें अनेक प्रकार आढळतात.

पाभरः—जमीन तयार झाल्यानंतर पुढें बी पेरणीचें काम पाभरीनें करतात. पाभरींत एक फणी (नारी)पासून तों दोन फणी, तीन फणी, चार फणी, पाच फणी, सहा फणी असे प्रकार आढळतात. सहाफणी पाभरीचा कर्नाटकांत भातपेरणीस उपयोग करतात बाकीच्या पाभरींचा खरीप व रब्बी पिकें पेरण्यास उपयोग करीत असून रब्बी पाभरी वजनांत थोड्या जास्त असतात त्यांना मोघड असें म्हणतात. पाभरीच्या पेरणींत बी कमी लागत असून तें समान अंतरावर ओळींत पेरलें जातें. एखादी ओळ वेगळ्या धान्याची पेरावयाची असल्यास मोगणीचा उपयोग केला जातो.

कोळपा.—हें आऊत लहान प्रमाणावर कुळव म्हटला तरी चालेल. यांत दोन प्रकार आढळतात. एकांत पासेचे दोन तुकडे असून मध्यें एक फट असते. तींतून कोळपतांना पिकाची ओळ जाते. दुसऱ्या कोळप्यांत कुळवाप्रमाणें सबंध पास असते. कोळप्याचा मुख्य उपयोग म्हणजे पिकाच्या ओळींतील तणझाडें काढून जमीन भुसभुशीत करणें व पिकास थोडीबहुत भर देणें होय. एका जुवावर बहुतकरून दोन कोळपीं व कांहीं ठिकाणीं चारहि चालवितात. कोळप्यागणीक वेगळा इसम लागतो.

मैंदः—या आउताचें मुख्य काम म्हणजे ढेंकळें फोडून जमीन सपाट करणें होय. देशावरील हें आऊत म्हणजे गुळगुळीत मोठें लांबट लांकूड असतें. त्याला बैल जुंपून जमीनीवर ओढतात. कोंकण, गुजराथ, कर्नाटक व इतर भात पिकणाऱ्या भागांत जमीन व चिखल सपाट करण्याचें काम खुटेफळीनें करतात. या आउतांत एका चौकोनी फळीला बारीक बारीक खुटे बसविलेले असतात. त्याला खुटे( गुटे )फळी असें म्हणतात.

पेटारीः—कोंकणांत ज्या ठिकाणीं दर वर्षी भात खाचराची बांधबंदस्ती करावी लागते तेथें माती इकडून तिकडे वाहून नेण्याकरितां व खाचखळगे बुजविण्याकरितां पेटारीचा उपयोग करतात. देशावरहि पेटारीचा ताली घालण्याकडे उपयोग करतात. पीक तयार झाल्यावर मळणीचें काम बहुतकरून सुर्तीं पिकें झोडून, काठ्यांनीं ठोकून किंवा बैलांच्या पायाखालीं मळून वाऱ्यानें उपणून धान्य तयार करितात. तथापि गुजराथेंत ओलपाड तालुक्यांत गव्हाची मळणी एका चौकटींत दातें असलेली चाकें बसवून त्या आउताच्या सहाय्यानें करितात. कर्नाटकांत, विशेषतः धारवाड जिल्ह्यांत व बळ्ळारींत जोंधळ्याच्या कणसाची मळणी लहानशा दगडी रुळानें करितात. त्याप्रमाणेंच खपली गहूं चुन्याच्या घाणींत मळल्यास थोड्या खर्चांत धान्य तयार होतें.

धान्य तयार झाल्यावर तें गाड्यांत भरून विक्रीकरितां बाजारांत पाठवितात. गाड्यांतहि प्रांतोंप्रांतीं फरक दिसून येतो. खानदेश, वऱ्हाड व कर्नाटक येथें फार मोठी भरीव चाकांची गाडी असते. तिचा उपयोग धान्य घरीं आणण्यास करितात. व ती ओढण्यास ८ बैल लागतात. मध्यप्रांतांत अनेक तऱ्हेच्या गाड्या आढळतात. उत्तर हिंदुस्थान व गुजराथ या भागांतील गाड्या फार ओबडधोबड अशा असतात.

वरील मोठमोठ्या आउतांखेरीज माती खणण्याच्या कामीं पहार, बडर, खोरें, कुदळ, टिकाव, फॅड्स वगैरे आउतांचा उपयोग करितात. माती ओढण्यास व वाफे करण्यास खोऱ्याचा उपयोग होतो. गोठ्यांत शेणखत ओढण्यास व खळ्यांत मदन(मळलेलें धान्य) हलविण्यास दाताळ्याचा उपयोग करितात. खुरप्यानें तण काढितात व विळ्यानें पिकें कापितात. खळ्यांत धान्य उपणून पाखडून तयार करण्यास तिवई, सुपें, चाळणी मोकरी हीं लागतात. धान्याचा भरडा व पीठ दळण्यास लाकडाचीं मोठीं जातीं व लहान जातीं असतात. वरील हकीकत देशी आउतांची झाली. याच्याशिवाय सुधारलेल्या लोखंडी सौटी, अर्लीरटन, किर्लोस्कर, मेस्टन् मन्तुन वगैरे नागरांचा प्रसार मुंबई, मद्रास, मध्यप्रांत व वऱ्हाड या प्रांतांत होऊं लागला आहे. याखेरीज कडबा कापण्याचें यंत्र, धान्य उपणण्याचें यंत्र, माती ओढण्याची लोखंडी पेटारी, मक्याच्या कणसांतील दाणे काढण्याचें यंत्र, हातानें चालविण्याचें खुरपण्याचें यंत्र, पिकें कापण्याचें यंत्र, धान्य उपणण्याचें यंत्र वगैरे आउतांनीं शेतीच्या सुधारणेंत बरीच भर पडलेली आहे.

पूर्वी उंसाचा रस काढण्याकरितां दगडी किंवा लाकडी घाणे असत व अद्यापिहि कांहीं ठिकाणीं ते चालू आहेत. तथापि लोखंडी घाण्याचा बराच प्रसार झालेला आहे. अलीकडे ऑइल एन्जिननें चालणारे उंसाचे मोठे चरक व पाणी काढण्याकरितां ऑइल एन्जिनें व पंप प्रचारांत येऊं लागले आहेत. अगदीं अलीकडे शेतकी खात्यानें दोन चार ठिकाणीं जमीन नागरण्यासाठीं वाफेनें व मोटारशक्तीनें चालणारे नागर हिंदुस्थानांत आणिले आहेत. त्यांचीं कामें बरीं चाललीं आहेत. हल्लीं वॉटर फाइन्डर ( पाणी दाखविणारें यंत्र ) शेतकी खात्यानें आणिलें आहे. त्या यंत्रानें पाण्याचा झरा जमीनीखालीं आहे किंवा नाहीं हें पूर्वी पाहून नंतर विहिरी खोल करण्याच्या यंत्रानें त्या खणल्या जातात. अशा अनेक तऱ्हेनें शेतींत प्रगति चालू आहे.

पाण्याचा पुरवठा.—ज्या ठिकाणीं पाऊस सरासरी १०-१२ इंचांपेक्षा कमी पडतो तेथें पिकें धोक्यानें आहे. अशीं ठिकाणें म्हणजे सिंध प्रांत, राजपुताना यांतील बहुतेक भाग होत.

वायव्येकडील ओसाड मैदानात नुसत्या गुरांना बकऱ्या-मेंढ्यांना व उंटांना खाण्यालायक थोडासा चारा व झुडपें याशिवाय कांहीं होत नाहीं. हल्लीं अशा भागात व उत्तर हिंदुस्थानात व मद्रास इलाख्यातील गोदावरी व कृष्णा या अंतर्वेदी भागात मोठमोठीं धरणें बांधून कालवे काढिले आहेत. दक्षिणेंत नीरा, गोदावरी, प्रवरा वगैरे नद्यांना धरणें बांधून मोठमोठे कालवे काढिले आहेत अशीं ठिकाणें, व ज्या ठिकाणीं विहिरींत भरपूर पाणी असतें असे भाग, व ज्या ठिकाणीं पाऊस मुबलक पडतो असे प्रदेश वेरीजकरून जवळ जवळ सुमारें दहा लक्ष एकर चौरस मैल क्षेत्रावर पावसाच्या कमतरतेमुळें दुष्काळ पडतो असें आढळतें. अशा ठिकाणीं पडतो तेव्हां एकदम पुष्कळ पाऊस पडतो व नाहीं तेव्हां पुरेसा पडत नाहीं. असा भाग म्हणजे मुख्यत्वेंकरून दक्षिणेंतील सुमारें ३० इंच अगर त्याहून कमी पाऊस पडणारा भाग होय. याशिवाय मध्यप्रांत माळवा व गुजराथ येथें कधींकधीं दुष्काळ पडतो. सन १९१४–१५ सालीं प्रांतवार पाणभरत्या क्षेत्राचें एकंदर लागवडीखालीं असलेल्या क्षेत्राशीं प्रमाण खालीं दिलें आहेः–

| प्रांत | शेंकडा प्रमाण | प्रांत | शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| दिल्ली | १६ | वायव्य सरहद्दी | |
| मुंबई | ४ | वरील प्रांत | ३४ |
| संयुक्तप्रांत | ३१ | मणिपूर | २ |
| बंगाल | ९ | अजमीर,मेरवाडा | ३२ |
| बहार व ओरिसा | १८ | आसाम | ६ |
| पंजाब | ४३ | सिंध | ८२ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ३ | कूर्ग | ३ |
| मद्रास | २८ | ब्रम्हदेश | ८ |

एकंदर पाणभरत्या पिकांपैकीं शेंकडा ८४ क्षेत्र खाण्याच्या धान्यासाठीं असून बाकी शेंकडा सोळा इतर धान्याखालीं होतें. खाण्याच्या धान्यांपैकीं १०१,९९,३०० गव्हाखालीं, २,८८,६३,००० इतर तृणधान्य व कडदण या धान्याखालीं व ३७,२९,००० एकर इतर खाण्याच्या धान्याखालीं होतें.

सर्वांत पाणभरत्या क्षेत्राचें प्रमाण सिंध प्रांतात जास्त असून अगदीं कमी मुंबई, मध्यप्रांतात, वऱ्हाड, मणिपूर व कूर्गप्रांत यात असतें.

पंजाबांत जेथें अगदीं उध्वस्त रान होतें, तेथें चिनाब व झेलम नद्यांचे मोठमोठाले कालवे निघाल्यापासून नवीन वसाहती झाल्या आहेत. हिंदुस्थानात कालव्याच्या पाण्याखेरीज तळीं व विहिरी यावर बरेंच क्षेत्र भिजविलें जातें. तळ्याची संख्या निझामच्या राज्यात, मद्रास इलाख्यात व म्हैसूर संस्थानात जास्त प्रमाणात आहे मुंबई इलाख्यात, गुजराथेंत व कर्नाटकात बरींच तळीं असून मध्यप्रांतात तीं जास्त प्रमाणात आढळतात. तळ्याचें पाणी बहुतकरून पाटानें नेण्यात येतें. जेथें पाटात पाणी सोडण्यापूर्वी थोडेंसें उचलावें लागतें तेथें ओकी, दुरणी, डोणी, चंपारा झील, टोपली, सारस वगैरेसारख्या साधनाचा उपयोग करितात. सरासरीनें तळ्याच्या पाण्यानें ८० एकर क्षेत्र भिजविलें जातें असा अंदाज आहे.

उत्तरहिंदुस्थानातील मळईच्या पट्यात पुष्कळ विहिरी आहेत व त्याचप्रमाणें कालवेहि आहेत; पण दक्षिणहिंदुस्थानात बरेचसें बागाईत विहिरीवरच आहे. हल्लीं विहिरी खोदण्याकरता सरकार तगाई सढळ हातानें देत असल्याकारणानें व विहिरी खणण्यासाठीं व खोल करण्यासाठीं नवीन यंत्रें निघाल्यामुळें त्याची संख्या वर्षानुवर्ष वाढत आहे. विहिरींतील पाणी काढण्याचें मुख्य साधन म्हणजे मोट होय. मोटा कातड्याच्या व लोखंडी असतात.कोंकणपट्टींत बहुतकरून रहाट असतात. हल्लीं पाण्याच्या संचयाप्रमाणें हातानें चालविण्याचे, बैलानें ओढण्याचे, ऑईल एन्जिन् व वाफेनें चालणारे पंप जागोजागीं प्रचारांत येऊं लागले आहेत. विहिरींच्या खोलीप्रमाणें एका मोटेवर अडीच ते ५ एकरापर्यंत बागाईत करितात.

सन १९१४–१५ सालीं कालवे, विहिरी, तळीं वगैरेंच्या साहाय्यानें भिजविलेल्या क्षेत्राचा तपशील खालीं दिला आहे.

सन १९१४–१५ सालीं कालवे, तळीं, विहिरी यांखालीं भिजविलेल्या जमिनींचा ( एकरांचा ) तपशील ( आंकडे हजारांचे आहेत. )

| देशाचें नांव | लागवडीचें एकंदर क्षेत्र. | कालवे. सरकारी | कालवे. खाजगी. | तळ्यांवर | विहिरींवर | इतर रीतीनें | एकंदर भिजविलेलें क्षेत्र |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ब्रिटिशहिंदुस्थान. | २६०६४१ | १८८८५ | २४६६ | ६९४३ | १२५५६ | ६३०९ | ४७१९४ |
| मध्यप्रांत | २०२२० | १८ | ५ | ५८१ | ८४ | ३१ | ७२१ |
| वऱ्हाड. | ७०४७ | ... | ... | ½ | ३२ | २ | ३३ |
| मुंबई इलाखा. | २६४६३ | १७८ | ११ | १३५ | ५९६ | ९९ | ९४८ |
| सिंध. | ४५२४ | ३१९४ | ९० | ... | २३ | ३७९ | ३६८१ |

कृषिशास्त्र व त्याचा शेतीकडे उपयोग.— शेतकी व कृषियंत्र अगर शास्त्र याचा परस्परांशीं फार निकट संबंध आहे. परंतु या गोष्टीची जाणीव कृषियंत्रशास्त्र हें शास्त्र या दृष्टीनें शेतकऱ्यांना शिक्षणाच्या अभावीं

माहीत नसल्यामुळे व शिकलेल्या लोकांनीं शेतकीकडे प्रायः दुर्लक्ष केल्यामुळे महाराष्ट्रांतील लोकांनां थोड्या वर्षांपूर्वी नव्हती. कृषिस्थापत्यशास्त्रांतील तत्वें आजपर्यंत शेतकीच्या कामाकडे मुळींच उपयोगांत आणली गेलीं नाहींत असा मात्र याचा अर्थ नाहीं. हीं तत्वें निरनिराळ्या वेळीं व निरनिराळ्या कामीं आजपर्यंत उपयोगांत आणलीं गेलीं आहेत. उदाहरणार्थ, जमीन खणण्यास कुदळीचा किंवा टिकावाचा उपयोग करणें, जमिनीच्या मशागतीस नांगर, कुळव, कोळपें वगैरे आउतें वापरणें, शेतांतील माती वाहून जाऊं नये म्हणून ताली घालणें, बागाइती पिकें करण्याकरितां नद्यांना व ओढ्यांना कच्चे अगर पक्के बंधारे घालून पाटानें त्यांचें पाणी शेतावर आणणें, उपळ्याच्या जमिनींत चर खोदून पाण्याचा निचरा करणें, विहिरींचें पाणी काढण्यास रहाट अगर चाक वापरणें वगैरे गोष्टी- वरून कृषिस्थापत्यशास्त्रांतील तत्वाचा शेतकीकडे उपयोग केलेला आढळतो. परंतु कुदळीला विवक्षित आकार का दिला, तो आकार बदलल्यानें जास्त सुलभता येईल किंवा नाहीं, तसेंच नांगर, कुळव व कोळपें वगैरे आउतें विव- क्षित आकाराचींच कां केलीं व त्यांतहि सुधारणा होणें शक्य आहे किंवा नाहीं, याचा विचार थोड्या वर्षांपूर्वी कोणीच केला नाहीं म्हटलें तरी चालेल. याचा परिणाम असा झाला कीं या आउतांना एकदां शेंकडों वर्षांपूर्वी जो आकार मिळाला तो अद्याप बदलला नाहीं. कृषिस्थापत्यशास्त्र याची शास्त्र या दृष्टीनें लोकांनां ओळख असती व त्या शास्त्राचा शेतकीकडे असलेला महत्वाचा निकट संबंध त्यांना माहीत असता तर अशी स्थिति कधींहि झाली नसती. शेतांतील माती वाहून जाऊं नये म्हणून पुष्कळ शेतकरी आपल्या शेतांनां ताली घालतात. परंतु ताल कोठें घालावी, कशी घालावी, तिची लांबी, रुंदी व उंची किती असावी, तालींत सांड ठेवावयाची ती कोठें ठेवावी व तिचा आकार केवढा असावा याबद्दलची शास्त्रीय माहिती अस- लेला शेतकरी अगर ही शास्त्रीय माहिती असून तिचा शेतकीकडे उपयोग केलेला शिकलेला मनुष्य बहुतकरून दुर्मिळ म्हटलें तरी चालेल. जी गोष्ट आउतें व ताली यां- संबंधाची तीच पाट व बंधारे याची होय. कृषिस्थापत्यशास्त्र- ज्ञानीं पाटबंधाऱ्याचीं जीं मोठमोठीं कामें केलीं आहेत तीं सगळीं असतां निवळ शेतकरी लोकांनीं केलेलीं व त्यांच्याच देखरेखीखालीं चालू असलेलीं लहान लहान पाट बंधाऱ्याचीं कामें महाराष्ट्रांत पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पड- तात. परंतु या कामींहि उन्हाळ्यात घातलेला बंधारा पावसाळ्यात वाहून गेलेला पाहाण्याचा जो कधीं कधीं प्रसंग येतो त्याच्या मुळाशींहि शेतकरी लोकांचें शास्त्रीय गोष्टींचें अज्ञान व शिकलेल्या लोकांची शेतकीबद्दल अनास्था हींच होय. बंधाऱ्यापासून पाट नेलेले असतात तेहि पुष्कळ वेळा जरूरीपेक्षां जास्त उतरणीच्या जागेवरून नेलेले आढळतात. तसेंच पाणथळ जमिनींतील पाण्याचा निचरा करण्याकरितां खोदावयाचे चर एकमेकांपासून किती अंत- रावर खोदावे, त्यांची खोली किती असावी, रुंदी किती असावी वगैरे माहिती न मिळाल्यामुळे पुष्कळ चुका होतात. केलेलें काम बरोबर झालें नाहीं असें आढळल्यावर शेतकरी चुका दुरुस्त करण्याचा यत्न करतात. अशा रीतीनें एक दोन वेळ चुका दुरुस्त केल्यानंतर हीं कामें योग्य तऱ्हेचीं होतात. परंतु अशा तऱ्हेनें चुका दुरुस्त कर- ण्यात गेलेला वेळ व पैशाचें नुकसान शेतकऱ्यास सोसावें लागतें. कित्येक प्रसंगीं तर अशा नुकसानीनें शेतकरी कायमचा बुडतो. या सर्व कारणांकरता व हल्लीं असलेल्या ज्ञानांत भर पडून या बाबतींत योग्य व शक्य त्या सुधा- रणा जितक्या लवकर करतां येतील तितक्या अगत्याच्या आहेत. म्हणून शेतकीकडे स्थापत्यशास्त्राचा उपयोग व त्याचा परस्पराचा संबंध याबद्दल शेतकरी व शिकलेले लोक याच्यामध्यें शक्य तितक्या लवकर जाणीव उत्पन्न होणें जरूरीचें आहे. या कामांत पाश्चात्य राष्ट्रें व अमेरिका- खंडांतील देशांनीं पुष्कळ प्रगति केलेली आहे. उदाहरणार्थ, आपल्या लाकडी व त्रिकोणाकृती तास पाडणाऱ्या नांगरां- ऐवजीं त्यांनीं लोखंडी, चतुष्कोणी तास पाडणारे व अल्प काळांत आणि अल्प श्रमांत जास्त काम करणारे नांगर बनविले आहेत. एवढेंच नसून नांगर बैलाच्या साह्यानें न चालविता त्या कामीं ते वाफेचा अगर ज्वालाग्राही तेलाचाहि उपयोग करूं लागले आहेत. अलीकडे थोड्या वर्षांत वर सांगितलेल्या प्रकारचे बैलाच्या साह्यानें चालणारे नांगर हिंदुस्थानांतील सर्व भागांत हजारों आले असून त्याचा नित्यशः उपयोग होत आहे व अल्पावधींतच हे नांगर लाकडी नांगरांना पदभ्रष्ट करून त्यांची जागा पटकावतील. हल्लीं सर्वच नांगर परदेशांतून येत नाहींत काहीं येथेंच तयार होतात. हे तयार करण्याचे कारखाने सातारा जिल्ह्यात पाडळी व किर्लोस्करवाडी येथें आहेत. वाफेचे नांगरहि हिंदुस्थानांत लोक वापरूं लागले आहेत. परंतु त्यांचा उपयोग सार्वत्रिक झालेला नाहीं. मुंबई इलाख्यांत अमले काहीं नांगर सर- कारनें आणले असून पंजाबांतहि या तऱ्हेचे काहीं नांगर आहेत. नांगराप्रमाणेंच इतर सुधारलेलीं आउतें आहेत. म्हणजे तव्याचा कुळव व इतर तऱ्हेचे कुळव, कोळपी, सोंगणी करण्याचीं यंत्रें, मळण्याचीं व उपणण्याचीं यंत्रें वगैरे आहेत. या सर्व यंत्राच्या साह्यानें मजूर लोकांवर विशेष अवलंबून रहावें लागत नाहीं, व कामहि तडाख्यांत होऊन जातें. परंतु लोक नांगराप्रमाणें या यंत्रांचा अजून विशेष उपयोग करीत नाहींत. नांगराच्या उपयुक्ततेबद्दल लोकांची जशी खात्री झाली आहे तशी या आउतांच्या बाबतींत खात्री झाली म्हणजे त्यांचाहि प्रसार शेतकरी लोकांत वाढेल. या आउतां- प्रमाणेंच विहिरींचें पाणी खेंचण्याकडे मोटांऱ्यापेक्षां वाफेच्या शक्तीनें अगर ज्वालाग्राही तेलाच्या साह्यानें चालणारे पंप

निःसंशय जास्त उपयोगी व कमी खर्चाचे असून त्याचाहि उपयोग अहर्निश वाढत्या प्रमाणात करण्यात येत आहे. विहीर कोठें खोदली असता पाणी लागेल हें पहाण्याकरिता ' वॉटर फाईंडर ' चा उपयोग प्रचारात येऊं लागला आहे. प्रत्यक्ष विहीर खोदण्याचें काम मस्टो साहेबाच्या यंत्रानें यशस्वीरीतीनें व अल्पायासानें होत आहे. अशा रीतीनें वर नमूद केलेल्या बाबतींत शेतकऱ्यास शास्त्रीय मदत मिळूं लागली असून त्यानाहि या ज्ञानाचें व मदतीचें महत्व व उपयुक्तता समजूं लागली आहे. उपळ्याच्या जमिनींना पाण्याचा निचरा करण्याच्या योजना पंजाबात लागू करण्यांत आल्या असून त्यापासून निरुपयोगी झालेल्या अगर ज्या थोड्या फार दिवसात निरुपयोगी झाल्या असत्या अशा पुष्कळ जमिनी पुन्हा लागवडीस आल्या असून रयतेचा हिमज्वर( हींवताप )सारख्या रोगापासून बचाव झाला आहे. पूर्वी सरकारचें शेतीला पाणी पुरवणारें खातें मागचा पुढचा विचार न करता वाटेल त्या जमिनीला पाणी देत असे व त्यामुळें पाणी देण्यास अयोग्य असलेल्या जमिनी लवकरच निरुपयोगी होत, व त्यामुळें लोकांतील आरोग्यासहि धोका येत असे. अशा तऱ्हेनें निरुपयोगी झालेल्या जमिनी निरा व गोदावरी कनॉलवर पहावयास मिळतात. परंतु या नुकसानीचा धडा मिळाल्यामुळें यापुढें होणाऱ्या मोठमोठ्या पाटावरील कोणत्या जमिनींना पाणी द्यावें व कोणत्याना देऊं नये हें आगाऊ ठरविण्यात येऊं लागलें आहे. ही योजना अमलात आली म्हणजे उपळ्याच्या व लोण्याच्या जमिनी कमी होऊन शेतकऱ्याचें आरोग्यहि वाढेल.

गुरें, मेंढ्या, शेळ्या व घोडे:—सरकारी आकडे प्रसिद्ध झाल्याप्रमाणें इ. स. १९१४-१५ सालीं ब्रिटिश हिंदुस्थानात अदाजें १४,७३,३६,००० गुरें होती. पैकीं बैलाची संख्या ४,८६,६४,७१० असून गाईची संख्या ३,७४,८१,२७३ होती, रेडे ५५,६०,३५२ व म्हशी १३४६६७२३ असून वासरें व रेडकें यांची संख्या ४,२१,८४,७५० होती यांचें प्रांतवार शेंकडा प्रमाण पुढें दिल्याप्रमाणें आहे. संयुक्तप्रांत २२, बंगाल १७, मद्रास १५, बहार व ओरिसा १४, पंजाब ११, मध्यप्रांत व वऱ्हाड ८, मुंबई व सिंध ७, बाकीचें ब्रिटिशहिंदुस्थान ६. पिकाच्या क्षेत्राच्या दर शंभर एकरामागें हें प्रमाण ६५ पडतें व लोकसंख्येच्या १०० मागें ६१ पडतें. इतर सुधारलेल्या देशात दर शेंकडा लोकसंख्येला बैलाचें प्रमाण पुढें देतों.

| देश | प्रमाण | देश | प्रमाण | देश | प्रमाण |
|---|---|---|---|---|---|
| जपान | ७ ८ | अमेरिका | ७७० | कान. | १४०.० |
| इंग्लंड व रशिया | २५० | कोरिया. | ४.० | चीन. | ७.० |
| | | जर्मनी व आस्ट्रिया | ३३.० | फ्रान्स | ३८० |

ही तुलना थोडी भ्रामक आहे. कां की, बैल हा नांगराचा प्राणी इतरत्र हिंदुस्थानाइतका नाहीं. यू. एस. अमेरिकेच्या दक्षिणेकडील काहीं संस्थानात मात्र बैल आहेत. असें असूनहि कानडात व अमेरिकेंत बैलाचें प्रमाण हिंदुस्थानापेक्षा अधिक आहे

सन १९१४-१५ सालीं मेंढरें, बकरी, घोडीं, खेचरें वगैरेंची संख्या हिंदुस्थानात खालीं नमूद केल्याप्रमाणें होती (यात बंगाल प्रांताचे आकडे नाहींत). मेंढरें २,३०,१५,८३९ बकरी ३,३३,३८,४८७. घोडे व तट्टें १९,५३,३७९ खेचरें ७१,२०७ गाढवें, १७,१२,२०५, उंट ४,९७,२०१

हिंदुस्थानात इतर देशापेक्षा गुरांचें महत्व अधिक आहे या देशात आउताचा मुख्य घटक बैल आहे बैल चांगले तर शेती चांगली. पाश्चात्य देशात शेतीला बहुतेक घोडे व खेचराचा उपयोग करतात. पॅलेस्टाइनकडे नांगरास गाढवें लावितात सिंधप्रांतात जुजबी उंटाचाहि शेतकीला उपयोग करतात. परंतु स्थूलमानानें पाहिल्यास बैलाचाच शेतकींत फार उपयोग आढळतो. काहीं काहीं ठिकाणी पावसाळी भागात टोणग्याचा उपयोग शेतकामाकडे करितात तथापि हवा, पाणी व जमीन याचा विचार करता बैलाशिवाय इतर जनावराचा शेतकीकडे फारसा उपयोग होत नाहीं.

शेतकीदृष्ट्या प्रत्येक शेतकरी एक दोन गाई बैलाबरोबर ठेवीतच असतो. गाईचें दूध घरखर्चास उपयोगी पडतें, गोऱ्हा मोठा झाला म्हणजे आउताच्या कामीं येतो, बैल आउतास, गाडीस, मोटेस व काहीं ठिकाणीं वर बसून जाण्यासहि उपयोगी पडतो. अर्थात बैलाची निपज होण्याकरिता गाईचेंहि तितकेंच किंबहुना जास्तच महत्व आहे. कारण आपल्या अन्नाचा जो मुख्य भाग धान्य तें पिकविण्याच्या कामीं लागणारीं गुरें उत्पन्न करणारी गायच आहे. शेतीची मशागत करणें, धान्य पेरणें, त्याची मळणी करून तें घरी आणणें वगैरे गोष्टी गाईच्या संततीवरच अवलंबून आहेत.

गाईपासून बैल व शिवाय दूधदुभतें, गोमूत्र व गोमय या मिळणाऱ्या पदार्थांचा शुद्धतेकरिता उपयोग होत असून त्याचा ( गोमूत्र व गोमयाचा ) खताच्या कामीं फार उपयोग होतो. अशा अनेक कारणासाठीं गाय ही हिंदुलोकांत पूज्य मानलेली असून गोहत्या हें महत्पाप समजलें जातें. आपल्याकडे अशी एक गोष्ट रूढ आहे कीं गाय व्याली असता तिजला प्रदक्षिणा केल्यास पृथ्वीप्रदक्षिणेचें फळ मिळतें. त्याचप्रमाणें शेतकरी लोकात अशी म्हण आहे कीं "शेताचा आरा ( मोड ), गाईचा गोऱ्हा व पाळण्यातील हिरा हे केव्हा तरी उदयकाळ आणतीलच आणतील" एकंदरींत बैलाच्या जातिवंत पैदाशीवर व त्याच्या संख्येवर शेतकीची भरभराट अवलंबून असते

यूरोप, अमेरिका व वसाहती यामध्यें गुरांची उपज मासाकरिता व दुधाकरिता अशा वेगवेगळ्या हेतूनीं करण्यांत येते. हिंदुस्थानात गाई शेतकीला लागणाऱ्या बैलाकरिता पाळतात व दुधासाठीं विशेषतः म्हशी पाळतात.

हिंदुस्थानातील निरनिराळे हवामान, पाण्याचा कमजास्त पुरवठा, निरनिराळ्या तऱ्हेच्या कमजास्त कसाच्या जमिनी

या मानानें गाईच्या अनेक जाती झाल्या आहेत त्यांत कित्येक फार दूध देणाऱ्या तर कित्येक कमी पण कसदार दूध देणाऱ्या व कांहीं फारच देखण्या अशा आहेत. कित्येकांचें प्रजा जड ओझीं वाहण्यास व नांगर ओढण्यास बळकट, कित्येक जास्त काटक, जास्त वर्षे काम देणारी व कित्येकांची अवलाद गाडीला लावल्यास घोड्यासारखी पळणारी आहे. बहुतेक जातींत वशिंड थोडें किंवा कमी जास्त प्रमाणांत वाढलेलें असतें. बहुतेकांना शिंगें असतात मद्रासेंतील कांहीं भागांत विनशिंगाचीं गुरें बरींच आढळतात म्हशीच्या जातींत रंग बहुतकरून काळा असून वशिंड नसतें बंगाल, आसाम, बहार, ओरिसा, तेलंगण, कोंकण वगैरे भात पिकणाऱ्या भागांत गुरें अगदीं लहान असतात इतर उष्ण व समशीतोष्ण भागांत कांहीं फार्दीं गुराच्या जाती आढळतात. त्यापैकीं नेलोरी, मद्रास इलाख्यांत अमृतमहाल म्हैसूर संस्थानांत मॉन्टगामेरी व हांसी पंजाबांत सिंधी दक्षिणसिंधांत, माळवी सातपुड्यांत व मध्य हिंदुस्थानांत, सोरटी अगर गीर काठेवाडांत, कांकेजी गुजराथेंत, गौळाऊ मध्यप्रांतांत, खामगांवी वऱ्हाडांत, खिल्लारी सातपुड्यांत व आटपाडी महालांत, व कृष्णाकांठीं कर्नाटकांत होत यांपैकीं दूधदुभत्याला चांगल्या मॉन्टगॉमेरी, हांसी, सोरटी, सिंधी, कांकेजी व नेलोरी ह्या गाईंच्या जाती असून दिल्ली जाफराबादी, सुरती, नागपुरी अगर वऱ्हाडी या म्हशींच्या जाती होत

इ. स १८९० सालीं सुधारलेल्या पद्धतीवर हिंदुस्थानांत दूधदुभत्याचा कारखाना पुणें जिल्ह्यांत खडकी येथें सुरू झाला. हल्लीं सर्व हिंदुस्थानांत दुधाचे हजारों कारखाने चालू आहेत. अलीगडला दुधाची डेअरी मोठ्या प्रमाणावर आहे मिलिटरी ( लष्करी ) खात्यानें फौजफाटयाला दूध व लोणी पुरविण्याकरितां हिंदुस्थानांत बरेच कारखाने काढले आहेत त्यांपैकीं पुणें, बंगलूर, कानपूर, अंबाला, अलाहाबाद वगैरे ठिकाणीं दूध दुभतें पुरविणारीं त्याचीं मोठीं शेतें आहेत

सन १९१७।१८ सालीं सहकारी तत्वावर दूध दुभतें पुरविणाऱ्या २४ संस्था होत्या त्यापैकीं ११ मुंबई इलाखा, २ नागपुरांत, ६ बंगाल्यांत, २ बहारांत, १ अलाहाबाद, १ बनारस व १ लखनौंत होती. मुंबई इलाख्यांत मुंबई शहराशिवाय अहमदाबाद व खेडा जिल्ह्यांत लोणी पुरविण्याचे बरेच कारखाने आहेत सांगली, मिरज, वऱ्हाड, नागपूर, अहमदाबाद वगैरे ठिकाणाहून सर्व हिंदुस्थानांत, ब्रह्मदेशांत, सिलोन व आफ्रिका येथें लोणी, तूप वगैरे रवाना होतें.

मेंढ्या व शेळ्या.—मेंढ्या व शेळ्या याच्यावर निर्वाह मुख्यत्वेंकरून करणारे महाराष्ट्रांत धनगर लोक होत ते मेंढ्या व शेळ्या मुख्यत्वेंकरून त्यांचें मांस व लोकर याकरितां पाळितात उत्तर हिंदुस्थानांत व दक्षिण हिंदुस्थानांत कांहीं मेंढ्यांच्या जाती नामांकित असून त्यांची लोकर तलम असते. चांगल्या जाती पाश्म ( काश्मीर व तिबेट ), डुंबा ( सिंध ), राजपुतानी, पाटणा ( बहार ), कोइमतूर ( मद्रास ) व म्हैसूर ह्या होत काश्मिरी शालजोड्या, पंजाबी गालिचे, सतरंज्या व ब्ल्यांकेटें, मारवाडी धाबळ्या, सिंधी गुरगुस व बंगलुरी घोंगड्या प्रसिद्ध आहेत देशी मेंढ्यांची लोकर व मांस सुधारण्याकरितां गेल्या पांच पन्नास वर्षे प्रयत्न चालू आहेत तथापि त्यांत फारसें यश आलेलें आढळून येत नाहीं हल्लीं आस्ट्रेलियांतील मेरिनो जातीचे नर आणून मेंढ्यांच्या लोकरींत सुधारणा घडवून आणण्याचे ब्यानटा—नहाल ( मद्रास ), तेलिंगखेडी ( मध्यप्रांत ), लखनौ, मुरादाबाद, खेरी, मथुरा, ( संयुक्त प्रांत ) हिस्सार, ( पंजाब ), पुसा ( बहार ) व कोइमतूर येथें चालू आहेत

त्याचप्रमाणें घोड्यांचा विशेष भरणा दक्षिण काठेवाड, पंजाब, सिंध वगैरे प्रांतांत आहे पुणें व नगर जिल्ह्यांत व निझामच्या राज्यांत घोड्यांची निपज गोदावरी, भीमा, नीरा, व माण या नद्यांच्या कांठीं होते मात्र हीं जनावरें एकत्र एकाच इसमाजवळ नसून तीं प्रत्येक गांवीं कांहीं सधन लोक मात्र तयार करवितात. या नदीकांठीं तयार होणारे घोडे लहान, बांधेसूद, पाणीदार व काटक म्हणून प्रसिद्ध आहेत. या जनावरास भिमथडी, निरथडी घोडे असें म्हणतात हे घोडे मराठी राज्यांत बरेच प्रसिद्धीस आले होते अद्याप यांचीं प्रदर्शनें नगर, अहमदाबाद, रावळपिंडी, डेरागाझीखान वगैरे ठिकाणीं प्रतिवर्षी भरवितात व त्यांना प्रोत्साहन मिळावें म्हणून बक्षिसेंहि देतात त्याचप्रमाणें काठेवाडांत काठीघोडे तयार करतात ते सुंदर व चपल असतात याशिवाय ब्रिटिश राज्यांत खेचरें तयार करण्याकडे पंजाब व वायव्य सरहद्दीवरील प्रांतांत पुष्कळ लक्ष दिलें जातें त्यांचा उपयोग अनेक प्रकारच्या लष्करी कामांकडे होतो

पशुवैद्यकशास्त्र.—पशु हा शब्द फार व्यापक असून त्यामध्यें सर्व चतुष्पाद प्राण्यांचा समावेश होतो पशुवैद्यक म्हणजे ज्या शास्त्रांत पशूंच्या रोगांचें निदान व त्यांची चिकित्सा ( औषधयोजना ) केलेली असते तें शास्त्र होय ज्या अर्थी हिंदुस्थानांतील शेती जनावरांवर व मुख्यत्वें-करून बैलावर अवलंबून असते त्या अर्थी त्यांना होणारे मुख्य रोग व त्यावर उपाय यासंबंधीं शेतकऱ्यास थोडीबहुत माहिती असणें जरूरीचें आहे जनावरांच्या रोगाचे दोन प्रकार करितां येतात एक सांसर्गिक सांथीचे रोग व दुसरा इतर सर्व रोग. लाळ अथवा खुरकूत, डरंगळ्या अगर देवी, फऱ्या, फाशी व घटसर्प हे मुख्य सांसर्गिक रोग असून इतर रोगांत जनावरांच्या पायाला होणारे रोग जसें हाड किंवा सांधा निसटणें, नसा किंवा स्नायूमध्यें लचक भरणें, जखमा होऊन किडे पडणें, शरीरावरील कातडीला गजकर्ण, नायटे, इसब इत्यादि होणें, अंगावर गोचीड, ऊवा वगैरे होणें, शिंग उखडणें, मोडणें, भिरड लागणें, बैलाचा सादा येणें वगैरे रोगांचा समावेश होतो यांखेरीज अजीर्ण, जुलाब,

पोटदुखी, पोटफुगी, दुभत्या जनावराची कास सुजणें, आंचलातून पाणी, पू, रक्त अगर दुधाच्या गांठी येणें वगैरे अनेक रोग होतात पशुवैद्यकांत पाळींव पक्षाच्या रोगाचाहि विचार केला जातो.

कृषिकर्मांचा आर्थिक विचार.—महाराष्ट्रातील शेतकरी लोकाची सांपत्तिक स्थिति चांगली नाहीं हें वेळोवेळीं निरनिराळ्या अधिकाऱ्यांनी दाखविलेंच आहे मुकत्याच डॉ मॅन याच्या 'व्हिलेज एकॉनमिक्स इन डेक्कन व्हिलेज' या नावाच्या पुस्तकांत एका विशिष्ट गावाची स्थिति आकडे देऊन लिहिली आहे त्यावरून आपल्या इकडला शेतकरीवर्ग कर्जांत बुडून गेला आहे व ह्या स्थितींतून डोकें बाहेर काढणें हें काम फारच दुरापास्त होऊन बसलें आहे. ह्या स्थितीचीं कारणें पुष्कळ आहेत त्यापैकीं काहीं खालीं दिलीं आहेत

( १ ) शिक्षणाचा अभाव.—हिंदुस्थानांतील शेतकरी वर्गाला बहुतेक शिक्षण नाहीं असें म्हटलें तरी चालेल. इकडील शेती फार पूर्वीपासून चालत असलेली व प्रत्यक्ष अनुभवानें ठरलेली असल्यामुळें ती फार चांगली आहे असा समज आहे, व तो जरी काहीं अंशीं बरोबर आहे, तरी पूर्वीच्या स्थितींत व आताच्या स्थितींत फारच फरक झाला आहे; याचा शेतकरी बंधूनीं विचार केलेला नाहीं. पूर्वीची शेती काहीं तत्त्वावर व काहीं अनुभवावर ठरविलेली होती, व ही तत्त्वें अजीबात विसरून गेल्यामुळें परिस्थिति बदलल्यावरोबर इकडील शेतींत अद्यापि काहीं एक फरक झाला नाहीं सध्याच्या स्थितींत जगातील शेतीशीं टक्कर देणें भाग आहे व अशा स्थितींत थोड्या खर्चांत शेतीचें उत्पन्न जितकें वाढविता येईल तितकें तें वाढविणें भाग आहे. जुन्या खर्चाच्या पद्धती टाकून कमी खर्चाच्या व प्रत्यक्ष शास्त्रीय माहिती व अनुभवावरून श्रेयस्कर ठरलेल्या पद्धतींचा उपयोग केला पाहिजे. हें सर्व कळण्याला शिक्षणाची अत्यंत जरूर आहे. शिवाय प्रत्येक काम हिशेबी झालें पाहिजे. प्रत्येक पिकाला मजुरी, खत व इतर खर्च किती आला व प्रत्यक्ष उत्पन्न किती झालें, उत्पन्नातून खर्च जाता निव्वळ फायदा किती झाला हें सर्व कळण्याला शेतकरी बंधूंना शिक्षणाची फार जरूर आहे. ह्याच्या अभावीं प्रगति होणें अतिशय कठीण आहे.

( २ ) मजूर.—दिवसानुदिवस मजुराची फारच अडचण भासूं लागली आहे. देशांत इतर उद्योगधंदे वाढल्यामुळें पुष्कळ मजूरलोक शेतकामातून निघून इतर धंद्यात पडूं लागले. ह्यामुळें व राहाणीचा खर्च वगैरे वाढल्यामुळें साहजीकच मजुरीचा रोज वाढला व सध्या पुष्कळ वेळा जास्त पैसे देऊन सुद्धा शेतीच्या कामास वेळेवर मजूर मिळत नाहींत. यामुळें जमिनीची मशागत वेळेवर होत नाहीं व त्यामुळें खर्च मात्र वाढत जातो व हंगामशीर मशागत न झाल्यामुळें उत्पन्न कमी येतें. ही स्थिति लक्षांत घेऊन शेतकरी वर्गानें ज्याच्या योगानें थोड्या मजुरींत व हंगामशीर काम होईल अशा तऱ्हेच्या पद्धतीनें शेती करण्यास प्रारंभ केला पाहिजे.

( ३ ) भांडवलाचा अभाव:—भांडवलाच्या अभावामुळें शेतकरी वर्गास अतिशय अडचणी सोसाव्या लागत आहेत. भांडवल नसल्यामुळें पुष्कळ वेळा जमिनीची मशागत करता येत नाहीं जमिनी सपाट करणें, शेतीला ताली घालणें, विहिरी खणणें, फायदेशीर पिकें करणें, मजुरी वाचविणारीं औतें घेणें वगैरे फायद्याच्या बाबींचा विचार करता येत नाहीं व ज्याप्रमाणें कोणत्याहि धंद्यात भांडवल कमी पडत चाललें कीं तो धंदा बसत जातो. त्याप्रमाणें हा शेतकीचा धंदा निकृष्ट स्थितीस येत चालला आहे

( ४ ) जमिनीची विभागणी:—आपल्या समाजात असा नियम आहे कीं, बापाच्या मागें वडिलोपार्जित सर्व इस्टेट त्याच्या मुलांना सारखी मिळावयाची. हिंदुधर्मशास्त्र असें असल्यामुळें त्याचा शेतीवर मात्र अति वाईट परिणाम झाला आहे सध्या ह्या कायद्यामुळें जमिनीचे इतके काहीं लहान लहान तुकडे पडले आहेत कीं,पुष्कळ जमीन पड होत चालली आहे व काहीं जमिनींत खर्च जास्त येत असल्यामुळें तींत मुळींच फायदा होत नाहीं. ह्या परिस्थितीमुळें पुष्कळ लोक शेती सोडून इतर धंद्याकडे जाऊं लागले आहेत. ह्या पद्धतीला काहीं तरी आळा पडणें जरूर आहे.

( ५ ) सर्वसाधारण महर्गता:—सध्या प्रत्येक जिन्नस, म्हणजे धान्य, आउतें, मजुरी, बीबियाणें खतें वगैरे जिन्नस पूर्वीपेक्षां किती तरी महाग झाले आहेत. पूर्वी चांगल्या माणसाचें पोट ४-५ रुपयांत भरत असून आतां ८-१० रुपयांपेक्षा जास्त खर्च येतो. ह्यावरोबर धान्याचा भावहि वाढला आहे व त्याचा शेतकरी वर्गास फायदा मिळावयास पाहिजे होता परंतु तो मिळतोसें दिसत नाहीं.

( ६ ) दुष्काळ —महाराष्ट्रांत काहीं भागात तर दुष्काळ बहुतेक वारंवार पडतात. सह्याद्रीच्या खालीं व माथ्यावर पुष्कळ पाऊस पडतो परंतु जसजसें ह्याच्या पूर्वेकडे जावें तसतसा पाऊस कमी होत जातो व पुढें म्हणजे पुण्याचा पूर्वभाग, नगर, सोलापूर व विजापूर जिल्ह्यांत पहिला पाऊस अगदींच थोडा पडतो व कधीं कधीं पडतहि नाहीं, पुढील म्हणजे सप्टेंबर आक्टोबरमध्यें पाऊस पडतो परंतु पुष्कळदा हा पाऊस पुरेसा होत नाहीं. म्हणून या मुलखात कोठेंनाकोठें तरी महर्गता असतेच. ह्यामुळें जमिनीची चांगली मशागत करणें व चांगलें पीक करणें ह्याबद्दल शेतकरी वर्गाला उमेदच रहात नाहीं. कारण पावसाच्या अभावीं त्याची मेहनत व पैसा पुष्कळदा वाया जातो.

ही स्थिति सुधारण्याला सरकारनें पुष्कळ उपाय केलेले आहेत व लोकानींहि काहीं करण्याजोगें आहे. त्यापैकीं काहीं पुढें दिले आहेत

( १ ) वर सांगितल्याप्रमाणें शेतकरी वर्गानें शिक्षणाचा फायदा जरूर घ्यावयाला पाहिजे. पूर्वी थोडेंसें शिक्षण मिळालें म्हणजे त्यांना शिक्षणाची गोडी लागेल व लोक जास्त शिकूं लागतील व वाचनानें निरनिराळ्या देशाच्या व ठिकाणाच्या शेतीची माहिती मिळूं शकेल व त्याचा फायदा शेतकरी लोकांस करून घेता येईल ठिकठिकाणीं सरकार शेतकरी वर्गाकरितां शेतकी शाळा व शेतकी कॉलेज स्थापन करीत आहे व त्या शाळांतून शेतकीचें शास्त्रीय व अनुभवसिद्ध ज्ञान दिलें जातें. हें शिक्षण मिळालें असतां शेतकरी वर्गाला शेती सुधारण्यास फार अडचण पडणार नाहीं याकरितां प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत होणें अत्यावश्यक आहे.

( २ ) प्रात्यक्षिकें —शेतकरीवर्गाच्या शेतीसंबंधाच्या अडचणी सोडविण्याकरितां निरनिराळ्या पद्धतींचा, खताचा व औताचा प्रयोग करण्याकरितां ठिकठिकाणीं सरकारनें प्रयोग क्षेत्रें काढिलीं आहेत अशा ठिकाणीं शेतकरीवर्गाकरितां प्रात्यक्षिकें व प्रदर्शनें भरविलीं जातात व अनुभवानें यशस्वी ठरलेली संपूर्ण माहिती त्यांना दिली जाते त्याचा शेतकरीवर्गानें फायदा घेतल्यास त्याचा व शेतीचा फायदा होईल

( ३ ) मजुराचा प्रश्न फारच महत्वाचा, काळजीचा व जरा कठिण आहे. मजूर थोडे व मागणी फार अशी स्थिति आज आहे शिवाय एकंदर रहाणीचा खर्च वाढला आहे अशा वेळीं जुन्या जास्त मजूर लागणाऱ्या पद्धती टाकून सुधारलेल्या औताचा व यंत्राचा उपयोग करून पिकें जास्त केल्याशिवाय फायदा होणें कठीण आहे येथल्या अनेकपट मजूरी देऊन अमेरिकेंतील शेती यंत्राच्या साहाय्यानें फायदेशीर होऊं शकते व धान्याच्या बाबतींत जगातील किंमतीशीं स्पर्धा करूं शकते ही गोष्ट विसरतां कामा नये

( ४ ) सहकारी संस्था —शिवाय संघशक्तीच्या तत्वावर हा प्रश्न सोडविला पाहिजे भांडवलाच्या अभावीं शेतकरी वर्गाला शेती सुधारणा करतां येत नाहीं असें वर सांगितलें आहे ह्याकरितां भांडवल उभारण्याची तजवीज केली पाहिजे

या कामीं सहकारी पतपेढ्यांचा फार उपयोग होत आहे व तो जास्त होईल अशी आशा आहे हल्लीं पुष्कळ खेडेगावीं पतपेढ्या झाल्या आहेत व त्यामुळें शेतकामाला भांडवलाची अडचण पडणार नाहीं शिवाय गावाला पतपेढीच्या मार्फत पुष्कळ औतें ठेवतां येतील व ज्यास तीं विकत घेण्याची ऐपत नसेल त्यांना तीं भाड्यानें देतां येतील व संघशक्तीच्या जोरावर मजुरीची बचत करणारीं यंत्रें आणवितां येतील एकंदरींत जमिनीची मशागत बेळेवर थोड्याखर्चांत व चांगल्या प्रकारें करतां येण्याचा संभव आहे सध्या शेतकरी वर्गाला आपला माल विकावयाच्या वेळीं दलालाकडून पुष्कळ नुकसान सोसावें लागतें यासाठीं माल विकणाऱ्या संस्था स्थापन केल्या असतां मालाला किंमत चांगली मिळून शेतकरी वर्गहि फसला जाणार नाहीं थोड्याखर्चात सागावयाचें म्हणजे भांडवल लागणारीं सर्व कामें गावाला या संस्थेच्या योगानें करतां येतील

( ५ ) जमिनीच्या विभागणीला आळा घालणें अगदीं जरूर आहे कारण जमिनीचे लहान लहान तुकडे झाले असल्यामुळें तीत सुधारणा करतां येत नाहीं व एखाद्याच्या मनात तसें करावयाचें आल्यास त्यास फार खर्च येतो याकरितां जमिनीची विभागणी अशा बेतानें झाली पाहिजे की त्या जमिनीच्या मशागतीपासून एका कुटुंबाचें चांगलें पोट भरून त्यास चांगल्या स्थितींत रहातां येईल काहीं काहीं देशांत यासंबधानें नियम झालेले आहेत व हिंदुस्थानांतहि तसें होऊन विभागणीला आळा पाडणें जरूर आहे असे नियम होण्याकरितां लोकांनीं नेटाचा प्रयत्न चालू ठेविला पाहिजे

स र का र नें दु ष्का ळा च्या प्र ति का रा र्थ यो जि ले ले उ पा य —दुष्काळ पडल्यास सरकार तहकुबी किंवा साऱ्याची माफी देतें शिवाय शेतकरी वर्गाला कर्जमुक्त करण्याकरितां 'डेक्कन ॲग्रिकल्चरिस्ट्स् रिलीफ ॲक्ट' पास केल्यामुळें सावकाराच्या कचाटींतून शेतकरी वर्गाची मुक्तता करण्याची सरकारनें व्यवस्था केली ह्यामुळें भांडवलाच्या व्याजाचा दर उतरला व सावकाराच्या व्यवहारास सचोटी वाढली सरकारनें दुष्काळी मुलुखांत मोठमोठे कालवे व तळीं बांधलीं व तीं जास्त बांधण्याचीं कामें चालू आहेत या पाण्याच्या सोईमुळें पूर्वीचे दुष्काळी भाग अति सुपीक व फायदेशीर झालेले आहेत आगगाडीच्या प्रसारामुळें दुष्काळाच्या वेळीं एका ठिकाणाहून धान्य व गुरांना लागणारी वैरण दुसऱ्या ठिकाणीं नेणें फार सोपें झालें आहे शिवाय शेतकरी वर्गाला विहिरी पाडण्याकरितां व इतर कामाकरितां कमी व्याजानें तगाई देण्याची व्यवस्था सरकारनें केली आहे या सर्व बाबींचा विचार करून शेतकरी वर्गानें वरील सर्व सवलतींचा योग्य मार्गानें फायदा घेतल्यास त्यांच्या शेतीची सुधारणा होणें सोपें जाईल

ज मी नी व री ल स त्ते चे प्र का र —हिंदुस्थानांत शेतावरील सत्तेचे किंवा स्वत्वाचे (मालकीचे) तीन प्रकार आढळतात ते —( १ ) रयतवारी, ( २ ) सर्व गावावर मुदतीनें ठरविलेली जमीनदारी व ( ३ ) कायम धाऱ्याची जमीनदारी. यापैकीं पहिल्या व दुसऱ्या प्रकारात ठरविलेल्या मुदतीनें धारा बदलतो परंतु तो तिसऱ्या प्रकारात कधींहि बदलत नाहीं

यापैकीं रयतवारी पद्धत मद्रास, मुंबई, सिंध, ब्रह्मदेश, कूर्ग प्रांत, वऱ्हाड, मध्यप्रांत, व आसामातील बहुतेक भाग यांत प्रचलित आहे कायम जमीनदारीची पद्धत बंगाल, संयुक्त प्रांत, बहार, ओरिसा, आसाम, अजमीर व मारवाडपैकीं काहीं भाग यांत लागू आहे मुदतीची जमीनदारी पंजाबांत, वायव्येकडील आणि प्रांतात आणि दिल्ली, बंगाल, मुंबई, संयुक्तप्रांत, बहार, ओरिसा, मध्यप्रांत, आसाम, अजमीर,

काहीं भागांत चालू आहे

एकंदर क्षेत्रापैकी शेकडा ४८ क्षेत्र रयतवारी, शेकडा २० कायम धारा व शें.४२ तूर्तच्या किंवा मुदतीच्या पद्धतीखालीं मोडतें. व एकंदर धान्याचें उत्पन्न ( वसूल ) इतर सेसशिवायकरून ३३$\frac{1}{2}$ कोटी रुपयांचें आहे व ह्याचें दर माणशीं प्रमाण एक रुपया सहा आणे पडतें. वरील हकीकतीच्या स्पष्टीकरणार्थ इ. स. १९१६-१७ सालीं प्रसिद्ध झालेल्या रिपोर्टावरून केलेला तक्ता पुढील दिला आहे:—

**प्रत्येक प्रांतांतील कृषिक्षेत्राचें धारापद्धति, धारा, लोकसंख्या यांशीं तुलना करून वर्गीकरण**

| प्रांताचें नाव | रयतवारी क्षेत्र | जमीनदारी कायमचा | जमीनदारी मुदतीची | एकंदर क्षेत्र | एकंदर धारा रुपये | एकंदर लोकसंख्या | दरमाणशीं धारा रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| बंगाल | ... | ३९२११ | ११२६९ | ५०४८० | २७४६७ | ४४५८८ | ० | १० | ० |
| मद्रास | ६१२८६ | २९८५२ | ... | ९११३८ | ६७२९४ | ४१४०५ | १ | ११ | ० |
| मुंबई | ४४८७६ | ... | ३७५३ | ४८६२९ | ३०९२८ | १५१३४ | २ | १ | ० |
| सिंध | २०२५७ | ... | ... | २०२५७ | ९०१० | ३५१२ | २ | १ | ० |
| संयुक्तप्रांत | ... | ७५४१ | ६०७९३ | ६८३३५ | ६५७६८ | ४७१९० | १ | ६ | ० |
| बहार ओरिसा | ... | ४१४५२ | ११७६० | ५३२१२ | १५७१३ | ३४४९० | ० | ७ | ० |
| पंजाब | ... | ... | ६१८५६ | ६१८५६ | ३९४९५ | १९५४८ | २ | ० | |
| ब्रह्मदेश | १०८८८१ | ... | ... | १०८८८१ | ३२४४२ | १०५७७ | ८ | १२ | ० |
| मध्यप्रांत | १२१४२ | ... | ४०४५२ | ५२५९४ | १०८७४ | १०८७३ | १ | ० | ० |
| वऱ्हाड | ११३७४ | ... | ... | ११३७४ | ८६२८ | ३०६७ | २ | १३ | ० |
| आसाम | २५८३० | ३९३० | १५४६ | ३१३०६ | ७७९५ | ६७१४ | १ | ३ | ० |
| अजमीर, मारवाड | ... | ९७४ | ७९७ | १७७१ | ३६५ | ५०१ | ० | १२ | ० |
| दिल्ली | ... | ... | ३६८ | ३६८ | ३९८ | ४१३ | ० | १५ | ० |
| कूर्गप्रांत | १०१२ | ... | ... | १०१२ | ३६५ | १७५ | २ | १ | ० |
| मानपूर | ३१ | ... | ... | ३१ | १६ | ७ | २ | ६ | ० |
| वायव्य सरहद्दीवरील प्रांत | ... | ... | ८४६८ | ८४३८ | २७३७ | २२५५ | १ | ३ | ० |
| एकूण | २९५६८९ | १२२९६१ | २०१०३२ | ६१९६८२ | ३३४७४४ | २४०४१० | ३१ | १३ | ० |

द्रव्य म प्र ती चे धं दे:—( १ ) कोंबड्या पाळणें व त्यांची उत्पन्न करणें:— ही वहिवाट शेतकरी लोकांमध्यें फार पूर्वापार आहे. परंतु हें काम धंदा या दृष्टीनें कोणीच करीत नाहीं. एक दोन कोंबड्या पाळणें त्यांचें उत्पन्न अंडीं, पिलें, कोंबड्या या रूपानें काढणें या पलीकडे हा धंदा अद्याप गेलेला नाहीं. कोंबड्यांचा धंदा काळजीपूर्वक केल्यास तो फायदेशीर असून शिवाय तो मन रमविणाराहि आहे. फ्रान्स, इंग्लंड वगैरे युरोपियन राष्ट्रांत कोंबडीं व त्यांचीं अंडीं यांची आयात व निर्गत दरवर्षी लाखों रुपयांची होते. तिकडे अंडीं उबविण्याचीं कर्में यंत्रानें करितात. पक्ष्यांना नियमित वेळीं व नियमित प्रमाणांत रोज चारा देतात व सर्व कर्म धंदा या दृष्टीनें करितात. हिंदुस्थानांत कांहीं साहेब लोक, ख्रिस्ताव लोक व सोलूमर हौसेसाठीं निरनिराळ्या हिंदी व विलायती जाती आणून त्या स्वतःच्या परसदारासाठीं पाळितात. हल्लीं त्यांचीं कोठें कोठें प्रदर्शनेंहि भरू लागलीं आहेत. चितागांग, असील, बसरा व गेम या हिंदुस्थानांतील मुख्य जाती होत. या विषयाच्या विशेष माहितीकरितां कोंबडी, बदकें वगैरे लेख पहावेत.

( २ ) मधुमक्षिकापालन:—पाश्चात्य देशांतमध्यें धंद्याच्या धोरणावर मधमाशांची वाढ करून मध उत्पन्न करणें याचाहि समावेश होतो. मधमाशा हिंदुस्थानांत पुष्कळ आहेत, यामुळें पाश्चात्य राष्ट्रांत ज्याप्रमाणें कृत्रिम पोळीं करून मधमाशांकडून मध तयार करवावा लागतो, त्याप्रमाणें हिंदुस्थानांत करण्याचें कारण पडत नाहीं. मध तयार करण्याच्या कामांतच आपलें सर्व आयुष्य घालविणारीं माणसें हिंदुस्थानांत तयार झालीं नाहींत याचें कारण त्या उद्योगास धंद्याचें स्वरूप आलेलें नाहीं. कांहीं रामोशी, कोळी किंवा कुणबी, वर्षांतून कांहीं दिवस ज्यावेळीं वनस्पती बहरास येऊन मधमाशांचीं पोळीं लागतात तेव्हां पोळीं काढून मध तयार करून विकण्याचा धंदा करितात. परंतु त्यांना मधमाशांसंबंधीं शास्त्रीय माहिती नसल्यामुळें त्यांनीं पोळ्यांतून काढलेला मध कमी दर्जाचा निघतो, तो लवकर आंबतो किंवा काकवीसारखा पातळ होतो. पाश्चात्य देशांतील मध जास्त दिवस टिकतो.

हिंदुस्थानांत मधमाशांकडून मध तयार करण्यासंबंधानें एंजिनियरिंग कॉलेजचे प्रिन्सिपल डॉ. कुक यांनीं इ. स. १८९० सालीं प्रयत्न केला होता. त्यांनीं इटालियन मधमाशांच्या जाती आणून त्या कृत्रिम घरांत ठेवल्या होत्या त्याप्रमाणें मध तयार होऊं लागला होता, परंतु कांहीं दिवसांनीं त्या मधमाशा मेल्यामुळें तें काम बंद पडलें. यासंबंधानें पुण्याच्या डेक्कन कॉलेजचे जीवशास्त्राचे प्रोफेसर मि. नाईट यांनीं व पुढ

येथील कीटकशास्त्रवेत्यानीं काहीं प्रयोग केले, पण त्यांत त्याना यावें तसें यश आलें नाहीं. मद्रास इलाख्यात कृत्रिम पोळ्यांत मध उत्पन्न करण्याचा प्रयत्न झाला असून तो यशस्वी झाल्याचेंहि प्रसिद्ध झालें आहे तथापि हा धंदा अद्यापपर्यंत प्रयोगावस्थेंतच आहे असें म्हणावें लागतें. शेतकी खात्याकडून संशोधनाचें काम चालू असतें. त्यात याचा प्रमुखत्वानें समावेश केल्यास शेतकरी लोकास एक नवीन घरगुती धंदा होईल.

( ३ ) रेशीम.-या विषयावरील लेख पहावा.

( ४ ) लाख.-या विषयावरील लेख पहावा.

व्या पा र उ दी म.—पूर्वकाळीं आपल्यास पुरेसें धान्य तयार करणें हाच साधारण व्यवहार होता व तेवढी जमीन शेतीखालीं वहातुकीस होती दळणवळणाचे मार्ग कमी व धोक्याचे असल्यामुळें प्रत्येक गावीं लागणारा सर्व माल बहुतेक तेथेंच तयार होत असे. यामुळें धान्याचा संग्रह व जनावरांचें पालनपोषण यापेक्षा पैशाला अधिक महत्त्व नव्हतें. परंतु आता सडका, मोटारी, आगगाड्या, आगबोटी वगैरे ने आण करण्याचीं साधनें झाल्यामुळें व तारायंत्राच्या योगानें व्यवहार त्वकर करूं लागल्यामुळें आणि सरकारच्या आरमारी व लष्करी बंदोबस्तामुळें दर्यावरील व्यापार वाढून तांदूळ, गहूं, ज्वारी, बाजरी, गळिताचीं धान्यें, चहा, काफी, वेलदोडे, मिरीं, सिंकोना, अफू, कापूस, ज्यूट, रबर, रंग, नीळ, सोरा, हाडें, पेंडी, कमावलेली व कच्चीं कातडीं, लोंकर वगैरे जिन्नस परदेशीं जाऊं लागले. या स्थितीमुळें खाण्याच्या धान्याखालीं क्षेत्र कमी होऊन अन्नेतर पिकाखालीं क्षेत्र वाढूं लागलें आहे. याचा परिणाम परदेशीं चढाओढ हा एक आहे. शिवाय कित्येक ठिकाणीं त्याच ठिकाणीं होऊं शकणाऱ्या व जरूरीच्या जिनसा देखील इतर ठिकाणाहून आणाव्या लागत आहेत.

हिंदुस्थानातून परदेशास निर्गत होणाऱ्या मालात कापूस व ताग ( ज्यूट ) हे जिन्नस बरेच महत्वाचे आहेत. निर्गत मालाची युद्धापूर्वीची पाच वर्षांची सरासरी पाहिल्यास ती साधारणपणें २२०कोटी रुपयाची भरते.त्यात धान्य (मुख्यत्वें करून तांदूळ व गहूं ) ४६ कोटी रुपये, कापूस व कापड ४५ कोटी रुपये, ताग व तागाचा कपडा वगैरे ४२ कोटी रुपये गळिताचीं धान्यें २४ कोटी रुपये, चामडीं व कातडीं १५ कोटी रुपये आणि चहा १३ कोटी रुपये हे सहा जिन्नस निर्गत व्यापारात प्रमुख आहेत.

सन १९१४।१५ सालीं तांदूळ व गहूं ( ब्रिटिश हिंदुस्थानात ) या दोन जिनसांचें उत्पन्न ३८२३३००० टन असून त्यांपैकीं ३६६००६३१ टन हिंदुस्थानांत राहिले व १६३२३६९ टन परदेशीं रवाना झाले निर्गत मालांत १५६१९६९ टन तांदूळ व ७०४०० टन गहूं होते. याशिवाय ज्वारी, बाजरी, जव, मका, डाळी, हरभरा वगैरे मिळून २४८००० टन जिन्नस परदेशीं गेले आयात मालात कपडा साखर मुख्य आहे



आयात माल

| जिनसांचें नांव | वर्ष | सरासरी किं. रु. |
|---|---|---|
| (१) कपडा व सूत | १९०९-१०ते१९१३-१४ सरासरी | ५२१८०३००० |
| ” | १९१५-१६ | ४३३७५५००० |
| ” | १९१६-१७ | ५३०९४६००० |
| (२) साखर | १९०९ ते १९१० व १९१३ते१४ सरासरी | १३१७५८००० |
| ” | १९१५ ते १९१६ | १६६१७८००० |
| ” | १९१६ ते १९१७ | १५४९०३००० |

निर्गत व्यापाराचा तपशील.

| मालाचें नाव | सन | मालाचें वजन टन | किंमत रु. हजार |
|---|---|---|---|
| खाण्याचीं धान्यें | १९०९-१४ | ४४११ | ४५८१११ |
| | १९१५-१६ | २४३६ | २९०७१२ |
| | १९१६-१७ | २९१५ | ३४१०४३ |
| गळिताचीं धान्यें | १९०९-१४ | १४१३ | २४३६९७ |
| | १९१५-१६ | ७०० | १०१२२६ |
| | १९१६-१७ | ९२८ | १६४४३२ |
| कापूस कपडा वगैरे | १९०९-१४ | | ४४६८३७ |
| | १९१५-१६ | | ३४५३४९ |
| | १९१६-१७ | | ४६९४५७ |
| ज्यूट-पोती वगैरे | १९०९-१४ | ७६४ | ४२४५११ |
| | १९१५-१६ | | ५३६२०४ |
| | १९१६-१७ | | ५७९४२७ |
| चहा | १९०९-१४ | २६६४९८ | १३०६७८ |
| | १९१५-१६ | ३३८४७०० | १९९८११ |
| | १९१६-१७ | २९१४०३ | १६७७१० |
| काफी | १९०९-१४ | | १३७५२ |
| | १९१५-१६ | | ९८६९ |
| | १९१६-१७ | | १०४५८ |
| अफू | १९०९-१४ | | ९९६१७ |
| | १९१५-१६ | | १४७०२ |
| | १९१६-१७ | | २०९६५ |
| नीळ | १९०९-१४ | | २९९७ |
| | १९१५-१६ | | २०७८७ |
| | १९१६-१७ | | २०७४४ |
| सोरा | १९०९-१४ | | ३४९९ |
| | १९१५-१६ | | ६८८७ |
| | १९१६-१७ | | १०५१३ |
| हाडें | १९१६-१७ | ४२ | ३३४४ |
| पेंडी | १९१६-१७ | ७५ | ९९१० |
| कच्चीं चामडीं | १९०९-१४ | | १०३३६० |
| कमावलेली चामडी | १९१६-१७ | | ४२७४५ |
| | | | १४४०८६ |
| | १९१६-१७ | | ९३१७८ |
| लोंकर | १९०९-१४ | | ३७८०० |
| | १९१५-१६ | | ३७९०८ |
| | १९१७-१७ | | ३७७९८ |

सन १९१६।१७ सालीं प्रसिद्ध झालेल्या व्यापारासंबंधीं परीक्षणरिपोर्टावरून असें आढळून येतें कीं बाहेर जाणाऱ्या मालाचे चार पाच वर्ग करता येतात

१ खाण्याचीं धान्यें :—गहूं, गव्हाचें पीठ, भात, तांदूळ चहा, काफी, मसाल्याचें सामान वगैरे.

२ कच्चा मालः—कापूस, ताग, गळिताचीं धान्यें, बिन कमावलेलीं चामडीं, लोंकर, सागवानी लाकूड वगैरे

३ अर्धवट तयार केलेले जिन्नस :—सूत, निरनिराळ्या प्रकारचीं तेलें, सोरा, कच्चें रेशीम, कमावलेलीं चामडीं वगैरे

४ तयार केलेले जिन्नस :—कपडा (रंगविलेला) पोतीं, गोणपाट, दोरखंडें, लाख, रेशमी कपडा वगैरे

५ अफू, नीळ व इतर रंग निघणारे जिनस

*जमिनीची सुपीकता*.—जमीनीची सुपीकता राखण्याचे मुख्य मार्ग चार आहेत ते पहिला, जमिनीला खत देणें, दुसरा, जमीन पड ठेवणें; तिसरा हिरवाळ खत देणें व चवथा पिकात फेरपालट करणें.

जमिनीला खत देऊन व तिची चांगली मशागत करून तिची सुपीकता कायम राखणें शक्य आहे परंतु ही बाब फार खर्चाची आहे. जमीन पड ठेवणें म्हणजे ती नांगरून वरचेवर कुळवून तयार करून त्यात सबंध एक हंगाम कांहीं पीक न घेता हवेचा व उष्णतेचा वगैरे तिजवर परिणाम होऊं देणें हा होय. यामुळें तींत जास्त पोषक द्रव्यें उत्पन्न होतात, तण मरतें, व तींत जास्त पाणी मुरून रहातें. जमीन अशी अगदीं पडित ठेवण्याची चाल मुख्यत्वेंकरून गुजराथेंत भडोच जिल्ह्यात आढळते. ज्या ठिकाणीं खरीप व रब्बी पिकें फेरपालटीनें घेतात, तेथें रब्बी पीक घेतलें म्हणजे जमिनीला तीन साडेतीन महिने विश्रांति मिळते व खरीप घेतलें तर आठ नऊ महिने विश्रांति मिळते.

कांहीं कांहीं भागांत जमीन पडित ठेवणें फायदेशीर असून ती पडित ठेवणें जरूरीचें आहे. हिंदुस्थानच्या पश्चिम घाटात आसामात, ब्रह्मदेशात, मध्यप्रांतात व मध्यहिंदुस्थानात जंगली भागात जेथें नवीन वैतीजमीन करतात व ज्या ठिकाणीं वर्षानुवर्ष जमीन बदलतात तेथें जमीन पड ठेवण्याची पद्धत जमिनीच्या मगदुराप्रमाणें व हवामानावर अवलंबून असते.

ही पड ठेवण्याची पद्धत कोंकणात वरकस जमिनींत आढळते. नागली, हरीक, वरी व कारळा तीळ हीं पिकें लागोपाठ चार वर्षे घेऊन नंतर ती जमीन पाच ते दहा वर्षे पड टाकितात तेणेंकरून तिची फलद्रूपता पुन्हा ताळ्यावर येते. या जंगली भागात पाऊस पुष्कळ पडत असल्यामुळें व जमीन उतारावर असल्यामुळें नांगर वगैरे करून ठेविल्यास भुसभुशीत जमीन वाहून जाते याकरतां ती तशीच आठ दहा वर्षे सोडून नंतर त्यातील जंगल तोडून व आजूबाजूच्या जंगलातील डहाळ्या आणून व गवत हातरून त्याला उन्हाळ्यात आग लावून देतात. ही राख लहान नांगरीनें हलवून पहिल्या वर्षी पाऊस पडल्याबरोबर नाचणी पेरितात, व पुढें वर नमूद केल्याप्रमाणें तीन पिकें घेऊन पुन्हा पूर्वीप्रमाणें पड टाकितात. याशिवाय रानटी जातीचे लोक अशाच पद्धतीनें कराडे, कोल, कणगरें भात, मका व हलक्या प्रतीचीं तृणधान्यें वगैरे करून आपला उदरनिर्वाह करितात.

या पद्धतीला ब्रह्मदेशात टावनग्या, आसामात झूम, मध्यहिंदुस्थानात डह्या, हिमालयात खिल व पश्चिम घाटात कुमरी अगर डाली म्हणतात

*हिरवाळ खत*.—म्हणजे ताग, गवारी, कुळीथ, कारळा वगैरेंसारखीं पिकें करून तींवर फुलवरा आला म्हणजे नांगरून जमिनींत गाडून टाकणें होय. याच्या योगानें जमिनीचा पोत सुधारतो व पोषक द्रव्याचा साठा वाढतो. याचा उपयोग पुढील पिकाना होतो. ही पद्धत मुख्यत्वें करून बागाइतात सर्वत्र प्रचलित आहे. याला बेवड करणें असेंही म्हणतात

पिकात फेरपालट करण्याची पद्धत सर्व हिंदुस्थानभर आढळते. ही पद्धत अनुभवानें जमिनीचा मगदूर, हवा, मान, पाऊसकाळ वगैरे पाहून त्यावर बसविलेली असते.

*पिकात फेरबदल*.—वनस्पतीस जीं पोषक द्रव्यें हवेंतून घ्यावयाचीं असतात, तीं हवेत पुष्कळ असतात. परंतु जीं जमीनींतून घ्यावयाचीं असतात तीं मात्र जमीनींत कांहीं नियमित प्रमाणात आढळतात. यामुळें पिकाची लागवड आळीपाळीनें करणें जरूरीचें आहे. पिकात आळीपाळी का असावी याचीं कारणें पुढीलप्रमाणें.—पहिलें कारण जमीनीतील द्राव्य रसापैकीं कांहीं भाग प्रत्येक वनस्पति शोषून घेते. दुसरें कारण जमीनींत जीं पोषक द्रव्यें असतात त्याचे सारखेच भाग सर्व जातींच्या वनस्पती घेतात असें नाहीं. तिसरें कारण सर्व वनस्पती जमीनींतून एकच जातीचें द्रव्य घेतात असेंहि नाहीं. चवथें प्रमाण प्रत्येक जातीच्या वनस्पतींत त्यात तण वाढण्याचें मान त्या वनस्पतीच्या मानानें कमजास्त असतें. वर नमूद केलेल्या कारणाअन्वयें पुढील नियम फायदेशीर दिसतात.

ज्या पिकाच्या पोषणास एकाच जातींचीं द्रव्यें लागतात अशीं पिकें एकाच शेतात लागोपाठ घेऊं नये. धान्याचीं पिकें कंदाचीं पिकें, पाल्याचीं पिकें, फलमूळाचाच उपयोग होतो अशीं पिकें, याचा परिणाम जमीनीवर निरनिराळ्या तऱ्हेनें होतो. म्हणून जर एक साल धान्याचीं पिकें एका जमीनींत केलीं तर त्याच जमीनींत दुसऱ्या वर्षी कंदाचीं अगर मुळ्याचीं

किंवा कडधान्याचीं पिकें करावीं धान्याच्या (तृणधान्याच्या) पिकास नायट्रोजन व फास्फरस या द्रव्याची विशेष गरजी आहे कडदणाच्या धान्यास पोटयाश व चुना याची जरूरी असते हीं पिकें नायट्रोजन हवेंतून घेऊं शकतात म्हणून त्याच्या काड्याकुड्या मुळ्या वगैरे कुजल्यावर त्यातील नायट्रोजन जमीनीस मिळतो व त्या शेतात पुढील सालीं तृणधान्याचीं पिकें काढल्यास तो त्या पिकाच्या उपयोगी पडतो. यासाठीं एक तऱ्हेचें अन्न खाणारें पीक काढल्यावर दुसऱ्या तऱ्हेचें अन्न लागणारें पीक करावें, म्हणजे जमीनीची सुपीकता कायम रहाते कापसासारख्या काहीं पिकाच्या मुळ्या खोल जाऊन खालच्या थरातील पोषक द्रव्यें घेतात जोंधळा, बाजरी, गहू वगैरेंच्या मुळ्या आखूड असून वरच्या थरातील पोषक द्रव्यें घेतात याकरिता खोल व आखूड मुळ्याचीं पिकें आळीपाळीनें केल्यास वरच्या व खालच्या थराना आळीपाळीनें विश्रांति मिळते

विवक्षित पिकाबरोबर विवक्षित तणें माजतात याकरिता जमीनींत फेरपालटीनें निरनिराळीं पिकें केल्यानें व त्या पिकाना निरनिराळ्या प्रकारच्या मशागतीची जरूर असल्यामुळें तण नाहींसें होतें उदाहरणार्थ बाजरीमागून भुईमूग अगर बटाटे व कापसामागून हरभरा

एका जातीच्या पिकावरील रोग अथवा कीड याची बाधा दुसऱ्या जातीच्या पिकास होत नाहीं म्हणून एकाच जातीचीं पिकें लागोपाठ केल्यास किड्याना भरपूर पोषण मिळतें व त्याची वाढ अतिशय जोरानें होते. याकरिता पिकात फेरपालट केल्यानें किड्याना अन्न न मिळून त्याचा नाश होतो. खेड व जुन्नर येथील बटाट्यातील बागडी व त्याप्रमाणें अळा नाहींशी करणें असल्यास तेथें काहीं वर्षेपर्यंत बटाटे करणें बंद झालें पाहिजे

वर सांगितलेल्या गोष्टींचा फायदा मिळावा म्हणून पिकाची माडणूक चागली करावी जमीनीची चागली मशागत करून कीड व तण न माजण्याबद्दल योग्य उपाय योजून दर वर्षी जमिनीला खत घालून एकाच जमिनींत लागोपाठ तेंच पीक करीत गेल्यास वावगें होणार नाहीं परंतु असें करणें ही जास्त खर्चाची बाब असल्यामुळें दरवर्षी पिकाची चागली माडणूक केल्यानें जमीनीला विश्रांति मिळून फार खर्च न येता चागलीं पिकें येतील

हिंदुस्थानात मिसळीचीं पिकें करण्याची बरीच वहिवाट आहे उदाहरणार्थ बाजरी आणि तूर, बाजरी आणि कुळीथ व मठ, बाजरी व कारळा, जोंधळा व उडीद, शाळू, जोंधळा व करडई, गहू आणि करडई, शाळू व हरभरा वगैरे मिसळीचीं पिकें केल्यानें पिकात फेरबदल केल्यापासून जो फायदा होतो तो होऊन शिवाय अनेक धान्यें मिसळून पेरलीं असता सर्वच पिकें बुडत नाहींत एखादें पीक बुडालें तरी इतर पिकापासून काहींना काहीं तरी उत्पन्न होतें मिसळींत कडदणाचीं पिकें असतात व तूर ही सर्वत्र आढळते तुरीपासून अतिशय फायदा आहे कारण तुरीची मुळें खोल जातात व तेथील पोषक द्रव्यें वर आणतात तुरीचा पाला जमीनीवर पडतो व अशा योगानें जमीन सुपीक बनते पिकाची चागली माडणूक केल्यास जमीन पड ठवण्याची फारशी जरूर पडणार नाहीं काहीं पिकें धान्याचीं असावीं व काहीं विकाऊचीं असावी पिकात फेरबदल केल्यानें व नवीन जातीचीं पिकें केल्यानें पेरणीचे, कापणीचे व मशागतीचे हंगाम वरच्यावर येऊन माणसाना व गुराना भरपूर अन्न मिळून शेतकऱ्यास व बैलाना वर्षभर राबणूक पुरेल पिकात फेरपालट करणें तो बाजारच्या मागणीवर, मजुरीवर, जमीनीच्या जातीवर हवेवर व शेतापासून नजीक असणाऱ्या बाजारावर व एकंदरींत शेतात होणाऱ्या फायद्यावर अवलंबून आहे असें असल्यामुळें व वेगवेगळ्या प्रांतात व प्रदेशात जमीन व हवा निरनिराळी असते म्हणून पिकाची माडणूक करण्याला निश्चित नियम सागणें कठिण आहे तथापि पिकाची माडणूक करताना ज्या पिकापासून जास्त फायदा होऊन जमिनीचें फारसें नुकसान होणार नाहीं इकडे विशेष लक्ष पोचवावें पिकाच्या फेरपालटींत एखादें पीक जमिनीची सुधारणा करण्यासारखें असाव जसें ताग करून तो जमीनींत नागरून टाकणें. असें केल्यानें जमिनीचा पोत सुधारतो सोईप्रमाणें पिकें करणें ती काहीं खोल व काहीं उथळ जमीनींत पोषण करणारीं पिकें असावींत नेहमीं फायद्याचीं पिक करीत असताना त्यात एखादें पीक असें असावें की तें करतांना जमीनीची जास्त मशागत करून तींतील सर्व तण नाहींसें होईल उदाहरणार्थ कापसाच्या फेरपालटींत सवडीप्रमाणें बटाटे, भुईमूग, हळद वगैरे पिकें करावीं एकंदरींत पिकाची माडणूक करताना जास्त पैसा देणारीं पिकें, विकाऊचीं पिकें, जमीन साफ ठेवणारीं पिकें, वाढींत फेर असणारीं पिकें व निरनिराळ्या जमीनीच्या थरावर पोसणारीं पिकें अशीं असावीं यावद्दल जास्त काळजी घ्यावी

महाराष्ट्रातील फेरपालटीच्या काहीं पद्धती खालीं दिल्या आहेत —(१) फार पाऊस पडणाऱ्या भागात वर्षानुवर्षे भात घेतात ज्या भाताच्या जमीनींत ओलावा टिकतो तेथें रब्बी हंगामात वाल, पावटा, कुळीथ, वाटाणा, गहू, एरंडी, हरभरा वगैरे पिकें घेतात (२) वरकस जमीनींत पहिल्या वर्षी नागली, दुसऱ्या वर्षी वरी, तिसऱ्या वर्षी हरीक, चवथ्या वर्षी कारळा. परंतु कोंकणात नागली, हरीक व तिसऱ्या वर्षी वरी अशी चाल आहे कारण वरी केल्यानतर तिचीं पाळें जमीनींत रहातात व त्या पाळ्यावर कारळ्याशिवाय दुसरें पीक येत नाहीं अशी समजूत आहे सर्वसाधारण हीं पिकें दर एकरी नागलीच्या सवाई हरीक व पाऊणपट म्हणजे नागलीच्या तीनचतुर्थांश वरी अशीं असतात या पिकानतर जमीन काहीं वर्षे पड टाकतात ही जमीन कमींत कमी आठ दहा वर्षे तरी पड टाकली पाहिजे असा कोंकणातील अनुभव आहे (३) खानदेश, भडोच, धारवाड, वऱ्हाड,

मराठवाडा येथील काळ्या जमीनींत पहिल्या वर्षी कापूस, दुसऱ्या वर्षी बाजरी, तिसऱ्या वर्षी तीळ, हरभरा अगर गहूं.

तापीकाठ.—यांत पहिल्या वर्षी गहूं, दुसऱ्या वर्षी हरभरा किंवा जवस.

दख्खन.—हलकी जमीन, हींत बाजरी व कडधान्यें.

डेक्कनः—मराठवाडा, काळी जमीन. हींत शाळू, व करडई; गहूं आणि करडई व हरभरा.

उत्तर गुजराथ—गोराडू जमीन हींत पहिल्या वर्षी बाजरी व कडधान्यें, दुसऱ्या वर्षी कोद्रा, तूर व तीळ, तिसऱ्या वर्षी नाचणी. बेसर-जमीन हींत पहिल्या वर्षी ज्वारी व कडधान्य, दुसऱ्या वर्षी कोद्रा, तीळ, तूर अगर तंबाखू, तिसऱ्या वर्षी नाचणी.

पंचमहालः—येथें पहिल्या वर्षी मका, दुसऱ्या वर्षी हरभरा, गहूं

वसईपट्टी ( ठाणें जिल्हा )—येथें पहिल्या वर्षी पानमळा, दुसऱ्या वर्षी आलें, तिसऱ्या वर्षी ऊंस, चवथ्या वर्षी केळी.

खेड जुन्नर ( पुणें जिल्हा )—येथें पहिल्या वर्षी बाजरी व रब्बी बटाटे, दुसऱ्या वर्षी भुईमूग, तिसऱ्या वर्षी बाजरी व रब्बी कांदे व चवथ्या वर्षी मिरची.

पाटबंधान्याखालील जमीन ( जिल्हा नाशिक )—हींत पहिल्या वर्षी भात, दुसऱ्या वर्षी ऊस, तिसऱ्या वर्षी बाजरी, रब्बी गहूं किंवा हरभरा व चवथ्या वर्षी भात.

बि या चा नि व डः—बीं खळ्यांत न धरितां मळ्यांत धरावें अशी म्हण आहे. शेतकीला आधारभूत मुख्य बीच आहे. " बीज तसा अंकुर " अशीहि म्हण आहे. व ती सार्थ आहे. बीं चांगलें असेल तर पीक चांगलें येईल, परंतु बीच जर वाईट असेल तर तें कसल्याहि जमीनींत पेरा, नंतर कशीहि मेहनत करा, तींत कितीहि खत मूत टाका तरी बीं रोगट वाईट असल्यामुळें पुढें पीक चांगलें येणार नाहीं.

असें असताहि या प्रश्नाकडे फारच दुर्लक्ष आहे. हल्लीं शेतकरी लोक बहुतेक जातींचें बीं पेरणीच्या वेळीं बाजारांतून आणतात, तें बहुतेक मिसळीचें असतें. कांहीं लोक खळ्यांतील ठळक ठळक कणसें राखून किंवा बीं पाखडून पेरणीकरितां ठेवितात. सरकी बहुतेक गिरणींतून आणितात. म्हणजे गिरणी हीं मुख्यतः बियाचीं कोठारें होत. ही निष्काळजी रीत झाली. या कामांत खालील तत्त्वें लक्षांत घेतलीं पाहिजेत. ( १ ) बीं पेरलेल्या जमीनींत व हवेंत येईल असें असलें पाहिजे ( २ ) तें वर्षानुवर्ष निवड केलेल्या, चांगली मशागत केलेल्या व जोरदार झाडाचें असावें. ( ३ ) तें नवें, बिन भेसळीचें, वजनदार, रंगदार, मोठें दगळ, चकचकीत, पक्कें झालेलें, चांगलें उगवणारें, बिनरोगी असावें. तें किडकें असूं नये. बियाच्या अंगीं चकचकीतपणा असल्यास तें त्याच्या परिपक्वतेचें दर्शक होय. ( ४ ) बीं भिजकें, उबट किंवा घुबट असूं नये. भिजकें बीं कोंडांत घातलें असतां घुबट लागतें ( ५ ) बियांत केरकचरा, गडा माती, किंवा तणांचें बीं हीं नसावींत ( ६ ) तें जास्त प्रमाणांत उगवणारें असावें. बियाची निवड करतांना खालील गोष्टी लक्षांत ठेवाव्या. ( १ ) एखादें निर्मळ रोग न झालेलें असें शेत पाहून त्यांतील चांगला भाग पसंत करावा. ( २ ) त्यांतील ओंब्या किंवा कणसें चांगली भरलेलीं व मोठीं असावीं, ( ३ ) ओंबीतील किंवा कणसांतील दाणे मोठे व वजनदार असावेत. ( ४ ) रोपावर किंवा धान्यावर कीड तांबारा, किंवा काणी सारखे रोग नसावेत ( ५ ) बीं धरणें तें पीक चांगलें तयार झाल्यावर धरावें ( ६ ) बीं तयार झाल्यावर तें चाळावें त्यांतील हलके, किडके व फुटके दाणे वेगळे करावे. बीं चांगलें असलें तरी तें पेरल्यावर उगवण्याला पुरेसा ओलावा, पुरेशी हवा व उष्णता यांची जरूरी आहे. हीं सर्व जमीनीची चांगली मशागत केल्यानें, व पाऊस न पडल्यास पाणी पाजल्यानें भागविता येतात पाणथळ जमीनींत बीं उगवत नाहीं तें कुजतें कोरड्या जमीनींत तें उगवत नाहीं व अगदीं थोडा ओलावा असल्यास तें पिठूळतें

बि या ची प री क्षा.—बीं शेतांत पेरण्यापूर्वी त्याच उगवण्याचें प्रमाण काय आहे हें पहाण्याची गुजराथेंतील कांहीं भागांत एक पद्धति आहे. गहूं शेतांत पेरण्यापूर्वी एक मूठभर घेऊन त्याची एक पुरचुंडी बांधितात व ती चार तास पाण्यांत भिजवून नंतर ती ओलसर दाण्याची पुरचुंडी जमीनींत पुरतात. पुढें चार दिवसांनी ती बाहेर काढून किती बियांना मोड फुटले हें पहातात बहुतेकांना मोड फुटले असल्यास तें पेरण्यास हरकत नाहीं असें समजतात याहीपेक्षा शेतकऱ्याला सोपी रीत म्हणजे एका लाकडाच्या खोक्यांत अगर टिनच्या तबकांत नदींतील बारीक रेती भरावी व ती पाण्यानें ओली करावी. नंतर बियांपैकीं शंभर दाणे घेऊन ते वाळूवर टाकावे व हलकेच दाबावे. रेती ओली ठेवावी, पण बियांवर पाणी सेळू देऊं नये. चार पांच दिवसांनीं बियाला मोड फुटले म्हणजे मोडावलेले दाणे मोजून फेंकून द्यावे व आणखीं चार दिवसांनीं पुन्हां मोड आलेले दाणे मोजून फेंकावे. अशा रीतीनें दहा दिवसांत एकंदर किती दाणे उगवले हें आपणास कळेल शंभर पैकीं ९०–९५ दाणे उगवले तर बीं पेरण्यास चांगलें आहे असें समजावें. बाजरी, राळें, तीळ वगैरे बारीक दाण्याच्या धान्याची जास्त काळजी घेतली पाहिजे.

बीं सा ठ वि णें.—प्रत्येक शेतकऱ्यानें पुढील वर्षाच्या पेरणीकरितां बीं राखून ठेवावें पुष्कळ बियांना विशेषकरून कडदण धान्यांना तीं फार दिवस ठेविल्यास कीड लागते व बियाची नासाडी होते. धान्याला कीड लागूं नये म्हणून हिंदुस्थानांत बीं साठविण्याचे अनेक उपाय योजण्यांत येतात. गुजराथेंत, देशावर व कर्नाटकांत बीं गाडग्यांत साठवून ठेवतात दक्षिण कोंकणांत भात पेंढ्याच्या मुडांत बांधून ठेवण्याचा चाल आहे. कित्येक ठिकाणीं तट्टे सारवून त्यांत अगर कणगींत किंवा फळ्यांच्या कोठारांत धान्य साठवून

ठेवतात. गाडगें, कणगी व तट्टे यांचीं तोंडें बीं भरल्यानंतर शेण, माती व राख यांच्या मिश्रणानें लिंपतात; बियाचा किडीपासून बचाव व्हावा म्हणून बियात राख व लिंबाचा सुकलेला पाला मिसळतात. गुजराथेंत बीं टिकावें म्हणून त्याला एरंडेलाचें पूट देतात. कोंकणात कडवे, वाल, पावटे वगैरेंनां तांबडी माती लावतात. गुजराथेंत कित्येक ठिकाणीं गव्हाच्या बियात थोडा पारा घालण्याची चाल आहे व त्याच्या पासून बियांचा बराच बचाव होतो. कित्येक ठिकाणीं मोठमोठीं दाणेदार कणसें निवडून, कित्येक ठिकाणीं धान्याच्या राशींतून मोठें ठोकळ बीं पाखडून राखून ठेवतात.

उन्हात वाळविलेलें बीं रांजणात अगर गाडग्यात भरलें म्हणजे बियाच्या मानानें त्यात कांहीं नेफथलाइनच्या (डांबरातील द्रव्य)गोळ्या घालाव्यात व तोंड चांगलें बंद करावें. गाडगें, कणगी वगैरे ऐवजीं शेतकऱ्याला लोखंडी पत्र्याच्या हौदात बीं ठेवणें बऱ्याच अंशीं फायदेशीर पडेल. या हौदाचें तोंड बंद असून त्याचें झाकण अगदीं घट्ट बसणारें असावें. प्रत्येक पन्नास पौंड बियावर सुमारें १०-१२ डांबराच्या गोळ्या घालाव्या, म्हणजे डब्यातील हवेंत बहुतेक कीटकाची वीण होणें बंद पडेल. त्या गोळ्या टाकलेल्या बियाचा फक्त पेरण्याच्या कामींच उपयोग होतो. त्याचा जनावरास अगर माणसास खाण्यास उपयोग होत नाहीं. शेतकरी जीं पिकें करितात. त्याना अनेक शत्रू आहेत. ते जमीनींत बीं पेरल्यापासून तीं पीक तयार होऊन पदरात पडे पावेतों त्याच्या मागें लागलेले असतात. पुन्हा धान्य कोठारात साठविल्यास तेथेंहि त्याचा फन्ना उडवितात. हे शत्रू म्हणजे निरनिराळ्या तऱ्हेचीं तणझाडें किडे व वनस्पतिजन्य रोग होत. याखेरीज उंदीर, कावळे, चिमण्या, घारी, ससे, कोल्हे, रानडुकरें, सायाळ, हरणें, रानमांजरें, रुई वगैरे प्राणी पिकें उभीं असताना खाऊन नुकसान करतात.

शेतात आपणास नको असलेलें किंवा पिकाची नुकसानी अगर खराबी करणारें झाड यास तण म्हणण्यास हरकत नाहीं. तणझाडें पिकाचें अनेक तऱ्हेनें नुकसान करतात. ज्याप्रमाणें पिकें वाढण्यास पाणी, पोषक द्रव्यें, हवा, उष्णता वगैरेंची जरुरी लागते त्याप्रमाणें तणझाडाची वाढ होण्यासहि या गोष्टींची अनुकूलता लागते. म्हणून तणझाडें शेतात होऊं दिल्यास तीं पिकासाठीं घातलेल्या पोषक द्रव्याचा वाटा घेतात व त्यामुळें ओलावा कमी पडतो, पिकें कमजोर दिसू लागतात. शिवाय रोपाना त्यापासून दाटी होऊन त्याची वाढ होण्यास लागणारें ऊन व हवा बंद होते. अशा दाटींत किडे, त्यांचीं अंडीं व त्याचप्रमाणें वनस्पतिजन्य रोगाचा उद्भव व वाढ होण्यास चांगली जागा सापडते तणझाडें शेतात वाढूं दिलीं व त्याना बीं येऊं देऊन त्याच्यासहित पिकाची कापणी केली तर धान्याच्या बियात तणाच्या बियाची अतोनात भेसळ होते व वर्षानुवर्ष असेंच बीं पेरीत गेल्यास तणझाडें आपलें वर्चस्व वाढवितात. व मुख्य पिकाची वाढ बंद करतात. शेतकऱ्यात "तण खाई धन" अशी एक म्हण आहे व ती सर्वस्वी खरी आहे. ती पूर्वजानीं पुष्कळ वर्षाच्या अनुभवातीं केलेली असून अज्ञानामुळें व आळसामुळें ती शेतकऱ्याना माहीत असूनहि त्याच्या हातून ती कृतींत येत नाहीं.

या तणझाडरूपी खादाड व आगंतुक शत्रूचा वेळींच प्रतिकार व बंदोबस्त केल्यास हल्लीं शेतात मिळणारें पीक निदान सवाई दिढीनें तरी वाढविता येईल.

तणाचें वर्गीकरणः—हें पुष्कळ तऱ्हेनें करता येईल. तणें कांहीं वर्षायु व कांहीं बहुवर्षायु असतात. कांहींच्या मुळ्या खोल जातात व कांहींच्या वरच असतात व कांहीं कोरडवाहू जमीनींत आढळतात तर कांहीं पाणभरत्या व बागाईत जमीनींतच फैलावतात. कित्येक खरीप हंगामात तर कांहीं रब्बींत व कांहीं दोन्ही हंगामात सापडतात. कांहीं तणाचा फैलाव बियापासून होतो, कांहींचा दर कांड्यास मुळ्या येऊन होतो व कांहींना खाणे फुटून त्याच्या शेवटीं कांदा किंवा गड्डा येऊन पुन्हा त्यातून फूट होऊन जास्त जास्त क्षेत्रावर त्याचा प्रसार होत जातो

तणाच्या बीजाचा फैलाव होणाऱ्या निरनिराळ्या तऱ्हाः—

( १ ) शेतातील तणाना बीं येऊन तेथल्या तेथेंच पडणें. उदा.—टारफुला, कुरडू, फळी, पिंवळा धोतरा वगैरे.

( २ ) वाऱ्यानें बाहेरून बीं शेतात येऊन. उ० म्हाताऱ्या, पाथरी वगैरे.

( ३ ) पक्ष्याच्या विष्टेतून बीं शेतात पडून. उ०आऱ्यावरील बांडगूळ.

( ४ ) गुरें, मेंढ्या, बकऱ्या वगैरेंकडून—बाभूळ, बोकेरी,

( ५ ) कालव्याच्या पाण्यातून—घोळ, पाथरी, फुली, नागरमोथा वगैरे.

( ६ ) मनुष्याकडून—तणाच्या बियानी भेसळ असलेलें बीं पेरून

निरनिराळ्या प्रकारच्या पिकात विशिष्ट प्रकारच्या तणाचीं बीजें आढळतात तीं पुढें दिलीं आहेत:—

| पिकें | तणाचीं नांवें. |
|---|---|
| १ राळा, सांवा व बाजरी | कुरडू, शिपी, शेवरा पिंवळा धोतरा, माठ, तांदुळजा, चिमणचारा व टारफुला. |
| २ ज्वारी व कुळीथ, खरीप व रब्बी | शेवरा, बरवडा, चांदवेल व टारफुला |
| ३ मटकी | बरवडा, शेवरा, पडवेल. |
| ४ गहूं | शेवरा, तांदुळजा, बरवडा, चांदवेल, माठ व सारमळ |
| ५ भात | पाकड, बरडी |
| ६ ताग | खाडेकुळी |

नियानें फैलाव होणाऱ्या तणाचा नायनाट करणें झाल्यास तें बीज येण्यापूर्वी निंदून ( खुरपून ) टाकावें व पेरणीला निर्मळ बीं वापरावें. जमीन खोल नांगरून कुळवून व पावसाऱ्याम्भी तणाची आडीमोड करून व पीक उभें असताना वरचेवर कोळपण्या देऊन व एक दोन खुरपण्या देऊन साधारणपणें वर्षायु तणाचा नायनाट करता येतो. वर्षायु तण दोन पानी असताना कुळवाची एक पाळी घातल्यास तें उपटून मोकळें होतें व उन्हानें मरून जातें परंतु याच तणाला चार पानें फुटूं दिल्यास त्याच्या मुळ्या पसरतात व खोल जातात. हें तण काढण्यास खुरपावें लागतें व तेणकरून खर्च जास्त येतो यादूनहि हीं तणें मोठीं होऊं दिल्यास तीं हातानीं उपटावीं लागतात व याला जास्त मेहनत व खर्च येतो.

मुळ्या खोल जाऊन व काण्याकाण्यानें नवीन मुळ्या फुटून फैलावणारीं तणें बहुवर्षायु होत. कुंदा, हरियाळी ( दूर्वा ) वसनसडी, लव्हाळा ( नागरमोथा ) दर्भ व मध्यप्रांतातील कासगवत वगैरे हीं या वर्गांतील होत हीं तणें उत्तम काळ्या जमिनींतच फार होतात. याचा बीमोड करणें फार कठीण असून जास्त खर्चाचें आहे व कांहीं कांहीं तणाचा बीमोड करणें तर दुरापास्तच आहे पाणभरल्या जमिनींत लव्हाळा कधींहि नाहींसा होत नाहीं. एका कुंद्याच्या रोपाला एक वर्षात नवे कोंब दहा फुटतात व त्याच्या मुळ्या सुमारें चवदा इंच खोल जातात व त्याचा विस्तार एक चौरस फूट जागा व्यापितो. त्याच्या दोन तीन वर्षांत एक हातारीएवढ्या पेढी बनतात. लोखंडी नांगरानें जमीन नांगरून, कुंद्याचे गड्डे वेंचून काढल्यास कुंद्याचा नायनाट एक दोन वर्षांत होऊं शकतो. बऱ्याच ठिकाणीं कुंद्याच्या पेढी हातानें गणवितात पण त्याला फार खर्च येतो.

लव्हाळा:—बागाइतात कोरडवाहू जमिनींतहि हा कांहीं ठिकाणीं आढळतो. फळझाडांच्या व फुलझाडांच्या बागांत तर बहुतेक जागा या तणानें व्यापलेली आढळते. लव्हाळा खणून, वेंचून काढून वावर अगदीं साफ करणें अगदीं अशक्य आहे. कारण जमीन खोल नांगरली अगर खणून काढिली तरी नागरमोथे रंगानें काळे असल्यामुळें ते वेंचण्यास दिसत नाहींत. तागाचें पीक करून जमिनींत गाडल्यानें, रताळ्यासारखीं जमिनीवर आच्छादन करणारीं पिकें केल्यानें व पाणभरतीऐवजीं कोरडवाहू पिकें केल्यानें हें तण कांहीं अंशीं कमी पडतें. उन्हाळ्याच्या एका झाडाला चार महिन्यात पाच नागरमोथे, आठ महिन्यात नऊ व बारा महिन्याच्या झाडास तेरा नागरमोथे येतात. यांपैकीं बऱ्याच नागरमोथ्याना नवीं रोपें फुटतात व त्यांचे ताणे खालीं जाऊन दर चार ते नऊ इंचाच्या अंतरावर खोल जमिनीत एक एक नागरमोथा याप्रमाणें येतात व वर्षअखेर शेवटचा नागरमोथा अठरा इंच खोलिवर भरतो. अशा रीतीनें प्रत्येक झाड एक वर्षांत वीस चौरस फूट जागा व्यापतें.

हरियाळी:—हरियाळी(हरळी) नांगरून किंवा खणून वेंचून टाकून थोडीबहुत नाहींशी करिता येते. ती वखराच्या पाळ्या वरचेवर घालून दाबात ठेविता येते परंतु बीमोड करणें झाल्यास दरवर्षी नांगरणें, वेंचणें अशी सतत दोन तीन वर्षें मेहनत घेतल्यास प्रयत्न बराच फलद्रूप होतो.

एका हरयाळाच्या झाडाला आठ महिन्यात तीन ताणे फुटतात व प्रत्येकाची लांबी तीन साडेतीन फूट असते. हिचीं कांडीं फार जवळजवळ असतात दर कांड्यास मुळ्या फुटून ती जमिनीला चिकटते. तेथें पुन्हा फूट होऊन लहान ताणा तयार होतो अशा तऱ्हेनें हरियाळी भराभर जास्त जास्त जागा व्यापीत जाते. हे ताणे जमिनीवर आढळतात तसेंच खालीं आढळतात. हरयाळीची फूट आठ महिन्यात सुमारें सतरा इंचपर्यंत खोल जाते व एका झाडानें सुमारें पाच चौरस फूट जागा व्यापिली जाते. जबलपुराकडे कास नावाच्या तणाचा नाश शेतात पाणी साठवून तें कुजवून करितात या गवताच्या मुळ्या फार खोल जातात व कुंद्याप्रमाणेंच त्याच्या शेतात पेंटी बनतात. टारफुला नावाची एक परोपजीवी वनस्पति आहे. हा टारफुला आपल्या मुळ्या दुसऱ्या झाडाच्या मुळात गुंतवून झाडातून आपलें पोषण करितो हें तणझाड ज्वारी व ऊंस या पिकात फार आढळतें. या तणाचीं झाडें फूल येण्यापूर्वी उपटून काढिल्यास पिकास होणारा अपाय बंद करिता येतो.

वरील हकीकतीवरून तण हा शेतकऱ्याचा केवढा शत्रु आहे हें स्पष्टपणें लक्षात येईल. हवीच्या चढाओढीच्या व अवर्षणाच्या काळात या शत्रूस थारा देता नये. याचा शक्य त्या उपायानें नायनाट केला पाहिजे.

हिंदुस्थानात तणाचा बीमोड करण्याच्या कामीं रसायन द्रव्याचा उपयोग करून प्रयत्न केलेले कोठें ऐकिवात नाहीं. [ लेखातील संदर्भग्रंथ द्यावयाचे म्हणजे एक वाङ्मयशास्त्राच सविस्तर वर्णावयाची. कांहीं ग्रंथाचें विवेचन कृषिशास्त्राच्या पोटविभागाचें विवेचन करताना येईल. कृषिकर्मशास्त्रावर प्रसिद्ध पुस्तकासारखे अनेक इंग्रजी ग्रंथ आहेत येथील शेतकीसाठीं शेतकीखात्याचे, सहकारी संस्थांचे रिपोर्ट पहावे. मुकर्जीचा भारतीय शेतकीवरचा ग्रंथ बराच सूचक आहे]

कृष्ण-(१) पुराणांतील एक व थोर विभूति व सर्व देवतामध्यें अतिशय लोकप्रिय देवता. कृष्ण हा विष्णूचा आठवा अवतार आहे असें समजतात. कृष्ण म्हणजे प्रत्यक्ष विष्णूच असेंहि कित्येक मानतात त्याच्याबद्दल अनेक गोष्टी व दंतकथा प्रचारांत आहेत अशा हा वीरपुरुष बहुधा महाभारताच्या काळीं होऊन गेला असावा वेदांतून या थोर पौराणिक व्यक्तीचा उल्लेख सापडत नाहीं. ऋग्वेदात कृष्ण नावाचा एक सूक्तकर्ता ऋषि येतो. ( ऋ. ८. ८५, ३. ४ ). कृष्ण देवकीपुत्र याचें नाव प्रथम छांदोग्य उपनिषदात ( ३. १७. ६ ) आलें आहे व त्याचा पौराणिक कृष्णाशीं संबंध

जोडण्याचा प्रयत्न बरेच पंडित करितात ( ज्ञानकोश वि ३ पा. ४४५ पहा ). महाभारतांत त्याचा प्रामुख्यानें उल्लेख केलेला आढळतो. महाभारतातील एक भाग म्हणून हल्लीं उपलब्ध असलेली भगवद्गीता श्रीकृष्णानेंच अर्जुनास निवेदन केली. भगवद्गीतेंत श्रीकृष्णानें आपणास " सर्व भूतांचे ठायीं वास करणारा ईश्वर " असें म्हटलें असून, ही सर्व सृष्टि मी उत्पन्न केली व माझ्या ठायीं सर्व वस्तू वास करतात हीं तत्वें प्रतिपादिलीं आहेत. 'जनार्दन, अनादि, अनंत, सर्वव्यापी, सर्वसाक्षी इत्यादि नावानीं अर्जुनानें श्रीकृष्णास संबोधिलें आहे. सर्व जनसमूहाला अत्यंत प्रिय वाटणाऱ्या अशा श्री कृष्णाच्या बाल्यावस्थेतील लीला भागवतपुराणात सविस्तर वर्णिल्या आहेत.

'देवकीचा आठवा गर्भ तुझा नाश करील ' असें नारदानें कंसास आधींच सांगितलें होतें. ही आपत्ति टाळण्याकरता कंसानें वसुदेव व देवकी याना कारागृहात टाकलें व त्यांचे पहिले सहा पुत्र उपजताच दगडावर आपटून ठार केले. सातव्या गर्भानें रोहिणीच्या उदरात प्रवेश केला व ती प्रसूत झाली. हाच बलराम होय. आठव्यावेळीं देवकी प्रसूत होताच वसुदेवानें त्या नूतन बालकास यमुनानदी ओलांडून यशोदेच्या घरीं नेलें. यशोदेला झालेली कन्या उचलून घेऊन व कृष्णास यशोदेच्या घरीं ठेवून वसुदेव तडक देवकीकडे आला. कंसानें ही कन्या देवकीचा आठवा गर्भ समजून मारिली.

इकडे कृष्ण गोकुळात निर्भयपणें वाढत होता. तो आपल्या ज्येष्ठ बंधू(बलराम)सह वनात गाई चारण्यास जाई. रामकृष्ण व गोपाळ यांचे खेळ चालू असता एकदा कंसानें कृष्णाच्या नाशार्थ पाठविलेला अरिष्ट नामक राक्षस, वृषभाचें रुप घेऊन तेथें आला परंतु कृष्णानें त्यास मारिलें. कंसानें पाठविलेल्या केशिन आदिकरून इतर राक्षसांचाहि कृष्णानें वध केला. नंतर अक्रूराबरोबर बलराम व कृष्ण असे उभयता मथुरेस कंसाच्या निमंत्रणावरून गेले. तेथें कृष्णानें चाणूर व बलरामानें मुष्टिक याना मल्लयुद्धात ठार मारलें. अखेरीस कृष्णानें कंसाला सिंहासनावरून ओढून ठार मारिलें व उग्रसेनास त्याच्या गादीवर बसविलें

एकदा इंद्रानें गोकुळावर प्रचंड वृष्टि केली असता कृष्णानें आपल्या करांगुळीवर गोवर्धन पर्वत सात दिवस उचलून धरला व सर्व गोकुळाचें रक्षण केलें. या पराक्रमाबद्दल त्यास 'गोवर्धनधारी' असें नाव मिळालेलें पुराणांतून आढळतें.

महाभारतात श्रीकृष्णाच्या जन्माबद्दल अशी एक कथा आहे कीं, श्रीविष्णूनें आपल्या मस्तकावरील एक पांढरा व एक काळा असे दोन केस उपटले. त्या दोन केसांनीं रोहिणी व देवकी यांच्या उदरात प्रवेश केला. व त्यांपासून अनुक्रमें बलराम आणि कृष्ण अथवा केशव जन्मले महाभारतांत श्रीकृष्णानें केलेल्या अद्भुत गोष्टी व पराक्रम वर्णिले आहेत. त्यांपैकीं काहींचा सारांश असाः—

यमुनेच्या तीरावरील अरण्यात राहणाऱ्या हयाधिपतीस कृष्णानें ठार केलें. वृषभाचें रूप घेऊन गोकुळांत आलेल्या अघासुरनामक दानवास त्यानें यमसदनीं पाठविलें. प्रलम्भ, नरक, जम्भ इत्यादि असुरांचाहि त्यानें वध केला जरासंधाचें साहाय्य असलेल्या कंसास त्यानें ठार केलें व बलरामाच्या साहाय्यानें त्यानें कंसाचा भ्राता जो सुनामन्, त्याचा पराजय करून त्यास मारिलें. त्यानें गंधाराधिपतीच्या मुलीचें ( रुक्मिणीचें ) स्वयंवराच्या वेळीं हरण केलें. जरासंध व शिशुपाल याचा त्यानेंच अंत केला. अंग, वंग आदिकरून असंख्य टोळ्याना त्यानें जिंकून आपल्या ताब्यात आणिलें. अद्भुत गोष्टींनें युक्त अशा सागरात प्रवेश करून त्यानें वरुणास जिंकिलें. पाताळामध्यें जाऊन त्यानें पंचजन्याचा वध केला व पांचजन्य नामक अद्भुत शंख मिळविला. खाण्डववनामध्यें अर्जुनासह त्यानें अग्नीची आराधना करून त्याजकडून सुदर्शन चक्र मिळविलें. गरुडावर आरूढ होऊन अमरावती नामक इंद्राच्या राजधानीवर त्यानें चाल केली व तेथून पारिजातकवृक्ष बरोबर आणिला

दुसऱ्या एका स्थळीं, अर्जुनानें श्रीकृष्णाच्या पराक्रमाचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे.—भोज राजाचा युद्धामध्यें समूळ नाश करून कृष्णान रुक्मिणीचें हरण केलें. गांधाराचा त्यानें नाश केला. नागजिताच्या पुत्राना त्यानें जिंकून त्यानीं प्रतिबंधात ठेवलेल्या राजा सुदर्शनाची त्यानें मुक्तता केली दरवाजाच्या एका फळीनें त्यानें पाण्ड्याचा वध केला व दन्तकुरामध्यें कलिंगाचा मोड केला कृष्णाच्या प्रयत्नामुळेंच एकेकाळीं जळलेल्या काशीपुराची पुनः स्थापना झाली. निषदाधिपति एकलव्य व जंभ नामक दैत्य याचा त्यानें वध केला. सुनामन् नामक उग्रसेनाच्या दुष्ट पुत्राचा बलरामाच्या साह्यानें त्यानें वध करून उग्रसेनास त्याचें राज्य परत मिळवून दिलें. शाल्वाधिपतीस जिंकून त्यानें शतघ्निनामक शस्त्र प्राप्त करून घेतलें. इंद्राच्या विनंतीवरून कृष्णान मुरु व ओघ या दानवाचा वध करून अखेरीस नरकासहि मारिलें व त्यानें हिरावून घेतलेलीं अदितीचीं कर्णभूषणें परत मिळविलीं.

द्वारकेचा राजा, कृष्ण द्रौपदीस्वयंवराच्या वेळीं हजर असून अर्जुनानें द्रौपदीचा पण उत्तम प्रकारें जिंकला असा त्यानें आपला अभिप्राय दिला, इत्यादि कथाभाग महाभारतांत आढळतो इंद्रप्रस्थास पांडव राज्य करीत असता कृष्ण त्याना भेटावयास गेला व खाण्डववनामध्यें पांडवासह तो शिकारीकरतां निघाला. तेथें गेल्यावर, खाण्डववन जाळण्यास उत्सुक झालेल्या अग्नीशीं त्याचें सख्य होऊन अग्नीला कृष्णार्जुनाचें साह्य मिळालें. त्याबद्दल अग्नीनें वज्रनाभ नांवाचें दिव्य चक्र व कौमोदकी गदा या वस्तू कृष्णाला अर्पण केल्या. पुढें इंद्राचा पराजय होऊन अग्नीनें सर्व खाण्डववन जाळिलें. श्रीकृष्णाची भेट घेण्याकरता अर्जुन द्वारकेस गेला असता श्रीकृष्णानें अर्जुनाचें स्वागत केलें. कृष्णानें कानाडोळा

केल्यामुळें अर्जुनानें बलरामास न जुमानता, सुभद्रेला (कृष्णाची स्वसा) घेऊन पलायन केलें व तिच्याशीं लग्न केलें. राजसूय यज्ञ करण्याचें जेव्हां युधिष्ठिराच्या मनात आलें, तेव्हां जरासंधास प्रथम जिंकलें पाहिजे असा कृष्णानें युधिष्ठिरास सल्ला दिला. तेव्हां भीमाकडून जरासंधाचा वध करून राजसूययज्ञास निर्विघ्नपणें प्रारंभ झाला. युधिष्ठिरानें केलेल्या राजसूय यज्ञाच्या वेळीं कृष्ण हजर असून शिशुपालहि यज्ञाच्या वेळीं तेथें होता. शिशुपालानें यज्ञाच्या वेळीं अत्यंत वाईट वर्तन करून श्रीकृष्णाची निर्भत्सना केल्यामुळें कृष्णानें आपलें सुदर्शन चक्र सोडून शिशुपालाचें डोकें उडविलें कौरवपांडवामध्यें झालेल्या द्यूताच्या प्रसंगीं कृष्ण हजर होता. ज्यावेळीं द्रौपदी पणाला लावली गेली व पण हरला, त्यावेळीं दुःशासन जबरीनें भरसभेमध्यें तिला घेऊन निघाला व तिला विवस्त्र करण्याचा प्रयत्न करूं लागला तेव्हां श्रीकृष्णाला तिची दया येऊन त्यानें तिला वस्त्रें पुरविलीं.

पांडवाचा वनवास संपल्यानंतर कृष्णानें ' भावी भारतीय युद्धाविषयीं चर्चा करणाऱ्या मंडळात भाग घेतला व शांतता प्रस्थापित होण्याविषयीं अटोकाट प्रयत्न केले. नंतर तो द्वारकेस परत गेला. भावी युद्धात त्याचें साहाय्य मागण्याकरता अर्जुन व दुर्योधन हे उभयता द्वारकेस गेले; परंतु दोन्हीं पक्षाशीं त्याचें नातें असल्यामुळें युद्धात भाग घेण्याचें त्यानें नाकारलें. " मी व माझें सैन्य या दोहोंपैकीं ज्यास जें पसंत पडेल तें त्यानें घ्यावें " असें श्रीकृष्णानें उभयतास सांगितलें अर्जुन दुर्योधनाच्या आधीं आल्याकारणानें प्रथम मागण्याचा हक्क त्यास मिळाला व त्यान्वयें त्यानें कृष्णासच पसंत केलें .दुर्योधनानें मोठ्या आनंदानें यादवसैन्य पत्करलें. तदनंतर कृष्ण अर्जुनाचा सारथी झाला. नंतर पांडवाच्या विनंतीवरून शिष्टाई करण्याकरता म्हणून श्रीकृष्ण हस्तिनापुरास गेला. परंतु त्याचे शांतता राखण्याबद्दलचे सर्व प्रयत्न निष्फळ होऊन तो परत आला. नंतर रणसंग्रामाची तयारी करण्यात येऊन सर्व सैन्य युद्धाकरता सिद्ध झालें युद्धाच्या अगदीं आरंभीं, अर्जुनाचा सारथि या नात्यानें कृष्णानें अर्जुनास भगवद्गीता सांगितली, व त्याचा व्यामोह नष्ट केला. युद्ध चालू असता श्रीकृष्णानें अर्जुनास अमोल मदत करून त्याचें रक्षण केलें. पांडव युद्धात विजयी झाल्यावर त्याच्यासह तो हस्तिनापुरास गेला व पांडवानीं केलेल्या अश्वमेध यज्ञास जातीनें हजर राहिला. यज्ञ समाप्त झाल्यावर कृष्ण द्वारकेस परत गेला. त्यावेळीं ' सर्व शहरवासी यानीं समुद्रतीरीं प्रभासक्षेत्रीं जाऊन देवतेची आराधना करावी अशी त्यानें सर्वांना विनंति केली व एक दिवस मदिरेचें सेवन करण्यास त्यानें सर्वांना परवानगी दिली. दारूनें धुंद झाल्यामुळें यादवामध्यें यडाजंगाचें भांडण होऊन श्रीकृष्णादेखत त्याचा स्वतःचा प्रद्युम्न नामक पुत्र मारला गेला, व बहुतेक यादव सरदाराचा या कलहात वध झाला. तेव्हां बलरामानें तेथून प्रयाण केलें व शांतपणें एका वृक्षाखालीं त्यानें देहत्याग केला. जरास नामक व्याधानें मृग समजून चुकीनें कृष्णावर एक बाण सोडला व त्या बाणानेंच कृष्णाचा अंत झाला. त्याकाळीं अर्जुनानें द्वारकेस जाऊन कृष्णाचें उत्तरकार्य यथाविधि केलें. नंतर थोड्याच दिवसांनीं समुद्रानें द्वारका नगर आपल्या उदरात घेतलं.

" कृष्ण हा शिवाचा ( महादेव ) उपासक होता व शिवपार्वतीकडून त्यास अनेक वर मिळाले होते असा कांहीं ठिकाणीं उल्लेख आहे " असें डॉ. मूर विधान करतो

अष्टनायका ( पट्टा ) व भौमासुराच्या बंदीतून सोडविलेल्या सहस्र राजकन्या इतक्या कृष्णाच्या स्त्रिया होत्या. मुख्य स्त्रियाची संतति पुढील प्रमाणेः—(१) रुक्मिणी-हिचे प्रद्युम्न,चारुदेष्ण, सुदेष्ण, चारुदेह, सुचारु, चारुगुप्त, भद्रचारु, चारुचंद्र विचार आणि चारु असे दहा पुत्र,व चारुमती नामक कन्या होती,तीस कृतवर्म्याच्या पुत्रानें वरिलें होतें (२)जांबवंती हिचे पुत्र सांब, सुमित्र पुरुजित्,शताजित्, सहस्र विजय, चित्रकेतु,वसुमान् द्रविड आणि क्रतु. शिवाय एक कन्या होती (३) सत्यभामा—हिचे पुत्र भानु, सुभानु, स्वर्भानु, प्रभानु, श्रीभानु, प्रतिभानु व एक कन्या. (४) भद्रा—हिचे पुत्र संग्रामजित् बृहत्सेन, शूर, प्रहरण, अरिजित्, जय, सुभद्र, वामआयु, आणि सत्यक, व एक कन्या. (५)मित्रविंदा-हिचे पुत्र वृक, हर्ष, अनिल, गृध्र, वर्धन, उन्नाद, महाश, पावन, वन्हि, आणि क्षुधि. (६)सत्या—हिचे पुत्र वीर, चंद, अश्वसेन चित्रगु, वेगवान्, वृष, आम, शंकु, वसु, कुंति.(७)कालिंदी—हिचे पुत्र श्रुत, कवि, वृष, वीर, सुबाहु, भद्र, शांति, दर्श, पूर्णमास, आणि सोमक. (८) लक्ष्मणा—हिचे पुत्र प्रघोष, गात्रवान्, सिंह, बल, प्रबल, ऊर्ध्वग, महाशक्ति, सह, ओज, आणि अपराजित्. व एक कन्या याशिवाय रोहिणी म्हणूनहि कृष्णाची एक स्त्री असल्याचें आढळते.

कृष्णाच्या पुत्रपौत्रात अठराजण महारथी होते. त्याचीं नांवें अशीं—प्रद्युम्न, अनिरुद्ध, दीप्तिमान, भानु, सांब, मधु, बृहद्भानु, चित्रभानु, वृक, अरुण, पुष्कर, वेदबाहु, श्रुतदेव, सुनंदन, चित्रबाहु, विरूप, कवि, न्यग्रोध.

कृष्णावतार व कृष्णभक्ति यासंबंधीं विवेचन ' अवतार ' या लेखांत आलेंच आहे. वासुदेव कृष्ण, अवतारी पुरुष कृष्ण, नारायण, गोविंद वगैरे व्यक्तीतील साम्य व भिन्नता तसेंच नारायणीय धर्माचा विकास ' बुद्धोत्तर जग ' या ज्ञानकोश प्रस्तावना खंडाच्या ६ व्या प्रकरणात विस्तारानें दिला आहे. सध्याच्या कृष्णभक्तीचा विचार भक्तिमार्ग या लेखात केला जाईल [ महाभारतः भागवत व इतर पुराणें, वैदिक इंडेक्स. डौसन—हिंदु क्लासिकल डिक्शनरी, ज्ञानकोश विभाग, ३, ४ व ५. ]

(२)हा एका प्रसिद्ध विद्वत्कुलातील ब्राह्मण. वऱ्हाडातपयोष्णीतीरी .दहिगाव या नावाच्या एक गांव आहे. या ठिकाणीं चिंतामणी नांवाचा एक यजुर्वेदी ब्राह्मण रहात होता बहाल नांवाचा त्याचा एक पणतू होता हा मोठा रुद्रभक्त होता कृष्ण

हा वल्लाळचा दुसरा मुलगा होता. भास्कराचार्यांच्या बीजावर 'बीज नवांकुर' नावाची टीका यानें केली आहे. जहांगीर बादशहाच्या दरबारीं कृष्णाचें वजन फार होतें. नूरदिन नावाचा यवन अधिकारी कृष्णावर फार प्रीति करीत असे. श्रीपतिकृत जातकपद्धतीवर उदाहरणरूप याची टीका आहे. 'जातक निर्णय' म्हणून याचा एक ग्रंथ आहे. [ भारतीय ज्योतिष शास्त्र. ]

( ३ ) हा सह्याद्री संनिध मावळांत रहाणारा देशस्थ ब्राह्मण होता. यानें ' करण कौस्तुभ ' नांवाचा ग्रंथ केला. याचें गोत्र कश्यप होतें. शके १५७५ ( इ. स. १६५३ ) त ग्रंथ लिहिण्याच्या व वेधादिकाच्या तयारीस ग्रंथकार लागला होता. यावेळीं मराठी राज्यस्थापक शिवाजी २६ वर्षांचा होता. व त्याची राज्य स्थापण्याची मानगड सुरू होती. यानें हस्तगतयास येणारा ग्रंथ करण्य विषयीं ग्रंथकारास सांगितलें ही गोष्ट महत्वाची आहे. कृष्णाचा दुसरा ग्रंथ तंत्ररत्न नांवाचा आहे. [ दीक्षित–भा. ज्योतिषशास्त्र ]

कृष्णकवि—नृसिंहाचा मुलगा; मुरारिविजय नाटकाचा कर्ता. यास कृष्णपंडित अथवा शेषकृष्ण अशीं भिन्न नांवें आहेत तीं चुकीचीं आहेत. १६ व्या शतकाच्या शेवटीं कृष्णकवीनें मुरारिचरित नाटक रचलें हें अलवार ग्रंथसंग्रहांत ( नंबर १०१७ ) आहे. [ पीटर्सनचा रिपोर्ट ४. ( बॉ. ब्रँ. रा. ए. सो. १८९८ ). उषापरिणयचंपु, कंसवध नाटक, क्रियागोपनकाव्य, पारिजातहरणचंपु, सत्यभामापरिणय नाटक, सत्यभामाविलास नाटक, असे आणखी कांहीं ग्रंथ आफ्रेक्टनें कृष्णकवीचे म्हणून दिले आहेत. प्राकृत चंद्रिकेचा कर्ता जो शेषकृष्ण किंवा कृष्णपंडित तो हा नव्हे असें पीटर्सननें म्हणणें आहे. कृष्णपंडित १२ व्या शतकांत होऊन गेला.

कृष्णगर, पोटविभाग.—बंगालप्रांतात नडिया जिल्ह्याचा पोटविभाग. क्षेत्रफळ ७०१ चौ. मै. यांत कृष्णगर ( जिल्ह्याचें व पोटविभागाचें मुख्य ठिकाण ) व नवद्वीप अशीं दोन मोठीं गांवें व ७४० खेडीं आहेत. याच्या पश्चिमेस भागीरथी नदी आहे. जलंगीनदी या पोटविभागांतून जाते. इतिहासप्रसिद्ध प्लाशीची रणभूमी या पोटविभागाच्या अगदीं उत्तरेस आहे.

शहर.—बंगालप्रांतात नडिया जिल्ह्याचें मुख्य ठिकाण व नडियाच्या राजाचें राहण्याचें ठिकाण. हें ईस्टर्न बंगाल रेल्वेचें एक स्टेशन असून जलंगी नदीच्या डाव्या तीराला आहे. याची लोकसंख्या ( १९११ ) २३४७५. येथें नडियाचे राजे रहातात. कृष्णगर हें व्यापाराचें महत्वाचें ठिकाण असून मातीच्या रंगित चित्राकरितां प्रसिद्ध आहे. येथील म्युनिसिपालिटीनें अंजीना नदीचा जुना पाट खोदून पाणी वाहून जाण्याच्या मार्गाची ( ड्रेनेजची सुधारणा केली आहे.

येथें कलकत्ता युनिव्हर्सिटीस जोडलेलें एक कॉलेज व त्यास जोडलेलें हायस्कूल आहे. इतर दोन तीन मध्यम व उच्च इंग्रजी शिक्षणाच्या शाळा आहेत. हें चर्च मिशनरी सोसायटीचें मध्यबंगालच्या रोमनकॅथोलिक विभागाचें हें मुख्य ठिकाण असून येथें दोन्ही संस्थेच्या शाळा व प्रार्थनामंदिरें आहेत. तसेंच दानांना मिशननें चालविलेले दोन दवाखाने आहे. व एक इस्पितळ आहे.

कृष्णदत्त—सदाराम व आनंददेवीचा मुलगा. 'सांद्र कुतूहलप्रहसन' ग्रंथाचा ( काल संवत् १८०९ ) हा कर्ता असून राधारहस्यकाव्य यानें रचलेलें आहे. वाउमड जिल्ह्यांत भामतीय गांवांत हा रहात असे. धर्मवर्मन् राजाचा तो समकालीन होता. [ आफ्रेक्टः पीटर्सनचा रिपोर्ट ४. ]

कृष्णदयार्णव—हा संतकवि सातारा जिल्ह्यातील कऱ्हाड जवळील कोपरडें येथील रहाणारा माध्यंदिनशाखी देशस्थ ब्राह्मण होय. याचें खरें नांव नरहरि असून बापाचें नांव नारायण व आईचें बहिणा होतें. याचा जन्म शके १५९६ च्या अक्षय्य तृतीयेस झाला. याचें लग्न झालें होतें. या वेळीं महाराष्ट्रांत औरंगझेबाच्या स्वारीमुळें सर्वत्र धुमाकूळ मातला होता. त्यामुळें नरहरीला गांव सोडावा लागला. तो ब्रोताईच्या आश्यास राहिला असतां तेथें आनंदसंप्रदायी गोविंदानें त्याला शके १६१८ गोकुळ अष्टमीस उपदेश दिला. मधुकरी मागत असतां " कृष्णदयार्णव " असें नरहरि सतत म्हणे. त्यावरून तेंच त्याचें टोपण नांव रूढ झालें. तीर्थयात्रा करून आल्यावर व प्रथम कुटुंब वारल्यावर अग्निहोत्र घेतल्यामुळें यानीं द्वितीय संबंध केला. परंतु तिनक्यात त्याला महारोग झाला. त्यावर उपाय म्हणून भागवताच्या दशमस्कंधावर त्यानीं प्राकृत टीका लिहिली. यावेळीं याचें वय ५४ होतें. या ग्रंथास आधार श्रीधरी टीकेचा आहे. पूर्वार्धाचे ४९ अध्याय संपले व रोग नाहींसा झाला. उत्तरार्धाचे ३७ अध्याय संपविले व ३८ व्या अध्यायाचे २३ श्लोक झाले आणि स्वामी पैठण येथें समाधिस्त झाले ( शके १६६२ मार्गशीर्ष ). पुढील साडेतीन अध्याय याचा शिष्य उत्तमश्लोक यानें लिहिले आहेत. एकंदर ग्रंथास १६ वर्षे लागलीं. हा ग्रंथ चांगला आहे. ओवी एकनाथाप्रमाणें आहे. ज्ञानेश्वरीचीहि छाया ग्रंथावर पडलेली आहे. विद्वान लोक या " हरिवरदा " ग्रंथास फार मान देतात. यावरून कर्त्याची विद्वत्ता व बहुश्रुतपणा दिसून येतो. काव्याच्या दृष्टीनेंहि ग्रंथ चांगला वठला आहे. विस्ताराच्या मानानें हा ग्रंथ प्रचंड आहे. याची एकंदर ओवीसंख्या ४२ हजार आहे. स्वामींचा "तन्मयानंद" नांवाचा आणखी एक ग्रंथ व वरेनसे अभंग आणि पदें इतकी कृति सध्यां उपलब्ध आहे [ महाराष्ट्र सा. ].

कृष्णदास—विहारिकृष्णदास असेंहि कोणी यास म्हणतात. अकबर बादशहाच्या विनंतीवरून त्यानें पारसीकोश किंवा पारसीप्रकाश नावाचा ग्रंथ लिहिला. [ पीटर्सन ]

कृष्णदासमुद्गल—हा कवि पैठणचा रहिवासी असून याच्या बापाचें नांव नरसिंह व याचें नांव मुद्गल होतें; याच्या गुरूचें नांव कृष्ण होतें. यानें वाल्मिकी रामायणांतील फक्त

युद्धकांडावर टीका केली आहे. त्याचे ७८ अध्याय असून तें त्यावेळीं मराठी भाषेंत फार मान पावलें होते. ' माझी देशभाषा मराठी आहे ' असें मोठ्या अभिमानानें सांगून यानें मराठी भाषेची प्रौढि गाजविली आहे. मराठी साम्राज्यांत या रामायणाचें पारायण तत्कालीन शूर व मुत्सद्दी करीत असत [ संतकविकाव्यसूची. ].

**कृष्णदेवराय**—हा विजयानगरचा राजा. याची कारकीर्द इ. स. १५०९–१५३० पर्यंत होती. याच्या विशेष माहितीबद्दल " विजयानगर " पहा.

**कृष्णदेव होयसळ**—हा ( इसवी सन १२०७–१२६० ) द्वारसमुद्राच्या होयसळ बल्लाळांच्या वंशांतील सुप्रसिद्ध सिंघणाचा नातू होय. त्याच्या बापाचें नांव जैत्रपाळ. तो आपल्या बापाच्या हयातींतच मरण पावल्यामुळें, सिंघणानंतर कृष्णदेव यास गादी मिळाली. कित्येक कोंकणस्थ व देशस्थ ब्राह्मणास ह्याच्या वेळेस गांवें इनाम मिळालीं. त्यांत पटवर्धन, पेठास, पाठक इत्यादि नांवें आढळतात. जल्हण म्हणून ( लक्ष्मीदेवाच्या पश्चात् ) कृष्णदेवाचा मुख्य मंत्री होता. तोहि विद्वान व हुषार असून ' सूक्तिमुक्तावली ' नामक त्यानें लिहिलेला सुभाषित ग्रंथ उपलब्ध आहे. वेदांतसूत्रावरचा टीकाकार अमलानंद हा कृष्णदेवाच्या दरबारीं होता. एकंदरींत त्या वेळेस संस्कृत विद्येची भरभराट होती. [ हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास भा. दुसरा; मराठी रियासत प्रकरण १ लें ].

**कृष्णद्वैपायन**—मैत्रावरुणी जो वसिष्ठऋषि त्याच्या शक्ति नावाच्या पुत्राचा पौत्र व पराशर ऋषीचा पुत्र. हा उपरिचर नामांतरानें प्रसिद्ध जो वसु राजा, त्याच्या वासवी नावाच्या धीवरानें पालन केलेल्या कन्येच्या ठायीं, तिच्या कौमारदशेंत पराशर ऋषीपासून झाला होता; आणि त्याच कारणामुळें त्यास पाराशर्य असें म्हटलेलें आहे. यास दुसरें द्वैपायन असेंहि नांव आढळतें. त्याचें कारण यमुनानदी कृष्णवर्ण असून तिच्या ठायीं असणाऱ्या द्वीपांत याचा जन्म झाला होता. म्हणून यास द्वैपायन अथवा कृष्ण द्वैपायन असें म्हटलेलें आहे. तसेंच बदरीवनांत तप केल्यामुळें बादरायण असेंहि यास म्हणत असत. यालाच वेदव्यास म्हणतात. यानें पुराणें व महाभारत नावाचा इतिहास रचला. [ व्यास पहा ]

यास वेदपरंपरा चालविणारे पैलादिक चार शिष्य असून, पुराणपरंपरा चालविणारा रोमहर्ष नावाचा एक शिष्य होता. यांशिवाय असित आणि देवल असेहि याचे दोन शिष्य होते. यानें छिन्न झालेला शंतनूचा वंश वृद्धिंगत केला. हा कल्पपर्यंत चिरंजीव असून पुढें सावर्णाच्या मन्वंतरात बादरायण नावानें सप्तर्षींतील एक ऋषि (सावर्णिवंश पहा) होणार आहे. यास शुक म्हणून उत्तम महत्तत्वसंपन्न असा एक पुत्र होता. [ देवी भागवत ]

**कृष्णनाईक वरंगळकर**—महंमद तघलक यानें दक्षिण जिंकली तेव्हां वरंगळ प्रांत त्याच्या आधिराज्याखालीं गेला. पुढें महंमदानें प्रजेचा अतिशय छळ केल्यामुळें राज्यांत सर्वत्र बंडें उठलीं. त्यावेळीं दक्षिणेंत हिंदु राजाचा जो एक मोठा संघ स्थापला गेला, त्यांत होयसळ बल्लाळ राजा, अनागोंदीचा बुक्कराय व वरंगळच्या ( तैलंगण ) रुद्रदेवाचा पराक्रमी पुत्र कृष्णनायक हे प्रमुख होते. यांनीं एकदम उठाव करून मुसुलमानाला जो तडाखा दिला त्यामुळें साऱ्या दक्खनमधून मुसुलमान नाहींसा झाला फक्त दौलताबाद मात्र त्याच्याकडे राहिली ( सन १३५१ ) [ मु. रि. ]

**कृष्णसूत्र ज्वर**—हा हिंवतापाशीं बरेंच साम्य असणाऱ्या उष्ण कटिबंधातील प्रदेशांत आढळून येणारा ज्वर आहे. याचीं मुख्य लक्षणें.—ताप अंगात वरचेवर भरतो पण केव्हां भरेल याचा नियम नसतो. थंडी फार वाजून ताप येतो व ओकून ओकून रोगी घाबरा होतो. वरचेवर पित्तमय वांति होते. लघवी अतिशय लाल काळसर अशा रंगाची असते. व बहुधा कावीळहि होते. हा ताप खालील देशांत विशेष पहाण्यांत येतोः— (१)आशिया व आफ्रिका या खंडांतील उष्ण कटिबंधाच्या टापूंत असणारे देश. (२) वेस्ट इंडीज बेटं. (३) अमेरिकेंतील दक्षिण संयुक्त संस्थानें. (४) यूरोप खंडांत ग्रीस, सार्डिनिआ व सिसिली हे देश. परंतु जेथें हिंवतापाचें चिन्हाड असतें अशा ठिकाणीं हाहि ताप पण असावयाचाच अशी स्थिति नसते रोग्याच्या रक्तामध्यें क्वचित्कालीं हिंवतापाचे कीटक सांपडतात खरे. कांहीं विद्वानाच्या मतें ( यामध्यें कॉक हे जंतुशास्त्रज्ञहि आहेत. ) हा रोग हिंवतापामध्यें कोयनेलचा अतिशय व मोठ्या प्रमाणांत उपयोग केला असता होतो. परंतु याच्या उलट मत दुसऱ्या अनेक विद्वानांचें आहे. ही उपपत्ति जर खरी असती तर जेथें जेथें हिंवताप फारच उसळलेले असतात, त्या प्रांतांत या रोगाचें अस्तित्व स्पष्टपणें नजरेस आलें पाहिजे होतें. किंवा जे डॉक्टर आपल्या हिंवतापाच्या रोग्यास कोयनेल जास्त प्रमाणांत देतात त्याच्या नजरेस कोयनेलपासून होणारा हा रोग वरचेवर आढळून यावयास पाहिजे होता. पण तशी स्थिति फारशी नाहीं. या तापाचें पीतज्वर या तापाशींहि बरेंच सादृश्य आहे. पण पीतज्वरांत वांती हटकून काळ्या रंगाची होते. तशी या ज्वरांत होत नाहीं. व या ज्वरांत काळ्या लालसर रंगाची जशी लघवी होते तशी पीतज्वरांत होत नाहीं. या विशिष्ट प्रकारच्या लघवीवरून या तापास हल्लीं त्याचें रूढ असलेलें नांव पडलें आहे. अगदीं अलीकडील शोधावरून असें सिद्ध झालें आहे कीं, या तापाचा संबंध हिंवतापाशीं व कोयनेलच्या अतिसेवनाशीं खरोखरच असावा. गुरामध्यें लाल काळसर लघवी होणारा असा एक रोग असून त्या लाल रूपवति विशिष्ट कीटक

सापडतात त्या जातीचाच हा ताप असावा अशी कल्पना होती. पण ती आता त्याज्य ठरली आहे.

उ प चा र.—यात पूर्ण विश्रांति व उत्तम शुश्रूशा यांची आवश्यकता फार असते. रोग्यास लघवी गढूळ न होईल व मूत्रपिंड कार्यक्षम होतील अशीं औषधें व विशेषतः पुष्कळ स्वच्छ पाणी द्यावें. शिराच्या मार्गे शरीरात अमृतजल टोंचून घातल्यानें रक्त विलयन होऊन कार्यसिद्धि होते. कोयनेल दिल्यानें लघवीची लाली अधिक होते व रोग्यास अस्वास्थ्य वाटतें म्हणून तें देऊ नये. पण रक्तात फीटक (हिंवाचे) स्पष्ट असतील तर थोडया प्रमाणात कोयनेल द्यावें अथवा तें स्नायूंत खोल टोंचून घालावें.

**कृष्ण याज्ञवल्की**—हा एक महाराष्ट्रातील प्रसिद्ध कवि होय. यानें कथाकल्पतरु नावाचा एक मोठा थोरला पौराणिक ग्रंथ रचिला आहे. याचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. काहींच्या मतें पूर्वार्ध फक्त यानें लिहिला. या पूर्वार्धांत सात स्तवक आहेत. पैकीं एकटया सातव्या स्तवकाचीच ग्रंथसंख्या २९४६ आहे. यावरून सर्व ग्रंथाच्या प्रचंडपणाची कल्पना येईल. याचा काळ शके १५००च्या सुमाराचा होता. हा कौंडिण्य गोत्री असून याच्या आईबापाचीं नावें कमळा व अवाजी होत. याच्या गुरूचें नाव अनंत असून कवीनें सदर ग्रंथ नाशिक येथें लिहिला. ग्रंथात अनेक पौराणिक कथा असून, त्यात व प्रचलित कथात बराच फरक आढळतो. कथाशिवाय, भूगोल, खगोल, चारी वर्ण, सर्व जातींची उत्पत्ति वगैरे इतर विषयहि यात आहेत. भाषा सरळ व साधी आहे. याचें मराठी भाषांतर प्रथसंपादक व प्रसारक मंडळीनें प्रसिद्ध केलें आहे. [ म. क. च.; संतकवि सू. ]

**कृष्णराजपेठ**,( ता लु का )—म्हैसूर संस्थानात म्हैसूर जिल्ह्याच्या उत्तरेकडील तालुका क्षे. फ. ४२५ चौरस मैल. यात किकेर व कृष्णराजपेठ हीं गावें व ३७३ खेडीं आहेत.

कावेरीस मिळणारी हेमावती नदी या तालुक्याची दक्षिण मर्यादा असून तिच्यापासून पाच पाट काढले आहेत व पुष्कळशी मोठीं तळीं केलीं आहेत.

येथील जमीन सखल भागात सुपीक, तांबडी आणि उंचवटयाच्या प्रदेशात फाळसर,रेताड व नापीक आहे. हींत हलका तांदूळ पिकतो. नारळीचीं व सुपारीचीं झाडें व केळीचे बगीचे वगैरेपासून पुष्कळ उत्पन्न होत असून या तालुक्यात उंसाची लागवड योग्य प्रमाणात करतात. सिंधुघाट येथें रेशमी कापड तयार करितात.

**कृष्णराव खटावकर**—हे खटावचे रहाणारे असून मराठी साम्राज्यात धुमाकूळ घालणारे म्हणून प्रख्यात होते. याचे पूर्वज निजामशाहींत बाराहळ्ळी येथें रहात असत. तेथील पाटिलकी त्याची होती. वडिलांचें नाव मंबाजी. त्याना दोन मुलें झालीं. राघो व कृष्ण. हे धार्मिक असल्यानें व्यंकोबाचे गिरीवर त्यानीं अनुष्ठान केलें हे माध्वमतानुयायी देशस्थ होते. दिल्लीकर मोंगलानें कृष्ण यास खटावची ठाणेदारी दिली. परंतु त्याचा वंश परत बाराहळ्ळी येथें गेला. राघोपंत खटावास राहिले. त्यांचा पुत्र भगवंत व त्याचा प्रसिद्ध कृष्णराव. हे फार शूर होते यानीं खटाव येथील कोटातील मशीद पाडली व दत्ताचें मंदिर बाधलें या मंदिरात त्याची पुस्तकशाळा होती. ते विद्वान् होते. त्यांनीं १२ लेखक ( नवीन ग्रंथ उतरून घेण्यासाठीं ) पदरीं बाळगले होते. ते स्वतः न्याय व व्याकरण यात पारंगत होते. यांचें कुलदैवत खंडोबा. त्यानीं जेजूरीचें देऊळ बांधिलें. हल्लींचें खंडोबाचें जें मुख्य देऊळ ते याच्या हातचें असून भोंवतालचा प्राकार होळकर वगैरेंनीं बाधलेला आहे. चंपाषष्ठीच्या दिवशीं पहिला नैवेद्य याच्याकडील असतो शाहु महाराज दक्षिणेंत उतरले व सातान्यास येऊन गादीवर बसले त्यावेळीं कृष्णराव हे ताराबाईच्या बाजूस होते. त्यानीं नावाला मोंगलाच्या तर्फेचें निमित्त करून सर्व माणदेश हाताखालीं घातला ( १७०८ ). संभाजी महाराजाच्या वधानंतर हे मोंगलास मिळाले होते व त्याच्या आश्रयानें मराठी साम्राज्यात लुटालूट करीत असत. मोंगलानें याना राजा हा किताब दिला होता. यानीं मोंगलाचे अनुकरण गोषाच्या चालीपर्यंत केलें होतें. शेजारच्या बुध व मलवडीच्या घाटग्यांचें काहीं देशमुखी उत्पन्न यानी दाबलें. मोंगलानें खटाव परगणा याना जहागीर दिला. स्वराज्याविरुद्ध यानीं मोंगलास पुष्कळ वर्षे मदत केली. मुळापासून हे बंडखोरच पुढें शाहू महाराजानीं बाळाजी विश्वनाथ व श्रीपतराव प्रतिनिधी यास त्याच्यावर पाठविलें कृष्णराव शौर्यानें लढले परंतु अखेरीस ते व त्याचा वडिल पुत्र हे दोघे लढाईत पडले. दुसरे दोन पुत्र महाराजास शरण आले. तेव्हा त्यानीं क्षमा करून त्यांचें वतन पुढें चालविलें कृष्णरावानीं संस्कृतात लिहिलेली विष्णुसहस्रनामावली वरील द्वैतमती टीका उपलब्ध आहे [ भा. व, डफ, म. रि; भा. इ मं. अ. ]

**कृष्णराव बल्लाळ काळे**—हे नाना फडणीस यांचे विश्वासू असून निजामकडे पेशवे याच्यातर्फे वकील होते. हे मूळचे काशीचे. त्यानीं दक्षिणेंत येऊन बाबूजी नाईक बारामतीकर याच्या वशिल्यानें नानासाहेब पेशवे याच्या वेळीं दरबारात नौकरी धरिली दादासाहेब हे उत्तर हिंदुस्थानात स्वारीस गेले असता कृष्णराव हा त्याच्या बरोबर होता व त्यानें त्या सुमारास काहीं राजकारण केल्यामुळें त्याला काहीं इनाम पेशव्यानीं दिलें पुढें निजामाकडे वकील असता, यास पंधरा हजाराचा सरंजाम व पंधरा हजाराची जहागीर मिळून तीस हजाराची नेमणूक होती; निजामाकडूनहि दहा पंधरा हजारांची यास जहागीर मिळाली. स. १७६४ त हैदरावरील मोहिमेंत हे होते. त्याचे चिरंजीव गोविंदराव, याना एकंदर ८५ हजाराची नेमणूक होती. पुढें पेशव्यानीं जातइनाम व सरंजाम ( फौज ) इनाम मिळून सव्वा लाखाची नेमणूक केली. टिपूविरुद्ध कारस्थानात गोविंदरावाचा बराच हात

होता. इंग्रजानें त्याबद्दल त्याना २ तोफा बक्षीस दिल्या होत्या. राजांच्या प्रसंगात मध्यस्थीस हेच होते. पुढें रावबाजीनीं गोविंदरावाचा कांहीं सरंजाम जप्त केला. परंतु गोविंदराव स्वामिनिष्ठ होते. बापू गोखले पडेपर्यंत ते इंग्रजांशीं लढत होते [ वाड. कै. या.; ऐ. ले. सं.]

**कृष्णाकुमारी.**—ही मेवाडच्या भीमसिंह राण्याची मुलगी. ही अत्यंत सुंदर होती. हिच्याबद्दल त्यावेळीं सान्या रजपुतांत भांडणें लागलीं होतीं तिच्यासाठीं जयपूरकर जगत्सिंग व मारवाडचा मानसिंग याच्यात चुरस लागली. शिंद्यानें मानसिंगाचा पक्ष घेतला. आठ हजार सैन्यानिशीं शिंद्यानें येऊन राजधानीजवळ मुक्काम केला तेव्हां राण्यानें जयपूरकराशीं ठरलेला वाङ्निश्चय मोडला. तेव्हां जयपूरकरानें स्वारीची तयारी केली; इकडे मानसिंगानेंहि तयारी केली.परंतु मारवाडांत त्याच वेळीं गादीच्या वारसाबद्दल तंटे उपस्थित झाले ( स. १८१६ ) त्यामुळें राजपुतान्यात आधिकच गोंधळ माजला. यावेळीं कृष्णेचें वय १६ वर्षांचें होतें. तिची आई अनहिलवाडच्या चावडा वंशांतील होती. कृष्णा अप्रतिम सुंदर असल्यानें तिला "राजस्थानचें फूल" म्हणत. होळकरानेंहि या भानगडींत भाग घेतला होता. त्यानें अमीरखान पठाणास उदेपुरी पाठविलें. अमीरचा त्यावेळीं दरारा फार होता. त्यानें भीमसिंहास सांगितलें कीं कृष्णेला एक तर मानसिंगाला द्या नाहींतर तिला ठार मारा. भीमसिंह दुर्बळ होता. नाइलाजानें कृष्णेला मारण्याचें त्यानें ठरविलें. पुरुषांपैकीं हें काम करण्यास कोणींहि तयार होईना. दौलतसिंगानें ( राण्याचा नातेवाईक ) तर स्पष्ट नकार दिला. तेव्हां कृष्णेचा बंधु (?) जवानदास यास हें काम सांगितलें. तो खंजीर घेऊन कृष्णेपर्यंत पोंहोंचला; परंतु तिचें अप्रतिम रूप पाहून त्याच्या हातांतील खंजीर गळून खालीं पडला.कृष्णेच्या आईनें तें पाहून शोकानें सारें अंतःपुर गजबजून सोडलें. परंतु अमीर यास दया आली नाहीं. कृष्णेचें मरण टळलें नाहीं. त्यानें उपाय बदलला. तिची आत्या चांदबाई हिनें विषाचे पेले तयार केले व ती ते स्वतः घेऊन कृष्णेकडे गेली व तिला बापाची आज्ञा कळविली. आपल्यासाठीं आपल्या बापाला व सान्या राज्याला त्रास होत आहे असें पाहून ती शूर मुलगी मरण्यास सिद्ध झाली. तिनें पेला हातांत घेऊन देवांची प्रार्थना केली व बापाला सुखी ठेवण्याबद्दल विनंति केली व नमस्कार करून पेला तोंडास लाविला. तें पाहून तिच्या आईनें भीमसिंहास शाप दिला. तेव्हां कृष्णेनें डोळ्यांतून एक टिपूसहि न गाळतां उलट शांतपणें आईची समजूत घातली. ती म्हणाली "आई या नश्वर देहासाठीं तूं इतकें का दुःख करतेस ! मी मृत्यूला भीत नाहीं. मी तुझी मुलगी आहेना ? जन्मापासूनच आम्हां रजपूत स्त्रियांच्या कपाळीं मृत्यु लिहिलेला असतो. इतके दिवस मी जगलें हा बाबांचा उपकारच आहे." याप्रमाणें ती बोलत असतां, तिला वांती होऊन पोटांतलें वीष बाहेर पडलें. तेव्हां राण्यानें दुसरा पेला पाठविला, तोहि ती प्याली; पण त्याचेंहि वीष वांती होऊन बाहेर पडलें. परंतु बाप हट्टास पेटला त्यानें तिसरा पेला तयार केला.याचा मात्र उपयोग झाला. साध्या विषाचा उपयोग होत नाहींसें पाहून त्या ( अमीर व अजितसिंह ) राक्षसांनीं अत्यंत जलाल असा कुसुंब्याचा पेला (अफूचा अर्क) भरला व कृष्णेच्या हातीं दिला. त्याच्याकडे पाहून ती हसली व "यानें तरी काम होवो" असें म्हणून तो घेतला असें 'कृष्णाकुमारी' काव्यकर्ते म्हणतात. त्या पेल्यामुळें ती जी निजली ती कायमचीच.पुन्हा कांहीं ती उठली नाहीं. तिच्या पश्चात् थोड्याच दिवसांत अन्नत्याग केल्यानें व शोकानें तिची आई मेली. अमीरखानासुद्धा कृष्णा मेल्याचें ऐकून थोडा वेळ वाईट वाटलें व त्यानें अजितची निर्भत्सना केली. भीमसिंहानें अजित यास तुझा निर्वंश होईल असा शाप दिला (अमीरखान पहा ) याच भीमसिंहानें इंग्रजास मेवाडांत घेतलें (१८१७). जणूंकाय कृष्णाकुमारीच्या रूपानें मेवाडची स्वातंत्र्यश्रीच मेवाडांतून नाहींशी झाली [ टॉड; मालकम, डफ ].

**कृष्णागिरी तालुका.**—मद्रास इलाख्यांत सालेम जिल्ह्याचा तालुका. कर्नाटकचें सपाट मैदान व म्हैसूरचें पठार याच्या मधलि प्रदेशांत हा तालुका असून याच्या सभोंवार डोंगरमाथ्यावर पूर्वकालीन किल्ले आहेत. याचें क्षेत्रफळ ६५९ चौ. मै. व लोकसंख्या ( १९११ ) १,६७,३०२ आहे यांत कृष्णागिरी हें मोठें गाव व दुसरीं ५०७ खेडीं आहेत.

**गाव.**—मद्रास इलाख्यांत सालेम जिल्ह्यातील कृष्णागिरी तालुक्याचें मुख्य ठिकाण. या गावापासून तिरुपतूरला २४ मैलाची सडक व मद्रास रेल्वेचा फाटा गेलेला आहे. या गावचे कृष्णागिरी, जुनें शहर व दौलताबाद उपनगर असे विभाग आहेत. दौलताबाद विभाग अलीकडे वसलेला असून तेथें सरकारी कचेऱ्या आहेत.

नवळच असलेल्या ८०० फूट उंचीच्या एका तुटलेल्या कड्यावरील डोंगरी किल्ल्याच्या मान्यात हें गाव वसलें असल्यामुळें नुसत्या हल्ल्यानें कधींच काबीज केलें गेलें नाहीं. व म्हैसूर युद्धांत इंग्रजास हें गांव काबीज करण्यास दोन वेळ वेढा द्यावा लागला. जवळपासच्या प्रदेशांत उत्कृष्ट द्राक्षें होतात.

**कृष्णा जिल्हा**—हा जिल्हा मद्रास इलाख्याच्या ईशान्य भागांत आहे. याचें क्षेत्रफळ ५९०७ चौरस मैल आहे याच्या पूर्वेस बंगालचा उपसागर असून पश्चिमेस निजामचें राज्य व करनूल जिल्हा; दक्षिणेस नेलोर व उत्तरेस गोदावरी जिल्हा आहे. कृष्णा नदी प्रथम जिल्ह्याच्या पश्चिम भागाच्या सरहद्दीवरून वहात जाऊन नंतर वायव्य भागांतून थेट आग्नेय भागाकडे जाते. या कृष्णा नदीवरून या जिल्ह्याला कृष्णा जिल्हा हें नाव पडलें आहे. या जिल्ह्याच्या अगदीं पश्चिमेकडील भागातील मुलुख डोंगराळ आहे. उत्तरेकडील व मध्यभागातील मुलूख सपाट असून कापसाच्या

लागवडीला योग्य आहे. पूर्वेकडील भाग हा अगदीं सपाट असून या ठिकाणीं भाताचीं शेतेंच्या शेतें पसरलीं आहेत. या भागांत फार सुपीक जमीन आहे.

भूस्तर.—या जिल्ह्याच्या पूर्व भागातील मध्यकटिबंधात पूर्व घाटाच्या पायथ्याशीं जंबूर दगडाची समृद्धि आहे. तसेंच या ठिकाणीं अभ्रक, स्फटिक, हरायित, मानाइट इत्यादि दगडाचेहि थर आहेत. या मध्य कटिबंधाच्या वायव्येस जो सपाट प्रदेश आहे, त्या ठिकाणीं स्लेटेसारखे दगड, खडूचे दगड व स्फटिकाचे दगड सापडतात. या कटिबंधाच्या आग्नेयीस, वाळूचे दगड, स्लेटीचे दगड, व कुरुंदाचे दगड आढळून येतात.

वनस्पती व प्राणी.—कारोमांडल किनाऱ्यावर ज्या वनस्पती सर्वसाधारण आढळून येतात त्याच या ठिकाणीं आढळून येतात. हा जिल्हा जरी सुपीक असला तरी या जिल्ह्यात वृक्ष व लतांचा जवळ जवळ अभावच आहे. काशूचीं झाडें मात्र मधून मधून दृष्टीस पडतात. हिंस्र पशु देखील या जिल्ह्यात विशेष आढळून येत नाहींत. चित्ते, अस्वलें हे कधीं कधीं डोंगरामध्यें आढळतात. रानडुकरें येथें वरीच आहेत. पक्षी मात्र निरनिराळ्या प्रकारचे आढळून येतात. जलचर पक्षी येथें पुष्कळ आहेत. माशांचीहि येथें विपुलता आहे.

हवामान व पर्जन्य.—जिल्ह्याचें हवामान जरी उष्ण असलें तरी निरोगी आहे. मच्छलीपट्टणची हवा समशीतोष्ण आहे. पर्जन्याचें सरासरी प्रमाण ३३ इंच आहे. पण सर्व भागात हें प्रमाण सारखेंच असतें असें मात्र नाहीं. मच्छलीपट्टण, तेनाली, बापताला इत्यादि ठिकाणीं पाऊस पुष्कळ पडतो, इतर ठिकाणीं कमी पडतो.

इतिहास.—या जिल्ह्यावर अगदीं प्रथम आंध्रांचें राज्य होतें. हे आंध्र लोक बौद्धधर्मीय होते. अमरावती येथें या लोकांनीं बांधलेला एक स्तूप असून शिवाय त्यावेळचीं शिक्क्याचीं नाणींहि या ठिकाणीं मधून मधून उपलब्ध होतात. त्यानंतर ७ व्या शतकाच्या सुमारास चालुक्यांचा अंमल या प्रांतावर सुरू झाला. यांच्या अमदानींत खडकामध्यें खोदलेल्या मूर्ती व खडकांत बांधलेलें एक देवालय आहे. ९ व्या शतकाच्या अखेरीस यांच्या सत्तेचें उच्चाटण होऊन या प्रांतावर चोलांचें वर्चस्व सुरू झालें. चोलांनीं आपली सत्ता शतक दोन शतकें गाजविल्यानंतर, वरंगळचे गणपति घराणें या प्रांतावर राज्य करूं लागलें. यांच्या अमदानींतच मार्को पोलो हा या प्रांतात आला होता. पुढें या जिल्ह्याचा उत्तरभाग ओरिसाच्या राजांनीं जिंकून घेतला व दक्षिण भागावर रेड्डी घराण्याच्या राजांनीं आपला अंमल बसविला. या राजांनीं पुष्कळ ठिकाणीं किल्ले बांधले. त्यांपैकीं कोंडविड, बेल्लमकोंड व कोंडपल्ली या ठिकाणीं अद्यापि काळाच्या भक्ष्यस्थानांतून अर्धे मुर्धे वाचलेले किल्ले पहावयाला मिळतात. इ. स. १५१५ मध्यें विजयानगरच्या कृष्णदेव राजानें ओरिसाच्या राजाच्या ताब्यात असलेला या प्रांताचा मुलूख जिंकून घेतला. पुढें विजयानगरचें साम्राज्य नष्ट झाल्यावर गोवळकोंडयाच्या कुतुबशाहीचें वर्चस्व या प्रांतावर सुरू झालें व शेवटीं कुतुबशाहीचा शेवट झाल्यानंतर औरंगझेबाच्या मोंगल साम्राज्याच्या छत्राखालीं हा प्रांत आला. १७५२ मध्यें दक्षिणच्या सुभेदारानें (निजाम) उत्तरसरकारच्या ताब्यातील मुलुख फ्रेंचांना दिला व नंतर फ्रेंचांकडून हा प्रांत इंग्लिशांच्या ताब्यात आला.

या जिल्ह्यात प्राचीन अवशेष जे सापडले आहेत ते पुढील प्रमाणें.—

मूळ रहिवाशांच्या गुहाः—या गुहा पलनद तालुक्यात करमपुदिपासून थोड्या मैलावर गुत्तिकोंडा व सनगलु येथें आहेत. यांपैकीं गुत्तिकोंडा येथील गुहा गावापासून दोन मैलावर असून तीमध्यें एक २८ हात रुंदीचें टांकें आहे. यांच्या पलीकडे खडकामध्यें कठड्यासारखी वाट कोरलेली आढळते व येथून काशी व रामेश्वराकडे वाटा जातात अशी दंतकथा आहे. येनडी व येरकल लोकांचे पूर्वज या गुहामध्यें रहात असावे. यामध्यें काहीं साधु रहात होते असेंहि सांगतात. हे बौद्ध भिक्षु असावे. या गुहेचा मुचकुंद व कालयवन यांच्या दंतकथेशीं संबंध जोडतात. सनगलु येथील गुहेमध्यें विहिरीप्रमाणें खोल वाटेंतून जावें लागतें. पलनदमध्यें आणखीहि गुहा आहेत त्या पाहण्यास कृष्णेंतून होडींत बसून जावें लागतें. गंटुर तालुक्यात मंगलगिरी व उन्दवल्ली येथें अशाच नैसर्गिक गुहा असून त्या दोहींना जोडणारी एक चोरवाट भुयारातून गेली आहे असें सांगतात; हीं भुयारें तेथें दृष्टीस पडतात.

शक किंवा पुराणी यांच्या पूर्वी होऊन गेलेल्या तक्षक अथवा दस्यु लोकांनीं कोरलेले नाग वगैरेः—हे अतिशय जुने असून पुष्कळ देवळांतून झाडांसभोंवतीं दिसून येतात. यावरून पूर्वी झाडें व नाग यांची पूजा करीत होते असें सिद्ध होतें. या नागांचें शिल्पकाम फारच ओबडधोबड व जुनें दिसतें. नागाच्या आकृती निरनिराळ्या व विचित्र आढळून येतात. या प्रदेशांतील शिल्पकलेचें हें सर्वांत जुनें स्मारक दिसतें.

शक कालातील शिल्पावशेषः—पलनद वगैरे आसपासच्या तालुक्यांमधून वीरकल, चतुनें व शिलावर्तुळें इत्यादि स्मारकें आढळतात. निलगिरी पर्वत व कोइंबतुर जिल्ह्यामधील वरवंड्यांप्रमाणेंच यापुढिच्या आसमंतात काहीं वरवंड्या आढळतात. प्रत्येक वरवंडीखालीं एक चौकोनी तळघर असून त्यावर एक सपाट पाथर ठेवलेली आढळते. तळघरात काहीं भांडीं वगैरे ठेवलेलीं आढळतात. हें तळघर जमीनींत असून फक्त वरचा पाथर तेवढा दृष्टीस पडतो. हा पाथर दूर करून नंतर ४।५ हात वाळू अथवा दगड खणून काढावे लागतात. नंतर तळघर जर मोठें असेल तर २।४ दालनें लागतात. व प्रत्येक

दालनामध्यें मनुष्याचीं जळकीं हाडें, त्याशेजारीं भस्मपात्र व निरनिराळ्या आकाराचीं मृत्पात्रें ठेवलेलीं आढळतात. यापैकीं कांहीं मडकीं फार प्राचीनकाळीं प्रचारात असलेलीं, कांहीं लाल भाजलेलीं, कांहीं काळीं व कांहीं अर्धवट काळीं, कांहीं अर्धवट तावडीं व कांहींवर हातानीं जिल्हई केलेलीं अशीं आढळतात. एका गुहेमध्यें एक हस्तिदंती अथवा दुसऱ्या कसल्या तरी हाडाचें कंकण सापडलें होतें. परंतु हत्यारें मात्र कोठें आढळलीं नाहींत. कोईमतुर जिल्ह्यातील थडग्यामध्यें लोखंडी हत्यारें आढळतात हाडाच्या आकारावरून हीं प्रेतें हल्लीं रहाणाऱ्या लोकांच्याच पूर्वजांचीं असावीं असें वाटतें. परंतु येथील लोक सांगतात कीं पूर्वी येथें टेंगू लोकांची एक जात रहात असून त्यांनीं एक अग्निप्रलय होणार असें भविष्य ऐकून दगडाचीं तळघरें करून आपणास पुरून घेतलें. परंतु अग्निप्रलयामध्ये ते सर्व जळून जाऊन तसेच पुरले गेले. कांहीं दिवसापूर्वी एकास तेथें एक काचेचें चाक सापडलें होतें. हें बहुतेक बौद्ध अवशेष असावें. वरील थडगीं हें शक व तुराणी लोकांचें अवशेष असावे. यांचीं हीं प्रेतें प्रथम जाळून नंतर पुरलीं असावीं असें या अस्थींवरून दिसतें. याच्या नंतरच्या काळातील कोणत्याहि जातीमध्यें, निदान हिंदुस्थानातील या भागात तरी, प्रेतें जाळून नंतर पुरण्याची चाल नव्हती. कृष्णा नदीच्या काठीं अमरावतीच्या पश्चिमेस एका टेंकडीवर पुष्कळशीं शिला वर्तुळें आहेत.

त्याच्याच नैर्ऋत्येस ४१५ मैलावर आणखी पुष्कळशीं शिलावर्तुळें आढळतात या वर्तुळाचा व्यास २४ते ३२ फूट असून याच्या खालीं अस्थिपात्रें, दग्धअस्थी व इतर वस्तू आढळतात. त्यावरून हीं स्मशानें असावीं हें सिद्ध होतें. नंदिग्राम तालुक्यामध्यें कृष्णेच्या डाव्या तिरावर सर्व बाजूंना हीं थडगीं दिसतात.

बौद्ध अवशेष.— कृष्णा जिल्ह्यात बेझवाडा गावापासून २० मैलावर सत्तनपल्ले तालुक्यात कृष्णाकाठीं अमरावती येथें कांहीं संगमरवरी दगडाचीं शिल्पकामें आहेत. याचा शोध प्रथम १७९७ मध्यें कं. मॅकेंझी यानें लावला. यापूर्वी चिंतपल्लीचा राजा वसरेड्डी यानें जवळचीं कांहीं टेंकाडें खोदलीं. त्यापैकीं एकात 'दीपावलि दिन' या नावाचा बौद्धाच्या वेळचा एक दीपस्तंभ सापडला. ( या गावाच्या आसपासचीं मातीचा टेंकाडें खणलीं असता बौद्धकालीन अवशेष अद्यापीहि सापडतात ). त्यात या राजास एक दगडाचा करंडा व त्यात एक मोती, एक सुवर्णपत्र व दुसऱ्या कांहीं किरकोळ जिनसा सापडल्या. तसेंच या स्तूपाभोंवतीं संगमरवरी दगडी कठडा होता त्याचे भाग कांहीं लंडनच्या ब्रि म्यूझियममध्यें व कांहीं मद्रास व कलकत्ता येथील अजबखान्यात ठेविले आहेत. या ठिकाणीं जे शिलालेख सापडतात त्यांची भाषा व लिपी गुप्ताच्या वेळची आहे. कर्नल मॅकेंझी यास तेथें कांहीं रोमन व कांहीं बॅक्ट्रिअन कडफिसेस याच्या वेळचीं नाणीं सापडलीं असून त्यावरून हें शहर खिस्ती शकारंभाच्या वेळीं फार महत्त्वाचें होतें असें दिसतें येथें सोन्याचीं, व शिशाचींहि नाणीं पुष्कळ सापडतात. या जिल्ह्यात याशिवाय पुढील ठिकाणीं नाणीं सापडतात.

( १ ) नजिविद जमीनदारीमध्यें कोकॅनलनवळ सालिनल दिन्ने.

( २ ) त्याच जमीनदारींत मरिवाडाजवळ दलमर्ते शेतातील टेंकडीमध्यें

( ३ ) नंदिग्राम तालुक्यात पतुर्गचीप्रोल गावाजवळ पदि जमीनींत

( ४ ) पोंडूक मिठाच्या भागात सयतपथ व लवलपडी येथील वारींत

( ५ ) गुळिवाडा येथें

याप्रमाणें कृष्णा नदीच्या डाव्या तीरावर उदवल्ली येथ कांहीं बौद्ध लेणीं आहेत बेझवाडा येथील लेणीं खोदून केलेलीं आहेत. तेथील एका दगडी देवळात गणपतीची मूर्ति दिसते. त्यावरून यानंतर ब्राह्मणांचें वर्चस्व येथें स्थापित झालें असावें असें दिसतें. यानंतर कांहीं गुहा लागतात. पुढें एक मंडप आहे. याला लागून कांहीं दालनें असून याच्यावर एक गुहा व टेंकडीच्या मध्यावर आणखी एक गुहा आहे. गावातील मल्लेश्वरस्वामीच्या मंदिरामध्यें व वाचनालयात कांहीं बौद्ध मूर्ती वगैरे आढळतात. गुडीवाडा येथें याप्रमाणेंच एक भव्य मूर्ति आहे.

गुडीवाडा येथें अमरावतीप्रमाणेंच नायकिणीचा बुरूज म्हणून एक टेंकडी आहे. याप्रमाणेंच घंटसिलपलम आणि कांतिप्रोल येथेंहि टेंकड्या आहेत. बुधवनी येथें कांहीं तांब्याच्या बुद्धमूर्ती सापडल्या. त्याच्या सिंहासनावर लेख आहेत. तेनाली तालुक्यात चंडवेलू येथें एक देवालय व बौद्धकालीन अवशेषाच्या टेंकड्या आहेत. जगय्यपेट येथेंहि एक बौद्ध स्तूप आहे. चंडवेलू येथें कांहीं सोन्याचीं नाणीं सापडलीं असून शिवाय १८७४ मध्यें कांहीं सोन्याच्या ओतीव विटाहि सापडल्या. भट्टीप्रोलु येथेंहि एक प्राचीन स्तूप होता; त्यात गौतमबुद्धाचें एक हाड एका स्फटिकाच्या करंड्यात ठेवलेलें आढळलें. उंदवल्ली येथील टेंकडीच्या पायथ्याशीं व वर बऱ्याच गुहा आहेत. येथें एक मंडप व एक चार मजली मंदिर आहे. यातील तळमजल्यावर एक भुयार आहे. येथून मंगलगिरी येथें चोरवाट गेली आहे असें सांगतात. या देवळास पुढें ब्राह्मणी स्वरूप दिल्याचें दिसतें. तिसऱ्या मजल्यावर रामायणातील कथांचीं चित्रें खोदलीं आहेत आत नरसिंहस्वामीची शेषावर निद्रिस्थ मूर्ति आहे. दुसरी बुद्धाची शिष्यासह बसलेली एक मूर्ति आहे. परंतु हल्लीं ही विष्णूचीच आहे असें सांगतात. येथें एक तेलगू अस्पष्ट शिलालेख आहे. हा दैत्याचा मुलूख असून करेमपुदि हें नाव खर नावाच्या राक्षसावरून व दुर्गी हें नाव दूषण या नावाच्या राक्षसावरून पडलें आहे असें सांगतात. दचपल्ली

येथें व श्रीशैलमंदिरच्या वाटेवर दोन लेणीं असून इति-पोतुला, जतेपल्लम् व इललेश्वरम् येथेंहि लेणीं आहेत असें सांगतात.

बौद्ध व ब्राह्मण यामधील क्रांतिकालातील अवशेषः— या कालात पूर्वीच्या बौद्ध लेण्यातून ब्राह्मणानीं केलेलीं ब्राह्मणी शिल्पकामें आढळून येतात. अशा प्रकारचा एक मंडप निंगुकोंडा येथें आहे पलनद तालुक्यातील 'पिड्गुरल्ल' व 'गुर्जेल' येथील व बपतल तालुक्यातील परचुर येथील देवालयेंहि अशींच आहेत. पिड्गुरल्लानजीक काहीं उंचवटे (बुरूज) आहेत ते पूर्वीच्या किल्ल्याचे अवशेष असावेत असें म्हणतात. हे बुरूज अमरावती येथील बुरुजांप्रमाणेंच दिसतात.

ब्राह्मणी देवालयें व त्याच्यावरील इ. स. ३०० ते ८०० च्या दरम्यानचे शिलालेखः—यापैकीं विष्णूचीं देवालयें मंगलगिरि, अकिरिपल्लि, श्रीककोलम्, वेदाद्रि व गोलपल्लि, हीं आहेत. यातील अकिरिपल्लि येथील देवालयाजवळ काहीं कोरलेल्या गुहा आहेत.

त्याप्रमाणेंच मुख्य शिवालयें कोटप्पा, कोंडा, बेझवाडा, कलपल्लि, शिवगंगा, मोपेदेवि, चेबरेला आणि मचेरला हीं आहेत. या देवालयावर शिलालेख असून ते इ. स. ३०० ते ८०० च्या दरम्यानचे आहेत असें म्हणतात.

मंगलगिरि येथील विष्णुमंदिरामध्यें नरसिंहस्वामीची मूर्ति आहे. येथें फाल्गुनात उत्सव होतो. हें मंदिर पूर्वीच्या बौद्ध लेण्यात आहे. टेंकडीच्या पायथ्याशीं एक काळ्या पाषाणाचा स्तंभ आहे. या मंदिराच्या भुयारातून एक चोरवाट उंदवल्लि येथें गेली आहे असें म्हणतात.

पलनद तालुक्यांतील मचेरला येथें एक जुनें दगडी देवालय असून त्यासभोंवतीच्या भिंतीवर महाभारत व भागवत यातील काहीं कथातील चित्रें खोदलीं आहेत.

शंकरपुरम्, गमलपद व दशपल्लि येथील देवालयावरहि कोरींव काम आहे. कांहीं दगडी शिवालयें आहेत.

गुर्जेल येथें एक मंडप व नलगम राजा नरसिंहराय (वेलम्) यानें बांधलेलें एक मंदिर आहे. त्याचे दगड जुन्या बौद्ध इमारतींचे असावेत असें वाटतें.

किल्लेः—कोंडविड ही गंगतूरच्या पश्चिमेस १५०० फूट उंचीची १२ मैलाची एक टेंकड्यांची रांग आहे. हीवर तीन किल्ले आहेत त्यांचीं नांवें.

पुत्तकोटः—हा उडिया राजानीं बांधला असावा. येथें पडकीं देवळें, मंडप वगैरे आहेत.

दुर्गम्ः—हा टेंकडीच्या माथ्यावर आहे. याला वट्टेल-दिड्डी नांवाची वेस असून तीवर चार मजली गोपूर होतें. हल्लीं त्याचे दोन मजले पडून गेले आहेत. दुसरी वेस पेठ दरवाजा म्हणून आहे. येथें खजिना, दारुगोळा व धान्य यांच्या कोठा-रांचे अवशेष आहेत. काहीं मोडकीं देवालयें असून कांहींच्या मशिदी झालेल्या दिसतात. येथें प्रथम रेड्डी राजे रहात असून यांचा एक निरियल तख्त नावाचा मंडप आहे. शेवटचा रेड्डी राजा निपुत्रिक मेल्यावर विजयानगरचा राजा कृष्णदेव रायलु यानें त्याच्या ७२ व्या सरदारास एका पुजाऱ्याकडून देवाच्या दर्शनाच्या निमित्तानें आणवून कपटानें मारून हा किल्ला बळकाविला असें सांगतात.

कोटः—याला कोलेपेल्ली व नदेल्ली अशा दोन वेशी आहेत. याचा तट अद्याप धड आहे. येथें एक गोपिनाथ स्वामीचें देवालय आहे. येथील स्तंभ प्रेक्षणीय आहेत. या कोंडाविड टेंकडीवरील किल्ल्याच्या दंतकथा तेलगू भाषेत लिहिलेल्या आहेत.

कोंडपल्लिः—हा फार प्राचीन डोंगरी किल्ला असून तो पूर्वी निझामाच्या ताब्यात होता. हा बेझवाड्याच्या पश्चिमेस १० मैलावर आहे. याला तट व तीन वेशी आणि काहीं बराकी आहेत. मुख्य वेशीस दरगा दरवाजा म्हणतात. तेथें 'तानिष महाल' नावाची मुसुलमानी पद्धतीची इमारत आहे. शिवाय इतर काहीं पडक्या इमारती व तोफे, हमामखाने वगैरे आहेत.

कृष्णा जिल्ह्यात एकंदर तेरा तालुके आहेत.ते म्हणजे बंदर, बेझवाडा, भीमवरम्, एलोर, दिवि, गुडिवाड, कैकलूर, नंदि-ग्राम, नरसापूर, गुन्नविद, टनुकु, तिरुवर, यर्नगुदेम हे होत. इ. स. १९०३ सालीं नवीनच गुंटूर जिल्हा करण्यात येऊन, त्यात कृष्णा जिल्ह्यातील काहीं तालुके समाविष्ट केले व गोदावरी जिल्ह्यातील काहीं तालुके कृष्णा जिल्ह्यात अंतर्भूत करण्यात आले. या जिल्ह्यात एकंदर १७०२ खेडीं असून १२ शहरें आहेत. १९२१ सालीं हा जिल्ह्याची लोकसंख्या २१,२३,३१४ होती. या जिल्ह्यात एकंदर १८,४३,३४० एकर जमीन इनामी असून एकंदर जमीनमहसूल ८० लाख पर्यंतचा आहे. या जिल्ह्यात मुख्यतः तेलगू भाषा प्रचारात आहे. येथील शासनपद्धति इतर जिल्ह्याप्रमाणेंच आहे.

मुसुलमानाच्या अमदानींत हिंदू अधिकाऱ्याकडून जमीन महसूल जमविला जात असे पण पुढें मुसुलमानाची सत्ता ज्यावेळीं शिथिल झाली त्यावेळीं हे हिंदू अधिकारी स्वतंत्र जमीनदार बनले व त्यानीं मुसुलमान राजाना एकदम काहीं-तरी ठरीव रकम द्यावयाची व नंतर आपल्या ताब्यातील रयतेकडून आपल्याला रुचेल त्याप्रमाणें सारा वसूल करून घ्यावयाची पद्धत पाडली. ज्यावेळीं कंपनीची सत्ता या जिल्ह्या वर प्रस्थापित झाली त्यावेळीं कंपनीच्या अधिकाऱ्यानीं हे जमीनदार मुसुलमानाचे मांडलिक सरदार असावेत असें वाटून त्यानीं जमीनदाराच्या अधिकारांत ढवळाढवळ केली नाहीं. त्यामुळें जमीनदाराचें आयतेच फावलें व अशा रीतीनें जुलूम व अव्यवस्था माजली.

पुढें १८०२ मध्यें ज्यावेळीं या जिल्ह्यात कायम धारा-पद्धति सुरू झाली त्यावेळीं जमीनदाराच्या उत्पन्नाच्या एक तृतीयांश सारा जमीनदारानीं सरकारला द्यावा असें ठरलें. पण यामुळें प्रत्यक्ष रयतेवर साऱ्याचें ओझें वाढत चाललें. अखेरीस १८६४–१८७४ याच्या दरम्यान सर्व जमीनीची

मोजणी करण्यात येऊन, रयतवारी पद्धत सर्वत्र चालू करण्यात आली. कोरड्या जमीनीवर एकरापाठीमागें दोन रुपये व पाण्याखालील जमीनीवर एकरीं पांच रुपये सारा बसविण्यात आला. जिल्ह्याच्या उत्तरभागात साऱ्याचें प्रमाण अनुक्रमें १ रु. ४ आ. व ४ रुपये प्रत्येक एकरी ठरविण्यात आलें.

मच्छलीपट्टण व बेझवाडा वगैरे ठिकाणीं म्युनिसिपालिट्या असून कांहीं ठिकाणीं जिल्हाबोर्डाकडून व तालुकाबोर्डाकडून सारा वसूल करण्यात येतो.

या जिल्ह्याचें मुख्य पीक म्हणजे तांदुळाचें होय. तांदुळाचे पांढरे व काळे असे दोन प्रकार आहेत. कोरड्या जमीनीतील चोलम् व कम्बू हीं दोन मुख्य पिकें होत. याशिवाय कापूस, नीळ व तंबाखू यांचें उत्पन्न आहे. या जिल्ह्यात कुरण मुबलक असल्याकारणानें गुराची जोपासना उत्तमरीतीनें होण्याला येथें पुष्कळ वाव आहे. शेळ्या व मेंढ्याचीहि निपज येथें विपुल होते.

या जिल्ह्यातील बहुतेक बागाईत बेझवाडा येथील कृष्णा नदीच्या कालव्यानी पिकत. तलाव व विहिरी यांच्या द्वारें फारच थोड्या जमीनीला पाणी दिलें जातें.

खनिजसंपत्ति.—इमारतीला लागणारे दगड वजा केल्यास या जिल्ह्यात इतर प्रकारची खनिजसंपत्ति फारच थोडी आहे. लोखंड व तांबें फारच थोड्या प्रमाणात सापडतें. १६–१७ व्या शतकात गोवळकोंड्याचे सुलतान कृष्णा जिल्ह्यावर राज्य करीत असता गोलम्पल्ली व मल्वल्ली येथें खनिजसंपत्ति शोधून काढण्याचे प्रयत्न मोठ्या प्रमाणात सुरू करण्यात आले होते. कोल्लर येथे व पर्तियाला येथेंहि हे प्रयत्न चालले होते. १७ व्या शतकात कोल्लर येथें खणण्याचें काम चाललें असता फ्रेंच प्रवासी व जवाहिऱ्या टॅव्हर्नियर हा येथें आला होता. त्यानें लिहिलेल्या हकीकतीवरून या कोल्लर येथील खाणींत ६०,००० मामसें राबत होतीं असें समजून येतें. याच खाणींत ९०० कॅरेटचा एक हिरा सापडला होता व तो औरंगझेबाकडे पाठविण्यात आला. याच हिऱ्याला कोणी ' कोहिनूर हिरा ' असें म्हणतात.

पलनद तालुक्यात करेमपुडीजवळ शिशाच्या खाणी आहेत. परंतु हल्लीं त्या चालू नाहींत पलनद आणि विनूकोंडा या दोन्ही तालुक्यामध्यें तांबें सापडतें.

व्यापार व दळणवळण—कृष्णा जिल्हा मुख्यतः कृषिप्रधान आहे. सर्व जिल्हाभर, मेंढ्याच्या लोंकरीपासून जाड भरडें कापड विणण्यात येतें. मच्छलीपट्टण येथें पूर्वी उत्तम गालीचे तयार होत असत व ते इंग्लंडात जात असत. पण हल्लीं तो धंदा बसला आहे. येथें एक लहानसा चामडीं रंगविण्याचा कारखाना आहे व यातून दरवर्षी ५०,००० रुपयाचा माल परदेशी जातो. जगय्यपेट येथील रेशमाचा धंदा पूर्वी भरभराटींत होता पण हल्लीं त्यालाहि निकृष्टावस्था प्राप्त झाली आहे. या जिल्ह्यातून बायकाच्या पातळाच्या उपयोगी असें हलक्या जातीचें कापड बाहेरगावीं बरेंच पाठविण्यात येतें. कोंडापल्ली येथें एका हलक्या लाकडापासून खेळणीं तयार होतात. कोंडाविड येथें पूर्वी कागद केला जात असे पण तोहि धंदा हल्लीं सपशेल बुडाला आहे.

कृष्णा जिल्ह्यात मच्छलीपट्टण व निजामपट्टण हीं दोनच बंदरें आहेत. त्यापैकीं दुसरें बंदर हल्लीं निरुपयोगीच झालें आहे. १८६४ च्या महापुरामुळें मच्छलीपट्टण बंदराची बरीच नासाडी झाली. त्यामुळें त्या बंदरातील व्यापारासहि बराच धक्का बसला. बेझवाडा येथें वातड्याचा मोठा व्यापार चालतो. याशिवाय कृष्णा जिल्ह्यातून एरंडिच्या बिया, मिरच्या, तंबाखू हे जिन्नस बाहेरगावी जातात. कोमटी हीच जात या सर्व वस्तूंचा व्यापार करते. लब्बे जात मात्र चामड्याचा व्यापार करते.

[ संदर्भग्रंथ.—इंपीरियल ग्याझे; एडिंबरो रिव्ह्यु आक्टोबर १८६९; जेम्स फर्ग्युसन–टी अँड सर्पंट वर्शिप, मद्रास ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्ट १९२१–२२ ].

**कृष्णाजी कंक**—शिवाजीमहाराजाचा बालमित्र येसाजी कंक याचा हा मुलगा. हा मोठा शूर होता. येसाजी सरनोबत होता, व कृष्णाजी हा ( संभाजी राजाच्या वेळीं ) पदाती नाईक होता. या दोघांनीं १६८३ मध्यें फोंड्याच्या स्वारींत मोठा पराक्रम करून फिरंग्याचा पराभव केला. खुद्द संभाजी राजे म्हणतात " फिरंगी यासी गांठी पडिली तेव्हा बहुत वस्त केली आणि गनीम मारून काढिला ते घसीं दोघाना ( बाप व लेक ) हि जखमा लागोन चकचूर जाले. कठीण जखमा राजश्री स्वामींनीं ( स्वतः ) दृष्टीनें पाहिल्या आणि घरासी जावया आज्ञा दिली. त्यावरी कृष्णाजी कंक याच्या जखमा फुटोन घरीं मयत झाला...त्यावरून स्वामी कृपाळु होऊन, हे ( बाप लेक ) कामाचे मर्दाने, स्वामी कार्यावरी तत्पर...स्वामी कार्यावरीं मयत जाला... म्हणून पारितोषकाची मोईन ( नेमणूक )...खासा येसाजी ( यास ) १ हजार होन व कृष्णाजी ( मयत, त्यास ) १ हजार होन...नियत केली असे. " या प्रमाणें छत्रपतींनीं ( इ. स. १६८५ ) कृष्णाजीचा व त्याच्या बापाचा बक्षिसें देऊन सन्मान केला. [ राज. खं. १५. ३३६; चतु. सं. वृ. १९८ ]

**कृष्णाजी त्रिमल**—हे मोरोपंत पिंगळे पेशवे यांचे मेव्हणे हे मथुरेस रहात असत. शिवाजी महाराज आग्र्याहून निसटले ते मार्गात मथुरेस आले. तेथें हे कृष्णाजी, काशी व विसाजी असे तीन बंधू होते. त्यांच्याकडे संभाजीराजांस ठेऊन महाराज पुढें गेले. एकदा मोंगलाचें धरणें आलें असता या कृष्णाजीनें संभाजीस आपल्या पानात जेवावयास घेऊन एकत्र भोजन (दूध पोहे) केलें व संभाजी आपला भाचा असें सांगून त्याचा बचाव केला. पुढें कांहीं महिन्यांनीं हे त्रिवर्ग बंधू आपल्या आईसह संभाजीस घेऊन रायगडास आले त्यावेळीं महाराजानीं त्याना नावाजून व कृष्णाजीस

सराव " हा किताब देऊन, काशीपंतास व मानोधीस प्रत्येकी २५।२५ हजार रु. बक्षिस दिलें (इ. स. १६७१ ) [ रा. खं. ८. म. रि. ].

**कृष्णाजी नाईक जोशी**—( चासकर घराणें ) हा शिवकालीन मुत्सद्दी पन्हाळ्यास सुरनीस होता. त्यास महाराजांनीं तंजावरास व्यंकोजी राजाकडे जें शिष्टमंडळ पाठविलें त्यांत धाडलें होतें. यास पुढें शाहुमहाराजांनीं सर्व राज्याची पोतदारी दिली. पूर्वीचे पोतदार श्रीगोंदेकर पुंडे हे ताराबाईच्या पक्षास चिकटून राहिल्यामुळें व कृष्णाजीनें "मोंगलाईतून येतेसमयीं स्वामींच्या व राजाच्या कल्याणाविषयीं बहुत श्रम साहस केल्यावरून...पोतदारीचा धंदा हुजुराचा व सरकारकून व सरदार यांजकडील वंश परंपरेनें " इनाम दिला. याचा पुत्र महादाजी. हा चासकर घराण्याचा मूळपुरुष. महादाजी याचा गोविंदा म्हणून एक भाऊ होता. या दोघांनींहि बापाप्रमाणेंच शिवाजी–संभाजी–राजाराम यांच्या वेळीं स्वराज्याची सेवा उत्कृष्ट केली. " महादाजी कृष्ण हे संभाजी व धनाजीसमवेत फौजा घेऊन गेले " त्यामुळें राजाराम यांनीं त्यांना सबंध गाव इनाम दिला. त्यानंतर थेट्या शिवाजीच्या वेळींहि यांनीं व यांचा मुलगा बाळाजी महादेव यानें ( भाऊ, रामचंद्र व कृष्ण यांसह ) सरकार सेवा केलेली आहे असें खुद्द करवीरकर संभाजी महाराजांनीं म्हटलें आहे. महादाजींनीं रागणा येथें बाळाजी विश्वनाथास मदत केली. तसेंच कान्होजी आंग्रे व बाळाजीपंत यांचा स्नेहहि त्यांनींच जमविला. महादाजीपंताची मुलगी ही थोरल्या बाजीरावसाहेबास दिली होती त्याचें नाव काशीबाई. महादाजी हे सावकार असल्यानें बाळाजीपंतांना त्यांचा बराच उपयोग झाला होता. [ भा. व; रा. खं. २०; म. रि. ] सातार्‍यास व्यंकटपुर्‍यात असलेलें कृष्णेश्वराचें देऊळ या महादाजी कृष्णरावांनींच बांधल्याचा उल्लेख करणारा शिलालेख ( शके १६४५ चा ) तेथें आहे. या देवळाच्या पुढील हल्लीचा व्यंकटपुरा त्यावेळीं नसून तेथें महादाजीपंतानें सदाशिवपुरी नावाची पेठ वसविली होती. महादाजीकडे लोहगडचा कारभार होता कृष्णराव महादेवास पेशव्यांनीं चास येथें सरंजाम दिल्यामुळें या घराण्यास चासकर म्हणूं लागले महादाजीचा पुत्र कृष्णराव हा सन १७३२ मध्यें फिरंग्याच्या स्वारीवर गेला होता. तत्पूर्वी त्याला पेशव्यांनीं कल्याणची सुभेदारी दिली होती. त्यावेळीं ( स. १७२० ) त्यानें भिवंडीच्या खाडीपलीकडील कावें हें फिरंग्यांचें ठाणें काबीज केलें होतें.

**कृष्णाजी भास्कर**—हे बाईंच्या कुळकर्ण्यांपैकीं एक. शिवाजीमहाराजांच्या नौकरींत होता. महाराजांनीं १६५७ त थेट अहमदनगरपर्यंत चाल करून मोंगलांचा पराभव केला. व विजापुरकरास सहाय्य केलें. त्यानंतर उभयतांत तह झाला. त्यावेळीं ( १६५८ ) औरंगझेबाकडे महाराजांनीं जो वकील पाठविला तो हाच कृष्णाजीपंत. पुढें कदाचित् यांनीं महाराजांची नौकरी सोडली असावी. कारण अफजल प्रकरणांत यालाच खानानें आपला वकील म्हणून शिष्टाई करण्यास महाराजांकडे पाठविलें होतें. खान हा वाईचा सुभा ( सात आठ वर्षे ) असल्यानें, या दोघांची दाट ओळख होती. महाराजांकडे पंत पूर्वी नौकर असल्यानें व त्यांनीं त्याला गौरवल्यामुळें त्यानें खानाचा खरा हेतु त्यांना कळविला. पुढें खानाचा वध झाला. यानंतर कृष्णाजीपंत हे महाराजांचे पदरीं राहिले असावेत. कारण औरंगझेब गादीवर बसला असतां महाराजांनीं त्यावेळीं ( १६५९ ) जो वकील दिल्लीस पाठविला तो हाच कृष्णाजीपंत होता राजाराम महाराजांच्या वेळीं हा जिवंत असावेसें दिसतें. रामचंद्रपंत अमात्य यांनीं सावंतावर ज्या सरदारास पाठविलें त्याचें नाव कृष्णाजी भास्कर असेंच आहे. सारांश हे शूर, मुत्सद्दी व शिवशाहीचे पहिले मदतगार होते [ रा. स. ८. म. रि; जेधे. सभासद ]

**कृष्णाजी विनायक सोहोनी**—हे प्रसिद्ध " पेशव्यांच्या बखरी " चे लेखक होत. हे रत्नागिरी जिल्ह्यातील सोमेश्वरचे रहिवासी होत. तेथून ते पुण्यास पेशवाईच्या अखेरीस आले व आपल्या कर्तबगारीनें सुभेदारीपर्यंत चढले. पुढें पेशवाई गेल्यानंतर यांचें सर्व वैभव नष्ट झालें. व त्यांनीं सर्व संसारकार्य सोडून नदीतीरावरील वैजनाथाच्या शिवालयात पुढील आयुष्य तपस्येप्रमाणें घालविलें त्यावेळीं त्यांनीं तोंडानें सांगावें व लेखकानें लिहून घ्यावें याप्रमाणें सदर बखर रचिली गेली. रावबाजींचे कारभारी चिंतोपंत देशमुख पावसकर यांचे कृष्णाजीपंत हे आप्त असल्यामुळें देशमुखाची त्यांच्यावर कृपा होती. याशिवाय याची जास्त माहिती आढळत नाहीं. बखरींत थोरले बाळाजीपंत नाना हे श्रीवर्धनहून निघाल्यापासून तों शनिवारवाड्यावर इंग्रजांचा बावटा चढेपर्यंतची सारी हकीकत आली आहे. बरीचशी माहिती ऐकीव व स्मरणीय आहे. पंतांचा काल वरील शिवालयांत इ. स. १८५४-५५ त झाला. त्यावेळीं त्यांचें वय ७० च्या सुमारास होतें. यावरून त्यांचा जन्म श्री. सवाई माधवरावसाहेब यांच्या कारकीर्दीत झाला असावा. [ साने-पेश. बख. प्रस्ता. ].

**कृष्णा नदी**—दक्षिण हिंदुस्थानांतील ही एक मोठी नदी असून, गोदावरी व कावेरी या नद्यांप्रमाणेंच दक्षिण हिंदुस्थानच्या सर्व प्रदेशांमधून पश्चिमेकडून पूर्वेकडे ती वहात गेली आहे कृष्णेपेक्षा गोदावरीची लांबी अधिक असली तरी, विस्ताराच्या मानानें कृष्णा ही गोदावरीपेक्षां मोठी आहे. कृष्णाघडीचें क्षेत्रफळ एकंदर ९७००० चौरस मैल असून नदीची लांबी ८०० मैल आहे.

सह्याद्रि पर्वतांत पश्चिम घाटामध्यें महाबळेश्वराजवळ हिचा उगम होतो. सातार्‍यानजीक माहुली येथें हीच वेण्णा नदी मिळते. तेथून ती दक्षिणेकडे वहात जाऊन कर्‍हाड येथें येते. या ठिकाणीं तिला उजवीकडून कोयना येऊन मिळते नंतर ती सांगलीजवळ वहात आल्यावर तिला

पश्चिमेकडून वारणा नदी मिळते. तेथून ती कुरुंदवाडपर्यंत वहात गेल्यावर त्या ठिकाणीं पंचगंगेचा तिच्याशीं संगम होतो. येथून ती पूर्ववाहिनी बेळगाव जिल्ह्यातून, दक्षिण मराठी संस्थानातून, व विजापूर जिल्ह्यातून, असा ५०० मैलाचा प्रवास करून निजामच्या राज्यात येते. विजापूर जिल्ह्यात तिचा संचार असतांना तिला घटप्रभा व मलप्रभा या नद्या भेट देतात. महाबळेश्वर, येथील उगमापासून माहुलीपर्यंतचें पात्र लहान आहे यामुळें तिच्यामधून नावा चालविल्या जात नाहींत.

निजामच्या राज्यात, रायचूर जिल्ह्याच्या एवाम्प्लेट गावाजवळ तिचा प्रथम प्रवेश होतो. दख्खनच्या डोंगर-सपाटीवरून सोलापूर आणि रायचूरच्या दुआबात ती ४०८ फूट उंचीवरून खालीं येते, व तिला जेव्हा पूर आलेला असतो तेव्हा एवढ्या उंचीवरून ग्रानाईट खड-काच्यामधून ‹ र्लीं जोरानें ती आदळत असता तुषा-राचा समूह वर उडत असतो व तो देखावा फार बहा-रीचा दिसतो. भीमा नदी ही अहमदनगर, पुणें, सोलापूर या प्रदेशातून वहात येऊन कृष्णेला मिळते तर तुंग-भद्रा ही म्हैसूरचा उत्तर भाग, बल्लारी व कूर्नल या प्रदे-शातून वहात येऊन, तिला मिळते. तुंगभद्रेचा संगम झाल्यावर ती ब्रिटिश मुलुखातून वहात असता, हैद्रा-बाद संस्थानचा पूर्व भाग व मद्रासचे कुर्नूल व गुंतूर जिल्हे यांच्यामधून ती वहात गेल्यामुळें ती या दोन्हीं प्रदे-शाची नैसर्गिक हद्द बनली आहे. या प्रदेशातील तिचें पात्र खोल आहे. तेथून ती ईशान्यगामी होऊन नल्लम-लई व इरल-टेकड्या यांच्यामधून वहात जात असता वझीराबाद येथें तिला मूसी नदी येऊन मिळते. हैद्रा-बाद संस्थानच्या मुलुखातून, व हैद्राबादच्या बाजूबाजूनें ती एकंदर ४०० मैल वहात जाते.

यानंतर आग्नेय दिशेला तिचा प्रवाह वळतो व गुंतूर व कृष्णा या जिल्ह्यामधून ती शंभर मैल वहात जाऊन बंगालच्या उपसागरात दोन मुखानीं जाऊन पडते. गुंतूर व कृष्णा जिल्ह्यातून ती वहात असता तिचे अनेक कालवे काढण्यात आले आहेत. बेझवाडा जिल्ह्यातून ती जम्बूर दगडाच्या लहान टेकड्यामधून वहात जात असता तिला एक प्रचंड धरण बांधण्यात येऊन तेथून अनेक कालवे काढलेले आहेत. कृष्णेचें पाणी या प्रदेशात जोरानें वहात असल्यानें तिच्यामधून नावा वल्हविणें अवघड होतें. तथापि वर्षातून सहा महिने या प्रदेशातील कुशल नावाडी नावा वल्हवीत असतातच. तिच्या अनेक कालव्यांच्या योगानें कृष्णा व गोदावरी हे जिल्हे जोडले गेले आहेत; व बकिंगहॅम कालव्यामुळें कृष्णा जिल्हा व दक्षिणे-कडील मुलूख व मद्रास हे परस्पराशीं जोडले गेले आहेत.

कृष्णा नदी ही हिंदुस्थानातील अनेक पवित्र नद्यात मोडते व हिच्या स्तुतिपर कृष्णाकांठच्या तीर्थांचें वर्णन करणारें कृष्णामाहात्म्यपुराण व कृष्णामाहात्म्यवर्णन काव्य वगैरे-सारखे स्तुतिपर ग्रंथ झाले आहेत. कन्ये राशीस गुरु आला असता कृष्णानदीस भागीरथी भेटावयास येते अशी समजूत असून त्या कालात भागीरथी तीरीं करावयाचे क्षौरश्राद्धादि धार्मिक विधी कृष्णेच्या कांठीं करण्याची वहिवाट आहे. हिचे महाभारतापासून उल्लेख आढळतात.

आंध्र व कुत्बशाही राज्याची ही दक्षिणसरहद्द होती ( गोदा-कृष्णा-दुआब ) इच्या कांठावरील कोप्पम गावीं सोमेश्वर चालुक्यानें राजाधिराज चोलाशीं लढाई करून त्याला ठार मारिलें. या गावीं चालुक्य व चोल यांच्यात बऱ्याच वेळा लढाया झाल्या आहेत. कृष्णा-कांठीं राक्षसतागडी ( रक्कसगी-तंगडगी ) येथें विजया-नगरकराचा पराभव झाला. मुजफ्फरजंगानें कृष्णा ते कन्या-कुमारीपर्यंतच्या देशाचा नबाब म्हणून डुप्लेला नेमिलें होतें. [ स्मिथ-ऑ. हि ; इं एंटि. इंडि. पु. १२ ; इं. गॅ.]

**कृष्णान्वक**—( १०४२९ ) त्रावणकोरमधील दक्षि-णेंतील इरानियल व कल्कुलम या दोन तालुक्यातच हे लोक आढळतात. कांहीं मक्कथायम वारसाहक्काचा कायदा पाळितात तर कांहीं मरुमक्कथायम कायद्याला धरून वागतात. पहिल्या वर्गाचे आचारविचार वेल्लाळ लोकासारखे आहेत व दुसऱ्याचे नायर लोकासारखे आहेत. यांच्या स्त्रीवर्गात पूर्वी गोंदण्याची चाल फार असे. हे मूळचे कांजीवरम् येथील रहिवासी. यांच्यात नियोगाची पद्धत आहे. मग दीर लहान असला तरी चालतो. [ थर्स्टन. से. रि. ( त्रावणकोर ) ].

**कैअर्नेस, जॉन एलियट**—( १८२३-१८७५ ) इंग्रज अर्थशास्त्रज्ञ. १८५० त तो एम्. ए. झाला. त्यानंतर काय-द्याची परीक्षा देऊन आयर्लंडात वकिली करूं लागला. आयर्-लंडातील सामाजिक व अर्थशास्त्रीय प्रश्नासंबंधानें चर्चात्मक लेख तो लिहूं लागला व अर्थशास्त्राचा अभ्यास त्यानें साग्रो-पांग व काळजीपूर्वक केला. डब्लिन येथें अर्थशास्त्राच्या अध्यापकाची जागा १८५६ मध्यें केअर्नेसला मिळाली. पहिल्या वर्षाचीं त्याचीं अर्थशास्त्रावरील व्याख्यानें प्रसिद्ध झालीं. त्यात जे. एस्. मिल्लची पद्धतीच विस्तारपूर्वक पुढें मांडलेली होती.

१८६२ त यानें 'दि स्लेव्ह पॉवर' (गुलामाची अर्थोत्पाद-नशक्ति) या विषयावर तात्त्विक विचारपरिप्लुत निबंध प्रसिद्ध केला. त्यात त्यानें गुलाम मजूर पद्धतींत किती तोटे आहेत तें विस्तारपूर्वक व मार्मिकपणानें पुढें मांडलें असून त्यानें काढलेलीं अनुमानें आता अर्थशास्त्रातील ठाम सिद्धांत होऊन बसलीं आहेत. शिवाय अमेरिकेंत हें गुलामपद्धतीप्रकरण युद्धावर जाणार, हें भविष्यहि त्यानें या निबंधांत वर्तविलें होतें.

इ. स. १८६६ मध्यें लंडन येथील युनिव्हर्सिटी कॉलेजांत त्याला प्रोफेसरची जागा मिळाली. पण १८७२ मध्यें प्रकृति फार ढासळल्यामुळें त्याला राजीनामा द्यावा लागला. 'स्लेव्ह

पावर ' 'पोलिटिकल एसेज' ' लीडिंग प्रिन्सिपल्स ऑफ पोलिटिकल एकॉनॉमी ' हीं त्यानें लिहिलेल पुस्तकें होत शेवटच्या ग्रंथ स्मिथ, माल्थस, रिकार्डो, मिल याच्या परपरेंतील विद्वानाला शोभण्यासारखाच होता. हा ग्रंथमपयी अर्थशास्त्राच्या मुख्य सिद्धांतांवरील टीकापर ग्रंथ असून त्यात केअर्नसनें मिलच्या बहुतेक सर्व प्रमुख सिद्धातासबधानें आपलें भिन्न मत स्पष्टपणें पुढें मांडलें आहे जे एस् मिलच्या ' अर्थशास्त्राची तत्वें ' या ग्रंथानतरें अर्थशास्त्रावरील महत्त्वाचे ग्रंथ म्हटले म्हणजे केअर्नसचेच असून त्यांत मुख्य मुद्दे पुढीलप्रमाणें आहेत (१)अर्थशास्त्राची व्याप्ति व अनुमानपद्धति यापैकीं व्याप्तीसबधी केअर्नस म्हणतो कीं, अर्थशास्त्र हें निव्वळ तात्विक शास्त्र असून प्रत्यक्ष सामाजिक स्थिति किंवा व्यवस्था याच्यामुळें या शास्त्रातील सिद्धांताना यत्किंचित्‌हि बाध येऊं शकत नाहीं समाजशास्त्राची किंवा गणितशास्त्राची अर्थशास्त्र ही शाखा नसून तें काहीं अशीं बौद्धिक व भौतिक असें मिश्र शास्त्र आहे या मुद्यासबधानें एवढें सांगितलें पाहिजे कीं, समाजव्यवस्थेच्या आर्थिक परिस्थितीवर होणाऱ्या परिणामाकडे केअर्नसनें दुर्लक्ष केलें, हा त्याच्या विचारसरणींतील मुख्य दोष होय (२) पदार्थ तयार करण्यास लागणारा खर्च व त्याची किंमत यासबधाने पदार्थांच्या उत्पादनखर्चामध्यें मजुरी व भांडवलवाल्याचा नफा या दोहोंचा समावेश मिल करीत असे. परतु हा दृष्टि भांडवलवाल्याची असून निर्मितींत केवळ मजूरीचा अन्तर्भाव होत नाहीं, असें केअर्नसचें म्हणणें आहे पदार्थ उत्पन्न करावयास लागणारे श्रम, मध्यंतरीची विश्रांति आणि अपघात या तिहींचा विचार किंमतीमध्यें येतो असें तो म्हणतो (३) स्वतंत्र चढाओढ व तिच्यावरील नैसर्गिक व सामाजिक निर्बंध, समाजाचे धंदेवारीनें होणारें वर्गीकरण व भांडवलाची अडचण यामुळें एक धदा सोडून दुसरा पत्करणें माणसाला कठिण जातें, व त्यामुळें स्वतंत्र चढाओढीचें तत्व पूर्णपण अमलात येऊं शकत नाहीं म्हणून मालाच्या किंमती अतरराष्ट्रीय व्यापाराच्या तत्वानुसार म्हणजे मागणी व पुरवठा या तत्वानुसार ठरतात केवळ उत्पादकाच्या दृष्टीनेंच केलेली ही केअर्नसचा मीमांसा मिलच्यापेक्षा अधिक व्यापक असली तरी एकागी पणाची आहे असं म्हणावें लागतें गिऱ्हाईकाच्या दृष्टीनें पाहता, स्वत स तो जिनस तयार करावा लागू नये म्हणून तो जास्तींत जास्त जें मोल द्यावयास तयार होतो त्यावरून पदार्थांची जास्तींत जास्त किंमत ठरत असते ही गोष्ट केअर्नसनें लक्षात घेतलेली नाहीं (४) मजुरीफडाचा सिद्धात मिलनें प्रथम प्रतिपादन करून पुढें सोडून दिला होता केअर्नसनें तो प्रश्न हातीं घेऊन त्यासंबधाचा बराचसा गैरसमज दूर करून त्याचें खरें स्वरूप लोकापुढें मांडलें शिवाय व्यापारीसघ व संरक्षणपद्धति, तसेंच आतरराष्ट्रीय व्यापार व पदार्थांच्या किंमती यासबधानें फार महत्वाचें व अगदीं नवीन स्वरूपाचें विवेचन त्यानें केलें आहे

**केइ द्वीपसमूह**—हा डच ईस्ट इंडीजचा अम्बोयना रेसिडेन्सींतील एक द्वीपसमूह आहे हीं बेटें दक्षिण अक्षाश ५° व ६°५' व पूर्वरेखाश १३१°५०' व १३३°१५' यामध्य आहेत मोठें केई, लहान केई, टायन्डा व कुरसमूह हा या द्वीपसमूहात आहेत मोठें केई हें बेट इतर बेटापेक्षा नैसर्गिकदृष्ट्या इतर बेटापासून अगदीं निराळें आहे. यात ज्वालामुखींची ओळ पसरली असून यातील सर्वांत उंच भाग २६०० फूट उंच आहे या बेटाच क्षेत्रफळ ३९० चौरस मैल असून सर्व द्वीपसमूहाचें क्षेत्रफळ ५७२ चौरस मैल आहे या बेटाची तृतीयावस्थाक नवपूर्वयुगातील घटना असून इतर बेटें त्यानतरचीं आहेत येथें नारळ साबूदाणा, मासे, ट्रेपाग इमारती लाकूड, खोबरें, मका व तबाखू हे जिनस उत्पन्न होतात येथील लोकसंख्या सुमार २३,००० आहे यापैकीं १४,९०० वन्य व ८३०० मुसुलमान आहेत येथें तीन प्रकारचे लोक राहतात ते केई, पॉपन व मलाया हे होत. केई द्वीपाचे लोक खोदीव कामात पटाईत असून यास उत्तमप्रकारचीं जहाजें बाधता येतात

**केओंझर संस्थान**—ओरिसामधील एक मांडलीक संस्थान ओरिसामध्यें जीं मोठीं संस्थानें आहेत त्यात या संस्थानचा नबर दुसरा आहे या संस्थानचें क्षेत्रफळ ३०९६ चौरस मैल आहे याच्या उत्तरेस सिंगभूम जिल्हा, पूर्वेस, बॅलॅसोर जिल्हा व मयूरभंज संस्थान, दक्षिणेस कटक जिल्हा व पश्चिमेस पाललहरासंस्थान आहे. केओंझर संस्थानचे, लोअर केओंझर व अपर केओंझर असे भाग पाडण्यात आले आहेत लोअर केओंझरमध्यें पुष्कळ दऱ्याव दऱ्या आहेत, व अपर केओंझरमध्य पर्वताच्या रागा आहेत अपर केओंझर प्रदेश शत्रूपासून बचाव करण्याच्या कामीं फार उपयुक्त आहे. या पर्वतावर पुष्कळ पठार असून तेथें बरीच सुपीक व पेराऊ जमीनहि आहे या पर्वतामध्येंच वैतरणी नदीचा उगम झाला आहे गंधमादन, ठाकुराणी, टोमाक, बोलट, हीं पर्वतशिखरें असून गधमादन शिखराची उंची ३४७९ फूट आहे.

प्राचीनकाळीं केओंझर संस्थानचा समावेश मयूरभंज संस्थानात झाला होता पण २०० वर्षांपूर्वी येथील डोंगराळ जातींनीं, मयूरभंज संस्थानचें वर्चस्व झुगारून दिलें व आपलें स्वतंत्र संस्थान स्थापन केलें या संस्थानावर आतापर्यंत ३६ संस्थानिकांनीं राज्य केलें आहे १८५७ च्या बडामध्यें या संस्थानच्या राजानें इग्रजाना मदत केली याकरिता त्याची खडणी कमी करण्यात येऊन त्याला महाराजा हा किताब देण्यात आला पुढं हा महाराजा वारल्यामुळें व याला औरस सतति नसल्यामुळें ब्रिटिश सरकारनें याचा दासीपुत्र यास राज्यावर बसविलें त्यामुळें चिडून जाऊन, भुइया व जुभाग या जातींनीं बड केलें पण ब्रिटिशानीं आपलें सैन्य संस्थानिकाच्या मदतीला पाठवून या बडाचा मोड केला १८९१ मध्यें या डोंगराळ जातींनीं

पुन्हा बंड केलें; पण पुन्हां ब्रिटिशाच्या मदतीनें या बंडाचें पारिपत्य करण्यात आलें. संस्थानचें सालिना ३ लाखाचें उत्पन्न असून ब्रिटिश सरकारला यातून १७१० रुपये खंडणी द्यावी लागते. या संस्थानची लोकसंख्या १९११ साली १,८२,०२० होती. या संस्थानात १९२७ खेडीं असून, त्यात आनंदपूर नावाचें एक महत्वाचें खेडें आहे. केओंझार नावाचें राजधानीचें एकच शहर आहे. एकंदर लोकसंख्ये-पैकीं हिंदू चैतन्यवादी, पान, खंडैत, गौर, होस, भुइया, कुर्मी गौड, खोंड, गौर, बाथुडी इत्यादि अनेक जातींचे लोक आहेत. राज्यकारभाराच्या सोईकरिता, आनंदपूर व चापेश्वर असे दोन भाग पाडण्यात आले आहेत संस्थानात ३ धर्मार्थ दवाखाने, २ माध्यमिक शिक्षणाच्या व ९१ प्राथमिक शिक्षणाच्या शाळा आहेत.

**केकती**-(घायपात) यास लॅटिन नांव व्हीग्व्हीपॅरा; मराठी केकती, केकताड, घारखंड, घायाळ, घायपत व गुजराथींत घापत, इत्यादि नांवें आहेत. अननस किंवा केवड्याच्या पानासारखीं या झाडाचीं पानें असतात. परंतु अननसच्या पानाहून तीं रुंद असून त्यांच्या कांठावर बारीक वाकडे व करवतासारखे समांतर कांटे असतात व पानाच्या शेवटीं अग्रावर एक माल्यासारखा आखूड कांटा असतो. हीं पानें आकारानें तरवारीसारखीं फार दळदार असून त्याचा रंग कांहीं जातींत पिंवळसर हिरवा व कांहीं जातींत हिरवागार असतो. ह्याच्या आखूड बुडख्यातून एकांत एक गुंतलेल्या पानांतून एक उंच दांडा वर निघतो व त्यास फुलें येतात. फुलांचा धार निघून गेल्यानंतर ज्या झाडापासून दांडा निघाला असेल तें मूळ झाड मरून जातें. पण त्याच्याच बुडख्यापासून कोंब फुटून नवीं झाडें उगवलेलीं असतात.

केकतीच्या अनेक जाती आहेत. त्या सर्वांचें जन्मस्थान अमेरिका खंड आहे. त्यांत मेक्सिको देशांत हीं झाडें विपुल सांपडतात. तथापि सध्या जगांतील बहुतेक उष्ण प्रदेशांत याचा प्रसार झालेला आहे. इ. सन १५६१ त घाय-पात अमेरिकेंतून यूरोपखंडांत येऊन, तेथून हिंदुस्थानांत पोर्तुगीज लोकांनीं प्रथम याची लागवड केली. मद्रास इलाख्यांत व हिंदुस्थानांतील इतर सर्व भागांत कुंपणाला घायपात लावतात. तसेंच केवळ तंतूच्या उत्पन्नाकरितां याची लागवड कांहीं ठिकाणीं हिंदुस्थानांत झाली आहे. ह्या झाडाच्या पानापासून व मुळ्यापासूनहि वाख निघतो. पानांत सरळ व उभे तंतू असतात. त्यांची वर्धी होतात व ती फार टिकाऊ निघतात.

सदरहू झाडाच्या पाती कापून त्या पाती लांकडी साचात टेवून लोखंडी पकडीनें ओढतात. त्यापासून फारच उत्तम असा दोरा निघतो, व तो विलायतेंत जाऊन त्याचें कापड बनतें. पूर्वी याचा उपयोग आपल्या देशांत होत नव्हता. परंतु मुंबई येथील प्रसिद्ध मेसर्स एन. फत्तेअली कंपनीनें याचा उपयोग करण्याची सुरवात केली. हल्लीं माग लोक या पाती कापून भिजवून त्यापासून ( वाख ) दोरा तयार करतात. परंतु जसा सांचाचा दोरा सफाईदार असतो तसा हा नसतो. शिवाय हल्लीं कांहीं मुंबईच्या कंपन्या याच्या दोऱ्याकरितां कांहीं जमीनी खरेदी घेऊन त्यांत ह्या झाडाची, नवीन लागवड करून वाफेच्या यंत्रा-पासूनहि सूत तयार करितात.

फुलें येण्याच्या हंगामांत वर निघालेल्या दांड्याला फुलें लागणारा मधला बारीक शेंवट कापून टाकला म्हणजे त्यापासून आंबट रस पुष्कळ निघतो तो शिजवून "पुल्क" आणि "मेक्सिकल" नांवाची दारू तयार करितात. आपल्या इकडील ताडीप्रमाणें या दारूचा अमेरिकेंत फार खप होतो. रसाचा लाखों रुपयांचा व्यापार करितात. व त्यांत साब-णासारखीं कांहीं द्रव्यें घातलीं असतां त्याचाहि उपयोग होतो. जुनाट झाडाच्या बुंध्याला फुटलेले कोंब काढून लाविल्यास त्यापासून नवीन झाडें उत्पन्न होतात. ह्या झाडाच्या पुऱ्या वाढीस १० । १२ वर्षें तरी लागतात.

ह्या झाडाची लागवड दोन प्रकारानें होते. एक याच्या दांड्यास फुलें आल्यानंतर बी धरते. त्या बियापासून व दुसरी रीत म्हणजे झाडाच्या बुंध्यास लागलेल्या कोंबापासून लागवड करणें हेंच जास्त सोईचें व खातरीचें असतें. एक दोन वर्षांचीं कोंवळीं झाडें आणूनहि पावसाळ्याच्या आरंभीं लावावीत. कुंपणासाठीं केकती लावणें असल्यास दोन फूट अंतरानें कोंब लावावे. म्हणजे ३ । ४ वर्षांत सर्व झाडें एकत्र होऊन उत्तम कुंपण होईल जमीन सुपीक होण्या-साठीं केकतीचें शेतच करणें असेल, तर दहा फूट अंतरानें कोंब रांगेनें लावून प्रत्येक रांगेंत पांच किंवा सहा फूट अंतर सोडावें. ह्या झाडाची लागवड करण्यास वरड, तावडी, रेताड किंवा दगडगोटे असलेलेली जमीन सुद्धा उपयोगी पडते.

याची लागवड नवीन करणें झाल्यास जमीन दोन वेळ कुळवावी व नंतर चार फूट रुंदीचे वरंबे दोन वरंब्यांत आठ फूट अंतर ठेऊन करावे. वरंब्याला दर एकरीं शेणखत सुमारें दहा गाड्यापर्यंत देऊन तें मातींत कालवून ती माती वर चढवावी. जून महिन्यांत चांगला पाऊस झाल्यावर वरंब्यावर दोन चौरस फूट अंतरानें लहान रोपाच्या दोन ओळी लावाव्या. पाण्याच्या सोयीप्रमाणें एकदोन वर्षें उन्हाळ्यांत दोनदां पाणी द्यावें व मधील भाग कोळपून स्वच्छ ठेवावी. लागवड होऊन चारपांच वर्षें झालीं म्हणजे वाखासाठीं पानें कापावीं.

केकतीचे तंतू काढण्याची दुसरी रीत.—लांब व मोठीं पानें विशिष्ट प्रकारच्या हत्यारानें कापितात. नंतर पानाच्या लांबलांब चिरण्या करून त्या एक दिवस उन्हांत वाळवितात व त्यांच्या लहान लहान जुड्या बांधून पाण्यांत भिजत टाकितात. याचा वाख काढण्याची सोपी रीत म्हटली म्हणजे पानाच्या चिरण्या एका फळीवर ठेऊन त्या

एका लोखंडाच्या पात्रामधून वरचेवर सर्व रस व चोथा निघून आईपर्यंत ओढणें हो:होय. अशा रीतीनें वास:काढ-ल्यानंतर तो धुवून वाळवितात. या पद्धतीनें दर.-एकरी सुमारें एक हजार पौंड वास निघतो ( तीस ते पन्नास पानांपासून सुमारें एक पौंड निघतो ). पुण्यानजीक गणेश-खिंडीतील बागेत निरनिराळ्या धायपाताच्या जातींचा दोन तऱ्हेनें वास काढिला होता. त्याचा तपशील पुढें दिला आहे:--

वासाच्या शेंभर पौंडांचें प्रमाण.

| जातीचें नाव | यंत्रानें काढलेला | भिजत घालून काढलेला |
|---|---|---|
| गावठी केकताड | ६. ४२ | ५. ६६ |
| सिसल | ३. ७१ | ३. ८५ |
| चुरुट (आलुड पानाचा) | ४. ५० | ४. ४७ |
| अमेरिकन | २. ७३ | १. ६९ |
| मोठया पानाचा | २. ० | १. ७८ |
| युका | ११.१५ | १०. ० |

या अनुभवाचा परिणाम धंद्यावर आज किती झाला आहे हें सांगता येत नाहीं [ वंट ].

**केकय**—भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा आमेय कोसलच्या उत्तरेस असावा. येथील राजास केकय हें नाव सर्वसाधारण असें असे; परंतु अंतर्गत नाव प्रत्येकाचें भिन्न भिन्न आहे. दशरथाच्या वेळीं अश्वपति नावाचा येथें एक राजा असून त्याची कन्या केकयी ही दशरथाची स्त्री होती. पांडवाच्या वेळेस येथील राजा धृष्टकेतु हा होता. याची राजधानी गिरिव्रज ( राजगृह ) नावाचें नगर ही होती.

**केकरी**—राजपुतान्यात अजमेर-मेरवाड संस्थानातील एक गाव व एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनरचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ( १९११ ) ५९२६. पैकीं ४४३१ हिंदु, ११२२ मुसलमान व ३६६ जैन आहेत. पूर्वी येथें व्यापारास फार तेजी होती अलीकडे या स्थलाचें व्यापारी दृष्टया महत्व फार कमी होत चाललें आहे. येथें पाण्याचा पुरवठा फार कमी असून पाणीहि वाईट आहे. येथें कापूस पिंजण्याची एक गिरणी व कापसाचे गठ्ठे बांधण्याचे तीन कारखाने आहेत.

**केकुल फ्रेडरिक ऑगस्ट**-(१८२९-१८९६)हा जर्मन रसायनशास्त्रज्ञ लीबिकच्या हाताखालीं रसायनशास्त्र शिकला. यानें आपली स्वतःचीच लहान प्रयोगशाळा काढली रासायनिक रंगाच्या धंद्याच्या उत्कर्षास हा कारण झाला.

कर्बयुक्त संयुक्त पदार्थांचें संशोधन हें त्याचें महत्वाचें कार्य होय. याचे परिणाम फार दूरवर पोहोंचणारे दिसून आले. बेन्झिनच्या घटनेची त्यानें दिलेली उपपत्ति इतकी महत्वाची आहे कीं, सेंद्रिय रासायनिक पदार्थांपैकीं जवळ जवळ तीनचतुर्थांश पदार्थ या बेन्झिनच्या घटनेच्या ज्ञानामुळें तयार करता येऊं लागले. तसेंच डांबरापासून रंग तयार करण्याची कृति वरील घटनेच्या ज्ञानाशिवाय अस्तित्वात येणें अशक्य आहे.

**केंजळगड, अथवा घेरखेळज किल्ला**—वाईच्या वायव्येस ११ मैल अंतरावर असलेल्या महादेव पर्वतश्रेणीच्या मांढरदेव शिखरावर हा किल्ला असून समुद्रसपाटीपासून हा ४२६९ फूट उंच आहे. यावर जाण्यास वाईच्या बाजूस याच्या पायथ्याशीं असलेल्या असरें किंवा खवली या खेड्यातून जावें लागतें. टेंकडीवरील चढाव फार मोठा आहे. किल्याकडे जाण्यास पायऱ्या आहेत व त्याच्या तळाशीं एक बुरूज आहे. किल्याच्या भिंती दगडाच्या आहेत. यातील घरें पडलेलीं आहेत. यात शाबूत असें घर म्हणजे दारूखाना होय. यात पाण्याची मोठी तीन व धान्य साठविण्यासाठीं लहान सहा टाकीं आहेत. किल्यावर पाण्याचा जिवंत झरा नाहीं. या पर्वतश्रेणीच्या उत्तरेकडील बाजूवर असलेल्या व्होळेली नावाच्या खेड्यात या किल्यातील शिबंदी रहात असे. बाराव्या शतकात जे पन्हाळ्याचे भोजराजे उदयास आले त्यानीं हा किल्ला बांधिला असें म्हणतात. एल्फिन्स्टन म्हणतो कीं जर हा किल्ला चांगल्या रीतीनें लढविला तर शत्रूस अभेद्य आहे. जनरल प्रिट्झलरच्या तुकडीच्या स्वाधीन होण्यापूर्वी सातारा प्रांताच्या ज्या थोड्या किल्यांनीं तोफा डागल्या होत्या त्यांपैकीं हा एक आहे

**केटर हेन्री**—( १७७७-१८३५ ) इंग्लीश-जर्मन-पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता. प्रथमतः त्याचा विचार कायद्याचा अभ्यास करण्याचा होता. परंतु त्याच्या बापाच्या मृत्यूनंतर त्यानें सैन्यात प्रवेश केला. त्याला बाराव्या रेजिमेंटमध्यें कमिशन मिळालें व त्यामुळें तो हिंदुस्थानात आला व त्यानें ( १७९४ ते १८०८ च्या दरम्यान) हिंदुस्थनची त्रिकोणमितीच्या सहाय्यानें पहाणी केली. आरोग्याकरिता त्यानें हिंदुस्थान सोडलें. इंग्लडास जाऊन त्यानें सँढर्स्ट येथील लष्करी कॉलेजात प्रवेश केला. तेथील परीक्षा उत्तीर्ण होऊन त्यानें कॅपटनची जागा मिळविली. पुढें सन १८१४ सालीं पेन्शन घेऊन शेषायुष्य त्यानें शास्त्रीय शोधात घालविलें. कासेग्रेनिअन आणि ग्रेगोरिअन दुर्बिणींची तुलना करून त्यानें असें ठरविलें कीं, या दोहोंपैकीं पहिली दुसरीपेक्षा ५ : ३ या प्रमाणात जास्त प्रकाश देते. एक सेकंदलंबक बसवून त्याप्रमाणें लंडन आणि दुसरीं काहीं स्थळें येथील एक सेकंडलंबकाची लांबी त्यानें काढली. खगोलशास्त्रीय दुर्बिणीत त्यानें काहीं सुधारणा करून दाखविल्या. रशियांतील मापाच्या तुलनेसंबंधानें अत्यंत परिश्रम घेऊन सौ मापें निश्चित केलीं. त्याच्या या कामाबद्दल रशियन सरकारनें त्याचा बहुमान ( १८१४ )केला. सन १८१५ सालीं त्याला रॉयल सोसायटीनें आपला सभासद करून घेतलें.

**केटी**—मुंबई इलाख्यातील कराची जिल्ह्याच्या घोडाबारी तालुक्यातील एक शहर व बंदर. सिंधुनदीच्या हजामी

नावाच्या फांट्यावर समुद्राच्या लगत हें शहर वसलेलें आहे. १९०१ मध्यें या शहराची लोकसंख्या २१२० होती. हें शहर सिंधुनदीच्या त्रोन्यांतील एक प्रमुख बंदर व व्यापाराचें शहर आहे. कराचीच्या खालोखाल या बंदराचा नंबर लागतो. हें बंदर ५० वर्षांपूर्वीचें आहे. त्याच्यापूर्वी घोडा-बारी बंदराची व्यापाराबद्दल ख्याती असे. या बंदरातून ज्वारी, कडधान्य, लोकर, कापूस, इत्यादि पुष्कळ जिन्नस मुंबई, मद्रास, सोनमियानी, मकाण इकडे जातात व मुंबई, मद्रास, मकाण इत्यादि ठिकाणाहून नारळ, कापड, धातु, साखर इत्यादि जिन्नस या बंदरात येतात. १९०३-४ मध्यें या बंदरातून बाहेरदेशी ५,३०,००० रुपयाचा माल गेला; व १,०५,००० रुपयाच्या मालाची आयात झाली. बाहेरच्या देशाहून आलेला माल प्रथम येथें उतरून नंतर तो कराची जिल्ह्यातील सिंधुनदीच्या मार्गानें जातो. हें बंदर थोडेसें उंचावर वसलें असल्याकारणानें नदीला पूर आला तर त्याची फारशी नुकसानी होत नाहीं. या बंदराहून ठठ्ठा, मिरपूर, घोडाबारी या शहराकडे रस्ता गेला आहे. १८५४ सालीं येथें म्युनिसिपॅलिटीची स्थापना झाली. शहरामध्यें एक दवाखाना व एक शाळा आहे.

**केटो मार्कस** पोर्शिअस (ख्रि. पू. २३४–१४९) हा रोमन मुत्सद्दी टस्कुलम येथें जन्मला. त्याचें कुल लष्करी कामा-करितां प्रसिद्ध होतें. व्हेलेरियस फ्लॅकस या गृहस्थाचें त्याज-कडे लक्ष गेल्यामुळें त्यास त्यानें रोम येथें आणलें. रोम येथें आल्यावर तो अनुक्रमें क्वेस्टर, एडाइल, प्रीटर व कॉन्सल झाला. मध्यन्तरीं तो आफ्रिकेंत गेला व झामाच्या स्वारींत त्यानें बराच भाग घेतला नंतर सार्डिनिया व स्पेनमधील स्वाऱ्यात तो होता. स्पेनमधील स्वारीनें त्याची बरीच कीर्ति झाली. ख्रि. पू. १९१ सालीं त्यानें ट्रिब्यूनचें काम केलें. लष्करी दृष्टीनें त्याची कीर्ति अढळ झाली होती. आता त्यानें स्वदेशात राहून कामगिरी बजाविण्याचें ठरविलें. केटोचें आफ्रिकेंतील स्वारीपासून सिपियो याजबरोबर वैर उत्पन्न झालें होतें. तेव्हां लवकरच सिपियोवर लाच घेतल्याबद्दल मुकदमा सुरू झाला; यात केटोचें प्रत्यक्ष अंग होतें असें म्हणावयास जागा नाहीं. हा सेन्सर या उपनामानें प्रसिद्ध होता.

पूर्वीच्या साध्या रोमन राहणीचा नाश करून अस्तित्वात येऊं पहाणाऱ्या नवीन हेलेनिक संस्कृतीस विरोध करण्याचें मत त्यानें अंगिकारिलें. या नवसंस्कृतीस आळा घालणें हेंच तो आपलें पवित्रतम कर्तव्य मानूं लागला. तो सेन्सॉर अस-ताना हें अंगीकृत कार्य तडीस नेण्याचा त्यानें बराच प्रयत्न केला. सेन्सार झाल्यापासून मरेतोंपर्यंत तो जरी अधिका-रावर नव्हता तरी सीनेटमध्यें नवविचाराचा प्रतिस्पर्धी म्हणून तो प्रसिद्ध होता. मुत्सद्दी या नात्यापेक्षा लेखक या नात्यानें केटोचें महत्व अधिक आहे लॅटिन भाषेत गद्य लिहि-ण्यास त्यानेंच प्रथम प्रारंभ केला. लॅटिन भाषेंत रोमचा इतिहास लिहिणारा हा पहिला लेखक होय. शेतकीवरहि त्यानें 'डी ॲग्रिकल्चरा अथवा डी रेरस्टिका' नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. ओरिजिन्स नावाचीं रोमच्या इतिहासाचीं सात पुस्तकें त्यानें लिहिलीं. त्याचीं भाषणेंहि संकलित आहेत.

**केटो मार्कस दुसरा**—(ख्रि. पू. ९५-४६) वरील केटोचा नातू. थोडा युद्धाचा अनुभव मिळाल्यानंतर हा ट्रिब्यून झाला. ख्रि. पू. ४९ मधील यादवींत हा पाँपीच्या बाजूस होता. शत्रूच्या हातीं सापडूं नये म्हणून यानें आत्महत्या केली.

**केडीझ**—हें स्पेनमधील केडीझ प्रांतांतील शहर व बंदर आहे. येथील लोकसंख्या (१९१७) ६६१०६ आहे. याला मुख्यत्वेंकरून भव्य आखातामुळें व्यापारी महत्व आलें आहे. जलवेष्टणामुळें येथील हवा समशीतोष्ण आहे. येथील वार्षिक सर्वसाधारण हवामान ६४° इतकें आहे. शहराभोंवती तट असून पांच दरवाजे आहेत. केडीझ ही धर्मोपदेशकाची जागा आहे. येथें वायकांसाठीं दवाखाना, अनाथबालकाश्रम, वेड्यांचें इस्पितळ या-सारख्या अनेक धर्मार्थ संस्था आहेत. पुष्कळ मुलाना फुकट शिक्षण दिलें जातें गणित, व्यापार, वैद्यक वगैरे विषयाचीं विद्यापीठें येथे आहेत.

येथील बंदराचें काम जुनाट व अपुरें आहे. एक सडक व एक आगगाडीचा रस्ता ही येथील मुख्य प्रदेशाशीं दळण-वळणाचीं साधनें आहेत. येथें बहुतेक मोठमोठ्या कंपन्यांच्या बोटी येऊन लागतात. मीठ, अंजीर, तयार केलेलीं बुचें, दारू, हे येथील निर्गत व्यापाराचे पदार्थ आहेत. जळाऊ लाकडें, लोखंड, यंत्रें, इमारतीचें सामान हा आयात माल आहे.

इ. स. १६२६ मध्यें बकिंगहॅमच्या ड्यूकनें केडीझवर स्वारी केली. इ. स. १७०२ मध्यें ब्रिटिशांनींहि स्वारी केली. १८ व्या शतकात केडीझची संपत्ति अतिशय वाढली. इ. स. १७२० ते १७६५ पर्यंत स्पॅनिश अमेरिकेशीं बहुतेक व्यापार चालत असे. व तेव्हा दरवर्षी ५०,००,००० पौंड किंमतीच्या सोन्याची व चांदीची आयात होती. परंतु या शतकाच्या शेवटीं या प्रांताचे दुर्दैवाचे दिवस आले. सन १८०० मध्यें नेलसननें हें ठिकाण घेतलें. इ. स. १८२० मध्यें झालेल्या क्रांतीच्या वेळीं सातव्या फर्डिनंडला येथें कैदेंत ठेवलें होतें. इ. स. १८६८ मध्यें इसाबेला राणीला गादीवरून काढण्या-करिता झालेल्या क्रांतींत केडीझनें प्रमुख भाग घेतला होता

**केणी**—ही एक जंगली भाजी आहे. ती पाणथळ जागेंत बारा महिने असते. कांहीं जाती पावसाळ्यात ओसाड जागीं व शेतातहि उगवतात. तिचे सरपटत जाणारे हात दोन हात वेल वाढतात. फुलें निळीं, जाभळीं व तेजदार असतात. कित्येक लोक हिचीं कोंवळेपाणीं शिजवून भाजी करतात. [पदे]

**केदारनाथ**—संयुक्तप्रांत. गढवाल जिल्ह्यात महापथ नावाच्या बर्फाच्छादित शिखरालगतचें देवस्थान. समुद्रसपा-टीपासून उंची सुमारें ११७५३ फूट आहे.

वर्हूंफेर मोठाले उंच पर्वत असून मध्यें दोन मैलांचें ओसाड मैदान आहे. त्या मैदानात मध्यभागीं केदारनाथाचें मंदिर

आहे. आसमंतात सर्व हिमालयाचीं शिखरें आहेत त्यावर बर्फ असल्यामुळें तीं सर्व रुप्यासारखीं चकाकतात. केदारेश्वराच्या मंदिरासभोंवतीं अष्टदिशास ईशान्य तीर्थ, दक्षिणामूर्ति तीर्थ इत्यादि तीर्थे आहेत. केदारेश्वराचें देऊळ पांडवांनीं बांधिलें असें सांगतात. देवळावर शिखर केलेलें नाहीं. देवळाचा परिघ मोठा असून तें फार जुनाट आहे. देवळांत नेहमीं धोंट्याइतकें पाणी असतें. बाहेर मंडपांत इतर देवतांचीं स्थानें आहेत. मुख्य गर्भगृहात केदारेश्वर आहे. तो लिंगाकार नसून मोठा रेडा बसतो त्या आकाराचा आहे. त्याच्या मागच्या बाजूस पुच्छाप्रमाणें आकार दिसतो. पांडवांचा स्पर्श होऊं नये म्हणून शंकरानें रेड्याचें रूप घेऊन पाताळांत शिरण्याचा प्रयत्न केल्याचें हें द्योतक आहे असें सांगतात. त्या प्रदेशीं बिल्ववृक्ष नाहींत; याकरतां मार्गांत जें भिल्लकेदार स्थान आहे, तेथून यात्रेकरू बिल्वपत्रें बरोबर आणून तीं केदारनाथास अर्पण करितात.

येथील रावळ (पुजारी) म्हैसूर किंवा दक्षिण हिंदुस्थान या भागातले बहुधा नंबुद्रि ब्राह्मणांपैकींच असतात. केदारक्षेत्रीं भृगुपतन (भैरवझाप) म्हणून एक हिमालयाचें शृंग आहे. त्या शृंगावरून उडी टाकून देहत्याग केला असतां त्यास आत्महत्येचा दोष नसून त्याच्या मनांत ज्या फलाची वासना असेल तें फल त्याला पुढील जन्मीं प्राप्त होतें, असें क्षेत्रमाहात्म्यांत लिहिलें आहे. म्हणून मागें पुष्कळ यात्रेकरू येथें उडी घेत. पण ब्रिटिश सरकारनें ही चाल बंद केली. केदार येथें देवस्थानें व तीर्थें आहेत तीं पुढीलप्रमाणें:-

कागदिपर्वत, फठोरग्राम, वालखिल्यगंगातीर्थ, पोवयाचा पर्वत, त्रियुगीनारायण, रुद्रकुंडतीर्थ (येथें स्नान केलें पाहिजे), विष्णुकुंडतीर्थ (येथें वंदन), वासुकीगंगा, शालमीलपट्टण, गौरीकुंडतीर्थ, तप्तकुंडतीर्थ, गौरीश्वरमहादेव, मंदाकिनीतीर्थ, गौरीदेवी, वीरभैरव (येथें देवास वस्त्र वाहिलें पाहिजे), भीमगोडा, दुग्धगंगातीर्थ, स्वर्गद्वारतीर्थ, केदारेश्वर महादेव, ईशानेश्वर, संगमेश्वर महादेव (येथें पिंडदान केलें पाहिजे), उदककुंड, रेतोदककुंड (येथें उदकपान केलें पाहिजे), नंदीमहाकाव्य, भृगुपतनपर्वत, स्वर्गारोहण मार्ग, महापथ (म्हणजे कैलासमार्ग), इत्यादि. [ अॅट्किनन्स—हिमालयन गॅ. २; ओकले—होली हिमालय; शेरिंग—वेस्टर्न तिबेट; मूर—नोट्स ऑफ ए ट्रिप टु केदारनाथ; तीर्थयात्राप्रबंध. ].

**केदारभट्ट**—वृत्तरत्नाकर ग्रंथाचा कर्ता. त्या ग्रंथांत असें म्हटलें आहे कीं, केदार हा काश्यपगोत्री पिब्बेकाचा (पब्बेक-ऑफ्रेक्ट) पुत्र. केदारभट्टाच्या ग्रंथांतून, वासवदत्त ग्रंथावर टीका करतांना शिवराम नामक टीकाकारानें व मल्लिनाथ, पद्मनाभ, चित्रसेन व इतर ग्रंथकारांनीं पुष्कळ उतारे घेतलेले आहेत. वृत्तरत्नाकरावर सुल्हणाची 'सुकविहृदयानंदिनी' नांवाची टीका आहे. [ पीटर्सन रिपोर्ट १८९४]

**केंदूर**—पुणें जिल्ह्यांत शिरूर तालुक्यांत शिरूरपासून १० कोसांवर हें गांव आहे. येथें बाजारपेठ आहे. थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांनीं हा गांव मस्तानीस इनाम दिला होता असें म्हणतात. याच्याजवळ असलेल्या पाबळ गांवीं मस्तानीची कबर आहे, तिला इनाम म्हणून हें गाव दिलें असावें असें वाटतें. गांवाजवळ एक वलीबाबा नांवाच्या मुसुलमान अवलियाचें थडगें आहे. त्याचा उरूस भरतो. याच केंदूरचें प्रसिद्ध पाठक घराणें होतें त्यांत कान्होपंत, पिलोपंत व नामदेव हे पुरुष होऊन गेले (कान्हो पाठक पहा). या परगण्याचा दमाजी गायकवाडाच्या सरंजामांत समावेश झाला होता. [ पुणें ग्या. राजवाडे खं. १२ ].

**केंदूली**—बंगाल इलाख्यामधील बीरभूम जिल्ह्यामधील एक गाव. हें अजयनदीच्या काठीं बसलेलें आहे या गावची लोकसंख्या १९०१ मध्यें ७७४ होती. या गांवीं, गीतगोविंद या संस्कृत काव्याचा कर्ता जयदेव कवि जन्मास आला असें मानतात. जयदेवकवीच्या स्मरणार्थ येथें दरवर्षी पौष महिन्याच्या अमावास्येस प्रचंड यात्रा भरते.

**केंद्रापारा**, पो ट वि भा ग.—बिहार–ओरिसा. कटक जिल्हा. याचें क्षेत्रफळ ९७७ चौरस मैल आहे. १९११ सालीं या विभागाची लोकसंख्या ४,८०,९१८ इतकी होती. हा दलदलीचा प्रदेश असून यातून पुष्कळ नद्या व ओढे वहात गेले आहेत. यात १३६८ खेडीं असून केंद्रापारा नावाचें एक शहर आहे या विभागात केंद्रापारा धरून तीन तालुके आहेत.

श ह र.—केंद्रपारा तालुक्याचें मुख्य ठिकाण. हा बोटींचा धक्का असून कटकहून येणाऱ्या बोटी येथें लागतात. याची लोकसंख्या १९११ सालीं १५,११२ भरली. या शहराच्या आसपास तांदूळ पुष्कळ होत असल्यानें हें शहर व्यापारी बनलेलें आहे. या शहरापासून कटक, जयपूर चांदबाली या शहराकडे रस्ता गेलेला आहे १८६९ मध्यें या शहरांत म्युनिसिपालिटी स्थापन झाली. या ठिकाणीं पुष्कळ सार्वजनिक इमारती असून शिवाय एक चांगली शाळा व दवाखाना आहे. येथें एक सार्वजनिक लायब्ररी स्थापन करण्यांत आली आहे.

**केन**—ही बुंदेलखंडातील एक नदी आहे. ही कैमूरच्या डोंगराच्या वायव्य भागांतील उतरणीवर उगम पावून, ईशान्यगामी होऊन, संयुक्तप्रांतांतील बांदा जिल्ह्यामधील बिल्हर्का या शहराजवळून वहात जाते. अशा रीतीनें बांदा जिल्ह्यामधून शंभर मैल वहात गेल्यावर ती बांदा–फत्तेपूर या रस्त्यावरील चिल्ला नामक गांवाशेजारी यमुनेला मिळते. या नदीचें पात्र फार खोल असून हिच्यामधून लहान लहान नावा सहज जाऊं शकतात. बांदा येथील तिचें पात्र वालुकामय असून त्यांत गारगोट्या, दगड, व स्फटिकाचे तुकडे सांपडतात. या स्फटिकाचे दागिने करण्यात येतात. खरौनी येथें या नदीचें पात्र फार प्रेक्षणीय आहे. अजयगड संस्थानांतील बरियारपूर शहराजवळ या नदीस एक कालवा काढण्यांत आला आहे.

*केनिया*—आफ्रिका केनियाची माहिती द्यावयाची म्हणजे *ब्रिटिश पूर्व आफ्रिकेची माहिती द्यावी लागेल. ब्रिटिश* पूर्व आफ्रिकेंत ईस्ट आफ्रिकन प्रोटेक्टोरेट, युगांडा, झांझिबार, व पेंबा बेटें हीं येतात. किनाऱ्याकडचा थोडा भाग सोडला तर सर्वच देश म्हणजे पूर्वआफ्रिकेचें पठार असून त्याची कमींत कमी उंची दोन हजार फूट व जास्तीत जास्त उंची ६ ते ८ हजार फूट आहे. या लेखात फक्त पूर्व आफ्रिकेच्या संरक्षित संस्थानाची माहिती दिली असून 'झांझिबार' व 'युगांडा' यांची माहिती वेगळ्या लेखांत सापडेल.

*स्थलवर्णन*—उंबा नदीपासून जुबा नदीपर्यंत व आत युगांडासरहद्दीपर्यंत हा मुलूख पसरला आहे. झांझिबारच्या सुलतानाचा काहीं प्रदेश लामु द्वीपसमूह व किस्मायु किल्ल्याच्या भोंवतालचा १० मैलाचा टापू यात येतो.

*याचें क्षेत्रफळ २,४६,८२२ चौ. मैल असून लोकसंख्या* २८,०७,००० आहे. पैकीं ५३६२ यूरोपियन व १७०० *आशियाटिक लोक आहेत.*

समातर असणाऱ्या प्रदेशापैकीं किनाऱ्यालगतचा अथवा 'टॅबोरो' हा पहिला भाग होय या प्रदेशाची रुंदी फार नाहीं. *किनाऱ्यावर बऱ्याच खाड्या असून मोंबासा अथवा म्व्हीटा*, लामू, मंडा, आणि पट्टा हीं बेटें आहेत. या प्रदेशापलीकडे 'न्यीका' नावाचा सपाट प्रदेश आहे. यानंतर पर्वताच्या ओळी आहेत. पुढें गवताचीं मोकळीं मैदानें असून त्यात कॅप्टे अथवा कॅपोटे आणि अथि हीं विशेष मोठीं आहेत. या भागात सर्वांत उंच शिखरें केनिया(१७००७फू.), सॅटिमा (१३,२१४ फू) व नंदरुआ (१२,९०० फू.) हीं आहेत. *सॅटिमा अथवा ॲबरडेअर पर्वताची सर्वसाधारण उंची १०,०००* फूट आहे. रुवाकी व टाना या दोन मोठ्या नद्या आहेत. ग्वासो-*न्यिरो नदी लोरियन दलदलींत नाहींशी होते. रिफ्टव्हॅलींत* बरीच तळीं आहेत. दक्षिणेस डोंजिलानी मैदानें आहेत. *याच्या उत्तरेस सुस्वा व लॉंगोनोट हीं मृत ज्वालामुखीचीं* शिखरें असून नैवाशा सरोवर आहे. याच्या उत्तरेस अनुक्रमे माउंट, वरु, आणि नॅकुरो, हॅनिंग्टन, बॅरींगो वगैरे हीं सरोवरें आहेत. *याच्या उत्तरेस रुडाल्फ सरोवर आहे. रिफ्ट*-व्हॅलीच्या पश्चिमेस माऊएस्कार्पमेंट, एलगीयो एस्कार्पमेंट, काहीं सुपीक जमीन व *व्हिक्टोरियानियाझा आहेत.* रुडाल्फ-सरोवराच्या पूर्वेस व स्टेफेनीच्या दक्षिणेस एक मोठें निर्जल *मैदान आहे. अबिसीनिया व हें संस्थान याच्यामध्यें गोरोए*-स्कार्पमेंट आहे.

*भूस्तरवर्णनः*—ब्रिटिश पूर्वआफ्रिकेंत भूस्तररचनेंत वेगळाले असे चार प्रदेश आहेत समुद्रकाठचा भाग म्हणजे अलीकडच्या खडकाचा झालेला आहे पायथ्याजवळचें पठार अगदीं खालच्या खडकी थराचें बनलेलें आहे *त्याऊपासून किकुयुपर्यंतचें* प्राचीन पठार जुन्या स्फटिकाच्या थराचें बनलें आहेत त्यांवर ज्वालामुखीच्या खडकाचा थर बसून त्यामुळें मध्यपूर्वआफ्रिकेच्यो ज्वालामुखीचें पठार तयार झालें आहे. ज्वालामुखी पर्वतांचें क्षेत्रफळ १,५०,००० चौ. मैल आहे.

*हवामान, वनस्पती व प्राणीः*—हवामान व वनस्पती *ह्या बाबतींत सुद्धा ब्रिटिश पूर्वआफ्रिकेचे किनाऱ्याशी* समातर असे भाग पडतात किनाऱ्याजवळच्या प्रदेशाची *हवा उष्ण परंतु निरोगी आहे.* येथें सुमारें ३५ इंच पाऊस पडतो. यानंतरच्या प्रदेशात हवा जास्त उष्ण आहे. डोंगरांत म्हणजे ५००० फूट *उंचीच्या* प्रदेशात हवा फार निरोगी आहे. ७००० फूट उंचीवर हवा फार थंड असते. *व्हिक्टोरिया-नियाझाच्या भोंवतालच्या प्रदेशांतील हवा फार* उष्ण आहे. डिसेंबरपासून एप्रिलपर्यंत येथें उन्हाळा असतो. मार्चपासून जूनपर्यंत व नोव्हेंबर, डिसेंबरमध्यें पाऊस पडतो. येथें कधीं कधीं अवर्षणें पडतात.

*येथें मारख्याचीं झाडें, सॅनमोम्ह, एबनी, आलीव्ह, ज्युनी*-पीझर, बाबू हीं झाडें असून कापूस व अंजीरादि होतात काहीं *ठिकाणीं मोठाल्या झाडांचीं अरण्यें असून त्यांच्या सर्वांत* खालच्या फांद्या जमिनीपासून ५० फुटावर असतात. मौल्यवान *रबराच्या वेलाच्या दोन जाती येथें सापडतात.*

जनावरात उंट, हत्ती, गेंडा, रेडा, काळवीट, झिब्रा, जिराफ, पाणघोडा, सिंह व *माकडांच्या पुष्कळ जाती येथें आहेत.* यात गेंड्याची संख्या जास्त असून त्याच्यापासून फार भय असतें. मोठाल्या *नद्यात व व्हिक्टोरिया नियाझात सुसरी* सापडतात. येथें घोणा, विंचू व डास बरेच आहेत. शहामृग, माळढोंक, बगळे, फ्लेमिंगो वगैरे पक्षी आहेत

*लोक.*—किकुयुपठार, रिफ्टव्हॅली व केनिया भाग यात *गोरे लोक असून ते बहुतेक शेतकरी आहेत. याच जिल्ह्यात* काहीं हिंदी लोकांची वस्ती आहे. दक्षिणेस *निग्रोंच्या* बंटु विभागांतील लोक आहेत. यात बदुंबा, किकुयु व *वन्यिका ह्या मुख्य जाती आहेत. व्हिक्टोरिया-नियाझाच्या* ईशान्य किनाऱ्यावर कॅव्हिरोंडो लोक राहतात हे लोक नग्न असतात. वायव्येस *निलोटिक जाती सापडतात. याशिवाय* मसाई, बोरनी व किनाऱ्याजवळ राहणाऱ्या सोमालींपैकीं हर्नी, वाडोरोबो नावाची पारध करून राहणारी जात, या जाती आहेत. समुद्रकिनाऱ्यावर स्वाहिली, अरब व हिंदी लोक सापडतात.

*प्रांत व शहरें*—केनियाचे *खालील विभाग होतात.* सेयीडी ( राजधानी मोंबासा ), उकंबा (राज. नैरोबी), केनिया ( राज. न्येरी ), *टॅनालँड ( राज. लामू ), जुबालँड ( राज.* किस्मायु ), नैव्हशा (राज.नैव्हशा), न्यांझाप्रांत (रा किसूमु). *या प्रांताचे जिल्हे व पोटजिल्हे असे भाग पाडले आहेत.* मोंबासा हें सर्वांत मोठें शहर असून त्याची लोकसंख्या सुमारें ३०,००० हजार आहे. मोंबासा शहराच्या समोर फियरटाऊन शहरात *गुलामगिरीतून मुक्त झालेले लोक राहतात.* लामू हें किनाऱ्यावरील अरबांचें प्राचीन ठाणें होतें. याशिवाय *मालिंदी, पटा, किपीनी, व किस्मायु हीं किनाऱ्याच्या*

वरील शहरें आहेत. मलिंद येथें १४९८ त वास्कोदगामानें उभारलेला स्तंभ आहे युगांडा रेल्वेवरील नैरोबी हें संस्थान राजधानीचें शहर आहे. नैव्हशा हें त्याच नावाच्या सरोवरा जवळ आहे. किसुम अथवा पोर्ट फ्लोरेन्स हें व्हिक्टोरियानियाझा सरोवराजवळच्या टेंकडीवर वसलेलें असून त्याचा युगांडा प्रांताशीं फार व्यापार चालतो.

द ळ ण व ळ ण ाचीं सा ध नें.—सडका तयार केल्यानें या संस्थानची बरीच भरभराट झाली. पूर्वी मोंबासाहून वर्कलेंव पर्यंत ( व्हिक्टोरिया नियाझावरील ) मोठी सडक तयार केली होती. नंतर मोंबासाहून व्हिक्टोरियानिआझा सरोवरापर्यंत ६१८ मैलाचा रेल्वे बांधण्यात आली. युगांडा रेल्वे ही डोंगरातील रेल्वे आहे. रेल्वेनें गुलामाचा व्यापार बंद होऊन युगांडामध्यें ब्रिटिश सत्तेची चांगली घडी बसली मोंबासाला बऱ्याच आगबोटीच्या कंपन्यांचीं जहाजें येतात. हिंदुस्थान व मोंबासामध्यें आगबोटीनें दळणवळण नेहमीं चालतें. देशात तारायंत्र आहे

शे त की व इ त र धं दे.—व्हिक्टोरियानियाझा व किनाऱ्यावरील प्रदेशात तद्देशीय व हिंदी लोक शेतकी करतात, आणि यूरोपियन लोकांचे कांहीं मळेहि आहेत. तांदूळ, मका, इतर धान्यें, कापूस, तंबाखू, नारळ, मॅनग्रोव्ह झाडाची साल, एरंड, ऊंस ह्या वस्तू होत असून रबर गोळा करण्याकडे बरेच लोक खपतात. उंच प्रदेशांतील यूरोपियन वसाहतवाले भाज्या व त्यातल्यात्यात बटाटे उत्पन्न करण्याकडे ज्यास्त लक्ष देतात. ओट, जंव, गहूं, कॉफी वगैरे येथें होतात. येथें जनावरांचे मोठाले कळप पाळतात. शेत मेंढ्या व शहामृग यांची वाढ विशेषेंकरून करतात. इमारतीचें लाकूड व वाळाचीं झाडें किनारा व उंच प्रदेश यामध्यें बरींच आढळतात. येथील जमीन हलकी, तांबड्या रंगाची व चिकणमातीची अशी असून कांहीं ठिकाणी निवळ काळी जमीन आढळते.

वाख व कापूस या धंद्याखेरीज येथें डुकराचें मांस खारविण्याचा धंदा चालतो. देशी लोक कापड, चटया व टोपल्या तयार करतात दगड, चुनखडी, तांबें यांच्या खाणी येथें असून चिका नदींत हिरे सांपडतात.

व्या पा र.—कापड, लोखंडी सामान व तयार माल हा मुख्य आयात माल असून तो विशेषतः हिंदुस्थान व यूरोपमधून येतो. हिंदुस्थान व ग्रेटब्रिटन मिळून शेंकडा ५० या प्रमाणात माल पाठवितात. येथील निर्गतीत युगांडाच्या बाह्य व्यापाराचा समावेश होतो खोबरें, कातडीं, धान्य, बटाटे, रबर, हस्तिदंत, मिरच्या, मेण, कापूस व वाख या वस्तू परदेशीं जातात. १९१७–१८ सालीं २८,०९,६८१ पौंडाची आयात असून १७,४१,६३९ पौंड निर्गत होती. संयुक्त संस्थानें व ग्रेटब्रिटननें हा माल घेतला.

शा स न प द्ध ति —याची राज्यपद्धति क्रौन कालनीप्रमाणें असून सर्व सत्ता गव्हर्नरच्या ताब्यात असते. त्याच्या हाताखालीं लेफ्टनंट गव्हर्नर असतो प्रत्येक प्रांतावर कमिशनर असतो येथें कार्यकारी व कायदेकौन्सिलें आहेत 'दहा मैलांच्या पट्ट्यात' झांझिबारच्या सुलतानाचा अधिकार चालत असून तेथें अरब व तद्देशीय लोकाना महंमदी कायदा लागू आहे. सुलताननें १९०७ मध्यें गुलामगिरीविरुद्ध कायदा केला. त्यापूर्वी १८९० च्या फायद्यान्वयें असें जाहीर केलें होतें कीं त्यानंतर जन्मलेल्याना गुलाम करता येणार नाहीं. संस्थानच्या इतर भागांत गुलामगिरी नाहीं येथील न्यायपद्धति हिंदी न्यायपद्धतीप्रमाणें असून चालीरीती आफ्रिकन लोकांच्या प्रमाणें आढळून येतात. येथें २००० पोलीस व किंग्ज आफ्रिकन रायफलच्या दोन पलटणी आहेत. जकात, परवाने, अबकारी, रेल्वे व पोस्ट या एकंदर उत्पन्नाच्या मुख्य बाबी होत. एतद्देशीय लोक झोपडींवर कर देतात. युगांडा रेल्वे झाल्यामुळें व्यापार व उत्पन्न यांची वाढ झाली १९१५–१६ मध्यें ११,६५,५६१ पौंड उत्पन्न व १०,७२,९१७ पौंड खर्च होता.

येथें मुख्य नाणें शिलिंग आहे येथें मिशनरी लोकांच्या शाळा असून त्यात धंदेशिक्षणहि देतात मोंबासा येथें अरब शाळा आहेत. नैरोबी येथें हिंदी व यूरोपियन लोकांसाठीं सरकारी शाळा आहेत

इ ति हा स.—८ व्या शतकापासून ११ व्या शतकापर्यंत अरब व इराणी लोकांनीं किनाऱ्यावर वसाहती केल्या. पुष्कळ ठिकाणीं त्यांनीं राजकीय सत्ता स्थापन केली व लवकरच झेंज साम्राज्याचा उदय झाला. या वेळेपासून ब्रिटिश सत्तेच्या उत्कर्षापर्यंत किनाऱ्यावरील शहराचा इतिहास म्हणजे झांझिबारचा इतिहास होय ब्रिटिश पूर्व आफ्रिकेच्या आतल्या भागाचा शोध १९ व्या शतकाच्या मध्यात लुड्विग क्राफ, जोहानेस रेबमन हे जर्मन मिशनरी व बॅरन व्हॉन डेर डेकेन यानीं लाविला व्हॉन् डेकेन व तीन यूरोपियन याचे खून बर्डेरा येथें सोमाली लोकानीं केले (१८६५). स्कॉटिश मधसी थॉमसन यानें व्हिक्टोरियानियाझाचा व काउंट टेलेकी ( हंगेरियन ) यानें रुडाल्फ व स्टेफॅनी सरोवराचा शोध लाविला.

ब्रिटिश लोकांचा प्रथम झांझीबारशीं संबंध आला. येथें १९ व्या शतकाच्या अखेरीस ब्रिटिशांचें बरेंच वजन होतें. सुलतान बर्गश हा सर जॉन कर्क या ब्रिटिश प्रतिनिधीच्या सल्ल्यानें नेहमीं वागे इ स १८७७ सालीं बर्गशहानें विल्यम मॅकिनॉन ( नंतर सर विल्यम मॅकिनॉन ) ब्रिटिश इंडिया स्टीम नॅव्हीगेशन कंपनीचा अध्यक्ष याला कांहीं सवलती व हक्क देऊं केले परंतु परराष्ट्रीय खात्याचा पाठिंबा नसल्यानें वरील सवलती नाकारण्यात आल्या त्याचप्रमाणें किलिमांजारो जिल्ह्यात जॉन्स्टन याला मिळालेल्या सवलतीकडे दुर्लक्ष देण्यात आलं. परंतु जर्मनानीं १८८४–८५ त पूर्व आफ्रिकेच्या किनाऱ्यावर कांहीं हक्क संपादन केल्यामुळें ब्रिटिशसत्ताधार्‍यांनीं पुन्हा उचल खाल्ली.

मोंबासाच्या मागील बाजूच्या जिल्ह्यावर १८६८ त ब्रिटिशांनीं जर्मनीच्या अनुमतानें आपला हक्क बसविला. १८८७त बर्गशहानें मॅकिनानच्या कंपनीला जर्मन सत्ताक्षेत्राच्या बाहेर असलेल्या आपल्या प्रदेशात काही हक्क दिले. परंतु सार्वराष्ट्रीय तहान्वयें किनाऱ्यापासून दहा मैलपर्यंतच्या प्रदेशावर सुलतानचा हक्क असल्याचें ठरविण्यात आलें वरील प्रदेश व त्याच्या मागील भाग यावर अंमल बसविण्याची इच्छा असल्यानें या कंपनीनें 'इंपीरियल ब्रिटिश ईस्ट आफ्रिका कंपनी' हें नाव धारण केलें व काही जास्त हक्क मिळविले (१८८८) यामुळें कंपनीचें भांडवल २,४०,००० पौंड उभारण्यात आलें. परंतु जर्मन ईस्ट आफ्रिका कंपनीच्या चढाओढीनें ब्रिटिश कंपनीला बराच त्रास झाला. नवीन कंपनीस १८८८ मध्यें सुलताननें काही हक्क दिले होते. व्हिक्टोरियानियाझाच्या दक्षिणेस जर्मनीचा कारभार चालेल असें प्रिन्स बिस्मार्कच्या अभयवचनावरून वाटलें. परंतु जर्मनानीं लामू वगैरे कंपनीच्या सत्तेखालील भागात आपला हक्क सागण्यास सुरुवात केली याला जर्मन सरकारचा पाठिंबा मिळाला. परंतु ब्रिटिश कंपनीला परराष्ट्रीय खात्याकडून मदत मिळण्याऐवजी उलट निरुत्साहजनक उत्तरें मिळत गेलीं. ब्रिटिशानीं ऑक्टोबर १८८८ च्या सवलतीमुळें बंदरातील जकातीच्या ऐवजी बरीच रकम सुलतानला देण्याचें कबूल केलें, परंतु लवकरच सुलतान वारला व त्याच्या नंतरच्या सुलतानाच्या जवळ जर्मनीनें लामू वगैरेची मागणी केली. त्यामुळें व्यापारांत बराच चट बसला व सुलतानला मोठी रकम द्यावी लागत असल्यानें कंपनीला जास्त तोटा आला. परंतु तिनें साम्राज्याचे बरेच हितसंबंध सुरक्षित राखले

जुलै १८८७ च्या जर्मनी व ग्रेटब्रिटनमधील पत्रव्यवहारात नमूद केल्याप्रमाणें युगांडावर ब्रिटिशाचा हक्क होता. परंतु जर्मन लोकमत याविरुद्ध असून नकाशात हा प्रदेश जर्मन अंमलाखालीं दाखविला होता. परंतु ब्रिटिश जनतेच्या मताप्रमाणें पाहिलें असता हा प्रदेश ब्रिटिश सत्तेखालीं येत असे. इ. स. १८८९ त कार्लपीटर्स नावाच्या जर्मन अधिकाऱ्यानें युगांडावर एक स्वारी केली. म्हणून कंपनीनें जॅक्सनला व्हिक्टोरिया नियाझाला पाठविलें परंतु युगांडात न जाण्याचा हुकुम मोडून युगांडातील लोकांच्या बोलावण्यास मान देऊन जॅक्सननें आपला मोर्चा युगांडाकडे वळविला. हें पाहून पीटर्स परत फिरला व काहीं तह केल्याचें त्यानें जाहीर केलें जॅक्सननें सुद्धा काहीं तह केले. इतक्यात १८९० मध्यें आंग्लोजर्मन तहनाम्यात युगांडावर ब्रिटिश अंमल असल्याचें जाहीर झालें कंपनीचा अंमल तेथें बसूं न देण्याची फ्रेंच मिशनरींनीं बरीच खटपट केली परंतु त्याचा प्रयत्न व्यर्थ गेला. १८९० मध्यें ब्रुसेल्स येथें सर्व राष्ट्रांच्या प्रतिनिधींनीं जमून गुलामगिरी मोडण्याचें ~~ याला कंपनीच्या युगांडांतील चळवळीचें बरेंच साहाय्य मिळालें. पुढें तिनें मोंबासा ते व्हिक्टोरियानियाझा पर्यंत रेल्वे केली. एकंदर खर्च कंपनीला झेपला नाहीं म्हणून साम्राज्य सरकाराकडे मदतीची याचना केली असतां पार्लमेंटात बिल नामंजूर झालें. पैशाची बरीच अडचण असल्यामुळें कंपनीनें युगांडातील आपलें सैन्य परत बोलाविलें व ब्रिटिश सरकारानें संरक्षित संस्थान म्हणून देशावर आपला अंमल बसविला

कंपनीवर बऱ्याच सांपत्तिक अडचणी येऊन पुढें ती मोडली. १८९० मध्यें झांझिबार ब्रिटिश संरक्षणाखालीं आल्यानें येथें खुला व्यापार चालू झाला. परंतु शासन वगैरेचा कंपनीचा खर्च तसाच राहून जकात, कर वगैरे वसूल करता येईना. यामुळें बराच तोटा झाला व त्याबद्दल मोबदला काहींच मिळाला नाहीं कंपनीनें करासंबंधीं कांहीं ठराव पुढें मांडले होते परंतु त्याला परराष्ट्रीय खात्याची संमति मिळाली नाहीं

मळे व व्यापार यात तोटा आणि एतद्देशीय व्यापाऱ्यास दिलेला मुदतीत पैसा अशी चोहोंकडून संकटें आलीं असताना सर विल्यम मॅकिनॉन हाहि १८९३त मरण पावला अखेरीस सर्व सनदा व कारभार सरकारच्या स्वाधीन करण्याचें ठरलें. सरकारनें कंपनीचे सर्व हक्क, मालमत्ता अडीच लाख पाडास विकत घेतली. कंपनीच्या भागीदारास फायदा मुळींच मिळाला नाहीं. परंतु कंपनीनें कामगिरी मात्र उत्कृष्ट रीतीनें बजावली. येथें ब्रिटिश अंमल होण्यास सर विल्यम मॅकिनॉन याचे प्रयत्न कारणीभूत झाले. या गृहस्थानें व त्याच्या बरोबरच्या मंडळींनीं गुलामगिरी नाहीशी करणें व लोकास सुधारणें यासाठी बरेच प्रयत्न केले. यासाठी त्यानीं मद्याचा व्यापार बंद केला, सडका बाधल्या व औद्योगिक मिशनाची स्थापना केली

१ जुलै १८९५ रोजी ब्रिटिश सरकारनें हें राज्य आपल्या ताब्यात घेतल्याचें जाहीर केलें. याला पूर्व आफ्रिकेचें संरक्षित राज्य असें नाव मिळालें. वितूचें सुलतानचें राज्य ब्रिटिश संरक्षित राज्यात सामील करण्यास आलें. याच सुमाराला मझरुई या प्रसिद्ध अरब घराण्यात वारसामुळें लढा पडून अखेरीस अरबाचें बंड झालें. अखेरीस १८९६ त बंडखोर जर्मन प्रदेशात गेले व तेथें त्याना अडकविण्यात आलें या बंडानें अरबी अंमलाचा नाश होऊन त्या ऐवजी यूरोपियन अंमल बसला

मोंबासा–व्हिक्टोरियानियांझा रेल्वेला १८९६ त सुरुवात होऊन ती १९०३ मध्यें पुरी झाली. मसाई, सोमाली वगैरे जातीवर चांगला दरारा बसला. आतापर्यंत किनाऱ्याच्या प्रदेशाचें महत्व युगांडाचा रस्ता म्हणून जास्त असे. परंतु रेल्वेमुळें पठारावर यूरोपियन लोकास राहण्यायोग्य असा प्रदेश आढळला. ईस्ट आफ्रिका सिंडीकेट व इतर लोक यानीं वसाहत करण्यास जमीनीची मागणी केली (इ. स. १९०२) बरेच वसाहतवाले आल्यानें इ स १९०३ मध्यें वसाहतीस जमीन

देण्याची बंदी झाली. याच सुमारास परराष्ट्रीय प्रधान लॉर्ड लॅड्सडौन व येथील कमिशनर सर चार्लस इलियट याच्यात बेबनाव होऊन सर चार्लसनें राजीनामा दिला. याच्या नंतरचे सर डोनाल्ड स्टुवर्ट यानी मसाई लोकाना दुसरीकडे वसाहत करावयास लावून वसाहतीसंबंधी भानगडी मिटविल्या ता.१ एप्रिल १९०५ पासून या प्रांताचा राज्यकारभार परराष्ट्रीय खात्याकडून वसाहत खात्याकडे देण्यात आला. १९०५ च्या अखेरीस सुमारें १० लक्ष एकर जमीन मक्त्यानें देण्यात आली अथवा विकली. गोरे रहिवाश्यानी कॉलनिस्टस असोसिएशन म्हणून मंडळ स्थापिलें याच्या मागणी वरून १९०७ मध्यें एक कायदे कौन्सिल स्थापण्यात आलें. येथें गव्हर्नराची नेमणूक होऊं लागली. याच वर्षी यूरोपियन लोकास अयोग्य असलेल्या जिल्ह्यात हिंदी वसाहतींना उत्तेजन देण्यात आलें. युद्धप्रिय मसाई लोकाकडून सरकारला फारसा त्रास झाला नाहीं. सोमाली लोकानीं मात्र त्रास दिला परंतु त्याच्यावर स्वारी करून ( १९०५-०६ ) त्याना वठणीस आणलें. येथें मजुराचा पुरवठा नसल्यामुळें वसाहतवाल्याना बराच त्रास झाला त्यात एतद्देशीय लोकाना काम करण्याचा कंटाळा असल्यानें विशेष भर पडली.

ब्रिटिश सरकाराचा अंमल बसला तरी उत्तरेकडच्या भागाची माहिती नव्हती.या भागावर गॅलास व अबिसीनियन सरकारची ठाणीं रुडाल्फ सरोवराच्या दक्षिणेपर्यंत सरकली व बोरान देश त्यानीं ताब्यात घेतला. असेरीस अबिसीनियन सरकारशीं ठराव होऊन जुबानदी व सरोवर यामध्यें सरहद्द ठरवण्यात आली ( १९०७ ). १९०८-०९ मध्यें नेमलेल्या अँग्लो-अबिसीनियन कमिशननें ती कायम ठरवून टाकली.

इ. स. १९०९ मध्यें सर पर्सी जिरौर्ड हा केनियाचा गव्हर्नर झाला. या सुमारास केनियामध्यें रहाणाऱ्या गोऱ्या लोकामध्यें त्याच्या मागण्या पुऱ्या न झाल्याकारणानं असंतोष माजून राहिला होता पण अशा विकट परिस्थितींतहि जिरौर्ड यानें आपला कारभार मोठ्या कुशलतेनें चालविला. १९११ पर्यंत या गोऱ्या लोकामध्यें व केनियातील रहिवाश्यामध्यें फारसें वितुष्ट नव्हतें पण १९११ मध्यें हें वितुष्ट अचानक तऱ्हेनें प्रगट झालें. यावेळीं देश्य लोकाकडून चोऱ्याचा उपद्रव फार होत असे एकदा कोल नावाच्या एका वसाहतवाल्यानें, मेंढ्या चोरल्याच्या निमित्तावरून एक किक्यूयू जातींच्या रहिवाशाला ठार मारिलें तेव्हा ब्रिटिश सरकारनें त्याला हद्दपारीची शिक्षा फर्मावली त्यामुळें चेकाळून गेलेल्या गोऱ्या वसाहतवाल्यानी एकच काहूर माजविलें व ब्रिटिशसरकारला चाराापासून गोऱ्यांचें संरक्षणकरण्यासाठीं विशेष उपाय अंमलांत आणणें भाग पडलें पण त्यामुळें या गोऱ्या लोकाना पुरेसे मजूर मिळेनात तेव्हा वर्षातून २ महिने तरी मजुरानीं सार्वजनिक काम केलेंच पाहिजे असा एक जाहीरनामा सरकारनें काढला. त्यावेळपासून या काळ्या मजुराच्या हालाला सुरवात झाली.

इ स. १९१२ च्या जुलैमध्यें जिरौर्ड यानें राजीनामा दिला व त्याच्या दर्जी सर एच्. सी. बेलफील्ड हा नवीन गव्हर्नर आला जुबालंडमध्यें मेहेशन जातीच बंडखोरीचें धोरण स्वीकारल्यामुळें तसेंच अबिसिनियाच्या टापूंतल्या सोमालिलॅडच्या सरहद्दीवरल प्रांतात तुरकान व इतर जातींनी धामधूम सुरू केल्यामुळें, सरकारला त्याच्या बंदोबस्तासाठीं तजवीज करणें भाग पडलें. १९१४ मध्यें महायुद्धाला सुरुवात झाली तेव्हा येथील वसाहतवाल्यानी व काळ्या रहिवाशानीहि आपापली पलटणें उभारलीं. १९१६ च्या मार्च पर्यंत या पलटणींनीं जर्मन लोकाच्या हल्ल्याला उत्तम प्रकारें तोंड देऊन जर्मन लोकाचा पराजय केला पण या युद्धात केनियातील मूळच्या रहिवाशाना फार त्रास सोसावा लागला मालाची व युद्धोपयोगी सामानाची नेआण करण्यासाठीं लष्कराला मास पुरविण्यासाठीं या काळ्या रहिवाशाना आप ल्यातील माणसें पुरविणें भाग पडलें. तरी पण अनंत हाल सोसूनहि या रहिवाशानी दोस्त राष्ट्राना अमोलिक साहाय्य केलें. यातच जुबालंडमधील बंडखोर जातींनीं पुन्हा त्रास देण्यास सुरवात केली तेव्हा त्याच्या बंदोबस्तासाठींहि ब्रिटिश सरकारला तावडतोब व्यवस्था करणें भाग पडलें.

१९१७ मध्यें बेलफील्डनें राजीनामा दिल्यामुळें सर बौरिंग याची त्या जागीं नेमणूक झाली. बौरिंगच्या कौन्सिलनें नेमलेल्या कमिटीनें, राज्यकारभारात लोकनियुक्त प्रतिनिधींना जागा द्यावी अशा प्रकारच्या सुधारणा सुचविल्या पण त्या अमलात आल्या नाहींत.१९१९ मध्यें बौरिंगच्या जागीं सर एडवर्ड नार्दे यानी नेमणूक झाली याच्यां अमदानींत केनियात पुष्कळच असंतोष माजला. महायुद्धामुळें चलनी नाण्यासंबंधीं फार विकट परिस्थिति उत्पन्न झाली होती. केनियात मूळचें रुपया हें मुख्य चलनी नाणें होतें पण १९१५ पासून पौंड हें नाणें सरकारनें मुख्य ठरविलें व पौंडाचा भाव १५ रुपये ठरविला पण १९१७ मध्ये रुपयाचा भाव अंदाजाबाहेर वाढला १९२० मध्यें रुपयाचा भाव २ शिलिंग ९ पेन्स झाला तेव्हा ही आपत्ति टाळण्यासाठीं केनिया, युगांडा, व टांगानिका प्रदेशात रुपयाचा भाव २ शिलिंग ठरविण्यात आला याचा परिणाम केनियातील उद्योगधंद्यावर फार विपरीत होऊं लागला सरते शेवटीं वसाहतसरकारनें शिलिंग हें मुख्य नाणें करावयाचें ठरविलें.

चलनी नाण्याच्या घोटाळ्यानें ज्याप्रमाणें असंतोष माजला त्याचप्रमाणें, युद्धात भाग घेतलेल्या शिपायाना जमिनी बक्षीस देण्याच्या बाबतींतहि यश न आल्यामुळें त्याच्यामध्यें असंतोष माजला

याच सुमारास ब्रिटिश ईस्ट आफ्रिका ही ब्रिटिश सरकारचा वसाहत म्हणून ठरविण्यात आली याच्यापूर्वी ब्रिटिश

ईस्ट आफ्रिकेचा दर्जा संरक्षित संस्थान म्हणून होता. पण १९१९ मध्यें तो दर्जा बदलला. १९१९ च्या जुलैमध्यें वसाहतीच्या कायदे कौन्सिलमध्यें युरोपियन लोकांना लोकनियुक्त प्रतिनिधी निवडून देण्याचा हक्क देण्यात आला. या कायदेकौन्सिलमध्यें ५ हिंदी लोकांतर्फे, दोन अरबांतर्फे व एक सरकारनियुक्त प्रतिनिधि घेण्याचें ठरविण्यांत आलें. गोऱ्या लोकांचा मतदानाचा हक्क विस्तृत करण्यांत आला. १९२० मध्यें ब्रिटिश ईस्ट आफ्रिका ही साम्राज्याला जोडण्यात आल्याचें जाहीर करण्यात आलें व त्याला केनियाची वसाहत असें नाव देण्यात आलें. केनिया पर्वतावरून हें नाव निवडण्यात आलें. या वसाहतींत झांझिबारचा मात्र समावेश करण्यात आला नाहीं. त्याला केनिया प्रोटेक्टोरेट असें स्वतंत्र नाव देण्यात आलें. यानंतर वसाहतीच्या संरक्षणासाठीं बंदरें बांधणें, रेल्वे बांधणें, इत्यादि सार्वजनिक कार्यांसाठीं मोठें कर्ज काढण्यात आलें.

पण राज्यकारभारामध्यें जी अदलाबदल झाली व त्यात गोऱ्यांना जे अधिक हक्क मिळाले त्यामुळें केनियातील रहिवाशामध्यें मात्र असंतोष माजण्यास सुरवात झाली. वास्तविक पहाता गोऱ्या लोकांपेक्षा दुप्पट तिप्पटीनें, काळ्यांची संख्या अधिक, पण राज्यकारभारामध्यें त्यांना मज्जाव होता. ब्रिटिशांच्या नेहमींच्या धोरणाला धरूनच हें होतें पण काळ्या रहिवाशांना हें न खपून त्यांनी याविरुद्ध चळवळीस सुरवात केली. राष्ट्रीयत्वाची ज्योत त्यांच्यामध्यें हळू हळू पेटूं लागली होती. या लोकांनीं गोऱ्या लोकांच्या बरोबरीनें आपल्यास हक्क मिळावे यासाठीं चळवळ सुरू केली. पण केनियातील गोऱ्या लोकांना हें कसें खपणार? आपण केनिया वसाहतीची वाढ केली तेव्हां आपणाला केनियाच्या राज्यकारभारांत अधिक हक्क असलेच पाहिजेत असा या गोऱ्या लोकांनीं कांगावा करण्यास सुरवात केली. शिवाय आपण वर्णदृष्ट्या या काळ्या लोकांपेक्षा श्रेष्ठ आहों असेंहि त्यांनीं प्रतिपादण्यास आरंभ केला. या वर्णविषयक श्रेष्ठत्वाच्या विधानाला जरी वसाहत सरकारनें कबुली दिली नाहीं तरी राज्यकारभारात गोऱ्या लोकांचा हक्क अधिक असणें जरूर आहे या मतास मात्र वसाहत सरकारनें दुजोरा दिला. यावेळीं लॉर्ड मिलनर हे वसाहतमंत्री होते. त्यांनीं या गोऱ्या लोकांच्या दोन्हीं विधानांना आपली संमति दिली व गोऱ्या लोकांसाठीं केनियामधील उंचवटयाचा जो चांगला प्रदेश आहे तो वसाहत करण्यासाठीं त्यांना स्वतंत्र द्यावा अशी तोड सुचविली. पण याचा केनियातील हिंदी रहिवाशांनी तीव्र निषेध केला व आपल्याला गोऱ्या लोकांबरोबर समान हक्क मिळावेत अशी न्याय्य मागणी पुढें मांडली. सुदैवानें हिंदुस्थान सरकारनें व भारत मंत्र्यांनीं हिंदी लोकांची बाजू घेतली. हिंदुस्थान सरकारनें पार्लमेंटाकडे १९२० च्या आक्टोबर महिन्यात एक खलिता पाठविला त्यात वर्णमूलक श्रेष्ठत्वाला अजीबात फाटा देण्यात येऊन सर्वांना मतदानाचे समान हक्क देण्यात यावेत असा मजकूर होता. १९२१ च्या जूनमध्यें चर्चिल हे वसाहत मंत्री झाले व त्यांनीं वर्णविषयक श्रेष्ठत्वाला अजीबात फाटा दिल्याचें जाहीर केलें.

लो क सं ख्या.—१९०० मध्यें केनिया वसाहतींत गोऱ्यांची लोकसंख्या ५५७०, आशियाटिक लोकांची १७४२७ व अरबांची ८००० होती. मूळच्या रहिवाशांची एकंदर संख्या २६,२०,००० इतकी होती. मोंबासा हें केनियातील मुख्य बंदर होय. त्याची लोकसंख्या ३२००० होती. नैरोबी राजधानीची लोकवस्ती १९,२७४ असून त्यात २०७० यूरोपियन व ५००० हिंदू होते.

व्या पा र.—१९१८-१९१९ या वर्षांत ३३,९७,००० पौंडांची आयात व २४,९८,००० पौंडांची निर्गत झाली. वसाहतीचें उत्पन्न १५,४८,००० पौंड व खर्च १५,७०,००० इतका झाला. १९२०-२१ मध्यें, उत्पन्न व खर्च ३१,९२,००० पौंड होता.

के नि या ती ल हिं दी लो क.—सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे सभासद रा. वझे हे केनियात जाऊन आल्यावर तेथील लोकांसंबंधीं पुढील माहिती त्यांनीं ज्ञानप्रकाशात प्रसिद्ध केली आहे.— केनियात सुमारें २२,००० हिंदी लोक आहेत. त्यात गुजराथी लोकांचा विशेष भरणा आहे. गुजराथी लोकांच्या खालोखाल पंजाबी लोकांची संख्या आहे. दक्षिणी अगर मद्रासी लोक केनियात एकंदरींत फारच कमी आहेत. पंजाबी लोकांची संख्या सुमारें सहा हजार आहे. त्यापैकीं बहुतेक लोक कारागिरी करणारे आहेत. गुजराथी लोकांत लहानमोठा व्यापार करणारे बरेच लोक आहेत.

केनियातील डोंगरपठारावरील चांगली व सुपीक जमीन यूरोपियन लोकांनीं आपल्या मालकीची केली आहे. यूरोपियनांनीं आपल्याकडे घेतलेल्या उंच पठारावरील सुपीक जमीन एकूणऐंशी लक्ष एकर आहे. पण तींत ते सर्वत्र लागवड करतात असें नाहीं. केनियातील लोलँड म्हणजे सखल अशा जमिनी हिंदी लोकांच्या वाटयास बहुतेक आलेल्या आहेत. केनियातील बऱ्याच हिंदी लोकांना स्वतःची शेतीवाडी नसल्याकारणानें तेथें कायम राहणें अशक्य होऊन जातें. बोहरी व आगाखानी जातीचे कांहीं लोक तेथें कायमची वस्ती करून राहिले आहेत. पण एकंदरीनें पाहिलें तर व्यापार व इतर धंदे यावर उपजीविका करणाऱ्या हिंदी लोकांची संख्या बरीच मोठी आहे. सरकारी वरिष्ठ नोकऱ्यात हिंदी लोकांचा प्रवेश होणें मुळींच शक्य नसतें. कारकुनाच्या जागा हिंदी लोकांना मिळतात. पण त्या मिळण्यास सुद्धां बरेच प्रयास पडतात. यूरोपियन लोकांना मात्र वाटेल त्या हुद्याच्या जागा मिळूं शकतात, व त्याचें असुक शिक्षण झालें असलें पाहिजे अशीहि कायद्यानें आडकाठी घालण्यात आलेली नाहीं. कलोनियल सेक्रेटरीला वाटेल त्या इसमास वाटेल तेथें नेमण्याचा अधिकार

आहे. वरच्या दर्जाच्या नोकऱ्या मिळण्यास एखादी परी क्षेची अट ठेवण्यात येईल तर हिंदी लोकहि सदर परी क्षेत यूरोपियन लोकांशीं स्पर्धा करून वरच्या नोकऱ्या मिळवू शकतील

केनियांतील रेल्वेवरील नोकरींच्या जागा मात्र बऱ्याचशा हिंदी लोकाकडेच आहेत असें म्हटलें तरी चालेल तिकडे हिंदी डॉक्टर, बॅरिस्टर वगैरे लोक आहेत पण त्यांची संख्या फारच थोडी आहे यूरोपियन डॉक्टराकडे कांहीं हिंदी रोगी औषध घेण्याकरितां जातात पण हिंदी डॉक्टराकडे एक देखील यूरोपियन पेशन्ट कधींहि येत नाहीं हिंदी लोकांकरितां बऱ्याच शाळा स्थापन करण्यात आल्या आहेत. धर्मशिक्षणाच्या बाबतींतहि सरकारची आडकाठी मुळींच नाहीं मिशनरी लोकांना धर्मशिक्षणाची मुभा द्यावी लागते म्हणून हिंदी लोकांनाहि तशी सवलत मिळते. शिक्षण खात्याच्या ग्रँट्स–इन–एडचे नियम चांगले आहेत यात शंका नाहीं

शाळांतून शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांची संख्या सुमारें १००० इतकीच आहे तेथील हिंदी लोकसंख्येच्या मानानं हिंदी विद्यार्थ्यांची संख्या फारच कमी आहे दुय्यम प्रतीच्या शिक्षणाच्या शाळा तेथें काढता येण्यासारख्या आहेत यूरोपियन लोकांच्या शाळांची संख्या तिकडे हिंदी लोकांच्या शाळांच्या संख्येपेक्षा चौपट आहे

केनियामध्यें १९०२ पासून हिंदी मंडळींनीं यूरोपियनास मिळालेलें अधिकाराधिक्य काढून टाकण्यासाठीं चळवळ सुरु केली या चळवळींत कर न देण्याची चळवळ होतीच १९२३ च्या जानेवारी १२ ला हिंदी मंडळींच्या बऱ्याचशा मागण्या देणारा एक आदेश कलोनिअल सेक्रेटरीकडून आला असें नैरोबीच्या स्टँडर्ड पत्रात प्रसिद्ध झालें व त्याच्याबरोबर यूरोपियन वसाहतींनें मोठ्या जोरानें निषेध केला व दंगे करण्याची धमकी दिली या आदेशाची बातमी आल्यानंतर केनियातील हिंदी लोकांनीं करबंदीची चळवळ बंद ठेवली पुढें जानेवारी ३० ला तेथील गव्हर्नरानें कलोनिअल सेक्रेटरीची योजना पुढें ठेविली त्या योजनेनें यूरोपियनास सात आठ प्रतिनिधी पाठवितां येतील व हिंदी मंडळींस चार पाठवतां येतील अशा प्रकारच्या अटी ठेवून, एकच मतदारांची यादी असावी, हिंदी लोकांच्या आगमनास अटकाव नसावा पण डोंगर पठार मात्र गोऱ्यासाठीं राखून ठेवावें असें ठरलें यूरोपीय नागरिक ही तडजोड स्वीकारावयास बिलकुल तयार नव्हते पण हिंदी मंडळी हें तात्पुरतें स्वीकारावयास तयार होती. यूरोपीय व हिंदी हीं दोन्ही मंडळी आपल्या मागणींत कांहीं एक कमी करावयास तयार नव्हतीं याच सुमारास बूइस्ली डेमोक्राट म्हणून एका साप्ताहिक पत्राच्या सीताराम आचार्य नावाच्या संपादकास यूरोपियन विरुद्ध लेख लिहिल्याबद्दल घालवून देण्याचा हुकूम सुटला फेब्रुवारींत गव्हर्नर कलोनिअल सेक्रेटरीशीं सल्लामसलत करण्यासाठीं गेला त्यामुळें पुन्हा तडजोडीस वाव मिळाला रा श्रीनिवासशास्त्री, बाळकृष्ण सिताराम कामत, जमनादास द्वारकादास व जीवनजी यांचीं केनिया प्रश्नासंबंधानं इंग्लंडात जाऊन खल करण्यासाठीं मध्यवर्ती कायदेमंडळाकडून कमिटी नेमण्यात आली आणि केनिया प्रश्नाविषयीं देशभर चळवळ करण्यात आली

केनियाच्या यूरोपियन लोकांनीहि डेप्युटेशन पाठविलेंच होतें जूनच्या अखेरीला कलोनिअलसरकारनें कायम ठराव केला त्यात जातवार सभासदांचें तत्व मान्य करण्यांत आलें लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत पाच हिंदी व अकरा यूरोपियन निवडलेले सभासद असावे पठारावरील जागा गोऱ्या आणि सखलप्रदेशातील इंडियन लोकांसाठीं राखून ठेवण्यात आली. या सन्देचा निर्णय हिंदुस्थानात कोणास आवडला नाहीं यांत नागरिकत्वाचे दोन दर्जे पाडण्याची पद्धत दिसून येते असा ना शास्त्री यांनीं शेरा मारला केनियाचें डेप्युटेशन ऑगस्ट १९२३ मध्यें परत आलें त्या डेप्युटेशननें हिंदी लोकांसबंधीं न्याय हा यूरोपियन वसाहतवाल्यांच्या दंग्याच्या भीतीमुळें दुर्लक्षिला गेला असें मत दिलें या सुमारास हिंदुस्थानात बरीच मोठी चळवळ झाली यानंतर इंपीरियल कान्फरन्समध्यें व राष्ट्रसंघापुढें हिंदुस्थानचें गाऱ्हाणें मांडण्याचा आशावाद कांहीं दिवस चालू होता इंपीरियल कान्फरन्समध्यें १ दिवस याकरितां म्हणजे वसाहतींत हिंदी मंडळींचा दर्जा यासंबधानें वादविवादासाठीं राखून ठेवला पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं हिंदुस्थानसरकारनें वसाहतींच्या विशिष्ट सरकारास प्रत्यक्ष लिहिण्यास हरकत नाहीं एवढेंच मिळवून हिंदुस्थानचे प्रतिनिधि हात हलवीत परत आले

१९२४ मध्यें केनियात हिंदी मंडळींची काँग्रेस किलिंडिनी येथें भरली सौ सरोजिनी नायडू या अध्यक्ष म्हणून गेल्या होत्या त्या प्रसंगामुळें केनियाकडे हिंदुस्थानचें लक्ष जिवंत राहिलें त्या वेळेस मिसेस नायडूंनीं आपली रहाणी सुधारण्याकडे लक्ष ठेवण्याचा उपदेश केला मेमध्यें केनिया कौन्सिल उघडलें, त्यावेळीं हिंदुस्थानी सभासद कौन्सिलला गेले नाहींत

**केनिया पर्वत**— ब्रिटिशपूर्वआफ्रिकेंतील एक मोठा ज्वालामुखी पर्वत हा विषुववृत्ताच्या किंचित दक्षिणेस व पूर्वरेखांश ३७°२' वर वसलेला आहे आफ्रिकेंतील अतिशय उंच पर्वतापैकीं हा एक असून याच्या अत्युच्च शिखराची सरासरी उंची १७,००७ फूट आहे अनेक निमुळत्या पिरामिडाकृती डोंगरांनीं बनलेला या पर्वताच्या आंतील मध्यभाग हा एका प्राचीन ज्वालामुखीचा बनलेला आहे या जुन्या ज्वलन् पर्वताची उंची पूर्वीं हल्लींच्या उंचीहून देखील २००० फुटांनीं अधिक असावी

या पर्वताचीं खरी तद्देशीय नावें म्हणजे किलिनयाग, डोयेनयो एयर ( श्वेत पर्वत ) आणि डोयेनयो एगेरे ( ठिपक्याचा पर्वत ) अशी आहेत असें सांगतात हा पर्वत

प्रथम लड्विग् काफ नामक मिशनऱ्याच्या सन १८४९ मध्यें दृष्टीस पडला नंतर जोसेफ थॉमस हा पश्चिमकडून इ स १८८३ मध्यें या पर्वतापर्यंत आला त्यानंतर काउन्ट एस् तेलेकी (स. १८८९), जे डब्ल्यू ग्रेगरी (१८९३) आणि जॉर्ज कोल्व (१८९६) हे या पर्वतावर थोडेसे चढले एच् जे मॅकिन्डरनें इ स १८९९ मध्यें पर्वतशिखरावर आरोहण केलें

**केनिलवर्थ**—इग्लंडमधील वारविकशायर परगण्यातील दक्षिण पार्लमेंटरी विभागातील एक बाजाराचें गाव लोकसंख्या (१९११) ५७७६ हें शहर पुराणवस्तुसंशोधनदृष्टीनें फार महत्वाचें आहे येथें प्राचीन किल्ल्याचे अवशेप आहेत किल्ल्याच्या जवळच ११२२ त स्थापलेल्या एका आगस्टीयन मठाचे अवशेप आहेत

पूर्वी हें सॅक्सन राजाच्या ताब्यात होतें पहिल्या हेन्रीनें हें शहर जॉफ्रेद् क्लिटनला दिलें यानेंच येथील प्रसिद्ध किल्ला बाधिला तिसऱ्या हेन्रीनें हें शहर सायमन डि मॉटफोर्ड याला दिलें १२६६ त प्रसिद्ध डिक्टम द केनिलवर्थ (केनिलवर्थ येथील जाहीरनामा) येथें जाहीर करण्यात आला इलिझाबेथ राणीनें १५६२ त हें गाव रॉबर्ट डडले, लीस्टरचा अर्ल याला दिलें याच ठिकाणीं अर्लनें राणीस मेजवान्या देऊन तिचें फार आदरातिथ्य केलें यादवींत क्रामवेलनें हा किल्ला घेऊन पाडून टाकला या ठिकाणीं कातडीं कमावण्याचा धंदा चागला चालतो

वाल्टर स्कॉटनें एक केनिलवर्थ नावाची कादबरी लिहिली आहे

**केन्सिंग्टन**—हा लडनचा पश्चिमेकडील मुख्य बरो लोकसंख्या (१९२१) १७५८६८ तिसऱ्या विल्यमनें केन्सिंग्टन येथें दरबार भरविण्यास सुरुवात केल्यापासून याची प्रसिद्धी आहे केन्सिंग्टन बागेच्या पश्चिम भागास केन्सिंग्टनें राजवाडा आहे याच राजवाड्यात विल्यम, मेरी, ॲन व जॉर्ज हे मृत्यु पावले व व्हिक्टोरिया राणीचा जन्म झाला (१८१९)

केन्सिंग्टन चौकात, ॲडिसन, टलिरँड, जॉनस्टुअर्ट मिल व इतिहासकार ग्रीन वगैरे प्रसिद्ध पुरुप रहात असत आज लडनमधील बराच शिष्ट समजला जाणार वर्ग दक्षिण केन्सिंग्टन येथें रहातो

व्हिक्टोरिया व आलबर्ट अथवा दक्षिण केन्सिंग्टनपदार्थ संग्रहालयाजवळच असलेलें सृष्टिविषयक संग्रहालय हीं प्रेक्षणीय आहेत. केन्सिंग्टन बागेंत १८५१ चें प्रसिद्ध प्रदर्शन भरलें होतें याशिवाय नगरभवन, मोफत ग्रंथालय, सार्वजनिक उपयोगासाठीं दिलेलें लॉर्ड लिटनचें गृह ह्या इमारती प्रेक्षणीय आहेत केन्सिंग्टनतर्फे पार्लमेंटात दोन सभासद जातात बरो कौन्सिलात एक मेयर, १० आल्डरमेन व ६० सभासद आहेत

**केप कोस्ट**—हें ब्रिटिश पश्चिम आफ्रिकेच्या गोल्ड कोस्ट वरील एक बंदर हें आक्राच्या पश्चिमेस सुमारें ८० मैलावर उ अ ५° ५' व पश्चिम रे १° १३' यांच्यामध्यें आहेत लो स (१९११) ११३६४ बहुतेक फॅंटिस लोक आहेत यात सुमारें १०० युरोपियन व क्रुमेन लोकांची वसाहत आहे हें शहर नीस व मिकेशस स्लेट याच्या चौथऱ्यावर आहे त्यामुळें बंदराचें लाटापासून सरक्षण होतें समुद्रा ।। समोर किल्ला आहे व ता भव्य व बराच मोठा आहे जिल्हाकमिश नरचें वसतिगृह, धर्ममंदिरें, शाळा, सरकारी शाळा व वसा हतींचें इस्पितळ या मुख्य इमारती आहेत श्रीमंत लोक विटांच्या घरात रहातात रस्ते टेकड्यावरून गेलेले आहेत व शहराच्या पूर्वेस व उत्तरेस उचवटयाची जागा व पश्चि मेस उथळ पाण्याचें सरोवर आहे शहराच्या पश्चिमेस व्हिक्टोरिया किल्ला व पूर्वेस फोर्ट वुइल्यम हे आहेत

पोर्तुगीजानीं १६१० मध्य येथें प्रथम वस्ती केली १६५२ मध्यें स्वीड लोकांनीं येऊन किल्ला बाधला व त्याचें नाव कॅरोलुस्बर्ग ठेवलें १६५९ मध्यें डचानीं तावा मिळविला परतु इंग्लिशानीं १६६४ मध्यें किल्ला घेतला व डिरुटरचा १६६५ मधील, फ्रेंचाचा १७५७ मधील व एतद्देशीयाचे कित्येक हल्ले झाले तरी सोडला नाहीं गिनीच्या किनाऱ्यावरील एल्मिनाचे खालोखाल हा किल्ला बळकट मानला गेला आहे या किनाऱ्या वरील ब्रिटिश वसाहतवाल्याची राजधानी येथेंच १८७६ पर्यंत होती नतर राज्यकारभार आक्राला नेला अद्याप हें गोल्ड कोस्टवरील एक मुख्य बंदर आहे येथूनच कुमासीला रस्ता गेला आहे १९०५मध्यें याला स्थानिक राज्यकारभार देण्यात आला किल्ल्याच्या अगणात जॉर्ज मॅक्लीन वसाहतीचा गव्ह र्नर व त्याची बायको याची थडगीं आहेत शहराच्या पूर्वे कडची जमीन सोन्याच्या खाणीवाल्यानीं टाकून दिलेल्या खाचानीं भरलेली आहे एतद्देशीयाच्या सात टोळ्या आहेत, व प्रत्येक टोळीवर नायक असतो व प्रत्येकीच्या चालीरीती वस्तुपूजा निरनिराळ्या प्रकारच्या आहेत

**केप टाउन**— दक्षिण आफ्रिकेंतील केप प्रांताचें राजधानीचें शहर हें द अ ३३° ५६' व पूर्वरेखांश १८° ते २८' यावर आहे केपद्वीपकल्पाच्या वायव्य टोंकास हें शहर आहे हें जलमार्गानें लडनहून ६१८१मैल व जोहान्सबर्गच्या नैर्ऋत्येस रेल्वेनें ९५७ मैल आहे उपसाग राच्या पाठीमागें टेबलपर्वत आहे पूर्वस डेव्हिल पर्वत आहे व पश्चिमेस सिंहाल टेंकडी आहे शहराची डच छत्र नाहींशी होऊन इंग्लिश पद्धतीचें साम्राज्य सुरू झालें आहे येथें मलाया लोक पुष्कळ आहेत १६६६ सालीं बाधलेल्या किल्ल्यात केपचा पहिला सुभेदार व्हॅनरेबीक याचा पुतळा आहे. ॲडर्ली आणि गव्हर्नमेंट अव्हेन्यु हे येथील प्रसिद्ध राजरस्ते आहेत याच्या बाजूनीं तारऑफिसें, जकातघर, पेढ्या वगैरे आहेत प्राचीन इमारतींपैकी फक्त घडाळ्मनोरा अस्तित्वात आहे अव्हेन्यु सडकेवर पार्लमेंट कचेऱ्या व यहुदी मंदिर

आहे. पश्चिमेकडील बाजूस, अँग्लिकन प्रार्थनामंदिर, व्याकरण शाळा, सार्वजनिक वाचनालय, बोटानिकल गार्डन्स व पदार्थसंग्रहालय इतक्या इमारती आहेत. वाचनालयासमोर केपचा सुभेदार जॉर्ज ग्रे याचा पुतळा आहे. व्हिक्टोरिया रस्त्यावर विद्यापीठाची इमारत आहे. सेंट जॉर्ज रस्त्याच्या पश्चिमेस ग्रीनमार्केटचा चौक आहे. रेनीस चौकात गुलामाचा बाजार असे. कवाइतीच्या मैदानासमोर असलेल्या घंटाघराजवळ सातवा एडवर्ड याचा पुतळा आहे. बंदराच्या पश्चिमेस समरसेट दवाखाना आहे ग्रीनपॉइंट व डेव्हिल पर्वता जवळील शहरची खेडी टामगा व रेल्वेनें खास शहरास जोडलेली आहेत.वुडस्टॉक येथें ०६ साली ब्रिटिशांनी डच लोकांचा पराभव केला. डाइप नदीच्या मुखाजवळ टेबल उपसागराच्या ईशान्येस मिलर्नर्टन नावाचे खेडें आहे. मेटलडला केपटाउनची वेधशाळा आहे. शहरापासून ५ मैलावर असलेल्या रॉंडेबोश येथें डच वाडे आहेत. येथें ग्रूटस्कर नावाची प्रसिद्ध डच इमारत आहे. न्यू लँडस् हें आर्चबिशप राहण्याचें ठिकाण आहे. कॉन्स्टँटिआ, म्युझिनबर्ग व काल्कवे हीं खेडीं शहरापासून जरा दूर आहेत. उन्हाळ्यात आग्नेयीकडून वाहणाऱ्या वाऱ्याला ' केपडॉक्टर ' ही संज्ञा आहे.

बंदराचें मुख्य काम १८६० साली सुरु झालें यात पुष्कळ जहाजांचा समावेश होतो. आल्फ्रेड आणि व्हिक्टोरिया नावाच्या गोद्या या बंदरात आहेत. येथून इंग्लंडशी आगबोटींचें दळणवळण आहे. शहरच्या बचावाकरिता साम्राज्याचें लष्कर व स्थानिक लष्कर येथें आहे. हें शहर सायमन्स टाउन,शहराशीं रेल्वेनें जोडलें आहे. नेदर्लंड ईस्ट इंडिया कंपनीनें पाठविलेल्या जॅन व्हॅन रेबेकनें १६५२ साली हें शहर वसविलें. १८०२ साली येथें म्युनिसिपालिटी स्थापण्यात आली. १९०४ साली डॉक्टर अबदुल रहिमान येथील कौन्सिलात निवडून आला, केपटाउन येथें दक्षिण आफ्रिकेला लागू होणारे कायदे करतात.

येथें एक विद्यापीठ असून हें ॲंग्लिकन व कॅथॉलिक पंथाच्या बिशपाचें राहण्याचें ठिकाण आहे.

इ. स. १९१३ मध्यें केपटाउन शहराची हद्द वाढवण्यात येऊन त्यामध्यें ग्रीनपाइंट, सी पाइंट, वुडस्टॉक, मेटलंड, मॉब्रे, रॉंडेबाश, क्लेरमॉंट, कल्कबे, मुइझेनबर्ग, इत्यादि गावें सामील करण्यांत आलीं हीं गावें सामील झाल्यामुळें केपटाउनची हद्द टेबलबेपासून फाल्सबे येथपर्यंत म्हणजे जवळ जवळ १७ मैल झाली व केपटाउनचें क्षेत्रफळ ५९ चौरस मैलापेक्षा अधिक झालें. १९१८ मध्यें केपटाउनची लोकसंख्या १,८१,६९३ इतकी होती त्यात ९९,६९३ गोरे व ८२०४० काळे लोक होते.

केपटाउन हें व्यापारी लोकांचें व धंदेवाल्या लोकांचें केंद्र आहे. १९१०-२० च्या दरम्यान केपटाउनची भरभराट फार झाली व या कामीं म्युनिसिपालिटीनें फार पुढाकार घेतला आक्टोबर ते मार्च या महिन्यात साउथ आफ्रिकेंतील लोकांचें केपटाउन हें विश्रांतीचें स्थान आहे

दक्षिण आफ्रिकेंतील बंदरामध्यें दरवानच्या खालोखाल, केपटाऊनचा नंबर लागतो. १९१९ मध्यें २२,५३,००० टन वहनशक्तीचीं ब्रिटिश जहाजें व ४२८००० टनाचीं परराष्ट्रीय जहाजें केपटाउनमध्यें उतरलीं केपटाउन व साउथवेस्ट प्रोटेक्टरेट यामध्यें सन १९१५ मध्यें रेल्वे झाली व १९१८ मध्ये, उत्तरेस लुभलनापर्यंत तिचा विस्तार झाला. १९११ मध्य स्लंगकॉप येथें बिनतारी विद्युद्यंत्र स्थापण्यात आलें. व १९१९ मध्यें विमानगृह यंगफील्ड येथें स्थापण्यात आलें.

केपटाउनच्या मध्यापासून पाच मैलावर रॉंडबाश नावाचा एक शहराचा भाग आहे त्या ठिकाणीं उत्तम इमारती दृष्टीस पडतात. या भागातच ग्रूटशर या इमारतींत युनियनचा मुख्य प्रधान राहतो याच ठिकाणीं, केपटाउनच्या विश्वविद्यालयासाठीं जागा घेण्यात येऊन त्याठिकाणीं प्रचंड इमारत उठविण्यात आली ग्रूटशोर येथच ऱ्होड्सचें स्मारक उभारण्यात आलें रॉंडेबाशच्या जवळच सन१९१४ मध्यें नॅशनल बोटॅनिकल गार्डन्स बाधण्यात आली सन १९१४ मध्यें हेबलवे येथें समुद्राकडे तोंड करून एक मोठी फिरण्याची जागा बाधण्यात आली

**केप प्राव्हिन्स**—' दक्षिण आफ्रिका संघा ' तील हा सर्वात मोठा प्रात आहे इ स १९११ च्या खानेसुमारींत या प्रांताची लोकसंख्या २५,६४,९६५ भरली. त्यापैकीं ५,८२,३६७ इतकी गोऱ्याची वस्ती होती व इतर निरनिराळ्या जातींचा लोकसंख्या १९,८२,५८८भरली.इतर जातींमध्यें मुख्यतः बंटू (१५,१९,५३९ )व आशियाटिक (७६९०) या जातींचे लोक होते. या प्रातात केपटाउन( १,६१,८५९ ), किंबर्ले ( ४४४३३ ), पोर्ट एलिझाबेथ ( ३७०६३ ), ईस्ट लंडन ( २४६०६ ) व ग्रहम्सटाउन ( १३८३० ) हीं मुख्य शहरें आहेत

रा ज्य व्य व स्था.-या प्रांताचा राज्यकारभार प्रांतिक कौन्सिलमार्फत चालविला जातो. हें प्रांतिक कौन्सिल दर तीन वर्षांनीं नवीन निवडलें जातें अॅक्ट ऑफ युनियननें ठरविलेल्या सर्व विषयावर तसेंच युनियन पार्लमेंटनें ठरवून दिलेल्या सर्व विषयावर कायदे करण्याचा या कौन्सिलला पूर्ण हक्क आहे. प्रांतिक कारभाराला लागणाऱ्या पैशासाठीं कर बसविण्याचा या कौन्सिलला अधिकार आहे. तसेंच म्युनिसिपालिट्यावर देखरेख ठेवणें. प्राथमिक शिक्षणाची सर्व तजवीज करणें या गोष्टी या कौन्सिलाकडे असून तन्निमित्त लागणारा पैसा, कराच्या रूपानें उभारण्याची या कौन्सिलला पूर्ण मुखत्यारी आहे. युनियन पार्लमेंटच्या अधिकारांशीं व हितासंबंधीं विरोधी असे कायदे पास करण्याला या कौन्सिलला अधिकार नाहीं तात्पर्य कौन्सिल कायदे करणारी संस्था जरी आहे तरी त्याच्यावर युनियन पार्लमेंटचा पूर्ण

हुकमत चालते. या प्रांताला स्वतंत्र न्यायखातें नाहीं. रेल्वे, येदरें ही सर्व यूनियन पार्लमेंटच्या ताब्यात आहेत.

या प्रांतिक कौन्सिलला आपला अध्यक्ष निवडण्याचा पूर्ण अधिकार आहे. राज्यकारभाराची प्रत्यक्ष व्यवस्था पहाण्याकरता कौन्सिल चार माणसांची कमीटि नेमते या कार्यकारी मंडळाच्या मुख्याला अॅडमिनिस्ट्रेटर असें नाव आहे. हा अॅडमिनिस्ट्रेटर दर पांच वर्षांनी नवीन नेमला जातो त्याचप्रमाणें एक प्रांतिक हिशेब तपासनीस व कायदेपंडितहि यूनियन पार्लमेंटतर्फे निवडण्याची पद्धत आहे.

इ. स. १९१३ व १९१७ च्या फायनॅन्शियल रिफार्म्स ॲक्टान्वयें यूनियन सरकार या प्रांतिक सरकारला दरवर्षी त्या प्रांताला येणाऱ्या खर्चाचा निम्मा खर्च देतें. १९१७–१९१८ सालीं प्रांतिक सरकारला यूनियन पार्लमेंटकडून ९,९९,००० पौंड वर्गणी मिळाली प्रांतिक सरकारास खास प्रांतिक उत्पन्न ४२,५०,०० पौंड झालें १९१७–१८ सालीं प्रांतिक खर्च १४,७७,००० पौंड झाला त्यात केवळ शिक्षणाकरिता ११,०५,०० पौंड खर्च झाले

इतिहास—इ स १९१० मध्यें 'यूनियन' अस्तित्वात येईपावेतों राजकीयदृष्ट्या केप प्राव्हिन्सला स्वतंत्र इतिहास असा नव्हताच. दक्षिण आफ्रिकेंतील राजकीय पक्ष प्रांतिकदृष्ट्या बनलेले नाहींत पण सर्व राजकीय पक्ष ब्रिटिशांशीं संबंध तोडण्याच्या बाबतींत एक मताचे आहेत. अंतर्गत राज्यकारभारात प्रांतिक कौन्सिलनें आपलें धोरण पूर्णपणें प्रांतिक ठेवलें आहे. शिक्षणाच्या बाबतींत कौन्सिल तर फारच खबरदारी घेतें. यूनियन अस्तित्वात आल्यानंतर या प्रांताचा पहिला अॅडमिनिस्ट्रेटर सर एन्. एफ् डी वाल झाला याची अॅडमिनिस्ट्रेटर या नात्यानें दोनदा निवडणूक झाली व तिसऱ्या खेपेसहि पुन्हा त्यालाच निवडण्यात आलें.

इ. स. १९१०–२० च्या अवधींत औद्योगिक व कृषिविषयक वाढ बरीच झाली गोऱ्या लोकांइतकीच इतर वर्गांच्या लोकांतहि सामाजिक व औद्योगिक बाबतींत प्रगति करण्याबद्दल अटोकाट प्रयत्न करण्यात आले.

**केप्लर योहान**—( १५७१—१६३० ) या जर्मन ज्योतिःशास्त्रज्ञाचें चरित्र व त्याचे शोध 'विज्ञानेतिहास' या विभागात ( पा. ३४३—३४५ ) दिले आहेत. त्या ग्रंथात न आलेली माहिती येथें ग्रथित केलेली आहे.

आईबापाच्या दुर्दैवाचे व गैरवागणुकीचे परिणाम जोहानला लहानपणीं भोगावे लागले एवढेंच नव्हे तर देवीच्या दुखण्यामुळें त्याच्या हाताची पूर्ण वाढ खुंटून त्याची दृष्टिहि मंद झाली

भविष्य वर्तविणारीं पंचांगें रचणें हा धंदा त्या काळांत जर्मनींत लोकप्रिय होता. ग्रहांचे परिणाम पृथ्वीवर होतात हे त्यास स्वानुभवावरूनच कळलें व प्रतिपक्षी पडणाऱ्या गोष्टी तो वर्तवूं लागला १५९५ मध्यें बारबरा व्हॉन मूहलेक नांवाच्या एका संपन्न स्त्रीशीं त्याचें लग्न झालें

टायकोब्राहेच्या आकस्मिक मृत्यूमुळें केप्लरला पुढें येण्यास चांगली संधी मिळाली. बादशहा दुसरा रुडोल्फ यानें त्याची सरकारी गणिती म्हणून नेमणूक करून टायकोचे सर्व कागदपत्र त्याच्या स्वाधीन केले. टायकोनें आरंभिलला रूडोल्फाइन नांवाचा अपूर्ण ग्रंथ पूर्ण करण्याचें श्रमदायक पण गोड असें काम केप्लरवर पडलें ' डी फंडामेंटिस आस्ट्रोलोजी सर्टिऑरिबस " या ग्रंथात केप्लरची कल्पनाशक्ति व सत्यनिष्ठा व्यक्त होते. स्वाभाविक फल व शक्यता यावर आधिष्ठित होऊन वर्तविली जाणारी त्याची भविष्यें जनसम्मत होऊं लागली बादशहा व इतर लोक यांच्या कुंडल्या त्यानें मांडल्या अशा हलक्या धंद्याकडे व धर्मभोळेपणाकडे आपणास वळण्यास मूळ कारण परिस्थिति होय असें त्याचें म्हणणें असे.

तरी केप्लरनें आपल्या आयुष्यातील मुख्य उद्दिष्टाची केव्हांच हयगय केली नाहीं त्याचा दृक्शास्त्राचा अभ्यास १६०४ मध्यें ' अॅस्ट्रोनोमिया पार्स ऑप्टिका' या पुस्तकानें मूर्त स्वरूपास आला दृक्शास्त्रांतील शोध व वर्कभवनाच्या खऱ्या सिद्धांताचा उगम या दोन गोष्टी उपयुक्त ग्रंथात दिसून येतात. १६०९ च्या सुमारास मंगळासंबंधीं त्याचा शोध पूर्ण झाला.

इ. स. १६११ हें वर्ष केप्लरला फार खडतर गेलें त्याची बायको विषमज्वरानें मृत झाली. कौटुंबिक दुःखात वाह्य आपत्तीची भर पडली. त्याच वर्षी रुडोल्फला घालवून देऊन मॅथिअसनें प्रेगची बोहिमियन राजसत्ता बळकाविली. तथापि दरबारी गणिती म्हणून केप्लरचें स्थान कायम राहिलें. बादशहा मॅथिअस याच्या सांगण्यानें जर्मनींत ग्रेगोरिअन पंचांग सुरू करण्याचा त्यानें १६१३ मध्यें प्रयत्न केला. काही निबंधातून त्यानें प्रसिद्ध केलें कीं, खिस्तजन्मशक सर्वांनी मान्य केलेल्या तारखेपेक्षा ५ वर्षे आधीं आहे.

सुसना रटलिंगर नावाच्या एका निराधार बाईशीं त्याचें दुसरें लग्न लिंझ येथें १६१३ त झालें या लग्नामुळें त्याला अनुरूप व सुखावह असें त्याचें वैवाहिक आयुष्य गेलें भाडयाचें घनफळ काढण्याच्या सदोष पद्धतीकडे त्याचें लक्ष वेधल्यामुळें त्यानें या विषयावर एक निबंध लिहिला व त्याच्या योगानें सूक्ष्मार्चे गणित करणाऱ्यांमध्यें त्याची गणना होऊं लागली. १६१८ च्या तीन धूमकेतूंवरील आपले विचार ' डी कॉमेटीस ' पुस्तकामध्यें त्यानें प्रसिद्ध केले या ग्रंथाच्या प्रकाशनामुळें त्याचा तिसरा सिद्धांत लोकांपुढें आला. इंग्लंडचा पहिला जेम्स यास हें पुस्तक अर्पण करण्यात आल्या नंतर त्याला दरबारी निमंत्रण आलें. परंतु केप्लर इंग्लंडास जाऊं शकला नाहीं

'दि एपिटामी अस्ट्रॉनमी कोपर्निकन' या नावाचें कोपर्निकसच्या शास्त्रावर सुबोध व सुंदर पुस्तक त्यानें लिहिलें. या पुस्तकात भौतिक ज्योतिषशास्त्राला महत्व दिलेलें असून ज्योन्हिअन नियमाच्या पद्धतीचाहि त्यात अंतर्भाव केलेला आहे. १६२० साली त्यानें प्रथम लागरिथम उपयोगांत आणिले व १६२४ मध्यें या विषयावर एक पुस्तकहि लिहिलें.

कौटुंबिक त्रासामुळें केप्लरच्या अभ्यासात फार व्यत्यय येई. त्याची आई कॅथेराइन केप्लर हिचा स्वभाव मोठा उपद्यापी होता.

१६१० मध्यें जादुगारीण व चेटकी अशा आरोपावर या ७४ वर्षांच्या म्हातारीस कोर्टाकडून पकडण्यात आलें. तेरा महिने तुरुंगवास भोगल्यानंतर केप्लरच्या अविश्रांत खटपटीमुळें तिची सुटका झाली. नंतर लवकरच तिनें इहलोक सोडला.

यावेळीं नवीन कोष्टकें तयार करण्यांत केप्लर व्यग्र झाला होता. आर्थिक अडचणी व धार्मिक आणि आपसांतील तंटे यामुळें त्याची खरी मनीषा तृप्त होणें दूरच राहिलें. जून १६२४ ते ऑगस्ट २९सन १६२६ पर्यंत लिंझला वेढा पडून वेढाळी माजली होती युलम येथें आपले सिक्के किंवा टैप घेऊन जाण्याची परवानगी मिळताच स.१६२७मध्यें रुडोल्फाइन टेबल्स नांवाचें त्यानें आपलें पुस्तक जगापुढें आणलें.

दुसऱ्या फर्डिनन्ड बादशहानें मीएढलेंडच्या उमरावाकडे केप्लरला नोकरी लावून दिली व १६२८ त केप्लर सहकुटुंब सायलेशियांतील सागन येथें रहाण्यास गेला. त्या ठिकाणीं १६२९ मध्यें 'ए नोटिस टु दि क्यूरिअस इन धिंग्ज सिलेश्चिअल' या नावाचें व ज्योतिषांना आगामी संक्रान्तीबद्दल सूचना देणारें पुस्तक त्यानें प्रसिद्ध केलें. त्यात नमूद केल्याप्रमाणें ७ नोव्हेंबर १६३१ रोजीं पॅरिसमध्यें गॅसेंडीला बुधाचें संक्रमण प्रत्यक्ष दिसलें. ६ डिसेंबरला होणारें शुक्राचें संक्रमण पश्चिम यूरोपांत मात्र अदृश्य झालें होतें. १५ नोव्हेंबर १६३० रोजीं वयाच्या ५९ व्या वर्षी केप्लर मरण पावला. पहिल्या बायकोकडून ५ व दुसरीकडून ७ अशीं १२ मुलें केप्लरला झालीं. परंतु त्यापैकीं लहानाची मोठी होऊन अवघीं दोन मुलेंच जगलीं.

विश्वासंबंधी केप्लरची कल्पना पायथॅगोरस व प्लेटोप्रमाणेंच होती. साधर्म्य व सौंदर्य यांच्या अमूर्त कल्पनेशीं अनुरूप अशीच मूर्त विश्वाच्या विभागाची योजना असली पाहिजे असें तो खात्रीपूर्वक सांगत असे. अशा रीतीनें प्रज्वलित झालेल्या त्याच्या प्रतिभाशक्तीला अनेक श्रमांनंतर नवीन शोध लाविता आले. सूर्याच्या मध्यबिंदूतून सर्व ग्रहांच्या कक्षांचे सपाट प्रदेश जातात या गोष्टीचें दिग्दर्शन करून सर्व ग्रहमालेची शक्ति सूर्यापासून आहे हें सिद्ध करून, केप्लरनें भौतिकशास्त्राचा संस्थापक असें सार्थ नांव जगात मिळविलें. भूमितीच्या रचना व संगीतातील अंतरा याचा ग्रहाच्या गती व अंतर या दोहोंकडे अन्योन्य संबंध आहे असें दाखविण्यात केप्लरनें आपल्या कल्पनासृष्टीतील एक चमत्कार दाखविला खरा. परंतु ज्या सिद्धान्तावर व शोधावर त्याची कीर्ति आवेष्टित झाली आहे त्या सिद्धान्ताइतकेंच महत्व तो वरील कल्पनाविलासाला देत असे. पायथॅगोरसप्रमाणेंच केप्लरची विश्वासंबंधी कल्पना आहे. मध्यबिंदु किंवा सूर्य, अचल ताऱ्याच्या क्षेत्रानें निर्दिष्ट असा पृष्ठभाग आणि ईथर नामक वस्तूनें व्याप्त असा मधील अवकाश, असें केप्लरचें त्रिदळ विश्व आहे. ग्रहाच्या परिभ्रमणाचें कारण सूर्याचें स्वतः आसाभोंवती फिरणें हें आहे असा त्याचा तर्क होता व सूर्यावरील डागाच्या शोधामुळें तो दृढमूल झाला.

असंख्य अडचणींना न जुमानता केप्लरनें केलेल्या प्रचंड कामाचा मुळींच आश्चर्यमूढ न होता नुस्ता विचार करणेंहि अशक्य आहे. त्याच्या तेजस्वी उद्योगामुळें संकटें पळून जात व यामुळें त्याला आपल्यातील उत्कृष्ट गुणाचा फायदा मानव जातीला देता आला. त्याचा स्वभाव अत्यंत प्रेमळ व मनमिळाऊ होता. दुसऱ्यातील गुण जाणण्यात त्याच्या मनाचें औदार्य प्रगट होई. यामुळें त्याला असहिष्णुतेचा कधींच बाधा झाली नाहीं. प्रक्षुब्ध मनःस्थितीतहि त्यानें प्रसन्न वृत्ती कायम राखली होती.

महाराणी दुसरी कॅथेराइन हिनें १७२७ त विकत घेतलेलें व पुलकोवाच्या वेधशाळेंत कोणाच्याहि सहसा हातास लागणारे नाहींत अशा स्थितीत पडून असलेलें केप्लरचे समग्र ग्रंथ प्रकाशात आणण्याचें काम डॉ. फ्रिशच याचे संपादकत्वाखालीं पार पडलें. या समग्र ग्रंथात, त्याच्या निबंधाचा, चरित्राचा व पत्रव्यवहाराचा अन्तर्भाव झाला आहे. 'जोहानीस केप्लेरा ऑपेरा ऑमनिया' असा या समग्र ग्रंथाचा मथळा असून तो फ्रँकफोर्ट येथें १८५८—१८७१ पर्यंत एकंदर आठ विभागात छापून प्रसिद्ध झाला आहे.

**कॅंब्रिज**—( १ ) हें इंग्लंडातील केंब्रिजशायर नावाच्या परगण्याचें मुख्य ठिकाण असून हें पार्लमेंटचा बरो आहे. हें लंडनच्या ईशान्येस आगगाडीनें ५६ मैल आहे. येथील लोकसंख्या १९२१ मध्यें ५९,२६२ होती. या शहराचा बराचसा भाग कॅम नदीच्या पूर्व किनाऱ्यावर आहे. याचें क्षेत्रफळ ३२३३ एकर आहे. ब्रिटिश साम्राज्यातील विश्वविद्यालयांत येथील विश्वविद्यालयाचा ऑक्सफोर्डप्रमाणें पहिला नंबर आहे. इ. स. १२८१–८४ मध्यें येथें पहिलें कॉलेज काढण्यांत आलें. पुढें निरनिराळ्या वेळीं येथें बऱ्याच कॉलेजांची स्थापना झाली. त्यांत क्लॅरिस्ट पिटरहाऊस ( १२८४ ), क्लेअर (१३२६)पेंब्रोक ( १३४७ ),

ट्रिनिटी ( १३५० ), कार्पस (१३५२), गॉनविले (१३४८), किंग्स ( १४४१) क्वीन्स( १४४८), जीझस (१४९६) ख्राइस्ट (१५०५),मॅग्डेलीन(१५४२),एम्यानुएल (१५८४) डाऊनिंग (१८००)वगैरे मुख्य आहेत या कॉलेजाना जोडलेली प्रार्थनामंदिरें, वाचनालयें, पदार्थसंग्रहालयें, निरनिराळ्या उपयोगाकरिता प्रयोगशाळा, वेधशाळा वगैरे अनेक संस्था आहेत. या विद्यालयांत कॉलेजात न जाणारे विद्यार्थीहि अभ्यास करितात व त्यांच्याकरिता एक वाचनालय व कांहीं व्याख्यानगृहें आहेत. येथें स्त्रियांकरिता दोन कॉलेजें आहेत

विश्वविद्यालय ( युनिव्हर्सिटी ) म्हणजे या सर्व कॉलेजाचा संघ होय या कॉलेजाना विश्वविद्यालयाच्या कायद्याप्रमाणें चालावें लागतें. एलिझाबेथ राणीच्या वेळच्या विश्वविद्यालयाच्या कायद्याचें इ.स १८५८ मध्यें रूपांतर झालें. यांतहि पुन्हा १८७२ व १८८२ त सुधारणा करण्यात आल्या. त्याप्रमाणें चान्सेलर हा विश्वविद्यालयाचा मुख्य असतो. हा विश्वविद्यालयाचा सभासद असून सीनेटनें निवडलेला उच्च दर्जाचा मनुष्य असतो. हा येथील रहिवासी नसला तर हा आपले अधिकार दुय्यम चान्सेलरला देतो व हाहि सीनेटनें एक वर्षाकरिता निवडलेला असतो. याच्या हाताखालीं दोन प्रॉक्टर असतात व हे क्रमाक्रमानें दोन कॉलेजें मिळून एक याप्रमाणें निवडले जातात. यांना मदतनीस म्हणून ४ प्रो-प्रॉक्टर असतात. विश्वविद्यालयाच्या सभासदात शिस्त राखण्याकरिता चान्सेलर व सीनेटनें नेमिलेले सहा विद्यालयाचे मुख्य अधिकारी मिळून एक सभा असते.

सीनेटला कायदे करण्याचा अधिकार असतो. या सीनेटात चान्सेलर, दुय्यम चान्सेलर, कायदा, वैद्यकी, शास्त्र, वाङ्मय वगैरेंचे डॉक्टर व कायदा, गायनवादन, वैद्यकी व कला याना अभ्यास करून मास्टर ( पारंगत ) पदवी घेतलेले लोक याना मत असतें. सीनेटचें कौन्सिल सर्व सूचना व ठराव सिनेटपुढें आणतें.

केंब्रिज विश्वविद्यालयात सुमारें ३००० विद्यार्थी असतात. कालेजातील अभ्यासाच्या तीन टर्म्स असतात व त्यात एकंदर २२० दिवस येतात. ९ टर्म्स राहिल्यानंतर अंडर ग्रॅज्युएटला बी. ए च्या परिक्षेला बसता येतें.

बी. ए. च्या परिक्षेस बसण्याकरिता तीन परीक्षा द्याव्या लागतात. त्यांना लिट्लगो, जनरल् व स्पेशल अशीं नांवें आहेत. या विश्वविद्यालयाच्या भरी पाळणाऱ्या ब्रिटिश साम्राज्यातील कोणतेहि विद्यालय याला जोडता येतें. विश्वविद्यालयातील मुख्य महत्वाच्या प्रसंगास ' मे आठवडा " म्हणतात व त्यावेळीं निरनिराळ्या तऱ्हेची करमणूक केली जाते.

(२) अमेरिकेंतील संयुक्त संस्थानातील मॅसाचुसेट्समधील मिडलसेक्स काउंटीचें मुख्य स्थान. हें बॉस्टन जवळ चार्लस नदीवर वसलेलें आहे. पण त्याची राज्यव्यवस्था निराळी आहे. लो सं. ( १९१७ ) १,१४,२९३. येथें बहुतेक लोक यूरोपीय आहेत. शहरात फक्त एकच रेल्वे आहे

हें हार्वर्ड विश्वविद्यालयाचें स्थळ असून वाङ्मयविषयक व शास्त्रीय अभ्यासाबद्दल प्रसिद्ध आहे. अँन्डोव्हर सिमिनरी नावाची संयुक्त संस्थानातील सर्वांत जुनी धार्मिक शाळा येथें आहे. हें ठिकाण ऐतिहासिक व वाङ्मय विषयक दृष्टीनें महत्वाचें आहे

येथील मुख्य उद्योगधंदे म्हणजे मास बंद करून पाठविणें, छापणें, जोडे तयार करणें, पियानो तयार करणें वगैरे होत. याला शहराचे हक्क १८४६ साली मिळाले.

केरल.—हा देश फार प्राचीन आहे. महाभारतात भीष्मपर्व ( अ. ९ ) व सभापर्व ( अ. ३१ ) यामध्यें हा देश दक्षिणापथात किष्किंधेच्या दक्षिणेस असल्याचें म्हटलें आहे भागवतात दहाव्या स्कंधात याचा उल्लेख येतो, ( अ. ११, १९, ७९, ८? ). बृहत्संहितेमध्येंहि याचा नामनिर्देश आढळतो( १६. २ ). अशोकाच्या लेखात केरलपुत्र म्हणून लहानदेशवाचक असें नाव येतें. हें छोटें राज्य पुढें पाण्ड्यराज्यात सामील झालें. हें राज्य मलबार किनाऱ्यावर असून तामीळभाषा बोलणारें होतें हें बहुतेक पश्चिमघाटाच्या म्हणजे सह्याद्रीच्या आसपास होतें. याच्या उत्तरेस मंगलोर व त्याच्याजवळ जिचें मुख आहे अशी चंद्रगिरी नदी होती व दक्षिणेस थेट कन्याकुमारी असून, पश्चिमेस अरबी समुद्र होता. समुद्रगुप्तानें जिंकलेल्या दक्षिणेकडील राजामध्यें केरळ राजाचें नांव आहे. या देशालाच पुढें चेर देश म्हणूं लागले अशोकानें दक्षिणेंतील ज्या पाच राजांच्या दरबारीं आपले वकील ठेविले होते त्यात केरल राजाचा समावेश होता. दुसऱ्या शतकातील एका केरल राजानें-याची राजधानी हल्लींचें कांगनोर ही होती-गंगाथडीं कांहीं राजाचा पराभव केल्याचा उल्लेख आढळतो. चोल, पाण्ड्य, व हे केरल उर्फ चेर यांचे नेहमीं आपापसांत झगडे चालत. दुसऱ्या शतकात, चोलानंतर हे केरल प्रबळ झाले. कांचीकर पल्लवानीं तिसऱ्या शतकात याचा कांहीं प्रांत काबीज केला होता. परांतक चोल ( पहिला) यानें इ. स. ९३० च्या सुमारास केरल राजाशीं शरीरसंबंध करून आपली सरहद्द केरळ देशापर्यंत भिडविली होती. परंतु पुढें राजराज चोलानें (इ. स ९८५ ) केरलावर स्वाऱ्या केल्या आणि वीरराजेंद्र चोलानें तर उलगई येथें केरल राजाचा पराभव केला. परंतु पुढें जेव्हां चोल साम्राज्य मोडलें तेव्हा तें मोडण्यास कारणीभूत होणाऱ्या राजात पाण्ड्य, काकतीय यांच्याबरोबरच केरळ राजाचाहि समावेश होतो. या देशाबद्दल जास्त माहिती चेर या नांवाखालीं आढळेल [ अम्पर-एन्शन्ट इंडिया; बृहत्संहिता; गुप्त इन्स्क्रिप्शन्स; महाभारत; भागवत, स्मिथ-ऑक्स. हिस्टरी ऑफ इंडिया ]

**केरवली**—रजपुतान्यातील एक संस्थान व त्याची राजधानी.( ' करौली ' पहा ).

**केराडी**—जयपूर संस्थानांतील याच नावाच्या इलाखदारीचें मुख्य गांव. हा इलाखदार रौतिया जातीचा असून त्यास 'वराईक' ही स्थानिक पदवी आहे. यात२२ खेडीं असून टाकोळी ३७६ रु.४ आ.आहे. राजनिष्ठेच्या अटीवर ही इस्टेट इलाखदाराकडे आहे.

**केरूर**—मुंबई इलाख्यातील विजापूर जिल्ह्यामधील बदामी तालुक्यांतील एक खेडेगांव. या गांवाची लोकसंख्या १९०१ सालीं ५३५२ होती. सोलापूर ते हुबळी रस्त्यावरील तटबंदीचें हें ठिकाण आहे. या खेड्याच्या नैर्ऋत्यदिशेस पाव मैलावर एका उंचवट्याच्या जागीं एक किल्ला आहे. या किल्ल्याच्या जवळच पूर्वेस एक मार्केट बांधण्यात आलें आहे व दक्षिणेस असलेल्या जुन्या मार्केटमध्यें हल्लीं विणकऱ्यांची वसाहत झाली आहे. या खेड्यांत व किल्ल्यात पुष्कळ देवालयें असून एक पाण्याचा तलाव आहे. नगरेश्वराचें देवालय सुमारें १५०९ त बांधलें असावें. त्यांत बरेच लेख असावे असें म्हणतात.

**केरो**—आधुनिक ईजिप्तची कायरो राजधानी. हें नाईल नदीच्या काठीं अलेक्झांड्रियाच्या नैर्ऋत्येस १३० मैल व सुवेझच्या पूर्वेस १४८ मैल आहे. या शहराचें क्षेत्रफळ ८ चौरस मैल असून येथें एक किल्ला आहे. १९ व्या शतकाच्या मध्यापासून आतांपर्यंत याची लोकसंख्या व आकार दुप्पट झाला आहे. १९१७ मध्यें लोकसंख्या सुमारें ८ लाख होती. पैकीं मुसुलमान ६ लक्षावर होते. उच्च दर्जाचे देश्य लोक तुर्क अथवा अर्धतुर्क रक्ताचे आहेत. दुसऱ्या जातीं पुष्कळ असून त्यात ग्रीक, इटालियन,ब्रिटिश, फ्रेंच व ज्यू लोक फार आहेत. येथील रोगट हवेमुळें पूर्वी मृत्युसंख्या फार होती.ब्रिटिशांच्या ताब्यात गेल्यापासून या शहरची आरोग्याच्या बाबतींत बरीच सुधारणा झाली व आता हवा साधारणतः आरोग्यकारक आहे. सर्वसाधारण उष्णमान ६८° श. असतें.

**दळणवळण**:-दळणवळणाचे मार्ग सुधारण्यासाठीं आरोग्य दृष्ट्या निरनिराळ्या सुधारणा करण्यासाठीं महायुद्ध सुरू होईपावेतों जारीचे प्रयत्न करण्यांत आले. १९१२ मध्यें बुलाक येथें नाईल नदीवर नवीन पूल बांधण्यात आला. १९१३मध्यें व्यापारासाठीं हेलवान व केरो यांच्या दरम्यान सडक बांधण्यात आली. तसेंच केरो येथें बिनतारी विद्युद्गृह उघडण्यात आलें. वैमानिक स्टेशनहि १९१४ सालीं बांधण्यात आलें. महायुद्ध सुरू असतांना शहराच्या पूर्व भागातील साचलेली माती खणण्यात येऊन ती जागा स्वच्छ करण्यांत आली व त्या ठिकाणीं निरनिराळ्या कचेऱ्या बांधण्यांत आल्या.

१९१८ मध्यें अरबांच्या मुलूखगिरीपासून तों मेहमेतअलीच्या कारकीर्दीपर्यंतच्या सर्व जुन्या इमारती सुरक्षित ठेवण्यासाठीं तसेंच जुनें केरो येथें असलेल्या बाबेलोन रोमन किल्ला शाबूत ठेवण्यासाठीं एक पुराणवस्तुसंरक्षक कायदा पास करण्यांत आला. हा किल्ला खणण्याचें काम सुरु करण्यांत आलें व त्यांत पुष्कळ जुन्या वस्तू सांपडल्या. इब्न एलनची मशीद महायुद्धाच्या अमदानींत उपलब्ध झाली. बिबर्सच्या मशिदींत पूर्वी कसाईखाना होता तो तेथून काढण्यात येऊन तेथें १९१८-१९ च्या दरम्यान सुंदर बाग करण्यांत आली. बुलाक येथें व दहेरच्या मशिदींच्या आसपास नवीन सार्वजनिक बागा करण्यांत आल्या. सुलतानिया ग्रंथसंग्रहालयाची पुनर्घटना करण्यांत आली. १९२० सालीं या ग्रंथालयात १२००० पुस्तकसंग्रह होता व त्यांत पौर्वात्य देशाबद्दलची माहिती देणारीं ४०,०००पुस्तकें होतीं. शहररचनेच्या नव्या कल्पना महायुद्ध सुरु झाल्यामुळें मागें पडल्या. पण त्या कल्पनांना आतां हळूहळू मूर्त स्वरूप देण्याचें प्रयत्न चालू आहेत.

केरोचा व्यापार मुख्यतः मालाची नेआण करण्याचा आहे. सुदानमधून हस्तिदंत, कातडें,उत्तरईजिप्तमधून कापूस व साखर, हिंदुस्थानातून नीळ व शाली हे व्यापाराचे जिन्नस येतात. कागदाच्या गिरण्या व कापसाच्या गिरण्या येथें आहेत. रेशमाचा माल, बंदुकीची दारू व कमावलेली कातडीं येथें तयार होतात. येथें एक वस्तुसंग्रहालय असून त्यात जुन्या वस्तूंचा मौल्यवान संग्रह आहे.

**इतिहास**.—ईजिप्त अरब लोकांच्या ताब्यात जाण्यापूर्वी येथें मोकळें मैदान होतें हल्लींच्या शहराच्या जवळ बाबिलॉन ही अति प्राचीन वसाहत होती व ती मेंफिसच्या ताब्यात असावी असें वाटतें. ईजिप्त जेव्हा इराणी लोकांनीं जिंकला तेव्हा बाबिलॉन शहर (खि. पू.५२५ च्या सुमारास) वसविलें गेलें रोमन लोकांनीं तेथें एक किल्ला बांधला. बाबिलॉन शहर नष्ट झालें तरी किल्ला राहिला आहे. केरोलाच बाबिलॉन म्हणत असत अशाबद्दलहि पुरावा सापडतो. खुद्द केरो ईजिप्तची चौथी मुसुलमानी राजधानी आहे नवें शहर लवकरच महत्वाचें ठिकाण झालें. ही खलिफानें नेमलेल्या नायबाची रहाण्याची जागा होती. अमिरानें एलफोस्टाट नांवाची सर्वांत जुनी राजधानी स्थापली. याला भग्न हें नाव मिळालें व तें कायरोबद्दल व मेंफिसबद्दल अरब लोक उपयोगात आणीत होते. उमईद वंशाच्या न्हासानंतर इ. स. ७५० त सुलेमाननें ' एल अस्कार ' शहर वसविलें. व तें अब्बासीद खलिफाच्या प्रतिनिधीचें ठिकाण झालें. ८७३च्या सुमारास एल. कटइ नांवाची राजधानी स्थापण्यात आली व ती राजघराण्याची राहण्याची जागा होती परंतु लवकरच हें शहर लुटलें गेलें हल्लींचें कायरो शहर येथेंच वसलेलें आहे.

इ. स. ९६८ मध्यें ईजिप्त जिंकणाऱ्या जोहर-एल कैदनें नवीन राजधानी स्थापली, व तिला एल'काहिरा' म्हणजे विजयी असें नाव दिलें व या नावाचा अपभ्रंश केरो झाला. हल्लींच्या राजधानीचा ⅔ भाग या शहरानें

होता. हळूहळू हें एलफोस्टाटपेक्षां मोठें झालें व त्यालाच मिसर म्हणूं लागले

इ. स ११७६ मध्यें क्रिस्ती धर्मयोद्ध्यांनीं यावर स्वारी केली परंतु त्यांना यश आलें नाहीं. १५१७ त तुर्क लोकांनीं हें शहर जिंकलें व तेव्हांपासून याचा न्हास होऊं लागला. १७९८ मध्यें हें शहर फ्रेंच लोकांनीं जिंकलें, परंतु १८०१ त त्यांना इंग्रज व तुर्क लोकांनीं हाकलून दिलें व शहर तुर्क लोकांना देण्यांत आलें. १८११ मध्यें तुर्कांचा प्रतिनिधि मेहमेतअली यानें मामेलुक लोकांची कत्तल करून तो त्या देशाचा स्वतः मालक झाला. व कैरो स्वतंत्र राज्याची राजधानी झाली. १८८२ मध्यें कैरो ब्रिटिशांनीं घेतलें व काहीं ब्रिटिश सैन्य अद्याप किल्ल्यांत रहातें. १९१९ सालीं कैरोमध्यें मोठें बंड होऊन झगलूलपाशा व त्याचे तीन साथीदार यांना हद्दपार करण्यांत आलें. पण ईजिप्तला स्वराज्य मिळाल्यावर झगलूलला परत आणलें.

सुवेझपासून कैरो १४७ मैल असून आण्याला रेल्वे आहे. याचे जुनें कैरो व न्यू कैरो असे दोन भाग असून दोहोंला जोडणारी विजेची रेल्वे आहे न्यू कैरोची मांडणी फार उत्तम व रेखीव आहे. येथें जुना किल्ला, जनावराचा बाग, म्यूझियम ( पुराणवस्तुसंग्रहालय ) व त्यांतील ममीज ( म्हणजे रासायनिक कृतीनें बिलकूल बिघडूं न देता राखून ठेवलेलीं ईजिप्तमधील पुरातन माणसें, कुत्रीं, मांजरें पक्षी, साप, सुसरी यांचीं प्रेतें ), अरबी भाषेंतील ग्रंथांचा मोठा संग्रह असलेली लायब्ररी, अरबी युनिव्हर्सिटी, एझबेके बाग, इत्यादि ठिकाणें पहाण्यासारखीं आहेत. परंतु सर्वांत महत्वाचें पहाण्याचें ठिकाण म्हणजे जगांतील सात आश्चर्यांपैकीं [ १ ईजिप्तांतील पिरामिड २ बाबिलोन येथील सेमिरामिसचे बाग, ३ ऑलिंपिया येथील झूसचा पुतळा; ४ एफेसिस येथील आर्टेमिसचें देवालय, ५ हालिकार्नेसस येथील मॉसोलियम, ६ -होडस येथील कलोसस; ७ आलेक्झांड्रिया येथील फारॉस लाईट हाऊस किंवा बाबिलोनियाच्या भिंती ] एक आश्चर्य जें ईजिप्तमधील ' पिरामिड ' तें होय. शहरापासून पिरामिडपर्यंत ट्रामगाड्या असून जाण्यास १॥ तास लागतो. वाटेंत नाईल नदीच्या विस्तीर्ण पात्रावरील पूल लागतो. पिरामिड उंचवट्यावर बांधलेले असून भोंवताली रुक्ष वाळवंट आहे. सर्वांत मोठा पिरामिड ४५१ फूट उंच असून बुडाशीं लांबी व रुंदी दोन्हीं सारख्याच म्हणजे ७५० फूट आहेत. या एकट्यानें १३ एकर जमीन व्यापिली आहे. याच्या जवळ आणखी दोन पिरामिड असून त्यांपैकीं एकाची उंची ४४७ फूट व दुसऱ्याची २०३ फूट आहे. हे पिरामिड मोठाले ओबडधोबड दगड रचून केलेले असून त्यावरील चुन्याच्या गिलाव्यावर अनेक चित्रें व लेख होते. पण त्यांपैकीं फार थोडे शिल्लक आहेत तेथून थोड्या अंतरावर 'स्फिंक्स' आहे. या स्फिंक्सची आकृति देह असलेल्या सिंहासारखी असून तोंडाकडील भाग मात्र स्त्रीच्या आकाराचा आहे. या स्फिंक्सचे नाक, डोळे वगैरे अवयव मोडून गेल्यानें सध्या ते फार विद्रुप दिसतात. तेथून अवघ्या जुन्या काळचीं पुरून गेलेलीं ईजिप्तमधील देवळें अलीकडे उकरून काढलेलीं आहेत. हीं ठिकाणें पहाण्यास उन्हांतून रेती तुडवीत जाणें शक्य नसल्यामुळें भाड्यानें मिळणाऱ्या उंटावरून किंवा गाढवावरून जाणें सोईचें असतें.

ईजिप्तमधील तुर्क लोक शरीरानें मजबूत व धिप्पाड असून रूपानें देखणे असतात. तुर्क स्त्रिया वर्णानें गोऱ्या व फार सुरेख असतात. कैरो येथें ' पियास्तर ' नावाचें नाणें चालतें व त्याची किंमत सुमारें २॥ आणे असते. येथें थिएटरांत होणारे नाच पहाण्यासारखे असून ते मोफत पहावयास मिळतात. ( " ईजिप्त " )

केलडी–म्हैसूर संस्थानांत शिमोगा जिल्ह्यांत सागर तालुक्यांतील एक खेडें. हें सागरच्या पूर्वेस ४ मैलावर वसलेलें आहे लोकसंख्या अजमासें १६००. हैदरअल्लीनें १७६३ मध्यें स्वारी करून हाकून देईपर्यंत म्हैसूरच्या वायव्येस व घाटाच्या दक्षिणेकडील मुलखावर जे राजे राज्य करीत असत त्यांचें हें मूलस्थान होय विजयानगरचें राज्य मोडल्यानंतर या राजांनीं स्वातंत्र्य मिळविलें. या राजांची प्रथम इक्केरी येथें व नंतर बेदनूर येथें राजधानी होती.

केलसी–मद्रासेंतील एक न्हावी जात. लो. सं (१९११) ७३१३. हें जातीचें नाव ' केलसा ' ( काम ) या कानडी शब्दावरून बनलें आहे. याप्रमाणेंच बागरी आणि धारवाड येथील कानडी न्हावी आपणाला "कष्ट माडोवरु" (कष्ट करणारे ) असें म्हणवितात हीं जात दक्षिणकानडांत आढळते. बोलण्याच्या भाषांवरून व ज्यांचा श्मश्रु करितात त्या लोकांवरून यांच्यात अनेक पोटजाती पडल्या आहेत, जसें:– तुळु केलसी किंवा भंडारी, कोंकणी केलसी किंवा म्हालो, हिंदुस्थानी केलसी किंवा हजाम, लिंगायत केलसी किंवा हडपवड महाँपिले ( मापला ), मल्याळी, तेलगु तामिळी, इत्यादि. दाढी काढणाऱ्या लोकांच्या न्हाव्यांना माङ्ले म्हणत असून ते भंडारी न्हाव्यापेक्षा हलक्या दर्जाचे आहेत असें मानण्यांत येतें. कारण भंडारी उच्च लोकांची हजामत करितात. जर उच्च वर्गाच्या न्हाव्यानें नीच जातीच्या माणसाची हजामत केली तर तो जातिबाह्य होतो, व पुन्हा जातींत येण्याकरितां त्याला काहीं दंड भरावा लागतो. या भागांतील परीटाचें निराळे न्हावी नाहींत. तर त्यांच्यापैकीच एखादा आपली कारागिरी दुसऱ्याच्या डोक्यावर करितो. मुसलमान फक्त माप्पिला न्हावी ठेवतात.

ही न्हावी जात समाजांत कुंभार, बाजंत्री, विणकर किंवा तेली यांच्या दर्जाचे होण्याची महत्वाकांक्षा धरीत नाहीं. कोळी किंवा भोई यांच्यापेक्षा आपली जात श्रेष्ठ आहे असें मानून स्वस्थ बसते. शूद्राचे काहीं धार्मिक संस्कार यांना करावे लागतात. नामकरण व और्ध्वदेहिक क्रिया या दोन प्रसंगीं तरी यांची जरूरी असते. उच्च शूद्र जातींत

माणसाच्या प्रेतयात्रेच्या प्रसंगीं न्हाव्यानें बरोबर अग्नि घेऊन जावयाचें असतें व हाडें गोळा करून ती जागा स्वच्छ करावयाची असते. मोर्ली, चंट, गटी आणि घोडारी या जातींचीं वरील कामें केळसी करितात.

दक्षिण कानडांतील न्हावी आपल्या मूळ पुरुषाविषयीं अनेक कथा सांगतात. शंकराला लग्न करण्याची जेव्हां इच्छा झाली तेव्हां आपला खडबडीत केसाळ चेहरा नवरीला आवडणार नाहीं म्हणून तो साफसूफ करण्याकरितां त्यानें एक न्हावी उत्पन्न केला व लग्न करण्याकरितां एक ब्राह्मण निर्माण केला अशी एक कथा आहे. दुसरी कथा म्हणजे एक गंधर्वकन्या ब्रह्मदेवाच्या शापानें समुद्रांत शिळा होऊन पडली असतां पश्चिम समुद्र मागें हटवून तेथील किनारा वस्तीस तयार करणाऱ्या परशुरामानें तिला शिलामुक्त केलें. तेव्हां तिनें त्याची स्तुति करून पुढील निवास त्याची आठवण करून देण्याकरितां एक पुत्र मागितला. तो पुत्र म्हणजे यांचा मूळपुरुष होय.

यांच्यांत मूल जन्माला आल्यावर घरातल्या पुरुषानें त्याच्या कमरेभोंवतां एक करगोटा बांधून त्याचें नांव ठेवावयाचें असतें. ज्या वारीं मूल जन्मलें असेल त्या वारावरून बहुधा नांव ठेवितात. कोणी कोणी ब्राह्मणाकडून पत्रिका करवितात व जन्मकाळीं अनिष्ट ग्रह असल्यास ग्रहास दानें देतात.

मुलाला त्याच्या वंशांतील धंद्याचें ज्ञान दहाव्या पासून बारदाव्या वर्षापर्यंत देतात. हल्लीं मुलांना लहानपणीं शाळेंत घालतात. यांच्यांत मुलीला हुंडा द्यावा लागतो. विधवांना पुनर्विवाह करण्याला सवलत असते. एकाच बळीच्या ( देवकाच्या ) गोतांत परस्पर विवाह होत नाहींत.

यांच्यांत प्रत्येक संस्कारांत ब्राह्मणांना दर्भ लागतात त्याप्रमाणें वस्त्राहि लागतो. गरीब मृतांना पुरतात व श्रीमंत मृतांना जाळतात. संसर्गजन्य रोगानीं मेलेल्या माणसांना मात्र नेहमीं पुरण्यांत येतें.

यांची कुलदेवता उडुपीचा कृष्ण होय. मुख्य धर्माधिकारी तेथील संन्यासी असून गावपंचायतीच्या निकालावर यांच्याकडे अपील करावयाचें असतें. हे लोक भुताखेतांना फार भितात व कांहीं अनिष्ट झाल्यास कोणाला कोणता बळी द्यावा वगैरे विचारण्यास ज्योतिष्याकडे धांव घेतात.

ज्ञातीचा कारभार गावपंचायतीच्या नियमानुसार चालतो. गुरकार किंवा गावचा अधिपति यानें जमविलेला दंडाचा पैसा उडुपी देवस्थानाकडे जातो. हल्लीं या गावपंचायतींना फारसें कोणी मानीत नाहीं.

काळाच्या ओघाबरोबर सर्वांप्रमाणें ही ज्ञातहि बदलत चालली आहे. पूर्वीचे न मिटणारे लाकडी दाज्याचे वस्त्रे टाकून हल्लीं हे " राजश्री "( राजसं ) वस्त्रे वापरूं लागले आहेत.

दिवसाचें काम आटोपल्यावर आपलें काम घाणीचें आहे अशी त्यांची भावना होऊनच कीं काय ते घरीं जाऊन स्नान करितात व पहिले कपडे धुवून नवीन घालतात. [ थर्स्टन ]

**केला**—अथवा कॅला हें प्राचीन शहर असून तैग्रिस व झाब या नदीकांठच्या लोकांचें वस्तीचें ठिकाण आहे. हें निनेव्हेच्या दक्षिणेस १९ मैलावर असून असुरियाची ही राजधानी होती. शिलालेखावरून असें दिसतें कीं केला हें इ. स. पूर्वी १३०० च्या सुमारास शाल्मनेसर ( पहिला ) यानें वसविलें. त्यानंतर शहराकडे दुर्लक्ष झालें असावें, अथवा त्याचा नाश झाला असावा. परंतु इ. स. पूर्वी ८८० मध्यें असुर नसिरपाल यानें या शहराचें पुनरुज्जीवन केलें त्यानंतर हें असुरियाच्या राजाचें रहाण्याचें ठिकाण झालें. निनेव्हेप्रमाणें सातव्या शतकाच्या शेवटी मीड व बाबिलोनियन लोकांनीं केला शहर सर करून त्याचा नाश केला. हिंदू दंतकथावरून केला शहर निमरोडनें वसविलें असें दिसतें. केलाची जागा पहिल्यानें सर ए. एच. लायर्डनें १८४५ मध्यें शोधून काढिली व खणली. यानंतर हार्मझ रसम व जॉर्ज स्मिथ यांनी हें खणण्याचें काम पुरें केलें. केला येथें मुख्य ७ इमारती सांपडल्या त्या पुढील होतः-

(१) वायव्येकडील राजवाडा. हा सर्वांत चांगला राजवाडा पहिल्या असुर नसिरपालनें (इ. स. पूर्वी ८८५-८६०त ) बांधिला सारगननें ( ख्रि. पूर्वी ७२२-७०५ ) हा राजवाडा दुरुस्त केला व तो त्यात राहूं लागला. आंग्ल पदार्थसंग्रहालया( ब्रिटिश म्यूझियम )मध्यें ठेविलेले पखांचे सिंह येथेंच सांपडले. (२) मध्यवर्ती राजवाडा. हा दुसऱ्या शाल्मनेसरनें ( इ. स. पूर्वी ८६०-८२५)बांधिला व तिसऱ्या तिगलथ पिलेसरनें तो पुन्हा बांधिला. शाल्मनेसरचा मनोरा व इतर वस्तु (सध्या आंग्लपदार्थसंग्रहालयांत असलेल्या ) येथेंच सांपडल्या. (३) नैर्ऋत्येकडील राजवाडा. (४) पश्चिमेकडील लहान राजवाडा. (५) आग्नेयेकडील राजवाडा. (६) असुरनसिरपालचीं दोन लहान मंदिरें व (७) एझिदा नावाचें देवालय. हें नेबोच्या नावानें बांधिलें असून आग्नेयीकडील राजवाड्याजवळ आहे.

या ठिकाणीं पंचरसधातूचें व हस्तिदंती सामान व ज्योतिष व फलज्योतिषास लागणारीं उपयुक्त कोष्टकें सांपडलीं. केला हें प्राचीनत्व व धार्मिक बाबतींत असुरच्या खालोखाल होतें. लोकसंख्येच्या मानानें हें शहर निनेव्हेपेक्षा फार कमी दर्जाचे होतें.

**केल्व्हिन, विल्यम थामसन लॉर्ड**—(१८२४–१९० ) प्रसिद्ध शास्त्रज्ञ जेम्स थामसन या नांवाच्या प्रोफेसरचा हा दुसरा मुलगा होय. याच्या जन्माच्या वेळेस याचा बाप रॉयल अक्याडेमिकल इन्स्टिट्यूशन नांवाच्या संस्थेंत गणिताचा प्रोफेसर होता. इ. सन १८३२ सालीं या प्रोफेसरानें ग्लासगो कॉलेजांत प्रोफेसरची जागा स्वीकारली. सन १८४१ सालीं विल्यम थामसन केंब्रिजच्या विश्वविद्यालयांत शिरला, आणि त्यानें १८४५ सालीं त्या विद्यालयांतून 'दुसरा रॅंगलर ' ही पदवी मिळविली व त्याबरोबरच स्मिथचें

पारितोषकहि संपादन केलें. त्याच वर्षी थामसनला पिटरहौस शाळेचा फेलो नेमण्यांत आलें. त्यावेळीं इंग्लंडमध्यें भौतिक शास्त्राचें प्रयोगात्मक अध्ययन करण्याची चागलीशी सोय नव्हती. याकरिता थामसननें पारीसचा रस्ता धरला व तेथें रेग्नोच्या प्रयोगशाळेंत एकवर्षपर्यंत काम केलें. या वेळेस रेग्नो हा उष्णतेसंबंधींचे अत्यंत महत्वाचे असे प्रयोग करीत होता. १८४६ सालीं त्यानें ग्लासगो येथील विश्वविद्यालयाच्या निसर्गशास्त्राच्या प्रोफेसरची जागा स्वीकारली. या वेळेपासून पुढें त्रेपन्न वर्षेपर्यंत त्यानें याच जागीं प्रोफेसरचें काम केलें.

यावेळीं पृथ्वीच्या आयुष्याविषयीं सिद्धांत मांडणारा एक बलवत्तर पक्ष होता. त्या पक्षाचें असें म्हणणें होतें कीं, पृथ्वीवरील मृण्मय कठिण कवच तयार होण्यास शेंकडो कोटी वर्षे लागलीं असलीं पाहिजेत. परंतु थामसन याच्या विवेचनावरून असें सिद्ध होऊं लागलें कीं, दोन कोटी वर्षांपासून ते ४० कोटी वर्षांपूर्वी पृथ्वीचें कवच तयार झालें असावें. हें मत अर्थातच पहिल्या मतास अगदीं विरोधी आहे. थामसन यानें हें सिद्ध करण्याकरितां पृथ्वींतून ज्या प्रमाणांत उष्णता बाहेर जाते त्या उष्णतेच्या प्रमाणाच्या आधारें ही गोष्ट त्या लेखांत विशद करून मांडली होती. थामसनच्या मतें सुमारें १० कोटी वर्षांपूर्वी पृथ्वीचें कठिण कवच तयार झालें असावें. यावर पुष्कळ वादविवाद झाला व त्यांत थामसनच्याच मताचा जय झाला. हें मत बरींच वर्षेपर्यंत टिकलें. १८४७त जेम्स प्रेस्काट, जूल व थामसन यानीं स्वित्झरलंडमध्यें एका धबधब्याचा उपयोग करून पाण्याच्या अधःपतनानें किती उष्णता उत्पन्न होते याविषयीं प्रयोग केले. जूल याच्या उष्णतेविषयींच्या कल्पनेचा थामसनच्या मनावर अतिशय परिणाम झाला व सन १८४८ सालीं थामसननें या कल्पनेस परिणत स्वरूप देऊन त्यानें निरपेक्ष उष्णमानपद्धति किंवा केवल उष्णमानपद्धति शोधून काढली. या पद्धतींत हा विशेष आहे कीं, या प्रकारें उष्णतामापन करण्यास पारा, अल्कोहल इत्यादि द्रव्यांची मदत घ्यावी लागत नाहीं. पुढें सन १८५१ सालीं थामसन यानें 'रॉयल सोसायटी ऑफ एडिंबरो' नावाच्या संस्थेला एक निबंध सादर केला. या निबंधांत त्यानें एन. एल. सादी कार्नो, कौन्ट रम्फोर्ड, सर. एन. डेव्ही, जे. आर. मेअर आणि जूल याच्या मताची एकवाक्यता करण्याचा प्रयत्न केला. या निबंधांत थामसन यानें शक्तिनित्यत्वाचा सिद्धान्त आणि उष्णतेचा गतिविशिष्टत्वाचा सिद्धान्त हे इतक्या उत्तम प्रकारें मांडले कीं, त्या सिद्धांताना सर्व विद्वज्जनाकडून मान्यता मिळाली याच निबंधांत प्रथमतः गत्युष्णतेच्या सिद्धान्ताचा दुसरा नियम लिहिला गेला ('विज्ञानेतिहास' पा. ५४३-५४४ पहा).

गत्युष्णतेचें संशोधन हें थामसनचें सर्वांत महत्वाचें कार्य आहे, तरी पण थॉमसनची प्रसिद्धि दुसऱ्याच एका महत्वाच्या कार्यामुळें झाली आहे सामुद्रिक-तारायंत्राच्या संबंधानें त्यानें जे शोध लावले त्यामुळें तो सर्व लोकांत प्रसिद्धीस आला आहे. तो इ. स. १८५४ सालापासून तारायंत्र-संशोधकांत प्रामुख्यानें गाजत होता. त्यानें असा निष्कर्ष काढला कीं, लांब सामुद्रिक तारांतून संदेश पाठवितांना लांबीच्या वर्गाच्या व्युत्क्रम प्रमाणांत संदेश पाठविण्याची शीघ्रता असेल. या सिद्धान्तास अनुलक्षून कित्येक शास्त्रज्ञांनीं असें आपलें मत दिलें कीं, खरें सामुद्रिक तारायंत्र सुरू होणें अशक्य आहे थॉमसननें सामुद्रिक-तारायंत्रांत सुधारणा करण्याचें काम हातीं घेऊन अत्युत्तम प्रकारचें तावें शोधून काढलें. नंतर संदेश घेण्याचें उत्तम प्रकारचें यंत्र तयार केलें. या यंत्राच्या योगानें अति अशक्त असा विद्युत्प्रवाह आला तरी त्या प्रवाहापासून संदेश घेतां येतो; तसेंच एखाद्या प्रवाहाच्या विद्युद्बलांत अत्यल्प प्रमाणांत फरक होऊन प्रवाह येत असेल आणि तद्द्वारा संदेश येत असेल तर तो संदेश ग्रहण करतां यावा म्हणून त्यानें एक संदेशग्राही यंत्र तयार केलें. असल्या प्रकारच्या यंत्राची सुधारणा होत होत दर्पण विद्युन्मापक (मिरर गॅल्व्हानोमीटर्) आणि वक्रनलिका नोंदयंत्र (सायफन् रेकॉर्डर) हीं दोन यंत्रें तयार झालीं. थॉमसन यानें तारायंत्रावर काम करण्यास सुरुवात केल्यापासून विद्युल्लतेंतील प्रत्येक जातीची विद्युत्संख्या मापण्याचीं यंत्रें भराभर तयार केलीं; या यंत्राच्या योगानें विद्युच्छास्त्रांतील त्या काळच्या बहुतेक सर्व अडचणी दूर झाल्या. पुढें ज्या वेळेस विद्युद्दीपाचा सार्वत्रिक उपयोग होऊं लागला त्या वेळेस दीपांत खर्च होणारी विद्युच्छक्ति मापण्याचीं यंत्रें त्यानें शोधून काढलीं. विद्युच्छास्त्रावरील एंजिनिअरास ज्या ज्या गोष्टी मापाव्या लागतात त्यांतील प्रत्येकीसंबंधानें थॉमसन यानें कसलें ना कसलें तरी यंत्र बनविलें आहे. एका अम्पिअरच्या एक दशसहस्रांशापासून तो दशसहस्र अम्पिअरपर्यंतचा विद्युत्प्रवाह मापतां येण्यासारखें यंत्र त्यानें तयार केलें आहे. एका व्होल्टच्या अत्यल्प अंशापासून ते १००००० व्होल्टपर्यंतचें विद्युद्बलाचें मापन करणारें यंत्र याचें शास्त्रज्ञानें तयार केलें आहे.

यानंतर थॉमसन यानें डानिअलच्या सेल (घट) चें विद्युद्बल आणि तारेंतून विद्युत्प्रवाह जात असतांना त्या योगानें जी उष्णता उत्पन्न होते तिच्या आधारें तारे‌‌‌च्या अंगची विद्युद्रोधक शक्तीहि मोजली. पुढें सन १८५३ सालीं विद्युद्घटातून होणारें विसर्जन प्रकंपित स्वरूपाचें असतें याविषयीं माहिती उपलब्ध करण्याकरितां थॉमसन यानें बरीच मेहनत घेतली. असलें विसर्जन प्रकंपित स्वरूपाचें असतें ही गोष्ट फार महत्वाची आहे; कारण असल्याच प्रकारच्या घटाच्या सहाय्यानें एच. आर. हर्ट्झ यानें विद्युल्लहरींचा शोध लावला व पुढें याच लहरींचा बिनतारी संदेश पाठविण्याकडे उपयोग करण्यांत आला या गोष्टीवरून विद्युद्घटांतील विसर्जन प्रकंपित स्वरूपाचें असलें याचें महत्व सहज कळून येईल.

सन १८७३ साली त्यानें मच्छन्द नावाची लेखमालिका लिहिण्याचें काम हातीं घेतलें. या मालिकेंत खलाशाच्या होकायंत्राविषयीं विवेचन केलें होतें. मालेचा पहिला अंक काढल्यानंतर त्याच्या डोक्यात इतके प्रश्न उद्भवले कीं, त्या प्रश्नाचा नीटपणें विचार करून त्याचा निकाल लावण्याला बरींच वर्षें लागली. या मालेचा दुसरा अंक सुमारें पाच वर्षांनीं जनतेपुढें आला. या अवधींत या संशोधकानें होकायंत्रात अनेक सुधारणा केल्या. जहाजावरील बराच भाग लोखंडाचा असतो त्यामुळें जहाजावरील होकायंत्रावर परिणाम घडून तें होकायंत्र योग्य दिशा दाखवीत नाहीं. असला अनिष्ट परिणाम घडूं नये म्हणून या संशोधकानें काहीं योजना तयार केली. या योजनेमुळें जहाजावरील होकायंत्र योग्य दिशा दर्शवितें आणि या योजनेमुळें आतापर्यंत पुष्कळ खलाशी व प्रवासी याचे जीव बचावले आहेत. जहाजासंबंधानें दुसरी महत्त्वाची सुधारणा थामसन यानें शोधून काढली ती सुधारणा म्हटली म्हणजे १०० फयादम खोलीच्या समुद्रात ५६ नाट या वेगानें जहाज जात असता समुद्राचा ठाव काढून देणारें यंत्र त्यानें शोधून काढलें. यापेक्षा जास्त खोलीच्या समुद्रात अल्पायासानें ठाव काढणारें यंत्र याच संशोधकानें बनविलें. भरतीचें मापन करणारें यंत्र, भरतीचे संगीतात्मक पृथक्करण करणारें यंत्र आणि भरतीचें भविष्यकथनकारी यंत्र हीं सर्व तयार करून संशोधकानें आपल्या कीर्तीत भर घातली. समुद्रात जहाजाची स्थिति कोठें आहे हें दर्शविण्याची पद्धत सम्नर नावाच्या संशोधकानें बसविली होती. परंतु ही पद्धत बरीच क्लिष्ट होती. या पद्धतींतील क्लिष्टता दूर करून तिला बरीच सुलभता थामसन यानें आणली. या प्रसिद्ध शास्त्रज्ञानें नवीन कल्पनेनें भरलेले असे सुमारें तीनशें निबंध लिहिले या सर्व निबंधात पदार्थविज्ञानशास्त्राच्या प्रत्येक शाखेंतील विषय आले आहेत.

एकुणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात पदार्थविज्ञान शास्त्रात जी प्रगति झाली तिच श्रेय काहीं अंशीं लॉर्ड केल्व्हिन यास दिलें पाहिजे, कारण त्याच्या संबधात जे विद्यार्थी आणि होतकरु गृहस्थ आले त्यास त्यानें योग्य प्रोत्साहन दिलें व त्याचा उत्तम परिणाम झाला

या शास्त्रज्ञाचें पहिलें लग्न१८५२साली व दुसरें१८७४साली झालें. अटलांटिक महासागरात तार घातल्याबद्दल त्याला सर ही पदवी मिळाली. १८९२ सालीं त्याला बॅरन केल्व्हिन ऑफ लॉर्जस ही पदवी मिळून तो लॉर्ड झाला. सन १८९० साली त्याला रॉयल सोसायटीचें अध्यक्ष करण्यात आलें सन१८९६ त याला प्रोफेसरची जागा मिळाल्याबद्दल ज्युबिली करण्यात आली. व त्यावेळेस त्याला " ग्रँड क्रास ऑफ धी रॉयल व्हिक्टोरिअन ऑर्डर " ही पदवी देण्यात आली व १९०२ साली ऑर्डर ऑफ मेरिट ही पदवी त्यास अर्पण करण्यात आली. १८९६ सालीं त्याच्या आचार्य पदाच्या ज्युबिलीबद्दल जो समारंभ करण्यात आला त्याचें अल्पसें शब्द-चित्र पुढें दिल्याप्रमाणें आहेः—त्या वर्षाच्या जून १५।१६ आणि १७ तारखेस शास्त्रात प्रवीण असे गृहस्थ आणि मोठमोठे पदवीधर यांचें जें मोठें संमेलन ग्लासगो शहरीं झालें तसें संमेलन तत्पूर्वी त्या ठिकाणीं कधींहि झालें नाहीं. तेथील विश्वविद्यालय आणि त्या शहराचे अधिकारी पुरुष यानीं आपल्या शहराच्या प्रसिद्ध नागरिकाचा सन्मान करण्यात भाग घेतला. सुमारें २५००पाहुण्याची विश्वविद्यालयाच्या इमारतींत उतरण्याची सोय लावण्यात आली होती त्याच विश्वविद्यालयाच्या प्रयोगशाळेंत एक प्रदर्शन उघडलें होतें. त्या प्रदर्शनात लॉर्ड केल्व्हिननें तयार केलेलीं यंत्रे ठेविलीं होतीं. तेथच रागेनें पदवीदानपत्रकें, मानपत्रें, पदकें इत्यादि लावून ठेविलें होतें. ईस्टन कंपनी, ॲंग्लो-अमेरिकन कंपनी आणि कमर्शल कंपनी या तीन सामुद्रिक तारायंत्र कम्पन्यानीं या समारंभात भाग घेतला. विश्वविद्यालयाच्या प्रयोगशाळेंतून एक संदेश पाठविण्यात आला, तो न्यूफाउंडलंड, न्यूयार्क, चिकागो, सेन्फ्रान्सिसको, लासअंगेलीज, न्यू आरलिअन्स, फ्लारिडा आणि वाशिंग्टन या मार्गानें जाऊन लार्ड केल्व्हिनच्या हातात पडण्याला अवघीं साडेसात मिनिटें लागलीं, या सर्व संदेश-मार्गाची लाबी सुमारें २०,००० मैल होती. हा संदेश अटलांटिक महासागरातून दोन वेळा गेला. यानंतर तीन वर्षानीं त्यानें आपल्या प्रोफेसरच्या जागेचा राजीनामा दिला. १९०४ साली त्याला त्या विश्वविद्यालयाचें चान्सेलर नेमण्यात आलें प्रोफेसरची जागा सोडल्यापासून त्याचें जें बहुतांशीं एकान्तवासात आयुष्य गेलें त्या काळात त्यानें शास्त्रीय विषयाशीं अगदीं पूर्णपणें संबंध ठेविला, त्यातला बराचसा काल बाल्टिमोर येथील जॉन्स हापकिन्स नावाच्या विश्वविद्यालयात प्रकाशाच्या लहरीविषयक सिद्धान्तावर दिलेलीं व्याख्यानें दुरुस्त करण्यात गेला; हीं व्याख्यानें दुरुस्त होऊन सन१९०४मध्यें प्रसिद्ध करण्यात आलीं. त्याचा मृत्यु होण्यास अगदीं अल्प काल राहिला होता तो त्यानें शास्त्रीय संशोधनात भाग घेतला. हा प्रसिद्ध शास्त्रज्ञ आपल्या वयाच्या ८३ व्या वर्षी मरण पावला. [अँड्रू ग्रे(१९०८)व एस. पी. थॉमसन(१९१०) यानीं केल्व्हिनचीं चरित्रें लिहिलीं आहेत; त्यात केल्व्हिनच्या ग्रंथकर्तृत्वाचा समग्र आढावा घेतला आहे.]

**केवट**—कोळी नावाची व शेतकरी या नात्यानें उपजीविका करणारी एक जात. याची लो.सं.१९११त१२,१५,६१६ होती. संयुक्तप्रातात व त्याच्या खालोखाल बिहार-ओरिसात याची वस्ती जास्त आहे संयुक्तप्रातात बिंद व मल्लाया जातीशीं केवट हे अगदीं एकरूप झालेले आढळून येतात. कैवर्तांचे हे आधुनिक वंशज असेंहि मानण्यात येतें क म्हणजे पाणी आणि वृत्ति म्हणजे धंदा. यावरून कैवर्त अथवा केवट या शब्दाची व्युत्पत्ति सांगण्यात येते. किंवर्त म्हणजे हलका

धंदा करणारा, अशीहि व्युत्पत्ति या शब्दाची लावण्यात येते. धर्मशास्त्रकार आपल्या ठराविक उपपत्तींचा उपयोग करताना कैवर्तास विसरले नाहींत. कैवर्त, मार्गव अथवा दास याची उत्पत्ति निषाद पिता व आयोगवी माता यापासून झालेली आहे असें मनुस्मृतींत म्हटलें आहे(अ. १०.श्लो.३४). ब्रह्मवैवर्त पुराणात, क्षत्रिय पिता व वैश्य माता याच्यापासून कैवर्तांची उत्पत्ति सांगितलेली आहे. कारण आयोगवी, ही च शूद्रपिता व वैश्य माता यापासून झाल्यामुळे 'प्रतिलोमा' म्हणून निर्दिष्ट केली जाते

भेदिया, बिल्व ,जोक, खोटिआ,कैवर्त अथवा दास,लियारी चुडीटिया, व दोस्सा इत्यादि केवट जातीचे पोटविभाग आहेत. केवटाप्रमाणें मल्हा व बिंद जातीचेहि पोटभेद आहेत. मलहाप्रमाणेंच या केवटाच्या पोटजातींतील घोग लोक स्वतःस निषादाचे वंशज समजतात आगरवाला, बादम जइधर, खारोट इत्यादि अनेक पोटविभाग केवट जातींत आहेत. नागो, मागो, कोचिपो वगैरे त्यांची गोत्रें आहेत.

पाचव्या किंवा सहाव्या वर्षी लग्नें करण्यात येतात. वराच्या उमरीचें प्रमाण वधूच्या पेक्षा जास्त असलें पाहिजे हें मुख्यतः पाळण्यात येतें सगाई पद्धतीनें विधवाविवाह होतो.

काली, भगवती व नौका यांची केवट लोक उपासना करतात. महावीर व काली याना बकरी व फुलें अर्पण करण्यात येतात. लग्नप्रसंगीं व धार्मिक समारंभात, सर्वोरिया ब्राह्मणाना पाचारण्यात येतें. भगतखेरीज सर्व लोक मासे, कासव वगैरे खातात व दारूहि पितात ते कोणाच्याहि हातची कच्ची रसोई खात नाहींत. परंतु ब्राह्मण,क्षत्रिय, वैश्य याच्या हातची पक्की रसोई मात्र खातात. कोइरी व तेली लोकाप्रमाणेंच केवटाचा सामाजिक दर्जा असल्याचें दिसून येतें याची आसामातहि थोडीशी वस्ती आहे.

मध्यप्रांतामध्यें ही जात दुग, रायपूर व विलासपूर या जिल्ह्यात विशेषकरून आढळते. याची लोकसंख्या १,३०,००० आहे.

मध्यप्रातात केवटाचे मुख्य वर्ग लडिया व उडिया असे आहेत. लडियाचे लाडया, कोसर्वांवा, विंझवार, व धुरि असे उपवर्ग आहेत. विंझवार हे हिंदू झालेले बैगा लोक आहेत व भंडाऱ्यास तर यानीं इंझवार हें नाव घेऊन बैगा मूळाचा अवशेष नाहीसा करण्याचा प्रयत्न केला आहे.

याचा व ढीमर लोकाचा फारच निकट संबंध आहे.छत्तीसगडातील ढीमर होडया चालवीत नाहींत. केवट शिंगाडे पेरीत नाहींत. केवट लोक म्हणतात कीं रामानें वनवासास जाताना याच्या हातचें पाणी पिऊन याची शिंगाडे पेरण्याची चाल बद केली ब्राह्मणांना यांच्या हातचें पाणी पिण्यास काहीं दोष नाहीं असे ठरविण्याकरिता ही गोष्ट निर्माण झाली असावी याचे अनेक असगोत्र विवाहवर्ग आहेत. आणि बरेच पशुपक्षी व झाडें हीं देवकें आहेत जसें.--तुमा, करसयाल, भलवा, धूप, इत्यादि. एक देवकाच्या कुटुंबात विवाह निषिद्ध आहेत तसेंच चुलत आतेभावाशीं व मामेभावंडाशीं विवाह निषिद्ध आहेत. मुलींचीं लग्नें १० वर्षांच्या वयातच करतात पण वर मिळत नसला तर जो कोणी लग्नाचा खर्च सोसण्यास तयार होईल त्याला देतात. संबलपुराकडे तिचें लग्न फुलाबरोबर लावतात विहारकडे वधूपेक्षा वर उंच असला पाहिजे, तो लहान असला तरी हरकत नाहीं अशी समजूत आहे लग्नें लग्नस्तंभास प्रदक्षिणा घालून होतात. वर वधूचा भाग काढतो व तिला पदर घालतो. पण बंगाल्यात वधूच्या बोटाचें थोडें रक्त काढून वर त्यात तादूळ कालवतो व ते तादूळ वधूवर दोघे खातात. विधवाविवाह व काडी मोडण्याची चाल याच्यात आहे. संबलपुरात १० वर्षे वयात झालेली विधवा ही विधवा न समजता तिचें लग्न पुन्हा कुमारिकेप्रमाणेंच होतें.

हे लोक सामान्य हिंदु देवाचीच पूजा करतात. याच्या होडयाचें रक्षण करणारी देवता 'चौरासी देवी' म्हणून आहे असें हे समजतात. हे लोक प्रेताचे पाय दक्षिणेकडे ठेऊन पुरतात व प्रेताबरोबर तीळ, कापूस व मीठ पुढें उपयोगी पडण्याकरिता ठेवतात. कोणत्याहि सोमवारीं व शनिवारीं पितरास एक कोंबडा बळी देतात. हे ओझ्याच्या कावडी देखील नेतात. विलासपूर नाव विलास केवरीण म्हणून याच्या जातीच्या एका बाईच्या नावावरून पडलें असें म्हणतात.राजाची तिच्यावर इच्छा गेली म्हणून आपला बचाव करण्याकरिता तिनें सूर्याची प्रार्थना करून त्याच्या किरणानें स्वतःस जाळून घेतलें व तिचा नवरा तिच्या बरोबर सती गेला अशी याच्यात आख्यायिका आहे [ क्रूक, रसेल आणि हिरालाल ].

केवडा---या झाडास लॅटिनमध्यें पँडानस ओडोरॅटिसिमुस, संस्कृतमध्यें केतकी, सूचिपुष्प, चामरपुष्प, मराठींत केवडा, हिंदींत केवरा, तेलगूंत मोगली, चेट्टू इत्यादि नावें आहेत केवडयाचें झाड सुमारें दोन पुरुष वाढतें. हिंदुस्थानात पाणथळ जागीं व बगीच्याभावतीं कुंपण म्हणून याची लागवड करतात. कित्येक ठिकाणीं या झाडाचीं दाट बेटें आढळून येतात. याच्या पातीस काटे असतात. या झाडाच्या पाढरा केवडा व पिवळा केवडा अशा दोन जाती आहेत पाढऱ्या जातीस केवडा व पिवळीस केतकी म्हणतात. केतकीस फार सुवास येतो व तिची पात फार सुकुमार असते केवडयास कणीस येतें. तें कणीस व त्याच्याभोंवतीं असणारीं काटेरी पानें या सर्वांस केवडयाचें फूल म्हणतात. केवडा फार सुवासिक असल्यामुळे केवडयाच्या वनांत सर्प रहातात असा लोकाचा समज आहे श्रावणांत केवडयाचा भर असतो व केतकीस माघ व फाल्गुन महिन्यातच कणीस येतें पाढरे केवडे बारमाही होतात. कर्नाटकात केवडयाच्या पातीच्या छत्र्या व चटया करतात. ही पात कातारी लोकास फार उपयोगी पडते केवडयाचें तेल व अत्तर काढतात. केवडयाच्या पानाचा वास लावून केलेल्या कातगोळ्या फार

सुवासिक होतात. केवड्याच्या आतील भागाची भाजी करतात. स्त्रिया आपली वेणी केवड्यानें सुशोभित करतात. तसेच केवड्याचें पान(पात)इतर सुवासिक फुलांप्रमाणें देवास वाहण्याचीहि चाल आहे. केवड्याच्या पातीचे तंतू काढून त्यापासून जाळी, कुंचल्या, चटया, लहान लहान पिशव्या वगैरे जिन्नस तयार होतात. केवड्याचे कांहीं औषधी उपयोगहि आहेत.

त्याच्या अंगीं उत्तेजक व आचके दूरकरण्याचे धर्म आहेत. त्याचा डोकें दुखण्यावर व संधिवातावर उपयोग करतात. कानातील ठणका केवडयाच्या तेलानें रहातो. [ वनौ. गुणा. ]

**केशर**—याचें झाड लहान असून याचे कांदे असतात. त्यास लॅटिनमध्यें ओकस साटिवस, इंग्रजींत सॅफ्रन, मराठींत व संस्कृतमध्यें केशर, कुंकुम इत्यादि नांवें आहेत.

काश्मीरमधील पामपूर प्रदेशात याची लागवड फार प्राचीन काळापासून होत आहे. पूर्वी केशराच्या पिकावर त्या संस्थानाचा पूर्ण हक्क होता.

भावप्रकाशामध्यें या झाडाला कुंकुम म्हटलेलें आहे.यावरून काश्मीरात किती प्राचीन काळापासून याचा व्यापार होता याची कल्पना सहज करता येईल. बाबर व जहांगीर यांच्या वेळच्या लेखांतूनहि काश्मीरमधील केशरासंबंधीं उल्लेख केलेला आढळतो.

केशराच्या लागवडीची जमीन उताराची असावी लागते. केशराचे कंद तीन वर्षांचे झाले म्हणजे ते दुसरीकडे तयार केलेल्या चौकोनी वाफ्यात दोन दोन हाताच्या अंतरावर लावतात. ज्या वाफ्यात केशराची लागवड करावयाची असेल तो सुमारें आठ वर्षे पडीत ठेवावा लागतो.या वाफ्यात पाणी किंवा खत देत नाहींत एकदा कंद लाविले असतां ते १४वर्षेपर्यंत टिकतात.कंदाची लागवड जुलै किंवा आगस्ट महिन्यात करतात. लागवड करतांना जमीन थोडी भुसभुशीत करून तिला चोहोंबाजूंनीं पाणी चांगलें निचरून जाण्याकरितां चर खणावा लागतो. आक्टोबर महिन्यात केशराच्या झाडांना जांभळीं फुलें येतात व त्यांचा सुगंध फार गोड व आल्हादकारक असतो. फुलें गोळा करून झाल्यावर त्यापासून केशर तयार केलें जातें. फुलें उन्हांत वाळवितात व त्यामधील प्रत्येक फुलाचे तीन स्त्रीकेसराग्र काढून घेतात. यापासून निघालेल्या केशराला शाही झाफ्रन हें नांव आहे. हें केशर पहिल्या प्रतीचें असतें. स्त्रीकेसराग्र काढून घेतल्यावर बाकी राहिलेल्या पाकळ्या तंतूपासून 'मॉगला' नावाचें हलकें केशर काढतात. मॉगला केशराचा भाव सामान्यतः तोळ्यास १रु. हा असतो. मॉगला केशर काढून घेतल्यानंतर वाळलेलीं फुलें हलकें काठीनें ठोकतात. हीं ठोकलेलीं फुलें सर्व पाण्यात टाकतात. यामधील फुलाचा उत्तम भाग बुडाशीं जाऊन बसतो. त्याला निवळ म्हणतात. तरंगत राहिलेला फुलाचा भाग फिरून ठोकतात व पुनः पाण्यात टाकतात. असा रीतीनें बुडाशीं राहिलेली निवळ एकें ठिकाणीं करतात. यापासून केलेलें केशर हलकं असतें. याला 'लचा' असें म्हणतात. केशर तयार झाल्यावर तें काश्मीरमधून अमृतसर व इतर व्यापाराच्या ठिकाणीं पाठविलें जातें.

केशराचा मुख्य उपयोग म्हणजे त्याच्यापासून होणारा रंग होय. याचा पक्वान्नात उपयोग करतात. केशरास फार किंमत पडत असल्यामुळें तें क्वचित् प्रसंगीं वापरलें जातें. मंगलप्रसंगीं याचा रंग शुभ समजतात. यूरोपखंडांत यापासून 'सॅफ्रन केक्स'(केशराच्या वड्या) तयार करतात. केशराचा रंग तांबूस असून तंतू लांब असले म्हणजे तें उत्तम प्रतीचें केशर समजलें जातें. केशर १ वर्षावर राहिलें म्हणजे बिघडावयास लागतें. केशर सुवासिक असून रंगास व औषधाकरितां उपयोगी पडतें. याच्या गंधाकरितां गाळ्यांहि करतात. केशराचा पुष्कळसा व्यापार फ्रान्स व मुंबई यामध्यें चालतो. हाँगकाँग व अरेबियामधील बंदरें यामध्यें हिंदुस्थानातून केशराची पुनर्निर्गत होते [वाट. फार्मा इंडिका]

**केशव**—मुहूर्तलाघवकार गणेशदैवज्ञ यानें 'विवाहवृंदावन' नामक ग्रंथावर टीका केली आहे तो ग्रंथ केशवचा आहे. याच केशवाचा दुसरा ग्रंथ करणकंठीरव नामक आहे असें गणेश दैवज्ञ म्हणतो, अर्थात् हा करणग्रंथ असला पाहिजे. केशव भारद्वाजगोत्री औदीच ब्राह्मण होता. याची पितृत्रयी क्रमानें राणग, प्रियादित्य आणि जनार्दन अशी होती मुहूर्तलाघवकार गणेशाचा पिता केशव याहून हा केशव प्राचीन आहे. प्राचीन केशवाचा काल शके १४००हून अर्वाचीन नसावा. याचा विवाहवृंदावन नामक ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यावर कल्याणवर्मकृत टीका आहे असें आफ्रेक्टसूची वरून कळतें [ दीक्षित–भारतीय ज्योतिःशास्त्र ].

**केशव (दुसरा)**—प्रख्यात मुहूर्तलाघवकार गणेश दैवज्ञ याचा हा पिता हा स्वतः मोठा विद्वान होता. मुहूर्तकौतुक म्हणून त्याचा एक करणग्रंथ आहे. केशवाच्या पित्याचें नांव कमलाकर होतें. तोहि मोठा ज्योतिषी होता. केशवाचा विद्यागुरु वैजनाथ नावाचा होता आणि त्याचें राहण्याचें ठिकाण कोंकणात समुद्रतीरीं नंदिग्राम हें होतें त्यास हल्लीं नांदगाव म्हणतात. हें गाव मुंबईच्या दक्षिणेस २० कोसावर आहे. त्याचें गोत्र कौशिक असून पत्नीचें नाव लक्ष्मी होतें. केशवाचे जातकपद्धति व ताजकपद्धति हे ग्रंथ सांप्रत प्रसिद्ध आहेत. ते केशवी या नांवाखालीं मोडत असून त्याचा उपयोग पुष्कळ ज्योतिषी करतात मुहूर्ततत्त्व हाहि ग्रंथ केशवाचा असून हे सगळे ग्रंथ छापले गेले आहेत. वेधाविषयीं केशवाची योग्यता फार मोठी होती. मुहूर्तकौतुक व जातकपद्धति यांवर केशवाची टीका आहे. [ दीक्षित–भारतीय ज्योतिःशास्त्र.]

**केशवचंद्र सेन**—ब्राह्मो समाजाचा एक पुढारी. केशव याचा जन्म कलकत्ता शहरात इ. स १८३८ या सालीं नोव्हेंबर महिन्याच्या १९ व्या तारखेस झाला. यांचें ब्राह्मणेतर वैद्य जातीनें. केशवच्या मातोश्रीचें नाव

सुंदरी. पिता पिआरीमोहन वारला तेव्हां केशव दहा वर्षांचा होता. केशवाला एक वडिल व एक धाकटा असे दोन बंधू होते यानीं आपली जन्मभाषा बंगाली हिचा थोडाबहुत अभ्यास केला. नंतर सात वर्षांचें वय असतां सन १८४५ साली हिंदुकॉलेज नावाच्या विद्यालयात तो जाऊं लागला. पुढें काहीं वर्षांनी मेट्रपालिटन कॉलेज नावाचें एक नवीन विद्यालय स्थापन झालें. येथें त्यानें १८५८ पर्यंत अभ्यास केला. ह्याच वर्षी केशव ह्या पाठशाळेंतून निघाला. केशवाचा विवाह सन १८५६ सालीं झाला, तेव्हां त्याचें वय १८ वर्षांचें होतें. याच्या वयास पुरीं अठरा वर्षे झालीं नाहींत तोंच त्याचा वक्तृत्वप्रभाव अनुभवास येऊं लागला. समवयी मुलाच्या सभा स्थापन करून त्यात व्याख्यानें देण्याचा व भाषणें करण्याचा त्यास मोठा नाद असे. अशा प्रकारच्या अनेक सभा त्यानें स्थापन केल्या होत्या त्यात तो तासाचे तास मोठमोठ्या गहन विषयावर आवेशानें भाषणें करी. याच्या घराजवळ पंडित राजवल्लभ नावाच्या एका पंतोजीची एक बंगाली शाळा होती एके दिवशीं राजवल्लभानें केशवाला ब्राह्मधर्मसंबंधीं एक पुस्तक दिलें, तें वाचून त्यास विलक्षण आनंद झाला व फार समाधान वाटलें तेव्हांपासून केशवाचें लक्ष ब्राह्मसमाजाकडे लागलें. त्यावेळीं नुस्ता आदिसमाजच होता. त्याचे प्रमुखत्व देवेंद्रनाथ टागोर याच्याकडे होतें. देवेंद्र हे श्रीमान असून सरदारी कुलांतील पुरुष होते. कुलीन घराण्यांतील तरुण मण्डळी ब्राह्मसमाजांत आणण्याविषयीं त्याचा फार प्रयत्न असे. केशवाहि श्रीमान व कुलीन घराण्यातील असल्यामुळें देवेंद्रनाथाची व त्याची साधारण तोंडओळख होती. प्रत्यक्ष परिचय मात्र नव्हता. याच सुमारास केशवनें 'गुडविल फ्रॅटर्निटी' नावाची एक मंडळी स्थापन केली होती. तींत मोठमोठ्याचीं मुलें जात असत तेथें देवेंद्रनाथ हेहि कधीं कधीं निमंत्रणावरून जात व अध्यक्षस्थान स्वीकारून मुलास उत्तेजन देत. तेव्हां त्या सभेंत केशवाचें बालपणचें वक्तृत्व ऐकून व त्याचा उत्साह व आवेश पाहून त्याच्याविषयीं देवेंद्रनाथाच्या मनात विलक्षण प्रेम उत्पन्न होई. राजवल्लभानें दिलेलें ब्राह्मधर्मविषयक पुस्तक केशवच्या हातात पडलें तें याच संधीस. त्याच्या वाचनानें केशवचें मन ब्राह्मसमाजाकडे वळलें आणि लवकरच त्यानें ब्राह्मधर्माची दीक्षा घेतली (१८५०)

केशवचंद्र आदिसमाजाचा सभासद झाल्या दिवसापासून त्याच्यावर देवेंद्रनाथाचा विशेष लोभ जडत चालला. ह्या दोन महापुरुषांचें एकमेकावर इतकें प्रेम होतें तरी त्यांच्या स्वभावात व गुणात पुष्कळ गोष्टींच्या संबंधानें भिन्नता होती. हे दोन पुरुष परस्परभिन्न परंतु ब्राह्मसमाजात त्यांचें ऐक्य झालें व दोघेहि भक्तिमान व धर्मशील असल्यामुळें एकमेकांवर त्याचें अलौकिक प्रेम जडलें केशवचंद्र ब्राह्मसमाजाचा सभासद झाला व देवेंद्रनाथांशीं त्याचा प्रेमभाव वाढत चालला हें पाहून केशवाच्या घरच्या माणसास फारच वाईट वाटलें. तेव्हांपासून तीं त्याचा छल करूं लागलीं. हा सर्व छल केशव निमुटपणें सहन करी इकडे देवेंद्राच्या सहवासानें केशवच्या धार्मिक स्वभावास विलक्षण बळकटी आली तो दिवसाचा आपला बराच काल देवेंद्राच्या समागमांत घालवी. त्याच्या सहवासात राहून त्याच्या बरोबर उपासना, संभाषण, धर्मचर्चा केल्यानें केशवाचा अधिकार वाढत चालला, तो इतका कीं त्याचा विश्वास, उत्साह व धर्मभाव पाहून देवेंद्रनाथानीं त्यास ब्रह्मानंद हें नाव दिलें

आदिसमाजात केशवचा अधिकार शेवटीं इतका वाढला कीं, सन १८६२ च्या एप्रिल महिन्याच्या १३ व्या तारखेस महर्षि देवेंद्रनाथानीं त्याला ब्राह्मसमाजाचे आचार्य नेमिलें. समाजाचे प्रधानाचार्य स्वतः महर्षीच होते. इतर कित्येक आचार्य असत, त्यास 'उपाचार्य' ही संज्ञा होती.

देवेंद्र आणि केशव यामधील अलौकिक प्रेमभाव फार दिवस टिकला नाहीं. जातिभेद व जानवें हीं काढून टाकण्याचा केशवचंद्र व त्याचे अनुयायी याचा आग्रह असे. म्हणून ब्राह्म समाजाच्या आचार्य वर्गांत जानवें घातलेला मनुष्य असता कामा नये असा त्यानें हेका धरिला. देवेंद्रनाथ जुन्या विचाराचे व वळणाचे असल्यानें त्याना या गोष्टी उघडपणें बंद करणें आवडेना तेव्हां केशव आदिसमाजातून निघाला व त्यानें भारतवर्षीय ब्राह्मसमाजाची स्थापना केली. हा नवीन पंथ निघाल्यावर देवेंद्राच्या पंथाला आदिब्राह्मसमाज म्हणूं लागले.

भारतवर्षीय समाजात केशवच्या धर्मबुद्धीचा एकसारखा विकास होत गेला. त्याची प्रार्थना, त्याची उपासना, त्याचे उपदेश इतके प्रेमळ असत कीं ते ऐकून त्याचा श्रोतृसमाज सद्गदित होऊन टपटप अश्रुपात करी, त्याचें आवेशयुक्त भाषण ऐकून त्याचे शत्रूहि थक्क होत असें सांगतात. त्याची निस्सीम भक्ति आणि विलक्षण वैराग्य याच्यायोगें त्यानें एक नवीन शिष्यवर्ग तयार केला. त्याच्या भक्तिभावाची जसजशी उन्नति होत गेली तसतसें त्याच्या वैराग्यास राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें. त्यानें भगवें वस्त्र धारण केलें व हाता मध्यें करताल व एकतारी घेऊन आपल्या शिष्यवर्गांसह गावातून नगरसंकीर्तन करीत फिरण्याचा क्रम चालविला. इ. स. १८६८ सालीं सर्व हिंदुस्थानातील मुख्य मुख्य स्थानीं जाऊन ब्राह्म धर्माचा उपदेश करावयाच्या उद्देशानें केशवचंद्र प्रवासास निघाले.

सन १८७० मध्यें केशवनीं विलायतेस जाण्याचा निश्चय केला. ते फेब्रुवारी महिन्याच्या १५ व्या तारखेस कलकत्त्याहून निघाले व त्याच वर्षाच्या आक्टोबरें महिन्याच्या १५ वीस परत मुंबईस आले. इंग्लंडाहून आल्यानंतर पांच सहा वर्षेंपर्यंत सामाजिक सुधारणेच्या संबंधानें केशवानीं फार मेहनत केली. विद्येचा प्रसार करून विचार जागृत करण्याकरितां त्यांनीं अनेक शाळा, कॉलेजें, पुस्तकालयें, सभा, मंडळ्या

स्थापन केल्या. ह्या सर्व कामीं लोकांनीं व सरकारी अधिकाऱ्यांनीं त्यास पुष्कळ साहाय्य केलें आपल्या स्त्रियांची उन्नति होण्याकरिता त्यांनीं "भामाहितैषिणी सभा" या नांवाची एक स्त्रियांची सभा स्थापन केली व 'भामाबोधिनी' नांवाचें एक वर्तमानपत्रहि सुरु केलें. १८७२ सालीं "ब्राह्म विवाहाचा कायदा" पास झ ला त्यांतहि त्याचें अंग होतें.

सामाजिक सुधारणेच्या ह्या गोष्टी होत असता समाजाच्या कामांत यत्किंचितहि खंड पडला नव्हता. तथापि वरील गोष्टींची व्यवस्था झाल्याबरोबर त्यांनीं समाजाच्या धर्मोन्नतीचें काम पुनः हातीं घेतलें. ह्या कार्याकरिता १८७६ सालीं कलकत्यापासून थोड्या अंतरावर एक बाग तयार करून तीस 'साधनकानन' असें नांव दिलें. ह्या ठिकाणीं ते व त्याचा निकट शिष्यवर्ग दिवसाचा बहुतेक काल भजन, भक्ति, ध्यान व उपासना यात घालवीत.

सन १८७८ पर्यंत भारतवर्षीय ब्राह्मसमाजाची धर्मोन्नति एकसारखी चालली होती. परंतु त्याबरोबरच केशवचंद्राच्या विरुद्ध असणारा पक्ष बळावत चालला. तशांत सन १८७८ सालीं केशवाच्या मुलीचा विवाह कुचबिहारच्या महाराजाशीं झाला. आपल्या समाजाच्या मताविरुद्ध केशवचंद्रानीं १६ वर्षांहून लहान असणाऱ्या कुचबिहारच्या महाराजाला आपली १३ वर्षांची मुलगी हिंदुविवाह संस्कार करून दिली म्हणून त्यांचे बरेच अनुयायी रागावले व नवीन साधारणब्राह्मसमाज निर्माण झाला. कुचबिहार प्रकरणाचें बावटळ शांत झालें नाहीं तोंच केशवानी पुनः घोर "वैराग्यसाधनास" आरंभ केला. सर्व धर्मांचें ऐक्य करणें हा जो ब्राह्मसमाजाचा मुख्य कार्यभाग तो आपण नवविधान धर्माच्या योगें पूर्ण करीत नाहीं अशी स्वतःची समजूत करून घेतली. हें धर्मैक्य साधारण जनांच्या देखील एकदम लक्षांत यावें म्हणून केशवनीं अनेक संस्कार व कर्मे लावून दिलीं. सन १८८१ त नवविधानध्वजारोपण या नावाचा एक संस्कार त्यानीं केला, त्यात ह्या नवविधानांचा हेतु उत्तम रीतीनें स्पष्ट करून सांगितला. यामध्यें सर्व राष्ट्रें, सर्व लोक, सर्व धर्म सर्व लोकाचार, सर्व भक्तिमार्ग, सर्व वैराग्यसाधनें यांचें ऐक्य झालें आहे; ह्या ऐक्याचें दर्शक अशी जी ही जयध्वजा तिच्या संरक्षणार्थ हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, पार्शी इत्यादि सर्व द्वेषभाव विसरावा आणि एक अंतःकरणानें, एक भावानें विश्वजननीस शरण जावें असें स्पष्ट करून सांगितलें. यांचें 'नवविधान' नांवाचें पत्र ते एकटे चालवीत. कुचबिहार प्रकरणापासून त्याच्याविषयीं लोक दुर्वे तें बोलत व लिहीत. 'नवविधान' उदयास आल्यादिवसापासून तर या निंदात्मक लेखाचा अगदीं कहर उसळला होता. ता. ८ जानेवारी १८८४ या दिवशीं ब्रह्मानंद केशवचंद्र सेन यानीं देह ठेविला.

केशवचंद्रांच्या अंगीं चांगले नैसर्गिक गुण होते. त्याचा लोकांवर मोठा परिणाम होत असे. विशेषतः त्याचा धार्मिक बाणा व नैतिक आचरण लोकाना मोहून टाकी व यामुळेंच केशवांच्या अनेक चुकाकडे त्याच्या अनुयायांनीं दुर्लक्ष केलें. आपलें मत दुसऱ्याला पटवून देण्यांत त्यांचा हातखंडा असे. यांचें भारतीय धर्मग्रंथांचें ज्ञान घेतांचेंच होतें व गुरुपणाच्या ढोंगधत्तुऱ्यापासून व ब्राह्मणमत्सरापासून हे अलिप्त नव्हते. त्यांचे विचार, विशेषतः आयुष्याच्या अंतिम काळांतील, त्रुटित व विसंगत असत. कोठल्याहि कामात त्याना सुव्यवस्था करिता येत नसे. प्रत्येक कार्यांत त्याचा प्रत्यक्ष संबंध असल्यानें ते गेल्यावर त्याच्या साऱ्या धडामोडी बंद पडल्या. त्यांच्या स्वभावात मनमोकळेपणा थोडाच असल्याकारणानें त्याचे अनुयायी बरेचसे साशंक असत व त्याचे नवीन विचार एकदम ऐकून त्याना सखेदाश्चर्य वाटे. पण ते विचार फार दिवस केशवचंद्राच्या मनात घोळलेले असत.

ख्रिस्तीमताचा त्यांच्या मनावर लहानपणापासून फार परिणाम झाला होता. कलकत्ता युनिव्हर्सिटीचे माजी रजिस्टार के. सी. बानर्जी नेहमी म्हणत कीं, केशव ख्रिस्ती होऊन मेले. बानर्जी हे केशवचंद्राचे परममित्र असल्यानें त्यांचें म्हणणें अजीबात विचाराबाहेर टाकून चालणार नाहीं. आपल्या नवविधानात त्यानीं बरेच ख्रिस्ती संस्कार घातले आहेत. अशा रीतीनें ख्रिस्ती संप्रदायाचें अनुकरण करून ब्राह्मसमाजातील एक भाग केशवानीं बनविला

केशवचंद्र व दयानंद हे जरी समकालीन होते तरी या दोहोंची तुलना कोणत्याच तऱ्हेनें करता येणार नाहीं. केशवचंद्राची भारतीय धार्मिक विचारविकासाच्या दृष्टीनें किंमत फारशी नाहीं व सामान्य संसारिक मोहामुळें त्याचें चरित्र कोणास स्फूर्तिदायक झालें नाहीं ('ब्राम्हसमाज' पहा).

[ स्लेटर–केशव चंद्रसेन अँड ब्राह्म समाज; मुजुमदार–दि लाईफ अँड टीचिंग्स ऑफ केशवचंद्र सेन, शिवनाथ शास्त्री–दि न्यू डिस्पेन्सेशन; व. भ. नगरकर–नवसंहिता ]

**केशवपुर**—बंगाल इलाख्यातील जेसोर जिल्ह्यातील एका तालुक्यातील खेडेगाव. जेसोरशहराच्या दक्षिणेस १८ मैलावर हें हरिहर नदीच्या काठीं वसलेलें आहे. हें गाव साखरेच्या व्यापाराकरिता प्रसिद्ध आहे. या साखरेच्या धंद्याला लागणारीं मातीचीं उपकरणें व पितळेचें काम या ठिकाणीं होतें. या गावीं बाहेरून बराच तांदूळ येतो.

**केशवस्वामी**—हे रामदास पंचायतनातील एक होत. याना भागानगरकर असें म्हणत. यांचे वडील आत्मारामपंत असून ते मोंगलाईंतील कल्याणीचे कुळकर्णी होते. केशवाच्या आईचें नांव गंगाबाई. त्या ८० वर्षांच्या झाल्यानंतर त्याना केशव हा मुलगा झाला असें म्हणतात. वाईच्या वयाच्या बाबतींत बरीच अतिशयोक्ति दिसते. केशवस्वामी हे पूर्ववयात भागानगरच्या तानशा कुतबशहा याच्या पदरीं एक अधिकारी होते. यांचे गुरु काशीराजस्वामी होत. केशवानीं एकादशीचरित्र व इतर अभंग, पदें वगैरे काव्य केलें आहे. काव्यसंग्रहात यांचीं सुमारें ५००।६०० पदें छापिलीं आहेत. यांची शिष्यशाखा बरीच मोठी होती. तिनें मराठी

आपेची पुष्कळ सेवा केली आहे. शिष्यांतील प्रमुख शिवराम व संतराज हे असून त्यांचे ग्रंथहि प्रसिद्ध आहेत. केशवस्वामींचा समाधिकाल शके १६०४ पौष शु. १२ असून, समाधिस्थळ हैद्राबादेस सुलेमान बागेपलीकडील रंगरेजगुड्याच्या पुढें मुसानदीच्या काठीं एका शेतांत आहे [ भक्त मं. चिंतानिवा, महाराष्ट्र. ]

**केशाकर्षण**-( कॅपिलॅरिटि ) ज्या नळीचें छिद्र केसाप्रमाणें अगदीं बारीक असतें तीस केशनलिका ( कॅपिलरी ट्यूब ) असें नाव आहे याप्रमाणें बारीक छिद्राच्या नलिकेंतून जें आकर्षण होतें त्यास केशाकर्षण असें नाव आहे. या प्रकारची नळी पाण्यात किंवा एखाद्या द्रवांत बुडविली असता केशाकर्षणाच्या योगानें नळीबाहेरील द्रवाच्या उंचीपेक्षा नळींतील द्रवाची उंची कमी किंवा जास्त होते. असल्या प्रकारच्या सूक्ष्म नळींत प्रवाही द्रव्याचे जे परिणाम होतात त्यांशिवाय दुसऱ्या ठिकाणीं असल्याच प्रकारचे परिणाम घडत असता त्यासहि केशाकर्षण असें नाव आहे. उदाहरणार्थ कापसाच्या वातींत तेल चढतें तें केशाकर्षणानेंच चढतें.

केशाकर्षणांत समानप्रकृतीच्या किंवा एकाच जातीच्या द्रव्यांत जें आकर्षण होत तें आकर्षण बऱ्याच अंतरावरून होत असताना अगदीं निर्बल असतें परंतु जर अंतर अत्यल्प असेल तरच हें आकर्षण जोरदार असतें असा शास्त्रज्ञाचा अंदाज आहे. जी. एच. क्विन्के नावाच्या शास्त्रज्ञानें या प्रकारच्या आकर्षणाचें मापन करण्याच्या हेतूनें कांहीं प्रयोग केले जास्तींत जास्त किती अंतर असताना या प्रकारच्या आकर्षणाचा दृश्य परिणाम होतो याविषयीं या प्रयोगावरून त्यानें अनुमानें बसविलीं आहेत. एका मिलिमिटरच्या एक वीससहस्रांश इतक्या अंतरावरून हें आकर्षण उत्तम रीतीनें होतें असें त्यानें दाखवून दिलें.

ऐतिहासिक माहिती—इ.स.१७११।१७१२च्या सुमारास फ्रान्सिस हाक्सबी यानें केशाकर्षण नळींतून होणाऱ्या केशाकर्षणाच्या बद्दल अनेक प्रयोग प्रथमत. केले; या प्रयोगावरून त्याचें असें मत झालें कीं, हें केशाकर्षण कांच आणि प्रवाही पदार्थ यांच्या दरम्यान असणाऱ्या आकर्षणामुळे होतें. तसेंच त्याच्या असें निदर्शनास आलें कीं, नळीची कांच कितीहि पातळ किंवा जाड असो नळीच्या आंतील द्रवाची फाजील उंची नळीच्या आंतील छिद्राच्या व्यासावरच अवलंबून असते. कांचेच्या जाडीचा या बाबतींत कांहींच परिणाम होत नाहीं. डॉ. जेम्स ज्युरिन, सर ऐझाक न्यूटन, अलेक्सिस क्लाड क्लेरिआट जे ए, व्हान सेमर, जे.जी. लिडन फ्रास्ट ( १७५६ ), ग्यासपर्ड मांगे ( १७८७ ), जान लेस्ली ( १८०२ ),थामस यंग ( १८०४ ), पिअरे सायमन लाप्लेस ( १८०६ ), सी. एफ. गौस( १८३० ), सायमन डेनिस पाइसन( १८३१ ) इ. शास्त्रज्ञांनीं या दिशेनें बरेच प्रयत्न केले आहेत. यांच्या प्रयत्नांच्या योगानें या विषयास असलेलें सध्याचें महत्व प्राप्त झालें आहे. इ. स. १८३१ च्या नंतर जे. ए. एफ्. प्लाटो, जी. एल व्हानडर, मेन्स ब्रुगे, अथान्से डुप्रे, एफ. एच. आर. ड्युट्रो व सर डब्ल्यू. थामसन वगैरे शास्त्रज्ञांनीं यांत बरीच प्रगति केली.

केशाकर्षणाविषयीं साद्यन्त माहिती येथें देता येणें शक्य नाहीं. केशाकर्षणाच्याच गुणधर्मामुळें जे चमत्कार दृष्टीस पडतात त्याला परिस्थितीप्रमाणें भिन्न भिन्न नांवें पडलीं आहेत. पृष्ठभागावर केशाकर्षणाचा परिणाम झालेला दिसून येतो.एखाद्या भांड्यांत पाणी आणि आल्कोहोल यांचें मिश्रण योग्य प्रमाणांत करावें तें असें कीं या मिश्रणाचें विशिष्टगुरुत्व तेलाच्या विशिष्टगुरुत्वा इतकें व्हावें नंतर यांत तेलाचे थेंब सोडल्यास ते या मिश्रणांत खालीं वर वाटेल त्या ठिकाणीं राहूं शकतात. तेलास जो आकार येतो तो कसा काय असतो हें पहाण्यासाठीं तें मिश्रण काठीनें हळूच हलवावें म्हणजे त्या थेंबास निरनिराळा आकार आलेला दिसेल, परंतु त्याबरोबरच असेंहि पण निदर्शनास येईल कीं, त्या तेलासभोंवार एखाद्या रबराच्या पिशवीप्रमाणें कसला तरी पृष्ठभाग आहे. ह्या थेंबाचा आकार मोठा असल्यास त्याला मंदमंद गति दिली असता त्या थेंबाचा आकार निरनिराळ्या रीतीनें बदलतो, परंतु त्या थेंबाचे दोन किंवा अधिक विभाग होऊं शकत नाहींत. त्या थेंबासभोंवार कसल्या तरी चिवट पदार्थाचें आवरण असल्यासारखें दिसून येतें.

अत्यंत पातळ असे पाण्याचे किंवा दुसऱ्या एखाद्या प्रवाही पदार्थाचे थर घेऊन त्यांची जाडी काढतात. त्यावर प्रकाशाच्या योगानें जे निरनिराळे रंग दिसतात त्याच्या योगानें जाडी निश्चित करता येते. याप्रमाणें जाडी निश्चित करून त्या योगानें आपणास पदार्थाच्या अण्वात्मक रचने- ( मॉलिक्युलर स्ट्रक्चर ) विषयीं अनुमान बसविता येतें. सर डब्ल्यू थामसन ( लार्ड केल्व्हिन ) यानें या रीतीनें प्रयोग करून त्यावरून त्यानें अणूच्या आकारमानाविषयीं कांहीं अनुमानें बसविलीं आहेत. केशाकर्षणाचें मूळ कारण अणूअणूमधील आकर्षण हें आहे. या प्रकारचें आकर्षण घडण्यास कमींत कमी किंवा जास्तींत जास्त किती अंतर असावें लागतें याविषयीं क्विन्के आणि दुसरे कांहीं शास्त्रज्ञ यांनीं प्रयोग केले आहेत. त्यावरून असें दिसून आलें आहे कीं, या प्रकारचें आकर्षण घडण्यास एक सहस्रांश मिलिमिटरपासून ते एक वीससहस्रांश मिलिमिटरपर्यंत अंतर असतें. इतक्या अंतरा र केशाकर्षणाचे परिणाम उत्तम प्रकारें निदर्शनास येतात. केशाकर्षणासंबंधानें मनोरंजक माहिती देऊन हा विषय पुरा करूं.

एका कांचेच्या नळींत कर्बद्विगंधकिद(कार्बनबायसल्फाइड) चा एक थेंब ठेवावा, आणि त्याच्या शेजारींच पाण्याचा एक थेंब ठेऊन ती नळी समान्तर ठेवावी; म्हणजे कर्बद्विगंधकिदाचा थेंब पाण्याच्या थेंबामागें लागून पाण्याचा थेंब पुढें पळूं लागेल. कांचेच्या एका सपाट तबकावर अल्कोहोलचा

थेंब ठेवावा आणि त्याच्या शेजारीच तेलाचा थेंब ठेवावा म्हणजे अल्कोहोलचा थेंब तैलबिंदूचा पाठलाग करताना दिसून येईल.

पाऱ्याच्या पृष्ठभागावर पाण्याचा बिंदु टाकला असता तो सर्व पृष्ठभागावर पसरला पाहिजे परंतु तो सर्व पृष्ठभागावर पसरलेला दिसत नाहीं. या प्रकारें पाऱ्याकडून अपवादात्मक असें वर्तन का व्हावें याचा उलगडा कित्येक दिवसपर्यंत शास्त्रज्ञास करिता आला नाहीं. क्विन्के यानें या गोष्टीचा उलगडा करण्याचें श्रेय संपादन केलें त्यानें असें दाखवून दिलें कीं, पाऱ्याच्या पृष्ठभागावर एक प्रकारचा चिकट असा पातळ थर असतो व त्यामुळें या प्रकारचें अपवादात्मक वर्तन पारदपृष्ठभागाकडून झाल्यासारखें दिसतें. त्याकरितां शुद्ध केलेला पारा घेतला असता या प्रकारचा अपवाद दिसून येत नाहीं.

स्वच्छ पाण्यावर कार्बन बायसल्फाईडचा थेंब टाकला असता तो पाण्याच्या पृष्ठभागावर पसरला पाहिजे, परंतु तो पसरत नाहीं आणि लेन्सच्या सारखा आकार धारण करून पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगत रहातो. परंतु असें का होतें याचा खुलासा पुढें दिल्याप्रमाणें सोपासा प्रयोग करून मिळविता येतो. पाण्यावर याप्रमाणें कार्बन-बाय-सल्फाइडचा थेंब तरंगत असता त्यावर लायकोपोडिअम नावाची तरंगणारी भुकणी टाकली असता ती भुकणी त्या थेंबापासून दूर सरकते. त्या थेंबापासून एक लहानसें वर्तुल काढावें, त्या वर्तुळाच्या दरम्यान ती भुकणी त्या वर्तुळाच्या आंत राहूं शकत नाहीं. जरी वारंवार भुकणी त्या वर्तुळाच्या आंत टाकली तरी ती सरकून बाजूस जाते. या एकंदर प्रकारावरून पुढें दिल्याप्रमाणें अनुमान बसविता येतें - नियमाप्रमाणें कार्बन बायसल्फाइडचा थेंब पसरण्याचा सारखा यत्न करीत असतो, परंतु त्याचें सारखें बाष्पीभवन होत असल्यामुळें पाण्याच्या सर्व पृष्ठभागावर तो थेंब पसरलेला दिसत नाहीं, त्यामुळें टाकलेली भुकणी थेंबापासून दूरदूर सरकते.

पृष्ठाकर्षणामुळें काय परिणाम घडतात याबद्दल पुढें कांहीं उदाहरणें दिलीं आहेत दोन सपाट कांचा घेऊन त्या ओल्या कराव्यात व नंतर त्या एकमेकींस चिकटवाव्यात याप्रमाणें चिकटविल्या असता कांचेच्या पृष्ठभागाच्या लवरेषेंत त्या एकमेकांपासून दूर करण्याचा प्रयत्न केला असता त्या दूर करितां येत नाहींत, यांना दूर करण्यास फार मोठा जोर लागतो हा जोर वातावरणाच्या जोरापेक्षा मोठा असतो. याचें कारण केशाकर्षण (पृष्ठाकर्षण) हें होय. बर्फाचे दोन तुकडे घ्यावेत, त्यांची एक एक बाजू सपाट करावी व नंतर ते दोन तुकडे एकमेकांस चिकटवून ठेवावेत कांहीं वेळानें ते दोन तुकडे मिळून बर्फाचा एकच तुकडा झालेला दिसून येतो याप्रमाणें दोन तुकड्यांचा एक तुकडा होण्याचें कारण पृष्ठाकर्षण हें होय या प्रकारास पुनर्घनीभवन (रेजिलेशन) असें नाव आहे याच्या उलट प्रकार पारा आणि कांच यांच्या संबंधांत दिसून येतो. दोन कांचा अगदीं थोड्या अंतरावर धरल्या असता त्यांच्या दरम्यानचा पारा त्या कांचांमधून निघून जातो व ती रिकामी जागा निर्वात होते. मात्र अशा प्रकारें निर्वात जागा होण्याकरितां त्या दोन्ही कांचा पाऱ्याच्या पृष्ठभागाखालीं असाव्यात, म्हणजे बाहेरील हवेस आंत शिरण्यास अवकाश मिळणार नाहीं.

थामस टेट नावाच्या शास्त्रज्ञानें नळीचा व्यास आणि थेंबाचें वजन याविषयीं प्रयोग केले आहेत. त्यानें जे प्रयोग केले आहेत त्यावरून त्यानें पुढील नियम बसविला आहे. "इतर गोष्टी समसमान असताना नळीतून गळणाऱ्या थेंबाचें वजन आणि नळीचा व्यास हीं एकमेकांच्या समान प्रमाणांत असतात."

एका सपाट पात्रांत एक दोन मिलिमिटर उंचीचें पाणी भरावें, नंतर त्यात साधारण मध्यावर एखादा आल्कोहोलचा थेंब टाकावा, म्हणजे थेंब पडलेल्या जागीं कोरडी जागा दिसूं लागेल

तीव्र मद्याचे अश्रु.—कांचेचा प्याला पोर्ट वाईन नावाच्या दारूनें अर्धा भरावा व तो कांहीं वेळ तसाच राहूं द्यावा म्हणजे ती दारू कांचेच्या बाजूनें हळू हळू वर चढेल व नंतर बिंदूच्या रूपानें अश्रूप्रमाणें खालीं पडतांना दिसूं लागेल

कर्पूर गति —कापराचा तुकडा पाण्यात टाकावा म्हणजे तो तुकडा पाण्यात वेडावाकडा फिरूं लागेल

मद्यार्कानें चालणारी होडी —उथळ पाण्यात एक लहानशी होडी टाकावी, त्या होडीची एक बाजू मद्यार्कानें ओली करून नंतर ती होडी पाण्यात सोडावी असें केल्यास ती होडी पाण्यात आपोआप चालूं लागेल मद्यार्क लावलेला भाग वराम (म्हणजे जहाजाचा मागचा भाग) असतो.

विद्युल्लतेच्या योगानें पृष्ठाकर्षणांत काय फरक होतो हें पहाणें फार मनोरंजक आहे पारा आणि सौम्य सल्फ्युरिक ॲसिड यांच्या दरम्यानच्या पृष्ठाकर्षणाबद्दल विद्युल्लतेनें मनोरंजक प्रयोग करतां येतो

एक कांचेचें भांडें घेऊन त्याच्या भोकांत बूच बसवावें बुचांत भोक पाडून त्यांतून एक धातूचा दांडा घालून त्याचें टोंक भांड्याच्या आतल्या बाजूस आणलेलें असावें त्या धातूस आतल्या बाजूनें स्पर्श करील अशा रीतीनें एक पारद-बिंदु ठेवावा. या धातूच्या दांड्यास विद्युद्घटमालेचें (विजेच्या ब्याटरीचें) एक टोंक जोडावें नंतर त्या भांड्यात सौम्य गंधकाम्ल (सल्फ्युरिक ॲसिड) ओतावें व त्यात त्या ब्याटरीचें दुसरें टोंक बुडवून ठेवावें. विद्युत्प्रवाह वहात असतांना पारद-बिंदूचा आकार कसा काय होतो याकडे लक्ष द्यावें. ज्या वेळेस पारदबिंदु धन विद्युद्ध्रुवाशीं जोडतात तेव्हां पारदबिंदु निस्तेज दिसूं लागतो आणि त्याचा गोल आकार जाऊन तो चपटा होतो परंतु जर पारद-बिंदूशीं ऋणविद्यु-

ध्रुव जोडला तर त्या बिंदूस पूर्ववत् आकार येऊन तो चक्रचक्रांत दिसूं लागतो.

**केशी**—हा एक असुर होता हा ऊर्वशी व चित्रलेखा या अप्सरास घेऊन पळत असता त्यास मारून पुरूरवा राजानें अप्सरांस सोडविलें होतें. ( मत्स्य. अ २४ )

(२) कोणा एका प्रजापतीच्या देवसेना आणि दैत्यसेना नामक दोन कन्या हरण करून पळणारा असुर त्यातून दैत्यसेना यास वश झाली, परंतु देवसेना होईना ती रडूं लागली त्यावरून इंद्रानें याचा पराभव करून तिला यापासून सोडविलि. ( भारत. वन. अ २२३ )

(३) कंसपक्षीय एक राक्षस. हा अश्वाचें रूप धरून वृंदावनात कृष्ण आणि गोपाळ यास पीडा देण्यात गेला असता कृष्णानें यास मारिलें [ भाग १० स्कं. अ ३७. ]

**केशोरइपाटण**—राजपुतान्यातील बुंदी संस्थानच्या केशोरइ तहशिलीचें मुख्य ठिकाण बुंदीपासून आग्नेयीस २२ मैलावर, व कोटा शहरापासून १२ मैलावर चंबळ नदीच्या उत्तर तीरावर हें वसलेलें आहे. या गावाची लोकसंख्या १९०१ साली ३७७३ होती. महाभारतकालापासून या शहराची प्रसिद्धि आहे प्राचीनकाळीं या ठिकाणीं जंबुकरण नावाचें एक अरण्य होतें. महेश्वरचा राजा रन्तिदेव याच्या नावावरून याला पूर्वी रंतिदेवपाटण असें नाव होतें या ठिकाणीं परशुरामानें जम्बुकेश्वराचें देवालय बांधलें अशी आख्यायिका आहे. पुढें पांच शतकें लोटल्यावर हें देऊळ अगदीं मोडकळीस आलें. तेव्हां छत्रसाल राजानें ( १६३१–१६५८ ) हें पुन्हा बांधलें. याच राजानें केशोरइ नावाचें एक मोठें देवालय बांधविलें व त्यावरूनच याला केशोरइ हें नाव पडलें आहे. या देवळात विष्णूची मूर्ति असून या ठिकाणीं दरवर्षी मोठी यात्रा भरते. मूर्तिकलेच्या दृष्टीनें या देवळात कांहींच पहाण्यासारखें नाहीं. १८ व्या शतकात, केशोरइ ही तहशील मराठ्यांना बक्षीस मिळाली, व पुढें पेशव्यांनी त्यांपैकीं $\frac{1}{2}$ शिंद्यांना व $\frac{1}{2}$ होळकरांना देऊन टाकली. १८१८ च्या तहान्वयें होळकराच्या ताब्यात असलेला भाग बुंदी संस्थानच्या ताब्यात पुन्हां गेला. पुढें १८६० च्या तहान्वयें शिंद्याच्या ताब्यात असलेला $\frac{1}{2}$ भाग ब्रिटिशसरकारनें आपल्याकडे घेऊन तो पुन्हा बुंदी संस्थानच्या ताब्यात देऊन टाकला, व त्याबद्दल दरवर्षी ८०००० रुपये बुंदीसंस्थाननें द्यावयाचें ठरलें. केशोरइपाटण गावात नदीच्या तीरावर दोन सतींचीं देवालयें असून त्या देवालयात शिलालेख आहेत. हे लेख ऱ म. १५ व ९२ या वर्षांचे आहेत

**केसरिया**—काठेवाडमधील एक छोटेंसें संस्थान. हा स्वतंत्र खंडणी देणारा तालुका पडधाण टाप्यांत आहे तालुक्यात केसरिया हें एकच गाव आहे. तालुकदार झाला रजपूत आहेत.

**केसरी**—एक वानर. अंजनेचा पति. हा गोकर्ण पर्वतावर रहात असे. एकदा शंखशादन नावाचा एक असुर बलवान होऊन त्यानें कित्येक ऋषींस बहुत त्रास दिला, त्यावरून ऋषींच्या आज्ञेनें यानें त्याशीं युद्ध करून त्याचा वध केला. तेव्हा ऋषींनीं संतुष्ट होऊन यास आशिर्वाद दिला होता कीं, तुला एक सुस्वभावी भगवद्भक्त आणि बलाढ्य असा पुत्र होईल त्यावरून यास पुढें मारुति हा तसाच पुत्र झाला.

**केसरीनाथ**—हे राशीन येथील नाथसंप्रदायातील मठाचे मठपति होत ज्ञानेश्वर–परंपरेंतील हे नाथ होते. यांच्या गुरूचें नाव उद्बोधनाथ होतें उद्बोधाच्या अनेक शिष्यांतून हेच राशीनमठाचे अधिकारी झाले पूर्वाश्रमीं हे राशीनचे मामलेदार होते. नौकरीवर असताना हे उद्बोधाच्या गावातील कथाकीर्तनास व ज्ञानेश्वरीच्या पुराणास जात असत. पुढें नोकरी सोडून हे उद्बोधाचा उपदेश घेऊन शिष्य बनले याची काव्यरचना फार आहे. त्यात सिद्धांतसार म्हणून मुख्य ग्रंथ आहे. यांनीं श. १२४६ मार्ग. शु २ रोजीं आळंदीस समाधि घेतली प्रख्यात मराठी कवि शिवदीन ( केसरी ) याचा शिष्य होय [ स. क सू. ]

**केसरीय**—बिहार-ओरिसातील चंपारण जिल्ह्यातील एक खेडें १९०१ सालीं या खेड्याची लोकसंख्या ४४६६ होती. या खेड्यात १६०० फूट परिघाची एक मोठी विटांची भिंत असून, त्यावर ६२ फूट उंच व ६८ फूट व्यासाचा एक विटांचा स्तूप आहे. बुद्धानें जीं अवतारकृत्यें केलीं त्यांपैकीं एका कृत्याच्या स्मरणार्थ हा स्तूप बांधला गेला असावा असें कनिंगहॅमनें म्हटलें आहे. हा स्तूप सन २००–७०० याच्या दरम्यान केव्हातरी बांधला गेला असावा. पण भिंत मात्र बरीच जुनी असावी असें दिसतें. ही भिंत चक्रवर्ति राजा वेन यानें बांधिली अशी दंतकथा आहे.

**केसीध्वज**—कृतध्वजाचा पुत्र. केसीध्वजास आध्यात्मिक ज्ञान प्राप्त झालें होतें. त्याचा खांडिक्य नामक चुलतबंधु फार दक्ष असून, धर्मकृत्याबद्दल त्याची फार प्रसिद्धि होती. या दोघामध्यें द्वेषभाव वसत असल्यामुळें खांडिक्यास आपल्या राज्यातून हाकून लावण्यात आलें परंतु पार्लेकरून त्याच्यात पूर्ण स्नेहभाव होऊन ते परस्पराच्या उपयोगी पडूं लागलें. खांडिक्यानें आपल्या धर्माचरणाच्या योगानें केसीध्वजास गोहत्येच्या पापापासून मुक्त फराविलं, व केसीध्वजानें खांडिक्यास योगधारणेच्या गूढ गोष्टी कथन केल्या.

**केसो भिकाजी दातार**—सवाई माधवराव यांचे कारकीर्दीत होळकर दरबारात हे रहस्य पेशव्यांचे वकील होते. हे निस्पृह व स्पष्टवक्ते असून, यांचें अवलोकन सूक्ष्म, बारकाईचें होतें. गुप्त बातम्या काढण्यात याचा हातखंडा असे. यांनीं १७८९–१७९८ पर्यंत वकिलीचें काम केलें व पेशव्यास वेळोवेळी सरकारी व इतर बातम्या दिल्या. यांनीं लिहिलेलीं २७६ पत्रें इ. स. मध्यें, ( महेश्वर दरबारचीं पत्रें भा २ यात प्रसिद्ध झालीं असून त्यात तत्कालीन होळकरशाहीचा इतिहास पहाण्यास सांपडतो. (भा. इ. सं. म. सं. १.

केळ—या झाडास लॅटिनमध्यें मूसासापिएन्टम्, इंग्रजींत प्लॅन्टेन् किंवा बनाना, व मराठींत केळ, संस्कृतमध्यें कदली, गुजराथींत केरा, हिंदींत केला इत्यादि नांवें आहेत.

मंगलप्रसंगीं केळीचें तोरण दारापुढें बांधण्याची वहिवाट हिंदुस्थानांत फार प्राचीन आहे. यावरून हें झाड आपल्या लोकांस फार प्राचीन कालापासून माहीत आहेसें दिसतें. आपल्या पुराणांत, काव्यग्रंथांत व नाटकांत कदलीवृक्षाचीं वर्णनें आलीं आहेत. प्राचीन ईजिप्शिअन लोकांस केळें माहित नव्हतें. मूळ मलायाद्वीपकल्पाकडील असावें असें म्हणतात.

व स्तु-क्षे त्र—हें बहुवर्षायु कंदरूप झाड आहे. त्याची उंची ८ ते १५ फूट असते. कधीं कधीं २० फूट उंचीचीं झाडें होतात. फळ ४ इंचापासून १५ इंचापर्यंत लांब असतात. हें झाड विहारच्या डोंगरांत, पूर्व हिमालय आणि आसामांतील पर्वतांत, मणिपूर आणि ब्रह्मदेश या ठिकाणीं आपोआप होतें. हिंदुस्थानांत व उष्ण कटिबंधांत सर्वत्र याची लागवड केली जाते. या झाडाच्या ४० जाती हिंदुस्थानांत आहेत. त्यापैकीं मुख्य खालीं दिल्या आहेत.

केळ्याच्या जातीः—मुसा डाका याचीं पानें फिक्कट हिरवीं व फळें फिक्कट पिवळीं असतात. पूर्व बंगालमध्यें याची लागवड होते.

मुसा चम्राः—याच्या पानाचा दांडा लाल असतो. व फळ ६ इंच लांब असून तें वाळलेल्या गवताच्या फिक्या रंगाप्रमाणें असतें. याचे चम्रा आणि चिनी चम्रा असे दोन प्रकार आहेत. हे प्रकार कलकत्यामध्यें दिसून येतात.

मुसा सिक्किमन्सिस.—ही जात सिक्किम प्रांतांत दार्जिलिंगजवळ होते.

मुसा पारेडिसैका—याचें फळ शिजवून खातात. भुतेळ आणि कच-केळ हे दोन्ही प्रकार यांतच येतात.

मुसा कार्निकुलाटा.—मुंबई व मद्रास इलाख्यांत ही जात सांपडते.

मुसा टेक्सटाइलीस व मुसा अरकानेन्सिस.—या दोन जातींच्या झाडापासून मजबूत व्यापारोपयोगी तंतू निघतात. ब्रह्मदेशांतील या झाडाचें फळ मुंबईच्या लाल केळ्याप्रमाणें असतें. मुंबईच्या फळाला मुसारुब्र, रामकेळें किंवा लालकेळें म्हणतात. या झाडाचा देंठ, फूल, फळ हीं तांबडीं असतात.

मुंबई इलाख्यांत आपल्याइकडे ठाणें, खानदेश, पुणें, सातारा, विजापूर, बेळगांव या जिल्ह्यांतून केळीची लागवड फार होते. ठाणें व खानदेशांत बसराई अगर बंगाली जात लावतात. तांबेळी, मुटेळी, राजेळी, गोवेगिरी, वेलची वगैरे जातींची लागवड ठाणें जिल्ह्यांत होते. पुणें, सातारा व बेळगांव यांत मुख्य जाती राजेळी अथवा राजापुरी व काळीं अथवा जुभरी या होत. शिवाय सोन, वेलची, म्हशेळी वगैरे आहेत. प्रत्येक देशांत भिन्न प्रांतांत एकच प्रकारचें झाड होत नसून लागवड केल्यामुळें पुष्कळ जातींचीं झाडें होऊं शकतात.

ला ग व ड—समुद्रसपाटीपासून ५००० किंवा ६००० फूट उंचीचा प्रदेश सोडून केळींचीं झाडें हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं होतात. कांहीं झाडें पिकल्या केळ्याकरितां व कांहीं कच्च्या केळ्याकरितां (भाजीकरितां) लावतात. कच्च्या केळ्याची लागवड हलक्या जमीनींतहि होते. निरनिराळ्या प्रांतांत लागवडीची निरनिराळी रीत असते.

सु के ळीं.—सुकेळीं करण्याचा हंगाम कार्तिक, मार्गशीर्ष व पौष हा होय. केळीं सुकविण्यासाठीं काढावयाचीं असल्यास त्याच्या शिरा पार जाऊन केळें अगदीं गोल व्हावयास पाहिजे. कच्चें काढल्यास सुकेळें कठीण व पांढरें होतें. जितकीं केळीं मिळतील तितकीं मिळवून भट्टींत ठेवून तीं पिकवितात. केळीं चांगली पिकल्यानंतर त्यांची साल काळी पडते. केळीं पिकून काळीं पडल्यानंतर तीं सोलून समुद्रकांठीं सुमारें आठ फूट उंच माडव घालून त्यावर वाळत घालतात. याप्रमाणें रोज करीत गेल्यास तीं सात दिवसांत वाळून तयार होतात. समुद्रकिनाऱ्यावर माडव उंच असल्यामुळें खालून व वरून हवा चांगली लागते व त्यामुळें केळीं लवकर व सारखीं वाळतात. वाळतांना त्यावर केरकचरा, माती वगैरे बसूं नये म्हणून काळजी घ्यावी लागते. मुंबई इलाख्यांत फक्त आगाशी येथेंच राजेळीचीं सुकेळीं करितात. मलबारकडे केळमें, टोडो उर्फ नेंद्रवाळी, कण्णन् वगैरे जातींचीं सुकेळीं होतात असें म्हणतात. बहुधा कोणत्याहि जातीचीं केळीं उन्हांत ठेवून वाळविण्यास अडचण पडत नाहीं. परंतु जी काय मुख्य अडचण आहे, ती सुकेळें भपकेदार व स्वच्छ असून त्यावर कोणत्याहि प्रकारची कीड, आळी वगैरे कांहीं असूं नये ही होय. त्यामुळें उंची व रंगदार माल फक्त आगाशीकडील राजेळीचाच होऊं शकतो.

उ प यो ग—पिकलेलीं केळीं खातात व कच्च्या केळ्यांची भाजी करतात. एका एकरांत पेरलेल्या इतर धान्यापासून जितक्या लोकांचा निर्वाह होऊं शकतो, त्यापेक्षां एका एकरांतील केळ्याच्या पिकावर जास्त लोकांचा निर्वाह होऊं शकेल. केळीं वाळवून बारीक पीठ करून त्याचे खाण्याचे पदार्थ करितात. या झाडाचीं फुलें, गाभा व कोंवळे अंकुर यांची भाजी करून खातात व गुरांना चाऱ्याप्रमाणें ते घालतात व कांदे जनावरास खाऊं घातले असता दूध वाढतें.

या झाडाच्या तंतूपासून दोऱ्या, चटया, व कागद तयार होतो [ वॅट, पराजंपे-फळझाडांचा बाग ]

**केळवाडा**—राजपुतान्यामध्यें उदेपूर संस्थानांतील कुंभलगड परगण्याचें मुख्य ठिकाण. हें उदेपूरच्या उत्तरेस ३८ मैलांवर असून कुंभलगड किल्ल्याच्या दक्षिणेस २॥ मैलांवर आहे. हें अरवली पर्वताच्या मध्यभागीं वसलेलें आहे. याची लोकसंख्या १९०१ सालीं १२०४ होती. चौदाव्या शतकाच्या आरंभीं, अल्लाउद्दिनानें जितें वेढा दिला. त्यावेळीं राणा लक्ष्मणसिंह व त्याचे

टार झाले तेव्हा राणा अजयसिंह यानें या ठिकाणचा आश्रय घेतला होता

**केळवाडी**—हें सदामाच्या उत्तरेस ११ व कट गिरीच्या पूर्वेस चार मैलावर एक खेडें आहे येथें रंगन याचें एक देऊळ आहे या ठिकाणीं फाल्गुनात यात्रा भरत असते रंगनाथाच्या देवळात एक जुना कानडी सिंद घराण्याचा ( ११९०--१२८० ) लेख आहे या घराण्याचा या तालुक्यावर अमल होता [ फ्लीट—कॅनरीज डिनॅस्टीज ]

**केळवे माहीम**—मुंबई इलाख्यातील ठाणें जिल्ह्यामधील तालुक्याचें मुख्य ठिकाण बा बं सी आय रेल्वेच्या फाट्यावर पालघर म्हणून स्टेशन लागतें त्याच्या पश्चिमेस सुमारें ५॥ मैलावर हें ठिकाण आहे. येथील लोकवस्ती १९११ सालीं ५९९९ भरली केळवें माहीम यापैकीं केळव या बंदराजवळ एक किल्ला आहे माहीम बंदरा समोरहि दोन किल्ले असून ते पोर्तुगीज लोकांनीं बांधलेले आहेत केळवें माहीम या ठिकाणीं मोठमोठ्या बागा असून येथें केळी, ऊस, सुंठ, सुपारी याचा मोठा व्यापार आहे हें शहर दिल्ली येथील मोंगलाच्या ताब्यात १३५० सालीं आलें पुढें गुजराथच्या सुभेदारानीं तें आपल्या ताब्यात घेतल १५३२ सालीं पोर्तुगीज लोकानी तें हस्तगत केलें १६१२ सालीं मोंगलानीं या शहराला वेढा दिला पण पोर्तुगीज लोकानीं मोठ्या शौर्यानें व चिकाटीनें त्याचें सरक्षण केलें या ठिकाणीं एका पोर्तुगीज सरदाराचें धडगें सापडलें त्याचा अवशेष ठाणें येथील कलेक्टराच्या बागेत ठेवला आहे १८७१ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन करण्यात आली १९०१ सालीं या शहराचा वार्षिक वसूल ८००० रुपये होता १८९० सालीं केळवें गाव देखील माहीम म्युनिसिपालिटीच्या ताब्यात देण्यात आलें माहीम शहरात एक धर्मार्थ दवाखाना असून १ मुलाच्या व १ मुलींची शाळा आहे

**केळापुर**, ता लु का —वऱ्हाड प्रांतातील यवतमाळ जिल्ह्यापैकीं एक तालुका या तालुक्याचें क्षेत्रफळ १०८० चौरस मैल आहे १९११ मध्यें या तालुक्याची वस्ती १,३०,७६७ होती या तालुक्यात ३१० खेडेगावें आहेत या तालुक्याचें मुख्य ठिकाण पांढरकवडा हें आहे या तालुक्यात गोंड लोकाची वस्ती अधिक आहे चांदा येथील गोंडांच्या राज्यात याचा पूर्वी समावेश होत असे या तालुक्याचा वार्षिक महसूल १३५०० येतो

**केळोद**—मध्यप्रांतातील नागपूर जिल्ह्याच्या काटोल तहशिलींतील एक गाव नागपूर छिंदवाडा रस्त्यावर नागपूरहून १८ मैलावर हें गाव वसलेलें आहे या ठिकाणीं पूर्वी केळीच्या बागा असत व त्यावरूनच याला सध्याचें नाव पडलें असावें या गावची लोकसंख्या १९११ सालीं ५७८५ होती गणी पिण्याचीं पितळी भांडीं या ठिकाणीं चागलीं तयार होतात या ठिकाणीं नुकतीच एक कापूस वटव ण्याची गिरणी निघाली आहे.

**केकाडी**. कर्नाटक व दक्षिण महाराष्ट्र येथें या जातीची वस्ती साधारण असून १९११ सालीं मुंबई इलाख्यात त्याची सख्या ९९१८ होती दरवडेखोरी व भुरटेगिरी याबद्दल केकाड्याची प्रसिद्धि आहे अजूनहि चोऱ्या व घरफोडी करण्याचा त्याचा व्यवसाय चालू असला तथापि अलीकडे त्याची थोडी सुधारणा झाली आहे आपलें मूळ ठिकाण तेलगण होय असें ते सागतात आणि तेलगू व कानडा मिश्रित अशी त्याची भाषा ऐकली कीं, ते तेलगणचे असावे हें संभवनीय दिसतें केकाडी जातींत भामटे व लमाण वगैरे गुन्हेगारहि शिरले असून कांहींना अर्धवट मराठीहि बोलता येतें

या जातींत नऊ पोटजाती आहेत बोरीवाले, धनताळे, कामाठी, काइजी, लमाण, माकडवाले, उरूकैकाडी, वाइवेस व भामटे असे ते नऊ भाग आहेत या सर्वांचा धंदा म्हणजे माकडें घेऊन फेरी करणें, टोपल्या करणें, जादुगिरी करणें व खिसे कातरण, किंवा अशाच स्वरूपाचा असतो ओड व कोल्हाटी जातींशीं त्याच सादृश्य दिसून येतें उपरोक्त जातींशिवाय गोत्रांतर—विवाहामुळ झालेले कांहीं भेद आढळतात जाधव, माने, गायकवाड, मधावत व पोवार असे पाच मुख्य वंश आहेत जाधवाचे मधू व सपाटसर आणि मान्याचे मानक व मालाजूर असे भेद आहेत कांहीं ठिकाणीं वरील वंशाचीं नावें हल्लीं आडनावें बनलीं आहेत मुख्य वंशांना, सातपाडी, मेलपादी, कावाडी, मढरेगुदी व संगाडी अशीं दुसरीं नावें आहेत

त्याच्यात बालविवाह रूढ असून बहुपत्नीत्वास मुभा ठेविली आहे मुलाचा बाप प्रथम मागणी घालतो व वधूच्या बापास २५ ते १०० रुपयेपर्यंत देतो लग्नाचा मुहूर्त व काय ब्राह्मणाकडून करविण्यात येतें पंचपालवी हें केकाड्याचें देवक असून त्याची लग्नाच्या दिवशीं स्थापना करितात होम, मगळसूत्र, कंकण वगैरे समारंभ कुणब्याप्रमाणेंच करण्यात येतात खानदेश व बेळगाव जिल्ह्यात अशी चाल आहे कीं, नवऱ्यानें आपल्या बायकोच्या घरीं तीन मुलें होईपर्यंत राहून आपल्या सासऱ्याच्या कुटुंबाचें पोसलें पाहिजे अशा अटीवर लग्न ठरल्यानतर पुढें नवराबायकोंत कलह झाल्यास तिच्या आईबापास पोसण्याची जबाबदारी नवऱ्यावर असते धनताळे केकाड्यात पंचाकडून लग्न ठरविण्यांत येतें पिंपळाची टहाळी एका घटात घालून व त्यात पाणी घालून, त्या घटापुढें वधूवरास बसवितात लोकांनीं अक्षता टाकल्यानंतर लग्नविधि पूर्ण होतो. या जातींत विधवाविवाहास मोकळीक आहे एक ब्राह्मण उपाध्याय व विधवा स्त्रियाच विधवेच्या लग्नात भाग घेतात

एखाद्या अविवाहित पुरुषास विधवेशीं लग्न कर्तव्य असेल तर त्यास प्रथम शमी वृक्षाशीं लग्न करावें लागतें नवराबायकोंत कलह झाल्यास काडीमोड करण्याची वहिवाट आहे

कैकाडी हे हिंदुधर्मीय असून बारसासमयीं हिंदु कायद्याचाच अवलंब करितात हिंदु देवतांना मान देऊन हिंदु सणच ते पाळतात खंडोबा, भवानी, मरिआइ, फिरगाई, तुकाई, यमाई, वगैरे देवतांची ते उपासना करतात सोनोरीचा बहिरोबा, जेजुरीचा खंडोबा, तुळजापुरची भवानी व मारुती या त्यांच्या कुलदेवता होत आळंदी, जेजुरी, सोनोरी, तुळजापूर, पंढरपूर वगैरे ठिकाणीं ते यात्रेस जातात गोसावी हे त्यांचे धर्मगुरू असून शकून, जादुगारी, चेटूक, कौल इत्यादिकांवर त्यांची श्रद्धा असते एखादी साथ उद्भवली की, बकरें किंवा रेडा बळी देतात खानदेशचे कैकाडी दावुलमलिक नांवाच्या मुसुलमान साधूस फार मान देतात या जातीचे उपाध्ये साधारणपणें देशस्थ ब्राह्मण असतात कैकाडी लोक मृतास पुरतात किंवा जाळतात दहा दिवसपर्यंत सुतक पाळण्यात येतें व प्रेतवाहकहि सुतक पाळतात रक्षा भरणें, क्षौर करणें वगैरे सर्व विधी करण्यांत येतात मृताची एक मूर्ति घरच्या देवांत पुजेकरितां ठेवण्यात येते श्राद्ध करण्याची चाल या लोकांत नाहीं

कैकाड्यांची चोर म्हणून प्रसिद्धि असल्यानें त्यांच्यावर पोलिसांची नेहमीं नजर असते त्यांचा परंपरागत धंदा टोपल्या करणें हा होय. पक्षी व हरिण पकडण्याचीं जाळीं तयार करणें पक्ष्यांचे पिंजरे करणें, मुलांचीं खेळणीं तयार करणें वगैरेहि धंदे कैकाडी लोक करतात

टोपल्यातील साप लोकांना दाखवून कांहीं लोक भिक्षा मागतात वाळू, माती, विटा, कोळसे वगैरे गाढवांवर लादून नेआण करण्याचें कामहि कांहीं लोक करतात कांहीं लोक शेती व मजुरी करूं लागले आहेत बकरें, हरीण ससे व डुकर यांवर उपजीविका करून ते दारूहि पितात त्यांचा सामाजिक दर्जा कुणब्यांहून अत्यंत हीन आहे

या जातीचा उल्लेख दामाजीपंत मंगळवेढेकर यांच्या वेळीं ( तेरावें शतक ) झालेल्या एका ऐतिहासिक महजरांत स्पष्ट आढळतो महारांनीं गांवातील कोणत्या लोकांपासून कोणकोणते हक्क वसूल करावेत याबद्दलच्या यादींत त्यांनीं कैकाडी लोकांपासून, प्रत्येक लग्नास सवा दोन रुपये व मर्तिकाच्या प्रत्येक मढ्याबद्दल साडेतीन रुपये वसूल करावेत असा निर्देश केलेला आहे [ इति मंड चतु सं वृ ६२ ]

व ऱ्हा ड म ध्य प्रां तां ती ल कै का डी —मध्यप्रांतात यांची वस्ती जास्त आहे हे कान्होबा रमगनास आपला पूर्वज समजतात व त्यानें आपल्या मुलास एक कादी दिली व त्यावर निर्वाह करण्यास सांगितलें म्हणून आम्ही टोपल्या विणून निर्वाह करतों, अशी हे जीवनवृत्ति समजावतात नेमाड जिल्ह्यात यांच्या दोन जाती आहेत.एक मराठी व दुसरी फिरस्ता मराठे कैकाडी दुसऱ्या वर्गास नीच समजतात नागपुरात यांच्या अनेक उपजाती आहेत त्या —कामाठी भामटी, कुणबी, तोर्कीवाला व घोरीवाला यावरून अन्य जातींनीं आपल्यातून काढून दिलेले लोक कैकाडी जातींत शिरले असावे असें दिसतें वऱ्हाडात यांच्या साडेबारा पोटजाती आहेत नेमाडात यांचे दोन वर्ग जाधों व गायकवाड असे आहेत व हे परस्परांशीं विवाह करतात दक्षिण जिल्ह्यातून जाधों, माने, कुमरे, जेष्टी, कले, दाने व इतर असे अनेक वर्ग आहेत यांचा मद्रासच्या कोरवा जातीशीं पूर्वी केव्हा तरी निकट संबंध असावा

सगोत्र विवाह यांच्यात निषिद्ध आहेत मुलींचें लग्न ८ ते १२ वर्षांच्या वयात होतें मुलीला वर मिळत नसला तर दुसऱ्या कोणाच्या तरी लग्नात अर्काच्या झाडाबरोबर किंवा अंगठीबरोबर तिचें लग्न करितात व तें झाड फार जपून वाढवितात आणि ती आंगठी बोटात घालतात जर तें झाड मेलें किंवा आंगठी हरवली तर त्याची उत्तरक्रिया करितात. २० ते १०० रुपयापर्यंत मुलींचें शुल्क असतें विधवेनें नवऱ्याच्या पाठच्या भावाबरोबर लग्न केलें पाहिजे व या पाठच्या भावाखेरीज इतर भावाबरोबर तिला लग्न करता येत नाहीं जर तिनें योग्य दिरास सोडून इतरास वरिलें तर त्या माणसानें तिच्या लग्नाचा अर्धा खर्च दिरास भरून दिला पाहिजे विधवाविवाह तिच्या नवऱ्याकडेच झाला पाहिजे प्रथम वरानें विधवेबरोबर लग्न करण्यापूर्वी रुइच्या झाडाबरोबर प्रथम विवाह केला पाहिजे हे पुष्कळ बायका करतात पण पहिल्या बायकोच्या परवानगीशिवाय दुसरें लग्न करता येत नाहीं व पहिली बायको नवऱ्याकडून ' दुसरें लग्न केल्यावर मी चांगला वागेन असें कागदावर लिहून घेते. बहुधा पहिल्या बायकोचे आईबाप दुसरें लग्न करूं देत नाहींत सबळ कारणें असलीच तर घटस्फोट करूं देतात व पंचायतीच्या सह्यासह एक फारखतीचा कागद तयार करतात त्याबद्दल नवऱ्यास ८ ते १० रुपये भरावे लागतात यांचा दव नाग आहे हे खंडोबाची व मरीमाताची पूजा करतात हे लोक फार अपवित्र समजले जातात ब्राह्मण, वाणी व कलारसुद्धा यास स्पर्श करीत नाहींत. यास मंदिरांत येऊं देत नाहींत यांची जातपंचाइत असून ती निरनिराळ्या अपराधाबद्दल शिक्षा करते जर कोणा कैकाडिणीनें भिन्न जातीशीं व्यभिचार केला तर तिला नदीवर किंवा विहिरीवर नेतात तिचें संपूर्ण क्षौर करतात मग दोन दारांचें झोपडें मुद्दाम जवळच तयार करून ठेवलेलें असतें त्यात ती एका दारानें जाते व बाहेरून ते झोपडें पेटवितात तें पेटत असताना ती कांहीं वेळ झोपडींत बसते नंतर दुसऱ्या दारानें बाहेर पडते मग एका लहान मुलास प्रथम तिच्या हातचें जेवण घालतात असाच विधि मुंबईचे कोरवा लोक करतात [ रसेल व हिरालाल ]

कैकुवाद—हा दिल्लीचा गुलाम ( मुसुलमान ) घराण्यांतील एक शहा ( स. १२८६–८८ ). हा बल्वनचा नातु होय. याचा बाप व हा आजाच्या कारकीर्दीत बंगालचा सुभा होता. आजाच्या मरणानंतर हा गादीवर आला ( याचा बाप आजाचा आवडता होता ). हा देखणा व सौम्य होता. आजानें त्याला १७ वर्षे शिक्षण देऊन शिस्त लाविली होती. परंतु हा गादीवर आल्यानंतर त्या कडक शिस्तीचा वचपा यानें काढला दारू व बायका याच्या विलासात हा फार दंग असे. सर्वदा चैनींत दंग असल्यानें राज्याचा कारभार दिवाण निजामुद्दीन पाही दिवाणानें याला काढून राज्य बळकाविण्याचा प्रयत्न केला, परंतु तो आयत्या वेळीं उघडकीस आला व त्यामुळें दिवाणानें आत्महत्या केली पुढें कांहीं दिवस कैकुवाद शुद्धीनें वागत असे; परंतु व्यसन पुन्हां बळावलें व सर्वत्र अंदाधुंदी माजली. तेव्हां दरबारातील जलालुद्दीन खिलजी नावाच्या सरदारानें आपला पक्ष प्रबळ करून एके दिवशीं कैकुवाद विलासात गुंग असता त्यास ठार मारून त्यानें प्रेत खालीं यमुनेंत फेंकून दिलें व आपण तक्त बळकावलें येथें गुलाम घराण्याचा शेवट झाला. हे गुलाम शहा फार व्यभिचारी व माथेफिरू असत. कैकुबादचा बाप त्याच्या भेटीस आला असता त्या प्रसंगीं प्रसिद्ध मुसुलमान कवि अमीर खुश्रु यानें त्या प्रसंगावर एक हृदयस्पर्शी काव्य केलें आहे. तें किरान–उस्–सदइन ( दोन नक्षत्राचा संयोग ) या नावानें प्रख्यात आहे [ बील–ओ. बा. डि; स्मिथ–ऑ. हि. इं.; सरदेसाई–मु. रि. ]

कैकेयी.—सूर्यवंशीय दशरथ राजाच्या तीन मुख्य स्त्रियांतील एक ही केकय देशींच्या अश्वपति राजाची कन्या असून आपल्या पतीस अतिशय प्रिय असे. एकदा लढाईंत ही दशरथराजास फार उपयोगी पडली होती. दाशरथि रामास अरण्यवास आणि दशरथास मृत्यु, असे प्राप्त होण्यास हीच कारण झाली होती. हिचा पुत्र भरत. ( २ ) मत्स्यपति विराटाची स्त्री सुदेष्णा, ती केकयाधिपतीची कन्या म्हणून तिलाहि कैकेयी म्हणत असत.

कैकोलन—एक कोष्टी जात. यांची एकंदर लो. सं. (१९११)३०३२९७ आहे.बहुतेक मद्रास इलाख्यातच आहेत. तेलगू प्रांतांत व दक्षिणेकडील सर्व जिल्ह्यांत कैकोलन जातीचे तामीळ कोष्टी रहात असून ते तेलगू भाषाच बोलतात. अशी एक दंतकथा आहे कीं, मदुरेच्या नायक राजांना कैकोलनांचें काम पसंत न पडल्यामुळें त्यांनी उत्तरेकडून पटनूलकारन कोष्टी आणविले, व त्यांचीच संख्या पुढें जास्त झाली. संस्कृत वीरबाहु शब्दाचा समानार्थी तामीळ शब्द कैकोलन असा आहे व वीरबाहु हाच आपला मूळ पुरुष होय असा या जातीची समजूत आहे. कैकोलन लोकांना सेनगुंदार म्हणजे रक्तरंजीर असें म्हणतात. व त्याविषयीं दंतकथाहि आहेत. कै म्हणजे हात व कोल म्हणजे धोटा, अशी कैकोलनची व्युत्पत्ति आहे. हातमागाच्या विविध भागांना हे लोक देवता व ऋषी समजतात धागा हा विष्णूच्या नाभिकमलांतून प्रथम उत्पन्न झाला, बाणा म्हणजे एक देवता, ताणा म्हणजे नारद, पावटी हा वेदमुनि, फलक म्हणजेच ब्रह्म आणि ताणा बांधण्याचा मुख्य दोर म्हणजे आदिशेष होय. अशा तऱ्हेच्या श्रद्धामय कल्पना मागाविषयीं कैकोलन कोष्ट्याच्या आहेत.

कित्येक ठिकाणीं खालील पोटजाती आढळून येतातः— सोझिया, रट्टु, सिरुताली, परुताली, शिरपरम्, सेवायहवृत्ति, इत्यादि. बहुतेक कैकोलन शैव असून कांहीं लिंग धारण करितात व कांहीं वैष्णवहि आहेत.

या जातीच्या मुख्य पुढाऱ्यास पेरिदानकारन् अथवा पट्टकारन् असें म्हणतात. त्याच्या हाताखालच्या मुख्यास ग्रामणी व उरल असें म्हणतात. कांजीवरम् येथें राहणारा त्याचा पुढारी देणग्या स्वीकारतो व जातीसंबंधीं तंटे मिटवितो त्यास महानाट्टन् असें म्हणतात त्याची अनुज्ञा उल्लंघन केल्यास तो अपराध्यास जातिबहिष्कृत करितो नट्टक्टाद नायनमार नावाचा एक भिक्षुक वर्ग कैकोलन जातीस जोडलेला आहे. देशांतर करताना,कोठेंहि जातीचा तंटा असल्यास, सभा बोलावून व कांजीवरम्च्या महानाडचे प्रतिनिधी म्हणून हजर राहून ते वादाचे निकाल कसे होतात हें पाहतात. जातिविषयक वाद संपेपर्यंत :आपलें काम तहकूब ठेवण्याची पद्धति या लोकात आहे. ते कामाक्षी देवीची उपासना करितात. वरील भिक्षुकवर्ग एका वेळूवर चढून कांहीं शकुनात्मक धार्मिक विधि व कसरती करितो. या दोन्ही गोष्टींना एका दंतकथेचा आधार आहेसें दिसतें नट्टकट्टद नायनमार हे आपण वीरबाहूचे वंशज आहों असें हक्कानें प्रतिपादन करितात. कैकोलनापेक्षा हे भिक्षुक लोक हलक्या दर्जाचे असून त्यांचा कैकोलनाशीं बेटीव्यवहार होत नाहीं. पोभम बालाधार व ऑंटीपुली नांवाचे दोन भिक्षुक वर्गहि यात असलेले आढळून येतात.

कैकोलन जातीचे नाडू अथवा देश असे ७२ विभाग असून ४२ पश्चिमेकडील नाडू व २८ पूर्वेकडील नाडू असे मुख्य आहेत. या सर्वांत बहुधा परस्पर लग्नें होतात सर्व नाडूंचे वरिष्ठ ४ थिसाइनाडू असतात व सर्वांत श्रेष्ठ कांजीवरम्चा नाडू असतो. थिसाइ नाडूंचे चार प्रकार शिवपुरम्, थोंडिपुरम्, विरंचीपुरम व शिवलिंगपुरम् असे आहेत. ७२ नाडूंपैकीं, प्रत्येक नाडूचे किलइग्राम, पेरुरग्राम व सिथुरग्राम असे पोट प्रकार आहेत. सध्या कांजीवरम् येथें कैकोलनचे दोन मुख्य विभाग आहेत व ते अय्यमपेटइ व पिलइपालयम् असे आहेत. आपला पूर्वापार कोष्ट्याचा धंदा सोडून सध्या कैकोलनांनीं शेती, व्यापार, गाडी हांकणें व हमाली करणें असले धंदे स्वीकारले आहेत

प्रत्येक कैकोलन कुटुंबातील एक मुलगी देवास वाहण्याची चाल त्यांच्यांत रूढ आहे. देवदासी जातींनी हे ११४

देवीत नाहींत, तथापि कांहीं समारंभाच्या प्रसंगीं ते दासींच्या घरीं सुखानें जेवतात. स्टुअर्ट म्हणतो कीं कुटुंबाचा पुढारी जर पुत्रहीन मेला व त्यास जर मुली असल्या तर त्यापैकीं एकीला दासी करतात. अशा दासी केलेल्या व देवास वाहिलेल्या मुलीस नृत्य गीतादि शिकविण्यांत येतें. एका देवळांत मूर्तीसमोर त्या दासीला बसवून ब्राह्मणद्वारा तालिबंधन करण्यांत येतें व नंतर तिची मिरवणूक काढतात. जिचें देवाशीं लग्न झालें आहे अशी एखादी दासी मृत झाल्यास देवावरील वस्त्र व फुलें तिला अर्पण करून तिचा अंत्य विधि होईपर्यंत ते देवाची पूजा करीत नाहींत.

कांहीं कैकोलनामध्यें सिद्धालंकार नावाचा एक लग्नविधि आहे. त्यांत वरानें वधूचें तालीबंधन केलें कीं लग्न ठरलें असें मानतात. नंतर वडिल मनुष्यांना तें लग्न मोडतां येत नाहीं. संतति नसेल तर स्त्रियांना पुनर्विवाह करण्याची मुभा देण्यांत येते. या जातीविषयीं पुष्कळ म्हणी उपलब्ध आहेत. अंत्य विधीची त्यांच्यांत अशी एक चाल आहे कीं, शेवटच्या दिवशीं एक झोपडी बांधून व न्हाव्यानें आणलेल्या दगडाची तेथें रास करून त्या दगडांनाच सर्व पदार्थ समर्पण करितात. देवीची साथ येऊं नये म्हणून माणसांनीं देवांचा रथ ओढणें, आकडे टोंचून घेणें इत्यादि प्रकार त्यांच्यांत रूढ होते. [ थर्स्टन ]

गंगम्मा देवीप्रीत्यर्थ होणारा तिरुपति येथील वार्षिकोत्सव कैकोलन आनंदानें करितात. या उत्सवाचा विशेष स्टुअर्टच्या मताप्रमाणें असा कीं, उत्सवदिन सुरू झाल्यानंतर रोज सकाळीं व सायंकाळीं लोक कपडे बदलतात. रविवारीं सकाळीं दिसून येणारा मातंगी वेष पाहण्यासारखा असतो. त्यावेळीं भक्त देवीपुढें नाचूं लागतो. तो रंगांत आला कीं, गिर्मेत एक तरवार मारून घेतो. हा वेषसमारंभ एका ब्राह्मणाकडे व महंताच्या मठांत होतो. ' पीरंतालू-वेष ' नावाचा समारंभ उत्सवाच्या अखेरीस होतो; त्यावेळीं स्त्रीवेष घेऊन एक कैकोलन जातीचा मनुष्य घोड्यावरून कुंकुम वाटीत गावांतून फेरी मारून येतो.

कैटभ—कैटभ आणि मधु या नावाचे दोन क्रूर दानव होते. विष्णु निद्रित असतां त्याच्या कानापासून हे दानव निर्माण झाले. विष्णूच्या नाभीपासून जन्मलेल्या कमळांत वास करणाऱ्या ब्रह्मदेवाचा वध करण्यास ते उद्युक्त झाले असें वर्णन महाभारतांत व पुराणांतून आढळतें. विष्णूनें दोघांनाहि ठार केल्यामुळें, त्यास 'कैटभजित्' व 'मधुसूदन' अशीं अभिधानें मिळालीं. कैटभवधाचें श्रेय मार्कंडेय पुराणाप्रमाणें उमेस मिळतें; म्हणून उमेस ' कैटभा ' असें विशेषण लावितात. या दानवाचा मेद सांडल्यामुळें पृथ्वीस मेदिनी असें नांव पडलें असें हरिवंशांत सांगितलें आहे. हरिवंशांत एके ठिकाणीं असा उल्लेख आहे कीं, वरील दोघा दैत्यांचे देह समुद्रांत टाकले जाऊन तेथें त्यांच्या शरीरापासून प्रचंड मेद तयार झाला व नारायणानें त्या मेदाचा उपयोग करून पृथ्वी निर्माण केली. या दानवाच्या मेदानें सर्व पृथ्वी झांकून टाकल्यामुळें पृथ्वीस ' मेदिनी ' हें नाव पडलें असें एके ठिकाणीं लिहिलें आहे. पृथ्वीच्या उत्पत्तिविषयक अनेक कल्पनांपैकीं ही एक कल्पना आहे.

कैथल, तहशील—पंजाब इलाखा. कर्नाळ जिल्ह्याची पश्चिमेकडील तहशील. उ. अ. २९° २२' ते ३०° १२' व पू. रे. ७६° ११' ते ७६° ४०'. क्षेत्रफळ १२७३ चौरस मैल लो. सं. ( इ. स. १९११ ) २,५०,९१७. या तहशिलींत कैथल व पुंड्री हीं गावें व ४१३ खेडीं आहेत.

शहर—कैथल तहशिलीचें मुख्य ठिकाण. उ अ. २९. ४८'व.पू.रे ७६° २२'सदर्न पंजाब रेल्वेच्या कर्नाळ फांट्यावरील हें अखेरचें स्टेशन आहे. लो. सं. ( १९११ ) १२९१२. हा गांव एका विस्तृत तलावाभोंवतीं वसलेला आहे. या तलावास ठिकठिकाणीं पायऱ्यांचे घाट बांधले आहेत. कैथल गाव कुरुक्षेत्रांत असून युधिष्ठिरानें वसविला असें म्हणतात. याचें संस्कृत नांव कपिस्थल असें असून हनुमानाची मातोश्री अंजनी हिचें येथें देऊळ आहे. मुसुलमानी अमलाच्या आरंभीं या गावास थोडें फार महत्व होतें व तैमूरनें दिल्लीवर स्वारी करण्यापूर्वी इ. स १३९८ सालीं येथें मुक्काम केला होता. त्यावेळीं येथील लोक अग्निपूजक होते असा उल्लेख करून ठेवलेला आहे. येथें बलखचा शेख सलाउद्दीन ( इ. स. १४२६ ) याचें थडगें आहे. त्या थडग्याचा जीर्णोद्धार अकबर बादशहानें केला. इ. स १७६७ सालीं भाइ देसुसिंग या शीख सरदारानें येथें आपला अमल बसविला. इ स. १८४३ सालीं शिखाकडून तें ब्रिटिश मुलखांत समाविष्ट झालें भाईचा राजवाडा अद्यापि पडक्या स्थितींत दिसतो. इ स. १८६७ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. कैथलं येथें सोरा शुद्ध करण्यांत येतो. शिवाय लाखेचें वार्निश केलेलें लाकूड तयार होतें.

कैफेंगफु—चीन देशांतील होनान प्रांताची कैफेंगफु ही राजधानी आहे ही उ. अ. ३४° ५२' व पू. रे. ११४° ३३' यावर आहे. ही पेकिंग–हॅनकौ रेल्वेच्या एका फांट्यावर आहे. सध्याचें शहर ड्यूक च्वांग ( इ. स. पूर्वी ७७४–७०० ) यानें आपल्या जहागिरीची ( फेंग ) मर्यादा ठरवण्यासाठीं ( कै ) बांधिलें. यावरून याचें कैफेंगफु नाव पडलें असावें. चिनी इतिहासांत कैफेंगफूला बरींच टोपण नांवें मिळालीं. चौ, सुइ व तंग या घराण्याच्या वेळेस (इ स.५५७–९०७ ) पिएनची, पुताई घराण्याच्या वेळीं ( ९०७–९६० ) तुंग किंग, संग व किन यांच्या वेळेस ( ९६०–१२६० ) पिएन किंग, अशीं नांवें मिळालीं. युआन अथवा मोंगल घराण्याच्या वेळीं ( १२६०–१३६८ ) ह्या शहराला पिएनलिंग म्हणत व मिंग घराण्यानें याला मूळचें म्हणजे कैफेंगफु शहर हें नांव दिलें.

कैफेंगफु शहर होअंगहो नदीच्या दक्षिणेस वर असून त्याला पुरानें वाहून जाण्याची

१६६२ त महापुरानें या शहराचा फार नाश झाला. हें शहर मोठें आहे. रस्ते रुंद असून बऱ्याच प्रेक्षणीय इमारती आहेत. येथील मोठी प्रसिद्ध इमारतः म्हणजे एक बारा मजली मंदिर ही होय. याची उंची ६०० फूट आहे. तसेंच एक २०० फूट उंचीचा पाहऱ्याचा बुरुज आहे. तसेंच या शहराच्या आसमंतातील प्रदेशात चिनी लोकांनी अति प्राचीन काळीं केलेल्या वसाहतींपैकीं एक वसाहत होती. यामुळें कैंफंगफूला एक तऱ्हेनें महत्व आलें आहे. चीन देशात आलेले यहुदी लोक १६६३ साली याच शहरीं प्रथम येऊन राहिले होते.

इ. स. १८५३ साली तैपिंग बंडवाल्यानीं हें शहर हल्ला करून मोठ्या शिकस्तीनें घेतलें त्यांनीं शहराची लूट करून कांहीं भागाचा नाश केला.

येथील व्यापार फारच थोडा आहे. पाश्चात्य पद्धतीवर झालेल्या कांही शाळा कैंफंगफूमध्यें आहेत त्यात एक सरकारी विद्यालय व लष्करी शाळा आहे. १९०५ साली येथें एक टांकसाळ सुरू झाली. येथील लोकसंख्या १९०८ साली सुमारें २,००,००० होती बहुतेक लोक मुसुलमान आहेत. सुमारें ४०० लोक यहुदी धर्माचे आहेत.

**कैमगंज, तहशील**—संयुक्त प्रांत.फरुखाबाद जिल्ह्याची उत्तरेकडील तहशील. हींत कंपील व शमसाबाद हे परगणे आहेत. उ. अ. २७° २३' ते २७° ४३' व पू. रे. ७९° ८' ते ७९° ३७'. लो. सं. ( १९११ )१,६९,०४५. क्षे. फ ३६५ चौरस मैल. हींत २ गावें व ४०५ खेडीं आहेत. कैमगंज हें मुख्य ठिकाण आहे. या तहशिलीत बराच भाग स ल आहे. गंगा नदीचा लोअर कालव्याचा फत्तेगड फाटा या तहशिलींतून गेला आहे.

**गा व.**—कैमगंज तहशिलीचें मुख्य ठिकाण. उत्तर अ. २७° ३०' व पू. रे. ७९° २१'. हें कानपूर अछनेडा रेलवेचें एक स्टेशन आहे.

लोकसंख्या ( १९११ ) ७४३०. फरुखाबादचा पहिला नवाब महंमदखान यानें इ. स. १७१३ साली हा गाव वसविला. सतराव्या शतकाच्या आरंभीं या गावाच्या आसपास पुष्कळ पठाणानीं वसाहत केली. येथें संवारूचा बराच व्यापार आहे. पूर्वी येथें तलवारी तयार होत असत. हल्लीं त्याऐवजीं साध्या सुऱ्या व अडकित्ते तयार होतात.

**कैमुर**—विंध्य पर्वताचा पूर्वेकडील भाग. उ. अ २३° २६'. पू. रे. ७९° ४८'. मिर्झापूर जिल्ह्यात विजयगड नावाचा पुरातन किल्ला आहे. येथील लेण्यात व डोंगरातील खबदाडात प्रागैतिहासिक कालांतील माणसांचीं चित्रें दगडांवर खोदलेलीं आढळतात

**कैय्यट**—महाभाष्यप्रदीप मेघाचा कर्ता काव्यप्रकाशटीकाकार भीमसेन अशी माहिती देतो कीं, जय्यटाला त्याच्या पत्नीपासून कैय्यट उव्वट, व मम्मट असे तीन मुलगे झाले. आँफ्रेक्ट हा काश्मीरी पंडिताच्या आधारें कैय्यट व मम्मट हे दोघे बंधू होते असें म्हणतो. कय्यट काश्मीरच्या अजितापीड राजाचा समकालीन होता.

**कैराना, तहशील**:—संयुक्तप्रांत मुझफरनगर जिल्ह्याची वायव्येकडील तहशील. उत्तर अक्षांश २९° १९'. आणि २९° ४२' व पूर्व रेखांश. ७७° २'. आणि ७७° ३०'. क्षेत्रफळ ४७१ चौरस मैल. लोकसंख्या इ. स. ( १९११) २०४५८५. या तहशिलींत पाच गावें व २५१ खेडीं आहेत. या तहशिलीच्या पश्चिमेस यमुना नदी असून आसपासचा प्रदेश सखल आहे. तथापि वरच्या कांहीं भागास यमुनेच्या पुर्वेकडील कालव्याचें पाणी मिळतें. इ. स १९०३-४ साली २९१ चौरस मैल जमीन लागवडीखालीं होती. पैकीं १३१ चौरस मैल बागाइती होती.

**गा व**:—संयुक्त प्रांत. मुझफरनगर जिल्हा. कैराणा तहशिलीचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश २९° २४'. व पूर्व रेखांश ७७° १२'. लोकसंख्या ( १९११ ) १६,२९३. जहांगीर व शहाजहान बादशहाचा हकीम मुकारब खान यास हें गाव व सभोंवतालचा प्रदेश इनाम मिळाला होता. यानें एक दरगा बांधला व एक तलाव बांधून सुंदर बाग तयार केला. येथील बाजार पेठ चांगली वसलेली आहे. इ. स. १८७४ साली येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-४ साली तिचें उत्पन्न १६,००० रुपये व खर्च १८,००० रुपये होता. येथें व्यापार बराच चालतो.

**कैलास**—तिबेटात मानससरोवराच्या उत्तरेस २१,८३० फूट उंचीचा हा पर्वत आहे. हिंदू याला मेरु पर्वत समजतात. ( 'मेरू' पहा ).

बंधुवर्म्याच्या मंदसोर येथील लेखात याला एक कुक्षि म्हटलें असून सुमेरुला दुसरी कुक्षि असें नाव दिलें आहे. शिवपार्वतीचें निवासस्थान म्हणून कैलासपर्वत हिंदूंना पूज्य वाटतो. वस्तुतः हा पर्वत शिखरविरहित हिंदु देवळाप्रमाणेंच किंबहुना लिंगाच्या आकाराचा दिसत असल्यानें त्याचा शिवाशीं संबंध जोडून दिला असावा. कैलासास कुबेरहि रहातो. असा पुराणात उल्लेख आहे याला गणपर्वत व रजतगिरी अशी नावें आहेत.

पुराणातून कैलासाला जाण्याचा मार्ग दिलेला आहे. प्रवासाच्या दगदगीमुळें यावर कोणी जात नसत. पण इंग्रजांच्या सहान्वयें पश्चिम तिबेट आता हिंदुस्थानवासीयांना खुलें झाल्यानें पुष्कळ लोक आता कैलासावर जाऊं लागले आहेत हिंदूप्रमाणें बौद्धानांहि हें स्थान पवित्र वाटतें. या दोन्ही धर्मांचे यात्रेकरू ३२ मैलाची कैलासाची प्रदक्षिणा सुमारें ३ दिवसात आटपतात. मार्गांत गौरीकुंड असून तें नेहमी गोठलेलें असतें. [शेरिंग-वेस्टर्न तिबेट अँड दि ब्रिटिश बॉर्डरलँड; अट्किन्सन—हिमालयन गॅ. वाडेल—बुद्धिझम् ऑफ तिबेट ]

**कैवर्त जात** —( केवट पहा ) याची वस्ती बंगाल, बिहार, ओरिसा व आसाम या प्रांतांतून आहे सर्वांत जास्त बंगाल्यांत आहे.

**इ ति हा स**—बंगालच्या पाल राजांपैकीं दुसरा महिपाल गादीवर आला असतां (१०८०) त्यानें आपल्या भावांना कैदेंत टाकून प्रजेवर जुलूम केला, त्यामुळें प्रजेनें दिव्य किंवा दिव्योक या चासी-कैवर्त (केवट) जातीच्या मुख्य नायकाच्या प्रमुखत्वाखालीं बंड केलें या सुमारास उत्तर बंगाल्यांत ही कैवर्त जात शूरपणामुळें प्रख्यात झाली होती. बंडखोरांनीं महिपालास ठार मारून देश काबीज केला. दिव्योकाच्या नंतर त्याचा मुलगा भीम हा राजा झाला. पुढें महिपालाचा भाऊ रामपाल यानें राष्ट्रकूटाची मदत घेऊन भीमावर स्वारी केली, तींत भीम मेला व पालांच्या राज्यावर पुन्हा रामपाल राजा आला (१०८४). पुढें बल्लाळसेन यानें याच कैवर्तांच्या मदतीनें उत्तर बंगाल काबीज केला. व त्यांची सुधारणाहि केली. (११७१)

[ एपि. इंडि २. १५५; संध्याकराचें रामचरित, हरप्रसाद– मॅ. सुदिसम ॲन्ड. फॉ. ओरिसा स्मिथ:— प्रा हिं. ]

कैवर्त लोकांची उत्पत्ति शोधण्याचे प्रयत्न व्यर्थ आहेत असें रिसले साहेबाचें मत आहे. परंतु हे लोक बंगालचे मूळचे रहिवासी असून बिहारमधील केवट लोक यांच्याच पैकीं असावे असें हे साहेब म्हणतात. कामरूपमध्यें केवट व कैवर्त हीं नांवें सारखींच समजलीं जातात कैवर्त लोकांचे धंद्यावरून चासी व जलिया असे दोन पोटभेद झाले आहेत. १९११ च्या खानेसुमारींत एकंदर जलिया कैवर्त ३,७५,९३६ व चासी कैवर्त २१,३१,२१८ होते. अवर्गीकृत कैवर्त १०,४८,०६ नमूद केले आहेत.

चासी कैवर्त शेतकरी असून, जलिया मासे धरण्याचा व विकण्याचा धंदा करितात. या दोन वर्गांत लग्नसंबंध किंवा अन्नव्यवहार मुळींच होत नाहीं.

सुशिक्षित व सुधारक चासी कैवर्तांची गणना महिष्य या नांवाखालीं होते. हे स्वतः विक्रीचा धंदा करीत नाहींत त्यामुळें महिष्य व जुन्या पद्धतीचे चासी कैवर्त यांत भिड पडत चालली आहे महिष्यानें चासी कैवर्तांशीं लग्नसंबंध केला तर त्याला वाळींत टाकितात. जलिया कैवर्तांशीं संबंध घडवून आणण्याची तर गोष्टच बोलावयास नको. कारण महिष्य त्यांना फारच हलक्या जातीचे व मासेविके म्हणून समजतात जलिया कैवर्तांतहि सध्या सुधारणा दिसत आहे थोडा सुशिक्षित जलिया आपणाला चासी म्हणवितो व इतर जलियांशीं संबंध ठेवीत नाहीं. बंगाल्यांत आणखी एक हलवा (हालिया) दास जात असून तिच्यांतील लोकांनीं आपणाला महिष्य म्हणवून घेण्याचा प्रयत्न केला. परंतु काहीं तंटे बखेडे झाल्यावर हलवादास जातीच्या लोकांनीं तो प्रयत्न सोडून दिला. पूर्व बंगाल्यांत असा जलभेद नसून कैवर्तकाचे फक्त वर दिलेले दोनच पोटभाग आहेत. [ सेन्सस रिपोर्ट, १९११ पु ५ ]

**कैसर गंज**—संयुक्तप्रांत. बहरैच जिल्ह्याची नैर्ऋत्येकडील तहशील. हींत फखरपुर व हिसामपुर हे दोन परगणे आहेत. उ. अ. २७°४' ते २७°४६,' पू. रे. ८१°१९' ते ८१°४६'. क्षेत्रफळ ६८३ चौरस मैल. या तहशिलींत ६३७ खेडीं आहेत.

**कोइनिग, कार्ल रुडाल्फ** (१८३२–१९११) या जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रवेत्त्याचा जन्म प्रशियांतील कोइनिग्जबर्ग नांवाच्या शहरीं झाला. व तेथील विश्वविद्यालयांत शिक्षण घेऊन त्यानें पी एच. डी ची पदवी संपादन केली. सन १८५२ सालीं तो पॅरिसला गेला व त्यानें प्रसिद्ध सारंगीकार जे. बी व्हुइलाम यांच्या हाताखालीं काहीं कालपर्यंत काम केलें; पुढें सुमारें सहा वर्षांनीं त्यानें स्वतःचा धंदा सुरू केला. त्यानें जे संगीत चिमटे (ट्यूनिंग फोर्क) तयार केले आहेत त्यामुळें त्याची फार प्रसिद्धि झाली आहे. त्याच्या वस्तू अगदीं शास्त्रशुद्ध असत. ध्वनिशास्त्रांतील शोध लावणें हा त्याचा एक फार महत्वाचा व आवडता विषय होता. याच्याकरितां त्याला आपल्या धंद्यातून जितके पैसे खर्च करणें शक्य होते तितके त्यानें खर्च केले. सन १८६२ सालीं लंडन येथें जें प्रदर्शन झालें त्यांत त्याला सुवर्णपदक मिळालें व सन १८७६ सालीं फिलाडेल्फियाचें प्रदर्शन झालें त्यांत त्यानें एक स्वरमापक यंत्र ठेविलें होतें. या यंत्रांत त्यानें सुमारें ६७० संगीत चिमटे वापरले होते या यंत्राच्या साहाय्यानें वाटेल त्या सप्तकांतील सुराचें मापन करितां येत असे. पेन्सिल्व्हानिआच्या विश्वविद्यालयाकरितां हें यंत्र विकत घेण्याचें ठरलें. हें यंत्र विकत घेतलें जाईल या समजुतीवर तो फ्रान्सला परत आला परंतु तें यंत्र न विकलें गेल्याकारणानें त्याचें द्रव्यदृष्ट्या पुष्कळ नुकसान झालें त्या यंत्रांतील काहीं संगीत चिमटे त्यानें टोरँटोच्या विश्वविद्यालयास दिले व राहिलेल्या चिमट्यांचा उपयोग करून त्यानें एक दुसरें यंत्र बनविलें, जुन्या यंत्रांत १२८ ते ४०९६ प्रकंपनें (दरसेकंद) मापलीं जात असत, परंतु या नव्या यंत्रांत १६ प्रकंपनांपासून ऐकूं न येतील इतकीं प्रकंपनें मापलीं जाऊं शकतील अशी योजना केली होती याशिवाय यानें दुसरीं कित्येक ध्वनिशास्त्रांतर्गत उपयुक्त यंत्रें तयार केलीं. सांगीतिक ज्वाला (मॅनोमेट्रिक फ्लेम), व्हेटस्टन याचे ध्वनिशास्त्रांतर्गत ध्वन्याकृति वगैरे स्वकल्पित गोष्टींविषयीं त्यानें पुष्कळ परिश्रम करून नवीन ज्ञान उपलब्ध करून दिलें आहे. एच. व्हान हेल्महोल्टझ यानें निरनिराळ्या सुरांच्या होणाऱ्या व्यतिकरणयुक्त येरजेसंबंधानें जो सिद्धान्त मांडला आहे, त्याच्या विरुद्ध यानें एक प्रतिसिद्धांत प्रतिपादिला आहे

**कोइंबतूर, जिल्हा** — हा मद्रास इलाख्यामधील दक्षिणेकडील एक जिल्हा असून याचें क्षेत्रफळ ७२२५ चौ. मैल आहे याच्या पश्चिमेस व दक्षिणेस नीलगिरी व अनाई

मलाई पर्वत आहेत यापैकीं अनाई मलाई पर्वत किन्येक पठाराचा बनला असून याची उंची समुद्रसपाटीपासून ७००० फूट आहे व त्यावर महत्त्वाचीं जंगलें आहेत. पूर्वेस पूर्वघाटाच्या टेकड्यांच्या रांगा असून मध्यावर सपाट मैदान आहे. हें सपाट मैदान कावेरी नदीपर्यंत पसरलें आहे. उत्तरेस पूर्वघाटाच्या बिलीगिरी व बारगूर नावाच्या रांगा आहेत. या जिल्ह्यात आलियार, कावेरी, भवानी, अम्पदी, नोय्यल, अमरावती वगैरे नद्या आहेत. या जिल्ह्यांत हत्ती, चित्ते वगैरे जनावरें सांपडतात.

या जिल्ह्यांतील सखल प्रदेशातील हवा रोगट असून इतर ठिकाणची शुष्क व प्रकृतीस मानवण्याजोगी आहे. सखल प्रदेशातील हवामान उष्ण व उंचवट्यावरील प्रदेशाचें थंड आहे. कोइंबतूर शहराचें साधारण हवामान ८० आहे

या जिल्ह्यातील निरनिराळ्या ठिकाणीं कमी अधिक प्रमाणात पाऊस पडतो. कोळ्ळेगाल तालुक्यात बरीच वृष्टि होते. सपाट मैदानात मात्र पावसाचें प्रमाण फार कमी आहे सर्व जिल्ह्यात दरवर्षी एकंदर २२ इंच पाऊस पडतो. या जिल्ह्यातील पावसाचें प्रमाण नियमित व निश्चित नाहीं.

इतिहास.—पूर्वी या जिल्ह्याची कोंगू प्रदेशात गणना होत असे. ९ व्या शतकात हा प्रदेश चोल घराण्यातील राजानीं जिंकून त्यावर २०० वर्षेंपर्यंत राज्य केलें. पुढें याचे तुकडे झाल्यावर ११ व्या शतकात म्हैसूरच्या होयसलबल्लाळ राजानीं हा प्रदेश काबीज केला. १४ व्या शतकात या प्रदेशावर विजयानगर साम्राज्याची स्थापना झाली. पुढें १५६५ त विजयानगर साम्राज्य लयास गेल्यावर विजयानगरच्या श्रीरंगपट्टम् येथील कामगारानें कोइंबतूर जिल्हा आपल्या ताब्यात घेऊनं तो त्यावर स्वतंत्र रीतीनें राज्य करूं लागला. पुढें मदुरा येथील सरदारानें हा जिल्हा हस्तगत केला. यानंतर १७०४ मध्यें म्हैसूरच्या चिक्कदेव राजाच्या मरणापूर्वी हा जिल्हा राज्यास जोडला गेला. म्हैसूरच्या राजानीं पाळेगाराच्या मार्फत याच्यावर राज्य केलें. पुढें १७६१ त हैदर अल्लीनें म्हैसूरचें राज्य घेतल्यावर त्याच्यात व इंग्रजात झटापट सुरु झाली. १७९९ त टिपूचा पाडाव झाल्यावर हा जिल्हा इंग्रजांच्या ताब्यात आला

या जिल्ह्यात मातीचीं भांडीं, अलंकार, पंचरंगी धातूच्या मूर्ती, चिमटे, छापाचीं नाणीं वगैरे जुन्या वस्तू सांपडतात. याशिवाय येथें आगस्टसच्या वेळचीं कांहीं रोमन नाणीं सांपडलीं आहेत. कोठें कोठें जैन देवळेंहि आढळतात.

या जिल्ह्याची लोकसंख्या १९२१ सालीं २२,१९,८४८ होती. यांत वेल्लाळ म्हणजे शेती करणारे, किलियान म्हणजे चांभार, शानान (ताडी काढणारे), परया (शेतात काम करणारे), ओद (मातीचें काम करणारे) व ब्र.म्हण असे वर्ग आहेत. याशिवाय या जिल्ह्यातील इतर जाती म्हटल्या म्हणजे कानडी व कलिंग, तेलगू, कम्म, तोत्तिय वगैरे शेतकी करणाऱ्या व पल्लान (पडी शेतात काम करणारे) कैकोळन देवांग व जनप्पन या विणकाम करणाऱ्या जाती होत. यांशिवाय कोइंबतूरच्या उत्तरेकडील डोंगराळ प्रदेशात शोलग व अनाई मलाई पर्वतावर मलसर या रानटी जाती आढळतात.

शेती.—या जिल्ह्यात खरीप व रब्बी हीं दोन्हींहि पिकें होतात या जिल्ह्यात बहुतेक रयतवारी पद्धति चालू असून फक्त ६८४ चौरस मैल प्रदेशात इनाम व जमिनदारी आहे. यात चोलम, कंबू, तांदूळ, कापूस, तंबाखू, ऊंस, कॉफी यांचें पीक होतें. यांत मेंढ्या बोकड, घोडे, अलंबडी, बरगूर, कांगयम वगैरे गुरेंढोरें आहेत.

जंगलें:—जंगलात साग, शिसवी, जाल वगैरे जातवान झाडें आहेत. या शिवाय मध, मेण, चामडें कमविण्याकरितां लागणारी झाडाची साल वगैरे जिनसांचें उत्पन्न होतें. दक्षिणभागातील जंगलात शिसवीचीं झाडें आहेत

धातु.—या जिल्ह्यात भवानी व सत्यमंगलम् येथें लोखंडाच्या रेतीपासून लोखंड तयार होतें कोळ्ळेगाल व सत्यमंगलम येथें सोनें सापडतें. शिवाय सोरा व पन्ना नांवाचा मौल्यवान दगड क्वचित् सापडतो.

व्यापार व दळणवळण.—या जिल्ह्यात रेशमी व सुती कापड व सतरंज्या तयार होतात रेशमी कापड सुबक असतें. सेत्तीपालयम् व तिरुप्पूर येथें गारेचे चष्मे तयार होतात. याच गारेचीं लिंगें व इतर मूर्तीहि तयार करितात. अनईपालयम् येथें घुंगरू तयार होतात.

या जिल्ह्यात एकंदर कापसाच्या ८ गिरण्या आहेत.यांच्या शिवाय येथें कातडें कमावलें जाऊन त्याच्या पाणी काढण्यासाठीं मोटा तयार होतात.

या जिल्ह्यातून बाहेर जाणाऱ्या मुख्य जिनसा म्हटल्या म्हणजे धान्य, कडधान्यें, मिरच्या, मिरीं, मसाला, कापूस, तंबाखू, तूप, चंदन, केळीं, तांब्याचीं व पितळेचीं भांडीं, गुरेंढोरें व कमावलेलें कातडें वगैरे होत. तसेंच बाहेरून येणारे मुख्य जिन्नस म्हटले म्हणजे तांदूळ, मीठ, कापड व सूत, धातू, सोवन्याचें तेल वगैरे होत.

या जिल्ह्यातून आगगाडीचे दोन तीन फांटे गेले आहेत. याशिवाय १२६९ मैल लांबीचे पक्के रस्ते असून कच्च्या रस्त्याची लांबी ४५९ मैल आहे.

या जिल्ह्याचे ५ पोटविभाग व त्यात एरोड, धरमपूर, भवानी, पोलाची, पल्लदम, उदमलपेठ, कोइंबतूर, अवनाशी कोल्लेगाल व गोबिचेट्टिपालियम असे १० तालुके आहेत.

या जिल्ह्याचें साऱ्याचें उत्पन्न सुमारें ३५ लाख रुपये असून एकंदर उत्पन्न ५१ लाख आहे. इ. स. १९०१ सालीं या जिल्ह्यात एकंदर १०६५ प्राथमिक, ३० दुय्यम प्रतीच्या, ५ विशेष प्रतीच्या शाळा व दोन कॉलेजें होतीं. जिल्ह्यात १२ दवाखाने व १२ इस्पितळें आहेत.

तालुका:—हा मद्रास इलाख्याच्या कोइंबतूर जिल्ह्यातील पश्चिमेकडील तालुका असून याचें क्षेत्रफळ ५१० चौरस मैल आहे. १९२१ मध्यें याची लोकसंख्या २,७१,३१९.

आहे. या तालुक्यात एकंदर २६३ मैल असून कोइंबतूर हें मुख्य ठिकाण आहे. १९०३-४ साली त्याचें उत्पन्न सुमारें ३ लाख रुपये होतें. या तालुक्याच्या पश्चिमेस नीलगिरि पर्वत असून पूर्वेस उंचवट्यावरील खुलें मैदान आहे. या मैदानाचा ½ भाग जंगलानें व्यापिला आहे. या तालुक्यात कालवे व तळीं आहेत. यात चोलम्, कापू व कापूस पिकतो.

शहर.—हें मद्रास इलाख्यातील कोइंबतूर जिल्हा व तालुका यांचें मुख्य ठिकाण असून नोयील नदीच्या डाव्या तीरावर वसलें आहे. १९२१ सालीं येथील लोक संख्या६५७८८ होती. हैदर अली व टिपू यांची इंग्रजाशीं झटापट चालू असता या शहरास बरेंच लष्करी महत्व प्राप्त झालें होतें. १७६८ त इंग्रजानीं हें हस्तगत केलें होतें, परंतु पुढें लवकरच पुन्हा हें हैदराच्या ताब्यात गेलें. या नंतर सन१७९९ त इंग्रजानीं हें कायमचें हस्तगत केलें. इ. स. १८६५ त या शहरास जिल्ह्याचें मुख्य ठिकाण करण्यात आलें. हें समुद्र सपाटीपासून १३०० फूट उंचीवर वसलेलें असून फार हवाशीर आहे. येथें दरवर्षी २२" पाऊस पडतो. येथें जिल्ह्यातील सर्व मोठमोठे अधिकारी राहतात.

१८६६ त येथें म्युनिसिपालटी स्थापना झाली. हें शहर जिल्ह्यातील उद्योगधंद्याचें व शिक्षणाचें केंद्रस्थान आहे. येथें ४ कापसाच्या गिरण्या, २ कातडें कमावण्याचे कारखाने, ४ कॉफी शुद्ध करण्याचे वाफेनें चालणारे कारखाने एक खत तयार करण्याचा वाफेचा कारखाना आणि एक सोरा शुद्ध करण्याचा कारखाना वगैरे निरनिराळ्या धंद्याचे कारखाने आहेत. बारीक तलम सुताच्या व जरीच्या कापडाची पैदास येथें पुष्कळ होते. येथें शेतकी कॉलेज कोइंबतूर कॉलेज व बरींच हायस्कुलें आहेत. याशिवाय जंगलखात्याचें काम शिकविणारें एक कॉलेज आहे.

**कोइंब्रा**—हें पोर्तुगालच्या एका जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. हें मान्डेगो नदीच्या काठीं असून लिसबन्–ओपोर्टो रेल्वेवर आहे. येथील लोकसंख्या १९०० मध्यें १८,१४४ होती. येथें असलेल्या विश्वविद्यालयामुळें याला महत्व आलें आहे या विद्यालयात ईश्वरशास्त्र, कायदा, वैद्यकी, गणित व तत्वज्ञान ह्या पाच शाखा आहेत व त्याच्या ग्रंथशाळेंत सुमारें १,५०,०००पुस्तकें असून, त्याची एक मोठी प्रयोगशाळा आहे. कोइंब्रा येथें लष्करी विद्यालय, कलाचें विद्यालय, शास्त्रीय व वाङ्मयात्मक संस्था आहेत.

पुष्कळ वर्षे पर्यंत हें शहर मूर लोकाच्या ताब्यात होतें परंतु १०६४ मध्यें पहिल्या ( कॅस्टाईलच्या ) फर्डिनाडनें घेतलें १२६०पर्यंत ही त्या देशाची राजधानी होती. येथें ६ राजाचा जन्म झाला. "फ्रान्सिस्को सा डि मिरान्डा" या कवीचा येथें जन्म झाला.१७५५त भूकंपानें या शहराचें बरेंच नुकसान झालें.मार्शल मासेनाच्या अधिपत्याखालीं सन१८१० मध्यें फ्रेंच लोकानीं हें शहर लुटलें. १८३४मध्यें डान मिग्वेल यानें हें शहर आपलें मुख्य ठिकाण केलें. येथें १८४६ मध्यें मिग्युएल बंड झालें.

**कोइरी**—एक शेतकरी जात. याची वस्ती बिहार-ओरिसा, संयुक्तप्रांत, बंगाल व आसाम यातून आहे. १९११ त याची संख्या १७,६६,७९६ होती कोइरी, कोरी हा शब्द संस्कृत कृषिकारी यावरून झाला असावा. कोइरी म्हणजेच सुधारलेले कोल जातीचे लोक हा नेस्फील्डचा तर्क असंभवनीय दिसतो. कुर्मी जातीशीं या लोकाचे बरेंच साम्य असून, डॉ. वाइजच्या मतें बंगाल्यात कोइरी हे कुर्मीबरोबर रोटीव्यवहार करीत नाहींत. उलट कुर्मी हे कोइऱ्याच्या लग्नास जाऊन मेजवान्याहि झोडू शकतात व त्यात त्यानां जात बाटली असें वाटत नाहीं. कर्नल डाल्टनच्या मतें कोइरी लोक हे बंगालमधील प्राचीन आर्यांचे वंशज असावे. या लोकात कांहीं अनार्यसंबंध असणें शक्य आहे पण या प्रश्नासंबंधींहि वाद आहेत.

या लोकाच्या अनेक पोटजाती असून निरनिराळ्या जिल्ह्यातील त्यांची नावें भिन्न प्रकारचीं आहेत. कांहीं पोटजाती स्थानिक आहेत. सर्वारिया, प्रयाग, कनोजिया, इलाहाबादी, व्रिजवासी, पुरभैया, दक्षिणी, बनारसाया, मगही, कच्छवाह, नाराइगण, तोरिकोरीय, हर्दिय, वर्डावार, भकिया, साकिया, इत्यादि पोटजाती मुख्य आहेत. एकंदर पोटजातींची संख्या खानेसुमारीवरून पाहता १४०च्या वर आहे व हे सर्व भेद स्थानिक स्वरूपाचे आहेत. त्याचप्रमाणें बैरागी, बेभर, हुराकोया, राठोड व सुरजवंशी इत्यादि नावें इतर प्रसिद्ध जातींवरून पडलेलीं आहेत.

पोटजातीमध्यें चटई नावाचें एक बंधुमंडळ असतें व त्यामध्यें ज्ञातिविषयक सभा होतात. मिर्झापूर येथें साकिया पोटजातीच्या १४ चटई आहेत. प्रत्येक चटईचा चौधरी उर्फ पुढारी असतो लग्नप्रसंगीं विशिष्ट चटईच्या लोकानाच निमंत्रण असतें व त्यामुळें बराच खर्च वाचतो. चौधऱ्याकडे लग्नचिठ्या पाठविण्याचें काम असतें व त्याप्रसंगीं पंचायती ताट व पंचायती हंडा ठेवितात. नंतर पंचायतीपुढें कोणत्या चटईच्या मनुष्याचा कोणाशीं विवाह व्हावयाचा हें ठरतें. पंचायतीनें निकाल दिल्यानंतर ब्राह्मणाकडून मुहूर्त वगैरे ठरविण्यात येतात. नंतर वधूवर पक्षाकडील लोकासमक्ष चौधरी त्या लग्नास परवानगी देतो. यानंतर ब्राह्मणास दक्षिणा देऊन वधूवराचे बाप तंबाखू ओढतात व या एकंदर विधीस 'रक्षा उठावणी' असें म्हणतात. लग्नविधि डोला पद्धतीनेंच होतो. तिलक लावल्यानंतर वराच्या कपाळास अक्षता लावितात व वधूस नूतन वस्त्र देण्यात येतें. लग्नसमारंभात स्त्रिया गाणीं गातात. कन्यादान, तेलहळदी इत्यादि सर्व विधी करण्यात येतात. लग्नें चालविण्याचें काम ब्राह्मणाचें असतें व त्याना दक्षिणाहि मिळते ... झाला पंचायतीकडून चांगलें शासनहि करण्यात

जन्मसंस्कार व मृत्युसंस्कार हेहि या जातींत आढळून येतात. पष्ठि व बारसें हे समारंभ रूढ असून मुलाचीं नखें काढण्याचा समारंभहि करण्यास येतो. या सर्व विधींस विशेषत. स्त्रियाच महत्त्व देतात. मृताचें दहन करून पिंडदान करण्यात येतें. वर्षश्राद्ध करण्याची त्याच्यात रीत नाहीं.

साधारणपणें कोइरी लोक वैष्णव संप्रदायाचे आहेत. भक्त नावाच्या पोटजातीचे लोक आपल्या मुलाना भगत अथवा शाकाहारी बनवितात. पांचोपीर व महावीर या देवताचे उपासक परस्परात लग्नव्यवहार करीत नाहीत.

कोइरी लोक उत्तम शेती करणारे असून अफू, तंबाखू सर्व धान्यें व भाजीपाला याची ते लागवड करितात. त्याच्या सामाजिक चारित्र्यात बरीच शुद्धता आढळून येते. फक्त प्रयागा जात दारू पिते व भक्त नावाची पोटजात मांसाशन करीत नाहीं. ब्राह्मणाच्या हातची पक्की रसोई प्रयागा हे खातात व धोबी आणि चाभारहि ब्राह्मणाच्या हातची पक्की रसोई खातात. कोइरी जात मोठी उपयोगी व सुशील असून स्वावलंबी आहे. हे लोक सेवाधर्म फारसा स्वीकारीत नाहींत.

कोइरी व चाभार या जातींचा गोरखपूर भागात फार निकट संबंध आहे. या भागात कोरी अशी स्वतंत्र जात नाहीं. सर्व लोक कोइरी चाभार आहेत. तरी पण कोइरी चाभार या नावाऐवजी ते आपल्याला कोरीच म्हणवितात. त्याचप्रमाणें जैस्वर चाभार हे लोक आपल्याला फक्त जैस्वर असेच म्हणवितात. आसामातील या जातींची लोकसंख्या १४,००० आहे. ब्राह्मणाना या जातीच्या लोकाच्या हातचें पाणी चालतें. [ सेन्सस रिपोर्ट. क्रूक ].

**कोइल कुंतल**—मद्रास इलाख्यातील कर्नूल जिल्ह्यातील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ५७९ चौरस मैल आहे. १९२१ मध्यें या तालुक्याची वस्ती ८३,४२० होती. या तालुक्यात ८५ खेडीं आहेत. या तालुक्याचा जमीनमहसूल व इतर कर मिळून ३ लाख रुपये उत्पन्न होतें. या तालुक्याच्या मध्यभागातून कुंदेरु नदी वहात गेली असून या नदीच्या दोन्ही तिरावरील शेतें फारच सुपीक आहेत. येथें वार्षिक पर्जन्यमान २२ इंच आहे. पण या तालुक्याच्या पश्चिम भागात पाऊस सरासरी १७ इंच पडतो. या तालुक्यातील लोक संपन्न व दणकट असून त्याची बज्जेदलालीबद्दल व भांडखोरपणाबद्दल ख्याति आहे. या तालुक्यात दळणवळणाचीं साधनें मात्र चागलीं नाहींत.

**कोकटनुर**.—मुंबई इलाखा. बेळगाव जिल्हा. अथणीच्या आग्नेयीस बारा मैलावर हा एक गाव आहे. येथें अडकित्ते तयार होतात. गावाच्या पूर्वेस एका मैलावर पापनाशिनी नदीच्या तीरावर येल्लम्मार्चे देऊळ असून दरवर्षी डिसेंबर महिन्यात तेथें जत्रा भरते. इ. स. १५६४ सालीं तालीकोटच्या लढाईंत विजयानगर राज्याचा नाश झाला. त्यावेळीं इब्राहिम आदिलशाहाच्या हाताखालीं चागली कामगिरी केल्यावरून शिरसिंगीच्या हल्लींच्या देसायाच्या मूळपुरुषास कोकटनूर परगणा इ. स. १५३५ सालीं बहाल करण्यात आला होता.

**कोंकण**—चतुःसीमा.—सामान्यतः दमणगंगानदीच्या दक्षिणेकडील व सह्याद्रीच्या पश्चिमेकडील खालील चतुःसीमेचा जो प्रदेश तो कोंकण होय. पश्चिमेस आरबी समुद्र, पूर्वेस सह्याद्रि, उत्तरेस दमण व दक्षिणेस गोव्याच्या सरहद्दीवरील तेरेखोलपर्यंतचा प्रदेश अशी याची चतुःसीमा आहे. डफनें तापी नदी ते सदाशिवागड अशी याची उत्तरदक्षिण सरहद्द दिली असून या भागास त्यानें थळ कोंकण असेंहि म्हटलें आहे. कोंकणात हल्लीं मुंबई शहर, ठाणें, कुलाबा, रत्नागिरी हे जिल्हे, उत्तर कानड्याची पट्टी, जंजिरा व सावंतवाडी हीं संस्थानें व गोवें प्रांत इतक्याचा समावेश होतो. या प्रदेशाची रुंदी साधारण २५।३० व मैल लांबी सुमारें ३२० मैल असून, लोकसंख्या जवळ जवळ ५७ लाख आहे.

प्राचीन उल्लेख.—कोंकण हा शब्द फार प्राचीन आहे. परंतु वरील भूप्रदेशाला हें नाव का व कसें देण्यात आलें. याचा समाधानकारक उलगडा अद्याप झालेला नाहीं. निरनिराळ्या काळीं कोंकणच्या मर्यादा वेगवेगळ्याच भिन्न असल्यात असे उपलब्ध झालेल्या तत्कालीन उल्लेखावरून दिसतें, महाभारतात ( भी. प. अ. ९ ) अपरान्त व कोंकण हीं दोन्हीं नावें आलीं आहेत. हरिवंश व विष्णुपुराण आणि वराहमिहिर यानींहि कोंकणचा नामनिर्देश केला आहे. अपरातातील शूर्पारक हें शहर फार जुनें असून बौद्ध वाङ्मयात त्याचा अनेकदा प्रामुख्यानें उल्लेख येतो. शूर्पारक म्हणजे हल्लींचें सोपारें ( ठाणें जिल्हा, वसईजवळ बी. बी. सी. आय. रेल्वेचें स्टेशन ) असून येथें थोड्या वर्षांपूर्वी बुद्धाचा एक स्तूप व अशोकाची धर्मशासनांकित एक लेखशिला सापडली होती. महाभारतात शातिपर्वाच्या ४९ व्या अध्यायात या शूर्पारकाचा उल्लेख आहे; तसेंच सहदेवाच्या दक्षिण विजयात कोंकण देशाचें नाव आलें आहे. बृहत्संहितेंत ( १४.१२ ) देखील दक्षिण विभागातील देशात याची गणना असून एके ठिकाणीं तर 'सप्तकोंकण' असाहि याचा उल्लेख आला आहे. दशकुमार चरित्रांत कोंकण असा शब्द आला आहे. क्रि. पू. तिसऱ्या शतकात यास अपरात म्हणत; रघुवंशात अपरात हेंच नांव आहे. संस्कृत वाङ्मयात त्रिंबक ते कन्याकुमारीपर्यंतच्या पश्चिमकिनाऱ्यावरील प्रदेशास कोंकण हें नाव येतें. 'अपरान्त' याची व्युत्पत्ति काहीं जण पुढीलप्रमाणें देतातः—अपरा म्हणजे पश्चिमदिशा, तिचा जेथें अंत होतो (म्हणजे पुढें समुद्र लागतो) तो प्रदेश. परंतु काहींचें म्हणणें कीं सोप्पार ( सोपारे ) प्रांताचा अंत या शब्दावरून ' अपरात ' शब्द झाला असावा.' महावंशो ' या बौद्ध ग्रंथात सोपाऱ्याच्या दक्षिणेकडील देशास अपरात म्हटलें आहे, व अशोकानें तेथें आपले धर्मप्रचारक पाठविल्याचाहि निर्देश केला आहे. राजतरंगिणींत व चालुक्याच्या

शिलाशासनात परीक्ष्मकोंकण हा शब्द आलेला आहे. ख्रि. पू. चौथ्या शतकात कोंकण हें नाव प्रसिद्ध झालें होतें. रा. रा. भागवत यांनी या शब्दाची व्युत्पत्ति अशी दिली होती की, चेर देशात काग किंवा कोंग ( कोंगु ? ) असें म्हणण्याची फारच जुनी वहिवाट आहे. काग आणि गंग हे दोन्ही शब्द एकार्थी आहेत व तें एका राजघराण्याचेंहि नाव आहे. यावरून कोंगवत हा शब्द तयार झाला असावा व कोंगनत याचा कोंकण शब्द बनला असावा ( वि. ज्ञा. वि. पु. २२ पृ. ११ ). कालिदास आणि भारवी यांच्या कोंकणवर्णनात थोडासा फरक आहे. शके ४२६ मधील पंचसिद्धांतिका या ग्रंथात कोंकण हा शब्द आला आहे इ. स. ८० मधील पेरिप्लसच्या कर्त्यानें कोंकणाचा व सिमोल ( चौल बंदर )चा उल्लेख केला आहे. कदंबराजवंशाच्या लेखावरून ख्रि. श. पूर्वी बौद्धधर्मप्रसारकाचे पाय कोंकणास लागल्याचें स्पष्ट होतें. ख्रि. पू. १ ल्या शतकात मलबारावर सत्ता गाजविणाऱ्या पेरमाळ राजाची एक मोठी सभा कोंकणात भरल्याचा उल्लेख आढळतो. रेवदंड्याबद्दल एक दंतकथा अशी सांगतात की, श्रीकृष्णानें ( आपली भावजय जी रेवती हिला निर्वाहार्थ रेवतीक्षेत्र म्हणून जी भूमि दिली होती, तेंच हल्लींचें रेवदंडा होय ( वि. ज्ञा. वि. पु. २१ अं. १-२). टॉलेमीनें कोंकणाचा निर्देश लारिका ( लाटदेश [ सं. ] = गुजराथ व उत्तर कोंकण ) व आरिका ( दक्षिण कोंकण ) असा केला आहे ( इ स. १५० ). पेरिप्लसमध्यें लारिका हें नाव नसून बरगझ ( भरुकच्छ = भडोच ) हें नाव येतें व आरिका देशांत चाचे लोकांचा फार उपसर्ग होता असें त्यात म्हटलें आहे; हे चाचे म्हणजे अरब लोक होत. या चाच्यांचा उल्लेख स्ट्रॅबोनेंहि केला आहे. तत्कालीन कल्लिएन म्हणजे हल्लींचें कल्याण ( जी. आय. पी. रेल्वेचें स्टेशन ) व सेमेनिएनी म्हणजे वेंगुर्लें होय असें स्मिथ म्हणतो ( स्मिथ. पु. २. ४२२ ), पैकीं कल्याण हें नाव बरोबर आहे, सेसेकिएनी म्हणजे वेंगुर्लें हें संशयित दिसतें. या दोन बंदरांच्या दरम्यान टॉलेमी व पेरिप्लस पुढील गावें देतात:— ओपार ( सोपारें ), सेमुल्ल ( चेऊल ? ) मेंदगोर, पलपोटम किंवा बलपाटण, मेलिझिगर व तोपरोन. टॉलेमीनें ओपार व सेमुल्ल यांच्यात बिंद ही नदी दिली आहे. प्लिनीचें सिझेरस व टॉलेमीचें मेलिझीगर हें सुवर्णदुर्ग किंवा जयगड असावें असें लासेन व स्मिथ हे म्हणतात. ( सिझेरस या शब्दाचें जंजिरा या शब्दाशीं बरेंचसें साम्य आहे ) प्लिनीचें बायझँटियम हें विजयदुर्ग व निट्रिअस हें ( मालवण व वेंगुर्लें यांच्यामधील ) निवती होय असें रेनेल म्हणतो ( व्हिन्सेन्ट पु. २ ). पेरिप्लस व टॉलेमीची तत्कालीन ग्रामनामें हल्लीं स्पष्ट ओळखता येत नाहींत. याचें कारण तीं हल्लीं नष्ट झालीं असून नवीनच बंदरें पुढें आलीं आहेत. ख्रि पू तिसऱ्या शतकात अशोकानें आपले अंकित बौद्ध धर्माच्या प्रसारासाठीं अपरांतात पाठविल्याचा उल्लेख, त्याच्या गिरनार खालशी व शहाबाज गढी येथील शिलालेखात आढळतो. यावरून ख्रि. पू. दुसऱ्या व तिसऱ्या शतकात अपरांत मौर्यांच्या राज्यात होतें व त्या काळीं शूर्पारक ही त्याची राजधानी होती असें ठरतें. बायबलातील ऑफीर हेंच सोपारा होय असें कांहींचें म्हणणें आहे. अलबेरुणीनें समुद्राजवळील कोंकण असा कोंकणाचा निर्देश केला आहे.

भूप्रदेश:—सामान्यतः किनाऱ्याजवळचे प्रदेश सुपीक, भरपूर लागवडीचे व दाट वस्तीचे असून किनाऱ्यापासून लांबचे प्रदेश खडकाळ रुक्ष असे आहेत. येथील हवा थंड असून पाऊस फार पडतो. उष्ण वारे क्वचित् वाहतात. हवेंत घडामोडी फेरफार होत नाहींत, ती सामान्यत निरोगी असते. मुंबईच्या उत्तरेस किनारा सपाट व वाळुकामय असून नद्या उथळ व बंदरें कमी महत्त्वाचीं अशीं आहेत. मुंबईच्या दक्षिणेकडील किनारा चांगला असून त्याच्या पाठीमागें टेकड्यांच्या रांगा आहेत. तसेंच या भागात पुष्कळ नद्या व मोठीं बंदरेंहि आहेत जमिनीपासून पाव मैलाच्या आंत दर्यामध्यें अर्नाळा, कुलाबा, दंडाराजपूर व सुवर्णदुर्ग यासारखी लहान लहान खडकाळ बेटें असल्यानें, त्यावर मराठी साम्राज्यात किल्ले बांधले गेले व त्यामुळें त्यांना महत्त्व आलें. उत्तरकोंकणात वस्ती पातळ असून दक्षिण कोंकणात भाग दाट आहे. दक्षिण कोंकणातली जमीन सामान्यतः खडकाळ व नापीक आहे, परंतु तींत नद्या व खाड्या पुष्कळ असल्यानें त्यांच्या काठचा प्रदेश सुपीक आहे. उत्तरकोंकणात झाडी बरीच असून रानात ताड व खजूर पुष्कळ आहेत. दक्षिणकोंकणात फारशी झाडी नाहीं; येथें ताडाऐवजीं नारळीचीं झाडें पुष्कळ आहेत तेथल्या लोकांना या नारळीच्या बागापासून बरेंच उत्पन्न मिळतें. सह्याद्रीमुळें पावसाचे वारे अडले जाऊन कोंकणात पाऊस फार पडतो म्हणून तेथें अवर्षण व दुष्काळ यांची भीति कधीं नसते. मुख्य पीक तांदूळ हें असून नागली, वरी, वाल वगैरे धान्य साधारण प्रमाणात होतें. नारळ, सुपारी, कलमी आंबे, फणस, कोकंबा, फणस वगैरे फळें व सर्वसाधारण शाकभाज्या उत्पन्न होतात. माशाचा व्यापार बराच चालतो. वाघ, चित्ते, सर्प हे प्राणी फार आहेत. पर्वताच्या पायथ्याशीं मलेरियाचा रोग विशेष जाणवतो. खनिज संपत्ति बहुतकरून मुळींच नाहीं.

लोक.—मुख्यतः महाराष्ट्रीय लोकांचीच वस्ती जास्त आहे उत्तरकोंकणात गुजराथी व नरतम उर्फ आणि मूळचे लोक थोडेफार आहेत. पण दक्षिणकोंकणात शुद्ध महाराष्ट्रीय आहेत. कोंकणातील बहुतेक लोक शेती करितात. इंग्रजी राज्य सुरू होण्यापूर्वी पुष्कळ लोक (मुख्यतः मराठा, भंडारी, कुणबी व थोडेफार ब्राह्मणहि) लष्करी पेशा स्वीकारीत असत. हल्लीं थोडेफार कोंकणी मराठे लष्करात दाखल होतात. अलीकडे या १५।२० वर्षांत मुंबईस गिरण्यांत मजूर म्हणून या कोंकणी (घाटू) लोकांची भरती सपाटून होऊं लागली आहे.

कोंकणी लोक पोटाकरितां घर सोडून बरेच दूरवर जातात खरे. परंतु म्हातारपणीं ते घरीं येतात. इकडील गांवें फार लहान लहान असतात, मोठ्या गावची लोकसंख्या १५ हजाराच्या वर क्वचितच जाते. किनारा विस्तृत व बंदरें सोईचीं असल्यानें पूर्वी दूरदूरचे परदेशी लोक येथें उतरत असत. अरबस्तानापासून कोंकण जवळ असल्यानें प्रथम अरबांचा उपसर्ग कोंकणास झाला. प्रदेश सुपीक असल्यानें या प्रांताला महत्त्वहि चढलें. बौद्धांनीं व पुढें ब्राह्मणांनीं आपापले मठ वगैरे येथें स्थापून इतरत्र लेणीं कोरलीं होतीं. पूर्वी येथें आलेले पारशी, ज्यू, हबशी व अरब यांचे वंशज अद्यापिहि आढळतात. यांपैकीं बेनेइस्रायल व पारशी यांचें आगमन कोंकणच्या इतिहासांत महत्त्वाचें गणलें जातें. बेनेइस्रायल हे बहुतेक उत्तरकोंकणांत राहतात. पारशांनीं व्यापारांत बराच पुढाकार मिळविला असून ते बहुतेक सारे श्रीमंत आहेत. पंधराव्या शतकांत पोर्तुगीज येथें येऊन त्यांनीं चौल, वसई वगैरे ठाणीं घेऊन आपले पाय पसरले. सोळाव्या शतकांत त्यांनीं वरीलप्रमाणें अंमल पसरवून हिंदु लोकांवर धार्मिक बाबतींत अतिशय जुलूम केला. अठराव्या शतकांत आंग्र्यांनीं यांचा व इंग्रज आणि डच यांचा पुरता नक्षा उतरविला. त्यांनीं सतराव्या शतकांत येथें आपल्या वखारी घातल्या होत्या. व मराठी राज्यांत व्यापाराच्या सवलती मिळविल्या होत्या. मराठी साम्राज्यांत तर कोंकण किनाऱ्याचें महत्त्व फारच वाढलें होतें. इंग्रजी राज्य झाल्यानंतर तें हळू हळू कमी होत चाललें व बंदरांचें व किल्ल्यांचें अस्तित्व नाममात्र भासूं लागलें आणि व्यापार घटत चालला. ठाणें जिल्ह्यांत तेवढी आगगाडी सुरू आहे. कोंकण व देश यांत सह्याद्रीची प्रचंड भिंत असल्यानें ( जरी मधून मधून पुष्कळसे घाट व वाटा जाण्यायेण्यास आहेत तरी ) परस्परांत व्यापार जोरांत चालू नाहीं; त्यामुळें कोंकण हें खालावलेलें व दरिद्री झालें आहे. फक्त तेथें सृष्टिशोभा पहावयास सांपडते. व कोंकणी लोक बुद्धीनें हुशार असतात एवढाच फरक आहे.

प्रा ची न व्या पा र व द ळ ण व ळ ण.—एल्फिन्स्टन म्हणतो कीं भडोच व अरिका येथून आफ्रिकेला पहिल्या शतकच्या सुमारास तांदूळ व इतर धान्य, लोणी, तिळीचें तेल, जाड व बारीक कपडा, साखर, वगैरे माल रवाना होई. हा व्यापार बहुधा व अरबी लोक करीत. प्राचीन इजिप्शन लोकांशीं हिंदुस्थानचा व्यापार होता. तसेंच रोमन लोकांचा व्यापारहि अरबांमार्फत हिंदुस्थानशीं असे, असें सिंध व एल्फिन्स्टन म्हणतात. पेरिप्लसचें मुझीरीस (हल्लींचें मंगळूर) हें अशा व्यापाराचें मोठें बंदर होतें. याकाळीं अरिका हा देश तगरच्या राजाच्या अंमलाखालीं होता. तगर म्हणजे हल्लींचें निजामशाहींतील तवरगिरी असें रा. राजवाडे म्हणतात. पेरिप्लसनंतर सहाव्या शतकांत कॉस्मस नावाच्या ग्रीक व्यापाऱ्यानें तत्कालीन व्यापाराची माहिती पुढीलप्रमाणें दिली आहेः—कल्याण हें व्यापाराचें मोठें ठिकाण असून तेथून जहाजें परत जातांना, पितळ, तीळ, लाकूड व कापड हे जिन्नस नेत. सातव्या शतकांत आलेला बौद्धभिक्षु ह्युएनत्संग हा परत जातांना कल्याण किंवा बाणकोट येथें जहाजावर चढला असें म्हणतात. यानें कोंकणपुर या राज्याचा घेर ४०० कोस असून तो प्रदेश पूर्वी कदंबाच्या राज्यांत मोडे असें म्हटलें आहे. कास्मसच्यानंतर आरबांनीं कोंकणचा उल्लेख केला आहे. त्यांनीं कोंकणाला केमकेम, कोमकम, कंकन, कोंकण वगैरे नावें दिलीं आहेत. इब्न बतुता यानें कोंकण ठाणें व एका इटालियन प्रवाशानें कोंसिटण म्हटलें आहे. इ. स. ६३६ त खलीफ उमर यानें ठाण्यास फौज पाठविली होती असें एक अरब ग्रंथकार म्हणतो ( रीनाड-फॅग्मेंटस्. १८२६ ). इ. स. ८५१ त एक सुलेमान नावाचा व्यापारी इकडे आला होता. त्यानें कोंकण हें बल्हार राजाच्या अंमलाखालीं असल्याचें नमूद केलें आहे; बल्हार म्हणजे शिलाहार असावेत. अबुरिहानें कोंकणचीं मैदानें दंडका या प्रदेशांत दिलीं आहेत. अल्बेरुणी हा कोंकणची राजधानी तालह ( तळें ? ) असल्याचें लिहितो. त्यानें भडोच, सिंदन ( संजान ? ), सौबर, टाणा ( ठाणें ), लारण, दिजमौर, मलाय, कंदजी, दर्भीर वगैरे मोठ्या गावांचीं व प्रांतांचीं नावें दिलीं आहेत. यांतील अंतरें त्यानें परसंग या इराणी मापानें दिलीं आहेत. ( एक परसंग म्हणजे साडेतीन मैलापेक्षां थोडें अधिक अंतर होय ). पुढें स. १२०० च्या सुमारास रशिदुद्दीन हा कोंकण व गुजराथचा उल्लेख, खंबायत, बंकन, टाणा, मलबार या नावांसह करतो. याच्यापूर्वी एक शतक अल इद्रिसी हा प्रवासी आला होता. त्यानें आपलें वृत्त असें दिलें आहेः—बरूक ( भडोच ) पासून सिंधापूर हें किनाऱ्यानें चार दिवसाच्या मजलीवर असून तेथून बन ( ठाणें ? ) चार दिवसाच्या वाटेवर आहे. हें एका मोठ्या आखाताच्या किनाऱ्याला असून येथें मोठमोठीं गलबतें राहूं शकतात. ठाण्याच्या खाडीच्या पूर्व व पश्चिमेकडील टेकड्यांच्या मधील भागांत व ठाणें आणि वसई या दरम्यानच्या प्रदेशावर थोड्या काळापूर्वी पाणी असावें हें लक्ष्यांत घेतल्यास, आठ शतकापूर्वीच्या ठाण्यासंबंधाची वरील वर्णनें चुकीचीं नसावीत असें वाटतें. या अरब प्रवाशांपैकीं शेवटचा इब्न बतुता हा होय. त्यानें ठाण्याहून मोठमोठीं जहाजें व्यापारानिमित्त एडनला जात असत असें म्हटलें आहे. मार्कोपोलो या व्हेनिसच्या प्रवाशानें कोंकणचें वर्णन ( स. १२९० ) दिलें आहे; परंतु तें फार संदिग्ध आहे. त्यानें कोंकणावर त्यावेळीं ठाणें व लार ( लाट ) अशीं दोन राज्यें होतीं असें म्हटलें आहे. ठाणें मुसलमानांच्या हातीं आल्यावेळीं साहजिकच कल्याण मोडकळीस आलें. त्यामुळें पुढील प्रवाशांच्या वर्णनांत कल्याण येत नाहीं. तसेंच दाभोळ व चेऊल यांचीहि नांवें त्यावेळीं आढळत

नाहींत. कारण ही पोर्तुगीज व मुसुलमानांच्या रियासतींत नांवारूपास चढलीं.

प्रा चीं न इ ति हा सः—हा इतिहास शिलालेख ताम्रपटादि साधनांवरून देतां येतो. कोंकणांत बौद्ध किंवा ब्राह्मणी लेणीं व खोदकामें पुष्कळ असून तीं पुढील ठिकाणीं आहेत:—कान्हेरी, कोंदिवटें, जोगेश्वरी, मंडपेश्वर, मागाठण, घारापुरी, करंज, मंमुल, कोंडाणे व चंदनसार हीं ठाणें जिल्ह्यांत असून पाल व कुडा हीं कुलाबा जिल्ह्यांत आहेत; आणि रत्नागिरी जिल्ह्यात चिपळूण, खेड, दाभोळ, संगमेश्वर, गव्हाणें, वेळगांव व वाडेपाडेल हीं आहेत. यांत असलेल्या शिलालेखावरून तत्कालीन पुष्कळ माहिती मिळते. कान्हेरी लेण्यांत शिलाहार व आंध्रभृत्य राजांचीं नांवें येतात. हीं पुष्कळशीं लेणीं बौद्धधर्मीयांचींच आहेत. त्यावरून एके काळीं साष्टी व मुंबईच्या दक्षिणेकडील कांहीं भागांत बौद्धांचें ठाणें असावें असें दिसतें. कोंकणावर निरनिराळ्या काळीं निरनिराळे (म्हणजे मौर्य, आंध्र, चालुक्य, राष्ट्रकूट, शिलाहार, यादव, मुसुलमान, पोर्तुगीज व मराठे इ. ) राजे झाले. ख्रि. पू. तिसऱ्या शतकांत अशोक मौर्याचा अंमल होता. सोपारें येथें सांपडलेल्या स्तूपांत गोतमीपुत्र शातकर्णी यांचें एक नाणें आढळलें; सोपारें ही अशोकाची या भागाची राजधानी होती. मौर्यांचें राज्य ख्रि. पू. २ ऱ्या शतकांतहि होतें. पुढें इ. स. च्या पहिल्या शतकांत शातवाहनांचें राज्य कोंकणावर झालें. हेच आंध्रभृत्य होत. नाशिक जिल्ह्यांतील एका ( त्रिरश्मि पर्वताच्या ) लेण्यांत पुलुमायी शातवाहनाच्या राज्यविस्तारांत अपरांतकाचें नांव आलें आहे. हा शातवाहनाचा अंमल बहुधा इ. स. ३ ऱ्या शतकापर्यंत टिकला असावा. यापुढें इ. स. च्या चौथ्या शतकांत कलचुरी घराण्याचा अंमल कोंकणावर बसला. या घराण्यांतील कृष्णराज ( इ. स. ३७५–४०० ) यांचीं कांहीं नाणीं मुंबई व साष्टीस आढळलीं. हें घराणें ५ व्या शतकापर्यंत कोंकणचें अधिकारी असावें. तसेंच इ. स. च्या ६ व्या शतकापर्यंत मौर्यांचा अंमल इकडे असल्याचाहि पुरावा मिळतो. या वेळीं नळ नांवाचें एक घराणेंहि कोंकणांत राज्य करीत होतें. सहाव्या शतकांत चालुक्य घराण्यांतील कीर्तिवर्मा यानें (इ. स. ५६७–५९१ ) उत्तर कोंकणवर स्वारी करून मौर्यांचा पराभव केला. त्याचा नातू दुसरा पुलकेशी यानें (६११–६४०) तर मौर्यांचें उच्चाटण करून कोंकण प्रांत खालसा केला. या मौर्यांची राजधानी पुरी (हल्लींचें घारापुरी किंवा त्याच्या शेजारचें मोरे बंदर असावें) हें शहर होतें. तें पुलकेशीच्या चंडदंड या सेनापतीनें १०० गलबतांच्या आरमारानिशीं लढाई करून काबीज केलें. हे चालुक्य उत्तर कोंकणावर साधारणतः इ.स. ८१० पर्यंत राज्य करीत असावेत. यापुढें शीलाहाराचा अंमल कोंकणावर बसला. वरील चंडदंडाची हकीकत वाडे येथील एका शिलालेखांत सांपडते. त्यावेळीं सुकेतुवर्मा नांवाचा मौर्य राजा होता. इ. स. ६३७ च्या सुमारास अरबांनीं ठाण्याजवळील कोंकण किनाऱ्यावर चढाई केली होती. शिलाहारराजे हे इ. स. ८१० ते १२६० पर्यंत कोंकणवर अधिकार गाजवीत होते. या अवधींत वीस राजे होऊन गेले. परंतु त्यांचा इतिहास चांगलासा उपलब्ध नाहीं. यांचीहि राजधानी पुरी हें शहर असून संजाण, ठाणें, चौल, लोनाड, सोपारें, चेमुली व उरण हीं शहरें राज्यांत प्रमुख होतीं. म्हणजे हल्लींच्या ठाणें व कुलाबा जिल्ह्यांतील बराच भाग त्यांच्या ताब्यांत होता. हे राजे स्वतःस तगरपुराधीश्वर असें बिरुद लावून, जीमूतवाहनाचे वंशज म्हणवीत. यांचा पहिला पुरुष कपर्दि होय; त्याचा मुलगा पुलकेशी. याच्याबद्दल कान्हेरीच्या एका शिलालेखांत " कोंकणांतील मंगलपुरीचा अधिपति " असें म्हटलें आहे. तो अमोघवर्ष राष्ट्रकूटाचा मांडलिक असावा असेंहि त्या लेखावरून दिसतें. कान्हेरी लेण्यांतील दुसऱ्या एका शिलालेखावरून या पुलकेशीचा मुलगा दुसरा कपर्दि ( ८५३–८० ) हा देखील राष्ट्रकूटाचा अंकित होता असें दिसतें. या कपर्दीचा नातू झांझ हा सैमूर ( चौल? ) प्रांताचा राजा असल्याबद्दल मसुदी हा अरब इतिहासकार (इ.स. ९१६) सांगतो, पुढें या झांझचा नातू अपराजित ( स. ९२०–९४० ) हा मात्र स्वतंत्र बनला. कारण, त्याचा सार्वभौम जो कक्कल राष्ट्रकूट त्याचा वध चालुक्य तैलप यानें परभारें केल्यामुळें ( भिवंडी तालुक्यांतील भेरगावचा शिलालेख पहा ) यास फावलें. त्याचा ( अपराजिताचा ) पुत्र अरिकेसरी ( इ. स. ९८०–१०१७ ) हा कोंकणांतील १४०० गांवावर राज्य करीत असून, त्यांत पुरी व श्रीस्थानक ( ठाणें ) हीं मुख्य गांवें होतीं असें ( स. १०१७ च्या ) एका शिलालेखांत म्हटलें आहे. या घराण्यांतील १७ वा राजा ( अरिकेसरीचा पणतू ) जो दुसरा अपरादित्य त्याचा नातू ) मल्लिकार्जुन ( स. ११५६–६० ) हा मोठा बढाईखोर असून स्वतःस राजपितामह म्हणवीत असे. त्याच्या एका भाटानें गुजराथच्या कुमारपाल सोळंखी ( स. ११४३–७४ राजाच्या देखत मल्लिकार्जुनाला राजपितामह म्हणून त्याची स्तुति केली असतां, ती ऐकून त्यानें आपला सेनापति आनंद यास मोठ्या सैन्यानिशीं मल्लिकार्जुनावर पाठविलें. पहिल्या लढाईत आनंदाचा पराभव झाला, परंतु दुसरींत त्यानें मल्लिकार्जुनास ठार मारिलें. याच्या वेळचे दोन शिलालेख ( वसई व चिपळूण ) उपलब्ध आहेत. कुमारपालाचा अंमल थोडे दिवस ठाणें कोंकणावर होता; परंतु पुढें थोड्याच दिवसांत ठाणेकर शिलाहार हे कोल्हापुरकर शिलाहाराच्या मदतीनें स्वतंत्र बनले. मल्लिकार्जुनाचा पणतू सोमेश्वर हा या वंशांतील शेवटचा–विसावा–पुरुष होय ( स. १२५० ते १२६० ). त्याच्यावर १२६० मध्यें महादेव यादव देवगिरीकर यानें स्वारी केली; तेव्हां सोमेश्वर हा नौकागमन शास्त्रांत प्रवीण असल्यानें, त्यानें दर्यांचा आसरा धरला; परंतु महादेवानेंहि अनेक समुद्रयानें जमा करून त्याचा सर्वस्वी विध्वंस केला. हेमाद्रीनें हें सर्व वर्णन आपल्या ' राज्यप्रशस्तींत ' दिलें असून सोमेश्वरास कुंकुणेश म्हटलें

आहे. याप्रमाणें इ. स. १२६० सालीं कोंकणप्रांत देवगिरीकर प्रौढप्रताप चक्रवर्ती यादवांच्या साम्राज्याखालीं गेला, तो इ. स. १३१८ पर्यंत त्यांच्याकडेच होता. शिलाहारराजे हे आपला राज्यकारभार निरनिराळ्या मंत्र्यांच्या सल्ल्यानें चालवीत असत. त्यांना देवालयें, तलाव वगैरे बांधण्याची फार आवड असून ते विद्येचे भोक्ते होते. यादवांनी कोंकणावर राज्य चालविण्यास आपले प्रतिनिधी नेमिले होते; त्यांना सर्वाधिकारी किंवा महाप्रधान म्हणत. अशा प्रकारचा एक अच्युत नायक नावाचा यजुर्वेदी ब्राह्मण महाप्रधान ( गव्हर्नर ) इ स. १२७२ सालीं कोंकणांत कारभार करीत होता. सार्वभौम रामचंद्रदेव यादव यांच्या या महाप्रधानांनी दिलेले दोन ताम्रपट (इ स १२७३ व इ स. १२९१ चे ) ठाणें जिल्ह्यांत सांपडले असून, भिवंडी व वसईस खुद्द रामदेवरायाचे शिलालेखहि आढळले आहेत. कृष्ण कावळे हा भारद्वाजगोत्री ब्राह्मण महाप्रधान इ स. १२९० त सर्व कोंकणप्रांतावर राज्य करीत होता. पुढें अल्लाउद्दीन खिलजीनें रामदेवरायावर स्वारी केली असतां (इ. स. १२९४) त राजानें देशरक्षणासाठीं आपला दुसरा मुलगा भीमदेव ( बिंबदेव ) यास त्याच्याबरोबर राजगुरु पुरुषोत्तमपंत कावळे व इतर सरदार बरोबर देऊन उत्तर कोंकणांत पाठविलें. बिंबाख्यान व कौस्तुभचिंतामणि या ग्रंथावरून असें दिसतें कीं भीमदेव हा अनहिलवाड्यावरून जलमार्गानें कोंकणांत उतरून व कृष्ण कावळ्यापासून सर्वाधिकार हस्तगत करून महिकावती ( माहीम ) ही आपली राजधानी करून तेथें राहिला. त्यानें उत्तर कोंकणचे १५ विभाग केले होते; त्यांत १५२४ खेडीं होतीं. भीमदेवाच्या मागून प्रताप देव व त्याच्या मागून नागरदेव हे राजे झाले. नागरदेवाच्या वेळीं स. १३४७ त गुजराथच्या मुसुलमान शहाचा सेनापति मलिकनाईक यानें एकाएकीं नागरदेवावर स्वारी केली, तींत नागरदेव व त्याची राणी मारलीं जाऊन उत्तरकोंकण मुसुलमानांच्या ताब्यांत गेलें. दक्षिण कोंकणांतील शिलाहारांच्या वंशांत दहा राजे होऊन त्यांनीं सुमारें इ स. ८०८ ते १००८ पर्यंत राज्य केलें ते प्रथम राष्ट्रकूटांचे व मग चालुक्यांचे आणि शेवटीं देवगिरीकर यादवांचे मांडलिक होते.

मुसुलमानी अंमल—मुसुलमान कोंकणांत घुसल्याचा पहिला उल्लेख १३१२ तील आहे. त्या वर्षी मलिक काफर यानें दाभोळ व चेऊलवर स्वारी केली होती पुढें इ स. १३१८ त देवगिरी घेऊन मुबारकशहानें समुद्रकिनाऱ्यावर नवे किल्ले बांधण्याचा प्रारंभ केला, व साष्टी आणि माहीम येथें जुने किल्ले काबीज केले. कोंकणांत मुसुलमान जाण्यापूर्वी उत्तर कोंकणांत वसई, कल्याण, कर्नाळा, चौल आणि दक्षिण कोंकणांत दाभोळ, राजापूर व कुडाळ हे प्रांत मोडत असत. ब्राह्मणी राज्य स्थापन झाल्यानंतर (१३४७) कोंकण त्यांच्या राज्यांत समाविष्ट झालें. त्यांत चौल व दाभोळ हे दोन निरनिराळे प्रांत होते. याच सुमारास जव्हारचें संस्थान निर्माण होऊन दिल्लीकर मोंगलानें त्याला मान्यता दिली होती. यावेळीं म्हणजे १३४७–१४०० पर्यंत जरी कोंकण हें अधिपाच्या सत्तेखालीं होतें तरी तेथें हिंदूंचीं कित्येक मांडलिक राज्यें होतीं. त्यांपैकीं कांहीं विजयानगरकरांचे व कांहीं गोंवळकोंडेकरांचे मांडलिक म्हणवीत. अर्सकिन म्हणतो कीं, अहमदशहानें ( गुजराथचा शहा ) पंधराव्या शतकांत बराच कोंकण प्रांत काबीज केला होता त्यावेळीं त्याच्या राज्यांत वसई, मुंबई, दमण, दांडाराजापूर हे प्रांत व वसई आगाशी, दाभोळ, चौल, दांडा, पनवेल, कल्याण, भिवंडी वगैरे हीं शहरें प्रमुख होतीं असें मिरात-ई अहमदी म्हणते यांच्या कारकीर्दीत मलिक-उल् तुजार यानें कोंकण लुटलें ( १४२९ ). माहीम ( मुंबईकडील ) व साष्टी हीं बेटें घेतलीं तेव्हां त्याच्यावर वरील अहंमदशहानें खुष्कीनें व जलमार्गानें सैन्य पाठवून व त्याचा पराभव करून तीं परत मिळविलीं पुढें १४३६ त व १४५३ त ब्राह्मणी राजांनीं कोंकणावर स्वाऱ्या केल्या, त्यांपैकीं शेवटच्या स्वारींत विशाळगडच्या शिरके या आडनावाच्या घराण्यांतील एका मराठा सरदारानें आपल्या शंकरराय नावाच्या राजाविरुद्ध मलिक-उल् तुजार यास बोलविलें वास्तविक हें केवळ नावाचें सर्व ढोंग असून मुसुलमानांचा नायनाट करण्याकरितां त्यावेळच्या प्रमुख मराठ्यांनीं ही युक्ति योजिली होती. शिरक्यानें मलिकास सह्याद्रीच्या अत्यंत अडचणीच्या जागेत नेऊन सोडल्यानंतर पूर्वी ठरल्याप्रमाणें शंकरराय व इतर मराठे सरदारांनीं त्याच्यावर हल्ला करून त्याचा सपशेल धुव्वा उडविला. या शिरक्यांची राजधानी प्राचीन काळापासून विशाळगड व भैरवगड येथें असून त्यांच्या ताब्यांत ( डफच्या मतें ) कुंभारापासून बारगेपर्यंतचा घाटमाथा व पलीकडील कोंकण होतें. वरील प्रसंगानंतर १६ वर्षें मुसलमान भीतीनें कोंकणांत फिरकले नाहींत. उलट शिरके हे आपल्या आरमाराच्या बळावर त्यांना भेडसावीत होते. पुढें महमद गवान यानें १४६९ त दाभोळ व चौल येथील सैन्याच्या व आरमाराच्या मदतीनें शिरक्यावर स्वारी केली परंतु ५ महिने विशाळगडास वेढा देऊनहि तो किल्ला पाडाव झाला नाहीं. तेव्हां तो परत फिरला. मात्र दुसऱ्या वर्षी गवाननें विश्वासघातानें विशाळगड घतला. फेरिस्ता म्हणतो कीं यापूर्वी हा किल्ला मुसुलमानाच्या हातीं लागला नव्हता. इ. स. १४७८ त दक्षिणच्या चार सरकारांचे ( प्रांताचे ) आठ सरकार झाले तेव्हां उत्तर कोंकणचा प्रांत जुन्नर सरकारांत जोडला गेला. यानंतर लगेच गोव्याच्या सुभेदाराचा मुलगा बहादुर गिलानी यानें माहीम, साष्टी, दाभोळ, वसई वगैरे कोंकणचा भाग ( हा गुजराथच्या शहाचा प्रदेश होता) जिंकला ( १४९० ) तो एक वर्ष त्याच्या ताब्यांत होता इकडे जुन्नर प्रांताचा सुभेदार अहंमद यानेंहि कोंकणांतील बरेच किल्ले सर करून दांडाराजपुरास वेढा दिला. पण तेथें त्याची डाळ शिजली नाहीं. तिकडे बेदरकडे गडबड झाली

त्याचा फायदा घेऊन अहमद यानें अहमदनगर येथें निजामशाही स्थापन केली व १४९० त दाभोळ घेतलें. याच वेळीं गिलानीनेंहि ( मुंबई ) माहीम जाळून गुजराथच्या शहाच्या आरमाराचा पराभव केला तेव्हा महंमद बेगडा गुजराथकर यानें विजापूरकर व बेदरकर यांच्या मदतीनें दाभोळवर स्वारी केली, त्यात त्याचें आरमार वादळात सापडून नाश पावलें, परंतु सैन्यानें गिलानीशीं कोल्हापुराजवळ लढाई दिली. तींत गिलानी ठार झाला यावेळीं गुजराथकर शहाच्या ताब्यात उत्तरकोंकण व ठाणें ( राजधानी ) होतें. पण पुढें काही वर्षांनीं पोर्तुगीजांनीं हळू हळू तो प्रदेश आपल्या ताब्यात घेतला. बहामनी राज्य मोडल्यावर कोंकणप्रात आदिलशाही व निजामशाही यांच्यात वाटला गेला त्या दोहोंमधील सरहद्द सावित्री नदी होती असें म्हणतात, त्यामुळें चौल व दाभोळ हीं बंदरें दोन्ही रियासतींत विभागलीं गेलीं. यावेळीं कोंकणची स्थिति खालावलेली होती. ती सुधारण्याचा प्रथम प्रयत्न युसुफ आदिलशहानें केला. शेतकऱ्यांच्यावरील सारा कमी करण्यात येऊन देसाई, देशपांडे, व कुळकर्णी यांचीं वतनें त्यानें कायम केलीं. हबशी हे जंजिऱ्यात राहावयास केव्हा आले हें निश्चित समजत नाहीं. ते १४९८ त आले अशी एक दंतकथा आहे. मलिकंबरच्या वेळीं निजामशाहीच्या आरमारात दोन हबशी आरमाराचे अधिकारी होते, त्यांपैकीं एकाच्या ताब्यात रायरी हें ठिकाण होतें असें डफ म्हणतो. मुसलमानी सैन्यात व मोठमोठ्या हुद्याच्या जागीं बरेच हबशी होते सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं कोंकणचे विभाग व महत्त्वाचीं ठिकाणें यांबद्दलची माहिती पोर्तुगीज लेखावरून पुढीलप्रमाणें आढळते:— नागोठण्यापर्यंत गुजराथच्या शहाचा अंमल असून, श्रीवर्धन किंवा बाणकोटपर्यंत निजामशाहीचा ताबा होता आणि बाणकोटच्या दक्षिणेकडील गोव्यापर्यंतचा भाग आदिलशाहीच्या राज्यात मोडत असे. चौल व दाभोळ हीं मोठीं बंदरें असून तीं सुरत व गोवें यांच्या बरोबरीचीं समजलीं जात. या वेळचीं दुसरीं महत्त्वाचीं गावें म्हणजे डहाणू, तारापूर, केळवेमाहीम, आगाशी, वसई, वांद्रें, माहीम, नागोठणें, श्रीवर्धन, जैतापूर व खारेपाटण हीं होत. चौल व दाभोळ या मोठ्या व्यापारी पेठा असून इराण व तांबडा समुद्र यांजबरोबर त्याचा बराच व्यापार चालत असे. हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील सर्व ठिकाणचे लोक दाभोळ येथें जमत असत असें निकितिन म्हणतो सोळाव्या शतकांत तेथील वस्ती बरीच असून इमारती सुंदर होत्या आणि देवालयें व मशिदीहि बऱ्याच होत्या असें पोर्तुगीज इतिहासकार म्हणतात इ. स १५४० त तेथें तटबंदीचे दोन किल्ले होते. ते पुढें पोर्तुगीजांनीं पाडून टाकले. त्यांनीं गुजराथच्या शहाच्या ताब्यातील कोंकणचा बराचसा भाग हाताखालीं घातल्यामुळें दिल्लीकर मोंगलाला कल्याणखेरीज महत्त्वाचा दुसरा भाग मिळाला नाहीं. निजामशाहीचें व फिरंग्यांचें (पोर्तुगीजांचें) बहुधा सख्य असे, आदिलशाहीचीं मात्र फिरंग्यांशीं नेहमीं खटखट होई. मलिकंबरच्या जमीनमहसुलीच्या पद्धतीनें कोंकणच्या शेतकऱ्यांना पूर्वीच्या मुसलमानी अमदानीपेक्षा जास्त सुखाचे दिवस गेले त्याच्या मृत्यूनंतर दहा वर्षांनीं हा कोंकणप्रात आदिलशाहींत समाविष्ट झाला. त्यापूर्वीच निजामशाहींत शहाजी राजानीं उत्तरकोंकणात स्वाऱ्या करण्यास प्रारंभ केला होता व बरेचसे किल्लेहि स्वतःच्या ताब्यात आणले होते. त्यामुळें आदिलशाही व दिल्लीकर मोंगल हे एक होऊन त्याच्या मागें लागले. त्यानीं बरेच दिवस त्या दोघांनाहि दाद दिली नाहीं. पण अखेरीस निजामशाहींतील फितुरीमुळें त्याना स्वतंत्र सत्ता स्थापण्याचा प्रयत्न सोडून आदिलशाहीचे नोकर रहावें लागलें या आदिलशाहींत कोंकणची व्यवस्था पुढीलप्रमाणें होती. दाभोळ, अंजनवेल, रत्नागिरी व राजापूर हे प्रात व तेथील कोट हे प्रत्यक्ष मध्यवर्ती सरकारच्या अमलाखालीं असत. याशिवाय उरलेल्या प्रांताचा कारभार देशमुखादि वतनदार हे वंशपरंपरेनें पहात असत. कुडाळचे सावंत हे अशा देशमुखांत ठळक होते. दाभोळची सुभेदारी ( जिल्हा ) बरीच मोठी असून, तिचें मुख्य ठाणें विशाळगडजवळील प्रभानवल्ली या गावीं होतें; येथील ब्राह्मण सरदेसाई यांचें घराणें पुष्कळ वर्षांपासून तेथील वतनदार होतें याशिवाय आणखी दोन सुभेदाऱ्या होत्या. कल्याणप्रात ( सुभेदारी ) वैतरणी नदीपासून नागोठण्यापर्यंत असून तिच्यावर विजापुराहून सुभेदाराची नेमणूक होई. याशिवाय उरलेल्या सावित्रीनदीपर्यंतचा सर्व प्रदेश जंजिरेकर हबशाकडे असून त्याच्या ताब्यात तळें, घोसाळें, रायरी हे किल्ले होते. मोंगलाचे ( दिल्लीकर ) व फिरंग्यांचें विशेषसें तंटा भांडण होत नसे. एकदां मोंगलानीं सन १५८२ त फिरंग्यांच्या दमण, डहाणु, व तारापुर या ठाण्यांवर हल्ले केले होते. परंतु अकबराच्या जनानखान्यातील एका फिरंगी नाटकशाळेच्या वजनानें त्यांच्यात लवकरच तह घडून आला असें जर्विस म्हणतो ( पृ. ८४ ). या नाटकशाळेच्या मार्फत फिरंग्यांना मोंगलाकडून बराच मुलूख मिळाला असेंहि तो सांगतो. पुढें पुन्हा एकदा स. १६१२ त मोंगलानें दमण, वसई व चौल यांना वेढा देऊन आसपासचा प्रात उध्वस्त केला. तेव्हा फिरंग्यानीं त्याना बराचसा नजराणा देऊन व काहीं प्रात सोडून त्यांच्याशीं तह केला. यापुढें मात्र त्याचा परस्पर बेबनाव फारसा झाला नाहीं. अकबराप्रमाणेंच शहाजहानेंहि फिरंग्यांशीं भांडण उकरून काढलें नाहीं कोंकणात मुसलमानी अवशेष फारच थोडे आहेत व तेहि महत्त्वाचे नाहींत. कोंकणातील बहुतेक मुसुलमान बाटलेले हिंदु असल्यानें त्यांचा पेहराव व भाषा सुद्धां अर्धवट मराठी आहे काहीं मुसुलमानात तर हिंदूंचे देव पूजेस ठेविलेले असून लग्नप्रसंगींहि ते हिंदु विधि बराचसा पाळतात

**पोर्तुगीज अमल**--हिंदुस्थानचा मार्ग शोधून काढल्यानंतर पोर्तुगीज लोकांनीं गोव्याच्या उत्तरेस १५०२ च्या सुमारास पहिली सफर केली असें म्हणतात. पुढें १५०८ त कांहीं पोर्तुगीज गलबतें लॉरेन्झो आल्मिडाच्या हाताखालीं चौल येथील मुसुलमानी आरमारावर चालून गेलीं. व त्याचा पराभव करून येथून तो दाभोळास गेला असता तेथें निझामशाही अधिकाऱ्यानें त्याला व्यापाराची परवानगी दिली. मात्र गुजराथ व ईजिप्त येथील आरमारें एकत्र होऊन त्यांनीं त्याचा पराभव केला. याप्रमाणें पोर्तुगीज लोकांना त्यांच्या पूर्वेकडील सर्व व्यापार काबीज करण्याच्या महत्वाकांक्षेमुळें प्रथमपासूनच शत्रू उत्पन्न झाले. कोंकणांतील चौल व दाभोळ या महत्वाच्या बंदरावर त्यांचा डोळा होता. यावेळीं आदिलशाही व निजामशाही यांच्यात भांडणें सुरू होतीं. कोंकण प्रांत त्यांच्या दोघांत विभागला गेल्यानें तिकडे त्यांचा धुमाकूळ चाले. व त्याचा फायदा पोर्तुगीज घेत. निजामशहानें चौल येथें त्यांना वखार घालण्याची परवानगी देऊन बंदरांत येणाऱ्या जहाजाचें संरक्षण करण्याचें कामहि त्यांना सांगितलें. आदिलशहानें फिरंग्यांना ही सवलत दिली नसल्यानें त्यांच्या दाभोळ बंदराला फिरंगी हे वरंवार त्रास देत. लुटालूट करण्याकरितां उत्तर कोंकणच्या किनाऱ्यावर हल्ले चढवीत. स. १५१७ त डीमटारोयो यानें वाऱ्यावर हल्ला करून तेथील मुसुलमान सुभेदाराचा पराभव केला. स. १५२९तील एका स्वारींत त्यानें नागोठणें, वसई, आगाशी हीं बंदरें जाळून ठाणें, वांद्रें, कारंजें व साष्टी हीं गावें काबीज केलीं. गुजराथच्या शहाबरोबरहि यांच्या वारंवार चकमकी होत. यांचा सन १५२१ त व १५३० तं असा दोन वेळां गुजराथकरांनी चौल येथें त्यांचा पराभव केला. पुढें १५३३ त फिरंग्यांनीं ८० जहाजें घेऊन वसईवर हल्ला करून तेथील तटबंदी पडली. व तारापुरापर्यंतचीं ठाणीं जाळून टाकलीं. तेव्हां गुजराथच्या शहानें निजामशहाप्रमाणेंच त्यांच्या संरक्षणाखालीं आपलें आरमार ठेवून त्यांना वसई देऊन टाकली. परंतु या दोघांतील स्नेह फारसा दृढ झाला नाहीं. पुढें १५४७ त फिरंग्यांनीं आदिलशहाविरुद्ध निजामशहाशीं व विजयनगरकराशीं तह केला आणि १५४८ त स्वारी करून गोंवें ते श्रीवर्धन यांच्या दरम्यानचीं पुष्कळ गावें लुटलीं व जाळलीं. त्यांत दाभोळचें विशेष नुकसान केलें. तेव्हां आदिलशहानें कांहीं बंदरें त्यांच्या हवालीं करून तह केला. तरी सुद्धां फिरंग्यांनीं नो न पाळता त्यांच्या मुलुखाची पुष्कळशी नासाडी केली. त्यांनीं १५४८ मध्येंच वसई येथें एक धर्मशिक्षणाची पाठशाळा काढून आपले धर्मोपदेशक वसई, ठाणें व चौल येथें पाठविले. स. १५६० त फ्रान्सिस्कन् धर्मोपदेशकांनीं कान्हेरी व मंडपेश्वर येथें रहाणाऱ्या हिंदु साधु व योगी यांना घालवून तीं ठिकाणें आपल्या ताब्यात घेतलीं. घारापुरी, कान्हेरी व मंडपेश्वर हीं स्थानें हिंदू लोक पवित्र मानीत, म्हणून तेथील खोदकामाचा नाश करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. मंडपेश्वर येथील गुहेच्या जागीं त्यांनीं ख्रिस्ती देऊळ बांधलें आणि साष्टी येथें जुलुमानें ख्रिस्ती केलेल्या लोकांच्या मुलांना धर्मशिक्षण देण्याकरितां एक पाठशाळा स्थापिली व तिच्या खर्चास त्या प्रांतांतील हिंदुधर्माच्या संस्थेचें पूर्वापार चालत आलेलें वतनाचें उत्पन्न लावून दिलें पुढें क्रमाक्रमानें बहुतेक सर्व सत्ता या ख्रिस्ती भटांच्या हातांत आली. इकडील या ख्रिस्ती धार्मिक संस्थाचें उत्पन्न इकडील फिरंगी राज्याच्या एकंदर उत्पन्नापेक्षांहि जास्त झालें. गोंवें येथील यांच्या धर्मविचारणी सभेची (इन्क्विझिशन) सत्ता उत्तर कोंकणांत सर्वत्र चालत असे. वाटेल त्या माणसाला पकडण्याचा तिला अधिकार असे. हा तिचा अधिकार इतका अमर्यादित होता कीं प्रसंगीं त्याला लिस्बन येथील दरबारची व मुख्य धर्मविचारिणी सभेची मंजुरी मिळाल्यास खुद्द गोव्याचा फिरंगी सुभेदार ( गव्हर्नर ) व ख्रिस्ती जगद्गुरु ( आर्चबिशप ) यानांहि तिला पकडतां येई. या अमर्याद सत्तेमुळें ख्रिस्ती भटांनीं पुष्कळ हिंदुलोकांस जुलुमानें बाटविलें व त्यांच्यावर अनेक अत्याचार केले. अशा बाट्या लोकांची संख्या ( १८ व्या शतकांत ) ६० हजारापेक्षां जास्त होती असें म्हणतात. इ. स १५५५ त फिरंगी सुभेदारानें हुकूम काढून वसई प्रांतांतील सार्वजनिक व खासगी देवळांत हिंदूंस पुजेची मनाई करून ब्राह्मणाकडून होणारें वेदपठण, होमहवन, सणाचे सार्वजनिक उत्सव वगैरे बंद केले. हिंदु लोक मूर्तिपूजा करितात कीं काय व मनाई केलेले धार्मिक विधी पाळतात कीं काय हें पहाण्याकरितां त्यांच्या घराच्या झडत्या घेत. त्यावेळीं जर एखाद्याच्या घरांत मूर्ति सांपडली किंवा कोणी मनाई केलेला धार्मिक विधि पाळतांना आढळला तर त्या माणसाला फाशीं देत आणि त्याची सारी मालमत्ता जप्त करून ती अर्धी पाद्री भटास व अर्धी अशी बातमी देणारास वांटून देत. यापुढें तर इ. स. १५९४ त रोमचा पोप व पोर्तुगालचा राजा यानीं हिंदुलोकांस जुलमानें बाटविण्याचे हुकूम पाठविले. त्यामुळें इकडील पाद्रीभटांनीं अनेक देवळांचा नाश करून वसई प्रांतांतील लोकांस लुटण्याचा व अनेक युक्त्या प्रयुक्त्या करून त्यांना बाटविण्याचा धूमधडाका सुरू केला. एखाद्या विहिरींत पावाचा तुकडा टाकून सबंध गावचा गाव बाटवीत असें म्हणतात. अशा प्रकारें धर्मच्छलाचा अतिरेक झ ल्यामुळें सर्वत्र असंतुष्टता उत्पन्न झाली. त्यामुळें पुढें फिरंग्यांचें जें उच्चाटन या भागांतून झालें, त्यास हें एक विशेष कारण होतें असें इतिहासकारांचें म्हणणें आहे. फिरंग्यांनीं किनाऱ्यावरील बहुतेक प्रांत १५६० पर्यंत काबीज केला. फार आंत जाण्याचा त्यांचा बेत नव्हता, कारण त्यांची आयात थोडी होत असे. यासाठीं अल्बुकर्कनें एक युक्ती काढिली, त्यानें गोव्यांतील हलक्या जातींतील बायकामुलींना बाटवून व त्यांना जमिनी देऊन त्यांची लग्नें आपल्या

फिरंगी शिपायाबरोबर लावून दिली या बाटपाच्या वंशजाचा धर्म ख्रिस्तीच बनला आणि अधिकाराच्या जागा वगैरे कारणामुळें त्याचा ओढाहि फिरंग्याकडेच वळला. या वेळीं फिरंग्याच्या ताब्यातील प्रातात सुपीक भाग पुढील ठिकाणीं होता. रेवदंडा ( नवें चौल ), वसई व आगाशीमधील भाग वगैरे. दाभोळास त्याची फक्त वखार होती. इ. स. १५५६ त असेरी व मनोर हे किल्ले त्यानीं घेऊन पुढें लवकरच पुष्कळ दिवसापासून डोळा असलेलें दमण व तारापूरचा किल्ला ( व गांव ) घेतला. इ. स. १५५९ त हबशानीं संभाण व तारापुरावर हल्ला केला. परंतु त्यात त्याचा पराभव झाला. फिरंग्यानी १५६९ व १५८२ त दोनदा कोळी लोका ( जव्हार ) वर स्वाऱ्या केल्या; परंतु दोन्ही वेळा त्यांचें फार नुकसान होऊन परास्त होऊन परत यावें लागलें. यावेळीं ते वैतरणीच्या काठावरून घाटाच्या पायथ्यापर्यंत गेले होते असें म्हणतात. १५६० त आदिलशाहा व निजामशहा एक होऊन त्यानीं फिरंग्यावर चढाई करून गोवें व चौल येथें वेढे दिले, परंतु त्याना यश आलें नाहीं रेवदंड्यास मुर्तुजा निजामशहानें वेढा दिला असता, त्याच्याच अधिकाऱ्यानीं फितूर होऊन फिरंग्याना समुद्राकडून वसईच्या सैन्याची कुमक मिळूं दिल्यामुळें निजामशहानें वेढा उठविला. फिरंग्यानीं निजामशहाच्या कल्याणवर याच वेळीं हल्ला चढविला होता व त्या सर्व भागात जाळपोळ व लुटालूटहि केली होती त्यामुळें या वेळीं तह होऊन निजामशहा परतला; पण पुन्हा १५९२ त या दोघात लढाई सुरू होऊन मुसुलमानानीं रेवदंड्यावर वारंवार हल्ले केले तेव्हा फिरंग्यानी त्याना चौलखाडीच्या तोंडावरील कोर्लें किल्ल्यात कोंडून त्यांचा पराभव केला व चौलखाडी ताब्यात घेतली. यानंतर आदिलशाही व निजामशाही याच्याकडून फिरंग्याना विशेष त्रास झाला नाहीं; तथापि इ. स १६०९ त चौलच्या मुसुलमान सुभेदारानें एक छोटेंसें आरमार त्याच्यावर पाठविलें होतें. इ. स. १५६० पर्यंत हिंदुस्थानात फिरंगी सत्तेची बाल्यावस्था इ १५६०–१६०० पर्यंत तारुण्यावस्था व पुढें वृद्धावस्था झाली, असें फिरंगी इतिहासकार म्हणतात. त्याचा उत्कर्ष जितका जलद व आश्चर्यकारक रीतीनें झाला तितकाच त्याचा ऱ्हासहि लवकर झाला व एकदा ऱ्हासास प्रारंभ झाल्यावर त्याची स्थिति पुन्हा सुधारली नाहीं. सतराव्या शतकानंतर त्यानीं चढाईचें धोरण स्वीकारल्याचें अथवा नवीन प्रदेश मिळविल्याचें ऐकण्यात नाहीं. आसपासच्या सत्ताधाऱ्यानीहि त्याच्याकडे कानाडोळा केला. त्यामुळें साष्टी व वसई प्रात त्याच्या ताब्यात राहिला. येथपर्यंत कोंकणच्या व्यापारात त्याचें वर्चस्व होतें यापुढें मात्र इतर यूरोपियन लोक व मलबारी चाचे याचा त्याना उपसर्ग होऊं लागला इ. स १६१५ त जहांगीर बादशहाशीं त्यानीं केलेल्या तहात दोघानीहि इंग्रज व डच याना शत्रू समजून त्याच्याचा नाश करावा असें एक कलम होतें. त्यावेळीं गोव्याच्या अधिकाऱ्याची परवानगी घेतल्याशिवाय कोणालाहि इराण व तुर्कस्तानच्या मार्गानें यूरोपला जाता येत नसे असें म्हणतात ( डी ला व्हॅले. पु. ३. पृ. ४०२–०६ ). डच लोकांनीं नवीन वसाहती स्थापण्यापेक्षा पोर्तुगीजाच्या असलेल्या वसाहतीच काबीज करण्याकडे विशेष लक्ष घातलें व तें त्याना सोपें गेलें. कारण फिरंग्याच्या अतीशय धार्मिक छळानें हिंदुलोक त्रासून गेले होते व ते त्याचे द्वेष्टे बनले होते. डचानीं स. १६३९ ते ४२ पर्यंत गोव्यास वेढा दिला होता. परंतु तिकडे यूरोपमध्यें त्या राष्ट्रात संधि झाल्यामुळें त्यानीं तो उठविला. या डचानीं स. १६४१ पूर्वी वेंगुर्लें येथें एक वखार उघडली होती. आदिलशाहानें त्याना आपल्या दाभोळ वगैरे बंदरातील आरमाराचें संरक्षण करण्याचें काम सांगितलें होतें. परंतु तें त्यानीं पत्करिलें नाहीं. साधारणतः डच लोकाना कोंकणात वसाहत करण्याची विशेष उत्सुकता वाटली नाहीं स. १६६१ त फिरंग्यानीं मुंबई बेट हें इंग्रजास ( आंदण ) दिलें. पुढें १६६३ त डच लोकानीं फिरंग्यापासून कोचीन घेतल्यानंतर झालेल्या तहान्वयें फिरंग्याचें व्यापारी वर्चस्व समूळ नष्ट झालें, आणि डच लोकानांहि त्यानंतर इंग्रजापुढें हार खावी लागली. कोंकणात फिरंग्याचे मुख्य अवशेष वसई व खालचें चौल ( रेवदंडा ) येथें आहेत. साष्टी बेटात व वसई, रमेदी, ठाणें येथें त्याचीं वरीचशीं प्रार्थनामंदिरें असून ठाणें व कोर्लें येथें त्यानीं बाधलेले किल्ले आहेत; याशिवाय अरब व चाचे आल्याची सूचना देण्याकरिता उंचवट्याच्या जागीं ठिकठिकाणीं त्यानीं बुरूज बाधलेले अद्यापि कायम आहेत; असला एक मोठा बुरुज मुंबईच्या मलबार टेकडीवरून दिसतो.

मराठ्याची कारकीर्द:—कोंकणाला अलीकडील काळात जें महत्व आलें. तें शिवाजीमहाराजाच्या वेळीं प्राप्त झालें. या सुमारास दक्षिणेस सावंतवाडी व उत्तरेस जव्हार हीं ( जंजिरा धरून ) संस्थानें होतीं महाराज हे जरी कोंकणचे रहिवासी नव्हते तरी मुसुलमानी सत्तेला तोंड देताना सह्याद्रीची पाठ व कोंकण याचा उपयोग करून घेतल्यास पुष्कळ फायदा होईल हें त्यानीं थोड्याच दिवसात ताडलें. त्याचा सरदार राघोबल्लाळ यानें बहुतेक कोंकण हस्तगत केलें होतें, व अण्णाजी दत्तो सचीव यानीं कोंकणच्या जमीनीची मोजणी करून सुव्यवस्थित धारे बसवून प्रजेस सुखी केलें होतें. महाराजानीं आपल्या वयाच्या २०–२१ व्या वर्षीच कोंकणाकडे हालचाली सुरू केल्या. प्रथम रायरी घेऊन तेथें रायगड हा मजबूत किल्ला बाधून तो आपली राजधानी केली नंतर कल्याणप्रात ( आदिलशहाचा ) युक्तीनें काबीज केला व पुढें विरवाडी आणि लिंगाणा हे दोन किल्ले बाधले. दख्खनमधून कोंकणात येण्याचा प्रसंग आल्यास सुरक्षित येता यावें म्हणून त्यानीं वाई–महाड रस्त्यावर प्रतापगड बाधून औरंगजेबाकडून सर्व कोंकण ताब्यात घेण्याच्या परवानगीच्या मिषानें १६५८ च्या सुमारास किनाऱ्यावरील ओसाड किल्ले व मोक्याच्या जागा काबीज करण्याचा सपाटा चालविला.

नंतर शिद्दीच्या मुलुखावर व सावंतावरहि स्वारी केली. तेव्हां सावंतानीं महाराजांशीं तह केला परंतु अफजलखानाच्या धामधुमीत सावंत हे आदिलशहास मिळून राहून त्यांनीं व वरून शिद्दीनें व उजवकिडून आदिलशहानें महाराजावर चढाई केली. तेव्हां त्या सर्वांना त्यांनीं नमोहरम केलें; मात्र सावंत शरण आल्यानें त्यांना त्यांचा प्रांत बहाल केला. पुढें सर्व कोंकणकिनाऱ्याची पहाणी करून आरमार वाढविलें व तें ठेवण्यास मालवण ही जागा सुरक्षित पाहून तेथें किल्ला व गोदी बांधली. नंतर सुवर्णदुर्ग, रत्नागिरी, जयगड, अंजनवेल, विजयदुर्ग व कुलाबा येथें कोठें नवीन किल्ले बांधले व कोठें जुन्या किल्ल्यांची दुरुस्ती केली आणि कुलाबा येथेंहि आरमाराचें मुख्य ठाणें करून सिदोजी गुजर यास आरमारी सुभा सांगितला. रायगडची मात्र फार मजबुती केली. त्यामुळें तो किल्ला त्यावेळीं अजिंक्य म्हणून समजला जाई इतकें तर त्याला पौर्वात्य जिब्राल्टर असें म्हटलें आहे. पुढें १६६३-६४ मध्यें महाराजांनी कोंकणवर स्वाऱ्या करून वेंगुर्लें जाळून लुटलें व मालवणचें आरमार जमवून व स्वतः आधिपत्य स्वीकारून बार्सिलोर पर्यंत स्वारी केली व बरीच लूट मिळविली. परत येतांना वारा प्रतिकूल लागल्यानें आरमाराला येण्यास बराच काळ लागला, इकडे त्याच सुमारास देशावर मोंगलांची स्वारी झाली तेव्हां (जयसिंगाशीं) जो तह झाला त्यांत कोंकणामधील बरेचसे किल्ले महाराजांनीं मोंगलाला दिले. आग्र्याहून परत आल्यानंतर पुन्हां त्यांनीं कल्याणप्रांत व मोंगलाचा उत्तर कोंकणांतील प्रांत हस्तगत करून इ.स. १६६८ त गोवें व जंजीरा प्रांतावर चढाई केली माहुली किल्ल्यास मोरोपंतानीं दोन महिने वेढा देऊन तो घेतला. तेव्हां कर्नाळाहि सहज हस्तगत झाला. याच वेळीं मोंगल व हबशी यांच्याशीं महाराजांच्या बऱ्याच दर्यावर्दी लढाया झाल्या. पुढें १६७० त त्यांनीं उत्तर कोंकणांत मोठें आरमार पाठवून पोर्तुगीजांचें एक मोठें जहाज पकडून आणिलें शिद्यांना डोळा दांडाराजपुरावर होता त्यामुळें त्यानें महाराजांच्या गैरहजेरीचा फायदा घेऊन (१६७२) त्या स्थळावर हल्ला करून तेथील तटबंदी मोडून आसपासचे कांहीं किल्ले सर केले. या कामीं त्याला मोंगलांचें पाठबळ होतें, म्हणून महाराजांनीं आरमार देऊन मोरोपंतांना सुरतेवर पाठविलें. त्याचवेळीं त्यांनीं वसई-डहाणूच्या भागांतील जव्हारकराकडील बरींचशीं ठाणीं काबीज करून फिरंग्यांचा घोडबंदर किल्लाहि घेण्याचा प्रयत्न केला. पुढें १६५३ त शिद्दी व मोंगल नागोठण्याच्या आसपासचीं गांवें उध्वस्त करून लोकांना गुलाम करून नेत असतां, महाराजांनीं अचानक त्यांच्यावर सैन्य धाडून त्यांचा पुरा मोड केला. बहुधा १६६१ पासून मधून मधून महाराजांनीं जंजिऱ्यास वेढा घालण्याचा उपक्रम सुरू केला होता त्याप्रमाणें १६७१ तहि घातला असतां दुसरीकडेहि गोव्याकडील फोंडा किल्ल्यावर त्यांनीं स्वारी केली. कर्नाटकांत महाराज गेले त्यावेळीं सर्व कोंकणचा राज्यकारभार त्यांनीं आण्णाजी दत्तो सचिवाकडे सोंपविला असतां त्यानें जिल्हानिहाय अधिकारी नेमून जमाबंदी केली, ती न्यायाच्या व समतेच्या तत्वावर केली होती असें इंग्रज इतिहासकारहि म्हणतात (जर्व्हिस ९३, मुंबई ग्याझे. पु. १ भा. २. ७१). या वेळीं सुद्धां मराठ्यांच्या दर्यावरील हालचाली सुरूच होत्या. पुढें १६७१ त महाराजांनीं मोंगलांचा सुरतेपर्यंतचा प्रदेश लुटून खांदेरी बेट घेतलें. त्या बेटावर इंग्रज व पोर्तुगीज हे दोघेहि हक्क सांगत. इंग्रजी आरमार तेथें असतांना त्यांचा डोळा चुकवून मराठ्यांनीं बेट घेतलें. तेव्हां इंग्रज चालून आले असतां मराठ्यांनीं त्यांचा सर्वांचा फन्ना उडविला (मराठे व इंग्रज २८). या वेळीं इंग्रजांस गुप्तपणें मदत करणारा शिद्दी त्यांना उघडपणें मिळाला होता. त्या दोघांनीं पुष्कळ दिवस खांदेरीस वेढा दिला, परंतु त्यांचा प्रयत्न निष्फळ झाला; इकडे उलट १६८० च्या जानेवारींत एकदम महाराजांनीं शिद्याचें उंदेरी बेटहि काबीज केलें व तेथें तटबंदी बांधली. शेवटीं नाइलाजानें इंग्रजानें महाराजांशीं तह केला व शिद्याला मुंबई बेटावर येऊं न देण्याचें कबूल केलें. स. १६७२ त दाभोळ व कल्याण हीं गांवें बरीं होतीं असें फ्रायर लिहितो. या वेळीं वसई व राजापूर हीं बंदरें भरभराटीचीं होतीं, तसेंच महाड हें रायगड राजधानीजवळ असल्यानें बरेंच वाढून व्यापाराची मोठी पेठ बनलें होतें. कल्याण ते रायगडमधील प्रांताला मात्र लढायांच्या मुळें बराच उपसर्ग पोहोंचे, परंतु बाकीचें कोंकण सुस्थितींत होतें, असें इंग्रज इतिहासकार कबूल करतात (बाँबे ग्याझे. व्हा. १ भा. २. पृ. ७३) महाराजांची जमीनमहसुलपद्धति पूर्वींच्या पद्धतीपेक्षां श्रेष्ठ प्रकारची होती, तसेंच बहुतेक सर्व प्रकारच्या लोकांना लष्करांत दाखल होऊन उदयास येण्याची संधि मिळे. नुसत्या किल्ले बांधण्याच्या कामावर हजारों लोक कित्येक वर्षेंपर्यंत पोट भरीत. महाराजांच्या समकालीन असलेल्या ख्रिस्ती अथवा मुसुलमान राजापेक्षां ते श्रेष्ठ असून त्यांच्या कारकीर्दींत कोंकण जितकें भरभराटींत होतें तितकें तें ऐतिहासिक काळांत बहुधा केव्हांहि नव्हतें, ही गोष्ट इंग्रज इतिहासकार व काफीखान यांनींहि कबूल केली आहे. कोंकणांतील किल्ल्यांचा व महाराजांचा बराच संबंध येत असल्यानें त्यांच्याबद्दल येथें त्रोटक वर्णन सांगतों. बहुतेक सर्व किल्ले निसर्गसिद्ध सोई पाहून बांधलेले असत. समुद्राकिनाऱ्यावर असलेला किल्ला जलवेष्टित खडकावर असे. मैदानी किल्ला नदीच्या किंवा घाटाच्या जवळील एखाद्या उंच पहाडावर असे व सह्याद्रीच्या रांगेंतील किल्ला त्याच्या एखाद्या दुर्गम कड्यावर किंवा सोंडेवर असे. किल्ल्यांची रचना बहुतेक सारखीच असे. भोंवतीं मोठा तट व तटास बरेचसे बुरूज असत. तटास बहुधा एकच वेस असून वेशीजवळील तटाचा भाग फार मजबूत असे. वेशीपाशीं दोन बुरूज असून तेथून

आंतील दुसऱ्या वेशीपर्यंत अरुंद, वळणावळणानें गेलेली व दोन्ही बाजूला उंच तट असलेली अशी वाट असे. त्यावेळीं हल्लींप्रमाणें महाकाळी ( हॉवित्झर ) तोफा नसल्यानें या किल्ल्याचा फार उपयोग होई. मुख्य तटाच्या आंत एक बालेकिल्ला असे व त्या भोंवती शिपायांच्या कोठड्या, दारूगोळ्याची कोठारें व पागा वगैरे असत. महाराजांनी बांधिलेल्या बहुतेक किल्ल्यांत एक देवीचें व मारुतीचें अशीं देवळें असत. अशा किल्ल्यांत विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, सिंधुदुर्ग, मालवण, पद्मगड, रायगड, विशाळगड, वगैरे किल्ले महत्वाचे असून पद्मगडास महाराजांचा जहाजें बांधण्याचा कारखाना होता. कुलाबा व मालवण येथें आरमाराचीं मुख्य ठाणीं होतीं. महाराजांच्या मृत्यूनंतर वाडीच्या सावंतानें कर्ली नदीच्या दक्षिणेकडील मुलूख काबीज केला. परंतु संभाजीराजे गादीवर आल्यानंतर त्यांनी सावंतानें घेतलेला प्रांत परत मिळविला. कलुशाला कोंकणच्या जमीनमहसुलाचें काम मिळालें असतां त्यानें कांहीं नवीन कर बसवून मामलती मक्त्यानें देण्याची रीत पाडली. खांदेरीउंदेरीबद्दल संभाजीराजे व शिद्दी यांत पुष्कळ दिवस भांडण चालू होतें. औरंगझेबाचा मुलगा अकबर हा राजे यांच्या आश्रयास आला होता. त्यामुळें औरंगझेबानें १६८२ च्या सुमारास संभाजीराजांच्या कोंकण किनाऱ्यावर आरमार पाठवून धुमाकूळ घालण्यास सुरवात केली; पण त्यांत त्याचाच पराभव झाला. तेव्हां औरंगझेबानें पुन्हां १६८४ त बहादुरखान व सुलतान मुआझिम यांच्या बरोबर प्रचंड सैन्य ( नुसतें घोडदळ ४० हजार असून बाकी पुष्कळ पायदळ होतें असें आर्म म्हणतो ) देऊन दक्षिण कोंकणांत पाठविलें. एवढी थोरली स्वारी दक्षिणकोंकणांत यापूर्वी व यानंतर क्वचितच झाली असेल. संभाजीराजांनीं या स्वारीला समोरासमोर तोंड न देता गनिमी पद्धतीनें लढाई सुरु ठेविली. आपण स्वतः विशाळगडीं राहून शत्रूची रसद लुटून त्यांच्या एकट्या दुकट्या टोळीचा फन्ना पाडण्याचा उपक्रम सुरू केला. मुसुलमानांनींहि किल्ले घेण्याच्या अवघड कामास हात घातला नाहीं. कारण प्रत्येक किल्ल्यावर शिबंदी वगैरे तयारी जय्यत असे. घाटांत मुसुलमानांचे बहुतेक घोडे, गुरें ढोरें मेलीं व अन्नाची टंचाई फार झाली. शिवाय त्यांची सगळीकडची रसद मराठ्यांनीं मारल्यामुळें त्यांनां नारळ व कुडु नांवाच्या अगदीं हलक्या धान्यावर निर्वाह करावा लागला. सुरतेहून येणारी सामानसुमानाचीं व धान्याचीं जहाजेंहि मराठ्यांनीं लुटलीं. तेव्हां मोठ्या नामोशीनें कांहीं एक कार्यसिद्धि न होता मुआझिमला परत फिरावें लागलें. या संधीस फिरंग्यांनीं कारंजे अशेरी व सातारूस हीं ठिकाणें मराठ्यांपासून घेतलीं. म्हणून संभाजीराजे व शहाजादा अकबर यांनीं फिरंग्याचा कल्याणजवळील मुलुख उध्वस्त करून वसईस वेढा दिला. तेव्हां त्यांनीं तह केला. यापुढें तीन चार वर्षे कोंकणांत विशेष कांहीं घडलें नाहीं. आदिलशाही नामशेष झाल्यानें तिच्या ताब्यांतील कोंकण मोंगलांकडे आलें. संभाजीराजे यांच्या फिरंगी, हबशी व सावंत यांच्याशीं नेहमीं झटापटी होत असत. शेवटीं इ. स. १६८९ त शिरके यांनीं कांहीं गडबड केल्यामुळें ती मोडण्यास कलुशा संगमेश्वरास गेला असतां त्याच्या मदतीस म्हणून संभाजीराजे खेळण्याहून तेथें गेले त्यावेळीं शेख निजामानें त्यांनां दग्यानें पकडून औरंगझेबाकडे पाठविलें. संगमेश्वर येथें कलुशाचा वाडा होता. हल्लीं त्याचा नुसता चौथरा दृष्टीस पडतो. संभाजीराजांचा शेवट झाल्यानंतर मोंगलानें सात महिने वेढा देऊन शेवटीं फितुरीनें रायगड घेतला व येसुबाईसाहेब व शाहुराजे यांना औरंगझेबाकडे पाठविलें. यापुढें रायगडचें महत्व नाहींसें झालें तें झालेंच. या सुमारास औरंगझेबानें शिद्दीला कोंकणातील त्याच्या प्रांताची सनद करून दिली. शिद्यानें सुवर्णदुर्ग, अंजनवेल, राजपुरी व रायगड हे किल्ले इ. स. १६९९ च्या सुमारास घेतले. परंतु मराठ्यांचें आरमार या वेळीं प्रबळ झाल्यानें व त्याचा आरमाराधिपति कान्होजी आंग्रे हा असल्यानें त्यानीं शिद्याकडील बराचसा प्रांत परत मिळविला. आंग्र्यांचें मुख्य ठिकाण कुलाब्यास असून सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग हे त्याचे मुख्य सुभे होते. तेथें दारूगोळ्याची मुख्य कोठारें, आरमारी लष्कर, जहाजे बांधण्याच्या गोद्या वगैरे असत. या काळीं मराठ्यांचें आरमार सर्व आरमारांत प्रबळ असून यूरोपीय अगर मुसुलमानी कोणत्याहि व्यापारी गलबतास मराठ्यांना खंडणी दिल्याशिवाय किनाऱ्यावर फिरकता येत नसे; कान्होजीला हे यूरोपियन व मुसुलमान चळचळा कांपत असत. मोंगलाच्या ताब्यांतील प्रांतांत सामान्यतः जुलूम, पुंडाई व बेबंदशाही होती. इ. स. १६९० त काकाजी या पाळेगारानें तिकडे लुटालूट चालविली होती व शिद्दी हा इंग्रजांच्या मागें लागला होता. आणि औरंगझेबानें फिरंग्यांना पिच्छा पुरविला होता. परंतु पुढें त्याच्याकडून बंदुका घेण्याच्या अटीवर त्यानें तह केला. मराठे व फिरंगी यांचेंहि इ. स. १६९५ त कडाक्याचें युद्ध झालें. याच सुमारास ( विशेषतः इ. स. १६९७ सालीं ) कप्तान किड या नावाचा एक इंग्रज सर्व कोंकणभर चांचेगिरी करीत होता. तो अतिशय दुष्ट व जुलमी होता.

राजाराम महाराजानीं कोंकणांत सुव्यवस्था लावण्याचा प्रयत्न केला; परंतु शिद्दी व मोंगल यांच्या स्वाऱ्यांमुळें व देशांत स्वस्थता नसल्यानें त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. फिरंग्याच्या अंगीं स्वतःचा मुलुख सांभाळण्याची ताकद नव्हती. शिद्याला आपल्या प्रजेच्या हालअपेष्टाची दाद नसे. यामुळें त्याच्या प्रांतांत व्यापार मंदावला. त्यावेळचा एक उल्लेख असा आढळतो कीं, मुंबईहून निर्गत होणाऱ्या मालावर इंग्रज शें ५ टक्के, ठाण्यास फिरंगी शें. ८ टक्के व कल्याणास मोंगल आपल्या लहरीप्रमाणें वाटेल तशी जकात वसूल करीत. शाहू महाराज देशीं आल्यावर व चालून गेल्यावर ताराबाई या मालवणास जाऊन

होत्या. यावेळीं कान्होजी आंग्रे फार प्रबळ होता. त्यानें सर्व यूरोपियनाचा नक्षा पार उतरून टाकला होता. मुंबई ते सावंतवाडीपर्यंतचें सारें कोंकण त्याच्या ताब्यांत होतें तो प्रथम शाहूराजे याच्या विरुद्ध होता. परंतु पुढें इ. स.१७१२ त पेशव्यानीं त्या दोघाचा समेट करून दिला त्यावेळीं कान्होजीला सरखेल हा किताब व बराच सरंजाम मिळाला. लागलीच तो व बाळाजी विश्वनाथ यानीं मिळून शिद्दीवर स्वारी करून त्यानें बळकाविलेला सारा मुलुख सोडविला. इंग्रजानें कान्होजी विरुद्ध इ.स.१७१७च्या एप्रिलात विजयदुर्गास वेढा घातला. त्यावेळीं इंग्रजाचें आरमार.मोठें करोल होतें. त्यावर १४८ तोफा व व्हिक्टरी, रिव्हेंज, हंटर अशीं याच स्वारीसाठीं २ वर्षें खपून बाधलेलीं मजबूत लढाऊ जहाजें व सुसज्जित असें ६ हजार सैन्य होतें.परंतु कान्होजीनें त्याचा खरपूस समाचार घेतला. तेव्हां त्याच्या माऱ्यापुढें "नामोहरम होऊन (इंग्रजास) मुठींत नाक घेऊन आरमारासह मुंबईस परत यावें लागलें" (सरदेसाई मरा. रिया. मध्य विभा. पृ. ६५). पुढें पुन्हा प्रचंड तयारी करून फिरंग्याची मदत घेऊन इ. स. १७२१ त इंग्रज कुलाब्यावर चालून आला. "परंतु पूर्वीप्रमाणेंच त्यास याहि प्रसंगीं हार खावी लागली. कान्होजी आंग्रे जिवंत असेपर्यंत या पाश्चात्याचा शिरकाव पश्चिम किनाऱ्यावर झाला नाहीं" (कित्ता). स. १७२० सालीं मराठयाचें स्वराज्य दिल्लीकर मोंगलानें कबूल केल्यामुळें कोंकणचा समावेश स्वराज्यात झाला आणि त्यापुढें मुसलमानाची त्यावर सत्ता उरली नाहीं. मराठयांचे निरनिराळे अधिकारी कोंकणचे निरनिराळे सुभे पाडून त्यावर नेमण्यात आले. कोल्हापुर व सातारा या राज्याची वाटणी झाली. त्यात विजयदुर्गाच्या दक्षिणेकडील कोंकण कोल्हापुरकराच्या ताब्यास गेलें. कान्होजी आंग्रे यावेळीं वारला असल्यानें व त्याच्या मुलात तंटे सुरू झाल्यामुळें, त्याच्या प्रांतात अव्यवस्था माजली. इ. स १७३३ त मराठयांनीं शिद्दीवर स्वारी केली तेव्हा शिद्याचा व इंग्रजाचा दोस्तीचा तह झाला. एकंदर मराठी साम्राज्या विरुद्ध हा तह केला नव्हता. बाह्यात्कारीं मराठयापासून शिद्याचें संरक्षण करणें असा त्यात हेतु दर्शविला होता खरा; परंतु शिद्याच्या मुलुखातून गोमास विनहरकत आपणास मिळावें (कारण आसपासच्या हिंदुराजाच्या राज्यातून तें मिळणें अशक्य होतें) हा त्यात इंग्रजाचा अंतस्थ हेतु असावा. यानंतर शिद्याच्या घरात तंटे सुरू झाले. त्याचा फायदा घेऊन पेशव्यानीं रायगड, तळें, घोसाळें वगैरे गेलेला बराच मुलूख परत मिळविला. यावेळीं इतर शत्रू नाहींसे होऊन फक्त फिरंगी काय ते उरले होते; त्याना नामोहरम करून सर्व कोंकण मराठी साम्राज्याखालीं आणण्याची संधि आली होती व तिचा फायदा पेशव्यानीं घेतलाहि. फिरंग्यावर हल्ला करण्यास कारणेंहि भरपूर होतीं; ते मराठयाची वारंवार आगळीक करीत, आंग्र्याच्या घरगुती भांडणांत हात घालीत आणि सर्वांत महत्वाचें कारण म्हणजे आपल्या ताब्यातील व मराठी हद्दींतील हिंदुलोकावर जुलूम करून त्याना बाटवीत, आणि गावाची जाळपोळ व लुटालूट करीत. या सर्व कारणामुळें पेशव्यांनीं त्यांची खोड मोडण्याच्या प्रयत्नास यावेळीं हात घातला. इ. स. १७३९ पूर्वी ८।१० वर्षे मराठी दरबारात फिरंग्यापासून वसई व साष्टी प्रांत काबीज करण्याचे खलबत चालू होतें, असें उपलब्ध पुराव्यावरून दिसतें रा. ब. पु बा. जोशी आपल्या लेखात म्हणतात. की, "मालाड परगण्याचे सरदेसाई व सरदेशमुख अंताजी रघुनाथ कावळे यानीं फिरंग्यांचा धर्मच्छलाचें गाऱ्हाणें थेट पेशवे व शाहुमहाराज याच्या कानीं घातलें होतें. वसई प्रांत काबीज केल्यास आपण मदत करण्यास तयार आहों, असें या कावळ्यांनीं थोरल्या बाजीरावसाहेबाना कबूल केलें होतें. स. १७२९ सालीं श्रीमंतानीं अंताजीपंताशीं खलबत सुरू केलें. पुढें चिमाजी आप्पांनीं अंताजीस कळविलें कीं "अवघा प्रसंग तुम्हीं आणून दिला आहे कार्येहि कर्तव्य आहेच आहे." परंतु त्या वेळीं श्रीमंत दुसरीकडे गुंतल्यानें हें काम झालें नाहीं; तें १७३७ त फुरसत सापडल्यावर त्यानीं हातीं घेतलें." त्या वर्षी आप्पासाहेब यानीं साष्टींवर स्वारी करून घोडबंदर व वसईची खाडी काबीज करून ठाणेंहि घेतलें. तेव्हा मराठे हे मुंबईवरहि चालून येतील अशी भीति वाटून इंग्रजानीं फिरंग्याच्या अनुमतीनें वाद्याचा किल्ला पाडला. त्यानीं फिरंग्यास दारूगोळ्याची व सैन्याचीहि मदत केली. परंतु मराठयापुढें तिचा उपयोग झाला नाहीं. पुढें १७३९ चे जानेवारींत आप्पासाहेब हे सेनापति होऊन फिरंग्यावर चालून आले.व त्यानीं.एका सपाटयात डहाणू, केळवे, शिरगाव, तारापुर, खत्तलवाडा हीं ठाणीं किल्ल्यासुद्धां जिंकलीं तें पाहून वेसावा व धारावी येथील किल्लेदारानीं शरण येऊन ते किल्ले आप्पासाहेबांच्या हवालीं केले. या वेळीं उत्तरेस नादिरशहावर चालून जाण्यास श्री. नानासाहेबानीं आप्पाना बोलाविलें होतें; परंतु त्यानीं इकडे वसईस वेढा दिला असल्यानें ते तिकडे गेले नाहींत; मध्यें वेढा १७ फेब्रुवारी १७३९ स बसला. तेव्हा फिरंग्यानें इंग्रजांची मदत मागितली, परंतु मदत पाठविण्यास इंग्रजाची छाती झाली नाहीं. समुद्राकडील बाजू मानाजी आंग्र्यानें रोंखून धरली व जमीनीवरून सर्व बाजूनें आप्पांचा वेढा बसला त्यामुळें फिरंग्याची उपासमार होऊन त्यानीं किल्ला १६ मे रोजीं मराठयाच्या हवालीं केला. तेव्हा मुंबईचा इंग्रज फार भ्याला व त्यानें आपले वकील कॅ. गॉर्डन यास शाहुमहाराजाकडे व कॅ. इंचबर्ड याला चिमाजीआप्पाकडे स्नेहयाचना करण्यास पाठविलें. त्यावेळीं तह होऊन असें ठरलें कीं, इंग्रजानें फिरंग्यास मदत करूं नये. मराठयांस दारुगोळ्याचा पुरवठा करावा; त्याच्या गलबतास मोहीम व वार्दे येथील दर्यांत विनहरकत येऊं यावं वगैरे. मराठयानीं या वेळीं इंग्र

तारापूर व वसई येथील किल्ल्याची डागडुजी करून केळवें येथें नवीन किल्ला बांधला. येथून फिरंग्याची उत्तर कोंकणांतील सर्व सत्ता मावळली. पुढल्याच वर्षी ( १७४० ) मानाजी आंग्र्यानें त्याच्या आरमाराचा नाश केला व इ.स.१७४१ त खंडोजी माणकरानें चौल घेतलें, तेव्हां सारा फिरंगी गोव्यास पळून गेला. बहुतेक सर्व कोंकण ( शिद्दी व जव्हारकर सोडून ) मराठ्याच्या ताब्यात आलें शिद्याचा प्रांत अगदींच थोडा होता व जव्हारकराचा सारा डोंगराळ होता म्हणून मराठ्यानीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. यापुढील काळ शांततेचा व भरभराटीचा गेला मराठ्यानीं प्रजेच्या संरक्षणाची चांगली व्यवस्था ठेविली होती (बॉबे ग्या. पृ.९७व्हॉ. १भा. २). फिरंग्यानीं ज्याप्रमाणें हिंदूंचा धार्मिक छळ केला, त्याप्रमाणें मराठ्यानीं मुसुलमान व खिस्ती प्रजेचा छळ केला नाहीं. एवढेंच नव्हे तर उलट त्यांच्या देवस्थानांना इनामेंहि दिलीं. याबद्दल इंग्रज इतिहासकारानीं प्रशंसोद्गार काढले आहेत. पुढें इ. स. १७६० त रामाजीपंत ( कोंकणचे ) सर सुभेदार यानीं फिरंग्याच्या मदतीनें जंजिऱ्यास वेढा दिला, तेव्हा इंग्रजानें शिद्यास मदत केली, इतक्यात पानिपत झाल्यामुळें पंतानीं वेढा उठविला. इ स १७६६ मध्यें इंग्रजानें साष्टी वगैरे बेटें घेण्याचा प्रयत्न चालविला, परंतु थोरल्या माधवरावाच्या अखेरपर्यंत त्याच्या हुशारीमुळें तो सफल झाला नाहीं. इंग्रजानें १७७१ मध्यें पुण्यास वकील पाठवून, मुंबईला धान्य पुरवण्याकरिता साष्टी बेट व कंपनीची जहाजें बांधण्याच्या कामास लाकूड पाहिजे म्हणून वसई आम्हास द्यावी असें बोलणें लाविलें. पण तें चार वर्षे तसेंच लोंबकळत राहिलें. इ.स. १७७४ त फिरंग्यानीं साष्टी घेण्यासाठीं मोठी तयारी केली. तेव्हा मुंबईजवळ दुसरे कोणीहि युरोपियन राहूं नयेत म्हणून इंग्रजानें ६०० गोरे व १२०० हिंदी सैन्य ठाणें किल्ल्यावर पाठविलें. किल्ल्यात मराठे फक्त ५०० च होते पण त्यानीं इंग्रजाचे १०० गोरे पहिल्याच दिवशीं ठार केले व निकराची लढाई दिली. अखेर कांहीं दिवसानीं उपासमारीनें त्यानीं किल्ला सोडला. थोड्या काळानें वेसाव्याचा किल्लाहि इंग्रजानें घेतला. पुढें तर रघुनाथराव दादा यानीं माऊबंदकी माजवून १७७५ च्या मार्चांत सुरतेच्या तहान्वयें वसई व साष्टी इंग्रजास देऊन टाकिलीं परंतु पुन्हा १७८२ त सालबाईच्या तहाप्रमाणें साष्टी, घारापुरी व करंजा याशिवाय वसई आदिकरून सर्व प्रांत इंग्रजानें मराठ्याना परत दिला मध्यंतरी १७७६ त सोतयाचें बंड माजलें. तो रत्नागिरीच्या किल्ल्यांतून सुटून मोठ्या सैन्यानिशीं कोंकणातील २० किल्ले हस्तगत करून बोरघाट्यावर आला. तेथें कारभाऱ्यानीं पाठविलेल्या सैन्यानें त्याचा पराभव केला तेव्हा तो पळून गेला. त्याला मिळण्यासाठीं दादासाहेब हे सुरतेहून निघाले. परंतु वरील बातमी समजताच ते तारापुरावरून दर्यानें मुंबईस गेले. पुढें १७७८ त इंग्रजानीं दादासाहेबाचा पक्ष घेऊन त्यांच्याकडून वसई व मांदेरी उपटली व ते पुण्यावर चालून गेले, परंतु त्याचा वडगावास पुरा मोड झाला. अखेर हो नाहीं कारिता करता सालबाईच्या तहांत वर सांगितल्याप्रमाणें इंग्रजास वसई प्रांत ओंकावा लागला. यापुढें सुमारें २१ वर्षे कोंकणच्या राज्यकारभारांत फरक झाला नाहीं. जव्हारकराचा बराचसा मुलूख मान मराठ्यानीं घेतला. विशाळगडास बंड झाल्यानें सन१७७७ त कोल्हापूरकरानीं मालवण घेतलें. वाडीकरावर १७८३ त स्वारी केली. पुढें सन १७८६ त कोंकणात (कोल्हापुरकराच्या प्रांतात ) बंड उद्भवल्यानें कोल्हापूरकरानीं वेंगुर्लें, निवती, विशाळगड इत्यादि ठिकाणावर हल्ले केले. तेव्हां सावंतानें फिरंग्याची मदत घेऊन वेंगुर्लें व निवती हीं गावें परत मिळविलीं; आणि शिद्याच्या मध्यस्थीनें इतर प्रांतहि परत मिळविला. यानंतर इसवी सन १८०३–१२ पर्यंत सावंत व कोल्हापूरकर यांच्यात नेहमीं कटकटी चालू होत्या. पुढें.१८१२ त कोल्हापूरकर व पेशवे यांच्यामध्यें झालेल्या तहाचा फायदा घेऊन इंग्रजानें कोल्हापूरकराकडून मालवण व सावंताकडून वेंगुर्लें घेऊन तेथें आपली फौज ठेविली. तथापि त्या मुलुखाच्या वसुलावर पेशवे, कोल्हापूरकर, सावंत, बावडेकर यांचे निरनिराळे हक्क होते इकडे१८०२ मध्यें होळकरानें पुण्यावर स्वारी केल्यानें रावबाजी हे महाडास व तेथून चौलास आणि तेथून इंग्रजाच्या मदतीनें वसईस गेले. ते तेथें गेल्याबरोबर इंग्रजानें कर्नल क्लोज व एल्फिन्स्टन याना तेथें पाठवून श्रीमंताशीं तह केला ( ३१ दिसेंबर १८०२ ). या तहानेंच श्रीमंताचे स्वातंत्र्य नष्ट झालें. मात्र या तहानें कोंकणच्या वाटणींत फरक झाला नाहीं इ स १८१७ त कोंकणात पेंढाऱ्याचा दंगा उसळला या वर्षांच्या जूनमध्यें पेशव्याचा व इंग्रजाचा तह होऊन त्या तहान्वयें इंग्रजास सर्व उत्तर कोंकण मिळालें पावसाळ्यानंतर रावबाजीनीं कोळी–भिल्ल-रामोशाकरवीं कल्याणावर हल्ला करवून बोरघाट घेतला व सह्याद्रींतील सर्व घाट रोखले. त्यामुळें पुण्याच्या ( रेसिडेंट ) इंग्रजाला मुंबईस बातमी पाठविणें ती बाणकोट वरून पाठवावी लागे रावबाजीनीं पुढें कोथळा घेतला, परंतु इंग्रजानें तो व अवचितगडादि इतर किल्ले घेतले याच सुमारास पंतसचिव हे इंग्रजाला शरण गेले ता. १० मे १८१८ रोजीं रायगड पडला व सर्वत्र अखेर कोंकण इंग्रजानें घेतलें. चिमाजीआप्पा हे त्याच्या हातीं लागले त्यास त्यानीं वसई, ठाणें येथें प्रथम ठेवून नंतर काशीस रवाना केलें पेशवाई गेल्यावर इंग्रजानें पेशव्याच्या मांडलिक संस्थानाशीं ( कोंकणातील ) स्वतंत्रपणें तह करून त्याचे हक्क निश्चित केले. सावंतवाडीकरापासून मालवण ते पोर्तुगीज सरहद्दी पर्यंतचा प्रांत घेतला इ. स १८२२ त आंग्रे हे मांडलिक बनले,परंतु १८४० त संस्थानिक निपुत्रिक वारल्यामुळें त्याचें संस्थान खालसा केलें. याप्रमाणें यावेळीं सर्व कों- ज्ञानीं हस्तगत केलें.

**उत्तर कोंकणांतील लोकवस्ती.**—रा. ब. पु. बा. जोशी आपल्या लेखांत म्हणतात "या भागांत मूळचे रहिवासी म्हणजे आगरी, कोळी ( डोंगरी व दर्यावर्दी ), वारली, कातकरी व ठाकूर हे होत. कुणब्यांत वैरी, कोंकणी, मराठे व चौशेळे हे जुने आहेत. पूर्वी सांगितल्याप्रमाणें कोंकणावर मौर्य, क्षत्रप, आंध्रभृत्य, पश्चिमचालुक्य, राष्ट्रकूट, उत्तर चालुक्य, शिलाहार, यादव वगैरे राजघराणीं झालीं; तेव्हां या प्रत्येक घराण्याबरोबर महाराष्ट्र, गुजराथ व मद्रास इकडील लोकहि कोंकणांत आले. इ. स. १३४० त मुसुलमानी सत्ता झाल्यावर गुजराथेंतून बरेचसे मुसुलमान खालीं उतरले; तत्पूर्वी थोडे फार अरब आले होते. या अर्वाचीन मुसुलमानांना कोंकणी मुसुलमान असें म्हणतात, ते मराठीच बोलतात. सातव्या शतकांत इराणच्या यझ्दगर्द राजाचा पराभव अरबांनी केल्यामुळें. तेथील पारशी लोक संजाण, तारापुर, ठाणें, नवसारी इकडे येऊन राहिले. नंतर फिरंगी आले व त्यांनीं आपली संख्या हिंदूंना बाटवून जास्त वाढविली. कोंकणांत पूर्वी कानडी भाषा बोलली जात असे. शिलाहार हे मूळचे द्रविड देशांतील असल्यानें त्यांच्या संसर्गानें कानडी भाषा इकडे आली असावी यांच्या वेळेस कांहीं कायस्थ प्रभूंची वस्ती इकडे झाल्याचें प्राचीन लेखांवरून आढळतें. ब्राम्हणांत सामवेदी व गोवर्धन हे प्राचीन रहिवासी होत; चित्पावन. सोपाऱ्याकडील कांहीं इनाम जमिनी शातवाहनांनीं या ब्राह्मणांना दान केल्या होत्या. त्यांचे पुरोहित कात्यायनसूत्री शुक्लयजुर्वेदी होते. यादव राजवटींत माध्यंदिन यजुर्वेदी ब्राह्मण, सोमवंशी क्षत्रिय व पाठारे प्रभु हे इकडे आले देवगिरीकर या नांवाचे यजुर्वेदी ब्राह्मण पुरोहित असत. इ. स. १२८० च्या सुमारास कृष्ण नांवाचा यजुर्वेदी ब्राम्हण उत्तरकोंकणचा महाप्रधान ( गव्हर्नर ) असल्याचें मागें सांगितलेंच आहे. पुढें भीमदेवानें माहीमकडे स्वतंत्र सत्ता स्थापिली. तेव्हां पुरुषोत्तम कावळे हा यजुर्वेदी ब्राह्मण पुरोहित इकडे आला होता; त्याच्या बरोबर आलेल्या ब्राह्मणाचेच वंशज हल्लींच्या मुंबई बेटांत आढळणारे यजुर्वेदी ब्राह्मण होत. इ. स. १७३१ तील अंताजी रघुनाथ हा वरील कावळे घराण्यांतील होय. यानें पेशव्यांना मदत केल्यानें त्याची मालाडची जहागीर फिरंग्यानें जप्त केली होती. पुढें पेशव्यांनीं ती त्याला दिली नाहीं असें म्हणतात. यानंतर पळशीकर ब्राह्मण व कोंकणस्थ ब्राह्मण यांच्यांत अग्निहोत्रासंबंधीं भांडणें सुरू झालें व पेशव्यांनीं तो तंटा निकालासाठीं नाशिकास पाठविला असतां तेथें पळशीकरांतर्फे निकाल झाला. परंतु पळशीकरांच्या अन्यायी लोकांना शिक्षा न झाल्यामुळें ते मुंबईस इंग्रजांच्या आश्रयास गेले. या कालापासून वसई व साष्टी प्रांतीं राहणाऱ्या पळशीकरांना पळशे या नांवानें त्यांचे प्रतिस्पर्धी लोक संबोधूं लागले. हे सर्व लोक माध्यंदिन शाखी शुक्लयजुर्वेदी असून त्यांच्याकडे उत्तर कोंकणांतील ज्योतिष व पौरोहित्य वंशपरंपरेनें चालू आहे. सोमवंशी क्षत्रियांचे पूर्वज हे भीमदेव यादवाबरोबर आलेल्या मूळच्या देवगिरी (पैठण) प्रांतांतून इकडे आले. यांना पाचकळशी असेंहि एक नांव आहे. हें नांव लग्नांत वराच्या चौरंगास असलेल्या पाच कळसांवरून निघालें असें कांहीं म्हणतात परंतु हें नांव पंचकुल-वंशी या शब्दद्वयापासून साधलें गेलें असावें. असें रा. ब. पु. बा. जोशी हे म्हणतात. प्राचीन काळीं क्षत्रियराजांच्या दरबारांत निरनिराळ्या खात्याचे पाच प्रधान असत. त्यानाच पंचकुळ म्हणत. या लोकांची वस्ती मुंबई, साष्टी, वसई, माहीम, उरण इकडे फार असून त्यांच्यांत वसईकर, साष्टीकर, उरणकर असे अनेक पोटभेद पडले आहेत. यांच्या प्रमाणेंच पाठारे प्रभु लोकांचीहि वस्ती मुंबई, माहीम साष्टी, ठाणें, वसई इकडे आढळते. यांना पाताणे किंवा पैठणीप्रभु असेंहि म्हणतात. पाठारे हें नांव जातिवाचक नसून ( रा. ब. पु. बा. जोशी यांच्या मतें ) जातिसूचक असावें. पाठारे हा शब्द प्रतिहार या संस्कृत शब्दापासून निघाला आहे ( प्रतिहार = पडिहार = पाठारा ). पुराणांतरीं प्रतिहार शब्द परिहार—परिहर असा आढळतो. प्राचीन इतिहासांतील प्रतिहार राजे पराक्रमी असून त्यांचीं चार घराणीं होतीं. पैकीं कनोजचें घराणें मुख्य होतें. त्या घराण्याचा संस्थापक नागभट्ट असून त्यानें इ. स.च्या ९ व्या शतकांत हर्षाच्या चक्रायुध नांवाच्या वंशजाचा पराभव करून आपली सत्ता स्थापिली या घराण्यांतील महेंद्रपाल हा फार पराक्रमी राजा झाला होता. त्याच्या पदरीं राजशेखर कवि होता, हा महाराष्ट्रीय यजुर्वेदी ब्राह्मण होता. या घराण्यांतील शेवटचा राजा राज्यपाल. याचा गझनीकर महंमदानें १०१८ त पराभव केला व राजधानींतील लोकांची कत्तल केली, त्यावेळीं तेथील प्रजा पळाली. बहुधा याच सुमारास प्रतिहार किंवा पाठारे यांचे पूर्वज कनोजहून देवगिरीकर यादवांच्या आश्रयास पैठणप्रांतीं आले असावेत पाताणे हा पैठणे या शब्दाचा अपभ्रंश होय ( असें रा. ब. जोशी म्हणतात. ). सह्याद्रिखंडांतहि "पैठणे पत्तनें शप्ता मया कोपवशात्किल । पाठारीयाः प्रसिद्धा ये पैठणाह्वया भवंतु ते॥" असा उल्लेख आहे. पाताण्याबरोबर पैठणहून आलेल्या कावळे आदिकरून यजुर्वेद्यांनाहि पैठणकर म्हणत असत. गोव्याच्या सुभेदाराचा मुलगा बहादुर गेलानी यानें स. १४५० त साष्टीकडील कांहीं ब्राह्मणास ज्या सनदा दिल्या आहेत त्यांत त्यांना पैठणकर असेंच म्हटलें आहे. कोणी असें म्हणतात कीं, पाठारे हे गुजराथेंतून आले असावेत. परंतु हें म्हणणें टिकण्यासारखें नाहीं कारण त्यास सबळ आधार नाहीं." (या लेखांत रा. ब. पु. बा. जोशी यांनीं आमच्याकडे पाठविलेल्या लेखांतील घेतलेला भाग अवतरणचिन्हांकित आहे. )

[संदर्भग्रंथः—वि. ज्ञा. वि. पु. २१. अं. १-२; पु. २३.पृ.९५. वृद्धसं.; राजतरं. रघुवंश, महावंशो, भारतवर्षीय भूगोल,

शिकंदरी भाषांतर; कौस्तुभचिंतामणि, मराठे व इंग्रज, इफ, एशि. रिसर्चेस. व्हॉ. १५; हीरेन-व्हॉ. २; टॉड-पृ. १८७, स्मिथ-व्हॉ. १-२; बॉम्बे ग्याझे. व्हॉ. १३, १४, आणि १६; भा. २, ३; एलफिन्स्टन-१६६, रॉबर्टसन-३८; वर्ड-हिस्टरी गुजराथ; इंपी ग्याझे. व्हॉ. १५; इलिअट. व्हॉ. १, ७; यूल-क्याथे. १: जॉन्हिन-कोंकण; ब्रिग्ज-व्हॉ. २, ३, ४; रासमाला-१; अर्स्किन व्हॉ. २; सदर अदालत रिपोर्ट १८२५; केर-व्हॉ. ८: इंग, १; ओर्मे; एचिसन, ट्रीटीज-फॉरेस्ट सिलेक्शन्स. व्हॉ १. भा. १, २, ३; डॉ. जोशी-अर्ली हिस्टरी. बॉम्बे, एड्वर्ड्स-राइज ऑफ बॉम्बे, आर्कि-आलॉ. सर्व्हे रिपोर्ट व्हॉ. ३, ९, इंडि. अँटि. व्हॉ. ५, ७, ८; फ्लीट. डिनॅस्टिज्-कानडी; फॉरेस्ट-ऑफि. रायटिंग्ज ].

**कोंकणपुर**—हुएनत्संग या शहरीं गेला होता. त्यानें हें शहर द्रविडदेशापासून १६६ कोसावर असल्याचें लिहिलें आहे. त्यावरून तें तुंगभद्राकांठचें अनागोंदी असावें असें एक मत आहे व दुसरें मत, तें हल्लींचें बनवासी असावें असें आहे. विजयानगरचें राज्य स्थापण्यापूर्वी अनागोंदी ही यादवराजाची राजधानी होती. कोंकणप्रांताची ही राजधानी हुएनत्संगच्या वेळीं होती व त्यावेळीं कोंकणप्रांतहि ( हल्लीच्या पेक्षां जास्त ) मोठा होता ( कोंकण पहा ). अनागोंदी हीच किष्किंधा असावी हें एक प्राचीन समज आहे [ भार. भुवन; विल्क्स-म्हैसूर १. १४ ].

**कोंकणस्थ वैश्य**, इ ति हा स.—वैश्यसमाज हा वैदिक त्रैवर्णिकापैकीं एक आहे. या समाजाची मूळ वस्ती गोदा-वरीतीरीं मुंगीपैठण येथें होती. दुर्गादेवीच्या दुष्काळामध्यें या समाजाची पांगापांग होऊन निरनिराळ्या घाटांनीं हे लोक कोंकणात उतरले आणि त्यावरून त्यांना " कोंकणस्थ वैश्य " असें म्हणतात. महाराष्ट्रांत हल्लीं " वैश्य " या नांवानें संबोधिले जाणारे पुष्कळ समाज आहेत. त्यांतील पटुनेकांचा आज आपापसांत रोटीबेटीव्यवहारहि नाहीं. कोंकणात जे दोन प्रमुख व्यापारी वैश्य-समाज आहेत. त्यापैकीं प्रस्तुत समाज हा एक होय. हा समाज प्रथम रत्नागिरी जिल्ह्यांतील प्रभानवल्ली व संगमेश्वर या दोन ठिकाणीं उतरला आणि नंतर रत्नागिरी व कुलाबा या दोन जिल्ह्यांत व करवीर संस्थानांत पसरला अशी माहिती मिळते. हल्लीं कुलाबा जिल्ह्यांतील महाड, माणगांव, रोहें व अलिबाग या तालुक्यांत, रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली, खेड, चिपळूण, संगमेश्वर व राजापूर या तालुक्यांत आणि करवीर संस्थानांत कोल्हापूर व मलकापूर या ठिकाणीं या समाजाचा बराच भरणा आहे. सुमारें पाउणशें वर्षांपूर्वी या समाजाचे लोक मुंबईस आले व तेथेंहि १० हजारावर त्यांची वस्ती आहे. एकंदर सर्व कोंकणस्थ वैश्यसमाजाची लोकसंख्या एकलक्षावर आहे.

आजकाल महाराष्ट्रांत जे इतर पांढरपेशे समाज आहेत त्यांचा कित्येक वर्षांपासूनचा इतिहास उपलब्ध आहे त्या प्रमाणें प्रस्तुत समाजाचा पूर्वकालीन सार्यंत इतिहास पूर्ण स्वरूपांत नाहीं. याला अनेक कारणें आहेत. मुख्य कारण एवढेंच सांगतां येईल कीं ब्राह्मण, सारस्वत, प्रभु इत्यादि समाजाचा ऐतिहासिक कालांत राजकारणाशीं प्रत्यक्ष संबंध आला. पण हा समाज व्यापारी वर्ग असून या समाजाचा व्यापाराबाहेर फारसा संबंध आला नाहीं आणि त्यामुळें वरील समाजाप्रमाणें या समाजाचा सार्यंत इतिहास टिकणें शक्य झालें नाहीं. तरीपण मुसलमानी अमदानींत, अव्वल मराठेशाहींत व पेशवाईंत हा समाज जिवंत स्वरूपांत व भरभराटींत होता यावद्दल कागदोपत्रीं आधार आहेत. विजापूरच्या दरबारांतून मुसुलमानी अमदानींत मिळालेल्या सनदा, शिवाजीच्या वेळीं व अव्वल पेशवाईच्या वेळीं निर-निराळ्या शेट्ये घराण्यांना मिळालेल्या शेटकीच्या सनदा त्या त्या घराण्यांत आज अस्तित्वांत आहेत. विशालगड संस्थानापैकीं वायकूळ घराण्याच्या जुन्या दप्तरांत अजूनहि पुष्कळ सनदा आहेत.

कोंकणांत या समाजाचा साधारण जम बसल्यावर समा-जातील कित्येक प्रमुख पुढाऱ्यांना मुख्य मुख्य ठिकाणीं पेठ वसवून तेथें जलमार्गानें व खुष्कीच्या मार्गानें येणाऱ्या माला-वर कर बसविण्याच्या सरकारांतून सनदा मिळाल्या. या करास " शेटकी " म्हणतात. आणि हा हक्क ज्यांना मिळाला त्यांना आज शेट्ये या नांवानें ओळखतात. ह्याप्रमाणें महाड, खेड, चिपळूण, रत्नागिरी, संगमेश्वर राजापूर वगैरे ठिकाणीं मोठमोठ्या पेठा वसून खुष्कीनें व जलमार्गानें निर-निराळ्या प्रांताशीं दळणवळण सुरू झालें. या ठिकाणचा बराच व्यापार पुष्कळ वर्षें वैश्यांच्याच हातात होता. रेल्वे सुरू झाल्यापासून घाटावरील माल पहिल्याप्रमाणें कोंकणांत उतरेनासा झाला व गुजराथ मारवाड येथील व्यापारी कोंक-णांत शिरले त्यामुळें या समाजाचा कित्येक वर्षें असलेला व्यापार आज मंदावला आहे. तथापि अद्यापहि महाड, चिपळूण, रत्नागिरी, खेड, संगमेश्वर राजापूर या ठिकाणीं कित्येक प्रमुख व्यापारी वैश्यच आहेत.

मुंबईमध्यें आल्यावर प्रथम छापखाना व तंबाखू या दोन व्यापारामध्यें या समाजातील कांहीं लोक पडून त्यांत ते चांगले नावारूपास आले. देवळेकर, हेगिष्टे, खातु, मापु-स्कर यांचे छापखाने चांगल्या भरभराटींत आले होते व त्यांनीं संस्कृत भाषेतील अनेक जुने ग्रंथ छापून वाङ्मयाची चिरकाल टिकणारी अशी सेवा बजावली आहे. त्यांचे एजंट काशी, प्रयाग, दिल्ली, लखनौ, कराची, अहमदाबाद, वऱ्हाड, नागपूर, खानदेश, गोकर्ण, महाबळेश्वर, निजाम हैद्राबाद, वगैरे ठिकाणीं पसरलेले होते. दुसऱ्या कित्येक मंडळींच्या तंबाखूच्या वखारी उत्तम प्रकारें चालल्या होत्या. कित्येक लोक कमिशन एजंटच्या धंद्यांत पडले होते. साम्प्रतहि या सर्व धंद्यांस हे लोक चिकटून आहेत. पान, तंबाखू,

टेंभुरणीचीं पानें, किराणा माल व कापड या धंद्यांत बरेच लोक आहेत.

सारांश कृषि, गोरक्षा, वाणिज्य ही जी वैश्यवर्गाचीं विविध कर्तव्यें आहेत तीं अद्याप या समाजाचीं सुटलीं नाहींत.कोंकणात या समाजातील सर्वच लोक प्राधान्यानें शेतकी, गोरक्षण आणि व्यापार करीत आहेत. जिनिंग प्रेस, तांदुळाच्या गिरणी वगैरे धंदे ज्ञातींतील सधन गृहस्थांनीं चालविले आहेत मुंबई, अहमदाबाद, हैद्राबाद वगैरे ठिकाणीं मुकतेलरचा धंदा करणारे देवाल काहीं वैश्य आहेत. शिवाय सरकारदरबारी मोठमोठ्या हुद्यावर या समाजातील कित्येक मंडळी चढली आहेत. इतर सार्वजनिक कार्यांत भाग घेणारेहि या समाजात आहेत. तसेंच ग्रंथकार व लेखक वगैरेहि आहेत.

कोंकणस्थ वैश्य समाजात मुंबईत कोंकणस्थ वैश्यजाति फंड, वैश्यविद्यावर्धक समाज, वैश्य संघ इत्यादि संस्था आज वैश्य समाजाच्या उन्नतीकरिता झटत आहेत. बाहेर गांवींहि अशा अनेक संस्था आहेत कोंकणस्थ वैश्यज्ञातिफंड हा सन १८८७ मध्यें स्थापन होऊन आजपर्यंत शक्त्यनुसार समाजसेवा बजावीत आहे या फंडातून लग्नकार्यादि शुभ कार्यांकरिता महाजनवाडी, और्ध्वदेहिक कार्याकरिता धर्मशाळा मुंबईत उघडल्या असून एक दत्तमंदिर बांधलें आहे फंड एक लाखाच्या घर आहे.' वैश्य विद्यावर्धक समाज' सन १९०४ या सालीं स्थापन झाला व विद्यार्थ्यांस शिष्यवृत्या देऊन शिक्षणासारखें पवित्र काम समाज करीत आहे. ' वैश्य विद्यार्थी संघ ' ही संस्था सन १९१७ सालीं स्थापन होऊन विद्यार्थ्यांची सर्वतोपरी उन्नति करण्याकरिता अविश्रांत काम करीत आहे. शिवाय मुंबई येथें कों वैश्य ज्ञातिफंडाचें एक 'मोफत वाचनालय ,' माखजण येथें वैश्य मंडळींचें ' श्रीराम वाचनालय, ' रत्नागिरी येथें ' बकुल ' नावाचें एक साप्ताहिक पत्र, मुंबई येथें ' वैश्य मासिक ' व ' वैश्य-धर्मोन्नति-माळा ' वगैरे सुरू आहेत, कुलाबा जिल्ह्यात वासवणें येथें वैश्य विद्याश्रम नांवाचें विद्यालय ज्ञातीनें चालविलें आहे.

मुंबई येथें कों वैश्य समाजाची एक पंचायत सभा आहे. या सभेकडून ज्ञातिविषयक बिस्येक गोष्टींचा निकाल देण्यात येतो व तो बहुश. समाजाकडून पाळण्यातहि येतो बाहेरगांवीं कोंकणात याच पद्धतीवर समाजविषयक काम चालत असतें. गांवोगांव पंचायती असून तालुक्यावारी देवदवे, महाजन असतात व त्यांच्याकडून झालेल्या निकालास सामान्यतः सर्व समाजाकडून मान देण्यात येतो.

सर्वसाधारणत. अशा प्रकारची कोंकणस्थ वैश्य समाजाची आज स्थिति आहे. विज्ञानाच्या बाबतींत दिवसेंदिवस प्रगतीच होत चालली आहे. निरनिराळ्या भागांतल एकमेकांकडे मंडळींच्या मनाची प्रवृत्ति होत असून त्याप्रमाणें औद्योगिक उन्नतीचे प्रयत्न होत आहेत. धार्मिकोन्नतीचा प्रवाहि ज्ञातींतील प्रमुख ऐक्यानें ज्ञाती पंतळा आहून त्या दृष्टीनें सक्य ते प्रयत्न चाललेले आहेत. [ बाळकृष्ण अनंत बेंडे यांजकडून आलेल्या माहितीवरून. ]

**कोंकणी**—हें प्रादेशिक नाव आहे. कोंकणातून आलेले ते कोंकणी. गुरव, कलावंत व गान, सारवे, न्हावी, शिंपी, गवळी, कुंभार, कुणबी, सुतार, लोहार, सोनार, चांभार, कोळी, यासारख्या जातींतून कोंकणी आहेत. या जातीची विशेष वस्ती मुंबई-कानडा जिल्ह्यात आहे. गुजराथेंतहि हे लोक आहेत.त्याना कोंकणी असें म्हणतात. सुरत जिल्ह्याच्या दक्षिण भागात व धरमपूर आणि वांडा संस्थानात या लोकांची मुख्यत. वस्ती असून १९०१ सालीं त्यांची संख्या ७०,६७८ होती. ठाण्याच्या वार्ली लोकांप्रमाणें ही जात दिसते.नावावरून ते कोंकणातून आले असावे हें उघड आहे. शिवाय त्यांच्या भाषेंत गुजराथी व मराठीचें मिश्रणहि आढळून येतें इ. स. १३९६-१४०८ सालात पडलेल्या दुर्गादेवीच्या दुष्काळामुळे त्याना उत्तरेकडे जाणें प्राप्त झालें असें म्हणतात

बहुपत्नीत्वाची चाल त्यांच्यात असून विधवाविवाहहि रूढ आहे लग्न ठरविताना उभय पक्षाकडून सुरापान केलें जातें व देणग्याहि दिल्या जातात. हुंड्याची रक्कम ८ किंवा १० रुपयापेक्षा जास्त नसते.लग्नापूर्वी वधूवराना त्या त्या वेळेप्रमाणें व प्रसंगाप्रमाणें मिरवीत नेण्याची चाल असल्याचें आढळून येतें. लग्नात त्यांना एका बैठकीवर बसवितात व त्यावेळीं एक स्त्री त्याच्या पदरास गांठ मारते. परस्परांनीं नांवें घेतल्यानंतर ती सोडण्यात येते. लग्नानंतर भात, रोटी व दारू यांची मेजवानी वधूच्या बापानें द्यावी अशी पद्धत आहे.

ब्रह्मा व वाघदेव यांची कोंकणी लोक पूजा करतात एखाद्या शमी वृक्षाजवळ ब्रह्मा नावाच्या देवाची स्थापना केलेली असते. एका लाकडी खांबावर वाघाचें चित्र कोरलेलें असतें व त्यावर शेंदूर फासतात. कोंकणी लोकांस ब्राह्मण उपाध्याय लागत नाहीं.

मृतास स्नान घालून नंतर त्यास स्मशानाकडे नेतात. प्रेतसंस्कार केल्यानंतर नदींत स्नान करून नंतर घरीं येऊन दारू पिण्याची त्यांची वहिवाट आहे. मृताची रास भरून चौथ्या दिवशीं आप्तास जेवण घालतात व वर्ष अखेरीस मृताची रौप्य मूर्ति करून तिच्यापुढें दीप लावतात.

हे लोक मजुरी करतात व शेतीहि करतात. ज्याना शेतीकरता बैल घेण्याचीहि ऐपत नसेल असे कोंकणी स्वतःच नांगर ओढतात व अशा लोकाना ' हायोडिया ' असें म्हणतात. महाराष्ट्रातील कोंकणी लोकात गोमातवी कोंकणी म्हणून एक वर्ग आहे. त्यांची वस्ती विशेषेंकरून मुंबई शहरात आढळते.

टा गॅ.—ठाणें जिल्ह्यांतील कोंकणी गर्भारपणचा डोंगरी किंवा रामाण्याकरितां आपले पूर्वज कोंकणांतून या भागांत आले असें हे सांगतात यांची रहाणी मलिन्य असून हे आपळ

परंपरागत शेतकीचा धंदा करतात. लग्नविधि ब्राह्मण चालवितो. लग्नप्रीत्यर्थ ब्राह्मणाला दक्षिणा व जातिप्रमुख पाटलास शेलापागोटें देतात. उत्तरक्रियेच्या प्रसंगीं ब्राह्मणाची जरूरी नसते. खंडोबा, देवी, चंद्र, सूर्य, वेदा, हिरवा वगैरेंना पुजतात. उपाध्याय ब्राह्मण असतो. हिंदूंचीं व्रतें व उपोषणें पाळतात. पाटील तंट्याचा निवाडा करतो. हे मिश्रभाषा बोलतात. त्यात मराठीचा भरणा जास्त असतो. याच्यात मुलांना शिक्षण देत नाहीत.

का न डा.—येथील कोंकणे आपणाला मराठे क्षत्रिय समजतात. इतर लोकहि त्यांना शूद्रापेक्षां उच्च वर्णाचे मानतात. यांत सावंत, देसाई, साइल अशीं आडनावें असून हे नावापुढें नाईक हें पद जोडतात. या कोंकण्यांचीं नावें महाराष्ट्रीय वाटत नाहीत. उदा. फकिरो, चौडो, काडलो. इत्यादि हे कोंकणी भाषा गोवनीज लोकांप्रमाणें हेल काढून बोलतात. निरंकार, महामाई, राऊळनाथ, खेत्री या देवतांना बळी देतात. हे महालय, श्राद्ध वगैरे करतात. गोवा, गोकर्ण, काशी व पंढरपूर या ठिकाणीं हे यात्रेला जातात. कऱ्हाडे ब्राह्मण यांची भिक्षुकी करतात. बावा नावाचे याच्या जातीचे उपाध्यायहि आहेत. सदाशिवगडाजवळील कृष्णापूरच्या विठोबाला हे भजतात व भजनात तुकारामाचे अभंग म्हणतात. यांचे आचारविचार सावंतवाडीकर मराठ्यांप्रमाणें दिसतात. प्रत्येक गावात पंचायत असून बुधवंत हा त्यांचा मुख्य असतो. हे लोक मुख्यतः शेतकरी पेशाचे आहेत.

त्रा व ण को र.—येथेंहि यांची वसाहत आहे. व्यापार हा यांचा सर्वसाधारण धंदा आहे. इतर वेळीं मलबारी लोकांप्रमाणें यांचा पोषाख असतो. परंतु धार्मिक किंवा सणाच्या दिवशीं पूर्वकिनाऱ्यावरील ब्राह्मणांप्रमाणें असतो. याच्या जातींत बरींच गोत्रें आहेत. होता होईल तों आतेच्या किंवा मामाच्या मुलीला वरण्याचा यांचा प्रघात आहे. यांचे वैवाहिक विधी जवळ जवळ ब्राह्मणांसारखेच आहेत. [सेन्सस रिपोर्ट, ( मुंबई व त्रावणकोर ) सु. गं. एन्थोवेन ].

**कोंकणी भाषा**—कोंकणात बोलण्यात येणारी मराठी भाषा. ही जास्त अनुस्वारयुक्त असते. याशिवाय तिच्यात ( काहीं शब्दपर्याय सोडल्यास ) विशेष फरक होत नाहीं. कोंकणी असें विशेष नाव ज्या भाषेला आहे, ती गोव्याकडे आणि मालवणकडील भागांत बोलली जाते. तिला गोमांतकी असेंहि म्हणतात. ही मराठीहून थोडीशी निराळी आहे. पहिल्यानें इकडे सारस्वती म्हणून एक भाषा प्रचारात होती; पुढें कदंबराजवटींत तिची हळू हळू कानडी झाली. विजयानगरकरांचें राज्य झाल्यावरहि इकडे कानडीच सुरु होती. पुढें फिरंग्याच्या अंमलांत व मुसुलमानी रियासतींत त्या त्या भाषेची छाप बसून मूळच्या महाराष्ट्री भाषेंत बराच फरक पडला. साप्रत ही भाषा बरीच चमत्कारिक झाली आहे. शुद्ध मराठी भाषा बोलणाऱ्याला ती एकाएकीं समजत नाहीं. गोव्यांत ती सर्वत्र सारखी आहे असें नाहीं अंतराअंतरानें तिच्यात फरक पडतो. बुक्यानन म्हणतो कीं, गोवेप्रांतांत ५५ मैलांच्या टापूंत ही भाषा बोलतात. मोर्ग्लीगचें म्हणणें असें आहे कीं, कोंकणी भाषा बोलणारे लोक ही भाषा मराठीहून निराळी मानून तिचें व्याकरणहि निरळें मानितात. परंतु व्याकरणाबद्दल मर्फी हा पुढीलप्रमाणें माहिती देतो.—'कोंकणी भाषेचें व्याकरण मराठीप्रमाणेंच आहे असें निश्चितपणें सिद्ध होतें नामें व क्रियाविशेषणें ही एकाच विभक्तीनें चालतात. या भाषेंतील विशेष लक्षण म्हणजे, जे शब्द हिंदी व मराठी भाषेंत आकारान्त असतात ते कोंकणात ओकारान्त होतात. हा प्रकार गुजराथी व मारवाडी या भाषात दिसून येतो. मराठींतील काहीं अडचणी या कोंकणीवरून समजून येतात. हिच्यात काहीं नियम अपूर्ण आहेत. या भाषेंत सामान्य व्यवहारात संस्कृत शब्द बरेच आढळतात. हे शब्द शेणवी ब्राह्मण शुद्ध रीतीनें उच्चारतात आणि गोमांतकातील साधारण किरिस्ताव लोक त्याचा अपभ्रंश करून बोलतात उदा॰ उदक, वृक्ष, तृण असे शब्द शेणवी ब्राम्हण चलितात व उदीक, रुख, तण हे शब्द किरिस्ताव बोलतात" हल्लीं पोर्तुगीज भाषा फार प्रसार पावली आहे, त्यामुळें या कोंकणी भाषेकडे सुधारण्याच्या दृष्टीनें कोणी फारसें पहात नाहीं

या भाषेंत पूर्वी काहीं कथा व काव्यहि झालेलें आहे. नायकस्वामी, सातबानायक, सोहिरोबा आंबिये इ. कवींनीं या भाषेंत काव्यरचना केली आहे. हल्लीं गोव्याकडे जुनीं कोंकणी लौकिक गीतें फार कमी ऐकण्यात येतात. या गीतांचा संग्रह करणें अत्यावश्यक आहे. भाषाशास्त्रदृष्टीनें या संकलनाचा बराच उपयोग होईल. कोंकणी भाषेंत ग्रंथरचना अगदींच अल्प आहे; ती वाढविली पाहिजे' पूर्वीचा एखादा मोठा ग्रंथ या भाषेंत रचलेला ऐकण्यात नाहीं. काहीं लोक स्टिफेनच्या ख्रिस्तपुराणास कोंकणी भाषेंतील ग्रंथ म्हणतात आणि याप्रमाणेंच आणखी काहीं ग्रंथास कोंकणी भाषेचे म्हणतात; परंतु स्टिफेनचा ग्रंथ हा कोंकणी नसून मराठी भाषेंतील आहे असें विद्वान लोकाचें म्हणणें आहे हल्लीं मुंबईस असलेले किरिस्ताव लोक ह्या कोंकणी भाषेला पारखे होत चालले आहेत. मात्र पत्रव्यवहारात हे लोक कोंकणी भाषा वापरून ती रोमन लिपींत लिहितात. गोमांतकातील उच्च वर्गाची ओढ मराठीकडे फार आहे. कोंकणी भाषेची प्रगति म्हणजे मराठीचा अपकर्ष असें जें त्यांचें मत दिसतें तें वास्तविक नाहीं. परंतु ही प्रगति होण्यास फार प्रयास पडतील मुंबईस आलेले किरिस्ताव इंग्रजी भाषा जास्त उचलात चालले आहेत. त्यांच्यात इंग्रजी, हिंदी व कोंकणी या तीनहि भाषा प्रचारात आहेत पुन्हां या त्यांच्या कोंकणीवर पोर्तुगीज भाषेचीहि छाप पडतेच. गोव्यांत तर या पोर्तुगीज भाषेचें दडपण फार पडल्यानें तेथें कोंकणी भाषेचें विकसन न होतां तें मुंबईस होतें या

भाषेची थोडी कल्पना येण्यास पुढें एक छोटासा उतारा देतों

इन्दिरेच्यो शिरवळ्यो ( सौ. शान्ताबाइ चंदे हिणें सांगिल्ली काणी ) —एक असलो म्हाळपै ताची असली एक वायल तिचें नाव इन्दिरी ती मोटी करनखरी, पाडी, उंवाळलेली आसली घोवान एक सांगल्यार ती दुसरेंच करताली एक फावट म्हाळपैक शिरवळ्यो खायनशो दिसल्यो ताका सामकी गाट लागली सुकून सुकून ताचो सामको भातवुटो जालो तो मरचे तडीक पावलो पुण सभागी करतलो किते ? वायले फुडें ताचें शाणपण चालता ? तिचेकडन उलशी माणुसकी आस म्हाळपैच्यो हाडाक वाती लागिल्लयो पळौन, शेजाशीन ताका एकदीस विचालें, आरे म्हाकू हाली तशी सामकीच अवस्ता जाली ती किते ? ' ताणें म्हळें, ' किते सांगू? म्हडलें ना, म्हाका पिडा–रोग की कायचना म्हाका शिरवळ्या खायनशो दिसल्यात पणून करुन घालना कोण? आम गेले करनखरेक तू वळखना? ' शेजारीन म्हळें, तर तुका शिरवळ्यो मेळपाची आस्ता ना तू तिका सांग तुजो म्हणचे येय यवेपाचो आस ताका तू जाय जाली पोळी करुन घाल शिरवळ्यो मात नाका ' म्हाळपैक घरा गेलो आनी वायलेक ताणें तशेंच सांगलें, इन्दिरी दळूक बसली तेना घोवान तिका म्हळें ' आज चंडशे तांदूळ दळटा तू ? ' तिणें वोंचो मुडडून जप केली, ' तुज्यो रयो लातवडायो म्हाका नाकान शिरवळ्यो करू नाका म्हणून सांगूक, तू कोण ? म्हजें सोयरू म्हाका फाटी सांगताले, आपल्या मावाक आस तो शिरवळ्याचें, मोटो घेस्त त्योंच हाव करतलीं तूं आपलो सांगशी साना कर, वडे कर, पोळे कर पणून हाव खें ऑयकूक आयल्या ? '

[दणाईत व वागळे–गोमांतकाचा प्रा अ इतिहास, स्वयसेवक व ४ अ ५, विद्यासेवक व १ अ २]

**कोकनाडा, तालुका** — मद्रास इलाख्याच्या गोदावरी जिल्ह्याच्या समुद्रकिनाऱ्यावरील हा एक तालुका असून याचें क्षेत्रफळ २९७ चौ मैल आहे १९२१ साली याची लोकसंख्या २,२९,१५१ होती यात कोकनाडा व सामलकोट या दोन शहराचा व ९९ खेड्यांचा समावेश होतो जमीन महसुलाचें उत्पन्न सुमारें ५ ३/४ लाख रु आहे याच्या किनाऱ्यावर कोरिंग व इनरम हीं यूरोपियन वसाहती–या वेळीं प्रसिद्ध असलेलीं बदरें आहेत कोरिंग जवळ तल्लारेवू येथें जहाजें बाधण्याचें काम होतें येथील मुख्य पीक म्हटलें म्हणजे तांदूळ होय या पिकास गोदावरी नदीच्या कालव्याचें पाणी देण्यात येतें

**गाव** —मद्रास इलाख्याच्या गोदावरी जिल्ह्याच्या कोकनाड तालुक्याचें हें मुख्य ठिकाण व बदर आहे एम् एस् एम रेल्वेच्या सामलकोट जक्शनपासून या शहराला एक फाटा गेला आहे हें मुंबईपासून ८१० मैलावर आहे हें गोदावरी नदीच्या पूर्वेकडील शाखेच्या मुखाजवळ कोकनाड उपसागराच्या वरच्या बाजूस आहे तेलगणात हें गाव फार स्वच्छ आहे

इ स १९२१ साली याची लोकसंख्या ५३,३४८ होती रामायणातील काकासुराचें हें निधनस्थान समजलें जातें म्हणून तेलगूत यास ' काकिनाडा ' ( कावळ्याचें स्थान ) म्हणतात हें इतिहासदृष्ट्या महत्वाचें नाहीं याच्या जगन्नाथपुरम् नावाच्या भागात पूर्वी डच लोकानीं वखार बाधली होती परंतु ती १८२ त ब्रिटिशांच्या ताब्यात दिली गेली १७५९ त कर्नल फोर्डनें मच्छलीपट्टण सर केल्यानतर फ्रेंच लोकानीं आपलें सैन्य दोन वेळां या ठिकाणीं उतरविलें होतें परंतु त्याना सहज रीतीनें तेथून हुसकविण्यात आलें

कोरिंगचा उपसागर जेव्हा माती जमून जमून निरुपयोगी झाला तेव्हा कोकनाडास महत्व आलें यात दौलेश्वरम पासून दोन कालवे काढिले आहेत एक सामलकोट मधून व दुसरा रामचद्रपुरम् तालुक्यामधून जाऊन दोन्हींहि एका खाडींत नेऊन सोडले आहेत व अशा रीतीनें जिल्ह्यांतील जल मार्गांशीं याचा संबंध जोडिला आहे. येथें म्युनिसिपालिटी १८६६ त सुरू झाली

मद्रासच्या उत्तरेस कारोमांडलच्या किनाऱ्यावर हें मुख्य बदर आहे यात रेल्वे सुरु झाल्यापासून व उपसागरात मातीचे पुष्कळ थर जमल्यामुळें याचें महत्व बरच कमी झाले आहे हें बदर घेताना, यकलपुडीच्या दीपस्तंभापासून काहीं अतरावर असलेल्या बदरात शिरण्याच्या मार्गापासून सुमारें पावणे पाच मैल दूर व ३० फूट खोलीच्या पाण्यात जहाजें नागरलीं जातात यातून इंग्लड, फ्रान्स आणि बेल्जम येथें कापूस, फ्रान्सात आणि इग्लडात तीळ वगैरे आणि सीलोन व मारिशस बेटांत तादूळ जातो रंगूनास तंबाकू जाते व तेथें तिचे चिरूट बनवितात तूप, कडधान्यें व एरडीचें तेल बाहेर गावीं पाठविण्यात येतें यात यूरोपियन व इडियन यांच्या चेंबर ऑफ कॉमर्स संस्था व एक पोर्ट कॉनझर्वेन्सी बोर्ड आहे

यात एक खाजगी मिठाची वखार आहे व पेनुगुडुयूरु जवळ काहीं मैलावर सरकारी मिठागरें आहेत यात धान्य दळण्याच्या गिरण्या, तेल काढण्याच्या चक्क्या, एक लोखड ओतण्याचा कारखाना आणि चुटे बळण्याच्या काहीं वखारी आहेत गावात तेलाचे, तंबाकूचे, तादूळ सडण्याचे, सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे बरेच कारखाने आहेत परंतु मुख्य धदा म्हणजे दर्यावरील व्यापार होय

यात १८५२ सालात मिठापुरमच्या राजानें एक कॉलेज स्थापिलें दुसरें पी आर कॉलेज व दोन हायस्कूलेंहि आहेत सरकारी ट्रेनिंग कॉलेज व मुलींच्या शाळाहि आहेत येथें छापखाने पुष्कळ असून छपाईहि स्वस्त असते १९२३ त अडतिसावी राष्ट्रीय सभा येथें भरली होती

**कोकंब**—कोकंबाच्या बियापासून तेल काढतात हें शेंकडा तीस पर्यंत निघतें तेल दोन तऱ्हेन काढतात बिया

फोडून वरचीं टरफलें काढून टाकतात. नंतर आंतील गर उखळांत कुटून पाण्यांत उकळतात. थोडा वेळ उकळल्यावर पाणी गार होऊं देतात म्हणजे तेल वर येतें. त्याचे लहान लहान गोळे किंवा वड्या करितात. दुसरी रीत अशी की, वरीलप्रमाणेंच बिया कुटून त्या पाण्यांत टाकून तें पाणी रात्रभर तसेंच ठेवून देतात सकाळीं तेल वर येईल तेवढें काढून घेऊन राहिलेलें पाणी रवीनें ताकासारखें घुसळतात म्हणजे लोण्याप्रमाणें पाण्यावर तेल येतें. थंडीच्या दिवसांत तेल चांगलें ( पुष्कळ ) निघतें. घुसळून काढलेलें तेल स्वच्छ असतें. तेलाचा उपयोग आमाशावर, थंडीनें आग फुटते त्यावर व पावसाळ्यांत चिखलानें पाय कुजतात त्यावर लावण्यासाठीं चांगला उपयोग होतो. कोकंब तेलाच्या मेणबत्त्या करण्यासाठीं उपयोग होईल परंतु तेल मात्र भरपूर मिळालें पाहिजे.

कोकंबाच्या फळापासून कोकमसालें ( आमसोलें ) तयार करतात. एप्रिल महिन्यांत फळें चांगलीं पिकल्यावर तीं फोडून बिया वेगळ्या काढतात आणि रस व सालें एके ठिकाणीं एका भांड्यांत वाटतात. बिया पिळून त्यांचं पाणी यांत टाकतात. बिया वाळवितात. सालें उन्हांत वाळवितात; व तीं वाळल्यानंतर पूर्वी काढलेल्या रसांत कुस्कुरून पुन्हा वाळवितात. याप्रमाणें त्यांना चार पांच पुटें दिल्यानंतर तीं विकण्यास तयार होतात. मालवण, गोवा वगैरे ठिकाणीं कोकमसालें तयार करतात. आमसुलाचें सार व चटणी करतात. त्याचा उपयोग चिंचेऐवजीं भाजींत घालण्याकरितांहि करतात. आमसुलें वैद्यकांत उत्तम पित्तशामक म्हणून वर्णिलीं आहेत.

कोका—इरिथ्रॉक्सिलॉन ह्या वर्गांतील झाडाच्या एकंदर पन्नास जाती आहेत. हीं झाडें उष्ण प्रदेशांत होतात. हिंदुस्थानांत या वर्गाच्या सहा जाती आहेत.

पहिली इ. कोका या जातीचीं झाडें दक्षिण अमेरिकेच्या निरनिराळ्या भागांत आढळतात. परंतु हीं झाडें मूळचीं पेरु व बोलिव्हिया येथील आहेत.

*हिंदुस्थानांतील लागवड.*—इ. स. १८७० त सिलोनमध्यें कोका जातीच्या झाडाची लागवड करण्यांत आली. पुढें कोकेनच्या उपयोगाचा शोध लागल्यामुळें युरोपांतून कोकाच्या पानास बरीच मागणी होऊं लागली. याच सुमारास कोका झाडाची लागवड चहाच्या मळ्यांतून सुरू होऊं लागली. व हिंदुस्थान सरकारनें कोकाचीं पानें तयार करण्याबद्दलची माहिती दक्षिण अमेरिकेंतून मागविली. निलगिरी पर्वताची उतरण, मद्रास इलाख्यांतील कांहीं भाग, आसाम, सिलहट व हिमालयपर्वताचा १०० पासून २००० फूट उंचीचा प्रदेश या ठिकाणीं या झाडाची लागवड करण्याचे प्रयोग केले आहेत. या झाडास थोड्या धुक्यापासून सुद्धां इजा होते व त्यास पाऊस बराच लागतो.

कांहीं जातींच्या झाडापासून निघणाऱ्या कोकेनचें स्फटिकीभवन होत नाहीं. याकरितां झाडाची जात नीट निवडून घ्यावी लागते. याच्या लागवडीला जमीन ओलसर व सुपीक लागते. व पीक काढल्यानंतर जमिनींतील कस निघून जात असल्यामुळें नवीन खत घालणें जरूर असतें. रोप लावल्यानंतर १८ महिन्यांनीं पानें काढतां येतात व एकदा लावलेल्या झाडाचीं पानें ४० वर्षेपर्यंत काढतां येतात.

झाडाचीं पानें जेव्हां कडक होऊन वाकविलीं असतां मोडतात तेव्हां तीं काढतात. सुपीक जमिनींतील झाडापासून एका वर्षांत दोन अथवा तीन वेळां पानें काढतां येतात. वाळलेलीं पानें एक दोन दिवस ठेऊन नंतर ( वातागम्य ) डब्यांत तीं भरतात. हीं पानें होतां होईल तितक्या लवकर जहाजावर चढवावीं, कारण तीं उष्णकटिबंधापेक्षां समशीतोष्ण कटिबंधांत जास्त दिवस टिकूं शकतात. या पानांतील आल्कलॉईड व क्षार व्यापाराकरितां वेगळे करण्याचा प्रयत्न हिंदुस्थानांत आजपर्यंत झाला नाहीं. या पानांतील आल्कलॉईड व क्षार हीं दोन्हीं मादक असून तीं शरीराच्या कोणत्याहि भागास लाविलीं असतां तो भाग बधिर होतो.

*व्यापार.*—सर्व जगास कोकेनचा पुरवठा दक्षिणअमेरिकेंतून होतो. इ. स. १९ ६ मध्यें पहिल्यानें १४०० औंस कोकेन हिंदुस्थानांत आलें. त्याची किंमत १८०४२ रुपये होती. कोकेनचा उपयोग लोकांनीं करूं नये म्हणून सरकारने कायदे केले आहेत. परवान्याशिवाय कोकेन विकणें कायद्यानें मना केलें असून त्याची गणना मादक पदार्थांत केली आहे.

कोकिल—कोकिलपक्ष्याकडे हिंदुस्थानांत व पाश्चात्य देशांतहि प्राणिशास्त्रकोविदांचें तसेंच इतर लोकांचेंहि कोणत्याहि पक्ष्यापेक्षां अधिक लक्ष वेधलें आहे. या पक्ष्यासंबंधीं पुष्कळ दंतकथा प्रचलित आहेत. पुष्कळ विद्वानांनीं याच्यावर पुस्तकें व लेख लिहिलेले आहेत. आपलीं अंडीं दुसऱ्याच्या घरट्यामधून ठेवून तीं उबवून घेण्याची याची विचित्र पद्धतीच विद्वानांचें लक्ष्य वेधून घेण्याला कारणीभूत झाली आहे. हिंदुस्थानांत कोकिलाला संस्कृतांत परभृत, अन्यभृत अशीं नांवें दिलेलीं आढळतात. शाकुंतलमध्यें, स्त्रियांचें अशिक्षितपटुत्व सिद्ध करण्याकरितां, दुष्यंत हा दुसऱ्याकडून आपल्या पिलांचें संगोपन करून घेणाऱ्या कोकिलाचा दाखला देतो. त्यावरून आपल्याकडेहि कोकिलासंबंधीं पाश्चात्यांप्रमाणेंच कल्पना होती हें सिद्ध होतें. याशिवाय कोकिलाचा आवाज, त्याचें मधुर कूजित यामुळेंहि त्याला विशेष प्रकारचें महत्व प्राप्त झालें आहे. वसंतऋतूच्या आगमनाबरोबरच कोकिल हा आपलें आगमन आपल्या मधुर वाणीनें सूचित करतो. यूरोपमध्यें व ध्रुवप्रदेशांतहि उन्हाळ्याच्या दिवसांत म्हणजे एप्रिल महिन्याच्या प्रारंभापासून कोकिलाचें कर्णमधुर आलाप ऐकूं येऊं लागतात.

वर्षाच्या इतर ऋतूंमध्यें तो आफ्रिकेत असतो असें पाश्चात्यांचें म्हणणें आहे. प्रथमतः उन्हाळ्याच्या सुरुवातीस, पुंस्कोकिल आपलें आगमन जाहीर करतो; व थोड्याच दिवसानंतर स्त्रीकोकिलाहि त्याच्या पाठोपाठ येते. या पुंस्कोकिलाच्या मध्यें स्त्रीकोकिलाबद्दल भांडणें सुरू होतात व शेवटीं ज्याच्या त्याच्या कर्तृत्वाप्रमाणें ज्याला त्याला एखादी कोकिला मिळते. दिवसाप्रमाणेंच रात्रींहि याचें गाणें चालूंच असतें. वर्षाऋतु प्राप्त झाला कीं हे कोकिलपक्षी कोठें गडप होतात कोणास ठाऊक ! यूरोपमध्येंहि अशीच स्थिति नजरेस येते. असजसा ग्रीष्म ऋतु संपण्याच्या बेतात येतो तसतशी या कोकिलाच्या आवाजातील माधुरी कमी कमी होऊं लागते. नंतर पुढें ग्रीष्मऋतु संपला कीं याचें कूजन बंद होतें व जुलैच्या मध्याला व फार झालें तर जुलै अखेरनंतर याचा पत्ताहि लागत नाहीं

कोकिलामध्यें प्रजोत्पत्ति कशी होते याचें यथार्थ ज्ञान अद्यापहि कोणाला नाहीं. तरी पण पाश्चात्य शोधकांनीं यासंबंधीं पुष्कळच प्रयत्न केले आहेत व अद्यापीहि त्याचे प्रयत्न चालूं आहेत. कोकिला ही आपलीं अंडीं ज्याच्या घरट्यात ठेवते त्या पक्ष्याचीं अंडीं ती बाहेर फेंकून देते व त्या जागीं आपलीं अंडीं ठेवते व नंतर त्या अंड्यांचें ते पक्षी आपलीं अंडीं समजून संगोपन करतात असें आढळून आलें आहे. सप्टेंबरच्या सुमारास हीं पिलें उडूं लागतात व नंतर तीं आपल्या आईबापाच्या निवासस्थानाकडे जातात. कोकिला ही आपलें अंडें दुसऱ्या पक्ष्याच्या घरट्यात ठेवण्याच्या कामीं आपलें चातुर्य व्यक्त करते. डर्मस्टॅट परगण्यातील ॲडाल्फ मुलर नावाच्या एका जंगली मनुष्यानें दुर्बिणीच्या सहाय्यानें यासंबंधींचा प्रकार पाहिला. कोकिला ही आपलें अंडें हळूंच आपल्या चोंचीत धरून दुसऱ्या पक्ष्याच्या घरट्यात कशी ठेवते यासंबंधींची साग्र हकीकत त्यानें दिली आहे. कधीं कधीं या पक्ष्याचें व कोकिलेचें भांडण होतें; पण शेवटीं हरप्रयत्नानें ती आपलें अंडें त्या घरट्यात घुसडतेच. आपल्या अंड्यासारख्याच रंगाचीं अंडीं घालणाऱ्या पक्ष्याच्या घरट्यामध्यें कोकिला ही आपलीं अंडीं ठेवते असें काहीं शोधकांचें मत आहे पण त्यासंबंधीं विद्वानांत मतभेद आहे. तथापि आपल्या अंड्यासारखींच अंडीं असणाऱ्या पक्ष्याच्या घरट्यात कोकिला हीं अंडीं ठेवते हें विधान पुष्कळ अंशीं खरें आहे असें मानण्यास पुष्कळ पुरावा आहे. हिंदुस्थान व इतर जगाचे भाग यामध्यें सापडणाऱ्या कोकिलामध्यें स्वरभिन्नत्वापेक्षा दुसरा फरक नाहीं व आहे तोहि फरक फारच सूक्ष्म आहे.

**कोकिलाव्रत**—आषाढ अधिक महिना आला असता सौभाग्यवृद्धीसाठीं हें पौराणिक व्रत करण्याची त्रैवर्णिक स्त्रियात चाल आहे. हें व्रत आषाढ पौर्णिमेपासून श्रावण पौर्णिमेपर्यंत करावयाचें असतें. महिनाभर नक्तभोजन व तें कोकिलेचा शब्द ऐकून करावयाचें असें याचें विधान आहे. दक्षाच्या यज्ञास आमंत्रणावाचून पार्वती गेल्यानंतर तेथें तिचा अपमान झाल्यावर त्याठिकाणीं दक्ष व वीरभद्र याच्या युद्धामुळें यज्ञविध्वंस झाला. पार्वतीनें यज्ञविध्वंस केल्यामुळें 'तू तिर्यक् योनींत कोकिला होशील' असा शंकरानीं तिला शाप दिला व ' सौभाग्यप्राप्त्यर्थ स्त्रिया तुझी पूजा करतील' असा उःशाप दिला अशी वराहपुराणात कथा आहे.

**कोको**—हें झाड मूळचें मध्य व दक्षिण अमेरिकेंतील आहे; परंतु अलीकडे पुष्कळ ओलसर उष्णप्रदेशात याची लागवड झाली आहे.

याचे बीं ठेचून अथवा भाजून पिवळसर रंगाचें घट्ट तेल काढतात. त्याला चॉकोलेटसारखाच वास असून तोंडात टाकल्यावर तें लोण्यासारखें वितळतें म्हणून याला "कोकोचें लोणी" म्हणतात. तें खावयास फार चागलें लागतें. या झाडापासून तयार होणारा मुख्य पदार्थ म्हणजे ज्यापासून चॉकोलेट करतात तीं फळें होत.

कोकोचें बीं लावल्यापासून पाचव्या-किंवा सातव्या वर्षी झाडास फळें येऊं लागतात. फळें शेंगेसारखीं ६ ते ९ इंच लांब असून त्यात ४० किंवा अधिक बिया असतात; त्यानाच "निब" असें नाव आहे. प्रत्येक झाडापासून दरवर्षास सुमारें ½ ते ५ शेरापर्यंत वाळलेलें बीं अथवा निबें निघतात. चॉकोलेट तयार करण्याकरिता बीं भाजून दळतात, व चव आणण्याकरिता त्यात साखर किंवा दुसरा एखादा पदार्थ मिसळतात. चॉकोलेटपासून तयार केलेल्या पदार्थांची किंमत त्यातील चॉकोलेटच्या प्रमाणावर अवलंबून असते.

**व्या पा र.**—चाकोलेटची झाडें हिंदुस्थानात आणण्याचे कित्येक प्रयत्न झाले, मलबार व निलगिरी डोंगरावर त्याची थोडीबहुत लागवडहि होते. परंतु ती सिलोनइतकी यशस्वी नाहीं. कच्चीं निबें अथवा बिया मुख्यतः ब्रिटिश वेस्ट इंडीज, पोर्तुगाल, सिलोन, फ्रान्स, इक्वेडोर, ब्राझील व ब्रिटिश वेस्ट आफ्रिका या देशातून येतात; व चॉकोलेटच्या निरनिराळ्या जिनसा व चॉकोलेटची मेवा मिठाई पुष्कळशी बेल्जममधून येते.

**कोकोनोर**—मध्यएशियामधील सरोवर. हें तिबेटच्या ईशान्येस ३७ उत्तरअक्षांश, १०० पूर्वरेखांशावर ९९७५ फूट उंचीवर आहे. या सरोवराच्या उत्तरेस नान-शान पर्वत व दक्षिणेस दक्षिणकोकोनार पर्वत आहेत. याची लांबी ६६ मैल व रुंदी ४० मैल असून त्यात ६ बेटें आहेत. यापैकीं एका बेटावर बौद्ध लोकाचा मठ आहे. त्यामुळें येथें यात्रेकरू येतात. सरोवराचें पाणी खारें आहे. तथापि त्यात मासे पुष्कळ आहेत. हिवाळ्यात सरोवराचें पाणी तीन महिने गोठलेलें असतें. सरोवराला पश्चिमेस बुहेनगोल ही नदी मिळते.

**कोकोबेटें**—कोको हीं बंगालच्या उपसागरांतील दोन बेटें असून अंदमान बेटाच्या ईशान्येस ४५ मैलावर

वसलीं आहेत. याचा दक्षिण महाराष्ट्रांतील हुतवाडी जिल्ह्यात समावेश होतो मोठ्या बेटाचें क्षेत्रफळ १४ चौरस मैल असून लहान २॥ मैल लांब व एक मैल रुंद आहे हीं बेटें सपाट असून त्यात पाण्याची टंचाई आहे व त्यावर लोकवस्ती नसून तीं नारळाची झाडें व मगलें यानीं व्यापिलीं आहेत या बेटांतील वनस्पतींचें उत्पन्न सरकार मक्त्यानें देतें

**कोगनोली**—मुंबई इलाख्यातील बेळगाव जिल्ह्याच्या चिकोडी तालुक्यातील एक खेडें याचें जुनें नाव कोंगुलवल्लि आहे. बेळगावाहून कोल्हापुरकडे जो रस्ता गेला आहे त्या रस्त्यावर हें वसलेलें आहे १९०१ मध्यें याची वस्ती ५५९७ होती हें व्यापाराचें गाव असून येथील तांदूळ बेळगाव, कोल्हापूर इत्यादि ठिकाणीं जातो येथें कापड, खजूर, मीठ, साखर इत्यादि जिनसांची आयात होते येथें दर गुरुवारी बाजार भरतो, व त्या वेळीं कापूस, तवाखू, गुरें इत्यादींचा मोठा व्यापार चालतो लुगडीं तयार करणें, हलक्या प्रकारच्या घोंगड्या विणणें हे येथील मुख्य धंदे होत १८७६ पूर्वी येथें पुढे तयार करण्याचा कारखाना होता, पण १८७६ च्या दुष्काळात पुढे तयार करणारे लोक हें गाव सोडून गेल्यामुळें हा धंदा बसला

**कोंगाळव**—हे कुर्ग प्रांताचे तामीळ जहागीरदार. याचा व होयसळ राजाचा नेहमीं खटका उडत असे नृपकाम होयसळनें ( १०२२ ),विष्टिदेवानें (११३० ),चोकण्णानें (११५५ ),व वरिवल्लाळानें ( ११६८ ) याच्यावर हल्ले करून त्याना आपल्या ताब्यात आणण्याचे प्रयत्न केले, परतु हे लोक कायमचे त्याच्याकडून जिंकले गेले नाहींत [ अय्यर प्रा हिं ]

**कोंगु देश**—या देशास कोंगु, कोंगुमंडलम्, कोंगुनाडु अशींहि दुसरीं नावें आहेत दक्षिणेकडील हलींचे कोइमतूर व सालेम या जिल्ह्याचा समावेश या प्रदेशात होतो प्रथमत हा प्रदेश पल्लवाच्या ताब्यात होता त्याच्यापासून पाण्ड्यानीं तो (९८० ) घेतला आदित्य पाण्ड्याला कोंगुदेश राजाधिराज अशी पदवी होती चोलांनीं ( राजराज ९८५ –१०१६ ) तो जिंकून घेतला नतर होयसळानींहि त्याचा ताबा घेतला (११३० ) याचा उल्लेख केरळ देशाबरोबर करीत असत चेर राजाचीं नाणीं अत्यत दुर्मिळ असून तीं या कोंगुदेशात सापडतात [अय्यर व स्मिथ प्रा हिं]

**कोच जात**—यांची वस्ती आसाम, बगालात, बिहार व ओरिसा यातून आहे आसाममधील या जातीची लोकसख्या २,३०,५०३ आहे आसामातील ही राष्ट्रजात नसून ती एक हिंदु लोकांची जात आहे व तिच्यांत इतर राष्ट्रजातींतून हिंदुधर्म स्वीकारलेल्या लोकांना घेतात असें गेटचें मत आहे या लोकाचें व मेचे व गारो जातीच्या लोकांशीं साम्य असल्यामुळें ते मगोलियन लोक असावे असेंहि पण त्याचें मत आहे वरील ब्रह्मपुत्रा सिंडीत त्यांना शूद्र समजतात व ब्राह्मणांना त्याच्या हातचें पाणी चालतें परतु मध्य व पश्चिम आसामातील जिल्ह्यातून या लोकाचा इतका वरिष्ठ दर्जा समजला जात नाहीं या जातीचे निरनिराळे पोटभाग आहेत व त्या प्रत्येकातून धर्मांतर केलेल्या पराण्याला जावें लागतें

बगाल्यात कोचाचे निरनिराळे वर्ग असून प्रत्येक वर्गावर एक पुढारी ( महत ) नेमिला असतो महताची जागा वंशपरपरा चालते महतावरचा मुख्य दिगरी महत किंवा परमाणिक महत नावाचा असतो या महतान्या निकालावर साहेब गोसैन याच्याकडे अपील करावयाचें असतें [ से रि १९११ बगाल व आसाम ]

**कोचाबंबा**—हें बोलिव्हियातील एक शहर आहे दक्षिण अक्षांश१७ ° –२७' व पश्चिम रेखांश ६५ ° ४६' यांच्यावर हें आहे लोकसख्या ( १९०० ) २१,८८६ आहे बहुतेक लोक इंडियन व मेस्टिझो आहेत हवा सौम्य व समशीतोष्ण आहे व सभोंवारचा प्रदेश सुपीक व लागवडीस योग्य आहे हें बोलिव्हियातील मोठें प्रगतीचें शहर मानलें जातें परतु हें दूर असल्यामुळें आता मागें पडलें आहे येथील बखारींत परकी माल बराच आहे या शहराचें ओरुरोशीं तारेनें दळणवळण आहे याची माडणी व्यवस्थित असून बगीच्यानीं युक्त अशीं बरींच मनोहर घरें येथें आहेत येथें एक विश्वविद्यालय व दोन विद्यालयें आहेत परतु त्याना सरकारी मदत नाहीं हें शहर सोळाव्या शतकात वसविलें गेलें व काहीं वेळ याला ओरोपेसा म्हणत असत स्वातंत्र्य युद्धात या शहरानें बराच पुढाकार घेतला होता यावेळीं स्त्रियानीं दखील स्पॅनिश लोकावर हल्ला केला होता

**कोचिन,संस्थान**—हें एक देश्य संस्थान असून तें मद्रास सरकारच्या ताब्यात आहे याला कोचिन हें नाव त्याच्या पूर्वीच्या राजधानीच्या शहरावरून पडलें हलीं हें शहर इग्रजाच्या ताब्यात आहे याचें क्षेत्रफळ १४१७ चौरस मैल आहे या संस्थानाचे एकामेकापासून विभक्त असे दोन मुख्य भाग आहेत त्यापैकीं मोठ्या भागाच्या उत्तरेस मद्रास इलाख्यातील मलबार जिल्हा, पूर्वेस मलबार व त्रावणकोर संस्थानें, दक्षिणेस त्रावणकोर संस्थान व पश्चिमेस मलबार व अरबी समुद्र असून धाकटा भाग ईशान्य दिशेस आहे व याला मद्रास इलाख्यातील मलबार व कोइंबतूर या दोन जिल्ह्यांचें वेष्टण आहे याला चित्तूर म्हणतात याशिवाय या संस्थानाचे त्रावणकोर संस्थानात तहि काहीं प्रांत आहेत

**स्वरूपवर्णन**—या संस्थानचे डोंगराळ, सपाट व समुद्रकिनारा असे निश्चित मर्यादेचे तीन भाग आहेत यापैकीं पूर्वेकडील डोंगराळ भाग म्हणजे पश्चिम घाटपर्वताचाच एक अंग असून यानें या संस्थानचा अर्धा अधिक प्रदेश व्यापिला आहे व या भागांत लाब लाब डोंगराच्या ओळी, मोठमोठ्या दऱ्या, खिंडी, दाट झाडी, निबिड अरण्यें व

एकमेकालगत व समुद्रसपाटीपासून ५००० फूट उंचीची डोंगरसपाटी अथवा पठारें आहेत. या भागात साग व इतर जातवान झाडाचीं वनें असून तो पालवी व फुलें यांनीं प्रफुल्लित दिसतो. या भागाच्या पश्चिमेस मैदान आहे. यातून पुष्कळ नद्या, ओढे वहातात. मैदानांतील बहुतेक सर्व प्रदेश लागवडीस आणलेला दृष्टीस पडतो. हें मैदान समुद्रकिनाऱ्यावरील आखातापर्यंत पसरलें आहे. आखात व समुद्र यांमध्यें लांबट व अरुंद असा वालुकामय प्रदेश आहे. या सर्व प्रदेशभर नारळाच्या झाडाची दाटी असून नैसर्गिक अथवा कृत्रिम बाध असलेल्या कांहीं भागांत भाताचीं शेतें दृष्टीस पडतात. हा प्रदेश सखल पाणथळ असून पर्जन्यकाळात याच्या कित्येक भागात पूर येतात कोचीन संस्थानातील मुख्य नद्या अलवाये, चालकुडी, कुरुमाली अथवा कुरुव्हनूर, पोन्नानी व अनइमलई या आहेत. या संस्थानच्या नैसर्गिक स्वरूपासंबंधानें लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे समुद्राशीं समांतर असलेली आखाताची साखळी ही होय.

शिवाय या संस्थानात एकमेकालगत अशीं एनमाकल व मनकोडी नावाचीं दोन मोठीं गोड्या पाण्याचीं सरोवरें असून तीं एनमाकल व चिरकल या ठिकाणीं भारतास मिळालीं आहेत. या संस्थानची एकंदर ७००० पेक्षा अधिक एकर जमीन लागवडीस आणली आहे.

या संस्थानातील नेलिपथिल टेंकड्यावर वेलदोडे व कॉफी यांचें उत्पन्न होतें. मैदानात फणस, अंबा, सुपारी व केळीं हीं उत्पन्न होतात. व समुद्रकिनाऱ्यावर नारळाचें उत्पन्न होतें. या संस्थानातील जंगलात हत्ती, गवे, वाघ, माकडें वगैरे जनावरें आढळतात.

या संस्थानची हवा दमट असून तिच्या योगें उत्साह व तरतरी वाटत नाहीं. पण एकंदरींत ती प्रकृतीस मानवते उत्तर भागापेक्षा दक्षिण भाग फार दमट आहे. चित्तूर तालुका पालघाटावर असल्यामुळें तेथील हवा कोरडी असून ती प्रकृतीस फार मानवते. लहान टेंकड्यावरील व चित्तूरच्या कांहीं भागांतील हवा विशेषेंकरून उन्हाळ्यात रोगट असते. तेथील उष्णमान एप्रिल महिन्यात ९६ ° व डिसेंबरात ६९ ° असून त्याचें सर्वसाधारण प्रमाण ८२ ° आहे.

या संस्थानात पर्जन्यवृष्टि नियमित असून बरीच आहे व तिचें प्रमाण सर्वत्र सारखें आहे. या संस्थानात दोन्हीही वाऱ्याचा पाऊस पडतो. येथील पर्जन्यवृष्टीचें प्रमाण त्रिचूर येथें १२६" एर्नाकुलम येथें १०८" व तत्तमंगलम् येथें ६६" या प्रमाणें आहे.

इतिहास.—इ. स. ८९० पर्यंत या संस्थानाचा केरळच्या राज्यात समावेश होत होता. याच सुमारास चेरमान पेरुमाल या शेवटच्या राजानें मुसुलमानी धर्माचा स्वीकार करून आपलें गोकर्णापासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेलें राज्य आपल्या नातेवाईकाच्या स्वाधीन केलें व आपण अरबस्तानात तीर्थयात्रेस निघून गेला. त्याचे वंशज त्याच देशात सापडल्याचें ऐकिवांत आहे. सध्याचे राजे त्याचेच वंशज होत. येथील राजाची शेजारच्या इतर राजांशीं व विशेषेंकरून कालिकतच्या झामोरिनशीं नेहमीं झटापट सुरू असे. इसवी स. १५०२ मध्यें पोर्तुगीज लोकांस कोचीन शहरीं राहण्याची मोकळीक मिळाली व त्याच्या पुढच्याच वर्षी त्यांनीं तेथें किल्ला बांधून सभोंवतालच्या प्रदेशात व्यापार करण्यास सुरवात केली. पोर्तुगीज लोकांनीं झामोरिन विरुद्ध कोचीनच्या राजास चांगली मदत केली. १५९९ त मेनेझस नावाच्या रोमन कॅथोलिक पाद्रयानें कोचीनपासून १२ मैल अंतरावर असलेल्या उदयम्पेरूर या खेडेगावीं एक धार्मिक सभा भरवून सीरियन ख्रिश्चन लोक पाखंडी आहेत असें ठरविलें, व त्याच्या प्रार्थनेच्या पुस्तकात दुरुस्ती केली. १६६३ साली डच लोकांनीं पोर्तुगीज लोकास कोचीन शहरातून घालवून दिलें. पुढें डच लोकांनीं सलगीनें कोचिनच्या राजापासून समुद्रकिनाऱ्यावर काहीं गावाच्या मालकीची सवलत मिळविली. १७५१ त डच लोकाच्या वैभवास उतरती कळा लागल्यावर कालिकतच्या झामोरिननें कोचिनवर स्वारी केली. पण कोचिनच्या राजानें त्रावणकोरच्या राजाच्या मदतीनें त्यास परतवून लाविलें. या कामगिरीबद्दल कोचिनच्या राजानें त्रावणकोरच्या राजास काहीं मुलुख बक्षीस दिला. १७७६ त म्हैसूरच्या हैदरअलीनें कोचीनवर स्वारी केली व तेथील राजास आपलें सार्वभौमत्व कबूल करावयास लावून तो त्याजपासून खंडणी घेऊं लागला. १७९१ पर्यंत कोचिनचा राजा म्हैसूरचा मांडलिक होता याच वर्षी त्यानें इंग्रजांशीं तह करून त्याचें स्वामित्व कबूल केलें व एक लक्ष रुपये खंडणी देऊं लागला. १८०८ साली पालीयथ अचन या पिढीजाद प्रधानानें त्रावणकोरच्या प्रधानाशीं इंग्रजाच्या रेसिडेंटास मारण्याचा कट केला व राजाच्या नकळत इंग्रजी सत्तेविरुद्ध बंड केलें. हें बंड मोडून इंग्रजानीं राजाशीं नवा तह केला. त्यास पावणेतीन लाख रुपये खंडणी द्यावयास लाविली. याशिवाय इतर राजाशीं पत्रव्यवहार न करण्याचें व आपल्या पदरीं इंग्रजाच्या संमतीशिवाय कोणत्याहि यूरोपियनास न ठेवण्याचें कबूल केलें. इंग्रजास संस्थानातील कोणत्याहि किल्ल्यास तटबंदी करण्याचा अथवा न करण्याचा अधिकार होता. उलटपक्षीं इंग्रजानीं संस्थानचे सर्व शत्रूंपासून संरक्षण करण्याची हमी घेतली. १८१८ त खंडणीची रक्कम २ लाख ठरविण्यात आली. पुढें या संस्थानांत पुष्कळशा सुधारणा होऊन तें चांगलें भरभराटीस आलें. १८६२ त लार्ड कॅनिंग या गव्हर्नर जनरलनें येथील राजास वारस नसल्यास दत्तक घेण्याची सनद दिली. सध्याचे महाराजे सर रामवर्मा हे १९१४ त गादीवर बसले. याना १७ तोफांच्या सलामीचा

मान आहे. १९२१ साली संस्थानिकाला महाराजा ही पदवी ब्रिटिश सरकारनें दिली.

प्रा ची न अ व शे ष.—या संस्थानांतील काहीं प्रदेशांत व विशेषेंकरून उंचवट्यावरील भागांत पुरातन थडगीं व त्याचप्रमाणें कोरींव लेखी आढळतात. कोरींव लेख्यांत तिरुविलामल व त्रिचूर येथील मुख्य होत. याशिवाय क्रागूर येथील ज्यू लोकांच्या किल्ल्याचे अवशेष, टिपूस थाबवून धरण्याकरिता बांधलेल्या भिंती व त्रिचूरचा किल्ला हे अद्यापि अस्तित्वांत आहेत. या संस्थानांत पुष्कळ पुरातन देवळेंहि आहेत. त्यामध्यें यात त्रिचूर येथील वदक्कुनाथन व क्रागूर जवळील तिरुवंचिकुलम् हीं मुख्य होत. मत्तांचेरी येथील घराण्याचा मनोरा असलेलें ज्यू लोकांचें देऊळ ३०० वर्षांचें आहे. या शिवाय पुरातन वस्तूंतील काहीं महत्त्वाच्या वस्तू म्हटल्या म्हणजे ज्यू लोकांचे ताम्रपट व खिश्चन लोकांची देवळें हीं होत. इ. स. १९२१ साली या संस्थानची लोकसंख्या ९,७९,०८० होती.

शे ती.—दरवर्षी पाऊस नियमित रीतीनें व पुष्कळ पडत असल्यानें येथील शेतीस कालवे वगैरेंची फारशी गरज नाहीं. चित्तूर तालुका व इतर काहीं भागांत मात्र कालवे वगैरेंची जरूर भासते. चित्तूर तालुक्यांत अनिमलईचे कालवे असून इतर ठिकाणीं लहान नद्या अडवून त्यांचें पाणी शेतीच्या उपयोगांत आणतात. या संस्थानांत मुख्यत्वेंकरून साळीचें पीक होतें. येथील तांदुळाच्या निरनिराळ्या पन्नास जाती आहेत. सखल प्रदेशांत तांदुळाचीं दर वर्षी दोन पिकें व उंच प्रदेशांत फक्त एकच पीक निघतें व काहीं कालव्यांचें पाणी मिळणाऱ्या अथवा अडवलेल्या नदीचें पाणी मिळणाऱ्या चांगल्या जमीनींत दरवर्षी तीन पिकेंहि निघतात. या संस्थानांतील रब्बीचीं पिकें म्हटलीं म्हणजे नेहमींचीं कडधान्यें, केळीं व इतर भाजीपाला, विड्याचीं पानें, सुपारी, सुंठ, ऊस मिरीं वगैरे होत. या शिवाय येथील वाळवंटांत नारळाचें पीक होतें. या संस्थानांतून नारळाची निर्गत फार आहे. नेलिम्पथिस टेंकड्यांवर ३१८२ एकर जमीन कॉफीची लागवड करण्यांत गुंतली आहे. खरीपाच्या पिकांकरितां या संस्थानची १,३१,००० एकर जमीन उपयोगांत आणतात. या संस्थानांत म्हशीशिवाय इतर गुरें ढोरें अथवा मेंढ्या यांची मूळ उत्पत्ति होत नसून गाई व बैल अनुक्रमें कोइंबतूर व म्हैसूर येथून आणविली जातात.

या संस्थानांत कायमचे कालवे फक्त चित्तूर तालुक्यांतच आहेत. एकंदर कालव्यांची संख्या ६ असून त्यांपैकीं २ संस्थानिक सरकारनें बांधले आहेत आणि बाकीचे चार लोकांनीं बांधले आहेत व याशिवाय संस्थानांत पाणी अडविण्याकरितां ९६९ बांध आहेत. हे कालवे १७,००० एकर जमीनीस पाणी पुरवितात. प्रतिवर्षी संस्थानिक सरकार १३,००० रु. कालव्यांचा कर म्हणून वसूल करतें.

१९२२ साली अभिरापळीचें धरण बांधण्यासंबंधीं त्रावणकोर व कोचीन सरकार या दोहोंमध्यें एक योजना ठरली गेली. छलकुडी नदीचा ओघ बदलून त्रावणकोर सरहद्दीनजीक असलेल्या अरण्यांतील पांच हजार एकर जमीनीस पाणी पुरविणें हा हेतु असल्यामुळें अर्थात् हें सर्व त्रावणकोर सरकारनें करावें असें ठरलें. सुमारें वीस हजार एकर कोचीनमधील पिकास पाणी पुरविलें जावें म्हणून इंचिप्पुराचे साली १२ मैल लांबीचें धरण कोचीन सरकारनें बांधावें असें ठरलें. कोचीनमधील जमीनींची लागवड उन्हाळ्यांत होते त्यावेळीं कोचीन सरकारनें सर्व पाणी घ्यावें. परंतु राहिलेल्या ऋतूंत त्रावणकोर संस्थाननें सर्व पाण्यावर हक्क सांगावा, असें ठरलें गेलें. १९२३ जून मध्यें कोचीन सरकारनें एका इंग्रजी कंपनीचा अर्ज विचारांत घेतला. निलगिरींतील पैकारा नदीच्या पाण्याचा पुरवठा करणारा प्रांत आपल्या ताब्यांत असावा व तेथें सर्व पाणी जमा करण्याचा सर्व हक्क आपणास असावा असें या इंग्रज कंपनीचें मागणें होतें. विद्युच्छक्तीची वाढ करण्याकरितांच या कंपनीला पाण्याचा सर्व हक्क हवा होता.

सं स्था ना नी ल जं ग लें.—या संस्थानचा जवळ जवळ ६०५ चौरस मैल प्रदेश जंगलानें व्यापिला असून तीं संस्थानच्या उत्पन्नाची मुख्य बाब आहे. जंगलाचे उत्तर व दक्षिण असे दोन भाग असून त्या प्रत्येकावर एक असिस्टंट कॉन्झरव्हेटरची नेमणूक केली आहे व या दोघांवर कॉन्झरव्हेटर देखरेख ठेवितो. पहिल्या भागांत मचाड व चित्तूर या दोन डोंगर ओळींचा समावेश होत असून दुसऱ्या भागांत कोदास्सेरी व परंबिकोलम् या दोन रांगा आहेत. या दोन्हींहि भागांत साग, शिसवीचें लाकूड व टेंबुरणीचें लाकूड व इरूळ, अईनी व्हेंगाई वगैरे सर्पण उत्पन्न होतें. परंबिकोलम, नेलिम्पथिस व कोदास्सेरी या रांगांत उत्तम इमारती लाकडाची पैदास होते. याशिवाय जंगलांचें इतर उत्पन्न म्हटलें म्हणजे वेलदोडे, मध, मेण वगैरे जिन्नस होत. संस्थानांतील लोकांस जंगलांतून सर्पण, च्या मोळ्या, बांबू, कुंपणाचे कांटे, खताकरितां पालवी, शेतकीचीं आउतें करण्याकरितां लाकूड, चारा, झोपडीचें गवत हीं फुकट घेऊन जाण्याची मोकळीक आहे. १९०३-४ साली संस्थानास जंगलाचें उत्पन्न ५८४००० रु. झालें. या संस्थानांत चुनखडी, ग्रानाइट व लॅटराइट या दगडाच्या खाणी असून लोखंड व अभ्रक या धातूहि सांपडण्यासारख्या आहेत.

व्या पा र व उ द्यो ग धं दे —या संस्थानांतील चित्तूर व तलपिल्ली तालुक्यांत सुती कापड निघतें. सुबक कापड विणणें झाल्यास परकीय सुताचा उपयोग करतात. वदक्कांचेरी येथें निरनिराळ्या रंगाच्या उत्तम गवती चटया होतात. एर्नाकुलम व मत्तांचेरी येथें काथ्याच्या चटया व गालीचे तयार होतात.

या संस्थानांतील मुख्य औद्योगिक कारखाने म्हटले म्हणजे खोबऱ्याचें तेल काढण्याचे होत. याशिवाय येथें रोजच्या उपयोगांतलि मातींचीं भांडीं तयार होत असून त्रिचूर व मुकुंदपुरम् तालुक्यात दोन दोन कवलें व विटा तयार करण्याचे कारखाने आहेत. त्रिपिन येथें व शोरानूर जवळ लांकूड कापण्याच्या गिरण्या आहेत. मत्ताचेरी येथें नारळाच्या काथ्याचे दोर करण्याचे विजेचे कारखाने आहेत. विणकामाच्या धंद्यांत साधारण प्रगति झालेली असून त्रिचूर येथलि कातण्याच्या व विणण्याच्या सिताराम गिरणीचें भांडवल १९२० मध्यें वीस लाख रुपये इतकें वाढलें १९२३ सालीं एकंदर ३०० माग यांत्रिक शक्तीनें चालणारे असे होते खोबरेल तेलाचा व्यापार एवढा वाढला आहे कीं, व्यापाराकरिता समुद्रातून जाणारीं मोठालीं जहाजें थेट बंदरात येतात. इ स. १९२१ च्या खानेसुमारी प्रमाणें यंत्रानें चालणाऱ्या तेलाच्या गिरण्या ९ आहेत. तीन चिरकामाच्या गिरण्या असून, तेथें ४०० लोक काम करितात कौल व विटाचे पाच कारखाने असून तेथील कामकऱ्याची संख्या ४०० आहे. सहा रबराचे कारखाने आहेत. व तेथील कामकऱ्याची संख्या १४०० आहे. उपरिनिर्दिष्ट कारखानेच संस्थानांतील मोठया औद्योगिक संस्था होत. इ. स. १९२२-२३ सालीं छलकुडी येथें ६०,०००रुपये भांडवलाचा एक मातीच्या भांड्याचा कारखाना स्थापण्यांत आला आहे.

या संस्थानांतून खोबऱ्याचें तेल, सूत, दोर, नारळाच्या दोऱ्या व चटया, खोबरें, सुपारी, सुंठ, मिरीं, मासे इत्यादि जिन्नस बाहेर पाठविले जातात; व बाहेरून तांदूळ, कापूस, सुती कापड; चाकू, कात्र्या, साखर वगैरे जिनस येतात.

१९०२ सालीं मद्रास रेल्वे कंपनीनें शोरानूरपासून एर्नाकुलम्पर्यंत एक आगगाडीचा रस्ता बांधला. एक ६५ मैल लांब असलेला व ७० लाख रुपये खर्च लागलेला रस्ता संस्थानिक सरकारनें बांधला असून तो मद्रास रेल्वे कंपनी उपयोगात आणीत आहे. शोरानूर–नीलावर रेल्वे काढण्याची वाटाघाट चालू आहे. संस्थानांतील पक्क्या रस्त्याची लांबी ३९१ मैल; कच्च्या रस्त्याची लांबी ५६ मैल आहे. याशिवाय समुद्रालगत जलमार्गानें व्यापार चालतो.

नवीन रस्ते बांधले जात असून सध्याची ट्राम्वेगाडी, संस्थानच्या रानांतील उत्पन्नाच्या वाहतुकीकरिता अपुरी पडत असल्यामुळें तिचें क्षेत्र वाढविण्यात येत आहे. वाहतुकीकरिता कायमच्या खुल्या असलेल्या रस्त्याची लांबी बळणाचे दोन्ही रस्ते धरून ५२ मैल आहे

राज्यव्यवस्था—कोचीन संस्थानाचे उत्तर व दक्षिण असे दोन भाग केले असून त्यांचीं मुख्य ठिकाणें अनुक्रमें त्रिचूर व एर्नाकुलम् हीं आहेत. यापैकीं प्रत्येक भाग एका अंमलदाराच्या ताब्यांत असून त्यास पेशकार ? संज्ञा आहे. हा अंमलदार जिल्ह्याचा न्यायाधीश असून त्याचा हुद्दा इंग्रजी मुलुखांतील कलेक्टराच्या बरोबरचा असतो. उत्तर भागात त्रिचूर तलपिल्ली व चित्तूर, हे तालुके असून दक्षिण भागात कनयनूर, कोचीन, क्रागनूर व मुकुंदपुरम् हे तालुके आहेत.या प्रत्येक तालुक्यावर एका तहसिलदाराची नेमणूक केली असून त्याला दुय्यम प्रतीच्या न्यायाधिशाचा अधिकार असतो. याशिवाय नेम्मारकुन्नमकुलम् व अदूर येथें तीन स्थायिक व मदतगार न्यायाधीश नेमले आहेत. तालुक्याचे आणखी ४४ विभाग आहेत या सर्वांवर दिवाण हा मुख्य प्रधान असून त्याच्यावर सर्व राज्यव्यवस्थेची जबाबदारी असते.

संस्थानचे एकंदर उत्पन्न सुमारें ३० लाख आहे. ब्रिटिश सरकारला खंडणी २ लाख रु. द्यावी लागते. सध्या संस्थानात इंग्रजी अमलाखालील प्रदेशांत प्रचलित असलेली हिंदी नाणीं प्रचारात आहेत.

१८६५ त इंग्रज सरकारानें १,१०,५०० रु उत्पन्नाची हमी घेतल्यावर संस्थानिक सरकारनें तंबाखूच्या मक्त्याची वहिवाट बंद केली. संस्थानांतील इकडून तिकडे जाणाऱ्या मालावरील जकात उठविली; आपल्या बंदरावरील जकात इंग्रजी बंदरावरोबर आकारण्याचें ठरविलें व मलबार जिल्ह्यांतील भावानें आपल्या मुलुखात मीठ विकण्याचें ठरविलें.

दिवाणी न्याय देण्याचें काम सहा मुन्सफकोर्टे, दोन जिल्हाकोर्टे व एक मुख्य कोर्ट यांजवर सोपविलें आहे. फौजदारी न्याय देण्याचें काम मुख्य कोर्ट, दोन सेशन कोर्टे, दोन पहिल्या प्रतीचे जिल्हान्यायाधीश दहा दुय्यम प्रतीचे अथवा तिसऱ्या दर्जाचे न्यायाधीश यांजवर सोंपविलें आहे. मुख्य कोर्टाचा निकाल कायम असतो. पण फाशीच्या शिक्षेस मात्र राजाची संमति लागते. मुख्य कोर्टांत तीन न्यायाधीश असून त्यापैकीं एक युरोपियन बॅरिस्टर असतो.

कायदे करण्याकरिता ७ सभासद व एक अध्यक्ष यांची एक सभा नेमली असून तिची मुदत तीन वर्षेपर्यंत असते. कायदा करावयाचा झाल्यास पहिल्यानें या सभेस कायद्याचा मसुदा करण्याविषयीं विनंति करण्यात येते; व मसुदा तयार झाल्यावर दिवाण त्यात योग्य ते फेरफार करून तो रेसिडेंटामार्फत मद्रासस्सरकाराकडे पाठवितो. मद्रास सरकारानें तो पसंत केल्यावर तो राजापुढें सादर करण्यात येतो व त्याची संमति मिळाल्यावर त्याला कायद्याचें स्वरूप प्राप्त होतें. कधीं कधीं कायदेमंडळाला न विचारतां देखील मसुदा तयार करण्यात येतो. विशेष प्रसंगीं राजा आपल्या नावानें हुकुमनामे काढतो व हे हुकुमनामे कायदेच समजले जातात संस्थानचें लष्कर ३७६ शिपायांचें आहे. संस्थानात एकंदर ५९३ पोलिसशिपाई आहेत. १९२०–२१ सालीं एकंदर १७१ सरकारी व २७३ निमसरकारी संस्था होत्या. जुलै १९२३ मध्यें शाळेंतील मुलांना अनेक सवलती

देऊन, मागसलेल्या वर्गामध्ये शिक्षणप्रसार करण्याचा कोचीनसरकारनें प्रयत्न केला शैक्षणिकदृष्ट्या 'मागसलेले' व 'खालावलेले' असा भेद करून, संस्थानातील इंग्रजी शाळांतून शिक्षण मोफत देण्याची संस्थाननें तजवीज केली कारण लोकांच्या वाढत्या दारिद्र्यामुळें अर्धी फी ठऊनहि शाळेतील मुलांची संख्या कमी होऊ लागली होती एर्नाकुलम येथें एक कॉलेज आहे संस्थानात एकदर ३३ दवाखाने व इस्पितळ आहेत

ता लु का—हा एक समुद्रकिनाऱ्यावरील विभाग व तालुका असून मद्रास इलाख्यातील मलबार जिल्ह्याच्या दक्षिणेस आहे याचे एकदर क्षेत्रफळ २ चौरस मैल आहे याची लोकसंख्या १९०१ साली ७५८५९ होती या तालुक्याचें मुख्य ठिकाण कोचीन बंदर आहे

श ह र—हे कोचीन संस्थानच्या सरहद्दीतील समुद्र किनाऱ्यावर वसलें आहे शहराच्या उत्तर भागात कित्येक डच घरें दृष्टीस पडतात हें शहर एक उत्तम बंदर असून तेथील पाण्याची खोली ७ पासून ९ पुरुष आहे मध्या आगबोटी या बंदराच्या दोन मैल अंतरावर उभ्या राहतात

पहिल्यान हें शहर एका लहानशा नदीच्या काठीं होतें पुढें १३४१ त या नदीस महापूर आला व महापुराच्या योगानें जवळच्या प्रदेशाचे स्वरूप अगदीं बदलून जाऊन पूर्वीच्या ठिकाणीं बंदर व व्हिपीन बेट हीं अस्तित्वात आलीं अशी दंतकथा आहे

इ ति हा स—या शहराचा स्वतंत्र इतिहास पोर्तुगीजांच्या आगमनापासून सुरु होतो इ स १५०० साली येथें कॅब्राल आला होता याचा येथील राजानें चांगला सन्मान केला हा मिरी घेऊन पोर्तुगाल देशास परत गेला १५०२ मध्यें येथें व्हास्कोन्डगामा येऊन त्यानें एक वखार स्थापन केली १५०३ मध्यें अल्बुकर्क येथें येऊन त्यानें येथील राजास झामोरिन विरुद्ध मदत केली पुढें झामोरिनला परतवून लावल्यावर अल्बुकर्कनें येथें मॅनुअल कोटा नावाचा एक किल्ला बांधला १५०४ मध्यें झामोरिनन या किल्ल्यावर चाल केली पण पॅचेकोनें त्याचा हल्ला परतवून लाविला १५०५ साली या शहरीं अलमेडा नावाचा पोर्तुगीज गव्हर्नर येऊन त्यानें किल्ल्याची डागडुज केली १५३० मध्यें येथें सेंट फ्रॅंसिस झेवियर यऊन त्यानें पुष्कळ लोकांस खिश्चन धर्माची दीक्षा दिली १५७१ त जीसस नामक मंडळानें एतद्देशीय लिपींतील पहिलें पुस्तक प्रसिद्ध केलें १५८५ त येथें राल्फ फिश नावाचा पहिला इंग्रज प्रवासी आला होता १६३४त ईस्ट इंडिया कंपनीनें येथें आपलें ठाणें वसविलें १६६३ त हें शहर डच लोकानी काबीज केलें डच अमदानींत येथील व्यापार बराच वाढला व येथील जकाती वसुलाचा आकडा ३०००० रु यावर येऊन ठेपला डच लोकांनीं या शहराच्या रचनेंत बरेच फेरफार केले १७९५ त इंग्रज लोकानीं हें शहर हस्तगत केलें १८१४ त हें शहर पूर्णपणें इंग्रजांच्या ताब्यात आलें

हें शहर मलबार किनाऱ्यावरील तिसऱ्या दर्जाचें बंदर आहे १९०२-४ सालं येथील आयात व निर्गत व्यापार अनुक्रमें ८२ व २०८ लाख किंमतीचा होता येथून मुख्यत्वेंकरून खोबऱ्याचें तेल व नारळाचे दोर बाहेरगावें जातात येथें बाहेरून येणारे मुख्य जिन्नस म्हटले म्हणजे ब्रह्मदेश व बंगाल प्रांतांतून येणारा तांदूळ होय येथील व्यापार चे इतर जिन्नस म्हटले म्हणजे मिरी, इमारती लाकूड, सूत, सुती कापड व घासलेट तेल हे होत

मद्राससरकारच्या योजनेप्रमाणें १९२१ मेमध्यें कोचीन येथें बंदर करण्याच्या कामास आरंभ झाला १९२३ त प्रयोगात्मक काम बहुतक पुरें झालें या कामाचा मूळ अंदाज ६ लाख होता तो ९लाख झाला. कारण बंदराच्या आतील भागातील गाळ काढून खाली बादविणें जरूर झालें होतें काम लवकर व्हावें म्हणून १९२२ त एक नवीन गाळ काढण्याचें यंत्र आणलें या योजनेच्या दुसऱ्या विभागाचा अंदाज ७५ लाख झाला १९२३ मध्यें या योजनेचा प्रयोगात्मक भाग यशस्वी झाला कारण मूळच्या कोचीन बंदरांतील गाळ यंत्राच्या साहाय्यानें नाहींसा झाला या बंदराचा अंतर्बाह्य छेद करण्यात आल्यानें इष्ट परिणाम झाला कारण बंदरातील खोल पाण्यामुळें वेणदुरुटी नावाचें बेट व एर्नाकुलम् या दोहोंमधील खोल पाण्या जोडलें गेलं व नियोजित दिशेनें पाण्याची भरती ओहटी सुरु झाली

येथील हवा दलदलीत उष्ण असून पाणी विकारी आहे येथें ५१६ हायस्कुलें व तितक्याच मिशनरी संस्था आहेत इंग्रजी व मल्याळी भाषेतली मासिकें, वर्तमानपत्रें निघतात

२ फ्रेंच इंडो-चीनच्या अगदीं दक्षिण टोंकाला ही एक फ्रेंचाची वसाहत आहे याच्या पश्चिमेस सयामचें आखात वायव्य व उत्तर-कॅम्बोडिया, पूर्वेस-अनाम, आग्नेयीस चीनचा समुद्र आहे क्षे फ ९५६०००चौरस मैल लोकसंख्या१९१० २९

भू व र्ण न—हा देश एक सुपीक मैदान आहे अनाम हा पर्वत आहे मेकाग, डोनाय, सायगॉन, आणि वैको या मुख्य नद्या आहेत य ची हवा उष्ण व सर्द आहे पावसाळा एप्रिल ते आक्टोबरपर्यंत असून पाऊस अति पडतो उन्हाळा एप्रिल त जूनपर्यंत असतो यात वाघ चित्ता, मुंगुस, डुकर, हरीण, रेडा गेंडा, हत्ती, वानर इ बदकें जलचर पक्षी सर्प वगैरे प्राणी आढळतात

उ त्प न्न आ णि ध दे—तांदूळ,मिरी, ऊंस, सुद कापूस, तंबाखू आणि साग शेतीकडे रेडे आणि घोडे याचा उपयोग विशेष करतात तांदुळच्या गिरण्या साखर तांदुळाची दारू, रेशीम, मासे आणि मीठ हे मुख्य धंदे आहेत येथून तांदूळ वाळलेले अथवा खार मासे, मिरी कापूस वगैरे माल निर्गत होतो येथील आयात-पक्का माल, धातू, लोखंडी सामान, यंत्रसामुग्री, चहा, मद्यें, खनिज तेलें, अफू, कागद,

हत्यारें आणि बंदुकीची दारू. या देशात सायगान आणि मिथो हीं मुख्य बंदरें आहेत.

रा ज्य व्य व स्था.—कोचीन चायना येथें एक लेफ्टेनंट गव्हर्नर नेमला असून तो इंडो-चायना येथील गव्हर्नर-जनरलच्या हुकमतीखालीं असतो. त्याचें एक १६ जणाचें मंडळ असतें. पैकीं ६ सभासद फ्रेंच नागरिक ६ तद्देशीय आणि ४ सायगॉन येथील व्यापारी मंडळ आणि सल्लागार मडळ यांनीं निवडलेलें असतात. या मंडळाकडे सर्व प्रकारचीं कामें सोंपविलेलीं असतात. कौन्सिलप्रिव्हि हें सल्लागार मंडळ असून यात २ तद्देशीय सभासद असतात वसाहतीचे ४ भाग केले आहेत. प्रत्येक भागाच्या अधिकाऱ्याला इन्स्पेक्टर म्हणतात. या भागाचे २० प्रांत आहेत. प्रत्येक प्रांतावर एक ॲडमिनिस्ट्रेटर व प्रांतिक कौन्सिल असतें. प्रांताचे जिल्हा आणि काम्यून असे भाग असतात काम्यूनमधील सर्व व्यवस्था तद्देशीय लोकांच्या हातीं असते. प्रत्येक काम्यून एक मेंबर प्रांतिक कौन्सिलाकरिता निवडते मेयर व दोन सल्लागार हे सर्व गावची व्यवस्था ठेवतात. जमीनमहसूल आणि डोईपट्टी ही उत्पन्नाचीं साधनें आहेत.९ मुख्य शहरात फ्रेंच न्यायकोर्टें असून ४ शहरात फौजदारी कचेऱ्या आहेत. या कचेऱ्यात फ्रेंच किंवा अनामी कायद्याप्रमाणें निकाल देण्यात येतो. दोन अपीलकोर्टें आहेत. जवळ जवळ ६०० प्राथमिक शाळा आहेत. सायगॉन राजधानी असून तीनचार मोठीं शहरें आहेत.

इ ति हा स.—कोचीनचीनचा प्राचीन इतिहास ज्ञानकोश वि. ९ यात आलेला आहे ( पा. १९६–१९७ ). ९ पासून १२ व्या शतकापर्यंत कोचीनचीन हा ख्मेर राष्ट्राचा भाग होता. नंतर १५ व्या शतकापर्यंत चंपा राज्याच्या सत्तेखालीं आला १७ व्या शतकात याचा पूर्वभाग आणि १८ व्यात पश्चिम भाग अनामी लोकांनीं घेतला. १८६७ मध्यें अनामी लोकापासून फ्रेंचानीं कोचीन-चायना घेतला. १८८७ मध्यें याचा इंडो-चायना यात समावेश करण्यात आला.

**कोचिनील किडे**—या किड्यापासून किरमिजी, शेंदरी व नारिंगी रंग तयार होतो. याना लॅटिन नाव कोकस कॅक्टि असें असून इंग्रजींत कोचिनील असें म्हणतात. आणि आपल्याकडे किरमदाणा, किरमझ, किरंदा, अथवा किर्मि असें संबोधितात. याच्यातील मायापासून रंग बनविता येतो. हा किडा कोसिडेश्रेणींतील आहे. हा मूळचा मेक्सिको व पेरु आणि दक्षिण व मध्य अमेरिका या देशांतील असून याची उपजीविका मुख्यतः फड्या निवडुंग ( आणि त्याच्या निरनिराळ्या जाती)यावर होते.यूरोपात हा किडा इ.स.१५१८ च्या सुमारास मेक्सिकोंतून स्पॅनिश लोकांनीं आणला. मेक्सिकोमध्यें याच्या पासून होणाऱ्या रंगाचा समावेश राजेरजवाड्याना करावयाच्या नजराण्यात करीत असत.रंगकला इटलीमध्यें इ.स. १५४८ च्या सुमारास जरी वाढत्या प्रमाणात होती, तरी या किड्याची इकडे माहिती नव्हती असें दिसतें. तिकडे इ. स. १६५० त शेंदरी रंग करण्याच्या वेळीं याचा प्रथम उपयोग करण्यात आला. इ. स. १७२५ पर्यंत तर या किड्याच्या सजीवपणाबद्दलच शंका होती. तें एखाद्या क्षुद्र-पाचें बीं असावें असेंच समजलें जाई. कारण ते किडे अतिशय सूक्ष्म असतात. सूक्ष्मदर्शक यंत्रानेंहि त्याच्यातील नर व मादी याची ओळख पटत नाहीं. नर हा मादीच्या निम्म्यानें लहान असून त्याला पाढरे पख असतात. त्याचा रंग तावडा लाल असतो. मादीला पख नसतात व तिचा रंग पिंवळसर असतो आणि त्याची संख्या ( नरापेक्षा ) जास्त असते एका नरामागें २०० ते ३०० मादा असें हें प्रमाण पडतें. अंडीं घातल्यावर मादी मरते व तिचेंच मेलेलें शरीर अंड्याना पुरेशी ऊब मिळण्याच्या उपयोगी पडतें हल्लीं स्पेन व अल्जिअर येथेंहि याची जोपासना करितात. तिकडे वर्षांतून तीन वेळा याचा संग्रह करितात. त्याना फड्या निवडुंगावरून हळूच काढून पिशव्यात घालून पिशव्या ऊन पाण्यात अगर वाफेत सोडतात किंवा नुसत्या उन्हातहि ठेवतात अशा कृतीनें किड्याना मारतात. ह्या मेलेल्या किड्याचा आकार चमत्कारिक वाकडा तिकडा बनतो एक पौंड कोचिनील रंग तयार करण्यास असले सत्तर हजार किडे लागतात. याच्या मुख्य दोन जाती आहेत त्या रुपेरी व काळ्या रंगाची या होत. रुपेरी रंगाचा किडा करडा–तांबूस रंगाचा असून त्याच्या अंगावर चकचकीत पांढऱ्या रंगाच्या वळ्या असतात. काळ्या जातीच्या किड्याचा रंग पिंवळसर तांबूस असा काळा असतो व त्याला चकाकी नसते. पहिल्याची पैदास करावी लागते व दुसऱ्या जातीचा किडा आपोआप उत्पन्न होतो. ग्रॅनिला नावाची एक हलकी तिसरी जात आहे. पहिल्या वेचणीचे किडे फार उत्तम असतात. कारण त्यातील माद्या गाभण नसतात. पुढील वेच्यातील किडे लहान मोठे व मेलेल्या किड्याचे सागाडे याचें मिश्रण असल्यानें त्यातून थोडाच रंग उत्पन्न होतो. काळ्या रंगाच्या किड्यावर अभ्रक भस्मासारखी पांढरी पूड वगैरे टाकून ते रुपेरा म्हणून लुच्चेगिरीनें बाजारात विकतात. परंतु सूक्ष्मदर्शक यंत्रानें ही लबाडी समजून येते या किड्याच्या अंगातच असलेल्या कोचिनिएलीन किंवा कार्मिनिक या(कृ उ,७ प्र.) आम्लापासून दिलेले रंग उत्पन्न करतात. या किड्यापासून मेणहि तयार करिता येतें हिंदुस्थानातहि याची पैदास करितात. रुपेरी किडे हे जास्त मौल्यवान असतात. याची आपल्याकडे पैदास करण्याचे येथील सर्व प्रयत्न निष्फळ झाले आहेत. सतराव्या शतकात पोर्तुगीजानीं हा किडा हिंदुस्थानात आणण्याचा प्रयत्न केला असें म्हणतात. कारण मद्रासेहून त्यावेळीं डॉ. अंडरसन यानें असल्या रंगाचें किडे सर बँक्स याला पाठविले होते पुढें ईस्ट इंडिया कंपनीनें कॅ. नेलसनकडून ब्राझिलमधून हे किडे (वसलेल्या नाग फणीसह) इ. स. १७९५ मध्यें आणले. हे दुसऱ्या( काळ्या )जातीचे होते. आपल्याकडे कांहीं किडे फड्या निवडुंगाचीं लाल फुलें तर कांहीं किडे

पिवळीच फुलें खातात. यावरून या दोन जाती असाव्यात असें म्हणतात. लाल फुलें खाणारे हे अधिक दिवस जगतात असें डॉ बोनेला म्हणतो. हे जन्मल्यानंतर कांहीं दिवसांनी निवडुंगास चिकटून बसतात. जेव्हां त्याची चलनशक्ति जाते तेव्हां रुपेरी किड्याच्या भोंवती एक पांढरा कोशेटा ( लवी ) गुंडाळला जातो. या वर्गनात नर व मादी दोन्हीं असतात. नराच्या खालीं एक उघड्या तोंडाची पिशवी बनत जाते. ती पुरी झाली कीं, नर बाहेर पडतो. तो दूर न जातां जवळच्या गुरफटलेल्या मादीच्या आसपास फिरतो व तो थोड्याच दिवसांत मरतो. मादी कोशेट्याबाहेर पडतच नाहीं ती आधळी होऊन तिच्या शरीराचा आकारहि बदलतो. मात्र ती निवडुंगांतील रस आपल्या नागीवजा नळीतून मिळवून आपलें पोषण करिते. बहुतेक तीन महिन्यांनीं तिला संतति होते. ती गाभण होण्यापूर्वींच तिला उत्तम रंग करण्यासाठी वेचून मारावी लागते हें वर सांगितलेंच आहे. स्टोव्हवर किडे वाळविल्यास कोशेटा राहूनहि भारी कोचिनील तयार होते. वाफेनें अगर ऊन पाण्यानें किडे मारल्यास कोशेटा नाहींसा होऊन काळें कोचिनील बनतें. या कोचिनीलचा उपयोग पूर्वी, लोंकर, रेशीम व कापूस रंगविण्यांत फार होई. परंतु अलीकडे अनिलीन ( डामरा )पासून होणारे रंग निघाल्यामुळें याचा उपयोग फक्त औषधें मेवामिठाई आणि चित्रकाराचे कांहीं रंग यांच्याच कामीं होतो. रुपेरी किड्याचा कोशटा हा सुद्धां मौल्यवान असतो. कारण तो कोसेरीन नांवाच्या मेणापासून बनलेला असतो. लोंकरीला शेंदरी रंग देतांना कोचिनीलबरोबरच रंगबंधकारक कथलाचा क्षार वापरतात; त्याच वेळीं तुरटीहि वापरल्यास किरमिजी रंग तयार होतो. यावरील क्षाराचें व अल्युमिनाचें मिश्रण कोचिनीलबरोबर करून त्यापासून तयार केलेला रंग व लाल शाई आणि चित्रकाराचे रंग अलीकडे बरेच विकत मिळतात. याच जातीपैकीं नाकाराट कार्मीन नांवाचा एक उत्तम रंग मिळत असतो. फ्लोरेन्टाइन नांवाचा रंगहि कोचिनीलपासून तयार होतो. फार वेळ उन्हांत राहिल्यास हे सर्व रंग फिके पडतात. अनिलीन रंगामुळें याचा खप कमी होत चालला आहे. इ स. १८९९–१९०१ या वर्षांत हिंदुस्थानांत सरासरी १५८३ हंड्रेडवेट कोचिनीलची आयात झाली होती. हल्लीं ती कमी होत चालली आहे. ही आयात बहुतेक फ्रान्स व अमेरिका या देशांतून होते [ वॅट–कमर्शि. प्राडक्ट्स्. पृ. ३४७ ]

कोट—पंजाबांतील अटक जिल्ह्याच्या फत्तेजंग तहशिलींतील एक जहागीर. हिचें क्षेत्रफळ ८८ चौरसमैल आहे. पूर्वी या ठिकाणीं घेबा जातीचें स्वतंत्र राज्य होतें. या जातीचे मुख्य बाह्यतः शिखांचे मांडलिक म्हणून म्हणवीत. पण वस्तुतः त्यांची सत्ता अबाधितच होती. १८३० मध्यें सैयद अहमद नांवाच्या एका धर्मवेड्या मुसुलमान पुढाऱ्याविरुद्ध रणजितसिंगाला येथील राय महंमद नांवाच्या एका मुख्य अधिकाऱ्यानें मदत केली. त्यामुळें रणजितसिंगानें त्याला ही जहागीर दिली. इ.स. १८५७ सालच्या बंडांत रायमहंमद यांच्या फत्तेखाननामक मुलानें ब्रिटिशांना मदत केली. व त्यामुळें इंग्रज सरकारनें खूष होऊन त्याला कांहीं जहागीर बक्षीस दिली. फत्तेखान हा १८९४ सालीं मरण पावला. त्यानंतर १९०३ पर्यंत सरदार महंमदअलीखान यानें राज्य केलें. नंतर त्यांचा मुलगा गादीवर आला. तो सज्ञान होईंपावेतों त्याच्या जहागिरीची व्यवस्था कोर्ट ऑफ वार्डसच्या ताब्यांत होती. कोट जहागिरींत २७ खेडीं आहेत व या जहागिरीचें सालीना उत्पन्न ४४०० रुपये आहे. कोटचे जहागिरदार घोड्यांचे फार शोकी असल्यानें त्यांच्यापाशीं चांगले जातिवंत घोडे असतात, व चांगल्या घोड्यांची निपज करण्याच्या बाबतींत ते अतिशय काळजी घेतात.

कोंट, ऑगस्ट (१७९८–१८५७)—हा प्रत्यक्षज्ञानवादी फ्रेंच तत्ववेत्ता मॉटपेलियर येथें जन्मला. त्या शहरांतल्या शाळेंत त्याचें शिक्षण प्रथम झालें व १८१४ मध्यें इकोल पॉलिटेक्निक या विद्यालयांत तो गेला. १८१६ मध्यें पॅरिस येथें राहून गणितविषय शिकवून तो पोटास मिळवूं लागला या वयांत बेंजामिन फ्रँक्लिनला तो अगदीं देवाप्रमाणें मानीत असे. पॅरिसमध्यें त्याला वार्षिक प्राप्ति ८० पौंड होत असे आणि तारुण्यांतील सुखोपभोग घेण्याची आवड असूनहि अधिक पैसा मिळविण्याकरितां स्वातंत्र्य गमावण्यास तो तयार नव्हता म्हणून थोडक्या खर्चांत तो रहात असे.

१८१८ मध्यें सेंटसायमन या विद्वानाशीं त्याचा परिचय होऊन त्याच्या आचारविचारावर महत्वाचा परिणाम झाला राजकीय गोष्टींनाहि नियमबद्ध शास्त्र असूं शकतें, आणि तत्वज्ञानाचें अंतिम ध्येय मानवसमाजाचें कल्याण होय, या दोन मूलभूत कल्पना कोंटनें सेंट सायमनपासूनच घेतल्या. व त्याच्याच शिकवणुकीनें समाजाची नैतिक, धार्मिक व राजकीय पुनर्घटना कोणत्या तत्वानुसार व्हावयास पाहिजे त्याचा विचार करण्यास तो प्रवृत्त झाला.

१८२५ मध्यें कोंटनें कॅरोलाइन मॅसिनबरोबर लग्न केलें. पण हा संबंध त्याला सुखावह झाला नाहीं १८२६ मध्यें प्रत्यक्षज्ञानवादी तत्वज्ञाना( पॉझिटिव्ह फिलॉसफी )संबंधानें त्यानें आपले विचार पॅरिसमधील लोकांपुढें व्याख्यानमालेद्वारा मांडले. हीं पहिलींच त्याचीं व्याख्यानें इतकीं सरस झालीं कीं, विश्वरचनाशास्त्रज्ञ हंबोल्ट, भूमितिशास्त्रज्ञ पॉइनसॉट, इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञ ब्लेनव्हिल वगैरे थोर विद्वान तीं ऐकण्यास येत असत. दुर्दैवानें या मालेंतल्या तिसऱ्या व्याख्यानानंतर कोंटचा मेंदू एकाएकीं बिघडला या अजारीपणांत त्यानें त्रासून सीननदींत उडी टाकली. पण वेळेवर मदत पोहोंचल्यामुळें तो वाचला. १८२८ मध्यें त्यानें आपली व्याख्यानमाला पुरी केली व १८३० मध्यें आपल्या 'प्रत्यक्षज्ञानवादी तत्वज्ञान" या ग्रंथाचा पहिला भाग प्रसिद्ध केला. त्याचा शेवटचा सहावा भाग १८४२ मध्यें प्रसिद्ध झाला

ही मध्यंतरीची बारा वर्षें त्याची सतत दीर्घोद्योगांत गेली, व सांपत्तिक दृष्ट्या सर्व हयातींत हाच त्याचा काळ साधारण बरा गेला. १८३३ मध्यें पॅरिस येथील इकोल पॉलिटेक्निक विद्यालयाच्या प्रवेश परीक्षेचा परीक्षक त्याला नेमण्यांत आलें. त्याचें व दुसऱ्या गणिताच्या शिकवण्याचें मिळून त्याला सालीना ४०० पौंड वेतन मिळूं लागलें.

१८३१ पासून १८४८ पर्यंत कामाचा बोजा फार असतानाहि तो ज्योतिषशास्त्रावर मोफत सार्वजनिक व्याख्यानें देत असे. याच भावनेखातर त्यानें राष्ट्रीयसंरक्षक सैन्यांत नोकरी करण्याचें नाकारून तुरुंगवास पत्करला व जुलै महिन्यांत स्थापन झालेल्या राजसत्तेविरुद्ध शस्त्र धरण्याचें नाकारलें. उलटपक्षीं तो लोकसत्ताक राज्याचा पुरस्कर्ता असल्यामुळें त्यानें राजसत्तेचें संरक्षण करण्याची शपथ घेण्याचेंहि नाकारलें. त्याच्या आयुष्यांतला करमणुकीचा एकच विषय संगीत नाट्यप्रयोग पाहणें हा होय. तारुण्यारंभी दुःखपर्यवसायी नाटकाचा तो शोकी होता, नंतर तो सुखपर्यवसायी नाटकांना जात असे शेवटीं संगीत नाटकांनाच तो फक्त जाऊं लागला. पण अखेर सांपत्तिक स्थिति इतकी खालावली कीं या सुखसाधनाला लागणारा खर्चहि त्याला झेपेना.

१८४२ मध्यें प्रत्यक्षज्ञानवादी तत्वज्ञान या त्याच्या ग्रंथाचा शेवटचा भाग बाहेर पडला. बारा वर्षांच्या दीर्घ परिश्रमाचा मोबदला म्हणून कसलेंहि समाधान न होता उलट कित्येक त्रासदायक गोष्टीच उपस्थित झाल्या. पहिली गोष्ट म्हणजे त्याचें बायकोशीं पटत नाहींसें होऊन अखेर १८४२ मध्यें त्यानीं एकमेकांना सोडचिठ्ठी दिली. दुसरी गोष्ट ही कीं, त्याच्या ग्रंथाच्या प्रकाशकानें ६व्या भागांत त्याच्या परवानगीवाचून कांहीं मजकूर छापला त्याबद्दल फिर्याद लावून स्वतःच्या तर्फे निकाल त्यानें करून घेतला. तिसरी गोष्ट म्हणजे ६व्या भागाच्या प्रस्तावनेंत पॉलिटेक्निक स्कूलच्या व्यवस्थापक मंडळीवर त्यानें टीका केली, व त्यामुळें परीक्षकाची जागा जाऊन त्याची वार्षिक प्राप्ति निम्म्यानें कमी झाली. १८४२ च्या पूर्वीपासूनच जे. एस्. मिल व कॉंट यांचा पत्रव्यवहार चालू झालेला होता. आणि कॉंटचा प्रत्यक्षज्ञानवादी तत्वज्ञान हा ग्रंथ वाचल्यानें मिलला स्वतःचा तर्कशास्त्रावरील ग्रंथ लिहिण्यांत बरीच मदत झाली होती हें स्वतः मिलनें लिहून ठेवलेलें आहे. स्त्रीपुरुषांच्या समानतेबद्दलहि दोघांचा बराच वादविवाद चालू असे. मिल वगैरे इंग्रज लेखक त्याला पैशाची नेहमीं मदत करीत. कॉंटच्या ठिकाणीं फारशी कृतज्ञताबुद्धि नव्हती असें म्हणावें लागतें.

१८४५ मध्यें मॅडम क्लॉटिल्ड डी व्हॉक्स या स्त्रीशीं त्याचा परिचय झाला. तिचा नवरा आमरण गलबतावरील नोकरींत गुंतला होता. तिच्याशीं पत्रव्यवहार चालू होता. ती फार हुशार व सुस्वभावी होती व ती अखेरपर्यंत अगदीं तर कॉंटच्या उत्तरवयांतील कार्यावर तिचा फार चांगला परिणाम झाला असता असें म्हणतात. परंतु एक वर्षानंतर ती मरण पावली. मॅडम डी व्हॉक्सच्या मरणानें कॉंटची मनःस्थिति काय झाली होती हेंहि प्रसिद्ध आहे. तिच्या मरणानंतर दर बुधवारीं कॉंट तिच्या थडग्याच्या दर्शनास जात असे; व त्यांच्यामधील प्रेमसंबंधाला कॉंटच्या शिष्यांनीं डान्टे–बियाट्रिसची उपमा दिलेली आहे.

पॉझिटिव्ह फिलॉसफी हा ग्रंथ पुरा झाल्यावर १८५१ पासून १८५४ पर्यंत कॉंटनें आपला सिस्टिम ऑफ पॉझिटिव्ह पॉलिटी ( प्रत्यक्षज्ञानवादी राजनीतिशास्त्र ) हा ग्रंथ चार भागांत प्रसिद्ध केला. १८४८ च्या राज्यक्रांतीमुळें तयार झालेल्या राजकीय वातावरणाचा फायदा घेऊन त्यानें पॉझिटिव्ह सोसायटी या नांवाची संस्था काढली व तिला जॅकोबिन क्लबाप्रमाणें सामर्थ्यवान बनविण्याची आकांक्षा धरली त्यानें १८४९त पॉझिटिव्हिस्ट कॅलेंडर प्रसिद्ध केलें. त्यांत ख्रिस्ती साधूंच्या नांवाऐवजीं ज्यांनीं जगांतील सुधारणेच्या प्रगतीस मदत केली अशा थोर पुरुषांचीं नांवें दिलेलीं आहेत. १८४९, १८५० व १८५१ या तीन सालीं त्यानें तीन व्याख्यानमाला गुंफून आपला 'साक्षात्वाद' श्रोत्यांपुढें जोरदार भाषेंत मांडला. तिसऱ्या व्याख्यानमालेच्या अखेरीस त्यानें पुढील प्रमाणें सडेतोड उद्गार काढले. "अखिल भूत व भविष्य काळ यांना साक्षी ठेऊन अखिल मानव जातीचे कल्याणकर्ते—तात्विक व व्यावहारिक दोन्ही बाबतींतील लोकसेवक—या जगाची अखिल नियंत्रणसत्ता आपल्या हातीं घेण्याकरितां पुढें येत आहेत. नैतिक, बौद्धिक व भौतिक या तिन्ही प्रकारच्या व्यवसायांची सर्व सत्तामध्यें ईश्वरी शक्ति म्हणून म्हणतात ती त्यांना स्वतः आपणच बनवावयाचें आहे. आणि म्हणून ईश्वराचे प्रेषित असल्याचा बहाणा करून जे कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट किंवा डीइस्ट वगैरे धर्मपंथी लोक आजपर्यंत राज्यसत्ता बळकावून बसलेले आहेत ते सर्व मागासलेले व समाजांत विनाकारण बखेडा माजविणारे असल्यामुळें त्यांचें तेथून कायमचें उच्चाटण करावयाचें आहे."

१८५२ मध्यें कॅटेकिझम ऑफ पॉझिटिव्हिझम हें पुस्तक त्यानें प्रसिद्ध केलें, व त्याच्या प्रस्तावनेंत लुई नेपोलियनचें पार्लमेंटरी राज्यव्यवस्था बाजूस सारून एकतांत्रिक लोकसत्ताक पद्धति स्थापन केल्याबद्दल अभिनंदन केलें. पुढें तो निकोलस बादशहाला अखिल ख्रिस्ती जगांतला अद्वितीय मुत्सद्दी मानूं लागला. १८५७ सप्टेंबर ५ रोजीं कॉंट खाद्यपुढीच्या रोगानें मरण पावला.

कॉंटची विलक्षण बुद्धिमत्ता व प्रतिकूल परिस्थितींतहि काम करण्याची जबरदस्त चिकाटी याबद्दल कोणालाहि आदर वाटतो. त्याची भाषा अवजड, फैलावलेली व कृत्रिम असे. त्याच्या सर्व ग्रंथांत वाचकांना चित्ताकर्षक वाटणारी गोष्ट म्हणजे फक्त त्याचे विचार व ग्रंथांतील

अत्यंत महत्त्वाचा व व्यापक विषय त्याच्या विचारांतहि उतारवयात वैयक्तिक दुराग्रहाची व केवळ तात्त्विकपणाची छटा फार असे. कारण त्यानें ' पॉझिटिव्ह फिलॉसफी ' हा ग्रंथ संपल्यापासून स्वतःचें ज्ञानभांडार परिपूर्ण असल्याचें ठरवून वृत्तपत्रें , मासिकें, शास्त्रीय ग्रंथ व नवे शोध याविषयींचें कोणतेंहि नवें पुस्तक वाचण्याचें अगीयात बंद केलें होतें कोंटचें समाजशास्त्र ' अर्थशास्त्र ' या लेखांत ( ज्ञानकोश, विभाग ५ पा ४६२ ) संक्षेपानें दिलेंच आहे. त्याच्या मध्यवर्ती प्रमुख कल्पना म्हणजे पुढील होत.

व्यक्तीप्रमाणें मानववंशहि ऐश्वरिक, आध्यात्मिक व प्रात्यक्षिक अशा तीन बौद्धिक अवस्थांतून जातच असतो. या प्रत्येक कल्पनादर्शेत विश्वचमत्कारांचें कर्तृत्व निरनिराळ्या कर्त्यांकडे दिलें असतें एक कल्पनेचा जगावरचा पगडा उठल्यानंतर दुसरी आपला पगडा बसवितें आज प्रत्येक सिद्ध केलेल्या गोष्टींवरच मनुष्याचा विश्वास बसतो. कोंट देव वगैरे मानत नाही. आपल्या ' फिलासॉफी पॉझिटिव्ह ' मध्यें त्यानें सामाजिक स्थितिशास्त्र व सामाजिक गतिशास्त्र यामध्यें मोठा भेद पाडिला आहे. पहिलें सामाजिक सह-अस्तित्वाचे तर दुसरें सामाजिक प्रगतीचे नियम अभ्यासितें कोंट समाजशास्त्राला सर्व शास्त्रांत पहिलें स्थान देतो. तथापि त्याला या शास्त्रानें फारच थोडें ज्ञान होतें

कोटकपुरा—पंजाबच्या फरीदकोट संस्थानांतील तहसिलीचें मुख्य ठिकाण. हें फरीदकोटपासून ७ मैलावर असून येथें नॉर्थ वेस्टर्न ( वायव्येकडील ) रेल्वेचें व राजपुताना माळवा रेल्वेचें स्टेशन आहे. लो. स. (१९११) १०६४. प्रथमतः हें अगदीं खेडें होतें; पण चौधरी कपूरसिंग यान नजीकच्या कोट इसाखान गावांतून लोक बोलावून येथें वस्ती करविली. १८४७ त हें गाव महाराजा रणजितसिंगानें फरीदकोट संस्थानास परत दिलें येथें धान्याचा मोठा व्यापार चालत असून एक बाजारहि आहे.

कोटगड—पंजाबात सिमला जिल्ह्यांतील कोटखाई व कोटगड हे दोन प्रदेश मिळून एक पोटतहसील होते लो. सं. ( १९११ ) १०८४१ मुख्य ठिकाण कोटखाइ या तहसिलीच्या सर्व बाजूला सिमल्याची डोंगरी संस्थानें आहेत. बहुतेक भाग डोंगराळ आहे. कोटगड ' हाटु ' डोंगराच्या एका ओढीवर आहे.

कोटगळ—वऱ्हाड मध्यप्रांत. जिल्हा चांदा उत्तरेस आणि पूर्वेस द्रुग जिल्हा, दक्षिणेस मुरमगाव जमीनदारी, पश्चिमेस पलासगड. एके ठिकाणीं ही जमीनदारी जवळच असलेल्या अंबागड चौकीचा एक भाग होता परंतु सुमारें २५० वर्षांपूर्वी ही जमीनदारी निराळी झाली इतें एकंदर २१ खेडीं असून पैकीं यारा खेड्यांची अद्याप पाहणी झाली नाहीं. लो. सं ( १९०१ ) ११३८ लागवडीखालीं जमीन एकंदर ४००० एकर असून भाताचें पीक मुख्य आहे एकंदर उत्पन्न २३०० रु, टाकोळी १० रु , इतर ६६ रुपये. जमीनदार सातुलवार गोंड असून त्याचें नाव फतेराम बापू आहे जमीनदारीची स्थिति बरी आहे [ चांदा गॅ. ]

कोटगिरी—मद्रास इलाख्यातील निलगिरी जिल्ह्याच्या कुनूर तालुक्यातील एक हवा खाण्याचें ठिकाण. हें निलगिरीच्या पठाराच्या ईशान्येस उटकमंडपासून १८ मैलावर व कुनूरपासून १२ मैलावर आहे याची लोकसंख्या १९०१मध्यें ५१०० होती. पंधरा दिवसांतून एकदा या ठिकाणीं कुनूरचा तहशिलदार आपलें फौजदारी कोर्ट भरवतो उटकमंडपेक्षा येथील हवा अधिक चांगली असें कित्येकांचें मत आहे याच्या नजीकच दिम्हट्टीचें आरोग्यस्थान आहे. पण हल्लीं तें मोडण्यात आलें आहे

कोटचांदपूर—बंगाल्यातील जेसोर जिल्ह्याच्या झेनिद पोटविभागातील कपोताक्ष नदीच्या तीरावरील गाव लो सं ( १९११ ) ८०७६ हें गाव जिल्ह्यातील साखरेच्या व्यापाराचें सर्वांत मोठें ठिकाण आहे.

कोटद्वार—संयुक्त प्रांताच्या गढवाल जिल्ह्यातील 'खो' नदीच्या काठीं मोठ्या व्यापाराच्या पेठेचें गांव या जिल्ह्यांतील दक्षिण भागांत मैदानांतील प्रदेशांतून सुती कापड, साखर, मीठ, भांडीं वगैरे माल या गावांतून पुरविला जातो तसेंच तिबेटांतील मालाच्या देवघेवीचें हें मध्यवर्ती गाव असून येथून मैदानी मुलुखात मोहरी, शिरसाचें बी, हळद, मिरच्या वगैरे जिनस जातात भोतिया लोक सवागी वगैरे खनिज द्रव्यें येथें आणून येथून कापड, तंबाखू, साखर व द्विदल धान्यें घेऊन जातात येथें पोलिस ठाणें, दवाखाना व अमेरिकेच्या मेथॉडिस्टांचें मिशन आहे

कोटपुतळी.—राजपुतान्यात जयपूर संस्थानच्या टोरावति निझामतींत जयपूरच्या ईशान्येस सुमारें ६४ मैलावर वसावी किंवा साहेबी नदीजवळ याच नावच्या परगण्याचें मुख्य ठिकाण. कोट व पुतळी हीं दोन गावें मिळून कोटपुतळी गाव झालें आहे. लो. सं ( १९०१ ) ६८७९. हें मराठ्यांच्या ताब्यात होतें त्यानेळीं येथें एक किल्ला व दुसरीं तटबंदीचीं महत्त्वाचीं ठिकाणें होतीं तीं अद्याप कायम आहेत. येथें पोष्ट व तार कचेरी, कित्येक शाळा व व्हिक्टोरिया ज्युबिली इस्पितळ हीं आहेत जवळच ८ मैलावर काळ्या संगमरवरी दगडाची खाण आहे

फोटा, संस्थान -राजपुतान्याच्या आग्नेय भागातील एक संस्थान या संस्थानचें क्षेत्रफळ, ५६८४ चौरस मैल व लो. सं ( १९११) ६,३०,०६०. उत्तरेस जयपूर संस्थान व अलीगड जिल्हा, पश्चिमेस बुंदी व उदेपूर हीं संस्थानें; नैर्ऋत्येस इंदूर संस्थानचे रामपूर भानपूर जिल्हे. झालवाडा व ग्वाल्हेरचा अगर तहशील, पूर्वेस ग्वाल्हेर संस्थान व छप्रा जिल्हा, दक्षिणेस खिलचीपूर व राजगड संस्थानें हीं आहेत. या संस्थानची लांबी ११५ मैल व रुंदी ११० मैल आहे. माळव्याच्या पठारापासून जी उतरण लागते त्या उतरणीवर हा प्रदेश वसलेला आहे. या प्रदेशांतून चंबळा व तिला

मिळणाऱ्या नद्या या उत्तरवाहिन्या होऊन वहात जातात. या संस्थानच्या दक्षिण भागांतून वायव्य दिशेकडून आग्नेय दिशेकडे मुकुंदवार नावाची एक टेकड्यांची माळ पसरलेली आहे व त्या रांगेची उंची समुद्राच्या पृष्ठभागापासून १४०० ते १६०० फूट आहे. या टेकड्यांवर खुजी झाडें असून शिवाय झाडझुडपाची रेलचेल आहे. यांतून शिकारीला योग्य अशीं पुष्कळ हिंस्र जनावरें आहेत. संस्थानच्या उत्तर भागात इंदरगढानजीकहि पुष्कळ टेकड्या असून त्यांची उंची १५० फूट आहे. शहाबाद जिल्ह्याच्या पूर्वभागातील टेकड्यांची उंची सर्वांत अधिक म्हणजे १८०० फूट आहे. चंबळा, काळी सिंद व पार्वती या या संस्थानातील तीन मुख्य नद्या होत. पार्वती नदीला अद्रू नावाच्या खेड्याजवळ अंधेरी नदी मिळाली असून या ठिकाणीं पार्वती नदीला एक मोठें धरण बांधण्यात आलें आहे व या धरणापासून कालवे काढण्यात आले आहेत. या कालव्यांच्या योगानें जवळ जवळ ४० खेड्यांना अगर २१७ हजार एकर जमीनीला पाणीपुरवठा होतो. या तीन नद्यांशिवाय परवान, उजर, मुकी, बाणगंगा, कूल व कुनू या दुय्यम नद्या आहेत. संस्थानच्या उत्तर भागात मळ्याची जमीन असून कोटा-जवळ विंध्य पर्वतांतील रेताड दगडासारखे दगड सापडतात. वाघ, चित्ते, काळे अस्वल, तरस, लांडगे, रानटी कुत्रे, ही हिंस्र जनावरें येथें आहेत. यांशिवाय, सांबर, चितळ, नीळ-गाई, काळवीट, हरिण हींहि जनावरें आढळतात. महाशीर रोहू, लाची, गुंच इत्यादि माशांच्या जाती आहेत.

हवा व पर्जन्यमानः—नोव्हेंबर ते फेब्रुवारी या महि-न्यांत हवा फार सुखकारक असते. मार्च महिन्यात उका-ड्याला सुरुवात होते व जूनमध्यें तर फारच कडक उन्हाळा पडतो. जुलै महिन्यापासून वरसातीला आरंभ होतो व आक्टोबरपर्यंत पावसाळा असतो. या दिवसांतील हवा रोगट असते. १९०५ मध्यें मे महिन्यातील उष्णमान ११५° व डिसेंबर मधील मान ४९° होतें. संस्थानांतील निरनिराळ्या भागांत पर्जन्यमान निरनिराळें आहे. संस्थानचें साधा-रण पर्जन्यमान ३० इंच आहे.

इतिहासः—कोटा संस्थानचें राजघराणें हें चव्हाण रज-पूत जातीच्या हाडा नामक शाखेचें आहे. ११४० मध्यें बुंदीचा राजा रावदेव यानें प्रथम कोटाच्या प्रांतांत आपल्या हाडाघराण्याचें नांव गाजविलें. कोटे नावाच्या एका भिल्ल जातीपासून त्यानें हा प्रदेश जिंकून घेतला. याच्या वंशा-मांच्या ताब्यात हा मुलुख १५३० पर्यंत होता व नंतर तो प्रदेश बुंदीच्या राव सुरजमल्लानें आपल्या ताब्यात आणिला. १७ व्या शतकाच्या प्रारंभी राव राजा रतनसिंग यानें कोटा व त्याच्या आसपासचा मुलुख आपला दुसरा मुलगा माधवसिंग यास जहागिर दिला. जहागिरच्या विरुद्ध रतनचा मुलगा खुरम यानें बंड उभारलें. त्यावेळीं रावराजा रतनसिंग व माधवसिंग या पितापुत्रांच्या जोरानें हें बंड मोडण्याच्या कामीं बादशाहाला मदत केली. त्यामुळें जहा-गिर यानें रतनसिंगाला बऱ्हाणपूरची सुभेदारी व माधवसिं-गाला कोटा शहर व ३६० खेडीं अशीं मिळून अडीच लाखाची जहागीर वंशपरंपरा तोडून दिली. शहाजहाननें सुद्धां ती तशीच पुढें चालविली. माधवसिंगाच्या कारकीर्दीत कोटा हें स्वतंत्र संस्थान बनून त्या संस्थानचा राजा माधव सिंग झाला. माधवसिंगाच्या मागून त्याचा मुलगा मुकुंद-सिंह हा गादीवर आला. १६५८ मध्यें औरंगझेबाशीं फत्ते-हाबाद येथें जी लढाई झाली तींत मुकुंदसिंह व त्याचे चार भाऊ यांनीं फार पराक्रम गाजविला. या लढाईत सर्वांत कनिष्ठ भाऊ किशोरसिंग हा सोडून बाकी सर्व भाऊ मारले गेले. पुढें १६५८ सालीं जगतसिंह हा गादीवर आला. तो निपुत्रिक असल्यानें त्याच्या मागून प्रेमसिंह हा गादीवर बसला. पण हा दुर्वर्तनी व नालायक असल्यानें अवघ्या सहा महिन्यांच्या आत त्याला पदच्युत करण्यात आलें. पहिला किशोरसिंग हा १६७० मध्यें राज्यारूढ झाला. औरंगझेबाच्या सैन्याबरोबर दक्षिणेच्या स्वारींत तो गेला होता. या स्वारींत त्यानें चांगलें नांव गाजविलें. तो अर्काटच्या वेढ्यात मारला गेला. त्याचा मुलगा पहिला रामसिंग यानें औरंगझेबाच्या मरणानंतर शहाआलम बहादुर शहा व अजमशहा यांच्यामध्यें राज्यासंबंधीं भांडण चाललें असता अजमशहाचा पक्ष उचलून धरला. १७०० मध्यें जाजौ येथें जी लढाई झाली तींत तो पडला. त्याच्या मागून भीमसिंग हा गादीवर आला. यानें सय्यद बंधूंचा पक्ष घेतल्यामुळें त्याला पंचहजाराची मनसब मिळाली. त्यानें आपल्या संस्थानाचा बराच विस्तार केला. यानें प्रथमतः आपल्याला महाराव हा किताब धारण केला. निझाम उल्मु-ल्कानें दक्षिणेवर स्वारी केली असता त्यानें निझामउल्मुल्काला विरोध केला पण तो त्या लढाईत १७२० सालीं मारला गेला.

त्याच्या मागून त्याचा मुलगा अर्जुनसिंग व अर्जुनसिंगा-नंतर दुर्जनसिंग हा गादीवर आला. यानें १७२४ ते १७५६ इतक्या अवधींत राज्य केलें व आपल्या राज्याचा मुलूख वाढविला. ( १७५६–१७६९ ). अजितसिंगानें राज्य केल्या-नंतर १७६९ मध्यें पहिला छत्रसाल हा राज्यावर आला. १७६१ सालीं जयपूरच्या राजानें या संस्थानावर स्वारी केली. पण त्यांत जयपूरच्या सैन्याचा पूर्णपणें पराभव झाला. या लढाईत झालिमसिंह नावाच्या एका तरुण सरदारानें चांगला पराक्रम गाजविला. महाराव छत्रसाल याच्यामागून त्याचा भाऊ गुमानसिंग हा राज्यावर आला. याच्या अमदानींत मराठ्यांनीं कोटाच्या दक्षिण भागावर स्वारी केली. पण झालिमसिंगाच्या मध्यस्थीनें मराठ्यांनी ६ लाख रुपये खंडणी देण्याचें कबूल करून कोटांतून आपला पाय मागें घेतला.

गुमानसिंगाच्या मागून उमेदसिंग हा गादीवर बसला. त्यानें १७७१-१८१९ पर्यंत राज्य केलें. पण झालिमसिंग

हाच खरा राजा होता. रजपुतान्यात त्याचें वजन फार असे. त्यानें कोटा संस्थानांत उत्तम शासनपद्धति अंमलांत आणली. सैन्यात उत्कृष्ट कवाइतीची पद्धत अस्तित्वात आणली. जमीनमहसुलाची नवीन व उपयुक्त अशी पद्धत काढून त्यानें कोटा संस्थानाला चांगलें भरभराटीचें स्वरूप प्राप्त करून दिलें. १८१७ मध्यें झालिमसिंहाच्या मध्यस्थीनें तहनामा होऊन कोटा हें ब्रिटिशाच्या ताब्यांत आलें व मराठ्यांना कोटा संस्थान खंडणी देत असे ती यापुढें ब्रिटिशाना मिळावयाची असें ठरलें. झालिमसिंग व त्याच्या वंशजाना प्रधानकीची जागा कायमची देण्यात आली व त्यांच्या हातांत संस्थानचा राज्यकारभार रहावा असें ठरलें. पण काही काळ लोटल्यानंतर दुसरा किशोरसिंग हा ( १८१९ ते २८ ) गादीवर आला. त्यानें झालिमसिंगाच्या वंशजाला राज्यकारभारात भाग घेऊं देण्याचें नाकारलें त्यामुळें ब्रिटिश सरकाराला किशोरसिंगाविरुद्ध युद्ध पुकारणें भाग पडलें. मंगरोल येथें १८२१ मध्यें जी लढाई झाली तींत किशोरसिंगाचा पराभव होऊन त्यानें झालिमसिंगाच्या वंशजाना राज्यकारभाराचा अधिकार देण्याचें कबूल केलें पुढें दुसऱ्या रामसिंगाच्या कारकीर्दीत पुनः एकदा रामसिंग व झालिमसिंगाचा वंशज मदनसिंग याच्यामध्यें तंटाबखेडा उत्पन्न झाला. शेवटीं झालिमसिंगाच्या वंशजासाठीं झालवाडाची स्वतंत्र जहागीर देण्यात येऊन हा लढा मिटविण्यात आला.

अर्थातच १८३८ मध्यें झालवाडाची स्वतंत्र जहागीर निर्माण झाल्यावर पुनः एकदा ब्रिटिशाचा व कोटाचा करारमदार ठरला व त्यात कोटा संस्थाननें पूर्वीच्या खंडणीपैकीं ८०००० रुपये कमी द्यावे असें ठरलें. ब्रिटिशाच्या मदतीसाटीं म्हणून एक स्वतंत्र तुकडी कोटाच्या खर्चानें उभारण्यात यावी म्हणून एक अट घालण्यात आली. १८५७ मध्यें या तुकडीनें इंग्रजाविरुद्ध बंड केलें.व पोलिटिकल एजंट व त्याच्या मुलाची या सैन्यानें कत्तल केली.रामसिंगानें या एजंटाचा जीव वाचविण्याच्या कामीं काहीं खटपट केली नाहीं. या सबबीवर त्याचा १७ तोफाचा मान कमी करून १३ तोफाचा करण्यात आला. पण पुढें १८६६ मध्यें पुनः १७ तोफाचा मान रामसिंगास देण्यांत आला. १८६६ मध्यें दुसरा छत्रसाल हा गादीवर आला. याच्या कारकीर्दींत राज्यकारभारात फार गोंधळ माजून राहिला व कर्जाची रक्कम ९० लाखापर्यंत गेली.तेव्हा छत्रसालच्या विनंतीवरून ब्रिटिशसरकारनें १८७४ सालीं संस्थानची व्यवस्था पाहण्याकरिता सर फैजअलीखान यास प्रधान नेमलें व त्यानें राजपुताना एजंटाच्या साह्यानें संस्थानचा कारभार चालवावा असें ठरलें या फैजअलीनें थोड्याच वर्षांत संस्थानचें कर्ज फेडून चांगली सुधारणा घडवून आणली. छत्रसालच्या मरणानंतर १८८९ मध्यें त्याचा मुलगा महाराजा उम्मेदसिंह हा गादीवर बसला. त्याला १८९६ मध्यें मुखत्यारी मिळाली.१९०० मध्यें त्याला के. सी एस. आय. हा किताब देण्यात आला. लेफ्टनेंट कर्नल हा लष्करी बहुमानाचा किताबहि त्याला मिळालेला आहे. झालवाडा जहागिरीच्या १७ जिल्ह्यापैकीं १५ जिल्हे याला पुनः परत मिळाले व झालवाडाच्या जहागिरीकडे २ जिल्हे देण्यांत आले. ही याच्या कारकीर्दीतली महत्त्वाची गोष्ट होय. याशिवाय याच्या कारकीर्दींतील सुधारणा म्हणजे ब्रिटिश पोस्ट ऑफिसांची स्थापना, ब्रिटिश चलनी नाण्याना मिळालेली मान्यता इत्यादि होत. १८१७ च्या तहान्वयें २,९०,००० रुपये खंडणी म्हणून संस्थानकडून ब्रिटिश सरकारास मिळत असत. पण हल्लीं २,३४,७२० रुपये खंडणी मिळते.

शासन-पद्धति.—शासनपद्धतीच्या दृष्टीनें संस्थानचे १९ निझामत व ६ तहशिली असे भाग पाडण्यात आले आहेत. प्रत्येक निझामतीवर एक नाझीम नावाचा अधिकारी व तहशिलीवर एकेक तहशीलदार असतो व त्याच्या हाताखालीं नायब निझाम व नायब तहशीलदार नेमलेले असतात. संस्थानचा सर्व कारभार महाराजा आपल्या दिवाणाच्या साह्यानें पहातो. तहशीलदाराना तिसऱ्या वर्गाच्या मॅजिस्ट्रेटचे अधिकार असतात. नाझिमाना दुसऱ्या वर्गाच्या मॅजिस्ट्रेटचा अधिकार असतो. याच्यावर फौजदार म्हणून पोटजिल्हा अधिकारी नेमलेले असून त्याच्याकडे अपीलें करावयाचीं असतात.फौजदारावरचा अधिकारी सेशन्स जज्ज हा असतो. व सर्वांत वरिष्ठ कोर्ट म्हणजे ' महकम खास ' असून त्याचा मुख्य स्वतः महाराजा असतो. महाराजाला फाशी देण्याचा अधिकार असतो. संस्थानचें वार्षिक उत्पन्न अदाजें ४२ लाखाचें असून खर्च ३४ लाख आहे. संस्थानात जहागीर, मुआफी व खालसा असे तीन जमीनीचे प्रकार आहेत संस्थानातील एकंदर जमीनीपैकीं एकचतुर्थांश जमीन पहिल्या दोन्ही प्रकारची मिळून आहे. जहागिरदाराना महाराजाच्या संमतीनें दत्तक घेण्याचा अधिकार आहे. जहागिरदारापैकीं बऱ्याच जहागिरदारांना संस्थानला कर द्यावा लागतो व काहींना संस्थानासाठीं लष्कर पुरवावें लागतें. मुआफी जमीनी या नोकरी इनाम म्हणून देण्यात येतात व देवस्थान अगर सार्वजनिक कार्यासाठीं देण्यात येतात. त्याच्यावर कर नसतो. खालसा जमीनीवर संस्थानचा पूर्ण ताबा असतो. कोरड्या जमीनीपाठीमागें एकरी ४ आणे ६ पै ते ५ रु. ८ आणे व पाण्याखालील जमीनी मागें एकरी सवारुपयापासून १७॥ रुपयांपर्यंत सारा असतो. १५००० सैन्य पदरीं ठेवण्याचा महाराजाला अधिकार आहे. १९०५ सालीं महाराजाचें सैन्य अंदाजें ८००० होतें. या सैन्यावर १९०५ सालीं ४,८०,००० रुपये खर्च करण्यात आले. दरबारला ब्रिटिशाचें सैन्य ठेवल्याबद्दल २० लाख रुपये द्यावे लागतात. पोलिसात शहरपोलीस व जिल्हापोलीस असे दोनभेद आहेत कोतवाल शहरपोलिसाचा मुख्य असतो. जिल्ह्याचे सहा भाग पाडून प्रत्येक भागावर एकेक असिस्टंट

सुपरिंटेंडेंट नेमलेला असतो १९०५ साली संस्थानांतील पोलीस ठाण्याची संख्या ३९ होती. प्रत्येक जिल्ह्यामध्ये एक एक छोटा तुरुंग असून राजधानींत एक मध्यवर्ती तुरुंग आहे. १९०४–५ साली संस्थानांत २१ दवाखाने होते.

*लो क.*—१९२१ च्या खानेसुमारींत कोटाची लो. सं. ६,३०,०६० होती दहा सालामागची लो .सं. सुमारें ९ हजारानें जास्त होती संस्थानात ८ शहरें व २५५४ खेडीं आहेत. कोटा, बारण, मांग्रोल व संगोड हीं शहरें आहेत संस्थानात निझामत व तहशील मिळून ३३ भाग आहेत संस्थानांतील मुख्य भाषा राजस्थानी असून हाराेटी, माळवी, ढुंढारी यादि भाषा प्रचारात आहेत. या संस्थानांत चमार जातीची लोक सं. अधिक आहे. १८११ साली ही लोकसंख्या ८८,३०१ इतकी होती. याचा धंदा चामडीं रंगविणें, चामड्याचें काम करणें व शेतकी करणें हा असे.त्याच्या खालोखाल मीना लोकाची वस्ती ५१,४७० होती. हे धिप्पाड व साहसी आहेत. पूर्वी त्याचा धंदा लुटालूट करण्याचा असे पण हल्लीं त्यानीं शेतकी करण्यास सुरुवात केली आहे धाकर लोकाची संख्या ४३,१४७ इतकी असून ते शेतकीवरच आपली उपजीविका करतात. ब्राह्मणानी वस्ती ३९४७० असून त्याचा धंदा उपाध्येगिरी व नोकरी करण्याचा आहे. माळी लोकाची संख्या ४८,६७० इतकी असून त्याचा धंदा बागाइतीचा आहे. याशिवाय त्यांच्यापैकीं पुष्कळ लोक शेतकीवर सुद्धां आपली वृत्ति चालवितात. गुजर हे गुराढोराच्या क्रयविक्रयाचा धंदा करतात. इ. स १९११ साली त्याची संख्या ३८९६३ होती याशिवाय महाजन ( ३,०६,५८५ ) व रजपूत ( १४,७४७ ) या जाती आहेत. महाजन लोक व्यापार व सावकारी वगैरे धंदे करतात. रजपुताचा धंदा म्हणजे लष्करी नोकरीचा आहे व इतर धंदा करणें त्याना कमीपणाचें वाटतें.

या संस्थानची जमीन फार सुपीक असून जमीनीला पाणी मिळण्याचीहि या ठिकाणीं चागली सोय आहे. काळी व उतरमाल व बरी अशा जमीनीच्या तीन जाती आहेत. काळी व उतरमाल या जाती फार सुपीक आहेत व कालव्याच्या अगर विहिरीच्या पाण्याशिवाय सुद्धा केवळ पर्जन्याच्या साहाय्यानें या जमीनींतून गहूं, चणे इत्यादि धान्यें चांगली पिकतात. १९०५ सालीं ३३१५ चौरस मैल जमीन शेतकीसाठीं उपयोगात आली. त्यात ३८१ चौरस मैलात ज्वारी,३५९ चौ. मैलात गहू, तसेंच ३९७ चौरस मैलात चणे आणि ३३ चौरस मैलांत कापूस पेरण्यात आला. सुद संस्थानात होणारी गुरांची निपज फार हलक्या दर्जाची असते. चागल्या गुरांची आयात माळव्यामधून होते. येथील घोडे फार लुजे असतात. मेंढ्याची व शेळ्याची पैदास पुष्कळ होते. पार्वती नदीला धरण्यात आलेलें धरण मोठें आहे. शिवाय संस्थानात एकंदर ३५० तळीं आहेत. अक्रोरासागर तलाव हा सर्वात मोठा असून क्षेत्रफळ ३॥ चौरस मैल आहे. संस्थानांतील जंगलांत सागवान फार थोडें आढळलें. बाभूळ, वड, बेल धाक, ढोंका, गुलर, जामुन जम्रोलण, कदंब, महू, निम्ब, पिंपळ, साल, सेमल व तेंडू हीं झाडें या जंगलांत आढळतात. इ. स. १९०४–५ साली जंगलाचें उत्पन्न ३३३०० रुपये आलें.

*व्यापार व दळणवळण.*—कापड विणण्याचा धंदा येथें मोठ्या प्रमाणात आढळतो. कोटा येथें तयार होणारी मलमल फार प्रसिद्ध आहे. मलमल पांढरी, रंगीत व जरीची सुद्धा तयार करण्यात येते. चिटेंहि उत्तम प्रकारचीं तयार होतात. बारण येथील रंगाचे कारखाने व खेळणीं प्रसिद्ध आहेत याशिवाय हलक्या दर्जाचा कागद, घोड्यावर व हत्तीवर घालण्याचें कलाबतूचें कापड, हस्तिदंती काम, भाडीं वगैरे जिन्नसहि या संस्थानात तयार होतात.

संस्थानची सालीना सरासरी आयात २०० लाखाची व निर्गत ३॥ लाखाची होते. धान्य, अफू, कापूस व कातडीं इत्यादि जिन्नस संस्थानातून बाहेर जातात व परदेशी कापड मीठ, तांदूळ, साखर, गूळ, लोखंड, फळें, कागद इत्यादि जिनसाची आयात होते. या संस्थानचा मुंबई कलकत्ता, कानपूर, राजपुतान्यातील संस्थानें इत्यादि प्रदेशाशीं व्यापार चालतो.येथील अफू माळव्यातील अफूच्या तोडीची असते व ती चीनकडेहि पाठवण्यात येते. कोटा शहर व बारण शहर हीं संस्थानांतील व्यापाराचीं शहरें आहेत. संस्थानात जी. आय. पी. रेल्वेचा बीना–बारण हा फाटा गेला असून या फाटयाचा भाग दरबारच्या मालकीचा आहे. या फाटयाचीं संस्थानात चार स्टेशनें आहेत. याच्या शिवाय नागद्यापासून मथुरेपर्यंत जाणारी रेल्वे तयार होत असून ती कोटामधून गेली आहे. १९०४ मध्यें, संस्थानांतील खडीच्या रस्त्याची लाबी १४३ मैल होती व साध्या रस्त्याची लांबी ४१० मैल होती. बारण, बुंदी झालरापाटण या शहराकडे जाणारे रस्ते खडीचे आहेत.

*साक्षरता:*—१९११ सालीं संस्थानांतील साक्षर लोकाची संख्या१९३७७ होती. त्यापैकीं ७५४ बायका होत्या; म्हणजे साक्षरतेचें प्रमाण शेकडा २ हें पडलें. १९२०—२१साली संस्थानात १०५ मुलाच्या, व १७ मुलींच्या शाळा होत्या. मुलाच्या शाळांपैकीं १ हायस्कूल, ३ आंग्लोव्हर्न्याक्युलर, १ मिडल, १ संस्कृत, १ ट्रेनिंग, १ उच्च प्राथमिक व ९७ व्हर्न्याक्युलर शाळा होत्या. शिक्षणार्थ संस्थान सरकार१॥ लाख रुपये खर्च करितें. संस्थानात शिक्षण मोफत दिलें जातें एवढेंच नव्हे तर पुस्तकें, कागद, शाई इत्यादि देखील मोफत पुरविण्यात येतात; तरी पण शिक्षणाच्या बाबतींत संस्थानांतील लोक फारशी तितकी काळजी घेत नाहींत.

*श ह र.*—कोटा संस्थानच्या राजधानीचें शहर. हें चंबळा नदीच्या काठीं वसलेलें आहे. चौदाव्या शतकाच्या आरंभीं बुंदीच्या रावदेव राजानें येथील भिल्ल

लोकांचा पराभव करून हें शहर वसविलें. माधवसिंगाच्या कारकीर्दीत, कोटा संस्थानची हें शहर राजधानी बनलें. कोटा हें भरभराटीचें शहर असून, राजपुतान्यांत जीं आठ प्रमुख शहरें आहेत त्यांत या शहराची गणना होते. याच्या पूर्व, दक्षिण व उत्तर दिशेला तटबंदी असून पश्चिमेस समोरून चंबळा नदी वहात गेली आहे. शहराभोंवतीं सहा मोठे बुरजी दरवाजे असून ते रात्रीं ११ वाजतां बंद करण्यांत येतात. या शहराचे कोटा, लाडपूर व रामपूर असे तीन भाग पडतात. शहरामध्यें पुष्कळ देवालयें असून मथुराजीचें देवालय फार प्रसिद्ध आहे. यांतील मूर्ति गोकुळांतून आणलेली आहे असें म्हणतात. येथील नीलकंठ महादेवाची मूर्ति ही सर्वांत जुनी आहे असें दिसून येतें. येथील लोकसंख्या वाढण्याऐवजीं कमीच होत आहे असें खानेसुमारीवरून दिसून येत. याचीं मुख्य कारणें म्हटलीं म्हणजे कोटा हें रेल्वेपासून बरेंच दूर आहे व येथें असणाऱ्या किशोरसागर तलावाचें पाणी जमीनींत मुरून हवा दमट झाल्यामुळें रोगराईचा येथें फार त्रास होतो हीं होत.

येथें पादरी व रंगीत उत्कृष्ट मलमल तयार होते. दर फेब्रुवारी महिन्यांत येथें औद्योगिक प्रदर्शन भरतें, त्यामुळें शहरांत कोणकोणते धंदे चालू आहेत याची माहिती आपोआपच मिळूं शकते. १८७४ मध्यें या शहराला म्युनिसिपॉलिटीचे हक्क देण्यांत आले. या ठिकाणीं दरबारनें चालविलेल्या शिक्षणसंस्था आहेत. महाराव हायस्कूल व सरदारासाठीं असलेलें हायस्कूल हीं दोन्हीहि अलाहाबाद विश्वविद्यालयाला जोडलेलीं आहेत. हायस्कूलला जोडून पटवारी( क्षेत्रमापन )चें शिक्षण देण्याचा वर्ग निघाला आहे. येथें २ इस्पितळें आहेत. त्यापैकीं 'व्हिक्टोरिया हॉस्पिटल' हें स्त्रियांकरतां आहे. येथील पहाण्याजोगीं स्थळें म्हणजे महाराजाचा राजवाडा ( उमेरभवन ), मोटमोठीं उद्यानें, अमरनिवास, ब्रिजविलास व छत्तरपूर हीं होत.

**कोटा** तालुका.—वऱ्हाड-मध्यप्रांत. बस्तर संस्थानांतील दक्षिणेकडील तालुका. १७° ते १८' व १८° ते ५७' उ. अक्षांश आणि ८०° ४७' ते ८२° २'. पू. रे. क्षेत्रफळ ९६८ चौरस मैल. लोकसंख्या (१९११)७७३६. दक्षिण व पश्चिम भाग डोंगराळ असून मुख्य नदी सावरीनाला ही आहे. यांत कोंट्याच्या वर दोन मैलापासून गोदावरीच्या संगमापर्यंत नाव चालविता येते या तालुक्यांत ताडाचीं झाडें फार असून त्यांपासून ताडी काढितात. या तालुक्यांत ३० चौ. मैल क्षेत्रफळाचा एक सपाट प्रदेश चोहोंकडून टेकड्यांच्या रांगांनीं वेढिला आहे. मुरिया लोकांची वस्ती जास्ती असून तांदूळ व ज्वारी हीं मुख्य पिकें आहेत. तालुक्याचें मुख्य ठिकाण कोटा गांव आहे. [ छत्तिसगड फ्युडेटरी स्टेट्स ग्या. ]

**कोटापल्ली** जमिनदारी.—वऱ्हाड, मध्यप्रांत, उत्तर अक्षांश १८° १२' ते १८ २६' व पूर्वरेखांश ८१ १५ ते ८१ ४२. क्षेत्रफळ ७२८ चौरस मैल. लोकसंख्या १०८००. बस्तर संस्थानांत ही जमिनदारी असून हिचा सारा ५२७रुपये आहे. हिच्या उत्तरेकडून दक्षिणेकडे एक टेकड्यांची ओळ गेली आहे. मुख्य पीक ज्वारी. जंगलांतील सागांच्या झाडावर जमीनदारांचा हक्क नाहीं.

**कोटी**—पंजाबांतील केओन्थल संस्थानांतील लष्करी जहागीर. लो. सं. (१९२१)/१२२८. वार्षिक उत्पन्न ४४,१५४ असून ५०० रु. केओन्थल संस्थानास मोकाशीबद्दल दिले जातात. येथील संस्थानिकास सर्व तऱ्हेच्या न्यायाधिकाराची सत्ता असून फक्त देहांतशिक्षेच्या बाबतींत सिमालापहाडी संस्थानच्या सुपरिंटेंडेंटची मंजुरी लागते.

**कोटुमचगी**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. गदगच्या ईशान्येस १५ मैलावरचें एक खेडें. येथें एक पक्का किल्ला असून सोमप्पाच्या देवळांत इ. स. १११२ आणि ११४२ सालचे दोन शिलालेख आहेत.

**कोटेश्वर**—मुंबई. कच्छमधील कोरी नदीच्या मुखाजवळील लहान बंदर येथील कांहीं देवळें कोटेश्वरच्या प्राचीन भरभराटीची साक्ष देतात. एका देवळांतील चार फूट उंचीच्या स्वयंभू लिंगाच्या डोकाला लोखंडी खिळे मारलेले आहेत. अल्लाउद्दीन खिलजीनें ( १२९५-१३१५) हे खिळे मारले अशी दंतकथा आहे. हल्लीं नवीं देवळें असलेल्या जागेवरील एका जुन्या दगडांतील लेखावरून येथील प्राचीन देवळें घोलेच्या केर लोकांनीं बांधलीं असें अनुमान निघते.

**कोट्टापट्टम्**—मद्रास इलाखा गुंटुर जिल्हा ओंगोले तालुक्यांतील समुद्रकांठचें गाव. एके काळीं व्यापाराच्या-भरभराटीचें हें ठिकाण होतें. गावांतील रस्ते व घरें पद्धतशीर रीतीनें बांधली असून गावाची रचना फार सुंदर आहे. बकिंगहॅम कालवा तयार झाल्यापासून या गावाचें व्यापारी महत्त्व नष्ट झाल्याकारणानें येथील कित्येक रहिवासी मद्रास व इतर ठिकाणीं रहावयास गेले. येथील लोकसंख्येंत कोमटी लोकांचा बराच भरणा आहे. येथें एक शिवालय व एक विष्णुमंदिर असून त्याच्या उत्सवासाठीं भव्य व सुंदर रथ केलेले आहेत.

**कोट्टायम्**, तालुका.—मद्रास प्रांतांतील मलबार जिल्ह्याचा उत्तरेकडील तालुका क्षेत्रफळ ४८१ चौ. मै. यांत २८ अमसम किंवा विभाग आहेत. लोकसंख्या ( १९२१ ) १,३२,२८५. यांतील महत्त्वाचें गाव तेलीचेरी ( तहसिलीचें गाव ) हेंच आहे. या तालुक्याच्या पूर्वेस उंच असा सह्याद्रि पर्वत असून त्यापासून हिंदी महासागरापर्यंत या तालुक्याचा पृष्ठभाग एकदम उतरत गेला आहे.

गांव.—मद्रास इलाख्यांत त्रावणकोर संस्थानांतील याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें गाव कोचिनच्या मोठ्या नदीमुखास जोडलेल्या सरोवरास मिळणाऱ्या 'मीनचिल' नदीच्या
लो. सं. ( १९११ ) १५,१४१. लोकसंख्येंत

यांचें प्रमाण जास्त आहे. हें सिरियन खिस्ती समाजाचें मध्यवर्ती ठिकाण असून येथील चर्च फार प्राचीन आहे. इ. स. १८१६ पासून येथील चर्चची मिशनरी संस्था काम करीत असून तिच्या ताब्यात दोन महाविद्यालयें व एक विद्यालय आहे. शिवाय येथील सिरियन बिशपच्या ताब्यातहि दोन हायस्कुलें आहेत. येथें ७१८ नियतकालिकें प्रसिद्ध होतात.

**कोट्टारु**—मद्रास इलाख्यांत त्रावणकोर संस्थानच्या अगस्तिवरम् तालुक्यांतील नागरकोईल गावचें उपनगर. त्यास प्रसिद्ध भूगोलशास्त्रज्ञ टॉलेमीनें कोटियारा व्यापारी पेठ असें म्हटलें आहे. हें प्युटिंजरच्या तक्त्यात कोट्टार म्हणून निर्दिष्ट केलें आहे व याला चोळ राजाच्या वेळीं मुमुदीचोळपुरम् असें नाव होतें. कुलोत्तुंग चोलानें हें पाण्ड्य राजापासून घेतलें. कन्याकुमारीचें कोट्टार हें नाव होय असें कुलोत्तुंगाच्या राज्याभिषेकाच्या १४ व्या व १५ वर्षी खोदलेल्या लेखावरून दिसतें (अय्यंगार-एन्शंट इंडिया). प्राचीन काळीं हें मोठ्या व्यापाराचें स्वतंत्र गाव होतें. या ठिकाणीं दूरदूरचे व्यापारी लोक येत असत. अद्याप दक्षिण त्रावणकोरमधील व्यापाराचें हें मुख्य ठिकाण असून येथें विणकामाचे कारखाने आहेत व उत्तम पोताचें कापड येथें तयार होतें. येथें रोमन कॅथोलिक चर्च व इंग्रजी हायस्कूल आहे.

**कोट्टूरु**—मद्रास इलाख्यात बल्लारी जिल्ह्याच्या कुडिलगी तालुक्यांतील गाव. हें लिंगायत समाजाचें केंद्रस्थान असून येथील लोकवस्तीत लिंगायतांचें प्रमाण बरेंच आहे. लिंगायतांचा धर्मगुरु बसाप्पा लिंगस्वामी यानें येथें केलेल्या महत्कृत्यामुळें हें गाव पवित्र झालें आहे असें ते समजतात. गावाच्या पूर्वेस या गुरूचें समाधिमंदिर असून त्याच्या भोंवतीं काळ्या दगडाची क्वचित् रंगीत व क्वचित् साध्या अशा कोरीव कामाची भिंत असून देवळाचे खांब कोरीव दगडाचे आहेत. मुख्य द्वाराच्या पश्चिमेस गजलक्ष्मीची मूर्ति आहे. गावातील मुलामुलींस कोट्री, कोत्रव, कोत्रप्पा वगैरे उपनावें प्रचलित आहेत. बसाप्पा लिंगस्वामींनीं येथील जैनास वादांत हरवून लिंगायत बनविलें व देवळांत लिंगाची स्थापना केली असें सागतात. हें देऊळ मरबलमठ या नांवानें प्रसिद्ध आहे. येथें मूर्ति कापड विणण्याचा धंदा चालत असून हें व्यापाराचें महत्वाचें ठिकाण आहे.

**कोट्रा किंवा सांगानी**—काठेवाड पोलिटिकल एजन्सीमधील चौथ्या वर्गाचें लहान मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ ७८ चौरस मैल व लोकसंख्या (१९०१) ८,८१५ असून यांत २० खेडीं आहेत. गोंडलच्या कुंभोजीचा मुलगा सांगोजी हा या संस्थानचा संस्थापक होय. पुढें याचे नातू भासोजी व सर्तनजी यांनीं कोट्रा हें ठिकाण काठी लोकांपासून जिंकून घेतलें (१७५०) व तेथेंच राजधानी स्थापिली.

**कोठारिया**—राजपुतान्याच्या उदेपूर संस्थानांतील एका ठेवीचें मुख्य गाव. हें बनारस नदीवर असून उदेपूर शहरापासून ३० मैल आहे. या इस्टेटीत अथवा महागिरींत ८१ खेडीं असून जहागिरदार मेवाडचे पहिल्या वर्गाचे सरदार आहेत. ते चव्हाण रजपूत असून त्यास 'रावत' असें म्हणतात. राणा संग्रामसिंगाच्या बाजूनें (१५२७) बाबराविरुद्ध लढणाऱ्या माणिकचंदानें हें स्थापन केलें. जहागिरीचें वार्षिक उत्पन्न ३२,००० रु. असून दरबारास १,२०० रु. खंडणी द्यावी लागते.

**कोठी**—मध्यहिंदुस्थानांत बाघेलखंडाच्या पोलिटिकल एजन्टाच्या देखरेखीखालीं असलेलें एक सनदी संस्थान आहे. येथील संस्थानिक बाघेल रजपूत असून त्याने येथील मूळच्या भार राजाला हाकलून देऊन येथें जहागीर स्थापिली. येथील संस्थानिकाच्या राजनिष्ठादि गुणांचें बक्षीस म्हणून त्यास इंग्रजांकडून राजा बहादूर ही पदवी मिळाली आहे. येथील जमीन चांगली सुपीक असून तींत साधारणतः सर्व धान्यें पिकतात.

**कोठी**—अठरा कारखान्यांत कोठी हा एक कारखाना असे. कोठींत धान्यसंग्रह विशेषेंकरून करीत. परंतु जुन्या कागदपत्रांत खजिना, वखार, किंवा कापडचोपड अथवा इतर सरकारी सामान साठवण्याची जागा या अर्थीहि हा शब्द येतो. लष्कराची रसद पुरविणारें खातें यासहि कोठी म्हणत. उ. ' लष्कराची कोठी चालली किंवा लुटली ' वगैरे. सामान्य अर्थ धान्यागार. या कोठीवरील अधिकारी तो कोठावळा. यावरूनच कोठवळे हें आडनाव प्रचारांत आलें आहे. प्रत्येक किल्ल्यावर धान्याची अशी कोठी असे. दारूच्या कोठारासहि काहीं जागीं कोठी शब्द इंग्रज लावीत. तसाच वखार या अर्थी हा शब्द इंग्रज किंवा फिरंगी वगैरे टोपीवाल्यांच्या फॅक्टरींना लावीत असत. कोठवळ्याकडे मुदपाकखान्या ( स्वयंपाक ) वरील देखरेखीचें काम असे. राजाच्या मुदपाकखान्याची व्यवस्था त्यानेंच पहावयाची असे. पेशवाई अखेर इंग्रजाच्या रेसिडेन्सीलाहि कोठी म्हणूं लागले होते. कोष्ट या संस्कृत शब्दापासून कोठी हा शब्द बनला आहे.

**कोठूर**—मुंबई. नाशिक जिल्हा. निफाडच्या दक्षिणेस तीन मैलांवर असून येथें एक मल्हारेश्वराचें देऊळ आहे. यामध्यें दोन ( इसवी १७१७ व १७२७ ) शिलालेख आहेत. बाळाजी विश्वनाथ पेशवे याचे मेव्हणे ( पत्नी राधाबाई यांचा भाऊ ) मल्हारराव बरवे यांनीं दोन वाडे, दोन घाट, दोन धर्मशाळा व बागेश्वराचें देवालय येथें बांधिलें आहे. मल्हारराव बरव्याचे वंशज येथें रहातात. [ बांवे. ग्या. ].

**कोड, तालुका**.—मुंबई इलाख्यातील धारवाड जिल्ह्याच्या अगदीं दक्षिण भागातील एक तालुका. या तालुक्याचें क्षेत्रफळ सुमारें ४०० मैल आहे. या तालुक्यांत १७३ खेडीं आहेत. १९११ मध्यें या तालुक्याची वस्ती ९९,३४५ होती. १९०३-४ या सालांत या तालुक्याचें उत्पन्न २,१८,००० होतें. या तालुक्याचें मुख्य ठिकाण हिरेकेरूर हें होय. या तालुक्यांत ठिकठिकाणीं टेंकड्या व झाडी आढळून येतात. या तालुक्यांत मुख्यतः ईशान्ये

लागवड होते. तसेंच सुपारीचीं झाडेंहि येथें पुष्कळच आहेत. येथील जमीन मुख्यतः तांबडी आहे. या तालुक्याच्या आग्नेय दिशेनें तुंगभद्रा नदी गेली आहे व पूर्वेकडून कुमद्वती नदी वहात येऊन या तालुक्यातून गेली आहे. उन्हाळ्यामध्यें या तालुक्यातील हवा फार थंड व निरोगी असते. पण पावसाळ्यात मलेरियल असते. या तालुक्यात मडग नावाचें एक तळें असून त्यात कुमद्वती नदीचें पाणी येतें.

गा व.—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. हिरेकरूच्या ईशान्येस सुमारें ६ मैलावर एक खेडें. येथें तांदूळ व मिरच्या याचा मोठा व्यापार आहे. येथील हनुमानाच्या देवळात एक जुना कानडी शिलालेख आहे.

**कोंडका**—मध्यप्रांतातील एक संस्थान. ( छुइखादन पहा ).

**कोंडगल, ता लु का.**—हैद्राबाद संस्थानातील गुलबर्गा जिल्ह्याच्या पूर्वभागातील एक तालुका. या तालुक्याचें क्षेत्रफळ ६२२ चौरस मैल असून १९११ मध्यें या तालुक्याची लोकसंख्या १,१९,५४४ होती. या तालुक्यात २ शहरें असून १६३ खेडीं आहेत. या खेड्यांपैकीं ३५ खेडीं जहागीर होतीं. या तालुक्याचा जमीनमहसूल १९०१ सालीं १,०१,००० होता. १९०५ मध्यें गुरमटकाल तालुक्यातील ५९ खेडीं कोडंगल तालुक्यात समाविष्ट करण्यात आलीं. या तालुक्यात तांदूळ पुष्कळ पिकतो व तो मुख्यतः तलावाच्या पाण्यामुळें पिकतो. या तालुक्यात जहागीर म्हणजे तांडूर व कोसगी हे छोटे तालुके होत व यात अनुक्रमें ६२ व ११ खेडीं आहेत.

श ह र.—कोंडगल तालुक्याचें हें मुख्य ठिकाण होय. हें तांडूर स्टेशनापासून १२ मैलावर आहे. या गावाची लोकसंख्या १९११ सालीं ६०६२ होती. या गावीं तालुका-कचेरी, पोलीस इन्स्पेक्टरची कचेरी, तालुका पोस्टऑफिस इत्यादि कचेऱ्या असून एक शाळा आहे या गावात एक मशीद असून ती ३०० वर्षांची जुनी आहे असें म्हणतात.

**कोंडगांव, ता लु का.**—वऱ्हाड-मध्यप्रांत. बस्तर संस्थानातील ईशान्येकडील तालुका. उ. अक्षांश १९° १५' ते २०° १०' व पू रेखांश ८०° २५' ते ८२° १०'. क्षेत्रफळ १९३१ चौरस मैल. लोकसंख्या ४७,७८२. याचा तीन चतुर्थांशापेक्षा जास्त भाग अरण्यानीं व्यापिला आहे. व सालाचीं झाडें अरण्यात फार आहेत. एकंदर ५३४ खेड्यापैकीं ८ खेडीं उजाड आहेत. ३५ खेडीं हल्लीच्या संस्थानिकाच्या चुलत्याकडे सारामाफीनें आहेत. तालुक्यांतील जमीनींत खरीपाचें पीक होत असून यात दोन पोलिसठाणीं, सहा पोलिस चौक्या व दोन इन्स्पेक्शन बंगले आहेत.

गा व.—कोंडगाव तालुक्याचें हें ठाणें. हें धमतरीपासून व राजनादगावापासून येणाऱ्या सडकांच्या संगमावर वसलें असून येथें पोलिस ठाणें, डाकघर व शाळा आहे. [ छत्तिसगड फ्यु. ग्या. ]

**कोंडचाद्री**—म्हैसूर इलाख्यातील शिमोगा जिल्ह्यामधील नगर तालुक्यातील एक पर्वत. याची उंची ४४११ फूट आहे. या पर्वताच्या पठारावर पुष्कळ सुंदर अरण्यें आहेत. या पर्वताचें शिखर म्हणजे एक अगदीं अरुंद असा सुळका असून तो दोन्ही बाजूंनीं तुटलेला आहे. पश्चिमेस हा पर्वत ४००० फूट उच असून त्याच्या पायथ्याशीं दाट अरण्यें आहेत याच्या समोरच कुंडापूरची सामुद्रधुनी व कुंडापूर गाव आहे. या पर्वतावर ' हुलदेव ' नांवाचें एक देवालय असून त्यातील देवाला ३० हात आहेत

**कोंडपल्ली**—मद्रास इलाख्यातील कृष्णा जिल्ह्याच्या बेझवाडा तालुक्यातील एक गाव. याच्या जवळच एक डोंगरी किल्ला असून त्याला कोंडपल्लीचा किल्ला असें म्हणतात. १९०१ मध्यें येथील किल्ल्यामुळें व उत्तरसरकारच्या राजधानीचें हें एक शहर असल्यामुळें, पूर्वी या गावाला विशेष महत्त्व प्राप्त झालें होतें. १३६० मध्यें कोंडवविडूच्या रेड्डी राजानी हा किल्ला बांधला. १४७१ मध्य, बहामनी सुलतानानें ओरिसाच्या राजापासून हा किल्ला जिंकून घेतला पण पुढें पुन्हां तो ओरिसाच्या राजानें परत मिळविला १५१५ साली विजयानगरच्या कृष्णदेवानें तो ओरिसाच्या राजापासून जिंकून घेतला. १५३१ मध्यें तो सुलतान कुलि कुतुबशहाच्या हातात पडला. १६८७ सालीं औरंगझेबाच्या ताब्यात तो येऊन सुमारें ७५ वर्षे तो मोंगलाच्या ताब्यात होता पण १७६६ मध्यें निझामपासून जनरल कैलाडनें तो जिंकून घेतला. इ. स. १८५९ पर्यंत त्या ठिकाणीं ब्रिटिशानीं आपलें लष्कर ठेवलें होतें. येथील किल्ल्याच्या आसमंतातील भागांत हल्ली जिकडे तिकडे जंगल वाढलेलें आहे तरी अशा स्थितींतहि किल्ला अद्यापि प्रेक्षणीय आहे या ठिकाणीं डोंगरावर एक प्रकारचें हलकें लाकूड मिळतें व त्या लाकडापासून येथील लोक खेळणीं तयार करतात.

**कोंडमगी**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. कोडच्या दक्षिणेस अकरा मैलावर एक खेडें आहे येथील बयल बसप्पाच्या देवळांत इ. स. ११५८ सालचा एक शिलालेख व सिद्धरामेश्वराच्या देवळात दोन शिलालेख आहेत. पैकीं एक इ. स. १०८० सालचा असून दुसऱ्यावरील तारीख लागत नाहीं. [ धारवाड ग्या. ].

**कोंडविडु**—मद्रास इलाख्यातील गुंटूर जिल्ह्याच्या नरसेरावपेट तालुक्यातील एक खेडें. या ठिकाणीं एक डोंगरी किल्ला आहे. प्राचीनकाळीं कोंडविडू नांवाचा कृष्णानदीपासून गुंडलकम्म गावापर्यंत पसरलेला एक प्रांत असून त्या प्रांताची हें गाव राजधानी होतें. येथील किल्ला १२ व्या शतकात बांधला असावा रेड्डीराजाचें चवदाव्या व पंधराव्या शतकात हें रहाण्याचें ठिकाण होतें. १५१६ मध्यें विजयानगरच्या कृष्णदेवरायानें हा किल्ला जिंकून थोड्याच वर्षांनीं तो गोंवळकोंड्याच्या ताब्यात आणिला. मुसुलमानानीं या गांवाचे

नांव ठेवलें होतें. १७५२ मध्यें फ्रेंचांनी हा प्रांत काबीज केल्यावर १७८८ सालीं तो प्रदेश इंग्रजांच्या ताब्यांत आला. येथील किल्ला टेंकडीवर बांधलेला असून तो दगडाच्या योगानें बांधल्यामुळें त्याला मजबुती आली आहे. या किल्ल्याचा घेर पुष्कळ मैल असून किल्ला अद्यापहि बऱ्या स्थितींत आहे. या किल्ल्याच्या आंत दाट जंगल वाढलेलें असून येथें पूर्वी शुरगोळ्याचें कोठार असावें असें तेथें सापडलेल्या अवशेषांवरून दिसतें. हा ज्या टेंकडीवर बांधला गेला आहे त्या टेंकडीची उंची समुद्राच्या पृष्ठभागापासून १७०१ फूट असून हिची आरोग्यस्थान म्हणून प्रसिद्धि होती. कोंडविडु गांवाची लोकसंख्या १९०१ सालीं १९७९ होती.

कोंडवीडु गाणदेव—हा कोंडवीडु देशाचा गाणदेव नांवाचा राजा शके १३७७ च्या सुमारास होऊन गेला. याचा आजा चंद्रदेव व बाप गुहिलदेवपाल हा होय. हुल्टा यानें याला ओरिसाच्या कपिल गजपतीचा समकालीन मानला आहे. परंतु तो त्याचा समकालीन नसून कपिलाचा वंशज असावा असें म्हणतात [ गाणदेवाचा ताम्रपट. ].

कोंडाणें—मुंबई इलाख्यातील कुलाबा जिल्ह्याच्या कर्जत तालुक्यातील एक खेडें. हें कर्जतच्या आग्नेयीस ४ मैलांवर आहे. हें राजमाची टेंकडीच्या पायथ्याशी वसलेलें आहे. याची लो. सं. १९०१ साली १५८ होती. येथें खिस्तपूर्व २०० वर्षांच्या सुमारचीं बौद्धांचीं लेणीं असून तीं प्रेक्षणीय आहेत. हीं लेणीं एकंदर चार असून यांत एक बुद्धाची मुर्ति आहे. येथें एक खिस्तपूर्व २ ऱ्या शतकांतील शिलालेख असून त्यावर ' कन्हाचा ( कृष्णाचा ) शिष्य बलक यानें तयार केलेली ' असा मजकूर आहे.

कोंडाणें किल्ला—' सिंहगड ' पहा.

कोडीनार—बडोदा संस्थानांतील अमरेली प्रांतांतील कोडीनार तालुक्याचें मुख्य ठिकाण. या गावची लोकसंख्या १९११ मध्यें ६०७५ होती. हें ठिकाण समुद्रापासून तीन मैलांवर सिंगवद् नदीच्या दक्षिण तीरावर वसलेलें आहे. या गावाचा कारभार म्युनिसिपालिटीमार्फत चालतो. या म्युनिसिपालिटीला संस्थानाकडून वार्षिक देणगी मिळते. येथें मुनसफ कोर्ट, मॅजिस्ट्रेट,कोर्ट व इतर कचेऱ्या आहेत. गांवांत एक मोफत दवाखाना व मोफत शाळा आहे. या गावाचा व्यापार मुंबई, कराची, पोरबंदर, मंगरोल या बंदरांशीं जलमार्गानें चालतो व कापूस, धान्य व तूप हे जिन्नस बाहेरदेशीं जातात. गहूं, ज्वारी, कापड, इत्यादि जिन्नसांची आयात होते.

कोडैकानल, ता लु का.—मद्रास इलाख्यांतील मदुरा जिल्ह्याच्या डिंडिगल नांवाच्या पोटजिल्ह्यांतील एक छोटासा तालुका. या तालुक्याचें मुख्य ठिकाण कोडैकानल हें असून या तालुक्यांत १५ लहान मोठीं डोंगराळ खेडीं आहेत. या तालुक्याची वस्ती १९२१ मध्यें २,३१,१३६ होती. जमीन महसूल व सारा मिळून या तालुक्याचें उत्पन्न सुमारें ४३,००० रुपये आहे. हा डोंगराळ तालुका असल्या कारणानें डोंगराच्या दरीच्या बाजूबाजूनें असलेल्या जमीनींची पेरणी करण्यांत येते. गहूं, लसूण, कॉफी, दालचिनी हें या तालुक्यातील मुख्य उत्पन्न आहे. येथें पिकणारा तांदूळ हलक्या जातीचा असल्याकारणानें त्याचें पीक यावयाला आठ ते दहा महिने लागतात. पलनी टेंकड्यांच्या आसमंतात केळीं पिकतात व या भागात गुराची निपज फार मोठ्या प्रमाणात होते. शिक्षणाच्या बाबतींत हा भाग फार मागसलेला आहे व जें कांहीं येथें शिक्षण मिळतें तें जेसुइट व अमेरिकन मिशनकडून दिलें जातें. या तालुक्याच्या सर्व भागात अस्वच्छता दिसून येते.

गा व—कोडैकानल तालुक्याचें हें मुख्य ठिकाण असून पूर्वी हें अगदीं लहानसें खेडें होतें. पण हल्लीं मद्रास इलाख्यातील आरोग्यस्थान म्हणून या भागाची ख्याति आहे. अर्थातच उन्हाळ्यामध्यें या ठिकाणीं राहण्याकरितां पुष्कळ लोक येतात. या गावाची लोकवस्ती १९२१ सालीं ४२८३ होती. सन १८९९ मध्यें या गावाला म्युनिसिपॅलिटीचे हक्क देण्यात आले. या गांवाला कायमची पाण्याची व्यवस्था करण्याबद्दलची योजना घाटत आहे. या गावात ३ प्रार्थनामंदिरें असून एक युरोपियन मुलामुलींकरता अमेरिकन मिशनतर्फे शाळाहि चालू आहे. तसेंच म्युनिसिपॅलिटीतर्फे या गावांत एक मोफत दवाखानाहि आहे.

येथील आरोग्यभुवन ( सॅनिटोरियम )समुद्रसपाटीपासून ७०००फूट उंचीवर आहे. हें ज्या टेंकडीच्या वर वसलेलें आहे, त्या टेंकडीच्या पायथ्याशी एक सुंदर कृत्रिम तलाव आहे. येथील हवा जवळ जवळ उटकमंडच्या सारखी आहे. शिवाय उटकमंडपेक्षा याठिकाणीं पर्जन्याचें मान कमी असल्याकारणानें तर तेथील हवा फारच सुंदर असते. या आरोग्यभुवनाच्या सभोंवार गवतानें आच्छादलेलीं मैदानें व लहान अरण्यें असून अरण्यांतून लहान पाण्याचे झरे वहात असतात. या स्थानापासून जवळचें स्टेशन म्हणजे अम्मयनायकनूर असून हें कोडकेनलपासून ३३मैल आहे. व आरोग्यभुवनाच्या पायथ्याशी आल्यावर नंतर आरोग्यभुवनाला११ मैलांचा चढ घोड्यावरून अगर खुर्चीवरून चढावा लागतो. या आरोग्यभुवनाच्या अगदीं जवळच थोड्याशा उंचीवर एक वेधशाळा आहे. १८९९ सालीं उटकमंड येथील वेधशाळा काढून या ठिकाणीं तिची स्थापना झाली. या आरोग्यभुवनाच्या पासून १००० फूट खाली शेंबगनूर येथें एक जेसुइट लोकांचें कॉलेज आहे.

कोडॉंग—अप्पर ब्रह्मदेशातील रुबीमाइन्स जिल्ह्यामधील एक डोंगराळ तालुका. हा मोंगमीट संस्थानच्या ईशान्येस असून याची व्यवस्था डेप्युटी कमिशनरमार्फत चालविली जाते. या तालुक्याचें क्षेत्रफळ ७६० चौरस मैल आहे. हा तालुका मुख्यतः टेंकड्यांवर वसला असून समुद्राच्या सपाटीपासून ७००० फूट उंच आहे. हा डोंगराळ मुलूख

असून सुद्धां येथें दळणवळणाची सोय चांगली आहे. एकेकाळीं या तालुक्यात पर्लेग लोकांचीच वस्ती असे. पण सुमारें शंभर वर्षांपूर्वी काचिन नावाच्या डोंगरी लोकांनीं, त्यांनां हुसकून लावून आपली वस्ती करण्यास सुरवात केली. हल्लीं येथील वस्ती या दोन्ही जातींची मिळून आहे. १९११ मध्यें येथील लोकसंख्या २४,४५७ होती. या तालुक्यात १४३ खेडीं आहेत. तालुक्याचें मुख्य ठिकाण मोलो हें आहे. या ठिकाणीं अंमलात असलेला कायदा म्हणजे १८०५ सालचा काचीन हिल्स ट्राइब्स रेग्युलेशनचा होय.

कोण्णूर—मुंबई इलाख्यातील बेळगाव जिल्ह्याच्या गोकाक तालुक्यातील खेडेंगाव. हें गोकाकच्या वायव्येस ५ मैलावर घटप्रभेच्या तीरावर वसलेलें आहे. याची लोकसंख्या इ. स. १९११ मध्यें ५६९७ होती. येथें एक मुलांची शाळा असून तेथें जवळ जवळ १००मुलें शिकतात. या खेडेगावच्या हद्दीत गोकाकच्या धबधब्यानजीक बरीच जीर्ण देवळें असून तीं अकराव्या शतकाच्या सुमारास बांधलेलीं असावीत असें दिसतें. या गांवाच्या दक्षिणेस एका टेंकडीच्या पायथ्याशीं पुष्कळ थडगीं असून त्या थडग्यांभोंवतालच्या इमारतींत लहान लहान अशा तीस चाळीस खोल्या आहेत. यापैकीं बरीचशीं थडगीं जीर्णावस्थेंत आहेत. या थडग्याच्या भोंवतालील इमारती दगड लोकांनीं आपल्या घरासाठीं येथून उचलून नेलेले आहेत. येथील खोल्या पांडवांनीं बांधल्या आहेत अशी समजूत आहे. कोण्णूर हा शब्द " कोन्न+ऊरु ' या दोन कानडी शब्दांपासून झाला आहे. कोन्न म्हणजे खोली व ऊरु म्हणजे गाव. कोण्णूर याचा अर्थ खोल्याचा गाव असा होतो व हें नाव सार्थ आहे असें तेथील थडग्याजवळील खोल्या पाहिल्यावर वाटल्याशिवाय रहात नाहीं. या ठिकाणीं असलेल्या एका थडग्यात एक मनुष्याचा दात, हाडें व काहीं भांडीं असलेलीं आढळलीं

कोतवाल—मराठी साम्राज्यात कोतवाल म्हणजे सर्व पोलिसखात्यावरील मुख्य अंमलदार असे. परंतु हल्लीच्या इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलीस याच्या कामापेक्षां या कोतवालच्या तत्कालीन कामात बराच फरक होता. राज्यांतील मोठमोठया शहरीं असे कोतवाल असत. त्यांच्या हाताखालील कोतवालींत शिपाई असत. सातारा, पुणें, नगर, बऱ्हाणपुर, नाशिक, सोलापूर वगैरे ठिकाणीं हे कोतवाल असत राज्यातील या निरनिराळ्या कोतवालींवर मुख्य अधिकारी ( पुण्याचा राजधानीचा कोतवाल नसून ) तत्तत् प्रांतीय सुभेदार असे. खात्याच्या एकीकरणाची रीत ही फार अलीकडील आहे. कोतवालाच्या कामाचें स्वरूप पुढीलप्रमाणें असेः–

पुणें येथील कोतवालीसंबंधाचीं कलमें अशीं.–(१)कसबा व शहर येथील पेठांमधील मोठमोठे कज्जे व न्यायमनसुबे कोतवालानें तोडावे ( किरकोळ कज्जे पेठांच्या मामलेदारांनीं तोडावे ), व शिक्षा वगैरे करावी. ( २ ) बाजारांतील वस्तूंचे ( धान्य, कापड वगैरे व्यापारी मालाचे ) बाजारभाव ठरवावे आणि त्यांची रोजची यादी (रिपोर्ट) सरकारांत धाडावी ( ३ ) वेठ, बिगार सरकारी कामास लागेल तिची व्यवस्था करावी. ( ४ ) सरकाराच कारागिरांचें काम लागल्यास त्यांचा पुरवठा करावा. ( ५ ) जमीनीची खरेदी विक्री शहरात ज्यानां करावयाची असेल त्यानीं कोतवालाच्या हुकुमानें ती करावी आणि योग्य तो सरकारी दस्तूर ( फी ) घेऊन कोतवालानें खरेदी विक्रीचे दस्तऐवज सरकारी सहीशिक्यानिशीं करून द्यावेत. ( ६ ) गावातील रयतेपासून पुढील कर वसूल करावे ( अ ) पाट व मोहतूर करणारापासून सव्वा रुपया व एक शेला; ( आ ) कापड वगैरे मोजण्याचा गज तपासून अगर नवा करून देताना शिरस्त्याप्रमाणें रकम घेणें (इ) नवीन वजनें करून त्यावर छाप मारणें व त्याचा दस्तूर ( फी ) घेणें व जुनीं मापें नेहमीं तपासणें, ( ई ) पेंढारी लोकापासून त्याच्या ताकदीप्रमाणें दरेक घरामागें सालीना आठ आणे ते एक रुपयापर्यंत कर घेणें, ( उ ) दरेक तेल्यापासून दरेक घाण्यामागें दररोज ३ रुके घेणें ( एक रुका एक पै ), ( ऊ ) नागेश्वर पीरदर्गा ( शेखसल्ला [1] ) व कसब्यातील चावडी येथें दरमहा अनुक्रमें ८३, ८६ व ८३ चें तेल दिवाबत्ताकरितां जाळणें हा खर्च वजा जाता (बाकी वरील तेल्याच्या दुकानातील कराची जी बाकी) राहील त्यात चरकड चौथरे ( पोलीसचौक्या ) व दिवटया वगैरेंस खर्च करावा, ( ए ) गावात ठिकठिकाणीं दसऱ्यास गोंधळ होतो अगर बकरें मारितात त्या वेळीं या प्रत्येक कृत्यामागें ६ रुके सरकारात घ्यावेत( ऐ ) भाग, गांजा वगैरेंवरील कर दरमहा वसूल करावा; (ओ) लोकाची खानेसुमारी करावी ( वार्षिक ), ( औ ) शहरातून रोज जाणाऱ्या येणाऱ्या एकूणएक लोकांची नावनिशीची यादी ठेवावी, ( ७ ) रस्ते, गल्ल्या व घरें याचे कज्जे तोडावे, ( ८ ) जुगारबाजांनीं कोतवालाच्या परवानगीशिवाय जुवे खेळूं नयेत व त्या लोकापासून कोतवालानें सरकारी ठराविक कर वसूल करावा. (९) कोतवाली ( खात्याचा ) हिशेब दरमहाचे दरमहा सरकारात दाखल करावे. ( १० ) गावात दौंडी फिरविण्याची व्यवस्था करावी. ( ११ ) शहरातील सरकारी किरकोळ कर ( भाजी पाला धान्य वगैरे आयात मालावरील) जमा करावेत (१२) पुण्यात कोतवालीचे कामाचे चावडीस बुधवारात जागा नेमून दिली. ( १३ ) शहराचा चौकीपहारा सतत करणें व रयतेवर जुलूम न करिता रयत आबाद राखणें. ( १४ ) सरकारी वसूल वेळेवर सरकारात जर भरला नाहीं तर कोतवालानें त्यावर आपल्या पदरचे दरमहा दर शेंकडा १ रुपया प्रमाणें व्याज दिलें पाहिजे. ( १५ ) सरकारी अमलातून नोकरीस ठेविलेल्या शिबंदीचा ( पोलिस घोडेस्वार व पायदळ

वगैरेंचा ) खर्च काढून घेऊन बाकीचा भरणा सरकारात दरमहा भरावा.

एखादेवेळी कोतवालावर सदर अमीन(मुख्य न्यायाधीश) चा हुकमत असे. साधे अमीन कोतवालाच्या हुताखाली असत. पुण्याच्या सर्वच कोतवालीची सालीना नेमणूक तीन ते साडेतीन हजारापर्यंत असे. खास कोतवाल याचा पगार सालिना१०० ते१२५० रु असून त्याच्या फडणिसास व दफ्तरदारास अनुक्रमे २०० व दिडशे रु. पगार असे. प्रत्येक कारकुनास सालीना १२५ रु. व प्रत्येक प्यादा ( शिपाई ) ला सालिना ४८ रुपये असत. कोतवालाला एक दिवटया देत व एक सरकारचावडीवर असे, याना सालीना ६० रु. हुरकामी आसामी (ऑर्डेली) दोन असत, त्याना सालिना ५० रु दोन नाईक, दोन दीडिये व दोन पानसारे याना प्रत्येकास सालीना २४ रु. असा पगार असे. या सर्वांचे वेरीज वरील ३।३॥ हजाराच्या वेहडयात(नेमणूक पत्रात) होई आकस्मिक गोष्टीत भोजनखर्च, दप्तरखर्च, ऐवजखर्च वगैरे येई त्याचा खर्च वेळेवर कोतवालाने आपल्या हुकमतीत करून सालअखेरीस मात्र सरकारी मंजुरी घ्यावी लागे. तसेंच एखादा कायद्याचा नियम अगर सरकारी हुकुम अन्यायाचा असल्यास तो बदलणें झाल्यास अगर प्रजेच्या फायद्याचे नवीन नियम वगैरे करणें झाल्यात ते कोतवालानें प्रथम सरकारात समजवावे म्हणजे सरकार योग्य ती तजवीज करीत असे. [ वाड. पु. ७ भाग २; पु. ८ भा. ३ ].

**कोत्रंग**—बंगाल प्रातात हुगळी जिल्ह्याच्या श्रीरामपूर पोटविभागात हुगळीच्या उजव्या किनाऱ्यावरील गाव. लोकसंख्या ६५७४. येथें विटा व कौलाचे कारखाने असून दोन्हीचेहि कारखाने आहेत येथें १८६९ त म्युनिसिपालटी स्थापन झाली.

**कोत्रा**—राजपुतान्यात उदेपूर संस्थानच्या वायव्य भागात उदेपूर शहराच्या नैर्ऋत्येस ३८ मैलावर वाकल व साबरमती या नद्यांच्या संगमाजवळ दरीत हें लष्करी छावणीचें ठिकाण आहे. हें राजपुतानामाळवा रेल्वेवर आहे. कोत्रा जिल्ह्यात ४१२ गावें असून एकंदर लो. सं. २०,४८० आहे. पैकीं दोन तृतीयांश भिल्ल आहेत या संस्थानावर ज्युरा, ओघना व पनर्वा येथील तीन गिरासिया सरदाराची मालकी आहे. ते मेवाडच्या दरबारात थोडीशी खंडणी देतात

**कोत्री**, *तालुका*.—मुंबई इलाख्यात सिंध प्रातामध्यें कराची जिल्ह्यातील एक तालुका क्षे.फ.३१०७ चौ. मै. यात ७९ खेडीं आणि२ मोठीं गावें आहेत.त्यांची लो सं (१९११) ८०९८३.याचे स्पष्ट असे दोन विभाग आहेत (१) मंद विरह' टप्पा नावाचें पठार हें कोहिस्तानात आहे. (२) डोंगराळ मुलूख व सिंधु नदी याच्यामधील सुपीक व अरुंद प्रदेश ( यात शेतांस पाणी पुरविणारे ५ कालवे आहेत ) मुख्य पीक जवारी, बाजरी, तांदूळ, तीळ, कापूस आणि गहूं. यातील मुख्य गावें कोत्री, ( तालुक्याचें मुख्य ठिकाण ) व मानझंद ही आहेत.

गा व.—मुंबई इलाख्यात सिंध प्रातामध्यें कराची जिल्ह्यात याच नावाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें सिंधु नदीच्या काठीं असून नार्थवेस्टर्न रेल्वेचें जंक्शन आहे. लोकसंख्या (१९११) ६२५८. पूर्वी सिंधु नदींतून व्यापार चालत असे, परंतु आगगाड्या सुरू झाल्यापासून तो व्यापार बराच कमी झाला आहे. हे गाव 'नुमरिया' किंवा नऊ इसमाच्या कुळाचा अधिपति मलिक मादरखान याच्या जहागिरींत आहे इंग्रजाच्या अमलाखालीं येण्यापूर्वी ह्या गावाला लष्करी दृष्टीखेरीज इतर दृष्टीनें मुळींच महत्व नव्हतें. इ स १८३९ त अफगाण वर जाणाऱ्या मुंबई तुकडीच्या सैन्याचा तळ या गावीं होता इ स. १८५४ त येथें म्युनिसिपालिटी अस्तित्वात आली. उत्पन्न सुमारें १६००० रु आहे १८७९ च्या महामारीच्या सालापासून गावच्या आरोग्यविषयक बाबतीकडे बरेंच लक्ष दिलें जातें येथें सबॉर्डिनेट जज्ज कोर्ट ६ मुलांच्या व २ मुलींच्या शाळा आहेत व एक दवाखानाहि आहे.

**कोथिंबीर**—ह्याला लॅटिनमध्यें अॅनेलीफेरा, इंग्रजींत कोरिअँडर, संस्कृत भाषेत धान्यक किंवा धन्यक व मराठींत धणे, धन्या, धनिया, कोथिंबिर इत्यादि नावें आहेत.

इ ति हा सः—हें एक मसाल्याचें झाड आहे. धन्याची माहिती यूरोपखंडात फार प्राचीन कालापासून आहे. हिंदुस्थानातून मसाल्याचे जिन्नस ईजिप्तमध्यें गेल्या शतकापर्यंत रवाना होत. परंतु हल्लीं कोथिंबिरीची लागवड रशिया, हंगेरी, हॉलंड, मोरक्को इत्यादि देशात झाल्यामुळें आता ते हिंदुस्थानातून ईजिप्तला रवाना होत नाहींत.

ला ग व ड.—हिंदुस्थानात निरनिराळ्या प्रातात याची लागवड निरनिराळ्या वेळीं करितात. व ती बहुधा मिश्रपीक म्हणून घेतली जाते. बंगाल व संयुक्त प्रात यामध्यें हिवाळ्यात मुंबईप्रातात पावसाळ्यात व मद्रास इलाख्यात शरदृतूंत याची लागवड करितात. नेपाळमध्यें धन्याचें मोठें उत्पन्न होतें. पंजाबातहि याची लागवड प्रत्येक जिल्ह्यात आहे. कोथिंबिरीच्या पानाचा भाजींत, कढींत स्वाद येण्याकरिता व धन्याचा उपयोग मसाल्यात करितात. मद्याकाला चव आणण्याकरिताहि याचा उपयोग केला जातो. यूरोपमध्यें त्यापासून एक बाष्पभावी तेल काढितात. ह्या झाडापासून तेल निघतें असें पोर्टानें १६ व्या शतकात लिहून ठेविलेलें आहे. या तेलाचें विशिष्टगुरुत्व ०.८७० पासून ०.८८५ पर्यंत आहे. या तेलाचा विशिष्ट वास त्यामधील कोणत्या पदार्थापासून येतो हें निश्चित झालेलें नाहीं. हिंदुस्थानात होणाऱ्या धन्यापासून निघणाऱ्या तेलाचें मान [illegible] ०.१५ ते ०.२ म्हणजे अतिशय कमी असल्यामुळें मोठ्या प्रमाणावर तेल काढण्याकडे हिंदुस्थानातील धन्याचा उपयोग करीत नाहींत. हिंदुस्थानांतून १९१८–१९१९ या

साली धन्याची निर्गत ४८३९ टन झाली. व त्याची किंमत सुमारें १ लाख रुपये झाली. तुतिकोरिन व नेगापटम् या बंदरातून याची निर्गत जास्त होत असून थोडाबहुत मुंबई व कलकत्ता बंदरातूनहि माल बाहेर जातो.

हिंदुस्थानातून मारिशस बेटाला सुमारें १०० टन माल दरवर्षी जातो. १९१७ त १८ साली युनायटेड स्टेट्स कडे अजमासें ५०० टन धन्याची निर्गत झाली. कोथिंबिर पुष्कळ प्रमाणावर करणें असल्यास धने फेकून पेरतात. धने पेरण्यापूर्वी जोत्यानें कठिण जमिनीवर खरडतात. जोत्यानेंच खरडले पाहिजेत अशी कित्येकाचा समजूत आहे. हेतु हा कीं धन्याची दोन शकलें झाली म्हणजे दोन बियांची दोन रोपें उगवतात. तीं शकलें कोणत्याहि हलक्या वस्तूनें खरडल्यास त्या शकलांतलि बियाचे उगवणारें टोक चिरडलें जाणार नाहीं. दुसऱ्या पिकात मोकळ्या जागीं तीन अगर पाच बोटाच्या चिमटीनें धने टोंचतात दुसऱ्या पिकात दुय्यम भाजी म्हणून कोथिंबीर लावण्याची पुष्कळ वहिवाट आहे. जेथें धने करण्याकरिता लागण करितात तेथें नुसती कोथिंबीरच करितात. मुंबईसारख्या शहरीं रोज एक वॅगनभर कोथिंबिरीचा सहज खप होतो. इतकी कोथिंबीर पुणें व नाशिकच्या बागाईत जमिनीत करितात. तेथें नुसती कोथिंबीरच पेरतात. कधीं एकाच वेळीं पुष्कळ लागण झाल्यानें बाजारात कोथिंबीर फारच स्वस्त होते व मळेवाल्यास काहीं उत्पन्न होत नाहीं. परंतु उन्हाळ्यांत कोथिंबीर बहुशः महाग असते. अशा वेळीं तयार होणाऱ्या कोथिंबिरीस चागला भाव येतो. वेळवाऱ्याप्रमाणेंच भाव मिळाल्यास कोथिंबिरीचे चागले पैसे होतात. न मिळाल्यास कधीं कधीं नुकसानहि होण्याचा संभव आहे.

चिमटीनें बीं लावतात. एकाच ठाणात पुष्कळ बीं पडतें व तें सर्व उगवलें तरी त्यातलें अर्धें कुचंबतें अथवा मरून जातें. म्हणून चिमटीनें बीं न लाविता खुरप्यानें ४–६ इंच रेघ ओढून तींत बीं टाकून खुरप्यानें पुन्हा त्यावर माती ओढल्यानें सर्व बियापासून उगवण्यास वाव मिळतो. थोडें परस असून पाण्याची सोय असल्यास घरात निघणारी राख वगैरेंचें खत घालून उद्योगी बायका घरकामापुरती कोथिंबीर नेहमीं घरींच पिकवितात. त्याकरितां दर १५।२० दिवसानीं आपणास कोथिंबीर लागते त्या मानानें धने पेरल्यास कोथिंबिरीस तोटा पडत नाहीं. कोथिंबीर उगवण्यास १५ पर्यंत दिवस लागतात. ती उगवून वर आल्यावर झपाझप वाढते. नुसत्या कोथिंबिरीचें शेत, ओली कोथिंबीर विकल्यास तीन महिन्यांतच खाली होतें. धने करावयाचे असल्यास जमीन ५।६ महिने अडते. धन्याच्या हळवे (गावरानी) व गरवे (बदामी) अशा दोन जाती आहेत. गावरानी धान्याचा दाणा लहान व काळसर असतो. बदामी धन्याचा दाणा गावरानीपेक्षा दुप्पट मोठा व पिंवळा असतो. बदामी धन्यास जास्त दिवस स्वाद रहातो; दुय्यम पिकाकरिता गांवरानी बीं वापरतात. धन्याकरितां कोरडवाहू शेतात हळवे व गरवे अशीं दोन्ही पिकें शेंकडों एकर करतात. धन्याचें उत्पन्नहि चागलें होतें.

औ ष धी गु ण ध र्म.—धने गोड, थंड, पित्तकफनाशक, वातघ्न, अंगमर्दनाशक व अग्निदीपक आहेत. याचे औषधी उपयोगहि अनेक आहेत. विशेषतः शरीरातील उष्णता काढण्यास, ताप, खोकला, तहान, ओकारी वगैरे विकारावर त्याचा उपयोग होतो. ओलें झाड (कोथिंबीर) मूत्रल असून कृमिनाशक आहे. आमाशावर धने व सुंठ याच्या काढ्यांत एरंडमुळाचें चूर्ण द्यावें. अरुचीवर धने, वेलची व मिरीं याचें चूर्ण तूपसाखरेंतून द्यावें. शरीरात दाह झाल्यास धने रात्रीं पाण्यात भिजत घालून सकाळीं तें पाणी गाळून त्यात खडीसाखर टाकून प्यावें. जेपाळाच्या विषावर धन्याचें चूर्ण, साखर व दहीं एकत्र करून द्यावें. मूत्रघातावर धने व गोखरू याचा काढा तूप घालून द्यावा तृषा कमी होण्यास धने पाण्यात भिजत घालून नंतर त्या पाण्यात मध व पिठीसाखर घालून ठेवावी व तें पाणी वारंवार देत जावें.

**कोंदिवटी लेणीं**—हीं लेणीं बी. बी सी. आय. रेल्वेच्या अंधेरी स्टेशनपासून दोन कोसावर (ठाणें जिल्ह्यात) सह्याद्रीच्या एका ठेंगण्या रागेंतील टेकडीमध्यें आहेत याना महाकाळाचीं लेणीं असें दुसरें नाव असून तीं एकंदर १९ आहेत. हीं बौद्धानीं खिस्ताच्या दुसऱ्या ते सहाव्या शतकाच्या दरम्यान कोरलेलीं असून तीं साधारणतः छोटीं, पडकीं व भुयारवजा अशीं आहेत. मरोळ अगर मूळगाव या पायथ्याच्या गावातून पहाडावर जाण्यास चागली वाट आहे. मूळगावच्या तलावाच्या पूर्वेस एक ११–१२व्या शतकातील ब्राह्मणी (धर्माचे) देऊळ, एक बौद्धकालीन (स. १००–५००) पाण्याचें कुंड व पुष्कळशा बौद्धकालीन इष्टिका पडलेल्या आहेत. लेण्याच्या अलीकडे ५० कदमांवर उत्तरेस एका खडकाखालीं एक छोटेंसें कुंड आहे. लेण्याचें मुख समुद्राच्या बाजूस असल्यानें वसईच्या खाडीचा व त्या भागाचा सुंदर देखावा तेथून दिसतो. पहिल्या समूहात फक्त चारच व तींहि चौथ्या ते पाचव्या शतकातील लेणीं आहेत. पहिल्या लेण्यात नेहमींप्रमाणें, पडवी, टाकें, दगडी ओटा, दिवाणखाना व निजण्याच्या खोल्या आणि ओटे वगैरे आहेत. दुसरें लेणें म्हणजे जेवण्याचें माजघर असावेंसें दिसतें. तिसरें लेणें कान्हेरी लेण्याप्रमाणें आहे. त्यात एक आंगण, टाकें, पडवी, अडोशाची भिंत, अटकोणी खांब दरवाजा, दगडी ओटे, दिवाणखाना, निजण्याच्या खोल्या, मागल्या बाजूस एक गाभारा व त्यात एका भिंतीवर कोरलेलें एक स्थंडिल वगैरे आहेत. तिसऱ्या व चौथ्या लेण्याच्या दरम्यान एक दागोबा आहे. चौथें लेणें हें रहाण्यासाठीं बांधलेलें असून त्यात दहा खांबी पडवी व दिवाणखाना आहे. हीं चारही लेणीं एकाच वेळचीं आहेत. या लेण्याच्या उत्तरेस १५० कदमावर वरीवर्शी (२ फूट औरस चौरस) पाण्याची

टाकीं मुयारात आलेलीं असून पश्चिमेस १० कदमावर ३१४ जुनाट यडगीं आहेत दक्षिणेस एक चार फूट उंचीचा खाव उभा आहे. जवळच एक स्तूप किंवा स्मशानभूमि असून त्याचा घुमट दगडविटांनीं बांधलेला आहे त्याचें तोंड उघडें केलेलें असून त्याच्या विटा भोंवतीं पडल्या आहेत या.च्याच जवळ दुसरा एक पडका स्तूप असून पलीकडे एका कोरलेल्या रस्त्यात दोन दगडी आसनें ( गुरुशिष्यासाठीं ) आहेत. या आसनांवरून पर्वताच्या उत्तर दक्षिणेकडील देखावा फार उत्तम दिसतो. दक्षिणेस पायथ्याशीं सर्पाळें तलाव, देवळाचा तलाव व कोंदिवटी गाव दिसतो. मोठ्या स्तूपाच्या पश्चिमेस असलेल्या ८। ९ पायऱ्या चढून दक्षिणेकडे वळल्यास लेण्यांचा दुसरा समूह लागतो. प्रथम एक पडकें बौद्ध देवालय असून त्यापलीकडे हीं ११ लेणीं आहेत. हीं लहान व पडकीं असून पहाण्यासारखें विशेष असें त्यात कांहीं नाहीं. त्यांचा क्रम पश्चिमपूर्व असा आहे पहिल्या लेण्याचें दार अर्धवट बुजलेलें असून पडवींत चार खांब आहेत. दुसरें लेणें मोठें असून आत एक नकशी कोरलेली पडवी, चार खांब,एक टाकें,एक खोली पंचकोनी खांब, एक गाभारा ( बिनखांबी ) त्यात एक मूर्तीसाठीं कोरलेलें असून व मागील भिंतींत लाकडी खुंट्या बसविण्यासाठीं खोदलेली तीन इंची औरस चौरस भोंकें आहेत. या भोंकात हल्लीं साप बसलेले असतात म्हणून तेथें जाताना काळजी घ्यावी असें मि. कझिन्स म्हणतो. हें लेणें बहुधा ५ व्या किंवा ६ व्या शतकातील असावें. तिसरें लेणें पडकं असून तें रहाण्यासाठीं बांधलेलें आहे. चौथें लेणें हें देवळासारखें आहे. आगणातील उजव्या बाजूच्या एका भिंतीवर एक कोरलेला मोठा ( साडेचार फूट लांब व पाऊणेदोन फूट रुंद फण्याचा ) सात मुखाचा नाग आहे. याच्याच खालीं पर्वताच्या पायथ्याशीं सर्पाळें तलाव येतो. बहुधा या सर्पावरून हें नाव तलावास मिळालें असावें. नागाजवळ एक टाकें असून, पटवीच्या आतील खांब अष्टकोणी आहेत. पडवीला २ खिडक्या व २ दरवाजे असून त्यातून पलीकडे मोठ्या गाभाऱ्यात जाता येतें. गाभाऱ्याच्या बाजूच्या पाख्यात तीन खोल्या आहेत. गाभाऱ्याच्या मागील भिंतींत दागोब्याची जागा कोरलेली आहे; हें लेणें ३ ऱ्या किंवा ४ थ्या शतकातील असावें. पाचवें लेणें छोटेंसें व रहाण्याचें आहे. सहाव्यात ३।४ खोल्या व दगडी ओटे आहेत. सातव्यात एक दिवाणखाना, बाजूस खोल्या व मागें एक गाभारा आहे. आठवें लेणें पडून गेलें आहे नववें लेणें हें सर्वांत जास्त जुनें व पहाण्यासारखें असून त्यात पडवीच्या नंतर एक भव्य सभा मंडप लागतो, येथें हल्लीं एक शिवलिंग असून त्याला महाकाल म्हणतात, त्यावरूनच या लेण्याना महाकालाचीं लेणीं म्हणतात. ब्राह्मणधर्माच्या भरभराटीत हें येथें स्थापन केलें गेलें असावें, सभामंडपाच्या उजव्या बाजूच्या भिंतींत कोरलेल्या मूर्ती आहेत. मागील भिंत ही कोरून तिला गोल व निमुळत्या गोपुराप्रमाणें बनविली असून, तिच्यात दोन जाळीच्या खिडक्या आहेत. ह्या भिंतींतच गाभारा कोरला असून त्याचा आकार अर्धचंद्रकार वीस फूट लांबीचा आहे यावरील शिखर १५ फूट उंच असल्यानें गाभाऱ्याचा सर्वसाधारण आकार झोपडीसारखा दुपाखी दिसतो. त्याच्या मधोमध पाढऱ्या रंगाचा दागोबा ( २३ फूट घेराचा व ८ फूट उंचीचा ) असून, खालून चार फूट उंचीवर एका सहा इंच रुंदीच्या पट्टिकेवर बौद्ध नमुन्याचें कोरीव काम आहे. आणि वर छत्रीसाठीं चार भोंकें आहेत दागोबाच्या भोंवतीं प्रदक्षिणेसाठीं मार्ग आहे. दागोबाच्या माथ्यावर मधोमध हल्लीं एक थेट खालीं जमिनीपर्यंत गेलेला तडा पडला आहे. वरील जाळीदार खिडक्यापैकीं पूर्वेकडील उजव्या खिडकीवर एक दोन ओळींचा पाली शिलालेख ( तिसऱ्या शतकातील ) असून त्याची अक्षरवटिका गिरनार येथील रुद्रदामाच्या अक्षरवटिकेसारखी आहे. आणि त्यात " पंचीकम ( भगवान लाल इंद्राजीच्या मतें नागपुराकडील पंचमडी ) च्या पितिम्ब नावाच्या गौतमगोत्री ब्राह्मणानें हा विहार बांधविल्याचा " उल्लेख आहे.या झोपडीच्या आकाराच्या गाभाऱ्यासारखाच एक गाभारा बिहार प्रातांतील बर्बर डोंगरातील ( गयेजवळ ) अशोकाच्या एका लेण्यात ( ख्रि. पू. २५० ) आढळतो; तसेंच गयेजवळील लोमशऋषींचें व सुदाम्याचें अशा या बर्बर पहाडातील फक्त दोनच लेण्यात असे गाभारे आहेत. बाकी मग साऱ्या हिंदुस्थानात असले गाभारे कोणत्याहि लेण्यात नाहींत. वरील गाभाऱ्यातील पूर्वेच्या भिंतीवरील नक्षीकाम सहाव्या शतकातील आहे. त्यांत मुख्य म्हणजे बुद्ध हा दोघा शिष्याना उपदेश करीत असलेलें चित्र होय. पाच फण्याच्या नागानें त्याचें कमलासन उचललें असून त्याच्या दोन्ही बाजूस दोन नागकन्या व दोन सेवक असून वरती दोन विद्याधर आहेत. जवळच वरती सहा उपदेश करणाऱ्या बुद्धाच्या मूर्ती आहेत व शेजारीं एक अवलोकितेश्वर उभा असून, त्याच्या नजीकच आणीक एक बसलेला बुद्ध आहे. खालीं एक उपासक बसला आहे, तो बहुधा हें लेणें कोरविणारा उपर्युक्त पितिम्ब असावा. दहावें लेणें पडकें व भिक्षूची रहाण्याची खोली असून, त्यातील उजव्या बाजूच्या भिंतीवर थोडें फार कोरीव काम आहे. अकराव्या लेण्यात पहाण्यासारखें कांहीं नसून तें पडलेलें आहे, बारावेंहि तसेंच असून पडवींतील कडेंजवरील एका पट्टिकेवर थोडेंसें कोरीव काम व डाव्या कोपऱ्यात एक मूर्ति आहे आणि आत ३। ४ खोल्या आहेत. तेराव्यात एक आगण व पडवी असून पडवींत एक टाकें,दगडी ओटे व चार खांब आहेत. त्यापुढें सभामंडप असून त्याला तीन दरवाजे व आत तीन खोल्या आहेत. त्याच्या पाठीकडील भिंतींत गाभारा व अष्टकोणी खांब असून जवळच कोरीव शिलापट्टिका आणि एक सिंहासन व त्यावर एक मूर्ति आणि शेजारीं दोन खोल्या आहेत. चौदावें लेणें म्हणजे एक लहान खोली

आहे पधराण्याचा रस्ता दगडमार्तीं पडून बुजून गला असून, आंत दोन पडव्या व खांब आणि एक कोरीव कामाची पट्टी आढळते जवळच भुयारांत एक व पहाडा वरून खालीं उतरण्याच्या डाव्या हाताकडील रस्त्यापाशीं एक अशीं दोन टाकीं आहेत याप्रमाणें या पर्वतांतील पहाण्यासारखीं सर्व लेणीं व ठिकाणें होत पहाडाच्या पायथ्याशीं देवळाच्या तलावानजीक एक जुनाट पडकें चर्च आहे त्याचे दगड ब्राह्मणी देवळांच्या ( इसवी सन १२ व्या शतकांतील ) बांधकामापैकीं आणिलेले आहेत. जवळच तात्कालीन एक मोडकें देऊळ व देवळाचे अवशेष असून, तलावास पडका घाट आहे शेजारच्या विहरगाव व मारोळ येथेंहि ब्राह्मणीधर्माच्या बांधकामाचे अवशेष आढळतात पूर्वेस पावमैलावर दोन पाण्याचीं कुंडें आहेत याप्रमाणें ही कोंदिवटी येथील लेणीं आहेत [ ठाणें ग्याझेटिअर ]

**कोद्रु**—यास लॅटिनमध्यें पास्पालम स्क्रोबिक्युलेटम, संस्कृतमध्यें व मराठींत कोद्रु, हरीक वगैरे नांवें आहेत या धान्याची सर्वांत जास्त लागवड मध्यप्रांतांत होते असें म्हणतात परंतु त्या ठिकाणीं या पिकानें किती क्षेत्र व्यापलें आहे यासंबंधीं आकडे मिळत नाहींत १९०४–५ मध्यें कुटकी व हें पीक यांनीं एकंदर २०३९३४५ एकर क्षेत्र व्यापलें होतें मुंबई इलाखा व संयुक्त प्रांत यांतहि याची लागवड होते विशेषत संयुक्त प्रांतांत ज्वारी, बाजरी वगैरे प्रकारच्या धान्यामध्यें याची पेरणी विशेष करतात कारण याला कितीहि दिवस जमीन चालते पावसाळ्याच्या आरंभीं पेरणी होते व आक्टोबरांत पिकाची कापणी होते तण वगैरे काढून शेताची मशागत चांगली झाल्यास एकरी १० ते १२ मण धान्य निघतें सर्व धान्यांत हें अगदीं हलक्या प्रतीचें धान्य समजलें जातें गरीब लोकांशिवाय हें धान्य बहुधा कोणी खात नाहींत यांत ४ जाती आहेत रामेश्वरी, शिवेश्वरी, रुक्मिणी व मामरा माजरा ही जात फार अपायकारक आहे माजरा जातीस शुद्ध न करता तिचा खाण्यांत उपयोग केल्यास वांति, जुलाब वगैरे विकार होतात घेरी येते, मन भ्रमिष्ट होतें, ग्लानि येऊन कैफ चढतो व कधीं कधीं प्राणहानि सुद्धां होते हिंदुस्थानांत पुष्कळ लोक याचा खाण्याकरितां उपयोग करतात परंतु अन्न या दृष्टीनें तें फारसें हितकारक नसून कांहीं ऋतूंत तर अपायकारक होत कापणीच्या वेळीं हवा सर्द व आकाश मेघांनीं व्याप्त असल्यास त्याचप्रमाणें सर्द दिवसांत व सर्द जमिनींत हें धान्य विषारी बनतें विषारी व सादितर धान्याला गुजराथेंत मिठा व मिना अशीं नांवें आहेत

मा ज रा को द्रु शु द्ध क र ण्या ची री त—हा कोद्रु एक दिवस शेणपाण्यांत भिजत घालतात मग तो स्वच्छ धुवून एकदान दिवस उन्हांत वाळत घालतात असें केल्यानें त्याचा दोष जाऊन तो खाण्यास योग्य होतो हरीकाचा भात, पेज, वगैरे करतात हें धान्य फार शीतळ आहे [ वॅट पदे ]

**कोणारक—विहार**—ओरिसा इलाख्यांतील पुरी जिल्ह्याच्या पोटविभागाच्या मुख्य ठिकाणीं असलेलें देवालय हें देवालय पुरी शहरापासून पूर्वेस २१ मैलावर आहे या देवालयापासून अर्धाच मैल लांबीवर समुद्र आहे ओरिसाच्या गग घराण्यांतील पहिल्या नरसिंह देवानें हें सूर्यदेवतेचें देवालय बांधलें (ओरिसा पहा) कोणारक याची व्युत्पत्ति कोन येथील अर्क म्हणजे सूर्यदेवता अशी आहे याचें प्राचीन नाव कोनाकोन असें होतें या देवालयाचा कळस १८० फूट उंच असून समोर १४० फूट उंचीचा एक सभामंडप आहे या देवालयाचें महाद्वार पूर्वाभिमुख असून द्वाराजवळ हत्तीवर बसलेल्या दोन सिंहाच्या मूर्ती आहेत उत्तर व दक्षिण द्वारापाशीं दोन हत्तींच्या मूर्ती असून हत्तीनें आपल्या सोंडेनें एका मनुष्याला वर उचलेलें आहे असा देखावा आहे याशिवाय याच द्वारापाशीं उत्तम सजविलेल्या दोन घोड्याच्या मूर्ती असून, त्या घोड्याजवळ पुष्कळ योद्धे उभे राहिले आहेत असा देखावा आहे प्रत्येक दरवाजावर खोदकाम असून तें चांगलें साधलेलें आहे पूर्वदरवाजावरील हें खोदकाम अद्यापि जसेंच्या तसें पहावयास मिळतें या दरवाज्याच्या वरच्या बाजूला एक शिळा असून तीवर नवग्रहाचें चित्र खोदलेलें आहे या शिळेचीहि भाविकपणानें पूजा करण्यात येते या शिळेमध्यें पाडलेल्या कोनाड्यात आसनमांडी घालून बसलेली एक सूर्यदेवतेची मूर्ति होती या देवळाच्या जोत्यावर आठ चाकें व यांत घोडे कारलेले आहेत सर्व देवालयास रथाचा आकार दिला असून त्यांत सूर्यदेवता बसलेली आहे व तो रथ या सात घोड्याकडून ओढला जात आहे अशा तऱ्हेची ही देवालयाची रचना आहे मंडपाच्या पूर्वेस एक चौकोनी इमारत असून, या इमारतीवर नाचणाऱ्या देवदासींच्या प्रतिमा कोरलेल्या आढळतात त्यावरून ही इमारत नाचासाठीं बांधली असावी असें दिसतें या देवळाच्या भोंवती एक पटांगण असून त्या पटांगणाच्या भिंतीची लांबी रुंदी ५००×३०० फूट आहे या भिंतीमध्यें पूर्वी पुष्कळ लहान मूर्ती, व ओव्या होत्या असे अवशेषांवरून दिसतें आतापावेतों या पटांगणांत जिकडे तिकडे वाळू साचलेली होती पण १९०२ सालापासून सरकारनें ही जागा खणण्यास सुरुवात केली व त्यामुळें या देवालयाच्या पटांगणांतील इतके दिवस बुजून राहिलेले भाग आतां उघडकीला आले आहेत देवलयाचा कळस पडलेला असून तोहि शोधण्याचें काम चालू आहे हें देवालय जरी अगदीं जीर्ण झालेलें असलें तरी, हिंदुमूर्तिकलेचा व वास्तुशास्त्राचा उत्तम नमुना या देवालयाकडे बोट दाखवता येण्यासारखें आहे

**कोनिग्जबर्ग**—जर्मनीतील पूर्वप्रशियाची राजधानी व पहिल्या प्रतीचें तटबंदी शहर लोकसंख्या (१९१०) २,४०,९९४, हें प्रेगेल नदीच्या दोन्ही बाजूस तिच्या मुखापासून साडेचार मैलावर उंच जागी वसलेलें आहे हें या नदीच्या ईशान्येस ३१० मैलावर असून प्रेगेल नदीचे दोन्ही प्रवाह शहरामधून वहात जातात नदीच्या पूर्वेस एक पश्चिमेस एक व दोन्ही प्रवाहाच्या मध्यें एक असे शहराचे मुख्य तीन भाग असून सर्व शहराचा घेर साडेनऊ मैल आहे ह्या नदीची शहरातील अधिकांत अधिक रुंदी ८०–९० यार्ड असून दळणवळणाकरिता तिच्यावर पुष्कळ पूल बांधलेले आहेत नोव्हेंबर ते मार्च महिन्यापावेतों ही बहुधा गोठलेली असते गॉथिक इमारतीजवळ कटचें थडगें आहे येथें शहरात बारा एकर असलेलें एक तळें आहे कवाइतीच्या मैदानाच्या वायव्येस विश्वविद्यालयाच्या इमारती आहेत त्याचें व प्रेगेलच्या दक्षिणेस असलेल्या हुडीबाजारच्या इमारतीचें काम नमुनेदार आहे येथील विश्वविद्यालय गणिताच्या व तत्वज्ञानाच्या अभ्यासाकरिता प्रसिद्ध असून त्याला जोडूनच एक नावाजलेली वेधशाळा, २,४०,००० पुस्तकें असलेलें एक ग्रंथसंग्रहालय, प्राणिसंग्रहालय, वनस्पतिबाग, प्रयोगशाळा आणि गणितशास्त्राच्या अध्ययनास उपयुक्त अशा वस्तूंचा संग्रह आहे येथल्या अध्यापकांत कंट, बेसेल, न्यूमन व ज एफ हर्बर्टसारखे प्रसिद्ध लोक होऊन गेले कँटचा जन्म येथें १७२४ त झाला व १८६४ त त्याचें स्मारक बांधलें गेलें येथें असलेल्या इतर शिक्षणसंस्थांत व्यायामशाळा, तीन व्यापारीशाळा, चित्रशाळा व संगीतशाळा यांचा समावेश होतो येथें शिलायुगापासून व्हायकिंगच्या काळापावेतोंच्या सापडलेल्या प्रशियन पुरातन वस्तूंचा संग्रह असलेला एक अजबखाना आहे

कोनिग्जबर्ग हें लष्करी व आरमारी तटबंदीचें पहिल्या प्रतीचें शहर आहे १८४३ मध्यें ह्या शहराची तटबंदी करण्यास सुरुवात करून ती १९०५ मध्यें संपविली गेली. पूर्वीच्या काळीं देखील ह्या शहराभोंवती भिंत होती, परंतु आता आतल्या बाजूस कोट असून त्यांत संरक्षणाकरिता तयार केलेल्या शहरच्या बांधकामाशीं संबंध ठेविता येईल अशा सोई केलेल्या आहेत नदीच्या उजव्या किनाऱ्यावर सहा व डाव्या किनाऱ्यावर सहा असे बारा वेगवेगळे किल्ले बांधले असून शिवाय नगरकोटाच्या आंत बेटात एक व शहरच्या पूर्वेस एक असे मोठे किल्ले आहेत बंदरास संरक्षणाचीं साधनें असल्यामुळें येथील व्यापार फारच वाढला आहे २९ मैलावर असलेल्या पिलाउ नावाच्या बंदरापासून शहरापावेतों नुकताच एक कालवा खणून काढल्यामुळें ज्या जहाजाचा भाग पाण्याखालीं ३० फूट रहातो अशीं जहाजें सुद्धा धक्क्यापावेतों येऊं शकतात ह्यामुळें शहराच्या व्यापारास आणखी उत्तेजन मिळालें आहे येथें मोठमोठीं मुद्रणालयें, यंत्राचे कारखाने, आगगाडीचे डबे व इंजिनें तयार करण्याचे कारखाने आणि रासायनिक द्रव्य व खेळणीं साखर, मद्य, तंबाखू, पियानो सिगार, अवर्षे सामान वगैरेंचे कारखाने आहेत येथून धान्य, पीठ, गुरें, घोडे, जवस, साखर, इमारती लाकूड व पेंड ह्या जिनसा बाहेरगावीं जातात

येथला किल्ला प्रथम १२५५ त बोहीमियाच्या राजानें बांधल्यावर नदीच्या पश्चिमेस असलेलें पूर्वीचें जुनें शहर त्याभोंवती वाढलें त्याला १२८६ त नागरिक हक्क मिळाले कोनिग्जबर्ग हें १३४० त हॅन्सिॲटिक संघात मिळालें उत्तरेकडच्या मोठ्या युद्धामुळें त्याच्या व्यापारास बराच अडथळा आला, परंतु १५ व्या शतकाच्या अखेरपासून त्याची पुन्हा भरभराट होऊं लागली १७२४ त शहराचे तीनहि स्वतंत्र भाग एक झाले हें इ स १७५७ मध्यें रशियनांनीं घेतलें, परंतु १८१३ त येथें कट होऊन नेपोलियनच्या विरुद्ध प्रशियानें बंड केलें व त्यांत लोकांस यशहि आलें १९ व्या शतकांत पूर्वप्रशियात व रशियांत आगगाडी झाल्यानें रशियातील धान्य, जवस, बियाणा, आणि सण ह्या बंदरातून परदेशात जाऊं लागले व त्यामुळें येथला व्यापार वाढला येथून आता मेमल, स्टेटिन, कील, ॲमस्टर्डाम व हल येथे आगबोटी नेहमीं जात येत असतात

**कानोली कालवा**—हा कालवा मद्रास इलाख्याच्या मलबार जिल्ह्यातील कालिकत तालुक्यांत आहे हा कोनोली नावाच्या कलेक्टरानें इ स १८४८ त बांधला याची लांबी ३ मैल असून हा इल्तूर अथवा कोरपुल व कल्लायी या दोन नद्या जोडतो हा बदगर व बेपापूर दळणवळणाच्या जलमार्गांचा एक फाटा आहे

**कोन्नूर**—मुंबई इलाखा बेळगाव जिल्हा शिलालेखात 'कोंडनुरु' असा उल्लेख या गावासबंधानें केलेला आढळतो गोकाक या वायव्येस सुमारें पाच मैलावर घटप्रभा नदीकाठीं हें गाव आहे गोकाकच्या धबधब्याजवळ या गावाच्या शिवेंत सुमार अकराव्या शतकातील कित्येक पडकीं देवळं आहेत गावाच्या दक्षिणेस टेकडीच्या पायथ्याशीं पुष्कळ किस्तवएन आहेत हीं थडगीं आहेत याविषयीं हल्लीं वाद नाहीं हीं फार प्राचीन काळातील आहेत हीं उन्हापासून बचाव व्हावा म्हणून पांडवानीं बांधलीं असा स्थानिक समज आहे (बेळगाव गॅ)

*किस्तवएन*—कोन्नूर गावाच्या दक्षिणेस डोंगरपायथ्याशीं हीं दिसतात दक्षिण हिंदुस्थान व दक्षिण हैद्राबाद जवळ ज्या प्रकारचीं किस्तवएन आहेत तशींच येथ पहावयास सापडतात यापैकीं पुष्कळ थडगीं असून मैदानावर तीं इतस्ततः पसरलीं आहेत याकरिता लागलेल्या शिला जवळच्या डोंगरातून आणलेल्या आहेत त्या शिलाना कोणत्याहि हत्यारानें घडवून योग्य आकार देण्याचा प्रयत्न केलेला दिसत नाहीं, तथापि त्या अगदींच गैरमापी दिसत नाहींत प्रत्येक खोली अथवा किस्तवएन हें बहुधा सहा

शिलाचें केलेलें आढळतें. चार सहा फूट लांब आणि चार सहा फूट उंच अशा मापाच्या दोन शिला दक्षिण उत्तर दिशेस समांतर असून चार पांच फुटांच्या अंतरानें ठेविल्या आहेत. उत्तरेकडच्या शेवटास त्या दोन शिलांच्या मध्यें तितक्याच उंचीची एक उभी शिला असते. ही शिला उपर्युक्त शिलांची पूर्व पश्चिम टोकें झांकीत नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. खोलीच्या दक्षिण दिशेस वरच्यासारखी एकच आडवी व मोठी शिला नसते. मध्यें साधारण दोन फूट जागा राहील अशा बेतानें दोन लहान शिला उभ्या केलेल्या आढळतात. या उभ्या पांच शिलांवर सुमार आठ इंच जाडीची एक मोठी शिला टाकलेली असते.' याप्रमाणें ही खोली तयार केलेली असते. बहुतेक खोल्यांकरतां आंत जाण्यास एक रस्ता केलेला असतो. सुमारें तीन ते पांच फूट लांब व सुमारें दोन फूट उंच अशा दोन शिला एक ते दीड फुटाच्या अंतरानें मुख्य खोलीच्या दक्षिणेकडील उघड्या तोंडाशीं काटकोन करून ठेविल्या असतात व या दोन शिलांवर एक शिला ठेवलेली असते. अशीं किस्तवएन्स येथें सुमारें ५० आहेत. बरींच पडकीं आहेत. कांहीं किस्तवएन्सच्या शिला कोणी तरी घेऊन गेले असावे. कांहीं अद्यापि सुस्थितींत आहेत. कांहींच्या सभोंवतीं कांहीं अंतरावर दगडी बांध घातलेला अद्यापि दिसतो. आंत काय असावें हें पाहण्याचा पूर्वी कोणी प्रयत्न केला नाहीं अशी एक खोली उकरली असता आंत कठीण सांवडी माती सांपडली. वरच्या शिळेपासून सुमारें अठरा इंच माती उपसल्यावर माणसाचा एक मोठा दात व हाडाचे कांहीं तुकडे सांपडले. तीन फूट आठ इंच व तीन फूट दहा इंच खोलीवर मडक्याचा चुरा सांपडला. ज्या स्थितींत दात सांपडला त्यावरून प्रेत बसलेल्या स्थितींत दक्षिणाभिमुख पुरलें असावें असें अनुमान काढतां येतें. [वा. ग्या.]

**कोन्हेर राम कोल्हटकर**—रत्नागिरीजवळील नेवरें गांवीं रामजी नारायण कोल्हटकर हे रहात असत. पेशवाईंत त्यांनीं वाईजवळ पांडवगड येथें वतन संपादिलें. पांडवगडाहून नेवऱ्यास जाण्याची वाट कोयना काठानें दक्षिणेस भैरवगडावरून चिपळुणाकडे जाते. भैरवगडाखालीं बापूजी, साबाजी व परसोजी हे भोंसलेबंधु रहात असत. त्यांचा व रामाजीपंताचा परिचय झाला होता. एकदा हबशानें भैरवगडावर स्वारी करून भोंसल्यांना कुटुंबासुद्धां पकडून जंजिऱ्यावर कैदेंत ठेवलें. त्यावेळीं ३ हजार रु. दंड भरून पंतांनीं यांची सुटका केली. त्यामुळें भोंसल्यांनीं आपलें उपाध्येपण पंतास वंशपरंपरा करून दिलें. पंताचा प्रवेश शाहूछत्रपतीकडेहि होता; त्याच्यामार्फत भोंसलेबंधु छत्रपतीकडे आले. छत्रपतींचे धाकनीस ठोसर यांची मुलगी शाहुमहाराजांनीं वाढविलेली होती. त्यांनीं तिचें लग्न पंताचा मुलगा कोन्हेर याच्याशीं लाविलें. या कारणानें कोन्हेरवर महाराजांचा लोभ विशेष जडला. त्याला भास्करराव म्हणून एक भाऊ होता. रघूजी भोंसल्यास महाराजांनीं सेनासाहेबसुभापद दिल्यावर त्याची मुजुमदारी कोन्हेरपंतास दिली. कोन्हेरपंतानें कान्होजी भोंसल्यास वऱ्हाडांतून पकडून साताऱ्यास आणलें होतें. छत्रपतींनीं भास्करपंतास रघूजीची बक्षीगिरी दिली. या दोघां बंधूंच्या मदतीनें रघूजीनें पुढें बंगालपावेतों प्रदेश काबीज करून अनेक पराक्रम गाजविले. भोंसल्याचें राज्य असेपर्यंत नागपुरास कोल्हटकरांचा लौकिक होता. कोल्हटकर व पेशवे यांचें मात्र चांगलें नसे. ते उभयतां सर्वस्वी पेशव्याच्या विरुद्ध राहून रघूजीस मदत करीत. मराठेशाहींत दुही माजविणाऱ्या ज्या कांहीं व्यक्ती झाल्या त्यांत रघूजी भोंसले हे एक प्रमुख होते. इ. स. १७४६ त कर्नाटकच्या सुभेदारीच्या भानगडींत भोंसले हे बाबूजी नाईकाच्या बाजूने होते व कोन्हेरपंत हा साताऱ्यास राहून त्या चळवळींत खटपट करीत होता. कोन्हेरपंत यानें भोंसल्याच्या घरच्या भाऊबंदकींतहि भाग घेतला होता. भास्करपंत हा बंगाल्यावर स्वाऱ्या करी. तिकडे त्याला अलीवर्दीखानानें दगा देऊन मारलें असतां ( भास्कर राम कोल्हटकर पहा ) कोन्हेरपंतास दुःख होऊन त्यानें देशीं जाण्याचा हट्ट घेतला. तेव्हां भोंसल्यांनीं त्यांना दरसाल २५ हजाराची जहागीर देऊन सरंजाम लग्नकार्य व त्यारीशिकारीस सरकारी मदत देण्याचें शपथपूर्वक कबूल केलें. याशिवाय कर्नाटकांतील भोंसल्याच्या सुभ्याबद्दल कोन्हेरपंतास १० लक्षांचें उत्पन्न अर्काटच्या नबाबानें इ. स. १७४८ त करार करून दिलें होतेंच. तरीहि पंताची उदासीनता दूर झाली नाहीं. तेव्हां रघूजीनें कष्टानें त्यांना निरोप दिला. पंतांना सहा पुत्र होते. त्यांपैकीं चौघांना रघूजीनें सरंजाम करून दिला व बापूराव कोन्हेर यास मुख्य करून जवळ ठेवलें ( १७५२ ). रघूजीची मर्जी पंतावर फार होती. त्यानें त्यांना एका स्वदस्तूरच्या पत्रांत लिहिलें आहे कीं "आमचाहि वृद्धापकाळ व तुमचाहि वृद्धापकाळ, अशा प्रसंगीं तुम्ही व आम्ही विभक्त असावें हें ईश्वरास मानत नाहीं...हें पत्र लक्ष पत्राचे जागा मानून तुम्ही चि. बापूरायास घेऊन यावें. ...तुम्ही यावयास अनमान कराल तर तुम्हांला आमच्या गळ्याची आण असे." सारांश, भोंसले व कोल्हटकर या कुटुंबाचा घरोबा एकजीवी होता. हिंदुस्थानच्या ईशान्येकडील मराठेशाहीची प्रचंड दौलत उभारण्यांत या दोन कुटुंबाचे श्रमच कारणीभूत झाले होते. पुढें या दोघांची भेट झाली कीं नाहीं हें आढळत नाहीं. भोंसल्यामुळें कोल्हटकरांचें व पेशव्यांचें सूत चांगलें नव्हतें. रघूजी व कोन्हेरपंत मेल्यावर नानासाहेब पेशव्यांनीं भोंसल्याच्या भाऊबंदकींत हात घालून ती मिटविली व त्याच वेळीं कोल्हटकरांच्या घराण्यास दूर करून देवाजीपंत चोरघड्यास भोंसल्याचा कारभारी नेमलें. कोल्हटकरांच्या घराण्यांतील पुरुष होतकरू व पराक्रमी होते. त्यांची भोंसल्यांच्या दौलतीविषयीं निष्ठा असून तिच्याकरितां ते सर्वस्वावर पाणी सोडण्यास तयार असत. पण पुढें देवाजीपंतानें सर्व कारभार हळूहळू ताब्यांत घेतला व कोल्हटकर

कुटुंब जे मागे पडले ते कायमचेच. कोन्हेरपंतास सहा पुत्र बाबूराव, यशवंत, रामचंद्र, बळवंत, गोविंद आणि लक्ष्मण या नावाचे होते. पैकी बाबूरावाकडे मुख्य वडिलकीचा सरंजाम पुढे चालला [ ना. भो. का. २; इ. सं. ऐ. गो. पु. १. राज. खं. ३; इति. मंड. अह. १८३५; मरा. रिया. ]

**कोन्हेरराव फांकडे.**—पहिले फाकडे कोन्हेरराव त्रिंबक एकबोटे. हे बाळाजी बाजीराव पेशवे याच्या कारकीर्दीमध्ये एक प्रसिद्ध शिलेदार होते. हे पुरंदरचे रहिवासी होते. ह्यांनी अनेक युद्धामध्ये शत्रूच्या फौजेवर चढाई करून फार सर्दमकीची कामे केली; त्यामुळे त्याचें शौर्य श्रीमंताच्या नजरेस येऊन त्यास शिलेदारीचें स्वतंत्र पथक मिळालें. इ. स. १७५१–५२ मध्यें मोंगलाचें व मराठ्यांचें जे तुमुल युद्ध झालें त्यामध्यें कोन्हेर त्रिंबक ह्यानीं आपल्या शौर्याचे असे काही चमत्कार दाखविले की, त्या योगानें त्याची रणांगणावरील कीर्ति अजरामर झाली असें म्हटलें तरी चालेल. ह्या वेळीं मराठ्याचा प्रतिपक्षी सलाबतजंग हा असून, त्याच्या बाजूस सुप्रसिद्ध फ्रेंच सरदार बुसी हा आपल्या कवाइती सैन्यासह मिळाला होता. ह्यावेळीं मोंगलाचा विचार पुण्यावर चढाई करून मराठ्यांची मुख्य राजधानीच हस्तगत करावी असा होता. त्याप्रमाणें ते ढमढेऱ्याचें तळेगाव व राजणगाव येथपर्यंत चढाई करून आले. तारीख २१ नोव्हेंबर रोजीं बुसीनें ग्रहणाच्या दिवशीं हिंदू लोक धर्मकृत्यात गुंतलेले असताना. त्याच्यावर छापा घालून त्याना सैरावैरा पळावयास लाविलें व त्याच्या लष्करातून त्यानें बरीचशी लूट नेली. त्यामध्यें पेशव्याचे देव व पुजेची उपकरणींहि गेलीं असें म्हणतात. हिला कुकडीची लढाई म्हणतात. त्यामुळें बुसीस मोठा विजयानंद वाटून तो अधिकच जोरानें पुढें चाल करून आला. ह्या बिकट प्रसंगीं मराठ्याचे सरदार बिलकुल न डगमगता ते मोठ्या आवेशानें शत्रूशीं युद्ध करण्यास सिद्ध झाले. ह्यावेळीं मराठी सैन्याचे मुख्य सेनापति महादजीपंत पुरंदरे हे असून त्याच्या हाताखालीं दत्ताजी शिंदे व महादजी शिंदे हे दोन नवीन जोमाचे तरुण सरदार आणि कोन्हेरराव त्रिंबक एकबोटे हे होतकरू शिलेदार हजर होते. मराठ्यांचें व मोंगलांचें ह्या समयीं मोठें हातघाईचें युद्ध झालें ( २७ नोव्हेंबर ). ह्या युद्धामध्यें कोन्हेरराव त्रिंबक एकबोटे ह्यानीं आपल्या शौर्याची अगदीं सीमा करून दाखविली. त्यानीं प्रतिपक्षाकडील फ्रेंचाच्या तोफाचा एकसारखा भडिमार होत असतांना शत्रूवर निकराचे हल्ले करून त्यानां नेस्तनाबूत करून सोडिलें. " महादजीपंत, दत्ताजी व महादजी शिंदे बारगीर व कोन्हेर त्रिंबक एकबोटे वगैरे अकरा असामींनी ( मोंगलाची ) हौद्याची अंबारी खाली केली...अबारी हुटली. मोंगल शिकस्त जाहला...सारा लुटला " त्यानंतर ९ डिसेंबरीं माढव्गण येथें कजारवीची लढाई झाली. ह्यावेळीं कोन्हेर ह्यानीं दाखविलेल्या युद्धकलाकौशल्याची फार तारीफ होऊन त्यास 'फांकडे' अशी शौर्यदर्शक पदवी पेशव्यांनीं दिली. तेव्हांपासून त्याची कोन्हेर त्रिंबक फांकडे ह्या नावानें प्रसिद्धि झाली व त्यांस पेशवे सरकारातून मोठा बहुमान ( पालखीची वस्त्रें व नेमणूक ) व इनाम मिळालें. आणि त्याच्या बहादुरीबद्दल त्याच्या घोड्याच्या पायात चांदीचा वाळा घालण्याचा मान मिळाला ( १७५४ ). ह्या बहुमान फारच थोड्या सरदारास पूर्वी मिळत असे. या मानाचा अर्थ असा की, हा घोडेस्वार एक तर समरांगणात जय मिळवील किंवा आपला देह धारातीर्थी अर्पण करील, पण शत्रूस पाठ दाखवून रणातून जिवंत परत येणार नाही. कोन्हेर त्रिंबक फाकडे हे होळीहुन्नूरच्या लढाईमध्यें हजर होते. तेथें त्यानीं शत्रूवर जवानमर्दीनें चालून जाऊन आपलें रणशौर्य चांगलें व्यक्त केलें. होळीहुन्नूरच्या लढाईमध्यें ते मोठ्या पराकाष्ठेनें बचावले. पुढें ते श्रीमंत सदाशिवराव भाऊसाहेब पेशवे ह्याच्याबरोबर इ. स. १७५६ मे मध्यें सावनूरच्या स्वारीवर गेले. तेथें भाऊसाहेब व फाकडे हे बुसीच्या बातेन्याच्या माऱ्यात उभे असता त्याच्या डोक्यावर बुसीच्या तोफखान्यातील तोफेचा एक गोळा पडून त्याचा रणभूमीवरच अंत झाला. श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांस त्याच्या मरणानें फार दुःख झालें. परंतु त्यानीं त्याच्या वंशजास चांगलें इनाम देऊन ह्या शूर पुरुषाचीं निस्सीम स्वामिभक्ति आणि पराक्रमपटुत्व या गुणाचें योग्य चीज केलें. पेशवाईमध्यें कोन्हेरराव फाकडे ह्याची कीर्ति फार असून त्यांच्या शौर्यकथा तरुण वीराना फार प्रोत्साहन देत असत. हें घराणें पेशव्याच्या अत्यंत घरोब्यातील व ढेऱ्यांप्रमाणें विश्वासातील होतें [ इति. सं. पु. ४ अं. १०–१२; डफ. पु २; वि. ज्ञा. वि. पु.५२. अं. १;राज. खं. ६.ले.२३२; का. इ. सं. प. १३; मरा. रिया. म. वि. ]

**कोपनहेगन.**—कोपनहेगन हें शहर डेन्मार्कच्या राज्याची राजधानी असून झीलंड बेटाच्या पूर्व किनाऱ्यावर साउंड सामुद्रधुनीच्या दक्षिणकिनाऱ्यावर आहे. याची लोकसंख्या ६,७०,००० आहे. हें झीलंड बेटाच्या पूर्वकिनाऱ्यावर समुद्र व लहान लहान बेटें याच्यामध्यें आहे. दोन बेटामधील नैसर्गिक खाडीमुळें एक छान बंदर बनलें आहे, व या दोन बेटामध्यें दळणवळण लँगेब्रो व निपेल्सब्रो या दोन पुलांच्या योगानें चालतें.

आतील शहरानें व्यापिलेल्या प्रदेशास गॅमेलशोन म्हणतात पाचव्या ख्रिश्चियनच्या पुतळ्याला हेस्टन ( घोडा ) म्हणतात. यार्भोवतीं पाहण्यालायक इमारती आहेत. पूर्वेस शार्लोटेन्बर्ग हा राजवाडा आहे. दक्षिणेस रॉयल नावाचें नाटकगृह आहे. लडविग होल्बर्ग व ॲडाम ओह्लेन्श्लागर या कवींचे पुतळे प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूस आहेत व समोरच्या बाजूस अॅपोलो, पेगॅसस व हिपोक्रिनीचा झरा हे आहेत. इतर शिल्पकामें म्हटलीं म्हणजे ओफेलियाची उठावदार आकृति होय. कॉन्जेन्स नॅटोरमधील इतर

इमारती परराष्ट्रीय कारभाराची कचेरी, कित्येक व्यापारी गृहें व्यापारी पेढी व प्रॉव्हस राजवाडा या होत. नायहेवेंहनच्या धक्क्यावर जुनीं घरें आहेत.

कॉन्जेन्स नायटोर्व्हपासून होल्मेन्स कॅनाल नांवाचा रस्ता नॅशनल बँकेवरून होल्मेन्स कर्क अथवा पादशाही आरमाराच्या चर्चला जातो. क्रिश्चियन्सबोर्गचा राजवाडा १७९४ व १८८४ या वर्षी दोन वेळा जळला. यांतील कलाकौशल्याचें काम बचावण्यांत आलें. शक्ति, ज्ञान, आरोग्य व न्याय या देवतांचे पुतळे आगींतून बचावले गेले. ५,५०,००० पुस्तकें व २०,००० हस्तलिखित लेख असलेलें पुस्तकसंग्रहालय आगींतून बचावलें गेलें. धक्क्यावर सराफकट्टा ( बोर्सेन ) ही एक सुंदर इमारत आहे.

थॉर्व्हाल्डसन संग्रहालयाच्या दुमजली इमारतींत ईजिप्शियन व एट्रुस्कन शिल्पपद्धतींचें मिश्रण सांपडतें. या संग्रहालयांत थॉर्व्हाल्डसनची सुमारें ३०० पुस्तकें आहेत व एका खोलींत १८४४ मध्यें त्याच्या मृत्यूसमयीं जसें सांपडलें होतें तसेंच व्यवस्थित मांडलेलें असें त्याचें सामान त्याच्या बसावयाच्या खोलींत आहे.

स्लॉटशोमच्या पश्चिमेस मुख्य जमिनीवर प्रिन्सेस पॅलेस आहे. यांत पूर्वी पांचवा ख्रिश्चियन व सहावा फ्रेडरिक रहात असत. यामध्यें राष्ट्रीय पदार्थसंग्रहालय आहे. व्हॉर फ्रु कर्क हें कोपनहेगन येथील कॅथेड्रल चर्च आहे. यामध्यें जॉन बॅप्टिस्ट, मोसेस ख्रिस्त व बारा साधु यांचे पुतळे आहेत व्हॉर फ्रु कर्कच्या उत्तरेस पहिल्या ख्रिश्चियननें स्थापिलेलें विश्वविद्यालय आहे. येथें सरासरी २००० विद्यार्थी आहेत. या विश्वविद्यालयाला जोडून वेधशाळा, नायव्हेस्टर गेडमधील रसायनशास्त्रप्रयोगशाळा, तसेंच ब्रेडगेड मधील शास्त्रप्रयोगशाळा व वनस्पतिबाग हीं आहेत. विश्वविद्यालयाचें पुस्तकालय व क्लेसनचें पुस्तकालय या दोहोंमध्यें २,००,००० ग्रंथ व ४०००हस्तलिखितें आहेत. आणि प्राणिसंवर्धक उद्यान आहे. जवळच सेंट पिटरचें चर्च व निस्टल गेडवर ट्रिनिटी चर्च हा आहे. याचा १११ फूट उंचीचा गोल मनोरा यूरोपांत अद्वितीय आहे.या चर्चपासून निघालेला जोवर मेयरगेड हा रस्ता दक्षिणेकडे जातो. यावर दुकानांची फार दाटी झाली आहे. यावर बिशप ॲबसलोनचा पुतळा आहे. या ॲबसालोननेंच हें शहर वसविलें.

कॉन्जेन्स नायटोर्व्हच्या ईशान्येकडील भाग हा श्रीमंत लोकांनीं व्यापला आहे. ॲमालियनबोर्गचे राजवाडे, किल्ला, रोझेनबोर्गचे बगीचे व इतर सरदारांचे वाडे हे या भागांत आहेत. मोल्टके पॅलेसमध्यें १८ व्या शतकांतील उच्च चित्रांचा संग्रह आहे. याच्या जवळच ग्रीसचा राजा जॉर्ज याचा राजवाडा आहे. या राजवाड्याच्या मागें ॲमालियन बोर्ग स्क्वेअर आहे. याच्या मध्यभागीं पांचव्या फ्रेडरिकचा पुतळा आहे.

अंतर्दुर्गांच्या पश्चिमेस ओस्टरनेगाडे अथवा पूर्वेकडील रेल्वेचें स्टेशन आहे. याच्या नैर्ऋत्येस बगीचे पसरलेले आहेत. ऑस्टर्‍ ॲन्लागेमध्यें कोरीव चित्रें व खोदीव कामाचें शिल्पकलासंग्रहालय आहे. याच्या समोर नववा ख्रिश्चियन व राणी लुईसा यांच्या लग्नाच्या स्मरणार्थ बांधलेलें डेन्मार्क नावाचें स्मारक आहे. यांत इंग्लंडचा राजा सातवा एडवर्ड व राणी अलेक्झांड्रा यांच्या विवाहप्रसंगाचीं उठावदार चित्रें आहेत. वनस्पतिसंवर्धक उद्यानांत टायकोब्रेहीचा पुतळा व यांतच वेधशाळा, रसायनशास्त्रप्रयोगशाळा तसेंच खनिजपदार्थसंग्रहालय, विविध धंदेशिक्षण देण्याच्या शाळा व दवाखाना या इमारती आहेत. ऑस्टेर्व्होल्डगेडच्या आंतल्या बाजूस रोझेनबोर्ग पार्क व राजवाडा ही आहेत. डॅन्स्कफोक पदार्थसंग्रहालयामध्यें १६६० पासून शेतकऱ्यांच्या खासगी चारित्राचें वर्णन करणाऱ्या वस्तूंचा संग्रह आहे. स्वातंत्र्यस्तंभ १७९८ मध्यें बांधलेला आहे. उत्तरेस मुख्य रेल्वे स्टेशन ( वॅनेगाडे ) आहे. पश्चिमेकडील भागांत फ्रेडरिक बर्गचें उद्यान आहे. यांत एक राजवाडा असून याचा लष्करी शाळेसारखा उपयोग करतात.या उद्यानांत एक प्राणिसंग्रह आहे. बंदराच्या लगतच्या भागास ख्रिश्चनशाव्हन म्हणतात. यांत व्हॉर फ्रेलसर्स कर्क आहे. ॲमागरचें बेट सुपीक असून यांत भाजीपाला होतो. येथें डच लोकांची वसाहत आहे.

कोपनहेगनच्या आसपासचा उत्तरेकडचा व पश्चिमेकडचा भाग मनोवेधक आहे क्लॅम्पनबोर्ग व स्कोड्सबोर्ग हीं समुद्रकाठचीं हवा खाण्याचीं ठिकाणें आहेत. येथेंच डायरेहॅव्हबर्ग ( मृगालय ) व स्कोव्हन ( अरण्यें ) आहेत. राजवाड्यांत राष्ट्रीय ऐतिहासिक संग्रहालय आहे. व्हिडोरचा व्हिला अलेक्झांड्रा राणीला १९०७ मध्यें मिळाला.

कोपनहेगन येथील साहित्य व शास्त्रीय मंडळामध्यें इ. स. १७४२ मध्यें स्थापलेली डॅनिश रॉयल सोसायटी, इ. स. १८२५ स्थापलेली रॉयल अन्टिक्केरियन सोसायटी, डॅनिश वाङ्मयवर्धक सोसायटी, रॉयल अग्रिकल्चरल सोसायटी, डॅनिश चर्च-हिस्टरी सोसायटी, इ. स.१८३८त स्थापिलेली इंडस्ट्रियल असोसियेशन, इ. स. १८७६ मध्यें स्थापिलेली रॉयल जिऑग्रॉफिकल सोसायटी व इतर संगीत विषयक संस्था या फार नावाजलेल्या आहेत. इ. स. १७५६ मध्यें पांचव्या फ्रेडरिकनें व्यापारी लोकांत कलाभिरुचीचा प्रसार करण्याकरता ॲकॅडेमि ऑफ आर्ट्स ( कलाभुवन ) स्थापित केली. इ. स १८२६ मध्यें आर्ट युनियन व इ. स. १८७० मध्यें संगीत सार्वजनिक शाळा स्थापल्या. विश्वविद्यालयाशिवाय, पशुवैद्यकी व शेतकी विद्यालयें, लष्करी शाळा व आरमारी शाळा या दुसऱ्या शिक्षणसंस्था आहेत. धंदेशिक्षण हें हुन्नरकला शाळा व विशिष्ट कलाविषयक संस्था या नांवाच्या सोसायट्यांच्या शाळेंत दिलें जातें. या सर्व शाळा खासगी आहेत. प्राथमिक शिक्षण निरनिराळ्या पंथांचे लोक आपापल्या पंथाच्या शाळेंतून देतात.

पूर्वीच . ४र्णन केलेलीं प्रार्थनामंदिरें ल्युथेरियन चर्चेचीं आहेत. इतर कांहीं मद्दराचीं रिफार्मड् चर्चेचीं आहेत. सेंट अॅन्सॉरियसचें कॅथॉलिक चर्च इ. स. १८४२ मध्यें बांधलें. क्रिस्टलगॅडमधील यहुदी लोकांचें प्रार्थनामंदिर इ. स. १८५३ मध्यें बांधलेलें आहे. सध्याच्या रस्त्याच्या नावावरून पूर्वी कोपनहेगनमध्यें मठ वगैरे इमारती होत्या हें स्पष्ट होतें.

कोपनहेगन हें डेन्मार्कमधील सर्वांत मोठें व्यापाराचें शहर आहे. आउटर साउंड व कॅलेवोस्ट्रॅंड याच्या मधील अंदर सामुद्रधुनीवर हें बंदर आहे १८९४ मध्यें शहराच्या उत्तरेस फ्रिहॅव्हन ( स्वतंत्र बंदर ) बांधण्यात आलें, व कांहीं वखारी व इतर सोयी करण्यात आल्या. त्यामुळें व्यापारात बऱ्याच सोयी झाल्या. हें बंदर मुख्यस्टेशनरून रेल्वेच्या स्टेशनला वर्तुळाकार रेल्वेनें व जकातीच्या फचेरीच्या घक्क्याला एका फाट्यानें जोडण्यात आलें आहे. व्यापारी बंदर व लढाऊ जहाजाचें बंदर ( ऑर्लोगशॅव्हन ) याच्यामध्यें एक बंधारा आहे व समुद्रकिनाऱ्यावर दहा धक्के बांधून समुद्राला हटविलें आहे. हें औद्योगिक शहर नाहीं. रॉयल चायना फॅक्टरी ही थोरव्हॅल्डसनच्या कामाच्या नमुन्याबद्दल प्रसिद्ध आहे. येथें लोखंडी जहाजें, एंजिनें वगैरे बनविण्याचा एक मोठा कारखाना आहे. बाहेर देशाहून आणविलेला कच्च्या मालाचा पक्का माल बनविण्याचे कांहीं कारखाने फ्रीपोर्टच्या आवारात आहेत.

इतिहास.—कोपनहेगन ( म्हणजे व्यापाऱ्याचें बंदर ) या शहराचा उल्लेख प्रथम १४०३ मध्यें इतिहासांत सापडतो. हें पूर्वी केवळ मच्छीमार खेडें होतें व बाराव्या शतकाच्या मध्यापर्यंत हें असेंच होतें. यावेळीं पहिला व्हाल्डेमार यानें हें एक्सेलव्हाइड याला नजर केलें. यानें येथें एक किल्ला बांधला. नंतर येथें व्यापाऱ्याची वस्ती झाली व याला कॉपमनाहोफन हें नाव प्राप्त झालें. १२४५ मध्यें डॅनिश राजा चौथा एरिक यानें बिशप नील्स स्टिगसन याला हाकून लाविलें. परंतु १२५० मध्यें राजाच्या मरणानंतर बिशप जेकब अर्लॅंडसेन यानें हें शहर पुन्हा घेतलें व १२५४ मध्यें नगरवासीयांना प्रथम नागरिकपणाचे हक्क दिले. यानंतर जुन्या सनदांच्या मनाईस न जुमानतां व्यापारी संघ स्थापन करण्यात आले. ते शहराच्या अधिकाऱ्याच्या सत्तेखालीं होते. १२४८ मधील लूबेकच्या लोकांच्या व १२५९ मधील रूगेनच्या प्रिन्स जॅरोमिरच्या हल्ल्यामुळें कोपनहेगनच्या भरभराटीस प्रतिबंध झाला. १३०६ मध्यें या शहरानें नॉर्वेजियन लोकांना हाकून लाविलें. परंतु १३६२ व १३६८ मध्यें व्हाल्डेमारच्या प्रतिस्पर्ध्यांनीं हें शहर पुन्हा काबीज केलें. पुढल्या शतकात हॅन्सियाटिक लीग ( संघ ) हा नवीन शत्रु उत्पन्न झाला व राणी फिलिप्पा हिनें याचा बेत फसविला. रोस्किल्डे येथील बिशपाच्या ताब्यातून हें शहर घेण्याचा पुष्कळ राजानीं प्रयत्न केला परंतु १४४३ पर्यंत हें शहर परत करण्यात आलें नाहीं. नंतर कोपनहेगन हें राजधानीचें ठिकाण बनलें. १५२३ पासून १५२४ पर्यंत दुसऱ्या ख्रिश्चियननें हें शहर पहिल्या फ्रेडरिकविरुद्ध लढविलें. अखेरीस फ्रेडरिकनें तें घेतलें व त्याची तटबंदी मजबूत केली. १५३६ मध्यें एक वर्षभर वेढा दिल्यानंतर हें शहर तिसऱ्या ख्रिश्चियनला शरण आलें. १६५८ ते १६६० पर्यंत स्वीडनचा चार्लस गस्टव्हस यानें निरर्थक या शहराला वेढा दिला होता व पुढल्या वर्षी मोठ्या शौर्यानें स्वसंरक्षण केल्याबद्दल या शहरास कित्येक हक्क देण्यात आले. ज्या तहाच्या योगानें तिसऱ्या फ्रेडरिकच्या स्वीडिश लढाईचा शेवट झाला होता त्या तहाला या शहराचें नाव १६६० मध्यें मिळालें. १७०० मध्यें इंग्लंड, हॉलंड व स्वीडन याच्या संयुक्त आरमारानें या शहरावर हल्ला केला. १७२८ मधील एका मोठ्या आगींत येथील १६४० घरें व ५ प्रार्थनामंदिरें जळालीं. १७९५ मधील दुसऱ्या आगींत ९४३ घरें व सेंट निकोलस व रायस हीं देवालयें जळून फस्त झालीं. १८०१ मध्यें ब्रिटिश आरमारानें डॅनिश आरमाराचा रोडस्टेडमध्यें नाश केला. १८०७ मध्यें लॉर्ड कॅथकार्टच्या नेतृत्वाखालीं एका ब्रिटिश आरमारानें ह्या शहरावर गोळ्यांचा पाऊस पाडून विश्वविद्यालयाच्या इमारती, मुख्य प्रार्थनामंदिर व इतर इमारती याचा नाश केला. कोपनहेगनची लढाई १८०१ मध्यें झाली.

**कोपरगांव**—मुंबई इलाख्याच्या अहमदनगर जिल्ह्यांतील एक तालुका. या तालुक्याचें क्षेत्रफळ १९११ सालीं ५१९ चौरस मैल होतें. या तालुक्यात पुणतांबें नावाचें एक शहर असून १२५ खेडीं आहेत. या तालुक्याचें मुख्य ठिकाण कोपरगाव हें आहे. १९०१ मध्यें या तालुक्याची लोकसंख्या ५,८९० इतकी भरली. या तालुक्याचा वसूल १९०३–४ सालीं २,४०,००० होता. या तालुक्याच्या अगदीं वायव्य टोंकाकडील भागातून गोदावरी नदी प्रविष्ट होऊन सर्व तालुक्यातून वहात गेली आहे. कोपरगाव तालुक्याची जमीन काळी आहे. गोदावरी नदीला या तालुक्यातील लहान लहान असे पुष्कळ ओढे मिळालेले आहेत. पण हे ओढे उन्हाळ्यात आटून जातात. त्यामुळें येथील जमीनींना विहिरींचेंच पाणी देणें भाग पडतें या तालुक्यातील शेतकरी वर्ग बराच कंगाल आहे कारण येथें पाऊस फार क्वचित् पडतो. कोपरगावात पेशव्याचा वाडा असून राघोबादादा १७८४ त येथें मरण पावला

**कोपर्निकस निकोलस**—( १४७३–१५४३ ) प्रशियन ज्योतिर्वेत्ता. याचें लहानसें चरित्र व ज्योतिःशास्त्रातील सिद्धांत 'विज्ञानेतिहास' ( ज्ञानकोश वि. ५ पा. ३२९–३४२ ) या ग्रंथात दिले आहेत. त्या ठिकाणीं त्याच्या सूर्यकेंद्रसिद्धांताचें विस्तृत विवेचन केलें आहे.

कोपळ—हा मुलूख आदिलशाहीचा एक कर्नाटकांतील प्रांत. शिवाजीमहाराज तंजावरकडे गेले असतां जिंजी वगैरे प्रांत त्यांनी त्यावेळीं जिंकिले. त्याचवेळीं हाहि प्रांत त्यांनीं काबीज केला. तेव्हांपासून आदिलशहानें त्यावरील आपला हक्क कायमचा सोडला. हा प्रांत व महाराजांनीं त्यावेळीं जिंकलेले इतर प्रांत यांचा समावेश कर्नाटकांतील 'स्वराज्यप्रांत' होत असे. पुढें मुसुलमानांच्या ताब्यांत सदर प्रांत गेला होता. तो शाहुछत्रपतीच्या कारकीर्दींत परत मिळविला. याच स्वराज्यासाठीं श्री. नानासाहेब व थोरले माधवरावसाहेब यांनीं मोहिमा करून ते प्रांत पुढें सोडविले आहेत. हैदरच्या लढायांत या स्वराज्या( प्रदेशा )चा उल्लेख वारंवार येतो [ मरा. रिया; ऐति. ले. सं. ].

कोपागंज—संयुक्तप्रांताच्या अझमगड जिल्ह्याच्या घोशी तहशिलींतील एक शहर. गाझीपुराहून गोरखपुराकडे जो रस्ता गेला आहे त्या रस्त्यावर हें वसलेलें आहे. गोरखपूरहून बनारसकडे जो बंगाल आणि नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचा फाटा गेला आहे त्या फाट्यावरील हें स्टेशनाचें ठिकाण आहे. या शहराची लोकसंख्या १९११ मध्यें ५६०४ होती. अझमगडचा राजा इरादतखान यानें १७४५ च्या सुमारास हें वसविलें. पण या शहरांत जें एक लहानसें हिंदु देवालय आहे त्यांतील शिलालेखावर १४७२ सालाचा उल्लेख आहे. १८५६ च्या २० व्या कलमान्वयें या शहराचा कारभार चालविला जातो. या ठिकाणीं ५०० माग असून कापड चांगल्या तऱ्हेनें तयार होतें. विशेषतः रेशमी किनारीचीं पागोटीं या ठिकाणीं उत्कृष्ट तयार होतात. साखरेचा व धान्याचा व्यापार चालतो. शहरांत दोन शाळा आहेत. येथें सोरमीठ शुद्ध करण्याचा एक छोटा कारखाना आहे.

कोप्प—म्हैसूर संस्थानांतील कडूर जिल्ह्याच्या पश्चिमेकडील तालुका. या तालुक्यांत, येडेहळ्ळी महाल व शृंगेरीची जहागिरी यांचा समावेश होतो. या तालुक्याचें क्षेत्रफळ १९११ सालीं ६२७ चौरस मैल होतें व त्याची लोकसंख्या ५१,६५१ होती. या तालुक्यांत येडेहळ्ळी व कोप्प हीं दोन गांवें असून १६६ खेडीं आहेत. कोप्प हें या तालुक्याचें मुख्य ठिकाण होय. कोप्पच्या पश्चिमेस 'पश्चिमघाट' पर्वत आहे. शिवाय पश्चिमेकडून तुंगानदी वहात गेली असून पूर्वेकडून भद्रा नदी वहात गेली आहे. हा सर्व तालुका सुपीक असून येथील देखावा फारच बहारीचा आहे. या तालुक्यांत उंच उंच टेकड्यांचें व खोल दऱ्यांचें जाळें पसरलें असून या टेंकड्यांवर दाट अशीं जंगलें आहेत. या जंगलानजीक गेल्या तीस वर्षांत युरोपियन लोकांनीं काफीचे मळे केलेले आहेत. खोल दऱ्यामध्ये तांदूळ पिकत असून सुपारीचीं पुष्कळ झाडें आहेत. येथील वार्षिक पर्जन्यमान सर्वसाधारण १२० इंच आहे. घाटामध्यें दालचिनी फार पिकते. याशिवाय या तालुक्यांतील मुख्य उत्पन्न तांदूळ व ऊस यांचें होय. येथील टेंकड्यांच्यामध्यें सर्वांत उंच शिखर मर्तीचें असून त्याची उंची ५४५१ फूट आहे. या तालुक्याच्या पश्चिमभागांत आद्य शंकराचार्यांनीं स्थापलेला शृंगेरीमठ असून पूर्वेकडील भागांत लिंगायतांचा एक प्रमुख मठ आहे.

पूर्वी कोप्प हें चोल व चालुक्य या राज्यांच्या सरहद्दीवर असल्यानें येथें त्यांच्या नेहमीं कटकटी होत. राजाधिराज चोल व सोमेश्वर चालुक्य यांच्यांत अशीच एक मोठी लढाई येथें १०५२ त होऊन तींत राजाधिराज पडला; परंतु राजाधिराजाचा धाकटा भाऊ राजेंद्र यानें थोड्याच दिवसांत येथेंच चालुक्य यांचा पराभव केला. आणि त्याच्या या पराक्रमामुळें त्याला कोप्पमच्या रणांगणावरच राज्याभिषेक करण्यांत आला. याचाच दुसरा भाऊ वीरराजेंद्र हा राजा झाल्यानंतर या प्रदेशातच विक्रमादित्य चालुक्यानें त्याच्यावर स्वारी केली. सारासपेरार ( तुंगभद्रा ) नदीवरील या गांवीं अनेकवार लढाया झाल्या आहेत. [ अय्यर ग्रा. हि ].

कोप्पल—हैद्राबाद संस्थानांतील रायचूर जिल्ह्यांतील एक गांव. या ठिकाणीं एक प्राचीन डोंगरी किल्ला आहे. याची लोकसंख्या १९११ सालीं ७५५८ होती. १७८६ मध्यें टिपू सुलतानानें हें गांव जिंकून त्या ठिकाणीं एक किल्ला बांधविला. १७९० मध्यें ब्रिटिशांच्या व निझामच्या सैन्यानें या गांवाला वेढा देऊन तें सर केलें. १८५७ च्या बंडामध्यें भीमराव नावाच्या एका शूर गृहस्थानें हें गांव आपल्या ताब्यांत आणलें, पण थोड्याच दिवसांत तें गांव त्याला सोडून द्यावें लागलें; व तेथें झालेल्या चकमकींत तो मारला गेला. या गांवांत दोन किल्ले आहेत. एक टेंकडीवरचा जुना किल्ला व टिपूनें बांधवलेला नवा किल्ला. टेंकडीवरील किल्ला पायथ्यापासून ४०० फूट उंच आहे. हा किल्ला हिंदुस्थानांतील इतर कोणत्याहि किल्ल्यापेक्षां दुर्गम आहे असें सर जॉन माल्कम म्हणतो. सर सालरजंगच्या घराण्याकडे जी जहागिरी आहे त्या जहागिरीचें हें मुख्य ठिकाण आहे. या ठिकाणीं एक पोस्ट ऑफिस व एक शाळा आहे.

कोंबड्या—कोंबड्यांच्या मूळ उत्पत्तीविषयीं शोध लावतांना डार्विननें कोंबड्यांच्या सर्व जाती 'गॅलसबँकिव्हा' नांवाच्या कोंबड्यापासून झाल्या असाव्यात असें म्हटलें आहे. परंतु ब्रह्मदेश व कोचिन या जातींची उत्पत्ति त्या जातीपासून झालेली नाहीं एवढेंच नव्हे तर त्या कोणापासून झालेल्या असाव्यात याचाहि अद्याप शोध लागलेला नाहीं. कसेंहि असो. सध्याच्या पाळीव कोंबड्या या रानटी कोंबड्यापासून पैदा झालेल्या आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. रानटी कोंबड्यांची पाळीव कोंबड्यांशीं तुलना केल्यास त्यामध्यें पुष्कळच फरक दिसून येतो. रानकोंबड्यांचीं नखें फार तीक्ष्ण असून त्या कोंबड्या मुळींच माणसाळत नाहींत. त्या फार थोडीं अंडीं घालितात व तीं लहान असतात. परंतु पाळीव कोंबड्यांचें एकंदर वाढण्याचें वातावरण

निराळें असल्यामुळें त्याच्या प्रकृतिमानात व इतर गोष्टींतहि पुष्कळ फरक झालेला आहे. कोंबडया, बदकें वगैरे प्राणी काळजीपूर्वक बाळगून त्यांची ओपासना केल्यास तो एक फायदेशीर धंदा होईल ही कल्पनाहि आपल्याकडील लोकाना अद्यापि नाहीं परंतु पाश्चात्त्य देशात या विषयाचा बराच अभ्यास झाला असून तेथील तज्ज्ञाच्या अनुभवाप्रमाणें तो कित्येक ठिकाणीं पूर्ण यशस्वी तर कित्येक ठिकाणीं नुकसानकारक झालेला आहे सदरहू धंदा नुकसानकारक होण्याचीं मुख्य कारणें (१) या विषयासंबंधी अज्ञान, (२) अपुरी जागा, (३) मजुरीची महर्घता वगैरे होत. परंतु हिंदुस्थानात शेवटच्या दोन अडचणी विशेष आड येऊ शकत नाहींत परंतु विषयाचें ज्ञान पुरें नसल्यामुळें हा धंदा मोठ्या प्रमाणावर करण्याचें धाडस कोणास होत नाहीं. म्हणून हा धंदा सध्या अडाणी शेतकरी वर्गाच्या हातीं राहिला आहे.

कोंबडयाचा धंदा काळजीपूर्वक केल्यास तो फायदेशीर आहे एवढेंच नव्हे तर त्यापासून मनाची करमणूकहि होते. दुय्यम धंदा या दृष्टीनें तर त्याचें महत्व फारच आहे कारण भांडवल फारसें न लागता नेहमीं खेळती रकम हातीं रहाते व त्यामुळें कोणतीहि अडचण येत नाहीं सदर पाळीव पक्ष्याचा उपयोग तीन तऱ्हेनें होतो. पहिला उपयोगः त्याचें मास फार रुचकर असल्यामुळें बहुतेक सर्व जाती त्याचा उपयोग खाण्याकडे करितात. दुसरा उपयोगः निव्वळ अंडी विकण्यास मिळावीत या हेतूनेंसुद्धा सदर पक्षी बाळगले जातात. तिसरा उपयोगः हे पक्षी पुष्कळ प्रमाणात बाळगल्यास त्याच्या विष्ठेचा उपयोग खताकडे चागला होतो.

फ्रान्स, इंग्लंड वगैरे यूरोपियन राष्ट्रामध्यें सदर पक्षी व त्याचीं अंडीं याची आयात व निर्यात दरवर्षी लाखों रुपयाची होत असते. या सर्व पक्ष्याची उत्पत्ति अंडयापासूनच होते. व ज्या मानानें अंडयाची निगा घेतली जाते त्या मानानें त्यातून पिलें कमी जास्त बाहेर पडतात अंडीं घालण्यापूर्वी सृष्टिनियमाप्रमाणें नर व मादी याचा संयोग होतो व नंतर मादी रोज एक याप्रमाणें अंडीं घालते. कोंबडयाचीं पिलें नऊ दहा महिन्याचीं झालीं म्हणजे तीं वयात येतात व नंतर अंडीं घालतात. अंड्याचा उपयोग दोन प्रकारें करतात. ( १ ) खाण्याकडे व ( २ ) उबवून पिलें काढण्याकडे. यापैकीं कोणताहि उपयोग झाला तरी अंडीं उत्तम ठेवावीं लागतात. अंडीं उत्तम ठेवण्याचा उत्तम मार्ग म्हणजे एखादी पेटी किंवा स्टॅन्ड करून त्यास भोकें ( अंडयाच्या परिघाएवढीं ) पाडून त्यात अंडीं निमुळता भाग खालीं करून ठेवणें हा होय अंडीं अशा रीतानें ठेवल्यानें त्यास भरपूर हवा मिळते व आतील गर्भास धक्का लागत नाहीं. अंडीं स्टॅन्डवर ठेवताना त्याजवर तीं ज्या दिवशीं घातलेलीं असतील ती तारीख घालून [illegible] म्हणजे तीं किती दिवसाचीं आहेत हें समजण्यास सोपें जातें व शिळीं होऊन चाललेल्या अंडयाचा अगोदर खप करिता येतो कोंबडीनें अंडीं घातलीं म्हणजे प्रथमतः त्याचे दोन वर्ग करावे विकावयाचीं असतील तीं अंडीं निराळीं काढून ठेवावींत व उबवावयाचीं अंडीं निराळीं असावींत. उबवावयाकरिता ठेवावयाच्या अंडयाचा आकार लंबवर्तुलासारखा असावा तीं फार मोठीं अगर फार लहान नसावींत त्याच्या वरचें कवच फार जाड किंवा फार पातळ असूं नये. अंडीं ८-१० दिवसापेक्षा जास्त शिळीं नसावींत अंडीं घालणें झाल्यावर त्या कोंबडया इतर कोंबडयाना सोडून निवांत ठिकाणीं विश्रांतीसाठीं जाऊन बसतात व त्या जागेतून त्या सहसा हालत नाहींत. अशा रीतीनें कोंबडया बसल्या म्हणजे त्यास खुडूक आला असें म्हणतात उबविण्याकरिता त्याच्या खालीं अंडीं ठेवण्यास हीच वेळ योग्य होय अंडीं उबविण्यास कोंबडया निवडणें त्या चागल्या, मोठया व पुष्कळ पिसाच्या अशा असाव्यात. पहिलटपणाची कोंबडी सहसा निवडूं नये. कारण त्या अस्थिर असल्यामुळें अंडीं सारखीं उबलीं जात नाहींत. ज्या कोंबडया गरीब व शांत स्वभावाच्या असतील त्यांसच अंडीं उबविण्याकरिता निवडावें. अंडीं उबवून त्यातून पिलें बाहेर येण्यास २१ दिवस लागतात व इतके दिवसपर्यंत कोंबडयाचा खुडका टिकतो या अवधींत त्याना जें अन्न द्यावयाचें तें चागलें, पौष्टिक व उष्णता उत्पन्न करणारें असावें. होता होईल तो सुकें अन्न द्यावें, ओलें देऊं नये.

अंडीं उबवावयास ठेविलीं म्हणजे त्यातील गर्भ दिवसेंदिवस वाढूं लागतो व त्यातून २१ दिवसानीं पिलें बाहेर पडतात. सर्वच अंडयामधून पिलें येतात असें नाहीं. तर काहीं अगदींच वाझ ठरतात व काहींत अर्धवट गर्भ वाढून [illegible] नासतात. थंडीच्या व पावसाळ्याच्या दिवसात विशेषतः अंडीं उबविण्यास चागलें. उन्हाळ्याच्या दिवसात अंडीं जशीं उबलीं जावींत तशीं उबलीं जात नाहींत.

अंडीं बरोबर उबलीं कीं नाहींत हें पहाण्याची सोपी युक्ति म्हणजे एक चौरस फूट लाबीचा जाड कार्डबोर्ड घेऊन त्याच्या मध्यभागीं अंडयाच्या आकाराचें लंबवर्तुलाकृति भोंक पाडावें, त्या भोंकावर अंडें धरून त्यातून दिव्याचा प्रकाश पहावा. ज्या अंडयात गर्भ वाढत नाहीं त्या अंडयातून दिव्याचा प्रकाश स्वच्छ दिसतो व पातळ पदार्थाखेरीज त्यात दुसरें काहीं दिसत नाहीं. जातिवंत कोंबडयाची पैदास करणें झाल्यास ती त्या जातीचे पक्षी आणून त्यापासून करण्यापेक्षां अंडीं विकत आणून केलेली चागली. मात्र अंडीं खात्रीलायक व ताजीं असावींत. परदेशाहून अंडीं आणणें झाल्यास तीं आगगाडीतून आणलीं असता फार धोक्याचें असतें. मनुष्याच्या हातीं आणणें शक्य असेल तर फारच उत्तम. अंडीं लाबून आणल्यानंतर त्यास २४ तास विश्रांति द्यावी व नंतर तीं कोंबडीखालीं उबविण्यास ठेवावीं. परदेशीं अंडीं पाठविणें झाल्यास तीं

पेटींतून पाठवावीं. १५ इंच लांब, बारा इंच रुंद व नऊ इंच उंच एवढ्या पेटींत सुमारें एक डझन अंडीं चांगलीं राहूं शकतात. हीं अंडीं एकमेकास न चिकटतील अशीं ठेवावींत. नंतर पेटीचें तोंड स्क्रूनें बंद करून आगगाडीनें पाठवावीं. उबयास ठेविलेलीं अंडीं २१ दिवसांनीं फुटून त्यांतून पिलें बाहेर येतात. बाहेर आल्यानंतर प्रथमतः त्यांना अन्नापेक्षा उबाऱ्याचीच जास्त जरूर असते; म्हणून त्यास २४–३६ तास पर्यंत कोंबडीखालून काढूं नये. या अवधींत त्यास थोडथोडें खाणें घालावें लागतें. पहिले कांहीं दिवसपर्यंत खाणें घालणें तें सुकें, कुटलेलें व अगदीं साधें असें असावें. परंतु पुढें पिलें वाढूं लागलीं म्हणजे त्यास चांगलें पौष्टिक अन्न खावयास घालावें लागतें. त्यास खाणें घालावयाचें तें केव्हांतरी एकदाच सर्व न घालतां दिवसांतून ३।४ वेळ थोडथोडें घालावें. गहूं, हरभऱ्याची डाळ, अर्धें कच्चें शिजविलेलें मांस, ताक वगैरे पदार्थ सवडी प्रमाणें मधून मधून देत जावें. वाळू, चुना व गारेचे लहान लहान खडे यांची आवश्यकता कोंबड्यांना फार असते. इतर पदार्थांबरोबर हे पदार्थहि तीं खातात व यांचा उपयोग त्यास अन्न पचविण्यास होतो. कोंबड्यांना दांत नसल्यामुळें अन्न चावून बारीक करण्याचें त्यास दुसरें कांहीं साधन नाहीं. परंतु वाळू, गार वगैरे पदार्थांचें गिळलेल्या पदार्थांशीं घर्षण होऊन अन्न पचन होतें. यावरून या पदार्थांची अवश्यकता किती आहे हें सहज कळून येईल चुन्याचा उपयोग अंड्यावरील कवची बनण्याकडे होतो म्हणून त्यास चुन्याचा पुरवठा केला पाहिजे. ज्यावेळीं कोंबड्या पाळणाराचा कोंबड्या बाळगण्यामध्यें कांहीं विशिष्ट हेतु असतो तेव्हां त्या हेतूस अनुसरून त्यास पिलांच्या अन्नामध्यें फेरफार करावा लागतो. उदाहरणार्थः–कोंबड्या विशेषकरितां तयार करावयाच्या आहेत असें असेल तर त्या जितक्या स्थूल व वजनदार होतील व ज्या मानानें त्यांचें मांस नाजुक, मऊ व चवदार होईल त्या मानानें त्यास किंमत अधिक येईल म्हणून ज्या अन्नाच्या योगानें त्यांच्या अंगांत हे गुण वाढतील तेंच अन्न त्यास द्यावें लागेल निरनिराळ्या पदार्थांच्या अंगीं मांस वाढविण्याची शक्ति असेल त्याच पदार्थांचे अंगीं जास्त अंडीं घालण्याचें सामर्थ्य वाढविण्याची शक्ति असेलच असें नाहीं व त्याकरितां निराळ्याच अन्नाची योजना करावी लागेल. म्हणून प्रथमतः कोंबड्या कोणत्या उपयोगाकरितां तयार करावयाच्या तो हेतू ठरवून नंतर अन्नाची योजना केली पाहिजे.

*पिलें तीन महिन्यांचीं झालीं म्हणजे त्यांची वाढ झपाट्यानें होऊं लागते.* ती वाढ तीन महिन्यापासून ८ महिने पर्यंत जास्त जोरांत असते म्हणून या वेळीं त्यास चांगलें कसदार अन्न खाऊं घालावें. खालीं दिलेलें अन्न तयार करून तीन महिन्यांच्या पिलास खाऊं घातल्यास त्यापासून त्यांच्या शरीराची वाढ झपाट्यानें होईल तें अन्न येणेंप्रमाणें:–

| धान्याचें नांव | वजन | धान्याचें नांव | वजन |
|---|---|---|---|
| बारीक कुटलेले गहूं | २ पौंड. | तांदुळाचें पीठ | ३ पौंड. |
| सातूचें बारीक पीठ | १ पौंड | गव्हाचा कोंडा | ३ पौंड |
| हरभऱ्याचें व वाटाण्याचें पीठ | १ पौंड. | जवसाची पेंड | ½ पौंड. |

*पि ला क रि ता घ रें व आ वा र.*—*पिलें एक दोन आठवड्यांचीं होईपर्यंत तीं आईस सोडून फारशीं दूर जात नाहींत.* म्हणून त्यांना हिंडण्यास लागणारें आवार मर्यादित असलें तरी चालतें. हें आवार सहा फूट लांब तीन फूट रुंद व दोन फूट उंच एवढें ठेवून चारी बाजूंनीं तारेच्या जाळ्यानें बंद करावें व त्यास जोडूनच एक लहानसें म्हणजे तीन फूट लांब तीन फूट रुंद व दोन फूट उंच एवढें फळ्यांचें घर असावें. एवढ्या आवारांत एक कोंबडी व आठ दहा पिलें सहज राहूं शकतात. *निव्वळ पिलेंच ठेवल्यास* १५।१६ पर्यंत राहूं शकतात. हें घर वरचेवर निरनिराळ्या ठिकाणीं उचलून ठेवावें म्हणजे कुसरें, कृमी वगैरेंचा त्रास होणार नाहीं.

*पिलें साधारण मोठीं झाल्यावर त्यास चरावयास* आवार मोठें लागतें. तसेंच त्यांचें कावळे, घारी, मुंगूस, वगैरे प्राण्यापासून रक्षण करावें लागतें. हवेंतील फेरफाराचा पिलांच्या प्रकृतीवर पुष्कळ परिणाम होतो म्हणून त्यावेळीं त्यास फार जपलें पाहिजे

*नियमित खाणें, बेतशीर व व्यवस्थित व्यायाम आणि* पुरेशी स्वतंत्रता या गोष्टी अशा पिलांना अवश्य आहेत तसेंच त्यांचीं घरें स्वच्छ ठेवणें अवश्य आहे. कोंबड्यांचा धंदा यशस्वी न होण्याचें कारण बऱ्याच अंशीं त्यांचीं घरें व आवारें स्वच्छ नसतात हें होय. तरी या बाबतींत शक्य ती खबरदारी घेणें जरूर आहे. कोंबड्यांचें संवर्धन उत्तम प्रकारें व्हावें व त्यापासून शक्य तितका फायदा व्हावा *अशी कोंबडी बाळगणाराची इच्छा असल्यास त्यांनीं* कोंबड्यांची संख्या अगदीं मर्यादित ठेविली पाहिजे कोंबड्या *बाळगणाऱ्या लोकांचे साधारणपणें* दोन वर्ग करितां येतील. (१) निव्वळ धंदा या दृष्टीनें कोंबडी बाळगणारे. व (२) केवळ शुद्ध जातींची पैदास करण्याची आवड म्हणून कोंबडी बाळगणारे. पैकीं पहिल्या वर्गांतील लोक पिलांना अगर कोंबड्यांना चांगली किंमत येत असल्यास शक्य तितकीं विकून टाकण्यांत कसूर करीत नाहींत. मग त्यांच्या संग्रहांतील उत्तम जात नाहींशी झाली तरी हरकत नाहीं. *आणि दुसऱ्या वर्गांतील लोक आपल्या संग्रहांतील पिलें पुढें* कदाचित् उत्तम निपजतील या आशेनें तीं मुळींच विकीत नाहींत तात्पर्य, *एक वर्ग काळजीनें उधळेपणा करितो तर* दुसरा फार काटकसर करितो, पहिल्या वर्गाची दृष्टि द्रव्यसंचयाकडे असते तर दुसऱ्याची दृष्टि पिलांशीं संबंध, त्यांचे लाड वगैरे गोष्टींमुळें प्रेम उत्पन्न

अध चालेली असते त्यामुळें कोंबड्याचा धंदा जसा व्यवस्थित चालावयास पाहिजे तसा चालत नाहीं

कोणतीं पिलें अगर कोंबडीं विकावींत ते पुढें दिलें आहे (१) जीं पिलें अशक्त असतील तीं विकून टाकावींत (२) कम अस्सल जातीचीं पिलें विकून टाकावींत, व (३) कोंबडी ४।५ वर्षांची मोठी झाली म्हणजे विकावींत

*पिलांचा कृत्रिम उत्पत्ति व त्यांचें संवर्धन*—सामान्यतः व्यवहारांत कोणताहि धंदा मोठ्या प्रमाणावर करणें झाल्यास निव्वळ नैसर्गिक साधनांवरच अवलंबून राहून चालत नाहीं त्यास यांत्रिक साधनांची जोड झाल्यास तो धंदा पुष्कळ किफायतशीर होऊन कामहि पुष्कळ होतें हीच गोष्ट कोंबड्यांच्या धंद्याची आहे कोंबड्यांचा धंदा मोठ्या प्रमाणावर करणें झाल्यास अंडीं उबविणें, पिलांचें संवर्धन करणें, वगैरेकरितां पाश्चात्य देशांत निरनिराळीं यंत्रें तयार झालेलीं आहेत, त्यापासून नैसर्गिक पद्धतीपेक्षा काम पुष्कळ होऊन परावलंबन कमी झाल्यामुळें नाशहि बराचसा वाचतो अंडीं उबविण्याकरितां जें यंत्र शोधून काढलें आहे त्यास इन्क्युबेटर असें म्हणतात याच्या सहाय्यानें एका खेपेस पुष्कळ अंडीं उबवितां येतात हें वर्षांतील कोणत्याहि ऋतूंत चालतें व पिलें निघण्याचें प्रमाण पुष्कळ अशानें समाधानकारक पडतें हें यंत्र वापरतांना मुख्यत्वेंकरून पुढील गोष्टींकडे लक्ष पुरविलें पाहिजे (१) उबवावयास ठेवावयाचीं अंडीं ताजीं असावींत तीं उन्हाळ्यांत तीन दिवसांपेक्षा व हिंवाळ्यांत सात दिवसांपेक्षा जास्त शिळीं नसावींत शिळीं अंडीं उबविण्यास ठेविलीं असतां त्यांतून खात्रीपूर्वक पिलें निघतीलच असें नाहीं (२) यंत्रांतील उष्णता अगदीं नियमित अशावर ठेवणें, उष्णतेचें मान १०१° पासून १०३° अंशापर्यंत असावें त्याच्यावर जाऊं देऊं नये (३) यंत्रामध्यें जरूर तितकी हवा राहील अशी खबरदारी घेतली पाहिजे (४) दिवसांतून यंत्राचें खण दोन वेळ उघडणें पहिले दहा दिवसपर्यंत अर्ध दहा मिनिटें उघडीं ठेवावींत, दहा दिवसांनंतर अंडीं वीस मिनिटें अगर थंड होईतोंपर्यंत उघडीं ठेवावींत व खण पुन्हां झाकावा (५) उष्णता १०२° अंशापेक्षा जास्त असल्यास दिवा मालवावा व १०२° अंशापेक्षा कमी होऊं लागल्यास पुन्हां लावावा (६) उन्हाळ्यांत अंडीं उबविणें झाल्यास यंत्रांतील हवेंत आर्द्रता असावी लागते म्हणून अंड्यांवर जरूर भासल्यास थोडें पाणी शिंपडावें पावसाळ्यांत याची मुळींच जरूर लागत नाहीं (७) अंडीं उबविण्याचें काम झाल्यावर यंत्रांतील खण, पाण्याची वशी, आणि व्हेंटिलेटर्स हीं सर्व ऊन पाण्यानें व साबणानें स्वच्छ धुवावीं (८) अंड्यांतून पिलें बाहेर निघत असतांना खण वरचेवर उघडल्यानें पिलांस थंडी होण्याचा संभव आहे सबब ते वरचेवर उघडूं नयेत इतक्या गोष्टींकडे लक्ष पुरविल्यास अंडीं चांगलीं उबून पिलांचें प्रमाणहि चांगलें पडेल व कोंबडीस खुडका येण्याची वाट पहावी लागणार नाहीं यंत्रांत अंडीं २१ दिवसपर्यंत ठेवावीं लागतात व २१ व्या दिवशीं पिलें बाहेर येऊं लागलीं म्हणजे त्यास तेथून काढून 'शुष्कीकरणमंजूषें'त ठेवावीं लागतात हीं मंजूषा अंडीं उबविण्याच्या यंत्रासच जोडलेली असते येथें तीं ठेवलीं म्हणजे त्यास भरपूर उष्णता मिळून तीं चांगलीं कोरडीं होतात तेथें तीं १२ पासून १६ तास ठेवल्यानंतर त्यास धात्रीमंजूषेंत ठेवतात धात्रीमंजूषेंतील व शुष्कीकरण मंजूषेंतील उष्णतेचें प्रमाण ६० पासून ९०° अंशापेक्षा जास्त असूं नये धात्रीमंजूषेचा उपयोग कोंबडीखालीं अंडीं ठेवून निघालेल्या पिलांचें संगोपन करण्याकडेहि होतो हीं पिलें तीन दिवसपर्यंत कोंबडीखालीं ठेऊन चवथ्या दिवसापासून धात्रीमंजूषेंत ठेवावींत मंजूषा हें यंत्र म्हणजे एक प्रकारची पेटी करून त्यांत ठराविक उष्णता राहील अशी व्यवस्था केलेली असते या यंत्रास किंमत अधिक पडते व ज्या मानानें त्यास सोई अधिक त्या मानानें त्याची किंमत अधिकाधिक वाढत जाते अर्थात् असलें यंत्र विकत घेणें शेतकऱ्यास परवडणार नाहीं, परंतु याच्या ऐवजीं खालीं सांगितलेल्या पद्धतीनें पेटया तयार करून त्यांचा उपयोग धात्रीमंजूषेसारखा करतां येईल व त्या फारच कमी खर्चांत करतां येतील ती पद्धत येणेंप्रमाणें —अडीच फूट लांब, दीड फूट रुंद व दीड फूट उंच अशी एक पेटी तयार करावी तिच्या तिन्ही बाजूस एक लहानसें दार असावें पेटीची वरील बाजू तारेच्या जाळ्यानें बंद करावी म्हणजे आंत हवा व उजेड भरपूर जाईल या जाळ्यापासून खालीं तळापर्यंत लोंबतील अशा दोन बोटें रुंदीच्या फ्लॅनेलच्या पट्ट्या दोन दोन इंचांवर लावाव्यात या पेटीच्या तळाशीं स्वच्छ बारीक वाळूचा एक इंच जाड थर पसरावा व त्यावर बारीक तोडलेलें गवत पसरावें गवताऐवजीं लाकडाचा भुसा असला तरी चालेल पिलांना या पेटींत ठेवलें असतां तीं फ्लॅनेलच्या पट्ट्यांत जाऊन बसतील व त्यास आपण जणूं काय आईच्या पंखाखालीं बसलों आहों कीं काय असा भास होईल ही पेटी वरचेवर ऊन पाण्यानें किंवा फिनाइलनें धुण्याची व्यवस्था केली पाहिजे धात्री मंजूषेचा उपयोग पिलें लहान आहेत तोंपर्यंतच होत असतो पिलें मोठीं होऊं लागलीं म्हणजे त्यास तेथून काढून एखाद्या खोलींत अगर खुराड्यांत ठेवावें येथपर्यंत पिलें अंड्यांतून बाहेर निघाल्यापासून तीं तीं जाणतीं होईपर्यंत त्यास काय खाणें घालावें व त्यांची निगा कशी राखावी यासंबंधीं विवेचन झालें आतां पिलें मोठीं झाल्यावर त्यांचें खाणें काय असावें, त्यांचीं घरें कशीं असावींत वगैरे गोष्टींसंबंधीं विचार केला पाहिजे

कोंबड्यांना जें खाणें घालावयाचें त्याचे शास्त्रदृष्ट्या पांच वर्ग करतां येतील ते असे —(१) धान्य, (२) हिरवें अन्न, (३) मांसल अन्न, (४) अन्नपचनसाहाय्यक द्रव्यें

# कोंबडीं

## कोंबडयाच्या जाती.

अन्नमार्ग.

चुनाळ.

पहिला कोठा.

स्नायुमय कोठा.

काळीज.

पित्ताशय.

लिबलिब.

मीका (आंतड्याचा एक भाग).

मूत्रवाहिनी.

अंडाशयाचा नळ.

क्लोएका (मलद्वार).



५ कोचिन चीन कोंबडी



६ गेम कोंबडी

## कोंबडयाचीं पचनेंद्रियें.



८ सुलतान कोंबडी



१० पेन्सिली हॅम्बर्ग कोंबडी



५ डार्किंग कोंबडी



११ ठिपकेदार हॅम्बर्ग कोंबडी



१२ गिनी कोंबडी.

व ( ५ ) द्रव पदार्थ. यापैकी धान्य हा पहिला वर्ग होय. यांत जे पदार्थ येतात त्याच्या गुणधर्मांप्रमाणें तीन पोटवर्ग करता येतील

पो ट व र्ग प हि ला.—या वर्गातील धान्येंः गहूं, सातू, जव, हरभरे, वाटाणा, गव्हाचा कोंडा, उडीद, तूर वगैरे. त्याचे गुणधर्म सत्वदृष्ट्या उच्च. यानें मांसवृद्धीस मदत होते. हें अन्न पिलांना किंवा कोंबड्यांना घालणें झाल्यास ताकांत, दुधांत किंवा पाण्यांत भिजवून ओलें करून घालावें.

पो ट वि भा ग दु स रा—यांतील धान्यें.—भात, तांदूळ, कण्या, तांदुळाचा कोंडा, बाजरी, ज्वारी वगैरे. हीं शरीरांतील उष्णता राखण्यास उत्तम व प्रकृतीस थंडावा आणणारीं आहेत यांत सत्व कमी असतें. लहान पिलांना बारीक करून घातलें असतां चांगलें अशक्त व आजारी कोंबड्यांना चांगलें

पो ट वि भा ग ति स रा.—धान्य मका.—हें मेदोवृद्धि व मांसवृद्धि करण्यास उत्तम होय हें कांडून किंवा भरडून भिजवून घालणें. ज्या कोंबड्या लठ्ठ करून दिखावयाच्या असतील त्यासच हें द्यावें अंडीं घालणाऱ्या कोंबड्यांस देऊं नये.

यानंतर दुसरा मुख्य वर्ग म्हणजे "हिरवें अन्न" हा होय. यांत पुढील पदार्थ येऊं शकतात.—कोंवळें गवत, कांदे, लसूण, घास, कोबीचीं पानें, बटाटे, वेलाचे कोंवळे देंठ, पालाच्या हिरव्या पानी वगैरे. हें अन्न कोंबड्यास खावयास घातलें असतां त्यांची प्रकृति सुदृढ व निरोगी रहते या अन्नाच्या अंगीं मलावरोध नाहींसा करण्याची शक्ति असते. शिवाय अंडीं मोठ्या आकाराचीं होऊन त्याचें प्रमाण वाढतें व पातळपणा कमी होतो. मलावरोध नाहींसा झाल्यानें आमांश, हगवण वगैरेंसारखे रोग होण्याची भीति नसते. असे अनेक फायदे या वर्गांतील अन्नापासून आहेत

पावसाळ्यांत जिकडे तिकडे हिरवें गार रान असल्यामुळें कोंबड्यांना कोंवळें गवत पुष्कळ मिळतें आणि म्हणून त्यास इतर पदार्थांची विशेष जरूर नसते. परंतु उन्हाळ्यांत ज्यावेळीं सर्व गवत सुकून जातें त्यावेळीं वर सांगितलेल्या इतर पदार्थांचा उपयोग करणें अवश्य असतें.

कोंबड्यांना बटाटे खाण्यास घातले असतां चरबीचें प्रमाण जास्त वाढतें व ती जास्त लठ्ठ होतात. तरी ज्या कोंबड्या अगर पिलें विकावयाचीं असतील त्यांस हे खाणें घालावें बटाटे घालावयाचे झाल्यास ते पाण्यांत उकडून साल काढून गव्हाच्या कोंड्यांत अगर पिठांत मिसळून द्यावे. कोंबड्यास बटाट्यांची साल कधींहि खावयास घालूं नये

कोबी, गाजर, लसूण घास वगैरे घालावयाचें झाल्यास तें कच्च्या स्थितींत घातलेलें चांगलें तें शिजविण्याचें अगर उकडण्याचें प्रयोजन नाहीं.

याखेरीज कोंबड्यांना कधीं कधीं मोहरी व अंबाडीचें बीं आणि पेंड खावयास घालतात थंडीच्या दिवसांत कोंबड्यांचे पंख गळत असतात. त्या वेळीं मोहरी व अंबाडीचें बीं खावयास घातलेलें चांगलें

तिसरा वर्ग म्हणजे मांसल अन्न हा होय या वर्गांत निरनिराळ्या जनावरांचें मांस,बारीक केलेलीं ताजीं हाडें किंवा हाडांचा चुरा, किडे, अळ्या हे पदार्थ येतात या अन्नाच्या अंगीं मांसवृद्धि व उष्णता उत्पन्न करण्याची शक्ति असल्या-मुळें कोंबड्या चांगल्या तयार होतात. उन्हाळ्यांत या अन्नाची विशेषशी जरूर नसते; परंतु हिंवाळ्यांत मात्र हें अन्न मधून मधून दिलेलें चांगलें पावसाळ्यांत कीटकोत्पत्ति फार होत असल्यानें कोंबड्यांचें चरावयाचें आवार पुष्कळ असल्यास त्यास हें भक्ष आपोआप मिळतें परंतु मर्यादित जागेंत आणि घातलेल्या अन्नावरच कोंबड्या पाळलेल्या असतील तर मात्र मधून मधून हें अन्न घालणें जरूरीचें आहे. कोंबड्यांचा सर्वसाधारण निरीक्षण पाहिल्यास असें दिसेल कीं, वरील अन्न मिळविण्यासाठीं त्या स्वाभाविकपणें फार खटपट करीत असतात. झाडावर किंवा जमिनींत असलेल्या अळ्या, वाळवी, मुंगळे वगैरे दृष्टीस पडल्यास ती त्याचा इतका फन्ना उडवितात कीं, त्या ठिकाणीं एकहि कीड रहात नाहीं काहीं काहीं कोंबडीं इतकीं धीट असतात कीं, ती आपल्या जिवाची पर्वा न करितां स्वजाती जातींतील काहीं प्राण्यावर हल्ला करून त्यास सर्वांग गिळून टाकतात. लहान लहान बेडूक, उंदराचीं लहान पिलें, मासळीचे वगैरे तुकडे, त्याच्याच पैकीं मेलेलीं पिलें वगैरे पदार्थ त्यास मिळा-ल्यास त्यांची सुस्ती पंगळ उडते यावरून हें अन्न कोंब-ड्यांच्या आवश्यक अन्नापैकीं एक आहे हें सांगणें नकोच.

कोंबड्या अन्नसेवनार्थ इकडे तिकडे हिंडत असतांना गारेचे खडे, बारीक रेती वगैरे पदार्थ खात असतांना पुष्क-ळांनीं पाहिलें असेल. कोंबड्यांना दात नसल्यामुळें त्यांस आपलें अन्न सबंध गिळावें लागतें व पोटांत गेल्यावर बारीक होण्याचें एखादें साधन पाहिजे म्हणून त्यांना वरील पदार्थ खावे लागतात.पदार्थ पोटांत गेल्यावर पाठीतील अन्नाशीं त्यांचें घर्षण होऊन ते बारीक होतें व म्हणून तें पचविण्यास सोपें जातें. प्रत्येक प्राण्यात खाल्लेलें अन्न बारीक करण्याची काहीं तरी व्यवस्था परमेश्वरानें केलेली असतेच. त्याचप्रमाणें कोंबड्या वगैरे पक्षिवर्गाच्या बाबतीतहि केलेली आहे. कारण जरी यांना दात वगैरेंसारखीं साधनें अन्नाचें चर्वण कर-ण्यास नाहींत तरी तें काम वाळूचे व गारेचे खडे बजावतात. तात्पर्य इतर पदार्थांप्रमाणें या पदार्थांचीहि कोंबड्याचे जीवनास अवश्यकता आहे हें उघड होतें.

वाळू, गार या पदार्थांबरोबरच कोंबड्या चुन्याचे खडेहि शोधून खात असतात कोंबड्याची अंडीं तपासून पाहिली तर त्याची कवची चुन्याची बनलेली असते असें दिसून येईल. हा चुना कोंबड्या बाहेरूनच मिळवितात तो त्याच्या शरी-रांत उत्पन्न होत नाहीं चुना भरपूर प्रमाणांत न मिळा-ल्यास अंड्यावरील कवची पातळ होते व अंडीं जरा धक्का

लागला तरी फुटतात. म्हणून अंडीं चांगलीं व पुष्कळ मिळवींत अशी इच्छा असेल तर कोंबड्यास भरपूर चुना मिळेल अशी व्यवस्था केली पाहिजे.

पांचवा मुख्य वर्ग म्हणजे द्रव पदार्थ होत. यांत दूध, ताक, पाणी वगैरे पदार्थ येतात. पाण्याची आवश्यकता प्रत्येक प्राण्यास आहे त्याप्रमाणें ती पक्ष्यांसहि आहे. कोंबड्यांना पाणी ठराविक वेळेस पाजून चालत नाहीं. त्यांना येता जाता वरचेवर थोडथोडें पाणी पिण्याची संवय असते; म्हणून त्यांच्या आवारांत पाण्याची सोय करून ठेविली पाहिजे. पाण्याचें भांडें व आंतील पाणी स्वच्छ ठेवण्याची खबरदारी घ्यावी लागते; कारण कोंबड्यास बरेचसे रोग घाणेरडें पाणी पाजल्यानें होतात. पाण्याच्या भांड्यांत कोंबड्यांनी पाय बुडवूं नयेत व त्यास स्वच्छ पाणी प्यावयास मिळावें याकरितां पाण्याच्या भांड्यावर पत्र्याचें झांकण घालून त्यास कोंबड्याची चोंच जाईल येवढालीं वाटोळीं भोकें पाडावींत. म्हणजे त्यास त्यांतील पाणी सहज पितां येईल. या पाण्यांत थोडासा कापूर मिसळल्यास पाण्याच्या स्वच्छतेबद्दल वादच रहाणार नाहीं.

मलई काढून घेतलेलें दूध शहरांत पुष्कळ स्वस्त मिळतें तरी मधून मधून तें कोंबड्यांना घातल्यास फार हितकर होतें. तसेंच ताक, दहीं वगैरेंसारखे पदार्थ खेडेगावांतील लोकांना बऱ्याच स्वस्त भावानें मिळतात. ते मधून मधून कोंबड्यांना घातल्यास त्यांजपासून उत्पन्न चांगलें मिळून त्या निरोगी बनतात. ताकाच्या योगानें कोंबड्यांचें मांस फारच रुचकर व नाजूक होतें. तसेंच त्यास अंडीं घालण्याची इच्छा जास्त उत्पन्न होते. म्हणून तो पदार्थ केव्हां सांपडल्यास त्यास घालण्याविषयीं हयगय करूं नये. येथपर्यंत शास्त्रदृष्ट्या कोंबड्यांना घालावयाचे खाण्याचे किती वर्ग करतां येतील व त्यांचे गुणधर्म काय यांविषयीं सांगितलें, परंतु सर्वसाधारण मानानें पाहिलें तर कोंबड्यांच्या खाण्याचे मुख्य दोन वर्ग करतां येतील:—एक सुकें अन्न व दुसरा ओलें (भिजवलेलें अन्न), सुकें अन्न, धान्य वगैरे देणें झाल्यास ते भाताच्या पेंढ्यांत, गवतांत किंवा रेतींत पसरून टाकावें म्हणजे तें खाणें शोधून काढण्यास कोंबड्यांस बरीच मेहनत करावी लागेल व त्याचा परिणाम अर्थातच शरीरावर चांगला होईल. परंतु अन्न ओलें असल्यास तें जमिनीवर न टाकतां भांड्यांतून घालावें व हीं भांडीं नेहमीं स्वच्छ ठेवावींत. कोंबड्यांना अन्न किती व कोणतें घालावयाचें हें बहुतांशीं ऋतुमानावर, कोंबड्यांच्या भोंवतालच्या परिस्थितीवर व त्यांजपासून मिळणाऱ्या उत्पन्नावर अवलंबून राहील. जास्त उत्पन्न देणारी जी कोंबडी असेल त्यास चांगलें व भरपूर खाणें घालावयाचें व इतर कोंबड्यास साधारण मानानें घालावयाचें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. तसेंच कोंबड्यास चरण्याकरितां भरपूर आवार असेल तर त्या मानानें खाण्याचें मान कमी करावयाचें व त्यास अगदीं मर्यादित जागेंत ठेवावयाचें असेल तर खाणें भरपूर घालावयाचें हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे. प्रत्येक खेपेस दर कोंबडीस जें खाणें घालावयाचें त्याविषयीं सर्वसाधारण नियम म्हणजे "ती जेवढें अन्न उत्सुकतेनें व अधाशीपणानें खाईल तेवढेंच अन्न दर वेळेस घालावयाचें" हा होय. पुढें टाकलेलें अन्न खाण्यांत कोंबडीकडून दिरंगाई दिसूं लागली कीं अन्न घालणें बंद करावें. कोंबड्यांना मर्यादित जागेंत ठेविलें असें धरून चालल्यास त्यास भरपूर खाणें द्यावें लागेल असें वर सांगितलें आहे. हें खाणें दिवसांतून तीन वेळ दिलें पाहिजे. मात्र हें देतांना तें पचविण्यास कोंबड्या कांहीं मेहनत करतात कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. नाहींतर चांगलें पौष्टिक अन्न भरपूर मिळून त्या मानानें मेहनत न झाल्यास कोंबड्यांच्या शरीरांत मेद वाढून त्या अंडीं घालण्याच्या कामीं अगदीं निरुपयोगी ठरतील. सकाळीं द्यावयाचें खाणें बऱ्याच अंशानें सात्त्विक असावें व त्यांत पांचहि वर्गांतील पदार्थ थोडथोड्या प्रमाणांत मिसळलेले असावेत. उदाहरणार्थ गहूं, यव किंवा सातु यांचा भरडा दुधांत अगर ताकांत भिजवून साधारण ओलसर करावा. त्यांत थोडे मांसाचे शिजलेले तुकडे, कांद्याचे किंवा इतर वनस्पतींचे तुकडे, थोडें मीठ, ताज्या कोळशाची थोडी पूड, हाडांचा चुरा वगैरे जिन्नस घालावेत. हें अन्न फार देऊं नये. कारण तें जास्त दिल्यास आमांश, हगवण वगैरे रोग होण्याचा संभव असतो. मधून मधून हें अन्न बंद करून त्याच्या ऐवजीं नुसतें भात अगर कशा प्रकारचें एखादें धान्य द्यावें. दुसरें खाणें निवळ धान्याचेंच असावें. व वरचेवर निरनिराळें धान्य मिळून द्यावें. दुकानदाराच्या दुकानांत मोजतांना सांडलेलें निरनिराळें मिसळलेलें धान्य पुष्कळ स्वस्त दरानें मिळण्याचा संभव आहे. तरी त्याचा उपयोग केला तरी चालेल. हें अन्न सुकेंच खावयास घालावें. तिसरें खाणें संध्याकाळीं घालावयाचें तें मात्र पुन्हां कसदार असावें. कारण त्या अन्नावर त्यास सबंध रात्र काढावयाची असते. प्रत्येक कोंबडीस साधारण मानानें एक औंस पासून दोन औंस पर्यंत खावयास घालण्यास मुळींच हरकत नाहीं.

कों ब ड्यां क रि तां जा गा व घ रें.—कोंबड्यांचा धंदा मोठ्या प्रमाणावर करावयाचा असल्यास ज्याप्रमाणें त्यांच्या अन्नासंबंधीं काळजी घेतली पाहिजे त्याचप्रमाणें त्यांना ज्या ठिकाणीं ठेवावयाचें ती जागा त्यांच्या वाढीस योग्य आहे कीं नाहीं तें पाहिलें पाहिजे. हिंदुस्थानांतील हवामान साधारण मानानें कोंबड्यांच्या वाढीस हितावह आहे. फक्त त्यांना ज्या जागीं ठेवावयाचें ती जागा व त्यांजकरितां बांधावयाचीं घरें हीं नीट विचारपूर्वक बांधलेलीं असलीं म्हणजे झालें. मुख्यत्वेंकरून ज्या जागेंत पाण्याचा निचरा चांगला होतो व जी जागा उंचवट्यावर असते, तसेंच ज्या जागेंत चुना, कंकर वगैरे फार सांपडतो ती जागा घरें बांधावयास चांगली. दलदलीची व चिकणमाती जमीन कोंबड्यांच्या

बाढीस विघातक आहे. कोंबडयांच्या घरास उत्तम जागा पसंत करावयाची असल्यास एखाद्या टेंकडीचें दक्षिण अगर आग्नेय बाजू पसंत करावी, कारण कोंबडयांना उत्तरेकडून व पूर्वेकडून वहाणारा थंड वारा मानवत नाहीं. कोंबडया व इतर पाळीव पक्षी हे जात्या फार नाजूक असल्यामुळें त्यांचें थंडी, ऊन, पाऊस वगैरे पासून संरक्षण करणें अवश्य आहे; व याकरितां कोंबडयांच्या घरास जोडून एखादी पडवी (निवासस्थान) काढावी. या पडवीची पश्चिम बाजू बंद करावी म्हणजे पाऊस, ऊन वगैरेपासून कोंबडयांस बाधा होणार नाहीं. तसेंच कोंबडयांच्या घरापुढील चरावयाचें अंगण विस्तृत असल्यास त्यांत लहान झाडें लावावींत म्हणजे त्यांच्या आश्रयास कोंबडया येऊन बसतील. झुडपें लावणें शक्य नसेल तर कळकाच्या ६।७ फूट लांब व ४।५ फूट रुंद ताटया करून त्यास वचूवे टेंकू देऊन त्या ठिकठिकाणीं उभ्या कराव्यात म्हणजे त्यांच्या आसऱ्यास कोंबडया येऊन बसतील. येणेंप्रमाणें कोंबडयांच्या घराकरितां जागा पसंत करून झाल्यावर त्यावर घर दाक्षिणाभिमुख बांधावें. ज्या मानानें कोंबडयांची संख्या ठेवावयाची असेल त्या मानानें घरें लहान अगर मोठीं बांधावीं लागतील. पांच फूट लांब, पांच फूट रुंद व सहा फूट उंच येवढ्या जागेंत मोठीं पांच कोंबडीं चांगल्या रीतीनें राहूं शकतात. कांहीं लोक एवढ्या जागेंत वीस पर्यंत कोंबडीं कोंडून ठेवितात परंतु त्यायोगानें त्यांच्या प्रकृतीस अपाय होतो आणि अंडीं घालण्याचें प्रमाणहि फार कमी होत जातें. तसेंच इतकीं कोंबडीं एके ठिकाणीं ठेवल्यास त्यांच्यात मारामाऱ्या होऊन अशक्त कोंबडयांस व पिलांस त्याचा परिणाम भोगावा लागतो. असो. कोंबड्यांकरितां घरें बांधावयाचीं तीं ज्या मानानें द्रव्याची सोय असेल त्या मानानें विटांचीं, फळ्यांचीं किंवा मातीचीं बांधावींत. विटांचीं बांधलेलीं घरें पुष्कळ काळपर्यंत टिकतात. परंतु प्रथमतः खर्च पुष्कळ करावा लागतो. विटांच्या भिंतींना आंतून व बाहेरून सिमेंटाचा गिलावा करावा म्हणजे कोंबड्यांच्या शरीरावरील कृमींस रहाण्यास जागा मिळणार नाहीं. फळ्यांचीं घरें कमी खर्चाचीं असून तीं एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं ओढून नेण्यास सांपडतात. या घरास वरचेवर डांबर, चुना वगैरे लावल्यास तीं पुष्कळ वर्षे पर्यंत टिकतात व त्यांत कृमींची उत्पत्ति होत नाहीं. मातीचीं घरें फार दिवस टिकत तर नाहींतच परंतु त्यांत उलट उंदीर, घुशी, साप वगैरे प्राण्यांस रहाण्यास जागा मिळते. हे प्राणी लहान पिल्लांना मारण्यास कमी करीत नाहींत. तसेंच अंडीं वगैरे घरांत ठेवलेलीं असल्यास ते तीं उचलून नेतात. म्हणून होता होईतों मातीचीं घरें बांधूं नयेत. कोंबड्यांना कधींकधीं संसर्गजन्य रोग होतात व त्यास उपाय म्हणजे रोगानें पछाडलेल्या कोंबड्यांस निरोगी कोंबड्यांपासून निराळें ठेवणें हाच होय. म्हणून एक मोठें घर बांधण्याऐवजी लहान लहान घरें एकमेकांपासून अंतरावर बांधल्यास उत्तम. कारण आजारी कोंबड्यांस एका घरांतून काढून दुसरीकडे नेऊन ठेवण्यास सोपें जातें व अशा रीतीनें संसर्गजन्य रोगाच्या वाटीस पुष्कळ प्रतिबंध होतो.

पक्षिगृहाचें छप्पर कौलारू किंवा फळ्यांचें असावें, पत्र्यांचें असूं नये, कारण दोनप्रहरीं उन्हानें पत्रे तापून आंत उष्मा फार होतो. पत्र्याचाच उपयोग करणें झाल्यास निदान त्यावर गवत वगैरे घालावें. छप्पर व भिंत यामध्यें रहाणारी फट बंद करावी, नाहींतर तीतून उंदीर, मांजर, सर्प वगैरे प्राण्यांस आंत जाण्यास मार्ग मिळतो. पक्षिगृहांतील हवा खेळती रहावी व त्यांत भरपूर उजेड असावा म्हणून त्यास खिडक्या ठेऊन त्या तारेच्या जाळीनें बंद कराव्यात. पक्षिगृहाचा दरवाजा लांकडी चौकटीचा व एक मनुष्यास आंत जातां येईल एवढा मोठा असावा. त्याचें दारहि तारेच्या जाळीचेंच केलेलें असावें. पक्षिगृहांतील जमीन चांगली पक्की असावी व त्यावर सिमेंट केलेलें असावें. या जमिनीवर नदीची वाळू किंवा दोन इंच जाडीचा मातीचा थर असावा. यावर पडलेली शीट दररोज काढून एके ठिकाणीं साठवावी. म्हणजे तिचा खतासारखा उपयोग करतां येईल. ही वाळू अगर माती दर १५ दिवसांनीं बदलावी. पक्षिगृहाचे एकंदर तीन किंवा चार निरनिराळे भाग करावे. एका भागांत फक्त मोठे पक्षीच ठेवण्याची व्यवस्था असावी. या भागांत कोंबड्यांना बसण्याकरितां वांबूच्या काठ्या भिंतींत बसविलेल्या असाव्यात. जमिनीवर माती हांतरणें व काढणें त्रासाचें वाटत असेल तर काढतां घालतां येतील असे पत्रे खालीं जमिनीवर हांतरावे व ते रोज सकाळीं बाहेर काढून झाडून धुवून नंतर पुन्हां आंत ठेवावे. दुसरा भाग अंडीं उबवणाऱ्या कोंबड्यांकरितां राखून ठेवावा. या भागांत एक फूट लांब, व एक फूट रुंद व एक फूट उंच अशीं लहान लहान घरटीं त्यांत पेंढा किंवा माती घालून ठेवलेलीं असावींत. त्यांत अंडीं उबविण्याकरितां मांडावींत. खुडका आलेल्या कोंबड्या आपल्या घरट्यांत जाऊन अंड्यांवर बसून तीं उबवितील. या भागास जोडून एक स्वतंत्र आवार असावें व तें सर्व बाजूंनीं बंद असावें म्हणजे त्यांत फक्त खुडका आलेल्या व अंडीं घालणाऱ्या तेवढ्याच कोंबड्या ठेवतां येतील व त्यास इतर कोंबड्यांपासून विनाकारण त्रास होणार नाहीं.

तिसरा भाग पिल्लांकरितां राखून ठेवावा व त्यांत महिन्यापासून दीड महिना वयापर्यंतचीं कोंबडीचीं पिल्लें ठेवावींत. पिलांना वांबूचे काठीची जरूर लागत नाहीं. या भागास जोडून असणारें आवारहि स्वतंत्र असावें. व याची वरची बाजूहि जाळ्यांनें झाकलेली असावी. कारण पिल्लांना कावळे घारी वगैरेपासून फार भीति असते. याच भागांत धान्यमंजूषा, शुद्धीकरणमंजूषा वगैरे असाव्यात. प्रत्येक भागांतील आवारांत धूलिस्नानाकरितां सोय केलेली असावी. तसेंच पाणी, चुना, गारेचे खडे, जाडी रेती वगैरेंचाहि भरपूर पुरवठा असावा. पक्षिगृह बांधणें झाल्यास तें खालीं दिलेल्या प्लॅनवर बांधावें.

पक्षिगृह

| | | | |
|---|---|---|---|
| --*-- | + | | |
| पिलांची खोली १०'X१०' | – | पडवी १०'X२०' | X मोठ्या पक्ष्यांस १०'X१०' |
| X | X | | |
| अंगण १००'X१०' | अंगण १००'X३०' | पावपासुन दहा कोंवडी अंगण. १००'X३०' | |
| X | X | | |

खुणांचें स्पष्टीकरणः-*=खिडकी; X=दरवाजा; +=अंडीं उबविण्याचीं घरटीं, ÷=अंडीं उबविण्याची खोली १०'X१०'.

वर दिलेल्या घरात दहा कोंबड्या चांगल्या रीतीनें राहूं शकतात. सदर रीतीनें घर बांधणें फारच खर्चाचें आहे. म्हणून यापेक्षा स्वस्तांत घर पाहिजे असल्यास तें खालील प्रमाणें करावें सहा फूट लांब तीन फूट रुंद व चार फूट उंच एवढा एक खोका घ्यावा त्याच्या तळास व तीन बाजूंस फळ्या असाव्यात व पुढची बाजू व वरची बाजू तारेच्या जाळीनें बंद करावी. वरच्या व पुढल्या तारेच्या जाळीची चौकट करून ती बिजागऱ्यांनीं बसवून टाकावी. म्हणजे तें झांकण ट्रंकच्या झांकणासारखें उघडतां येईल या पेटीच्या पुढील बाजूसहि एक लहानसें दार असावें म्हणजे कोंबड्यांना त्यांतून आंत बाहेर जातां येईल या पेटींत सहा इंच उंचीवर एक बांबूची काठी बसविलेली असावी. ही पेटी कोठें तरी सावलींत ठेवावी. असल्या एका पेटींत ५-६ कोंबड्या राहूं शकतात. पेट्या स्वच्छ ठेवण्याची फार खबरदारी घेतली पाहिजे.

पक्षिगृह बांधल्यानंतर तें स्वच्छ ठेवण्याविषयीं फार खबरदारी घेतली पाहिजे. त्याचप्रमाणें पक्षिगृहांतील इतर वस्तु, कोंबड्यांचीं घरटीं, पाखरें, बसण्याच्या दांड्या, खाण्याचीं व पाणी पाजण्याचीं भांडीं वगैरे सामान रोजच्या रोज धुवून स्वच्छ ठेविलें पाहिजे म्हणजे कृमींची उत्पत्ति किंवा वाढ फार होणार नाहीं.

कोंबड्यांचे मुख्य शत्रू म्हणजे उंदीर, साप वगैरे होत. घरें बरोबर रीतीनें बंद केलेलीं नसल्यास ते आंत शिरून अंडीं पळवितात व लहान पिलांना मारून खातात. भिंती वगैरे चांगल्या बांधलेल्या असल्यास ते आपला मार्ग जमिनींतून काढतात. यास आळा घालण्याकरितां पक्षिगृहांतील जमीन [illegible] पद्धतीनें करावी.

जमिनीस व सभोंवतांच्या भिंतीस तीन फूट पुरेल एवढें तारेचें जाळें घेऊन तें पक्षिगृहांत पसरावें व त्यावर चार इंच जाडीचा मातीचा किंवा वाळूचा थर द्यावा व सभोंवतालच्या भिंतीस सिमेंटचा गिलावा करावा. जाळ्याच्या ऐवजीं पत्रे घातले तरी चालतात. जमीन करण्याची दुसरी पद्धत आहे ती अशीः- जमीन एक फूटपर्यंत खोल खणून तींतील माती बाहेर काढून टाकावी नंतर सहा इंच जाडीचा धोंडे व कोळसे यांचा थर करावा व पुष्कळ पाणी घालून तो ठोकून काढावा. नंतर त्यावर बारीक मुरूम पसरून त्यांत डांबर ओतावें व ती जमीन कठिण व गुळगुळीत होईपर्यंत ठोकावी. म्हणजे तींत उंदरांना बिळें करतां येणार नाहींत.

येणेंप्रमाणें घरें बांधून झाल्यावर कोंबड्यांचीं अंडीं उबविण्यास लागणारीं साधनें, त्यांना खाणें व पाणी यासाठीं लागणारीं भांडीं, तसेंच त्यांचें खाणें साठवून ठेवण्याचें कांहीं तरी साधन वगैरे गोष्टींची तजवीज करावयास पाहिजे अंडीं उबविण्याचें काम यंत्राच्या सहाय्यानें करावयाचें असेल तर त्याकरितां स्वतंत्र खोली असावी या खोलींत हवा, उजेड वगैरे विपुल असावा. तसेंच उष्णतामानमापक यंत्र व हवेंतील सर्दपणा मापण्याचें यंत्र हीं या खोलींत असावीत. दाणे घालण्याचीं भांडीं नेहमीं रुंद तोंडाचीं व लाकडी असावींत व त्यास आतून पत्रा मारलेला असावा. त्यांजवर झांकणाची सोय असावी. कोंबड्यांना दाणे घालण्याची खोली स्वतंत्र असून खोलींत जे दाणे घालावयाचें ते सुके असल्यास चोहोंकडे फेंकावे व ओलें असल्यास भांड्यांत घालावें. पाण्याच्या बादल्या, फावडीं, टिकाव वगैरे साधनें नेहमीं तयार असावीं. भाज्या वगैरे पदार्थ शिजवून घालावे लागतात तरी त्याचाहि व्यवस्था असावी.

पुंस्त्वहरण.—कोंबड्याचें जननेंद्रिय काढून घेणें यास 'पुंस्त्वहरण' असें म्हणतात. जनावरांमध्यें याचा प्रघात बराच आहे आणि त्याजपासून फायदा होत असल्यामुळें आजकाल सर्व शेतकरी लोक बैलाच्या बाबतींत त्याचा फार उपयोग करीत आहेत. पक्ष्याच्या बाबतींत सुद्धां पुंस्त्वहरणक्रिया साध्य होते ही गोष्ट कदाचित् कांहींना चमत्कारिक वाटेल परंतु पाश्चात्य देशामध्यें याचा अनुभव पुष्कळांनीं घेतलेला आहे. व त्याजपासून द्रव्यदृष्टीनें इतर बाबतींतहि बराच फायदा होतो असाहि अनुभव आहे. असो. पुंस्त्वहरण केल्यानें कोंवडे लठ्ठ होतात, त्याचें वजन वाढतें आणि त्याचें मांस रसदार व अधिक नाजूक बनतें. अर्थात् त्याची किंमत अधिक येते जे कोंबडे पांचसहा महिन्यांचे झालेले असतील व ज्यांना विकून टाकावयाचा आपला बेत असेल अशाच कोंबड्यांवर ही क्रिया करावी. ही क्रिया करण्यास योग्य काळ म्हणजे हिंवाळा होय ही क्रिया करण्यापूर्वी तीस लागणारीं हत्यारें, पाणी वगैरे जिन्नस जवळ घेऊन बसावें व नंतर क्रियेस आरंभ करावा. ही क्रिया करावयास जें शस्त्र घ्यावयाचें तें तीक्ष्ण असावें डॉक्टर लोकांचा एक बांकड्या

पातीचा चाकू असतो तो या कामीं फार चांगला. याखेरीज एक वक्राकार टाके घालण्याची सुई व मेण लावलेला दोरा किंवा घोड्याची तात या वस्तू सन्निध ठेवाव्यात. शस्त्रप्रयोग करतांना दोन मनुष्यांची जरूर लागते. शस्त्रक्रिया करणारा मनुष्य एका खुर्चीवर बसतो व दुसऱ्याला आपल्या मांडीवर त्याच्या ( कोंबड्याच्या ) डाव्या बाजूवर निजवितो. असें केल्यानें कोंबड्याची पाठ शस्त्रक्रिया करणाऱ्या मनुष्याकडे वळते व कोंबड्याची डावी बाजू वरच्या बाजूस येते. ( कोंबड्यास मांडीवर घेण्याच्या ऐवजीं एखाद्या टेबलावर निजवावें. या टेबलाच्या फळीस लहान भोंकें पाडलेलीं असावीत. कोंबड्यास निजविल्यावर त्याचे पाय एका बाजूस करून त्यावरून दोरी बांधावी व ती पंजाजवळ असलेल्या भोंकांतून ओंवून तीस खालीं वजन असावें. अशीच एक दोरी पायावरून व मानेवरून घेऊन तेथें असलेल्या भोंकांतून ओंवून घ्यावी म्हणजे कोंबडा जागच्या जागीं बांधला जाऊन दुसऱ्या मनुष्याची जरूर लागणार नाहीं ) नंतर दुसरा मनुष्य कोंबड्याची उजवी तंगडी व मान त्याच्या छातीबरोबर ओढून दुसरी तंगडी शेपटीकडील बाजूस ओढून धरतो. कोंबड्याचें 'वृषण' त्याच्या आतड्याखालीं पाठीच्या कण्याजवळ असतें व तें त्यास चिकटलेलें असतें. तें काढून घेण्याकरितां शेवटच्या 'बरगडी'जवळ तिला समांतर अशी एक चीर पाडावी लागते. ही चीर पाडण्यापूर्वी डाव्या कुशीवरील सर्व पिसें काढून टाकावीत. नंतर शेवटच्या बरगडीच्या पाठीमागें सुई टोंचून तिच्या योगें तेथील कातडें वर उचलावें व शेवटच्या बरगडीस लागून चाकूनें चिरावें. कातडें वर उचलल्यानें आंतील आंत्रांना धक्का लागत नाहीं. ही जखम आंत बोट शिरेल एवढी मोठी असावी. जखम रुंद रहावी व आंतील भाग स्पष्ट दिसावे म्हणून स्प्रिंग असलेलें चिमट्यासारखें एक हत्यार वापरावें. या जखमेंतून आंत्राचा एखादा भाग वर आल्यास तो काळजीपूर्वक आंत जागच्या जागीं बसवावा. नंतर या जखमेंत करांगुली किंवा करांगुलीच्या ऐवजीं कित्येक वेळां एक प्रकारचा पुढें चीर असलेला चमचा वापरण्यात येतो. हा चमचा आंत वृषणाच्या खालीं घालावयाचा व वृषणास जोडून असलेली रक्तवाहिनी चमच्याच्या भोंकांत येईल अशी खटपट करावयाची, आणि नंतर चमचा एका बाजूस फिरवून आंत पीळ पाडून वृषण तोडावयाचें. करांगुलीनें वृषण काढण्यापेक्षां ही पद्धत चांगली. कारण यांत वृषण निसटून जाण्याची भीति नसते. वृषणाची योग्य जागा सांपडल्यास तें बोटाला लागतें. व तें चार महिन्याच्या वयाच्या कोंबड्याचें साधारणपणें घेवड्याच्या मोठ्या बियाएवढें असतें. तें इकडेतिकडे हालण्यासारखें असतें व बोटानें धरावयास गेल्यास निसटून जाण्याचा संभव असतो. हें वृषण करांगुलीला लागलें म्हणजे हलकेंच ओढावें व कण्यापासून वेगळें करावें. वृषण बाहेर काढतांना तें हातांतून निसटून आंत्रांत न जाईल अशी खबरदारी घेतली पाहिजे. वृषण शरीरांत राहिल्यास फारसा अपाय होत नाहीं. परंतु तें काढून टाकलेलें चांगलें, कारण त्यापासून शरीर सुजण्याचा संभव असतो. येणेंप्रमाणें डावीकडील वृषण काढल्यावर त्याच पद्धतीनें उजवीकडील वृषण काढावें. दोन्ही बाजूंचीं वृषणें काढून झाल्यावर जखमेचें तोंड सारखें जोडून त्यास ठिकठिकाणीं टाके मारावेत. प्रत्येक टाका निरनिराळा मारण्याविषयीं खबरदारी घेतली पाहिजे. तसेंच ते मारतांना आंतील आंत्रांना धक्का न लागेल अशी काळजी घेतली पाहिजे. शस्त्रक्रिया पुरी झाल्यावर कोंबड्यास स्वतंत्र व शांत अशा ठिकाणी तारेच्या पिंजऱ्यात ठेवावें व त्यास पाणी व मऊसर अन्न खावयास घालावें. भाकरी दुधात भिजवून घातली असतां चांगली. कांहीं थोडे तास लोटल्यानंतर त्याची त्यास पूर्ण मुभा द्यावी, मात्र त्यास इतर कोंबड्यांत मिसळूं देऊं नये आणि त्यास रात्रीं एखाद्या टोपलीखालीं अगर पाटाऱ्याखालीं झाकून ठेवावा. अशा रीतीनें चारपांच दिवस गेल्यानंतर त्यास लठ्ठ करण्याकरितां पीवरीकरणमंजूषेंत (फॅटिंग बॉक्स) ठेवावें. ही मंजूषा खालीलप्रमाणें करावी. सहा फूट लांब, सवा फूट रुंद व दोन फूट उंच एवढा एक खोका घेऊन त्यात सारखे चार कप्पे पाडावेत. त्याच्या तिन्ही बाजूस फळ्या असून चवथ्या बाजूस तारेची जाळी किंवा लोखंडी सळ्या माराव्या. पेटीच्या बुडाशीं फळ्या न बसवितां लोखंडी गज बसवावेत व त्याच्याखालीं एक खण काढता घालता येण्याजोगा कोंबड्याची शीट गोळा करण्याकरितां असावा. प्रत्येक कप्प्यात एक कोंबडा ठेवावा. ही पेटी एका अंधाऱ्या खोलींत ठेवावी किंवा उजेडांत ठेवल्यास तीवर झांकण घालावें. या पेट्या नेहमीं स्वच्छ ठेवण्याची खबरदारी ठेवली पाहिजे. या कोंबड्यांना जें खाणें घालावयाचें तें अंगात चरबी उत्पन्न करणारें असलें पाहिजे. मका, सातूचें पीठ, शिजलेला भात, तांदुळाचा अगर गव्हाचा कोंडा, बटाटे, शाक व इतर ताज्या व कोंवळ्या वनस्पति यांच्या अंगीं वरील गुण असल्यामुळें वरील पदार्थ आलटूनपालटून खावयास घालावेत. तांदुळाचा अगर गव्हाचा कोंडा पाण्यात कालवून त्यात भिजलेले बटाटे घालून द्यावा. कधीं कधीं कोंड्यामध्यें सातूचें किंवा मक्याचें पीठ मिसळून तें पाण्यात चांगलें शिजवितात व थंड झाल्यावर कोंबड्यास खाऊं घालतात. सदर खाणें खाऊं घालण्याची एक विशिष्ट पद्धत आहे ती अशी:—एका वाटोळ्या उंच किंवा फनेलच्या आकाराच्या भांड्यात सातूचें व इतर कांहीं पदार्थांचीं पिठें घालून तीं दुधात कालवून पातळ करून नंतर त्यांत थोडी चरबी घालतात. सदर दूध किंचित आंबलेलें असावें. हें मिश्रण चांगलें ढवळून तयार करतात. या भांड्यास एक तोटी लावलेली असते व तीस एक रबराची नळी एक फूट लांब लावून तिच्या तोंडास पितळेची नळी बसविलेली असते. कपडे शिवण्याच्या यंत्रात जशी पायानें यंत्र फिरविण्याची योजना

ऑर्पिंग्टन (४) प्लायमौथरॉक (५) ब्रह्मा व (६) वायंडाट. यांच्या पिलांना पौष्टिकरण मंडूर्दत घालून खाणे घातले असता ती लवकरच तयार होतात. चितागाँग जात फार रागीट असते. व रागाच्या भरात आपले पोर जवळ असले तरी मारण्यास मागें पुढें पहात नाहीं. वरील जातीतील कोणत्याहि कोंबड्याचें तो दोन महिन्याचा असताना पुंस्त्व हरण केल्यास तो लौकर तयार होतो.

(४) अंडीं पुष्कळ घालणाऱ्या व विशेष पुष्कळ किंमत येईल अशा कोंबड्या पाळणाऱ्याच्या असतील तर खालील जातींपैकीं पसंत कराव्या. ( १ ) ऑर्पिंग्टन. ( २ ) लँगशन, ( ३ ) वायंडाट, (४) प्लायमौथ, (५) ब्रह्मा, (६) चितागाँग. यापैकीं काहीं जाती अंगानें फार स्थूल असतात व काहीं अगदीं लहान असतात. या जातीतील कोंबड्या अंडीं घालण्याच्या कामीं चांगल्या ठरले जरी सर्वसाधारण मानानें ठरलें आहे तरी सुद्धा त्यामध्यें कधीं कधीं अपवाद दिसून येतात. तसेंच ज्या जातींची अंडीं घालण्याबद्दल मुळींच प्रसिद्धि नाहीं त्या जातींतील कोंबड्या अंडीं पुष्कळ घालतात असें आढळून येतें. परंतु साधारण मानानें विचार केल्यास असें दिसून येईल कीं अस्सल व शुद्ध जातीच्या कोंबड्या सहसा आपल्या जातीच्या ठरलेल्या गुणावगुणास अपवाद होत नाहीत, असो. वर जे एकंदर निरनिराळे वर्ग सांगितले आहेत त्या सर्वांचा एकसमयावच्छेदें विचार केला तर काहीं जाती अशा आहेत कीं त्या वरील सर्व वर्गांत येतात असें दिसून येईल उदाहरणार्थ, लँगशन, ऑर्पिंग्टन, ब्रह्मा, चितागाँग, प्लायमौथ रॉक, वायंडाट वगैरे जाती थोड्या थोड्या प्रमाणात सर्व हेतु साध्य करतात व म्हणून कोणाहि साधारण मनुष्यास निवड करणें झाल्यास त्यानें वरील पैकीं कोणतीहि एखादी निवडावी

हिंदुस्थानांतील काहीं जाती.—हिंदुस्थानात ज्या जातींचा प्रसार विशेषेकरून झालेला आहे, त्यापैकीं लँगशॉन व हँबर्ग यांच्या एवढ्या आहेत. ऑर्पिंग्टन् ही जात अंडीं घालण्याच्या कामीं चांगली असल्यामुळें ती पुष्कळ पारशी व यूरोपिअन लोक घरच्या उपयोगाकरिता म्हणून पाळतात. तसेंच काहीं शौकी लोक लढण्यांत कोंबडे हौसेनें पाळतात. चितागाग व गेम ह्या त्या जाती होत बंगालमध्यें कोंबड्यांची जी एक विशिष्ट जात दृष्टीस पडते ती आकारानें वायंडाट व प्लायमौथरॉक यासारखी असते परंतु ती जराशी लहान असते व निरनिराळ्या रंगाचा असते. या कोंबड्या व चितागाँग कोंबड्या यांचा संयोग केला असता होणारी प्रजा फार चांगली, मोठी व नाजूक अशी निपजते.

हिंदुस्थानच्या पश्चिम भागात म्हणजे कोंकण, मुंबई वगैरे कडे साधारणपणें पावसाचें मान जास्त असल्यामुळें सर्व जातींची पैदास होणें शक्य नाहीं अर्थातच बंगालच्या हवा मानाप टिकणारी जात कदाचित् मुंबई व कोंकणात टिकण्याचाहि संभव आहे परंतु ह्याच प्रकारात अशी जी एकच जात दृष्टीस पडते ती वसरा ही होय. या जातीच्या कोंबड्या अंडीं पुष्कळ घालतात, ती आकारानें मोठी असून त्याचा रंग तपकिरी फिकट असतो व वजन सुमारें चार ते सहा तोळे पर्यंत असतें. कोणतीहि अंडीं चार तोळ्यापेक्षा वजनात कमी भरत असतील तर ती चांगली नाहींत असें समजावें. वसरा जातीच्या कोंबड्या अंगानें स्थूल असल्यामुळें त्यांना विशेष प्रकारचें खाणें दिल्यास ती लठ्ठ होतात व त्यास किंमतहि बरी येते.

कोंबड्यांच्या साधारणपणें बऱ्याच जाती असतांना हिंदुस्थानातील लोक त्यापैकीं निदान काहीं जाती तरी पूर्ण काळजी घेऊन वाढवीत नाहींत; याचें कारण एक तर असें कीं, उच्च व अस्सल जाती येथें सर्वसाधारण लोकांच्या आटोक्याबाहेरच्या असते व दुसरें कारण म्हणजे चांगली व सशास्त्र पद्धतीनें कोंबड्यांची पैदास कशी करावी याबद्दल कोंबड्या पाळणाऱ्या लोकांचें अज्ञान हें होय. स्वाभाविकपणें हलक्या किंमतीची कोंबडीं विकत घेण्याकडे त्याची प्रवृत्ति दिसून येते आणि दोहोंकडून तरी थोडीशीं अंडीं व पिलें विकावयास मिळालीं म्हणजे तेवढ्यात समाधान मानतात. परंतु त्यांनीं जर खालीं सांगितल्याप्रमाणें थोडेसे श्रम घेतले तर त्यास अस्सल जात सहज तयार करता येईल. व त्या मानानें त्यास अर्थातच किंमत जास्त मिळेल ती पद्धत अशी —उत्तम जातीचा व अस्सल बीजाचा कोंबडा व त्याच जातीच्या काहीं कोंबड्या व इतर जातीच्या फक्त कोंबड्याच पाळाव्यात. अस्सल जातीपासून मिळणारी अंडीं अर्थातच अस्सल असणार त्यापासून पाहिजे तर जास्त उत्पत्ति करावी इतर कोंबड्यापासून निघणारी अंडीं विकून टाकावीत अगर पिलावळीस उबविण्यास ठेवावीत. मात्र पिलें साधारण मोठीं झालीं म्हणजे लगेच विकून टाकावीत. कारण त्या पिलांपैकीं एखादा कोंबडा असल्यास तो वाढू दिल्यास कदाचित् भेसळ होण्याचा संभव आहे. असें केल्यानें उत्तम जात कायम राखली जाईल

आपण जर खेडोपाडीं हिंडून अस्सल जातीच्या कोंबड्या कोणाजवळ आहेत कीं काय याचा तपास करूं लागलों तर आपली अगदीं निराशा होते व जिकडे तिकडे गावठी लहान व खुज्या कोंबड्या दृष्टीस पडतात जास्त वजनाच्या कोंबड्यांस जास्त किंमत येते, तसेंच मोठ्या अंड्यास जास्त किंमत येते, या गोष्टी शेतकरी लोकांस माहीत असताहि अंडीं किंवा कोंबड्या कशा सुधारतां येतील या गोष्टीकडे त्यांचें मुळींच लक्ष जात नाहीं तरी खालील पद्धत अमलात आणल्यास कोंबड्यांची अवलाद सुधारून शेतकरी लोकांचाहि फायदा होईल: गावठी कोंबड्यांचा चितागाग, लँगशन, आरपिंग्टन, वयडाट किंवा ब्रम्हा या कोंबड्यांशीं संयोग केल्यास होणाऱ्या प्रजेंत पुष्कळच सुधारणा होते. या गावठी कोंबड्यांपैकीं दहा बारा उत्तम कोंबड्या [illegible]

त्याच्या कळपात वर निर्दिष्ट केलेल्या जातींपैकी कोणत्याहि जातीचे दोन कोंबडे सोडावेत. या कोंबड्यापासून जी प्रजा होईल त्या प्रजेपैकी कोंबडे तेवढे विकून टाकावेत. त्याचप्रमाणें बाकीची पिलें मोठीं झालीं म्हणजे पहिल्या कोंबड्याहि विकून टाकाव्यात. म्हणजे नवीन झालेलीं पिलें व कोंबडे शिल्लक रहातील हीं पिलें पुढें वयात आल्यावर त्याचा पुन्हा त्या कोंबड्याशीं संयोग होईल व त्याच्या अंड्यापासून होणाऱ्या पिलामध्यें बापाचे बरेच गुण उतरतील अशा रीतीनें वरचेवर संयोग करून कोंबड्याचे पूर्ण गुण कोंबडींत येईपर्यंत ही क्रिया चालू ठेवावी. म्हणजे अखेरीस सर्व प्रजा अस्सल जातीच्या वळणा-वर जाईल कोंबड्याचे संयोग दाखविणारें कोष्टक पुढें दिलें आहे:—

संयोगनंबर १:—

अस्सल कोंबडा × गांवठी कोंबडी
मिश्रकोंबडे (विकावे) मिश्रकोंबड्या

संयोगनंबर २:—

अस्सल कोंबडा × मिश्रकोंबड्या
मिश्रकोंबडे (विकावे.) मिश्रकोंबड्या.

संयोगनंबर ३.—

अस्सल कोंबडा × मिश्रकोंबड्या.
मिश्रकोंबडे मिश्रकोंबड्या

संयोगनंबर ४.—

अस्सल कोंबडे × मिश्रकोंबड्या
मिश्रकोंबडे मिश्रकोंबड्या

संयोगनंबर ५.—

अस्सल कोंबडा × मिश्रकोंबड्या
मिश्रकोंबडे मिश्रकोंबड्या.

याप्रमाणें संयोग केल्यावर निघणारी प्रजा मोठी व वजनानें भारी व अंडीं घालण्यात उत्तम निघेल हें सांगणें नको. इतर पाळींव पक्ष्याच्या धंद्याचें महत्व इतर राष्ट्रांतील लोकाना पुष्कळ काहीं वर्षांपासून कळूं लागलें आहे इंग्लंड, फ्रान्स, स्कॉटलंड, आयर्लंड, कानडा, ऑस्ट्रेलिया, जर्मनी, बेल्जम, डेन्मार्क, स्वीडन, साउथ आफ्रिका वगैरे राष्ट्रामध्यें हा धंदा मोठ्या प्रमाणात करण्यात येऊन तिकडे दरसंवर्षी दर वर्षी प्रदर्शनेंहि भरतात या प्रदर्शनात उत्तम व अस्सल जातीच्या कोंबड्याना तसेंच उत्तम अंड्याना पदक वगैरे काहीं तरी बक्षीस मिळतें. अशा तऱ्हेचीं प्रदर्शनें तिकडे वारंवार भरत असल्यामुळें कित्येक हौशी व श्रीमंत लोक पुष्कळ द्रव्य खर्च करून अस्सल जातींचे संगोपन करतात. इंग्लंडमध्यें सर्व श्रीमंत लोक, तसेंच लॉर्ड लोक यानीं सुंदर व दिखाऊ जाती बाळगिल्या आहेत. एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष राजे साहेबानीहि कोंबड्या बाळगल्या आहेत यावरून तिकडे लोकाना या धंद्याची किती गोडी लागली आहे तें सहज कळून येतें

यूरोपखंडातील बहुतेक लोक मांसाहारी असल्यामुळें या धंद्यास जास्त जोर आलेला असावा. मालाचा नेहमीं खप होत असल्यानें जितका माल अधिक उत्तम तितकी त्यास मागणी अधिक आणि अर्थातच किंमत अधिक. ही गोष्ट लक्षात आल्यामुळें लोकाचें मन या धंद्याकडे वळणें साहजीकच आहे एकट्या ग्रेटब्रिटनमध्यें दरसाल १५ कोटी रुपयाचा सदर माल खपतो. फ्रान्समधील एका प्रधानानें या धंद्यापासून देशात एकंदर किती पैसा उत्पन्न होतो याचा अंदाज केला तेव्हा तो १,३४,११,००० पौंडपर्यंत झाला असें आढळून आलें. यावरून हे धंदे तिकडे मोठ्या प्रमाणावर चालतात असें दिसून येतें

हिंदुस्थानातील लोकात या धंद्याचा प्रसार हळू हळू होऊं लागला आहे तो विशेषेकरून आंग्लोइंडियन व रेल्वेकामगार यामध्यें दिसून येतो शेतकरीवर्ग म्हणजे ज्याच्या ताब्यात हा धंदा सदोदीत राहिला पाहिजे, त्या वर्गांत या धंद्याचा प्रसार मुळींच झालेला नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें याचीं मुख्य कारणें म्हटलीं म्हणजे —(१) अस्सल जातींचा अभाव, (२) भांडवलाचा अभाव व (३) हें धंदा कसा करावा याविषयीं अज्ञान.

हिंदुस्थानात अस्सल जाती फक्त तीन किंवा चार सापडतील (१) चितागाग (२) असील (३) बसरा व (४) गेम. याखेरीज पुष्कळ निरनिराळ्या रंगाच्या व आकाराच्या गांवठी कोंबड्या आढळून येतात व त्यास सर्वसाधारण 'मुरगी" हें नाव आहे. या जातींहि निकटसंबंधोत्पत्ती (इन्ब्रीडिंग) मुळें पुष्कळ ऱ्हास पावल्या आहेत याखेरीज दुसऱ्या जाती आणावयाच्या म्हणजे परदेशातून आणल्याखेरीज गत्यंतर नस्त. व परदेशातून कोंबडी आणण्यापासून कोंबडी बाळगणाराना विशेषसा फायदा होत नाहीं, एवढेंच नव्हे तर कधीं कधीं नुकसान होतें कारण परदेशातून कोंबड्या आणवल्या असता प्रवासातच त्यातील कित्येक मरतात व ज्या थोड्याशा जगून इकडे येतात त्यास देथील हवामान मानवल्यामुळें काहीं दिवसानीं त्याचाहि अंत होतो किंमत जास्त यामुळें परदेशातून कोंबड्या आणण्याचें धाडस कोणी सहसा करीत नाहीं. बरें इतक्या दूर ठिकाणाहून अंडी आणावयाची म्हटलें तरी तेंहि तितकें सुकर नाहीं कारण एक तर इतक्या लाबून आणलेल्या अंड्यातील गर्भाचे घराच त्रास पोंचून

त्यामुळें तो तयार होत नाहीं व बहुतेक अंडीं फुकट जातात. अशा स्थितींत हा धंदा ऊर्जितावस्थेस कसा आणावा हा एक प्रश्न आहे परंतु स्वत सरकारनें अगर आमचेकडील मोठमोठ्या व श्रीमंत लोकानीं मनावर घेतल्यास हा प्रश्न सुटण्याजोगा आहे सरकार शेतकीखातें काढून निरनिराळ्या विकासंबंधीं प्रयोग करून ज्याप्रमाणें लोकावर उपकार करीत आहे, त्याचप्रमाणें शेतकीखात्यातर्फेच ठिकठिकाणीं कोंबड्याच्या पैदासेच्या शाळा ठेवून त्या ठिकाणीं निरनिराळ्या जातींच्या कोंबड्याचा संयोग करून उत्तम व हिंदुस्थानातील हवेस योग्य अशी अवलाद तयार करणें, ती स्वस्त दरानें विकून तिचा प्रसार होता होईतों चहूंकडे करणें, खेडेगावांतील कोंबडीं सुधारण्याकडे लोकाचें लक्ष लावणें, सहकारी तत्वावर कोंबड्याचा धंदा काढून त्याच तत्वावर त्याचा क्रयविक्रय करणें वगैरे गोष्टींस लागणार भाडवल सरकार जितकें सर्व करूं शकेल तितकें इतर लोकाच्या हातून होणें शक्य नाहीं काहीं तरी नियम करून खेडेगावातील लोकांस गावठी कोंबडे पाळण्याची मनाई केली व त्याऐवजीं ८।१० महिन्याचे चितागाग ऑरपिंग्टन, किंवा लँगशन जातीचे कोंबडे आणून सरकार मालक या नात्यानें त्या कोंबड्याची अवाबदारी गावकऱ्यावर घातल्यास कोंबडीं सुधारण्यास फारसे दिवस लागणार नाहींत. एकदा अस्सल जात तयार झाल्यावर त्यापासून होणारी प्रजा मोठी, बळकट व अंडीं घालण्याचे कामीं उत्तम होईल आणि पूर्वींच्या गावठी कोंबड्यापेक्षा किंमतहि दुप्पट येईल तात्पर्य, खर्च फार न येता थोडासा वेळ खर्च करून चिकाटी दाखविल्यास हें काम सहज होण्याजोगें आहे. चितागाग जातीचे ५० लहान लहान कोंबडे विकत घेतल्यास त्याना १५० रुपयाहून अधिक किंमत पडणार नाहीं व खेडेगावाचे मानानें हा खर्चहि काहीं फार होणार नाहीं सरकारनें आपण भाडवल पुरवून सदर कोंबडे आणून दिल्यास व पुढें आपल्यातर्फे एक माणूस ठेवून त्याजकडून गावांतील सर्व गावठी कोंबडे व मिश्र कोंबडे नाहींसे करण्याचें ठरविल्यास त्या गावात या धंद्याच्या बाबतींत मोठी क्रांति घडून येईल. तात्पर्य, भाडवल व ज्ञानाच्या अभावीं दिसणारी उणीव सरकारनें भरून काढली म्हणजे या धंद्याचा प्रसार होण्यास मुळींच विलंब लागणार नाहीं. पुष्कळ वेळा असें आढळून येतें कीं, अस्सल व कमअस्सल जात याच्या संयोगापासून होणारी प्रजा कणखर, जोमदार व काटक निघते उदाहरणार्थ, घोडा व गाढव याच्या संयोगापासून खेचर तयार होतें. यात गाढवाच्या काटकपणाचे गुण येऊन घोड्याच्या शरीरासारखा बांधा होतो. त्यामुळें याचा घोड्यासारखा बसण्यास व गाढवासारखा ओझें वहाण्यास असा दोन्ही कामाकडे उपयोग होतो. अशाच प्रकारचे कोंबड्याच्या काहीं जातींचे संयोग केल्यास त्याजपासून निघणारी प्रजा जास्त देखणी, काटक व पुष्कळ अंडीं देणारी अशी निघते. परंतु हे संयोग करण्यापूर्वी खालील गोष्टी लक्षात ठेविल्या पाहिजेत —

(१) दोन जातींचें मिश्रण करावयाचें असल्यास होता होईतों कोंबडा व कोंबडी एकाच रंगाचीं, निदान जवळ जवळ त्याच रगाची असावीत (२) लाब पायाच्या कोंबड्याचा आखूड पायाच्या कोंबडीबरोबर व आखूड पायाच्या कोंबड्याचा लाब पायाच्या कोंबडीबरोबर संयोग करावा ( ३ ) संयोगाकरिता निवडावयाचीं कोंबडीं सशक्त असावींत. येणप्रमाणें नर व मादी निवडल्यानंतर खालीं दिलेल्या कोणत्याहि दोन जातींचा संयोग करावा (१) मद्रास अगर कोचीन कोंबड्या व गेम किंवा चितागाग कोंबडे यापासून पिलें लठ्ठ होऊन त्याचें मास खाण्यास रुचकर लागतें (२) लँगशन, प्लायमौथरॉक, वायंडाट किंवा ऑरपिंग्टन कोंबडे याचा गेम किंवा चितागाग कोंबड्याशीं संयोग केल्यास पिलें मोठीं व विकण्यास योग्य अशीं होतात (३) काळी मद्रास कोंबडी व काळा आरपिंग्टन अगर काळा लँगशन किंवा प्लायमौथरॉक कोंबडे याच्या संयोगानें प्रजा अंडीं घालणारी व खाण्यास योग्य होते ( ४ ) फिक्कट रंगाची मद्रास कोंबडी व पाढरा वायंडाट अगर पाढरा लँगशन अगर पाढरा प्लायमौथ रॉक अथवा पाढरा ऑरपिंग्टन यापासून उत्तम अंडीं घालणारी प्रजा तयार होते. ( ५ ) करड्या रंगाची कोचीन कोंबडी व करडा किंवा पाढरा ऑरपिंग्टन अगर पाढरा वायंडाट किंवा लँगशन अगर प्लायमौथ रॉक याच्यापासूनची प्रजा कोचीन कोंबडीपेक्षा अधिक अंडीं घालते व खाण्यास लायक होते ( ६ ) करडी किंवा पाढरी लँगशन कोंबडी व पाढरा ऑरपिंग्टन किंवा पाढरा प्लायमौथरॉक अगर पाढरा वायंडाट याची प्रजा अंडीं घालणारी व खाण्यास लायक अशी होते ( ७ ) काळी लँगशन कोंबडी व काळा ऑरपिंग्टन किंवा काळा मिनोर्का अथवा काळा वायंडाट यांचीं पिलें व ( ८ ) इंडियन गेम आणि चितागाँग कोंबडीचा लँगशन ऑरपिंग्टन, मद्रास किंवा कोचीन या कोंबड्याशीं संयोग केल्यास त्याचीं पिलें खाण्यास योग्य व अंडीं घालणारी होतात.

कि ती जा ती पा ळा व्या.—बऱ्याच लोकांना निरनिराळ्या प्रकारच्या जाती आपणाजवळ असाव्या असें वाटत असतें, परंतु त्या कायम राखण्याकडे व निर्भेळ ठेविण्याकडे त्यांचें लक्ष नसतें, याचा परिणाम अर्थातच वाईट होतो. निरनिराळ्या जातींच्या कोंबड्या व कोंबडे एके ठिकाणीं मिसळल्यानें त्यापासून मिश्र जाती उत्पन्न होतात व एकदा भेसळ झाली म्हणजे मूळ जातींत असलेले गुण हळूहळू कमी होऊं लागतात निरनिराळ्या जाती पाळावयाच्या झाल्यास त्याचा परस्परांशीं कोणत्याहि प्रकारें संबंध न येईल अशा रीतीनें त्या ठेविल्या पाहिजेत. ही खबरदारी घेणें शक्य नसेल तर पुष्कळ जाती ठेवून सर्वच बिघडविण्यापेक्षां एकच जात उत्तमशी निवडून ठेवणें फार

चागलें. अशा जातीच्या पंचवीस ते चाळीस कोंबड्या विकत घेऊन पाच सहा कोंबडे त्याच जातीचे त्यांत मिसळावे. कोंबड्यांकरिता एकच घर बांधलेलें असल्यास ही सर्व कोंबडी एकाच घरात ठेवावी लागतील. परंतु असें करण्यांत एक मोठी अडचण येते ती ही की, कोंबड्या कोंबड्यांचे भांडण होण्याचा नेहमीं संभव असतो, म्हणून त्या सर्वांना एकाच ठिकाणीं ठेवण्यापेक्षा पाच सहा कोंबड्या व एक कोंबडा याचा एक कळप याप्रमाण निरनिराळे कळप करून ठेवावे व आपला सर्व वेळ, पैसा व श्रम वगैरे सर्व करून जी काय सुधारणा करावीशी वाटत असेल ती या जातींत घडवून आणावी, म्हणजे श्रमाचें व पैशाचें चीज होऊन फायदाहि बराच राहील सर्व जातीच्या कोंबड्या बाळगून त्याची जात कायम ठेवणें हें फार कठिण काम आहे. कारण हें करण्यास पुष्कळ पैसा, हिंमत, शहाणपण व श्रम खर्च करावे लागतात व इतका खर्च करणें एका व्यक्तीच्या आटोक्याबाहेरचें असतें. जर एखाद्या मनुष्याची सर्व जातींच्या कोंबड्या बाळगण्याची इच्छा असेल तर त्यानें प्रत्येक खेपेस एक एक जात घेऊन तिचा पूर्ण अभ्यास केल्यावर त्या जातीत ज्या काहीं सुधारणा करणें शक्य असेल त्या केल्यानंतर मग दुसरी जात घ्यावी येणेंप्रमाणे ज्यास जितक्या जाती बाळगावयाच्या असतील तितक्या त्यानें बाळगाव्या कोणत्याहि जातीचें सवर्धन करण्यात यश येणें किंवा न येणें हें त्या जातीसंबंधीं जें ज्ञान असेल त्याजवर अवलंबून असतें निरनिराळ्या जातींची राहणी व जीवनक्रम हीं अगदीं भिन्न भिन्न असतात जी गोष्ट एका जातीस अपायकारक होईल तीच दुसरीस हितकारक असूं शकेल. त्याचप्रमाणें निरनिराळ्या जातींस खाणें निरनिराळ्या प्रकारचें द्यावें लागेल उदाहरणार्थ काहीं कोंबड्या जात्याच फार चपळ असतात व त्यांना मेहनतीची व व्यायामाची आवश्यकता असते त्या लवकर स्थूल होत नाहींत व त्यांना मांसवर्धक खाणेंहि फार लागतें परंतु त्याच्या अगदीं उलट दुसऱ्या कोंबड्यांचा जीवनक्रम असतो. उदाहरणार्थ, कोचीन कोंबड्या या फार स्थूलदेही असून त्यास व्यायाम फारसा नको असतो. यास उष्णताजनक अन्न फारसें लागत नाहीं, परंतु मांसवर्धक अन्न फार लागतें तात्पर्य या गोष्टी अनुभवावाचून कळत नाहींत पुस्तकें वाचून अर्थातच काहीं थोडीशी मदत होते परंतु विशेषतः स्वतःस मिळालेल्या अनुभवावर जितकें यश संपादन करता येईल तितकें तें दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीपासून साध्य होणें शक्य नाहीं

आतांपर्यंत जें विवेचन केलें त्यावरून ( १ ) निव्वळ जाती बाळगणें व ( २ ) जाती बाळगून त्यात काहीं विशिष्ट सुधारणा करणें या दोन हेतूंपैकीं कोणता तरी एक हेतु मनात धरून कोंबड्या बाळगणारे लोक जाती बाळगतात हें उघड आहे. पैकीं दुसरा हेतु मनात धरून जे लोक जाती बाळगणार असतील त्यांनीं प्रथमतः त्याच्यांत काय सुधारणा करावयास पाहिजेत व त्या कोणत्या तऱ्हेनें करतां येतील याचा पूर्ण विचार करून व तें ध्येय सदैव डोळ्यापुढें ठेवून त्या दृष्टीनें आपली खटपट चालू ठेवली पाहिजे एकच जात पाळल्यानें काय काय फायदे होतात तें वर सांगितलेंच आहे. परंतु या फायद्याखेरीज आणखीसुद्धा काहीं फायदे एकच जात बाळगल्यानें होतात पहिला फायदा म्हणजे कोंबडे विकत घेण्यात बचत एकच जात असल्यास त्या त्या जातीचे एकदोन कोंबडे विकत घेतले तरी पुरतात. परंतु चारपाच जाती ठेवल्यास प्रत्येक जात शुद्ध राखण्याकरिता म्हणून प्रत्येक जातीचे काहीं कोंबडे विकत घ्यावे लागतील. अर्थात त्या मानानें खर्च जास्त पडेल. दुसरा महत्त्वाचा फायदा म्हणजे त्याच्याजवळ नेहमीं अस्सल जात राहिल्यानें त्यास पुष्कळ गिऱ्हाईक मिळतें. पुष्कळ जाती बाळगणाऱ्या मनुष्याकडे तितकें गिऱ्हाईक जास्त नाहीं, कारण तेथें कदाचित भेसळ असेल अशी गिऱ्हाइकास शंका येते. तशी स्थिति एकच जात बाळगणाऱ्या मनुष्याची होत नाहीं. शिवाय प्रदर्शनामध्यें त्याच नाव होऊन त्यास बक्षीस मिळतें, व हें एक त्याचें नाव वाढविण्यास कारण होतें. असो; येथपर्यंत साधारणपणें जातींची निवड कशी करावी, निरनिराळे हेतु साध्य होण्यास कोणत्या जाती योग्य आहेत, मिश्र संयोगापासून फायदे, उत्तम मिश्रसंयोग कोणते, व जाती किती बाळगाव्या यासंबंधी विवेचन केलें आता साधारण शेतकरी वर्गास बाळगण्यास फायदेशीर अशा जाती किती, त्यांची शरीर रचना कशी व इतर गुणधर्म याविषयीं थोडक्यात विचार करू

(१) म ही.—ही जात उच्च जातीपैकीं असून प्रत्येक कुटुंबानें बाळगण्यास योग्य आहे. ही स्थूलदेही असून काटक असते. यांचीं अंडीं मोठीं व सतेज असतात अंडीं घालण्याच्या कामीं ही जात चांगली असून त्याची वाढ लवकर व झपाट्यानें होत असल्यामुळें त्यांना लठ्ठ केल्यास त्यांची किंमतहि चांगली येते या जातीच्या कोंबड्या अगदीं शांत स्वभावाच्या आणि माणसाळलेल्या असतात, या स्थूलदेही असल्यामुळें यांना फार उंच उडता येत नाहीं. चरण्याला थोडें आवार असलें तरी चालतें अंडीं उबविण्याच्या कामीं व पुढें पिलांचा सांभाळ करण्याच्या कामीं या फार योग्य आहेत. यांचें वजन जात्याच जास्त असल्यामुळें त्यांच्या भारानें कधीं कधीं अंडें फुटण्याचा संभव असतो या जातीचे काहीं कोंबडे फारच जलद वाढतात व वजनात ७ ते १४ पौंड पर्यंत भरतात यांच्या पायावर कोचीन कोंबड्याप्रमाणें पिसें असतात यांचा पिसारा फार मऊ असून फार तुकतुकीत असतो त्यामुळें ती फार सुंदर दिसतात यांच्यात त्यांच्या रंगावरून आणखी उपजाती झालेल्या आहेत.

शरीरवर्णन.—यांचें डोकें लहान व सरळ असून त्यावर मखमाली शिंगोरी (शेंडी) असते. छाती रुंद व पुढें आलेली असते शेपटाचीं पिसें सरळ असून पल्यासारखीं पसरलेलीं असतात चोंच बळकट व पिंवळी किंवा काळी असते. मानेवरील पिसें पुष्कळ असून मानेवर लोळत असतात. कोंबडीच्या माडीवरील व पाठीवरील पिसें पुष्कळ असून पाय आखूड व पिंवळ्या रंगाचे असतात व त्यास मधल्या नखीपर्यंत पिसें असतात. पायावर पिसें असणाऱ्या कोंबड्याना ओलसर जागेत ठेवल्यास थंडीची बाधा होते.

या जातीच्या काळ्या रंगाची, भुरकट रंगाची व ह्या पांढुरक्या रंगाची अशा तीन उपजाती आहेत. या जातीची मूळची उत्पत्ति हिंदुस्थानातील असून पुढें तिचा प्रसार अमेरिका व इंग्लंड या देशात झाला असावा असें कांहीं लोकाचें मत आहे

अमेरिकेतील ब्रह्मी कोंबड्या इंग्लंडमधील ब्रह्मी कोंबड्या पेक्षा अंडीं अधिक घालतात या जातीचा उत्पत्ति मलाया व कोचीन कोंबड्यापासून झाली असावी. कारण हींत दोनही जातींचे गुणधर्म दिसून येतात याना किंमत फारच पडते. कधीं कधीं दोन कोंबड्या व एक कोंबडा यांस २५।३० रुपये पडतात.

(२) कोचीन कोंबड्या—याचा स्वभाव बहुतेक ब्रह्मी कोंबड्यासारखा असतो यांहि शरीरानें अवजड असून त्यांच्याचप्रमाणें लवकर माणसाळणाऱ्या व पिलाचा सांभाळ करणाऱ्या असतात. यांचीं पिलें काटक असून त्यांचें संगोपन करणें फारसें कठिण नसतें. याना इतर पिलापासून निराळें ठेवल्यास याची वाढ झपाट्यानें होते यांचीं पिलें वाढविण्यास सोईचीं असतात परंतु त्यांचें मांस रुचकर नसतें तें फार लवकर जून होतें याना गेम किंवा विलायती कोंबड्याशीं संयोग केला असता त्याची अंडीं घालण्याची शक्ति वाढते.याची शेंडी लहान असून तिला एकच आरी असते डोळे काळे, पिंवळे किंवा तांबडे असतात. मानेवरील पिसें लांब व पुष्कळ असून छाती रुंद व खोल आणि शेपूट लहान, खालीं वाकलेलें, पाय आखूड व त्यावर पिसें असतात

इंग्लंडमध्यें रंग व आकार या दोन बाबतींत या जातीची पूर्ण सुधारणा झाली आहे पण ह्या सुधारणा करण्यात त्याच्या अंगचे अंडीं घालण्याचे व नाजुक मांस असण्याचे मूळ गुण नाहींसे झाले आहेत. कोचीन जातीच्या पाच उपजाती आहेत (१) पार्ट्रिज (२) कफू,(३) पांढुरर्ण,(४) पांढरी, (५) काळी या होत.

पार्ट्रिज —यांच्या शरीराचा खालचा भाग, मांड्या आणि शेपट्या काळ्या रंगाच्या असतात, आयाळ सोनेरी रंगाची असून प्रत्येक पिसाच्या मध्यभागीं एक काळी रेषा असते. मादीची आयाळ गडद पिंवळ्या रंगाची असते.

कफू.—या जातीचा पिच्छकलाप किंचित् नीळसर रंगाचा असतो व त्यावर काळसर रंगाच्या रेषा असतात.

मफू:—या जातीचा रंग दालचिनीच्या रंगासारखा व कधीं कधीं गडद पिंवळा असतो. दुसऱ्या दोन उपजाती त्याच्या नावाप्रमाणें अगदीं शुभ्र किंवा अगदीं काळ्या असतात या जातींची मूळ उत्पत्ति चीन देशांतील आहे परंतु अलीकडे इंग्लंड, अमेरिका येथें यांचें संवर्धन फारच मोठ्या प्रमाणावर केलें गेलें. दोन कोंबड्या व एक कोंबडा यास सरासरीनें पंचवीस तीस रुपये किंमत पडते

(३) लँगशॅन —ही जात देखणी असून फार उपयोगी आहे ही उत्तम व पुष्कळ अंडीं घालणारी असल्यानें व त्याचप्रमाणें या जातीचें मांसहि खाण्यास अत्यंत रुचकर असल्यानें ही बाळगल्यानें हौसेच्या हौस भागून शिवाय दुहेरी फायदा होतो अंडीं घालण्याच्या कामात तर हिची बरोबरी करणारी दुसरी कोणतीहि जात सांपडणार नाहीं. यांचीं अंडीं फार सत्वपूर्ण असून काळसर रंगाचीं असतात ही जात हिंदुस्थानात कोरड्या हवेच्या प्रदेशात व कमी पाऊस असणाऱ्या प्रदेशात कोठेंहि बाळगली असता चांगली तयार होते या जातीचे पंख फार लांब असल्यामुळें एके ठिकाणीं स्वस्थ बसणें हीस आवडत नाहीं. आवारात कोंडून ठेविलें असता हीं उंच उडून बाहेर पाडण्याचा प्रयत्न करतात व त्यास पूर्ण स्वतंत्रता भोगूं दिली नाहीं तर तीं चांगलीं वाढत नाहींत यांचें आवार एवढ्याकरिता मोठें ठेवावें लागतें यांचीं पिलेंहि तशींच काटक असतात. त्याना सुद्धा आईबरोबर चरण्यास सोडावें लागतें. अगर अन्य तऱ्हेनें त्यास भरपूर व्यायाम होईल अशी व्यवस्था करावी लागते. या पिलास चांगलें खावयास घातलें असता तीं लवकर च लठ्ठ विक्रीस योग्य अशी होतात याच्या वाढीच्या मानानें त्याच्या अंगावर पिसें येत नाहींत. काळ्या लँगशन जातीचीं पिलें उपजल्याबरोबर फारच चमत्कारिक दिसतात त्याच्या डोक्यावर काळे केस असतात तर त्याची छाती आणि तोंड ही पांढऱ्या, काळ्या आणि इतर मिश्र रंगाच्या केसानीं झाकलेलीं असतात कांहीं पिलाच्या पिसांचें रंग अगदीं गडद असतात. तीन चार महिने झाले म्हणजे हळूहळू

( ४ ) *ला य मो थ रॉ क*.—ही जातहि वरीलप्रमाणेंच उपयोगी आहे कारण ही देखणी असून पुष्कळ अंडी घालण्याच्या व स्वादिष्ट आणि रुचकर मांसाच्या बाबतींत या जातीचा हातखंडा आहे याचाहि स्वभाव वरील जातीप्रमाणेंच शांत व माणसाळणारा असतो यासहि स्वतंत्रता आवडते. याचे चरावयाचें आवार विस्तृत असेल त्या मानानें त्याची वाढ फार झपाट्यानें होते. ही जात काटक आहे ही *मूळ अगदीं शुद्ध जात नसून मॅले व काळी लँगशन याज*पासून झालेली आहे. कारण या जातींत कांहीं पक्ष्याच्या पायावर पिसें असलेली व कांहींची शिगोरी मखमली असलेली अशी कोंबडी अद्यापि सापडतात शरीरवर्णन.—शिगोरी एक आरीची व लहान, छाती रुंद, शेपूट आखूड, पाय *आखूड, बळकट, स्वच्छ व पिवळ्याचे रंगाचे. या* जातीच्या चार उपजाती आहेत त्याः—( १ ) पांढुवर्ण, ( २ ) कबू, ( ३ ) पांढरी व ( ४ ) काळी या होत पैकीं नबर दोन व तीन उपजाती उत्तम समजतात या जातीच्या दोन कोंबड्या व एक कोंबडा याचा किंमत तीस पस्तीस रुपये येत *प्रदर्शनाकरिता तयार केलेल्या कोंबड्यांची किंमत* पन्नास रुपये किंवा जास्तहि पडते या जातींतील नराचें वजन साधारणमानानें आठ दहा पौंड भरतें व मादीचें वजन सहा ते आठ पौंडपर्यंत भरतें या जातीचीं पिलें पीवरीकरणमंजूषेंत घातल्यास चांगलीं तयार होतात

(५) *वा य ण्डा ट*.—ही *जातहि लँगशनप्रमाणें सर्वोपयोगी* आहे, परंतु हिचा वर सांगितलेल्या जातींपेक्षा जरा खालीं नंबर लागेल. याचीं पिलें लहानपणीं फार नाजूक असल्यामुळें त्याचें संगोपन करणें फार कठीण जातें परंतु पुढें मोठेपणीं हीं फार काटक होतात हीं वजनांत इतर कोंबड्यांपेक्षा फार कमी भरतात कोंबड्याचें वजन ७ ते ९ *पौंडपर्यंत व कोंबडी* पाच ते सात पौंडपर्यंत भरतें. शिगोरी गुलाबी रंगाची असून डोक्यास चिकटलेली असते पाय आखूड व पिवळ्या रंगाचे असून त्यावर पिसें नसतात छाती भरींव असते. ही आकारानें प्लायमौथरॉकसारखीच दिसतात या जातींत उपजाती चार आहेत पैकीं दोन फार दिखाऊ आहेत ही जात मूळची अमेरिकन असून तिची उत्पत्ति ब्रह्मी, हँमबर्ग व *इंडियन गेम याच्यापासून झालेली असावी.* कांहीं वायंडॉट कोंबड्यांच्या शिगोऱ्या एक आरीच्या असून त्याच्या पायावर पिसें असल्याचें आढळून येतें परंतु हे गुण नसून दोष असतात हें लक्षात ठेविलें पाहिजे. शास्त्रपद्धतीनें संयोग घडवून आणल्यास हे दोष नाहींसे होतात. या जातीचा कोंबडा व दोन कोंबड्या याची किंमत पचवीस ते पन्नास रुपयेपर्यंत असते.

( ६ ) *हौं ड न*.—ही जात दिखाऊ असून उपयोगी आहे. या कोंबड्या साधारणपणें अंडी बरीं घालतात व याचें मांसहि खाण्यालायक असतें कोरड्या हवेंत व जमिनीवर त्याचें संवर्धन चांगलें होतें. परंतु अतिवृष्टीच्या ठिकाणीं ही जात टिकाव धरीत नाहीं *या जातींच्या माद्या अंडी* उबवीत नाहींत म्हणून त्याचीं अंडीं दुसऱ्या कोंबड्याखालीं उबवण्याकरिता ठेवावीं लागतात याची शिगोरी पानाच्या आकाराची असून ती मध्यभागीं जाड व दोन्ही बाजूस लोंबती असते. चोंच फाळी असते. शेपूट भरलेलें, उंच व सरळ असते तंगड्या बारीक व पांढऱ्या रंगाच्या आणि माडी भरलेली व आखूड असते याच्या पायास स्पष्ट दिसणारें एक पाचवें बोट असतें पिसारा काळा व शुभ्र वर्णाचा असून त्यात हिरव्या रंगाची थोडी झाक मारीत असते

शुद्ध हौंडन जातीचे पक्षी बाळगण धोक्याचें आहे म्हणून ही जात बाळगणेंच असेल तर त्यापैकीं मिश्र पक्षीच *बाळगलेले बरे* याचा कोचीन, लँगशन किंवा ब्रह्मी कोंबड्यांशीं संयोग केला असता होणारी प्रजा काटक व अंडी घालण्यास योग्य होऊन त्याचें मांसहि चवदार असतें ही जात मूळची फ्रेंच आहे या जातीच्या कोंबड्याचें वजन पाच ते सात पौंड व मादीचें ४ ते ५ पौंड भरतें दोन कोंबड्या व *एक कोंबडा याची वीस ते चाळीस रुपयेपर्यंत किंमत असते*

( ७ ) *मॅ ले किं वा चि ता गॉ ग*.—हिचें नांव, तिची मूळ उत्पत्ति मॅले पेनिनसुलामध्यें झाल्यामुळें व नंतर तिचें संवर्धन चितागागमध्यें झाल्यामुळें मॅले किंवा चितागॉंग असें पडलें आहे या जातीचे पक्षी फार धिप्पाड असे *असतात कांहीं कांहीं पक्ष्याची उंची दोन अडीच फूटपर्यंत* सुद्धा भरते ही जात भारी रागीट आहे, त्यामुळें हिचें दुसऱ्या जातीशीं किंवा तिच्या पिलाशीं पटत नाहीं, म्हणून त्यास नेहमीं निराळें ठेवणें भाग पडतें या जातींतील माद्या फारशीं अंडीं घालीत नाहींत परंतु या पक्ष्याचें मांस *रुचकर असल्यामुळें व ही जात जात्या काटक असल्यामुळें* पुष्कळ लोक ही घरच्या उपयोगाकरिता व विक्रीकरिता म्हणून बाळगतात ही जात स्वातंत्र्यप्रिय असल्यामुळें तिला लहानसें आवार पुरत नाहीं *या जातीचीं पिलें लहानपणीं* फार नाजूक असतात, त्याची फार निगा ठेवावी लागते. *पिलाचा स्वभावहि फार भांडखोर असल्यामुळें त्याना इतर* जातीच्या पिलात मिसळल्यास त्याची डोकीं फोडण्यापर्यंत भांडणें होतात या पिलाना सुद्धा नेहमीं मोकळेपणानें रहाणें आवडतें पूर्ण स्वातंत्र्य देऊन भरपूर खाणें दिल्यास हीं पिलें फार झपाट्यानें वाढतात याना मांसल अन्नाची फार आवड आहे व तें त्यास पुष्कळ द्यावें लागतें *कोंबडी* व तिचीं पिलें स्वतंत्र ठेवण्याचें साधन असल्यास कोंबडीस अंडीं उबविण्यास बसविलें तरी चालतें परंतु तशी सोय नसेल तर अंडीं उबविण्याचें काम दुसऱ्या शांत स्वभावाच्या कोंबड्याकडून करून घेतलेलें चांगलें अंडी उबविण्यास योग्य वेळ म्हणजे जूनपासून डिसेंबरपर्यंत असते. या जातीच्या नराचें वजन आठ दहा पौंड भरतें व मादीचें सहा ते आठ पौंड भरतें.

*शरीरवर्णन* —शिगोरी लहान, सरळ व मऊ असून तीवर मांस असतें काहीं कोंबडयांना मराभाली शिगोरी असते डोकें व चोंच लांब असते गलस्तन ( कंठे ) अगदी लहान व माद्यांचे तर अदृश्य असतें डोळे पांढरे किंवा किंचित् पिवट्सर असतात छाती रुंद व खोल असते पृष्ठभाग शेपटीकडे उतरता होत गेलेला असतो शेपूट लहान व भरलेलें असते तंगडया पिवळ्या, सरळ, लांब व भरलेल्या असतात पिसारा दाट व तकतकीत असतो या जातींत रंगास विशेष प्राधान्य नाहीं तथापि सोनेरी रंगाचे पक्षी उत्तम गणले जातात उत्तम अशा दोन कोंबऱ्या व एक कोंबडा यांची किंमत दहा पंधरा रुपयेपर्यंत असते

अॅ सि ल कि वा हि ंदु स्था नी कों ब डें —अॅसिल म्हणजे अस्सल व अॅसिलपक्षी म्हणजे शुद्ध व अस्सल 'गेम' जातीचे पक्षी होत या जातींतील कोंबडे विशेषेंकरून लढण्यासंबंधी प्रसिद्ध आहेत मोठमोठे श्रीमंत व शोकी लोक हौसेनें हे कोंबडे बाळगतात आपल्याकडे पूर्वीचे राजेरजवाडे झुंजणारे कोंबडे बाळगीत असल्याचीं पुष्कळ उदाहरणें सांपडतात दशकुमार चरितांत कोंबडेझुंज वर्णिलेली आहे या जातींतील माद्यांची अंडीं घालण्यासंबंधीं फारशी प्रसिद्धि नाहीं, परंतु या जातींतील कोंबडयाचें मांस फारच रुचकर असतें यामुळें याचा खाण्याकडे पुष्कळ उपयोग करितात चितागाँग जातीप्रमाणें हे पक्षीहि धिप्पाड व उंच असतात यांच्या पिलांना सुद्धां स्वातंत्र्य आवडतें तीं लहानपणीं फार नाजूक असल्यामुळें त्यांची फार काळजी घ्यावी लागते यास मांसल अन्न मुद्दाम द्यावें लागतें चितागाँग पिलांप्रमाणें यांचीं पिलेंहि कलहप्रिय असतात म्हणून यांना इतर पिलांत मिसळूं न देतां स्वतंत्र ठेवावें लागतें हैदराबाद, म्हैसूर वगैरे ठिकाणीं या जातीचे अस्सल कोंबडे मिळतात हे वजनांत बरेच भरतात नराचें वजन नऊ दहा पौंडपर्यंत व मादीचें वजन सात आठ पौंडपर्यंत भरतें *शरीरवर्णन* —या जातीची शिगोरी लहान आणि मटामली व डोकें लहान, चिंचोळें व लांब असतें भिवया जाड असतात, छाती अतिशय रुंद व कठिण असते, तंगडया थोड्या आखूड असतात शेपटाचा पिसारा लहान व खालीं पडलेला असतो साधारणमानानें चितागाँग व ही जात यांत बरेंच सादृश्य असतें व दोघांचे गुणधर्महि बहुतेक सारखेच असतात हे पक्षी निरनिराळ्या रंगाचे असतात परंतु शुद्ध पांढरा किंवा शुद्ध काळा रंग असलेले पक्षी फार उत्तम दिसतात दुसऱ्या कोणत्याहि जातीचा आकार किंवा शक्ति वाढवाव याची असल्यास या जातींतील कोंबडयाशीं संयोग करावा या पक्षांना मुंबईत " कुलम " असें म्हणतात याचा फार्चीन कोंबडयाशीं संयोग केला असता त्यापासून होणारी प्रजा खाण्यास योग्य अशी होते व त्यास किंमत फार येते या जातीचीं अंडीं जरी थोडीं मिळतात तरी तीं सत्त्वपूर्ण असतात या जातीच्या दोन कोंबडया व एक कोंबडा यांची किंमत तीसपासून शंभर रुपयेपर्यंतहि येते मिश्र जातीच्या कोंबडया इतस्त्रहि पुष्कळ सांपडतात त्या " मुरती " या नांवानें ओळखल्या जातात

*घागू* —ही जात मिश्र असून हिची उत्पत्ति हिंदुस्थानांतच झालेली आहे मले किंवा असील जातीचा कोंबडा व ब्रह्मी किंवा लँगशन जातीची कोंबडी यांच्या संयोगापासून ही जात झाली असावी अलीकडे ही जात फारशी आढळण्यांत येत नाहीं या जातीचें मांस खावयास बरें असतें व अंडींहि साधारण मानानें बरीं मिळतात ही जात काटक असते हिला बंदिवास मुळींच खपत नाहीं अंडीं उबविण्याचें व पिलांचा सांभाळ करण्यास ही जात फार चांगली आहे *शरीरवर्णन* —शिगोरी मटामली अगर एक आरीची व लहान, मान जाड, गळा पिशवीसारखा सैल व लोंबता तंगडया धुरकट पिवळ्या रंगाच्या व लांब असतात हे पक्षी निरनिराळ्या रंगाचे आढळतात उत्तम दोन कोंबडया व एक कोंबडा यांची किंमत दहा पंधरा रुपयेपर्यंत येते

*ऑरपिंग्टन* —ही जात प्लायमौथरॉक, लँगशन व मिनोर्का यांच्या संयोगापासून झालेली आहे या जातीचा विशेष हा कीं, तिजपासून पुष्कळ अंडीं मिळतात एवढेंच नव्हे तर तिचें मांसहि रुचकर व स्वादिष्ट असतें निरनिराळ्या रंगांवरून तिच्या तीन उपजाती केलेल्या आहेत ( १ ) काळी ऑरपिंग्टन ( २ ) करड्या रंगाची ऑरपिंग्टन व ( ३ ) पांढरी ऑरपिंग्टन करडया रंगाची ऑरपिंग्टन जात फार लोकप्रिय झालेली आहे हिची उत्पत्ति करडया रंगाची कोचीन, सोनरी हँबवर्ग व डार्किंग यांच्यापासून झालेली आहे ही जात अंडीं घालण्यांत सरस ठरलेली आहे पांढरी ऑरपिंग्टन ही प्लायमौथरॉक, आणि लेगहॉर्न ( सर्व श्वेतवर्णाची ) यांजपासून झालेली आहे काळी ऑरपिंग्टन ही लँगशन, प्लायमौथरॉक व मिनोर्का यांच्यापासून झालेली आहे या जातीचा आकार साधारणपणें लँगशन जातीसारखाच असतो *ऑरपिंग्टन जात साधारणपणें प्लायमौथरॉक किंवा लँगशन कोंबडीच्या सारखी दिसते.* या जातींतील पक्ष्यांच्या पायावर जरी कोठें कोठें पिसें *असलेलीं आढळतात तरी अस्सल जातीच्या पक्षाच्या पायावर* पिसें दिसत नाहींत या पक्ष्याची छाती रुंद व पाय आखूड असतात शिगोरी एक आरीची किंवा गेंजी दिसून येते पायाचा रंग पांढरा किंवा किंचित् गुलाबी असतो पिसारा पाठीमागें झुकलेला व सरळ असतो या जातीचीं पिलें काटक असून फार जलद वाढतात परंतु त्यांची काळजी घ्यावी लागते *ऑरपिंग्टन व प्लायमौथरॉक या जाती ओळखण्याची* मुख्य खूण म्हणजे ऑरपिंग्टनचे पाय पांढरे व प्लायमौथचे पिवळे असतात तीन कोंबडयांची किंमत पंचवीस ते पन्नास रुपये असते

*सिल्की* —ही जात विशेषेंकरून दिखाऊपणा व मऊ *पिसारा या गुणाबद्दल प्रसिद्ध आहे* फायद्याच्या दृष्टीनें ही

कोंबडी बाळगण्यात काहीं अर्थ नाहीं. अंडीं उबविणें व पुढें पिलाचें संगोपन करणें या कामीं ही कोंबडी फार चांगली असतात. ही जात या काटक असल्यामुळें यांचें संगोपन करणें फारसें कठिण जात नाहीं. या जातीस व तिच्या पिलांना स्वतंत्रता लागते. पिलांना आईबरोबर हिंडूं दिल्यास तीं चांगलीं वाढतात. शिंगोरी गेंजी ( रोझ कोंब ) नीळसर रंगाची व वाटोळी असते. गलस्तन(कल्ले)लाल व नीळसर रंगाचे असतात. पायास नख्या काहींस पांच तर काहींस चार सांपडतात. पांच नख्या असणें उत्तम जातीचें लक्षण नव्हे. पायावर पिसें मुळींच असूं नयेत; किंवा असलींच तर थोडीं असावींत. तीन पक्ष्यास किंमत दहा पासून पंधरा रुपये पर्यंत पडते.

डार्किंग.—ही जात नाजूक असल्यामुळें हिंदुस्थानांत फारकरून आढळत नाहीं. या जातीचीं अंडीं थोडीं असतात. याचें मांस फार रुचकर असतें. याचीं पिलें फार नाजूक असून त्यांचें संगोपन करणें फार कठिण जातें.

शारीरवर्णन.—या जातीची शिंगोरी एक आरीची किंवा गेंजी ( रोझ कोंब ) असून नराची ताठ व मादीची पडलेली व डोकें मोठें असतें. नराचे गलस्तन (कल्ले) मोठे व लोंबणारे व मादीचे तितके मोठे नसून वाटोळे असतात. तंगड्या आखूड, बळकट व नखें आतल्या बाजूस वळलेलीं असतात.

मिनोर्का:—ही जात दिसण्यात लेगहॉर्नसारखी दिसते परंतु नराची शिंगोरी मोठी असून तोंड व चेहरा तांबडा असतो. याच्या पायावर पिसें नसतात. याच्या दोन उपजाती आहेत. एक काळी मिनोर्का व दुसरी पांढरी मिनोर्का. पैकीं दुसरी फार क्वचित आढळते. पहिली जात तिच्या काळ्या तकतकीत पिसाऱ्यामुळें फार शोभिवंत दिसते. या जातीच्या कोंबड्या अंडीं पुष्कळ व फार मोठीं घालितात, परंतु याचें मांस खाण्यास तितकें रुचकर नसतें. याचीं पिलें फार नाजूक असल्यामुळें त्याचें संगोपन करणें फार कठिण जातें. मिनोर्का कोंबडीचा लँगशन कोंबड्याशीं संयोग केल्यास होणारी जात फार काटक होते. दोन कोंबड्या व एक कोंबडा याची किंमत पंचवीसपासून पन्नास रुपयेपर्यंत येते.

लेगहॉर्नः—या जातीचीं कोंबडीं साधारणतः गावठी कोंबड्यासारखींच लहान लहान असतात. अंडीं घालण्याच्या कामीं ही जात फारच प्रख्यात आहे, परंतु तिचें मांस खाण्यास मुळींच लायक नसतें. इंडियन गेम, चितागॉंग अगर लँगशन जातीशींहि हिचा संयोग केल्यास यापासून होणाऱ्या पिलांचें मांस खाण्यास बरें लागतें. निरनिराळ्या रंगाप्रमाणें या जातीच्या पुष्कळ उपजाती आहेत, परंतु त्यांत पांढरी व पिंगट लेगहॉर्न या दोन प्रख्यात आहेत. याचीं अंडीं साधारण मध्यम व पांढरीं असतात. याची शिंगोरी एक आरीची व ताठ उभी असते. आणि तिज वरील दाते सारख्या आकाराचे असतात. मादीची शिंगोरी एका बाजूस पडलेली असते. काहीं कोंबड्यांना गेंजी शिंगोरीहि असते. याचे पाय पिंवळे असतात, तोंड तांबडें असतें. उत्तम नराचें वजन पांच सहा पौंड भरतें व मादीचें तीन पासून चार पौंड पर्यंत भरतें. यापेक्षा सुद्धां कमी वजनाचींच कोंबडीं या जातींत फार आढळतात. उत्तम तीन कोंबड्यांची किंमत पंचवीसपासून पन्नास रुपयेपर्यंत येते. निव्वळ अंड्यांचाच धंदा करणाऱ्यास ही जात बाळगण्यास चांगली.

गिनी कोंबडी.—हीं फार खादाड असून नेहमीं कळप करून रहातात. दिवसाचा बहुतेक वेळ इकडे तिकडे अन्नशोधार्थ घालवून संध्याकाळच्या वेळीं सर्वांनीं एकत्र जमावयाचें असा यांचा-कालक्रम असतो. हे पक्षी उडण्यांत जरी फारसे पटाईत नसतात तरी पळण्यांत फारच चपळ असतात. यांना नेहमीं शांत ठिकाणीं रहाणें आवडतें. अंडीं घालण्याच्या कामीं हे पक्षी चांगले असून त्यांचीं अंडीं सत्वपूर्ण असतात. साधारण कोंबड्यापेक्षां हे अंडीं जास्त घालतात. यांचें मांसहि खाण्यास चांगलें असतें. त्यांच्या माद्या इतर कोंबड्यासारख्या खोलींत जाऊन आपल्या घरट्यांत अंडीं घालीत न हींत, तर त्या आपलीं घरटीं शेताच्या कुंपणांत किंवा अशाच कोठें तरी गुप्त ठिकाणीं करितात व तेथें अंडीं घालतात. मादी अंडीं घालीत असतांना नर तेथें उभा राहून आसपास कोणी येतें कीं काय तें पहात असतो. त्यावरून मादी अंडीं घालीत आहे असें ओळखतां येतें. नर व मादी ओळखावयाची मुख्य खूण म्हणजे नरास एक तुरा असतो व त्याचे गलूल ( कल्ले ) नीळसर तांबड्या रंगाचे असतात. याच्याकरितां घरें करावयाचीं तीं एक मोठें छपर काढून त्याच्या सभोंवतीं तारेचें जाळें लावून बंद करावयाचें व आंत पुष्कळ बांबूंच्या काठ्या, त्यांस बसण्याकरितां मेढी पुरून त्यावर बसवावयाच्या. याचीं पिलें फार नाजूक असल्यामुळें खाण्याच्या व इतर बाबतींत त्यांची थोडी जास्त काळजी घ्यावी लागते. मादी दर खेपेस तीस पासून चाळीस अंडीं घालते. अंडीं उबवणें झाल्यास तीं कोंबड्याखालीं उबविण्यास ठेवणें चांगलें. अंडीं उबून पिलें बाहेर येण्यास सव्वीस दिवस लागतात. पिलें बाहेर आल्यावर त्यांना कोरड्या हवेंत ठेवावें. त्यास पहिल्या आठवड्यांत प्रत्येक तासास खाणें घालावें लागतें. उत्तम खाणें म्हणजे शिजविलेलीं अंडीं, बारीक केलेले कांदे, बाळवी, शिजविलेलें मांस व तांदुळाचें व गव्हाचें पीठ. जसजशीं पिलें मोठीं होत जातील तसतसें त्यास बाहेर फिरूं द्यावें व खाण्याचें मान कमी करावें. पूर्ण वाढ झाल्यावर दिवसांतून दोन वेळ गहूं, तांदूळ वगैरेसारखें धान्य खाण्यास घातलें म्हणजे झालें. बाकी सर्व व्यवस्था इतर कोंबड्याप्रमाणेंच करावी.

गिनी कोंबडीं जात्या क्रूर पण भित्रीं असतात. त्यास इतर कोंबड्यांत मिसळून ठेवल्यास तीं त्यांस त्रास देतात म्हणून

त्यास निराळें ठेवावें. गिनी कोंबडी जरी इतर कोंबड्यापेक्षा मोठी दिसतात तरी त्यांची पिसें काढून टाकल्यावर त्यांचें वजन इतर कोंबड्यापेक्षा जास्त होत नाहीं. गिनी कोंबडी जास्त काटक असल्यामुळें त्यांना सहसा रोग होत नाहींत व झाल्यास उत्तम उपाय म्हणजे त्या मारून टाकणें हा होय. तीं फार भित्री असल्यामुळें त्यास धरावयास गेलें असतां तीं फार तडफड करितात व त्यामुळें त्यांस फार इजा होते. म्हणून आजारी गिनी कोंबड्यांना होता होई तों निराळें ठेवावें व वरी नच झाल्यास शेवटचा उपाय अमलांत आणावा.

टर्की कोंबडीः—यांना वयांत यावयास तीन वर्षें लागतात व त्यांचें वजन चांगली काळजी घेतल्यास तीस ते चाळीस पौंड भरतें. नर तीन वर्षांचा व मादी दोन वर्षांची झाली म्हणजे संयोग होऊं द्यावा. निकटसंबंधोत्पत्ति होणें श्रेयस्कर नाहीं म्हणून होता होईतों ती होऊं देऊं नये. चार माद्यास एक नर याप्रमाणें ही कोंबडी ठेवावीत. मादीला गिनी कोंबड्याप्रमाणेंच आपलीं घरटीं चोरून एकांतांत करण्याची संवय असते; परंतु त्याच्याकरितां पानाचें वगैरे घरटें करून तेथें एखादें कृत्रिम अंडें ठेवल्यास ती तेथें जाऊन आपलीं अंडीं घालते.

टर्की कोंबड्यातील नर जात्या फार क्रूर असतात. ते वेळप्रसंगीं मुलें व मोठीं माणसें यावरहि हल्ला करण्यास भीत नाहींत. सर्वच दुसऱ्या कोंबड्याशीं किंवा टर्की नराशीं झुंज लागल्यास ते मरेपर्यंत मागें हटत नाहींत. त्यांच्या या क्रूर स्वभावाचा परिणाम मादीवर सुद्धा झालेला असतो आणि म्हणून नर आपलीं अंडीं फोडून खाऊन टाकील या भीतीनें ती नरास अमदी कळणार नाहींत अशा रीतीनें अंडीं घालते. अंडीं घालण्याचा प्रसंग आला म्हणजे मादी एक विशेष प्रकारचा आवाज करते. त्यावेळीं मालकानें जपून राहून ती अंडीं कोठें घालते इकडे लक्ष द्यावें. मादी एक दिवसाआड व कधीं कधीं दररोजहि अंडीं घालते व दर खेपेस १५ ते वीसपर्यंत अंडीं घालते. हीं अंडीं त्याच मादीखालीं उबवावयास ठेवल्यास ती त्यांची काळजी घेते. अंड्यावर बसली असतां तिला वरचेवर खाणें लागते व तिला बाहेर सोडावें लागतें. ती स्वतः खाण्याकरितां म्हणून अंडीं सोडून जात नाहीं व खाणें न मिळाल्यास ती उपाशी मरते.हीं अंडीं कोंबड्याखालींहि उबवितात. अंडीं उबून पिलें बाहेर येण्यास २८ दिवस लागतात. पिलें बाहेर आल्यावर कांहीं दिवस त्यांची काळजी घ्यावी लागते. पिलांचें खाणें गिनी कोंबड्याच्या पिलाप्रमाणेंच असावें. आईला मात्र गव्हाचा कोंडा व तांदुळाचें पीठ खावयास घालावें. पिलांना प्रत्येक दोन तासास खाणें घालावें लागतें. यांचीं घरें गिनी कोंबड्याप्रमाणेंच साधीं बांधावीत. त्यास इतर कोंबड्यापासून निराळें ठेवावें. यांच्या जाती आहेत त्याः–( १ ) ब्राँझ टर्की, ही सर्वांत मोठी आहे. ( २ ) पांढरी टर्की, ही लवकर लठ्ठ होते. ( ३ ) करडी टर्की, ही नाजूक असते. ( ४ ) पाढरी टर्की, ही फारच सुंदर व मोठी असते.

टर्की कोंबडी एकदा मोठीं झालीं म्हणजे त्यांना सहसा रोग होत नाहींत.पण झालेच तर इतर कोंबड्यांच्या रोगांवर सांगितलेल्या उपायाचीच योजना करावी.

टर्की कोंबडीं लठ्ठ करणें झाल्यास त्यांना एका स्वतंत्र खोलींत वाळू, चुना, विटांची भुकटी वगैरेंचा पुरवठा करून तींत ठेवावें. त्यास दिवसातून चार वेळ खाणें घालावें व तें मका, सातु, तांदूळ, गहूं वगैरेंपैकीं असावें. बटाटे,कांदे, कोबी वगैरे इतर पदार्थ भरपूर घालावे. त्यास लठ्ठ होण्यास दीड महिना लागतो.

हंस.—हे पक्षी ज्याच्याजवळ पुष्कळ माळ वगैरे चरावयास आहेत त्यास पाळण्यास चांगले. ते जात्या काटक असून आजारी क्वचित पडतात. ते पुष्कळ वर्षें पर्यंत ( कधीं कधीं वीस वर्षेंपर्यंत सुद्धा ) जगतात यांच्या पोटजाती पुष्कळ आहेत. त्यापैकीं टौलौज, एम्डेन आणि आफ्रिकन अशा तीन मुख्य आहेत. इन्डियन किंवा चायना म्हणून जी एक जात आहे ती इकडे पुष्कळ आढळते. ही जात फार ओरडणारी असून त्रासदायक असते. यांना जागा पुष्कळ लागते म्हणून यांचीं घरें नेहमीं मोठीं बांधावींत. बारा फूट लांब व नऊ फूट रुंद एवढ्या जागेंत बारा पक्षी राहूं शकतात म्हणजे प्रत्येकाला नऊ चौरस फूट ( स्केअर ) जागा लागते. यानाहि बदकाप्रमाणें पाण्याच्या टाकीची अवश्यकता आहे. यांचें कळप ठेवावयाचे झाल्यास प्रत्येक नरास तीन माद्या या प्रमाणांत ठेवावे. अंडीं उबविण्याकरितां मादीखालीं ठेवणें चांगलें. कोंबडीखालींहि तीं उबविण्यास ठेविलीं तरी चालतात.अंडीं उबविण्यास मादी बसली म्हणजे तिच्या खाण्याची तजवीज पाहिली पाहिजे. कारण ती सहसा अंड्यावरून उठत नाहीं व वेळेवर खाणें न मिळाल्यास उपाशी राहून मरते. अंडीं २९ व्या दिवशीं फुटून पिलें बाहेर येतात. त्यांना २४ तासपर्यंत खाणें वगैरे देऊं नये. नंतर सातूचें पीठ, गव्हाचें पीठ, तांदुळाचें पीठ, थोडेसें बारीक केलेलें गवत वगैरे दुधांत मिसळून खावयास द्यावें. प्रथमतः वरचेवर खाणें घालावें लागतें. परंतु पुढें हळूहळू तीं हिंडतीं फिरतीं झाल्यावर तें कमी करावें मोठ्या पक्ष्यांना गव्हाचा कोंडा, सातु, भात वगैरे खाणें घालावें. या पाखरांस रोग वगैरे फारसे नाहींत; व ते एकदा झाले म्हणजे बरे करणें शक्य नाहीं.

कों ब ड्या चे रो ग व त्या व र उ पा य —कोंबड्यांना होणाऱ्या रोगांचे मुख्यत्वेंकरून तीन वर्ग करतां येतील (१) सर्वसाधारण किरकोळ रोग; ( २ ) भयंकर परंतु सांसर्गिक नसणारे रोग व ( ३ ) सांसर्गिक रोग. यापैकीं पहिल्या व दुसऱ्या वर्गांतील रोग तावडतोब उपाय केला असतां बरे

होतात. तिसऱ्या वर्गांतील रोग सांसर्गिक असल्यामुळें त्यांत पुष्कळ वेळा यश येत नाहीं. शिवाय कोंवडयांची काळजीहि फार घ्यावी लागते, व कधीं कधीं तर सर्व कोंबडयांचा नाश होईल या भीतीनें आजारी असलेल्या कोंबडया ठार मारून टाकाव्या लागतात. असो; वर सांगितलेल्या निरनिराळ्या वर्गांतील रोगांविषयीं आतां थोडासा विचार करूं. (१) पिसें जाणें:—यावर उपाय, त्यांना स्वतंत्र ठेवणें, मऊ अन्न देणें; गव्हाचा किंवा सातूचा भरडा दुधांत भिजवून देणें, स्वच्छता राखणें व हिरवें अन्न खावयास घालणें (२) मऊ अंडीं घालणें:— याचीं कारणें फार खाणें, व चुन्याची कमतरता. यावर उपाय, कारणें नाहींशीं करणें. (३) पायावरील खवलें वाढणें:—कारण कृमी यावर उपाय-रोज सकाळीं कोंवडयाचे पाय रॉकेल व जवसाचें तेल यांच्या मिश्रणांत बुडवावे व त्यावर पोल्ट्री पावडर चोळीत जावी. (४)मऊ गाजा किंवा पेटारा.—याचें कारण अजीर्ण चिन्हें.—गाजा हातास बिलबिलित लागणें व त्यांत पाणी आहे असा भास होणें. उपाय—कोंवडयास उलटें धरून गाजा हातानें चिवडून सर्व अन्न पोटावाटे काढावें गाजांतील अन्न कठिण झालेलें असल्यास शस्त्रक्रिया करणें अवश्य आहे. (५) पिसें खाणें:—उपाय, थोडा हिंग किंवा रॉकेल पिसें तोडलेल्या जागेस लावावा. लसूण पुष्कळ खावयास घालावा (६) अंडीं खाणें:—कारण—चुना, वाळू व मांसल अन्न भरपूर न मिळणें. यास उपाय, कारणें दूर करणें; तेवढ्यानें संवय गेली नाहीं तर अंडें एका बाजूनें फोडून त्यांत फिनाईल व मोहरी घालावी. कोंवडीनें एकदा हें खाल्लें म्हणजे पुन्हां ती अंडीं खाण्याच्या भानगडींत पडणार नाहीं. याशिवाय शेवटचा उपाय म्हणजे ठार मारणें हा होय. (७) फिकट वलस— नर व मादी अशक्त असतील तर अंडीं वरील प्रकारचीं निघतात. उपायः—कोंबड्यास हिरवें अन्न पुष्कळ खावयास घालणें व त्यास पूर्ण स्वतंत्रता देणें. (८) फेंपरें:—याचीं कारणें (१) अतिशय खाणें, (२) नेहमीं कोंडून ठेवणें, व (३) झुंज लागली असतांहि हा रोग होतो. यास उपायः—पंखाखालील हाडाजवळची एखादी रक्तवाहिनी कापून काढणें, एप्सम सॉल्ट थोडथोडें देणें, नेहमीं अंधारांत ठेवणें व सातू खावयास घालणें. (९) पायफुगीः—पायाचा तळवा सुजून त्यामध्यें पू होतो व कोंबडयाना चालतां येत नाहीं; उपायः—पोटीस लावून *पिकविणें; नंतर सगळा दर्द काढून टाकून जखम* धुवून त्यांत आयडोफॉर्म व व्हॅसेलिन हीं भरणें. (१०)पेटके येणें:—कारण—सर्द व थंड हवा. यावर उपाय-कारण नाहींसें करणें, लिंबाचा पाला पाण्यांत मीठ टाकून त्यांत उकळावा व त्यानें पाय चोळावेत. उष्णता उत्पन्न करणारे व पौष्टिक असें अन्न खाऊं घालावें. (११) पोटफुगीः—याचीं कारणें:—(१) अति खाणें, (२) तडें वगैरे गिळणें अगर कागद, हाड वगैरे खाणें. यास उपाय—मऊ गाजा झाला असतां करतात तोच. याखेरीज ऊन पाणी वरचेवर पाजून किंवा सॅलड तेल पाजून आंतील पदार्थ निघाले तर पहावें. (१२) मेंदूची सूज—यावर कांहीं उपाय नाहीं. (१३) अर्धांगवायु किंवा पक्षाघातः-कांहीं उपाय नाहीं; पक्ष्यास ठार मारणें बरें. (१४) अंडीं घालतांना त्रास होणें, कारणें:—(१) अंडीं मोठीं असणें, (२) कोंवडा लहान असल्यामुळें, व (३) अंडीं येण्याचा मार्ग सुजल्यामुळें. चिन्हें—अस्वस्थता. उपायः-गुदद्वारास एरंडेल लावावें व आंत पिचकारी मारावी, आभण आलेल्या पाण्यावर कोंबडीस धरावें एप्समसॉल्ट एक चमचाभर द्यावें खाणें थोडें व हलकें घालावें (१५)संधिवात.—हा पेटक्यासारखाच रोग आहे सर्व सांध्यास सूज येते व कोंबडयाला चालतां येत नाहीं. उपाय पेटक्याप्रमाणें (१६) कृमी.—हे तीन प्रकारचे आहेत. (१) फुसरे, हे अगदीं बारीक असून पिसांत पुष्कळ भरलेले असतात. कोंबड्याच्या कातडयाचा जो कोंडा वरचेवर निघतो त्यावर हे आपली उपजीविका करतात. यापासून पिलांना त्रास होतो. (२) चपटे—हे उवासारखे असतात. पंखाच्या मुळांत लहान लहान भोंकें पाडून त्यांत हे रहातात याची उपजीविका कातडयावरून होते. (३) टोंके हे तांबडे लाल असून मुख्यत्वें करून डोकें, डोळे, कल्ला, शिंगोरी वगैरे भागावर असतात. हे त्या भागास इतके चिकटून बसतात कीं ते मेल्याशिवाय निघत नाहींत. ते आंतलें रक्त शोषून घेतात व त्यामुळें कोंबडीं मरतात. कारण—मुख्यत्वेंकरून कोंबडयांच्या घरांत अस्वच्छता असल्यामुळें हे किडे होतात. याच्या नाशाचे उपाय—घरें दर आठ अगर पंधरा दिवसांनीं फिनाइलच्या पाण्यानें स्वच्छ धुवावीं. तीं विटाचीं बांधलीं असल्यास शेण, व रॉकेल एके ठिकाणीं करून त्यानें सारवावीं व घरांत कॅर्बोलिक पॉवडर टाकावी. कोंबडीं व पिलें यास वरचेवर नॅपथेलिन किंवा गंधक चोळावा व त्याच्या खोलींत अगर शेजारी कोरडया मातीचें किंवा राखेचें घमेलें भरून ठेवलेलें असावें. कोंवडयाच्या घरांतील जमीन वर्षांतून एकदा तरी करावी. टोंके झालेल्या कोंवडयास इतर कोंवडयांपासून निराळें ठेवावें व सर्व टोंके हातानें काढून टाकावे. फुसरें, चपटे यास नॅपथेलिनची पूड चांगली लागू पडते. याखेरीज पाहिजे असल्यास पुढें दिलेलें मिश्रण थोडथोडें चोळावें टरपेनतेल २ भाग, कापूर १ भाग व खोबरेल १२ भाग. जखमा झाल्याबरोबर त्या स्वच्छ धुवून त्यांत हळद किंवा *आयडोफार्म भरावा झिंक ऑक्साइडचाहि उपयोग करावा.* (१७)मोड.—कोंबडयाचे शेपटाजवळ एक गाठ असते तीस मोड म्हणतात. ही सुजली म्हणजे हळकुंड किंवा कारवी पेटवून भाजतात. परंतु हें करणें क्रूरपणाचें आहे तरी असें करूं नये. [ ले. रा. आर्. डी. खाडेकर ]

**कोबर्ग**—जर्मनींतील एक शहर सॅक्सोबर्ग-गोथा नांवाच्या संस्थानाच्या ई व गोथा अशा दोन राजधान्या आहेत. रजन नदाला मिळणाऱ्या इत्झ नांवाच्या एका लहान नदीच्या

काठीं वसलेलें असून गोथाच्या आग्नेयीस ४० मैलांवर आहे. लोकसंख्या (१९१०) २३७८९. शहर पुरातन असून येथें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाच्या अशा बऱ्याच गोष्टी पहावयास सापडतात. बाजारचौकात महाराणी व्हिक्टोरिया यांचे पति राजपुत्र आल्बर्ट याचा धातूचा पुतळा आहे. येथें १६०४ मध्यें स्थापलेली एक व्यायामशाळा असून औद्योगिक व शेतकी शिक्षणाकरितां विशेष शाळा आहेत. येथील ड्यूकच्या ग्रंथसंग्रहालयात एक लक्ष पुस्तकें आहेत.

येथील कोबर्ग नावाचा पुरातन किल्ला शहराच्या वस्तीपेक्षा बऱ्याच उंच जागेवर बांधलेला आहे. हा ११ व्या शतकात बांधला गेला असावा असा अदाज आहे. इ. स. १७८१ त वेड्याच्या इस्पितळाकडे या किल्ल्याचा उपयोग करूं लागले. परंतु १८३५–३८ त याचा जीर्णोद्धार केला गेला व आता येथें प्राणिशास्त्राचें पदार्थसंग्रहालय आहे. प्रॉटेस्टंट धर्माचा संस्थापक मार्टिन ल्यूथर हा इ. स. १५३० मध्यें या किल्ल्यांत एका खोलींत रहात असे. ज्या बिछान्यावर तो निजत असे तो बिछाना व ज्या व्यासपीठावरून तो उपदेश करीत असे तें व्यासपीठ अजून तेथें दाखवितात. येथें रंगाचे, यंत्रें तयार करण्याचे दारू गाळण्याचें, लोखंडाचें ओतीव काम करण्याचे, चिनई मातीची भांडीं तयार करण्याचे व लाकडाचे तक्ते पाडण्याचे कारखाने असल्यामुळें या शहरास औद्योगिक दृष्ट्या महत्त्व आहे. जवळच ड्यूकचे राजवाडे असून त्यांपैकीं एकांत राजपुत्र आल्बर्टचा इ. स. १८१९ त जन्म झाला होता.

या शहराचा १२०७ मध्यें प्रथम उल्लेख केलेला आढळतो. येथें असलेल्या किल्ल्यावरूनच या शहराचें नाव कोबर्ग असें पडलें. यूरोपमधील ३० वर्षांच्या युद्धांत ह्या किल्ल्याभोंवती १ वर्ष (१८३२–३३) वेढा पडला होता इ. स. १८२५ पासून सॅक्स-कोबर्गचे ड्यूक येथें राहूं लागले.

कोबी—गड्डाकोबी. कोबीची भाजी विलायतेकडून हिंदुस्थानांत आलेली आहे. कोबीचें बीं फाल्गुनफळावरच्या बियासारखेंच असतें. पण तें मोहोरीपेक्षां मोठें व काळसर असतें. कोबी थंडींत चांगली होते. पावसाळ्यांत पानें वाढतात पण त्याचा गड्डा बनत नाहीं. थंडी संपतांना लागण केल्यास कडक उन्हाळा नसेल तर उन्हाळ्यांतहि कोबी होते. पण थंडीच्या दिवसांप्रमाणें गड्डे मोठे होत नाहींत महाबळेश्वरासारख्या हवेंत वैशाखांतहि चांगले गड्डे होतात. कोबीचा योग्य मोसम म्हणजे थंडी असतानाच गड्डे तयार झाले पाहिजेत. थंडींत गड्डे मोठाले होतात व त्यांस स्वाद चांगला असतो. उन्हाळ्यांतील कोबीस उग्र वास येतो व भाजी खाण्यास वेचव लागते. कोबीला जमीन फार उत्तम पाहिजे. तिला पाणी मुबलक पाहिजे. खत चांगलें कुजलेलें, एकरीं सुमारें लावणीच्या वेळीं २५।३० गाड्या व पुढें जमीन वाढून गड्डेभरणीच्या वेळीं १०।१५ गाड्या लागतें. जमीन दोनतीन वेळ नांगरून खत पसरावें व २।३ वेळ कुळवून सरीचे वाफे करावे. सऱ्या सुमारें २ फुटांच्या अंतरानें पाडाव्या. कोबीचें बीं दर एकरीं सुमारें ५ औंस लागतें. एक औंस बीं पेरण्यास सुमारें ८ चौरस वार्ड म्हणजे २ हात रुंद व ४ हात लांबीचे ४ वाफे इतकी जागा पाहिजे. बीं पेरण्याचा हंगाम गोकुळअष्टमीपासून दसऱ्यापर्यंत मुख्य आहे. पुढें ज्यावेळीं कोबी तयार पाहिजे त्याच्या अगोदर ६ महिने बीं पेरावें लागतें. रोप दाट झाल्यास तें सुमारें चार पानांवर येतांच दुसऱ्या वाफ्यात बदलावें म्हणजे तें जोरात वाढेल. रोपास पहिल्यानें रोज झारीनें पाणी घालावें. रोप चांगलें वर आल्यावर वहातें पाणी देण्यास हरकत नाहीं. रोप दोन वेळ खुरपून काढावें. बीं खुरप्यानें रेघा काढून चिमटीनें पेरलेलें असल्यास रोप खुरपण्यास सोपें जातें. बीं फेकून पेरलें असल्यास तें खुरपण्यास अवघड जातें व शिवाय वेळ जास्त लागतो. रोपावर तें लहान असतांच कधीं कधीं हिरव्या अळीची कीड पडते त्या किडीबद्दल रोप उगवल्यापासून रोज उजाडतांच तपास ठेवून कीड थोडी नजरेस पडतांच उपाय केला पाहिजे. मुख्य उपाय रोपाचीं पानें विषारी केलीं पाहिजेत, म्हणजे तीं खाऊन कीड मरून जाईल. 'हेलिबोर पावडर' संध्याकाळीं रोपावर टाकल्यानें रात्रीं कीड पानांवरोबर विषहि खाते व मरून जाते. कीड वाचलीच तर उजाडतांच वेंचून मारून टाकावी. किडीनें पहिलींच पानें खराब केलीं तरी अंकुर खाल्लेला नसतो; म्हणून दुसरीं पानें येऊन रोप जोरावतें. तंबाखूचें पाणी, तंबाखूचा सारण, गोमूत्र, मुतारीचें पाणी, साबण व घासलेटाचें पाणी, कडुनिंबाच्या सालीचा काढा वगैरे कडू व विषारी पाणी शिंपल्यानें कीड मरते. या किडीबद्दल आळस केल्यास रोप हातीं पडणें कठिण आहे. ही कीड पडत नाहीं असें क्वचितच होतें. जेथें कोबीच्या वर्गाचें पीक आहे नवीनच केलें असतें अशा नव्या ठिकाणींहि ही कीड तयार होते. रोप सुमारें दीड महिन्यांत लावण्याजोगें वाढतें. रोप लावण्याकरितां काढण्याच्या अगोदर दरास आदल्या दिवशीं पाणी द्यावें म्हणजे रोप उपटतांना मुळ्या तुटत नाहींत. कोरड्या वाफ्यांत एक हातावर सरीच्या तळाशीं खुरप्यानें अगर कुदळीनें माती उकरून केलेल्या उथळ खाचेंत डाव्या हातानें रोप धरून त्याच्या मुळांवर उजव्या हातानें माती ओढावी व दोन्ही हाताच्या बोटांनीं ती दाबावी. म्हणजे पाणी सोडल्यावर रोप आडवें पडत नाहीं. जमीन कसदार असल्यास रोपें दोन फुटांवर लावावीं म्हणजे दाटी होत नाहीं. दर खाचेंत एकेक रोप लावावें. लावतांना रोपाच्या मुळ्या खोल जातील अशा टेंगळ्या, वाकड्या करूं नयेत. पहिलें पाणी लागून द्यावें. दुसरें पाणी जरूरीप्रमाणें ४।५ दिवसांनीं द्यावें. नंतर ८।१० दिवसांनीं पाणी देत जावें.

वाफ्याच्या चहूं बाजूंच्या वरंब्यास बीटचें बीं लाविलें असतां त्याचे कांदे कोबीबरोबरच तयार होतात. सऱ्याच्या दोन्ही बाजूंच्या वरंब्याच्या बगलेस सालटाचें रोप चांगलें वाढलेलें

लावल्यास चाळणीच्या अगोदर साळटे तयार होतात. रोप बारीक लावल्यास चाळणी करून गळेभरणीच्या वेळी अड-थळा होईल. तण उगवलें असेल त्या मानानें दोन तीन वेळ खुरपणी करून रोपाच्या मुळाजवळील माती भुसभुशीत करावी.

लावणीनंतर सुमारें अडीच महिन्यांनी पेंड, कुटी (मासळी )अगर शेणाचें खोडखत देवून चाळणी करावी व सऱ्या मोडून वाफे सपाट करावे. यानंतर वेळच्यावेळीं पाणी देणें व जुनी पानें काढणें याशिवाय कांहीं करावें लागत नाहीं. कोबीचे गड्डे तयार होण्याच्या वेळीं तीवर मावा पडत असतो. मावा पडलेली कोबी तिजवरील मावा जमिनीवर न पडूं देता हलकेच उपटून जाळून टाकावी व त्या जागेवर घासलेटमिश्रित साबणाचें पाणी मारावें. म्हणजे जमिनी-वरील किडे मरून जातील माव्याचा वेळींच प्रतिकार न केला तर सर्व कोबीवर तो पसरतो व मग चांगले गड्डे होत नाहींत.

कोबीच्या गड्ड्यात एक प्रकारची अळी पानाच्या खालच्या बाजूनें देंठाकडून गाभ्यात प्रवेश करते. ही कीड नजरेस येताच किडलेले गड्डे उपटून जाळून टाकावे उन्हाळ्याच्या तापानें गड्डे कमजोर होतात व वरून करपावयास लागतात. अशा गड्ड्यात आतून कीड असते. असे गड्डे दृष्टीस पडताच उप-टून उपयोगात आणावे अगर किडले असल्यास जाळून टाकावे. चांगल्या गड्ड्याचा भाजीकडे उपयोग होतो. जून पानें जनावरें खातात. किडलेलीं पानें अगर गड्डे जनावरास खाण्यास घालूं नयेत. तसेंच कित्येक लोक गैरसमजुतीनें किड-लेलीं पानें खताच्या खड्ड्यांत टाकितात. पण तसें करण्यानें ते किडीचा संचय करितात, नाश करीत नाहींत. नेहमी पिकाचे रोगट भाग जाळून टाकीत गेल्यानेंच किडीचा नाश होतो. [ वनौषधि गुण. ]

**कोम-मौजे-कसवा**—कोम म्हणजे लहान गाव किंवा वाडी असें मॅट ड्फ म्हणतो, पण तसा अर्थ इतरत्र आढळत नाहीं. कोम म्हणजे समाज किंवा जात अशा अर्थानेंहि हा शब्द हिंदुस्थानांत वापरला जातो. मौजे म्हणजे खेडें. मूळ शब्द मौजा. येथें बाजार भरत नसे कसबा म्हणजे महालातील अथवा परगण्यातील मुख्य ठाण्याचें गाव; गावातील जुना वसाहतीचा भाग, बाजारचा गाव. प्रत्येक कसब्याखालीं साधारणतः ५ ते २५ दुसरीं खेडीं असत. परंतु कसब्याचें गाव फारच मोठें असलें, तर तेवढें एकच गाव देखील त्या कसब्यात असे. [ मोल्सवर्थ-कोश, ड्फ ग्हा. १].

**कोमटी**—ही व्यापारी जात मुंबई, मद्रास इलाखा, वऱ्हाड व मध्यप्रात, संयुक्त प्रांत, म्हैसूर इत्यादि प्रदेशांत आढळते. हा आंध्रातील मुख्य वैश्य वर्ग होय यांची वस्ती बऱ्याच ठिकाणीं असल्यानें त्यांच्यातील धार्मिक व सामाजिक संस्कारात मोठी विविधता आलेली आहे. १९११ सालीं हिंदुस्थानात एकंदर ७,६५,५३५ कोमटी होते. त्यांपैकीं सर्वात जास्त मद्रासेंत (४,९८,२९५) होते. कोमटी हें नाव या जातीस कसें पडलें याविषयीं भिन्न भिन्न मतें दिसून येतात को-मति (शोकरस्वभावी) गो-मति ( गाईवाला ), कु-मति ( दुष्ट स्वभावाचा ) अशा तऱ्हेच्या उपपत्त्या पुढें आलेल्या आहेत. कोमट्याच्या कन्यकापुराणात शिवानें यांना गाईप्रमाणें वागविलें म्हणून गो-मति असें नाव दिल्याचें लिहिलें आहे. पूर्वी गोदावरीच्या तीरीं हे रहात असत असें म्हणतात, अद्यापहि मुख्य वस्ती तेथें आहे. व गो-मति किंवा गोमर्ता असें यांचें त्या ठिकाणचें एक नाव आहे, तेव्हा गोमर्तीचें तेलगूंत कोमटी असें अपभ्रष्ट रूप झालें असावें अशी माडणी करतात. सर्व ठिकाणचे कोमटी तेलगू बोलतात. ती त्यांची मातृ-भाषा होय. याखेरीज ज्या देशात ते रहातात त्या देशाची भाषा चांगली मुखोद्गत करितात. त्यांची एक निराळी व्यापारी भाषा असते

कोमट्यात मुख्य दोन जाती आहेत. एक गवर (गौर) आणि दुसरी कलिंग विजयानगरच्या उत्तरेस असणारे गौर व दक्षिणेस असणारे कलिंग होत. गौर कोमट्यात पुन्हा अनेक पोटजाती आहेत. कोणी शैव, कोणी वैष्णव व कोणी माध्वपंथी आहेत. धंद्यावरूनहि अनेक पोटजाती उत्पन्न झाल्या आहेत. गौर व कलिंग यांच्यामध्यें परस्परात लग्नें होत नाहींत गौर मद्यमांस खात नाहींत. कलिंग खातात. धंद्यावरून पडलेल्या जातींत रोटीबेटी व्यवहार होत नाहींत. यांची देवकें प्राणी व वनस्पती असतात. कोमटी आपणाला वैश्य समजतात व आपली गोत्रें व प्रवर सागतात. ही जात बरीचशी ओबडधोबड चेहऱ्याची असते.

'मेनरिकम' चालीप्रमाणें कोमटी तरुणाला आपल्या मामेबहिणीशीं लग्न करता येतें. कन्यकापुराणातील कन्य-कम्मानें १०२ गौर कोमट्यांसह ( हे पुढें गोत्रपुरुष झाले.) अग्निप्रवेश केल्याची कथा फार लोकप्रिय असून ती थोड्या फार फेरबदलानें तेलगू मार्कंडेय पुराणात (१४ वें शतक ) सुद्धा आलेली आहे. म्हणजे कोमट्याचा उल्लेख इतका प्राचीन आहे. संस्कृत मार्कंडेय पुराणात ही कथा नाहीं, तेव्हा ती कन्यकापुराणातूनच घेतली असावी. कोमटी व जवळ जवळ अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या मादिगाचा व यांचा संबंध पुरातनचा आहे. त्याचा उलगडा करण्यासाठीं अनेक कथा सागतात. मदिग स्त्री व ब्राह्मण पुरुष यांच्यासंबंधापासून कोमटी जात बनली आहे असा एक आक्षेप कोमट्यावर करण्यात आला आहे.

कोमट्यांत बालविवाहाची चाल आहे. लग्न ब्राह्मण चालवितो. बहुपत्नीकत्वाची यांच्यात चाल आहे. पण पहिल्या पत्नीला मूल होत नसेल तर दुसरें लग्न करा-वयाचें. वेदोक्त संस्कारांना ब्राह्मण हरकत घेऊं लागल्या-कारणानें पुष्कळ तंटे माजले आहेत. वेदोक्त व पुराणोक्त अशा

दोन्ही पद्धतींनी लग्नें होतात. मद्रासकडे प्रथम वरांची मुंज करितात, मग काशीला जाण्याचा आव आणिला म्हणजे वधूचा बाप त्याला घरी नेतो व आपल्या मुलीशी लग्न करून देतो. कलिंग कोमटी गंजमच्या उत्तरेस राहात असून आपली मातृभाषा बहुतेक विसरले आहेत. त्यांचे उपाध्याय उरिया ब्राह्मण असल्यानें त्यांच्यात उरिया चाली शिरल्या आहेत.

यांच्यांत विधवाविवाह रूढ नाहीं. शैवाखेरीज कोणाहि विधवेचें मुंडण सक्तीनें करण्यांत येत नाहीं. अंगावर दागीने घालणें, पान खाणें विधवा निषिद्ध मानीत नाहींत. शैव कोमट्यात देखील बालविधवांचें मुंडण होत नाहीं. वैष्णव विधवा तर नेहमीं सकेशाच असतात. सजीव आणि मृत या दोघांनें जें लग्न लावण्यांत येतें तें मात्र फार विलक्षण दिसतें. एखाद्या स्त्रीपुरुषाचा संबंध असेल व तो पुरुष कदाचित दिवंगत झाला तर त्याच्या प्रेताशीं त्या स्त्रीचें लग्न सन्या लग्नाप्रमाणें लावितात. वधू सोवन्याच्या विच्या तोडून त्याच्या तोंडावर थुंकते; त्याच्यापुढें बसून पुष्कळ वेळ भाषण करिते; नंतर प्रेताला न्हाऊं माखूं घालून विडा खावयास देतात व या तऱ्हेचे लग्नसोहळे संपल्यावर त्याची प्रेतयात्रा निघते. उत्तरसरकारात राहाणाऱ्या लिंगायत कोमट्यामध्यें वरील चाल आहे.

सर्व ठिकाणीं कोमटीकन्यका 'परमेश्वरी' या कुमारी देवतेला भजतात. तिची जागजागीं देवळें आहेत. या देवीखेरीज इतर देवतांचीहि ते पूजा करितात. विझगापट्टम् येथील कोमटी किनाऱ्यावरील डोंगरावर पुरलेल्या एका मुसलमान साधूची फार आराधना करितात. त्या बंदरात येणारें जाणारें प्रत्येक जहाज आपलें निशाण तीनदा वाकवून त्याला सलामी देतें. प्रवास सुरक्षित व्हावा म्हणून हिंदु बोटींचे मालक त्याला चांदीची डोणी अर्पण करीत. हल्लीं बोटींचे मालक कोमटी नाहींत तरी ते या साधूला भजतात. व खटल्यात यश यावें, दुसरीं वरीं व्हावीं म्हणून याला नवस करतात. धार्मिक विधि करण्यास हे लोक ब्राह्मणाना बोलावतात व त्याना आपले गुरु करतात या ब्राह्मणाला भास्कराचार्य असें म्हणतात. सोळाव्या शतकापूर्वी होऊन गेलेल्या संस्कृत कन्यकापुराणाच्या तेलगु भाषांतरकारानें हें नाव होतें. त्यानें कोमट्याना दैनिक आचारांचे काहीं नियम घालून दिले आहेत. हा वैश्यगुरु भास्कराचार्य व त्याचे वंशज गृहस्थाश्रमी असून त्यानां या ज्ञातीकडून वर्षासन असे. हल्लीं निरनिराळ्या ठिकाणीं गुरुपीठें असून धार्मिक कारभारात याचा अधिकार मानला जातो.

मोठे व्यापारी, वाणी आणि सावकार म्हणून कोमटी प्रसिद्ध आहेत. मद्रास शहरांत सर्व आयात मालाचे ते घाउक व्यापारी आहेत. बहुतेक कोमटी विद्यासंपन्न असतात व त्यामुळें यांचा कारभार चांगला चालतो. येथून तेथून सर्व कोमटी हुषार, मेहनती, मितव्ययी व नम्र असतात अशी म्हण आहे ती काहीं खोटी नव्हे. जर एखादा कोमटी धंद्यात बुडाला तर त्याचे जातभाई त्याला मदत करून पुन्हां मार्गाला लावतात. याचा दानधर्म व्यवस्थित असतो. प्रत्येक कन्यकापरमेश्वरीचें देऊळ म्हणजे एक दानगृह होय. या पैशातून कोमटी स्त्रीशिक्षण, अनाथसंगोपन यांसारख्या संस्था चालवितात. वैश्यज्ञातीची नैतिक, धार्मिक, शैक्षणिक, सामाजिक व औद्योगिक उन्नति करण्यासाठीं १९०५ सालीं "दक्षिणहिंदुस्थान वैश्यसंघ" नावाची एक संस्था यानीं स्थापिली. लायक कोमटी विद्यार्थीना यातून इंग्रजी व स्वभाषा शिकण्यासाठीं शिष्यवृत्त्या देण्यात येतात. शेटी, चेटी (श्रेष्ठीचीं अपभ्रष्ट रूपें) हीं बहुमानार्थक नांवें कोमट्यातहि आहेत. हल्लीं कोणी कोणी आपणाला आर्य म्हणवितात. [थर्स्टन].

त्रावणकोरमध्यें याची संख्या सुमारें दोनशें आहे. व म्हैसूरमध्यें जवळ जवळ दहा हजार आहे. याची भाषा तेलगूच आहे. मुंबई इलाख्यात याची संख्या २१,८६५ असून हे विशेषतः बेळगाव, विजापूर व धारवाड जिल्ह्यात आढळतात. नाशिक जिल्ह्यातहि याची थोडी वस्ती आहे. हे जुन्या कपड्याचा व्यापार करतात. याचा धर्मगुरु कृष्णाचार्य नावाचा असून निझाम हैदराबादनजीक बर्डुवागल येथें त्याचा मठ आहे. याच्यात जातिसभा असून ती आचार्यांनीं नेमलेल्या मानकऱ्याच्या संमतीनें जातीचे प्रश्न सोडविते. मध्यप्रातात याची वस्ती सुमार ११०००आहे. याच्यात यज्ञ, पटी, जैन व विडूर अशा जाती आहेत. याची रहाणी मद्रासेंतील कोमट्याप्रमाणेंच आहे. [सेन्सस रिपार्ट, रसेल व हिरालाल].

**कोमारपाइक**— एक जात. याची लोक संख्या १०,०५९. फक्त कानडा जिल्ह्यात हे लोक आढळतात. अलीकडे हे लोक आपल्याला "खत्री कोमारपथ" म्हणवूं लागले आहेत. आम्ही क्षत्रिय आहों असें हे आता म्हणतात. आमचें मूळचें वसतिस्थान गुलबर्गा असून तेथून आम्ही कानड्यात आलों असें ते सागतात. हे पूर्वी सोंडा सरदाराच्या सैन्यात असावे असा अंदाज आहे. इ. स. १७६३ ते १७९९ पर्यंत हे लुटारू म्हणून प्रसिद्ध होते. इ.स. १७९९ मध्यें ब्रिटिशानीं या लुटारूंचा नायनाट केला व तेव्हापासून हे लोक शांतताप्रिय झाले आहेत. ते पूर्वी सैनिक होते असें ते म्हणतात. परंतु आता पुष्कळसे शेतकरी व ताडी काढणारे आहेत. यामध्यें हिंदू व लिंगायत असे दोन पोटभाग असून त्यामध्यें बेटीव्यवहार होत नाहीं. हिंदू कोमारपाइक हे घाटात रहातात व लिंगायत कोमारपाइक हे घांटाच्या वरच्या प्रदेशात रहातात. हिंदु कोमारपाइकामध्यें १८ कुळें आहेत. मावसभाऊ व मामेबहिण यांचें लग्न होतें. साटेलोटें करण्याची चाल यांमध्यें आहे. मुलींचीं लग्नें ८ ते १० व मुलांचीं १४ ते २० वर्षांपर्यंत होतात. पुनर्विवाहाची चालहि आहे. पहिल्यानें मुलाने केलेल्या मागणी व मुलीनें

कोंमडयाशीं लग्न होऊन नंतर तिसरें लग्न करण्याची परवानगी आहे. घटस्फोटाची मनाई आहे. हे लोक मांसाहारी आहेत व अलीकडे दारूहि पिऊं लागले आहेत. फक्त ब्राह्मण व वाणी यांच्या हातचें हे जेवतात. यांचा वारसासंबंधी कायदा हिंदूप्रमाणेंच आहे. हिंदु कोमारपाइक पुष्कळ बाबतींत लिंगाइतांप्रमाणेंच वागतात. बसव, व्यंकटरमण, कालभैरव, म्हास्ती इत्यादि यांच्या देवता आहेत जोशी, हविक, गौडसारस्वत ब्राह्मण यांचे उपाध्याय असतात. जंगमानांहि ते मान देतात.

शंभर वर्षांपूर्वी हिंदु कोमारपाइक लोक लिंगायतांप्रमाणें आपलीं प्रेतें पुरीत असत परंतु आतां ते जाळूं लागले आहेत. कोमारपाइकांच्या प्रत्येक पंचायतीवर "बुद्धवंत" हा अधिकारी नेमलेला असतो. त्याचप्रमाणें न्हेट्यांच्या एका गटावर एक कडा नावाचा वरिष्ठ अधिकारी असतो महत्वाचे प्रश्न जातीच्या सभेंत येतात व तेथें त्याचे निकाल दिले जातात. निकालाप्रमाणें न वागल्यास जातीबाहेर टाकण्यात येतें. बारीकसारीक अपराधाबद्दल दंड होतो. परंतु अपराध मोठा असला तर पंचगव्य देऊन प्रायश्चित्त देतात. खालच्या जातीच्या पंक्तींत जेवण्याबद्दल गोकर्णाला जाऊन क्षौर व स्नान करावें लागतें व त्यानंतर पंचगव्य घ्यावें लागतें. शृंगेरी येथील स्मार्त मठाधिपति हा विशेष महत्वाच्या प्रश्नाचे निकाल देतो व त्याचे निकाल कायमचे व अखेरचे समजले जातात. [ एन्थोवेन. से; रि. मुंबई १९११ ].

**कोमिल्ल गांव**—हें बंगाल इलाख्यातील टिप्पेरा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून गोमती नदीवर वसलें आहे. ढाक्यापासून चितागांगला जाणारा रस्ता याच शहरावरून जातो. इ. स. १९०१ साली या शहराची लोकसंख्या १९१६९ होती. या शहरी १८६४ सालीं म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. गोमती नदीचें पाणी पुराच्या वेळीं गावांत शिरूं नये म्हणून येथे एक बांध घातला आहे. येथें टिप्पेराच्या राजानें १५ व्या शतकात बांधलेला धर्मसागर नावाचा एक तलाव असून त्याचा घेर १ मैल आहे. येथें कोमिल्ला व्हिक्टोरिया कॉलेज व बरीचशीं हायस्कुलें आहेत.

**कोयी**.—एक डोंगरी जात याची वस्ती मद्रास व हैदराबाद संस्थान यांतून आहे. एकंदर लो. सं. ( १९११ ) ९०,३६१. गोदावरी जिल्ह्याच्या उत्तरेकडील डोंगरांत राहणारी कोयी अथवा कोया नावाची एक जात असून जेपूर जमीन्दारीच्या मालकानगिरी नावाच्या तालुक्यांतहि कोयी जातीची वस्ती आहे. लोक गोंड वंशाचे आहेत असें म्हणतात व त्रिग्सनच्या मतें गोंडी भाषेचीच कोयी भाषा ही एक पोटभाषा आहे. वरील प्रांतांतल्या कोयी भाषेत बरेच शब्द असतात. तेथील लोकांना बस्तरकडून आलेल्या कोयांची भाषा समजत नाहीं. रेव्हरंड जे. केन. म्हणतो की, गोंड व तेलगू भाषांचा पगडा बऱ्याच प्रमाणांत कोयी भाषेवर बसलेला आहे.

कोयांच्या पंचवीस खेड्यांस मिळून 'समुतु' म्हणतात. व एकट्या भद्राचलम् तालुक्यात एकंदर दहा 'समुतु' आहेत. गोदावरीनजीक रहाणाऱ्या कोयास गोम्मू कोइ म्हणतात. पेरुंबोयूडु, माडोगुट्टा, पेरेगट्टा, मातामुपायो व विडोगट्टा असे कोयी जातीचे पाच विभाग आहेत एफ. आर. हेमिंगवे ( कास्ट्स अँड ट्राइब्ज ऑफ इंडिया पा. ४० ) म्हणतो की, गोत्रांतर विवाहामुळें झालेला 'गट्टा' नावाचा वर्ग या जातींत असलेला आढळून येतो. कपाळावरील निरनिराळ्या चिन्हावरून मुडो, नालो व ऐडो वगैरे नावाचा गट्टा किंवा वर्ग ओळखिता येतो. रावा अथवा दोरा नावाचे कोयी इतर सर्व पोटजातींपेक्षा फार श्रेष्ठ आहेत. जे. केन. म्हणतो कीं, वासवा व कोयी हे लोक एकच होत वासवा हा शब्द भाषा या शब्दापासून झालेला आहे. त्या जातीचे गोल लोक इतरांपेक्षा निराळी भाषा बोलूं लागले म्हणून त्यास हें नाव मिळालें असावें. एरागोल व काकागोल अशाहि जाती असून त्याच्याबद्दल मोठ्या दंतकथा आहेत.

गोदावरी जिल्ह्यातील कोयी अगदीं साध्या वृत्तीचे लोक आहेत. ते दिसण्यांत गरीब व हीन दिसतात. अरण्यात रानटी लोकांसारखे राहून ते समाज व शहरें यांपासून अलिप्त रहातात. या एकान्तवासामुळें असो वा अन्यकारणानें असो त्यांच्या चरित्रात प्रामाणिकपणा व शुद्धता हे सद्गुण असलेले दिसून येतात. खोंड जातहि खरेपणा व साधेपणा याबद्दल प्रसिद्ध आहे. बस्तर प्रदेशातील कोयी स्वतःस भूमिराजुलु असें म्हणवून घेतात. त्यांचीं राहण्याचीं ठिकाणें बहुतेक अरण्यांत व डोंगरावर असतात. एकाच ठिकाणीं कायम वस्ती करून राहण्याची प्रवृत्ति कोयी लोकांत नाहीं. ते झोपड्या बांधतात, शेती करितात व चार वर्षांनीं देशांतरहि करितात. ते एखादें रान सर्व जाळून त्यात बी पेरून शेती करतात व ती जमीन नापीक झाल्यावर दुसरीकडे जातात. बालविवाह या जातींत फारसा नाहीं. वर श्रीमंत असेल तर त्याला तडजोड करून बायको मिळविता येते. परंतु साधारणतः नवऱ्याकडील मंडळी वधूला जबरदस्तीनें पळवून नेतात व लग्नाच्या वेळीं मात्र तिच्या दुःखित आईबापांस निमंत्रण पाठवितात. यांच्यात बहुपत्नीत्वाची चाल असून विधवांनाहि लग्नार्थ पळवून नेतात. वधुवरांना एकत्र स्नान घालून त्यांच्यासह व ज्ञातीसह भोजनसमारंभ उरकण्यांत आला की, लग्न झालें असें समजतात. त्यांच्या नंतर गाणें व बजावणें व नाच वगैरे समारंभ करण्यांत येतात. कोयी स्त्रिया अत्यंत काटक व स्वतःसंबंधी फार निष्काळजी असतात. यांच्यांत लहान असलेल्या मृतास पुरण्याची व मोठ्यास जाळण्याची त्यांची रीत आहे मृतांची अशी वाट लाविल्यानंतर एखादा पशु मारून ते लोक मेजवानी करितात.

कोमारम्मा, कादूरुडु, आडादाराजु अशा त्यांच्या देवता आहेत. मामिलो व पेद्दी या देवतांची पांडवांच्याकरितां प्रार्थना करून त्यांना नवसही देतात. पांडवांना सर्व कोयी

पिवळ्या फुलाची कोरफड उत्पन्न होते. या कोरफडीस अलोस बार्बाडेन्सेस हें नाव तज्ज्ञांनीं दिलें आहे हिचीं पानें १॥ पासून २॥ फूट लांब असून दळदार असतात. त्याची जाडी अर्ध्या इंचापासून पाऊण इंचापर्यंत असते पानें हिरव्या रंगाचीं तलवारीच्या आकाराचीं असून त्यावर पांढरे ठिपके असतात फुलाचा बाह्य कोश पिवळ्या रंगाचा १४ ते १६ इंच लांबीच्या पुष्पदंडावर असतो त्यापैकीं खालचीं फुलें नारिंगी रंगाचा मधली फिक्या रंगाचीं व शेंड्याकडील हिरवीं असतात. त्याजमधील परागकोश लाल रंगाचा असतो. फुलाचा दांडा मार्गशीर्षाच्या सुमारास येऊन पौषाच्या अखेरीस झडून जातो

( २ ) हबशी कोरफड (अलोस व्हल्गॅरिस) ही जात गुजराथेत व काठेवाडच्या किनाऱ्यावर आपोआप उगवलेली आढळते इचा बुंधा उथळ असून १-२ फूट उंचीचा व २-३ इंच व्यासाचा असतो. पानें खड्गाकार असून देठापासून २॥ फूट लांबीचीं पसरट असतात. तीं टोंकाकडे निमुळतीं हिरव्या रंगाचीं असून त्याच्या पाठीवर सफेत रंगाचे ठिपके असतात. पुष्पदंड बराच लांब असून उपपत्रें अर्धद जाल्यासारखीं असतात फुलें पिवळीं असून शुडाशीं हिरवीं असतात त्याची अंतर्वेष्टिका आखूड गळ्याची असून तिचे दांते लांब असतात व नरकेसर वेष्टिकेच्या बाहेर बरेच आलेले असतात. कोरफडीच्या पात्यातील गीर पारदर्शक व कडू असतो गुजराथमध्यें कोरफडीचें लोणचें करितात. कोरफड आढ्यास टांगून ठेविली तरी न सुकता जशीच्या तशीच रहाते परिल पात्या सुकल्यास नवीन पात्या फुटून ही वनस्पति सदासर्वकाळ ताजी रहाते म्हणून हिला "कुमारी" हें अन्वर्थक नाव मिळालें आहे. कित्येक ठिकाणीं कोरफडीचीं मोठालीं रानें सांपडतात. कोरफडीच्या रसापासून येळ्याबोळ म्हणजे काळा बोळ तयार करतात. तो सारक, रेचक व आर्तवशुद्धिकर आहे.

*औषधी उपयोग*—नोकरयास कोरफड फुपाट्यात भाजून तिचा रस व आदुळशाचा रस अथवा मध, पिंपळी व लवंगाचें चूर्ण घालून ती घ्यावी, किंवा कोरफडीचा रस मध, सैंधव व हळद मिळवून घ्यावा. डोळे दुखूं लागल्यास कोरफडीच्या कापा पाण्यांत धुऊन त्या पाण्यात तुरटीची लाही व अफू मिसळून तें पाणी गाळून थेंबथेंबानें डोळ्यावर फिरवीत जावें. [ वैद्य पदे ]

**कोरा**—संयुक्तप्रांत. फत्तेपूर जिल्ह्याच्या खागुआ तहशिलींतील एक जुनें शहर. उ. अ २६° ५′ व पू. रे. ८° २२′. लोकसंख्या ( १९०१ ) २८०६. हें शहर बरेच शतकें अर्गलच्या गौतम राजाच्या ताब्यात होतें व मुसलमानांच्या वेळीं हें प्रांताचें मुख्य ठिकाण होतें मोठ्या बागेंतील 'बारादरी' व त्याच्या भोंवतालच्या उंच भिंती व भव्य मकबरे हे पुरातन काळचे मुख्य अवशेष आहेत. हें गाव सुमारें १८ व्या शतकांतील असावें.

**कोरिंग**—मद्रास इलाख्यांत गोदावरी जिल्ह्यांतील कोकनाड तालुक्यांतील एक खेडें. गोदावरीस उत्तरेकडून येऊन मिळणाऱ्या पहिल्या नदीच्या तीरावर कोकनाडपासून ८ मैलावर वसलेलें आहे. कोरिंग हें पूर्वी डच व्यापाऱ्यांचे वसाहतीचें स्थान होतें व एके काळीं हें एक प्रमुख बंदरहि होतें जवळच्या तल्लरेवू खेड्यांत जहाजें बांधण्याचें काम चालतें येथून जवळच ९ मैलावर निलपल्ली येथें भात सडण्याचा मोठा कारखाना आहे

**कोरिया**—आशिया खंडातील पूर्वेकडचा एक देश क्षेत्रफळ सुमारें ८४००० चौ मै. असून लोकसंख्या ( १९११ ) १६९९८११ आहे परकीय लोकांत मोठा भरणा चिनी लोकांचा ( १८९७२ ) आहे त्याखेरीज ब्रिटिश प्रजाजन ( २२३ ), अमेरिकन ( ५९७ ), फ्रेंच ( १०७ ) व जर्मन ( ४७ ) आहेतच. अलीकडे जपानी लोक फार येऊं लागले आहेत.

कोरियाची हवा कोरडी व उत्साहवर्धक असून जपानांतल्याप्रमाणें या ठिकाणीं भूकंप अगर प्रचंड झंझावात सुटणें अशा प्रकारचे चमत्कार दृष्टीस पडत नाहींत. उत्तरेकडील कोरियाचा प्रदेश डोंगराळ आहे पण दक्षिण व पश्चिम या दिशांच्या मुलुखांत सपाट मैदानें, मोठ्या नद्या असून फ्यूसन, मोक्पो, चेमुल्पो आणि छिनांपो अशीं चांगलीं बंदरें वसलेलीं आहेत. उत्तरेकडील भागांत खनिजपदार्थांची समृद्धि आहे, तर नैर्ऋत्येकडील भागांत शेतकीला अनुकूल अशी जमीन आहे. कोरिया हें भौगोलिक दृष्ट्या फार चांगल्या ठिकाणीं वसलेलें आहे व त्यामुळें चीन, जपान, सायबेरिया या भागांत पेरियाला आपला व्यापार सुलभ रीतीनें चालविता येतो. कोरिया व उत्तर आशिया यांच्यामध्यें हल्लीं आगगाडी चालू झाली आहे.

*भाषा व धर्म*—कोरियन लोकांची भाषा मोंगोलो-तार्तर व जपानी यामधली आहे. हींत चिनी शब्दांचा पुष्कळ भरणा असून लिहिण्याकरितां लिपीची योजना आहे. सरकारी दप्तर जपानी भाषेंत असतें. लोकांत धार्मिक भावना फारशी आहे तथापि चीन देशांतल्याप्रमाणेंच पूर्वजांची उपासना मोठ्या नेमानें पाळली जाते. कोरियांत बरेचसे बौद्धमठ आहेत, पण याकडे कोणी फारसें लक्ष देत नाहीं.

*शिक्षण*—चिनी साहित्य व कन्फ्यूशियन तत्त्व यांचें ज्ञान उच्च दर्जाच्या लोकांत जें पूर्वी अवश्य मानलें जाई तें आतां जपानी वर्चस्वामुळें लोपत चाललें असून त्याची जागा चांगल्या व्यावहारिक शिक्षणानें पटकाविली आहे. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या चळवळी या ठिकाणींहि आहेतच. त्यामुळें बाटलेले ख्रिस्ती कोरियांत पुष्कळ दिसतात. तसेंच मुलांमुलींच्या अनेक मिशनरी शाळा देशभर पसरल्या आहेत. पण या सर्व शाळा सरकारी शिक्षणखात्याच्या देखरेखीखालीं असतात. नाविक व औद्योगिक संस्थादि झपाट्यानें निघत आहेत. सुदान येथें एक शेतकी शाळा स्थापन झाली आहे.

इ. स. १९१४ साली सर्व सन्धेच्या एकंदर ४०५ सरकारी शाळा होत्या. खासगी शाळा ११३० होत्या. सेवुलमध्ये १ कोरियन दैनिक व २ जपानी पत्रें निघतात सेवुलशिवाय येथें आणखी काही निघतात. सेवुलला एक सरकारी इंग्रजी दैनिक प्रसिद्ध होतें. वृत्तपत्रावर जपानी सरकारचा मोठा कटाक्ष असतो. त्यामुळें स्वतंत्र विचारांचा फारसा प्रादुर्भाव होत नाही.

म ह सू ल व ख र्च. सन १९१६–मध्यें कोरियाचा महसूल ४७६४ ५५९ व जादा महसूल २३,४३,७१८८ येन झाला व १९२०–२१ साली साधा महसूल ६९३४७८२० व जादा ५४४१७१२३ येन इतका झाला. १९१६–१७ मध्यें कोरियाचा वार्षिक खर्च ५७५६२७१० येन व १९२०–२१ साली ११,३३,२८,३३४ येन इतका झाला.

व्या पा र.—चेमुल्पो, फुसन, चीसन, चिनंपो, मोकपो, कुन्सन, सॉंग्चिन, पिंगयंग वगैरे बंदरें होत. १९१०–२० सालाच्या दरम्यान कोरियाची परराष्ट्रीय व्यापार बऱ्याच मोठ्या प्रमाणांत झाला. याला मुख्य कारणें म्हणजे जलमार्गानें व पायमार्गानें वाहतुकीची उत्तम सोय, जकातीची सवलत, व महायुद्धामुळें वाढलेली मागणी ही होत. इ. स. १९१२ साली कोरियातून जपान. मध्यें ५६१६६०८ येन किंमतीच्या मालाची व परराष्ट्रांत १५३६९००९ येन इतक्या किंमतीच्या मालाची निर्गत झाली. तर १९१९ मध्यें अनुक्रमें १९८१९११७ व १९९८४८८५४ येन इतक्या किंमतीच्या मालाची निर्गत झाली. १९१२ त जपानमधून व परराष्ट्रामधून अनुक्रमें २६३५९४३४ येन, ४०७१६०१३ येन किंमतीची आयात झाली व १९१९ मध्यें अनुक्रमें ९५८६८६४० व १८८९१७९७८ येन किंमतीच्या मालाची आयात झाली.

शे त की व उ द्यो ग धं दे.—कोरिया हा केवळ शेतकीचा प्रदेश आहे. लागवडींत आलेली जमीन सरासरी ७७७०००० एकर आहे. पण शेतकी करण्याची पद्धत सुधारलेली नाही. तांदूळ, गहूं व इतर धान्यें होतात. कोरियांतून जिनसेंग नांवाची वनस्पति विपुल प्रमाणात होते. त्याची अधिक वाढ करण्याकरतां इ. स. १९०८ साली जपानेनें एक खास अधिकारी नेमला. तसेंच पिकांतील रोगाचा नाश करण्यासाठीं व शेतकीची वाढ करण्यासाठीं शेतकरी मंडळें स्थापण्यात आली. इ. स. १९०८–२० या अवधींत शेतकीला उपयुक्त जमीनीची इ. स. १९०८ सालापेक्षा चौपटीनें वाढ झाली व इ. स. १९२० साली जिनसेंग वनस्पतीचें उत्पन्न २०००००० येन झालें. मीठ तयार करण्याचें कामहि सरकारनें आपल्याच ताब्यांत घेतलें इ. स. १९१८ साली १०२३९६९४१ पौंड मीठ तयार झालें. १९२० साली याहीपेक्षां अधिक मीठ तयार करण्याचें सरकारनें प्रयत्न चालविले. तंबाखूचा व्यापार कोरियामध्यें फार प्राचीन काळापासून आहे; त्यांतहि बरीच प्रगति झाली आहे. इ. स. १९१९ मध्यें तंबाखूची लागवड ४२५.२५ एकर जमीनींत होत होती; व १४००११६९ येन इतक्या किंमतीची तंबाखू त्या साली तयार झाली.

मलबेरी झाडांची लागवड व रेशमी किड्यांची जोपासना याहि बाबतींत सरकारनें बरीच खटपट चालविली आहे. १९१८ रेशमी किड्यांचे कोशे ( १० ९०४२० )५०००००० येन किंमतीचें बाहेर गेले. तरी पण रेशमाचा व्यापार कोरियामध्यें अद्यापि बाल्यावस्थेंत आहे

गु रें ढो रें—गुराढोरांचीहि जोपासना कोरियात सर्व ठिकाणीं केली जाते. शेतकीच्या कामीं बैलांचा उपयोग करण्यात येतो. कोरियातील गाई दूध कमी देतात व यांचा मांसाकडेच उपयोग करण्यात येतो; गाईंची कातडीं बाहेर देशात मोठ्या प्रमाणात पाठवण्यात येतात. कोरियात चांगल्या प्रकारचे घोडे उत्पन्न होत नाहींत पण त्याबद्दल सरकारनें बरेच प्रयत्न चालविले आहेत तसेंच खेचरें, गाढवें, कोंबडी, मेंढ्या इत्यादि जनावरांचीहि चांगल्या प्रकारची निपज व्हावी याबद्दलहि सरकारची खटपट चालू आहे.

फळांच्या लागवडीसंबधानें समाधानकारक स्थिति आहे. इ. स. १९१० मध्यें पीअर, आपलें, चेसनट यांच्या झाडांची जितकी संख्या होती त्याच्या दुप्पट वाढ १९१८ त झाली आहे.

ख नि ज प दा र्थ—कोरिया जपानला जोडण्याच्या पूर्वी खनिज पदार्थ काढण्याचें काम बहुतेक परकीय राष्ट्रेंच करीत असत. इ. स. पूर्वी चार अमेरिकन, २ इंग्लिश व इतर राष्ट्रांच्या एक दोन कंपन्या यांनी खाणींचा धंदा व्यापून टाकला होता.कोरियात सोन्याच्या खाणीच मुख्यतः आहेत. इ. स. १९१६ च्या एप्रिल १ तारखेपासून जपानने परकीय लोकांना खाणीसंबधाचे हक्क देण्याचें बंद केलें. इ. स. १९१० पूर्वी ज्या कंपन्याकडे खाणी होत्या त्या कंपनींना मात्र हाकलून देण्यांत आलें नाहीं. सोनें, चांदी, जस्त तांबें, शिसें, लोखंड कोळसा इत्यादि खनिज पदार्थ कोरियांत सांपडतात इ. स १९१९ मध्यें खाणींपासून होणारें उत्पन्न २५४१४५१० येन झालें.

का र खा ने —कारखान्यांची कोरियात वाण आहे. तरी पण नवीन धंदे अस्तित्वांत येऊं लागले असून कापूस वटण्याच्या गिरण्या, तांदूळाचा भुसा काढण्याचा गिरण्या, विमेचे कारखाने अस्तित्वात येऊं लागले आहेत. वनगाई प्रांतांत क्युनिपो या ठिकाणीं लोखंडाचा कारखाना निघाला आहे. त्यांतून निरनिराळा लोखंडाचा माल २३५००० टन बाहेर पडतो. पल्प तयार करण्याचा कारखाना शिनविडर येथें निघाला असून कमरपट्टे, घोड्याच्या जिनाचें कातडें इत्यादि यांतही चांगली तयार होतात.

द ळ ण व ळ णा चीं सा ध नें —इ स पूर्वी कोरियांतील रस्त्यांची स्थिति अगदीं समाधानकारक नव्हती. पण

जपानने कोरिया आपल्या ताब्यात घेतल्यावर जवळ जवळ ५००० मैलांचा रस्ता तयार केला. १९१९–२० मध्यें कोरियांत ११४३ मैल रेल्वे झाले होते. १९१० पासून टपालगृहांचीहि वाढ फारच झाली आहे. इ. स. १९२० साली कोरियांत ५६२ पोस्टें होतीं ४८३० मैल इतक्या लांबून तारा चालू झाल्या आहेत.

इतिहासः—पूर्वी कोरिया देशांतले लोक अगदीं रानटी स्थितींत असून, दऱ्या खोऱ्यांत श्वापदाप्रमाणें रहात असत. या लोकांत अगदीं पहिल्यानें सुधारणा घडवून आणणारा पुरुष किटझेनामक चिनी गृहस्थ असून तो इसवी सनापूर्वी ११२२ मध्यें हजारों चिनी लोकांसह कोरियामध्यें आला व त्यानें येथील रानटी लोकांवर आपलें वर्चस्व प्रस्थापित करून त्यांच्यांत चिनी तऱ्हेची संस्कृति घडवून आणली. याच्या वंशजांनीं इसवीसनापूर्वी चवथ्या शतकापर्यंत राज्य केलें. पुढें इसवीसनानंतर १० व्या शतकापर्यंत अंतःकलहामुळें व परराष्ट्रीयांच्या स्वाऱ्यांमुळें हा देश त्रस्त झाला. तरी अशा अंदाधुंदीच्या काळांतहि लेखनकलेचा प्रादुर्भाव, वाङ्मयाची अभिवृद्धि, बौद्धधर्माचा प्रसार इत्यादि सुधारणा अबाधितपणें होऊं शकल्या. इ. स ९१३ मध्यें या देशांतील यादवींचा नायनाट 'वँग' नामक एतद्देशीय वीरानें करून, यांत राष्ट्रीय घटना घडवून आणली व याला 'कोरिया' हें नांव देऊन यांतील बौद्धधर्माला राष्ट्रीय स्वरूप दिलें. याच्या वेळीं कोरियाची राजधानी 'सॉंगडो' नामक शहरीं होती.

पुढें इ. स १३९२ मध्यें 'वँग' च्या घराण्याचें वर्चस्व लोपलें, व 'नि तैजो' अथवा 'लिटन' नामक राजाचा अंमल सुरू झाला. कोरियांत इ. स. १९१० पर्यंत जे राजे राज्य करीत आले, त्यांचा मूळ पुरुष हाच होय. यानें चीन देशाच्या त्या वेळच्या 'मिंग' नामक बादशहाशीं सख्य केलें, व त्याचें मांडलिकत्व पत्करून त्याच्याकडून 'कोरिया देशाचा सम्राट्' अशी मान्यता मिळविली. यानें सुरळीत राज्यव्यवस्थेकरितां जी योजना अमलांत आणली तीच इ. स. १८९५ पर्यंत या देशांत चालू होती. व सध्याहि कांहीं अंशीं चालू आहे. यानें कित्येक चांगल्या सुधारणा करून आणल्या. मानवयज्ञाच्या व वृद्धांना जिवंत गाडण्याच्या दुष्ट चाली बंद केल्या. चिनी वाङ्मयांत परीक्षा घेणें सुरू करून त्यांत जे उत्तीर्ण होत त्यांना राज्यांतील मोठमोठ्या हुद्द्यांच्या नोकऱ्या देण्याची पद्धत सुरू केली आणि चीनमधील 'कन्फ्यूशियस' धर्मगुरूंच्या शिक्षणविषयक, शासनविषयक व सामाजिक पद्धती अमलांत आणून 'कन्फ्यूशियस' पंथासच राष्ट्रीय धर्माचें स्वरूप दिलें. कोरियावर या सुधारणांचा पगडा पुढें पांच शतकांपर्यंत चांगला टिकला व येथील प्रजा सुखानें वास्तव्य करीत होती. पण नंतर कोरियाचें दुर्दैव ओढवलें आणि १५९२ इ. स १५९२ मध्यें जपानचें पारडें आलें. त्यास कोरियानें चीनच्या साहाय्यानें ६ वर्षेपर्यंत तोंड दिलें. पण अखेरीस यांतील 'स्किल' व बरींच जुनीं शहरें जपानच्या हस्तगत झालीं, जवळ जवळ सर्व देश ओसाड झाला आणि यांतील कलाकौशल्याचें भांडार व कलानिपुण पुरुष जपानमध्यें नेण्यांत आले. शेवटीं इ. स. १५९८ त कोरियाच्या 'फुसन' नामक बंदरांतील मालाचा व्यापार करण्याचा हक्क जपानला असावा आणि याशिवाय कोरियानें जपानला दरवर्षी मोठी खंडणी द्यावी, या अटींवर हें भयंकर युद्ध थांबलें या जबरदस्त आघातामुळें कोरियाची घडी जी एकदा बिघडली तिचा जम पुन्हा कधींच नीट जमला नाहीं.

नंतर, इ. स. १८६६, १८६७ व १८७१ या वर्षी फ्रेंच व अमेरिकन लोकांनीं या देशांत येऊन, धर्मप्रसाराच्या मिषानें कांहीं राजकीय धोरण लढवून आपली तुंबडी भरण्याचा प्रयत्न केला, पण त्यांना मुळींच दाद मिळाली नाहीं पुढें इ. स. १८७६ मध्यें चीन देशाच्या संमतीनें जपाननें कोरियाशीं तह घडवून आणला, व तहान्वयें 'फुसन' मध्यें आपला वसाहत करून व्यापाराचें ठाणें नीट बसविलें आणि इ स १८८० मध्यें 'वॉनसन' (गेनसन) व 'चेमुलपो' हीं दोन बंदरें व्यापाराकरितां करवून घेतलीं. इ स. १८८२ मध्यें चीननें आपले व्यापाराचे व सरहद्दासंबंधीं नियम प्रसिद्ध केले, आणि अमेरिकेनें कोरियाशीं व्यापारी तह जुळवून आणला. कोरियाच्या पडत्या काळाचा इतर राष्ट्रांनी असा फायदा घेतला, असें पाहताच यूरोपीय राष्ट्रांनीं आपलें घोडें पुढें दामटलें इ. स. १८८३ मध्यें जर्मनी व ग्रेट ब्रिटन' इ. स. १८८४ मध्यें इटली व रशिया, इ. स. १८८६ मध्यें 'फ्रान्स', आणि इ. स. १८९२ मध्यें 'ऑस्ट्रिया' या राष्ट्रांनीं कोरियाशीं व्यापारी तह केले; आणि 'सिऊल' राजधानीचें बंदर व्यापाराकरितां खुलें करवून घेतलें. इ. स. १८९७ व १८९९ च्या दरम्यानच्या अवधींत याच्या कारस्थानाचें वजन कोरियावर चांगलेंच पडलें व आणखी कांहीं बंदरें या परकीय व्यापाऱ्यांस खुलीं झालीं. एवंच सर्व कोरिया देश आतां परराष्ट्रीयांस मोकळा झाला.

आतां या राष्ट्रांशीं एकामागून एक झालेल्या व्यापारी तहांमोर्डींत जो काळ निघून गेला त्या अवधींत म्हणजे इ. स. १८८२ ते १८९७ च्या दरम्यान कोरियाची अंतःस्थिति कशी काय होती इकडे आपण वळूं. इ. स १८८२ त येथील बादशहाच्या बापानें म्हणजे तैवोन कुनानें कट करून जपानी वकिलाच्या ठाण्यावर हल्ला केला, पण तो यशस्वी न झाल्यामुळें त्याच्या नुकसानीच्या भरपाईदाखल कोरियाला फारच मोठी रक्कम जपानला द्यावी लागली नंतर यादवी माजून तींत कांहीं मुत्सद्दी मारले गेले व पुढें इ. स. १८९४ मध्यें तर मोठें बंड झालें. हें मोडण्याकरितां बादशहाला चीनची मदत मागावी लागली चीननें मदत पाठविली.

" पूर्वीच्या चीन व जपानमध्ये झालेल्या तहान्वये जपानने आपला हेतु कळविला जपाननेंहि ही संधि साधून आपलें सैन्य कोरियांत उतरविलें. सिऊल राजधानी व तहांत नमूद केलेलीं सर्व बंदरें आपल्या ताब्यात घेतलीं, आणि तें वड कायमचें माडण्याकरिता ज्या काहीं राजकीय सुधारणा पाहिजे होत्या, त्याचा मसुदा चीननें व जपाननें मिळून करावा अशी सूचना पुढें आणली. पण त्या सुधारणा कोरियानेंच कराव्या, त्यांत कोणीहि ढवळाढवळ करूं नये आणि ही सडजोड होण्याच्या पूर्वी जपाननें आपलें सैन्य कोरियांतून काढून घ्यावें असें त्या सूचनेस चीननें उत्तर मिळालें जपानला चीनची ही योजना पटली नाहीं,म्हणून ती त्यानें अमान्य केली व राजाच्या महालावर हल्ला करून तो आपल्या ताब्यांत घेतला याचा परिणाम असा झाला कीं, पुढें चीन व जपान यामध्यें युद्ध जुंपलें या युद्धांत जपानला विजय मिळाला, व कोरियांतील चीनचें वर्चस्व पार नष्ट होऊन त्याच्या जागीं जपाननें वर्चस्व प्रस्थापित झालें तेव्हांपासून पुढें कोरियामध्यें जपानी सल्लागारांच्या मदतीनें बऱ्याच चांगल्या सुधारणा अमलांत आल्या, आय व व्यय खातें सुधारण्यांत आलें, इतर खात्यांतील अवाढव्य खर्चाची योग्य छाटाछाट करण्यांत आली कराची आकारणी समतेच्या तत्वावर झाली, टपालाची व शिक्षण देण्याची पद्धत अमलांत आली, लग्न करण्याची वयोमर्यादा वाढविण्यात आली आणि आणखी इतर बारीक सारीक सामाजिक सुधारणा घडून आल्या एकूण कोरियाच्या राजकीय, सामाजिक, शिक्षणविषयक वगैरे सर्व बाबींत सुधारणा घडून आल्या व त्यांत जपानचा हात होता

पण हें जपानचें वजन फक्त १८ महिनेच टिकलें कारण इ स १८९५ च्या आक्टोबर महिन्यात ' तैवन कुनने " जपानी सैन्याच्या साहाय्यानें राजवाड्यावर छापा घातला व बादशहास कैद केलें परंतु पुढें चार महिन्यांनीं बादशहा तुरुंगातून निसटला व रशियाच्या वकिलाचें जेथें ठाणें होतें तेथें पळून गेला तो तेथें इ स १८९७ पर्यंत राहिला याचा परिणाम असा झाला कीं जपानचें कोरियामधील वजन कमी झालें, प्रतिगामी चळवळ सुरू झाली आणि बादशहानें रशियाच्या मदतीनें आपल्यावरील जपानचा दाब पार झुगारून देऊन आपली सत्ता पूर्ववत् अनियंत्रित करून घेतली या रशियाच्या ढवळाढवळीमुळें बादशहाच्या वाटलेल्या अनियंत्रित सत्तेचा परिणाम असा झाला कीं कोरियांत अंदाधुंदी माजली पुन्हा रशियाची जपानच्या कोरियामधील व्यापाराचा नाश करण्याची कावेबाज मसलत जारीनें चालूच होती यामुळें जपानला शेवटीं रशियाचे विरुद्ध हातीं शस्त्र धरावें लागलें या रुसोजपान युद्धात (१९०४-०५) जपान विजयी झाला व तेव्हांपासून त्याचें कोरियांत पूर्ववत् वजन प्रस्थापित झालें पण कोरियांतील लोकांना जपानचें वजन नको होतें त्यामुळें येथें वारंवार दंगे होत असत व बादशहाहि जपानविरुद्ध कट करीत असे पण शेवटीं इ स. १९०७ मध्यें बादशहाला अपयश येऊन आपले अधिकार आपल्या मुलाला द्यावे लागले एवढें झालें तरीहि कोरियाचें जपानला प्रतिगामी असलेलें वातावरण निवळेना तेव्हा इ स १९१० मध्यें हा देश जपाननें आपल्या पूर्ण ताब्यात घेऊन राजाला पदच्युत केलें आता कोरिया सर्वस्वी जपानचा आहे

१९१० च्या ऑगस्ट महिन्याच्या २९ व्या तारखेस कोरिया हें जपानी साम्राज्यांतर्गत संस्थान म्हणून ठरलें व त्याला पुरातन काळीं लावण्यांत येत असलेलें 'चोसेन' हें नाव पुन्हा देण्यात आलें जपानी साम्राज्याचा एक भाग झाल्यामुळें कोरियाचें स्वातंत्र्य नष्ट झालें तरी पण जपानी लोकांच्या राज्यपद्धतीशीं व प्रागतिक धोरणाशीं कोरियन लोकांचा निकट संबंध येऊं लागल्यामुळें कोरियाचीहि सर्वांगीण प्रगति अस्ते अस्ते होऊं लागली याच वेळीं कोरियांतील व कोरियाच्या बाहेरील इतर लोकांचा असा एक पक्ष होता कीं जो कोरियाचें स्वातंत्र्य नष्ट केल्याबद्दल जपानी लोकांवर एक सारखा जळफळत होता स्वातंत्र्यापुढें किरकोळ सुधारणा तुच्छ आहेत, स्वातंत्र्याशिवाय राष्ट्राची प्रगति व्यर्थ होय, असा प्रकारची विचारसरणी हा पक्ष मांडीत होता व त्यांत पुष्कळ तथ्य होतें ही गोष्टहि निर्विवाद आहे तथापि पारतंत्र्याच्या स्थितींतहि इतर काहीं दृष्टींनीं कोरियाची प्रगति होत होती हेंहि नाकबूल करून चालणार नाहीं कोरिया जपानला जोडण्यात आल्यावर त्याची राज्यव्यवस्था पहाण्याकरता जनरल टेराउची याला व्हाइसराय म्हणून नेमण्यात आलें व त्याच्या मदतीला यमागाटा याची नेमणूक झाली १९१६ मध्यें जनरल टेराउची याच्या जागीं जनरल काउंट हसेगवा हा आला कोरियामध्यें या सुमारास बरेच दंगे होत होते चोर व दरवडेखोरांच्या टोळ्या चहूंकडे पसरल्या होत्या त्यामुळें रहिवाश्याच्या जीवाला व मालमत्तेला वारंवार धोका पोंचत असे याचा बंदोबस्त करण्याकरता, काउंट हसेगवा यानीं पोलिस शिपाई व लष्करी शिपाई यांचें एकीकरण करून चोर, दरवडेखोर वगैरे लोकांवर धाक घालण्याची तरतूद केली १९१९ पर्यंत म्हणजे कोरिया जपानशीं जोडण्यात आल्यापासून सुमारें ८१९ वर्षे कोरियामध्यें अराजक लोकांचा विशेषसा त्रास नव्हता पण १९१९ सालीं मात्र अराजक लोकांच्या दंग्याला सुरवात होऊन असंतोषाचा वणवा चहूंकडे थोडक्या काळांत पसरला या दंग्याला व असंतोषाला दोन तीन कारणेंहि होतीं एक तर महायुद्धात समता व स्वातंत्र्य इत्यादि जीं उदात्त तत्वें विल्सन साहेबानीं पुढें मांडलीं त्यांचा प... कोरियन लोकांच्या मनावर होऊन आ... मिळावें अशी कोरियनांची साहजिकच...

दुसरें कारण म्हणजे जपानी लोकांनी राज्यकर्त्यांच्या नेहमींच्या वहिवाटीला अनुसरून कोरियामध्यें सुधारणा करण्याच्या व कोरियन लोकांना राज्यकारभारांत हक्क देण्याच्या बाबतींत हळू हळू मागचें पाऊल घेण्यास सुरुवात केली यामुळें अधिक असंतोष पसरून बऱ्याच ठिकाणीं दंगेधोपे झाले पण जपाननें सैन्याच्या जोरावर ते दंगे मोडून टाकले व कोरियन लोकांना सुधारणेचा हप्ता देण्याची त्यांनीं तजवीज केली. या हप्त्यात तीन चार प्रमुख गोष्टी होत्या (१) त्यावेळेपावेतों एखादा सेनापति हा कोरियाचा व्हाइसरॉय म्हणून राज्यारूढ होत असे, ती पद्धत यापुढें बंद होऊन सिव्हिलियन नेमण्याचें ठरलें (२) कोरियाचा व्हाइसरॉय यानें जपानच्या मुख्य प्रधानाला जबाबदार रहावयाचें ठरलें (३) सेनापतीचें काम स्वतंत्र अधिकाऱ्याकडे देण्यात यावयाचें ठरलें, (४) व लष्करी शिपायाच्या बदली साधे पोलिस हे शांतता ठेवण्याच्या कामीं नेमावयाचें ठरलें, त्याप्रमाणें जनरल हसेगवच्या जागीं बॅरन सैटो याची नेमणूक व्हाइसराय म्हणून झाली व त्याच्या मदतीला डॉ. मिझूनो याला देण्यात आलें याशिवाय शिक्षण, उद्योगधंदे व सिव्हिल सर्विस, या बाबतींत जपानी लोकांना जे हक्क होते तितकेच हक्क हळू हळू कोरियन लोकानांहि देण्यात येतील असें फर्मान जपानच्या त्यावेळच्या प्रधानानें (हाराने) प्रसिद्ध केलें अशा रीतीनें पुन्हा कोरियामध्यें कशीबशी शांतता प्रस्थापित झाली मधून मधून, जाळपोळ, मारामारी इत्यादि प्रकार स्वातन्त्र्येच्छू उर्फ अराजक लोकांनी चालू ठेवलेच होते, व १९२० सालीं तर जपानी वकिलाला, त्याच्या परिवाराला व इतर जपानी लोकांना कोरियन बंडखोरांनी ठार मारलें तरी पण हळू हळू हा असंतोष कमी होत होता.

महात्मा गांधींनी जशी हिंदुस्थानात असहकारिता पुकारिली तद्वत् कोरियन राष्ट्रीय पक्षानेंहि जपान सरकारशीं असहकारिता करण्याचें ठरविलें १९२३ च्या अखेरीस जपानात मोठा भूकंप झाला तेव्हां तेथील कोरियनांना या अनर्थाचे जबाबदार धरून त्यांचा अनुमाप छळ केला पण कोरियनांची मुस्कटदाबी केली गेल्यानें त्याचा जगात गवगवा झाला नाहीं या सर्व गोष्टींवरून कोरिया शांतपणें जपानच्या कबजांत फार दिवस राहीलसें वाटत नाहीं. [ चोसेन ( कोरिया ) राज्यपद्धतीचे वार्षिक अहवाल, ॲलनथिंग्स कोरियन मिशेस बिशप-कोरिया ॲंड हर नेबर्स, ग्रिफ्स-दि हर्मिट नेशन, हॅमिल्टन-कोरिया., लॉंगफोर्ड-दि स्टोरी ऑफ कोरिया ]

**कोरिया संस्थान**—मध्यप्रांतांतील एक मांडलिक संस्थान याचें क्षेत्रफळ १६३१ चौरस मैल आहे १९०५ पर्यंत या संस्थानचा अंतर्भाव बंगाल प्रांतांतील छोटा नागपूर संस्थान समूहात होत असे पण अलीकडे याचा समावेश मध्यप्रांतात होतो. सीमा उत्तरेस रेवा संस्थान, पूर्वेस सुरगुजा, दक्षिणेस विलासपूर जिल्हा व पूर्वेस चांगभकार व रेवा संस्थान आहे. स्वरूप --हें संस्थान डोंगरपठारावर वसलेलें आहे या पठाराची उंची समुद्रसपाटीपासून १८०० फूट उंच आहे. या पठाराच्या पूर्वभागात या पठारापेक्षांहि उंच असे सोनहाट नावाचें पठार असून त्याची उंची २४७७ फूट आहे. या पठाराच्या उत्तरभागात ल पठार सर्वांत अधिक उंच असून, त्याची उंची ३३६७ फूट आहे पश्चिमेकडील भागात बऱ्याच लहान मोठ्या टेंकड्यांची माळ गेली असून त्यांपैकीं एका टेंकडीचें देवगड नावाचें शिखर सर्वांत उंच असून त्याची उंची ३३७० फूट आहे सोनहाटच्या पठारावर पाण्याचे पुष्कळ प्रवाह असून ते निरनिराळ्या दिशेनें गेले आहेत. यापैकीं एक प्रवाह पश्चिमेकडे गोपद नदीकडे गेला आहे. ही गोपद नदी देवगडच्या शिखरामध्यें उगम पावून कोरयाच्या व चांगभकारच्या हद्दीच्या मधून वहात गेली आहे. दुसरा एक प्रवाह ईशान्येस शोणनदीकडे वहात गेला आहे तिसरा एक प्रवाह दक्षिणेकडे हेस्दो अथवा हसदो नदीला मिळाला आहे ही नदी कोरियांतील सर्वांत मोठी असी असून ती कोरियाच्या उत्तरदक्षिण भागातून वहात जाऊन महानदीला जाऊन मिळाली आहे ही नदी खडकाळ प्रदेशातून वहात गेली असून कित्येक ठिकाणीं तिचा एक धबधबा आहे. या संस्थानात पूर्वी रानटी हत्ती, वाघ इत्यादि हिंस्र पशूंचा भरणा असून त्यांचा त्रास या संस्थानातील खेड्यांना होत असे व त्यामुळें कित्येक खेडीं ओस पडलीं पण हल्लीं हे हिंस्र पशु बरेच कमी झाले आहेत. गवे, रानम्हशी, सांबर, नीलगाई, निरनिराळीं हरिणें, अस्वलें ही येथें नेहमीं आढळतात.

इ स १८१८ सालीं हें संस्थान ब्रिटिश सरकाराला मिळालें तत्पूर्वी, सुरगुजा संस्थानचे मांडलिक संस्थान म्हणून कोरिया नांदत होतें येथील संस्थानिक आपल्यास चव्हाण रजपुताचे वंशज म्हणवितात कित्येक शतकांपूर्वी चव्हाण कुलातील एका राजानें कोरिया जिंकून घेतलें व त्याच्या कुलातील आपण आहों असें ते म्हणतात इ. स. १८९७ मध्यें हें कुल वास्तविक नष्ट होऊन हल्लीं त्या कुलाशीं संबद्ध अशा एका कुलातील वंशज या संस्थानात राज्य करितात. या संस्थानिकांना ब्रिटिश सरकाराकडून राज्य करण्याची सनद इ. स. १८९९ सालीं मिळाली. येथील संस्थानिकावर छत्तीसगडच्या कमिशनरची देखरेख असते. जमीन महसूल, कर, न्याय, अबकारी इत्यादि खात्यांचा कारभार कमिशनरच्या सल्ल्यानें त्यांना करावा लागतो. संस्थानिकाचे न्याय देण्याचे अधिकार नियमित आहेत.

इ. स. १९११ सालीं या संस्थानची लोकसंख्या ८१,१०७ होती. संस्थानांत एकंदर ३०१ गांवें आहेत. सोनहाट पठाराच्या पायथ्याशीं असलेल्या सोनहाटगावीं येथील संस्थानिक रहातो

संस्थानात लोखंड सर्वत्र आढळतें पण खाणींवर संस्थानचा ताबा नसून ब्रिटिश सरकारचा आहे साखर, तंबाखू, मीठ, कापड, इत्यादि जिन्नस परठिकाणाहून या संस्थानात येतात व संस्थानातून तांदूळ, इतर धान्य व लाख या वस्तू निर्गत होतात संस्थानात सडकांचा अभाव आहे म्हटलें तरी चालेल पायवाटा पुष्कळ आहेत बैल वरून मालाची नेआण करण्यात येते संस्थानातील खालच्या वर्गाचे बहुतेक सर्व लोक शेतकीवरच रहातात संस्थानिकाच्या खालोखाल जमीनदार लोकांचा वर्ग असून जमीनदार ठराविक कर संस्थानिकाला देतात जमिनी वंशपरंपरा देण्याची पद्धत या ठिकाणीं आढळून येत नाहीं इ स १९०४–५ सालीं या संस्थानचा वसूल १८५० रुपये झाला व संस्थानचा खर्च १७३१० रुपये होता

कोरी —एक कोळी जात यांची वस्ती संयुक्तप्रांत (८,९०,६३६) व वऱ्हाड–मध्यप्रांत (३९,०२८) यांतून आहे एकंदर लो स (१९११) ९,१८,८२० आहे कौलिक म्हणजे परपरा त या संस्कृत शब्दावरूनहि कोळी हा शब्द बनलेला असावा अशी एक दंतकथा आहे कीं, कबीर गंगास्नानास जात असतांना त्याला वाटेंत एक कुमारी आड आल्यामुळे 'पुत्रवती भव' असा त्यानें तिला आशीर्वाद दिला परंतु ती कुमारी असल्यामुळें, कबीराची वाणी निराळ्याच रीतीनें खरी झाली त्या कुमारीच्या हातावर एक फोड झाला व त्यातून एक पुत्र निर्माण झाला तिनें त्यास गंगाकिनारीं ठेविलें व तेथील एका कोळ्यानें त्या मुलास सांभाळलें हा कोळी मुलगाच कोरी जातीचा मूळ पुरुष होय असें ते मानतात कारण तो 'कोरी' पासून झालेला होता या कथेसबंधीं एक दोहराहि या लोकांत प्रसिद्ध आहे खानेसुमारीवरून कोरी लोकांची मोठी संख्या असल्याचें दिसून येते अहारवार, बैस, भडौरिय, भाइनहार, बकार, धामन्, जइसवार, जादवा, ज्युरीया, करीरबन्सी, कैथिया, कामारिया, कनौजिया, कोरचामरा, कुष्टा, माहुरे, परतुतिया, साकरवार, रूसवार, इत्यादि मुख्य पोटजाती आहेत याशिवाय आणखी बऱ्याच पोटजाती आहेत खानेसुमारींत त्यांच्या जातिनामाची संख्या १०४० पेक्षा कमी नाहीं

चालीरीती व एकंदर वागणूक या बाबतींत कोरी लोक चांभारा(चामार)च्या दर्जाचेच आहेत हमिरपूर येथें वधूगृहप्रवेशाचा एक निराळाच प्रकार आढळून येतो घरांतील वृद्ध मनुष्य कांहीं पोळ्या तयार करतो व डुकरासह त्याचा नैवेद्य बाल्नाई देवीस दाखवितो नंतर 'निहारन'समारंभ झाल्यावर तीन पोळ्या वधूवरानीं पायाखालीं तुडवून गृहप्रवेश करावयाचा असतो हमिरपूर येथें लग्नाचे दलाल असतात व त्यांना एखादी धोतरजोडी बक्षीस देण्यात येते बालविवाह रूढ असून वराचें लग्न त्याच्या मेहुणीच्या नवऱ्यानें जुळवून आणावयाचें असतें हा जुन्या मातृकन्यापरंपरेचा अवशेष असावा काराओ विधीनं लग्न झालेल्या स्त्रीला राजरोस आपल्या नवऱ्याच्या घरीं जाता येत नाहीं काराओविधीनं विधवेला पुनर्विवाह करता येत नाहीं ब्राह्मण, रजपूत, वाणी कायस्थ, अहार, गडारिया कन्डा, कहार, मुर्जी, बारहाइ साठी व कुमा, इत्यादिकांना कोरी लोक आपल्या जातींत घेतात परंतु चांभार तेली धावा, बारी, धानुक इत्यादिकांना मनाई आहे एटावा येथें विधवेला नवऱ्याच्या ज्येष्ठ अगर कनिष्ठ बंधूशीं लग्नाची मुभा असते असें म्हणतात. अखिल कोरी समाज हिंदु आहे. फैजाबाद येथील कोरी रामदासी अथवा शिवनारायणी पंथाचे असून बिजनोर येथील कोरी लोक कबीरपंथाचे आहेत हीच स्थिति हमिरपूर येथें आढळून येते त्या ठिकाणीं सर्व धार्मिक विधी दुहितेच्या नवऱ्यानें करावयाचे असतात मातृकन्यापरंपरेचें हें दुसरें उदाहरण होय पश्चिमप्रांतातील कोरी झाहिरपारदेवाच्या व अम्रोहा आणि जालेसर येथील मियांणाची उपासना करितात पूर्वकडील कोरी पचावन पीर व सीतला माता यांना भजतात कोरी लोकांचा सामाजिक दर्जा फार हलका आहे मिर्झापूरचे ब्राह्मण काहार–कान्यांच्या हातचें पाणी पितात पण चामार(चांभार)कोऱ्यांचें पाणी वर्ज समजतात धावी चामार हे कमारकोऱ्यांच्या हातची कच्चा व पक्की रसोइ खातात व कालवारखेरीज सर्व वैश्यांच्या हातचाहि पक्की रसोइ खातात कोऱ्यांचा धंदा म्हणजे जाडाभरडा खादा विणणें हाच होय कांहीं कोरी नोकरी करतात व कांहीं जमिनीचे मालकहि असतात कुष्ट अथवा काष्टा हा कोऱ्यांचा एक पोटजात दक्षिणेंत विणकऱ्याचा धंदा करून उपजीविका करीत आहे मध्यप्रांतांत यांची वस्ती सागर दमो जबलपूर वगैरे जिल्ह्यांत आहे यास कोणी कोल लोकांची शाखा असें म्हणतात [ क्रूक, रसेल व हिरालाल, सेन्सस रि ]

कोरूना शहर —स्पेनमध्ये कोरूना प्रांताची राजधानी आहे येथील लो स १९११ सालीं ६० ४८३ होती येथून माद्रीड व ओपोर्टो या शहरांशीं प्रत्यक्ष दळणवळण आहे या शहराचा वरचा भाग व खालचा भाग असे दोन भाग आहेत वरचा भाग जुना असून त्याच्या भोंवतीं भिंता आहेत बंदर पूर्व भागात आहे व तें अनेक दुर्गांमुळें सुरक्षित आहे हरक्युलिस टावर उत्तरेस असून त्याची उंची ४०० फूट आहे त्यावर एक उत्तम फिरता दिवा आहे शर्तातील माल, दारू आणि मांसें हे येथील निर्गत मालाचे पदार्थ आहेत कारखान्यांत सरकारी तंबाखूचा कारखाना मुख्य असून बरेच लोक हेरिंग व सार्डीन मासे धरण्याच्या कामांत गुतलेले असतात मध्ययुगांत अथवा बहुधा त्यापेक्षांहि पूर्वी याला 'मारोनियम' म्हणत असत हें बंदर पूर्वीपासून नेहमींच फार महत्वाचें आहे परंतु इतिहासांत तें अलीकडेच दिसू लागलें इ स. १५८८ मध्यें 'अजिंक्य आरमार' (इन्व्हिन्सिबल आरमाडा)'ला या बंदरानें आश्रय दिला १५९८ मध्यें ब्रिटिशांनीं हें शहर काबीज केलें १७४७ व १८०५या सालीं ब्रिटिशांनीं फ्रेंच लोकांवर या ठिकाणीं जय मिळविला

१८२३ साली तें फ्रेंचाच्या ताब्यांत गेलें. १८३६ मध्यें कारलिस्टांनीं तें आपल्या ताब्यात घेतलें. स्पॅनिश अमेरिकन युद्धामुळें जेव्हां क्युबा व पोर्टोरिको ह्या वसाहती स्पेनच्या साम्राज्यातून गेल्या तेव्हां कोरुनाचें फार नुकसान झालें. कारण या वसाहतींशीं कोरुनाचा बराच व्यापार होता.

**कोरेगांव(१)** ता लु का—मुंबई इलाख्यातील सातारा जिल्ह्यातील एक तालुका. याचें क्षेत्रफळ १९११ साली २८५ चौरस मैल होतें. या तालुक्यांत एक गाव व ७३ खेडीं आहेत. रहिमतपूर(लो सं. ५८०६ )हेंच मोठें गाव आहे. कोरेगाव हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. १९११ मध्यें या तालुक्याची लो सं ७८,१५६ होती. १९०३-४मध्यें जमीनीचा वसूल २,२०,०००रुपये व सारा १२,०००रुपये होता. या तालुक्याचा दक्षिण भाग कायतो सपाट असून बाकीचा भाग उन्नतस्थल आहे. या तालुक्याची हवा निरोगी आहे. पर्जन्यमान ३० इंच आहे.

**कोरेगांव(२)**—मुंबई इलाख्यातील पुणें जिल्ह्याच्या शिरूर तालुक्यातील एक खेडें. हें पुण्याच्या ईशान्येस १६ मैलावर भीमा नदीच्या काठी वसलेलें आहे. या ठिकाणीं १८१८ सालीं जानेवारी तारीख १ ला इंग्रज व पेशवे यांच्यामध्यें युद्ध होऊन त्यात पेशवे व इंग्रज यांत चकमक होऊन तींत मेलेले इंग्रज शिपाई यांचें स्मारक म्हणून इंग्रजांनीं तेथें एक जयस्तंभ उभारला आहे. येथें एक लहानशी शाळा आहे.

**कोर्कु जात**—संयुक्तप्रांतातील एक मूळची जात. १९११ साली सर्व हिंदुस्थानात मिळून या जातीचे लोक जवळ जवळ २००००० होते. त्यांपैकीं मध्यप्रांतात व वऱ्हाडात मिळून १,५१,२६२ इतके होते. ही जात सातपुडा पर्वताच्या पश्चिमेस होशंगाबाद नेमाड व बैतूल जिल्ह्यात रहाते. कोर्कु याचा मूळ अर्थ ' मनुष्य जात ' एवढाच आहे. पण रूढीमुळें हें नाव एका विशिष्ट जातीलाच पडलें आहे. छोटानागपूरमधील कोरवा जात व ही कोर्कु जात एकच होय असें काहींचें मत आहे व तसें असण्याचा पुष्कळ संभवहि आहे. राजकोर्कु लोक हे आपणाला रजपुतांचे वंशज मानतात. एका हरिणाच्या पाठीमागें लागून उज्जनी सोडून पंचमढीच्या डोंगरात यांचे पूर्वज आले अशी आख्यायिका आहे. कोर्कु जातीच्या ४ पोटजाती आहेत त्या म्हणजे मोवासी, बावरिया, रूम व बोंडोय या होत. त्यांपैकीं पहिल्या दोन पोटजाती उच्च मानण्यात येतात. या दोन पोटजातींना राजकोर्कु असेंहि दुसरें नाव आहे. राजकोर्कु हे मुख्यतः जमीनदार असून त्यांची उच्च वर्गात गणना होत असल्यामुळें ब्राह्मण लोकांना त्यांच्या घरचें पाणी सुद्धा प्यावयास चालतें. मोवास हें नाव सातपुड्याच्या पश्चिम भागाला मराठ्यांनीं दिलें. मोवास याचा अर्थ ' त्रासदायक मुलूख ' असा आहे. या पश्चिम भागातील कोर्कु लोक हे फार साहसी व लुटारू म्हणून फार प्रसिद्ध होते. यामुळें त्यांना मोवास प्रदेशांत रहाणारे ते मोवासी हें नाव पडलें. बैतूल जिल्ह्यात बावरागड येथें राहणारे जे लोक त्यांना बावरिया असें नाव आहे. गोत्रांतरविवाहामुळें या प्रत्येक पोटजातीचे पुन्हा ३६ वर्ग झालेले आहेत; व या वर्गांची नावें झाडांच्या नावावरून बनलेलीं दिसतात. या वर्गातील लोकांत देवकपूजा प्रचारांत होती. पण हल्लीं एकदोन वर्गांशिवाय इतर वर्गांत ही चाल अगदीं लुप्तप्राय झालेली दिसते.

या वर्गांतील १० वर्ग असे आहेत कीं त्यांच्यामध्यें विधिपूर्वक विवाह ही असभ्य गोष्ट मानतात. पण या दहांशिवाय इतर वर्गांत लग्नें विधिपूर्वक करण्यात येतात. मुलाचा बाप मुलीच्या बापाला मुलीची मागणी करतो. नंतर मुलीच्या बापानें वर्ष-सहा महिने जाणूनबुजून ती मागणी नाकारावयाची व तेवढी मुदत टळल्यावर मग ती मागणी कबूल करावयाची अशी यांच्यात विचित्र चाल आहे. कन्यादानाबद्दल मोबदला म्हणून कन्येच्या पित्याला ५० रुपये दक्षिणा दिली जाते. एकदा का मुलीच्या लग्नाचा वाङ्निश्चय ठरला कीं मग लग्नाच्या अगोदर जरी मुलगी मेली तरी ही दक्षिणा वधूच्या पित्याच्या हातात पडलीच पाहिजे असा प्रघात आहे. वरात निघावयाच्या पूर्वी वर व वराच्या थोरल्या भावाची बायको हे एका कावळ्यावर उभे राहून एकमेकांना सात वेळा आलिंगन देतात. पूर्वीच्या बहुभर्तृक विवाहाचा हा अवशेष असावा असें दिसतें. नंतर वराच्या हातात एक चाकू अगर सुरी देण्यात येते व त्या सुरीच्या टोकाला एक लिंबू टोंचलेलें असतें. अमंगल अशा भुताखेतांना भिवविण्याकरितां ही चाल आहे असें म्हणतात. नंतर आपल्या आप्तेष्टासमवेत वर गावाच्या बाहेर जातो. तेथें बोरीच्या झाडाखालीं वर व त्याचे आईबाप बसतात. नंतर 'भुमका' ( जातीचा भगत ) हा त्या तिघाभोंवतीं व बोरीच्या झाडाभोंवतीं मिळून एक दोरी बांधतो. नंतर या झाडाला एक कोंबडीचा पक्षी, सुपें, वगैरे खाण्यासाठीं दिला जातो. एवढा प्रकार झाल्यानंतर वरपक्ष हा वधूच्या गावाला जाण्यास निघतो. वधूच्या गावाच्या नजीक आल्यावर गावाबाहेर वधूपक्षाची मंडळी एका ठिकाणी एक च मंडपाची बांधणी करतात. त्या ठिकाणीं वरपक्षाची व वधूपक्षाची मंडळी भेटतात. नंतर वधूपक्षाकडील मंडळी वरपक्षाचें स्वागत करते. वरपक्षाला वधूपक्षातील मंडळींना प्रत्येकाला या सत्काराबद्दल दोन पैसे दक्षिणा द्यावी लागते. नंतर गावांत आल्यावर वधूवरांचा विवाहसमारंभ साजरा केला जातो.

मृत्यूनंतर मृत मनुष्याला त्याच्या पूर्वजांच्या निवासस्थानांत रहातां यावें म्हणून काहीं विशिष्ट संस्कार करण्याची पद्धत आहे. मृत मनुष्याचे पितर हे मृत मनुष्याच्या प्रेताच्या आसपासच अदृश्य रहात असतात अशी यांची समजूत आहे. प्रेताला एका खड्ड्यांत ठेवून त्याच्या तोंडावर दोन पैसे ठेवून नंतर त्या शवास पुरण्यात येतें. जाळण्याचा मुळीच प्रघाताची चाल नाहीं. मरणानंतर काहीं दिवस लोटल्यावर मृताचे आप्तेष्ट मृताला पुरलेल्या जागेपाशीं जेवण

तेथें आल्यावर एका हळकुंडाचे लहान तुकडे करून त्यांपैकी एक तुकडा त्या जागेवर ठेवतात व उरलेले तुकडे एका फडक्यात बांधून ते घरी नेऊन येतात नंतर घराच्या मुख्य तुळईसाठी हे गाठोडे ठेवण्यात येतें कारण या ठिकाणी पितर राहतात अशी यांची समजूत आहे सेडोली नावाचा एक और्ध्वदेहिक विधि करावयाचा असतो तो १५ वर्षांच्या आत केव्हाहि करता येतो

कोर्कू लोक आपणाला हिंदुधर्मीय म्हणवितात यांचें उपास्य दैवत महादेव हें आहे पंचमढीच्या डोंगरात या महादेवाचें एक देवालय असून त्याची व्यवस्था पहाण्याचें काम या जातीतील दोन जमीनदाराकडे वंशपरंपरागत आहे याशिवाय डोंगरदेव, मुठादेव, कुनवरदेव इत्यादि पुष्कळ जातिदैवता आहेत प्रत्येक जातीचे उपाध्याय निरनिराळे असून त्या उपाध्यायांना भुमका असें नांव आहे यांना वाघ वश असतात अशी समजूत आहे. कोर्कू जातीचे लोक बांध्यानें मजबूत, उंच व काळ्या रंगाचे असतात हे प्रामाणिक व कसोटीचे असल्यानें शेतावर काम करण्यासाठी त्यांनाच पाठविण्यात येतें ते दरिद्री असून त्यांच्या अंगावर पुरेसा कपडादि नसतो त्यांची राहणी गलिच्छ आहे कोर्कू नावाची यांची एक स्वतंत्र भाषा आहे या जातीतील शेकडा ६० लोक ही भाषा बोलणारे आढळतात पण ही भाषा बोलणाऱ्यांची संख्या हल्ली हळूहळू कमी होत चालली आहे

**कोर्ट**—कोर्ट या इंग्रजी शब्दाचा मुख्य अर्थ कुंपण घातलेली खुली जागा असा आहे हल्ली याचा अंगण हा एक व न्यायसभा हा दुसरा असे दोन अर्थ प्रचारात आहेत

*इंग्लंड*—पूर्वी इंग्लंडमध्यें सर्व न्यायसभा नुसता न्याय निवाडा करणाऱ्या न हृत्या परगणान्यायसभा म्हणजे जमीनदार व काही अधिकारी अशांचें एक निवडक मंडळच होतें व या मंडळाला राजकीय, न्यायसभा व कायदेमंडळ या तिन्ही बाबतींत अधिकार चालत असे परंतु आता न्यायसभांना न्यायनिवाड्याशिवाय दुसरे कोणतेहि अधिकार राहिले नाहीत न्यायकचेरीतील प्रत्येक खटल्यात तीन पक्ष असलेच पाहिजेत एक वादी, दुसरा प्रतिवादी व तिसरा न्यायाधीश कायदेपंडितांच्या भाषेत बोलावयाचें म्हणजे न्यायाच्या बाबतीतील सर्व अधिकार राजाचे असतात आणि तो प्रत्येक न्यायकचेरीत हजर राहतो परंतु एकाच वेळेस निरनिराळ्या ठिकाणी हजर राहणे अशक्य असल्यामुळें, तो आपले प्रतिनिधी नेमतो ते न्यायाधीश होत त्यांचे अधिकार पार्लमेंट सभा अथवा लेटर्स पेटंट यांकडून मिळालेले असोत किंवा परंपरागत असोत, त्यांना राजाची संमति मिळालेली असते हा गोष्ट निर्विवाद आहे. पूर्वी न्यायनिवाडा करणें हें राजाच्या कामांपैकी एक काम असे आणि नवव्या एडवर्डच्या कारकीर्दीपर्यंत राजा त्याकरिता दौऱ्यावर जात असे पुढें स्वतंत्र न्यायसभा स्थापन झाल्यानंतरदेखील राजा व त्याचें सल्लागार मंडळ यांकडे काहीं अधिकार राखून ठेवले होते. इंग्लंडच्या राजाचें प्रत्यक्ष न्यायदानाचें शेवटलें कृत्य म्हणजे पहिल्या जेम्सनें चान्सरी व कॉमन लॉ या दोन कोर्टांतील तंटा तोडल्याचें होय पार्लमेंटरी राज्यपद्धति सुरू झाल्यापासून कोर्टाच्या अधिकारावर कायदेमंडळाचें नियंत्रण असतें व राजा त्या मंडळाचा सभासद असल्यामुळें त्याचा न्यायसभांशी अप्रत्यक्ष संबंध येतो

न्यायकचेऱ्यांचे निरनिराळ्या दृष्टीनें निरनिराळे भाग पडतात (१) पहिला भाग म्हणजे वरिष्ठ व कनिष्ठ हा होय कॉमनलॉ, चान्सरी व हायकोर्ट हीं वरिष्ठ कोर्टें होत व जिल्हा व परगणा हीं कनिष्ठ कोर्टें होत (२) दुसरा प्रकार म्हणजे दप्तरी व बिनदप्तरी कोर्टें पहिल्या प्रकारच्या कोर्टातील निवाडे व्यवस्थित व सविस्तर लिहिलेले असतात आणि ते नेहमी कायम ठेवतात त्या निवाड्यास कोणा हरकत लावू शकत नाहीं आणि ते निवाडे अबाधित असल्यामुळें त्याबद्दल कोणी शंका घेतल्यास त्यास शिक्षा करण्याचा त्या कोर्टास अधिकार आहे (३) कोर्टांचा तिसरा प्रकार म्हणजे दिवाणी व फौजदारी (४) चवथा प्रकार म्हणजे मुख्य खटले चालविणारी कोर्टें व निवाड्याचा विचार करणारें हायकोर्ट हें नवे खटले चालविते व कनिष्ठ कोर्टांच्या निवाड्यांचा फेरविचार करतें त्या कोर्टावर दुसरें अपील कोर्ट आहे व त्यावर लॉर्डांची सभा ही होय (५) यांच्या शिवाय वरील कोणत्याहि विभागात न पडणारीं किरकोळ कामाचीं कोर्टें होत उदाहरणार्थ —डरहम, लँकेस्टर येथील किरकोळ कामाचीं कोर्टें

फौजदारी कोर्टें—(१) सर्वांत खालच्या दर्जाचीं फौजदारी कोर्टें म्हटलीं म्हणजे जस्टिस आफ दि पीस ही पदवी मिळालेल्या लोकांनीं चालविलेल्या कोर्ट्या त्यांना बारीक सारीक गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार दिलेला असतो लंडनसारख्या मोठ्या शहरात पगारी मॅजिस्ट्रेट नेमलेले असतात जस्टिस ऑफ दि पीस हे मोठाले गुन्हे चौकशीकरिता वरिष्ठ कोर्टांकडे पाठवू शकतात (२) त्रैमासिक अदालतींना मोठ्या गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार दिलेला असतो या कोर्टांना जे खटले चालविता येत नाहींत त्यांची एक यादी प्रसिद्ध केलेली असते (३) या अदालतीं वर्षातून फक्त दोनदा एकेक परगण्यात काम करितात परंतु १८७६ व १८७७ च्या कायद्यानें

कायद्याच्या किंवा वस्तुस्थितीच्या मुद्यावर अपील करतां येते.

दिवाणी कोर्टे.—कांहीं किरकोळ बाबी सोडून दिल्यास दिवाणी स्वरूपाचे सर्व दावे परगणाकोर्ट व हायकोर्ट यापुढें चालतात. ज्युडिकेचर कायद्यानें फेरफार केल्यामुळें आतां दिवाणी कोर्टांची रचना खालीं लिहिल्याप्रमाणें आहे वरिष्ठ दर्जाचें एक कोर्ट आहे; त्याचें हायकोर्ट व अपील कोर्ट असे दोन कायमचे भाग आहेत पहिल्या म्हणजे हायकोर्टांत आरमारी, चान्सरी, घटस्फोट, किरकोळ व चान्सरी कोर्टांतील दावे वगैरे स्वरूपाचें काम चालतें आणि अपील कोर्टाकडे सर्व दर्जाच्या कोर्टांकडील अपिलाचें काम असतें लॉर्डांच्या सभेनें इंग्लंडच्या कोर्टावरील अपिलाचा विचार केला जातो (१८७६ च्या कायद्यान्वयें) आणि ज्यावेळेस पार्लमेंट सभा बरखास्त किंवा अनिश्चित कालपर्यंत तहकूब झाली असेल त्यावेळेस स्कॉटलंड व आयर्लंडमधील अपिलें ऐकण्याचें काम चालतें. इंग्लंडमधील न्यायखात्याचा हा एक विशेष आहे कीं, तथील सर्व कोर्टें एकाच सत्तेपासून म्हणजे राजा व त्याचें सल्लागार मंडळ यापासून उत्पन्न झालीं. इतर कामात राजा व त्याचें मंडळ हेंहि काम करीत असे. पुढें क्युरिआ रेजिस म्हणून एक मंडळ निर्माण झालें व त्याला फक्त न्यायाचेंच काम दिलें. जमीनमहसुलाच्या बाबतींत उत्पन्न होणाऱ्या तंट्याचा निवाडा करणारें एक्सचेकर नावाचें स्वतंत्र कोर्ट निर्माण झालें. मॅग्नाचार्टाच्या योगानें राजा नसेल अशा ठिकाणीं देखील कोर्टें भरविण्यास सुरवात झाली व किरकोळ दाव्यांचीं कोर्टें स्थापन झालीं. क्युरिआ रेजिस याची वसुली आणि किरकोळ हीं दोन उपांगें झाल्यावर राजाचें म्हणून एक स्वतंत्र कोर्ट झालें, त्याला किंग्ज बेंच म्हणतात. अशा रीतीनें एकाच सत्तेपासून सारख्या अधिकाराचीं तीन कोर्टें अस्तित्वात आलीं. परंतु राजाचा न्यायाच्या बाबतींत वरिष्ठ अधिकार शिल्लक राहिलाच व तो न्यायाध्यक्षाकडे गेला. याच पद्धतीवर इ.स. १८३३ सालीं स्थापन झालेलें प्रिव्ही कौन्सिल होय. याकडे वरिष्ठ कोर्टाचे सर्व अधिकार आहेत. लॉर्डांच्या सभेला जो अपिलें ऐकण्याचा अधिकार आहे तो पूर्वीच्या राष्ट्रीय मंडळाचा अवशेष आहे.

अमेरिकन संयुक्त संस्थानें.—या ठिकाणची न्याय पद्धति तेथील राज्यघटनेनें कायदेमंडळ आणि अम्मल बजावणी खातें यापासून स्वतंत्र अशी केली आहे. तेथील कोर्टें तीन प्रकारचीं आहेत ( १ ) मुख्य कोर्ट, ( २ ) फिरतीं कोर्टें ( ३ ) व जिल्हा कोर्टें पहिलें तेथील शासनपद्धतीनें निर्माण केलें आहे. त्या कोर्टांत इ. स. १९०९ सालीं नऊ न्यायाधीश होते ते अध्यक्षाच्या शिफारशीनें मुख्य सभेनें नेमले होते. त्यांची नेमणूक तहाहयात असते व फक्त गैर वर्तणुकीमुळेंच त्यांना कामावरून दूर करता येतें. या रीतीनें त्याच्या नेमणुका इंग्लंडमधील न्यायाधिशांच्या नेमणुकांपेक्षा जास्त भक्कम पायावर झालेल्या असतात. हें कोर्ट वाशिंग्टन येथें भरतें.व ते मुख्यतः दरवर्षी भरतें.

सेशन्स राजधानीच्या ठिकाणीं भरवितात. या ठिकाणीं असा एक नियम आहे कीं, कोणताहि निकाल बहुतेक न्यायाधिशांनीं मिळून सांगितला पाहिजे. यामुळें कोर्टांमध्यें एकापेक्षां जास्त न्यायासनें होऊं शकत नाहींत. या नियमामुळें प्रत्येक खटल्याची जरी कसून चौकशी केली जाते तरी न्यायदानाच्या बाबतींत दिरंगाई होते. प्रत्येक खटल्याचा दोनदां विचार केला जातो प्रथम मताधिक्य कोणत्या बाजूस आहे हें ठरविण्याकरिता प्रत्येकास विचार करावा लागतो व तें निश्चित झाल्यावर कोर्टानें तें कायम करण्याच्या वेळीं त्याचा पुन्हां विचार केला जातो

शासनपद्धतीनें दिलेल्या अधिकारान्वयें तेथील राष्ट्रीय सभेनें कनिष्ठ कोर्टें निर्माण केलीं आहेत. एकंदर एकोणतीस न्यायाधीश मिळून निरनिराळ्या नऊ टापूंत काम करतात. आणि प्रत्येक टापूवरची देखरेख वरिष्ठ कोर्टाच्या एकेका न्यायाधिशाकडे दिलेली असते या कोर्टावरील अपील कोर्टांत तीन न्यायाधीश असतात. (१) वरिष्ठ कोर्टांतील, (२) परगणा कोर्टांतील व (३) फिरत्या कोर्टांतील. कांहीं खटल्यावर खालच्या कोर्टांतून वरिष्ठ कोर्टांत अपील करता येतें व कांहींत खालच्या अपीलकोर्टाच्या निकालाविरुद्ध वरिष्ठ कोर्टाकडे अपील करता येतें. जिल्हाकोर्टें एकंदर नव्वद आहेत. बहुतेकांत एकच न्यायाधीश असतो. त्या ठिकाणीं स्थानिक सरकाराविरुद्ध असलेल्या तक्रारी ऐकण्याकरिता एक निराळें कोर्ट निर्माण केलें आहे. हें एक न्यायखात्याचा भाग नसून राष्ट्रीय सभेनें न्यायखात्याचें काम कमी करण्याकरिता निर्माण केलें आहे.

अधिकाराच्या बाबतींत संयुक्त कोर्टें व संस्थानी कोर्टें यांत फरक आहे. संयुक्त कोर्टाकडे फक्त पुढीलप्रमाणें कामें असतातः—( १) संयुक्त संस्थानाचे कायदे, त्यांच्या संमतीनें केलेले तहनामे व यांच्या बाबतींत उद्भवणारे कायद्याचे प्रश्न, (२) वकिलाती किंवा सार्वजनिक प्रधान, (३) समुद्रमर्यादा, (४) ज्या भांडणांत संयुक्तसंस्थानें हा एक पक्ष आहे; (५) दोन संस्थानें एक संस्थान व दुसऱ्या संस्थानाची प्रजा, निरनिराळ्या संस्थानांतील प्रजा, संस्थान किंवा त्यांतील प्रजा, संस्थान किंवा त्याची प्रजा आणि परराष्ट्र किंवा त्यांतील प्रजा यामध्यें असलेले खटले. परराष्ट्रावरोबर असलेल्या खटल्याचे बाबतींत हल्लीं वरील कोर्टांचे अधिकार जरा संकुचित केले आहेत. वरिष्ठ कोर्टाचा अधिकार हा वकिलाती आणि संस्थानासंस्थानांतील तंटे यांच्या बाबतींत मुख्य चौकशीकोर्टासारखा आहे व इतर बाबतींत अपील कोर्टाचा आहे. जर एखाद्या संस्थानीकोर्टापुढें चाललेल्या खटल्यांत कायद्यासंबंधी कांहीं प्रश्न उपस्थित झाला व त्या कायद्याचें म्हणणें अमान्य झालें तर पक्षकारास आपला खटला फेडरल कोर्टाकडे वर्ग करून घेतां येतो. जर एखाद्या खटल्यांत एखादा तह, संयुक्त संस्थानाचे अधिकार, एखादा कायदा, किंवा त्यांची

पुनरावृत्तना किंवा राज्यघटनान्वयें मिळालेली पदवी, अधिकार वगैरे यासंबंधीं वाद असेल त्या वेळेस सर्व खटले वरिष्ठ कोर्टाकडे वर्ग करण्यात येतात

राष्ट्रीय सभेचा एखादा कायदा किंवा संस्थानी कानू घटनेबरोबर किंवा चूक म्हणण्याचा जो अधिकार फेडरेशनच्या घटनेनें वरिष्ठ कोर्टाला दिला आहे हेंच अमेरिकेंतील न्याय पद्धतीचें वैशिष्ट्य आहे कारण असा अधिकार त्या कोर्टास लोकांनींच दिला आहे. फेडरेशनच्या घटनेशीं विसंगत असलेले सर्व कायदे रद्द आहेत असें म्हणण्याचा अधिकार वरिष्ठ कोर्टाला आहे व तो असणें जरूर आहे. फेडरल कोर्टें घटनेसंबंधी प्रश्नावर कधींहि आपलें मत देत नाहींत. कोर्टापुढें जर तोच प्रश्न असेल तर चालू खटल्यापुरतेंच मत देतात.

हिंदुस्थानांत.— हायकोर्टें हीं हिंदुस्थानसरकारच्या हुकमानें स्थापन झालीं आहेत. त्यांचा अधिकार त्या त्या प्रांतातील दिवाणी किंवा फौजदारी वगैरे सर्व कोर्टांवर चालतो. हायकोर्टांना इलाख्याच्या शहराच्या हद्दींतील दिवाणी अगर फौजदारी स्वरूपाचे सर्व दावे अगर खटले चालविता येतात. त्या मर्यादेच्या बाहेरील पांच हजारावरील दाव्यांतील सर्व अपिलें व त्याच्या आंतील दाव्यांतील जिल्हा जज्जाकडील अपिलाच्या निकालाविरुद्ध अपिलें करण्याचा अधिकार आहे व त्या मर्यादे बाहेरील फौजदारी खटले इच्छा अगर जरूर असल्यास आपल्याकडे घेतां येतात. इलाख्याच्या ठिकाणीं सुद्धां दिवाणी अगर फौजदारी स्वरूपाच्या खटल्याशिवाय आरमारी, नादारी, घटस्फोट, मृत्युपत्रें वगैरे सर्व स्वरूपाचे दावे चालविण्याचा अधिकार आहे सर्व हायकोर्टांत जास्तींत जास्त पंधरा न्यायाधीश नेमण्याचा अधिकार विलायतच्या राजाकडे आहे. त्यांपैकीं एक सर न्यायाधीश असतो. त्यांपैकीं एकतृतीयांश इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील असावे लागतात, एकतृतीयांश विलायतेंतील बॅरिस्टरपैकीं असावे लागतात व बाकीचे त्या त्या हायकोर्टांतील पांच वर्षें काम केलेल्या बॅरिस्टरांतून किंवा दहा वर्षें काम केलेल्या वकिलांतून निवडतात. हे न्यायाधीश हिंदुस्थानांतील सरकारास जबाबदार नसतात. हायकोर्टांच्या कामाकरितां निरनिराळे भाग केलेले असतात एका न्यायाधिशाकडे हायकोर्टाच्या दिवाणी स्थलमर्यादेंतील दिवाणी दावे ऐकण्याचें काम दिलेलें असतें. मुंबई इलाख्यांत ते दावे दोन हजारापेक्षां जास्त किंमतीचे असावे लागतात. त्याच्या निकालाविरुद्ध अपील प्रिव्ही कौन्सिलकडे असतें. एकाकडे मृत्युपत्रें, आरमारी, वारसा वगैरे संबंधी कामें असतात. इलाख्यांतील दुसरीं अपिलें ऐकण्याकरितां सर न्यायाधीश व एक मदतगार असे असतात. एकाकडे मधून मधून फौजदारी सेशन ऐकण्याचें काम दिलेलें असतें वरील स्वरूपाच्या एकेका कोर्टानें काम होत नसेल तर एकेका स्वरूपाचीं दोन दोन तीन तीन कोर्टें सुरू करण्याचा अधिकार सरन्यायाधिशास आहे. त्याचप्रमाणें इलाख्याच्या ठिकाणीं व जेथें जरूर आहे अशा मोठाल्या व्यापाराच्या शहरीं किरकोळ दाव्यांचें एक निराळें कोर्ट स्थापन केलेलें असतें. त्या कोर्टांत फक्त पैशाच्या देवघेवीचे खटले संक्षिप्त पद्धतीनें चालतात. मुंबईस याची आर्थिक मर्यादा दोन हजार रुपये आहे, पुणें व अहमदाबाद या ठिकाणीं एक हजार रुपये आहे ही मर्यादा इतर जिल्ह्यांत सबजज्जास पांचशें रुपयेपर्यंत देवघेवीचे दावे संक्षिप्त पद्धतीनें चालविण्याचा अधिकार हायकोर्ट जरूर तेथें देतें. त्याच्या निकालावर अपील नसतें. हायकोर्टामार्फत फेर चौकशी होते मध्यप्रांत व सिंधप्रांत या ठिकाणीं ज्युडिशिअल कमिशनरचीं कोर्टें आहेत. त्यांचे निकालाविरुद्ध अपील प्रिव्ही कौन्सिलकडेच होतें परंतु त्यांना हायकोर्ट म्हणत नाहींत रंगून येथें चीफ जज्जाचें कोर्ट आहे. प्रिव्ही कौन्सिलचे निकाल हिंदुस्थानांतील सर्व कोर्टांवर बंधनकारक असतात. हायकोर्टाचे निकाल त्याच्या अधिकारांतील सर्व कोर्टांवर बंधनकारक असतात परंतु एकाचे दुसऱ्यावर बंधनकारक नसून शिफारसीपुरते असतात प्रत्येक हायकोर्टाचा त्या त्या प्रांतांतील वकीलांवर धाक असतो अधिकार चालतो व वाईट वर्तणुकीकरितां सनदा रद्द करतां येतात योग्य न्यायाकरितां कोणत्याहि मनुष्यास कोर्टांत येऊन जबानी देण्यास भाग पाडण्याचा अधिकार कोर्टास असतो. त्याचप्रमाणें कोर्टांत काम चालू असतां कामास अडथळा केल्यास किंवा जबानी देण्याचें नाकारल्यास किंवा जबानी देतांना उद्धामपणा केल्यास त्यास दोनशें रुपये दंड व दंड न दिल्यास एक महिना शिक्षा देण्याचा अधिकार दिवाणी, फौजदारी व मुलकी या सर्व कोर्टांस आहे. हायकोर्टाची न्यायदानाच्या बाबतींत बेअदबी केली गेल्यास गुन्हेगारास अनियमित शिक्षा देण्याचा अधिकार हायकोर्टास आहे.

दिवाणी कोर्टें.—हिंदुस्थानांत हल्लीं कलकत्ता, मद्रास, मुंबई, अलाहाबाद, पाटणा, लाहोर ( सिंधप्रांत, मध्यप्रांत ) या ठिकाणीं हायकोर्टें आहेत. हीं निरनिराळ्या वेळीं स्थापन झालीं आहेत. त्यांच्या मर्यादेंत त्यांच्या अधिकाराखालीं निरनिराळीं कोर्टें आहेत प्रत्येक जिल्ह्यांत एक जिल्हा कोर्ट, एक सबजज्ज कोर्ट ( पहिला वर्ग मुन्सफ ) व जरूर तेवढीं मुन्सफ कोर्टें असतात. ( बहुतकरून प्रत्येक तालुक्यांत एक ) व तीं स्थापण्याचा प्रांतिकसरकारास अधिकार आहे.

अधिकार.—जिल्हाकोर्टाला कांहीं विशिष्ट फिर्यादी चालवितां येतात व पालन करणार नेमणें वगैरे किरकोळ कामें करतां येतात बाकीच्या म्हणजे ज्यांची किंमत पांच हजार रुपयाच्यापेक्षां कमी आहे अशा दाव्यावरील अपिलें ऐकण्याचा अधिकार त्यास आहे सबजज्जाला ( यास कांहीं प्रांतांत मुन्सफ वर्ग एक असें म्हणतात ) दिवाणी स्वरूपाचे वाटेल त्या किंमतीचे दावे चालवितां येतात मुंबई सबजज्ज वर्ग दोन यास पांच हजार रुपये

दिवाणी स्वरूपाचे कोणतेहि दावे चालविता येतात मद्रास इलाख्यात ही मर्यादा अडीच हजार रुपये आहे व बंगालमध्ये एक हजार रुपये आहे. त्याची क्षेत्रमर्यादा ज्या तालुक्याकरिता ते नेमलेले असतात त्या तालुक्यापुरती असते. सबजज्जाच्या अधिकाराची क्षेत्रमर्यादा सर्व जिल्ह्याइतकी असते. ज्या दाव्याच्या निकालावर कायद्यानें अपील आहे अशा पाच हजार रुपये किंमतीच्या दाव्याच्या निकालावर जिल्हाजज्जाकडे अपील करता येतें पाच हजारापेक्षा जास्त किंमतीच्या दाव्यांतील अपिलें त्या त्या इलाख्याच्या हायकोर्टाच्या निकालाविरुद्ध विलायतेंतील प्रिव्ही कौन्सिलकडे अपील करता येतें परंतु त्यात दाव्याची किंमत दहा हजार रुपयांपेक्षा जास्त पाहिजे किंवा कायद्याचा महत्वाचा प्रश्न असून हायकोर्टानें शिफारस केली पाहिजे

फौजदारी कोर्टें:—हिंदुस्थानात प्रत्येक इलाख्यात एक एक हायकोर्ट आहे त्याच्या देखरेखीखालीं पुढील फौजदारी कोर्टें आहेत, ( १ ) सेशन कोर्ट, ( २ ) इलाखा मॅजिस्ट्रेट कोर्ट, ( ३ ) पहिला, दुसरा व तिसरा वर्ग मॅजिस्ट्रेट कोर्टें हीं होत प्रत्येक प्रांताला एक सेशन कोर्ट असतें प्रांत म्हणजे बहुतेक सर्व ठिकाणीं जिल्हा होय. परंतु कांहीं ठिकाणीं दोन जिल्हे मिळून एकच सेशन कोर्ट असतें व त्याला प्रांत म्हणतात. इलाख्याचें ठिकाण हें एक जिल्हाच समजलें जातें व स्वतंत्र जिल्ह्याप्रमाणें त्या ठिकाणीं कोर्टें असतात. प्रांतिक सरकारास हिंदुस्थान सरकारच्या परवानगीनें जिल्ह्याची संख्या किंवा मर्यादा ठरविता येते जिल्ह्याचे भाग मात्र स्वतंत्रपणें पाडता येतात प्रत्येक सेशनच्या विभागात एक एक सेशनजज्ज नेमण्याचा अधिकार प्रांतिक सरकारास आहे. त्याचप्रमाणें सेशन जज्जास जोडीदार किंवा मदतगार देण्याचाहि किंवा एकास दुसऱ्या भागातील सेशन जज्जाचा मदतगार नेमण्याचा अधिकार आहे.

प्रत्येक जिल्ह्यामध्यें एक पहिल्या वर्गाचा मॅजिस्ट्रेट इलाखामॅजिस्ट्रेट म्हणतात. त्यांपैकीं एक मुख्य असतो. त्याची नेमणूक प्रांतिक सरकार करतें. त्याच्या अधिकाराची क्षेत्रमर्यादा इलाख्याचे शहर, त्या ठिकाणीं बंदर असल्यास तेथें व एखादी जहाजें चालण्यासारखी नदी जर त्या ठिकाणीं येऊन मिळत असेल तर तिच्या खाडींत इतकी आहे. अशांपैकीं दोन किंवा दोहोंपेक्षा जास्तजणांचें बेंच नेमता येतें याचप्रमाणें इलाखा शहराच्या ठिकाणीं हिंदुस्थान सरकार किंवा प्रांतिक सरकार यांनीं नेमलेले जस्टिस ऑफ दि पीस असतात

अधिकार.—हिंदुस्थानच्या फौजदारी गुन्ह्याच्या कायद्यात दिलेल्या सर्व गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार हायकोर्ट व सेशन कोर्ट यांना व गुन्ह्याच्या चौकशीच्या कायद्याच्या [illegible] व्या परिशिष्टात दिलेल्या एखाद्या कोर्टास आहे ब्रह्मदेश, औंध, मध्यप्रांत, कुर्ग–आसाम आणि सिंध या ठिकाणीं फाशीच्या शिक्षेशिवाय इतर शिक्षा असलेल्या सर्व गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार पहिला वर्ग मॅजिस्ट्रेटांस देण्यात येतो हायकोर्टाला फौजदारी गुन्ह्याच्या कायद्यात सांगितलेली वाटेल ती शिक्षा देण्याचा अधिकार आहे सेशन जज्जालाहि तितकाच अधिकार आहे; परंतु फाशीच्या शिक्षेला मात्र हायकोर्टाची परवानगी लागते. त्याच्या मदतगारास फाशी, सात वर्षें काळेंपाणी किंवा तुरुंग याशिवाय बाकीची कोणतीहि शिक्षा देता येते.

इलाखा मॅजिस्ट्रेट किंवा पहिला वर्ग मॅजिस्ट्रेट यांना दोन वर्षें तुरुंग, एक हजार रुपये दंड किंवा फटके इतकी जास्तींत जास्त शिक्षा देता येते. दुसरा वर्ग मॅजिस्ट्रेटांना सहा महिने तुरुंगवास, दोनशें रुपये दंड व कायद्यानें देता येण्याइतका एकांतवास इतकी जास्तींत जास्त शिक्षा देता येते. पण तिसरा वर्ग मॅजिस्ट्रेटास एक महिना तुरुंग आणि पन्नास रुपये दंड इतकी जास्तीत जास्त शिक्षा देता येते. वरील सर्व मॅजिस्ट्रेटांना गुन्हेगारानें दंड न दिल्यास शिक्षा देता येते. मात्र

निकालाविरुद्ध अपील सेशन जजाकडे असते. सेशनजज किंवा इलाखा मॅजिस्ट्रेट यांचे निकालाविरुद्ध अपील हायकोर्टाकडे व हायकोर्टाच्या निकालाविरुद्ध प्रिव्ही कौन्सिलकडे अपील करण्याचा हक्क अलीकडे बंद केला आहे. [ ले. रा. द. गो. फडके ].

**कोर्टरॉय**—बेलमम. या शहराची लोकसंख्या १९०४ साली ३४,५६४ होती. येथें उत्तम मलमल तयार होते. शिवाय फीतकामसुद्धां येथें बरेंच होतें. जुन्या कोर्टरॉय शहराची लोकसंख्या २,००,००० होती. १३०२ मध्यें येथें मोठी लढाई झाली, तींत फ्रेंचाचा पराभव झाला. या लढाईत फार शें सोन्याचे (नाइटाचे) मंजेन सापडले. येथील फार प्रसिद्ध इमारत नाट्रेडेम ही आहे. ही १२११ मध्यें बांधली. येथें वॅन डिक यांचें उत्तम चित्र आहे. कोर्टरॉय हें शहर रोमन कोर्ट्राकमपासून झालें आहे. हें शहर नॉर्मन लोकांनी उध्वस्त केलें. पण तिसरा बाल्डीन यानें हें पुन्हा वसविलें व वाढविलें. पण दजयेकच्या लढाईनंतर फ्रेंचानीं हें शहर पुनः जाळून पोळून फस्त केलें. परंतु बरगंडीचा ड्यूक फिलिप दि बोल यानें नें पुन्हा बांधलें.

**कोर्डोफान**—हा ईशान्य आफ्रिकेंतील आंग्लो ईजिप्शियन सुदानचा एक प्रांत आहे. या प्रांताचें क्षेत्रफळ १,३०,००० चौरस मैल असून याच्या पश्चिमेस डारफुर, उत्तरेस बायुडाचें माळरान, पूर्वेस व्हाइट नाइल प्रांत आणि दक्षिणेस शीलुक्स लोकांचा व इतर निग्रो जातींचा देश आहे.

कोर्डोफानचा बराचसा भाग उन्नतावनत मैदानाचा बनलेला असून, निर्जन, रूक्ष व ओसाड असा आहे. हत्ती, गेंडे, सिंह, चित्ते, चलवीट, म्हशी, ससे इत्यादि प्राणी येथें आहेत. येथील पुष्कळ जिल्ह्यांतून लोखंड सापडतें पण सर्पणाच्या अभावामुळें तें सापडून न सापडून सारखेंच आहे.

रहिवाशी.—इ. स. १९०३ सालीं येथील लोकसंख्या ५,५०,००० होती. रहिवाशाचे साधारणतः दोन वर्ग करिता येतील, (१) मैदानावरील अरब लोक व (२) डोंगरावरील न्युबाज. मैदानावरील बरेचसे गावकरी संमिश्र रक्ताचे आहेत. कित्येक लहान लहान टोळ्यांतील जाती मूळच्या निग्रो रहिवाशांच्या वंशज आहेत असें सांगतात. गोवामा ही एक महत्वाची जात होय. डार हमींद व बेडेरिआ या जाती हिच्या खालोखाल येतात. फिरत्या व कळपवाल्या अरबांचेहि दोन वर्ग करिता येतील. उंटवाले अरब व गुराचे कळप पाळणारे अरब यापैकी उंटवाले अरब उत्तरेकडे रहातात व दुसरे म्हणजे बागारा हे दक्षिणेंत राहतात. बागारा हे उत्तम शिकारी आहेत. भाले व रुंद पात्याच्या तलवारी हीं यांचीं शस्त्रें होत. न्युबाज लोकांच्या पुष्कळ पोटजाती आहेत. प्रत्येक जात आपल्या राजाच्या अंमलाखालीं असते. न्यूबाज लोकांचा वंश फार प्राचीन होय. हे लोक काळे, ठेंगण्या बांध्याचे व स्पष्ट निग्रो लक्षणाचे आहेत. उत्तरेकडील डोंगरांतहि कृष्णवर्णाचे व लॉकरीसारख्या केसाचे लोक आहेत, पण याचे अवयव निग्रो लोकांसारखे नाहीत. हे आरबी भाषा बोलतात व याना न्यूबाअरब लोक अशी संज्ञा आहे. एल ओबेद हें या प्रांताच्या राजधानीचें शहर होय. निरनिराळे व्यापारी रस्ते या शहरीं येऊन मिळतात. खार्टुमपासून सेन्नारमधून येथें रेल्वे आलेली आहे.

इतिहास.—कोर्डोफानच्या प्राचीन इतिहासाविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. येथें केव्हांहि स्वतंत्र राज्य नव्हतें. १६ शतकाच्या सुरुवातीस हा प्रांत फुंज साम्राज्याच्या अमलाखालीं होता. त्या शतकाच्या अखेरीस डारफुरच्या सुलतानानें हा प्रांत जिंकिला. १७७५ च्या सुमारास तो फिरून फुंज साम्राज्याकडे आला. यावेळीं अरबांच्या पुष्कळ टोळ्या येथें येऊं लागल्या. १७८४ त हा प्रांत फिरून डारफुर सुलतानाकडे गेला. १८२१ त महमद यानें हा प्रांत जिंकला. १८८२ पर्यंत तो ईजिप्तच्या अंमलाखालीं होता. या वर्षी हा प्रांत माह्दीच्या ताब्यात गेला. खलीफ अबदुल्ला हा १८९९ त येथेंच मरण पावला. पुढें नूतन सुदान सरकारच्या ताब्यात हा देश गेला. अडदांड न्युबाज व अरब याना वठणीवर आणून शांत करण्यास सुदान सरकारला फारच श्रम पडले.

**कोयार्क लोक**—ईशान्य सैबेरियातील मंगोल जातीच्या लोकांना कोयार्क म्हणतात.चुकची लोकाशीं त्यांचें साम्य आहे. ते शूर, बुद्धिमान व स्वावलंबी असून कोणाचेंहि स्वामित्व कबूल करीत नाहींत. लढाईच्या वेळीं शत्रूची संख्या अधिक असल्यास ते आपल्या बायकापोरांना मारून जिवावर उदार होऊन लढतात. त्याच्यांत बहुपत्नीत्वाची चाल असून राक्षसविवाह प्रचलित आहे. दुःसह वेदनापासून होणारा त्रास वांचविण्याकरिता पंगु व म्हातारे यांना ठार मारण्यात येत असून पूर्वी बालहत्याहि प्रचारात होती. मृताला जाळण्यात येतें. हे लोक शामनपंथी आहेत.

**कोर्वेइ**—हें मध्यहिंदुस्थानातील भोपाळ जहागिरींतील छोटेंसें संस्थान आहे. हें खास ब्रिटिश सरकारच्या ताब्यातील संस्थान आहे. याचें क्षेत्रफळ १९११ मध्यें १४४ चौरस मैल होतें. याच्या उत्तरेस व पूर्वेस मध्यप्रांत असून पश्चिमेस व दक्षिणेस ग्वाल्हेर संस्थान आहे. माळव्याच्या डोंगरपठाराच्या एका टोंकावर हें वसलेलें असून याच्या पश्चिम भागातून बटवा नदी वहात गेली आहे. इ. स. १७१३ मध्यें महंमद दिलेरखान यानें कोर्वेइ व त्याच्या आसपासचा मुलूख आपल्या ताब्यात आणला. मोंगल बादशहाला साहाय्य केल्याबद्दल त्याला ३१ परगण्याची जहागीर मिळाली. मोंगल साम्राज्याच्या ऱ्हासकालीं या संस्थानाचा विस्तार भोपाळ संस्थानाइतका होता. मराठ्यांच्या अमदानींत मात्र या संस्थानला उतरती कळा लागली. पण अशाहि परिस्थितींत या संस्थाननें कसेंबसें आपलें स्वातंत्र्य राखलें. १८१८मध्यें शिद्यांनीं या संस्थानाला उपद्रव देण्यास सुरवात

दिवाणी स्वरूपाचे कोणतेहि दावे चालविता येतात. मद्रास इलाख्यात ही मर्यादा अडीच हजार रुपये आहे व बंगालमध्यें एक हजार रुपये आहे. त्यांची क्षेत्रमर्यादा ज्या तालुक्याकरिता ते नेमलेले असतात त्या तालुक्यापुरती असते. सबजज्जाच्या अधिकाराची क्षेत्रमर्यादा सर्व जिल्ह्याइतकी असते. ज्या दाव्याच्या निकालावर कायद्यानें अपील आहे अशा पांच हजार रुपये किंमतीच्या दाव्याच्या निकालावर जिल्हाजज्जाकडे अपील करता येतें पांच हजारांपेक्षा जास्त किंमतीच्या दाव्यांतील अपिलें त्या त्या इलाख्याच्या हायकोर्टाच्या निकालाविरुद्ध विलायतेंतील प्रिव्ही कौन्सिलकडे अपील करता येतें परंतु त्यांत दाव्याची किंमत दहा हजार रुपयांपेक्षा जास्त पाहिजे किंवा कायद्याचा महत्वाचा प्रश्न असून हायकोर्टानें शिफारस केली पाहिजे

फौजदारी कोर्टें.—हिंदुस्थानांत प्रत्येक इलाख्यांत एक एक हायकोर्ट आहे त्याच्या देखरेखीखालीं पुढील फौजदारी कोर्टें आहेत, ( १ ) सेशन कोर्ट, ( २ ) इलाखा मॅजिस्ट्रेट कोर्ट, ( ३ ) पहिला, दुसरा व तिसरा वर्ग मॅजिस्ट्रेट कोर्टें हीं होत प्रत्येक प्रांताला एक सेशन कोर्ट असतें प्रांत म्हणजे बहुतेक सर्व ठिकाणीं जिल्हा होय. परंतु कांहीं ठिकाणीं दोन जिल्हे मिळून एकच सेशन कोर्ट असतें व त्याला प्रांत म्हणतात. इलाख्याचें ठिकाण हें एक जिल्हाच समजलें जातें व स्वतंत्र जिल्ह्याप्रमाणें त्या ठिकाणीं कोर्टें असतात. प्रांतिक सरकारास हिंदुस्थान सरकारच्या परवानगीनें जिल्ह्याची संख्या किंवा मर्यादा ठरविता येते जिल्ह्याचे भाग मात्र स्वतंत्रपणें पाडता येतात प्रत्येक सेशनच्या विभागांत एक एक सेशनजज्ज नेमण्याचा अधिकार प्रांतिक सरकारास आहे. त्याचप्रमाणें सेशन जज्जास जोडीदार किंवा मदतगार देण्याचाहि किंवा एकास दुसऱ्या भागांतील सेशन जज्जाचा मदतगार नेमण्याचा अधिकार आहे.

प्रत्येक जिल्ह्यामध्यें एक पहिल्या वर्गाचा मॅजिस्ट्रेट प्रांतिक सरकार नेमतें व त्यास जिल्हामॅजिस्ट्रेट म्हणतात. हाच अधिकारी मुलकी खात्यांतील कलेक्टर असतो. त्याच्या हाताखालीं पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या वर्गाचे मॅजिस्ट्रेट प्रांतिक सरकार नेमतें. विशिष्ट कामाकरिता किंवा दोन अथवा दोहोंपेक्षा जास्त पहिल्या, दुसऱ्या किंवा तिसऱ्या वर्गाच्या मॅजिस्ट्रेटाचे अधिकार देऊन बेंच नेमण्याचा अधिकार प्रांतिक सरकारास आहे. त्याच्या पैकीं ज्याचे अधिकार सर्वांत जास्त असतील तितके अधिकार सर्व बेंचास प्राप्त होतात. जिल्ह्याचें ठिकाण मोठें असल्यास त्या ठिकाणीं एक शहरमॅजिस्ट्रेट असतो व तो बहुतेक पहिल्या वर्गाचा असतो. जिल्हा मॅजिस्ट्रेटचा अधिकार जिल्ह्यांतील सर्व मॅजिस्ट्रेटांवर व बेंचावर चालतो. परंतु अपील किंवा फेरचौकशी याच्या बाबतींत सेशन जज्जाचा जिल्हा मॅजिस्ट्रेटासुद्धा सर्वांवर अधिकार चालतो. इलाख्याच्या ठिकाणीं वरच्या प्रमाणें जे मॅजिस्ट्रेट नेमलेले असतात त्यांना इलाखामॅजिस्ट्रेट म्हणतात. त्यांपैकीं एक मुख्य असतो. त्याची नेमणूक प्रांतिक सरकार करतें त्याच्या अधिकाराची क्षेत्रमर्यादा इलाख्याचें शहर, त्या ठिकाणीं बंदर असल्यास तेथें व एखादी जहाजें चालण्यासारखी नदी जर त्या ठिकाणीं येऊन मिळत असेल तर तिच्या खाडींत इतकी आहे. अशा पैकीं दोन किंवा दोहोंपेक्षा जास्तजणांचें बेंच नेमता येतें याचप्रमाणें इलाखा शहराच्या ठिकाणीं हिंदुस्थान सरकार किंवा प्रांतिक सरकार यांनीं नेमलेले जस्टिस ऑफ दि पीस असतात

अधिकार.—हिंदुस्थानच्या फौजदारी गुन्ह्याच्या कायद्यांत दिलेल्या सर्व गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार हायकोर्ट व सेशन कोर्ट यांना व गुन्ह्याच्या चौकशीच्या कायद्याच्या • व्या परिशिष्टांत दिलेल्या एखाद्या कोर्टास आहे मद्रास, औंध, मध्यप्रांत, वर्‍हाड–आसाम आणि सिंध या ठिकाणीं फाशीच्या शिक्षेशिवाय इतर शिक्षा असलेल्या सर्व गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार पहिला वर्ग मॅजिस्ट्रेटांस देण्यात येतो हायकोर्टाला फौजदारी गुन्ह्याच्या कायद्यांत सांगितलेली वाटेल ती शिक्षा देण्याचा अधिकार आहे सेशन जज्जालाहि तितकाच अधिकार आहे; परंतु फाशीच्या शिक्षेला मात्र हायकोर्टाची परवानगी लागते. त्याच्या मदतगारास फाशी, सात वर्षें काळेपाणी किंवा तुरुंग याशिवाय बाकीची कोणतीहि शिक्षा देता येते.

इलाखा मॅजिस्ट्रेट किंवा पहिला वर्ग मॅजिस्ट्रेट यांना दोन वर्षें तुरुंग, एक हजार रुपये दंड किंवा फटके इतकी जास्तींत जास्त शिक्षा देता येते. दुसरा वर्ग मॅजिस्ट्रेटांना सहा महिने तुरुंगवास, दोनशें रुपये दंड व कायद्यानें देता येण्याइतका एकांतवास इतकी जास्तींत जास्त शिक्षा देता येते. पण तिसरा वर्ग मॅजिस्ट्रेटास एक महिना तुरुंग आणि पन्नास रुपये दंड इतकी जास्तींत जास्त शिक्षा देता येते. वरील सर्व मॅजिस्ट्रेटांना गुन्हेगारानें दंड न दिल्यास शिक्षा देता येते. मात्र ती त्याच्या अधिकारापेक्षा जास्त असतां कामा नये. सेशन कोर्टांतील खटले कांहीं जिल्ह्यांत पंचांच्या व कांहीं जिल्ह्यांत सल्लागारांच्या मदतीनें चालतात. पंचांनीं एकमतानें दिलेला निकाल न्यायाधिशास बंधनकारक असतो तसा सल्लागाराचा नसतो. त्याचें जर पंचांच्या मताशीं जुळत नसेल तर त्याला ती गोष्ट हायकोर्टाकडे कळवावी लागते व हायकोर्टालाहि प्रत्यक्ष अन्याय होतोसें वाटेल तरच पंचांच्या निकालाविरुद्ध जाता येतें. प्रत्येक महत्त्वाच्या खटल्यांत खालच्या कोर्टाविरुद्ध वरच्या कोर्टांत अपील करता येतें. त्या कोर्टाला अपील रद्द करण्याचा, पुन्हा चौकशीचा हुकूम करण्याचा, गुन्हेगारास सोडून देण्याचा, आरोप किंवा शिक्षा बदलण्याचा अधिकार आहे.परंतु खालच्या कोर्टानें दिलेली शिक्षा अपिलानंतर वाढविण्याचा अधिकार नाहीं दुसरा किंवा तिसरा वर्ग मॅजिस्ट्रेटाच्या निकालाविरुद्ध अपील जिल्हा मॅजिस्ट्रेटाकडे असतें पहिला वर्ग मॅजिस्ट्रेटाच्या किंवा मदतगार सेशन जज्जाचा

निकालाविरुद्ध अपील सेशन जज्जाकडे असतें. सेशनजज्ज किंवा इलाखा मॅजिस्ट्रेट याचे निकालाविरुद्ध अपील हायकोर्टाकडे व हायकोर्टाच्या निकालाविरुद्ध प्रिव्ही कौन्सिलकडे अपील करण्याचा हक्क अलीकडे बंद केला आहे. [ ले. रा. द. गो. फडके ].

**कोर्टरॉय**—बेल्जम. या शहराची लोकसंख्या १९०४ साली ३४,५६४ होती. येथें उत्तम मलमल तयार होते. शिवाय फीतकामसुद्धां येथें बरेंच होतें. जुन्या कोर्टरॉय शहराची लोकसंख्या २,००,००० होती. १३०२ मध्यें येथें मोठी लढाई झाली, तींत फ्रेंचाचा पराभव झाला. या लढाईत पाचशें सोन्याचे (नाइटाचे) मेंजेस सापडले. येथील फार प्रसिद्ध इमारत नाट्रेडेम ही आहे. ही १२११ मध्यें बांधली. येथें व्हॅन डिक याचें उत्तम चित्र आहे. कोर्टरॉय हें शहर रोमन कोरट्राकमपासून झालें आहे. हें शहर नॉर्मन लोकांनीं उध्वस्त केलें. पण तिसरा बाल्डीन यानें हें पुन्हा वसविलें व वाढविलें. पण रूसबेकच्या लढाईनंतर फ्रेंचानी हें शहर पुनः जाळून पोळून फस्त केलें. परंतु बरगेंडीचा ड्यूक फिलिप दि बोल यानें तें पुन्हा बांधलें.

**कोर्डोफान**—हा ईशान्य आफ्रिकेंतील आग्लो ईजिप्शियन सुदानचा एक प्रांत आहे. या प्रांताचें क्षेत्रफळ १,२०,००० चौरस मैल असून याच्या पश्चिमेस डारफुर, उत्तरेस बायुडाचें माळरान, पूर्वेस व्हाइट नाइल प्रांत आणि दक्षिणेस शील्लुक्स लोकांचा व इतर निग्रो जातींचा देश आहे.

कोर्डोफानचा बराचसा भाग उभ्ताव्नत मैदानाचा बनलेला असून, निर्जन, रुक्ष व ओसाड असा आहे. हत्ती, गेंडे, सिंह, चित्ते, दरयाबीट, म्हशी, ससे इत्यादि प्राणी येथें आहेत. येथील पुष्कळ जिल्ह्यांतून लोखंड सापडतें पण सर्पणाच्या अभावामुळें तें सापडून न सापडून सारखेंच आहे

**र हि वा शी.**—इ. स. १९०३ साली येथील लोकसंख्या ५,५०,००० होती. रहिवाशाचे साधारणतः दोन वर्ग करिता येतील, (१) मैदानावरील अरब लोक व (२) डोंगरावरील न्युबाज. मैदानावरील बरेचसे गांवकरी संमिश्र रक्ताचे आहेत. कित्येक लहान लहान खेड्यांतील जाती मूळच्या निग्रो रहिवाशांच्या वंशज आहेत असें सांगतात. गोवामा ही एक महत्वाची जात होय. डार हमीद व बेडेरिआ या जाती हिच्या ताब्यांखालीं येतात. फिरत्या व कळपवाल्या अरबांचेहि दोन वर्ग करिता येतील उंटवाले अरब व गुराचे कळप पाळणारे अरब यापैकीं उंटवाले अरब उत्तरेकडे रहातात व दुसरे म्हणजे बागारा हे दक्षिणेंत राहतात. बागारा हे उत्तम शिकारी आहेत. भाले व रुंद पात्याच्या तलवारी हीं यांचीं शस्त्रें होत. न्युबाज लोकांच्या पुष्कळ पोटजाती आहेत. प्रत्येक जात आपल्या राजाच्या अंमलाखालीं असते. न्युबाज लोकांचा वंश फार प्राचीन होय. हे लोक काळे, टेंगण्या बांध्याचे व स्पष्ट निग्रो वंशाचे आहेत. उत्तरेकडील डोंगरांतहि कृष्णवर्णीचे व लोंकरीसारख्या केसांचे लोक आहेत, पण यांचे अवयव निग्रो लोकांसारखे नाहींत. हे आरबी भाषा बोलतात व यांना न्यूबाअरब लोक अशी संज्ञा आहे. एल ओबेद हें या प्रांताच्या राजधानीचें शहर होय. निरनिराळे व्यापारी रस्ते या शहरीं येऊन मिळतात. खार्टुमपासून सेन्नारमधून येथें रेल्वे आलेली आहे.

**इ ति हा स.**—कोर्डोफानच्या प्राचीन इतिहासाविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. येथें केव्हांहि स्वतंत्र राज्य नव्हतें. १६ शतकाच्या सुरवातीस हा प्रांत फुंज साम्राज्याच्या अमलाखालीं होता त्या शतकाच्या अखेरीस डारफुरच्या सुलतानानें हा प्रांत जिंकिला १७७५ च्या सुमारास तो फिरून फुंज साम्राज्याकडे आला. यावेळीं अरबाच्या पुष्कळ टोळ्या येथें येऊं लागल्या १७८४ त हा प्रांत फिरून डारफुर सुलतानाकडे गेला १८२१ त महमद यानें हा प्रांत जिंकला. १८८२ पर्यंत तो ईजिप्तच्या अंमलाखालीं होता या वर्षी हा प्रांत माहदींच्या ताब्यात गेला. खलीफ अब्दुल्ला हा १८९९ त येथेंच मरण पावला. पुढें नूतन सुदान सरकारच्या ताब्यात हा देश गेला. अडदांड न्युबाज व अरब यांना वठणीवर आणून शांत करण्यास सुदान सरकारला फारच श्रम पडले

**कोयार्क लोक**—ईशान्य सैबेरियांतील मंगोल जातीच्या लोकांना कोयार्क म्हणतात चुकची लोकांशीं त्याचें साम्य आहे. ते शूर, बुद्धिमान व स्वावलंबी असून कोणाचेंहि स्वामित्व कबूल करीत नाहींत लढाईच्या वेळीं शत्रूंची संख्या अधिक असल्यास ते आपल्या बायकापोरांना मारून जिवावर उदार होऊन लढतात. त्याच्यांत बहुपत्नीत्वाची चाल असून राक्षसविवाह प्रचलित आहे दुःसह वेदनापासून होणारा त्रास वांचविण्याकरिता पंगु व म्हातारे यांना ठार मारण्यात येत असून पूर्वी बालहत्याहि प्रचारात होती. मृताला जाळण्यांत येत. हे लोक शामनपंथी आहेत.

**कोर्वेइ**—हें मध्यहिंदुस्थानांतील भोपाळ जहागिरींतील छोटेंसें संस्थान आहे. हें खास ब्रिटिश सरकारच्या ताब्यातील संस्थान आहे. याचें क्षेत्रफळ १९११ मध्यें १४४ चौरस मैल होतें. याच्या उत्तरेस व पूर्वेस मध्यप्रांत असून पश्चिमेस व दक्षिणेस ग्वाल्हेर संस्थान आहे माळव्याच्या डोंगरपठाराच्या एका टोंकावर हें वसलेलें असून याच्या पश्चिम भागातून बटवा नदी वहात गेली आहे. इ. स १७१२ मध्यें महंमद दिलेरखान यानें कोर्वेइ व त्याच्या आसपासचा मुलूख आपल्या ताब्यात आणला. मोंगल बादशहाला साहाय्य केल्याबद्दल त्याला ३१ परगण्याची जहागीर मिळाली मोंगल साम्राज्याच्या ऱ्हासकालीं या संस्थानाचा विस्तार भोपाळ संस्थानाइतका होता. मराठ्याच्या अमदानींत मात्र या संस्थानला उतरती कळा लागली. पण अशाहि परिस्थितींत या संस्थानानें कसेंबसें आपलें स्वातंत्र्य राखलें. १८१८मध्यें शिंद्यानीं या संस्थानाला उपद्रव देण्यास सुरवात

केली तेव्हा भोपाळ येथील पोलिटिकल एजंट यानें या संस्थानाला मदत केली. पुढें १८२०मध्यें इरादत महंमदखान यास त्याच्या बापाला एका दासीपासून झालेल्या मुलानें पदच्युत केलें. पण यावेळीं ब्रिटिशानीं त्याला मदत देण्याचें नाकारलें व त्यामुळें त्याला पेन्शनवरच स्वस्थ बसावें लागलें. १८९५ सालीं महंमद याकुबखान हा गादीवर बसला. त्यानें १९०६ पर्यंत राज्य केलें. त्याच्यामागून सवर अलीखान हा गादीवर आला व तोच हल्लीं या संस्थानचा नबाब आहे.

या संस्थानची लोकसंख्या १९११ मध्यें १८४५६ होती. संस्थानात एकंदर ८८ खेडीं आहेत. संस्थानामध्यें विशेषतः मालवी भाषा प्रचारात आहे. संस्थानातील शेंकडा ४३ लोक शेतकीवर आपली वृत्ति चालवितात. येथें लागवडीसाठीं असलेली एकदर जमीन २३ चौरस मैल आहे. तीपैकीं अवघ्या १३ एकराना पाणीपुरवठा होतो. ११ चौरस मैल जंगल आहे. ज्वारी, धनें, गहूं व मका हीं मुख्य पिकें होत. या संस्थानात दोन खडीचे रस्ते आहेत. एक रस्ता जी. आय. पी रेल्वेच्या कंधोरा स्टेशन-पर्यंत व दुसरा बमोरास्टेशनापर्यंत जातो. संस्थानिकास फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार आहेत.त्याच्या अधिकाराबाहेरच्या गुन्ह्याची चौकशी पोलिटिकल एजंट करतो. ब्रिटिश कायदे संस्थानाला लागू आहेत. संस्थानचा खजिना हा पोलिटिकल एजंटाच्या ताब्यात असतो.संस्थानचा वटवसूल १९०४ मध्यें ३७००० रुपये झाला. संस्थानची राजधानी कोर्वाई गाव ही आहे. हें गाव घटना नदीच्या काठीं वसलेलें आहे. या गावाच्या पूर्वेस एका टेंकडीवर एक किल्ला असून तो जंबूर नावाच्या दगडानीं बांधलेला आहे. हा दगड या संस्थानात मुबलक सापडतो. याच दगडानें बांधलेलीं संस्थानातील घरें आहेत. येथें एक पोस्ट ऑफिस व एक इस्पितळ आहे.

**कोन्हा**—संयुक्त प्रातातील मिर्झापूर जिल्ह्याच्या वायव्य भागातील तहशील १९११ सालीं हिचें क्षेत्रफळ ३९६ चौरस मैल होतें. १९११ मध्यें या तहशिलीची लोकसंख्या २,७५,८९२ होती. या तहशिलींत एक गाव व १०५६ खेडीं होती. ही तहशील गंगेच्या अगदीं उत्तरेस असून या तहशिलीची उत्तर हद्द वर्णा नावाची नदी आहे. हा प्रदेश बनारस जहागिरींत मोडत असून फार सुपीक आहे. १९०३-४ मध्यें सुमारें २५० चौरस मैलाच्या टापूंत लागवड करण्यात आली. त्यापैकीं ११२ चौरस मैलांना विहिरी इत्यादिकाच्यामुळें पाणी पुरवठा होत होता.

**कोल**—ही एक द्रविड जात असून विन्ध्या कैमूर पठारानजीक या कोलाची संख्या जास्त असल्याचें आढळून येतें. कोल हा एक निंदाव्यंजक शब्द असन तो अनार्यासंबंधीं आर्यांकडून उपयोगिला जात असे अशी समजूत आहे. मुंडारी हो, होरे व होरो या मनुष्यवाचक शब्दावरून कोल असा शब्द बनला असावा असें म्हणतात. छोटा नागपुरांत[१] कोल...

[१] येथें कोल जात मुंडारी अथवा मुंडा या नांवानें

ओळखली जाते. लोहारगडाचे मुंडारी मिर्झापुरच्या कोल जातीसारखे दिसतात. व त्याची उंची ५॥ फूट असते. त्याच्या चेहऱ्या रून पहता, आर्यांच्या रक्ताची बरीच भेसळ त्याच्या पुष्कळ कुटुंबात झाली असावी असा प्रत्यय येतो. त्याच्या चेहऱ्यात मंगोलियनचिन्हेंहि बरेंच दिसून येतें. सरळ नाक व लाब चेहरेपट्टी पुरुषवर्गांत असलेली आढळते. त्याच्यातील तरुण स्त्रियाचे अवयव मृदु व रेखीव असून हनुवटी, तोंड व नाक इत्यादि अवयव यथोचित व अरुंद आणि सुंदर असे असतात. कोल स्त्रीपुरुषाची चालण्याची ढब मोठी ऐटदार असते असें डाल्टननें म्हटलें आहे. कोल जातीच्या उत्पत्तीविषयीं अनेक दंतकथा रूढ आहेत. सोमवंशीय ययाति राजा यानें आपल्या राज्याची पाच मुलात वाटणी केली. हरिवंशावरून असें दिसतें कीं, ययाति-पुत्र तुर्वसु हा दक्षिणेंत रहात असून त्याच्या राजवंशात पाड्य, कोरल, चोल व कोल असे पुरुष निर्माण झाले. कोलाचे वंशज हेच प्रस्तुतचे कोल होत. त्याचा रजपुताशीं संबंध आहे असें म्हणतात, परंतु द्राविड वंशाशीं ह्याचा संबंध जोडणाऱ्या दंतकथा ज्यास्त विश्वसनीय अशा आहेत. चित्रकूटांतून आपण देशांतर केलें असें मिर्झापुरचे कोल म्हणतात. रेवा संस्थानातील बर्डि राजाच्या मुलखात वरील स्थान आहे. नानद्दू हा त्याचा पूर्वज होता. चुनारनजीक विंध्रि येथें त्याचें एक देवस्थान असून ते विरमद्द देवीची उपासना करितात. राजा लाखन अथवा लाखनदेव हें त्याचें उपास्य-दैवत होय.

रउतीय, दहैत, महतीयान, ठाकुरीय, बनाज, पहारीय, बरवार,बिन, इर्वरिय, राजवारीय,हनरियाना असे कोल जातींचे वर्ग आहेत. त्याची एक पंचायत असून तेथें विवाहाचे व काहीं नैतिक आचरणाचे निवाडे दिले जातात. पंचायतीच्या मुख्यास चौधरी म्हणतात. व त्याची जागा वंशपरंपरागत असते. जातिबहिष्कार व दंड या शिक्षा तेथें फर्माविल्या जातात. कोलांचीं लग्नें वद्य पक्षात होत नाहींत. बहुपत्नीत्वाच्या तत्वाविरुद्ध त्यांचा मह असतो. परंतु अनेक बायका करण्याची ह्याच्यात रूढि आहे. या जातींत कोणाचीहि लग्नें रहात नाहींत. विधवाविवाहास मोकळीक असते. काडीमोड करण्याचा प्रघात कोलामध्यें असलेला आढळून येतो. मिर्झापुरच्या कोलामध्यें दत्तकासंबंधीं अनेक नियम आहेत. निपुत्रिकानें आपल्या भावाच्या मुलास दत्तक घ्यावें किंवा एखाद्यानें आपल्या मुलीच्या मुलासहि पुत्र नसल्यास दत्तक घ्यावें असा नियम आहे. एखाद्यानें भयंकर गुन्हा केलेला असल्यास किंवा त्याने धर्मांतर केलें असल्यास त्याच्या पित्यास एखादा मुलगा दत्तक घेण्याचा अधिकार असतो. एक दत्तक जिवंत असता दुसरा घेता येत नाहीं. दत्तक घेणाऱ्याचें व देणाऱ्याचें एकच कुल असलें पाहिजे. साधु अथवा फकीर याना दत्तक घेण्याचा अधिकार नाहीं या जातींत वारसासंबंधींहि अनेक नियम असून त्याया-

विपर्या पाहिलें तर असें आढळतें कीं, वधूचे सर्व नातेवाईक हे वराचेहि नातेवाइक होऊ शकतात, व लग्नामुळें अशीं अनेक नातीं जडतात ' ओरावन ' व ' मुंडा ' हे लेख पहा. [ शृंक ]

**कोलकाइ**—मद्रास इलाख्याच्या तिनेवेल्ली जिल्ह्यांतील श्रीवैकुंठम् तालुक्यामधील एक खेडें श्रीवैकुंठशहरापासून पूर्वेस १२ मैलावर हें आहे १९०१ मध्यें या खेड्याची लोकवस्ती २५५८ होती. द्रविडी संस्कृतीचें हें एक प्राचीन पीठ होतें अशी आख्यायिका आहे चेर, चोल व पाड्य या घराण्याचे संस्थापक पुरुष जे चेर, चोल व पाड्य हे तिघेहि मिळून या खेड्यावर राज्य करीत होते असें म्हणतात पुढें चेर व चोल यानीं अनुक्रमें पश्चिमेस व उत्तरेस आपलीं स्वतत्र राज्यें स्थापन केल्यानतर पाड्य घराण्याची त्यावर सत्ता सुरू झाली व त्यानीं हें खेडेगाव आपली राजधानी केली मोतीं काढण्याचा धदा या गावीं फार मोठा असे असें टॉलेमीनें म्हटलें आहे पण पुढें कोलकाईजवळ असलेला समुद्र बराच मागें हटल्यावर कोलकाई व समुद्र याच्यामध्यें कायल नावाचें एक खेडें वसल व तेथें हा धदा सुरू झाला

**कोलगाग**—हें बगाल इलाख्यामधील भागलपूर नावाच्या जिल्ह्यातील एका विभागातील गाव आहे हें गगा नदीच्या दक्षिण तीरावर वसलें असून येथें ईस्ट इडियन रेल्वेचें एक ठाणें आहे १९०१ सालीं या गावाची लो स ५७३८ होती. बंगालचा शेवटचा स्वतन्त्र राजा घियासउद्दीन महमूद हा १५३८ त येथें गौर शहर सुटून आल्यावर मरण पावला. येथें विचित्र तऱ्हेनें कोरलेलें एक लेणें आहे या शहरीं ह्युएनत्संग हा चिनी प्रवासी आला होता हें गाव व्यापाराकरिता प्रसिद्ध असून येथें पूर्वी ठग लोक रहात असत येथें १८६९ सालीं म्युनिसिपालिटीची स्थापना झाली

**कोलघा**—एक मजुराची जात सुरतेच्या आग्नेय दिशेकडील संस्थानात या जातीची वस्ती असून १९११ सालीं याची संख्या ५८४९ होती ते ब्राह्मणाना पूज्य मानीत नाहींत, व त्याचे स्वत च्या जातीचे उपाध्यायहि नाहींत हे देवताचे उपासक असून त्याचे समारंभहि अत्यत साध्या स्वरूपाचे असतात त्याच्यात बहुपत्नीत्व व विधवाविवाह रूढ आहे मुलाच्या बापाकडून तीन रुपयास वधूची मागणी केली जाते ढोलगी वाजवून मिरवणुकी काढतात व उभयपक्षीं देवघेवहि बरीच होते एका जाजमावर बसून वधूवराच्या पदरास गाठ मारून व उभयताना नावें घ्यावयास लावून लग्नसमारंभ आटोपतात त्यानतर उभय पक्षातील जोडप्याचा नाच होतो व त्यात वधूवर हेहि भाग घेतात नतर भोजनास इष्टमित्र बोलावून वधूवराच्या पदराची गांठ सोडली जाते व वधूचा गृहप्रवेश होतो हनुमान, शिवदेव व काकाबालिया या देवताची उपासना कोलघा लोक करतात याच्यात उपाध्यायाचा वर्ग नाहीं मृताच दहन करून घरीं आल्यावर सुरापान करण्याची याची वहिवाट आहे त्याचा परपरागत धदा म्हणजे नोकरी करणें, लाकडें तोडणें व मजुरी करणें अशा प्रकारचा आहे त्याची आर्थिक स्थिति अत्यत निकृष्ट असल्यामुळें काहीं कदमुळावर गुजारा करतात व काहीं लोकाना दोनदोन तीनतीन दिवस उपवासहि करावा लागतो बडोदें संस्थानात कोलघाची लोकसंख्या सुमारें एक हजार आहे. [ एन्थोवेन ]

**कोलन्चिस**—हा प्राचीन भूगोलात काळ्या समुद्राच्या पूर्वेस असलला त्रिकोणाकृति जिल्हा आशियामायनरमध्यें होता मर्यादा –उत्तरेस कॉकेशस, पूर्वेस आयबेरिया, दक्षिणेस मॉंटेस–मास्चिसी, आर्मेनिया, आणि पाटसचा काहीं भाग व पश्चिमेस युक्झिन साम्राज्याच्या जिल्ह्याला कुतैस ( यापूर्वी मिंग्रेलिया) म्हणतात येथ काहीं जाती रहात असत स्त्रियाच्या प्रेतांना मूठमाती देत असत व पुरुषाच्या प्रेतास झाडाला लटकावीत असत किनाऱ्यावरील मुख्य शहर म्हणजे डायोस्कुरियसची मिलेशियन वसाहत होय ( आधुनिक सुखुम कॅले ) येथील मुख्य नदी फॅसिस ( आधुनिक–रिआन ) होती ग्रीक पुराणात या स्थानाची महती होती, व याच ठिकाणीं आरगोनॉटाना जावयाचें होत प्राचीन काळीं इराणी साम्राज्यात याचा समावेश होत होता रोमन स्वारीच्या वेळीं मोठ्या मिथ्रिडाटीझच्या ताब्यात हें होतें परतु त्याचा पांपेनें पराभव केल्यावर हा रोमन प्रात बनला यानतर ६ व्या शतकात येथील राजा गोथाझेसन थनास्की अथवा अबास्गी सह बड केलें व इराणचा पहिला खुश्रु ( ५४१ ) याला मदतीस बोलावलें त्यानें किनाऱ्यावरील पेट्रा हें मुख्य रोमन ठाणें घेतलें सर्व जिल्हा इराणी बनणार असें गोबाझेसनें पाहून रोमन मदत बोलावली व पेट्रा पुन्हा परत घेतलं गोबाझेसचा खून झाला, परतु इराणी सेनापति नाकोरागनचा पराभव फॅसिस येथें झाला (५५२) ५६२ च्या तहानें कोलघा रोमन लोकाच्या ताब्यात आलें ५९७ त रोमच्या विरुद्ध बंड झालें दुसऱ्या जस्टिनियननें अबास्गी लोकावर हल्ला करण्यास ॲलन लोकास चिथावण्यासाठीं इसारियन लिओ ( हा नतर बादशहा झाला ) यास पाठविलें परतु सारासन लोकाच्या मदतीमुळें हा प्रयत्न निष्फळ झाला १४ व्या शतकारंभापासून १७ व्या शतकाच्या अतापर्यंत यावर मिंग्रेलिया नावाखालीं डेडियन या स्वतत्र घराण्याची सत्ता होती नतर चिकोव्हान घराण्याची सत्ता सुरू झाली व १८३८ त त्यानीं रशियाचें सार्वभौमत्व कबूल केलं १८६५त हा जिल्हा रशियानें खालसा केला

**कोलचेस्टर**—इंग्लंडातील एसेक्सचें कोलचेस्टर हें बाजार शहर, नदीवरील बंदर, म्युनिसिपालटीचा व पार्लमेंटरी विभाग आहे लडनच्या पूर्वईशान्येस ग्रेटईस्टर्न रेल्वेनें हें ५२ मैल आहे १९२१ सालीं येथील लोकसंख्या ४३,३७७ होती हें कोल्ने नदीवर आहे दुसऱ्या विल्यमनें बाधलेला किल्ला मोडकळीस आला आहे एसेक्स पुराणवस्तुसशोधन मडळाच्या पदार्थसग्रहालयात रोमन प्राचीन वस्तू व राउड

घराण्याचें वाचनालय आहे. सेंट बोटाल्फ व बेनिडिक्टाइन या दोन मठाशिवाय होली ट्रिनिटी, सेंट मार्टिन व सेंट लिओनार्ड प्रार्थनामंदिरें येथें आहेत. मोफतवाचनालय व काउन्टी रुग्णालय येथें आहे काहीं काळपर्यंत येथ लष्करी छावणी होती. मोफत व्याकरणशाळा, धंदेशिक्षणाची शाळा आणि इतर बऱ्याच वैद्यकी संस्था येथें आहेत कॅसल रमणबाग येथें आहे धान्याच्या व गुराच्या बाजाराकरिता हें प्रसिद्ध आहे. कापडाचे, बुटाचे व शिल्पकलेचे वगैरे कारखाने येथें आहेत. कोल्ने नदीवरील मासे पकडण्याचें ठिकाण म्युनिसिपालिटीच्या मालकीच आहे प्रतिनिधिविभागातून पार्लमेंटात एक सभासद पाठविला जातो म्युनिसिपालिटींत एक मेअर, ८ सनदी शहरचे अधिकारी व २४ सभासद असतात शहराचें क्षेत्रफळ ११,३३३ एकर आहे. क्लॉडिअसनें हें शहर वसविलें. बोडेशिआ राणीच्या कारकीर्दींत तद्देशीय लोकांनीं शहर जाळून वसाहतवाल्यांची कत्तल केली. ११८९ सालीं पहिल्या रिचर्डनें दिलेल्या सनदेमुळें येथील लोकास पुष्कळ हक्क मिळाले. १६३५ सालीं पहिल्या चार्लसच्या सनदेप्रमाणें बेलिफच्या जागीं मेयरची नेमणूक करण्यात आली आपल्या पक्षाच्या लोकांची संख्या जास्त असावी म्हणून क्रॉमवेलनें १६५३ सालीं ही सनद बदलली. गेलेलें स्वातंत्र्य १७६३ सालीं ३ ऱ्या जॉर्जनें येथील लोकांस दिलें १२९५ पासून १८८५ पर्यंत येथून पार्लमेंटात दोन सभासद जात असत. फ्लेमिश वसाहतवाल्यांनीं येथ पट्टू कापडाचे कारखाने काढले १६३८ सालीं फेअरफॅक्सनें शहराला वेढा दिला उत्तरेकडील भागात झालेल्या क्रॉमवेलच्या जयामुळें तर फेअर फॅक्सचा चांगलाच मोड झाला. आठव्या हेनरीनें हें मदतनीस बिशपचें राहण्याचें ठिकाण केलें

**कोलंब, चार्लस आगस्टिन( १७३६-१८०६ )**— चार्लस आगस्टिन कोलंब या फ्रेंच शास्त्रज्ञाचा जन्म फ्रान्सातील अंगोलीमी नावाच्या गावीं झाला. प्रथमतः त्याने लष्करी एंजिनिअरचा पेशा स्वीकारला व काहीं काळ याप्रमाणें त्यानें नोकरी केली. परंतु १७८९ सालीं फ्रेंच राज्यक्रांतीला सुरुवात झाली व त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला व तो ब्लॉई एथील आपल्या लहानशा मिळकतीवर जाऊन राहिला. क्रांतिकारक सरकारनें त्याला नवीन मापें व वजनें तयार करण्याकरिता पारीस येथें बोलाविलें. सन १८०२ सालीं त्याला सार्वजनिक शिक्षणखात्यावर तपासनीस (इन्स्पेक्टर) नेमिलें. परंतु त्याची शरीरप्रकृति अगोदरच खालावली होती व पुढें चार वर्षांनीं तो पारीस येथें मृत्यु पावला. यंत्रशास्त्र, विद्युच्छास्त्र आणि चुंबकत्वशास्त्र यांच्या इतिहासात कोलंब याचें नाव फार प्रसिद्ध आहे सन १७७९ सालीं त्यानें घर्षणाविषयीं महत्वाची माहिती पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली यानंतर सुमारें २० वर्षांनीं त्यानें प्रवाही द्रव्याच्या घर्षणाविषयीं माहिती प्रसिद्ध केली. सन १७८५ सालीं त्यानें एक महत्वाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. या पुस्तकात त्याच्या नावानें प्रसिद्ध असलेली ( पिळाची ) तुला व तिच्यापासून चुंबकशास्त्र, विद्युच्छशास्त्र यात होणारा उपयोग याचें वर्णन केलें होतें. पदार्थाच्या पृष्ठभागावर विद्युत् कसकशी पसरलेली असते याची माहिती या तुलेच्या साहाय्यानें सुलभतेनें संपादन करता येते. त्यानें गणितविषयक सिद्धान्त ( विद्युत् आणि चुंबकत्व याच्यासंबंधानें ) प्रस्थापित केले आहेत. विद्युत्तेच्या व्यावहारिक एकम् परिमाणास कोलंब हें नाव दिलें गेलें आहे

**कोलंबस.**—( १४५१-१५०६ )—क्रिस्तोफर कोलबस हा डोमेनिको कोलंबो याचा मुलगा होय. हा जिनोवा येथें १४५१ मध्यें जन्मला. काहींच्या मतें तो १४४६ मध्यें जन्म पावला. त्याला पेविया येथील विश्वविद्यालयात विद्याभ्यासासाठीं त्याच्या बापानें पाठविलें. विश्वविद्यालयात असतांना त्यानें भूमिति, भूसृष्टिविद्या, ज्योतिष व नकाशे काढण्याची कला याचा अभ्यास केला. वयाच्या १४ व्या वर्षींच त्यानें नाविकाचा धंदा पत्करला. तरी पण आपल्या धंद्यातून वेळ सापडताच, तो विणकामाचा वडिलार्जित धंदा पहात असे लहानपणापासूनच त्याला नाविकविद्येचा फार नाद असे. त्यामुळें त्यानें नाविकाचा धंदा पत्करून निरनिराळ्या देशाच्या सफरी केल्या १४७७ मध्यें तो ऐस्लंडसारख्या उत्तरसमुद्रातील बेटापर्यंतदेखील जाऊन आला. नंतर तो पोर्तुगालमध्यें रहाण्यास आला. तेथें त्यानें पेरेस्त्रेलो नावाच्या एका सरदाराच्या फेलिपा नावाच्या मुलीशीं लग्न केलें. पेरेस्त्रेलो हा प्रिन्स हेन्रीच्या पदरचा एक दर्यावर्दी सरदार होता. अर्थात् यामुळें त्याला नौकानयन कलेचें सांगोपांग ज्ञान झालें. पेरेस्त्रेलोनें शोधून काढलेल्या नवीन नवीन स्थळांचीं वर्णनें, त्या देशाचे नकाशे याचा त्यानें सूक्ष्म अभ्यास केला. पोर्तुगीज लोकांनीं शोधून काढलेल्या सर्व देशापर्यंत त्यानें सफरी केल्या. त्यामुळें त्याच्या शोधक मनाला नवीन नवीन देश शोधून काढण्याची तळमळ लागली. पश्चिमेच्या मार्गानें आशियाखंडाला आपणाला जाता येईल असें त्याच्या मनात येऊं लागलें. अर्थातच त्या दृष्टीनें त्यानें मार्कोपोलो, पीरे द ऐली या धाडशी संशोधकाचीं प्रवासवर्णनें बारकाईनें वाचून पाहिलीं. या प्रवासवर्णनापासून व त्यात स्वतःच्या कल्पनेची भर घालून त्यानें काहीं सिद्धांत बसविले त्या सिद्धांताच्या आधारानें नवीन अज्ञात देश सापडणें शक्य आहे असें त्याच्या मनानें घेतलें. पण मनात पुष्कळ कल्पना आल्या तरी कल्पना व सिद्धि याच्यामध्यें साता समुद्राइतकें अंतर असतें. शिवाय अशा प्रकारच्या धाडसी कल्पनांना प्रोत्साहन देणें म्हणजे जाणूनबुजून पैशाचा अपव्यय केल्यासारखेंच होतें आपल्या या धाडसी पण विचारपूर्वक बनलेल्या कल्पनांना सहज मोठमोठे लोक मान्यता देतील अशी कोलंबसाची कल्पना होती. पण त्या बाबतींत त्याला

जो प्रत्यक्ष अनुभव आला त्याच्यामुळें कोलंबसाची पूर्ण निराशा झाली. पोर्तुगालच्या राजानें त्याला मदत देण्याचें नाकारलें. स्पेनच्या फर्डिनंड राजानें व इसाबेला राणीनें प्रथम त्याला बरीच आशा दाखविली. पण त्यांनीहि शेवटीं त्याला अर्धचंद्र दिला. तरी पण इजाबेला राणीवर ज्याचें वजन असा लोकांनीं शिफारस मेहनत करून एकदां कशीबशी कोलंबसाला मदत देण्याचें राणीच्या राजाराणीकडून आश्वासन घेतलें व कांहीं करार उभयतामध्यें झाल्यानंतर कोलंबसानें शुभ मुहुर्तावर आपल्या चिरवांछित पर्यटनाला सुरवात केली. ता. ३ आगस्ट १४९२ ला त्यानें पर्यटणाला सुरवात केली. प्रथम दोन महिने जमीनच दृष्टीस पडली नाहीं. जहाजावरील लोक घाबरून गेले. कोलंबसाला त्यांनीं दोष देण्यास सुरवात केली पण 'धैर्याचा महामेरू' कोलंबस यानें आपलें धैर्य व शांतता ढळूं दिली नाहीं. परमेश्वरावर विश्वास ठेऊन त्यानें आपला मार्ग तसाच चालू ठेवला होता. शेवटीं आक्टोबरच्या १२ तारखेला त्याला जमीन दिसली. तो सर्वांच्या अगोदर त्या बेटावर उतरला; व त्यानें त्या बेटाला सॅन सॅल्व्हडॉर असें नाव दिलें. तेथील लोकांशीं मैत्री जोडून त्यानें सँटा मेरिया फर्नेंडिना, कुबा, हिस्पॅनियोला, हृटी इत्यादि बेटें शोधून काढलीं. हिस्पॅनियोला येथें त्यानें एक वसाहत स्थापन केली व तो यूरोपला परत आला. स्पेनमध्यें राजाराणींनें त्याचा अतिशय चांगल्या रीतीनें सत्कार केला; व त्याच्या या सफरीनें यूरोपखंडभर त्याची कीर्ति पसरली. कांहीं काळ विश्रांति घेतल्यानंतर सप्टेंबर १४९३ च्या २४ व्या तारखेस कोलंबस पुन्हा सफरीला निघाला. वाटेंत त्यानें डोमिनिका, मादिगलाते, ग्वाडलूप, मॉन्टेसेराट, ॲंटिग्वा, सेंन मार्टिन, सॅंटाक्रुझ, व्हर्जिन इत्यादि बेटें शोधून काढलीं. नंतर तो हिस्पॅनियोला येथें येऊन पोहोंचला. तेथील वसाहतींत बेबंदशाही माजलेली दिसली त्यामुळें त्याला फार वाईट वाटलें. पण त्यानें तेथील कशी बशी व्यवस्था लावली. सोन्याच्या खाणी खोदण्याचें काम सुरू करविलें व नंतर तो पुन्हा कुबाच्या दक्षिणदिशेनें निघाला. या वेळेस जमेका वगैरे निरनिराळ्या बेटांचा शोध करून तो १४९६ च्या जून महिन्यात स्पेन येथें आला. त्याचा राजाराणींनें चांगल्या तऱ्हेनें सत्कार केला; व त्याच्या मुलांना चांगल्या मानाच्या जागा देण्यात आल्या. पुन्हा कांहीं काळ विश्रांति घेऊन कोलंबसानें तिसरी सफर काढली. या सफरींत त्याला दक्षिण अमेरिकेचा शोध लागला. तेथून तो हिस्पॅनियोला येथें आला पण त्याच्या गैरहजेरींत अव्यवस्था माजलेली त्याला आढळून आली. हें पाहून त्याला फार वाईट वाटलें. शिवाय खुद्द स्पेनमध्यें राजाराणीच्या मनांत कोलंबसाविरुद्ध भलतें सलतें भरवून देण्याचा त्याच्या हितशत्रूंनीं जोराचा प्रयत्न चालविला होता; व त्या प्रयत्नात त्यांना यशहि येत चाललें होतें. राजानें बोबडिला नावाच्या एका गृहस्थाला हिस्पॅनियोलाच्या वसाहतीची देखरेख करण्याकरितां पाठवलें. त्यानें तेथें येऊन कोलंबसाला बंदिवान केलें व स्पेनला पाठवून दिलें. पण पुढें राजाराणीला खरी हकीकत कळताच त्यांनीं त्याला मुक्त केलें व पुन्हा त्याचा योग्य बहुमान केला.

पुन्हा कोलंबसानें चवथ्या सफरीवर जाण्याचा निश्चय केला या सफरींत त्यानें बेथलेहेम बेट शोधून काढलें. तेथें सुवर्ण विपुल सापडतें असें त्याला समजल्यामुळें तेथ त्यानें वसाहत स्थापन केली. तो पुन्हा जमेका येथें परत आला. तेथें एक वर्ष विश्रांति घेऊन तो पुन्हा स्पेनला परत आला. त्याला तेथें पुष्कळ मानमरातब मिळाला. पण त्याची प्रकृति अगदीं अशक्त झाली होती. अशा रीतीनें कांहीं काळ कंठल्यावर तो १५०६ मध्यें मरण पावला. कोलंबस हा शरीरानें उंच व सुदृढ होता. त्याचा परमेश्वरावर दृढ विश्वास असे. प्रचंड संकटात देखील तो मनाची समता ढळूं देत नसे. त्याच्या मुलीनें त्याचें चरित्र लिहिलेलें आहे. त्यावरून त्याच्यासंबंधीं पूर्ण माहिती आपणाला उपलब्ध होते.

[ संदर्भ ग्रंथ —वॉशिंग्टन आयर्व्हिंग—हिस्ट्री ऑफ दि लाईफ ॲंड व्हॉयेजेस ऑफ ख्रिस्तोफर कोलंबस(१८२०-१८२८) महादेव गोविंदशास्त्री कोल्हटकर–कोलंबसाचा वृत्तांत ( सन १८८२ ) मुंबई ].

**कोलंबस राजधानी.**—उत्तरअमेरिका संयुक्त संस्थानां-तील ओहिओ संस्थानची राजधानी. हें बंदर असून फ्रांक्लिन कौंटीचें मुख्य स्थान आहे हें स्किओटो व ऑलेंटांगी नद्यांच्या संगमावर वसलें आहे. लोकसंख्या(१९१७)२,२०,१३५. हे तीन रेल्वेचें केंद्रस्थान असून यांत ९ विजेच्या गाड्यांचे फांटे आहेत. याचें क्षेत्रफळ १७चौ. मैल आहे. मुख्य कामकाजाचा रस्ता शंभर फूट रुंद आहे व ब्रॉडस्ट्रीट रस्ता १२० फूट रुंद आहे. स्टेट कॅपिटोल, सिटी, हॉल कोर्ट हाऊस, विश्वविद्यालय वगैरे इमारती आहेत. फ्रांक्लीन पुडेल, शिलर या सारखे कांहीं बगीचे गावांत आहेत. ओहिओ विश्वविद्यालयात निरनिराळ्या शाखांचे अभ्यासक्रम आहेत हें विश्वविद्यालय सरकारी खर्चातून चालतें व कालेजांतील शिक्षण मोफत देण्यात येतें. याशिवाय कॅपिटल विश्वविद्यालयाचीं विद्यापीठेंहि येथें आहेत. कोलंबस हें ओहिओ येथील कोळशाच्या व लोखंडाच्या खाणींजवळ असल्यामुळें येथें कोळशाचा व्यापार बराच आहे. पण याशिवाय लोखंडी वस्तूंचा व्यापारहि येथें मोठा आहे घोडे, औषधें, गाड्या व दुसऱ्या अशाच वस्तू करण्याचे कारखानेहि येथें आहेत. १७९७ मध्यें येथें वस्ती पहिल्यानें झाली. १८३४ त हें शहर झालें.

**कोलंबिया**—हें दक्षिण अमेरिकेच्या वायव्य कोंपऱ्यात एक प्रजासत्ताक राज्य आहे याच्या उत्तरेस कॅरिबियन समुद्र व व्हेनेझुएला, पूर्वेस व्हेनेझुएला व ब्राझील, दक्षिणेस ब्राझील, पेरू व इक्वेडोर व पश्चिमेस इक्वेडोर, पॅसिफिक

महासागर, पनामा व कॅरिबियन समुद्र आहेत याची लांबी १०५० मैल असून रुंदी ८६० मैल आहे क्षेत्रफळ ४,८१,९७१ चौरस मैल आहे पनामाचा भाग गेल्यामुळें या देशाच्या सीमा प्रत्येक बाजूनीं अनिश्चित झाल्या आहेत

स्व रू प व र्ण न—कोलंबिया हा अतिशय डोंगराळ प्रदेश आहे सरासरी निम्मा प्रदेश ॲंडीज पर्वताच्या आग्नेयेस असून विस्तीर्ण लॅनॉस व जंगली मैदानाचा बनलेला आहे व यामधून ॲमेझॉन व ओरिनोको नद्यांना मिळणाऱ्या कित्येक पश्चिमेकडील नद्या वाहतात या भागात निरनिराळ्या वनस्पती दाट वाढलेल्या आहेत व काहीं भाग उष्णकटिबंधातील निरनिराळ्या प्रकारच्या लागवडीस लायक आहे मैदानात कित्येक ठिकाणीं कमी उंचीच्या अशा टेंकड्या आहेत व येथेंच उद्योगधंद्याच्या वसाहती आहेत सखल सपाटीचा प्रदेश दलदलीचा असून गोरे लोकांच्या वसाहतीस अयोग्य आहे दुसरा भाग ह्या राज्याच २/५ क्षेत्रफळ व्यापतो हा अतिशय डोंगराळ असून यामधून मॅगेलेना, कॉका व ॲट्राटो नद्यांच्या दऱ्या गेलेल्या आहेत या भागातील पर्वत श्रेणी ॲंडीयन पर्वताच्या उत्तरेकडील मध्यभागाच्या ओळी आहेत. सखल दऱ्या, डोंगरपठार व पर्वताच्या ओळी यावर चांगली कॉफी होते व दळणवळणाचे मार्ग चांगले झाल्यास या व्यापारानें देशाची उन्नति ॲंटिओकिआच्या सोन्याच्या खाणींपेक्षा वाढेल.

कोलंबियाच्या डोंगराळ प्रदेशात ज्वालामुखी पर्वताचे स्फोट व धरणीकंपाचे धक्के–विशेषत दक्षिण भागात वारंवार बसतात परंतु हे धक्के व्हेनेझुएला व इक्वेडोरमधील धक्क्यांएवढे भयंकर नाहींत

बे टें—कोलंबियाचे किनाऱ्यावर फार थोडीं बेटें आहेत यांपैकीं बहुतेक नेहमींच्या उपयोगातील नकाशावर दाखविण्याइतकीं मोठीं नाहींत गॉर्गोना हे पॅसिफिक महासागराच्या किनाऱ्यावरील मोठें बेट आहे माल्पेलो बेट व पानामा आखातातील मोरयाचीं बेट कोलंबियाच्या ताब्यात आहेत सर्वांत मोठें व महत्वाचें बेट व्हिएजा प्रॉव्हिडेन्सिया हें आहे

न द्या—पॅटिआ, कॅका, मॅग्डेलेना, कॅक्वेटा व पुटूमायो मुख्य नद्या आहेत मिरा, पॅटिआ, इस्कुआंडे, मिकाइ, ब्रेनाव्हेंटूरा, सॅनज्वान व बॉडो या पॅसिफिक किनाऱ्याच्या मुख्य नद्या आहेत ॲट्रॅटो, बॅंकुबा, सिनु, मॅग्डेलेना, झुलिआ या कॅरिबियन सिस्टिमच्या नद्या आहेत ग्वायाबेरो व्हिचाडा, मेटा व अरॉकचा वरचा भाग या पूर्वेकडील मैदानातील नद्या आहेत

स मु द्र कि ना रा—समुद्रकिनारा पॅसिफिक महासागर व कॅरिबियन समुद्र याच्या लगत असून पानामाच्या कालव्यामुळे योगानें याचे दोन भाग झाले आहेत टुमाको व ब्रेनाव्हेन्टुरा हीं दोन व्यापारी बंदरें आहेत मिरा, पॅटिआ सॅनज्वान नद्यांतून लहान बोटी जातात पॅसिफिक किनाऱ्याचीं मुख्य आखातें टुमाको, चोको, मॅग्डेलेना, कॅंपिटा, कोर्बा, प्युर्गो, उर्‍हिय, सोलॅनो, कुपिका, ओक्टाव्हिआ हीं आहेत कॅरिबियन किनाऱ्यावर बॅरन किला, कार्टाजेना, सॅंटा मार्टा, वरिओहाचा हीं मुख्य बंदरें आहेत युराबाचें आखात, मोरोस्किलो, सायनेगा डिसॅंटा मार्टा हीं मुख्य आखातें आहेत

ह वा—हा देश बहुतेक उत्तर उष्णकटिबंधात आहे ॲमेझॉनच्या जंगली मैदानाचा थोडासा भाग भूमध्यरेषा ओलांडून दक्षिण उष्णकटिबंधात गेलेला आहे ॲंडीज पर्वत दक्षिणोत्तर या देशांतून गेल्यामुळ अटलांटिक महासागराचे पूर्वेकडे वहाणारे वारे थंड होऊन पूर्व उतरणीवरील ॲमेझानच्या जंगली मैदानावर पुष्कळ पाऊस पडतो समुद्रकिनाऱ्यावरील मैदान दलदली व अरण्यें यांनीं व्यापलें असून तथील हवा फार रोगट आहे वर्षांत ॲमेझान प्रदेशातील हवेंत विशेष फेरबदल होत नाहींत

लो क सं ख्या—१९१२ सालीं पनामा वगळून कोलंबियाची लोकसंख्या ५०,७२,६०४ होती पैकीं १,५०,००० इंडियन लोक होते येथील सध्याचे गोरे लोक, कोलंबियाचा शोध लागून तो जिंकल्यावर पुढ ३ शतकात आलेल्या गोऱ्या वसाहतवाल्यांचे वंशज होत इंडियन व मेस्टिझो हे येथील जुने रहिवाशी होत

रा ज की य वि भा ग व श ह रें—याचे १७ विभाग पाडलेले आहेत लहान शहरांमध्यें सांगण्यालायक अम्बालेमा असून तें तंबाकू व विड्याकरिता प्रसिद्ध आहे शिवाय ब्युनाव्हेन्टुरा चॅपारेल, हॉंडा, गिरार्डोट रेल्वे ठाणें व विल्डो हीं दुसरीं शहरें आहेत

द ळ ण व ळ णा चे मा र्ग—कोलंबियामध्यें रेल्वे करण्याचा प्रश्न फार मुष्कीलीचा आहे वस्तीचा व पिकाऊ प्रदेश बहुतेक डोंगराळ भागात असल्यामुळें मॅग्डेलेना नदी हीच काय ती दळणवळणाच्या सोईची आहे स्पॅनिश लोकांनीं बोगाटापासून मॅग्डेलेना नदीच्या खोऱ्यात जाणारे दोन रस्ते बांधले होते सध्या ते नादुरुस्त स्थितींत आहेत. कॉका व नेचो नद्यांतून लहान बोटी चालतात मॅग्डेलेना नदाला जोडलेल्या नऊ रेल्वे लाइनी व तीन न जोडलेल्या लाइनी आहेत १९०७ मध्यें बोगोटा, बॅरनकिला व कॅर्टागिनामध्यें रेल्वे चालू होत्या सडकाळ उष्ण कटिबंधातील प्रदेशातून डाका नेण्यास फार अडचण पडत असल्यामुळें तार व डाकखात्याची व्यवस्था बरोबर नाहीं पॅसिफिक समुद्रकिनाऱ्यावर ब्युनाव्हेन्टुरा येथें समुद्रातून तार जाते कॅरिबियन समुद्रावरील मुख्य बंदरें व प्रांताच्या राजधान्या याचे मध्यें व बोगोटामध्यें टपालाच दळणवळण आहे परंतु त्यात वारंवार अडथळे येतात ब्युनाव्हेन्टूरा, बॅरनक्विला कॅर्टाजिना, सॅंटामार्टा व रिओहॅचा या बंदरातून सरकीचा व्यापार चालतो टुमाको व व्हिलामाझार या बंदराचा इक्वेडोर व व्हेनेझुएलाशीं थोडा व्यापार चालतो लहान बोटी व नावा नद्यांतून देशाच्या अंतर्भागात मालाची नेआण करतात किनाऱ्याना व्यापार मुळींच नाहीं परकी

व्यापार जर्मन व ब्रिटिश लोकांच्या हातात आहे. कॅरिबियन समुद्राची बंदरें व युनायटेड स्टेट्स व युरोपची बंदरें यामध्यें दळणवळण आहे. १९१४ मध्यें कार्टाजेना, संटामार्टा व सान अँड्रीज येथें बिनतारी विद्युत्संदेशगृहें स्थापण्यात आलीं. याचप्रमाणें युनैटेड स्टेट्सशीं चालू असलेल्या दळणवळणाच्या बाबतींतहि पुष्कळ सुधारणा करण्यात आल्या आहेत.त्याचप्रमाणें चांगल्या सडका बांधण्यात आल्या.१९२० मध्यें कोलंबियाच्या मालकीची८००मैलांची रेल्वे होती. प्यूटो विलचीसपासून ब्यूकरमागापर्यंत रेल्वे करण्याचें काम चालू झालें. कार्टागो ते काचीपर्यंत पॅसिफिक रेल्वे करण्याचें कामहि सुरु करण्यात आलें. याशिवाय इतर किरकोळ रेल्वे तयार करण्याचीं कामें सुरू करण्यात आलीं.

शे ती.—कोलंबियाचे बरेच लोक शेती व गुरेढोरें बाळगून उपजीविका करतात. मका, गहूं, इतर गळिताचीं धान्यें भाज्या व फळें उंचवटयाच्या मैदानातून पिकवितात. मैदान व सखल दर्‍यात कार्फी व समशीतोष्ण कटिबंधातील प्रदेशात होणार्‍या पदार्थांची लागवड होते. काकाव, कापूस, साखर, तांदूळ, तंबाखू, बनाना ( केळीं ), येम , कसाव्हा, ॲराकाचा, बटाटे व गोड बटाटे हे पदार्थ येथें उत्पन्न होतात. गुरें चारण्याचा धंदा फार महत्त्वाचा नाहीं. लोंकर व चामडीं काढण्याकरिता शेळ्या पाळतात. सॅटान्डोर प्रांतात घोड्याची पैदास होते. डुकरें सर्वत्र आढळतात.

ख नि ज प दा र्थ—कोलंबियामध्यें खनिज पदार्थांची पुष्कळ समृद्धता आहे. सोनें, रुपें, पाच, रत्नें, प्लॅटिनम्, तांबें, लोखंड, मँगनीज, शिसें, जस्त, पारा, कोळसा, शुद्ध रॉकेल ( पेट्रोलियम ) व मीठ हीं येथील खनिज द्रव्यें आहेत.

प क्का मा ल.—बोगोटाजवळील पॅडेरा लोखंडी कारखान्यात साखरेच्या कारखान्यांत उपयोगी पडणारीं बॉयलरें व शेतकीचीं आउतें होतात. इप्पिनाल येथें मातीचीं भांडीं होतात. पोपायान व पॅस्टो येथें लोंकरीच्या गिरण्या आहेत. अंबालेम व पामिरा येथें विड्या तयार होतात. साहेबी टोप्या करण्याचा धंदा बहुतेक सर्व ठिकाणीं चालतो. आगपेटया, रम नावाची दारू व साखर येथें तयार होतात.

व्या पा र—कणीक, तांदूळ, अन्न, तयार केलेलें अन्न, साखर, कोळसा, घासलेट, बीर, दारू, लिकर, रेल्वेचें सामान, यंत्रें, साधारण लोखंडी सामान, कुंपणाची तार, कापसाचें व इतर कापड, औषधी, इमारतीकरता करवतलेलें लाकूड, सिमेंट व कागद इत्यादि पदार्थ या देशात येतात. व कार्फी, बनाना (केळीं), चामडीं, तंबाखू, मौल्यवान धातू, रबर, कॅबिनेट लाकूड, डिव्हिडिव्हि, रंगाचें लाकूड, हस्तिदंत, टोप्या, ऑर्चिड, व्हॅनिला इत्यादि पदार्थ बाहेर रवाना होतात.

इ. स. १९१६ मध्यें कोलंबियात परराष्ट्रातून जवळ जवळ ५९३२०४१ पौंडाची आयात झाली. आयात वस्तूंत कापड, मीठ, धातू, औषधी, कागद, शेतकीची व खाणीला लागणारीं हत्यारें, मादक पेयें व तेलें या प्रमुख वस्तू होत्या. इ. स. १९१६ मध्यें कोलंबियातून ७२०१३६५ पौंडाचा माल निर्गत झाला. निर्गत वस्तूंमध्यें खाणींतील द्रव्यें कातडी, गुरें ढोरें, इत्यादि वस्तू होत्या. शेंकडा ७५ टक्के माल फक्त युनैटेड स्टेट्समध्येंच निर्गत झाला.

रा ज्य व्य व स्था— कायदे करण्याचें मंडळ, राज्यकार्यकारी मंडळ व प्रतिनिधिसभा यांचें बनलेलें असतें. हें मंडळ बोगोटा येथें दोन वर्षांतून एकदां फेब्रुवारी पहिलीपासून नव्वद दिवसाकरितां भरत असतें. सीनेटमध्यें ४८ सभासद असतात. प्रत्येक प्रांताकरिता तीन सभासद गव्हर्नर व त्याचे सल्लागार मंडळ निवडतें. अध्यक्ष व त्याचे दोन प्रधान संयुक्त जिल्ह्याकरिता तीन सभासद निवडतात. यांची मुदत चार वर्षांची असते. चेंबरमध्यें ९७ मेंबर असतात. प्रत्येक ५०,००० लोकांना एक प्रतिनिधि निवडून देता येतो. इंटेंडेन्सियाकरता एक मेंबर प्रत्येकी असतो. काँग्रेसनें चार वर्षांकरता निवडलेल्या एका प्रेसिडेंटाच्या हातीं कार्यकारी सत्ता असते. राज्यकारभाराचीं सर्व कामें पाहण्याची सत्ता प्रेसिडेंटला दिलेली असते. याचे मदतीस अंतरराष्ट्रीय, परराष्ट्रीय, जमाबंदी,लष्कर, सार्वजनिक शिक्षण, लोकोपयोगी कामें वगैरे खात्याच्या मंत्र्यांचें एक मंडळ असते. हे सहा मंत्री प्रेसिडेंट निवडतो व बडतर्फ करतो. प्रांताचे गव्हर्नर राज्याचे प्रांताध्यक्ष, परराष्ट्रीय मंत्री, कोर्टाचे न्यायाधीश नेमण्याचा अधिकार प्रेसिडेंटला आहे. याचा पगार सालीना ३६०० पौंड व मंत्र्याच्या १२०० पौंड आहे. राष्ट्रसभा मोडून सीनेटला कांहीं कार्यकारी अधिकाऱ्यांच्या नेमणुका करण्याचा अधिकार दिलेला आहे. बोगोटा येथें सात मेंबरांचे एक वरिष्ठ कोर्ट व प्रत्येक न्यायविषयक जिल्ह्यात एक कोर्ट अशी येथील न्यायव्यवस्था आहे. कनिष्ठ कोर्टें व मॅजिस्ट्रेट आहेत.

१९१० च्या कोलंबियाच्या काँग्रेसनें १८८६ च्या कोलंबियाच्या राज्यशासन घटनेमध्यें महत्त्वाचे फेरफार केले. १९१० च्या जून महिन्याच्या ६ व्या तारखेस असा एक कायदा पसार करण्यात आला कीं जर अध्यक्षाची जागा रिकामी पडेल तर त्याच्या बदलीं काँग्रेसनें निवडलेल्या दोघा इसमानीं मिळून कोलंबियाची राज्यव्यवस्था पहावी. काँग्रेसनें जर दोघा इसमांची निवड केली नाहीं तर अध्यक्षाच्या दिमतीस असलेल्या कार्यकारी मंडळानें सर्व राज्यव्यवस्था पहावी. १९१० मध्यें आक्टोबर महिन्याच्या ३१ व्या तारखेस दुसरा एक कायदा पास करण्यात आला. त्या कायद्यान्वयें, काँग्रेसच्या व अध्यक्षाच्या निवडणुकीच्या बाबतींत फक्त लिहितावाचता येणाऱ्या अगर कांहीं स्थावर जिंदगी असणाऱ्या पुरुषांनाच मत देण्याचा अधिकार असावा असें ठरविण्यात आलें. देहांतशिक्षा रद्द करण्यात आली. अध्यक्षाची मुदत ४ वर्षे करण्यात आली. राष्ट्रीय सभेनें एखादा कायदा बेसनदशीर ठरविलें तरी तो कायदा अमलात आणावा ?

ठरविण्याचा पूर्ण अधिकार वरिष्ठ न्यायकोर्टाला देण्यात आला १९१४–१८ च्या दरम्यान कोंच हा अध्यक्ष होता. त्याच्या कारकीर्दीत ८ जणांचें कौन्सिल ऑफ स्टेट हें पुन्हा निर्माण करण्याचें ठरलें व या मंडळाचें काम अध्यक्षाला राज्यकारभाराच्या बाबतींत सल्ला देणें हें होतें. १९१६ च्या कायद्यानें राष्ट्रच्या सैन्याची संख्या ६००० ठरविण्यात आली १९२० च्या जाहीरनाम्यानें पायदळाची मुदत १५ महिने, व घोडदळाची १८ महिने सक्तीची करण्यात आली १९२१ मध्यें आरमारखात्याच्या ताब्यात काहीं क्रुझर्स व बोटी होत्या वैमानिक शिक्षण देण्यासंबंधीं एक शाळा काढण्यासबंधींहि १९०० मध्यें वाटाघाट सुरु होती

शि क्ष ण—राज्यकर्त्यांचें दुर्लक्ष असल्यामुळें शिक्षणप्रगती मुळींच नाहीं. मोठमोठ्या शहरांतून दुय्यम शिक्षणाच्या शाळा आहेत कोलंबियांत एकंदर चार कॉलेजें आहेत प्राथमिक शिक्षण मोफत आहे. परंतु सक्तीचें नाहीं १९१६ सालीं सर्व प्रकारच्या शिक्षणसंस्थांची संख्या ५८३९ होती पैकीं ५३८७ प्राथमिक शिक्षणाच्या शाळा होत्या शेकडा ५ लोकांना शिक्षण मिळत आहे

ध र्म—येथें रोमन कॅथोलिक धर्म चालतो ख्रिस्ती धर्मतत्त्व व कायदा यांचे विरुद्ध नसलेल्या कोणत्याहि धर्मास येथें मज्जाव नाहीं सर्व दर्ज्यांच्या लोकांवर ख्रिस्ती धर्मोपदेशकाचें वर्चस्व आहे व शिक्षणविषयक ताबा त्याचे हातीं आहे.

ज मा बं दी—परकी माल देशांत आल्यावर त्याच्यावर बसविलेला कर व देशांत उत्पन्न होणाऱ्या पदार्थांवरील कर, लिकर, दारू, सिगारेट, तंबाखू, आगपेट्या, काडतुसें, मीठ, सरकारी पाचेच्या खाणी, मोत्यांचे कारखाने, स्टँप, टपाल व तारखातें यांचें उत्पन्न व कर या उत्पन्नाच्या बाबी आहेत.

ना णें—सोन्याचीं नाणीं–डबल कॉंडोर = २० डॉलर कॉंडोर = १० डॉ अर्धा कॉंडोर = ५ डॉ. डॉलर = १०० सेंट चांदीचीं नाणीं–अर्धा डॉलर = ५० सें पेसेटा = २० सें रिअल = १० सेंट निकल = ५ सेंट. ब्रांझ = २ सेंट व १ सेंट चांदीचें नाणें शेंकडा १० व निकल आणि ब्रांझचें नाणें शेंकडा ३ सोन्याच्या नाण्याचें आहे. जकात सोन्याच्या नाण्यात अथवा चालू भावाप्रमाणें कागदी नाण्यात द्यावी लागते.

व ज नें व मा पें—अंतरराष्ट्रीय व्यापरात मेट्रिक सिस्टिम पद्धतीचीं वजनें व मापें चालतात परंतु व्यवहारात जुनीं स्पॅनिश मापें चालतात. द्रव पदार्थांचें माप लिटर आहे.

इ ति हा स—स्पॅनिश दर्यावर्दी लोक अमेरिका खंडातील कोलंबियाच्या किनाऱ्यावर प्रथम आले. आलोंसोडिओजेडा १४९९ व १५०१ मध्यें कित्येक ठिकाणीं उतरला व कोलंबसनें १५०२ मध्यें व्हेरेग्वा, पोर्टोबेलो व इतर ठिकाणें पाहिलीं १५०८ मध्यें ओनेडोला स्पॅनिश सरकारपासून केपव्हेलापासून डारियनच्या आखातापर्यंतच्या प्रदेशाची देणगी मिळाली, व डारियन आखातापासून केप ग्रॅशियस एडिओसपर्यंतचा मुलूख निकवेसाला मिळाला. १५२६-१५३७मध्यें गोंझालो जिमिनेझ डिक्वेसाडा याच्या हाताखालीं एक स्वारी सॅंटामार्टाहून मॅगडेलेना नदीच्या काठानें गेली होती व क्वेसाडानें या भागाला न्यू ग्रानाडा हें नाव दिलें यानंतर येथें स्पॅनिश सत्ता बरीच स्थापित झाली व समुद्रकिनाऱ्याचे बाजूनें भरभराटीच्या वसाहती झाल्या राज्यव्यवस्थेकरतां स्पॅनिश सरकारनें न्यू ग्रानाडाचा प्रांत १५६४ मध्यें बनविला. १७१८ मध्यें यावर एक राजप्रतिनिधि नेमण्यात आला या प्रांतांत सध्याचा कोलंबिया, व्हेनेझुएला व इक्वेडोरचा समावेश होत असे १८१९ मध्यें बोलिव्हारनें हे तीन विभाग एकत्र करून त्याला कोलंबियाचें प्रजासत्ताक राज्य असें नाव दिलें. परंतु १८२९ मध्यें व्हेनेझुएला अलग झालें व १८३० मध्यें इक्वेडोर अलग झालें. १८३१ मध्यें न्यूग्रॅनाडाचें प्रजासत्ताक राज्य स्थापित होऊन १८३२ मध्यें राज्यव्यवस्था ठरविण्यात आली. प्रेसिडेंटची नेमणूक चार वर्षे ठरविण्यात आली. पहिला प्रेसिडेंट जनरल फ्रॅन्सिस्को डि पॉला सँटॅन्डर झाला

१९०९ च्या ऑगस्टमध्यें जनरल होजनें अध्यक्षपदाचा राजीनामा दिल्यामुळें जनरल रॅमॉन गोंझालेस व्हेलेनिया याला एक वर्षपर्यंत अध्यक्ष नेमण्यात आलें. १९१० च्या जुलै १५ मध्यें कॅर्लास रेस्ट्रेपो याला अध्यक्ष निवडण्यात आलें यानें कोलंबियाची सांपत्तिक स्थिति सुधारण्याचे प्रयत्न केले त्याचप्रमाणें पनामा प्रकरणाचीहि योग्य तऱ्हेनें विल्हेवाट लावण्यासाठीं त्यानें आटोकाट प्रयत्न केले. अध्यक्ष पदाची मुदत संपताच त्याला पुन्हा दुसऱ्या खेपेस अध्यक्षाचे जागेकरतां उभे रहाण्याची विनंति करण्यात आली पण त्यानें ती नाकारली त्याच्यामागून १९१४ मध्यें जोसे व्हिसेंटे कोंचा याची निवड करण्यात आली कोंचा हा हुजुरपक्षाचा होता. तरी पण त्यानें आपल्या कार्यकारी मंडळांत उदारपक्षाच्या दोघा तिघा गृहस्थांना नेमलें परराष्ट्रीय खात्यावर मोर्को फायडेल सुजरान या उदारमतवादी व सुप्रसिद्ध विद्वानाची मुत्सद्याची नेमणूक केली त्याचप्रमाणें डीओ मेंडोसा या उदारमतवादी गृहस्थाला फडणीस नेमलें पण त्याचें व मेंडोझाचें पुढें न पटल्यामुळें मेंडोझा यास राजीनामा द्यावा लागला. कोंचाच्या कारकीर्दीतच महायुद्धाला सुरवात झाली व त्यामुळें जे नवीन नवीन सांपत्तिक व इतर अवघड प्रश्न उद्भूत झाले त्यांना तोंड देण्याचें अवघड काम कोंचा याला करावें लागलें १९१८ मध्यें कोंचाची मुदत संपल्यानंतर सुआरेझ याला अध्यक्ष निवडण्यात आलें

१९०३ मध्यें पनामा हें स्वतंत्र संस्थान बनल्यापासून कोलंबिया, पनामा व युनायटेड स्टेट्स यामध्यें बरेच नाजुक व गुंतागुंतीचे प्रश्न उपस्थित झाले होते १९०९ मध्यें ही भांडणें मिटविण्याचा यत्न कोलंबियापासून करण्यात आला

पण त्याला याचें तसें यश आलें नाहीं. तरी पण त्यावेळीं कधावस्था तह करण्यात आला. या तहान्वयें कोलंबियानें पनामा हें स्वतंत्र आहे असें कबूल करावें, १९०३ पूर्वी कोलंबियाकडून पनामा संस्थानानें जें कर्ज घेतलें असेल त्यापासून पनामाला मुक्त करण्यात यावें व कोलंबियाच्या नुकसानभरपाईबद्दल पनामानें १० वर्षेपर्यंत दरवर्षी २५००० डॉलर्स कोलंबियाला द्यावे असें ठरलें. वास्तविक कोलंबिया या तहाला राजी नव्हताच. त्यामुळें १९१४ मध्यें या तहावर पुन्हा चर्चा होऊन त्यात युनायटेड स्टेट्सनें कोलंबियाला पनामाच्या स्वातंत्र्याबद्दल २,५०,००,००० डॉलर्स द्यावे असें ठरलें. पुढें १९१४ च्या बैठकींत कोलंबिया काँग्रेसनें या ठरावाला आपली मान्यता दर्शविली. महायुद्ध सुरू झाल्यानंतर लगेच सुआरेझ यानें कोलंबियातील सर्व वृत्तपत्रकारांस महायुद्धाच्या बाबतींत तटस्थ धोरण राखण्याची विनंति केली. त्याचप्रमाणें १९१७ मध्यें ज्यावेळीं अमेरिका ही दोस्त राष्ट्रांच्या वतीनें महायुद्धात पडली त्यावेळींहि कोलंबिया या युद्धात तटस्थ रहाणार असें सुआरेझ यानें पुन्हा जाहीर केलें. पुढें राष्ट्रसंघामध्यें सामील होण्यासाठीं ज्यावेळीं कोलंबियाला आमंत्रण करण्यात आलें त्यावेळीं कोलंबिया काँग्रेसनें राष्ट्रसंघात सामील होण्याचें ठरविलें. पण सामील व्हावयाच्या वेळीं पनामा हें स्वतंत्र राष्ट्र मानावयाला कोलंबिया तयार नाहीं ही अट कोलंबियानें दोस्त राष्ट्रांना कबूल नंतरच मग राष्ट्रसंघात कोलंबियानें भाग घेतला. १९२० च्या डिसेंबरमधील राष्ट्रसंघाच्या जिनीव्हा येथील बैठकीला कोलंबियानें आपले दोन प्रतिनिधी धाडले.

कोलबेर (१६१९–१६८३)—या फ्रेंच मुत्सद्याचा जन्म ऱ्हीम्स शहरीं झाला. लहान हुद्यावरून चढत चढत अखेरीस तो फ्रान्समधील अतिशय थोर मंत्र्यांपैकीं एक मंत्री झाला. इ. स. १६६१ मध्यें तो कंट्रोलर–जनरलच्या जागेवर गेला. टॅली अथवा संपत्तीवरील कर कमी करणें व डिपार्टमेंटल कचेरी स्थापणें ह्या त्याच्या प्रथम सुधारणा होत. उद्योगधंदे व व्यापार यामध्यें शिस्त व नियमितपणा असावा असें त्यास मनापासून वाटे. त्यानें केलेले ठराव नेहमी अतिशय कडक असत. उद्योगधंदे वाढविणें, जकातचौक्या स्थापून व्यापार चिरस्थायी करणें व मोठया रकमा किंवा हक्क देऊन नमुनेदार कारागिरांच्या कामाची निपज करणें ह्या गोष्टी त्यानें केल्या. वसूल गोळा करण्यात येणाऱ्या लबाड्या बंद करण्याकरिता त्यानें कसून प्रयत्न केला व या कामीं फार निष्ठुरपणा दाखविला. तथापि पूर्णपणें नवीन अशी पद्धत अमलात आणण्याजोगें त्याचें मन विचारी व मोकळ नव्हतें. त्याला मार्गात पुष्कळ अडचणी आल्या, परंतु त्यानें शहाणपणानें व धैर्यानें त्यास तोंड दिलें. जहाजाच्या व्यापाराची त्याला फार आवड होती. त्याचप्रमाणें कला व शास्त्रें हे त्याच्या आवडीचे विषय होते. कारागिरांना उदार देणग्या देऊन त्यानें कलेस उत्तेजन दिलें इ. स. १६६३ मध्यें त्यानें दि ॲकॅडमी ऑफ इन्स्क्रिप्शन्स' आणि 'बैल्स लेटर्स' याची स्थापना केली. स १६६८ त 'ॲकॅडमी ऑफ सायन्सेस' ही संस्था त्यानें स्थापन केली. स. १६८३ त पॅरिस येथें तो मरण पावला

कोलंबो—कोलंबो ही सीलोनची राजधानी व मुख्य बंदर आहे. हें सीलोन बेटाच्या पश्चिम किनाऱ्यावर आहे. येथील लोकसंख्या सन १९०१ मध्यें १,५८,६९१ होती. ह्या मोठ्या व कृत्रिम बंदराच्या दक्षिणेस एक लहानसें भूशिर आहे. येथें पूर्वी किल्ला होता. परंतु १८६९ मध्यें तो पाडण्यात आला. येथें एक "रॉयल कॉलेज", धंदेशिक्षणाचें विद्यालय व सेंट जोसेफ रोमन कॅथॉलिक विद्यालय आहे. या शहरात बहुतेक ठिकाणीं ग्यासचे दिवे आहेत व काहीं ठिकाणीं विजेचे दिवे आहेत. शिवाय येथें विजेच्या ट्रामगाड्या आहेत. शिवाय मद्रासप्रमाणें रिक्शा हें लोकप्रिय वाहन उपयोगात आहेच. शहरात ३० मैलावरून पाण्याचा पुरवठा होतो. सीलोनमध्यें सुरू झालेल्या चहाच्या व कॉफीच्या लागवडीमुळें कोलंबोची बरीच भरभराट झाली. या शहरात जहाजातून पाठविण्यास कॉफी बंद करण्याकरिता व स्वच्छ करण्याकरिता सुमारें १०,००० लोक कामावर आहेत कोलंबोचें वाढत्या महत्वाचें कारण तें पूर्वेकडील आगबोटी लागण्याचें बंदर आहे हें होय. १८७५ साली येथील सुंदर धक्क्याच्या पायाचा दगड बसविला. या बंदराला आता पहिल्या प्रतीचें महत्व आलें आहे हल्लीं जगातील उत्तम कृत्रिम बंदरांपैकीं हें एक आहे आगगाडीच्या वाढीमुळें सीलोन बेटाचा सर्व व्यापार येथें आला व अशा रीतीनें त्याची भरभराट झाली.

कोलंबो हें प्रथम कालनी या नावानें प्रसिद्ध होतें अरब लोकांनी याचें नाव बदलून कोलंबु असें ठेविलें. १३४६ मध्यें इब्नबतूता यानें या शहराचा सेरेन्दिव(सुवर्णद्वीप)मधील सर्वांत मोठें व सुंदर शहर असा उल्लेख केला आहे १५१७मध्यें पोर्तुगीज लोकांनी येथें वसाहत केली व १५२० मध्यें त्यांनी आपल्या बंदराला तटबंदी केली. १५८६ मध्यें राजसिंह यानें या शहराला वेढा दिला. परंतु त्यास तें घेता आलें नाही १६५६ मध्यें हें डच लोकांनी काबीज केलें तेव्हा हें भरभराटीत होतें, व येथें पाच धर्मपंथाचे मठ होते. ९०० पेक्षा जास्त सरदार घराणीं व १५०० व्यापार व राजकीय धंद्यात असलेल्या लोकांची घराणीं येथें होतीं. १७९६ मध्यें हें ब्रिटिशांना देण्यात आलें.

कोलब्रुक—हेन्री थॉमस कोलब्रुक या पौरस्त्यभाषाकोविद इंग्रज गृहस्थाचा जन्म १७६५ त झाला. त्याचें शिक्षण घरींच झालें असून वयाच्या पंधराव्या वर्षींच त्यानें फ्रेंच व लॅटिन भाषा आणि गणित या विषयात बरेंच प्राविण्य मिळविलें. १७८२ सालीं हिंदुस्थानात एका कारकुनाच्या जागेवर त्याची नेमणूक झाली व पुढें लवकरच बढती होऊं लागली हिंदुस्थानांत आल्यानंतर

त्यानें संस्कृत भाषेचा अभ्यास केला. भाषा जाणणारांपैकीं हा एक विद्वान गृहस्थ बनला.' डायजेस्ट ऑफ दि हिंदु लॉ' (*हिंदुकायद्यांचें वर्गीकृत संग्रहपुस्तक*)चें अपुरें राहिलेलें भाषांतराचें काम याजकडे देण्यांत आलें होतें १८०५ सालीं फोर्ट विल्यम येथील दिद्यालयांत हिंदु कायदा व संस्कृत विषयाचा त्याला अध्यापक नेमिलें. याच सुमारास त्यानें संस्कृत व्याकरण, हिंदुधर्मसंस्काराची माहिती व वेदावर निबंध लिहिले. तो १८१४ सालीं इंग्लंडला परत गेला व १८३७ सालीं मार्चच्या १८ व्या तारखेस मरण पावला. मरणापूर्वी कांहीं दिवस तो एशियाटिक सोसायटीचा डायरेक्टर होता.

**कोलम**—वऱ्हाड-मध्यप्रांतांतील एक असंस्कृत जात यवतमाळच्या वणी तालुक्यांत विशेषत राहणारे हे लोक असून यांची एकंदर संख्या २५००० आहे. हे लोक गोंड वंशांतले आहेत व यांची भाषा कोलामीच आहे व तिचें स्थान गोंडीप्रमाणेंच कानडी, तामीळ व तेलगु यांच्यामध्ये आहे. कोलामी, भीली व चांदाची नायकी भाषा या तिन्ही बहिणींसारख्या आहेत पण गोंडी भाषेपेक्षा ही फारच भिन्न आहे या भाषेचा व नीलगिरींतल्या उपभाषेचा संबंध आहे. यांचीं कुलनांवें मराठी आहेत. यांचीं गाणीं देखील मराठी आहेत. यांची राहणी कुणब्यासारखी आहे. वऱ्हाडांत ज्या बायकास नवरा लौकर मिळत नसे त्या अन्य पुरुषावर झडप घालीत आणि लग्न करावयास लावून त्यांना आपल्या ताब्यांत ठेवीत.

यांच्यांत उपजाती नसून एकाच विभागांत लग्न न करणारे कांहीं विभाग पडले आहेत. स्त्रिया शेतांत किंवा रानांत असतांना वधूला हे लोक पळवून नेतात. कधीं कधीं पुरुषांना पत्ता मिळाल्यास ते काठ्या घेऊन युद्ध करावयास येत आणि त्या युद्धांत वराचे लोक हरले तर वधूच्या बापास कांहीं रुपये देऊन वधू घेत. आजकाल तर या युद्धाचें नुसतें सोंग करतात. लग्नविधि कुणब्यासारखाच असतो. विधवांचें लग्न त्याच्या आईबापाच्या परवानगीशिवाय होत नाहीं. पण एखाद्या विधवेला कोणी पुरुष फारच आवडला तर आपल्या डोक्यावर पाण्याचें मडकें घेऊन त्याच्या घरांत तिनें शिरावें म्हणजे तिला बाहेर घालवितां येत नाहीं काडी मोडणाऱ्या जोडप्यानें मद्याचें भांडें घेऊन पंचाइतीसमोर उभें रहावें. त्या भांड्यावर एक काडी ठेवावी, तिचें टोंक दोघांनीं धरावें व नवऱ्यानें बायकोस बहीण म्हणावें व बायकोनें नवऱ्याला भाऊ म्हणावें म्हणजे *काडी मोडली*. हे लोक प्रेतें पुरतात. या लोकांनी मुख्य देवी सीता आहे. हे लोक जगाचा उत्पन्न व रक्षणकर्ता कोणी देव आहे असें मानीत नाहींत. गावाचें मोठ्या रोगापासून रक्षण करण्याची यांची रीत फार मनोरंजक आहे. गावाच्या चारी दिशास चार दगड ठेवतात. नाईक सीतेला बकरा व कोंबड्याचा बळी अर्पण करतो व चारी दिशांच्या दगडास जोडणाऱ्या मिठाच्या ओळी गावाभोंवतीं काढतो. फक्त एक वाट मोकळी ठेवतो त्याच वाटेनें सर्वांनीं गेलें व आलें पाहिजे. *या ओळीला वेंदेश म्हणतात. या ओळींत रोगराईचा प्रवेश* होत नाहीं असें समजतात हे लोक गोंडाच्या हातचें जेवतात पण गोंड यांच्या हातचें जेवीत नाहींत. हे उंदीर, वाघ, सर्प, गाढवें व कोल्हे खातात. पूर्वी नायकास जमीनीचे वांटे करण्याचा अधिकार होता व अद्यापपर्यंत हे कोर्टांत न जातां पंचाइतीकडूनच तंटे तोडून घेतात प्रायश्चित्त देऊन जातींत परत घेण्याचा विधि असा —पतितानें नदींत डोकें भिजवावें व क्षौर करावा आगटीजवळ बसून सर्व दोष जळाला असें लोकांना सांगितलें म्हणजे स्नान करून जातभाईच्या आगठ्यांचें चरणतीर्थ घ्यावें. स्त्रियास देखील जातींत पावन करून घेण्यास क्षौर करावेंच लागतें कापूस चोरण्याविषयीं यांची प्रसिद्धी आहे यांना निरनिराळ्या वनस्पती व त्यांचा उपयोग फारच चांगला ठाऊक आहे [ रसेल व हिरालाल. ]

**कोलाचल**—मद्रास इलाख्यांतील त्रावणकोर संस्थानामधील इरेनियल तालुक्यांतील एक बंदर याची लोकसंख्या १९०१ सालीं १००० होती पावसाळ्यांत अगर सप्टेंबर ते एप्रिल या महिन्यांत १५ ते २० जहाजें व ४०।५० बोटी या बंदराला लागतात. येथून कॉफी, खारें मास, सागवान, गूळ इत्यादि जिन्नस बाहेर जातात. व तांदूळ, बंगाली चणे, लोखंड इत्यादि जिन्नसांची आयात होते. येथें पूर्वी निळीचा कारखाना होता. हें प्राचीन काळीं चांगलें बंदर असून एका वेळीं डच लोकांच्या ताब्यांत होतें असें बार्थोलोम्यूनें म्हटलें आहे. १७४० मध्ये त्रावणकोरच्या सैन्याचा सेनापति राम अय्यन दलव यानें डच लोकांचा पराभव केला व हें बंदर ताब्यांत घेतलें.

**कोलायन**—एक जात. यांची वस्ती मद्रास व पूर्व प्रांतांत असून संख्या ( १९११ ) २२२४१ आहे. मलबारच्या उत्तरेस व दक्षिण कानडांतील कासारगड तालुक्यांत कोलायन जात बहुधा आढळून येते. दक्षिण मलबारांत या जातीस उराली म्हणतात. माई रासणें व कांहीं हिंदू देवळांस दुधतुपाचा पुरवठा करणें हाच त्याचा वंशपरंपरागत धंदा असला तथापि सध्या बहुतेक कोलायन गवंड्याचें काम करतात. त्यांच्या ज्ञातिसंबंधीं दोन विभाग आहेत. आयन अथवा कोल आयन हा एक भेद व मारियन अथवा एरुमन हा दुसरा भेद होय. कोलायन हा शब्द गोल्ला व अयन या शब्दांपासून झाला आहे गोल्ला हा तेलगू शब्द असून त्याचा अर्थ गवळी असा आहे कोलायन व एरुमन या दोन मुख्य पोटजाती परस्परांत लग्न करीत नाहींत. परंतु दोन्ही ज्ञातींतील स्त्रिया नायरांशीं मात्र संबंध ठेवतात अशा लोकांच्या संततीला कोलायनपेक्षा हलके लोक म्हणून समजण्यांत येतें कोलायनांच्या उपाध्यायास मूधावन अथवा पोड्वन असें म्हणतात व त्यांची नेमणूक राजाकडून होते. वयांत येण्यापूर्वीच कोलायन

वधूंचीं लग्न ' तालिकेटू ' विधीनें करण्यात येतात. कानिसन ( ज्योतिषी ) जेव्हां मुहूर्त पाहून देतो तेव्हां तालिसमारंभ होतो व नंतर तिच्यावरून तांदूळ, नारळ इत्यादि सामसकाळ ओवाळून टाकण्यात येतात. मृताचें दहन करण्यांत येतें व पहिले दहा दिवसपर्यंत मतात्म्यास थोडें अन्न मिळावें म्हणून तें बाहेर ठेवलें जातें. बाराव्या दिवशीं बाथियन नावाचा उपाध्याय मृताच्या जागेवर जाऊन व विभूति घेऊन एक मनुष्याकार आकृति काढतो तेथें पूजा व नैवेद्य करतात व तो नैवेद्य मृतास अर्पण करतात हा विधि झाल्यावर स्नान करून ते शुद्ध होतात. [ थर्स्टन ].

**कोलार, जिल्हा.**—म्हैसूर संस्थानच्या पूर्वभागांतील एक जिल्हा. या जिल्ह्याचें क्षेत्रफळ १९११ सालीं ३,१८,४१२ चौरस मैल होतें.

सीमाः—उत्तरेस, अनंतपूर व कडाप्पा जिल्हे, पूर्वेस कडाप्पा व उत्तर अर्काट हे जिल्हे; दक्षिणेस सालेमचा जिल्हा, व पश्चिमेस, बंगलोर व तुमकूर जिल्हे.

स्वरूपवर्णन.—पूर्वघाटाच्या दक्षिणेस व ईशान्येस हा जिल्हा पसरला आहे. या घाटातून पालार व पेन्नेर नद्या वहात गेल्या आहेत. वायव्येस, नंदिदुर्गच्या भोंवतालच्या प्रदेशांत अर्कावती, चित्रावती, पेन्नेर, पालार, पापघ्नी व पोन्नेर या नद्या उगम पावल्या आहेत. नंदिदुर्ग पासून उत्तरेस एक पर्वताची रांग गेली असून तिची उंची ४८५१ फूट आहे. या पर्वताचें चेनुकोंड हें सर्वांत उंच शिखर होय. या जिल्ह्याच्या मध्यभागातून, टयाकल, रेवाकेलरी, कोलार ( ४०२६ फूट ), रहमानगड ( ४२२७ ) अवाजी दुर्ग ( ४३८९ ) व डोकलकोंड या रांगा उत्तरेस पसरलेल्या आहेत. पूर्वेस व ईशान्येसहि लहान लहान टेंकड्यांचें जाळें पसरलेलें आहे; व त्यामुळें पुष्कळ खोरीं बनलेलीं आहेत. जिल्ह्याच्या पूर्व व मध्य भागांत पालार नदीचीं खोरीं असून त्यामधील जमीन सुपीक आहे.

भूस्तरः—या जिल्ह्यांतील दगड अम्यूर जातीचा असून त्यांत अभ्रकाचे दगड मधून मधून विखुरले आहेत. नंदिदुर्ग मधील दगड हे ग्रानाइट ( वज्रतुंड ) दगडाच्या जातीचे आहेत. बौरिंगपेट तालुक्यातून जी टेंकड्यांची मालिका गेली आहे तींत ठिसूळ दगड सांपडतात हे बहुतेक चपटे असतात. या जिल्ह्याच्या दक्षिणभागांत कोलार गोल्ड फील्ड्स् आहेत.

वनस्पती.—बंगलोर जिल्ह्याप्रमाणेंच या जिल्ह्यांतहि बरेच तलाव असल्यानें, वनस्पतींची समृद्धि आहे. पाण्यांत व पाण्याच्या बाजूनें पुष्कळ प्रकारचीं गवतें व मुळ्या सांपडतात नंदिदुर्गच्या टेंकड्यावरहि अनेक प्रकारच्या वनस्पती व झाडें आहेत. या टेंकड्यावरील झाडें खूपच उंचच्या उंच असतात. या झाडांच्या आश्रयानें निरनिराळ्या प्रकारच्या लता व वेली उगवलेल्या असतात.

हवा व पर्जन्यमान.—येथील हवा बंगलोर जिल्ह्यांतील हवेसारखीच आहे. पण बंगलोरपेक्षां येथील पर्जन्याचें प्रमाण थोडें कमी आहे. सर्व जिल्ह्यांतच हवा निरोगी आहे. त्यातल्या त्यांत, चिकबळापूर व कोलार या शहरांची व त्यांच्या आसपासची हवा फार सुरेख आहे. पण चिकबळापूर येथें प्लेगचा त्रास वारंवार सोसावा लागतो. या जिल्ह्यांत बाहेरगांवच्या लोकांनी नेहमी येजा असल्यानें कॉलरा व इतर सांसर्गिक रोगांचा येथें बराच फैलाव आहे; पण हे साथीचे रोग बंद करण्यासाठीं आरोग्यसंरक्षक खात्यानें शक्य ती व्यवस्था करण्याचे प्रयत्न चालविले आहेत येथील पर्जन्याचें सरासरी मान २९ इंच आहे.

इतिहासः—या जिल्ह्याचा जो इतिहास उपलब्ध आहे त्यावरून या जिल्ह्यावर अगदीं प्रथम महाबली अगर बाण या लोकांची सत्ता होती. हे महाबली आपल्याला बलीचे वंशज असे मानीत. यांची राजधानी उत्तर अर्काट मधील पंडुर्बी पुरी ही होती. हा जिल्हा धरून सर्व तेलगु मुलुखावर, पल्लवाचें राज्य पसरलेलें होतें, व हे महाबली अगर बाण राजे हे पल्लवाचे मांडलिक होते. त्यानंतर वैदुंब घराण्याचीहि या जिल्ह्यावर सत्ता असावी असें दिसतें. दुसऱ्या शतकापासून तें दहाव्या शतकापर्यंत, या जिल्ह्याचा पश्चिमभाग गंग घराण्याच्या ताब्यांत होता. नंतर ९९८ मध्यें चोल लोकांनीं गंगघराण्याची सत्ता नाहींशी करून आपलें वर्चस्व बसविलें त्याच्या कारकीर्दींत या जिल्ह्याला निकरिलि चोलमंडल हें नांव पडलें १११६ च्या सुमारास या चोलांची सत्ता संपुष्टांत येऊन, होयसळ घराण्याची सत्ता या जिल्ह्यावर पसरली १२५४ मध्यें या घराण्याची दोन घराणीं होऊन, सोमेश्वराचा मुलगा रामनाथ याच्या कडे हा जिल्हा आला पण ही वाटणी फार दिवस टिकली नाहीं. होयसळ घराण्याचा राजा तिसरा बल्लाळ याच्या कारकीर्दींत पुन्हां पूर्वींचा सर्व प्रांत एकट्या बल्लाळाच्याच ताब्यांत आला. विजयानगरची सत्ता ज्या वेळीं या जिल्ह्यावर पसरली त्यावेळीं मुलबागल ही या राज्याची राजधानी झाली. १५ व्या शतकाच्या अखेरीस बहामनी सुलतानानें विजयानगरच्या मुलुखांत धुमाकूळ घातला असतां साळुव नरसिंह नांवाच्या विजयनगरच्या सेनापतीनें या बहामनी सुलतानाची स्वारी मोठ्या शौर्यानें परतविली व स्वतः च विजयानगरचें सिंहासन बळकावलें. पुढें थोड्याच वर्षांनीं तम्मे गौडा नांवाच्या एका मांडलिक राजानें सुगटूर येथें आपली सत्ता स्थापन केली व या त्याच्या कृत्याबद्दल विजयानगरच्या राजानें त्याला कोलार जिल्ह्याचा पूर्वभाग बक्षीस दिला. १४७६ मध्यें दुसऱ्या एका मांडलिक राजानें पश्चिमेस चिकबळापुर नांवाचें संस्थान स्थापन केलें. १७ व्या शतकांत कोलार जिल्हा विजापूरच्या ताब्यांत जाऊन विजापूरकरांनीं या मुलुखावर शहाजीची नेमणूक केली.

मोगलांच्या ताब्यांत जवळ जवळ ७० वर्षें ।

मराठ्यांच्या ताब्यात आला पुढें अनुक्रमें कडाप्पाचा नबाब, अर्काटचा नबाब, सलाबतजंग यांच्या तो ताब्यांत गेला. १७६१ मध्यें सलाबतजंग यानें हा जिल्हा हैदर अल्लीला दिला १७६८ मध्यें ब्रिटिशांच्या ताब्यातहि कांहीं काळ हा किल्ला होता, पण १७७० मध्यें मराठ्यांनीं पुन्हा तो जिंकून घेतला. पुढें हैदरानें पुन्हा तो आपल्या ताब्यात घेतला पण १७९१ मध्यें ब्रिटिशांनीं तो जिंकून घेतला. शेवटीं १७९२ मध्यें ब्रिटिशांनीं तो म्हैसूरकरांना देऊन टाकला. या जिल्ह्यातील अवनी, बेटमंगल व टेकल या ठिकाणीं प्राचीन काळचे अवशेष सांपडतात. नोनमंगल येथें १८९७ मध्यें एक जैनांचें देवालय सापडलें त्यामध्यें चौथ्या अगर पाचव्या शतकातील शिलालेख आढळून आले तसेंच त्या देवळात वाद्यें, लहान लहान मूर्ती व इतर वस्तुहि सापडल्या. नंदी येथील नंदीश्वराचें देवालय व कोलार येथील कोलारम्माचें देवालय हींहि जुनीं आहेत. नंदीश्वराच्या देवळातील नक्षीकाम प्रेक्षणीय आहे. हीं दोन्हीं देवळें कोलांच्या काळचीं म्हणजे ११ व्या शतकातील दिसतात कोलार शहरात हैदरअल्लीच्या घराण्यातील एका प्रसिद्ध पुरुषाचें थडगें आहे. सर्व जिल्ह्यात जे शिलालेख सापडले आहेत ते हल्लीं छापण्यात आले आहेत

शेतकी.—पठारावरील जमीन तांबडी व रेताळ असून त्यात गंबूर व ग्रानाईट दगड पसरलेले आहेत दऱ्याखोऱ्यातील जमीन सुपीक आहे. या जिल्ह्यात बागाइत जमीनहि पुष्कळ आहे रागी, तांदूळ, धान्यें, ऊंस व बटाटे हीं मुख्य पिकें आहेत १९०३–४ सालीं जंगलाचें क्षेत्रफळ १३५ चौरस मैल होतें व त्याचें कराचें उत्पन्न ४७,००० रुपये झालें.

व्यापार व दळणवळण.—कोलार येथील सोन्याच्या खाणी वगळून दिल्यास इतर धंदेहि येथें पुष्कळ आहेत गौरीबिदनूर येथें साखरेचा कारखाना आहे. कोलार येथें धंदेशिक्षणाची शाळा आहे कोलार, चिकबल्लार, सिद्दघट्ट तालुक्यांत रेशमाचे कारखाने पुष्कळ आहेत. १९०४ मध्यें १४२१ लहान कारखाने ब्लँकेट तयार करण्याचे होते. याशिवाय लाकडी काम, लोखंडी काम, तांबे पितळेची भांडीं तयार करण्याचें काम इत्यादि पुष्कळ प्रकारचीं कामें येथें होतात. जिल्ह्यात १९०४ सालीं २९३ तेलाच्या चक्क्या व २०९ साखरेचे कारखाने होत्या. मुलबागल या शहरीं साखर उत्कृष्ट तयार होते. मद्रास रेल्वेच्या बंगलोरचा फांटा या जिल्ह्यांतून सर्व ठिकाणीं गेला आहे

साक्षरताः—१९११साली लोकसंख्येपैकीं ४०,९१० लोक साक्षर होते. म्हणजे साक्षरतेचें प्रमाण शेंकडा ५ असें पडलें. इंग्लिश जाणणाऱ्या लोकांची संख्या २६८९ होती १९०३–४ मध्यें या जिल्ह्यात ४१३ शाळा होत्या.

ता लु का —कोलार जिल्ह्यातील एक तालुका. याचें २,८२,०५४ चौरस मैल आहे. १९११ सालीं या तालुक्याची लोकसंख्या ८०,९६१ होती. तालुक्यात कोलार नावाचें शहर व २९२ खेडीं आहेत. १९०३–४ सालीं जमिनीच्या वसुलाचें उत्पन्न १,७१,००० रुपये होतें. या तालुक्याच्या पूर्व भागाच्या हद्दीवरून पालार ही नदी वहात जाते पश्चिमेस कोलार व वोक्कलेरी या टेंकड्या आहेत. या तालुक्यात व विशेषतः दक्षिणभागात पुष्कळ मोठे तलाव व विहिरी आहेत. तालुक्यातील व कोलारच्या टेंकड्यावरील पठारातील जमीन सुपीक आहे पुष्कळ खेड्यातून रेशमी किड्याच्या संवर्धनाचा धंदा आढळून येतो

श ह र —कोलार जिल्ह्याचें व कोलार तालुक्याचें मुख्य ठिकाण हें शहर बौरिंगपेट स्टेशनापासून उत्तरेस ११ मैलावर आहे या शहराची लोकसंख्या १९११ सालीं ८११३ होती. कोलार हें फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे याचें पूर्वींच नाव कुवलालपूर असें होतें व त्याचें पुढें कोलाल व कोलार असें रूपांतर झालें येथील कोलारम्माचें प्रसिद्ध देवालय ज्यावेळीं अकराव्या शतकात कोलांनीं गंग घराण्याचें वर्चस्व नष्ट केलें त्यावेळच असून तें राजेंद्र कोल नावाच्या राजानें बांधलें असें म्हणतात. १२ व्या शतकांत कोलांची सत्ता होयसळ राजानें बळकावली व कोलांना म्हैसूर मधून हाकलून दिलें. या संबंधीचा इतिहास कोलार जिल्ह्यावरील लेखात दिलेला आहे या शहरीं हैदरअल्लीच्या बापाचें एक थडगें असून त्याची व्यवस्था ठेवण्याबद्दल स्वतंत्र इनाम आहे या शहराच्या भोंवतालचा तट कांहीं वर्षांपूर्वी पाडण्यात आला व शहराभोंवतीचा खंदकहि बुजविण्यात आला. त्याच सुमारास पुष्कळ रस्ते बांधण्यात आले रेल्वे सुरू होण्यापूर्वी मद्रासच्या रस्त्यावरील कोलार हें रहदारीचें शहर होतें या शहरात विंचू फार आहेत कोरम्मा देवळाच्या प्रवेशद्वाराखालीं जें भुयार आहे त्यात विंचू आहेत असें म्हणतात. देवाला नैवेद्य म्हणून जे जिन्नस देण्यात येतात त्यात रुप्याचा तयार केलेला एक विंचू नेहमीं अर्पण करण्यात येतो रेशमाच्या किड्यासाठीं मलबेरी वृक्षाची लागवड येथें फार करण्यात येते लोंकरी बुरणुसें करण्याचा येथें धंदा आहे. येथें दोन हायस्कुलें आहेत व मेथॉडिस्ट एपिस्कोपल संस्थेनीं अनाथासाठीं एक धंदेशिक्षणाची शाळा आहे १८७० मध्यें या शहराला म्युनिसिपालिटी देण्यात आली

गो ल्ड फी ल्ड (सोन्याच्या खाणी )—कोलार जिल्ह्याच्या आग्नेय भागातील एक शहर. बौरिंगपेट स्टेशनापासून हें १० मैलावर वसलेलें आहे. बौरिंगपेटपासून येथपर्यंत कोलार गोल्डफील्ड रेल्वे आहे. याच्या पश्चिमेस लहान मोठ्या बऱ्याच टेंकड्या पसरलेल्या आहेत. याचें क्षेत्रफळ १९११ सालीं १४८८ चौरस मैल असून लोकसंख्या ११,१८४ होती. या प्रदेशातील सोन्याच्या खाणीविषयीं प्राचीन काळापासून प्रसिद्धि होती. टिपू सुलतानानें या खाणी खणण्याचा प्रयत्न केला होता पण तो निष्फळ झाला. १८०२ सालीं लेफ्टनंट वारन यानें

प्रथमतः इंग्रजांच्या नजरेस ही गोष्ट आणली. १८७३ मध्यें मेजर लॅवेल यानें म्हैसूरसरकारापासून या खाणी खणण्याचा वीस वर्षांचा मालकी हक्क मिळविला. पण हें काम एकट्याच्या भांडवलावर निभावणार नाहीं असें पाहून त्यानें म्हैसूर सरकारच्या संमतीनें कोलार कनसेशनेरीयर्स नावाच्या एका मंडळाला ३० वर्षांच्या मुदतीनें २० चौरस मैलांचा प्रदेश कौलानें दिला. १८८१ मध्यें या मंडळाला लंडन येथील प्रसिद्ध खाणीशास्त्रांतील पारंगत अशा मेसर्स टेलर अँड के या शास्त्रज्ञ एंजिनियरांची मदत मिळाली. नंदिदुर्ग येथील खाणी खणण्याचें काम कॅप्टन प्लूमर या अनुभविक खाणीतज्ञानें सुरू केलें. पण भांडवलाच्या अभावीं १८८३ सालीं तें काम बंद पडलें. पण त्याच सालीं कॅप्टन प्लूमर यानें जॉन टेलरच्या प्रोत्साहनानें तें काम आपल्या अंगावर घेतलें व त्याच्या नशिबानें त्याला यश येत गेलें. १८८५ मध्यें कोलार येथील खाणींची सोन्याबद्दल चोहोंकडे प्रसिद्धि झाली. म्हैसूरदरबारनें आपला स्वत हिस्सा ठेवून खाणींच्या वरील कौलाचे दर कमी केले. १९०४ च्या अखेरीस एकंदर ११० लक्ष पौंडाच्या किंमतीचें सोनें या खाणींतून बाहेर पडलें त्यापैकी दहा लक्ष पौंड म्हैसूरसरकारला व ९० लक्ष डेव्हिडंड म्हणून वाटण्यांत आलें. १९०४ मध्यें या खाणींत ११ कंपन्या काम करीत होत्या. त्यांपैकीं म्हैसूर, चँपियनरीफ, उरेगम, नंदिदुर्ग व बालाघाट या पांच कंपन्या डिव्हिडंड वाटीत असत. या निरनिराळ्या कंपन्यांतर्फे नोकर ५१० युरोपियन, ४१५ युरेशियन व २७,००० हिंदु लोक काम करीत होते. १९१८ सालीं हिंदुस्थानांत निघालेल्या सोन्यापैकीं ९८ टक्के कोलार गोल्डफील्डचें होतें व त्याची किंमत २५० लक्ष रुपये होती. या खाणींच्या धंद्याला प्रोत्साहन देण्यासाठीं म्हैसूर संस्थाननें अनेक साधनें निर्माण केलीं. १८९४ मध्यें बोरिंगपेट जंक्शन पासून खाणींकडे जाणारा एक रेल्वेचा फांटा बांधण्यांत आला. १८९९ मध्यें आरोग्यसंरक्षक खातें निर्माण करण्यांत येऊन ७ लोकांचें एक मंडळ नेमण्यांत आलें. १९०० सालीं म्हैसूर सरकारनें या खाणींच्या संरक्षणार्थ पोलीसठाणेंहि निर्माण केलीं. १९०२ मध्यें कावेरी नदीच्या धबधब्याच्या साहाय्यानें खाणींच्यासाठीं विजेच्या प्रकाशाची सोय करून देण्यांत आली. प्रथम ४३८९ हॉर्स पॉवरची वीज उत्पन्न होत होती. पण १९०५ मध्यें ती जवळ जवळ ८००० पर्यंत वाढविण्यांत आली व हल्लीं आणखी २००० पावर वाढविण्याची योजना चालली आहे. खाणींतील लोकांना पाण्याची सोय म्हणून पालार नदीच्या काठावर असलेल्या बेटमंगल तलावापासून पाणी नेण्यांत आलें आहे. प्रार्थनामंदिरें, क्लब, मोठमोठीं दुकानें हीं या ठिकाणीं स्थापन झालीं आहेत. १८९५ सालापासूनच येथें एक स्वतंत्र शहर वसविण्याची कल्पना संस्थानच्या डोक्यांत घोळत होती. १९०१ सालीं तिला मूर्त स्वरूप देण्यांत आलें नवीन शहराला रार्बटसनपेट हें नांव देण्यांत आलें. या शहराच्या आसपास खाणींतील मजुरांच्या चाळी आहेत. या शहरांत मोठमोठे रस्ते बांधण्यांत आले असून विहिरी वगैरे खणण्यांत आल्या आहेत.

कोलार सरोवर.— हें मद्रास इलाख्यांतील मोठ्या पाण्याचें सरोवर असून हें कृष्णा जिल्ह्यामध्यें आहे. याच्या मध्यभागांत पाणी असून बाकी भाग दलदलीचा आहे. हें सरोवर प्रथम बंगालच्या उपसागराचा एक फांटा असावा. याचा आकार अंड्यासारखा असून याच्या दोन्ही बाजूंस अनुक्रमें गोदावरी व कृष्णा या नद्या वहातात व या नद्यांच्या मुखाशीं गाळ सांचून ज्या नव्या जमीनी तयार झाल्या त्यांच्या एकमेकांशीं झालेल्या संमेलनानें या सरोवराचा समुद्राशीं असलेला संबंध तुटला. या सरोवरांत आतां नद्या व जलप्रवाह वाहत असल्यामुळें यांतील पाणी गोडें आहे. परंतु या जलप्रवाहांबरोबर वाहात येणारा गाळ दरवर्षी या सरोवरांत भरून काढतो. पावसाळ्यांत या सरोवराची लांबी १०० मैलांहून अधिक असते पण उन्हाळ्यांत ती बरीच कमी होते या सरोवराच्या उत्तरेस २० पासून ५० मैलांवर पूर्व घाटाच्या टेकड्या असून सभोंवारच्या २००० चौरस मैल प्रदेशांतील जलप्रवाह या सरोवरास येऊन मिळतात. या रीतीनें सांचलेलें पाणी येंतलकनल व उप्पुटेरु या दोन खाड्यांतून सरोवराच्या बाहेर पडतें. या सरोवरांत पुष्कळ मासे असून सरोवराच्या तीरावर सर्व तऱ्हेचे पाणबुडे पक्षी राहतात. सरोवरांत पुष्कळ बेटें असून त्यावरील जमीन सुपीक आहे. ही जमीन दरवर्षी नांगरण्याकरितां ठेक्यानें दिली जाते.

कोलिकेर, रुडोल्फ आलबर्ट व्हॉन— (१८१७ ते १९०१) हा स्विस् शारीरशास्त्रज्ञ व इंद्रियविज्ञानशास्त्रवेत्ता झूरिच येथें ता. ६ जुलै इ. स. १८१७ रोजीं जन्मला. त्याचे आईबाप झूरिचचे रहिवासी असून त्याची बालकीर्दि तेथीलच असल्यामुळें, जरी त्यानें आपलें आयुष्य जर्मनींत घालविलेलें असलें तरी वास्तविक त्यास स्वित्झरलंडचाच नागरिक म्हणणें योग्य होईल. झूरिचच्या शाळेंत प्राथमिक शिक्षण झाल्यावर त्याचा १८३६ मध्यें तेथील विश्वविद्यालयात प्रवेश झाला. पुढें बॉन व बर्लिन येथील विश्वविद्यालयांत शिक्षण संपादून त्यानें जोहानस मुल्लर व एफ. जी. जे. हेन्ले यांचें शिष्यत्व पत्करिलें. १८४१ त झूरिच येथें तत्वज्ञान विषय घेऊन व १८४२ त हायडेलबर्ग येथें वैद्यकीचा अभ्यास करून तो उत्कृष्ट पदवीधर झाला. हेन्लेच्या हाताखालीं शारीरशास्त्रांतील प्रेतच्छेदक शिष्य म्हणून तो प्रथम नोकरीस राहिला. परंतु १८४४ त तुलनात्मक शारीरशास्त्राचा व इंद्रियविज्ञानशास्त्राचा अध्यापक म्हणून त्यास स्वदेशी विश्वविद्यालयाकडून निमंत्रण आलें परंतु तेथें तो फार दिवस राहिला नाहीं. कारण १८४७ त व्हूर्सबर्ग येथील विद्यालयाकडून त्यास सूक्ष्मदर्शक यंत्राच्या तुलनात्मक शारीरशास्त्राचा व इंद्रियविज्ञानशास्त्राचा प्रसिद्ध अध्यापक नेमण्यांत आलें. त्यानंतर, सर्व म्यामोहाचा

व्हर्टेरियन शहरांतील ज्ञान असा विद्यापीठीय जीवनक्रम आमरण चालवीत असतांना तेथेंच त्यानें २ नोव्हेंबर १९०५ तारखेस इहलोक सोडला. सूक्ष्मदर्शक यंत्र व कोलिकेर हें नाव यांचें साहचर्य सतत राहील यांत शंका नाहीं. 'सजीव प्राण्यांचा सूक्ष्मदर्शक यंत्रानें शोध' हा विषय पुनरुज्जीवित होण्याचा काल व कोलिकेरच्या एतद्विषयक शोधाचा काल या गोष्टी अगदीं एकदम व एकाच वेळीं घडून आल्या. परन्तु यापूर्वी दोन शतकें प्रसिद्ध इटालियन मालपिधी यानें सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें प्राणी व वनस्पती यांचें निरीक्षण केलें होतें. मालपिधीनंतर संयुक्त सूक्ष्मदर्शक यंत्राची सुधारणा व थिओडरश्विन्हान आणि मॅथिअस यांनीं सूक्ष्मपिंड अथवा गोलकसिद्धांत यांचें केलेलें प्रसिद्धीकरण, या दोन गोष्टींमुळें सूक्ष्मदर्शक यंत्राच्या शोधांत एक नवें मन्वंतर घडून आलें. तारुण्योचित उत्साहामुळें कोलिकेर यानें या नवीन विद्येच्या क्षेत्रांत तावडतोब प्रवेश केला. तेथें त्यानें जे दीर्घकालीन व विविध असे परिश्रम केले त्याला मूळ कारण म्हणजे त्याचे गुरु हेन्ले व जोहानेस मुल्लर हेच होत. तत्कालीन प्रवृत्तीचाहि त्याच्यावर परिणाम झाला.

झूरिच येथें व नंतर वूर्झबर्ग येथें तुलनात्मक शारीरशास्त्र शिकवीत असतांना त्यानें कांहीं टिपणें प्रसिद्ध केलीं. १८४१ मध्यें त्याचा पहिला निबंध प्रसिद्ध झाला. त्याचें नाव 'ऑन दि नेचर ऑफ दि सो-कॉल्ड सेमिनल ॲनिमल-क्युलिस' असें असून त्यांत सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साह्यानें विविध जातींच्या प्राण्यांची अंतर्गत रचना पाहण्याचा प्रयत्न केलेला होता. वनस्पतिशास्त्रासंबंधीं ज्ञान मिळविण्याकरितां, भूमध्यसमुद्राकडे व स्कॉटलंडच्या किनाऱ्याकडे त्यानें सफर केली. सी. टी. ई. व्हॉन साइबोल्ड नांवाच्या आपल्या मित्राबरोबर वनस्पतिशास्त्राच्या मासिकाचा सह-संपादक म्हणून काम करून त्यानें मोठें नाव मिळविलें.

कोलिकेरच्या खऱ्या जीवनवृत्तांतास सुरवात होत होती त्या वेळीं कार्ल अर्नेस्ट व्हॉन बेअर याची पिंडशास्त्रासंबंधाची माहिती लोकप्रिय झाली होती व बाह्यस्वरूपविषयक ज्ञान व वनस्पतिशास्त्रासंबंधीं माहिती या दोन गोष्टींचें महत्व लोकांस पटूं लागलें होतें. अशा वेळीं कोलिकेर या विषयाकडे वळला. अपृष्ठवंशी प्राण्यासंबंधीं शोध लावण्याचा प्रथम प्रयत्न करून नंतर सपृष्ठवंशी प्राण्याबद्दल तो विचार करूं लागला. भूजल-वासी प्राणी व कोंबड्या यांचाच अभ्यास करून न थांबतां सस्तन प्राण्याच्या पिंडांनाहि त्यास विचारांत गर्क करून सोडलें. गर्भजनशास्त्राचा शोध या विषयांत सूक्ष्मदर्शक यंत्राच्या उपयोगांतील दृढीकरण, परिच्छेदन, सवर्णीकरण इ. सर्व कृती पूर्णपणें जाणणारा कोलिकेर हाच पहिला शास्त्रज्ञ होय. १९ व्या शतकाच्या मध्य व उत्तर पादांत झालेल्या पिंडशास्त्राच्या विलक्षण प्रगतीशीं कोलिकेरचें साहचर्य सतत राहील यांत शंका नाहीं. १८६१ मध्यें त्यानें 'लेक्चर्स ऑन् डेव्हलपमेंट' हा या विषयावरील आपला प्रमाणभूत ग्रंथ प्रसिद्ध केला.

परंतु प्राणिशास्त्र व पिंडशास्त्र यावरच त्याची कीर्ति अधिष्ठित झालेली नसून सूक्ष्मपिंडरचनाशास्त्राबद्दलहि त्यानें नाव मिळविलें आहे. मऊ व रेषारहित स्नायू हा स्नायु-गोलकाच्या भिन्न घटकाचा बनलेला असतो या सिद्धांताचें दिग्दर्शन त्यानें १८४७ मध्यें केलें. या विषयांत त्यानें हेन्लेचेंच अनुकरण केलें आहे. गुळगुळीत स्नायु, रेषारहित स्नायु, त्वचा, अस्थि, दंत, रक्तवाहिन्या व आंतडीं या सर्वांचें त्यानें संशोधन केलें व कांहीं तरी नवीन माहिती त्यानें त्यासंबंधीं दिली आहे. कांहीं शोध स्फुट टाचणांमध्यें, कांहीं 'सूक्ष्मदर्शक यंत्राचें शारीरशास्त्र' या आपल्या ग्रंथामध्यें व कांहीं निबंधांमध्यें अशा विविध स्थळीं त्यानें आपले शोध ग्रथित केले आहेत. मज्जातंतु-रचनाशास्त्रामुळें कोलिकेरची कीर्ति अढळ झाली आहे. १८४५ मध्यें झूरिच येथें असतांनाच मज्जातंतूचें मज्जा-गोलकाशीं साहचर्य असतें असें सिद्ध करून मध्यवर्ती मज्जा-तंतुरचनेसंबंधीं होणाऱ्या विचाराचा जणूंकाय त्यानें पायाच घातला असें म्हणतां येईल. त्यानंतर त्यानें मज्जातंतुरच-नेच्या सूक्ष्मपिंडरचनाशास्त्राबद्दल अत्यंत परिश्रम करून मेंदू व पृष्ठरज्जू यांत एकत्र विणले गेलेले गोलक व तंतु ज्यामध्यें सांपडतात असें गुंतागुंतीचे नमुने पाहिल्यामुळें उत्पन्न झालेले कठिण प्रश्न सोडविण्याच्या कामीं त्यानें फार परिश्रम केले व त्यांत यशहि मिळविलें. अगदीं म्हातारपणी सुद्धां विश्रांति घ्यावयाचें सोडून देऊन त्यानें मज्जातंतु-विज्ञानशास्त्रासंबंधीं शोध लावले. वृद्धावस्थेंत असूनहि गॉल्गी पद्धतीचें महत्व कळतांच पुनः नव्या साधनांचा अव-लंब करून मज्जातंतुरचनेच्या शोधास तो प्रवृत्त झाला. आपल्या हयातीच्या पूर्वार्धांत कोलिकेर हा शारीरशास्त्राचा व इंद्रियविज्ञानशास्त्राचा अध्यापक होता. सूक्ष्मपिंडरचना-शास्त्रासंबंधीं त्यानें जे परिश्रम केले त्यांतून इंद्रियविज्ञान शास्त्राबद्दल नवीन शोध निष्पन्न झाले एवढेंच नव्हे तर प्रयोगानें सिद्ध होणारे नवीन शोध करून त्यानें त्या शास्त्रांत भर टाकिली. खरोखर त्याच्या अष्टपैलु व्यासंगाचा मनुष्य पाहावयाचा असेल तर आपणास कित्येक शतकें फार मागें जावें लागेल. जोहानेस मुल्लरच्या काळीं इंद्रिय-विज्ञानशास्त्र व शारीरशास्त्र यांचा व्यतिरेक करावा असें कोणासच वाटलें नाहीं. कोलिकेरनें त्यांचा अन्वय घडवून आणला व हीं दोन्हीं शास्त्रें अगदीं भिन्न अशीं मानलीं जाऊं नयेत असें प्रतिपादन केलें. एवढ्या योग्यतेच्या पुरुषाला मानमरातब मिळाला नाहीं असें कसें होईल! पूर्वी नुसता कोलिकेर असा त्याचा उल्लेख होत असे; परंतु पुढें व्हॉन ही पदवी त्याच्या नांवास जोडली गेली. अनेक देशां-तील विद्वान् लोकांच्या मंडळांचा तो सभासद झाला होता. इंग्लंडांत त्याची प्रसिद्धि झाली व १८६० मध्यें त्यास

रॉयल सोसायटीचा फेलो करण्यात आलें. पुढें १८०७ मध्यें बहुमोल 'कॉपले पदक" देऊन सोसायटीनें कोलिफेरचा अत्यंत सन्मान केला.

**कोलेगल, ता लु का**—मद्रास इलाख्यातील कोईंबतूर जिल्ह्याचा एक तालुका. उ. अ. ११° ४६' ते १२° १८' व पू. रे. ७६° ५९' ते ७७° ४७ १९११ साली याचें क्षेत्रफळ ११६७ चौरस मैल होतें या तालुक्याच्या तिन्ही बाजूंनी कावेरी नदी वहात गेली आहे. १९११ साली या तालुक्याची लोकवस्ती १,१८,०१७ व १९२१ साली ९५,३५६ होती. या तालुक्यात एक शहर असून १५६ खेडीं आहेत. १९२१-२२ मध्यें या तालुक्याचा वसूल १,३२,००० रुपये झाला. या तालुक्यातील लोकवस्ती क्षेत्रफळाच्या मानानें फार कमी आहे, म्हणजे दर चौरस मैलीं १०० लोक हें प्रमाण पडतें. कोईंबतूर जिल्ह्याच्या इतर तालुक्यापेक्षा या तालुक्यात पर्जन्याचें प्रमाण जास्त आहे येथील सरासरी मान ३५" आहे. पूर्वघाटातील पर्वताचीं दक्षिणटोंकाकडील शिखरें या तालुक्यामधून गेली आहेत. इतर तालुक्यापेक्षा हा तालुका थोडासा उंचावर वसलेला असून यानें हवामान म्हैसूर इलाख्यातील हवामानाप्रमाणें आहे. जवळ जवळ अर्धा तालुका जंगलमय असून हीं जंगलें राखीव आहेत. या जंगलामध्यें गुरांना चारा खूप मिळतो. कोलेगल तालुक्यातील रयत लोकांचा धंदा मुख्यतः शेतकीचा नसून गुरांची निपज करण्याचा आहे. या ठिकाणीं अलमबादी नांवानें प्रसिद्ध असलेल्या ओझीं वाहणाऱ्या गुरांची निपज होते.

श ह र.—कोलेगल तालुक्याचें हें शहर व मध्यवर्ती ठिकाण आहे उ. अ. १२ ° १०' व पू. रे. ७७ ° ७'. १९११ साली या शहराची वस्ती १२,५६६ होती या शहरीं जरीचें कापड व रुमाल चांगल्या तऱ्हेनें तयार होतात. येथें जें रेशमी कापड तयार होतें त्यापैकीं बरेंच ३०० रुपयाच्या वरच्या किंमतीचें असतें व अशा प्रकारचा रेशमी जरीचा माल फारच सुबक होतो.

**कोलेरिज सॅम्युअल टेलर**—(१७७२-१८३४) हा सुप्रसिद्ध इंग्लिश कवि, तत्वज्ञ व मार्मिक टीकाकार होता. जॉन कोलेरिज नांवाच्या एका पाद्र्याचा सर्वांत हा धाकटा मुलगा होय. हा डेव्हनशायर परगण्यामधील ओटरी सेंट मेरीज या ख्रिस्तालयाच्या आवारात जन्मला. लहानपणींच त्याचा बाप वारल्यामुळें त्याला ख्राइस्ट हॉस्पिटल येथें ठेवण्यात आलें. या ठिकाणीं चार्लस लँब हा त्याचा शाळासोबती होता. १७९१ मध्यें केंब्रिज येथील जीझस कॉलेजमध्यें त्याला धाडण्यात आलें. येथें असताना त्यानें निरनिराळ्या विषयावरील पुस्तकें वाचून काढलीं येथें असताना लोकशाहीचीं तत्वें त्याच्या मनावर पक्कीं ठसलीं होती. पुढें विश्वविद्यालयांतील रहाणीचा त्याला कंटाळा आल्यामुळे व तेथें असताना प्रणयाच्या बाबतींत त्याची निराशा झाल्यामुळे त्यानें केंब्रिजला रामराम ठोकला व सैन्यामध्यें आपलें नांव दाखल केलें. पण तेंहि काम त्याला झेपेना. शेवटीं मोठ्या खटपटीनें त्याला सैन्यातून रजा मिळाली व तो १७९४ मध्यें केंब्रिज येथें परत आला नंतर तो ऑक्सफोर्ड येथें आला. तेथें त्याचा व सौदे कवीचा परिचय झाला येथें असताना त्याची सारा फ्रिकर या कुमारिकेवर प्रीति जडली व त्यानें १७९५ मध्यें तिच्याशीं लग्न केलें. केंब्रिजमध्यें असतानाच त्यानें 'रॉबेसपीयर ए ड्रामा' नावाचें एक नाटक छापलें होतें. लग्न झाल्यानंतर तो प्रथम क्लीवडन व नंतर नेदर स्टोवे येथें रहावयास आला. येथें असताना त्याची वर्डस्वर्थ या सुप्रसिद्ध कवीशीं ओळख जडली; व ती मरेपर्यंत कायम टिकली. समानधर्मी अशा या दोन कवींची थोडक्याच काळात दाट मैत्री जडावी यात आश्चर्य नाहीं. १७९६ त 'पोएम्स ऑन व्हेरियस सब्जेक्ट्स', 'ओड टु दि डिपार्टिंग इयर इत्यादि कविता त्यानें प्रकाशित केल्या. १७९७ त वर्डस्वर्थच्या सहवासात असताना, 'दि एनशंट मॅरिनर', 'ख्रिस्ताबेल'चा पहिला भाग, व 'कुबलाखान' हीं काव्यें त्याने लिहिलीं व वर्डस्वर्थच्या मदतीनें लिरिकल बॅलड्स' हें काव्य लिहिण्यास आरंभ केला

युरोपखंड पहाण्याची त्याला फार उत्कंठा असे. त्यामुळें १७९८ त वर्डस्वर्थ व त्याची बहिण यांच्या समवेत तो हॅंबर्ग येथें आला तेथून तो एकटाच रटझेबर्ग येथें व नंतर गाटिंजन येथें गेला. जर्मनींत असताना त्यानें जर्मन भाषेचा अवघ्या नऊ महिन्यात उत्कृष्ट अभ्यास केला. जर्मन वाङ्मयाचा त्याच्या मनावर फार परिणाम झाला. १७९९ त तो लंडन येथें परत आला. तेथें आल्यावर अवघ्या सहा आठवड्यातच त्यानें शिलरचें 'वॅलेन्स्टीन' काव्याचें भाषांतर केलें. १८०० त त्यानें ख्रिस्ताबेल काव्याचा दुसरा भाग लिहिला. फ्रान्समधील बंडाला तो प्रथम जरी अनुकूल होता तरी पुढें पुढें या बेशिस्त स्वातंत्र्याविरुद्ध झाला. १८०० त तो लेक्स'.या भागात रहावयास गेला. तेथें सौदे हा कवि त्याच्याबरोबर रहात असे. कोलेरिज यांस अफूचा नाद अतिशय असे. त्यामुळें त्याची शरीरप्रकृति फार नाजूक असे. १८०१ त त्याची प्रकृति ढासळू लागली. त्यामुळें त्याला विश्रांति घेणे जरूर पडलें १८०४ मध्यें तो प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठीं माल्टा येथें गेला. तेथें असताना त्याची व माल्टाचा गव्हर्नर सर अलेक्झांडर बाल याची मैत्री जमली व बालनें त्याला आपला सेक्रेटरी नेमले पण लवकरच तो या नोकरीला कंटाळला व त्यानें तिचा राजीनामा देऊन इटलींत प्रवास करण्यास सुरवात केली. इटलींत असता टीक, हंबोल्ट, बेन्सन इत्यादि मोठमोठ्या विद्वानांशीं त्याचा परिचय झाला. तो १८०६ त इंग्लंडात परत आला. १८०८ त त्यानें रॉयल इन्स्टिटयूशन या संस्थेतर्फे शेक्सपीयरवर व्याख्यानें दिलीं. नंतर तो वर्डस्वर्थकडे रहावयास गेला. येथें असतांना त्यानें 'फ्रेंड'नावाचें एक पत्र सुरू केलें व अवघे ९ महिनेच टिकलें १८१२ मध्यें त्यानें पुन्हा

शेक्सपियरवर व्याख्यानें दिलीं. १८१३ त त्यानें लिहिलेल्या 'रिमोर्स' या नाटकाचा ड्रुअरीलेन थिएटरात प्रयोग झाला व तो यशस्वीहि ठरला १८१७ त बायॉग्रफीया लिटरेरिया सिबिलाइन लीव्हज व स्वतःचें आत्मवृत्त अशीं तीन पुस्तकें त्यानें प्रकाशित केलीं. १८१८ त पुन्हा त्यानें कांहीं व्याख्यानें दिलीं. पण पुढें मात्र त्याची प्रकृति फारच बिघडूं लागली. तरी पण त्याचा व्यासंग अखेरपर्यंत चालूच होता. त्याच्या काव्यावर लुब्ध झालेले कित्येक लोक त्याच्याशीं चर्चा करण्याकरतां, व त्याच्या तोंडून मननीय विचार ऐकण्याकरतां जमत असत. १८२४ त रॉयल सोसायटी ऑफ लिटरेचरचा असोशिएट म्हणून त्याची निवड करण्यात आली व त्यामुळें त्याला १०० गिनींचा तनखा मिळूं लागला. १८२५ त त्याचें 'एड्स टु रिफ्लेक्शन' हें काव्य व 'दि कॉन्स्टिटयूशन ऑफ चर्च अँड स्टेट' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. १८३४ त तो मरण पावला. त्याच्या मृत्यूनंतर १८३५ त 'टेबलटॉक्स', १८०० त 'कन्फेशन्स ऑफ ॲन एनक्वायरिंग स्पिरिट, 'लेटर्स अँड ॲनिमा पोएटा' हे ग्रंथ प्रसिद्ध करण्यात आले. कोलेरिज हा असाधारण बुद्धिमत्तेचा माणूस होता. त्याची प्रतिभा उच्च दर्जाची होती. त्याची कल्पनाशक्ति दांडगी होती. त्यानें लिहिलेल्या काव्यावरून तो किती उच्च दर्जाचा कवि होता हें दिसून येतें. पण तो केवळ पहिल्या प्रतीचा कवि होता एवढेंच नाहीं तर तो उत्कृष्ट टीकाकारहि होता. शेक्सपियर अगर वर्डस्वर्थवरील त्याचे लेख वाचले असता अगर काव्याच्या सिद्धांतावरील त्याचें विवेचन वाचलें असता वरील म्हणण्याची सत्यता पटल्याशिवाय रहात नाहीं. तत्त्वज्ञानाचा व धर्माचा अभ्यास त्यानें खोल रीतीनें केला होता व त्याच्या मनाची छाप तत्कालीन इंग्लिश तत्त्वज्ञानाच्या वाङ्मयावर पडलेली आढळून येते. खासगी भाषणें करण्यात तर त्याचा हातखंडा असे. तो आपल्या संभाषणानें श्रोतृवृंदास भारून टाकीत असे. त्याला दुष्ट व्यसन नसतें तर त्यानें वाङ्मयात आणखी पुष्कळच भर टाकली असती. तरी पण आहे त्या काव्यावरून व लेखनावरून त्यानें इंग्लिश वाङ्मयात फार उच्च दर्जाचें स्थान त्यानें पटकावलें आहे व तें यथायोग्य आहे यात वाद नाहीं.

[ संदर्भग्रंथ—जे. डी. कँपबेल-सॅम्यूअल टेलर कोलेरिज-ए नॅरेटिव्ह १८९३; एच. डी. ट्रेल-कोलेरिज ( मेन ऑफ लेटर्स सीरीज १८८४ ) ].

**कोलेरून**—कोलेरून हा कावेरी नदीच्या उत्तरेकडील एक फाटा असून तो त्रिचनापल्लीच्या पश्चिमेस ९ मैल अंतरावरून फुटला आहे. हा प्रथम १७ मैलपर्यंत कावेरीशीं समान्तर राहून नंतर तिच्याकडे वाहत जातो व जवळजवळ तिला जाऊन मिळतो. या त्याच्या पद्धतीनें बनलेल्या बेटास श्रीरंगम हें नाव आहे. हें बेट त्रिचनापल्ली जिल्ह्यांत आहे. या बेटाच्या खालच्या टोकाशीं वरील फाट्याची दिशा बदलून तो ईशान्येस तंजावरच्या उत्तरसरहद्दीवरून वहात जातो व देवीकोटाइजवळ समुद्रास जाऊन मिळतो. या फाट्याचा कालव्याकडे चांगला उपयोग होतो. या फाट्याला ठिकठिकाणीं पाणी अडविण्याकरिता बांध बांधले असून त्यापैकीं उगमाजवळील व मुखाजवळील मुख्य होत. या फाट्याच्या मुखाजवळ कांहीं मैलपर्यंत होड्या चालतात. फाट्याची लांबी१४ मैल असून त्यापासून १०४ चौरस मैल जमीनीस पाणी मिळतें.

**कोलोन**—प्रेशियाच्या ऱ्हाइन नदीच्या प्रांतातील पहिल्या प्रतीची तटबंदी असलेलें शहर हें एक्सला चॅपेलच्या ईशान्येस आगगाडीच्या रस्त्यानें ४४ मैलावर ऱ्हाइन नदीच्या डाव्या तटीं अर्धवर्तुळाकार वसलेलें आहे. ह्या ठिकाणीं ऱ्हाईन नदीचें पात्र नौकानयनास सोईचें असल्यामुळें, व ह्या शहराभोंवतीं लोहमार्गांचें जणूं कय जाळेंच पसरलेलें असल्यानें येथून युरोपमधील कोणत्याहि महत्त्वाच्या शहराशीं दळणवळण फार सुलभ झालें आहे. येथील सर्वांत प्रेक्षणीय इमारत म्हणजे कॅथेड्रल होय. ही इमारत गॉथिक शिल्पकलेचें एक उत्तम स्मारकच म्हटलें असता चालेल. हिच्यात १७६४ मध्यें फ्रेंच तोफ गाळून तयार केलेली ५४१ हंड्रेडवेट वजनाची एक सर्वांत मोठी घंटा आहे. ह्या शहरात इतकीं देवालयें आहेत कीं प्राचीन काळीं त्याला कांहीं लोक जर्मन रोम असें म्हणत असत. येथें तिसऱ्या फ्रेडरिक विल्यमचें स्मारक म्हणून उभारलेला एक २२३ फूट उंचीचा अश्वारोही पुतळा आहे. हें शहर ऱ्हाइन नदीवरील व्यापाराचें एक मुख्य केन्द्रस्थान असून औद्योगिकदृष्ट्या देखील या शहरास फार महत्व आहे. प्रसिद्ध कोलनवाटर येथेंच तयार होतें. येथें प्रसिद्ध होत असलेल्या ' कोलोन गॅझेट' चा जर्मनींत सर्वांत जास्ती खप आहे. येथील लोकसंख्येपैकीं शेकडा ८० लोक रोमन कॅथोलिक धर्माचे आहेत. धर्मासंबंधीं तंट्यामुळें ह्या शहराचें बरेंच नुकसान झालें आहे. १७९४ मध्यें जेव्हा हें शहर फ्रेंचांनीं घेतलें तेव्हां त्याची लोकसंख्या फार ४०००० होती. परंतु १८१५ त व्हिएन्नाच्या तहानें जेव्हा तें प्रशियाकडे आलें तेव्हापासून आजपर्यंत त्याची भरभराट होत आहे. १८८५ मध्यें त्याची लोकसंख्या सुमारें १। लक्ष होती; आणि पुढील वीस वर्षांत ती आणखी एक लाखानें वाढली. १९१० सालीं याची लोकसंख्या ५,१६,५५७ होती.

**कोलोफोन**—कोलोफोन हें प्राचीन शहर आयोनियातील होय. एफेससच्या उत्तरेस १५ मैलांवर हें होतें. याचें बंदर नोटियम अथवा नवीन कोलोफोन होतें. सांप्रत या जागेला ट्रॅचा नांव असून ती डीगर्मिंडीयरच्या जवळ आहे, व स्मर्ना एडीन रेल्वेवरील बेल्हेविस्ती स्टेशनच्या दक्षिणेस ५ मैलांवर हें आहे. माल्याजिडच्यापासून २ मैलांवर आहे. पादशाहच्या कैद्याप्रमाणें हें स्थापिलें गेलें इ. स.

पूर्वी ८ व्या व ७ व्या शतकात हें शहर भरभराटीच्या शिरा-राग पोहोंचलें होतें. ६६५ त लिडियाच्या गायजेसनें लुटलें. येथें होमरचा जन्म झाला असें येथील लोकाचें म्हणणें आहे. परंतु मिमुनरमस नांवाच्या कवीचा जन्म येथें झाला. श्रीमंत जहागीरदारांची सत्ता येथें होती. २८७ त लिसिमॅकसनें येथील लोकवस्ती एफेससला नेली. नोटियम अथवा नुवीन कोलोफोन येथें क्लेरियन अपोलोचें मंदिर होतें.

**कोलोरॅडो**—अमेरिका.संयुक्त संस्थानातील एक ठिकाण. याचें क्षेत्रफळ १,०३,९४८ चौ. मैल असून येथील लो. सं. (१९१८)१०,१४,५८१ आहे. १९१० साली तेथें भिनदेशीयाची लो. सं. १,२६,८५१ इतकी होती. तींपैकी १२९१६ इंग्रज, ४९६९ स्कॉच, ८७१० आयरिश १७,०७१ जर्मन, १२,४४५ स्विडिश आणि ९५१३ इतके कॅनेडियन लोक होते.१९१६साली डेनव्हर या राजधानीची लो सं.२,६८,४३९ होती. या संस्थानात रोमनकॅथेलिक, मेथॉडिस्ट, प्रेसबिटेरियन, बॅप्टिस्ट व कॉंग्रेगेशनॅलिस्ट इत्यादि धर्मपंथ आहेत तथापि कॅथोलिक पंथाचे अनुयायी जास्त आहेत. १९१५ साली १८८९ प्राथमिक शाळा व १७ हायस्कुलें या दोहोंत मिळून ४१२१शिक्षक होते व विद्यार्थ्यांची संख्या १,८४,४७१ होती. १९१६–१७ साली स्टेट टीचर्स कॉलेजात ७० अध्यापक व १८३२ विद्यार्थी होते. १९१५ सालचा एकंदर शैक्षणिक खर्च ७९,४०,१७४ डॉलर्स झाला आहे. शिक्षणाकरिता कित्येक कॉलेजें आहेत. कोलोरॅडो कॉलेज,युनिव्हर्सिटी ऑफ कोलोरॅडो, युनिव्हर्सिटी ऑफ डेनव्हर, चेंबरलिन ऑब्झर्व्हेटरी वगैरे शिक्षणसंस्था प्रसिद्ध आहेत फोर्ट कॉलिन्समधील शेतकी कॉलेज व स्कूल ऑफ माइन्स या संस्थाहि नावाजलेल्या आहेत. ता. ३० नोव्हेंबर १९१८ रोजी संस्थानचें कर्ज ४७,३५,८०० डॉलर्स होतें. १९१८मध्यें जमीनसाऱ्याचें उत्पन्न १३०५२८६४०९ डॉलर्स होतें नॅशनलगार्ड नावाच्या लष्कराचें मुख्य ठाणें डेनव्हर येथें असून पायदळ, घोडेस्वार, तोफखाना, स्थापत्यपथक, वैद्यकीय पथक, वगैरे अनेक प्रकार सैन्यात आहेत. १९१० साली ४६,१७० इतकी शेतनंबराची संख्या असून एकंदर क्षेत्रफळ १,३५,३२,९१३ एकर होतें. पाटबंधाऱ्यामुळें संस्थानची बरीच जमीन लागवड करण्यास योग्य झाली आहे. मुख्य पीक म्हणजे गहूं, ज्वारी, बटाटे, ओट, गवत व मका हें होय. फळें व भाज्याहि विपुल होतात खाणीच्या व धातूच्या ओतकामाबद्दल कोलोरॅडो फार प्रसिद्ध आहे. सोनें, चांदी, तांबें, पेट्रोलियम, शिसें, जस्त, ग्रॅनाइट, सँडस्टोन,लाइमस्टोन व कोळसा इत्यादि अनेक पदार्थांची निपज या ठिकाणीं बरीच मोठी होते. येथील उद्योगधंद्यात १९१४ च्या खानेसुमारीवरून १८,१७,७६,००० डॉलर्स इतकें भांडवल गुंतलें असून मजुरांची संख्या २७,२७८ होती. सोनें, रुपें, शिसें व जस्त वगैरे पदार्थ शुद्ध करण्याचे मोठे कारखाने येथें आहेत. १९१६ साली संस्थानात ५८०३ मैल मेनटेक रेल्वे होती १९१७ साली संस्थानात एकदर ८ सेव्हिंग्ज बँका होत्या. आगस्ट १ सन १८७६ रोजीं संस्थानचा युनियनमध्यें अंतर्भाव करण्यात आला. जनरल असेंब्लींत एक सीनेट असतें व तेथील चार वर्षांकरिता निवडलेल्या सभासदांची संख्या ३५ असते. त्यापैकीं अर्ध्या सदस्याना दर दोन वर्षांनीं आपली जागा सोडावी लागते. सीनेटशिवाय हाउस ऑफ रिप्रिझेंटेटिव्हज म्हणून एक ६५ सदस्यांचा संघ असतो व त्यातील लोकांची निवड फक्त दोन वर्षांपुरतीच असते. जेथून निवडणूक व्हावयाची त्या जिल्ह्यात एक वर्ष राहणारे व २५ वर्षांच्या वर असलेले सर्व स्त्रीपुरुष उपर्युक्त उभय संस्थाचे सभासद होऊं शकतात. संस्थानतर्फे फेडरल कॉंग्रेसला २ सीनेटर व ४ प्रतिनिधी पाठविता येतात [*यु एस. जिऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्ट, हाल–हिस्टरी ऑफ कोलोरॅडो*]

**कोलंगड**—मद्रास इलाख्यातील मलबार जिल्ह्याच्या पाऊघाट तालुक्यातील एक शहर येथील लो. स. १९०१ साली ९८०० होती. कोलंगडचे नंबिदी जहागीरदार येथें राहतात. यानीं येथें एक हायस्कूल स्थापन केलें आहे. या शहराच्या दक्षिणेस २ मैलावर कचंकुरुची नावाचें एक मोठें हिंदु देवालय आहे. कोलंगड व नेलियापथी या डोंगराळ प्रदेशात कॉफीची लागवड झाल्यापासून या शहराचा व्यापार वाढला आहे.

**कोल्लमशक**—हा शक खिस्त शकाच्या ८२४ किंवा ८२५ या वर्षी सुरू झाला [ अय्यर–प्रा. हिं. ] हा मलबारात चालू आहे

**कोल्लिमलई**—मद्रासमधील सालेम जिल्ह्यातील नामक्कल व अतुर तालुक्यातील पर्वताची ओळ ही ओळ उत्तर अक्षांश ११° १०' ते ११° २७' व पूर्व रेखांश ७८° १८' ते ७८° ३०' यामध्यें आहे सपाटीच्या भागात ही ओळ एकदम उंच वाढलेली आहे व तिचीं शिखरें सपाट असावीं असा भास होतो परंतु खरोखर शिखरातून अरुद व खोल अशा अनेक दऱ्या असून त्याच्यामुळें सुमारें १७ मैल लांब ओळींत सृष्टिसौंदर्य फार मजेदार आहे. उत्तरेकडील ४००० फूट उंच गेलेल्या सुळक्यावरून खालील अतुरच्या सुपीक सपाट प्रदेशाची शोभा दिसते पश्चिमेकडील दक्षिणेकडच्या कड्यावरून गवताचीं कुरणें व त्यामधून वाढलेली तुळतुळीत फणसाची व साबुदाण्याची उंच झाडें. खोल दऱ्या व खिंडी आढळतात. अगदीं दक्षिणेकडील उंच कड्यावरून कावेरीचा देखावा दिसतो शेव्हरॉय, पाचायमलेइस, कलरायण येथें जे लोक राहतात त्यापैकीं काहीं लोकांची वस्ती या पर्वतावर आहे. हे लोक बऱ्याच क्षेत्रफळावर लागवड करतात परंतु त्यानीं पूर्वी फार उपयुक्त असलेल्या जंगलाचा नाश केला आहे

**कोल्हटकर, भाऊराव**—एक महाराष्ट्रीय नट भाऊराव १८८२ साली किर्लोस्कर कंपनींत शिरले त्या वेळेस त्यांचें वय सुमारें १९ वर्षांचें होतें त्यानीं प्रथम रंगभूमीवर

प्रवेश केला त्या दिवशीं मंडळीस १५०० रुपयाची प्राप्ति झाली. इतकी प्राप्ति यापूर्वी कधीं झाली नव्हती. भाऊराव हे पूर्वी कंपनीकडून पगार घेत असून पुढें भागीनेंच होते. यांना पात्रांना शिकविण्याचा किंवा आपलें स्वतःचें काम करण्याचा कंटाळा नसे. एवढेंच नव्हे तर, नाटकास किंतीहि कमी उत्पन्न होवो व मंडळी कितीहि कर्जी येवो आपलें काम कमोशीनें करीत असत. यांनीं चांगलेच पैसे मिळविले, व धर्मादाय आणि सार्वजनिक कामें यासहि त्यांनीं चांगली मदत केली १८९९ सालीं मुंबईस गुजराथेंतील दुष्काळ-पीडित गुरां करिता मंडळीच्यातर्फे भाऊरावांनीं २५०० रुपये दिले या वेळीं मुंबईकरांनीं यास सर भालचंद्र यांच्या हस्तें एक मानपत्र दिलें विलायतेंत काचेच्या कारखान्यात शिका-वयास गेलेले गृहस्थ रा. वागळे यांनीं मुद्दाम यास तिकडे बोलाविलें होतें, व तुम्ही इकडे आल्यास मोठमोठ्या लॉर्ड्स वगैरे लोकांत तुमची ओळख करून देऊन तुमच्या गुणाची चीज करून देईन असें त्यांनीं आश्वासन दिलें होतें परंतु त्यांची प्रकृति या वेळीं ठीक नसल्यामुळें ही विनंति त्यांना मान्य करतां आली नाहीं भाऊराव यांची उत्तम गवयांत जरी गणना होणार नाहीं तरी आपल्या मधुर कंठरवानेंच त्यांनीं सर्व लोकांस वश करून घेतलें होतें आवाजी तयार करून त्यांनीं तीस ताऱ्यात टेंबिलेंच होतें पण त्यात जें माधुर्य होतें ती पुष्कळांशीं ईश्वरदत्त देणगीच म्हटली पाहिजे १९०१ सालीं भाऊराव वारले मरणसमयीं त्यांचें वय ३८ वर्षांचें होतें

भाऊराव दिसण्यात सुरेख होते. यांचें सुभद्रेचें व मंथ-रेचें काम फार अप्रतिम वठे. ते 'भावड्या' ह्या टोपण नावानें सर्वांना परिचित असत अण्णा किर्लोस्कर वारल्या-पासून ( १८८५ ) पाच वर्षेपर्यंत रा. नाटेकर, वाघोलीकर व भाऊराव यांनीं कंपनी चालविली होती पुढें भाऊराव एकटेच राहिले या वेळी ते पुरुषपार्ट करीत असत. ते अण्णाच्या तालमींत कसलेले नट असून, सर्व महाराष्ट्राला त्यांनीं आपल्या सुस्वर गायनानें मोहून टाकिलें होतें. [ रंगभूमि. ]

**कोल्हा**—कोल्हा हा प्राणी कुत्र्या च्या वर्गांतच मोडतो कुत्रा व लांडगा या यांत व कोल्ह्यामध्यें पुष्कळसें साम्य आप-ल्याला दृष्टीस पडतें. यांच्या सवयी बहुतेक सारख्याच आहेत शिवाय दंतरचना, गर्भधारणकाल, डोळ्यातील गोलाकार बाहुल्या इत्यादि बाबतींतहि या त्रिवर्गांचें साम्य नजरेस येतें. यूरोपमधील कोल्ह्याची उंची १५ इंच व लांबी जवळ जवळ २ फूट असते. याच्या अंगावरील मऊ केस भुरट्या रंगाचे असतात पण पाठीवरचे मात्र काळे असतात. कोल्हे पृथ्वीवरील सर्व भागांत आढळतात. पण देशभिन्न-त्वाप्रमाणें याच्यामध्येंहि थोडेंफार भिन्नत्व आढळून येतें. ईजिप्तमधील कोल्हा बराच मोठा असतो व त्याला ईजिप्शि-यन लांडगा अशा टोपण नावानें संबोधण्यात येतें. आफ्रिकेंतील कोल्हे निरनिराळ्या प्रकारचे असतात, कांहीं काळ्या पाठीचे असतात तर कांहीं ठिपक्याचे असतात व कांहीं भुरकट रंगाचे असतात हिंदुस्थानातील कोल्हे ईजिप्तमधील कोल्ह्यासारखे असतात कोल्हे हे रात्रिंचर प्राणी आहेत. दिवसा ते झाडींमध्यें अगर इतर जागीं दडून बसतात.संध्या-काळ झाली कीं मग त्यांच्या झुंडींच्या झुंडी बाहेर पडतात एकेक टोळी दोनदोनशें सुद्धा क्वचित प्रसंगीं दृष्टीस पडतें रात्रीस या टोळ्या भक्ष्य शोधण्यासाठीं बाहेर पडतात शेतामध्यें, बागेमध्यें अगर खेड्यापाड्यांतहि भक्ष्यशोधनार्थ यांची स्वारी होते हरिण, मेंढ्या यांची देखील हे शिकार करतात. द्राक्षें, व इतर फळें यांची यांना भारी आवड असते वरीलपैकीं कांहींच भक्ष्य मिळालें नाहीं तर मग मेलेल्या जनावरांचें मांस अगर इतर मलयुक्त पदार्थ यावरहि फन्ना उडवण्यास हे मागेंपुढें पहात नाहींत कोल्ह्याचें ओरडणें फारच कर्कश असतें एखादा कोल्हा कर्कश आवाज काढू लागला कीं जवळपास असणारे सर्व कोल्हे लगेच कर्कश आवाज काढू लागतात व हें ओरडणें रात्रभर चालू असतें "कोल्हेकुई" हा वाक्प्रचार यावरून पडलेला दिसतो कोल्ह्याच्या कांहीं जाती लवकर माणसाळतात पण कांहीं कांहीं जाती अजीबात माणसाळत नाहींत. पण माणसाळ-लेले कोल्हे देखील कुत्र्याप्रमाणें आपल्या धन्यावर प्रेम करीत नाहींत. कोल्ह्याची जात ही कुत्र्याप्रमाणें इमानी नसते याची जात धूर्ततेबद्दल व लुच्चेगिरीबद्दल फार प्रसिद्ध आहे. पण जात्या हे फार भित्रे असतात त्यांच्या जिवावर प्रसंग येतला कीं ते मरून पडल्याचें सोंग आणतात निरनिराळ्या अडचणींतून हरएक युक्ति योजून पार पडण्याची कला यांना उपजतच आहे अशा प्रकारच्या चातुर्याच्या गोष्टी सर्व देशांच्या वाङमयात आपल्याला आढळून येतात. इसॉपच्या गोष्टींत याला प्रामुख्यानें स्थान दिलेलें आढळतें. आपल्या इकडेहि पंचतंत्रात कोल्ह्याच्या धूर्तपणाची गोष्ट आढळते. कोल्हा याला वेदांत क्रोष्टृ म्हणजे मळा काढून रड-णारा असें नाव दिलें आहे. हे रानकुत्र्याप्रमाणेंच स्वभावत. भित्रे असतात असें ऋग्वेदांत ( १० २८, ४ ) म्हटलेलें आहे. हा प्राणी शवभक्षक आहे असें अथर्व-वेदांत ( ११. २, २ ) म्हटलेलें आढळतें. बौद्धवाङ्मयांत शृगाल-सुत्त नांवाचें सूक्त आढळतें कोल्ह्यामध्यें ६० ते ६५ दिवस गर्भधारणेचा काल आहे. त्यानंतर साधारणतः एप्रिल महिन्यांत प्रजोत्पत्ति होते. कोल्ह्याचीं पिलें फार चाळ व खोडकर असतात कोल्ह्याचें वयोमान साधारणत. १४।१५ वर्षांचें असतें आपल्या पिलांची जोपासना कोल्हे फारच काळजीपूर्वक करतात असें नजरेस आलें आहे. हिंदुस्थानांत व इतर देशांतहि कोल्ह्यांची शिकार कर-ण्याचा प्रघात पूर्वीपासूनच आहे. शिकारी कुत्र्यांच्या साहा-य्यानें शिकारी लोक कोल्ह्याची शिकार करतात तथापि कोल्हे हे स्वभावतः धूर्त व कावेबाज असल्यानें ते लवकर सांपडतच

नाहींत व त्यामुळें शिकारीला फारच मजा येते असें म्हणतात.

**कोल्हाटी**—मुंबई इलाख्यांत यांची वस्ती महाराष्ट्र, कर्नाटक, कानडा, कुलाबा व ठाणें या भागांतून आहे. १९०१ मध्यें यांची संख्या ४९११ होती पैकीं बायका २६८९ होत्या. कर्नाटकांत यांना डोंबारी म्हणतात व अहमदनगर जिल्ह्यांत खेळकरी असें यांचें नाव आहे तथापि डोंबाऱ्यांना कोल्हाट्यांपेक्षां हलक्या वर्गाचें मानण्यांत येतें अनेक जातींतून या जातींत भरती होत असते. व बहुधा स्त्रियांच्या वेश्यावृत्तीवर कोल्हाट्यांचा निर्वाह आहे.

मराठा गुजराथी, डुकरे किंवा पोटरे, पाल किंवा कानें, हरको, बले किंवा वाडीर (महार डोंबार), गोपलगणी, अरे व मुसुलमान या पोटजाती कोल्हाट्यांत आहेत. जातीजातींत लग्नव्यवहार होतो या पोटजाती निरनिराळ्या भागांत रहातात.

कोल्हाटी किंवा डोंबारी हे लोक अतिशूद्रांतच गणता येतील. यांचा मूळ पुरुष नट, ह्यास 'कोला' असें टोपण नाव होतें. व त्यावरून त्याच्या वंशजास कोल्हाटी ही संज्ञा पडली आहे. बारशी तालुक्यांतील माणकेश्वर हें त्याचें मूल वसतिस्थान होय परंतु हे लोक एके ठिकाणीं असे क्वचित रहातात. ते फिरस्ते असून गांवाबाहेर चटयांच्या झोंपड्यांतून मुक्काम करतात त्यांच्या भाषेंत मराठी व गुजराथी ह्यांचें मिश्रण आहे. ह्यांचीं उपनावें, भंवारे, जाधव, पवार आणि साकेश्वर अशीं असून ह्या सर्व कुटुंबांमध्यें रोटीबेटीव्यवहार चालतात. दोरावरून चालणें, नाचणें, गाणें, कोल्हाट्या मारणें, शिंगाच्या फण्या, चाकें व फडफड्यांच्या बाहुल्या करणें हे ह्या लोकांचे धंदे होत. ह्यांची चालचलणूक वाईट असते. पुष्कळ स्त्रिया कसबीणपणा करून रहातात, व तसें करण्यास त्यास जातीची संमतीहि मिळते. मुलगी वयांत आली म्हणजे कसबीण किंवा घरधनीण होणें ह्या दोहोंपैकीं एक मार्ग तिला पतकरण्यास सांगतात. आपल्या आईबापाच्या संमतीनें घरधनीण होणें हें जर पसंत असलें तर नीट तसें सांगतें. म्हणजे तिचें लग्न करून तिजवर सक्त नजर ठेवितात. पण तिनें जर कसबीण होण्याची आपली खुषी दर्शविली तर तिला जातिबांधवांच्या पंचायतीपुढें आणून रुजू करतात. ती पंच लोकांस एक मेजवानी देते, व त्यांच्या संमतीनें कसबीण ठरविली जाते। असें झाल्यावर तिच्याशीं जातिबांधवांचा अन्नपानादि व्यवहार तुटतो तथापि कालगतीनें तिचा कसबिणीचा धंदा चालेनासा झाला म्हणजे तिला परामर्ष घेतात लग्न करणें झाल्यास मुलीच्या बापास मुलाच्या बापानें १०० पासून २०० रु. पर्यंत हुंडा द्यावा लागतो। इतका हुंडा देण्याचें सामर्थ्य नसल्यास दोन कुटुंबांत परस्पर बेटीव्यवहार (साटेलोटें) करितात.

लग्नांत मागणी, हळद, देवकार्य, गडगनेर, तेलसाडी व लग्न हे मुख्य विधी होत विधवेला तिसऱ्यादा लग्न करावयाचें झाल्यास लग्नाच्या वेळेस जवळ एक कोंबडा घेऊन बसावें लागतें. प्रथम रुईशीं विवाह करून मग प्रथम वरानें विधवेशीं विवाह केलेला चालतो. घटस्फोटाला या जातींत परवानगी नाहीं. पुणें जिल्ह्यांत एखाद्या कोल्हाटणीनें जर व्यभिचार केला तर तिचे केस व नवऱ्याच्या मिशा व केस काढून टाकावयास लावितात व सोनें तापवून त्यांच्या जिभेला डाग देतात. नवराबायकोचें पटत नसल्यास नवरा कांहीं रकम घेऊन बायकोवरील हक्क सोडून देतो.

महादेव व मारुति यांची कोल्हाटी पूजा करितात, खंडोबा मरीआई, भैरोबा, जानाई, जोखाई, म्हसोबा वगैरे ग्रामदेवतांना भजतात मृतांना पुरतात व त्यांचे और्ध्वदेहिक विधी करतात.

यांच्यांतील पुरुष व बायका कसरत व भिक्षा यावर उपजीविका करितात बहुतेक स्त्रिया वेश्याचार करितात उच्च वर्गांतील मुली पळवून आणून त्यांना वेश्या बनवितात गोपालगणी कोल्हाटिणी पुरुषांना फार मोहून टाकतात अशी ख्याति आहे त्या याकरितां उत्तम मुली निवडून काढितात त्यांना सोनचेडी म्हणतात. पुणें जिल्ह्यांत कांहीं कोल्हाट्यांना पेशव्यांकडून इनामें मिळालीं आहेत.

वऱ्हाडांत या जातीचे दोन भेद आहेत. एकाचें नाव डुकरकोल्हाटी व दुसऱ्याचें साम किंवा पालकोल्हाटी पहिल्या वर्गाचे लोक रानडुकरें पुष्कळ उपद्रव देऊं लागलीं म्हणजे त्यास भाले टोंचून मारतात हे मोठमोठे दरवडे घालतात पण गुरें चोरीत नाहींत. सामकोल्हाटी फारच आळशी आहेत हे फण्या करतात व आपल्या बायकांच्या वेश्यापणावर निर्वाह करतात हे लोक मोठ्या मेळ्यांतून लहान झोंपड्या बांधून आपल्या बायकांस नटवून झोंपडीच्या दारावर बसवितात व स्वतः कोठेंतरी झोंपडीच्या पाठीमागें असतात. डुकरकोल्हाटी गांवांत राहून वेश्यापण करतात यांच्यात मरेठी, बालवेडिया, मुवरवाले, व मुसुलमान कोल्हाटी असे चार वर्ग आहेत. परस्परांत अन्न किंवा लग्नव्यवहार नाहीं यांच्यांत कोणाचाहि प्रवेश होतो. यांचें लग्न वऱ्हाडांत वधुवरांस नवीं वस्त्रें नेसवून जातींतल्याच नाचणाऱ्या तरुण मुलीकडून नाच करवून व मंडळीस दारू पाजून होतें. विलासपुरांत तर हिंदुविधीनें लग्नें होतात. यांच्यांतले सुंदर व नाजूक लोक मुसुलमान होतात हे प्रेतें जाळतात किंवा पुरतात जमल्यास तिसऱ्या दिवशीं मृताच्या अस्थी गोळा करून एका सलीत्यांत भरून गाडग्यावरून मिरवितात आणि कोल्हाटणी त्यांच्यासमोर नाचत जातात आणि समारंभानें त्या कोठें तरी पुरून थडगें बांधतात व त्यास शेंदूर फासतात यांच्या

पुरुषापेक्षा बायका पुष्कळ आहेत. व्यभिचारिणी बायका-कडून काहीं दिव्यें करवून त्याना दोषी किंवा निर्दोषी ठरवितात. डुकरें इत्यादी रानडुकरें भाल्यानें मारण्यात फार कुशल व शूर आहेत पण ते कधीं कधीं डुकरें मार-ण्याच्या मिषानें चोऱ्या मारा करतात आणि आपल्या ह्या बाय-काच्या जाराजवळ हे चोरीचा माल लपवून ठेवतात. हा जार बहुधा पाटील किंवा जोशी तरी श्रीमंत यांपैकीच असतो. लहान मुलास व मुलींस नाचणें व कसरत करणें शिकवितात. मुंबई इलाख्यात उच्च जातींच्या मुली चोरून पळवितात व त्यास वेश्या धनदिण्याकरिता विकतात किंवा बाळगितात. [एन्थोवेन, रसेल व हिरालाल, अलोर्न–रूमविधि व सोहाळे]

कोल्हाण–बिहार-ओरिसा इलाख्यातील सिंगभूम जिल्ह्या-तील सरकारी इस्टेट. कोल्हाणचें क्षेत्रफळ १९०१ सालीं १९५५ चौरस मैल होतें. कोल्हाणचा प्रदेश उंचसखल असून दक्षि-णेस काहीं ठिकाणीं त्याची उंची समुद्रसपाटीपासून ७१० फूट, तर काहीं ठिकाणीं १००० फूट आहे. उत्तरेस व पूर्वेस मात्र हा प्रदेश बराच सपाट आहे. या प्रदेशात पुष्कळ सपाट शेतें असून या प्रदेशातील जमिनींत तांदूळ, खाद्य-धान्यें, डाळ इत्यादि जिन्नस पिकतात. या प्रदेशाचा आग्नेय भाग खडकाळ असून यात जंगल आहे. पश्चिम व नैर्ऋत्य भागात टेकड्या असून या ठिकाणींहि पुष्कळ जंगलें आहेत. या ठिकाणची वस्ती अर्थात् फार पातळ आहे. या भागातील खेडीं झोपड्या झोंपड्यांचीं मिळून झालेलीं आहेत. या प्रदेशात हो जातीचे लोक राहतात. १८०० च्या सुमा-रास या प्रदेशात छोटानागपूरमधील लुटारूंच्या टोळ्या आश्र-यास येत असत. हो लोकहि आपल्या शेजारच्या प्रदेशात लुटालुटी करीत असत व त्यामुळें पोराहाटच्या राज्याला व सिंगभूमच्या उत्तरेस असलेल्या छोट्या संस्थानानां याचा फार उपद्रव होत असे. याचा बंदोबस्त करण्यासाठीं ब्रिटिश-सरकारनें या संस्थानिकाना मदत करण्याचें कबूल केलें पण तेवढ्यानें निभाव लागेना. तेव्हां याच्या बंदोबस्ताचें काम ब्रिटिशसरकारनें स्वतः आपल्याकडेच घेतलें. कर्नल रिचर्डनें आपलें सैन्य या भागात नेऊन हो लोकाना जेरीस आणलें; व त्यांना शरण येणें भाग पाडलें. त्यानंतर सिंगभूमसंस्था-नांतील २० परगणे व मयूरभंज संस्थानातून चार परगणे वेगळे या चोवीस परगण्यांचा एक स्वतंत्र भाग बनविला. यालाच कोल्हाणचा प्रदेश असें नाव आहे. १८५७ च्या बंडात पोराहाटच्या राजाला या प्रदेशातील हो लोक इंग्रजां-विरुद्ध जाऊन मिळाले. पण पुढें १८५९ मध्यें या राजाचा व या लोकांचा इंग्रजांनीं पराभव केला.

या प्रदेशातील खेड्यांचे लहानमोठे संघ बनविण्यात आले आहेत. प्रत्येक संघावर एक मुंडा अगर पाटील हा अधिकारी असतो, व अशा खेड्यांच्या संघावर एक मानकी अगर तालुका-पाटील असतो. प्रत्येक मुंड्याला आपल्या खेड्याचा वसूल गोळा करावा लागतो व आपल्या खेड्यातील गुन्हेगारांची पाळत राखून त्याना पकडण्याची जबाबदारी असते. या त्याच्या कामगिरीबद्दल मुंड्याना वसुलापाठीमागें १६ टक्के व मानक्याना १० टक्के कमिशन मिळतें. प्रत्येक मुंड्याला जातींतील व इतर तंटेबखेडे मिटविण्याचा अधिकार दिलेला आहे. पण हो जातीहून भिन्न अशा लोकामधील तंट्यांची व्यवस्था करण्याचें काम डेप्युटी कमिशनराच्या परवानगी शिवाय मुंड्याना करता येत नाहीं. या प्रदेशाची मोजणी १८९७ सालीं झाली, व या प्रदेशाचा वसूल १,७७,००० व्हावा असें ठरलें. त्यात ४९,००० रुपये मुंडे, मानकी व तहशील-दार ऊर्फ कारकून यांच्या पगारासाठीं तोडून देण्यात आले. या प्रदेशातील ५५५ चौरस मैल जमीन १९०३–४ सालीं पेरण्यात आली होती. सिंगभूम जिल्ह्याचें मुख्य ठिकाण चैबास या प्रदेशाच्या हद्दींत असून त्यातील जमिनीची आकारणी निराळी करण्यात आली आहे.

**कोल्हापूर, संस्थान.**—हें मुंबई इलाख्यातील दक्षिण-महाराष्ट्र संस्थानापैकीं एक मराठी संस्थान आहे. याचें क्षेत्र-फळ ३२१७ चौरस मैल आहे.

सीमा—कोल्हापूर संस्थानच्या उत्तरेस वारणा नदी आहे. पूर्वेस कृष्णानदी व दक्षिणेस बेळगावचा जिल्हा आहे. पश्चिमेस सह्याद्रिपर्वत व रत्नागिरी जिल्हा आहे.

स्वरूप—कोल्हापूर संस्थानच्या टापूंत महाराष्ट्र व कर्नाटक या दोन्ही प्रांतातील थोडा थोडा देश आहे. दक्षणच्या सपाट प्रदेशापैकीं कोल्हापूर संस्थान ही एक वाकडीतिकडी पट्टी आहे. ही पट्टी सह्याद्रीच्या शिखराच्या पूर्वेस उत्तरदक्षिण ६५ मैल व पूर्वपश्चिम ८ पासून ५० मैलावर आहे. उत्तरेस सुमारें ८ पासून १२ मैल रुंदीची पट्टी सह्याद्रीच्या बाजूनें १६ मैल लांबीची आहे. पुढें ती पूर्वेस पसरत जाऊन तिची रुंदी सुमारें ५० मैलपर्यंत वाढली आहे. व असा प्रदेश दक्षिणेस सुमारें १६ मैलापर्यंत आहे. पुढें पुन्हा चिंचोळी होऊन दक्षिणटोंकापासून १० मैलापर्यंत रुंदी ३०–४० मैलपर्यंत आहे आणि तेथून सह्याद्रीच्या पूर्व बाजूस रुंदी सारी १६ मैल अगदीं दक्षिण टोंकापर्यंत आहे. कोल्हापुरच्या सृष्टिसौंदर्यात तेथील डोंगर हे मुख्य होत. त्यात उत्तरदक्षिण सुमारें १०० मैल असलेला सह्याद्रिपर्वत हा मुख्य होय. यापासून थेट ईशान्येस, थेट पूर्वेस सुमारें ५० मैल जाणारे त्याचे सहा फाटे आहेत. सह्याद्रीचा देखावा जंगली पण रमणीय आहे. पायथ्याजवळच्या उतरणीवर व दऱ्यात दाट झाडी आहे. पर्वताच्या माथ्यामधून घुम-टाकासारखीं उंच शिखरें आहेत. या शिखरांपैकीं कित्येकावर मोठे दुर्घट असे किल्ले बांधलेले आहेत. कोल्हापूर प्रांताच्या सरहद्दींत सह्याद्रीच्या शिखरावर किंवा त्याच्या नजीक अस-लेले ९ पहाडी किल्ले आहेत. ते म्हणजे प्रचीतगड, भुदरगड, महिपतगड, विशाळगड, शिवगड, भैरवगड, रांगणा उर्फ प्रसिद्धगड, बाडीमाचाळ व पन्हाळा हे होत. कोल्हापूरच्या हद्दींत सह्याद्रीपासून खालीं कोंकणात उतरण्याचे सुमारें १०

घांट आहेत. त्यांपैकीं उत्तरेस आंबाघाट, मध्यभागीं फोंडाघाट व दक्षिणेस अंबोलीघाट हे तीन मात्र गाड्या जाण्या येण्याजोगे चांगले बांधलेले आहेत. याशिवाय आणखी १४ घांट ओझीं वाहणारीं जनावरें येण्याजाण्याजोगे आहेत व बाकीचे थोडेसे दुर्घट असे रस्ते आहेत.

सह्याद्रीच्या पूर्वेस व ईशान्येस ज्या शेंकडों टेंकड्या आहेत त्यांत सह्याद्रीचे सहा मोठे फाटे पूर्वेस व ईशान्येस २० ते ५० मैलांपर्यंत कोल्हापुरच्या हद्दींत आले आहेत. या टेंकड्यांमुळे या प्रांताचीं सहा मुख्य खोरीं बनलीं आहेत. या टेंकड्यांच्या माथ्यावर कित्येक ठिकाणीं उंच शिखरें व सुळके आहेत व त्यांवर कोठें किल्ले व कोठें देवस्थानें आहेत. या टेंकड्यांवर पन्हाळगड, पावनगड, विशाळगड यासारखे किल्ले व जोतीबा, सिद्धोबा, धुळोबा, अलंप्रभु, रामलिंग इत्यादि देवळें आहेत.

कोल्हापूर प्रांतात एकंदर लहानमोठ्या मिळून आठ नद्या आहेत त्या बहुतेक पूर्ववाहिनी आहेत. यांपैकीं मुख्य नदी कृष्णा ही असून ती कोल्हापूर प्रांताच्या ईशान्यसरहद्दीवरून सुमारें २५ मैलपर्यंत वाहात गेली आहे. याशिवाय वारणा, पंचगंगा, दूधगंगा, वेदगंगा, हिरण्यकेशी, घटप्रभा व मलप्रभा याहि नद्या या प्रांतांतून वहात गेल्या आहेत. कासारी, कुंभी, तुळशी, भोगवती व सरस्वती ( ही गुप्त आहे) अशा पांच नद्या एकत्र मिळून ही पंचगंगा नदी झाली आहे. या सर्व नद्यांना ज्यावेळीं पावसाळ्यांत पूर येतो त्यावेळीं या नद्यांमधून नावा चालू शकतात; पण उन्हाळ्यांत मात्र यांतून नावा चालत नाहींत.

कोल्हापूर संस्थानांत पाण्याचा पुरवठा एकंदरीनें चांगला आहे. जमिनीच्या पृष्ठभागाखालीं २०।२५ फूट पाण्याचे झरे बहुतेक सर्व भागीं लागतात. एकंदर १२।१५ हजार विहिरी कोल्हापूर संस्थानांत आहेत. तसेंच यांत जवळजवळ १२५ तळीं आहेत. त्यांपैकीं रंकाळें, पद्माळें, कोटितीर्थ व राधानगर हीं मोठीं तळीं अगर तलाव आहेत. सर्वांत मोठा तलाव रंकाळ्याचा होय. हा तलाव कोल्हापूर शहरांत आहे. याचा परीघ जवळ जवळ ३ मैलांचा असून त्याची खोली साधारण ३३ फूट आहे.

भूस्तरः- कोल्हापूरच्या दक्षिणेस मात्र रेताड व गारेच्या दगडाच्या कांहीं शिरा आहेत. बाकी सर्व प्रांत दक्षिणेंतील ट्रापच्या मोठ्या प्रदेशाच्या क्षेत्रांत येतो. या ट्रापच्या बसाल्ट, अग्निगुळाइट्राप, कणदारट्राप व चिकण मातीचा ट्राप अशा चार जाती आहेत. कोल्हापूरच्या दक्षिण भागांत ट्रापची जाडी २००० ते २५०० फूटपर्यंत आढळते. सह्याद्रीच्या पश्चिम भागांतील कड्यांमध्यें या ट्रापचे थर दृष्टीस पडतात. फोंडा व अंबोली घाटांत हे थर बऱ्याच जाडीचे आहेत व त्यांवर लोहमिश्रित मातीचे थर आढळतात.

हवाः—कोल्हापूर हें संस्थान समुद्रसपाटीपासून जवळजवळ १८०० फूट उंच असल्यानें येथील हवा साधारणपणें समशीतोष्ण असते. सह्याद्रीच्या घाटमाथ्यांत झाडी पुष्कळ असल्यामुळें व त्या ठिकाणीं पाऊसहि पुष्कळच पडत असल्यानें त्या भागांतील या प्रांताची हवा थंड असते. पण इतर भागांत पाऊस बेताचाच असतो. पावसाळा जून ते ऑक्टोबरपर्यंत असतो व यावेळीं पावसाचें प्रमाण सरासरी ४० इंच असतें. बावडा येथें पावसाचें प्रमाण पुष्कळ म्हणजे २०७ इंच आहे तर शिरोळ येथें अवघें २१ इंचच आहे. कोल्हापुरास पावसाचें प्रमाण ३८ इंच असून आजऱ्यास ७७ इंच आहे. उन्हाळ्यांत देशावरील हवा बरीच उष्ण असते व अशा वेळीं डोंगरावरील किल्ल्यांमधील हवा बरीच गार व सुखदायक असते. नोव्हेंबर ते फेब्रुवारीपर्यंत हिंवाळा असतो.

खनिज पदार्थः—सह्याद्रीचे कोल्हापूरच्या हद्दींत जे फाटे गेलेले आहेत त्यांत इतर प्रकारच्या दगडांशीं मिसळलेले असे लोखंडाचे दगड सांपडतात व या दगडांपासून लोखंड काढण्यांत येतें. याशिवाय या प्रांतांत इमारतीला लागणाऱ्या दगडाची समृद्धि आहे. दख्खन हा टापू ट्राप दगडांनीं युक्त असल्यानें कोल्हापूर प्रांतांतहि या दगडाचें वैपुल्य असावें यांत नवल नाहीं. ट्राप म्हणजे काळ्या अगर करड्या रंगाचे दगड. आजरें व तोरगल परगण्यांत तांबूस पांढऱ्या रंगाचा ग्रानाइट दगडाचा उपयोग करितात. तसेंच या प्रांतांत बहुतेक सर्व ठिकाणीं चांगला मुरुम सांपडतो. या मुरुमाचा सडकांचे रस्ते करण्याच्या कामीं चांगला उपयोग होतो. याशिवाय चुन्याचे दगड येथें खूप आढळतात. इमारतींच्या उपयोगाकरितां ज्या प्रकारची वाळू लागते तीहि या प्रांतांतील नद्यांच्या व ओढ्यांच्या पात्रांत पुष्कळ आढळून येते.

लोकसंख्या.—कोल्हापूर संस्थानची लोकसंख्या १९२१ च्या खानेसुमारींत ८,३३,७२६ इतकी होती. त्यांत ४,२८,५४३ पुरुष व ४,०५,१८३ स्त्रिया होत्या. या संस्थानांत ९ शहरें व १०६० खेडीं आहेत. १९११ सालीं लोकसंख्येपैकीं ३४३३४ लोक साक्षर होते. म्हणजे साक्षरतेचें प्रमाण जवळजवळ शेंकडा ४ ( पुरुष ७·२, स्त्रिया ०·२ ) हें प्रमाण पडतें. १९०३-४ सालांत कोल्हापूर संस्थानांत २५० शाळा होत्या. त्यांत एक हायस्कूल व एक टेक्निकल स्कूल होतें.

शेतकी—कोल्हापूर प्रांतांत काळी, तांबडी, मळी व खारी अथवा पांढरी अशा प्रकारच्या जमीनी आहेत. त्यांपैकीं काळी व तांबडी या जमिनी उत्तम प्रकारच्या आहेत. एकंदर लागवडीस आलेल्या जमिनीपैकीं तिसरा हिस्सा चांगली जमीन असून तींत बागाईत पिकें होतात. बाकीची जमीन मध्यम प्रकारची आहे. कोंकणघाटमाथ्यावरील जमीन अगदीं साधारण आहे. लागवडीस योग्य अशा २३५४ चौरस मैल एकरांपैकीं २०१९ चौरस मैल लागवड झालेली जमीन आहे. १९०३-४ मध्यें १५५ चौरस मैलांतच लागवड झाली बाकीची जमीन पडित होती. बागाईत जमीनींत खरीप आणि रब्बी अशीं दोन पिकें येतात

जंगल—कोल्हापूर प्रांतातील जंगलाचें क्षेत्रफळ सुमारें ५०० चौरस मैल आहे त्यांत राखीव जंगल ३४१ व संरक्षित जंगल १८२ मैल आहे या जंगलांत शिसवी, साग, खैर, किंजल, ऐन, हिरडा, जांभळ, करमळ, शेवरी इत्यादि पुष्कळ प्रकारचीं झाडें आहेत यांचीं लाकडें इमारतीच्या कामाला उपयोगी पडतात

गुरेंढोरें —पाळीव जनावरांत, बैल, म्हशी, रेडे, घोडे, उंट, गाढवें, शेळ्या, बकरी, मांजरें व कुत्रीं हीं मुख्य होत बैलांचे हुणम, सुरता, देशा असे तीन प्रकार आहेत हुणम बैल उभ्या शिंगाचे, दिसण्यांत सुरेख, आकारानें मध्यम, बळकट व काटक असतात सुरती बैल हुणम बैल पेक्षा उंच असून ते हुणम बैलाइतके चपळ नसतात मेंढरें बहुधा काळी, किंवा काळीं पांढरीं असतात धनगर लोक दूध, लोणी, लोकर आणि मांस मिळविण्याकरितां मेंढरें पाळतात. पूर्वीइतकीं हल्लीं या प्रांतांत जरी हिंस्र जनावरें आढळून येत नाहींत तरी वाघ, चित्ते, तरस, अस्वलें, डुकरें हीं अद्यापि कोल्हापूरच्या पश्चिमेकडील जंगलांत आढळतात कोल्हापूरच्या डोंगराळ प्रदेशांत विषारी व दुसरे असे नाना प्रकारचे सर्प आढळतात

व्यापार व दळणवळण —कोल्हापूर प्रांतांत तेल काढण्याच्या धंद्यांतील प्रमुख पदार्थ करडी, तीळ, भुइमुग, आंबाडी हे होत. हे येथें पुष्कळ पिकतात याशिवाय भाडीं करणें, विणकाम, लोंकरकाम, सुगंधी पदार्थ तयार करणें, बांगड्या, सोन्याचांदीचे दागिने इत्यादि धंदे या प्रांतांत चालतात कोल्हापूर येथील स्त्रियांचा अलंकार 'कोल्हापुरीसाज' हा प्रसिद्ध आहे गूळ, तंबाखू, कापूस, धान्य हे जिनस बाहेरदेशीं जातात, व साखर, नारळें, रेशीम, मीठ, गंधक इत्यादि माल बाहेरून येतो कोल्हापूर, शाहुपुरी, वडगांव, इचलकरंजी, कागल, या मुख्य बाजारपेठा आहेत

१८९१ पासून मिरज ते कोल्हापूर सदनमराठा रेल्वेचा फांटा सुरू झाला हा फांटा कोल्हापूर संस्थानच्या मालकीचा आहे. याशिवाय या प्रांतांतून मुख्यत सहा सडका जातात त्यांत पुणें ते बेळगांवपर्यंत जाणारी सडक महत्त्वाची आहे याशिवाय कोल्हापूरापासून रत्नागिरीपर्यंत, गगनापुराकडे, इत्यादि चारपांच वाटा चांगल्या आहेत

शासनपद्धति —कोल्हापूर संस्थानांत, विशाळगड, बावडा, इचलकरंजी, हिंमतबहाद्दर कागल, ( मोठी पाती व धाकटी पाती ), कापशी, सरलष्कर या सात जहागिरी असून, त्या त्या जहागिरदाराच्याकडून त्यांचा कारभार चालविला जातो खुद्द कोल्हापूर संस्थानांत करवीर, पन्हाळा, अळतें, शिरोळ, गडहिंग्लज, भुदरगड हे सहा पेटे व चनवड, रायबाग व कटकोळ असे तीन महाल आहेत या सर्वांचा राज्यकारभार कोल्हापूरचे महाराज, कोल्हापूर व दक्षिण महाराष्ट्र जहागिरीवर देखरेख ठेवण्याकरितां नेमलेल्या पोलिटिकल एजंटच्या सल्यानें चालवितात कोल्हापूरच्या महाराजांना दिवाणी फौजदारीचे पूर्ण अधिकार आहेत त्यांना फाशी देण्याचाहि हक्क आहे पण ब्रिटिश नागरिकांच्या गुन्ह्याचा इनसाफ पोलिटिकल एजंटच्या परवानगीशिवाय त्यांना करतां येत नाहीं १९०३–४ सालीं संस्थानांत सेशन्सजजापासून तों थर्डक्लास मॅजिस्ट्रेटच्या दर्जापर्यंतचीं एकंदर ६४ फौजदारी कोर्टें होतीं मांडलिक जहागिरदारांना डिस्ट्रिक्ट जजाचे अधिकार व सात वर्षेपर्यंत शिक्षा देण्याचा अधिकार आहे या संस्थानांत कोल्हापूर, नरसोबाची वाडी, इचलकरंजी, वडगांव, हातकणंगले, शिरोळ, गडहिंग्लज, कटकोळ व मलकापूर या ठिकाणीं म्युनिसिपालिट्या आहेत जमीनधाऱ्याची पद्धत तीन प्रकारची आहे, इनामी, शेरी व रयतवारी इनामापैकीं *काहीं बक्षीस म्हणून, काहीं नोकरीबद्दल व काहीं देवस्थान* इनामें आहेत सरकारी जमीनी सर्व महाराजाच्या ताब्यांत असतात व त्या खंडानें देण्याचें काम रेव्हेन्यू अधिकाऱ्याकडे असतें रयतवारीचे मिराशी, उपरी व चालखंड असे तीन पोटभेद आहेत संस्थानांतील जमीनीचा महसूल गोळा करण्याकरितां एक मुख्य अधिकारी नेमला असतो तादुळाच्या पिकापाठीमागें दर एकरी ५ रु एक आण्यापासून १० रुपये पर्यंत, बागायती जमीनीस एकरामागें ८–१० रु व कोरडवा जमीनीमागं दर एकरी १ ते चार रु चार आणे सारा द्यावा लागतो १९०३–४ मध्यें संस्थानचें एकंदर उत्पन्न ४४ लक्ष झालें त्यापैकीं १९ लाख जमीनीपासून उत्पन्न झालें सर्व एकंदरीत ४३लक्ष रुपये खर्च झाला त्यापैकीं ३ लक्ष रुपये महाराजाच्या खासगी खर्चाकडे, ३ लक्ष पब्लिक वर्क्स खात्यावर व २ लक्ष लष्करकडे खर्च झाले. अफू, अबकारी खातें व मीठ याच्यावर सरकारी ताबा आहे १८३९ पासून कोल्हापूर संस्थानांत ब्रिटिश नाणींच प्रचलित आहेत कोल्हापूरच्या महाराजाजवळ सुमारें ७०० ते ८०० लोकांचें लष्कर असतें याशिवाय पोलिसाची संख्या ८०० ते ९०० आहे कोल्हापूर येथें एक तुरुंग असून तेथें जवळ जवळ ९१० कैद्यांची सोय होऊं शकते याशिवाय संस्थानांत १० लहान तुरुंग आहेत कोल्हापूर येथें पाऊस नेहमीं बरा पडत असल्यानें दक्षिण महाराष्ट्रांतील इतर ठिकाणांपेक्षां कोल्हापूर संस्थानांत दुष्काळाच्या फेऱ्या फार कमी होतात दर दहा बारा वर्षांपाठीमागें सर्वसाधारण एकदां दुष्काळ पडतो असें दिसून येतें दुष्काळ पडला असतांना दुष्काळग्रस्त लोकांसाठीं सरकाराकडून व्यवस्था करण्यांत येते स्वस्त धान्याचीं दुकानें उघडण्यांत येतात १८९६–१८९७ च्या दुष्काळांत दुष्काळग्रस्त लोकांना मदत म्हणून संस्थाननें जवळ जवळ ७ लक्ष रुपये खर्च केले १८९९–१९०० या सालच्या दुष्काळांत ९१,००० रुपये खर्च झाले

इतिहास —कोल्हापूरच्या इतिहासाचे प्राचीन हिंदु कारकीर्द ( इ स १३४७ पर्यंत), मुसुलमानी कारकीर्द ( १३४७ १७०० पर्यंत ) व मराठी कारकीर्द ( १७०० पासून आतापर्यंत ) असे तीन विभाग करतां येतील

प्राचीन इतिहास—कोल्हापूर अगर करवीर हें संस्थान फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे १८७७ सालीं कोल्हापुरास खणीत असता बौद्ध लोकांच्या एका मोठ्या देवळाचा अवशेष सापडला त्याच्या मध्यभागीं एक चौरस चौरस दगडी पेटी सापडली तिच्या चौकोनी झाकणाच्या आतल्या बाजूस ख्रिस्ती शकाच्या पूर्वीच्या तिसऱ्या शतकांतील लिपींत, धम्मगुत्तानें ब्रम्ह यास दिलेल्या देणगी-विषयीं लेख होता याशिवाय कोल्हापुरास जीं ताम्रपटाचीं अगर शिलांचीं नाणीं सापडलीं आहेत त्यांवरूनहि असें दिसतें कीं, ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत दक्षिणच्या उत्तरभागाचे जे शातकर्णी अगर आंध्रभृत्य राजे झाले त्याच्या वंशांतील कांहीं पुरुषांच्या व त्यांच्या प्रतिनिधींच्या अमलाखालीं कोल्हापूर प्रांत होता व या राजांपैकीं एकानें नाव विल्वियायकुर होतें टॉलेमीनें ज्या वले ओकूर राजाचा उल्लेख केला आहे तेच हे विल्वायकुर होत असे डॉ भांडारकर यांचें म्हणणें आहे आंध्रभृत्यांपासून ५०० च्या सुमारास कदंब राजांनीं हा प्रांत जिंकून घेतला असें दिसतें पुढें पन्नास वर्षांच्यानंतर हा प्रांत पश्चिमेकडील चालुक्यांच्या ताब्यांत गेला चालुक्य राजांनीं या प्रांतावर सुमारें सव्वाशें वर्षें आपला अमल गाजविल्यावर राष्ट्रकूटांनीं या प्रांतावर राज्य केलें पण पुन्हा चालुक्यांनीं हा प्रांत राष्ट्रकूटांकडून बळकावून घेतला पुढें शिलाहार राजांनीं साधारण इ स ११८० पर्यंत या प्रांतावर राज्य केलं हे शिलाहार राजे जैनपंथाचे असूनहि त्यांची कुलस्वामिनी कोल्हापूरची महालक्ष्मी ही होती या शिलाहार वंशांतील,जटिग, चंद्रादित्य, मारसिंह, भोज ( पहिला ) गंडरादित्य, विजयादित्य व भोज दुसरा या राजांनीं कोल्हापुरावर राज्य केलें त्यामध्यें दुसरा भोज हाच प्रसिद्ध राजा होऊन गेला याच्या वेळीं याच्या राज्याचा विस्तार साताऱ्याच्या उत्तरेस शंभुमहादेव पर्वत आहे, तेथून ते कोल्हापूरच्या दक्षिणेस हिरण्यकेशी नदीपर्यंत होता यानें आपल्या अमदानींत १५ किल्ले बांधले असें म्हणतात त्यांपैकीं बावडा, भूदरगड, खेळणा, पन्हाळगड, पावनगड समानगड हे किल्ले कोल्हापूरच्या हद्दींत आहेत. दुसऱ्या भोजानंतर हा प्रांत देवगिरीच्या यादवांकडे आला. यादव वंशांतील दुसरा सिंघणदेव यानें भोजराजाकडून हा प्रांत जिंकून घेतला हा ११६० मध्यें या प्रांतावर राज्य करीत होता असें तत्कालीन शिलालेखांवरून सिद्ध होतें या देवगडच्या यादव वंशांतल राजांनीं १५० वर्षांहून अधिक वर्षें राज्य केलें पुढें या यादवांपासून मुसुलमान लोकांनीं हा प्रांत जिंकून घेतला

मुसुलमानी कारकीर्द—इ स. १३४७ पासून या प्रांताचा पूर्व भाग दक्षिणेंतील बहामनी राज्याच्या अमलाखालीं आला या वंशांतील दहावा राजा दुसरा अल्लाउद्दीन १४३५ सालीं या प्रांतावर राज्य करीत होता त्यानें प्रथमत या प्रांताचा पश्चिम भाग जिंकण्याचें मनांत आणिलें पण त्याचा यत्न सिद्धीस गेला नाहीं पुढें सुमारें पस्तीस वर्षांनीं दुसरा महमदशाहा बहामनी यानें महंमद गवान नावाच्या आपल्या एका मुख्य सरदाराला खेळणा किल्ला घेण्यास पाठविलें. यानें अनेक युक्तिप्रयुक्त्या लढवून हा किल्ला काबीज केला, व या काबीज केलेल्या मुलुखावर कीश्वरखान नावाच्या एका इसमास सुभेदार म्हणून नेमलें पुढें कांहीं वर्षांनीं बहादुर गिलानी या एका सरदारानें कोल्हापूर व त्याच्या आसपासचा प्रांत बळकावला त्यामुळें महमदशाहा बहामनी याला त्याचें पारिपत्य करण्याचें काम अंगावर घ्यावें लागलें महमदशहाच्या बरोबर झालेल्या लढाईंत गिलानी हा मारला गेला व या प्रांताचें स्वामित्व ऐनउलमुल्ख गिलानीस देण्यांत आलें पुढें १४९८ सालीं बहामनी राज्य मोडकळीस आलें त्या वेळीं तत्कालीन शूर सरदारांनीं मिळेल तेवढा प्रदेश आपल्या ताब्यांत आणला व अशा रीतीनें ते स्वतंत्र सरदार बनले कोल्हापूर व आसपासचा मुलूख मात्र विजापूरच्या सुलतानाच्या ताब्यांत गेला या सुलतानाच्या वंशांतील दोघा इब्राहिमांनीं पन्हाळगडच्या तटबंदीकडे लक्ष्य देऊन त्या गडाला मजबुती आणली

मराठी अम्मल—मराठी साम्राज्याचे संस्थापक श्री शिवछत्रपति महाराज यांनीं आपल्या राज्याची स्थापना करतांना या प्रांतांतील किल्ल्यांचा उपयोग करून घेण्याचें ठरविलें यांनीं अनेक कारस्थानें करून पन्हाळगड, पावनगड, विशाळगड, रांगणा इत्यादि किल्ले हस्तगत करून घेतले अशा रीतीनें हा प्रांत शिवाजी महाराजांच्या व त्यांच्या पराक्रमाच्या ताब्यांत आला छत्रपती राजारामाच्या मरणानंतर त्याची बायको ताराबाई हिनें आपला पुत्र शिवाजी या बाल राजास गादीवर बसविलं व पंत अमात्य, सेनापति व परशुराम त्र्यंबक यांच्या सहाय्यानें ती राज्यकारभार करूं लागली पण पुढें १७०७ सालीं औरंगझेबाच्या मरणानंतर शाहु हा मोंगलांच्या कैदेंतून सुटून आल्यावर त्यानें सर्व राज्यावर आपला हक्क सांगितला त्यामुळें या दोन वारसदारांमध्यें कलागती उपस्थित होऊन शेवटीं १७३० मध्यें या दोन घराण्यामध्यें सलोख्याचा तह झाला या तहान्वयें शाहूनें ताराबाईचा कोल्हापूरच्या मुलखावरील हक्क मान्य केला १७६० मध्यें राजारामाचा धाकटा मुलगा संभाजी मरण पावला त्यामुळें राजारामाचा वंश खुंटला. तेव्हा त्याची वडील बायको जिजाबाई हिनें आपल्या नवऱ्याच्या इच्छेप्रमाणें शिवाजीच्या घराण्याचा एक दूरचा वंशज खानवटचा शहाजी भोंसला याच्या मुलास दत्तक घेण्याचें ठरविलें याला प्रथम पेशव्यांनीं आडकाठी आणली पण पुढें त्यांनीं रुकार दिला या दत्तक मुलाचें नांव शिवाजी असें ठेवण्यांत आलें व त्याच्या अल्पवयांत त्याच्या नांवानें जिजाबाईनें राज्यकारभार चालविला या जिजाबाईच्या कारकीर्दींत या राज्यावर अनेक संकटें आलीं कोल्हापूर

प्रांतातील प्रजेचा बंडखोरपणा बेसुमार वाढल्यामुळें व तो ईस्ट इंडिया कंपनीला बाधक होऊं लागल्यानें, कंपनीनें कोल्हापुरकराच्या पश्चिम किनाऱ्यावरील मालवण बंदरावर आपलें आरमार पाठविलें व मालवणचा किल्ला ताब्यात घेतला. पुढें कोल्हापूरकर व कंपनीसरकार याच्यामध्यें तहनामा होऊन त्यामुळें कोल्हापूर प्रांतांत इंग्रजी व्यापाऱ्यांना व्यापार करण्यास सवलत मिळाली. कोल्हापूरकरांवर आपला दाब ठेवण्यासाठीं सुमारें ८०० स्वार ठेवता येण्याजोगा सरंजाम देऊन पेशव्यांनीं कोल्हापूरच्या पूर्व सरहद्दीवर पटवर्धन जहागीरदाराची स्थापना केली. पुढें जिजाबाई मरण पावल्यानंतर, शिवाजी राजा हा अद्यापि अल्पवयी असल्यामुळें त्याच्यावतीनें दिवाण यशवंतराव शिंदे हे राज्यकारभार पाहूं लागले पेशवे, पटवर्धन, इत्यादिकांना कोल्हापूरकर हे नेहमीं त्रास देत. ते पेशव्याविरुद्ध निजाम, हैदर, टिपू, दादासाहेब पेशवे वगैरेंना नेहमीं सामील होते पुढें इ. स. १७८? मध्यें यशवंतराव हे मरण पावले त्यानंतर रत्नाकरपंत आप्पा याची दिवाणगिरीच्या कामावर योजना झाली यांनीं आपल्या अमदानींत सर्व बंडाळी मोडून कोल्हापुरात कांहीं वर्षे शांतता प्रस्थापित केली पण ती पुढें फार वर्षे टिकली नाहीं. कोल्हापूरच्या प्रजेचा पश्चिम किनाऱ्यावरील लुटारूपणा अद्यापि मोडला नाहीं, नाना फडणवीस वारल्यामुळें सर्वच मराठी राज्यात अदाधुंदी माजली होती. छोटे जहागीरदार स्वतंत्र होण्याच्या प्रयत्नास लागले त्यामुळें कोल्हापूरकरानीं इंग्लिशांबरोबर तह करुन त्यांना मालवण बंदर व त्याखालील मुलुख दिला. इंग्रजानींहि कोल्हापूरकराना त्याच्यावर कोणी चाल करून आल्यास मदत करण्याचें कबूल केलें हा तह इ. स. १८१२ च्या आक्टोबर महिन्यात झाला. शिवाजी इ. स. १८१२ सालीं मरण पावला होता. त्याच्या पाठीमागें त्याचा ज्येष्ठ पुत्र संभाजी उर्फ आबासाहेब हे गादीवर बसले. याचा स्वभाव फार शांत होता याच्या कारकीर्दीत पेशवे व इंग्रज याच्यामध्यें युद्ध उपस्थित झालें. त्यावेळीं संभाजी महाराजानीं इंग्रजाचा पक्ष धरिला. त्यामुळें इंग्रजानीं चिकोडी व मनोली हे तालुके त्याना दिले इ. स. १८२१ सालीं आबासाहेबाचा निर्दय रीतीनें वध झाला. त्याच्यामागून त्याचे कनिष्ठ शहाजी उर्फ बुवासाहेब हे गादीवर आले; हे बदफैली, साहसी व क्रूर असल्यानें प्रजेवर फार जुलूम होऊं लागला. आपल्या दुर्वर्तनामध्यें व चैनीमध्यें आडकाठी येऊं नये म्हणून त्यानीं वाटेल तसे पैसे उकळण्यास सुरुवात केली. कागलकर, इचलकरंजीकर यासारख्या महागिरदाराच्या जहागीरी उध्वस्त करुन त्यांना त्रास देण्यास त्यानीं सुरुवात केली. इंग्रजाच्या प्रदेशाला त्यानीं त्रास देण्यास आरंभ केला तेव्हा त्याचा बंदोबस्त करण्यासाठीं ब्रिटिशानीं कोल्हापुरावर फौज पाठविली. पण कोल्हापूरकरानीं त्या फौजेला तोंड न देता ब्रिटिशाशीं तह करण्याचें कबूल केलें. तहान्वयें आपल्या ताब्यातील जहागिरदारानां व ब्रिटिशाच्या मुलुखाला कोणत्याहि प्रकारें त्रास न देण्याचें बुवा महाराजानीं कबूल केलें पण इंग्रजाची फौज दूर होताच महाराजानीं पुन्हा पूर्वक्रम सुरू केला. त्यामुळें इंग्रजाना पुन्हा फौज पाठविणें भाग पडलें. इ. स. १८२७ च्या आक्टोबर महिन्यात पुन्हा महाराजानीं इंग्रजाशीं तह केला व आपली फौज कमी करण्याचें मोठ्या नाखुषीनें कबूल केलें. पण याहि तहान्वयें हातून वागणूक न झाल्यामुळें पुन्हा इ. स १८२९ सालीं नवा तहनामा ठरला व या नवीन तहनाम्यानें कोल्हापूरच्या राज्यावर मुख्य कारभारी नेमणें, त्यास कायम करणें, बडतर्फ करणें यासंबंधीचे सर्व अधिकार ब्रिटिश सरकारनें आपल्याकडे घेतले. बुवासाहेब हे इ. स. १८३७ सालीं मरण पावले

बुवासाहेबाच्या मागून त्याचे अल्पवयी चिरंजीव शिवाजी उर्फ बाबासाहेब यास गादीवर बसवून रीजन्सीमार्फत कोल्हापूरचा राज्यकारभार चालविण्यात येऊं लागला. पण या अमदानींतहि दंगेधोपे होऊं लागल्यामुळें ब्रिटिश सरकारनें दाजी कृष्ण पंडित यास कारभारी नेमलें तरी पण याच्या कारकीर्दीत कांहीं गडकऱ्यानीं बंड केल्यामुळें व पंडित यास तुरुंगात टाकल्यामुळें ब्रिटिश सरकारनें फौज पाठवून तें बंड मोडलें व मेजर ग्रॅहॅम यास कोल्हापूरच्या राज्यकारभाराची व्यवस्था पाहण्याकरितां कोल्हापूर येथें पोलिटिकल सुपरिंटेंडंट म्हणून नेमिलें. त्यामुळें कोल्हापूरचा राज्यकारभार पुन्हा सुरळीतपणें चालूं लागला. इ. स. १८६६ सालीं बाबासाहेब हे मरण पावले. तत्पूर्वी त्यानीं आपल्या मांडीवर दत्तक घेतला होता. याचें नाव राजाराम असें ठेवण्यात आलें. याना चागलें शिक्षण मिळण्याची सरकारनें खबरदारी घेतली होती. पुढें हे यूरोपमध्यें प्रवास करण्यास गेले असता परत येताना त्यांना वायूचा विकार जडून फ्लॉरेन्स शहरीं त्याचा अंत झाला

राजाराम महाराजाना औरस संतति नसल्यानें त्याच्या वडील बायकोस दत्तक घेण्याची परवानगी मिळाली. दत्तक पुत्राचें नाव शिवाजी महाराज असें ठेवण्यात आलें. इ. स. १८८२ सालीं हे भ्रमिष्ट झाल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं त्यामुळें राज्यकारभारासाठीं एक रीजन्सी ठेवण्यात आली. हे १८८३ सालीं मरण पावले यानाहि औरस संतति नसल्यानें त्याच्या बायकोनें दत्तक घेतला, व त्याचें नाव शाहु असें ठेवलें.हे अल्पवयी होते तोंपर्यंत कोल्हापूरचा कारभार रीजन्सीमार्फत चालविला जात असे. याचा विवाह बडोद्याचे गणपतराव गायकवाड याच्या नातीशीं झाला होता याचें शिक्षण राजकोट येथील राजकुमार कॉलेजमध्यें फ्रेझर याच्या देखरेखीखालीं झालें. इ स. १८९४ सालापासून याना मुखत्यारी मिळाली. यानीं आपल्या कारकीर्दीत राज्यकारभार बरा चालविला. निकृष्ट वर्गातील लोकाबद्दल याना फार सहानुभूति असे व ब्राह्मण वर्गाबद्दल तिटकारा असे. यानीं

२१ तोफांचा मान होता हे १९२२ च्या मे महिन्यात मरण पावले. त्याच्या पाठीमागें त्याचे ज्येष्ठ पुत्र राजाराम छत्रपति हे राज्यावर आहेत. याना के सी आय ई. ही पदवी नुकतीच मिळाली आहे.

शहर.—कोल्हापूर संस्थानची राजधानी. उ. अ १६° ४१' व पू. रे. ७४° १७'. १९११ सालीं या शहराची लोकवस्ती ८९४८१ होती व हल्लीं या शहरात चागल्या इमारती झालेल्या आहेत. यापैकीं कॉलेज, हायस्कूल, टेक्निकल स्कूल, दवाखाना या इमारती प्रेक्षणीय असून राजारामकॉलेज व पाच हायस्कुलें येथ असून विश्वबंधु,ज्ञानसागर हीं वर्तमानपत्रें निघतात.

कोल्हापूर शहर दक्षिण काशी या नावानें पुरातन कालापासून प्रसिद्ध आहे या ठिकाणीं पुष्कळ देवालयें आहेत.त्यापैकीं अंबाबाईचें देऊळ तर फारच भव्य व उत्कृष्ट आहे. त्यात चार शिलालेख आहेत. पूर्वी हे धर्माचें क्षेत्र होतें असें म्हणतात या शहराजवळच जें करवीर नावाचें खेडें आहे तें पूर्वी संस्थानचें मुख्य ठिकाण होतें. पण पुढें कोल्हापूर हें राजधानीचें शहर बनलें.

याचें कोल्लापुरम् म्हणूनहि दुसरें नाव असून तें चोलाच्या इतिहासात येतें दुसरा राजेंद्र चोल यानें चालुक्यावर स्वारी करून त्याचा पराभव केल्यानंतर या गावीं एक विजयस्तंभ उभारल्याचें ( सुमारें १०६० त ) एके ठिकाणीं नमूद केलेलें आहे [ अय्यर—एन्शंट इंडिया ] कोल्हापूर शहराचा यापुढील इतिहास संस्थानच्या इतिहासात अंतर्भूत झाला आहे.

कोवनो—हें शहर रशियात आहे. येथें एक किल्ला असून हें याच नावाच्या प्रांताचें मुख्य ठिकाण आहे. हे नेमेन व व्हिलिया या नद्यांच्या संगमावर असून लेलिनग्राड ( पेट्रोग्राड = पीटर्स बर्ग ) पासून ५५० मैलांवर आहे हें प्रशिअन सरहद्दीपासून ५५ मैल आहे कोव्हेनोचा किल्ला पहिल्या प्रतीचा आहे २॥ मैलाच्या अंतरावर ११ किल्ल्यांच्या वेढ्यानें ह्याचें रक्षण केलेलें आहे. येथील कारखान्यात खिळे, तारेचें काम व दुसऱ्या धातूचीं कामें तयार होतात. हें शहर ११ व्या शतकात वसविलें गेलें. १३८४ पासून १३९८ पर्यंत हें ट्यूटॉनिक सरदाराच्या ताब्यात होतें १६५५ मध्यें रशियाच्या झारनें हें शहर लुटलें. या ठिकाणीं रशियन लोकानीं पोल लोकाचा १८३१ च्या जूनच्या २६ तारखेला पराभव केला

कोवेलंग—मद्रास इलाख्यात चिंगलपुट जिल्ह्यांतील चिंगलपुट नावाच्या तालुक्यांतील एक खेडें. मद्रास शहरापासून दक्षिणेस वीस मैलांवर पूर्व किनाऱ्यावर वसलेलें आहे. प्रथमत. हें डच लोकाचें ठाणें होतें. पुढें ओस्टेंडच्या ईस्ट इंडिया कंपनीनें येथें एक वसाहत स्थापिली व किल्ला बांधिला पण सध्या कांहीं त्याचा मागमूस नाहीं सन १७४४ ते १७४९ पावेतों कर्नाटकचा नबाब असलेल्या अन्वरुद्दीनखानाच्या वेळीं बाधलेला पण सध्या मोडकळीस आलेला सादत बंदर नावाचा किल्ला येथें आहे सन १७५० सालीं फ्रेंच लोकानीं हें गाव मोठ्या युक्तीनें काबीज केलें. १७५२ सालीं क्लाइव्हनें ही जागा व किल्ला घेतला. पण त्यानें किल्ल्याचा तट सफा उडवून दिला येथें मिठागरें पुष्कळ आहेत येथून जवळच विड्याच्या पानाचे मळे आहेत

कोश —कोश याचा मूळचा अर्थ एखाद्या भाषेंतील अक्षरानुक्रमानें अगर दुसऱ्या कोणत्या तरी ठराविक पद्धतीनें शब्दांचा संग्रह करून त्या शब्दाचें त्याच भाषेंत अगर दुसऱ्या एखाद्या भाषेंत विवरण करणारा ग्रंथ असा आहे. कोशामध्यें त्या त्या भाषेंतील सर्व प्रकारच्या शब्दाचा भरणा असतो प्रथमत. अशा प्रकारचे सर्व शब्द कोशात देण्याची वहिवाट असे पुढें जेव्हा भाषेमध्यें नवीन नवीन शब्दांचा अंदाजाबाहेर भरणा होऊं लागला, त्यावेळीं अशा सर्व शब्दाचें सागोपाग रीतीनें विवरण करणारा कोश करणें फार जड जाऊं लागलें तेव्हा निरनिराळ्या विषयामधील शब्दाचा स्वतंत्र कोश करण्याची कल्पना उदयास आली त्याप्रमाणें निरनिराळ्या विषयाला वाहून घेणारे स्वतंत्र कोश निर्माण होऊं लागले बायबलचा कोश, तत्वज्ञानाचा कोश, स्थळाचा कोश असे कोश प्रत्येक भाषेंत निर्माण झाले कोशाचें विस्तृत स्वरूप म्हणजे ज्ञानकोश होय अशा प्रकारच्या ज्ञानकोशामध्ये सर्व महत्वाच्या विषयाची विस्तृत माहिती आलेली असते

भारतीय —भारतीय कोशकल्पनेचा उगम आपल्याला प्रथमत निघंटुमध्यें पहावयास सापडतो धातुपाठ, उणादिसूत्रें, गणपाठ व लिंगानुशासन अशा क्रमानें कोशाला हल्लींचें स्वरूप प्राप्त झालें आहे. निघण्टूमध्यें धातूंचाच विचार केलेला आहे तर कोशामध्यें केवळ नामें व अव्ययें याचाच समावेश झालेला आढळतो निघण्टूमध्यें वैदिक ऋचाचाच स्पष्ट उल्लेख आलेला आहे तर कोशामध्यें सर्वच वाङ्मयातील शब्दाचा संग्रह केलेला आढळतो

आज आपल्याला हिंदुस्थानांत जे प्राचीन कोश पहावयास मिळतात त्याच्या रचनेचा हेतु, वैदिक निघण्टूच्या रचनेच्या हेतूहून भिन्न आहे असें दिसून येतें. वैदिक निघण्टु हा वैदिक ऋचाच्या स्पष्टीकरणार्थ रचिण्यात आला, तर कवींना काव्यरचनेला उपयोग व्हाव, यासाठीं कोशाची कल्पना उदयास आली काव्य व कोश याचा फार निकट संबंध आहे. कवींच्या उपयोगासाठीं कोशरचना केल्याबद्दलचे उल्लेख कोशकार वारंवार करतात बरेचसे कोश खुद्द कवींनीच निर्माण केले असल्याचें आपल्याला दिसून येतें मुरारि, मयूर, बाण, श्रीहर्ष व बिल्हण या कवींनीं स्वत. स्वतंत्र कोश लिहिले आहेत श्रीहर्षानें श्लेषोपयोगी शब्दांचा कोश लिहिला असून त्याचें नांव श्लेषार्थपदसंग्रह असें आहे. अमरकोशाचा कर्ता अमरसिंह

स्वतः कवीच होता हे कोश बहुधा श्लोकात लिहिलेले असत. या कोशात सर्व शास्त्रांमधील शब्दांचा संग्रह केलेला असे. त्यामुळें कवीला मुद्दाम त्या त्या शास्त्राचा स्वतन्त्र अभ्यास करण्याचें कारणच पडत नसे शिवाय हे कोश बहुधा श्लोकातच लिहिलेले असल्यामुळें ते पाठ करण्यास फार सोपे जात. असे भारतीय कोशाचे मुख्यत. दोन वर्ग पडतात. ( १ ) समानार्थी शब्दाचा ज्यात संग्रह केला आहे असा कोश, ( २ ) अनेकार्थवाची शब्दाचा ज्यात संग्रह आहे असा कोश पण अशा प्रकारचे हे दोन भिन्न वर्ग जरी आहेत तरी बहुतेक कोशात या दोन्ही वर्गांची सरमिसळ झालेली दिसते. कोशामधील शब्दांची व्यवस्था मात्र निरनिराळ्या पद्धतीनें केलेली आढळते ज्या वस्तूला पर्यायशब्द पुष्कळ असतील ती वस्तु अगोदर व जिला पर्यायशब्द कमी असतील ती वस्तु नंतर अशी पद्धत काही कोशात आढळते, तर काही कोशात अक्षरविन्हे- वारीनें रचना केलेली दिसते काहींत अक्षराच्या कमीअधिक सख्येवरून कोशातील शब्दांची माडणी करण्यात येते पण बऱ्याच कोशामध्ये या निरनिराळ्या पद्धती एकसमयाव- च्छेदेंकरूनच उपयोगात आणलेल्या दिसतात अनेकार्थवाची शब्दकोशात एक शब्द व त्याचे निरनिराळे अर्थ हे प्रथमा विभक्तींत दिलेले आढळतात,तर क्वचित् शब्दाचे अर्थ सप्तमी- विभक्तींत दिलेले असतात. काहीं कोशात शब्दांचे अर्थ व शब्दांची लिंगें अशीं दोन्हीं दिलेलीं आढळतात काहीं कोशात लिंगानुशासन हें शेवटीं परिशिष्टात दिलेलें दिसून येतें क्वचित् प्रसंगी लिंगाप्रमाणें शब्दाची माडणी केलेली पहावयास सापडते

अगदीं प्राचीन कोश हल्लीं संपूर्ण असे उपलब्ध नाहींत. शिवाय खण्डशः का होईना जे उपलब्ध आहेत त्यामध्यें शब्दाची माडणी एका विशिष्ट पद्धतीनें झालेलीहि आढळून येत नाही शब्दाचे अर्थ फार संक्षिप्त तऱ्हेनें दिलेले असतात. अगदीं प्राचीनातला प्राचीन कोश म्हणजे मध्य आशियात काशगर येथें सापडलेलें आठ पानाचें एक चोपडें होय. हें चोपडें संपूर्ण उपलब्ध नाहीं या अपूर्ण चोपड्याचा कर्ता बौद्धधर्मीय असावा असें दिसतें याशिवाय निरनिराळ्या ग्रंथांमधून जे उल्लेख आढळून येतात त्यावरून पूर्वी पुष्कळ कोश असावेत असें दिसून येतें. काशिकेमध्यें नानार्थ कोशाचा उल्लेख आलेला आहे याशिवाय कात्यायनाची नाम- माला, वाचस्पतीचा शब्दार्णव, विक्रमादित्याचा संसारावर्त, व्याडीची उत्पलिनी, इत्यादि फार प्राचीन काळच्या कोशाची नावें आपल्याला आढळून येतात पण या सर्वांना मागें टाक- णारा कोश म्हणजे अमरसिंहविरचित नामलिंगानुशासन ऊर्फ अमरकोश होय हा अमरसिंह जरी बौद्धधर्मीय होता तरी अमरकोशात बौद्ध नावाचा म्हणण्यासारखा भरणा आढळून येत नाही या अमरसिंहाचें विक्रमादित्याच्या दर- बारातील नवरत्नांमध्यें जरी नाव आलेलें आढळतें तरी त्यावरून त्याच्या कालाचा नक्की निर्णय होऊं शकत नाहीं. कालिदासाच्या काव्यांतून त्यानें बरेच शब्द घेतले आहेत त्यावरून तो कालिदासानंतरचा असावा हें उघड होतें हा बहुतेक सहाव्या ते आठव्या शतकाच्या दरम्यान झाला असावा असें दिसतें अमरकोश हा समानार्थवाची शब्द- कोश असून त्याचीं तीन काड आहेत. पहिल्या काडात आकाश, देव,अंतरिक्ष, तारे, काल,नाद, भाषा, शब्द, गायन, नृत्य, पाताळ, सर्प, समुद्र, पाणी, इत्यादि शब्दाचे पर्याय- शब्द आले असून दुसऱ्या काडात, पृथ्वी, नगर, पर्वत, अरण्य, वृक्षलता, प्राणी, मनुष्य, नातीगोती, रोग, अवयव वस्त्र, आभरण, वर्ण, जाति, धंदे इत्यादींच विवेचन आहे तिसऱ्या काडात, विशेषणें, अन्वयें, अनेकार्थवाची शब्दसंग्रह याचा समावेश झाला आहे अग्निपुराणात जो कोशसदृश भाग आला आहे त्याची माडणी अमरकोशासारखीच असून, अमरकोशावरूनच तो भाग उद्धृत करून घेतला असावा असे दिसतें अमरकोशाच्या धर्तीवरच इतर कोशाचीं माडणी झालेली आढळून येते अमरकोशावर जवळ जवळ५० टीका झाल्या,पण त्यापैकीं फारच थोड्या उपलब्ध आहेत. क्षीर स्वामीची टीका विशेष महत्वाची आहे १५ व्या शत- कात बृहस्पतिराय मुकुटमणि यानें अमरकोशावर फार मोठी टीका लिहिली. त्या टीकेच्या आरंभीं त्यानें आपण ही टीका आपल्या अगोदर होऊन गेलेल्या १६ टीकाच्या आधारें लिहिला असें म्हटलें आहे व आपल्या टीका- ग्रंथात त्यानें जवळ जवळ २७० ग्रंथ व ग्रंथकाराचा उल्लेख केला आहे.

या अमरकोशाला पुरुषोत्तमदेवानें त्रिकाडशेष नावाची एक पुरवणी जोडली. या पुरवणीमध्यें बौद्धसंस्कृतवाङ्मय- यातील महत्वाचे शब्द आलेले आहेत. शिलालेखात आढळणारे शब्द व प्राकृत शब्दहि या पुरवणींत आलेले आढळतात. याशिवाय याच पुरुषोत्तमदेवानें हारावली नावाचा एक कोश लिहिला असून यात पूर्वीच्या पुरवणी कोशातल्यापेक्षा देखील अधिक महत्वाच्या शब्दाचा संग्रह केलेला आहे हा कोश लिहिण्याला आपणाला १२ वर्षे खपाव लागलें असें पुरुषोत्तमदेव म्हणतो. याचा काळ नक्की ठरविता येत नाहीं, तरी पण महायानपंथाच्या भर- भराटीच्या काळीं हा झाला असावा असें वाटतें.

अनेकार्थवाची शब्दकोशात, शाश्वताचा अनेकार्थसमु- च्चय हा कोश प्राचीन व महत्वाचा आहे या कोशाची रचनाहि प्राचीन तऱ्हेची आहे ज्या शब्दाच्या अर्थाला एक संबंध श्लोक लागेल ते शब्द अगोदर; त्याच्या खालो- खाल अर्धा ओळ ज्याला पुरेल असे शब्द, अशा तऱ्हेची विचित्र माडणी याच्यात आढळते कोशाच्या शेवटीं परिशिष्ट असून अव्ययासंबंधीं एक स्वतन्त्र प्रकरण आहे शाश्वताच्या काळासंबंधीं नक्की काहींच सागता येत नाहीं

शाश्वताच्या खालोखाल दुसरा महत्वाचा कोश म्हटला म्हणजे हलायुधाचा अभिधानरत्नमाला हा होय. हलायुध हा दहाव्या शतकाच्या उत्तरार्धात झाला असावा. हा कोश फार छोटा असून त्याचे ९०० श्लोक आहेत. हलायुधानंतर सुमारें शंभर वर्षांनीं रामानुजाचार्यांचा समकालीन यादवप्रकाश यानें वैजयंती नावाचा एक विस्तृत कोश लिहिला. हलायुधाप्रमाणेंच यादव प्रकाश हा दक्षिणहिंदुस्थानाचा रहिवाशी होता. या वैजयंती कोशात प्रथमतः अक्षराच्या कमी अधिक संख्येप्रमाणें शब्दांची मांडणी केली आहे. नंतर लिंगपद्धतीनें शब्दांची मांडणी केली असून, शिवाय प्रत्येक प्रकरणात अक्षरशिल्पानें क्रम ठेवलेला आहे. हा कोश अत्यंत महत्वाचा आहे यांत पुष्कळच नवीन शब्दांचा भरणा झालेला आढळतो. १२ व्या शतकाच्या पूर्वार्धांत दिगंबर जैन पंथाच्या धनंजय कवीनें नाममाला नावाचा एक कोश लिहिला. १११९मध्यें महेश्वर कवीनें विश्वप्रकाश नावाचा शब्दकोश लिहिला विसाव्या शतकाच्या मध्यभागात मंखक कवीनें अनेकार्थकोश नावाचा सटीक कोश लिहिला. त्यात त्यानें हलायुध, अमरसिंह, शाश्वत, धन्वंतरी याच्या कोशाचा आपण फायदा घेतला असें म्हटलें आहे. कोशात भल्लट नावाच्या काश्मीर कवीचा व हर्षचरिताचा वारवार उल्लेख आलेला आढळतो या कोशात पुष्कळच नवीन शब्दांचा भरणा आलेला आहे हेमचंद्रानें लिहिलेल्या कोशांतहि पुष्कळच महत्व आहे. आपल्या व्याकरणाच्या ग्रंथाच्या पुरवणीखातर त्यानें हे कोश तयार केले अभिधानचिंतामणि नाममाला हा समानार्थ शब्दांचा कोश आहे. या कोशाचे सहा भाग आहेत. पहिला भाग जैनदैवतात्मक असून दुसऱ्या भागात ब्राह्मणधर्मांतील देवता, तिसऱ्या भागात मानुषधर्म, चवथ्यात प्राणी, पाचव्यात पाताळातील प्राणी, सहाव्यात भावनाचक नामें, विशेषणें, अव्ययें इत्यादिकांचा समावेश झाला आहे याशिवाय प्रस्तावनेंत शब्दांच्या जातीसंबधानें विवेचन आलें आहे या कोशावर स्वतःच हेमचंद्रानें टीका लिहिली आहे. त्याबरोबरच या कोशाला परिशिष्टेंहि बरींच आहेत या कोशाला पुरवणीदाखल निघण्टुशेप या नावाचा ३९६ श्लोकाचा वनस्पतिविषयक एक छोटासा कोश हेमचंद्रानें लिहिला अनेकार्थसंग्रह नावाचा हेमचंद्राचा दुसरा कोश आहे याचे सात भाग आहेत. त्यापैकीं पहिल्या सहा भागात, नामें व विशेषणें याचा समावेश असून सातव्या भागात अव्ययांचा संग्रह केला आहे. या कोशातील शब्दरचना पद्धतशीर अतएव फार उपयुक्त अशी आहे या कोशावर महेंद्रसूरी नामक हेमचंद्राच्या शिष्याची विस्तृत टीका आहे.

१२ व्या शतकाच्या अखेरीस अगर १३ व्या शतकाच्या प्रारंभीं केशवस्वामीनें नानार्थार्णवसंक्षेप नावाचा कोश लिहिला. या कोशात शब्दांची मांडणी, अक्षराच्या संख्येच्या क्रमानें, अक्षरक्रमानें व लिंगानुक्रमानें केलेली आहे. चौदाव्या शतकात मेदिनीकार यानें लिहिलेला नानार्थशब्दकोश हा फार प्रसिद्ध कोश आहे. याळाच मेदिनी कोश अगर मेदिनी असं संक्षिप्त नाव आहे. वर सांगितलेल्या निरनिराळ्या कोशांशिवाय एकाक्षर कोश, द्विरूपकोश, त्रिरूपकोश तसेंच वनस्पतिविषयक व ज्योतिषविषयक असे पुष्कळ कोश आहेत. याशिवाय, बौद्ध संस्कृत ग्रंथाच्या स्पष्टीकरणार्थ त्यातील शब्दांचे कोशहि बरेच लिहिले गेले या कोशांपैकीं महाव्युत्पत्तिकोश हा फार प्रसिद्ध आहे. या विस्तृत कोशात बुद्धांचीं सर्व नावें आलीं असून, बुद्धधर्मांतील विशिष्ट संज्ञांचें स्पष्टीकरण आलेलें आहे तसेंच या कोशात शरीराचे अवयव, प्राणी, वनस्पती, रोग, सर्वनामें इत्यादींचा समावेश झालेला आहे प्राकृत कोशांतील सर्वांत प्राचीन कोश म्हणजे धनपालाचा पैयलच्छी नाममाला हा होय हा ९७९ त आर्यांमध्यें रचिलेला आहे. हा कोश ९७२ साली लिहिला गेला. हा कोश धनपालनें आपली धाकटी बहीण सुंदरी इच्यासाठीं लिहिला या कोशाचें नाव नाममाला असें जरी आहे तरी त्यामध्यें क्रियाविशेषणें, धातुसाधितें, अव्ययें इत्यादिकांचा संग्रह झालेला आहे या ग्रंथाचा उपयोग हेमचंद्रानें देशीनाममाला कोशाच्या बाबतींत बराच करून घेतला या देशीनाममाला कोशात अथवा देशी शब्द संग्रहात देशीशब्दांचा संग्रह केला गेला आहे या देशी शब्दांचे हेमचंद्रानें तत्सम, तद्भव, व देश्य असे तीन भाग पाडले आहेत हेमचंद्रानें आपल्या कोशात विशेषत देश्य म्हणजे संस्कृतीशीं ज्याचा कांहीं संबंध नाहीं अशा शब्दांचाच संग्रह केला आहे या दृष्टीनें हा हेमचंद्राचा कोश अत्यंत महत्वाचा आहे. या कोशात त्यानें आपल्या पूर्वी झालेल्या प्राकृत कोशांचा उल्लेख केलेला आहे पण ते प्राकृत कोश सध्या उपलब्ध नाहींत या कोशावर हेमचंद्रानें स्वतःच टीका लिहिली आहे. प्राचीन पाली कोशांपैकीं, मोग्गलान यानें लिहिलेला अभिधानप्पदीपिका हा कोश तेवढा उपलब्ध आहे. हा ग्रंथ १२ व्या शतकाच्या अखेरीस लिहिला गेला असें दिसते हा ग्रंथ श्लोकबद्ध असून अमरकोशाच्या धर्तीवर आहे कांहीं कांहीं ठिकाणीं अमरकोशांतील उताऱ्यांचच बरोबर भाषांतर केलेलें आढळतें अकबराच्या कारकीर्दीत कृष्णदासानें पारसीप्रकाश नावाच्या पारशीसंस्कृत कोश लिहिला शहाजहानच्या कारकीर्दींत वेदांगराय नावाच्या गृहस्थानें ज्योतिषविषयक शब्दांचा पारसीसंस्कृत कोश इ स.१६४३ मध्यें रचिला, त्या कोशाचें नावहि पारसीप्रकाश असेंच आहे. क्षेमेंद्राचा लोकप्रकाश हा ग्रंथ धड कोशहि नाहीं व धड अर्थशास्त्रहि नाहीं या ग्रंथापैकीं कांहीं भागाला कोश ही संज्ञा लावता येईल बाकीचा बहुतेक भाग व्यवहारोपयोगी माहितीनें भरलेला आहे कोश सदृश भाग असलेल्या भागातील शब्द व वस्तु याहि व्यवहारोपयोगी तेवढ्याच संगृहीत केल्या आहेत या कोशात

पारशी व देशी भाषांची खिचडी झालेली आढळते. या ग्रंथात मुसुलमानी नावें आलेली आहेत व शहाबुद्दीन बादशहाचें नाव वारंवार आलेलें आढळतें. कोशाच्या प्रस्तावनेंत क्षेमेंद्र हा आपल्याला व्यासाचा शिष्य म्हणवितो पण व्यास हें व्यासदासाचें संक्षिप्त स्वरूप असावें असें दिसतें. हा व्यासदास म्हणजे ११ व्या शतकातील क्षेमेंद्र होय. या क्षेमेंद्राच्या शिष्यानें क्षेमेंद्राच्या कोशामध्यें आपणास वाटेल तसा फरक करून हा लोकप्रकाश रचिला असावा असें दिसतें. [ विंटरनिट्स ].

म रा ठी.—कोशाची कल्पना इतर वाङ्मयाप्रमाणें आपल्या मराठी वाङ्मयातहि होती इंग्रजी राज्य झाल्यावर मराठी भाषेचा कोश तयार करण्याचें काम सरकारनें अंगावर घेतलें सरकारनें मोलस्वर्थ व मेजर कँडी याची या कामीं नेमणूक केली व त्याच्या मदतीकरता एक शास्त्रीमंडळ दिलें या शास्त्रीमंडळानें एक उत्कृष्ट मराठी कोश तयार केला व त्याच्या आधारें मोलस्वर्थ व कँडी यांनीं इंग्रजीमराठी कोश व मराठीइंग्रजी कोश हे तयार केले हे कोश चांगले झाले आहेत. त्यानंतर रा. रानडे यांनीं इंग्रजी मराठी कोश तयार केला व तो त्याचा प्रयत्न बरा साधला आहे पण चांगल्या लोकाश्रयाच्या अभावीं तो व्हावा तितका चांगला झालेला नाहीं. वासुदेव गोविंद आपटे यांचा शब्दरत्नाकरहि बरा झाला आहे वास्तविक मराठीभाषेचा उत्तम कोश करण्याची आज वेळ आलेली आहे व मोठमोठ्या विद्वानांनीं मिळून हें काम केल्यास मराठी भाषेवर त्याचे उपकार होतील असें म्हणावयास हरकत नाहीं

शालिवाहनाच्या १२व्या शतकापासून १९ व्या शतकापर्यंत मराठी भाषेंत जे कोश झाले आहेत त्यात अत्यंत जुना महानुभाव ग्रंथकारानीं रचलेला मध्यकालीन मराठी शब्दाचा कोश होय. यात जुन्या मध्यकालीन मराठी शब्दांना सुबोध प्रतिशब्द किंवा शब्दसमूह दिलेले आहेत. हा कोश पद्य नसून गद्य आहे. महानुभावाच्या कोशाहून किंचित अलीकडचा असा एक मराठी कोश रा. राजवाडे यास मिळाला आहे. यात ज्ञानेश्वरीतील दुर्बोध म्हणजे मध्यकालीन शब्दाचे अकारविल्यानें मराठी प्रतिशब्द दिले आहेत हा कोश सुमारें ३०० वर्षांचा जुना असून हा दोन चार स्थली याहून प्राचीन मराठी कोशाचा हवाला देतो. [ प्राचीन मराठी कोशाचा हा उल्लेख खरा असावा असें समजण्यास एक प्रमाण आहे. हेमाद्रीच्या रघुवंशाच्या टीकेंत ( नंदर्गीकराच्या रघुवंशाची आवृत्ति पहा ) कित्येक संस्कृत शब्दांना सार्वलौकिक मराठी शब्द देण्याचा प्रयत्न शके ११६० तल्या हेमाद्रीसारख्या मान्य पंडितानें करणें म्हणजे द्वैभाषिक कोश रचण्याची प्रस्तावनाच करणें आहे. ११६० त मराठी प्रौढत्वाप्रत पोंचला होती व त्यावेळीं तींत अनेक ग्रंथ झाले होते. तेव्हां त्याबरोबर कोशरचनाहि होणें स्वाभाविक आहे. शके १२३९ पर्यंत महाराष्ट्रात यादवांचें राज्य होतें, तोंपर्यंतच्या काळात महाराष्ट्रात शुद्ध मराठी व संस्कृत–मराठी असे दोन प्रकारचे कोश झाले असावे असें राजवाडे याचें अनुमान आहे व यापैकीं शुद्ध मराठी कोश महानुभावानीं, नाथपंथीयानीं किंवा हेमाडपंतीच्या आज्ञानुवर्ती ब्राह्मणानीं केले असावेत असा त्याचा तर्क आहे ]

शके १२३९ पासून १५३९ पर्यंत मुसुलमानांचा अंमल होता त्या अवधींत फारशी–मराठी कोश मराठींत निर्माण होऊं लागले त्यातील काहीं प्रकार येणेंप्रमाणें, (१) हेमाडपंताच्या जमाखर्चाच्या पद्धतींची फारशी भाषांतरें हे एक तऱ्हेचे कोशच होत ( २ ) हिंदुमुसुलमानाच्या सामान्य व्यवहारात दळणवळण सुकर होण्यासाठीं केलेले व्यवहारी शब्दाचे कोश; त्यात एक श्लोकबद्ध आहे व दुसरा यादी सारखा आहे (३) वेदांत परिभाषेचा सुफींनी केलेला कोश, यात संस्कृतला प्रतिशब्द फारशी किंवा आरबी दिले आहेत. पुढें मराठी राज्यात पुनः कोशघटना झाली त्यात ( १ ) राज्यव्यवहार कोश ( रघुनाथ पंडित कृत ) हा प्रमुख होय. फाजील शिरलेले फारशी व अरबी शब्द राज्यव्यवहारातून काढून टाकण्यासाठीं याची योजना होती ( २ ) याच वेळेस जमाखर्चांतील फारशी शब्दाना मराठी पेहेराव देण्याचा एक श्लोकबद्ध कोशरूपानें प्रयत्न झाला ( ३ ) अमरकोशाचें मराठी भाषांतरहि झालें. ( ४ ) ज्ञानेश्वरींतील कठिण शब्दांच्या काहीं याद्या याच वेळेस निर्माण झाल्या ( ५ ) पेशव्याच्या व इतर सरदाराच्या दप्तरखान्यांत फारशी, इंग्रजी, कानडी, तामिळ वगैरे भाषांतील शब्दाचे कोश असत. पोर्तुगीज फ्रेंच व इंग्रज यांच्याहि दप्तरखान्यात मराठी शब्दांच्या याद्या असाव्यात. इ. स. १८१० त श्रीरामपुरास कॅरीनें मराठी शब्दांची यादी उर्फ कोश छापला. इ. स. १८२४ त केनडीनें एक मराठी कोश प्रसिद्ध केला. इ. स. १८२९ मध्यें जगन्नाथ शास्त्री क्रमवंतानें एक मराठी कोश प्रतिशब्द देऊन संपविला. १८३१ त मोलस्वर्थचा इंग्रजी मराठी कोश बाहेर पडला. १८४७त कँडी व मोलस्वर्थचा इंग्रजी मराठी कोश प्रकाशला. रघुनाथ भास्कर गोडबोले यानीं हंस कोश १८६३ त मराठी भाषेचा बृहत् कोश १८७० त छापला. १८९१ मध्यें बापट व पंडित यानीं शुद्ध मराठी कोश तयार केला. इंग्रजीमराठी कोश शालोपयोगासाठीं तळेकर, बाबा पदमजी कृत, रानडे याचा इंग्रजीमराठी कोश राजवाडे याचा राष्ट्रीय मराठी कोश अलीकडे प्रसिद्ध झाले आहेत. इत्यादि.

पा श्चा त्य.—पाश्चात्य देशात १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत कोश तयार करण्याच्या कार्याची फार भरभराट झाली. कोश तयार करताना मुख्यतः तीन गोष्टींकडे प्रामुख्यानें लक्ष्य देण्यांत येत असे. पूर्वीच्या कोशात कोशाचें सर्वसामान्य स्वरूप काय असावें इकडे दुर्लक्ष करण्यात येत असे. पण या शतकात, कोशाचें सर्वसाधारण स्वरूप काय असावें यासंबंधीं चर्चा सुरू होऊन त्यासंबंधीं

निश्चित रूपरेषा आंखण्यात आली. त्यानंतर कोशास लागणारें साहित्य कोणत्या तऱ्हेनें मिळवावें,त्यात कशाकशाचा अंतर्भाव व्हावा यासंबंधींचेंहि निश्चित धोरण ठरवण्यात आलें व त्याच्या बरोबर त्याची मांडणीहि कशा पद्धतीची असावी याचेंहि सामान्य स्वरूप आखण्यात आलें. जुन्या कोशामध्यें मुख्यत्वेंकरून त्या भाषेंत त्या त्या काळीं प्रचलित असलेले व वाङ्मयामध्यें नेहमीं येणारे तेवढेच शब्द ग्रथित करण्याची वहिवाट असे. अशाप्रकारचा कोश म्हणजे जॉन्सननें केलेला कोश होय या जान्सनच्या कोशामध्यें तत्कालीन समाजांत व वाङ्मयात रूढ असलेल्या शब्दांचाच संग्रह केला गेला आहे. जान्सननें आखून दिलेली ही कोशाची कल्पना जवळ जवळ एक शतकभर अस्तित्वांत होती. पण त्यानंतर या संकुचित कोशकल्पनेच्या विरुद्ध चळवळ सुरू झाली. १८५७ मध्यें आर्चबिशप ट्रेंचनें फायलालॉजिकल सोसायटीच्या पुढें एक निबंध वाचून त्यात त्या वेळची कोश तयार करण्याची पद्धत किती संकुचित होती हें त्यानें सप्रमाण सिद्ध केलें. या निबंधात तो म्हणतो. 'कोश' या शब्दाचा खरा अर्थ भाषेंतील सर्व शब्द एके ठिकाणीं ग्रथित करणें हा होय. भाषेंतील उपयुक्त शब्दांचाच संग्रह करणें ही कल्पना कोशकारानें आपल्या डोळ्यापुढें ठेवून चालावयाचें नाहीं. उपयुक्त शब्दांचा संग्रह करणें, अगर अनुपयुक्त अशा सर्व शब्दांचा संग्रह करणें एवढेंच कोशकाराचें काम आहे. तो भाषेचा इतिहासकार आहे. अमका शब्द घेणें, तमका शब्द न घेणें हें त्याचें काम नव्हे. ही ट्रेंचची कल्पना जर्मनींत त्याच्या पूर्वीपासूनच प्रचारांत येऊं लागली होती. या ट्रेंचच्या तत्वप्रमाणेंच जर्मनींत जेकब व विल्हेल्म ग्रिम यांनीं कोश तयार करण्यास सुरुवातहि केली होती.

दुसरें एक जें तत्व ट्रेंचनें आपल्या निबंधात ग्रथित केलें होतें तें म्हणजे कोशांत केवळ शब्दाचा अर्थ न देता त्या शब्दाची सांगोपांग माहिती देण्यांत यावी हें होय. पूर्वीच्या कोशांत शब्दाचा ऐतिहासिक दृष्ट्या कसकसा अर्थ बदलत गेला याचें निरूपण करण्यात येत नसे. पण तुलनात्मक भाषाशास्त्राचा उदय झाल्यापासून शब्दाच्या इतिहासाला महत्व प्राप्त होऊं लागलें. व त्या कल्पनेला अनुसरून ट्रेंचनें आपली कल्पना आपल्या निबंधात पुढें मांडली

शब्दाचा इतिहास देण्यांचें तत्व मान्य केलें कीं त्याबरोबर शब्दाच्या निरनिराळ्या अर्थांचीं बोधक अशीं वाक्यें देण्याची पद्धत पाडण्याचें श्रेय डॉक्टर जॉन्सनलाच देणें जरूर आहे. त्यानंतर रिचर्डसननें १८३५-३६ सालीं तयार केलेल्या कोशांत कल्पना विकास पावल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. अशा प्रकारचीं अर्थबोधक वाक्यें उध्दृत केल्यानें विशिष्ट काळीं विशिष्ट शब्दाचा विशिष्ट अर्थ कसा होता हें समजणें फार सुलभ होतें.पण सर्वांत महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजे शब्दाचा धात्वर्थ देणें ही होय. शब्द कसा निर्माण झाला, कोणत्या धातूपासून तो तयार झाला हें सांगितल्याशिवाय शब्दाची माहिती पूर्ण झाली असें म्हणतां येणार नाहीं. या शब्दांच्या उत्पत्तिशास्त्रानें तत्समान अशा शब्दांवर चांगला प्रकाश पडतो. एकाच धातूपासून निरनिराळे शब्द कसे बनले याचें आपल्याला उत्कृष्ट ज्ञान होतें. याशिवाय शब्दाचा उच्चार देणें वगैरे किरकोळ गोष्टीहि कोशात येणें जरूर आहे. पण वर सांगितलेल्या सर्व तत्वांचा समावेश करून त्याबरहुकूम कोश तयार करणें हें अशक्य नसलें तरी अतिशय अवघड काम आहे यांत शंका नाहीं अशा प्रकारचा नमुनेदार कोश अद्यापि कोणत्याहि भाषेंत झाल्याचें दिसून येत नाहीं. शिवाय अशा प्रकारचा कोश तयार करणें एकट्या दुकट्याचें काम नाहीं. त्याला निरनिराळ्या विषयांत पारंगत असलेली अशीं विद्वान मंडळी एकत्र झाली पाहिजेत हल्लीं कोश तयार करतांना निरनिराळे विद्वान नेमण्यात येतात व अशी पद्धत अमलांत येणें अगदीं स्वाभाविकच आहे.

अशा प्रकारच्या तत्वाबरहुकूम तयार झालेला कोश म्हणजे ऑक्सफोर्ड न्यू इंग्लिश डिक्शनरी होय हा कोश तयार करण्याची कल्पना ट्रेंचच्या निबंधावरून उदयास आली व त्याप्रमाणें कोश तयार करण्याचें काम सुरू झालें. हर्बर्ट कॉलेरिज याला मुख्य संपादक नेमण्यात आलें हर्बर्ट कॉलेरिज हा १८६१ सालीं वारला. त्याच्यानंतर मुख्य संपादकाच्या जागीं डॉ फर्निव्हल याची नेमणूक झाली. १८७८ पर्यंत या संपादकीय मंडळाकडून२०,००,००० अर्थबोधक वाक्यें गोळा करण्यापलीकडे कांहींच झालें नाहीं. पुढें १८७८ सालीं ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटीनें हा कोश प्रसिद्ध करण्याचें काम अंगावर घेऊन डॉ मरे याच्याकडे तें काम सोंपविण्यात आलें. १२ व्या शतकानंतरचे जे जे शब्द असतील ते सर्व या कोशात ग्रथित करावयाचे असें ठरविण्यात आलें. या कोशाचे दहा विभाग करावयाचे असें ठरलें, व त्याप्रमाणें १८८४ मध्यें या कोशाचा पहिला विभाग प्रसिद्ध झाला.

या कोशाइतका जवळ जवळ पूर्णतेस पावलेला दुसरा कोश नाहीं असें म्हटलें असता वावगें होणार नाहीं. जर्मनीमध्यें जेकब आणि विल्हेल्म ग्रिम यांनीं जो कोश तयार केला तो देखील न्यू इंग्लिश डिक्शनरीप्रमाणेंच नमुनेदार झाला आहे. तरी पण न्यू इंग्लिश डिक्शनरीपेक्षां यांत अधिक दोष आहेत. उदाहरणार्थ, या जर्मन डिक्शनरींत शब्दाचे उच्चार दिलेले नाहींत व व्युत्पत्तीसंबंधानें बिलकूल माहिती दिलेली आढळत नाहीं. अर्थबोधक वाक्यें उत्कृष्ट प्रकारचीं नाहींत व एकंदर कोशाची रचनाहि जितकी व्यवस्थित असावी तितकी नाहीं.फ्रेंच भाषेंतील लिट्रे यानें तयार केलेला कोश जर्मनीमधील कोशापेक्षा अनेक बाबतींत अपूर्ण आहे. पण एकट्यानें तयार केलेला कोश या नात्यानें त्याचें महत्व आहे. बर्लिन,

गॉटिंजन, लैप्झिक, म्यूनिच व व्हिएना या विद्यापीठाच्या देखरेखीखाली तयार झालेला 'थेसारस लिंग्वा लॅटिना' हा महत्वाचा कोश आहे. यात दुसऱ्या शतकापर्यंत सर्व लॅटिन ग्रंथकाराच्या ग्रंथांतील प्रत्येक शब्द व त्याचीं अर्थबोधक वाक्यें उद्धृत केलीं आहेत. त्याचप्रमाणें दुसऱ्या शतकापासून तो सातव्या शतकापर्यंतच्या सर्व लॅटिन ग्रंथातील वचनें उध्दृत करण्यात आलीं आहेत. हे सर्व कोश तयार करताना कोशकारांनीं आपल्यापुढें लोकांची गरज व त्याचबरोबर विद्वानांचीहि गरज भागविण्याचें ध्येय ठेवलें होतें या दृष्टीनें कोशाचा विकास ज्ञानकोशात होऊं लागला अशा प्रकारें कोश व ज्ञान कोश या दोनहि प्रकाराचें संमिश्रण पिरे लरौसे याच्या 'ग्रँड डिक्शनेएर युनिव्हर्सेल डु सियेक्ले' यामध्य सापडतें या कोशाचे १५ भाग प्रसिद्ध झाले. अशाच प्रकारचा इंग्लिश भाषेंतील प्रयत्न म्हणजे सेंचरी डिक्शनरी हा होय हा कोश अमेरिकेंत डॉ. व्हिटनें याच्या देखरेखीखाली तयार झाला याचे सहा भाग असून ते १८८९-१८९१ सालात प्रसिद्ध झाले यात न्यूइंग्लिश डिक्शनरीपेक्षा देखील, शब्दाचे अधिक बरोबर अर्थ दिले आहेत

चिनी.--या भाषेंत कोशाचा सुकाळ आहे 'स्वोवन' हा ड्रशीन याचा कोश सर्वांत जुना असून खि. श. १५० मध्यें लिहिलेला आहे. त्यानंतर १३०० मध्यें कु ये वँग यान यू पीन नावाचा एक कोश तयार केला. पी वन यव फू हा प्रचंड कोश हन लिन या विद्यापीठाच्या ६६ विद्वानानीं मिळून लिहिला. यात अर्थबोधक वचनाची रेलचेल आहे या कोशाचें इंग्लिश भाषेंत भाषांतर करावयाचें म्हटल्यास अष्टपत्री १००० पानाचे ४० भाग काढावे लागतील. हा कोश १७११ मध्यें प्रसिद्ध झाला. त्यानंतर १७१६ मध्यें, हन लिन विद्यापिठाच्या तीस विद्वानानी मिळून कांघी से तीन हा कोश तयार केला व त्याला स्वतः कांघी बादशहानेंच प्रस्तावना लिहिली आहे. हा कोश अद्यापि चीनमध्यें प्रमाणभूत मानला जातो.

**कोशिंब**--या झाडास लॅटिनमध्यें श्लेचेरा ट्रिजुगा, मराठींत कोशिंब, लाखेचें झाड, हिंदींत कोसुंबा; संस्कृतमध्यें कोशाम, लाक्षावृक्ष इत्यादि नांवें आहेत हिंदुस्थानच्या बऱ्याच प्रदेशात, ब्रह्मदेशामध्यें व सिलोनमध्यें हें एक मोठें झाड आहे. बंगालप्रांतात व विशेषतः छोटानागपुर भागांत हीं झाडें पुष्कळ आढळतात. परंतु आसामांत हीं झाडें नाहींत. या झाडांपासून उत्पन्न होणारा अतिशय मौल्यवान पदार्थ म्हटला म्हणजे याच्या बियाचें तेल होय. हें तेल खाण्याकरिता व दिव्याकरिता वापरतात. केसाना लावण्याच्या कामीं व देशी औषधांत देखील याचा उपयोग करतात. या तेलाच्या अंगीं केसाना साफ करून त्यांची वाढ करण्याचा उत्कृष्ट गुण आहे असें म्हणतात, व हें मूळचें मॅकासार तेल आहे अशीहि समजूत आहे. अलिकडे याच्या बियांस परदेशाहून फार मागणी आहे. परंतु याचा व्यापाराच्या कामीं उपयोग होत असल्यामुळें बंगालांतील लोक दुष्काळांत या झाडांचीं फळें व्यापारापेक्षा खाण्याकरिताच गोळा करितात. व हें फारसें निर्गत होत नाहीं. या झाडाच्या कोंवळ्या फांद्यावर लाखेच्या किड्यापासून पुष्कळ लाख उत्पन्न होते. मध्य प्रांतातील रायपुर व बिलासपुर जिल्ह्यात हें लाख उत्पन्न करणारें झाड म्हणून फार प्रसिद्ध आहे. याचें लाकूड कठिण, मजबूत व टिकाऊ असून याचीं मुसळें, गाड्यांचीं चाकें, आस, नांगर, साखरेच्या व तेलाच्या घाण्यांच्या व कापसाच्या रेच्याच्या लाटा देखील बनवितात. [ वॅट ]

**कोशी** ( कुशी )—उत्तरबंगाल व नेपाळमधील एक नदी. पूर्वनेपाळमधून जी हिमालयाची रांग गेली आहे तेथें सप्तकौशिकी नावानें प्रसिद्ध असलेला एक प्रदेश आहे. या प्रदेशात ही नदी उगम पावते नंतर ती नैर्ऋत्येस ६० मैल वहात गेल्यावर पुढें १६० मैलपर्यंत ती दक्षिणेस व आग्नेयीस वहात गेली आहे दक्षिणेस व आग्नेयीस वहात असताना तिला अरन व तावर या दोन नद्या मिळाल्या आहेत. चत्रा पर्वतातून ती वहात असता तिचे अनेक धबधबे झाले आहेत अशाच रीतीनें ती दक्षिणवाहिनी होऊन वहात असता भागलपूर जिल्ह्याच्या ईशान्येकडील प्रदेशात तिचा संचार झाला आहे या ठिकाणीं तिचें पात्र एक मैल रुंद आहे नंतर ती अनेक ठिकाणी वळणें घेत घेत, वाटेंत घोमा नदीला आपल्या पोटात घेऊन, शेवटीं पुर्निया जिल्ह्यात ती गंगेला जाऊन मिळाली आहे. बंगालमध्यें ही जवळ जवळ ८४ मैल वहात गेली आहे.

गाधी देशाचा राजा कुशिक याची ही कौशिकी नावाची मुलगी होय अशी पुराणातरी कथा आहे. या कौशिकीचा एका ब्राह्मणपुत्राशीं विवाह झाला त्याच्यापासून तिला मुलगा झाला.नंतर तिला नदीचें स्वरूप प्राप्त झालें अशी कथा आहे या नदीचा प्रवाह फार वेगाचा असून ती क्षणोक्षणीं आपले प्रवाह बदलते व त्यामुळें ती फार घातकी नदी आहे अशी तिची बंगालमध्यें प्रसिद्धि आहे. हिला ज्या वेळी पूर येतो त्यावेळीं ती आसपासचा प्रदेश उध्वस्त करून टाकते. अशा रीतीनें भागलपूर जिल्ह्याच्या मधेपूर पोटजिल्ह्याचा बराचसा भाग तिनें उध्वस्त करून टाकला आहे. १८ व्या शतकात ती पुर्निया शहराच्या जवळून जात असे पण पुढें तिचा प्रवाह बदलून तो बराच पश्चिमेकडे गेलेला आहे. पुर्नियाच्या प्रदेशाच्यामधून नदी वहात गेली असता त्या ठिकाणीं तिच्यामधून नावा चालतात पण त्यादेशील मोठ्या मुष्किलीनें चालतात. याचें कारण ती नेहमी आपला प्रवाह बदलत असते. शिवाय तिचा प्रवाह फार मोठाचा असल्यानें देखील तिच्यातून होडी नेणें फार धोक्याचें असतें. हल्लीं फार्बेहार जवळ या नदीवर एक मोठा पूल बांधण्यात आलेला आहे व शिवाय बेत्रा घाटापासून तो दब्बाघाटपर्यंत नावाहि सुरू आहेत

**काशी**—संयुक्त संस्थानातील मथुरा जिल्ह्याच्या छाट तहशिलींतील एक गाव आहे. ते दिल्लीच्या मार्गावर है

गांव वसलेलें आहे इ स.१९११मध्यें याची लोकसंख्या ७१८८ होती. येथें एक सुंदर धर्मशाळा असून ती अकबराच्या कारकीर्दीत ख्वाजा इनिवारखान नावाच्या सुभेदारानें बांधलें असें म्हणतात. इ. स. १८५७ च्या बंडांत मथुरा जिल्ह्याचे अधिकारी या ठिकाणीं दडून राहिले होते पण ही गोष्ट शत्रुसैन्याला समजल्यामुळें त्यांना तेथून पळ काढावा लागला. या ठिकाणीं एक दवाखाना व बॅप्टिस्ट लोकांची एक मिशनरी संस्था आहे. हें गांव खोलांत वसलेलें असून याच्या आसपास पाण्यचीं डबकीं आहेत. त्यांतलि पाणी संथ व वाईट असल्यामुळें रहिवाश्यांच्या प्रकृतीवर त्याचा परिणाम घातुक होतो. येथें हल्लीं एक चांगलें सर्व बाधण्यांत आलें आहे.इ. स.१८६७साली या गावाला म्युनीसिपालिटीचे हक्क देण्यांत आले. येथून धान्य व कापूस मथुरा जिल्ह्यांत जातो.येथें कापसाच्या सद्दा गिरण्या आहेत. हें गांव विशेषतः गुराच्या व्यापाराबद्दल प्रसिद्ध आहे. येथें दरवर्षी १०,००० गुरांची विक्री होते. येथें चार पाच शाळा आहेत.

**कोष्टी**—या जातीची मोठी वस्ती वऱ्हाड-मध्यप्रांतांत आहे. तेथील मराठी व तेलगू कोष्टी नागपूर व छत्तीसगडांत रहातात. यांची संख्या ( १९११ ) १,५४,९९९ आहे. तेलगू कोष्ट्यास सालेवार म्हणतात. हे मार्कंडेय ऋषीस आपल्या धंद्याचे ऋषि समजतात.कारण या ऋषीनें कमलतंतूपासून कपडे तयार करून देवास दिले. यास सूर्याची मुलगी दिली होती. तिजबरोबर भवानी नावाचा राक्षस व एक वाघ आंदण दिला होता. राक्षस फार उन्मत्त झाल्यामुळें ऋषीनें त्यास मारलें. पण वाघ अगदीं आज्ञाधारक होता. राक्षसाच्या हाडांपासून ऋषीनें कपडे विणण्याचें सामान तयार केलें अशी आख्यायिका हे लोक आपल्या प्राचीनत्वाबद्दल सांगतात.कोष्टी लोकांची वाघावर फार भक्ति आहे. आजपर्यंत वाघानें एक देखील कोष्टी मारला नाहीं. वाघ यास भेटला तर हे मार्कंडेयाच्या स्मरणानें त्याचा शक्तिपात करतात. तेव्हां तो निमूटपणें आपल्या वाटेनें जातो अशी याची समजूत आहे लग्नप्रसंगीं हे वाघाची मूर्ति संनिध ठेवतात.

यांच्यातील उपजातींचे निरनिराळे प्रकार आहेत ते हळबी, लाड, कोष्टी, गधेवाल, देशकर, देवंग, पटवी, इत्यादि होत, आकुले हे गोलक संततीचे आहेत. पूर्वींचे जैन कोष्टी हे आता हिंदू झाले आहेत. साळेवारांत सूतसाळे व पद्मसाळे असे दोन वर्ग आहेत. सगुणसाळे वर्ग हा गोलक आहे.

नागपुराकडे लग्नात वधूवराभोंवती सणाचा दोरा सातदां गुंडाळतात. वधूची आई वरास ओंवाळते व वराची आई जमीनीवर पाणी टाकते साळेवारांत लग्न वराच्या घरीं होतें वधूस मध्यरात्रीं आणतात. विणकामांतील एका लांकडावर वरानें उजवा व वधूनें डावा पाय ठेवतात व त्याच्यावर कापडें गुंडाळतात. मध्यें अंतरपाट धरतात. वधूवर एकमेकांवर पांचदां अक्षता टाकतात व मग दोघे त्या लांकडावर बसतात, म्हणजे लग्नविधि आटपला. विधवांना लग्न करण्यास परवानगी आहे. यांच्यांत विधवा बापाकडे रहात असली तर त्यास ४० रुपये हुंडा द्यावा लागतो. तिच्या पुनर्विवाहाच्या दिवशीं तिची ओटी नवरा नारळानें भरतो व तिला कुंकू लावतो. रात्रीं ती नवऱ्याकडे जाते त्याला ती ओटी देते व त्याच्या पायां पडते. हे लोक होताहोईतोंपर्यंत घटस्फोट करीत नाहींत. जितक्या बायका त्यास मिळतील तितक्या त्यास हव्याच असतात. हे कधीं कधीं बायका चोरतात, विकतात व गहाणसुद्धां टाकतात लिंगायत व कबीरपंथी लोक प्रेतें पुरतात, इतर दहन करतात. ५ व्या दिवशीं विधवेच्या बांगड्या फोडून कुंकू पुसतात. मयताच्या मुलग वारसाच्या डोक्यास ५ व्या दिवशीं जातीचे पंच पागोटें घालतात हे लोक श्राद्ध करीत नाहींत. अक्षयतृतीयेला पितरांस बोलावतात व त्यास विचारतात कीं तुम्ही माझे कोण आहात ? तो सांगतो कीं मी तुझा आजा किंवा पणजा आहे. अशा रीतीनें पितरांस बोलावून जेवण घालतात गणपति हा यांचा मुख्य देव आहे कबीरपंथी कोष्ट्याचा स्वतंत्र पुरोहित असतो. गुरुमुखी म्हणून नागपूरच्या कोष्ट्यांत एक पंथ आहे ते भाणेवाड्याचे कोळीबाबाचे शिष्य आहेत हे आपल्या गुरूच्या नावानें घरीं एक नारळ ठेऊन त्याची पूजा करतात. हे आपल्या विणण्याच्या धंद्यास पवित्र समजतात. विटाळशा बायका त्यास शिवत नाहींत यांपैकीं कांहीं लोक मद्यमांस खातात व कांहीं खात नाहींत हे लोक ब्राह्मणांस पौरोहित्य देतात. डाक्याची मलमल विणणारे कोष्टीलोक अपवित्र समजले जात नाहींत. ब्राह्मण त्यांच्या हातचें पाणी पितात. नागपूरच्या भागांत हे फार चांगले कपडे विणतात धोतरें व लुगडीं यांची नागपुरास प्रसिद्धि आहे. गिरण्यांमुळें यांची स्थिति फार खालावली आहे. महाराष्ट्रीय व कर्नाटकी कोष्ट्यांची माहिती ' देवांग ' या लेखांत सांपडेल. [ रसेल व हिरालाल एन्थोवेन ]

**कोष्ठ**—या वनस्पतीस लॅटिनमध्यें सोस्सुरिआलाप्पा व भरतखंडांत कुट, पाचक, कोष्टम इत्यादि नांवें आढळतात. ही काश्मीरच्या दरीच्या उतरणीवर ८००० ते ९००० फूट उंचीवर होते. झेलम व चिनाब यांच्या दोन्हींतहि ही आढळते.

**पुरातन माहिती**—प्राचीन काळापासून कोष्ठाच्या मुळ्यांची औषधी गुणाबद्दल फार ख्याति आहे, परंतु बराच काळपर्यंत याच्या उत्पत्तीची माहिती नव्हती; व म्हणून चुकीनें कोस्टस स्पेसिओससशीं याचा संबंध जोडीत असत. याच्या मुळ्यांचे काप काढून कलकत्ता व मुंबई बंदरांत व तेथून चीन, तायवान समुद्र वगैरेकडे पाठवितात. औषधाशिवाय या मुळ्याचा अत्तर काढण्याकडे व केसांचा कलप करण्याकडे उपयोग होतो

**कोस**—हिंदुस्थानांत रस्ता मोजणीचें माप फार प्राचीन काळापासून प्रचारांत आहे. मेगस्थि

काळींहि कोस उपयोगांत होता. हल्लींप्रमाणें रस्त्याच्या कडेला हे कोसांचे दगड पुरलेले असत. रोमन स्टेडिआ व कोस यांचें प्रमाण म्हणजे २० स्टेडिआबरोबर एक कोस होय. मोंगल राज्यांतहि हेंच कोसाचें मोजमाप होतें. चंद्रगुप्ताच्या काळीं प्रत्येक अर्ध्या कोसावर एक एक दगड पुरीत; परंतु मोंगली राज्यांत दरेक कोसास एक दगड असे. मोंगल कोस म्हणजे इंग्रजी ४५५८ यार्ड होत. अशोकाच्या ८ व्या शिलाशासनांतील "अडकोसिक्य" याचा अर्थ फ्लीट आठ कोस धरितो; परंतु पुष्कळांच्या मतें अड म्हणजे अर्धा असा अर्थ होतो. स्टेडियाचेहि तीन प्रकार (६५०, ६०० व ५२० इंग्रजी फूट) पहिल्या खि. शतकांत होते. पेरिप्लसच्या वेळीं एक स्टेडिआ म्हणजे हल्लींचा एकदशांश इंग्रजी मैल असावा. चंद्रगुप्ताच्याहि आधींपासून कोस हें माप हिंदुस्थानांत प्रचलित होतें एवढें नक्की होय. [ स्ट्राबो. १५. २; इलियट; ज. रा. ए. स. १९०५; शॉफ-पेरिप्लस. ५८ ]

**कोसगी**—हैद्राबाद संस्थानांतील गुलबर्गा जिल्ह्यामध्यें सर सालरजंगच्या घराण्याकडे जी जहागिरी आहे त्या जहागिरीचें मुख्य ठिकाण. याची लोकसंख्या १९०१ सालीं ८२२८ होती. या ठिकाणीं एक पोलीस ठाणें, एक दवाखाना व एक सरकारी शाळा आहे. या ठिकाणीं सुमारें दीड हजार माग असून सुती व रेशमी लुगडीं मोठ्या प्रमाणावर तयार होतात.

**कोसम**—संयुक्त प्रांतांतील अलाहाबाद जिल्ह्याच्या मंझनपूर तहशिलींतील एक खेडेंगाव. वास्तविक हें गाव कोसम इनाम व कोसम खिराज या दोन छोट्या खेड्यांचें मिळून बनलेलें आहे. हें गाव यमुना नदीच्या कांठीं वसलेलें आहे. १९०१ मध्यें याची लोकसंख्या २३७४ होती. प्राचीन हिंदुस्थानांत प्रसिद्धीस आलेलें कौशाम्बी नगर हें या खेडेगावाच्या खालीं पुरलें गेलें असावें असें तज्ज्ञांचें मत होतें. पण हुएनसंगाचें म्हणणें गृहीत धरल्यास कौशाम्बी हें कोसमच्या नैर्ऋत्येस थोडक्या अंतरावर होतें असें मानावें लागतें कोसम येथें जे अवशेष सापडले आहेत त्यावरून पूर्वी तेथें चार मैलांचा घेर असलेला व ३०।३५ फूट उंचीवर बांधला गेलेला असा एक तटबंदी किल्ला असावा असें दिसतें. येथें एक एकसंधि, असा मोठा दगड असून त्यावर यात्रेकरूंनीं लिहिलेले ५।६ व्या शतकांतील शिलालेख आढळतात. १५६४ मधील एक शिलालेख येथें आढळतो. त्यांत कौशाम्बी या नांवाचा उल्लेख आलेला आहे. या खेड्याच्या आसपास दगडी मूर्ति, नाणीं इत्यादि सांपडलेलीं आहेत व तेथील नाण्यामध्यें अगदीं अर्वाचीन नाणीं देखील सांपडलेलीं आहेत. यांपैकीं कांहीं नाण्यावर पहिल्या दुसऱ्या शतकांतील राजांचीं नांवें आढळून येतात. या खिड्याच्या वायव्येस तीन मैलांवर पभोसा नांवाची एक टेकडी असून तेथें लेणीं आहेत, या शिलालेख सापडलेले आहेत.

**कोसल**—याचा उल्लेख वैदिकवाङ्मयांत येतो. (ज्ञानकोश विभाग ३ पृष्ठ २१० पहा) कोसल या या नांवाचे दोन देश प्राचीनकाळीं प्रख्यात होते; एक उत्तरकोसल व दुसरा दक्षिणकोसल. उत्तरकोसल हा फार प्राचीन होता. तो म्हणजे हल्लींचा घोगरानदीच्या उत्तरेकडील अयोध्याप्रांत होय. जैन, बौद्ध व ब्राह्मण या तिन्ही वाङ्मयांत या कोसलाचा उल्लेख येतो. रामायणाच्या पूर्वीपासून हा देश प्रख्यात आहे. कोसलराजकन्या कौसल्या ही रामाची आई होय वायुपुराणावरून लवानें या प्रदेशावर राज्य केलें असल्याचें ठरतें. बौद्धवाङ्मयांत येथील राजांची सत्ता कपिलवस्तूवरहि होती असें म्हटलें आहे. त्यांत कोसल व मगध यांचा नेहमीं संबंध येतो. या प्रदेशांतच बुद्धाचें पूर्वचरित्र झालें व तेथेंच त्यानें आपल्या धर्माची ध्वजा प्रथम फडकविली. पौराणिक काळांत काशीच्या राज्याची प्रसिद्धि होती. परंतु, त्यानंतर ऐतिहासिक काळाच्या प्रारंभींच कोसलच्या राज्याच्या ख्यातीस (खि. पू. ६ वें शतक) सुरुवात झाली. त्या वेळीं साऱ्या उत्तरहिंदुस्थानांत कोसलाचेंच राज्य महत्वाचें होतें. या कोसलची राजधानी श्रावस्ति होय. ही नेपाळांत हिमालयाच्या पायथ्याशीं होती हुएनसंग याच्या मतानें व फाहियान याच्या तर्कावरून हल्लींचें साहेट माहेट (हल्लींच्या उत्तर अयोध्या प्रांतांतील गोंड बहिरच जिल्ह्याच्या सरहद्दीवरील गाव) हीच पूर्वीची श्रावस्ती होय असें म्हणतात. ही राप्ती (रावती) नदीच्या कांठीं आहे. महाभारतांत सभापर्वांत उत्तरकोसल देश भीमानें जिंकल्याचा उल्लेख आहे. इक्ष्वाकु(सूर्यवंशी)चा आठवा पुरुष (वंशज) श्रावस्त यानें श्रावस्ती स्थापिली. अश्वमेधपर्वांत कोसलाचें नाव आलें आहे. वराहमिहिरानेंहि कोसल (फक्त एकच) उल्लेखिला आहे. कालिदासानें अयोध्येस उत्तरकोसलाची राजधानी म्हटलें आहे. वर दिलेल्या साहेटमाहेट येथें बनिगर्हमला एक बुद्धाचा पुतळा आढळला. त्यावरील लेखांत श्रावस्ती अशीं अक्षरें होतीं. त्यावरून हेंच गाव श्रावस्ती असें ठरलें. येथें जुने अवशेष पुष्कळ आहेत. हुएनसंगच्या वेळीं हें मोडकळीस आलेलें शहर रामाच्याहि पूर्वीचें आहे. बुद्धाच्या वेळीं ही प्रसेनजित् राजाची राजधानी होती. बुद्धाच्या बऱ्याच कथा या प्रांतांत घडलेल्या आहेत. बिंबिसार राजाची राणी कोसलराजकन्या होती. बुद्धानंतर ५ शतकें या शहराचा इतिहास सांपडत नाहीं. तदनंतरचा तेथील विक्रमादित्य नांवाचा एक राजा बौद्धधर्मद्वेष्टा म्हणून प्रख्यात आहे. याचा काल (अजमासें) इ. स. १०० चा आहे. नंतर तिसऱ्या व चवथ्या शतकांतील सिरपार राजे यांचीं नावें आढळतात. परंतु हे स्वतंत्र नसून गुप्तांचे (मगधच्या) मांडलिक असावेत. तदनंतर श्रावस्तीचें महत्त्व कमी झालें. फाहिआनच्या वेळीं येथें फक्त २०० घरें होतीं. याचीं सेट, सेवट, सावत्थी, साहेट, सावित्री अशीं निरनिराळीं नांवें आहेत. हल्लीं येथें जंगल आहे. हुएनसंगानें या कोसलराज्याचा

घेर ३३४ कोस सांगितला होता. यावरून हा दक्षिणउत्तर घोगरा, हिमालय व पश्चिमपूर्व कर्णाला, धवलगिरीपर्यंतचा प्रदेश होय. चंद्रगुप्त मौर्यानें हा देश जिंकिला होता कांहीं ठिकाणीं इंद्रप्रस्थ मध्य धरून पूर्वकोसलाचेहि ईशान्य कोसल व आग्नेय कोसल असे दोन पोटभाग होते असा उल्लेख येतो. ब्राह्मणकाळीं व महाभारतकाळीं सूर्यवंशी क्षत्रियांचीं राज्यें हिंदुस्थानांत फक्त पूर्वेस होतीं त्यापैकींच कोसल-विदेह हें एक होय ब्राह्मणग्रंथांत याचा उल्लेख अभिमानपूर्वक येतो. कुरुपांचालाहून हे लोक भिन्न होते हे तत्वज्ञानी होते. ग्रीयर्सन व मॅक्डोनेल याच्या मतें याची भाषा जवळ जवळ पंजाबी भाषेसारखी असून ते सूर्यवंशी क्षत्रिय होते.

आतां दक्षिण कोसल म्हणून दुसरा एक प्रांत आहे,त्याची माहिती अशी —हा महानदीच्या खोऱ्यांत, गोदावरी व महानदी यांच्यामधील पूर्वेकडील (हल्लींचा छोटानागपूर) प्रांत होय. रामायण, महाभारत यांतहि या दक्षिण कोसलाचा उल्लेख येतो रामानें कुशाला (रामाचा पुत्र) हे राज्य दिलें होतें व त्याची राजधानी कुशावती ही या प्रांतात विन्ध्यतटेप्रांतीं होती. महाभारतांत दक्षिणापथांत सहदेव विजयांत या कोसलाचा उल्लेख आहे. रत्नावली नाटकांत व ह्युएनत्संगाच्या वर्णनांतहि याची राजधानी मणिपूर होती असें एकेठिकाणीं म्हटलें आहे. हा प्रांत समुद्रगुप्तानें जिंकिला होता, त्यावेळीं येथील राजा महेंद्र नांवाचा होता. कांहींच्या मतें हल्लींचा छत्तीसगड, अमरकंटक व काकर हा प्रांत म्हणजे दक्षिणकोसल होय. यांतच गाजिमहाना नगरी होती असें म्हणतात.

या प्राचीन दक्षिण कोसलाचे प्राचीन राजे हैहय होत. हे सहस्रार्जुनाचे वंशज होते. ते रामायणकालीन होते. यांचीं व अयोध्येच्या सगर राजाचीं युद्धें झालेलीं आहेत. या हैहयांना कांहीं ( विशेषतः परकीय ) इतिहासकार हय नांवाचे बाह्य शक समजतात. परंतु तें खोटें आहे असें रा. वैद्य म्हणतात.हे शुद्ध सोमवंशीय क्षत्रिय होते.ह्युएनत्संगहि त्यांना स्पष्ट क्षत्रियच म्हणतो. ते उंच व रंगानें काळे होते सोमवंशांतील बहुतेक लोक काळे ( श्रीकृष्णासारखे ) असत. या हैहयांचीं दोन मोठीं राज्यें होतीं. एक मणीपूरचें महाकोसलाचें व दुसरें त्रिपूरचें चेदीचें. त्रिपूरचे राजे कलचुरी हैहय होते. त्यांनीं पुढें शिशुपालाच्या चेदी वंशाचें राज्य जिंकल्यामुळें त्यांना चेदी असें म्हणूं लागले वास्तविक ते कलचुरी हैहय होत पुढें चेदी राज्यांतील प्रख्यात किल्ला कलिंजर हा त्यांनीं जिंकल्यामुळें यांना ' कलिंजरपुरवराधीश्वर ' म्हणत. यांचा उल्लेख ह्युएनत्संगनें महाकोसलासारखा स्पष्ट केला नाहीं. बाली जिल्ह्यांतील हैहय रजपूत हे सोमवंशी व रंगानें काळे असून मध्यप्रांतांतील साऱ्या क्षत्रियांत त्यांचा दर्जा पहिल्या प्रतीचा आहे. रतनपूर येथें या हैहयांची राजधानी- बऱ्याच कालापासून होती. हीच बहुधा ह्युएनत्संगनें पाहिली असावी मंडलाच्या ताम्रपटावरून रतनपूरच्या राजाचें राज्य छत्तीसगडावर इ. स १४४ पासून सुरू होतें तें अठराव्या शतकापर्यंत( मराठ्यांच्या मुलुखगिरीपर्यंत )अव्याहत होतें. जबलपूरच्या ताम्रपटांत येथील कांहीं राजांचीं नांवें येतात त्यांच्यांत प्रख्यात असा पहिला कोकल्लदेव होऊन गेला. त्याच्या आधीचे छत्तीसगडचे हे हैहय बौद्धधर्मी होते ह्युएनचा राजा बौद्धधर्मी होता सुप्रसिद्ध बौद्धधर्माचार्य नागार्जुन या कोसलदेशचा होता. सारांश हर्षाच्या आधीं व नंतरहि कोसलांत बौद्धधर्म प्रचलित होता. आठव्या शतकांत येथें धर्मक्रांति होऊन बौद्धधर्माचें उच्चाटन झालें. या हैहय घराण्यांतील राजाच्या वंशावळी बिनचूक सापडत नाहींत. कोकल्ल हा सनातनधर्मी होता. त्रिपूरचे चेदी उर्फ कलचुरी हैहय यांनीं आपला स्वतःचा एक शक इ. स २४८ च्या सप्टेंबरच्या पांचव्या तारखेस सुरू केला हैहयांचीं हीं राज्यें पर्वतांनीं वेष्टित असल्यामुळें एक हजार वर्षें बिनधोक टिकलीं होतीं. त्यांना पहिला व शेवटचा तडाखा मराठ्यांनीं दिला.त्यांच्या बखरी साधारण सापडतात,परंतु त्यांत खरी माहिती थोडीच असते.

छत्तीसगड प्रांत म्हणजे महाकोसल या छत्तीसगडांत एक एक गड असलेले ३६ भाग आहेत. त्यांत पुढील चार भाग मुख्य आहेत ( १ )शिवनाथ नदीचें खोरें, (२) हसदा नदीचें खोरें, ( ३ ) महा नदीचें खोरें व ( ४ )रायपूर प्रांत. येथील मुख्य धान्यें तांदूळ,गहू,कडधान्य व गळिताचीं धान्यें होत.जंगलांत वाघ,डुकर व रेडे फार आहेत,बंगालच्या बाजूस हत्तीहि पुष्कळ आहेत जंगलांत गोंड, भुम्ये व आधीग हे रानटी लोक राहतात. हे घाटावरील लोकांत मिसळत नाहींत घाटावर बहुतेक चांभार लोक असून ते शेतकी करतात यांचा धर्म सतनामी आहे. याशिवाय ब्राह्मण, रजपूत कूर्मी व राऊत या येथील प्रमुख जाती आहेत. या प्रांतांत आगगाडी फार थोडी आहे. पूर्वी इकडे प्रांत सुपीक असल्यानें अतोनात धान्य पिकें व वाहतुकीचे रस्ते कमी असल्यानें तें तेथेंच पडून कुजे. त्यावेळीं वाहतुक वंजारी लोक करीत असत

पूर्वी येथें ( बखरीच्या माहितीवरून ) सत्याग नांवाच्या हैहय राजा होता त्याच्या नंतर सुग्रराजा झाला. त्याला तीन पुत्र होते. त्यानें तिघांना आपलें राज्य माहिष्मती (मांडला ), चंद्रपुर ( चांदा ), मणिपुर ( रतनपुर ) याप्रमाणें वांटून दिलें रतनपुर म्हणजेच छत्तीसगड. येथील हैहय राजा कर्णपाल यानें स ११५–१९४ पर्यंत राज्य करून व अमरकंटक येथें शहर वसवून देवळें बांधिलीं स. ३०० च्या सुमारास मदनपाल नांवाच्या राजानें अमरकंटकाजवळ धनपुर शहर व अजमीर किल्ला बांधला. व किल्ल्याचे अवशेष अजून आहेत पुढें आठव्या शतकांत सुरदेव व महादेव या भावांनीं हें राज्य वांटून घेतलें रतनपुरची थोरली पाती व रायपुरची धाकटी पाती होय. बिलासपुर सुरगुजाव, संबळपुर येथील संस्थानिक रतनपूरचे मांडलिक

असून रायपुरचे मांडलिक वस्तर व कंकरचे राजे आहेत मराठ्याच्या स्वाऱ्यापर्यंत हीच परिस्थिति होती.

मणिपुर हें ( जुनी राजधानी ) रतनपुरचे उत्तरेस ७॥ कोसावर, लफा पर्वताच्या माथ्यावर वसलेलें आहे. त्याची उंची ३४०० फूट आहे येथें किल्ला, टाक्या, देवळें व वाडे याचे अवशेष अद्यापि आहेत- संवत ८९५ ते १६२० पर्यंतच्या तेथील ब्राह्मणी कथांत, राज्यातील बांधलेली देवळें व वसविलेली नगरें याच्या नामावळीखेरीज, निरनिराळ्या राजाच्या कल्पित गुणांचें वर्णन आढळतें. या कथा अद्यापि छापलेल्या नाहींत. स. १५६३ त, अकबराचे कारकीर्दीत येथें मुसुलमान घुसले, तेव्हां रतनपुरचा राजा कल्याणसिंग हा अकबराचा मांडलिक बनला. या वेळेपासून मराठ्याच्या वेळेपर्यंत याच्या वंशजानी तेथें राज्य केलें मराठ्याच्या स्वाऱ्यात रतनपुर व रायपुर हीं दोन्हीं राज्यें मेडिली व नागपुरची भोसलेशाही झाली हल्लीं एक दोन लहान संस्थानिक ( हैहयवंशीय ) या प्रांतात आहेत. हैहयघराण्यात फार पराक्रमी राजे झाले नाहींत व त्यांचीं घराणींहि हल्लीं फारशीं उरलेलीं नाहींत इकडील राज्याच्या पूर्व वैभवाची व सामर्थ्याची साक्ष, इकडील प्रांतातील राजीम, सुपुर व कवर्दानारायण या ठिकाणच्या मोठमोठ्या देवळाच्या अवशेषावरून व तेथील शिलालेखावरून पटतें या हैहयवंशातील एक मुरदेव नावाचा राजा पराक्रमी निपजला होता. त्यानें स. ९९८ त तैलंगण जिंकला होता. स. ११६५ तील एका शिलालेखात, श्रीकल्ल चेदीश्वर, रत्नराज, पृथ्वीदेव, जज्जलदेव अशीं राजाचीं नावें आढळतात., या प्रांतातील आतापर्यंत सापडलेलीं फार जुनीं नाणीं या पृथ्वीदेवाचीं असून, तीं बहुतेक सोन्याचीं व फार थोडीं ताब्याचीं आहेत. ताब्याच्या नाण्यावर हनुमानाची मूर्ति असून, सोन्याच्या नाण्यावरील आकृति अस्पष्ट आहे. जज्जलदेव व रत्नदेव याचीहि कांहीं नाणीं आटळलीं आहेत. त्यावरून त्याचा काल अनुक्रमे स. ११२० व स. ११४० येतो या रेक्षा, हैहय राजाचा व त्यावरोबरच या दक्षिणकोसल देशाचा देण्याजोगा इतिहास आढळत नाहीं. [ स्मिथ–अय्यर-वैद्य. मध्य. भा. पु. १–२; इं. ग्या. पु. १५ ; ज. रा ए सो. १९००,०९, १८; वायुपुराण वाल्मी. रामायण, महाभारत; रघुवंश; भा. भु. व, प्रा. कोश, अ. कोश; त्रिकाडशे, हंटर–ओरि. इति, म प्रा. ग्याझि; बुक, ग्रँट–ग्याझि, कनिंगहाम ]

**कोसीगी**–-मद्रास इलाख्यातील बळारी जिल्ह्याच्या आपवानी तालुक्यातील एक शहर. हें मद्रास रेल्वेच्या वायव्य फाट्यावर वसलेलें आहे. १९११ सालीं याची लोकसंख्या ६,९०७ होती. ४००—५००फूट उंच अशा एका टेंकडीच्या पायथ्याशीं हें वसलेलें आहे. या शहराच्या बाजूस ग्रानाइट ( वज्रतुंड ) दगडाचे ढीगच्या ढीग अस्ताव्यस्त रीतीनें पडलेले आहेत शहराच्या सभोंवतालीं छोट्या टेंकड्यांची माळ असून त्यांत ग्रानाइट दगडाची समृद्धि आढळते या टेंकड्यावर स्वयंभू दगडाच्या मूर्ती आढळतात. कोसीगी स्टेशनच्या दक्षिणेस तीन मैलांवर एका टेकडीवर एक ८० फूट उंचीचा दगडाचा गुंडा असून त्यावर दोन दगडी स्त्रियाच्या मूर्ती आहेत. त्या 'अक्कचेल्लु' या नावानें प्रसिद्ध आहेत प्राचीनकाळीं हें ठिकाण येथील एका जातीच्या मुख्याच्या ताब्यात होतें याच्या घराण्यात गोपाची चाल असे या जातिमुख्याच्या घराण्यातील वीरपुरुषाच्या पराक्रमाचीं वर्णनं ज्यावर खोदलेलीं आहेत असे मोठ मोठे दगड ( वीर–कल ) या शहरच्या आसपास सापडतात. शहराच्या दक्षिणेस एका मैलावर तीन टेकड्याच्या योगानें झालेल्या एका त्रिकोणाकृति भागास ५ दगडी मूर्ती आहेत; त्यापैकीं एकच अगदीं जशाच्या तशीं शाबूत आहे येथें एक चामड्याना रंग देण्याचा कारखाना असून शिवाय कापड विणण्याचा धंदाहि येथें मोठ्या प्रमाणात आहे.

**कोस्टारिका**—मध्यअमेरिकेंतील प्रजासत्ताक राज्य. याच्या उत्तरेस निकाराग्वे; पूर्वेस कॅरिबियन समुद्र, आग्नेयीस व दक्षिणेस पनामा; नैॠत्येस, पश्चिमेस व वायव्येस पॅसिफिक महासागर क्षेत्रफळ २३००० चौ. मै. हा एक उंच पठार असून त्यात उंच पर्वताच्या रागा गेलेल्या आहेत यात सहा प्रांत आहेत.

**स्व रू प व र्ण न.**— कोस्टारिकात ज्वालामुखी पर्वताच्या रागा असून त्या एकमेकापासून सॅनजोसे व कॅर्टागोया पठारामुळें विभक्त झाल्या आहेत. यापैकीं मुख्य शिखरें:—पोआस ( ८८९५ फूट ), इराझु ( ११,२०० ), टुरिआल्वा ( १०,९१० ). दुसऱ्या दोन पर्वताच्या रागा निकोया आखाताच्या दक्षिणेकडून पनामाकडे गेल्या आहेत. याचें नाव कॉर्डिलिरा द टालामाका असून त्याची मुख्य शिखरें चिरिपोग्राद (११,४८५), बुएनाव्हिस्टा (१०,८२०), पिकोव्हॅल्को ( ९६४५ ) हीं होत. या प्रदेशात धरणीकंप वारंवार होतात. मुख्य नद्या सॅनजॉन रिओफ्रायओ या होत.

**ह वा मा न**—सर्व देशात उष्ण, थंड व समशीतोष्ण अशा तीन तऱ्हेचें हवामान असतें. दरसाल पाऊस सुमारें ८० इंच पडतो. संधिवात व हिंवताप समुद्रकांठीं विशेष आढळतो. एकंदरींत उष्ण कटिबंधातील दुसऱ्या कोणत्याहि देशापेक्षा कोस्टारिका अत्यंत निरोगी प्रदेश आहे असें म्हणण्यात अतिशयोक्ति होणार नाहीं.

**लो क.**—१९१७ मध्यें लोकसंख्या ४५४९९५ होती. बहुतेक स्पॅनिश व तिच्या उपभाषा याचा प्रचार आहे. १६ व्या शतकातील गॅलिशियन लोकाचें ( स्पॅनिश ) वंशज आहों असें बहुतेक लोक मानितात. मिश्र लोकाची संख्या जास्त आहे. मूळचे इंडियन लोकसंख्येनें कमी आहेत ते निकाराग्वेची सरहद्द व टालामाका यांत राहतात. संस्थानचा धर्म रोमन कॅथॉलिक आहे पण सर्वत्र धर्मस्वातंत्र्य आहे प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत आहे. १९१५ त

सरहद्द झाली आहे. या रांगेच्या पश्चिमेकडील ओळीस थंद इ तुर्कस्तान असें म्हणतात. कोह इ बाबची पश्चिम शाखा शिखरांनीं युक्त असून तींतील सर्वांत मोठीं शिखरें १६००० फूट उंचीचीं आहेत. कोह इ बाबच्या दक्षिणेस बेसूर नावाचा एक डोंगराळ जिल्हा आहे. उत्तरेस अफगाणिस्तानचें सपाट मैदान पसरलें आहे या पर्वतातील, इराक ( १२००० फूट ), हजीगक ( १२००० फूट ), व इर्दसंग ( १३००० फूट ) हे मोठे घाट आहेत.

**कोहली**—वऱ्हाड मध्यप्रांतांतील एक शेतकरी जात. वैनगंगेच्या खोऱ्यात मराठी भाषा चालू असलेल्या भागात भंडारा व चांदा जिल्ह्यात यांची वस्ती आहे. यांचा धंदा आजकाल शेतकी करणें हाच आहे. यांची संख्या २६००० आहे. वैनगंगेच्या खोऱ्यात यांनीं आजपर्यंत मोठीं तळीं बांधलीं आहेत, व त्यामुळें शेतकीला पाण्याचा पुरवठा झाला आहे. उसाची लागवड करणें हा यांचा फार आवडीचा उद्योग असे. हे स्वत:बद्दल असें सांगतात कीं चांद्याच्या गोंड राजानें आह्मास काशीहून आणिलें यांच्या चालीरीती व भाषा सर्व मराठी प्रांतातली दिसते.

यांचीं कांहीं कुळें व उपजाती बनल्या आहेत. त्यांचीं नावें बहुतेक स्थलावरूनच पडलीं आहेत. यांच्यात भावाची मुलगी बहिणीच्या मुलानें केलेली चालते पण उलट संबंध करता येत नाहीं. यांची शेती कुदळीनें खोदूनच होते. यास शेताची रखवालदारी करण्याची फार गरज पडते.म्हणून एकापेक्षा अधिक बायका करणें यास फायदेशीर आहे. सापत्न बायका भांडू लागल्या तर नवरा त्यांचीं घरें निरनिराळीं बांधून देतो. ब्राह्मणानें मंत्र म्हणून वराकडून वधूच्यां गळयात मंगळसूत्र बांधवावें व परस्परांनीं एकमेकास माळा घालाव्या म्हणजे झालें. यांचें लग्न ब्राह्मण नसला तर जातीचा वृद्ध माणूसहि चालवितो. विधवांचीं लग्नें मध्यरात्रीं लागतात. कधीं कधीं विधवेचा नवरा लग्नात स्वतः हाजर न रहाता तलवार किंवा कट्यार ठेवितो. व त्याबरोबर विधवेचें लग्न लागतें. नाहीं तर पांच विधवा तिला नवऱ्याच्या गावाकडे नेतात. वाटेंतील नदीवर पहिल्या नवऱ्याच्या नावानें असलेल्या मागच्या फोडाव्या मंगळसूत्र तोडावें म्हणजे झालें.कोहली लोकास नेहमीं घराबाहेर रहावें लागत असल्यामुळें त्यांच्या बायकांनीं व्यभिचार केला तर ते क्षमा करतात. पण घटस्फोट कधींच करीत नाहींत कारण त्याबद्दलचा जबर दंड भरावा लागतो.

कोहली लोकांस लग्नाच्या बायकोखेरीज इतर बायका राख म्हणून ठेवता येतात. कोहली बायकांस मिळालेल्या देणग्या किंवा बापानें दिलेली आणखीं कांहीं संपत्ति खुद्द तिच्याच मालकीची असते. या स्त्रीधनास खमोरा म्हणतात. यांना परसडल्यास हे प्रेतें जाळतात. तळीं बांधण्याचा यास अजून पुष्कळ नाद आहे. हे फार चांगले मालगुजार असतात.

याच्याकडे कोणी पाहुणा आला तर त्याचे पाय धुतात व वहाण असली तर पाय धुण्याचा हट्टच घेतात. पशुपक्ष्यांचें मांस खातात पण दारू पीत नाहींत. यांचा दर्जा माळी लोकांच्या बरोबर असून कुणब्यापेक्षा नीच आहे.

**कोहलू**—बलुचिस्तानांतील सिबी जिल्ह्याच्या सिबी पोटविभागांतील एक तहशील. हिचें क्षेत्रफळ ३६२ चौरस मैल असून, लोकसंख्या १९०१ साली १७४३ होती. समुद्रसपाटीपासून ही तहशील ३९०० फूट उंचीवर असून येथील हवा फार चांगली आहे. तहशिलीचें मुख्य ठिकाण कोहलू हें आहे. या तहशिलींत ९ खेडीं आहेत जमीनमहसुलाचें उत्पन्न १९०३–४ मध्यें १४१५४ झालें.

**कोहळा.**—लॅटिन नांव बेलिनकास सेरिफेरा; मराठींत कोहळा, हिंदुस्थानांत सफेद कद्दु, कोहोला इत्यादि नांवें आहेत. ही एक भोपळयाची जात आहे.संस्कृत ग्रंथात कुमरा किंवा कूष्मांड याचा उल्लेख पुष्कळदा केलेला आहे. हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व भागात याची लागवड करितात. याची शेतांत मोठ्या प्रमाणावर लागवड करीत नाहींत. दक्षिण हिंदुस्थानात याची लागवड पावसाळ्याच्या आरंभीं करावी लागते. बंगालांत आक्टोबर अखेरेपासून डिसेंबर मध्यापर्यंत याची लागवड करतात. पहिलीं चार पानें आल्यावर या वेलांना किडा लागतो व या वेळेस त्याचा बचाव झाल्यास पुढें किडा लागण्याची भीति नसते. या वेलांना भरपूर पाणी लागतें व कधीं कधीं प्रवाहीं रसतहि घावें लागतें. कोहळे लवकर वेलावरून काढले पाहिजेत कारण ते लवकर जून होतात. फळें पुष्कळ आलीं तर फुलें तोडून टाकावीं लागतात. तसें न केल्यास फळें चांगलीं पोसत नाहींत. संयुक्त प्रांतात हिंवाळ्यात हे वेल होत नाहींत. व त्यामुळें याची लागवड फेब्रुवारीनंतर करतात. डोंगरावर एप्रिलमध्यें बी पेरल्यास जुलैमध्यें फळें येतात. मसूरीमधील कोहळे शेंदरी रंगावर असतात हे मूळचे काश्मीर प्रांतातले आहेत असें म्हणतात. यूरोप खंडातील व अमेरिकेंतील शेतात या पिकाच्या रांगा १२ फुटाच्या अंतरावर करून एक एक वेल १५ फुटाच्या अंतरावर लावतात. एक एकर जमिनीत सुमारें १५ ते २० टन वजनाचीं फळें निघतात. हिंदुस्थानात याच्या बियापासून स्वच्छ खाण्याचें तेल काढतात. हें तेल औषधीहि असतें. या फळाची भाजी करतात. गाईंना यांचीं कच्चीं फळें दिल्यास त्याना तीं चांगलीं मानवतात. तीं औषधी असतो. कोहळयाच्या बिया भांगेत घालतात कोहळयाच्या फळावर पक्व होण्याच्या सुमारास पांढरी पिठासारखी पूड येते ती अंगास लागल्यास पांढरे कोड उत्पन्न होतें. तसेंच कोहळ्याचा रस केंसास लागला तर केंस पांढरे होतात अशा समजुती आहेत पण त्या भ्रामक आहेत. हा वेल वाढण्याकरिता झुडुपाचा किंवा मांडवाचा आधार लागतो. किंवा मळयात कुंपणाच्या बाजूस अळीं घालून वेल कुंपणावर जाऊं देतात.

कोहळ्याची भाजी करतात. कोहळ्याच्या पाण्यात पापडाचें पीठ भिजवून केलेले पापड हलके होतात. कोहळ्याच्या मगजाचा किसून अगर फोडी करून साखरेच्या पाकात मुरंबा करतात.

**भुईकोहळा**—ही एक भोंवरीच्या वेलाची जात आहे. या वेलाचीं फुलें जांभळ्या रंगाचीं असून तीं पावसाळ्यात येतात. हा वेल पुष्कळ वर्षे टिकतो. यास फळें मधून मधून लागतात व तीं वेलाच्या मुळाशी सुरणासारखीं जमिनींत येतात तीं निरनिराळ्या आकाराचीं असतात व त्यासच भुईकोहळे म्हणतात

या झाडास संस्कृतात भूमिकूष्माड, विदारीकंद, मराठींत भुईकोहळा, लॅटिनमध्यें इपोमीआ डिजिटाटा, हिंदींत बेलाईकंद इत्यादि नावें आहेत याची भाजी करून खातात. तसेंच कोहळा कुटून पीठ करून त्याची दुधात लापशी केली तर ती फार स्वादिष्ट, अतिशय गोड व पौष्टिक होते. हें फळ भाजून खाण्यासहि उपयोगी पडतें. [ वॅट; पदे ]

**कोहाट, जिल्हा.**—वायव्य सरहद्दीवरील प्रांतातील एक जिल्हा. याचें क्षेत्रफळ इ. स. १९११ साली २६९५ चौ. मैल होतें. उत्तरेस पेशावर जिल्हा, जोवाकी पर्वत, वायव्येस ओरकैझ तीराह, नैर्ऋत्येस वझीरिस्तान, आग्नेयीस, बन्नू व मियानवाली जिल्हे, पूर्वेस सिंधु नदी. या जिल्ह्याची जास्तीत जास्त लांबी १०० मैल व रुंदी ५० मैल आहे. या जिल्ह्यात तृतीय युगातील पाषाणाचे थरच्या थर आढळतात. हे पाषाण रेताड दगडाचे असून त्या दगडाच्या थरात चपट्या खडूच्या दगडाचेहि कण सापडतात. रेताड दगडाची दक्षिण भागात समृद्धि आहे व उत्तर भागातहि समृद्धि आहे. व उत्तरभागात खडूच्या दगडांचे वैपुल्य आहे या चपट्या खडूच्या थराखालीं शेंदेलोण मुबलक सापडतें हें शेंदेलोण विशेषतः बहादुर खेल येथ पुष्कळच सापडते येथें याचे थर १००० फूट जाडीचे आहेत. याचा रंग तांबूस असून हें शेंदेलोण फार शुद्ध असतें.

हा जिल्हा उंचीवर असल्यानें येथें उन्हाळा थोडा काळ असतो पण तेवढ्या काळात आपली चुणूक भासविल्याशिवाय तो रहात नाही वसंत व शरद हे ऋतु फार बहारीचे असतात हिंवाळ्यांत थंडी कडक असते व मीराझी पर्वताच्या दऱ्यातून थंड वाऱ्याचे प्रवाह सारखे येत असल्यामुळे, ते अंगाला झोंबून फार त्रास होतो उन्हाळा व थंडी दोन्हीहि कडक स्वरूपाची असल्यामुळें न्युमोनियाची साथ येथें वरचेवर येते. शिवाय मलेरियाचा रोग तर येथें कायमचाच तळ देऊन बसलेला आहे.

बाबर बादशहानें आपल्या आयुष्यातील आठवणी लिहिल्या आहेत त्यात प्रथमतः या जिल्ह्याचा उल्लेख केलेला आढळतो हल्लींप्रमाणेंच त्यावेळींहि या जिल्ह्यांत पठाण लोकांच्या बंगष व खटक या दोन जातींची मुख्यत्वेंकरून वस्ती होती. या बंगष जातीच्या लोकांना, गर्देझहून गिलझैच्या प्रदेशात हाकून लावण्यात आल्यानें त्या लोकांनीं १४ व्या शतकाच्या सुमारास कुरम खोऱ्यात आश्रय घेतला; व तेथून मिराझी व कोहाटच्या मुलुखात तेथील मूळचे लोक जे ओरकैझ यांच्याशीं लढाया करून त्याना हळू हळू मार्गे वायव्यसरहद्दीवरील टेंकड्यापलीकडे हाकून लावून मिराझी व कोहाट या मुलुखावर आपली सत्ता प्रस्थापित केली अशी आख्यायिका आहे. खटक लोक हे मूळचे सुलेमान पर्वतात रहाणारे पण तेराव्या शतकाच्या सुमारास त्यांनीं आपलें वसतिस्थान सोडून बन्नू जिल्ह्यात वस्ती केली. पण बन्नू जिल्ह्यातील मूळचे रहिवाशी जे बनूची त्यांच्याशीं यांचें पटेनासें होऊन त्यांनी सुमारें १५ व्या शतकाच्या सुमारास कोहाट जिल्ह्यात वस्ती केली. इ. स. १५०५ साली लूट करण्याच्या इच्छेनें बाबरनें या जिल्ह्यावर स्वारी केली व कोहाट व हंगु हे प्रांत लुटले पण अशा रीतीनें कोहाट जिल्हा जरी मोंगलाच्या ताब्यात गेला तरी, मोंगलाचा या जिल्ह्यावरील अंमल नावापुरताच होता. अकबराच्या कारकीर्दींत मलिक अकोर नावाच्या एका खटक जातीच्या सरदारानें काबूल नदीच्या दक्षिणेस असलेल्या मुलुखाचें लुटारूंपासून रक्षण करण्याचें अकबराजवळ कबूल केलें व याचा मोबदला म्हणून अकबरानें त्याला अकोरच्या प्रदेशावर कर बसविण्याचे अधिकार दिले व इतर थोडासा मुलूखहि त्याला तोडून दिला. एवढेंच नव्हे तर या प्रांतावर अकोरच्या वंशजाचाहि हक्क चालावा ही गोष्टहि त्यानें मान्य केली.

सन १७४७ मध्यें दुराणी साम्राज्याच्या सत्तेखालीं कोहाट प्रांत आला, तरी पण त्या प्रांताचा कारभार बंगष व खटक जातींच्या लोकांच्याच ताब्यात असे १९ व्या शतकाच्या प्रारंभीं सरदार समदखान नावाच्या बारकझी जातीच्या एका सरदारानें, कोहाट व हंगू हा देश आपल्या ताब्यात आणिला. पण १८२८ मध्ये या सरदाराच्या वंशजांना पेशावरच्या सरदार लोकांनीं हाकून लाविलें. या पेशावरच्या सरदारात सुलतान महमदखान हा प्रमुख सरदार होता टेरी तहशील ही अहमदशहा दुराणीच्या ताब्यात आल्यावर अकोरच्या घराण्याचा कनिष्ठ पुत्र हा या तहशिलीचा कारभार पहात असे व हीच पद्धत रूढ झाल्यामुळें या तहशिलीवर राज्य करणारें मांडलिक घराणें अकोरच्या मुख्य घराण्याशीं तुटकपणानें वागूं लागलें व त्या घराण्यातील राजांनीं स्वतंत्र होण्याचा यत्न आरंभिला पण यामुळें अकोरच्या मुख्य घराण्यात व या मांडलिक घराण्यात टेरी तहशिलीवर कोणी सत्ता चालवावी यासंबंधांत वरचेवर भांडण, खून, मारामाऱ्या होऊं लागल्या व अशा रीतीनें जिकडे तिकडे अंदाधुंदी माजली.

पण लवकरच या प्रांतावर शिखाचें वर्चस्व प्रस्थापित झालें. तरी पण या प्रांतातील लोकांपासून नियमानें कर वसूल करण्याची या शिखाच्या अंगीं धमक नव्हती तेव्हा

रणजितसिंगानें सुलतान महमुदखान नावाच्या एका इसमाला पेशावरचा सुभेदार नेमून त्याला कोहाट, हगू व टेरी हे प्रांत बक्षीस दिले महमदखानानें टेरी तालुक्याचा व्यवस्था रसूल खान नावाच्या एका माणसाकडे सोपविली,व त्याच्या दोन्ही प्रांताचा कारभार तो स्वत आपल्या मुलाच्या साह्यानें पाहू लागला १८४३ मध्यें रसूलखान वारल्यानंतर त्याचा दत्तक मुलगा ख्वाजा महंमदखान हा गादीवर बसला दुसरें शीख युद्ध ज्या वेळीं सुरु झालें त्यावेळीं पेशावर येथील शिखानीहि इग्रजाविरुद्ध हत्यार उपसलें त्यावेळीं, पेशावर येथील अमलदार जॉर्ज लॉरेन्स यानें कोहाट येथें आश्रय घेतला, पण सुलतान महमदखान यानें त्याला शिखाच्या स्वाधीन केलें सुलतान महमदखानानें शिखाचा पक्ष धरला होता पण ख्वाजामहमदखान हा मात्र इग्रजाच्या पक्षास मिळाला पुढें या युद्धात इग्रजाची सरशी झाल्यामुळ सुलतान महमदखान हा आपल्या अनुयायासह काबूल येथें पळून गेला व त्यामुळें कोहाट व पजाब हे प्रदेश ब्रिटिश राज्याला जोडण्यात आले ख्वाजा महमदखानानें मात्र ब्रिटिशाचा पक्ष धरला होता म्हणून टेरी तहशील ही त्याच्या कडेच ठेवण्यात आली व १८७२ मध्यें त्याला नबाब व के सी एस् आय हे हुद्दे देण्यात आले हा १८८९ मध्यें वारला व त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा खान बहादूर अब दुल गफूरखान हा गादीवर आला १८५१ मध्यें ब्रिटिश-सरकारनें जाहीरनामा काढून मिराझी पर्वताचा टापू आपल्या राज्याला जोडल्याचें जाहीर केलें पण या टापूत रहाणाऱ्या पहाडी जाती अतिशय घाणेदार असल्यानें त्या इग्रज लोकाचें वर्चस्व कबूल करीनात व त्याना करहि देइनात तेव्हा १८५५ मध्यें इग्रजानीं ४००० लोकाची एक तुकडी त्याच्यावर पाठविली त्यामुळें डोंगरातील मिराझी लोकाना इग्रजाना शरण येणें भाग पडल अशा रीतीनें कुरम नदीपर्यंतचा सर्व मुलूख पादाक्रात केल्यावर, कोहाट ते पेशावरपर्यंतचा, व बहादूरखेलच्या मार्गानें, ब नूपर्यंतचा रस्ता असे दोन रस्ते तयार करण्याचें काम सुरू करण्यात आलें या कामात डोंगराळ जातींनी बरींच विघ्नें आणलीं पण शेवटीं ते रस्ते कसेबसे पुरे करण्यात आले

कोहाट जिल्ह्यात कोहाट, टरी व हगू अशा तीन तहशिली आहेत जिल्ह्यात एक गाव व ४९० खेडीं आहेत [ लो स ( हस १९११ )२,१४,१२३] १९११ साली या जिल्ह्याची लोकसंख्या २,२२,६९० होती, त्यापैकीं १,१९,०८१ पुरुष व १,०३,६०९ स्त्रिया होत्या कोहाट तहशिलीची लोकसंख्या ७४१६२० असून टेरी व हगू याची १०४१३० व ४४०६६ इतकी लोकसंख्या होती कोहाट हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे या जिल्ह्यांत मुसलमान ( २०८८६८ ) हिंदु ( १०८८८ ) शीख ( ०७२९ ) व खिश्चन ( २०१ ) असे चार धर्माचे मुख्यत लोक आहेत

धंदे —जिल्ह्यातील शेंकडा ८८ लोकाचा धदा शेतकीचा आहे या जिल्ह्यातील दऱ्याखोऱ्याच्या पायथ्याशीं असलेली जमीन चिकण मातीची असून ती सुपीक आहे जमीन नांगरून दरवर्षी आक्टोबर ते जानेवारी व जून ते आगस्ट अशीं दोन पिकें काढण्यात येतात १९०३-४ साली ४६१ चौरस मैल जमीन लागवडाखालीं होती व त्यापैकीं ६१ चौरस मैलाना कालवे,तळे व अगर विहिरी इत्यादि साधनानीं पाणीपुरवठा केला जात होता जमिनींतील मुख्य पीक म्हणजे गव्हाचें व बाजरीचें होय याशिवाय चणे, मका, कडधान्यें व ज्वारी इत्यादींचेंहि उत्पन्न होत तबाखू व कापूस यांचें फारच थोडें उत्पन्न आहे गुराची निपज चागली नसते तीं मुख्यत पजाबातून आणिलीं जातात उंटाची निपज येथें मोठ्या प्रमाणात आढळते लाड शेपटाच्या व साध्या या दोन्ही प्रकारच्या मेंढ्या व शेळ्या या जिल्ह्यांत पुष्कळ आहेत येथील घोडे पाढऱ्या वर्णाचे असतात या जिल्ह्यात डिस्ट्रिक्ट बोर्ड व म्युनिसिपालिटी यानीं घोड्याच्या व गाढवाच्या दोन पागा ठेवल्या आहेत जिल्ह्यातील जगल सुमारें ७४ चौरस मैल आहे व त्याच्यावर एक स्वतन्त्र अधिकारी नेमण्यात आला आहे जगलात मझी उर्फ देवदारू झाडाची बरीच समृद्धि आढळते, याशिवाय शिशवी, कैन, पलोसी इत्यादि झाडेंहि आहेत जट्ट, मालगीन, खरक व बहादूरखेल या ठिकाणीं सैंधवाच्या खाणी आहेत यानीं जवळ जवळ ५० मैल लाब व २० मैल रुंदीचा टापू व्यापिला आहे १९०३-४ साली १५,३०७ टन सैंधवाचा खप झाला तसेंच या जिल्ह्यात पेट्रोलियमचे तीन लहानसे झरे आहेत कोसट नदीच्या दक्षिणेकडील भागात गधक सापडत कलाकौशल्याच्या बाबतींत हा जिल्हा मागसलेला आहे पूर्वी येथें रायफल्स (एक प्रकारची बदूक) तयार होत असत पण त्यास उत्तेजन न मिळाल्यामुळें तो धदा बसला आहे कापड विणण्याचें काम सर्व भागातून होतें कोहाट गावात व त्याच्या आसपास रेशमाची अगर सुती पागोटीं फारच उत्तम तऱ्हेचीं तयार केलीं जातात देवदारूचा दोऱ्या, चटया, टोपल्या इत्यादि वस्तू करण्याच्या कामीं उपयोग करण्यात येतो उटावर ठेवण्याकरता लागणाऱ्या लाकडी पिंढाऱ्याहि येथें चागल्या तयार होतात तसेंच कातडी वहाणा अगर जोडेहि येथें उत्तम तऱ्हेचे तयार होतात या जिल्ह्याचा तीराह व काबूलशीं खुशालगड कोहाट-थल रेल्वेनें बराच मोठा व्यापार चालतो. सैंधव, धान्य, चटया, दोऱ्या, इत्यादि वस्तू बाहेरगावीं जातात कापड व लोखड याची आयात होते कोहाट, थल, व नर्याद ही तीन व्यापारी ठिकाणें आहेत खुशालगड ते थलपर्यंतचा रेल्वे १९०३ सालीं सुरू झाला पेशावर ते कोहाट बखानू येथपर्यंत टांग्यानें टपालाची नेआण होते १०१ मैल सडकेचा रस्ता असून ५५९ मैल साधा रस्ता आहे याशिवाय खुशालगडापासून कोहाटच्या मार्गानें थलपर्यंत व खुशालगडापासून ते अटकपर्यंत असे दोन रस्ते आहेत

शासन पद्धति.—या जिल्ह्याच्या राज्यकारभारासाठी तीन तहशिली पाडण्यांत आल्या असून त्या प्रत्येकीवर एक तहशिलदार व एक दुय्यम तहशिलदार असे अधिकारी नेमलेले आहेत. डेप्युटी कमिशनरला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचे फौजदारी अधिकार व डिस्ट्रिक्ट दिवाणी अधिकार असतात. याच्या हाताखाली एक दुय्यम न्यायाधीश असून त्याला अपील चालविण्याचेहि अधिकार असतात. याशिवाय कोहाट येथें एक मुन्सफ व टेरी येथें एक दिवाणी न्यायाधीश असतो. या जिल्ह्यात गुन्ह्यांचें प्रमाण अधिक आहे.

टेरी तहशिलीनें कोहाट जिल्ह्याचा अर्धा भाग व्यापिला आहे. ब्रिटिश राज्याशीं ही तहशील जोडण्यात आल्यानंतर तेथील खानानें ३३००० रुपये वसूल ब्रिटिश सरकारला द्यावा असें ठरलें. पण पुढें तो वसूल २०००० पर्यंत करण्यात आला. १९०० त मिराशी टापूचीहि आकारणी ठरविण्यात आली. अशा रीतीनें इ. स. १९०३-४ त या सर्व जिल्ह्याचा एकंदर वसूल ८३००० रुपये झाला. या जिल्ह्यात फक्त कोहाट या एकाच गावात म्युनिसिपालिटी आहे. १९०४ त या गावाचा वसूल १४१०० रुपये व खर्च १६००० रुपये झाला. १९११ सालच्या खानेसुमारीत एकंदर लोकसंख्येंत शेंकडा तीन या प्रमाणांत म्हणजे ६९१२ लोकांना लिहितां वाचता येत होतें. कोहाट येथें एक दवाखाना व खास स्त्रियांसाठीं एक औषधालय असून शिवाय हंगू व टेरी या ठिकाणीं एक एक दवाखाना आहे.

तहशील.-कोहाट जिल्ह्यातील तहशील. हिचें क्षेत्रफळ १९११ सालीं-चौरस मैल होतें. या तहशिलीचे दोन भाग आहेत. पैकीं पश्चिम भागात कोहाट शहर व कँटोनमेंट असून या भागांतून कोहाट नदी वहात गेली आहे. दुसरा भाग म्हणजे एक सपाट मैदान आहे. या तहशिलीची लोकसंख्या ७८,१६२ होती. १९०३-४ सालांत या तहशिलीचा वसूल ९०००० रुपये होता. या तहशिलींत कोहाट हे तहशिलीचें मुख्य ठिकाण व ८५ खेडीं आहेत.

गाव.—कोहाट जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. खुशालगढाहून ३० मैलांवर हें आहे. इ. स. १९११ सालीं या शहराची वस्ती २२६५४ असून त्यापैकी कँटोनमेंटची ७५०३ होती. त्याच्या पैकीं १५९३० मुसुलमान;४८५० हिंदु१६९३ शीख. व१६८ ख्रिश्चन धर्माचे लोक होते. ब्रिटिश राज्याला कोहाट जिल्हा जोडण्यांत आल्यानंतर हें शहर अस्तित्वात आलें. हें शहर दंवयसल जागीं वसलें आहे. लष्कर व पोलीस ठाणें ही उंच जागेवर वसलीं आहेत येथें लष्करी शिपायाच्या चार तुकड्या व तोफखाना आहे. इ. स. १८७३ मध्यें या शहराला म्युनिसिपाटी देण्यात आली या शहराचें सर्वसाधारण उत्पन्न ४१००० असून खर्च ३६००० रुपये आहे. या ठिकाणीं एक ऑंग्लोव्ह्नर्नाक्युलर हायस्कूल, एक पुरुषांसाठीं व एक स्त्रियासाठीं दवाखाना आहे. या शहराला व्यापारी दृष्ट्या मुळींच महत्व नाहीं. या शहराच्या नजीक गेगलखेल या खेड्यांत बंदुका तयार करण्याचा धंदा पूर्वी होता तो हल्लीं नामशेष झाला आहे.

येथें इ. स. १९२४ च्या सप्टेंबर मध्यें हिंदु मुसुलमानांत दंगा झाला त्यावेळीं सरकारास हिंदूंचें संरक्षण करतां न आल्यामुळें बऱ्याच लोकांस स्थानत्याग करावा लागला.

**कोहिस्तान**—मुंबई इलाख्यातील सिंधप्रांताच्या कराची जिल्ह्यातील एक डोंगराळ प्रदेश. हा किरथार पर्वताच्या ओळीच्या मुळक्यांनी बनलेला आहे. या प्रदेशाच्या दक्षिण भागात सपाट मैदान आहे व येथें गुरांना मुबलक चारा मिळतो. कोहिस्तान येथील जमीनीला पावसाची अत्यंत जरुरी भासते. अथवा जमीनीजवळ पाण्याचे ओहोळ तरी असावे लागतात. असे ओहोळ ज्या जमीनीजवळ असतात, तेथील जमीन चांगली पिकते. अशा ओहोळाना ' नै ' असें नाव आहे. बारण नावाचा या प्रदेशात एक प्रमुख झरा असून तो कोट्रीच्या नजीक सिंधूस मिळालेला आहे.

कोहिस्तान हा एक महाल असून १९११ सालीं तेथील लोकसंख्या १८,४८३ होती. येथील लोक रानटी असून त्यात सिंधी व बलूची लोकाचा भरणा बराच आहे. हे लोक उंट, गुरें, शेळया व मेंढ्या याची उपासना करून त्यावर आपली उपजीविका करितात.

**कोहीम**—आसामात नागा टेंकड्या जिल्ह्याच्या कोहिमा पोट विभागाचें मुख्य ठिकाण. हें समुद्रसपाटीपासून ५००० फूट उंचीवर आहे. ब्रह्मपुत्रा दरींतील दिमापूर गावापासून मणिपूरकडे जाणारा रस्ता या गावावरून जातो. या गावाची लोकसंख्या १९११ सालीं २४२३ होती येथील पर्जन्यमान ७३ इंच आहे. येथील हवा थंड व सुंदर आहे. या ठिकाणीं एक धर्मार्थ दवाखाना आहे. येथें काळ्या लोकांच्या दोन पलटणी व एक लष्करी तुकडी आहे.

**कोहीर**—हैद्राबाद. बेदर तालुक्यातील एक गाव. हें बेदर शहरापासून आग्नेयीस २४ मैलावर आहे. या गावाची लोकसंख्या १९११ मध्यें ६४८६ होती या गावात पुष्कळ मशिदी असून दोन प्रसिद्ध मुसुलमान साधूंची थडगीं आहेत. येथील जुम्मा मशीद ही बहामनी राजाच्या अमदानींत बांधली असें म्हणतात. येथें एक प्राथमिक शिक्षणाची शाळा असून एक मुलींची शाळा, पोस्टऑफिस व पोलिसइन्स्पेक्टरचें ऑफिस आहे. कोहीर गाव आंब्यांकरिता फार प्रसिद्ध आहे.

**कोळसा** ( दगडी )—यास इंग्रजींत कोल, मराठींत दगडी कोळसा, हिंदींत पत्थरका कोयला अशीं नावें आहेत. हा खनिज पदार्थ व्यापारी दृष्ट्या अत्यंत महत्वाचा आहे. आपण लाकडें जाळून तयार केलेला कोळसा लोणाऱ्याकडून घेतो त्यात व या दगडी कोळशात रासायनिक दृष्ट्या फारसा फरक नाहीं. पृथ्वीच्या पाठीवर मनुष्यप्राण्याचा संचार होण्यापूर्वी हजारों वर्षें दलदलीच्या प्रदेशांत उगवणाऱ्या वनस्पती व निबिड अरण्यें हीं भूकंपादि आपातांनीं जमिनींत गाडलीं जाऊन त्याच्यावर नाना प्रकारची रासायनिक

क्रिया होऊन त्यापासून दगडी कोळशाच्या खाणी बनतात. दगडी कोळसा येथील लोकांना फार प्राचीन काळापासून माहीत होता याबद्दल मुळींच शंका नाहीं. परंतु यूरोपियन लोकांनीं येथें येऊन खाणी खणून त्याचा व्यापार सुरू करी-पर्यंत कोळशाचा व्यापार येथें चालत नसे याचा किरकोळ स्थानिक धंद्यात किंवा घरगुती कामात फारसा उपयोग करीत नाहींत. इंग्लंडमध्यें तिसऱ्या हेनरीनें इ. स. १२३९ त पहिल्यानें दगडी कोळशाची खाण खणण्यास परवाना दिला. दगडी कोळशाला तेव्हां समुद्रकोळसा म्हणत असत. इ. स. १३०६ सालीं दगडी कोळशाच्या उपयोगाला इंग्लंडांत प्रतिबंध केला होता परंतु १३२५ त इंग्लंड व फ्रान्समध्यें परस्पर दगडी कोळसा व धान्य यांची देवघेव होत असे. न्यू कॅसलच्या कोळशाची प्रसिद्धि त्याच वेळेस झाली. यानंतर दोन शतकेंपर्यंत इंग्लंड, फ्रान्स, हॉलंड व जर्मनी येथें न्यू कॅसलहून कोळशाचा पुरवठा होत असे १७७६ च्या सुमारास न्यू कॅसलप्रमाणेंच संडरलंड, हार्टले, डरहॅम व व्हिलय हीं ठिकाणें कोळशाकरितां प्रसिद्धीस आलीं अशी स्थिति असताना हिंदुस्थानांतील यूरोपियन लोकांना १८ व्या शतकात येथेंहि कोळशाचा व्यापार शक्य असल्यास सुरू करावासा वाटणें साहजिक होतें.

इ. स. १७७४ त वॉरन हेस्टिंग्जनें ईस्ट इंडिया कंपनीच्या दोन नोकरांना कोळशाच्या खाणी खोदण्याकरिता परवाना दिला त्यांच्यापैकीं हीटलेनें काढलेला कोळसा इंग्लंडमधील कोळशापेक्षा कमी दर्जाचा ठरला. लॉर्ड कॉर्नवॉलिसनें या धंद्याकडे बरेंच दुर्लक्ष केल्यामुळें कोळशाच्या व्यापाराची पहिल्यानें भरभराट झाली नाहीं. ( विल्यम-वाइल्ड स्पोर्टस इन् दि ईस्ट, १८०८, पृ. ७८ ).

हिंदुस्थानात मिळणाऱ्या कोळशापेक्षा कंपनीच्या बोटींतून भरताड म्हणून विलायती दगडी कोळसाच आणून तो येथील तोफखान्याच्या कारखान्याकरिता पाठविणें सोईचें होतें असें आढळून आलें. परंतु १८०८ च्या सुमारास कंपनीच्या लंडन येथील डायरेक्टरांनीं हिंदुस्थानातील प्रतिवर्षी वाढत जाणाऱ्या कोळशाच्या मागणीमुळें जास्त येणाऱ्या खर्चाविरुद्ध कुरकुर केली व दगडी कोळशाच्याऐवजीं लाकडी कोळसा वापरता येईल किंवा नाहीं याची चौकशी करण्याबद्दल सूचना आणली. तसें करणें शक्य नसल्यास कंपनी तोफा करण्याचे कारखाने हिंदुस्थानांतून काढून इंग्लंडमध्यें आणावे अशीहि सूचना केली होती. याच सुमाराला अर्ल ऑफ मिंटो हा गव्हर्नर जनरल होता. त्यानें येथील कोळशाची परीक्षा करण्याकरितां कर्नल हार्डविक् यांना सांगितलें. हार्डविक्नें हिंदुस्थानातील कोळशाची शिफारस केली नाहीं व कांहीं काळपर्यंत कोळशाचा प्रश्न मागें पडला. परंतु १८१४ त लॉर्ड हेस्टिंग्जनें कोळशाचा प्रश्न पुन्हा हातीं घेऊन काळजीपूर्वक त्याचा निर्णय करण्याचें ठरविलें या वेळेस एका तज्ज्ञ मनुष्याकडून कोळसा तपासविण्याचें त्यानें ठरवून त्याला लागणारी सर्व सामुग्रीहि देण्याचें त्यानें जाहिर केलें त्या हुकुमान्वयें जोन्स नावाच्या तज्ज्ञानें येथील कोळसा पुष्कळ सरस असल्याचें प्रसिद्ध केलें (एशियाटिक रिसर्चेस १८३३. पृ. १६३ ते ७० ) हा अहवाल प्रसिद्ध झाल्यापासून येथील कोळशाच्या खोदकामाला पुन्हा चलन मिळालें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

१८२० सालीं सरकारातून ४००० पौंड जोन्स यास खाणी खणण्याकरिता आगाऊ मिळाले. परंतु या कामात त्याला यावें तसें यश आलें नाहीं यूरोपियन लोकांच्या देखरेखीखालीं व भांडवलानें १८२० सालीं बंगाल प्रांतात राणीगंज येथें पहिली खाण सुरू केली १८३९ त या खाणींतून ३६००० टन कोळसा निघाला. इ. स. १८५४ त ईस्टइंडिया रेल्वे सुरू होईपर्यंत कोळशाचा व्यापार फार मंद असे, परंतु रेल्वे कंपनी निघाल्यापासून व कलकत्यामधील ज्यूटचें कारखाने व इतर पक्का माल तयार करण्याचे धंदे निघाल्यापासून कोळशाच्या व्यापाराला भरभराट आली व इकडील लोकहि आपलें भांडवल त्या धंद्यात घालूं लागले इ. स. १८५७-५८ सालीं हिंदुस्थानात २,९३,४४३ टन कोळसा निघाला व ९२,९८३ टन कोळसा परदेशांतून आला. या सालापासून कोळशाच्या व्यापाराला कायमचें स्वरूप प्राप्त झालें. दरवर्षी किती कोळसा निघाला हें पुढील कोष्टकात दिलें आहे. ( वजनाचे आकडे टनाचे आहेत. )

| वर्ष | वजन |
|---|---|
| १८६८ | ४५९४०८ |
| १८७८ | ९९५४९४ |
| १८९८ | ४६०८१९६ |
| १९०४ | ८३४८५६१ |
| १९०६ | ९७८३२५० |
| १९१८ | २०४०२२५०० |

यापैकीं शेंकडा ८८ हिस्से कोळसा बंगालमध्यें निघतो. राणीगंजच्या खाणींची फार प्रगति झाली आहे. कारण कलकत्यापासून त्या फक्त १२० ते १४० मैल अंतरावर आहेत. कलकत्यापासून सुमारें १८० मैल लांबीवर असलेल्या झेरिया येथील खाणी मात्र अलीकडे राणीगंजच्या खाणींना मागें टाकूं लागल्या आहेत गिरिधी येथील खाणींचीहि तशीच स्थिति आहे. हिंदुस्थानात लागणारा सर्व कोळसा अलीकडे येथेंच उत्पन्न होतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण कोळशाची आयात दर वर्षी कमी होऊं लागली आहे. परदेशातून येणाऱ्या कोळशापैकीं बराचसा कोळसा मुंबई येथेंच खपतो. हिंदुस्थानला इंग्लंड, आस्ट्रेलिया व जपान येथून दगडी कोळशाचा पुरवठा होतो. हिंदीमहासागरातील बंदरांना कोळसा पुरविण्याचा व्यापार नवीन सुरू झाला आहे. यूरोप व जपानमधील संप व इतर कांहीं आकस्मिक कारणांनीं कोळशाचा भाव वाढल्यामुळें या व्यापाराला सरजास्तच महत्त्व आलें आहे.

याशिवाय आणखी एक महत्वाचा मुद्दा म्हणजे येथील कोळसा जगातील सर्व कोळशापेक्षां स्वस्त मिळतो हा होय. १९१८ साली खाणीच्या तोंडाशीच कोळसा विकत घेतल्यास एका टनाला ४ रु. ६ आणे पडत. इंडियन मायनिंग असोसिएशन व बंगाल चेंबर ऑफ कॉमर्सच्या दर वर्षाच्या अहवालावरून आपणाला कोळशाच्या व्यापाराची स्थिति कळून येते.

हॉलंडनें या विषयावर आपल्या रिव्यूमध्यें चांगली माहिती दिली आहे. त्यापैकीं काहीं पुढें दिली आहे.— हिंदुस्थानातील बहुतेक कोळसा गोंडवण येथील खाणींतून निघतो. या खाणी किनाऱ्याजवळ व मुख्य रेल्वे फाट्याच्या जवळ असल्यामुळें येथील कोळसा फायदेशीर पडतो.

गोंडवण-कोळसा:—राणीगंज येथील खाणीची पहिल्यानें भरभराट होऊन सर्वांत जास्त कोळसा तिच्यांतून निघत असे. परंतु १९०६ पासून झेरियाच्या खाणींनीं आघाडी मारली आहे ईस्ट इंडिया रेल्वे व बंगाल नागपूर रेल्वे कंपन्या या खाणींतील कोळसा वापरतात.

*राणीगंज येथील कोळसा मुख्यत्वेंकरून डामुडा सेरिजच्या* वरच्या थरांतून काढलेला असतो. बराकर सेरिजचा कोळसा *राणीगंज येथील कोळशाइतका चांगला झालेला नाहीं.* परंतु झेरिया येथें वरील थरापासून हलका कोळसा निघतो व बराकर सेरिजपैकीं कोळसा चांगला असतो.

गि रि धी ये थी ल खा णी.— गिरिधीजवळील गोंडवणाच्या दगडी कोळशाच्या खडकापैकीं कोळसा ईस्ट-इंडिया रेल्वे कंपनी व बंगाल कोल कंपनी वाटून घेतात. येथील खाणीचा मुख्य भाग म्हणजे 'डामुडा सेरिज' च्या पायथ्याशीं असलेला १५ फूट जाडीचा थर हा होय. तेथील उरलेला कोळशाचा पुरवठा ७.७ कोटि टनापेक्षा जास्त होणार नाहीं असा अंदाज आहे.

म ध्य प्रा ता ती ल पें च खो ऱ्या ती ल खा णीः-१९१८ साली येथील खाणींतून २६७३०० टन कोळसा निघाला. मुंबई व दक्षिण प्रांतातील कारखान्यांना या खाणीचें महत्व फार आहे.

म ध्य प्रां ता ती ल न र सिं ग पू र जि ल्या च्या मो ह पा णी ये थी ल खाणीः—*नर्मदाव्हॅली व आयर्न कंपनी या खाणींतील* कोळसा १८६२ सालापासून काढीत आहे. या खाणीची *काहीं विशेष प्रगती झालेली दिसत नाहीं. परंतु तिच्या* पश्चिमेस सुमारें दोन मैलांवर नवीन कोळसा सापडला असून तो काढण्याचें काम सुरू झालें होतें.

चा दा ( म ध्य प्रां त ) जि ल्या ती ल खा णी —ह्या नागपूरच्या दक्षिणेस सुमारें ९२ *मैल असून तेथील कोळसा* १८७१ पासून काढीत आहेत. या खाणींतून निघणाऱ्या कोळशापैकीं सुमारें अर्धा कोळसा जि. आय. पी. रेल्वे कंपनी विकत घेते व बाकीचा मध्यप्रांतातील कापसाचे कारखाने व कापडाच्या गिरण्या यांना लागतो. वरोऱ्याचा कोळसा लवकर पेट घेणारा असल्यामुळें आगीनें खाणीपैकीं बराच भाग जळून फार नुकसान झालें बंगालपेक्षा वरोरा येथील खाणीच्या कामांत पुष्कळ नैसर्गिक अडचणी आल्या होत्या कोळसा काढण्याच्या नवीन पद्धतीमुळें वरोरा येथें पाणी व आग यापासून आतां फारसें नुकसान होत नाहीं. व अपघातानें प्राणहानीहि कमी होते. लवकरच वरोऱ्याच्या *खाणींतील कोळसा संपण्याची चिन्हें दिसत* आहेत पण बेलापूरजवळील खाणींतून कोळसा निघूं लागल्यापासून आता ही भीति बाळगण्याचें कारण राहिलें नाहीं

नि जा म च्या रा ज्या ती ल सिं गा रे णी ये थी ल खा णीः—वरोऱ्याच्या आग्नेयीस असणाऱ्या गोंडवणचे दगडी कोळशाचे खडक गोदावरी खोऱ्यातील राजमहेंद्रीपर्यंत आहेत. वरच्या गोंडवणच्या खडकांतून बंगालमधील दामुदासेरीजपैकी कोळसा कोठें कोठें सापडतो. निझामच्या राज्यातील येलान्डुजवळील खाण प्रसिद्ध आहे गोंडवणच्या खाणीपेक्षा सिंगारेणी येथें अपघातानें फार लोक मरतात वाफ तयार करण्याकरितां सिंगारेणी येथील कोळसा हलक्या प्रतीचा असून तो *जाळल्यानंतर काहीं अदाह्य भाग शिल्लक रहात नाहीं* असें तज्ज्ञांचें मत आहे. या सर्व कारणामुळें सिंगारेणी येथील *खाणींची फार मंद प्रगति झाली आहे.*

उ मा रि या ( रेवा स्टेट, मध्य हिंदुस्थान ) ये थी ल को ळ शा च्या खा णीः—बंगालनागपूर रेल्वेचा बिलासपूर कटनी फाटा या खाणीवरून जातो. या खाणींतून सुमारें २ कोटी ४० लक्ष टन कोळसा निघेल असा अंदाज आहे. आजपर्यंत कोळसा काढलेले चार थर ३ ते १२ फूट जाड होते. खाणींतील कोळसा काढण्यास सुरवात १८८२ त मि. टी. डब्ल्यू. एच्. ह्यूजेस यांच्या सूचनेवरून करण्यात आली व १९०० सालच्या जानेवारीच्या पहिल्या तारखेपर्यंत खाणीची देखरेख सरकार करीत असे. परंतु तेव्हांपासून रेवा संस्थानाला सर्व सत्ता दिली गेली. येथील बहुतेक कोळसा जी आय. पी रेल्वे व बंगालनागपूर रेल्वेला विकतात.

२ खडूमिश्रित व भूस्तरातील तृतीयावस्थाक कोळसाः— अर्वाचीन कोळसा बहुतेक सर्व खडूमिश्रित व तृतीयावस्थाक आहे. खडूमिश्रित कोळसा आसामच्या खासिया व गारो टेंकड्यांतून सापडतो आसामातील या कोळशात प्रास्तर राळेचे पुंज आढळतात इतर कोळशापेक्षा यात हें वैशिष्ट्य आहे. तृतीयावस्थाक कोळसा सिंध, राज*पुताना, बलुचिस्तान, आसाम, ब्रह्मदेश, हिमालयाच्या* पायथ्याजवळच्या टेंकड्या व अंदमान आणि निकोबार *बेटांतून सापडतो.*

अर्वाचीन कोळसा एकंदरींत गोंडवणच्या कोळशाहून फार भिन्न आहे त्यांत गोंडवणच्या कोळशापेक्षा *आर्द्रता* जास्त असून उडून जाणारे बाष्पभावी उत्कर्षहि जास्त असतात. *या कोळशाच्या थराच्या जाडीचें प्रमाण व त्याच्यामधील*

सापडणाऱ्या द्रव्याचें प्रमाण ठरीव नसतें त्यान्यापासून राख कमी होते व जळताना तो फार उष्णता देतो

आसामच्या ईशान्येकडील माकुम खाणी — आसामातील व्यापारी व रेल्वे कंपनीनें या खाणींतून कोळसा काढण्यास १८८१ त सुरवात केली ब्रह्मपुत्रा नदीवरील डिब्रूगडला या खाणी रेल्वेनें जोडिल्या आहेत ब्रह्मपुत्रा नदी जहाजें जाण्यास योग्य असल्यामुळें कोळसा पलीकडे पाठविणें फार सोपें जातें तिरप व नामडाग ओढ्याच्यामधील भागात फार मौल्यवान थर सापडतात पाच मैल दूरवर आसमतात याची जाडी १५ ते ७१ फूट आहे जाळण्याकरिता हा कोळसा चागला असल्याबद्दल त्याची ख्याति आहे व यापासून उत्तम कोक बनतो

ब्रह्मदेशातील श्वेबो जिल्ह्यातील खाणी — ब्रह्मदेशाच्या बहुतेक भागात कोळसा सापडतो अलीकडे नामार्वजवळ १० फूट जाड थराचा कोळसा असल्याचें निश्चित समजलें आहे

बलुचिस्तानच्या खाणी — पश्चिमहिंदुस्तानातील बहुतेक सर्व कोळसा मुख्यत्वेंकरून बलुचिस्तानात सापडतो परंतु येथील खडक अस्थिर असल्यामुळें खाणी खणणें खर्चाचें व धोक्याचें झालें आहे सोर, बोलन व खोस्ट येथील खाणी चागल्या आहेत खोस्टच्या खाणींतून १९१८ साली २९०० टन कोळसा निघाला

झेलम जिल्ह्यातील ( पंजाब ) डॉन्डोट येथील खाणी —येथील मौल्यवान थर १८ ते ३९ इंच जाड असतात व 'नुम्युलिटिक' चुनखडीखाली ते पसरलेले असतात नॉर्थ् वेस्टर्न रेल्वे कंपनी १८८८ पासून या कोळशाचा उपयोग करीत आहे

भागनवाला येथी खाणी —मिठाच्या डोंगराच्या ओळीच्या पूर्वेस कोळशाचे थर आहेत त्यांची जाडी ठिकठिकाणीं कमी जास्त आहे येथील कोळसासुद्धा नॉर्थ वेस्टर्न रेल्वे कंपनीच काढिते

मिआनवाली जिल्ह्यातील खाणी — कालाबागच्या उत्तरेस सुमारें दोन मैलावर या खाणी आहेत येथील कोळशाला 'जुरासिक' कोळसा म्हणतात पश्चिमेस सुमारें २४ मैलावर असलेल्या मैदानातून चागला कोळसा येतो तो तृतीयावस्थाक आहे

काश्मीर येथील खाणी —जम्मूच्या खाणींतील कोळसा १९०३ पासून काढण्यास सुरवात झाली लाद्रा कोळसा बगालच्या कोळशाइतकाच चागला निघू शकेल परंतु किंमतीस त्याबरोबर स्पर्धा करणें लाद्रा कोळशाला कठिण आहे

राजपुतान्यातील बिकानेर येथील खाणी—येथील कोळसा गर्द तपकिरी रंगाचा असून ज्या लाकडापासून तो झालेला आहे त्याची रचना यात स्पष्ट दिसते त्याचप्रमाणें तमेच ग्रास्तर राळहि यात सापडते ज्या ठिकाणीं २० इंच जाड थर असेल अशी कल्पना होती तेथें खाण खणण्यास १८९८ साली सुरुवात केली जळाऊ लाकडें एंजीनमधून वापरणें फायदेशीर होत नाहीं परंतु अलीकडे कोळशाच्या चुऱ्याचे गोळे बनवून वापरणें किफायतशीर असल्याचें सिद्ध झालें आहे असें केल्यानें त्यातील आर्द्रता कमी होते व हवेचा परिणाम त्याच्यावर फारसा होत नाहीं रेल्वे कंपन्याना याचा सहज पुरवठा करता येण्यासारखा असल्यामुळें त्याचा हलकेपणा कोणी फारसा लक्षात घेत नाहीं १९१८ सालीं या खाणींतून ११३०० टन कोळसा निघाला

हिंदुस्थानातील निरनिराळया कोळशाच्या क्षेत्रातून १९१८ सालीं किती कोळसा निघाला त्याचा टनवार तपशील —

| स्थान | टन |
|---|---|
| गोंडवणकोल फील्ड्स् | |
| बंगाल, बिहार व ओरिसा— | |
| डाल्टनगंज | ८१८०० |
| गिरिधी | ८४६६०० |
| झेरिया | १०९५२००० |
| जेन्टी | १४०४०० |
| रामगड बोकारो | ५४२००० |
| राणीगंज | ६३६८५०० |
| संबळपूर | ५१००० |
| मध्यहिंदुस्थान— | |
| उमरिया ( रेवा ) | २००००० |
| मध्यप्रांत— | |
| मोहपाणी | ७८८०० |
| पचम्हॉलि | २६७३०० |
| बल्लारपूर ( चांदा ) | १३५४०० |
| हैद्राबाद— | |
| सिंगरेरी | ६५९१०० |
| एकूण | २०३२२९०० |
| टर्शिअरी (तृतीयावस्थाक) कोलफील्डस्— | |
| बलुचिस्तान— | |
| खोस्ट | २९००० |
| सोररेंज माक्, इत्यादि | १४१०० |
| आसाम— | |
| माकुम इत्यादि | २९४००० |
| वायव्य सरहद्दप्रांत— | |
| हमारा | २०० |
| पंजाब ( सॉल्टरेंज )— | |
| झेलम जिल्हा | ३९७०० |

( कोष्टक पृ. ११६ वरून पुढें चालू )

| | |
|---|---|
| मियानवाली | ५२०० |
| शाहापुर | ५६०० |
| राजपुताना— | |
| विकानेर | ११३०० |
| एकूण | ३९९६०० |
| एकूण सर्व | २०७२२५०० |

हिंदुस्थानांतील व जगांतील कोळशाच्या पैदाशीचें तुलनात्मक टिपण पुढें दिलें आहे यातील आकडे १९१८ सालचे आहेत ( आकडे हजार टनी आहेत ).—

हिंदुस्थान ( अदमासें ) २०७२२ अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें ६,११,९२५; युनायटेड किंगडम् २,२७,७४९; जर्मन साम्राज्य १५,७९२८; फ्रान्स २४,५३७, रशियन साम्राज्य ३०,४७३ (१९१७ सालांतील), जपान २७,५७९; ऑस्ट्रिया हंगेरी १७,३१९ (१९१६ सालांतील). बेलजिअम १३,६००; कानडा १५,१८०; ऑस्ट्रेलिया १०,२३७ (१९१७ सालांतील), साउथ आफ्रिका ९२७१; स्पेन ६४०८; न्यूझीलंड २०३४.

येथेंच हिंदुस्थानांत १९१८ सालीं कशाप्रीत्यर्थ किती कोळसा खर्च झाला त्याचें तपशीलवार टिपण देणें उपयोगी होईल ( आकडे हजार टनी आहेत ):—

रेल्वे ५८८१; ॲडमिरॅलिटि व रॉयल इंडियन मॅरिन शिपिंग अकाउंटस्. १३५८; बंकर कोळसा ११८०; जूटच्या गिरण्या १०४५; कापडगिरण्या ९६८; लोखंड व पितळ याचे कारखाने ( एंजिनिअरिंग वर्कशॉप्स सुद्धां ) १३०७, अन्तर्देशीय आगबोटी ४८५, विटा व कौल कारखाने (पॉटरी व सिमेंट कामां सुद्धां ) ४७७; चहाच्या बागा २२५; पोर्ट ट्रस्ट्स १६३; कागदाच्या गिरण्या १६६; कोळशाच्या खाणींस लागणारा व फुकट जाणारा २४८७; औद्योगिक व घरगुती व्यय वगैरे ४९६०.

खा णीं चें खो द का म.—मजुरी:—कोळशाच्या खाणींतून मजुराच्या बाबतींत हिंदुस्थाननें इतर खाणी खोदण्याच्या तन्हांपेक्षा फार अघाडी मारली आहे. १८९८ ते १९०३ पर्यंत दररोज सरासरी ८८८०५ मजूर खाणींवर काम करीत. १९०५ सालीं ९२७४० मजूर कामावर असून त्यापैकीं ७५७४९ मजूर बंगालमध्यें काम करीत होते. १९१८ त एकंदर १९१३२५ मजूर कामावर होते. पैकीं बिहार-ओरिसातच११८८४९मजूर काम करीत होते. ब्रिटिश साम्राज्यात फक्त केपकॉलनी खेरीजकरून हिंदुस्थानमध्यें मजुराच्या कामाचें प्रमाण इतर भागांतील मजुराच्या कामापेक्षा कमी पडतें. १९१८ सालीं हिंदुस्थानांतील खाणींतील प्रत्येक मनुष्यानें सुमारें १७२ टन कोळसा काढला, परंतु ब्रिटिश साम्राज्याच्या इतर भागांत प्रत्येक मजुरानें २८७ टन कोळसा काढला. खाणींत काम करावयाचें म्हणजे अपघातानें मरण येण्याची फार भीति असते, परंतु यूरोपपेक्षां हिंदुस्थानांत प्राणहानि फार कमी होते असें आढळून आलें आहे. १९१८ त दर हजारीं मृत्यूचें प्रमाण १·११ आहे.

को ळ सा का ढ ण्या च्या री ती.—कोणच्याहि एखाद्या नवीन ठिकाणीं दगडी कोळशाची खाण व्यापारीदृष्ट्या फायदेशीर पडेल किंवा नाहीं हें पहाण्याकरितां भूगर्भशास्त्र जाणणारे लोक गिरमिटाच्या आकाराचें जमीनींत भोंक पाडण्याचें यंत्र असतें. त्याच्या सहाय्यानें ४।५ ठिकाणीं छिद्रें पाडून त्यायोगानें भूपृष्ठापासून किती अंतरावर व किती खोलीपर्यंत कोळशाचा पुरवठा आहे व त्याचें क्षेत्र किती लांबवर आहे हें समजतें फायदेशीर वाटल्यासच खाण उघडण्याचा यत्न करितात. कित्येक खाणींची खोली१००० पासून १५०० फुटांहूनहि अधिक असते व तिचा घेर ४०० ते ५०० मैल पर्यंत असूं शकतो एवढ्या सर्वच भागांत कोळसा सारखा भरलेला सांपडत नाहीं. तर एक एका थराची जाडी फार तर २५।३० फूट असते. असें कित्येक थर खणून काढावे लागतात. कारण ह्या थराच्या मध्यें रेतीचे, दगडाचे किंवा मातीचे थर असतात कोळशाची खाण म्हणजे एक विस्तीर्ण शहरच असतें. भूपृष्ठावरच्या शहरांतील सर्व रस्ते व गल्ल्या बहुतकरून एकाच भूपृष्ठावर असतात परंतु खाणींतील रस्त्याचे एकावर एक असे पांचपाच दहादहा मजले असतात. खाणींतील मजूर व इतर कामकरी लोक यास आंत उतरण्याकरितां पाळणे असतात कोळसा व कामकरी माणसें वर येण्याकरितां, तसेंच पवनचक्कीच्या सहाय्यानें सर्व खाणींत हवा खेळविण्याकरितां एंजिनचा उपयोग करावा लागतो.

कोळसा काढण्याच्या तीन चार पद्धतींपैकीं 'लॉंगवॉल' व 'बोर्ड ॲन्ड पिलर' या दोन प्रमुख पद्धती आहेत. पैकीं दुसऱ्या पद्धतीलाच 'स्टूप ॲन्ड रूम' व 'पोस्ट ॲन्ड स्टॉल' अशींहि नांवें आहेत. 'बोर्ड ॲन्ड पिलर' ही पद्धत 'लॉंगवॉल' पद्धतींपेक्षां प्राचीन आहे. हींत शॅफ्ट उर्फ खड्ड्यापासून वरच्या भागापर्यंत दोन सरळ अशा मुख्य वाटा खोदतात. नंतर या मधल्या बोगद्याशीं लंब ( आडवे) असे लहान लहान बोगदे खोदून पुन्हां पहिल्या बोगद्याशीं समांतर व आकारानें तेवढाच असा दुसरा बोगदा खोदतात व तेथील कोळसे काढतात. पुन्हां आडव्या अशा लहान वाटा खोदून तिसरा समांतर बोगदा खोदतात व तेथील कोळसे काढतात. याप्रमाणें खोदीत व कोळसे काढीत गेले म्हणजे खाणींतील या बोगद्यांची व वाटांची रचना बुद्धिबळाच्या पटासारखी दिसते. या(लॉंगवॉल) पद्धतीप्रमाणें कोळसा निरनिराळ्या स्वतंत्र बोगद्यांतून न काढतां एकदम काढण्यांत येतो कोळशाच्या पहिल्या थरापासून तो खालपर्यंत भिंतीच्या आकाराप्रमाणें खोदाई करण्यात येते व अशा तऱ्हेनें पहिली भिंत खणून झाल्यावर लगेच त्याच्या मागची भिंत खणण्यास सुरुवात होते. अशा प्रकारचें खोदण्याचें काम एकाच दिशेनें होतें असें नाहीं तर एकदम चारी दिशांनींहि कामाला सुरवात करण्यात येते कोळसा वर नेण्यासाठीहि निरनिराळीं यंत्रें

उपयोगात आणतात. जलपीडन यंत्राच्या साहाय्यानें दहा टन वजनाचा डबा ४५ फूट उंचीवर एका मिनिटात नेण्यात येतो अशा रीतीनें कोळसा खाणीबाहेर काढण्याचें काम झटपट उरकण्यांत येतें. हिंदुस्थानात सामान्यतः 'बोर्ड ॲन्ड पिलर' पद्धतीनें कोळसा काढण्यांत येतो. यूरोपमध्यें 'लॉंगवॉल' नावाची कमी खर्चाची नवीन पद्धत उपयोगात आणतात. परंतु हिंदुस्थानातील कोळशाचे थर जाड असल्यामुळें येथें नवीन सोईस्कर पद्धत चालू करणें सोपें नाहीं. गोंडवणच्या टेंकड्यांची मजबूत शिखरें, क्षुब्धतेचा अभाव व पृष्ठभागावरील वजनाचा हलकेपणा ही परिस्थिति खाणीला फार चांगली आहे. गिरिधीच्या खाणींतून वॉर्डनें सुचविलेल्या दक्षिण स्टॅफोर्डशायर पद्धतीनें कोळसा काढतात. माकम खाणींतील ७५ फूट जाडीच्या थरापासून दक्षिस्टॅफोर्डमधील 'स्क्वेअर वर्क' पद्धतीनेंच कोळसा काढतात. डॅनुडॉट व खोस्टच्या खाणींतून '*लॉंगवॉल*' पद्धत उपयोगात आणतात सर टामस हॉलंड साहेबाच्या मताप्रमाणें इंरियामधील कोळसा राणीगजमधील बाराकर सिरीजच्या कोळशासारखाच असून दोहोंतहि आर्द्रतेचें प्रमाण जवळ जवळ सारखेंच आहे इंग्लंड व वेल्समधील कोळशापेक्षा हिंदुस्थानी कोळसा फारसा कमी दर्जाचा नसतो. कोळशातील राखेचें प्रमाण शेंकडा ६.७ असल्याचें ग्रीव्हर साहेबानीं सिद्ध केलें आहे.

प र दे श चा व्या पा रः—इ स ( १८८८–१८८९ ) साली परदेशातून ८,७७,८४३ टन कोळसा हिंदुस्थात आला व त्याची किंमत २,००,९५ १०५ रुपये द्यावी लागली. या नंतर कोळशाची आयात दर वर्षी कमी कमी होत गेली. १९०६-०७ सालीं तर ४९,४७,४४१ रु. किंमतीचा २,६२६,८६ टन कोळसा आला. १९१८ मध्यें ५४,३४६ टन वजनाचा २०,२०,८३६ रु. किंमतीचा कोळसा इकडे आला. यावरून *हिंदुस्थानात दरवर्षी खाणींतून जास्त कोळसा काढूं लागल्याचें* सिद्ध होतें. आयातींतील पुष्कळसा कोळसा ग्रेटब्रिटनमधून येत असे पण हल्लीं पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेंतून फार येतो. *मुंबई इलाख्यातच* १९०६-०७ साली *आलेल्या* २,६२,२८६ *टन कोळशापैकी* २,२०,३५१ *टन कोळसा खपला.* १९१८ सालच्या ७,८५.१५३ टन निर्गत कोळशापैकीं ५२,०४० टन सिलोन व १०,२७९ टन स्ट्रेट्स् सेटलमेंटमध्यें गेला. बंगालमधील खाणींना कलकत्ता हें अतिशय जवळचें बंदर असल्यामुळें *येथून कोळशाची वाटणी होते.* हिंदुस्थानचा कोळशाचा व्यापार जरी कितीहि वाढला तरी *बंगाल किंवा न्यूइंग्लंड इंग्लंडला लवकरच मागें टाकतील हें* होरेस वॉलपोलाचें भविष्य खरें होईलच असें वाटत नाहीं. *लॉर्ड कर्झननें झेरियाच्या खाणींची तपासणी केल्यानंतर* पुढील उद्गार काढिले– "पश्चिमेस सुवेझ व पूर्वेस सिंगापूर यांपलीकडे हिंदुस्थानातील कोळसा जाणें शक्य नाहीं. कारण त्या ठिकाणीं अनुक्रमें इंग्लंड व जपान येथील कोळशाबरोबर हिंदुस्थानच्या कोळशाला टक्कर द्यावी लागेल. *तथापि त्यांच्या दरम्यान हिंदी कोळशाचा पुष्कळ खप होण्यासारखा आहे* हें मला दाखवावयाचें आहे. व येथील बाजार पुरा काबीज करण्याचा प्रयत्न करणें जरूर आहे असें मला वाटतें"

हिंदुस्थानातील सर्व कोळशाच्या खाणींतून इ. स. १९००, १९०५, १९२०सालीं किती टन कोळसा निघाला तें खालील कोष्टकात दिलें आहेः—

| वर्ष | १९०० | १९०५ | १९२० |
|---|---|---|---|
| आसाम | २१६७३६ | २७७०६५ | ३२५५३५ |
| बलुचिस्थान | २३२८१ | ४१७२५ | ३३९४१ |
| बंगाल, बिहार व ओरिसा | ४९७८४९२ | ७२३४१०३ | ४२०७४५२ |
| ब्रह्मदेश | १०२२८ | ... ... | ... |
| मध्यहिंदुस्थान | १६४४८९ | १५७७०१ | १५८०५१ |
| मध्यप्रदेश | १७२८४२ | १४७२६५ | ४९१२०५ |
| हैद्राबाद | ४६९३९१ | ४५४२९४ | ६९४०८० |
| पंजाब व काश्मीर | ७४०२८ | ६२६२२ | ५८०७८ |
| राजपुताना | ९२५० | ४२९६४ | १८२१६ |

द ग डी को ळ शा पा सू न दि वे ला व ण्या चा ग्या स व डा ब रः—*गव्हर्नमेंट ऑफ इंडियाच्या १९०४ सालीं प्रसिद्ध झालेल्या सांपत्तिक व व्यापारी आकड्यात मुंबई व कलकत्ता* येथील दगडी कोळशाच्या धुराच्या कारखान्यांचा उल्लेख केला आहे. या कारखान्यातून एकंदर ५८१ मजूर काम करीत होते या कारखान्याशिवाय इतर कांहीं खासगी *लहान कारखाने असावे असा समज आहे. ग्यासच्या कारखा*न्यातून बहुतेक इंग्लिश कोळसाच वापरतात व या कारखान्यातून यूरोपसारखे डांबराचे पदार्थ तयार करीत नाहींत.

बत्तीचा धूर व कोळशाचा उर्ध्वपातन क्रिया करताना *कांहीं उडून जाणारें द्रव्य निघतें. तें थिजतांना त्यापासून* पाण्यासारखा पातळ व डांबरासारखा काळा असे दोन पदार्थ निघतात. पातळ पदार्थापासून ॲमोनिया व त्याचे क्षार बनतात व घन पदार्थापासून डांबर होतें. डांबरापासून बेन्झीन, नॅपथॅलिन, फिनॉल, कांहीं अत्तरें व तसेंच पुष्कळ रंग तयार होते.

द ग डी को ळ सा व त्या पा सू न हो णा रा को क— दगडी कोळशास उष्णता देऊन धूर काढून टाकल्यानंतर राहिलेल्या कोळशाच्या भागाला कोक म्हणतात. दिव्यांच्या *धुराच्या कारखान्यात हलक्या प्रकारच्या कोकचें* आड-उत्पन्न निघतें. घरगुती कामाकरितां व सिमेंट व चुनखडीची भट्टी लावण्यास त्याचा उपयोग करितात. कोकमध्यें

जास्त उष्णता देण्याचें शक्ति असल्यामुळें त्याचें महत्व जास्त आहे. शिवाय भाकरीसारख्या होणारा कोळसा कोक करण्यास फार चांगला असतो. बऱ्याच वर्षांपासून राणीगंज झेरिया व गिरिधी येथील खाणींत कोक तयार करितात. कोक तयार करणें म्हणजे दगडी कोळशाच्या फुकट जाणाऱ्या भागाचा उपयोग करणें होय व अशा रीतीनें त्याचा पुरवठा वाढल्यावर धातूंच्या कारखान्याची सहज भरभराट होणें शक्य आहे. कोकचे दोन प्रकार आहेत (१) कठिण व (२) मऊ. कोक तयार करण्याच्या कोळशात शेंकडा ०·५ हिश्शे नायट्रोजन असतो असें गृहीत धरल्यास उघड्या भट्टींत कोक तयार करावयाच्या सध्याच्या पद्धतीनें दर वर्षी हजारों टन नायट्रोजन व्यर्थ जातो असें म्हटलें पाहिजे. या नायट्रोजनपासून अमोनिया सल्फेट तयार केलें असतें तर त्याची किंमत जवळ जवळ २०॥ लक्ष रुपये झाली असती. जाव्हांबेटात उसाची वाढ करण्याकरिता १९०२ सालीं २३,४०० टन अमोनिया सल्फेट लागलें या आकड्यावरून या पदार्थाचें महत्व लक्षात येईल. जर्मनी व अमेरिकेंतील प्रयोगावरून वरील अमोनियाचें महत्व सिद्ध झालें आहे. व त्याप्रमाणें गिरिधी, राणीगंज व झेरिया या खाणींतून अमोनिया तयार करून त्या आड उत्पन्नाचा फायदा करून घेण्याची सोय केली आहे. अमोनियम सल्फेटचा हिंदुस्थानातच खप व्हावा म्हणून येथील शेतकी खात्यानें येथील उसाच्या व इतर पिकात त्याचा उपयोग होतो हें प्रयोग करून सिद्ध केलें आहे.

उत्तम प्रकारच्या भाजलेल्या दगडी कोळशावर सर्व ठिकाणी सारखी झाक मारते. त्यास जडपणा व टणकपणा असतो. हा फोडला असता लांबट रेषा निघतात. याचें विशिष्ट-गुरुत्व बरेंच असावें लागतें. कारण भट्टींत यावर लोखंडाचें वजन पडावयाचें असतें. विशिष्टगुरुत्व कमी असेल तर लोखंडाच्या वजनाखाली चुरून भट्टींतील वायूंची हालचाल होण्यास अडथळा होईल. हा साठवून ठेवण्यास कोरडी जागा लागते. याच्या दोन जाती आहेत —पहिली जात दिवे लावण्याकरता धूर तयार करणाऱ्या कारखान्यातील भट्यातून शिल्लक राहिलेला. दुसरी जातः लोखंड व पोलाद तयार करण्याऱ्या भट्यामध्यें वापरण्यात येणारा याला भट्टीचा भाजलेला दगडी कोळसा असेंहि म्हणतात. चांगल्या जातीच्या भाजलेल्या दगडी कोळशात असलेल्या घटकाचें प्रमाण शेंकडा कार्बन ९३ ते ९४, राख ३ ते ५, ओलावा १, गंधक .७ ते १, असें असतें. वरील प्रमाणात गंधकाचें प्रमाण जरी फारच थोडें आहे तरी तितक्यानें देखील लोखंडास व पिडास अपाय होतो गंधक लोखंडात मिसळल्यानें त्यास ठिसूळपणा येतो. व रस करून ओतलें असता त्यात सोस रहातात.

दगडी कोळसा भाजण्याच्या भट्या —यात मुख्य दोन जाती आहेत यात दगडी कोळसा तापवून भाजतात. (१) या जातीच्या भट्याना "मधपोळें भट्या" असें म्हणतात. यात उपपदार्थ हाती लागत नाहींत. फक्त भाजलेला कोळसा तयार होतो. या तयार करण्यास खर्च फार थोडा पडतो. या फार ठिकाणी प्रचारात आहेत. (२) दगडी कोळसा तापविला असता त्यातून निघणाऱ्या वाफा जमवून त्या एका भांड्यात एकत्र करून त्या वाफावर रासायनिक क्रिया करून त्यातून निरनिराळे पदार्थ काढून घेतात. हें काम ज्या भट्यात होतें त्याना उपपदार्थजनक भट्या असें म्हणतात. या भट्यामध्ये उपपदार्थ फुकट जाऊं न देता धरून ठेवण्याच्या कामात फार सुधारणा झाल्या आहेत. या जातीच्या भट्याची मूळ किंमत जास्त पडते व शिवाय उपपदार्थ काढण्यासाठीं आणखी यंत्रेंहि घ्यावीं लागतात. त्याची किंमतहि अधिक पडते

भाजलेल्या दगडी कोळशाचें आडउत्पन्न – डांबर आणि नवसागर.—नवसागर कोरडा हातीं लागत नसून जलमिश्रित नवसागर हातीं लागतो हें मिश्रण तापविलें म्हणजे नवसागराची वाफ होते व ती सल्फ्युरिक ॲसीडमध्यें मिसळली म्हणजे सल्फेट ऑफ अमोनिया नावाचें खत तयार होतें डांबरापासून नॅफ्था, बेंझोल क्रीओसोट तेल, रंगाचीं तेलें, रंग पिच, इत्यादि जिनस तयार होतात.

जळणाच्या कोळशाच्या विटा —बिकानेर, काश्मीर व इतर ठिकाणच्या हलक्या जातीच्या कोळशाच्या जळाऊ विटा किंवा गोळे करतात असें केल्यानें त्यामधील आर्द्रता कमी होते. युरोप व अमेरिकेंतील कोळशाच्या विटा व गोळे निराळ्याच तऱ्हेनें व इतर पदार्थापासून तयार केलेले असतात। हिंदुस्थानातील हलका कोळसा व चूर याचा उपयोग करण्यासाठीं कोळशाच्या विटा व गोळे तयार करण्याकडे अलीकडे लोकाचें बरेंच लक्ष लागलें आहे.

**कोलिंजन** —यास लॅटिनमध्यें अल्पीनिया गलंगा मराठींत कोळिंजन अथवा कोष्टकोळिंजन व इतर भाषातर कुळिंजन, मोठा कोलंजन, इत्यादि नावें आहेत हें हिमालयाच्या पायथ्यापासून सिलोनपर्यंत सर्व हिंदुस्थानात व ब्रह्मदेशात आढळतें. याचे गड्डे व फळ बाजारात विकले जातात संयुक्तप्रातात चीट छापण्याच्या कामीं याच्या काढ्याचा उपयोग करतात व हा औषधीहि आहे ऑफिसिनेरम म्हणून याची एक जात आहे हें बाजारात कोळिंजन नावानें विकलें जातें याला छोटा मानकीगर किंवा छोटी कुळिंजन शित्तरत्तई, सुखो-दारु ही नावें आहेत. चिनी भाषेंत यास लिआंग कियांग हें नाव आहे हें मूळचें चीनमधील असून तेथून याचे गड्डे हिंदुस्थानात व थोडेबहुत इंग्लंडास जातात याला मुख्य मागणी रशियातील आहे कोळिंजन हे मज्जातंतुपौष्टिक व कामोद्दीपक आहे असें म्हणतात.

**कोळी**—कोळी संधिपाद प्राण्याच्या वर्गांत मोड<br>या प्राण्याच्या वर्गांतील अष्टपाद प्राण्याच्या ७

यांचा अंतर्भाव होतो. या उपवर्गांतील प्राण्यांना स्वतंत्र असें डोकें नसतें. डोकें व छाती यांचा एकजीव असून डोळे साधे असतात. कोळ्याचें पोट व छाती यांमध्यें कमर असते. यांच्या शरीरावर शृंगमय कवच असून पोट मऊ असतें. कोळ्याला आठ पाय असून ते फार बारीक, लांब व केंसाळ असतात. यांच्या पायांस पेरीं असून शेवटीं नख्या असतात. कोळी हा प्राणी डोकें खालीं करून चालतो. त्याचें तोंड डोक्याखालीं असतें. त्याच्या तोंडास जबड्यासारखे भाग असून शेवटीं नांगीसारखे आकडे असतात. या आकड्यामध्यें विष असतें. या विषारी आकड्यांनीं तो कृमिकीटकांना दंश करतो व त्यांना मारून टाकतो. कोळ्याचें हृदय नळीसारखें असून तें पाठीच्या भागाकडे असतें. पोटाखालीं दोन भोकें असून त्यांतून आंतील पडद्यांत हवा शिरते. कोळ्यांतील नर हा मादीपेक्षा लहान आकाराचा असतो. मादीचा आहार नरापेक्षा मोठा असतो व प्रसंग पडल्यास ती नरालाहि खाऊन टाकण्यास मार्ग पुढें पहात नाहीं. त्यामुळें नर हा मादीजवळ घाबरत घाबरतच येतो. नराचा आकार लहान असल्यामुळें मादीनें त्याच्यावर हल्ला केल्यास त्याला सुटून जाण्यास या लहान आकाराचा फार फायदा होतो. कोळ्याची जात बहुप्रसव आहे. मादी ही वेळेस सहापासून शेंकड्यापर्यंत अंडीं घालते. हीं अंडीं मादी आपल्या कोशीष्टकांत जपून ठेवते.

कोळी आपलें जाळें मोठ्या कुशलतेनें विणतो. या जाळ्याचें दोन प्रकार आहेत. स्वतःला राहाण्याकरितां जें जाळें तो बनवितो तें नळीसारखें असून त्याचें झडप असतें. भक्ष्य पकडण्याचें जाळें चक्राकार असतें. कोळ्याच्या पाठीवर सहा टेंगळें असतात व या टेंगळांना पुष्कळ छिद्रें असतात. या छिद्रांतून चिकट रस बाहेर येऊन तो वाळतो. पुढें त्याचा तंतु बनतो व त्या तंतूंना पीळ पडून धागा बनतो. हा धागा काढतांना एखाद्या पदार्थावर तो आपलीं टेंगळें दाबतो व रस चिकटवितो व आपण दूर जाऊं लागतो. त्यामुळें धागा निघतो. आपलें जाळें बनविण्याच्या कामीं कोळ्याला अखेरच्या पायाचा फार उपयोग होतो.

'येरीडिडी' जातीच्या कोळ्याचें विष फार जहाल असतें. त्यामुळें तो कृमींना तावडतोब मारूं शकतो. या जातीचा कोळी मनुष्याला चावला तर त्यामुळें मनुष्याच्या अंगाचा दाह होतो. क्वचित् माणसें दगावतातहि. खूप नाचल्यानें हें विष उतरतें असें म्हणतात. या जातीचा कोळी उष्ण प्रदेशांत सांपडतो. ऑस्ट्रेलिया, चिली, न्यूझीलंड, दक्षिण यूरोप इत्यादि देशांतील लोक या जातीच्या कोळ्यांना फार भितात.

कोळी उपद्रवी कीटकांना आपल्या जाळ्यांत पकडून ठार करतो. हा प्राणी मांसाहारीहि आहे. काहीं जातीचे कोळी आपल्या जाळ्यांत पक्ष्यांनाहि पकडून ठार मारतात. पण कोळी हा जसा दुसऱ्यांना मारतो तसें याला मारण्याकरितांहि पुष्कळ प्राणी टपलेले असतात. कीटकभक्षक प्राणी साप, सिवाणू हे नर या कोळ्याचा फन्ना उडवतातच, पण त्यांपक्षांहि त्वक्पक्ष कीटक वर्गाच्या काहीं जातींच्या प्राण्याकडून यांचा फार संहार होतो. गांधीलमाशी तर यांना नाहिं नाहिं करून सोडते. कोळी हे बहुप्रसव असल्यानें त्यांचा संहार करणारे प्राणी आहेत म्हणूनच ठीक आहे.

कोळ्याच्या जाती पुष्कळ आहेत. काहीं कोळी जमिनीवर रहातात, काहीं पाण्याच्या कडेस खडकावर रहातात व पाण्यावर तरंगून तेथील कृमींचा नाश करतात. काहीं कोळी रेशमाचीं जाळीं विणणारे असतात. काहीं साधीं जाळीं विणणारे असतात. काहीं जातीचे कोळी अजीबात जाळीं करीत नाहींत. उष्ण प्रदेशांतील एक जातीचा कोळी जमिनीला भोंक पाडून आंतून तें जाळ्यानें लिंपतो, व वर झडप लावतो.

**कोळीजात**—हिंदुस्थानांत कोळी जातीची एकंदर लोकसंख्या ३१॥ लाख आहे. मुंबई इलाख्यांत ती २२ लाखांच्या वर असून त्यांची वसति दक्षिण हिंदुस्थान, गुजराथ, ठाणें, कुलाबा, वऱ्हाड, खानदेश इकडे आहे. यांचा दर्जा कुणब्यांहून खालच्या प्रतीचा आहे ( रे. ज. विल्सन—फ्रॅग्मेंट्स् १८७५ ) महाराष्ट्रांत साधे कोळी व डोंगरी कोळी असे दोन प्रमुख भेद असून पुन्हा त्यांत सोनकोळी, महादेव कोळी वगैरे आणखी पोटभेद आहेत. त्यांची थोडक माहिती त्यांच्या वसतीच्या व इतर माहितीसह खालीं दिली आहे.

कोळी हे बारा बलुत्यांपैकीं असून बलुत्याचा हक्क त्यांना मिळतो. हे उच्च वर्गांतील लोकांकडे पाणी भरतात व मासे पकडून त्यावर उदरनिर्वाह करतात. कोणी कोणी नदीवरच होड्यांतून अगर नदीकांठीं झोपड्यांतून रहातात. डोंगरीकोळी हे मावळ (सह्याद्रींतील) व कोंकण इकडे आहेत. हे जंगलांतील कंदमुळें व शिकार यांवर उपजीविका करतात. काहीं शेतीहि करतात. त्यामुळें हे इतर हिंदु शेतकरी जातींत मिसळले गेले आहेत. डोंगरी कोळ्यांत, धुडिया, चौधरी, वारली, कातकरी, दुबळा, ठाकुर या पोटजाती आहेत असें रे. विल्सन म्हणतो. यांच्यापैकीं ढोरकोळी म्हणून एक पोटजात आहे, तिला ( ती मेलेल्या जनावराचें मांस खात असल्यामुळें ) सर्वांत हलक्या दर्जाची मानतात. महादेव व मल्हार कोळ्याचें मराठ्यांशीं साम्य आढळतें. काश्मीर प्रांतांत ही जात थोडी असून ती शेतकी करते. व तिकडे तिला कोहली असें नांव आहे. ते आपल्याला पूर्वीचे क्षत्रिय समजतात. नर्मदेच्या उत्तरप्रांतींहि यांची बरीच वस्ती आहे.

संस्कृतांत कोल शब्द येतो, तोच या कोळी जातीचा निदर्शक असावा असें विद्वानांचें म्हणणें आहे. कोलापुर, कोलवन वगैरे प्रांत हा यांचा मूळ देश असून हे येथील

मुळचे ( अनार्य ) रहिवासी असावे असा काहींचा तर्क आहे. ( वि ज्ञा. विस्तार पु २३. पृ ११० ).

कोळ्यातहि कदम, पोवार, क्षीरसागर, दळवी, गायकवाड, शिरके, जाधव, भोइटे, शेलार वगैरे मराठयाप्रमाणेंच आडनावें आहेत. मराठयामध्यें व कोळयामध्यें पूर्वी शरीरसंबंध होत असत अशी दंतकथा कोळयात प्रचलित आहे कोंकणातील जे कोळी शेतकी करतात त्याना 'आगरी कोळी' व जे मळा लावितात त्याना 'माळी कोळी' म्हणतात. ( वि ज्ञा नि. पु. ११ अं. २ )

वऱ्हाडातील कोळी म्हणात कीं "मासे पकडून अगर विकून निर्वाह करणारी कोळ्याची एक पोटजात आहे, तिचा इतर पोटजातींशी अनोदकाचा संबंध नाहीं, तसेंच पोषाख वगैरेंत कोळ्याच्या इतर पोटजातींशींहि तिचें साम्य नाहीं. वऱ्हाड, मध्यप्रांत व महाराष्ट्रात मासे धरून व ते विकून निर्वाह करणारी भोई या नावाची एक स्वतंत्र जात आहे. तिच्यातहि अनेक पोटजाती आहेत. ही भोई जात सर्वच बाबतींतहि मागसलेली आहे. कोळी जातीचा भोई जातीशीं काहीं संबंध नाहीं." ( रा.उ के जाधव-एलिचपूर याच्या कडून आलेल्या माहितीवरून ) महाराष्ट्रातील मराठी-भाषा बोलणाऱ्या कोळ्याची लो. सं. ३ लाख आहे. याच्यातील मुख्य जाती पुढील भागात रहातात मराटे कोळी—वस्ती निजाम इलाख्यातील मराठवाडा व मुंबई इलाख्यातील सह्याद्रीच्या पूर्वेकडील प्रांतात. रहाणारी याच्यात वतनदार देशमुखादि लोक आहेत पण फार थोडे. धंदेः—शेती, पाणी भरणें व नावा हाकणें. मराटेखार कोळी—वस्ती वऱ्हाडातील पूर्णा नदीकाठचा प्रदेश व खानदेश. याच्यात बरेचसे वतनदार असून ते शेती व इंग्रजी होण्यापूर्वी मीठ विकविण्याचा धंदा करीत. त्यावरूनच त्याना खार हें नाव मिळालें असावें. सोनकोळी—वस्ती उत्तर व दक्षिण कोंकणात असून याचा मुख्य धंदा मासे मारणें व जहाजें चालविणें हा होय. महादेव, मराठे व मराठेखार या पोटजातींत अनोदक व्यवहार आहे. सर्व पोटजातींचे विवाहादि संस्कार ब्राह्मणभिक्षुकच करतात. जातिसंबंधाचे काहीं नियम मोडल्यास त्याचा निकाल पंचायतीमार्फत होतो परंतु धार्मिक नियम मोडल्यास त्याचा निकाल ब्राह्मणभिक्षुक शास्त्राधारें करतात. सर्व पोटजातींच्या सामान्य व गावपंचायती आहेत महादेव, सोन व मल्हार या पोटभेदात सामान्यपंचायतीचा हक्क वंशपरंपरागत चालतो पंचाना पाटील, मेहतर किंवा महाजन म्हणतात. काही पोटजातींत निवाड्याचीं देवळें किंवा मठासारखीं स्थळें असून त्याना इनाम जमिनी मिळालेल्या आहेत. सर्व पोटजातींत पुनर्विवाहाची चाल असून रखेलीपासून झालेल्या संततीची जात कोळीच धरली जाते, मात्र त्या जातीस लहानताटे, अर्धामासे किंवा कडु म्हणतात. या कोळी जातीचा स्वतंत्र इतिहास नाहीं. माल्लतारण ग्रथात म्हटलें आहे कीं शालिवाहन राजाच्या एका कोळी सरदारानें पंढरपूर हें वसविलें त्याच सरदाराचे वंशज तेव्हापासून आतापर्यंत पंढरपुरच्या पुंडलिक व मल्लिकार्जुन या देवाची पूजा करून तेथील उत्पन्नहि घेतात. या जातीचा एक प्राचीन मठ 'ऋषिमठ' नावाचा वऱ्हाडात दर्यापूर तालुक्यात सामदे या गांवी आहे. मराठी राज्यात मावळे लोकांच्या फौजेंत व आरमारातहि कोळी लोक पुष्कळ होते. कोळ्यांचीं बहुतेक कुलदैवतें देवी, महादेव व मल्हारीमार्तंड ही आहेत जातींतील सुज्ञ लोकाच्या आपण क्षत्रिय आहों असा समज आहे" ( उ. के जाधव यानीं दिलेली माहिती ).

वऱ्हाडांतील कोळी हे भील लोकाचे संबधी असावेत असें मे. रसेल व हिरालाल म्हणतात. हे लोक पूर्वी डोंगरातील मार्गांचें रक्षण करीत असत. चौदाव्या शतकात मुसलमानाच्या त्रासामुळें इकडे आलेल्या बऱ्याच रजपुतांनीं याच्या मुली केल्या. त्याची संतति आपल्यास राजपूत म्हणविते. मध्यप्रांतात याच्या जाती आहेत त्या सूर्यवंशी, मल्हार, भिलावाकोड व शिंगाडे या होत. बऱ्हाणपूर भागात काहीं कोळी मुसलमान झालेले आहेत याच्या लग्नात एका पाटपाभोंवती वधुवरानीं सात प्रदक्षिणा घातल्या कीं लग्न पुरें होतें. वाङ्‌निश्चयाच्या दिवशीं वराच्या बापास वधूगृहीं उंबरठयात ठेंच लागणें हा एक शुभमुहूर्त मानितात बायकोच्या व्यभिचारामुळें काडी मोडता येते, नंतर तिनें जर आपल्या जाराबरोबर पाट लाविला तर जाराने १०० रु. दंड जातीस दिल्याखेरीज त्या दोघाना जातींत घेत नाहींत विवाहित स्त्रीनें व्यभिचार केल्यास तिला सवासन म्हणतात नेमाडातील कोळ्याचीं कुलदेवता इच्छापुरची देवी असून त्या ठिकाणीं पूर्वी गळ घेत असत. याच्यात प्रेतें पुरतात. हे लोक गोमास सोडून वाटेल तें खातात व दारूहि पितात ( कास्ट्स् ट्राइब्ज. सी. पी—रसेल व हिरालाल).

नाशिक जिल्ह्यात मल्हार, ढोर व राज या तीन जाती आहेत याचा निर्वाह बहुतेक शेतीवर असून हा वर्ग खाऊन पिऊन सुखी आहे. जात्या चपल व धाडशी असल्यानें याच्यांत चौर्यकर्माची लालसा एके काळीं बरीच वाढली होती. इ. स. १८४५ साली राघोजी भांगऱ्या यानें या जिल्ह्यात सर्वत्र लुटालूट करून धुमाकूळ माजविला होता. त्यानें मारवाड्याना लुटण्याचा व त्यांचीं नाकें कापण्याचा सपाटा लाविला होता. शेवटीं त्याला पंढरपुरास पकडून पुढें फाशीं दिलें इकडील कोळ्याचा लग्नविधि व आचार कुणब्याप्रमाणेंच असतो मुलीला माहेरकडून मिळालेले दागिने हे हक्काचे व नवऱ्याकडून मिळालेले हे उसने असतात अशी एक विचित्र समजूत याच्यांत आहे ( नाशिक ग्याझे. ).

ठाणें जिल्ह्यात मुख्यतः महादेव कोळी हे प्रमुख
जिल्ह्यातील जव्हार संस्थान महादेव कोळ्यांचेंच
रफ़ शिलजीनें इ. स. १३४७ त येथील कोळ्यास
१. कबूल करें असें म्हणतात. परंतु कालदृष्टया

यासरद वाटतें. याची इकडील सत्ता पोर्तुगीज या भागांत येई-पर्यंत अबाधित होती व फिरंगी इकडे आले तरी त्यांना या जव्हारकराचें थोडें फार भय असे. अठराव्या शतकांत-मात्र पेशव्यांनी जव्हारकराचा बराचसा मुलूख घेतला. आगरी व सोन याखेरीज आणीक बारा (कोळ्यांच्या) पोटजाती या जिल्ह्यांत आहेत. त्या पुढीलप्रमाणे (१) वाड (२) चार्चा (३) ढोर किंवा टोकरे (४) डोंगरी (५) खार (६) महादेव (७) मल्हारी किंवा चुंबळी ऊर्फ कुनम अथवा पानभरी (८) मारवी (९) डोंगरी किंवा मेटा (१०) राज अथवा येन (११) सोलेसी ऊर्फ बाळा किंवा काथी, लालंलगुटी (१२) ठाणकर. यांची थोडी माहिती पुढें दिली आहे. वाडः–धंदा शेती किंवा मजुरी. हे लोक चोरीहि करतात. चार्चीः—हे काठेवाडांतील मूळचे असावेत; व्यवसाय शेती व मजुरी. हे मेहनती असून यांचे कुलदैवत ठाकुरजी व महालक्ष्मी होय. ढोरः—हे गोमांस खातात म्हणून याना ढोर म्हणतात. बांबू तोडण्याच्या धंद्यावरून यांना टोकरे नाव मिळालें. हे पक्के दरवडेखोर आहेत. यांचें लग्न ढोर कातकऱ्याप्रमाणें ज्ञातींतील माणसें लावितात. डोंगरीः—उपजीविका शेतकी व मजुरी; हे इतर पोटजातींच्या हातचें पाणी पीत नाहींत. महादेवः–निजामच्या राज्याच्या पश्चिम सरहद्दीवरील महादेव व बालाघाट हें यांचें मूलस्थान असावें. तेथून ते पुण्याकडे येऊन तिकडून कोंकणांत पश्चिम व उत्तर भागाकडे चौदाव्या शतकाचे सुमारास पसरले. पापेरा नावाचा त्यांचा एक नाईक एका सिद्धाच्या आज्ञेनें जव्हारास येऊन तेथील वारली राजाकडे येऊन तेथील वारली राजावर स्वामित्व मिळवून जव्हार संस्थानचा मूळपुरुष झाला. यानें गंभीरगड घेऊन दिल्लीवर मोंगलाकडून या भागांतील बावीस किल्ले व त्याखालील प्रांत जहागीर मिळविला अशी एक दंतकथा आहे. या जातींत एकंदर २४ घराणीं असून त्यांच्या शाखा दोनशेवर आहेत. यांच्यात देशमुख जहागीरदार पाटील वगैरे आहेत. पूर्वी इकडे मराठे व कोळी यांच्यांत लग्नें लागत. हे लोक काटक व मजबूत असून यांच्या स्त्रिया नाजूक व रेखीव अवयवाच्या आणि कुणबिणीपेक्षाहि सुरेख असतात. हे पोषाखाचे फार शोकी आहेत. यांचा मुख्य धंदा शेतीचा व शिपाईगिरीचा आहे हे हुषार, चाणाक्ष तीव्र स्मरण शक्तीचे असून बोलण्यांत म्हणी व अलंकार वापरतात. हे स्वातंत्र्यप्रिय असल्यानें त्यासाठीं धडपडहि करतात. पूर्वी मराठी राज्यात यांच्यातील शिपायांनीहि लष्करी बाणा पाळल्याचें ऐकण्यात आहे. इ. स. १८३१ मध्यें लक्ष्मी घाटगे या स्त्रीनें रामोशांशीं पुष्कळ दिवस टक्कर दिली होती. पेशवाईपूर्वी हे लिंगायतधर्मी असून पेशवाईत हे सनातधर्मीय झाले. यांचे कुलदैवत खंडोबा, भैरोबा व भवानी आहे. यांचा जादुमंत्रटोणा यावर भरंवसा आहे. भयकोनें नवरा सोडून परजातींत प्रवेश केल्यास तिची उत्तर क्रिया करून मग नवरा दुसरें लग्न करतो. आकस्मिक मेलेल्यास किंवा रोगानें फार दिवस खितपत पडून मेलेल्यासच जाळतात. यांच्यांतील पंचायतींस गोतरणी म्हणत. त्याचे सहा सभासद असून मुख्याला रगतवान उपाध्यक्षाला मेतल व इतराना सावला, डाल्या, हुडक्या व मडक्या अशीं नावें असत. मल्हारीः—हे सर्व कोळी जातींत उच्च व निर्मळ समजले जातात यांच्यात जाधव, पोवार, गायकर, केरव वगैरे आडनावें आहेत गावकऱ्यांना व प्रवाशांना हे पाणी पुरवितात म्हणून याना पानभरी, डोक्यावर पाण्याची घागर वाहताना चुंबळ घेतात म्हणून चुंबळी व कुणब्यांशीं क्वचित रोटीव्यवहार करतात म्हणुन कुनम अशीं दुसरीं नावें आहेत. हे शेतीहि करतात मारवीः–पूर्वी हे पालखी, मेणे वगैरे वाहत असत; सध्या हे मजुरी व पाणी भरण्याचें काम करतात. मेटाः–याना डोंगरीहि म्हणतात. मराठी राज्यात हे खलाशी व नाविक होते. स. १८३६ पर्यंत सुद्धा यांच्यापैकीं सधन लोक मलबार किनाऱ्याशीं व्यापार करीत होते. हे फार दारूबाज आहेत. राज.–पूर्वी हे कोळीराजाच्या पदरीं नौकर असल्यानें व यांच्याशीं त्याचा बेटीव्यवहार होत असल्यानें याना राज हें नाव मिळालें. पूर्वी यांच्या जातीचा मुख्य नाशिक जिल्ह्यांतील वाघदरा गावीं रहात असून त्यास सरनाईक म्हणत असत. सोलेसीः–धंदा मजुरी व शेतकी. ठाणकरः– हे फिरंग्याच्या कारकीर्दीत बाटले गेले. स. १८२०–२१ सालीं पटकीची साथ आली असता, त्यावेळीं यांच्यापैकीं बरेचजण पुन्हा हिंदु होऊन खंडोबा व भवानीची पूजा करू लागले आणि विवाहविधि वगैरे ब्राह्मणाकडून करवूं लागले. याप्रमाणें ठाणें जिल्ह्यांतील पोटजाती आहेत. यांची एकंदर लो. सं. ८ हजार असून हे कोळी दिसण्यात सर्वसाधारण कुणब्याप्रमाणें असतात काहीं (विशेषतः स्त्रिया) कुणब्यापेक्षा-गौर असतात. हे मराठी साम्राज्यात नावाजलेले दर्यावर्दी असून मराठी आरमारात नोकर असत. यांच्यात देवकेंहि आहेत व लग्नें देवकावरून लावितात. यांच्या जातीचा मुख्य अलिबागेस रहतो, त्यास वाघपाटील असें नाव आहे. (ठाणें ग्याझे).

गुजराथेंत कोळ्यांच्या जाती व पोटजाती अनेक असल्यानें त्यांचें वर्गीकरण करणें कठिण आहे. उच्चवर्गांत पाटाची चाल नसून ते आपल्या मुली रजपुताना देतात. पागी, कोतवाल, पाटणवाडिया अशा हलक्या कुळ्यात ते शरीरसंबंध करीत नाहींत. धाराळ, तालब्द इ. सर्वसाधारण कुळ्या यांच्यात आहेत. मात्र दिराशी पाट लावण्याची चाल यांच्यांत रूढ असून सर्वसाधारण चालीरीती स्थानिक हिंदूप्रमाणेंच आहेत. पालनपूर, महिकाठा, पंचमहाल व कच्छ या भागातील लोकांत कुळें आहेत. मात्र लग्नें कुळावरून किंवा आडनांवावरून होतात हें नक्की समजत नाहीं.

आहेत. हे मांसाहार करीत नाहींत. गुजराथेंतील सर्व कोळ्यांत यांची जात श्रेष्ठ समजली जाते. हे फक्त आपापल्या जातींतच लग्नें लावितात. शिआल म्हणून जी जात आहे ती काठेवाडच्या दक्षिणकिनाऱ्यालगतच्या शिआल बेटांत रहाते. वलकिया हे काठेवाडांतील नलक जिल्ह्यांत रहातात. याप्रमाणें गुजराथेंतील बहुतेक कोळ्यांच्या जातींची विशेष माहिती दिली आहे त्यांची सामान्य माहिती पुढें देत आहों:—

यांचा जीवनक्रम निरनिराळा असल्यानें व रजपुतांशीं कित्येकांचा संबंध येत असल्यानें यांच्या चर्येत बराच फरक आढळतो. तळवद्यांची चर्या व चालीरीती कुणब्यांप्रमाणें सर्वसाधारण आहेत. पुष्कळी यांचे शरीरसंबंध उच्च वर्गाशीं झाल्यानें तेहि तळबदाप्रमाणें गौरवर्ण आहेत कोळी राजे हे बहुधा रजपूत पुरुष व कोळी स्त्री यांचे वंशज असून धष्टपुष्ट, चपळ, धूर्त व कारस्थानी असतात या जातींतील बहुतेक स्त्रिया सडपातळ व सुरेख असतात. यांची भाषा अशुद्ध गुजराथी असते. यांचा पेहराव दर्जाप्रमाणें निरनिराळा असतो दागिन्यापैकीं ताईत हा पुरुष वापरतात व बायका हस्तिदंती बांगड्या, सोन्याची नथ,चांदीच्या वेळा वापरतात. सुखवस्तु लोक ज्वारी व बाजरी खातात, कधीं कधीं खिचडीहि खातात डोंगरातील कोळी हंगामाप्रमाणें आपला आहार बदलतात बहुतेक सर्व कोळी मद्यमांससेवी आहेत. पाटणवाडिया हे म्हशींचें मांस खाणारे असल्यानें त्यासाठीं ते म्हशींची चोरीहि करितात. कांहीं कोळी अफीमबाजहि आहेत. यांचा धंदा मासेविक्रीचा व शेतीचा आणि कांहींचा लुटालूट करण्याचा आहे. पूर्वी बहुतेक कोळी दर्यावर्दीपणा करीत असत. स्वराज्यात हे आरमारीखात्यांत नौकर असत. स्वराज्य गेल्यानंतर अंगांतील शौर्यधाडसाचा उपयोग नाहिंसा झाल्यानें चौर्यकर्माच्या ठिकाणीं होऊं लागला असावा. यांचीं मुख्य दैवतें इंद्र व हातमल हीं आहेत. शिवाय हिंगलाजदेवी, खोदिआर, कुकडी वेराई, मेराडी या त्यांच्या देवता आहेत. महिकाठ्याकडे गाईची पूजा करितात. एकादशी व अमावास्या दर्शास यांचा सुटीचा दिवस असतो. यांचा गुरु पाटण येथें रहातो कांहींजण बीजपंथी रामसनेही व स्वामीनारायण पंथाचे झाले आहेत. अलीकडे स्वामीनारायणांत जातिभेदाचें महत्त्व वाढल्यानें कांहीं कोळ्यांनीं तो पंथ सोडला आहे. काठेवाडी कोळी मोहोतीमार्गी असून ते द्वारका, प्रभासपाटण वगैरे ठिकाणीं यात्रेस जातात. ते ब्राह्मणांना पूज्य मानून त्यांना लुटीत नाहींत. त्यांच्याकडून राखीपौर्णिमेस राखी बांधून घेतात. ते खळ्याजवळ आल्यास त्यांना धान्य देतात. यांचे उपाध्याय श्रीमाळी व औदीच ब्राह्मण असतात. हे धर्मभोळे असून भुतारवेतावर व जादुटोण्यावर आणि पंचाक्षऱ्यावर विश्वास ठेवितात मूल जन्मल्यावर त्याला गुळाची एक लहान गोळी देऊन सर्वत्रांस गूळ वाटतात. षष्ठीपूजनाच्या दिवशीं षष्ठीबरोबर ब्रह्मदेवाचीहि पूजा करून त्याच दिवशीं मुलाचें नांव ठेवतात. सुखवस्तु कोळ्यांत सोहेर सव्वा महिना धरतात

यांच्यांत लग्नाचे चार प्रकार आहेत. ( १ ) कुमार व कुंवारीण यांचा प्रथमविवाह. ( २ ) विधुर व विधवा यांचें नात्र. ( ३ ) सोवासन म्हणजे पहिला नवरा जिवंत असतां दुसरा करणें. ( ४ ) दिअर्वतु(दीरवधु) म्हणजे धाकट्या दिराशीं लग्न करणें. रेवाकांठ्याकडे वाङनिश्चय झाल्यानंतर जोंपर्यंत देवीपक्षी उजव्या हाताकडे दिसत नाहीं तोंपर्यंत लग्न लावीत नाहींत. मध्यप्रांतातल्याप्रमाणें इकडेहि वराच्या बापास वधुगृहीं उंबरठ्यावर ठेंच लागणें शुभकारक समजतात. लग्नमंडपांत प्रवेश करण्यापूर्वी वरावरून नागर, रवी, बाण वगैरे जिन्नस नवरीची आई ओंवाळते. लग्नसमयीं नवरीच्या एका हातांत बाण व एका हातांत माळ असते. ठाकूरकोळ्यांत रजपुतांप्रमाणें मुलीचें लग्न प्रथम तलवारीशीं लावितात. नात्रलग्नांत नवरदेव विधुर असावा लागतो. ब्रह्मचाऱ्यानें विधवेशीं लग्न केल्यास तो जातिबहिष्कृत होतो. नात्राचा समारंभ साधा असतो. तो विधवेच्या बापाच्या घरीं होतो. वधुवर समोरासमोर बसतात व ब्राह्मण उपाध्याय त्यांचे हात नात्रा–नाडा( साबडा दोरा )नें बांधून त्यांना मधोमध ठेवलेल्या मडक्यांतील दिव्याकडे पाहण्यास सांगतो, म्हणजे हा समारंभ आटपतो. सोवासन म्हणजे एक पति जीवंत असतांना दुसरा करणें; यांत पहिल्या नवऱ्याला पंचायत ठरवील त्याप्रमाणें पैसा द्यावा लागतो. पहिल्या नवऱ्यानें काडी मोडून दिल्यावर विधवा आपल्या डोकीवर पाणी भरलेले दोन तांबे घेऊन भावी नवऱ्याच्या घरीं जाते व तो ते तांबे उतरून दाराबाहेर ठेवतो, इतकें झालें कीं लग्नविधि संपतो. दिअर्वतुविवाह फार प्रचारांत नाहीं त्याला आमेष्टाची संमति घ्यावी लागते. विधवेस लहान मुलें असल्यास तिन्हाईत पुरुषाशीं लग्न लावण्यापेक्षा धाकट्या दीराशीं लग्न लावणें बरें असें त्यांना वाटतें मात्र तो दीर तिच्याहून वयानें मोठा व विधुर असला पाहिजे पुरुषाप्रमाणें बायकोलाहि काडी मोडून देतां येते व नवरा सोडतां येतो.

गुजराथेंतील कोळी प्रेतें जाळतात. मृताचा पुत्र लहान अगर दरिद्री असल्यास बाराव्या, अकराव्या व बाराव्या दिवशीं श्राद्धादि विधी न करितां, तो दाराबाहेर येऊन नुसते हात चोळतो. एक वर्ष होईपर्यंत मृताच्या घरांतील वडील स्त्री, तोंडावर ओढणी घेऊन रोज सकाळीं पांच दहा मिनिटें रडते. जातींतील सर्व भांडणें पंचायत अगर पुढारी तोडतात. [ गुजराथी कोळ्यांची सर्व माहिती बाम्बे ग्याझेटियर व्हॉ. ९ भा. १ यांतून घेतली आहे ]

सो न को ळी.—या जातीबद्दल वेसावे ता. साष्टी जि. ठाणें येथील रहिवासी व सोनकोळी सार्वजनिक परिषदेचे चिटणीस रा. पोशा गोविंद नाखवा यांनीं आमच्याकडे जी माहिती पाठविली आहे, तिचा थोडक्यांत

साराश पुढीलप्रमाणें आहे "या जातीचें मुख्य ठिकाण चंपावती ( चेऊल, जि अलिबाग ) हें होय याची वस्ती रत्नागिरी, कुलाबा, ठाणें व मुंबई बेट या चार भागातील समुद्र काठच्या सुमारें दीडशें गावीं आहे याचा मुख्य धंदा मासे धरण्याचा मोठे मासे फक्त दर्यांत सापडतात म्हणून हे दर्याकाठींच राहतात यांची लो स ३५ हजार आहे हे लोक जाळ्यांनीं मासे धरतात व याच्या बायका ते मासे ताजे किंवा वाळवून बाजारात विकतात याच्या जाळ्यांचीं नावें पुढीलप्रमाणें आहेत —डोलें, बोकशी, जाळ, पास, तिबोटें,वागूर,कानजावळें,जावळें,हेडा,पाग,घोळ्वें, खादा वगैरे सोनकोळी नावाबद्दल शिवनिबंध नामक ग्रंथांत पुढील कथा आहे परमेश्वराच्या सोहंध्वनीपासून एक पुरुष निर्माण झाला, त्याला सोह अगर सोम किंवा मयातऋषि असें नाव मिळालें त्याची मुलगी अर्चिना ही कश्यपास दिली, तिला मार्धव म्हणून मुलगा झाला याच्या वशजास सोम नाव पडलें त्याची प्रवृत्ति तपापासून सुटून हिंसेकडे होऊं लागल्यानें मयातऋषीनें त्यास मासे मारून निर्वाह करण्यास सांगितलें त्याप्रमाणें तो करू लागल्यावर त्याचें सोम नाव जाऊन सोन अगर सोनकोळी हें नाव पडलें सोनकोळी जात कोणत्या वर्णाची आहे याबद्दल निश्चित सागता येत नाहीं काहींचें म्हणणें हे वैश्य व काहींचें म्हणणें हे शूद्र आहेत ' ही जात मासे मारण्यासारखें हिंसाकर्म करीत असल्याकारणानें प्राचीनकाळापासून या लोकास गायत्री व यज्ञोपवीत याचा अधिकार राहिला नाहीं व त्याचें या जातीच्या लोकाकडन आजपर्यंत ग्रहण व धारणहि झालेलें नाहीं आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य याच्यात जो पंचमहायज्ञ करण्याचा नित्यक्रम आहे, तोहि याच्यात नाहीं, अतएव ही सोनकोळी जात शूद्र वर्णांत गणिल्यास काय वावगें होणार आहे ' रा. नारबा याची माहिती अशी "यांची प्रथम वस्ती कुलाबा जिल्ह्यात होती नतर तेथून ते ठाणें व रत्नागिरी जिल्ह्यात पसरले ज्यावेळीं आग्र्यांचें प्राबल्य कोंकणात होतें, त्यावेळीं त्यांनी सोनकोळ्यांच्या बायकांवर एक ' जोवनपट्टी ' किंवा ' चोळीपट्टी ' बसविली बायकांनीं अगात चोळ्या न घालता अगावरून लुगडयाचा पदरच घ्यावा व ज्याना चोळ्या घालावयाच्या असतील त्यांनीं काही ठराविक कर आंग्रेसरकारात भरावा अशा या कराचा अर्थ होता त्यामुळें बायाचा छळ होऊ लागला म्हणून कुलाबा जिल्ह्यातील थळ वगैरे गावांतील वस्ती उठून मुंबई, ठाणें, चिंबई, वेसावें इकडे येऊन राहिली हे लोक हल्लीं आपणास थळकर सोनकोळी म्हणवितात. यांचीं कुलदैवतें जेजुरीचा खंडोबा व कार्ल्याच्या लेण्यातील एकवीरा देवी हीं होत या पथाचा प्रवर्तक कुलाबा जिल्ह्यातील मौजे वरसोली गांवचा पूर्वीचा कोणी कान्हो नावाचा भगत होता हा स्मार्तपंथांतर्गत खंडोबाचा पथ असून याच्या धर्मगुरूची गादी वरील वरसोली गावीं आहे व गादिवर वरील भगताचाच वंशज अधिष्ठित आहे सोनकोळ्याहून भिन्न अशा कोळ्याच्या जाती पुढीलप्रमाणें आहेत —गावकर सोनकोळी, वैती, मांगेला, मेंढी, खारवी, टोरलेकर, न्हटाऱ्कर, गावीट, पान, राज, मार्तंड, डोंगरी, मिठ, भोईर, कराडे व किरिस्ताव या जाती बहुतेक मासळी मारून त्यावर निर्वाह करणाऱ्या व थोडा शेती वगैरे दुसर धंदे करणाऱ्या आहेत किरिस्ताव हे जरी ख्रिस्ती धर्म पाळतात तरी ते हिंदू धर्महि थोडाफार आचरतात सोन, गावकरसोन वैती व मार्तंड या चौघात परस्पर अन्नोदकव्यवहार चालतो. मात्र हे चाही इतर कोळ्याच्या घरीं जेवीत नाहींत लग्नव्यवहाराविषयीं म्हटल्यास ज्या जातींतील स्त्रीपुरुषाचा त्याच जातींतील स्त्रीपुरुषांबरोबर विवाह होत असतो मध्यतरीं सोन व गावकरसोन याच्यात लग्नें होत, परंतु हल्लीं ही चाल बद झाली चालली आहे मात्र कुलाब्याकडील करंज मुलखांड व ठाण्याकडील साबासें, दिवाळें इकडे ही चाल सुरू आहे

सोनकोळी जातींत पचायतसंस्था आहेत प्रत्येक गावात एक किंवा अनेक तट अथवा थर्ळें किंवा जमाती असतात त्या प्रत्येकास गावपचायत म्हणतात कित्येक गाव मिळून एक सघ होतो सार्वजनिक निवाडे अशा सघाच्या पचायतीपुढे येऊन निवडले जातात आणि खासगी निवाडे फक्त गावातील पचायतींत चालतात. जे निवाडे गावपचायतींत तुटत नाहींत ते कोंकणातील चार भागाची जी सोनकोळी सार्वजनिक परिषद हल्लीं स्थापित झाली आहे तिच्यापुढें जातात या परिषदेचें ठिकाण वेसाव येथें असून तिच्या कार्यकारी मडळात ( १९१९ ) रा अ बा शिंदे हे अध्यक्ष, रा क था. पाटील हे उपाध्यक्ष व रा पो गो नाखवा हे चिटनीस होते प्रत्येक जमातीच्या मुख्यास पाटील म्हणतात गावच्या लोकवस्तीच्या मानाप्रमाणें तट एक किंवा अनेक असून त्याप्रमाणें पाटीलहि असतात. पाटलाचा अधिकार वशपरंपरेचा असतो पाटील घराण्यात कोणीच पुरुष हयात राहिला नाहीं तर पाटिलकीचा अधिकार घराण्यातील मुख्य व वडील बाईकडे देण्यात येतो व तिच्या नावानें तटातील कर्ते गृहस्थ तटाचा कारभार चालवितात एकाद्या घराण्याचा निर्वंश झाल्यास तटातील कर्ते पुरुष आपल्या सगनमतानें आपल्याच पैकीं एखादा सर्वमान्य कर्ता पुरुष अधिकारी नेमून त्याला "अमुक मयत पाटलाचा कारभारी" असे म्हणतात. हा अधिकार वंशपरंपरेचा नसून तो लोकसमाधानावर अवलंबून असतो वादाचा निकाल बहुमतानें देण्यात येतो पचायतीपुढें नित्य व नैमित्तिक प्रश्नांचे वाद येतात, नित्य म्हणजे- शिव्यागाळी, मारामारी वगैरे व नैमित्तिक म्हणजे-जातीजातींत सुधारणा, शिक्षणप्रसार वगैरे अपराध्यास बहुमताप्रमाणें शासन करण्यात येतें ते शासन गुन्ह्याच्या सौम्य व तीव्र स्वरूपाप्रमाणें थोडेफार दड करणें असें असतें दड न दिल्यास त्याला वाळींत टाकतात शासनाच्या या दोन प्रकारांशिवाय तिसरा प्रकार सोनकोळी जातीच्या पचायतींत

रुढ नाहीं प्रत्येक फिर्यादीमागे वादीप्रतिवादीकडून सव्वा-रु घेऊन त्यातील चार आणे पाटलास वतन म्हणून व बाकीचे सव्वादोन रु पचायतींत हजर असणाऱ्या इसमास वाटण्यात येतात शिवाय प्रत्येक लग्नात वरपक्षाकडून पाटलास सव्वा रु विदागी मिळते गुन्हेगारास शासन करण्याचा रीत जातींत पूर्वापार चालत आलेली आहे या अधिकारासाठीं ब्रिटिशसरकारकडून मजुरी मिळालेली नाहीं तथापि ब्रिटिश अमलापूर्वी अशी मजुरी सोनकोळी जातींतील दोन सरपाटील घराण्यानां मोंगल बादशहाकडून मिळालेली असून, तिजप्रमाणें अमल सदरहु सरपाटील घराणी आजपर्यंत चालवीत आहेत याचा अमल चेऊलच्या व जजिऱ्याच्या आसपासच्या प्रांतावर आहे याचा मूळपुरुष जानू पदवारी ऊर्फ जाया पाटील होता व त्यास दिल्लीकर व विजापुरकर शहानीं हा अधिकार दिला होता खटल्याच्या निवाड्याची टिपणें पूर्वी लिहून ठेवीत नसत हल्लीं सोनकोळी ज्ञातिपरिषदेच्या दप्तरात निवाडे लिहून ठेवण्यात येतात प्रत्येक पचायतीला थोडीफार स्थावर-स्वरूपाची ( देवळें, घरें, जमीन, वगैरे ) मालमत्ता व नक्त ऐवजहि असतो या मिळकतीवर त्या पचायतीची सत्ता असते पचायतीच्या खर्चासाठीं प्रत्येक घरापासून दरवर्षी कांहीं रक्कम घेतात या जमातीच्या करावर तटाच्या लोकाचा हक्क असून तो तटाच्या तिजोरींत जमा होतो या जातीचे उपाध्याय गोवर्धन, क्रमवत, पळशे, देशस्थ व चित्पावन ब्राह्मण असून त्यांच्याचकडून विवाहादि धार्मिक सस्कार करनात व रीतीभाती आणि गोतासंबंधीचे व्यावहारिक प्रश्न जात आपल्या मतानें सोडवितें हल्लीं यांच्यापैकीं शिकलेल्याचा पोशाख पांढरपेशासारखा असतो मुलें व मुली मराठी शिक्षण घेऊ लागल्या असून क्वचित् मुलें इग्रजीहि शिकू लागलीं आहेत. मुंबई बेटात रहाणाऱ्या पैकीं ¾ लोक मासळी मारण्याचा धदा करीत असून ¼ लोक सरकारी व्यापारी नौकरी व धंदे करू लागले आहेत विधवेचा विधुराबरोबरच पुनर्विवाह होतो विधवा स्वत च मासळी विक्रीचा धदा करीत असल्यानें तिचा भार कोणावर पडत नाहीं अनाथ मुलाची काळजी त्याचे नातलग घेतात स्वजातीय अगर परजातीय राख ठेवण्यास निर्बंध आहे तो मोडणाऱ्यास राखेचा त्याग करवून विधियुक्त पावन करून घेतात हाच न्याय स्त्रियास लागू आहे स्त्रियास अधर्मव्यवहारानें सजातीय पुरुषापासून झालेल्या सततीस स्वजातींतच मिळवून घेत असतात " ( रा. पो गो नाखवा याची लिहून आलेली माहिती ) महाभारतात कोळगिरीपर्वत दक्षिणेंत असल्याचा ( सहदेव दिग्विजय ), कोलिसर्प नांवाचे लोक शूद्रवर्गांत घातल्याचा ( अनुशासन पर्व ) आणि कोलवगिरेय लोकाना अर्जुनानें अश्वमेधयज्ञाच्या दिग्विजयात हाकलून लावल्याचा असे तीन उल्लेख आले आहेत [ सेन्सस रिपोर्ट १९११ म्हौं २०, कास्ट्स् अँड ट्राइब्ज सी पी, रसेल, हिरालाल, मुंबै ग्याझे. म्हौं ९ भा १ ]

**कोळ्ळीप्पाकई**—हें गाव चालुक्याच्या राज्याच्या दक्षिण सरहद्दीवर होतें म्हैसूर प्रातांतील चित्रदुर्ग जिल्ह्यात हल्लीं हें आहे दक्षिणेकडील प्रदेशाची ही वेस होय असें चालुक्य राजे मानीत असत म्हणून या गावीं आपल्या राज्यातील एक विश्वासू सरदार ते नेहमीं लष्करी तळ देऊन ठेवीत पुढें गगईगोंड राजेंद्र चोल यानें हें तटबंदीचें शहर चालुक्यापासून काबीज केलें (१०१५). दक्षिणेंतून वर उत्तरेस चालुक्याच्या राज्यात घुसण्याच्या या वेशी( शहरा )चा सुभेदार हा बहुधा राजवंशीय अगर राजवंशाचा आप्त असे इ स १०६० त येथें सिंघणदेव म्हणून एक रट्टवंशीय सुभेदार होता त्याचें वर्णन ' महामडलेश्वर, त्रैलोक्यमल्ल, कोळ्ळीप्पाकई प्रभु, दक्षिणचें महाद्वार, चोलकमलवनगजराज ' इत्यादि शब्दानीं केलेलें आहे [ एपि कर्ना, अय्यर–प्रा हिं ]

**कौटिल्य**—याचें नाव विष्णुगुप्त आर्य चाणक्य, कौटिल्य अशींहि याचीं आणखी दुसरीं नावें आढळतात यानं नदराजाचा, त्यानीं याचा अपमान केल्यामुळें आमूलाग्र उत्खात करून धनानदाचा दासी ( मुरा )पुत्र चद्रगुप्त मौर्य याला मगधाच्या राज्यावर बसविलें हा अत्यत निस्पृह पण तापट ब्राह्मण होता यानें लिहिलेला अर्थशास्त्रावरील ग्रंथ नुकताच सापडला आहे हा ग्रथ पुष्कळ दिवसापासून माहीत होता, परतु त्याची उपलब्धि मात्र आताच झाला आहे त्यावर भट्टस्वामीची टीकाहि आहे प शामशास्त्री यानीं हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे विशाखदत्ताच्या मुद्राराक्षस नाटकाचा हा नायक आहे [ अर्थशास्त्र पहा ] याचा काल खि पू ३२० ते ३०० असा आहे

**कौण्डिन्य**—वैदिक वाङ्मयात बृहदारण्यकातील वशात शांडिल्यचा शिष्य म्हणून याचा उल्लेख येतो हा गोत्रप्रवर्तक ऋषि होता याच्या नावाचें गोत्र रूढ आहे पौराणिक वाङ्मयात ( महाभारत सभापर्व अध्याय ४ श्लो २२ ) मयासुरकृत धर्माच्या सभेंतील एक सभासद म्हणून याचा उल्लेख येतो

**कौण्डिन्यपुर**–वऱ्हाड जिल्हा उमरावती तालुका चांदूर वर्धा नदीच्या तीरीं हें गाव आहे दर कार्तिक पौर्णिमस विठ्ठल-रुक्मयाची एक मोठी जत्रा येथें भरते तिला सुमार ५०,००० यात्रा जमते असें म्हणतात येथील महादेवाचें देऊळ फार पूर्वी बाधलेलें होतें, परतु हल्लींचें काम सुमार १०० वर्षांपूर्वी झालेलें आहे रुक्मिणीच्या बापाचें येथें राज्य असून त्याची राजधानी हें शहर होतें त्यावेळीं येथ देवलवाडा नावाचें शहर होतें, परतु हल्लीच्या गावाखालीं तें पुरलें आहे असें म्हणतात

**कौपर**, वि ल्य म ( १७३१–१८०० )—इंग्लिश कवि या कवीचा जन्म बर्खामस्टेड येथें १७३१ त झाला याचें लहानपणचें शिक्षण मार्किएट येथील शाळेंत झालें ' टिरोसिनिअम ' मध्यें या शाळेंतील आयुष्यक्रमाचें त्यानें वर्णन केलें आहे. तो मोठा झाल्यावर त्याला वेस्ट मिन्स्टर

येथील शाळेंत पाठविलें व तेथें वॉरनहेस्टिंग्ज, चर्चिल, इंपे वगैरे प्रसिद्ध मंडळी सहाध्यायी होती. त्याच्या घराण्यांत कायद्याचा अभ्यास करणारी बरीच मंडळी होऊन गेली. अर्थात् त्यांना अनुसरून यानेंहि कायद्याचा अभ्यास सुरू केला. १७५४ मध्यें त्याला वकीलीची सनद मिळाली. व १७५९ मध्यें त्याला 'कमिशनर ऑफ बँकरप्ट्स' ही जागा मिळाली. त्या जागेवर त्यानें ५ वर्षे काम केलें. पुढें इंग्लंडमधील उमरावाच्या सभेतील कारकुनाच्या जागेकरितां कौपरचें नाव सुचविण्यात आलें. ती जागा मिळण्यापूर्वी त्याला उमरावाच्या न्यायसभेपुढें जाणें जरूर होतें. पण तें कौपरला पसंत न पडून त्यानें आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला व त्याला कांहीं दिवस वेडहि लागलें होतें. कांहीं दिवसांनीं तो बरा झाला व नंतर त्याची व लेडि ऑस्टेन नांवाच्या एका स्त्रियेची फार मैत्री जमली. कौपरनें सही पुस्तकांतून प्रसिद्ध केलेल्या 'दि टास्क' नांवाच्या प्रसिद्ध काव्याचा विषय हिनेंच सुचविला व तसेंच 'जॉन गिलपिन' व 'दि रॉयल जॉर्ज' या कविता लिहिण्यास हीच कारण झाली. त्यानें होमरच्या 'इलियड' ग्रंथाचें भाषांतर १७८९ त छापून प्रसिद्ध केलें या नवीन इंग्लिश काव्याला एक निराळेंच वळण दिलें. कवितांतील कृत्रिमपणा व भाषाशैलीचे दोष त्यानें बरेच कमी केले. बर्नस्, शेले, वर्डस्वर्थ वगैरेंच्या काव्यांतून आढळणारी निसर्गप्रियता व प्राणिमात्राबद्दलची सहानुभूति हीं प्रथम कौपरच्याच काव्यांत आढळून येतात असें म्हणण्यास हरकत नाहीं. इंग्लिश कवींच्या काव्यांतून विनोद फार क्वचित प्रसंगीं आढळतो परंतु कौपर या नियमाला अपवाद आहे. उत्तम पत्रें लिहिणाऱ्यांमध्यें यांची गणना केली जाते. कौपर हा जगप्रसिद्ध कवि होता असें जरी म्हणता येणार नाहीं, किंबहुना इंग्लंडमधील असामान्य कवींमध्येंहि जरी त्याची गणना करता येणार नाहीं तरी पण वाङ्मयामध्यें एक नामांकित कवी या नात्यानें त्याचें स्थान अढळ राहील यांत मात्र शंका नाहीं. 'टु मेरी' 'दि रिसीट ऑफ माय मदर्स पोर्ट्रेट' व 'ऑन दि लॉस ऑफ दि रॉयल जॉर्ज' या त्याच्या कविता इंग्लिश वाङ्मयांत कायमच्या रहातील अशा आहेत. पोप-प्रभृति कवींच्या बर्नस्, वर्ड्स्वर्थ, शेले या कवींच्या मधला हा सांखळीचा दुवा आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं वर्डस्वर्थच्या काव्यांत व याच्या काव्यांत बरेंच साम्य आढळून येतें. हा सन १८०० मध्यें मरण पावला

**कौरव**—एक राष्ट्र ( कुरु पहा )

**कौल**—हा शब्द अरबी असून त्याचा मूळ अर्थ परवाना किंवा खात्री देणें असा आहे. मनुष्यांनीं विचारलेल्या प्रश्नांना मिळणारें दैवी उत्तर, शकुन, कौल, दिव्य वगैरेंनीं ओळखितां येतें असा सार्वत्रिक समज आहे प्राचीन इजिप्त ग्रीस, रोम वगैरे पाश्चात्य राष्ट्रांतहि या गोष्टी फार चालत. अथर्ववेद, अद्भुतब्राह्मण, कौशिकसूत्र, अथर्ववेदपरिशिष्टें यांत ज्योतिष, जातक, शकुन यांची माहिती मिळते तर गृह्यसूत्रांतून लक्षण विज्ञानाचे विधी सांगितले आहेत. तथापि कौल हा दैवी उत्तर ओळखण्याचा एक प्रकार असल्यानें दैवी शकुन, लक्षणें यांचें व्यापक विवेचन येथें न करितां केवळ कौल लावण्याच्या चालीकडे वळूं.

ग्रीसमध्यें कौल लावण्याची पद्धत इजिप्तमधून आली. हिरॉडोटस या प्रकाराच्या विरुद्ध होता व त्यानें ग्रीक देशांतील कौल लावण्याच्या प्रकारांतील लबाडी उघडकीस आणिली आहे, तथापि हा प्रकार बंद झाला नाहीं. डेल्फायच्या कौलाचें महत्व राज्यकारभारांत अतोनात होतें राष्ट्राचे राजकीय व खासगी व्यवहार एवढ्याशा यःकश्चित् गोष्टीवर अवलंबून असलेले इतिहासांत क्वचितच आढळतात. ग्रीक लोकांचा व पुढें रोमन लोकांचाहि असा समज होता कीं, या कौलाच्या द्वारें देव आपली इच्छा प्रगट करतात. प्राचीन काळीं ग्रीस देशांतच नव्हे तर, त्या वेळच्या मूर्तिपूजक राष्ट्रांत अपॉलोचें प्रस्थ मोठें होतें. त्याचें देऊळ डेल्फायच्या बेटावर एका टेकडीत असून आंत सोन्याची मूर्ति होती देऊळ फुलांच्या माळांनीं सदैव शृंगारिलेलें असे. तेथें नेहमीं सहा पुजारी असत. सर्वांच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें काम या पुजाऱ्याकडे असल्यामुळें त्यास अतिशय महत्व आलें होतें सर्व ग्रीक लोकांची अशी पक्की समजूत होती कीं हीं उत्तरें खास अपॉलोकडूनच येतात परंतु हे पुजारी राज्यांतील प्रमुख लोक असल्यामुळें त्यांच्या मर्जीस येईल त्याप्रमाणें लोकांस ते प्रश्नांचीं उत्तरें देत यांत कांहीं संशय नाहीं. आधीं तें देऊळच एका अवघड ठिकाणीं बांधिलेलें होतें त्यांत खालीं एक मोठें भुयार होतें; त्यांतून दुर्गंधयुक्त हवा वर येतें असे पण प्रश्न विचारावयाचा असे तेव्हां त्याच्या तोंडावर एक तिवई ठेवीत, व तिजवर एक बाई बसवीत या बाईला पायथिया असें म्हणत. तिला तिवईवर बसविल्यावर मग भुयाराचें द्वार उघडीत, त्यावरोबर ती दुर्गंधीनें गुसमटून चमत्कारीक हातवारे व बडबड करूं लागे, कीं मग तिच्या अंगांत देव आला असें लोकांस वाटे. अंगांत आल्यावर ती जे शब्द उच्चारी ते सर्व शब्द पुजारी लिहून घेत व मागून, त्यांची कविता बनवून ती पृच्छकाच्या हवाली करीत. या कवितेंतील शब्दरचना अशा घोंटाळ्याची असे कीं, त्यांतून वाटेल तो अर्थ निघावा तेणेंकरून पुढें कसाहि प्रकार घडून आला तरी भविष्य खरें झालें अशी लोकांची खात्री करण्यास अडचण पडत नसे म्हणून देवाचा कौल खोटा ठरण्याचा प्रसंगच कधीं येत नसे.

ह्याप्रमाणें डेल्फायच्या कौलाचें महत्व अतिशय वाढलें होतें. पायथियाचें काम करण्याकरितां आरंभीं एखादी हलक्या कुळांतील बाई आणीत. एकवार तिचा देवळांत प्रवेश झाल्यावर तिला देऊळ सोडून जाण्याची किंवा लग्न करण्याची मनाई असे. एकदा अशी एक तरुण स्त्री नरील

नियम मोडून पडून गेली. तेव्हां असा कायदा करण्यात आला की, पन्नास वर्षांखालील बाईस देवळांत घेऊं नये. आरंभीं पुष्कळ दिवस पायथियाचें काम एकच बाई करीत असे; पण पुढें पुढें पृच्छकाची संख्या अतोनात वाढल्यामुळें दोन बाया ठेवण्यांत आल्या, व दुर्गंधयुक्त हवेनें एखादी बाई कचित् प्रसंगीं आजारी झाल्यास काम बंद पडूं नये म्हणून तिसरी एक बाई देवळांत आणून तयार ठेवीत असत. डेल्फायच्या देवाकडे वकील पाठविण्यासाठीं आथेन्सच्या लोकांनीं सरकारी गलबतें बांधिलीं होतीं. तीं फार पवित्र समजत.

आपल्याकडेहि हा प्रकार असून चालतो. तांदूळ, सुपारी, पानें, फुलें किंवा दगडी लहान गोटे मूर्तीच्या छातीच्या डाव्या अगर उजव्या बाजूस चिकटवितात. याना कळे असें म्हणतात; व देवानें हो म्हणावयाचें असल्यास अमकीकडील कळा पाडून हा कौल दे असें म्हणतात. हा कौल लावावयाचा तो देवाचा पुजारी लावतो. त्याबद्दल त्यास थोडी फार दक्षणा द्यावी लागते. कौल लावावयाच्या देवता बहुधा देवी आणि मारुती ह्याच असतात. ही चाल कोंकणांत फार आहे.

**कौशांबी**—ही प्राचीन वत्स देशाची राजधानी. कौशाबी येथें अशोकचा शिलालेखस्तंभ आहे. त्याचें भाषांतर सेनार्टनें व बुह्लरनें केलें आहे ( इंडि. ॲंटि. १८८९; १८९० ). उज्जनीच्या उत्तरेस हें प्राचीन शहर आहे ( ज. रा. ए. सो. १८९८ ). हें शहर वैदिक व बौद्ध दोन्हीं पंथांत प्रसिद्ध आहे. बृहत्संहितेंत ( १६. ३ ) याचा उल्लेख आहे. पुरुरव्याचा १० वा वंशज कुशांब यानें हें स्थापिलें; त्यानंतर अर्जुनाचा आठवा वंशज निमिचक्र येथें ( हस्तिनापूर वाहून गेल्यामुळें ) राहूं लागला. रामायणांतहि याचा उल्लेख आहे. येथील पाण्डववंशीय उदयन राजाची कथा सर्वत्र प्रसिद्ध आहे. मेघदूतांत, बृहत्कथेंत, रत्नावलींत याचा नामनिर्देश आहे. उदयनाचें दुसरें नांव वत्सराज; त्यावरून याला वत्सपत्तनहि म्हणत. बौद्ध भिक्षु वस हा येथें पळून आला होता. महावंशो, ललितविस्तर व इतर सिंहली आणि तिबेटी बौद्धग्रंथांत याचें नाव आढळतें. गौतम हा बुद्ध झाल्यानंतर येथें त्यानें सहावें व नववें वर्ष घालविलें. बुद्धाची चंदनी मूर्ति उदयनानें केलेली. ह्युएनत्संगाच्या वेळीं येथील राजवाड्यांत होती. बेलच्या मतें अलाहाबादेच्या उत्तरेस १५ कोसांवरील यमुनाकांठचें कोसाम खेडें म्हणजेच कौशांबी होय. कनिंगहॅमनेंहि तेंच ठरविलें असून अद्यापीहि तेथील लोक त्याला कौशांबीच म्हणतात. बौद्धकथांत बकुल अर्हताच्या कथेंत तो कौशांबींत जन्मला व लहानपणीं त्याची आई तेथें यमुनेंत स्नान करीत असतां हा यमुनेंत पडल्याची कथा आहे. त्यावरून यमुना काठचें कोसल म्हणजेच कौशांबी होय. ह्युएनत्संगानें याचा घेर अदीच कोस दिला आहे. येथें अकबराच्या वेळचा एक शिलालेख असून त्यांत यास कौशांबी नगर असें म्हटलेलें आहे. खरा-शिलालेखांत कौशांबीमंडल राज्याचा उल्लेख आहे. यावरून त्यावेळीं ( १०२५ ) तें कनोजपासून स्वतंत्र होत होतें असें दिसतें [ स्मिथ; कनिंगहॅम दीक्षित-भा. भू. ].

**कौषीतकी, ब्राह्मण.**—कौषीतकी ब्राह्मण हें ऋग्वेदाचें एक ब्राह्मण आहे. याला शांखायन ब्राह्मण असेंहि दुसरें नांव आहे. कौषीतकी ब्राह्मणाचे तीस अध्याय असून ऐतरेय ब्राह्मणाच्या पहिल्या सहा पंचिकांचा जो विषय तोच या ब्राह्मणाचाहि विषय आहे. कौषीतकीच्या पहिल्या एक ते तीन अध्यायांत अग्न्याधान, अग्निहोत्र, दर्शपूर्णमास याग असून चौथ्या अध्यायांत दाक्षायणयज्ञ, इष्टादधयज्ञ, सार्वसेनियज्ञ, शौनकयज्ञ व वसिष्ठयज्ञ. साकंप्रस्थयाग, तुरायणयज्ञ इत्यादि काम्य याग दिले असून नंतर आग्रयण याग दिला आहे. पांचव्या अध्यायांत चातुर्मास्यें सांगितलीं असून सहाव्यांत ब्रह्मा नामक ऋत्विजानें यागांत करावयाचें सर्वसाधारण कर्म दिलें आहे. येथपर्यंत दिलेलीं हीं सर्व कर्में ऐतरेय ब्राह्मणांत सांगितलेलीं नाहींत. सातव्या अध्यायापासून पुढें सोमयागासंबंधींचें वर्णन आलें आहे.

कौषीतकी ब्राह्मणांत हौत्र विषयासंबंधींचें पद्धतशीर व सुस्पष्ट असें विवेचन आलें आहे. या विषयाच्या पलीकडे जाऊन इतर विषयासंबंधींचा यांत ऊहापोह केलेला नाहीं. सोमयागाचें मात्र यांत सविस्तर विवेचन आलें आहे. ऐतरेयांत ज्याप्रमाणें प्रस्तुत विषयाशिवाय राजसूय यज्ञाचें व राज्याभिषेकाचें वर्णन आलेलें आहे तसें यांत नाहीं. यावरून व इतर अंतर्गत पुराव्यावरून कौषीतकी ब्राह्मण हें ऐतरेयानंतर रचिलें गेलें असावें असें दिसतें. ऐतरेय ब्राह्मणांत आप्तवाक्याचीं प्रमाणें फारशीं आढळत नाहींत पण कौषीतकीमध्यें 'तस्योक्तं ब्राह्मणानाम्' अशा शब्दांनीं कौषीतकी, पैंग्य इत्यादि ब्राह्मणांचा निर्देश केलेला आहे. कौषीतकीमध्यें शिवाचीं 'ईशान' महादेव हीं नांवें आलेलीं आहेत तशीच तीं शुक्लयजुर्वेद, शतपथ ब्राह्मण यामध्येंहि आलीं आहेत. यावरून कौषीतकी ब्राह्मणग्रंथ ऐतरेयानंतरचा व शतपथकालीन असावा असा वेबरचा अभिप्राय आहे. आणि आरंभीं अध्याय १ ते ६ यामध्यें आलेल्या सूत्रसदृश विषयावरून व पुरुषमेधाचा मुळींच उल्लेख नाहीं यावरून ही गोष्ट संभवनीय वाटते. कौषीतकी ब्राह्मण असें जरी या ब्राह्मणाचें नांव आहे तरी हा ब्राह्मणग्रंथ कौषीतकीनेंच रचला असावा असें दिसत नाहीं. याचें कारण या ब्राह्मणामध्यें कौषीतकीचा मोठ्या आदरपूर्वक उल्लेख केला गेला आहे व कौषीतकी स्वतः अशा तऱ्हेनें आपला आदरपूर्वक उल्लेख करील हें संभवत नाहीं. बोडलियन लायब्ररींत जी कौषीतकी ब्राह्मणाची हस्तलिखित प्रत आहे तीवर 'कौषीतकी मतानुसारी शांखायन ब्राह्मण ' असें लिहिलें आहे त्यावरून शांखायनानें कौषीतकी संप्रदायानुसारें हा ग्रंथ रचिला असावा असें दिसतें.

कौषीतकी ब्राह्मणातील सहाव्या अध्यायातील १–९ हीं खंडें प्रक्षिप्त आहेत असें वेबरचें मत आहे. या खंडात रुद्रदेवतेची स्तुति करण्यात आली आहे, व त्या स्तुतीचा कौषीतकींतील मूळ विषयाशीं संबंध नाहीं, तसेंच इतर अध्यायात रुद्राला विशेषसें प्राधान्य दिलेलें आढळत नाहीं असें त्याचें म्हणणें आहे. पण हें म्हणणें सयुक्तिक नाहीं. ऐतरेय ब्राह्मणाच्या पाचव्या पंचिकेंतहि रुद्रदेवतेसंबंधीचा उल्लेख आहे व रुद्राची स्तुतीहि केली आहे कौषीतकीनेंहि त्याचेंच अनुकरण केलें असावें. या देवतेची स्तुति मूळ विषयाला सोडून नतून त्याकाळीं रुद्रदेवतेचें महत्व वाढलें असल्यामुळें ऐतरेय, कौषीतकी व शतपथ या तिन्ही ब्राह्मणात रुद्राची स्तुति आली असावी असें वाटतें. तिसाव्या अध्यायात वाजपेय व अप्तोर्याम या विधींचा उल्लेख आलेला असून इतर अध्यायात याचा उल्लेख येत नाहीं. त्यावरून हा तिसावा अध्याय प्रक्षिप्त आहे असें कीथचें म्हणणें आहे परंतु वाजपेय व अप्तोर्याम हे याग सप्तसोमसंस्थेंपैकीं असल्यामुळें यथानुक्रमच आलेले आहेत म्हणून त्यास प्रक्षिप्त म्हणता येत नाहीं. ऐतरेय ब्राह्मणाचा जो काळ तोच कौषीतकीचा काळ होय. ऐतरेयानंतर जरी कौषीतकी ब्राह्मणाची रचना झाली तथापि यात काळाचें फारसें अंतर नसून दोन्हीहि ब्राह्मणग्रंथ जवळ जवळ एकाच काळचे असावेत असें म्हणावयास हरकत नाहीं. ऐतरेय ब्राह्मणाचा काल खि. पू. ६०० च्या पूर्वीचा ठरला आहे व तोच कौषीतकीचा ठरवावयास काहीं हरकत नाहीं. काल ठरविण्याची प्रमाणें ऐतरेय ब्राह्मण या लेखात सांपडतील. ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणेंच कौषीतकी ब्राह्मणाचीहि भाषा बोजड, तुटक व संक्षिप्त अशी आहे त्यातल्यात्यात कौषीतकी ब्राह्मणाची फारच संक्षिप्त आहे. कौषीतकीमध्यें ज्या आख्यायिका आल्या आहेत त्या देखील फारच संक्षिप्त रीतीनें सांगितल्या आहेत त्यामुळें त्या समजावयाला क्लिष्ट वाटतात. सुलभ रीतीनें कळेल अशी भाषा वापरण्याऐवजीं सूत्रमय भाषा वापरण्याचा यात प्रयत्न जास्त दिसतो. ऐतरेयात ज्याप्रमाणें काहीं पद्यमय गाथा आहेत त्याप्रमाणें कौषीतकीमध्यें आढळून येत नाहींत. कोणत्या कारणानें असेल तें असो, पण कौषीतकी ब्राह्मणाला लोकप्रियता फारच कमी मिळाली असें दिसतें. लाट्यायनें श्रौतसूत्रावरील आपल्या टीकेंत अग्निस्वामिन् असें म्हणतो, कीं कौषीतकींना कोणत्याहि महत्वाच्या प्रश्नाचें चांगल्या समाधानकारक रीतीनें विवरण करता येत नसे म्हणून ते मागें पडले. कौषीतकी हे अकुशल व व्याहत आहेत असें धनंजयाचें मत होतें असें निदानसूत्रावरून दिसतें महार्णव ग्रंथात कौषीतकी शाखेची जी हकीकत आली आहे तीवरून कौषीतकी ब्राह्मणाची रचना उत्तर गुजरायमध्यें झाली असावी असें दिसतें व अशा दूरच्या भागात याची रचना झाल्यानें याला लोकप्रियता मिळाली नसावी असाहि संभव आहे.

आरण्यक —कौषीतकी ब्राह्मणाला जोडलेल्या या आरण्यकाचे १५ अध्याय असून त्यापैकीं पहिले दोन अध्याय ऐतरेय आरण्यकाच्या पहिल्या व पाचव्या आरण्यकाशीं जुळते आहेत. सातव्या व आठव्या अध्यायाचें तिसऱ्या अरण्यकाशीं साम्य आहे. तीन ते सहा असे चार अध्याय मिळून कौषीतकी उपनिषद झालें आहे हें बरेंच मोठें असून अध्यात्म विषयानें भरलेलें आहे.

[ संदर्भग्रंथ—ऋग्वेदान्तर्गत शाखायन ब्राह्मणम् ( आनंदाश्रम संस्कृत ग्रंथावलि ग्रंथांक ६५ ), कीथ—ऋग्वेद ब्राह्मणाज ट्रॅन्सलेटेड (हर्वर्ड ओरिएंटल सीरिज व्हॉल्यूम२५), मॅकडोनेल—हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर ]

**कौसल्या**—कोसल राष्ट्रावरून हें व्यक्तिनाम पडलें या नावाच्या अनेक पौराणिक स्त्रिया होऊन गेल्या उदा. पुरूची बायको व जनमेजयाची आई (म भा. आदि अ. ९५ ), दशरथ राजाची बायको व रामचंद्राची आई (' राम ' ' दशरथ ' पहा ) धृतराष्ट्र व पंडु यांच्या आया ज्या काशि राजाच्या कन्या त्यानाहि हेंच नाव आहे

**क्यांबिन**—उत्तर ब्रह्मदेशात उत्तर चिंद्विन् जिल्ह्यातील दक्षिणेचा तालुका. याचें क्षेत्रफळ ६४० चौरस मैल. लोकांची संख्या ४७, लो सं. १९११ सालीं ११२२४. तालुक्याचें मुख्य शहर क्यबिन याची लो सं ३३८०. सन १९०३–४ सालीं लागवडीचें क्षेत्रफळ १८ चौ मै. असून काळीचें उत्पन्न १६००० झालें होतें.

**क्यवक्कू**—ब्रह्मदेशात दक्षिणेकडील शान संस्थानातील म्येलत भागातलें एक लहान संस्थान याचें क्षेत्रफळ ७६ चौ. मै. आहे सदरहु संस्थान डोंगराळ असून पनलंग नदी संस्थानच्या सरहद्दीवरून जाते. येथें तांदुळाचें मुख्य पीक असून १००० एकरामध्यें त्याची पेरणी होत असते. इ स १९११ सालीं याची लो सं ४०,६३६ होती. यात खेडीं ४२ आहेत सन १९०४–५ सालीं उत्पन्न रुपये ३९०० झाले इंग्रज सरकारला खंडणी २००० रुपये दिली जाते

**क्यान्डी, मेजर टी**—( इ. स. १८०२–१८७७ ) मराठीचे इंग्रज ग्रंथकार हे इ स. १८२२ त हिंदुस्थानांत आले व ईस्ट इंडिया कंपनींत अंमलदार झाले कॅप्टन मोलस्वर्थनीं जो मराठी-इंग्लिश कोश लिहिला त्यात त्यानीं त्यास साहाय्य केलं नंतर इंग्लिश–मराठी कोश करण्याच्या कामीं त्याना साहाय्य करूं लागले. कॅप्टनसाहेब विलायतेंत गेल्यामुळे तो ग्रंथ तसाच अपूर्ण राहिला होता. तो त्यानीं इ स १८४० त हातीं घेऊन सात वर्षांत पूर्ण केला इ स. १८७३ त त्याची सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति काढली इ. स १८५१–५७ मध्यें हे पुना कॉलेजचे–जे पुढें इ. स १८६८ त डेक्कन कॉलेज झालें–प्रिन्सिपाल होते. बाकी मराठी क्रमिक पुस्तकें यांच्याच हातचीं होत इंडियन पिनलकोड आणि सिव्हिल प्रोसिजर कोडचें मराठी भाषातर यानींच केलें हे इ स १८७१ पर्यंत

ट्रान्स्लेटर होते. इ. स. १८७७ च्या जाहीरनाम्यात याना सी. एस. आय. ही पदवी मिळाली.

**क्युरी,पेरी व मॅडम**—पेरी क्युरी हा एक फ्रेंच पदार्थ विज्ञानशास्त्रवेत्ता होऊन गेला. याचा जन्म तारीख १५ मे १८५९ रोजी पारीस येथें झाला. सार्बोन येथें याचें शिक्षण झालें व पुढे तो त्याच ठिकाणीं प्रोफेसर झाला. उष्णताजन्य विद्युत, भिन्न भिन्न उष्णमानावर भिन्न भिन्न द्रव्याची चुंबकस्थिति इत्यादि विषयावर त्यानें कांहीं शोध लावले आहेत. रेडिअम नावाच्या मूल द्रव्याचा शोध त्यानें व त्याच्या पत्नीनें लावला व यामुळे त्याची प्रसिद्धि झाली आहे. त्याची बायको मेरी स्क्लोडोस्का हिचा जन्म तारीख ७ नोव्हेंबर १८६७ साली वार्सा येथें झाला. ही एक उत्तम विदुषी होती. हेन्री बिकेरल यानें सन १८९६ सालीं असें सिद्ध करून दाखविलें कीं युरेनिअम धातुपासून जे किरण विसर्जन होतात त्यापेक्षा जास्त तीव्र प्रतीचे किरण या धातूच्या अशोधित मृत्तिकेपासून विसर्जन होतात. या प्रकाराविषयीं उभयता पतिपत्नींनीं असें अनुमान बसविलें कीं, या अशोधित मृत्तिकेंत युरेनिअम धातूपेक्षा एखादें जास्त तीव्रतर किरणविसर्जक द्रव्य असलें पाहिजे याकरितां त्यांनीं पिच ब्लेन्ड नावाची कित्येक खंडी अशोधित मृत्तिका घेऊन तिचें अत्यंत परिश्रमानें आणि युक्तीनें पृथक्करण करून त्यातून पोलोनिअम आणि रेडिअम नावाचीं दोन द्रव्यें त्यांनीं सन १८९८त निराळीं काढलीं. या सालानंतर त्यांनीं पुढील कित्येक वर्षेपर्यंत या दोन द्रव्यावर प्रयोग केले व त्या प्रयोगाच्या सहायानें त्यांनीं असें सिद्ध केलें कीं, रेडिअम नावाच्या मूल द्रव्यापासूनच पोलोनिअम नावाचें द्रव्य तयार होत असतें. सन १९०३ साली त्या उभयताना रॉयल सोसायटीनें त्याच्या या शोधाबद्दल डेव्ही नावाचें पदक बक्षीस दिलें. पुढें याच सालीं हेन्री बिकेरल आणि क्युरी पतिपत्नी यांच्यात नोबल प्राइझ नावाचें पारितोषक निम्में निम्में वाटून देण्यात आलें. सन १९०५ सालीं ॲकॅडमी आफ सायन्सेस नावाच्या संस्थेचा प्रोफेसर क्युरी याला सदस्य करण्यात आलें. तारीख १९ एप्रिल १९०६ रोजी क्युरी हा पारीसच्या रस्त्यातून जात असताना त्याच्या अंगावरून एक गाडी गेली व त्याचा तात्काळ मृत्यु झाला.

**क्युरेषी**—क्युरेषी ही पंजाबातील एक जात आहे. लो. सं. ७८०२२. महंमद पैगंबर हा क्युरेषी वंशातील होता म्हणून त्या वंशास मोठा मान दिला जातो. ते मुख्यतः जालंदर, लाहोर, रावळपिंडी, मुलतानप्रांत व भावलपूर संस्थान यात आढळतात. शेतकी हा त्याचा मुख्य धंदा आहे; परंतु त्याचा उदरनिर्वाह पुष्कळ अंशीं आपल्या शिष्यवर्गाकडून मिळालेल्या देणगीवर चालतो. वायव्यसरहद्द प्रांतातहि सुमारें २१ हजार क्युरेषी आहेत. [ भूक; से. रि. ( पंजाब ) १९११ ]

**क्यूबा**—हें वेस्ट इंडीज बेटांपैकीं सर्वांत मोठें बेट आहे. हें पश्चिम रेखांश७४° ७' ते ८४०° ५७ व उत्तर अक्षांश १९° ४८' २३ १३' यात वसलेलें आहे. हें बेट चिंचोलें असून चंद्राकृति आहे. क्यूबाचें क्षेत्रफळ ४१६३४ व आसपासचीं बेटें धरून ४४१६४चौ. मैल आहे. ह्या बेटाच्या किनाऱ्यावर नागरवाडे व बंदरें आहेत. यांपैकीं कांहीं पहिल्या प्रतीचीं बंदरें आहेत.

क्यूबा बेटाचे स्वाभाविक भाग होतात ते असेः—सँटिआगो, (सध्याचा ओरिएन्ट), कॅमाग्वे,सँटाक्लारा, सँटाक्लाराचा पश्चिमभाग व मॅटाझास, हॅव्हाना, आणि पिनारडेल रिओ पूर्व, मध्यम पश्चिम अशा तीन मुख्य पर्वताच्या ओळी आहेत. पूर्व ओळींत माटे टर्किनो नावाचें ७७०० ते ८३२० फूट उंचीचें एक सर्वांत उच्च शिखर आहे. काटो नावाची एक मोठी नदी अही ओरिएन्ट प्रांतात आहे ॲरिग्वानावो नावाचे एक अतिशय सुंदर सरोवर हॅव्हानाच्या जवळ आहे. क्यूबाबेट रूपांतर झालेल्या व ज्वालामुखी पासून बनलेल्या खडकाचें बनलेलें आहे. ह्या बेटात खनिज पदार्थांची समृद्धि आहे. क्यूबाबेटात उत्कृष्ट वनस्पतीहि सांपडतात. निरनिराळ्या तऱ्हेचीं मधुर व रुचकर फळें ह्या बेटात होतात. त्यापैकीं अननस, चिंच, केळीं, आंबे व लिंबें सर्वत्र आढळतात. प्राणिवर्गांत पक्षी, सरपटणारे प्राणी व मासे हे अतिशय व निरनिराळ्या तऱ्हेचे आहेत. क्यूबाबेटातील हवा उष्ण परंतु सर्द अशी आहे. येथें अवर्षण नेहमीं पडतात. आठ अथवा दहा वर्षांनीं एकदा तरी एखादें मोठें वादळ होतें. क्यूबा बेटात १६४७ पासून पीतज्वर नावाच्या तापाच्या साथीनें फार कहर करून सोडला होता. परंतु अलीकडे ह्या रोगानें तेथून पाय काढला आहे. देवी, महारोग व क्षय हे सर्वत्र असून देवीच्या साथीनें पुष्कळ प्राणहानि होते.

या बेटांत चार तऱ्हेच्या जमिनी आहेत. एकंदरींत सर्व जमिनी अतिशय सुपीक आहेत. मुख्य पीक साखरेचें आहे. १९१७—१८ या वर्षी १३,८४,८१२ एकर जमीन उंसाच्या लागवडीखालीं होती. त्यातून ४०,४८,४८०टन साखर काढण्यांत आली या बेटांतील तंबाखू जगांत अतिशय नावाजलेली आहे पिनार डेलरिओ, हॅव्हाना व सॅन्टाक्लारा या प्रांतातून बहुतेक तंबाखू येते तंबाखूचे मळे. गोरे लोकाच्या मालकीचे आहेत. १९०७ मध्यें २,०१,५६२ गाठी म्हणजे १,०९,५६२ पौंड ( वजनी ) तंबाखूचें पीक झालें. कॉफीचें एके काळीं फार भरभराटीचें पीक होतें. १९०७ मध्यें ६५,९९,७००पौंड वजनाची कॉफी झाली. केळीं, नारळ, संत्रीं व अननस हीं प्रसिद्ध फळें होतात. याशिवाय याम, रताळीं, तांदूळ वगैरे पिकें होतात. गुरंढोरें बाळगणें हा एक महत्वाचा धंदा आहे. उद्योगधंद्यात विशेष महत्त्वाचे असे सिगार, सिगारेट, साखर, रम व व्हिस्की तयार करण्याचे धंदे होत.

खनिज पदार्थांमध्यें ताम्याच्या खाणीबद्दल क्युबाची प्रसिद्धि आहे याशिवाय लोखंड व मँगनीज याच्या खाणी अलीकडे खणण्यास सुरुवात झाली आहे या बेटातील व्यापार महत्त्वाचा समजला जातो साखर, तबाखू व फळें याची निर्गत होते आयात मालात कापड खाण्याचे पदार्थ, लाकडी सामान व यंत्रसामुग्री ही मुख्य आहेत संयुक्त संस्थानाशीं बहुतेक व्यापार चालतो १९१७ साली आयात ५,४२,५५,९६३ पौंड व निर्यात ७,३३,५४,१८९ पौंडाची होती या बेटात दळणवळणाच्या बाबतींत मात्र दैन्यावस्था आहे १९१९ साली २३१९ मैल रेल्वे होती

क्यूबाची लो स १९१६ साली२६,२७,५३६ होती काही चिनी मजूर या बेटात आहेत ओरिएंट प्रातात निग्रो लोकांचें प्राबल्य आहे निग्रो लोकाची स्थिति चागली आहे राजकीय बाबतींत व थोडेबहुत सामाजिक बाबतींत निग्रो लोकाचा गोऱ्या लोकाबरोबर मान असतो रोमन कॅथॉलिक धर्म सर्वत्र आहे अशिक्षिताची सख्या जास्त आहे संयुक्त संस्थानने लष्करी दृष्टीनें ज्यावेळी या बेटाचा ताबा घेतला त्यावेळी या बेटाच्या राज्यघटनेचा मसुदा तयार करण्यात आला या बेटातील प्रजासत्ताक पद्धति संयुक्त संस्थानच्या पद्धतीवर आहे अध्यक्षाची मुदत चार वर्षांची असते याशिवाय कॉंग्रेसमध्यें एक मंत्रिसभा व प्रतिनिधिसभा अशा दोन सभा असतात कॉंग्रेसची बैठक वर्षांतून दोनदा होते ह्या बेटाचे सहा प्रांत केले आहेत त्याचीं नावें — पिनारडेलरिओ, हॅव्हॅना, मॅटान्झाज, सान्ताक्लार, कॅमाग्वे अथवा प्युर्टो प्रिंसिप आणि ओरिएन्ट प्रत्येक प्रांताला एक गव्हर्नर व लोकनियुक्त प्रतिनिधिमंडळ असून प्रांताचा कारभार स्वतंत्र रीतीनें चालविण्याचा त्याना अधिकार असतो अध्यक्षालाच फक्त याच्या कामांत ढवळाढवळ करता येते २१ वर्षे वयाच्या प्रत्येक कुटुंबातील पुरुष रहिवाशास मत देण्याचा अधिकार असतो या राष्ट्राचा वसूल १९१८–१९ साली १२ ८९,२००० असून खर्च १,०८,१८,९०३ होता

क्यूबा बेटात प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत आहे दुय्यम व वरिष्ठ शिक्षण सरकारच्या हातीं आहे. हॅव्हाना येथें एक विश्वविद्यालय आहे याशिवाय कलाकौशल्य, धंदे-शिक्षण व व्यापार त्यासबधी सोय आहे प्रजासत्ताक राज्या पूर्वी या बेटावर स्पेनचा अमल होता ह्या बेटातच एक मुख्य मुलकी व लष्करी अधिकारी असून त्यास गव्हर्नर व कॅप्टन जनरल असा हुद्दा होता त्याची अनियंत्रित सत्ता चालत असे क्यूबाच्या पूर्वेतिहासाची फार थोडी माहिती मिळते येथें पूर्वी ताम्रवर्णी परंतु उच्च असे लोक रहात असत ते चलाख व धिम्या स्वभावाचे असून शेतीवर आपली उपजीविका चालवीत असत १५५० च्या सुमारास त्याचा अगदींच नायनाट झाला असावा असा समज आहे.

इ ति हा स —कोलंबसाला आपल्या पहिल्या सफरीत हें बेट १४९२ साली सापडलें वसाहतीस १५१० पासून सुरुवात झाली व १५१५ पर्यंत मुख्य मुख्य शहराची स्थापना झाली क्यूबा हें मुख्य ठिकाण होऊन त्या ठिकाणाहून युकॅटन, मेक्सिको व फ्लोरिडा वगैरे देश शोधण्यासाठीं टोळ्याची रवानगी होत असे १५३३ सालापासून गुलामांच्या व्यापारास सुरवात झाली १६ व्या शतकात ह्या बेटात फार अदाधुदी होती इंग्लिश व फ्रेंच चाच्याच्या चाचेगिरीची सुरवात १६ व्या शतकात होऊन १७ व्या शतकात तिचा कळस झाला हॅव्हाना हें ब्रिटिशानीं १७६२ त घेतलें परंतु लगेच दुसऱ्या वर्षी त फ्लोरिडा देशाच्या मोब दला स्पेनला मिळालें ह्या वेळेपासून या बेटात ब्रिटिशाचा शिरकाव झाला १८ व्या शतकाच्या शेवटीं व १९ व्या शतकारंभीं क्यूबा बेटाचा गव्हर्नर उदारमतवादी असल्या-मुळे, व्यापार व राजकीय बाबतींत फायदा झाला या-नतर पक्षभेद होऊन सब बेटभर अशातता माजली १८६६ साली येथील दशवार्षिक युद्धाला सुरवात झाली झाजानच्या तहानें ( १८७८ ) बडखोराना सरसकट माफी, गुलामाचें दास्यविमोचन, राज्यकारभारात सुधारणा व वसाहतस्वातंत्र्य या गोष्टी अमलात आल्या परंतु स्पॅनिश एकतंत्री राज्यव्यवस्थेविरुद्ध पुन्हा १८९५ त बंड झालें उत्तम अमेरिकेंतील संयुक्त संस्थानानीं १८९८ त क्यूबाबेटात सैन्य उतरविलें इसवी सन १८९९ जानेवारींत स्पेनची सत्ता नाहीशी झाली व संयुक्त संस्थानाचा लष्करी अमल सुरू झाला प्रजासत्ताक राज्याचा पुरस्कार १९०१ मध्यें करण्यात येऊन स्वत च्या हक्काची पायमल्ली होऊ नये म्हणून संयुक्त संस्थानानें ' प्लॅट अमेंडमेन्ट ' ची कलमें क्यूबाकडून कबूल करून घेतलीं एस्ट्रॅडपाल्मा हा प्रजासत्ताक राज्याचा पहिला अध्यक्ष होय सर्व पक्षाच्या लोकाचें एकमत न होता अध्यक्षाला इ स १९०६ त राजीनामा देणें भाग पडलें पुढें बंड झाल्यामुळे पुन्हा संयुक्त-सरकारनें क्यूबा बेटात सैन्य पाठवून शातता प्रस्थापित केली १९०९ पासून पुन्हा प्रजासत्ताक राज्याचा पुरस्कार करण्यात येऊन सेनापति जोस मिग्वेल गोमेझ हा अध्यक्ष व आल्फ्रेडो झयास हा उपाध्यक्ष झाला

**क्यूमी**—प्राचीन रोम (इटली) इ शहर कँपानियात होतें यापासून निआपोलीस १२ मैल आहे हें एओलियन किंवा खाल्डियन यापैकीं कोणत्या लोकानीं स्थापलें याबद्दल निश्चित काहींच सागता येत नाहीं इ स पूर्वी ५२४ मध्यें एट्रुस्कन लोकानीं या शहरावर हल्ला केला पण त्याचा पराभव झाला पुन्हा इसवी सनापूर्वी ४७४ या वर्षी या शहरावर एट्रुस्कन लोकानीं हल्ला केला परंतु यावेळीं या शहरानें सायराक्यूजच्या हीरोची मदत घेतली व क्यूमेच्या लढाईत एट्रुस्कन लोकाचा पराभव केला व
आरमार हाणून लावून त्याची सत्ता मे

रोमच्या छत्राखाली ३१८ मध्यें आलें हॅनिबॉलिक युद्धांत तें रोमच्या बाजूनें लढलें याला पुढें नागरिकत्व मिळालें

**क्यैकटो**, ता लु का —दक्षिण ब्रह्मदेशांत थेटन जिल्ह्यांतील एक तालुका यांचें क्षेत्रफळ ५०८ चौ मै तालुक्याचें मुख्य ठिकाण क्यैकटो याची लो स इ स १९११ सालीं ६१२७ होती या तालुक्यामधून सितंग-क्यैकटो कालवा गेलेला असून तालुक्याचा उत्तर व पूर्व भाग पहाडी परंतु सुपीक आहे १९०३-४ सालीं लागवडीचें क्षेत्रफळ १२० चौ मै होतें व सान्याचें उत्पन्न १,२५,५०० होतें

गा व—दक्षिण ब्रह्मदेशांत थेटन जिल्ह्यांतील क्यैकटो पोटविभागाचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण हें यदत नदीच्या काठीं आहे कड्याच्या पायथ्याशीं क्यैकटो शहर मार्ताबानच्या आखातापर्यंत दक्षिणेस पसरलेलें आहे याची लो स सालीं १९११ ६१२७ असून येथील व्यापार भरभराटींत आहे इ स १८८९ सालीं येथें म्यु क स्थापना झाली तिचें १९०३-४ सालीं उत्पन्न २०३०० रु झालें व खर्च २२३०० रु झाला होता

**क्यैकमरव**—दक्षिण ब्रह्मदेशांत अमहर्स्ट जिल्ह्यांतील एक तालुका पूर्वी त्याला अतरन असें नाव होतें. यांचें क्षेत्रफळ २४१७ चौ मै असून लो स १९११ सालीं ८७ ८६९ होती खेड्यांची संख्या ११३ क्यैकमरावची लो स १५९७ असून तें अतरन् नदीच्या डाव्या तीरावर वसलेलें आहे लागवडीखालीं १९०३-४ सालीं १४० चौ मै जमीन असून सान्याचें उत्पन्न १, ३८,६०० होतें

**क्यैकलत** तालुका–दक्षिण ब्रम्हदेश पेपन जिल्ह्यांतील उत्तरेकडील तालुका यांचें क्षेत्रफळ २८४ चौ मै लो सं (१९११) ७५६७६ खेडीं ११७ असून इ स १९११ सालीं त्याची लोकसंख्या ८, ४३८ होती तालुक्याचें मुख्य ठिकाण क्यैकलत तालुका सपाट व सुपीक आहे लागवडीचें क्षेत्रफळ २१९ चौ मै असून सान्याचें उत्पन्न २,३७,००० होतें

*गां व —क्यैकलत पोटविभाग व तालुक्याचें मुख्य* शहर असून क्यैकलत नदीच्या उजव्या किनाऱ्यावर वसलेलें आहे १९११ सालीं या गावची लो संख्या ८४२८ होती येथें मामुली सरकारी इमारती असून शिवाय १ दवाखाना आहे इ स १९०० सालीं म्यु कमीटीची स्थापना झाली तिचें उत्पन्न इ स १९०३-४ सालीं ५१००० रुपये असून खर्च ३९००० रुपये झाला

**क्यैकमी**—दक्षिण ब्रह्मदेश अमहर्स्ट जिल्ह्यांतील एक तालुका यांचें क्षे फ ९२८ चौ मै लो संख्या(१९११)२३१०१ क्यैकमी ( अथवा ॲमहर्स्ट ) हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे पहिलें ब्रम्ही युद्ध संपल्यावर थोडा वेळ येथें जिल्ह्याचें ठाणें होतें अलीकडे त्याचें महत्व सर्व जाऊन तें साधारण गावांत मोडलें जातें इ स १९०३-४ सालीं ३३ चौ मै लागवडीखालीं क्षेत्रफळ असून सान्याचें उत्पन्न २७,६०० झालें होतें

**क्यैंगटन**, स स्था न —ब्रह्मदेशांतील दक्षिणशान संस्थानांपैकीं एक संस्थान ब्रह्मदेशांत जीं संस्थानें आहेत त्या सर्वांत हें मोठें संस्थान आहे या संस्थानचें क्षेत्रफळ १२,४०० चौरस मैल आहे याच्या उत्तरेस चीनची सरहद्द, पूर्वेस चीन, दक्षिणेस सियाम व फ्रेंचांच्या ताब्यांत असलेला लाओचा प्रदेश, व पश्चिमेस दक्षिणशानसंस्थानांतील मोंग पन, मोंगने इत्यादि संस्थानें आहेत या संस्थानचीं मांडलिक संस्थानें सेन्यावत, सेनमोंग, मोंगपू, मोंगसन व केंगचेंग हीं होत १८ व्या व १९ व्या शतकामध्यें सियाम आणि चीन या दोन देशांनीं या संस्थानावर अनेक स्वाऱ्या केल्या व त्याचा मुलुख उध्वस्त केला या संस्थानचा पुष्कळ भाग डोंगराळ असून हें संस्थान मेकांग व साल्वीन या नद्यांच्या दरम्यान वसलेलें आहे पावसाळ्यांत या प्रदेशांतील हवा दमट व अनुत्साहकारी असते हिवाळ्यांत या ठिकाणीं दाट धुकें पसरलेलें असतें या संस्थानचें तांदूळ हें मुख्य उत्पन्न आहे पण येथें पुष्कळ बागा असून निरनिराळ्या फळांचीहि लागवड येथें केली जाते याशिवाय कापूस, चहा तीळ इत्यादि जिन्नस येथें पिकतात या संस्थानांत मोठीं जंगलें असून जंगलाचें उत्पन्न १९०४ मध्यें ३४,००० रुपये झालें १९११ सालीं या संस्थानची लोकसंख्या २००३४४ होती हे लोक मुख्यत शानजातीचे असून याशिवाय येथें काव, अरव, मुहसो इत्यादि डोंगराळ जातीहि आहेत ५५०५८ लोक शानभाषा बोलतात तर ४२१६० कुनभाषा बोलतात याशिवाय अरव, लू या भाषाहि बोलणारे पुष्कळ लोक येथें आहेत या संस्थानांत २३३८ खेडीं असून, क्यैंगटन हें मोठें गांव व या संस्थानचें मुख्य ठिकाण आहे संस्थानचें सालीना उत्पन्न १,१०,००० आहे व त्यापैकीं ३० ००० ब्रिटिश सरकारला खंडणीबाबत द्यावे लागतात

श ह र —हें क्यैंगटन संस्थानच्या राजधानीचें शहर आहे हें शहर १९ व्या शतकामध्यें वसलें १९०१ सालीं या शहराची लोकसंख्या ५६९५ होती या राजधानींत या संस्थानचा मुख्य रहातो या संस्थानिकाला सवबा असें नाव आहे हें व्यापाराचें शहर म्हणून प्रसिद्ध आहे या शहरापासून क्यैंगटन स्टेशन हें दोन फर्लांगावर असून तेथें पोलिसांची रहाण्याची सोय केली आहे या शहरापासून कँटोनमेंट ७ मैलांवर आहे

**क्यैंगलोन**—ब्रह्मदेशांतील दक्षिणशानसंस्थानांतील पूर्व भागांत असलेलें एक छोटेखानी संस्थान या संस्थानचें क्षेत्रफळ ५४ चौरस मैल आहे या संस्थानचा कांहीं भाग उंचवट्याच्या जागीं तर कांहीं सखल जागीं वसलेला आहे संस्थानांत एकंदरींत १०१ खेडीं असून संस्थानची लोकसंख्या १९११ सालीं ५२९१ होती संस्थानचें वार्षिक उत्पन्न १९०३-४ सालांत ४००० रुपये होतें व त्यापैकीं १५०० रुपये ब्रिटिशसरकारास खंडणी म्हणून द्यावे लागत या

संस्थानचें मुख्य ठिकाण क्यैंगलोन आहे. संस्थानचा प्रदेश सुपीक असून या भागात तांदूळ पुष्कळ पिकतो.

**क्यैंघकम**—ब्रह्मदेशांतील दक्षिणशानसंस्थानच्या पूर्व भागांतील एक छोटेंसें संस्थान. या संस्थानचें क्षेत्रफळ ११६ चौरस मैल आहे. या संस्थानामधून नमपंग नदी वहात गेली आहे. उत्तरेस मोंगनाग संस्थान, दक्षिणेस व पश्चिमेस मोंगनाईसंस्थान व पूर्वेस सलवीन नदी अशा संस्थानच्या मर्यादा आहेत. या संस्थानची लोकवस्ती १९११ सालीं ५५३६ होती. या संस्थानात एकंदर ४२ खेडीं आहेत. या संस्थानचा संस्थानिक म्योजा हा या संस्थानचें मुख्य ठिकाण क्यैंघकम या ठिकाणीं राहतो. हें शहर नमपंग या नदीच्या कांठीं फारच सुंदर मार्गी वसलेलें आहे. या संस्थानचें मुख्य उत्पन्न तांदुळाचें आहे. संस्थानचें वार्षिक उत्पन्न ४००० रुपये असून, त्यांपैकीं २००० रुपये ब्रिटिशसरकारला खंडणी म्हणून द्यावे लागतात.

**क्योनपिभाव**—दक्षिण ब्रह्मदेशांत बेसिन जिल्ह्यामध्ये मर्यमैंग पोटविभागांतील एक तालुका. क्षेत्रफळ ३२० चौ.मै. खेड्यांची संख्या ११८. लो. सं. ( १९११ ). ९०७०८. तालुक्याचें मुख्य ठिकाण कोनपा.(लो सं. ५४१९). हें तालुक्याच्या पश्चिम सीमेवर दगा नदीच्या कांठीं आहे. १९०३–०४ सालीं लागवडीचें क्षेत्रफळ १७१ चौ. मै. होतें. कार्ळीचें उत्पन्न २२९००० रुपये.

**क्यौकपदौंग**—उत्तर ब्रह्मदेशांत मिंग्यन जिल्ह्यातील एक तालुका. क्षेत्रफळ ७७१ चौ. मै. १९११ सालीं लो. सं. ८९६८१. खेड्यांची सं. १९५. तालुक्याचें मुख्य ठिकाण क्यौकपदौंग. लो. सं.९०७. लागवडीचें क्षेत्रफळ(१९०३–४) ११६ चौ. मै. सार्‍याचें उत्पन्न १,१६,०००. तालुक्याच्या पूर्वभागांत ज्वारीचें मुख्य पीक असून तिळाचा पेरा मोठा असतो.

**क्यौकप्यू जिल्हा**.—दक्षिण ब्रह्मदेशांत आराकान विभागाच्या मध्यभागीं असलेला एक जिल्हा. याचें क्षेत्रफळ ४३८७ चौ. मै आहे. चतुःसीमाः—पूर्वेस अराकान योमा; पश्चिमेस बंगालचा उपसागर; दक्षिणेस सँडोवे जिल्हा; उत्तरेस अक्यब जिल्हा. या जिल्ह्यात अराकानयोमा हा मुख्य पर्वत असून महत्वाची अशी एकहि नदी नाहीं. अन व दलेत हे दोन प्रवाह मोठे असून त्यात गलबतें व नावा चालतात. चेदुब बेटावर कांहीं लहानसे ज्वालामुखी आहेत. चेदुब बेटावरील एका ज्वालामुखीखेरीज या जिल्ह्यातील इतर ज्वालामुखींचा स्फोट अलीकडे झाला नाहीं. १९०१–०४ सालीं बेटावरील ज्वालामुखीचा स्फोट झाला होता. त्यावेळीं पेट्रोलियमच्या वायूनें पेट घेतल्यामुळें १००० फूट उंचपर्यंत ज्वाला गेलेल्या होत्या. समुद्रकिनाऱ्यापासून ५० मैल अंतरावर ज्वालामुखींची लीला दिसत होती. समुद्रकिनारा फार रमणीय असून सर्व जिल्ह्याचा किनारा मॅंगल व झाडांनीं अतिशय सुंदर दिसतो. या जंगलांत वाघ, जंगली डुकर, हरिण, व अस्वलें विपुल आढळतात. अराकान योमा पर्वतावर जंगली हत्ती विशेषतः दृष्टीस येत संचार करतात. जिल्ह्याची हवा अतिशय रोगट आहे. पावसाळ्यांत आरंभीं थंडीचा ताप ( मलेरिया ) व पुढें कोठ्यासंबंधी वद्धकोष्ठता वगैरे विकार सर्वत्र दिसतात पारा जून महिन्यांत ९७° अंशपर्यंत चढतो व जानेवारींत ७८° पर्यंत उतरतो. पावसाळा मे पासून आक्टोबरपर्यंत असतो. जुलै, आगष्ट व सप्टेंबर महिन्यांत पाऊस अतिशय पडतो.

*इतिहास*.—एके काळीं, आराकानच्या बलिष्ठ राज्यांत या जिल्ह्याचा समावेश होत असे. त्यामुळें आराकान विभागाच्या इतिहासात या जिल्ह्याचा इतिहास आलेला आहे. ब्रह्मी लोकांनीं आराकान जिंकून घेतल्यावर 'क्यौकप्यू' जिल्हा पुढं आराकानला जोडण्यांत आला. व रमरी व चेदुब बेटावर निराळे सुभे झाले. पुढें इंग्रजांनीं तीं बेटें व क्यौकप्यू मिळून क्यौकप्यू हा एकच जिल्हा बनविला. ब्रह्मी भाषा ४२,२०२ लोक बोलतात, व आराकानी भाषा १,०९,५९९ लोक बोलतात अराकानी लोक १,२८,३०० असून क्यौकप्यू, चेदुब व रमरी येथें त्याची वस्ती विशेष आहे. म्येबन व अन तालुक्यात ब्रह्मी लोक विशेषेंकरून राहतात. चिनी लोक ११,३०० असून अन व म्येबन तालुक्याच्या डोंगराळ प्रदेशात वस्ती करतात. चितागाग मधील कांहीं लोक शेतकी वगैरे करण्याकरता येतात. त्याची म्हणण्या सारखी संख्या नसते मुसुलमानांची संख्या १९०१ मध्यें ३२१०० होती व हिंदु ४२० होते. शेतीवर उपजीविका करणारे १,२४,२०० म्हणजे एकंदर लोकसंख्येच्या शेंकडा ७३ प्रमाणात होते. ख्रिस्ती लोक फार अल्प ( १२१ ) होते. जिल्ह्यात कालवे, पाट वगैरे मुळींच नाहींत. तांदुळाचें पीक पावसावर येतें. नदीच्या आसपासचा भाग खेरीजकरून बाकी जिल्ह्याची जमीन चांगली नाहीं. क्यौकप्यू व रमरी येथील जमीन रेताड आहे. १९०१ सालीं लागवडी खालील क्षेत्रफळ २४२ चौ मै होतें.

या जिल्ह्यात पेट्रोलिअम, लोखंड, दगडी कोळसा हे खनिज पदार्थ आढळतात. समुद्रापासून मीठ तयार करतात. मातीचीं भांडीं व चटया तयार होतात. क्यौकप्यू बंदर म्हणून महत्वाचें नाहीं. येथून तांदूळ, इमारतीचें साग, मीठ, मच्छी, चामडी, शिंगें वगैरे पदार्थ बाहेर गांवीं विशेषेंकरून अक्यब येथें पाठविले जातात. बाहेरून कापूस, रेशीम, लुंग्या, कापड वगैरे जिन्नस या जिल्ह्यात येतात. व्यापार मुख्यत्वें करून इंग्रज कंपन्यांच्या हातीं आहे.

येथें शिक्षणाकडे चांगलें लक्ष दिलें जात नाहीं. प्रत्येक जिल्ह्यात शाळा तपासणारा एक अधिकारी असतो. त्यानें जिल्ह्यातले पोंगी (पंतोजी)वर नजर ठेवावयाची असते. पोंगी लोक त्याची तशी काळजी घेत नाहींत. १९०२ ५ दुय्यम, ८३ प्राथमिक व १५५ प्राथमिक मुलांची संख्या ४६३८ व मुलींची २२२ होती

तालुका—दक्षिण ब्रह्मदेश क्यौकप्यु जिल्ह्यातील तालुका याचें क्षेत्रफळ ५९४ चौ मै १९११ सालीं लो स १६,१९५ तालुक्याचें मुख्य ठिकाण क्यौकप्यु (व जिल्ह्याचेंहि मुख्य ठिकाण) हेंच असून येथील लो स (१९११) ३३२३ खेड्याची संख्या १३१ १९०३–०४ सालीं लागवडीखालीं क्षे फ ५५ चौ मै साऱ्याचें उत्पन्न ५१००० रुपये

गाव—दक्षिण ब्रह्मदेशात क्यौकप्यू जिल्ह्याचें मुख्य ठिकाण सन १८२६ सालीं आराकान इंग्रजांच्या ताब्यात गेलें त्या वेळेस क्यौकप्यू साधारण मच्छी धरण्याचें खेडेंगाव होतें तें १८३८ पर्यंत तसेंच राहिलें गाव चांगलें समुद्रकिनाऱ्यावर वसलेलें आहे येथें पाऊस मनस्वी पडतो सर्व बाजूनीं टेंकड्या आहेत बंदराची हद्द रमरीबेटापर्यंत आहे परंतु खडक मध्यें असल्यानें आगबोटी निर्विघ्नपणे बंदरात येऊं शकत नाहींत येथील लो स १९०१ सालीं ३३२३ असून त्यात आराकानी व ब्रह्मी लोकाचा भरणा जास्त आहे मुसुल्मान ७७६, हिंदु १६४, व चिनी ६०० होते

क्यौकप्यू जलमार्गानें १९०३ व ४ सालीं आयात व निर्यात मिळून ५॥ लक्ष रुपयाचा व्यापार झाला होता तीन चतुर्थांश आयात माल इतर ब्रह्मी बंदरातून व एक चतुर्थांश कलकत्त्याहून आलेला होता सर्व निर्गत माल ब्रह्मी बंदरातच जातो. सन १८८५ सालीं म्यु क चीं स्थापना झाली तिचें १९०३–०४ सालीं उत्पन्न ११,००० रु खर्च १०,००० रु होता

**क्यौकुक्यी**—दक्षिण ब्रह्मदेशात थायु जिल्ह्यातील दक्षिणेकडील तालुका क्षेत्रफळ १०४८ चौ मै १९११ सालीं लो स ४०४४७ खेड्याची स २४५ तालुक्याचें मुख्य शहर कयकी (लो स १६५०) लागवड क्षेत्रफळ ५५ चौ मै काळीचें उत्पन्न १२००० रुपये. हा तालुका मोठा असून पश्चिमेस सित्तग नदीपासून पूर्वेस सालवीन जिल्ह्याच्या सरहद्दीपर्यंत पसरलेला आहे

**क्यौक्तन**—दक्षिण ब्रह्मदेशात ह्यवडी जिल्ह्यातील एक तालुका हा रगून नदी व मार्तावान आखात यांच्यामध्यें असून याचें क्षेत्रफळ ३०४ चौ मै आहे थोडा कडाचा प्रदेश खेरीजकरून बाकी तालुका सपाट आहे क्यौक्तन हें तालुक्याचें मुख्य ठिकाण ब्रम्बून नदीच्या काठीं असून येथून ५ मैलावर ब्रम्बून रगून नदीला मिळते तालुक्याच्या पश्चिमेस सिरियम नावाचें एक ऐतिहासिक गाव असून त्याचा लो स १९११ त १०८९७ होती १९११ सालीं सदर तालुक्याची वस्ती ६८८८७ होती खेड्याची संख्या ९० आहे १९०३–०४ सालीं लागवडीखालीं २३७ चौ मै क्षेत्रफळ होतें साऱ्याचें ४५९००० रु होतें

**क्यौक्ता**—दक्षिण ब्रह्मदेशात अक्यब जिल्ह्यातील एक तालुका याचें क्षेत्रफळ ५६२ चौ मै असून उत्तर आराकान जिल्ह्याच्या सरहद्दीवर आहे याची लो स १९११ सालीं ५५८२० असून खेडीं ११७ होतीं क्यौकताव हें तालुक्याचें मुख्य ठिकाण कलदन नदीच्या तीरावर वसलेलें आहे १९०३–०४ सालीं लागवड क्षेत्रफळ ११६ चौ मै असून साऱ्याचें उत्पन्न १४०००० होतें

**क्यौक्से**—उत्तर ब्रह्मदेशात मेइकतील विभागातील उत्तरेकडील हा जिल्हा असून याचें क्षेत्रफळ १९७८ चौ मै आहे याची चतुःसीमा उत्तरेस म्यिटगे नदी, पूर्वेस शान संस्थानें, दक्षिणेस मेइकतिल जिल्हा, पश्चिमेस—म्यिंग्यन व सैगाग

जिल्ह्याचा स्वाभाविक देखावा चमत्कारिक आहे ज्या भागातून कालव गेले आहेत तो भाग बहुतकरून सपाट असून त्याचा पृष्ठभाग नेहमीं हिरवागार असतो एक पीक काढून घेतल्यावर दुसऱ्या पिकाची तयारी करण्याकरिता शेतकऱ्यांची धादल उडत असते टेंकड्यांच्या उतरणीवरून जंगलातील लहान मोठीं झाडें दुरून पहाणारास सारखीं उतरत आलीं आहेत अशीं दिसतात उत्तरेकडून म्यितगे नदी जिल्ह्याची सरहद्द बनून शान संस्थानात उगम पावून ६० मैलपर्यंत दक्षिणेकडे वहात येऊन आवाजवळ इरावती नदीला मिळते ही पूर्वपश्चिमवाहिनी असून टेंकड्यांच्या पायथ्याशीं तिची खोली इतकी आहे कीं, नावा सहज चालू शकतात हिची रुंदी २०० पासून ३५० यार्ड आहे जिल्ह्याच्या अगदीं उत्तरेस तिजवर रेल्वेचा पूल आहे दुसरी इरावतीला मिळणारी नदी पनलौंग नावाची आहे यामेथिन जिल्हा व शान संस्थान याच्या सरहद्दीवर तिचा उगम होतो

क्यौक्से जिल्ह्यात सरोवरें मुळींच नाहींत पाण्याच्या मोठ्या दलदली कित्येक आहेत सपाट प्रदेशावर लहान झुडुपें व मोठीं झाडें असून जंगलातून बाबू क्वचित आढळून येतात पहाडी प्रदेशात फळभाजी विपुल असून पहाडावर ओक व पाइन झाड पुष्कळ आहेत उतरणीवर सारा सापडतो.

इतिहास—इंग्रज अमलापूर्वीचा इतिहास विशेष महत्त्वाचा नाहीं हा जिल्हा इंग्रजांच्या ताब्यात गेल्यानंतर लवकरच (१८८६ त) मिनझैंगच्या राजपुत्रानें बंड केलें होतें व तें मोडण्याकरिता अधिकाऱ्यास बरेच श्रम पडले. १८८७ सालीं दरोडेखोरानीं शानसंस्थानचे आसपास आश्रय करून पुंडगिरी चालू ठेविली दोनदा त्याची दाणादाण झाली १८८९ सालीं सर्वत्र शांतता झाला या जिल्ह्यात जुनीं प्रसिद्ध देवालयें बरींच आहेत त्यापैकीं बहुतेक अकराव्या शतकात अनवरत राजानीं बाधलेलीं आहेत क्यौक्से टेंकडीच्या पायथ्याशीं एक देवालय आहे तें अशोक राजानें बाधलें असें म्हणतात या सर्व देवालयांचे वार्षिक उत्सव करण्यात येऊन मेळेहि मोठमोठे भरतात क्यौक्से जिल्ह्याच्या दक्षिणेस पिनले व मेठकाथ येथें शानसंस्थानच्या राजधान्या होत्या क्यौक्से जिल्ह्याची लो स १९०१ सालीं १,४१,२१३ होती सबंध जिल्ह्यात क्यौक्सी हें एकच शहर

असून जिल्ह्याचें ठाणें तेथेंच असतें. उत्तर ब्रह्मदेशांत या जिल्ह्याची लोकसंख्या अतिशय दाट आहे याचें मुख्य कारण क्यौक्से जिल्ह्यांत पाटस्थळ असल्यामुळें मंडाले, मेक्टिला सैगंग वगैरे गावांतून शेतकी करण्याचे उद्देशानें पुष्कळ लोक येतात. एकंदर लोकसंख्येंत शेंकडा ९८ बौद्ध-धर्माचे आहेत. मुसलमान ३४००, ख्रिस्ती ७३८ व हिंदु ७०० होते (१९०१). ब्रम्ही भाषा सर्वत्र प्रचारांत असून हिंदुस्तानांतील भाषा बोलणारे शेंकडा १ आहेत. नम्हीं एकंदर १,३५,४०० (१९०१) होत. शानवंशज लोक पूर्वेकडील भागांत बहुतेक आढळतात. बाहेर देशांतून आलेल्या हिंदुलोकांची संख्या १२०० होती. या जिल्ह्यांतील जमीन फारच सुपीक व पाण्याखालीं असल्यामुळें भात वगैरे पिकें अनेकवार घेतां येतात. या जिल्ह्यांत रस्ते जगलिह वगैरे आहे. लोकांचा मुख्य धंदा शेतकी हा आहे. बीणकामहि थोडें फार होतें. जिल्ह्यांत रेल्वे आहे व व्यापार वाढता आहे.

राज्यकारभार — क्यौक्से जिल्ह्याचे २ पोटविभाग आहेत. क्यौक्से व मिट्टा त्यावर स्वतंत्र अधिकारी आहेत. गेमन प्रदेश क्यौक्सेंत असून मुलकी कामदार व जिल्हा खनिनदार यांचीं ठाणीं तेथेंच आहेत. जंगलचा कन्सरव्हेटर मंडालेयेथें रहात असून इरिगेशनचा एक क्यौक्सेला असतो. दिवाणी व फौजदारी कचेऱ्या मामुली जिल्ह्याप्रमाणें असून मुख्य अधिकारी एक असतो. जिल्ह्यांत दिवाणी व फौजदारी काम फार असतें. ब्रह्मी लोकांच्या अमदानींत जमीनमहसूल भाताच्या रूपानें वसूल केला जात असे.

तालुका — उत्तर ब्रह्मदेशांत क्यौक्से जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ १८० चौ. मै. असून १९११ सालीं लो. सं. ५२,३४८ होती. सबंध ब्रह्मदेशांत अतिशय दाट वस्तीचा तालुका हाच होय. जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठि. क्यौक्से येथें असून १९११ सालीं त्याची लो. सं. ५८७७ होती. तालुक्यांत खेडीं ११७ आहेत. तालुका सपाट असून पूर्वेकडे शान संस्थानची हद्द आहे. झावगी नदीचा पाट मधून नेला आहे. १९०३–४ साली सार्‍याचें उत्पन्न २,४४,००० रु. होतें.

गांव — उत्तर ब्रह्मदेशांत क्यौक्से जिल्ह्याचें मुख्य ठिकाण हें झावगी नदीच्या उजव्या तीरावर वसलेलें असून रेल्वेनें मंडालेपासून २९ मैल व रंगूनपासून ३५९ मैल आहे. १९११ सालीं याची लो. सं. ५८७७ होती. गांवाच्या पश्चिमेस सरकारी कामदार लोकांचे बंगले असून रेल्वेच्या पूर्वेस बाजार आहे. टेकडीवर अनवरत राजानें बांधलेलें एक देवालय असून टेंकडीच्या पायथ्याशीं अशोक राजानें बांधलेलें एक देऊळ आहे. उद्योगधंद्यांचे कारखाने या ठिकाणीं कांहींच नसून किरकोळ व्यापार तेथील रहाणारे लोक करतात. १८८८ सालीं म्यु. कमिटीची स्थापना झाली. १९०२ सालीं तिचें उत्पन्न २१,००० रुपये झालें असून खर्च २२,००० रु. झाला होता.

क्यौगोन — दक्षिण ब्रह्मदेशांत बेसिन जिल्ह्यामध्यें गर्यंग्याग (गर्यंगग) पोटविभागांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ २६३ चौ. मै. यांत ७९ खेडीं आहेत. १९११ सालीं लो. सं. ५५,७९९. तालुक्याचें मुख्य ठिकाण (कगन) क्यौगोन (लो. सं. १०१७) हें बेसिन शहरापासून ईशान्येस ४० मैलांवर दक्षा नदीच्या काठीं आहे. १९०३–४ सालीं लागवड क्षेत्रफळ १९० चौरस मैल व साऱ्याचें उत्पन्न ३,३८,००० होतें.

क्रॅकौ — हें शहर आस्ट्रियामधील गॅलिशिया प्रांतांत आहे. याची लो. सं. (१९१४) १,७१,००० या शहरांत पुष्कळ जुन्या व ऐतिहासिक इमारती नजरेस येतात. हें शहर व्हिस्च्युला नदीच्या डाव्या बाजूस वसलें आहे. यामळें या शहरास बरेंच लष्करी महत्व प्राप्त झालें आहे. येथें एक स्टॅनिस्लॉस नावाचें एपिस्कोपेलियन पंथाचें देवालय आहे. याच देवालयांत पोलंड देशाच्या राजास राज्याभिषेक होत असे. याशिवाय या शहरांत आणखीहि पुष्कळ देवालयें आहेत. या शहरीं जॅगेलोन लोकांचें एक मोठें विद्यापीठ आहे. या विद्यापीठाची इमारत भव्य असून तिची रचना गॉथिक पद्धतीनुरूप आहे. या विद्यापीठांत १९१६–१७ सालीं १८५४ विद्यार्थी व १९५ शिक्षक होते. या सर्वांत पोलिश भाषेंत शिक्षण दिलें जातें. या शहरीं शेतकीचीं आउतें, रासायनिक द्रव्यें, साबण, तंबाखू वगैरे जिन्नस तयार होतात. येथें मुख्यत्वेंकरून इमारतीं लाकूड, मीठ, कापड, दारू व सर्व प्रकारचें शेतकी उत्पन्न यांचा बराच व्यापार चालतो. हें शहर इ. स. १८४६ पासून १९१६ पर्यंत ऑस्ट्रियाच्या ताब्यांत होतें. पोलंडला स्वराज्य मिळाल्यानें गॅलिशिया व त्याबरोबर क्रॅकौहि पोलंडच्या अमलाखालीं आलें.

क्रतु — स्वायंभु मन्वंतरांतल्या ब्रह्ममानसपुत्रांतील एक हा ब्रह्मदेवाच्या करापासून उत्पन्न झाल्यामुळें यास असें नांव पडलें. कर्दमप्रजापतीच्या नऊ कन्यांतील एक जी क्रिया ती याची स्त्री असून वालखिल्य नावाचे ६० सहस्र पुत्र होते. संपूर्ण ब्रह्मपुत्र महादेवाच्या शापानें मरण पावले असतां वैवस्वत (चालू) मन्वंतरारंभीं ब्रह्मदेवानें त्यांस पुनः उत्पन्न केलें. त्यांत जरी याचें नांव नाहीं तरी हा 'क्रतुः खलनपत्योमुद्राजन् वैवस्वतेंतरे' या वाक्यावरून उत्पन्न झाला होता असें प्राचीन कोशकार आधार न देतां म्हणतात.

क्रप, आल्फ्रेड — (१८१२—१८८७) जर्मन धातुविद्यावेत्ता. १८१० चे सुमारास इसेन या त्याच्या जन्मगावीं त्याचा बाप फ्रेडरिच क्रप यानें लोहाराचें एक दुकान खरेदी करून पोलादाच्या ओतकामाचा कारखाना काढला. परंतु विक्री न झाल्यामुळें कारखाना वाढीस लागेना. फ्रेडरिचच्या मृत्यूनंतर त्याच्या बायकोनें कारखाना चालूच ठेविला. आल्फ्रेड हा वडील मुलगा असल्यानें चौदाव्या वर्षीच

शाळा सोडून देऊन त्याला कारखान्याकडे लक्ष्य द्यावें लागलें. कित्येक वर्षेपर्यंत आल्फ्रेडला धंद्यात यशच येईना. १८४७ साली त्यानें तोंडानें दारु भरण्याची एक अवजड तोफ तयार केली व १८५१ च्या लंडनच्या प्रदर्शनात त्यानें दोन टन वजनाचा व ओतीव पोलादाचा भरभक्म व निर्दोष गट लोकापुढें ठेविला. यामुळें औद्योगिक जगात क्रांति झाली व इसेनचा माल प्रसिद्धी पावूं लागला, व आगगाडीकरिता एकसंधी पोलादी धावा तयार करण्याचा नवा शोध त्यानें लाविला. अशा प्रकारें जो मोठा फायदा झाला त्याचा विनियोग कारखाना वाढविण्याकडेच करून तोफखाना तयार करण्याकडे त्यानें लक्ष्य लाविलें. क्रप कारखान्याच्या नमुनेदार योजनेला १८६० च्या सुमारास सुरुवात झाली. कच्चा माल आपल्या हुकमतींत असावा म्हणून लोखंडाच्या व कोळशाच्या खाणीहि पैदा करण्यात आल्या. पुढें 'कॅनन किंग' म्हणून प्रसिद्ध झालेला आल्फ्रेड क्रप १४ जुलै १८८७ रोजीं वारला. त्याचा मुलगा फ्रेडरिच आल्फ्रेड क्रप ( १८५४—१९०२ ) यानेंहि कारखाना वाढविला. स. १८९६ सालीं त्यानें कील येथील 'जर्मानिया' नावाचा जहाजें बांधण्याचा कारखाना कौलानें घेतला व तो १९०२ सालीं क्रप कारखान्याच्या मालकीचा झाला. त्याच्या अमदानींत कारखान्यात एकंदर चाळीस हजार मजूर होते. त्याची वडील मुलगी बर्था ही त्याच्या मागून वारस झाली व तिचें लग्न डॉ. गस्टाव व्हॉन बोह्लेन हालबॅच याच्याशीं झालें. पुढें त्यास क्रप व्हॉन बोह्लेन हालबॅच हें नाव धारण करण्याचा हक्क मिळाला. जर्मन आरमाराची बेसुमार वाढ होऊं लागताच क्रपचा कारखानाहि वाढला व त्या ठिकाणीं नव्या जहाजाकरिता जाड पत्रे व तोफा होऊं लागल्या; व १९०८ सालीं कारखान्याचें भांडवल नव्वद लक्ष पौंड इतकें होतें तें पुढें पंचवीस लक्ष पौंडानीं आणखी वाढलें.

क्रपचा कारखाना.—जेव्हा जुलै १ सन १९०३ रोजीं या जर्मनींतील अत्यंत मोठ्या पोलादी कारखान्याचें व जगातील प्रचंड तोफकारखान्याचें स्टॉक कंपनींत रूपांतर झालें त्यावेळीं कारखान्यात ४१६०० कामकरी वर्ग होता. इसेनजवळ मुख्य कारखाना असला तरी या कंपनीच्या पोटकंपन्या पंधरा असून एकंदर ५०० शाखा जर्मनींत व यूरोपात पसरल्या होत्या. कामकऱ्याना रहाण्याकरिता कंपनीच्या अनेक वसाहती होत्या. त्यातून वृद्ध, विधवा वगैरेंना फुकट घरें मिळण्याची व स्वच्छता व आरोग्य राखण्याच्या तजविजी केल्या आहेत.

प्रत्येक वसाहतींत बाजार, गुत्ते, सहकारी भांडार, उपवन व संगीतशाला असे. तेथें स्नानगृहाचीहि व्यवस्था केलेली असे. भोजनगृहें, उपहारगृहें व क्लब ठिकठिकाणीं असत. शाळा असत. सरकारी कायद्याप्रमाणें मुलाना सक्तीचें प्राथमिक शिक्षण दिलें जाई, परंतु गणित, चित्रकला वगैरे विषय मुलाना व शिवणकाम, कपडेलत्ते करणें, स्वयंपाक, इत्यादि गृहशिक्षण मुलींना दिलें जाई. आजार, अपघात व म्हातारपण, या गोष्टींची तरतूद योग्य पेन्शन, वेतन वगैरे देऊन केली जात असे. दरवर्षी २५०००० मार्क केवळ पेन्शन देण्यात खर्च होत. तज्ज्ञ वैद्यांचें एक मंडळ नेमून त्याच्या द्वारा कामकरी व त्यांचीं कुटुंबें याच्या आरोग्याची काळजी घेतली जात असे. १८८७ सालीं १०००००० मार्क पेन्शन देण्याकरिता किंवा ज्यांचे पेन्शनात भागत नसेल अशा कामकऱ्याकरिता मुद्दाम राखून ठेवले गेले. मजुराची भौतिक व नैतिक प्रगति व सुधारणा व्हावी म्हणून १००००० मार्क इतकी रक्कमहि याप्रीत्यर्थ देणगी म्हणून दिली गेली.

आपल्या लोकांची बौद्धिक व सामाजिक प्रगति व्हावी व त्याची करमणूक व्हावी म्हणून क्रपनें निरनिराळ्या दर्जाच्या लोकाकरिता क्लब काढले होते. तसेंच एक वाङ्मय मंडळ व दोन वाचनालयें त्यानें स्थापन केलीं. एका वाचनालयात ३८००० ग्रंथ असून दुसऱ्यात पारिभाषिक किंवा कलाविषयक ग्रंथ सुमारें ४०००० होते. निरनिराळ्या वाचनालयात ११०० वृत्तपत्रें व नियतकालिकें होती. एवढ्या बहुविध साधनाचा फायदा सर्वांना सारखा घेता यावा म्हणून क्रप कंपनीनें स्वेच्छेनें कामाचे तासहि कमी केले होते. ही स्थिति १९०७–०८ सालची होती. गेलें महायुद्ध सुरू झाल्यावेळीं जर्मनीला या कारखान्याचा फार मोठा आधार मिळाला. दारूगोळा व तोफा या कारखान्यातून वाटेल तशा व वाटेल तितक्या तयार होऊं लागून दोस्त राष्ट्रांवर मोठें संकट ओढविलें होतें. महायुद्धानंतर साऱ्या जर्मन उद्योगधंद्याबरोबर याहि कारखान्याला वाईट दिवस आले. पण १९२३ सालापासून हा कारखाना वाढीस लागला आहे.

क्रमवंत ब्राह्मण.—याना किरवंत असेंहि म्हणतात. या जातीचे लोक मुख्यतः कुलाबा, रत्नागिरी जिल्ह्यात व सावंतवाडी संस्थानात आढळतात. सुपाऱ्याच्या बागांत काम करीत असताना त्याना पुष्कळशा कृमींचा नाश करावा लागतो यासाठीं त्याना कृमि मारणारे अगर कृमिवंत असें म्हणतात. कृमिवंत यानाच पुढें क्रमवंत असें नाव वापरण्यात येऊं लागलें असें सेन्ससकार म्हणतात. याच्या नावाची दुसरी एक व्युत्पत्ति अशी आहे कीं या जातीचे लोक मुख्यतः मृताच्या उत्तरक्रियेवर आपली उपजीविका करीत असत त्यावरून त्याना ब्राह्मण लोक कमी लेखूं लागले. क्रिया करणारे म्हणून याना क्रियावंत असें संबोधण्यात आलें व त्यावरून किरवंत अगर क्रमवंत असें नाव पडलें. हे लोक मूळचे साष्टी प्रांतातील सारस्वत जातीचे असावेत अशी एक दंतकथा आहे. हे सारस्वत लोक उपाध्येगिरीचा धंदा करीत पण या सारस्वतातील काहीं लोक खालच्या जातींचें उपाध्येपण स्वीकारीत नसत, पण काहींना खालच्या जातींचेंहि

उपाध्येपण स्वीकारण्यांत कमीपणा वाटत नसे. अशा या इतक्या वर्गाला पुढें क्रियावंत असें स्वतंत्र नाव पडलें. पूर्वी सारस्वतांत मिश्रविवाहाची पद्धत रूढ होती; पण हल्लीं ती नामशेष झाली आहे. या क्रमवंत लोकांत देखील पोटभेद आहेत. रत्नागिरी जिल्ह्यातील व सावंतवाडी संस्थानांतील क्रमवंत लोक व कुलाबा जिल्ह्यातील क्रमवंत लोक यांच्यांत पुष्कळच फरक आहे. कुलाबा जिल्ह्यातील क्रमवंत लोक हे देशस्थांशीं व क्वचित चित्पावनांशींहि बेटीव्यवहार करतात. क्रमवंतामध्यें उपाध्येपण, सावकारी व शेतकी हे तिन्ही धंदे करणारे लोक आहेत.

रा. ज. रा. टुल्लु यांनीं 'वनांचें उपवन' नावांचें एक मनोरंजक आत्मचरित्र लिहिलें आहे. त्यात क्रमवंत जातीचा थोडा प्राचीन इतिहास दिला आहे. शके १८४१ च्या संमतिपत्रात वेदमूर्ति अप्पाभट्ट क्रमवंत यानीं आपलें कुलवृत्त जें दिलें आहे त्यावरून त्याचें पुरातन स्थान जोगाईचें आंबें असून एक पुरुष पुण्यस्तंभीं (पुण्यास!) राहिला होता. त्यास 'टुल्लु' असें उपनाव पडलें. दुसरा टेरव्यात राहिला त्याचें 'टेरडे' नाव पडलें. क्रमविद (वेदपाठपद्धति जाणणारे क्रमाध्यायी) नावाच्या मूळ पुरुषावरून क्रमवंत हें आडनाव पावलें. गागाभट्टास बाळकृष्ण भट्ट क्रमवंत व रघुनाथ भट्ट क्रमवंत असे दोन शिष्य होते. संभाजीनें बाळकृष्णभट्टास मौजे भुर्ळे,तर्फ खंजाळे सुभा, प्रांत वेऊळ हा गाव इनाम दिला. कान्होजी आंग्र्यानें क्रमवंतांना अपंक्त ठरवून त्यांची वृत्ति बंद केली. पेशव्यानीं या बाबतींत क्रमवंताची बाजू घेऊन मध्यस्थी केली; त्यांना संमतिपत्रें दिलीं, पण फारसा उपयोग झाला नाहीं. "श्रीमंताच्या घरीं शिष्टांनीं तुम्हांशीं पंक्तिव्यवहार केला असेल तर आम्ही करतां," असें आंग्र्याचें म्हणणें पडल्यावरून श्रीमंतांनीं शिष्ट ब्राह्मणासह पंढरपुरी क्रमवंतास पंक्तिपावन करून त्यास परत पाठविलें. याप्रमाणें अष्टागर प्रांतातील क्रमवंत प्रामण्य मिटलें, तें दुसरीकडे कल्याण प्रांतीं उद्भवलें पण लवकर मिटलें. अव्वल इंग्रजींत साखरेच्या राईत बुडून मेलेल्या ब्राह्मणाची क्रिया पुलव्याच्या कलेक्टरानें एक क्रमवंत ब्राह्मणाकडून करविली. इंग्रजी अमदानींतील क्रमवंतातील पहिले प्रमुख गृहस्थ वे. शा. सं. जगन्नाथशास्त्री हे १८२९-३७ त प्रसिद्ध झालेल्या 'महाराष्ट्र भाषेच्या कोशा' च्या संपादकीय वर्गात प्रमुख होते. कर्नल जर्व्हिसला याची बरीच मदत असे. टुल्लु, मुळेकर, टेंडे, क्रमवंत यासारखीं आडनांवें क्रमवंतात आहेत.

**कायसीन** (का च नी न)-(क$_{1}$, उ.$_{1}$)उच्च उत्क्वथनांशाचा(बॉइलिंग पॉइंट)हा एक उज्जकर्व(हायड्रोकार्बन,आहे. दगडी कोळशाच्या डांबराचें पातन (डिस्टिलेशन) केलेल्या पाताचे (डिस्टिलेट) पुनः पातन केल्यावर जो उच्च उष्णतामानावर पात येतो त्या पातात काचनीन असतो. अबर (तृणमणी)चें निर्जल पातन केलें म्हणजे त्याच्या पातात काचनीनाचा थोडासा अंश असतो. याचे (काचेन म्हणजे बेंझिनमधून) चपटे अर्धपैलू स्फटिक होतात. यास आंभळी रंगकांति असते. ते २५०° वर वितळतात. काचनीन अल्करीयुक्त करून त्यास रसभावना दिली म्हणजे कांचनाम्ल क, उ$_{1}$, प्र$_{3}$ (कायसेनिक ॲसिड) होतें. अशुद्ध कांचनीनें सुवर्णासारख्या पिवळ्या रंगाचें असतें व यावरूनच यास काचनीन हें नाव पडलें आहे.

**क्रॉय सेंट**—साटा क्रुझ. डॅनिशवेस्ट इंडीजमधील सर्वात मोठें बेट. उ. अ १७° ४०' व पू. रे. ६४° १४'. हें २२ मैल लांब, १ ते ६ मैल रुंद असून याचें क्षेत्रफळ ८४ चौ. मैल आहे. लो. सं. १९०१ त १८,५९० होती. साखर हें मुख्य उत्पन्न आहे इंग्लिश मळेवाले व इंग्रजी भाषा यांचें वर्चस्व सर्वत्र दृष्टीस पडतें. राजधानी क्रिश्चनस्टॅड (स्थानिक गाव—बॅसिन) उत्तर किनाऱ्यावर आहे. येथें गव्हर्नर ६ महिने राहतो. कोलंबसानें हें बेट १४९३ मध्यें शोधून काढलें नंतर परंपरेनें हें डच, ब्रिटिश व स्पॅनिश यांच्या ताब्यात गेलें. १७३३ त हें डेन्मार्कनें विकत घेतलें १८४८ त येथील गुलामगिरी मोडली

**क्रॉन्स्टाट**—क्रॉन्स्टाट हें रशियातील उत्तम तटबंदीचें बंदर व शहर आहे उत्तर समुद्रातील आरमाराचें मुख्य ठिकाण असून रशियाच्या आरमारखात्याचें मुख्य ठिकाण आहे. येथील लो सं. सुमारें ७० हजार आहे हें फिनलंडच्या आखातात कोटलिन बेटात वसलेलें आहे. हें लेनिनग्राड (पीटर्सबर्ग)पासून २० मैलावर आहे. हें फार मजबूत आहे. या शहराची तटबंदी पूर्वीपासून मजबूत असून अलीकडे आधुनिक पद्धतीवर केली आहे. क्रिमियन युद्धाच्या वेळीं अँग्लोफ्रेंच आरमाराला न जुमानणारे जुने पांच किल्ले आता कमी महत्वाचे झाले हल्लीं कान्स्टंटाइन नावाचा नवीन किल्ला बांधण्यात आला आहे.हें शहर सपाट जाग्यावर वसलेलें असल्यामुळें त्याला पुरापासून नेहमीं धोका असतो. येथील बंदर वर्षांत १४० पासून १६० दिवसपर्यंत बर्फामुळें बंद असतें. येथील रहिवाशांपैकीं बरेच नाविक आहेत. क्रॉन्स्टाट हें १७१० मध्यें पीटर दि ग्रेटनें वसविलें. त्यानें कोटलिन बेट स्वीडनपासून १७०३ मध्यें घेतलें.

**क्रियावाद**—क्रिया, विकार इत्यादि गोष्टी आत्म्यावर आपला पगडा बसवितात असें मानणारें हें एक मत आहे. वैशेषिक पंथानें व जैन तत्वज्ञान्यांनीं याचा प्रसार केला. क्रियावादाच्या उलट अक्रियावाद असून तो वेदांत, सांख्य, योग आणि बौद्धसंप्रदाय यातून दिसतो.

**क्रिसा**-ग्रीसमधील प्राचीन शहर हें फोसीस या प्रांतात असून पारनेस पर्वताच्या एका शिखरावर वसलें आहे. होमरनें या शहराचा उल्लेख केला आहे. पुढें क्रिसिआच्या आखातावर सीऱ्हा बंदर बांधलें जाऊन त्याचें महत्व जसजसें वाढत गेलें तसतसें या शहराची महती कमी होत गेली. अम्फीसेटी येथील मंत्रिमंडळानें क्रिसिअनांबरोबर युद्ध करून क्रिसा शहर धुळीस मिळविलें. इ. स. पूर्वी ३२९

त मॅसिडोनच्या फिलिपशी फिरून युद्ध उपस्थित होऊन क्रीसाचा मागमूसहि राहिला नाहीं अर्वाचीन किंवा म्हणजे प्राचीन किंवा असावेंस वाटतें

**क्रीट**—भूमध्यसमुद्रातील बेटात सिसिली व सार्डिनिया याच्या खालोखाल क्रीट हें महत्वाचें बंदर आहे या बेटाचा आकार लांबट असून त्याची पूर्व पश्चिम लांबी १६० मैल आहे व रुंदी ३५ ते ७॥ मैल आहे क्रीटचें क्षेत्रफळ ३३३० चौरस मैल आहे या बेटाचा बराच भाग पर्वतांनीं व्यापलेला असून त्यापैकीं सिलोरिति पर्वताचें स्टाव्हेंस नावाचें शिखर ८१९३ फूट उंच आहे व्हाइट पर्वताच्या हॅगिआस थिओडोरस शिखराची उंची ७८८२ फूट आहे

क्रीट बेटात मेट्रोपोलि, पोर्टमस,अनापोधिआरि व लॅम्नस या नद्या आहेत क्रीट बेटात सत्री व लिंबें याचा सुकाळ असून ग्रीस व कान्स्टांटिनोपल येथें बहुतेक येथूनच त्याचा पुरवठा होतो याशिवाय येथें तंबाखू, कापूस वगैरेहि होतात इ स १८९० च्या खानेसुमारीच्या वेळीं येथील लोकसंख्या ३०१२७३ असून त्यापैकीं नऊदशांश लोक ख्रिस्ती होते व बाकीचे मुसुलमान होते हे सर्व लोक मूळचे ग्रीक असून ते ग्रीक भाषा बोलतात क्रीट बेटात लोखंड, शिसें, मॅंगनीज हे धातु व गधकहि बऱ्याच मोठ्या प्रमाणात सापडेल असा शोध अलीकडे लागला आहे ऑलिव्ह झाडाच्या राईपासून होणारें उत्पन्न महत्वाचें असून त्याच्या लागवडीच्या रीतींमध्यें सुधारणा करण्याकडे सरकारनें लक्ष दिलें आहे येथील शेती अद्याप प्राथमिकावस्थेंतच आहे या बेटात थोडे कारखाने असून त्यात साबणाचे कारखाने महत्वाचे आहेत १९०५ सालीं ४१९६४२ पौंडाचा माल परदेशीं गेला व ५४९६६५ पौंडाचा माल परदेशाहून येथें आला येथील माल तुर्कस्तान, इग्लंड, इजिप्त, ऑस्ट्रिया व रशिया देशांत जातो

**राज्यव्यवस्था**—इ स १८९७ पर्यंत बेटात अनेक बंडें झालीं १८९७ च्या बंडाच्या वेळीं ग्रीसला मध्यस्थी करावी लागली या बंडामुळें क्रीटमधून तुर्क अधिकाऱ्यांची हकालपट्टी होऊन सुलतानाच्या अधिकाराखालीं क्रीटन स्वराज्याची स्थापना झाली या १८९९ च्या राज्यव्यवस्थेप्रमाणें ग्रीसचा राजा जार्ज हा सरक्षक राष्ट्राचा मुख्य प्रतिनिधि असून त्याचे अधिकार श्रेष्ठ समजले जात असत हे अधिकार फक्त व्यक्तिविषयक असल्यामुळें त्याच्यानंतर ते कमी करण्यात आले १९०७ च्या राज्यव्यवस्थेप्रमाणें मुख्य प्रतिनिधीला प्रतिनिधिसभा बोलावणें, बरखास्त करणें, कायद्याला अनुमति देणें वगैरे अधिकार असून परराष्ट्रीयसंबंधात ता या बेटातर्फे प्रतिनिधि समजला जातो व तोच लष्कराचाहि मुख्य समजला जातो ५००० स एक या प्रमाणात प्रतिनिधिसभेचे सभासद निवडले जातात ही सभा वर्षांतून एकदा भरते व तिची बैठक दोन महिनेपर्यंत असते या सभेचा क्रीट बेटाच्या जमाखर्चांवर पूर्ण ताबा असून तिच्या अनुमतीशिवाय कर बसविता येत नाहींत. मुख्य प्रतिनिधि आपल्या अधिकाऱ्याच्या बाबतींत बेजबाबदार असतो, परतु त्याच्या आज्ञापत्रावर सल्लागार मंडळाऱ्या एका सभासदाच्या सहीचा जरूर असते मुख्य प्रतिनिधीला मदत करण्याकरिता तीन सभासदाचें मत्रिमंडळ असतें मुख्य प्रतिनिधीच हे सभासद नेमतो व काढतो हें मत्रिमंडळ प्रतिनिधिसभेला जबाबदार असतें य मडळाच्या ताब्यात न्याय, जमाबदी, शिक्षण वगैरे खातीं आहेत आपल्या कामांत हयगय अगर बेकायदा वर्तन केल्यास त्याच्यावर खटला होतो क्रीट बेटात नावाला मात्र सक्तीचें शिक्षण आहे शिक्षणाकरिता दरसाल २००० पौंड दिले जातात येथील बरेच लोक ख्रिस्ती आहेत

**इतिहास**—अलीकडे सापडलेल्या प्राचीन वस्तूवरून पहाता डोरिअन सत्तेपूर्वी २००० वर्षांपासून क्रीट बेटास एजिअन समुद्रात बरेंच महत्व होतें असें दिसतें ९ व्या शतकापर्यंत हें बेट बायझन्टाइन साम्राज्याचा एक घटक होतें, पुढें तें चाचे लोकाचें व गुलामाच्या बाजाराचें आगर बनलें नंतर तें ग्रीक लोकांच्या ताब्यात गेलें व ग्रीक सरकारनें तें व्हेनिसच्या सरकारास विकलें १७ व्या शतकाच्या शेवटीं या बेटाच्या रहिवाशांच्या इच्छेनुरूप तुर्क सरकारानें हे बेट घेण्याचा प्रयत्न केला इ स १७१८ मध्यें हें बेट तुर्क लोकांच्या ताब्यात गेलें यानतर ग्रीसमध्ये राज्यक्राति होईपर्यंत तें तुर्कांच्याच ताब्यात होतें १८११ त जेव्हा ग्रीसमध्यें राज्यक्रातीला आरंभ झाला तेव्हाच या बेटातील लोकांनीं सुद्धा बंड केलें तें इजिप्तच्या मदतीनें तुर्क सरकारानें मोडलें ग्रीसमध्यें शातता होऊन फ्रान्स, इग्लंड व रशिया या मित्रसंघाच्या मदतीनें जेव्हा ग्रीसची राज्यव्यवस्था झाली, तेव्हाच क्रीट बेट तुर्कांच्या ताब्यात रहावें असें ठरविण्यात आलें(१८३२) नवान अमलाखालीं या बेटची भरभराट झाली मुस्ताफापाशाच्या अमलाखालीं येथील शेतीचा सुधारणा होऊन रस्ते वगैरे बाधले गेले १८४० मध्यें क्रीट बेट पुन्हा तुर्क लोकाच्या ताब्यात गेलें इ स १८५६ जाहिरनाम्यानें ख्रिस्ती लोकाना धर्मस्वातंत्र्य व मुसुलमान प्रजेच्या इतकेच हक्क देण्यात आले परतु या जाहिरनाम्यातील वचनें पाळलीं गेलीं नाहींत म्हणून ख्रिस्ती प्रजेनें बंड केलें यानतरहि तुर्क सरकारनें ख्रिस्ती प्रजेवर जुलूम केले शेवटीं बंडें होऊन ख्रिस्ती लोकाना जास्त हक्क द्यावे लागून या बेटाला काहीं स्वातंत्र्य द्यावें लागलें प्रतिनिधिसभा अस्तित्वात आली नवीन राज्यव्यवस्था खर्चाची व भानगडीची असल्यामुळें पुन्हा बंड उभें होऊन इग्लंडच्या मदतीनें इ स १८७८ मध्यें तुर्क सरकार व बेटाचे काहीं लोक यांजमध्यें समेट झाला त्याला " पॅक्ट ऑफ हॅलेपा " म्हणतात या करारप्रमाणें अंमलबजावणी खात्यातून न्यायखातें वेगळें काढून स्वतंत्र करण्यात येऊन प्रतिनिधि

सभेत ४९ ख्रिस्ती व ३१ मुसुलमान असावे असें ठरलें. इ. स.१८८९ मध्यें क्रीटच्या प्रतिनिधिसभेंतील पक्षामध्यें तंटा होऊन त्याचें ख्रिस्ती मुसुलमान युद्धांत पर्यवसान झालें. त्यात ख्रिस्ती लोकांना अपयश आलें. तुर्क सरकारनें ख्रिस्ती लोकांचे हक्क काढून घेतले. यानंतर क्रीट बेटाची सांपत्तिक व राजकीय स्थिति फार असमाधानकारक झाली. इ. स. १८९६ मध्यें काहीं असंतुष्ट ख्रिस्ती लोकांनी बंड केलें. पुढें त्यांना इतर ख्रिस्ती येऊन मिळाले. हें बंड तरवारीच्या जोरावर मोडण्याचा तुर्कस्तानचा निश्चय झाल्यामुळें परदेशाच्या वकिलांच्या मध्यस्थीचा उपयोग झाला नाहीं. पुढें इतर राष्ट्रें या गोष्टींत लक्ष घालीत आहेत असें पाहून व याच वेळीं आर्मेनियांत बंड होत आहे असें पाहून तुर्क सरकारनें समेट केला. 'हॅलेपा पॅक्ट'मध्यें दिलेले अधिकार देऊन क्रीटमधील सैन्य परत बोलावण्यांत आलें व पैशाची मदत करण्याचें अभिवचन देण्यात आलें.

ख्रिस्ती पुढाऱ्यांनी सुधारणायोजना तयार केली व तुर्क सरकारनें ती बहुतेकांशीं मान्य केली. परंतु ती योजना अमलात आणण्याचें लांबणीवर टाकण्याचा तुर्क सरकारचा बेत पाहून ख्रिस्ती लोक फार असंतुष्ट झाले. इ. स. १८९७ मध्यें पुन्हा बंड झालें. या वेळेस ग्रीसनें ख्रिस्ती लोकांची बाजू घेऊन त्याच्या मदतीकरिता राजपुत्र जॉर्ज याला त्याच्या हाताखाली सैन्य देऊन पाठविलें. त्यानें क्रीट बेटाचा काहीं भाग घेतला. तेव्हा यूरोपच्या राष्ट्रांनीं सैन्यें पाठवून कॅंडिया वगैरे शहरें घेतलीं व आपल्या निकालाचा खलिता ग्रीस व तुर्कस्तान यांना पाठविला. त्यातील निकाल खालीं दिल्याप्रमाणें होताः—

(१) काहीं झालें तरी ग्रीसला क्रीट बेट जोडता येत नाहीं. (२) सुधारणायोजना अमलात आणण्यास तुर्कस्ताननें उशीर लावला म्हणून आता क्रेटि बेटात स्वायत्त राज्यपद्धति सुरू करावी व तेथील राज्यकारभार स्वतंत्र करून तुर्क साम्राज्यात त्याची गणना व्हावी. (३) ग्रीस व तुर्कस्तान यांनीं आपआपलीं सैन्यें परत न्यावीं. इ. स. १८९८ मध्यें ग्रीसचा राजा जार्ज याला क्रीट येथें तेथील सत्तेचा मुख्य प्रतिनिधि नेमण्यात आलें. इ. स. १८९९ मध्यें आंतर्राष्ट्रीय अधिकाऱ्यांनीं क्रीटच्या रहिवाशी अधिकाऱ्यांना स्थानिक कारभार दिला.

मागील बंडात एम. व्हेनेझोला याचें अंग होतें म्हणून जार्ज यानें त्याला सल्लागार मंडळातून काढून टाकिलें. पुढें क्रीटच्या प्रतिनिधिसभेंत विरोधी पक्षाचा तो पुढारी बनला. नंतर त्यानें बंड केलें परंतु तें मोडलें गेलें. जार्जच्या कारकीर्दींत राज्यव्यवस्थेंत काहीं सुधारणा झाल्या. जार्ज नंतर अलेक्झांडर झेमिस याला मुख्य प्रतिनिधि नेमिलें; त्याच्या कारकीर्दींत शांतता होती. म्हणून यूरोपच्या पहिल्याप्रतीच्या राष्ट्रांचीं असलेलीं क्रीटमधील सैन्यें परत नेण्यात आलीं.झेमिस यानें निःपक्षपातानें कारभार केला व मुसुलमानांना मुद्दा राज्यकारभारातील मोठ्या जागा दिल्या तरी त्यांच्या तक्रारी असत. सर एडवर्ड ग्रे यानें पार्लमेंटमध्यें त्या तक्रारी फुगवून सांगितल्या जातात असें सांगितलें. सैन्यें परत नेण्यापूर्वी यूरोपच्या राष्ट्रांनी काहीं अटींची पूर्तता करून घेतली. त्या अटी अशाः (१) तद्देशीय लोकांच्या सैन्याची उभारणी-(२) बेटात शांतता राखणें व(३) मुसुलमान प्रजेला कोणतीहि भीति नसणें. झेमिस हा अथेन्सला जाऊन ग्रीसला क्रीट बेट जोडण्याचा प्रयत्न करूं लागला. तो बाहेर असतानाच क्रीटच्या प्रतिनिधिसभेनें क्रीट बेट ग्रीसला जोडण्याचा ठराव पास केला व ग्रीसच्या राजाच्या नावानें कारभार सुरू केला. मुसुलमान प्रतिनिधींनीं इंग्लंडकडे याच्या विरुद्ध तक्रार केली तेव्हा मुसुलमानाच्या हितसंबंधाचें रक्षण आपण करूं असें त्याना कळविण्यात आलें तदनंतर ग्रीसच्या राजाच्या नावानें शांततेनें कारभार चालला १९०९ त यूरोपातील राष्ट्रांनीं आपलीं राहिलेलीं सैन्यें क्रीटमधून नेलीं. या बेटाच्या आसपास चार लढाऊ जहाजें मात्र ठेवण्यात आलीं. मुसुलमान प्रजेचें संरक्षण व आटोमन साम्राज्याच्या अधिकाराचें संरक्षण हाच त्याचा उद्देश होता. ही व्यवस्था तात्पुरती होती व तिच्या योगानें दोन्ही पक्षाचें समाधान झालें नाहीं व ग्रीसमध्यें तर तिच्यामुळें इ. स. १९०९ व १० मध्यें लष्कर व राज्यव्यवस्थेसंबंधीं संकट ओढवलें. १९१२ त तुर्कस्तानशीं बल्गेरिया, ग्रीस, सर्व्हिया व मॉंटेनिग्रो या दोस्तराष्ट्रांचें युद्ध सुरू झालें. १९१३ त लंडन येथें तह होऊन मिडिया एनॉसशीं जोडणारी जी रेषा तिच्या पश्चिमेकडच्या यूरोपियन मुलूख तुर्कस्तानानें दोस्ताना देऊन टाकिला. तेव्हापासून क्रीट कायमचें ग्रीसकडे आलें.

**क्रूगर**—( १८२५—१९०४ ). स्टेफॅनस, जोहॅनसपॉल क्रूगर, हा ट्रान्सव्हाल रिपब्लिकचा प्रेसिडेंट, केप कॉलनींतील कोल्सबर्ग येथें १८२५ आक्टोबर ता १० रोजीं जन्मला. क्रूगर घराण्याचा मूळ पुरुष जॅकब क्रूगर नावाचा जर्मन असून त्या घराण्यातील मंडळी डच ईस्ट इंडिया कंपनीच्या मदतीनें केपकडे सन१७१३ सालीं रहावयास गेलेली होती. इ. स.१८३५-४०च्या सुमारास पॉल क्रूगर आपल्या आईबापाबरोबर केपकॉलनी सोडून ऑरेंजच्या उत्तरेकडील प्रदेशात रहावयास गेला. लहानपणापासूनच तो धाडसी होता. रानटी व सुधारलेल्या अशा दोन्ही जातींच्या संमिश्र समाजात तो वाढला होता त्यामुळें सतत लढाया, शिकारी असल्या व्यवसायात तो गुंतलेला असल्यानें त्याचें शिक्षण लिहिणें-वाचणें व डच प्रेस्बिटेरियनपंथाचें धार्मिक ज्ञानसंपादन यापलीकडे फारसें झालें नव्हतें.

क्रूगर लहानपणींच मेटवेल व झुलु याच्याबरोबर होणाऱ्या लढायात भाग घेई. त्याच्या चवदाव्या वर्षी त्याच्या घरचीं सर्व मंडळी व्हॅालनदीच्या उत्तरेस रहावयास गेलीं ( ट्रान्सव्हाल स्टेट स्थापना करणारांपैकीं ते होते ). पासून सैन्यात त्याचा दर्जा वाढता वाढता ...

वर्षी बेच्युआनाच्या मोहिमेंत तो सैन्याचा कमांडर झाला लढाया नसतील त्यावेळीं तो दूरवर (झाबेरी नदीपर्यंत) शिकारीवर जात असे १८५२ मध्यें ट्रान्सव्हालचें स्वातंत्र्य ग्रेटब्रिटननें मान्य केलें यथपासून पुढें अनेक वर्षे तेथें अराजकता माजलेली होती शिवाय ऑरेंज फ्रीस्टेटचें राज्य मोडून दोन्ही देशाचा राज्यसंघ स्थापण्याचा प्रयत्न प्रेटोरियस-क्रूगर-पक्ष करीत होता यापुढील या देशाच्या इतिहासात क्रूगरचें नाव अगदी प्रामुख्यान येतें १८६४ मध्यें प्रेटोरियस प्रेसिडेंट होता व क्रूगरला सैन्याचें कमांडर जनरल नेमण्यात आलें १८७० मध्यें डच व ब्रिटिश यांच्यातील एका सरहद्दीसंबंधींच्या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल असमाधानकारक लागल्यामुळें प्रेटोरियसचा पक्ष पदच्युत होऊन थॉमस बर्गर्स नावाचा इसम प्रेसिडेंट झाला त्या कारकीर्दींत क्रूगरनें बर्गर्सच्या विरोधीपक्षांत सामील होऊन कर न देण्याविषयींहि बोअर लोकास उपदेश करण्यास सुरुवात केली अशा विरोधी धोरणानें राज्यकारभार बंद पडून शेवटी १८७७ मध्यें ब्रिटिश लोकांनीं तो प्रांत आपल्या प्रांतास जोडून टाकला या कृत्यास ट्रान्सव्हालचा देशभक्त क्रूगर यानें विरोध केला खरा, परंतु ती गोष्ट चुकत नाहीं असें ठाम दिसल्यामुळें नंतर त्यानें ब्रिटिश सरकारची एक मोठया पगाराची नोकरी पत्करली यावरून यावेळीं ट्रान्सव्हालातील बोअर लोकांना देशभक्तीची व्याख्या बरोबर कळतच नव्हती असें म्हणावें लागतें तथापि नोकरी पत्करल्यावरहि क्रूगरनें ट्रान्सव्हाल पुन्हा स्वतंत्र करण्याची चळवळ उघड चालवून, इंग्लंडमध्यें ट्रान्सव्हालचा ब्रिटिशांशीं जडलेला नूतन संबंध तोडून टाकण्याची खटपट करण्याच्या दोन डेप्युटेशनसमध्यें सदस्य पाठविले। तव्हा या राजद्रोही कृत्याबद्दल अर्थात क्रूगरला नोकरीतून काढून टाकण्यात आलें १८८० मध्यें बोअर लोकांनीं बंड केलें त्या बंडातील नेतृत्रयींपैकीं जनरल जौबर्ट व प्रेटोरियस हे दोघे व क्रूगर हा तिसरा होता १८८३ मध्यें क्रूगरला बहुमतानें ट्रान्सव्हालचा प्रेसिडेंट निवडलें १८८३ मध्यें प्रेसिडेंट क्रूगर पुन्हा इंग्लंडमध्यें गेला व ब्रिटिशसरकारपासून लॉर्ड डर्बीमार्फत लंडन कन्व्हेन्शन नामक करारपत्र त्यानें मिळविलें त्यायोगें ट्रान्सव्हालचा राज्यकारभार पुन्हा पूर्णपणें बोअर लोकाच्या हातीं गेला परंतु तेव्हापासून पुन्हा राष्ट्राची स्थिति खालावत चालली स्वत क्रूगर फारसा लोकप्रिय नव्हता, राज्यकारभाराच्या कामातहि तो बराच नालायक ठरत चालला होता फक्त ब्रिटिशसरकारबरोबरच्या कारभारात यश आल्यामुळें देशात त्याला साधारण पाठिंबा होता इतकेंच १८८८ मध्यें क्रूगर दुसऱ्यादा प्रेसिडेंट निवडून आला १८८९ डॉ लिडस हा तरुण हॉलंडर स्टेट सेक्रेटरी नेमला गेला त्यानें कुळमक्तेपद्धतीला फार उत्तेजन दिलें व्यापारात सरकारलाहि हक्क घेऊं देण्याचें तत्व मान्य करण्यात आलें १८९० ते १८९२ व १८९४ या सालांत मताधिकारासंबंधींच्या कायद्यात फेरबदल करून क्रूगरनें सब यूटलंडर लोकांनां त्या अधिकारातून वगळून टाकलें या त्याच्या कृत्यामुळें इतर समाजाचें मत क्रूगरविरुद्ध इतकें बळावलें होतें कीं, १८९३ च्या निवडणुकींत क्रूगरच्या ऐवजीं जौबर्ट प्रेसिडेंट निवडून येणार असें बहुतेक लक्षण दिसत होतें तथापि निवडणुकीच्या वेळीं प्रतिनिधिसभेच्या सभासदाशीं संगनमताचें धोरण ठेवून कित्येक विरोधक मतदारांच्या मताचा हक्क कायद्याच्या फालतू सबबींवर काढून टाकून व मतें मोजण्याच्या कामातहि कांहीं लटपटी करून जौबर्टपेक्षा अधिक मतें मिळवून निवडणुकींत आपला विजय झाल्याचें क्रूगरनें जाहिर करविलें त्या निकालाविरुद्ध जौबर्टनें प्रतिनिधिसभेकडे अपील केलें, पण त्याचा कांहीं उपयोग न होता क्रूगर तिसऱ्यादा प्रेसिडेंटच्या जागीं कायम झाला बर्गर्स व जौबर्ट यांच्याबरोबर क्रूगरनें केलेल्या वर्तनावरून व तसेंच यूटलंडर्सना मताधिकारातून वगळण्याच्या त्याच्या कृत्यावरून असें दिसतें कीं, ट्रान्सव्हालचें सरकार विशिष्ट मंडळाच्या हातात ठेवून आपण स्वत त्या मंडळाचा आमरण प्रेसिडेंट रहावें, अशी त्याची महत्वाकांक्षा होती

१८७७ पासून क्रूगरनें आपलें परदेशी राजकारण सतत ब्रिटिशविरोधक ठेवलें आणि बेच्युआनालँड, ऱ्होडेशिया व झुलुलँड या तिन्ही ट्रान्सव्हालची सरहद्द वाढविण्याचा व ब्रिटिश मुलुख आपल्या राज्यात सामील करण्याचा क्रम चालविला या गोष्टींत १८९५ पर्यंत क्रूगरला यशच येत गेलें, पण त्या सालीं मात्र त्याला पाहिजे होतें तें बंदर मिळालें नाहीं अंतर्गत कारभारातील त्याचें धोरणहि विचारशून्य पणाचें, बेफिकिरीचें व बेदिकतीचें असे त्यामुळें शेवटीं अनर्थ गुदरले यूटलंडर्स लोकाच्या डेप्युटेशनला त्यानें जें उत्तर दिलें त्यांत त्याच्या एकंदर वागणुकीचें स्पष्टीकरण चांगलें होतें तो म्हणाला "हा माझा देश आहे व हे या देशाचे कायदे आहेत, ज्यानां हे कायदे पाळावयाचे नसतील त्यांनीं हा माझा देश सोडून खुशाल चालतें व्हावें" यूटलंडर्स लोकांशीं सलोख्यानें तो वागला असता तर त्याच्या राज्यास चांगली बळकटी आली असती शिवाय जेमसनच्या हल्ल्याच्या प्रकरणावरूनहि त्यानें कांहीं एक बोध घेतला नाहीं आणि ब्रिटिश सरकारनें मध्यस्थी केली तरीहि यूटलंडर्स लोकांच्या तक्रारी दूर करण्याचें क्रूगरनें साफ नाकारलें १८९८ मध्यें क्रूगर चवथ्यांदा ट्रान्सव्हालचा प्रेसिडेंट निवडून आला १८९९ मध्यें परकीयावर जो जुलूम चालला होता त्याचा विचार करण्याकरिता ब्लोएमफॉंटेन येथें सर मिलनर व प्रेसिडेंट क्रूगर यांची एकत्र बैठक भरली पण त्या बैठकींत क्रूगर आपली तत्वें तिळमात्र सोडण्यास तयार नव्हता येथपर्यंतच्या सर्व प्रसंगीं क्रूगरनें स्वत च्या व आपल्या समाजाच्या करिता सर्व फायदे मिळवून इतरानां तो काडीनें सवलत देण्यास तयार नसे यामुळेंच फ्री स्टेटचा प्रे सर बॉन ब्रँड याच्या

बरोबर क्रूगरचें कधीं पटलें नाहीं. मॅंढनंतर रीट्झ प्रेसिडेंट झाला. त्यावेळीं क्रूगरनें सर्व बोअर लोकसत्ताक राज्यांनीं त्यांच्या स्वातंत्र्यावर घाला आल्यास एकमेकांना परस्पर मदत करण्याचा बंधनपर ठराव केला, पण त्या ठरावानें फ्रीस्टेटला कांहीं मदत न होता क्रूगरनें मात्र ब्रिटि. शाविरुद्ध त्याची वारंवार मदत घेतली. याप्रमाणें क्रूगरनें आपला एक कावा तर साधलाच. पण त्याच्या पुढें चढून जाऊन मिल्नर बैठकींत कोणतीहि सवलत इतरांना द्यावयाची नाहीं अशा निश्चयानें तो आला. त्या बैठकींत मताधिकार देण्याचें त्यानें वरकरणी कबूल केलें पण त्याला दुसऱ्या इतक्या अनेक अटी घातल्या कीं तें सर्व ढोंग होतें हें उघड दिसत होतें. मिल्नरनें जी जी म्हणून सूचना पुढें मांडली तिला ट्रान्सव्हालच्या स्वातंत्र्यास यानें धक्का पोहोंचेल असें क्रूगरचें ठराविक उत्तर मिळत गेलें. अर्थात् ही बैठक अयशस्वी झाली. पुढें १८९९ आक्टोबरमध्यें ग्रेट-ब्रिटनबरोबर पत्रव्यवहार होऊन शेवटीं ट्रान्सव्हाल सरकारनें निर्वाणीचा खलिताहि पाठविला व तावडतोब ट्रान्सव्हाल व फ्रीस्टेट यामधील बोअर लोकांनीं नाताळ व केप कॉलनी यावर स्वारी केली. १९०० मध्यें ब्रिटिश फौजेनें ब्लोएम फौंटेन व प्रेटोरिया हे प्रदेश व्यापले. त्यावेळीं स्वत. वृद्ध-पणामुळें रणांगणावर जाण्यास असमर्थ असल्यामुळें क्रूगर आपल्या कार्यकारी मंडळाच्या सल्ल्यानें यूरोपांत जाऊन तिक-डील राष्ट्रांची मध्यस्थीरूपी मदत मिळविण्याच्या खटपटीस लागला. परंतु त्यांत त्याला बिलकुल यश आलें नाहीं. यापुढें राजकारणांत त्याचें महत्व उरलेंच नाहीं तेव्हां तिकडेच युट्रेट येथें राहून त्यानें स्वत.चें चरित्र लिहून प्रसिद्ध केलें. १९०४ जुलै १४ रोजीं तो जिनेवा सरोवरा-नजीक क्लेरेन्स येथें मरण पावला प्रिटोरिया येथें त्याच्या तिसऱ्या बायकोच्या थडग्यातच त्याचें शव पुरण्यांत आलें त्याच्या एकंदर तीन बायका झाल्या. त्याचें कुटुंबहि मोठें होतें. प्रिटोरिया येथें क्रूगरचा एक पुतळा स्थापला त्या-वेळीं क्रूगरच्या बायकोच्या इच्छेवरूनच क्रूगरच्या डोक्या-वरील टोपी उताणी ठेवण्यांत आली, कारण असें कीं, तींत पावसाचें पाणी आपोआप सांचावें व तें पक्ष्यांना पिण्यास उपयोगीं पडावें.

**क्रूनस्टाड**—हें ऑरेंज रिव्हर कॉलनीचें शहर असून रेल्वेनें ब्लोएमफाँटनच्या ईशान्येस १२७ मैल व जोहान्स-बर्गच्या नैर्ऋत्येस १३० मैल आहे. १९०४ सालीं येथील लोकसंख्या ७१९१ होती हें शहर व्हाल्सानदीच्या तीरावर असून समुद्रसपाटीपासून ४४८९ फूट उंच आहे हिऱ्याच्या व कोळशाच्या व्यापाराचें हें केंद्रस्थान आहे येथील हवा आरोग्यकारक आहे यामारचौकात डच रिफॉर्मड प्रार्थना-मंदीर आहे. १९०२ च्या ॲंग्लो बोर युद्धांत ब्रिटिशांनीं ब्लोमेफांटेन काबीज केल्यावर ऑरेंजफ्रीस्टेच्या बोर लोकांनीं हें राजधानीचें शहर केलें. लवकरच लॉर्ड रॉबर्ट्सनें हें काबीज केलें. लेस येथें हिऱ्याच्या व व्होर फॉन्टेन येथें कोळ-शाच्या खाणी आहेत.

**क्रेक**—इ स. ६३९ या वर्षी सयाममध्यें बौद्ध धर्माचा प्रसार होण्यास सुरवात झाली असें म्हणतात. ज्या राजाच्या अमलाखालीं या प्रसारास सुरवात झाली त्या राजाला पुराणकथेमध्यें क्रेक हें नांव दिलें आहे. बौद्ध धर्माच्या सन्मानार्थ त्यानें इ. स. ६४२ पासून सुरवात होणारा लोकां-मध्यें चाललेला शक स्थापन केला

**क्रेसी**—फ्रान्सच्या उत्तरभागातील सोमी विभागांतील एक शहर. हें मेई नदीच्या काठांवर वसलें आहे. येथें १३४६ च्या आगष्ट महिन्याच्या २५ व्या तारखेस तिसऱ्या एडवर्डच्या नेतृत्वाखालीं इंग्लंड व व्हॅलाइजचा फिलिप राजा याच्या नेतृत्वाखालीं फ्रेंच लोकांमध्यें युद्ध होऊन इंग-लंडास मोठा जय मिळाला

**क्रोपॉटकिन**—( १८४२–१९२१ ) हा रशियन भूगोल-शास्त्रवेत्ता, ग्रंथकार व क्रांतिकर्ता पुरुष इ स १८४२ मध्ये मास्को येथें जन्मला त्याचा बाप सरदार होता. त्याची आईहि मोठ्या कुलांतील असून तिला विद्येची फारच अभि-रुची होती वयाच्या पधराव्या वर्षी क्रोपॉटकिन याला त्याच्या बापानें सरदाराच्या मुलांकरितां स्थापन झालेल्या लष्करी शिक्षणाच्या शाळेंत दाखल केलें लष्करी शिक्षण घेत असतांना त्यानें इतर विषयांचा आस्थापूर्वक अभ्यास केला विशेषत. फ्रेंच वाङ्मय इतिहास याकडे त्यानें लक्ष्य पुरविलें रशियातील शेतकरी वर्गाच्या स्थितीबद्दल त्याला फार वाईट वाटत असे व शेतकऱ्यांच्या हितसंबंधा-विषयीं त्याचें लक्ष्य शेवटपर्यंत वाढतच गेलें याच सुमारास रशियांत एक नवीन प्रकारची क्रांतिकारक चळवळ उदयास येऊं पहात होती त्या चळवळीमध्यें क्रोपॉटकिन हा उत्सा-हानें भाग घेऊं लागला इ स १८६२ मध्यें त्यानें आपलें नांव कोसाक स्वाराच्या तुकडींत दाखल केलें पुढें कांहीं दिवस ट्रॅन्सबैकेलियाच्या गव्हर्नराचा सेक्रेटरी या नात्यानें काम केलें. इ. स १८६४ मध्यें भूगोलशास्त्रवेत्त्यांची उत्तर मँचुरियाची पहाणी करण्याकरितां एक कमिटी नेमली गेली, त्याचा हा अध्यक्ष झाला. ही पहाणी झाल्यानंतर मध्य मँचूरियाची पहाणी करण्याचें कामहि यानें अंगिकारिलें यामुळें त्याचा फार फायदा झाला पुढें इ स १८६७मध्यें त्यानें सै.यांतील कामाचा राजीनामा दिला सेंटपीटर्सबर्ग येथील विश्वविद्यालयांत त्यानें आपलें नांव दाखल केलें १८७१ मध्यें त्यानें एक विद्वत्तापूर्ण निबंध प्रसिद्ध करून त्याकाळचे आशिया खंडांतील नकाशे कसे चुकीचे होते हें त्यानें सप्रमाण सिद्ध केलें इ स. १८७१ मध्यें त्यानें फिनलंड व स्वीडनमधील हिमकालीन प्रस्तरावशेष शोधून काढले, पण आणखी नवीन लावण्या-पेक्षा पूर्वी झाले आहेत तेच शोध जनतेंत फैलावण्यार्थ काम त्याला अधिक प्रिय वाटूं लागल्यामुळें तो सेंटपीटर्सबर्ग परत आला व त्यानें क्रांतिकारक पक्षांना मागू .

इ स १८७२ मध्यें तो जीनिव्हा येथील सार्वराष्ट्रीय मजूर संघाचा सभासद झाला पण या संघाचीं मतें त्याला मवाळ वाटल्यामुळे त्यानें रशियात अधिक जहाल मताचा प्रसार करण्यास सुरवात केली इ स १८७४ मध्यें त्याला पकडण्यात आलें पण इ स १८७६ मध्यें त्यानें आपली कशावशा सुटका करून घेतली व तो इंग्लंडमध्यें आश्रयार्थ आला थोडक्याच दिवसानीं तो स्वित्झर्लंडमध्यें गेला तेथील जूरा फेडरेशनचा तो सभासद झाला या संस्थेतर्फे त्यानें एक वर्तमान पत्र सुरु केलें मधून मधून तो क्रांतिकारक चळवळीसंबधींचीं छोटीं पत्रकेंहि प्रसिद्ध करीत असे इ स १८८१ मध्यें रशियाचा झार दुसरा अलेक्झांडर याचा खून झाला त्यामुळें स्वित्झर्लंड सरकारनें त्याला आपल्या देशातून हद्दपार केलें लंडन येथें एक वर्ष काढल्यावर तो थॉनान येथें परत आला पण तो सार्वराष्ट्रीयमजूरसंघाचा सभासद आहे या सबबीवर फ्रेंच सरकारनें त्याला पकडून पाच वर्षांची शिक्षा ठोठावली पण फ्रेंच राष्ट्रसभेंत त्याच्या तर्फे पुष्कळांनीं त्याच्या सुटकेबद्दल चळवळ केल्यामुळें त्याची सुटका झाली सुटका झाल्यानंतर तो लंडन येथें राहण्यास आला एन्सायक्लोपिडीया ब्रिटानिकांत त्यानें रशियासंबधीं बरेच लेख लिहिले याशिवाय दि स्टेट इट्स पार्ट इन् हिस्टरी ( १८९८ ) फील्डस, फॅक्टरीज अँड वर्कशॉप्स ( १८९९ ) मॉडर्न सायन्स ॲंड अनार्किझम (१९०३), रशियन लिटरेचर इत्यादि पुष्कळच ग्रंथ त्यानें लिहिले लंडन येथें पुष्कळ वर्षे घालवल्यानंतर क्रोपॉटकिन हा रशियामध्यें इ स १९१७ मध्यें परत आला इंग्लंडमध्यें असताना इंग्रज लोकांनीं त्याला चांगल्या रीतीनें वागविलें होतें रशियामध्यें येताच लंडन टाईम्सला एक पत्र लिहून त्यानें त्याबद्दल गौरवपर उद्गार काढले रशियामध्यें मान तो ज्या आशेनं परत आला ती आशा फलद्रूप होण्याचें बाजूला राहून त्यास निराशेचें जीवित कंठावें लागलें बोल्शेविकांच्या अमलाविरुद्ध तो कडक टीका करीत असे याबद्दल रशियातील जहाल पक्ष त्याला पाण्यात पहात होता त्यामुळें त्याला फार वाईट वाटत असे अशा स्थितींत फेब्रुवारी ता ८ इ स १९२१ मध्यें तो मास्को येथें मरण पावला

**क्रोमाइट**—क्रुमित ( क्रोमियम ) व लोहस ( लोखंड ) यांचें प्राणिद झाला क्रुमिक लोह किंवा क्रुम लोहाची अशोधित धातु असेंहि नाव असून क्रोमियम व त्याचे संयुक्त पदार्थ मुख्यत ह्यापासूनच मिळतात त्याचे समकोन अष्ट कोनाकृति स्फटिक असतात. परंतु तें बहुधा ल्हान ल्हान गोळ्याच्या रूपात आढळतें दिसण्यात तें लोहचुंबकीय लोखंडासारखें दिसतें, परंतु त्याच्या अंगी लोहचुंबकीय गुण असलाच तर फार थोडा असतो त्याचें विशिष्टगुरुत्व ४ ५ आहे औपपत्तिक संकेताप्रमाणें त्यामध्यें क्रुम प्राणिदाचें प्रमाण शें ६८ व लोहस प्राणिदाचें प्रमाण शें ३२ असावयाचें परंतु बहुतकरून लोहस प्राणिदाच्या ऐवजीं अंशत म्याग्नेशिया व क्रुमप्राणिदाऐवजीं अल्युमिना व लोहप्राणिद आल्यामुळें खनिज धातूंत क्रुमप्राणिदाचें प्रमाण शें ४० तें ५० पेक्षा ज्यास्त नसतें उल्कापातातून पडलेल्या लोहात व दगडात हें द्रव्य सापडतें. हल्लीं कॅलिफोर्निया, तुर्कस्तान, उरलपर्वत व न्यूझीलंडमध्यें डून डागर व शेटलंडात उन्स्ट येथें खाणींतून हें खनिज काढतात

रंग व रंगीत चिटें करण्याला लागणारें क्रुमसंयुक्त पदार्थ तयार करण्याकडे, त्याच प्रमाणें क्रुम पोलाद करण्याकरिता या द्रव्याचा पुष्कळ उपयोग केला जातो

**क्रौंचद्वीप**—पृथ्वीच्या सप्तमहाद्वीपांत पाचवें हें घतोदाच्या पलीकडे असून याचा विस्तार अथवा रुंदी सोळा लक्ष योजनें आहे व यास तितक्याच रुंदीच्या क्षीरसमुद्राचें वेष्टण आहे येथील अधिपति प्रियव्रत राजर्षीचा पुत्र घृतपृष्ठ असून त्यात क्रौंच नामक एक अत्यंत मोठा पर्वत आहे त्यावरूनच यास क्रौंचद्वीप असें नाव पडलें आहे यात शुक्ल, वर्धमान, भोजन, उपबर्हिण, नंद, नंदन आणि सर्वतोभद्र असे सात पर्वत आहेत आणि अभया, अमृतौघा, आर्यका, तीर्थवती, वृत्तिरूपवती, पवित्रवती आणि शुक्रा अशा सात नद्या आहेत घृतपृष्ठानें या द्वीपाचें वर्ष संज्ञक सात भाग करून, आपल्या सात पुत्रांस यांचींच नावें ठेवून विभागून दिले असत [ भाग स्क ५ अ २० देवी भा स्क ८ अ १२ ]

**क्लाइव्ह**—( १७२५–१७७४ ) रॉबर्ट क्लाइव्ह हा इंग्लंडात श्रॉपशॉयर परगण्यात स्टिचे येथें ता २९ सप्टेंबर १७२५ रोजीं जन्मला याचा बाप वकील होता हा लहानपणीं धाडशी व हूड असे फारशीं विद्या नसल्याकारणानें त्याला त्याच्या बापानें खटपट करून ईस्ट इंडिया कंपनींत कारकुनीची



जागा देवविली तो इ स १७४३ त मद्रासेस आला त्यावेळीं कारकुनीच्या जागेला व्यापाराची चांगली माहिती लागे पण ती याला मुळींच नव्हती व त्यामुळें पैसाहि त्याला फारसा मिळेना हा काळ विपत्तींत एकलकोंड्यासारखा त्यानें घालविला पिस्तुलानें आत्महत्या करण्याचाहि त्यानें दोन वेळा प्रयत्न केला परंतु प्राण गेला नाहीं हें पाहून, माझ्या जगण्याचें कांहीं तरी प्रयोजन आहे असें त्यानें ठरविलें शेवटीं

त्याला घरीं जावेसें वाटलें. त्यावेळचा मद्रासचा गव्हर्नर त्याला चांगलें वागवी. इ. स. १७४६ त फ्रेंचांनीं मद्रास घेतलें, तेव्हां पळून गेलेल्या इंग्रजांत हा होता. पळतांना त्यानें मुसुलमानी वेष घेतला होता. याच सुमारास डेव्हिडच्या किल्ल्यावर फ्रेंचांनीं हल्ला केला पण त्यांत त्यांचा मोड झाला. या चकमकींत क्लाइव्हनें प्रथम हातांत शस्त्र घेतलें. नंतर इंग्रजांनीं पाँडेचरीस वेढा दिला. त्यावेळीं यानें तरवार गाजविली. इंग्रजांनें यानंतर देवीकोटा घेतला तेव्हां हा लेफ्टनंट बनला. पुढें बालकोंड्यावरील हल्ल्यांत याचें व कॅप्टन जिंजेनचें जमलें नाहीं म्हणून तो मद्रासला परतला. पुढें इ. स. १७५१ त त्रिचनापल्लीच्या वेढ्यांत यानें कारकुनाची जागा कायमची सोडून लष्करात नौकरी धरली त्रिचनापल्लीस महंमद अल्ली हा फ्रेंचांनीं ( चंदासाहेबानें ) अडकवून ठेविला होता. तेथील इंग्रजांच्या सैन्यांत अत्यंत बेशिस्ती होती तेव्हां क्लाइव्हनें चंदासाहेबास तेथें तसाच सोडून एकदम अर्काटवर ( चंदासाहेबाच्या राजधानीवर ) ता. ११ आक्टोबर सन १७५१ रोजीं हल्ला केला व किल्ला काबीज केला. तेथें मुसुलमानी फौज थोडी होती; शिवाय चंदासाहेबानें पाठविलेली कुमक उशीरा आली. त्यामुळें राजधानी सहजासहजी पडली. चंदासाहेबानें आपला मुलगा राजेसाहेब याला अर्काटवर पाठविलें. त्यानें अर्काटला वेढा दिला तेव्हां क्लाइव्ह आत कोंडला गेला. तटाला खिंडारें पडलीं पण राजेसाहेब आत घुसेना, अन्नसामुग्री संपल्यावर आपोआप इंग्रज शरण येईल असें त्याला वाटलें. ही ढिलाई त्याला नडली. पुढें मोहरमच्या एके दिवशीं जोराचा हल्ला करावयाचा त्यानें बेत केला, तो फितुरीमुळें क्लाइव्ह यास समजला. त्यामुळें राजेसाहेबाच्या लढाईचें काम विनसलें, शेवटीं त्यानें ५० दिवस चालविलेला वेढा उठविला. या वेढ्यामुळें फ्रेंचाच्या वजनास उतरती कळा लागून इंग्रज वरचढ बनूं लागले याच वेढ्यात हिंदी लोकांनीं आपण पेज पिऊन इंग्रजास भात दिला. या व पुढील मोहिमांत मराठे ( मुरारराव घोरपडे व तंजावरकर ) यानीं इंग्रजांचा पक्ष घेतल्यामुळें अखेर त्यांचा जय झाला. मद्रासहूनहि क्लाइव्हला मदत आली. त्यामुळें त्यानें अरणी येथें राजेसाहेबाचा पराभव केला ( १७५१ ). नंतर तो मद्रासेस परत गेला. तेव्हां राजेसाहेबानें परत सर्व प्रांत काबीज केल्याचें ऐकून तो मागें फिरला. कावेरीपाक येथें दोघांची गांठ पडली व मोठ्या युक्तीनें क्लाइव्हनें जय मिळवला, आणि क्वंग्रंग व चिंगलपट हे दोन किल्ले त्यानें घेतले. मद्रासला परत आल्यावर आपल्या एका स्नेह्याच्या मास्कलिन नावाच्या बहिणीशीं त्यानें लग्न केलें व अखेर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें १७५३त तो विलायतेस गेला. या वेळीं दोन लाखांची माया त्यानें जमविली. इ. स. १७५६ मध्यें इंग्रजांचें व सिराजउद्दौल्याचें वाकडें आलें होतें. कलकत्तेकर इंग्रज फार संकटांत होते. अशा वेळीं इंग्लंडहून आलेला वाटसन व क्लाइव्ह यांस बंगाल्यांत पाठविलें क्लाइव्ह नुकताच मद्रासला विलायतेहून गव्हर्नर म्हणून आला होता. सिराजशीं मिटतें घ्यावें असा मद्रासकरांचा हेतु होता. परंतु क्लाइव्हनें हुबळीस उतरल्यावरोबर लगेच सिराजला चढाईचीं पत्रें लिहिण्यास सुरवात केली. त्यानें कलकत्याचा विल्यम किल्ला काबीज केला. यावेळीं तत्रस्थ इंग्रजांत भांडणें सुरू होतीं. क्लाइव्ह त्यांस अप्रिय झाला होता. तो कंपनीचा व वॉटसन हा राजाचा नोकर असल्यानें त्यांची आपसांत चुरस लागली होती. क्लाइव्हनें हुगळी घेतली तेव्हां सिराजनें त्याच्याशीं तहाची वाटाघाट सुरू केली, पण त्यानें ती टाळली व दोघांची लढाई कलकत्यास होऊन उभय पक्षांचें सारखेंच नुकसान झालें. तेव्हां अलीनगर येथें तह झाला (९ फेब्रु. १७५७) यूरोपांत १७५७त फ्रेंच इंग्रजांचें युद्ध सुरू झाल्यामुळें चंद्रनगरच्या फ्रेंच गव्हर्नरानें इंग्रजांची कांहीं एक खोडी काढली नसताहि क्लाइव्हनें त्याच्यावर एकाएकीं हल्ला केला. फ्रेंचांनीं शर्थीनें बचाव केला. यावेळीं क्लाइव्हचा पराजय झाला असता पण वॉटसननें आयत्या वेळीं मदत केल्यानें त्याला जय मिळाला. तो धाडशी असला तरी कठिण प्रसंगीं त्याची ताराबळ उडे. त्याच्या आयुष्यांतील सर्व मोठे प्रसंग अशा धरसोडीनेंच पार पडले आहेत. ऐन आणीबाणीच्या वेळीं त्यानें स्वतःच्या हिंमतीनें मनाचा निश्चय करून पराक्रम गाजविला असें घडलें नाहीं या लढाईत नंदकुमार व एक फ्रेंच या दोघांच्या फितुरीनें इंग्रज विजयी झाले. याच वेळीं पातशहा आपल्यावर चालून येत आहे असें समजल्यावरून सिराजनें क्लाइव्हला मदतीस बोलाविलें. तो या संधीची वाट पहात होता. अलीनगरच्या तहाचा वाटेल तसा अर्थ करून क्लाइव्हनें आपल्या मागण्या वाढविल्या व स्वतः सिराजच्या प्रजेस त्रास देऊं लागला. कांहींतरी कुरापत काढून सिराजचें राज्य स्वाहा करण्याचा घाट त्यानें घातला. सिराजनें इंग्रजास भेटण्यापूर्वी नजराणे द्यावे, फ्रेंचाच्या सर्व वखारी इंग्रजास द्याव्या, त्यांना सर्व बंगाल्यात व्यापारास परवानगी असावी वगैरे अटी क्लाइव्हनें घातल्या, त्या सिराजनें अमान्य केल्या. त्यावेळीं सिराजला पदच्युत करण्याचा बेत त्यानें केला व त्यास सिराजचा सेनापति मीरजाफर हा फितूर होऊन मिळाला. सिराजच्या दरबारीं वॅट हा इंग्रजी वकील होता, त्यानें व क्लाइव्हनें हीं सर्व कारस्थानें रचलीं. वरून त्यानें सिराजास गोड पत्रें लिहून कटाचा सुगावा लागूं दिला नाहीं. या कटांत उमीचंद हा सावकार होता. त्याला क्लाइव्हनें अगदीं हातोहातीं फसविलें ( उमीचंद पहा ). मीरजाफर फितूर झाल्याचें सिराज याला कळलें तरी त्यानें त्याला वडतर्फ केलें नाहीं. क्लाइव्हची लबाडी मात्र त्याला समजली व तुम्ही तह मोडला असें त्याला पत्र लिहून तो प्लासीस आला. यावेळीं क्लाइव्ह धरसोडीनें वागत होता, कोणावरहि त्यानें पुरा विश्वास टाकला नाहीं. त्यानें पाच हजार फौज पाठविण्याचें मीरजाफरास वचन दिलें होतें, परंतु त्याच्याजवळ सारे बावीसशें लोक व मोठ्याच तोफा होत्या.

सिराजवर आपण एकदम हल्ला करावा असें त्यानें ठरविलें. त्यानें आपलें सैन्य आवराईत सुरक्षित ठिकाणीं ठेविलें होतें. सिराजचा मुख्य सेनापति मीरमदन मेल्यावर व मीरजाफर फितूर झालेला पाहून सिराजनें मुर्शिदाबादेस परत फिरण्याचा हुकूम केला व त्यामुळें सर्वत्र गोंधळ माजला खरी लढाई येथें झालीच नाहीं. सिराज उगाच घाबरून पळाला ( २३ जून १७५७ ). पुढें दोन तीन दिवसांनीं क्लाइव्हनें फितुरी मीरजाफरास मुर्शिदाबादेस नेऊन गादीवर बसविलें व गुप्त कराराप्रमाणें बक्षिसाची मागणी केली. एकंदर रकम सव्वादोन कोटी रुपयाची होती. मोठ्या कष्टानें मीरनें ती भरली. त्यात खुद्द क्लाइव्हला तेवीस लाख, चाळीस हजाराची रकम मिळाली. ही निव्वळ लूट असल्यानें इंग्लंडात याबद्दल मोठा गवगवा झाला. परंतु आपण हें गैर केलें असें क्लाइव्हला कधींच वाटलें नाहीं. हिंदी लोकात फूट पाडून आपला फायदा साधण्याची युक्ति प्रथम क्लाइव्हनेंच अंमलात आणून, इंग्रजी राज्याचा पाया घातला. मीरजाफरासहि पुढें क्लाइव्हनें छळलें बाकीच्या उगवणीबद्दल त्यानें त्याच्याकडून पंचवीस लक्षाचा मुलुख लुबाडला ( इ. स. १७५८ ), सान्या बहार प्रांतातील सोन्याचा मक्ता कंपनीस देवविला आणि स्वतःस सहा हजाराची मनसबदारी मिळविली व आपण पातशाही अमीर बनला. त्यानें सहा हजार पायदळ व पाच हजार घोडदळ ठेवावें व त्याबद्दल पातशहानें त्याला सात लक्षांची नेमणूक द्यावी असा याचा अर्थ होता. परंतु त्यानें फौज न ठेवता रकम मात्र मागितली व मीरजाफरनें परभारे कंपनीच्या जहागिरींतून वसूल करण्यास त्याला परवानगी दिली. यामुळें कंपनी व क्लाइव्हमध्यें याबद्दल तंटा उत्पन्न झाला. या सुमारास तो कलकत्त्याच्या कौन्सिलचा अध्यक्ष झाला होता. इ स. १७५९ त शहाआलमानें मीरजाफरवर स्वारी केली तेव्हा हा त्याच्या मदतीस गेला होता नंतर वेळीं मिळविली नंतर कंपनीच्या नौकराचे पगार त्यानें वाढवून त्यांनीं नजराणे घेऊं नयेत व खासगी व व्यापारांत भाग घेऊं नये असें ठरविलें, सैन्यात सुधारणा केली, तोफखान्याचे सर्व गोलंदाज युरोपियन नेमले, एकहि हिंदी नेमला नाहीं. हल्लींहि हीच पद्धत अंमलात आहे. यानंतर तो परत विलायतेस कायमचा गेला. तेथें त्याने फार पैसे खाल्ले या आरोपावर त्याची चौकशी पार्लमेंटात सुरू झाली ( मीरजाफरनें आपल्या मृत्युपत्रात त्याला ५ लक्ष रु. देऊन ठेविले होतेच ). पुष्कळ वादविवाद होऊन व त्यानें बंगालच्या पहिल्या सफरींत २३ लक्ष ४० हजाराची माया जमविली खरी परंतु ती कशी जमविली त्यावर वाद न घालता अखेर एकमतानें "त्याच वेळीं त्यानें स्वदेशाची मोठी व स्पृहणीय कामगिरी केली" असा निकाल देण्यात आला व त्याला निर्दोषी ठरविलें. त्यावेळीं क्लाइव्हनेंहि आपलें समर्थन केलें. तो उमींचंदाच्या फसवणुकीबद्दल म्हणाला कीं "मला त्याबद्दल यत्किंचितहि वाईट वाटत नाहीं. एवढेंच नव्हे तर वेळ आल्यास शंभरदा मी पुन्हा असेंच करीन." यानंतर लवकरच १७७४ च्या नोव्हेंबरमध्यें त्यानें आत्महत्या केली. याला अफूचें जबरदस्त व्यसन लागलें होतें. [ अर्बुथनाट, सर विल्सन, मॅलेसन, कॅरसिओली यांचीं क्लाइव्हचीं चरित्रें ]

**क्लासिअस, रुडाल्फ जुलिअस इम्यान्युएल** (इ.स. १८२२–१८८८ ).—एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता. याचा जन्म जर्मनींतील कास्लिन गावीं झाला. इ. सन १८४० ते १८४४ पर्यंत त्यानें बर्लिन विश्वविद्यालयात अभ्यास केला. इ. सन १८४८ सालीं त्यानें विश्वविद्यालयाची पदवी मिळविली झुरिच येथील विविध कलाशाळेंत त्याला इ. सन १८५५ सालीं प्रोफेसर नेमण्यात आलें इ. सन १८६७ सालीं त्याची बॉन येथें प्रोफेसरच्या जागेवर नेमणूक झाली. फ्रांको–जर्मन युद्धात त्यानें वाहतुकीच्या तुकडीचें आधिपत्य

द्रव्याच्या अणूंचा मध्यमपथ किती असावा यासंबंधाची गणना त्यानेंच प्रथमतः केली. " विद्युद्विश्लेषणाविषयीं त्यानें अशी कल्पना पुढें मांडली कीं, विश्लेषणधर्मी द्रावणांत अणूंच्या जोड्या बदलत असाव्यात व विद्युद्बलाच्या योगानें या अणूंना एका विशिष्ट दिशेनें गति प्राप्त होत असावी " ही कल्पना शास्त्रज्ञांस इ. सन १८८७ सालापर्यंत पटली नाहीं परंतु १८८७ सालीं एस. ए. आऱ्हेनिअस यानें ही कल्पना विद्युद्विश्लेषणास उत्तम प्रकारें लागू पडते असें दाखवून दिलें.

**क्लोजपेट**—म्हैसूर संस्थान. बंगलोर जिल्ह्याच्या चनपट्टण तालुक्यातील एका लहान विभागाचें मुख्य ठिकाण. हें अर्कावती नदीवर वसलें आहे. १९११ सालीं याची लोकसंख्या ३५०९ होती. हें गाव इ. स. १८०० त सरकारी क्लोज या इंग्रजी रेसिडेंटानें वसविलें त्यावेळीं येथें धारगीर अथवा घोडेस्वारांचें ठाणें होतें. येथील मुसुलमान रेशमाचे किडे पोसण्याचा व रेशीम काढण्याचा धंदा करितात येथें १८७० त म्युनिसिपालिटीची स्थापना झाली.

**क्लोरोफार्म**—मधुर वास व दाहक चव असलेलें रंगहीन व झोंप आणणारें द्रवरूप औषध. हें इथिल अल्कोहल किंवा ॲसिटोन (सारख्या कार्बनाच्या एखाद्या संयुक्त पदार्था)वर विरंजन चूर्णाची क्रिया झाली असता मिळतें. थंडीनें क्लोरोफार्म गोठतो व तो ६२° सें. ला वितळतो; व ६१.२° से. ला उकळतो. त्याचें विशिष्टगुरुत्व १.५ आहे. चरबी, अल्कलॉइड्स, आयोडिन वगैरे पदार्थ त्यात लवकर द्रवतात.

वै द्य की य.—क्लोरोफार्म भूल येण्यासाटीं हुंगविण्याची पद्धतिः—शस्त्रक्रिया करण्यासाठीं रोग्यास तास अर्धा तास बेशुद्ध अवस्थेंत ठेवणें ही जबाबदारीची गोष्ट आहे. ज्या माणसानें पूर्वी रोग्यास क्लोरोफार्म हुंगविला नाहीं त्यास तो देण्यास सांगू नये. कारण रोगी दगावण्याचा संभव असतो. रोगी हृदयक्रिया बंद पडून दगावतो किंवा श्वसनक्रिया थांबून दगावतो याबद्दल मतभेद आहे. तो हुंगविणारानें पुढील सूचना ध्यानांत ठेवाव्या म्हणजे सहसा अपघात होणार नाहींत.—(१) रोग्यास आदले दिवशीं संध्याकाळीं एरंडेल अगर मस्ती द्यावा. (२) शस्त्रक्रियेच्या दिवशीं त्यास भूल देण्याच्या अगोदर ४–६ तास कांहींहि खाण्यास देऊं नये. दिलेंच तर जडान्न देऊं नये. पातळ अन्न (दूध, चहा वगैरे) थोडेंच द्यावें. (३) क्लोरोफार्म हुंगविण्यासाठीं फुगा, बाटली व नाकाशीं धरावयाची टोपी असलेलें यंत्र मिळतें. परंतु तें महाग असून त्याची आवश्यकता असतेच असें नाहीं. तागाच्या कापडाची दुहेरी घडी द्रोणाच्या आकाराची, नाक व तोंड यांवर धरतां येईल येवढी मोठी करून तींत थेंबथेंब चोहोंकडे असा ३० पर्यंत थेंब क्लोरोफार्म घालावा व नाकापासून जरा अंतरावर तो द्रोण धरून रोग्यास सावकाश अंक मोजण्यास सांगावें, म्हणजे सहज भूल येण्यास मदत होते. (४) ही प्रथमावस्था होय. यांत रोगी—विशेषतः दारुबाज रोगी—धडपड करण्याचा संभव असतो म्हणून धडपड होते असें वाटल्यास मदतनिसाकडून हातपाय अंमळ दाबून धरावे व द्रोण नाकाशीं आणखी जवळ धरावा व आणखी थोडे थेंब द्रोणांत पाडावे म्हणजे धडपड थांबेल (५) नाडी व श्वसनक्रिया नीट चालत आहेत हें कानशिलाजवळची नाडी व पोट अगर छातीच्या हालचालीकडे अविरत लक्ष ठेवून पहातां येतें. (६) एखादेवेळेस श्वास थांबतो. त्यावेळीं रोग्याचा कृत्रिम श्वासोच्छ्वास सुरू केला पाहिजे. (७) गुंगी आल्यावर कांहीं रोग्याची जीभ घशाशीं गोळा होऊन गुदमरा होतो. तो होऊं नये म्हणून गुंगी आल्यावर एका विशिष्ट चिमट्यानें जीभ पकडून तोंडाबाहेर तो चिमटा लोंबत ठेवतात. ही सावधगिरी घेणें फार प्रशस्त आहे. (८) तसेच रोग्याची छाती, पोट व कमर यासभोंवतीं घट्ट वस्त्रें असतील तीं सैल केलींच पाहिजेत. (९) शस्त्रक्रिया कोंदट जागेंत करूं नये. (१०) *शस्त्रक्रियेस आरंभ करण्याइतकी गुंगी आली कीं* नाहीं हें पहावें. डोळ्याची पापणी उघडून बुबुळास स्पर्श करूं लागलें तर पूर्ण बेशुद्धि असल्यास रोगी पापण्या गच्च मिटून घेत नाहीं. (११) रोग्यास दर पाच सात मिनिटांनीं क्लोरोफार्मचे २० ते ३० थेंब द्रोणात पाडून हुंगवीत जावें, म्हणजे रोगी मध्येंच शुद्धीवर येऊन धडपडून शस्त्रक्रियेस व्यत्यय आणणार नाहीं. (१२) नकळीचे डाक्टर कमी क्लोरोफार्म देतात तें चांगलें नाहीं व क्लोरोफार्म अधिक दिल्यानें धोका असतो. डोळ्याची कनीनिका गुंगीमध्यें जी अति बारीक झाली असते ती फार मोठी होते. अशा वेळीं अधिक हुंगविणें बंद अगर जपून करावें. (१३) चांगली गुंगी असली म्हणजे रोगी झोंपेप्रमाणें अगर त्याहून बऱ्याच मोठयानें अकाळ विकाळ घोरतो. (१४) तोंड, घसा, दात या ठिकाणीं शस्त्रक्रिया असल्यास जबडा उकललेला ठेवण्याच्या योजनेचें यंत्र अगर दाताच्या कवळीमध्यें दोन्ही बाजूस मोठीं बुचें घालून कांहीं वेळ शस्त्रक्रिया थांबवून मधून मधून क्लोरोफार्म हुंगविण्यास अवसर द्यावा लागतो. (१५) शस्त्रक्रिया आटोपतांक्षणीं तावडतोब हुंगविणें बंद करावें व त्या अर्धवट गुंगींत त्याची जखम व पट्टया बांधणें उरकून घ्यावें. (१६) रोगी पूर्ण शुद्धीवर येईपर्यंत त्यापासून भूल देणारानें जाऊं नये (१७) शस्त्रक्रियेनंतर ३।४ तास अन्न देऊं नये. अन्न खाऊं घातल्यास शस्त्रक्रिया चालू असतां अगर नंतर वांतीचा संभव फार असतो म्हणून उपासमारच बरी. (१८) सर्व रोग्यांचें हृदय भूल देण्याच्या अगोदर तपासावें. तें विकृत असल्यास अगर रोगी फार वृद्ध व अशक्त असल्यास फारच जपून भूल हुंगवावी. येणेंप्रमाणें मुख्य गोष्टींविषयीं दक्षता ठेविल्यानें अपघात होण्याचा संभव टळतो.

**क्विटो**—इक्वेडोरची राजधानी. दक्षिणअक्षांश १४' व पश्चिम रेखांश ७९° ४५' यांचेवर ही आहे, ही पासिफिक महासागराच्या किनाऱ्यापासून सुमारें ११४ मैलांवर व ग्वायाक्विलच्या

सिराजवर आपण एकदम हल्ला करावा असें त्यानें ठरविलें. त्यानें आपलें सैन्य आबराईंत सुरक्षित ठिकाणीं ठेविलें होतें सिराजचा मुख्य सेनापति मीरमदन मेल्यावर व मीरजाफर फितूर झालेला पाहून सिराजनें मुर्शिदाबादेस परत फिरण्याचा हुकूम केला व त्यामुळें सर्वत्र गोंधळ माजला. खरी लढाई येथें झालीच नाहीं. सिराज उगाच घाबरून पळाला ( २३ जून १७५७ ). पुढें दोन तीन दिवसांनीं क्लाइव्हनें फितुरी मीरजाफरास मुर्शिदाबादेस नेऊन गादीवर बसविलें व गुप्त कराराप्रमाणें बक्षिसाची मागणी केली. एकंदर रक्कम सव्वादोन कोटी रुपयाची होती. मोठ्या कष्टानें मीरनें ती भरली. त्यात खुद्द क्लाइव्हला तेवीस लाख, चाळीस हजाराची रक्कम मिळाली. ही निव्वळ लूट असल्यानें इंग्लंडात याबद्दल मोठा गवगवा झाला. परंतु आपण हें गैर केलें असें क्लाइव्हला कधींच वाटलें नाहीं. हिंदी लोकात फूट पाडून आपला कावा साधण्याची युक्ति प्रथम क्लाइव्हनेंच अंमलात आणून, इंग्रजी राज्याचा पाया घातला. मीरजाफरासहि पुढें क्लाइव्हनें छळलें. बाकीच्या उगवणीबद्दल त्यानें त्याच्याकडून पंचवीस लक्षाचा मुलुख लुबाडला ( इ. स. १७५८ ), साऱ्या बहार प्रांतांतील सोन्याचा मक्ता कंपनीस देवविला आणि स्वतःस सहा हजाराची मनसबदारी मिळविली व आपण पातशाही अमीर बनला. त्यानें सहा हजार पायदळ व पाच हजार घोडदळ ठेवावें व त्याबद्दल पातशहानें त्याला सात लक्षाची नेमणूक द्यावी असा याचा अर्थ होता. परंतु त्यानें फौज न ठेवता रक्कम मात्र मागितली व मीरजाफरनें परभारे कंपनीच्या जहागिरींतून वसूल करण्यास त्याला परवानगी दिली. यामुळें कंपनी व क्लाइव्हमध्यें याबद्दल तंटा उत्पन्न झाला. या सुमारास तो कलकत्त्याच्या कौन्सिलचा अध्यक्ष झाला होता. इ. स. १७५९ त शहाजाद्यानें मीरजाफरवर स्वारी केली तेव्हा हा त्याच्या मदतीस गेला होता नंतर आपल्या मनाप्रमाणें कलकत्त्यास व्यवस्था लावून तो १७६० च्या फेब्रुवारींत स्वदेशीं परत गेला. तेथें त्याला प्लासीचा लॉर्ड बनविलें गेलें त्यानें तेथें कंपनीच्या कारभाराची थोडीशी सुधारणा केली. इकडे मीर कासीमला इंग्रजानीं गादीवर बसविलें व त्याच्यापासून पुष्कळ पैसा उपटला. "कंपनीच्या मुलकी व लष्करी साऱ्या नौकरानीं लाच खाल्ला." तेव्हा ही स्थिति सुधारण्यास क्लाइव्हला गव्हर्नर म्हणून तिसऱ्यानें हिंदुस्थानात पाठविलें ( १७६५ ). या वेळीं इंग्रजावर अयोध्येचा नबाब व दिल्लीचा बादशहा हे चालून गेले. परंतु त्याचा बक्सार येथें पराभव झाला. याचा फायदा घेऊन क्लाइव्हनें बंगाल, बहार व ओरिसा या तीन प्रांताची प्रख्यात दिवाणी सनद शहाअलमपासून मिळविली. या सनदेनें कंपनी ही या प्रांताची ( ४ कोटी उत्पन्नाची ) मालकीण झाली. कर्नाटक व दक्षिण या प्रांतांतील इंग्रजाच्या प्रदेशाचीहि दुसरी फर्मानें त्यानें या वेळीं मिळविली. नंतर कंपनीच्या नौकराचे पगार त्यानें वाढवून त्यांनीं नजराणे घेऊं नयेत व खासगी व्यापारांत भाग घेऊं नये असें ठरविलें, सैन्यात सुधारणा केली, तोफखान्याचे सर्व गोलंदाज युरोपियन नेमले; एकहि हिंदी नेमला नाहीं. हल्लींहि हीच पद्धत अंमलात आहे. यानंतर तो परत विलायतेस कायमचा गेला. तेथें त्यानें फार पैसे खाल्ले या आरोपावर त्याची चौकशी पार्लमेंटात सुरू झाली ( मीरजाफरनें आपल्या मृत्युपत्रात त्याला ७ लक्ष रु. देऊन ठेविले होतेच ) पुष्कळ वादविवाद होऊन व त्यानें बंगालच्या पहिल्या सफरींत २३ लक्ष ४० हजाराची माया जमविली खरी परंतु ती कशी जमविली त्यावर वाद न घालता अखेर एकमतानें "त्याच वेळीं त्यानें स्वदेशाची मोठी व स्पृहणीय कामगिरी केली" असा निकाल देण्यात आला व त्याला निर्दोषी ठरविलें त्यावेळीं क्लाइव्हनेंहि आपलें समर्थन केलें. तो उमीचंदाच्या फसवणुकीबद्दल म्हणाला कीं "मला त्याबद्दल यत्किंचितहि वाईट वाटत नाहीं. एवढेंच नव्हे तर वेळ आल्यास शंभरदा मी पुन्हा असेंच करीन" यानंतर लवकरच १७७४ च्या नोव्हेंबरमध्यें त्यानें आत्महत्या केली. याला अफूचें जबरदस्त व्यसन लागलें होतें. [ अर्बुथनाट, सर विल्सन, मॅलेसन, कॅरसिओली यांचीं क्लाइव्हचीं चरित्रें ]

**क्लासिअस, रुडाल्फ ज्युलिअस इम्यान्युएल** (इ.स. १८२२-१८८८ )—एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता. याचा जन्म जर्मनींतील कास्लिन गावीं झाला. इ. सन १८४० ते १८४४ पर्यंत त्यानें बर्लिन विश्वविद्यालयात अभ्यास केला. इ. सन १८४८ सालीं त्यानें विश्वविद्यालयाची पदवी मिळविली झ्युरिच येथील विविध कलाशाळेंत त्याला इ. सन १८५५ सालीं प्रोफेसर नेमण्यात आलें. इ. सन १८६७ सालीं त्याची बॉन येथें प्रोफेसरच्या जागेवर नेमणूक झाली. फ्रांको-जर्मन युद्धात त्यानें वाहतुकीच्या तुकडीचें आधिपत्य स्वीकारून बरीच कामगिरी बजाविली १८८८ मध्यें बॉन येथें तो मृत्यु पावला.

*त्या चे शो ध:*—प्रयोग करून शास्त्रीय शोध लावणारा या नात्यानें क्लासिअस यानें विशेष महत्वाची कामगिरी केली नाहीं. परंतु तो उत्तम गणिती होता, व त्यानें गणिताच्या साहाय्यानें अणुसंबंधानें कित्येक सिद्धान्त प्रस्थापित केले. त्यानें कार्नोचें तत्व पुन्हा शास्त्रापुढें माडलें व गत्युष्णतेचे सिद्धान्त या तत्वाच्या सहाय्यानें भक्कम पायावर रचले. इसवी सन १८५० सालीं यानें गत्युष्णतेचा दुसरा सिद्धांत प्रस्थापित केला. हा सिद्धान्त यानें पुढील शब्दात माडला. "थंड पदार्थांतून उष्णपदार्थांत स्वयंप्रेरणेनें उष्णता जाऊं शकत नाहीं". वाफेच्या यंत्रासंबंधानें त्यानें सिद्धान्तरूप बरेच शोध लावले. क्लार्कमाक्सवेलचें असें मत आहे कीं वायुरूप द्रव्याच्या अणूंच्या गतीचा सिद्धान्त क्लासिअसनें बसविला, किंबहुना तो त्या सिद्धान्ताचा आद्य जनक आहे. वायुरूप

द्रव्याच्या अणूचा मध्यमपथ किती असावा यासंबंधाची गणना त्यानेंच प्रथमतः केली. " विद्युद्विश्लेषणाविषयीं त्यानें अशी कल्पना पुढें मांडली कीं, विश्लेषणधर्मी द्रावणांत अणूंच्या जोड्या बदलत असाव्यात व विद्युद्बलाच्या योगानें या अणूंनां एका विशिष्ट दिशेनें गति प्राप्त होत असावी." ही कल्पना शास्त्रज्ञास इ. सन १८८७ सालापर्यंत पटली नाहीं परंतु १८८७ सालीं एस. ए. आन्हेनस यानें ही कल्पना विद्युद्विश्लेषणास उत्तम प्रकारें लागू पडते असें दाखवून दिलें.

**क्रोजपेट**—म्हैसूर संस्थान. बंगलोर जिल्ह्याच्या चनपट्टण तालुक्यांतील एका लहान विभागाचें मुख्य ठिकाण. हें अर्कावती नदीवर वसलें आहे. १९११ सालीं याची लोकसंख्या ३५०६ होती. हें गांव इ. स. १८०० त सरबारी क्रोज या इंग्रजी रेसिडेंटानें वसविलें त्यावेळीं येथें बारगीर अथवा घोडेस्वाराचें ठाणें होतें. येथील मुसुलमान रेशमाचे किडे पोसण्याचा व रेशीम काढण्याचा धंदा करितात. येथें १८७० त म्युनिसिपालिटीची स्थापना झाली.

**क्लोरोफार्म**—मधुर वास व रुचकर चव असलेलें रंगहीन व झोंप आणणारें द्रवरूप औषध. हें इथिल अल्कोहल किंवा ॲसिटोन( सारख्या कार्बनाच्या एखाद्या संयुक्त पदार्था )वर विरंजन चूर्णाची क्रिया झाली असता मिळतें. थंडीनें क्लोरोफार्म गोठतो व तो ६२° सें. ला वितळतो; व ६१.२° सें. ला उकळतो. त्याचें विशिष्टगुरुत्व १.५ आहे. चरबी, अल्कलॉइड्स, आयोडिन वगैरे पदार्थ त्यात लवकर द्रवतात.

वै द्य की य.—क्लोरोफार्म भूल येण्यासाठीं हुंगविण्याची पद्धतिः--शस्त्रक्रिया करण्यासाठीं रोग्यास तास अर्धा तास बेशुद्ध अवस्थेंत ठेवणें ही जबाबदारीची गोष्ट आहे. ज्या माणसानें पूर्वी रोग्यास क्लोरोफार्म हुंगविला नाहीं त्यास तो देण्यास सागू नये. कारण रोगी दगावण्याचा संभव असतो. रोगी हृदयक्रिया बंद पडून दगावतो किंवा श्वसनक्रिया थांबून दगावतो याबद्दल मतभेद आहे. तो हुंगविणारानें पुढील सूचना ध्यानांत ठेवाव्या म्हणजे सहसा अपघात होणार नाहींतः—(१) रोग्यास आदले दिवशीं संध्याकाळीं एरंडेल अगर बस्ती द्यावा. (२) शस्त्रक्रियेच्या दिवशीं त्यास भूल देण्याच्या अगोदर ४–६ तास कांहीं.हि खाण्यास देऊं नये. दिलेंच तर जडान्न देऊं नये. पातळ अन्न ( दूध, चहा वगैरे) थोडेंच द्यावें. (३) क्लोरोफार्म हुंगविण्यासाठीं फुगा, बाटली व नाकाशीं धरावयाची टोपी असलेलें यंत्र मिळतें. परंतु तें महाग असून त्याची आवश्यकता असतेच असें नाहीं. तागाच्या कापडाची दुहेरी घडी द्रोणाच्या आकाराची, नाक व तोंड यावर धरता येईल एवढी मोठी करून तींत थेंबथेंब चोहोंकडे असा ३० पर्यंत थेंब क्लोरोफार्म घालावा व नाकापासून जरा अंतरावर तो द्रोण धरून रोग्यास सावकाश अंक मोजण्यास सागावें, म्हणजे सहज भूल येण्यास मदत होते. (४) ही प्रथमावस्था होय. यांत रोगी--विशेषतः दारुबाज रोगी--धडपड करण्याचा संभव असतो म्हणून धडपड होते असें वाटल्यास मदतनिसाकडून हातपाय अंमळ दाबून धरावे व द्रोण नाकाशीं आणखी जवळ धरावा व आणखी थोडे थेंब द्रोणात पाडावे म्हणजे धडपड थांबेल. (५) नाडी व श्वसनक्रिया नीट चालत आहेत हें कानशिलाजवळची नाडी व पोट अगर छातीच्या हालचालीकडे अविरत लक्ष ठेवून पहातां येतें. (६) एखादेवेळेस श्वास थांबतो. त्यावेळीं रोग्याचा कृत्रिम श्वासोच्छ्वास सुरू केला पाहिजे. (७) गुंगी आल्यावर कांहीं रोग्याची जीभ घशाशीं गोळा होऊन गुदमरा होतो. तो होऊं नये म्हणून गुंगी आल्यावर एका विशिष्ट चिमट्यानें जीभ पकडून तोंडाबाहेर तो चिमटा लोंबत ठेवतात. ही सावधगिरी घेणें फार प्रशस्त आहे. (८) तसेच रोग्याची छाती, पोट व कमर यासभोंवतीं घट्ट वस्त्रें असतील तीं सैल केलींच पाहिजेत. (९) शस्त्रक्रिया कांद्ट जागेंत करूं नये. (१०) शस्त्रक्रियेस आरंभ करण्याइतकी गुंगी आली कीं नाहीं हें पहावें. डोळ्याची पापणी उघडून बुबुळास स्पर्श करूं लागलें तर पूर्ण बेशुद्धि असल्यास रोगी पापण्या गच्च मिटून घेत नाहीं. (११) रोग्यास दर पाच सात मिनिटांनीं क्लोरोफार्मचे २० ते ३० थेंब द्रोणात पाडून हुंगवीत जावें, म्हणजे रोगी मध्येंच शुद्धीवर येऊन धडपडून शस्त्रक्रियेस व्यत्यय आणणार नाहीं. (१२) नवशिके डाक्टर कमी क्लोरोफार्म देतात तें चागलें नाहीं व क्लोरोफार्म अधिक दिल्यानें धोका असतो. डोळ्याची कनीनिका गुंगीमध्यें जी अति बारीक झाली असते ती फार मोठी होते. अशा वेळीं अधिक हुंगाविणें बंद अगर जपून करावें. (१३) चागली गुंगी असली म्हणजे रोगी झोंपेप्रमाणें अगर त्याहून बऱ्याच मोठ्यानें अकाळ विकाळ घोरतो. (१४) तोंड, घसा, दात या ठिकाणीं शस्त्रक्रिया असल्यास जबडा उकललेला ठेवण्याच्या योजनेचें यंत्र अगर दाताच्या कवळीमध्यें दोन्ही बाजूस मोठीं घुचें घालून कांहीं वेळ शस्त्रक्रिया थांबवून मधून मधून क्लोरोफार्म हुंगविण्यास अवसर द्यावा लागतो. (१५) शस्त्रक्रिया आटोपताक्षणीं तावडतोब हुंगविणें बंद करावें व त्या अर्धवट गुंगींत त्याची जखम व पट्या बांधणें उरकून घ्यावें. (१६) रोगी पूर्ण शुद्धीवर येईपर्यंत त्यापासून भूल देणारानें जाऊं नये. (१७) शस्त्रक्रियेनंतर ३।४ तास अन्न देऊं नये. अन्न खाऊं घातल्यास शस्त्रक्रिया चालू असतां अगर नंतर वातीचा संभव फार असतो म्हणून उपासमारच बरी. (१८) सर्व रोग्याचें हृदय भूल देण्याच्या अगोदर तपासावें. तें विकृत असल्यास अगर रोगी फार वृद्ध व अशक्त असल्यास फारच जपून भूल हुंगवावी. येणेंप्रमाणें मुख्य गोष्टींविषयीं दक्षता ठेविल्यानें अपघात होण्याचा संभव टळतो.

**क्विटो**-इक्वेडोरची राजधानी.दक्षिणअक्षांश १४'व पश्चिम रेखांश ७९° ४५' यांचेवर ही आहे; ही पासिफिक महासागराच्या किनाऱ्यापासून सुमारें ११४ मैलांवर व ग्वायाक्विलच्या

ईशान्येस सरळ रेषेंत १६५ मैलावर आहे. ग्वायाक्विलशीं हें शहर रेल्वेनें जोडलेलें आहे. लोकसंख्या ( १९१५ ) सुमारें ७०,०००. परकी लोक विशेषत. कोलंबियन आहेत. हें शहर पश्चिमेस पिचिंचा ज्वालामुखी पर्वत, पूर्वेस प्वेगासी उंचवटा व दक्षिणेस व उत्तरेस पिचिंचाचे उंचवटे यानीं बनलेल्या डोंगरपठारावर आहे. या शहराचा पृष्ठभाग उंचसखल असून त्याच्यामधून दोन खोल दऱ्या पश्चिमेकडून पूर्वेकडे गेल्या आहेत शहराचे चौकोनी चौक पाडलेले आहेत. तेथील घरें जुन्या स्पॅनिश व मूरिश पद्धतीचीं आहेत घरें साधारणत उन्हानें वाळविलेल्या विटाचीं असतात. चारल्या घराना गिलावा केलेला असतो. सार्वजनिक इमारती स्पॅनिश पद्धतीच्या आहेत. मुख्य चौकाच्या समोर दक्षिणेस कॅथेड्रल, पश्चिमेस सरकारी राजवाडा, उत्तरेस धर्माध्यक्षाचा राजवाडा व पूर्वेस म्युनिसिपालिटीच्या इमारती आहेत जेसुईट लोकाचें चर्च ही प्रेक्षणीय इमारत आहे. येथें एक विश्वविद्यालय, वेधशाळा, अकरा मोठाले मठ या सार्वजनिक संस्था आहेत. येथें मोठाल्या व्यापारी वखारी नाहींत. येथून कातडीं व जगलातील लाकूड हीं बाहेर देशीं रवाना होतात. मध्ययुगातील धार्मिक चित्रें पुष्कळ बनतात व हीं बाहेर देशीं पाठविलीं जातात. कमावलेलें कातडें, खोगीर, जोडे, लोकरीचें व कापसाचें कापड, पोती, चटया व जाड्या लोकरीच्या घोंगड्या बनविणें हे देशी धंदे आहेत येथें उंची गालीचे तयार करतात, लाकडी खोदीव काम व सोन्यारुप्याचीं कामें यात येथील कारागीर बरेच तरबेज आहेत बायका छानदार कशिद्याचें व फितीचें काम करतात.

स्पॅनिश लोकानीं हें जिंकण्याच्या बरेच पूर्वी क्विटसनें येथें वस्ती केली त्यावरून या शहराला क्विटो नाव प्राप्त झालें आहे. १५३३ मध्यें सेबॅस्टियन बेबॅल्काझरनें या शहराचा शातर्तेनें ताबा मिळविला व १५४१ त याचें स्पॅनिश शहर बनलें याचें पूर्ण नाव सेन डेल विटो असून हें क्विटो प्राताची राजधानी होतें याचें भूकंपामुळें वारंवार नुकसान झालें आहे. १७९७ व १८५९ मधील धक्क्यामुळें याचें अतिशय नुकसान झालें

**क्विबेक**—कानडामध्यें याच नावाच्या प्राताचें मुख्य शहर. सेंट लॉरेन्स व सेंट चार्लस या दोन नद्याच्या संगमावर हें वसलें आहे. पश्चिम रेखाश ७१° १२'व उत्तर अक्षाश ४६° ४८'वर हें आहे लो सं (इ स. १९११ ) ७८,७१०. या शहराचे अप्परक्विबेक व लोअरक्विबेक असे दोन भाग असून अप्पर क्विबेकमध्ये मोठे लोक राहतात पश्चिमेस सेंट जॉन व सेंट रॉज असे उपात भाग आहेत. सेंट जॉनजवळ अब्राहाम म्हणून रणभूमि आहे येथें जनरल वूल्फ मरण पावला त्या ठिकाणी एक ४० फूट उंच स्तंभ आहे. आणि स्टेफाय रस्त्यावर एका लोहस्तंभावर त्याचा काशाचा पुतळा बसविला आहे. क्विबेकच्या स्वाभाविक रचनेमुळें त्याला लष्करी महत्व आलें आहे येथील वस्ती बहुधा रोमन कॅथोलिक आहे व 'नॉत्रे दामे दे विक्तॉयर' नावाच त्याचें एक मोठें चर्च आहे त्याचप्रमाणें लाव्हल नावाचें येथ एक विश्वविद्यालय आहे. या शहरात विजेचे दिवे व ट्राम आहे. ग्रांड ट्रंक कॅनेडियन पॅसिफिक रेल्वेचें व इंटर कलोनियल रेल्वेचें हें स्टेशन आहे कॅनेडियन हाऊस ऑफ कॉमन्समध्यें या शहराचे प्रतिनिधी जातात त्याचप्रमाणें प्रातिक मडळात (प्रॉव्हिन्शियल हाऊस) तीन प्रतिनिधी पाठविण्यात येतात. येथील व्यवस्था मेयर व आल्डरमेन पाहतात त्याना दर दोन वर्षांनीं पुन. निवडण्यात येतें. येथील मुख्य व्यापार लाकडाचा आहे. त्याचप्रमाणें जोडे, कागद, रबर, तंबाखू, दोरखंडें,वार्षें व चाकू-कात्र्या इत्यादि सामान येथें तयार होतें जॅक्स कारटियर या फ्रेंच नावाड्यानें हें१५३५शोधून काढलें. चाप्लेन यानें हें शहर १६०८ त वसविलें १६२९त इंग्रजानीं त घेतलें १६३२त फ्रेंचाना तें परत देण्यात आलें यानंतर तें परत घेण्याचे प्रयत्न इंग्रजानीं दोनदा केले पण त्यात त्याना यश आले नाहीं. शेवटीं १७५९ तें ब्रिटिशानीं घेतलें, १७६३ च्या पॅरीसच्या तहानें तें ब्रिटिशास कायमचें देण्यात आलें. १७७५ त अमेरिकन जनरलनें तें घेण्याचा प्रयत्न केला पण तो फसला.

**क्विलान** ( कोल्लम )—मद्रासमधील त्रावणकोर संस्थानातील किलान तालुक्याचें मुख्य शहर, व बंदर. हें ८° ५३'उत्तर अक्षाश व ७६° ३६' पूर्व रेखाशावर वसलें आहे साउथ इंडियन रेल्वेच्या शेणकोट्टा–क्विलान–त्रिवेंद्रम या फाट्यावर क्विलान आहे. लोकसंख्या ( १९११ ) १८,८३९. याला पूर्वी देसिंगनाडू म्हणत. हें संस्थान त्रावणकोरला अठराव्या शतकात जोडलें. हें पूर्वी पश्चिम किनाऱ्यावर एक उत्तम बंदर होतें. त्रावणकोरच्या महाराजाचा राजवाडा क्विलान सरोवरावर आहे शहरात एक रेसिडेन्सी, पेशकार दिवाणाची कचेरी, डिस्ट्रिक्ट व त्याच्या खालील कचेऱ्या, शाळा, रुग्णालयें, आणि इतर संस्था आहेत तीन चार मल्याळी नियतकालिकें येथें निघतात सुताच्या कापडाचे व विटाचे मुख्य कारखाने येथें आहेत. बाहेरगावीं जाणारा माल कॉफी, चहा, मासे, लाकूड, मिरीं आणि काथ्या हा असून बाहेरून येणारा माल मीठ, तबाखू वगैरे होय. ह्या शहरांत इ. स ७५१ या वर्षी चीनहून जहाजें येत असत. ह्या ठिकाणीं पोर्तुगीज लोकाची वखार होती ती १६६२ मध्यें डच लोकानीं घेतली. पुढें ती डच लोकाकडून ईस्ट इंडिया कंपनीच्या ताब्यात गेली. हल्लीं ब्रिटिश सरकारच्या अमलाखालीं असलेल्या भागाला तंगासेरी असें नांव आहे.

**क्वीन्स्टौन** (१)—हें कॉर्क परगण्यातील दर्यावर्दी ठाणें, समुद्र काठचें आरोग्यकारक स्थळ आणि बंदर, ग्रेट आयर्लंड ( मोठें बेट ) याच्या दक्षिण बाजूवर वसलें आहे येथील लोकसंख्या १९०१ साली ७९०९ होती हें शहर कॉर्कच्या पूर्व–आग्नेय दिशेकडे १२ मैलावर आणि ग्रेट सदर्न, ॲन्ड वेस्टर्न रेल्वेनें डब्लिनच्या नैर्ऋत्येस १७७

गेलावर आहे अमेरिकन युद्धापूर्वी हें एक लहान शेर्डे असून येथील लोक मासे धरण्याचा उद्योग करीत असत या शहरास पूर्वी ' कॉर्केव कोव्ह ' असें नाव होतें १८४९ मध्यें व्हिक्टोरिया राणी आयर्लंडमध्यें आली त्यावेळीं प्रथम येथेंच उतरली म्हणून या शहरास क्वी-स्टौन म्हणू लागले येथें अमेरिकन मेल आगबोट थांबते व येथून एक्सप्रेस आगगाड्यांनीं टाक रवाना करतात हें वसाहतींचें लष्कर उतरण्याचें व परदेशगामी लोकांस चढविण्याचें ठिकाण आहे संयुक्त राज्यांतील सर्वांत जुन्या याट क्लबाचें येथें मुख्य ठाणें आहे सेंट कॉलमनचें कॅथॉलिक मंदिर व प्रॉटेस्टन्ट एपिस्कोपल देऊळ या मुख्य इमारती आहेत येथून रश-ब्रूकपावेतों एक सुंदर रस्ता गेला आहे

( २ ) हें दक्षिण आफ्रिकेच्या केप प्रांतांतील शहर असून कड नदीच्या काठच्या प्रदेशांत आहे १९०४ मध्यें येथील लोकसंख्या ९६१६ होती पैकीं ४१५७ गार-वर्णीय होते हें १८५३ मध्यें वसविलें गेलें व त्याला व्हिक्टोरिया राणीचें नाव दिलें येथील हवा आरोग्यकारक असून हें शहर हवा खाण्याचें ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे हें ३५०० फूट उंच वसलेलें आहे येथें गहूं पिकतात व येथील लोक मेंढ्या पाळतात हें व्यापाराचें शहर आहे

क्वीन्सलंड—आस्ट्रेलियाखंडाचा सबंध ईशान्य भाग क्वीन्स्लंडनें व्यापिला आहे याचें क्षेत्रफळ सुमारें ६,७०,५०० चौ मै असून मूळचे रानटी लोक सोडून लोकसंख्या सात लाखापर्यंत भरते राजधानी ब्रिस्बेन आहे येथें प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें असून लग्न झालेल्या लोकां-पैकीं शेंकडा ९८८३ लोकांना १९१७ सालीं लिहितां वाचतां येत होतें क्वीन्स्लंड युनिव्हर्सिटी इ स १९११ त ब्रिस्बेन येथें स्थापन झाली शेतकी व गुरचराई या कामीं बऱ्याच जमीनींचा उपयोग होतो गहूं, मका, गवत या उत्पन्नाच्या विशेष बाबी होत संस्थानांत कोळशाच्या बऱ्याच खाणी आहेत १८५८त सोन्याच्या खाणींचा शोध लावून १९१७ सालापर्यंत ८२११३६७९ पौंड किंमतीचें सोनें निघालें सोनें चांदी, तांब, कोळसा, मांस, कातडीं लोंकर, व साखर यांची मोठ्या प्रमाणांत निर्गत होते संस्थानचें उत्पन्न १९१७–१८ सालीं ८११९४८२ पौंड असून खर्च ८९,००,९३४ पौंड होता यांपैकीं रेल्वेपासून होणारें उत्पन्न निम्यानें होतें रेल्वे करण्याच्या कामीं खर्चहि तितकाच करावा लागतो जून ३० सन १९१८ या दिवशीं संस्थानचें एकंदर सरकारी कर्ज ६३११०७८६ पौंड होतें १८५९ त स्वतंत्र वसा-हतीचा दर्जा मिळण्यापूर्वी क्वीन्स्लंड हा न्यू साउथ वेल्सचा एक भाग म्हणून होता लेजिस्लेटिव्ह कौन्सिल व असेंब्ली या दोन मंडळांकडे कायदे करण्याचे व कर बसविण्याचे अधिकार आहेत या वसाहतीचा इतिहास आस्ट्रेलियांत अंतर्भूत झालेला आहे [ क्वीन्स्लंड स्टॅटिस्टिक्स, सरकारी रिपोर्ट वीडन क्वीन्स्लंड पास्ट ॲन्ड प्रेझेन्ट ]

क्वीलहानी-मद्रासमधील मलबार जिल्ह्याच्या कुरुमनाड तालुक्यांतील बंदर हें उत्तरअक्षांश८ ° ५३'व पूर्वरेखांश ७६ ° १६'वर वसलेलें आहे लोकसंख्या(१९०१)१८७० या ठिकाणीं सबमॅजिस्ट्रेटचें व मुनसिफचें कोर्ट आहे ह्याचे जवळ १४९८ सालीं वास्कोदगामानें आपलें जहाज आणिलें होतें

क्वेकर पंथ—" सोसायटी ऑफ फ्रेंड्स " नामक एका ख्रिस्ती धर्मपंथाच्या अनुयायांना क्वेकर असें संज्ञा देतात मनुष्याचा परमेश्वराशीं निकट सहवास व त्यापासून होणारे योग्य फायदे ह्यांच्या खरेपणाबद्दलचा त्यांचा आग्रह, शपथ-विधीस विरोध, युद्धाचा तिटकारा, धंदेवाईक पुरोहितवर्ग न ठेवण्याची पद्धत, आचार्यवर्गाची निवड ह्या मतभेदामुळें हा पंथ इतर ख्रिस्ती पंथांपासून अलग दिसतो हे क्वेकर लोक मुकाट्यानें प्रार्थना करतात, उद्देश हा कीं, उपासना अंत स्फूर्तीनें व्हावी अर्थात् एखाद्या स्त्रीला किंवा पुरुषाला स्फूर्ति झाली असतां मोठ्यानें प्रार्थना करण्याला, धर्मग्रंथ वाचण्याला किंवा जशी स्फूर्ति होईल तसा उपदेश करण्यालाहि मोकळीक असते खालील गोष्टींवर यांचा भर असतो –(१)जमलेल्या लोकांचें स्वास्थ्य राखणें व त्यांची उपा-सना अन्त करणपूर्वक हाऊ देणें यासंबंधीं जबाबदारीचा अंश प्रत्येक व्यक्तीकडे–मग त्या व्यक्तीला वाचिक उपास-नेचें काम दिलें असो वा नसो–येतो ( २ ) प्रत्येक उपास-काला बोलल्या ( किंवा ऐकलेल्या ) शब्दांवर किंवा इतर बाह्य गोष्टींवर अवलंबून न राहतां स्वत परमेश्वराची सेवा करण्याच्या वैयक्तिक हक्क आहे ( ३ ) क्वेकर असो वा नसो, प्रत्येक व्यक्तीला दुसऱ्याच्या साह्यासाठीं वाटेल त्याप्रमाणें ईश्वराजवळ प्रार्थना करण्याची आहे ( ४ ) ज्याविषयीं पूर्वी विचार केला आहे अगर नाहीं अशा कोणत्याहि बाबतींत स्फूर्ति होईल त्याप्रमाणें प्रार्थना करण्याची मोकळीक आहे ते संस्काराच्या तत्वार्थाला महत्व देतात. क्रियांना देत नाहींत म्हणून ते बाप्तिस्मा, लाईस सपर वगैरे बाह्य संस्कार पाळीत नाहींत. जेव्हां एखादी स्त्री किंवा पुरुष समाजाचें पौरोहित्य पत्क-रण्यास सर्वथैव लायक असा दिसून येईल तेव्हां मासिक सभा त्या व्यक्तीला पुरोहितत्व करण्याविषयीं ईश्वरी आव्हान आहे असें समजून त्या व्यक्तीला तिच्या ईश्वरी देणगीचा उपयोग करण्यास लागेल ती मदत करण्याचा ठराव करते. स्त्रियांना सुद्धां ईश्वरेच्छा स्फुट करण्याचा व उपदश कर-ण्याचा ईश्वरी प्रसाद होतो म्हणून स्त्रियाहि पुरोहित होण्याला अपात्र ठरत नाहींत महत्वाकांक्षा,अभिमान,लोभ, शत्रुत्व वगैरे ख्रिस्ताच्या मनाविरुद्ध गोष्टींचा परिणाम व ह्या गोष्टींचें कारण युद्ध असल्यामुळें तें सर्वथा निंद्य होय खरें बोलण्याकरितां कोर्टांतून वगैरे शपथविधि जो ठेवला असतो तो त्याज्य आहे शपथ घेऊन बोलणें म्हणजेच खरें बोलणें असें नेहमीं होत नाहीं

ह्या क्वेकर पंथ व इतर ख्रिस्ती धर्मपंथ ह्यांतील मूलाधारभूत ख्रिस्ती धर्मतत्वें बहुधा सारखींच आहेत. बाप्तिस्मा वगैरे धर्मसंस्कारांना फांटा देणें व आपल्या सांप्रदायिक मताची अमुक अमुक व्याख्या आहे असें सांगून आपल्याला बांधून न घेणें इत्यादि त्याच्यातील प्रकारामुळें क्वेकर पंथाविषयीं बराच गैरसमज उत्पन्न होतो.

इ. स. १६४७त जॉर्ज फॉक्सनें मूळ इंग्लंडात ह्या पंथाची स्थापना केली. त्या वेळच्या धर्मविचाराला अंतःस्फूर्तीची किंवा आध्यात्मिक ज्ञानाची जोड ह्या पंथानें दिल्यामुळें त्याला पुष्कळ अनुयायी मिळाले. त्यांनीं अमेरिका, आफ्रिका वगैरे देशांतून आपल्या मताचा प्रसार केला. पहिल्यानें कांहीं वर्षें ह्या लोकांचा फारच छळ करण्यांत आला. हे शपथा घेण्याच्या विरुद्ध असल्यामुळें राजनिष्ठेची सुद्धां शपथ घेण्याचें नाकारीत, म्हणून त्यास जास्त छळ सोसावा लागे. त्या वेळीं राजमान्य धर्माविरुद्ध असलेल्या सर्व पाखंडी लोकांस कडक शिक्षा देण्यांत येत असे इ. स.१६८९ त जेव्हां धर्मसहिष्णुतेचा कायदा पास झाला तेव्हां हा छळ बंद पडला पुढें ( इ. स. १८३२ ) ह्यांना पार्लमेंट, युनिव्हर्सिटी वगैरे संस्था खुल्या झाल्या. ह्यांची परोपकाराविषयींची चळवळ प्रसिद्ध आहे. अमेरिकेंत मॅसाचुसेटस् परगण्यांत क्वेकर लोकांना येण्याची बंदी असे. त्याकरितां कडक कायदे केले होते. त्यास क्वेकरनीं सत्याग्रहानें तोंड दिलें. त्यांनीं ओसाड पडलेल्या जागांतून वसाहती करण्यास सुरवात केली व इ.स. १६७५ त ' न्यू जर्सी ' ही वसाहत स्थापली. सर्वांत महत्वाची व क्वेकर पंथाला अभिमानाची गोष्ट म्हणजे विल्यम् पेननें पेन सिल्व्हेनियाची स्थापलेली वसाहत होय. तेथील राज्यकारभार ह्या पंथाच्या तत्वाप्रमाणें चालूं लागला. ह्यांत गुलामांच्या व्यापाराची बंदी केली. ह्यांतील प्रमुख मंडळींनीं हा अश्लाध्य व्यापार अजीबात बंद पाडावा म्हणून अतोनात खटपट केली; त्याला इ. स. १८६३ त यश आलें. पंथांतून कांहीं लोक फुटून त्यांनीं नवीन पंथ काढले. अंतःस्फूर्तीचा कडेलोट होऊन, ख्रिस्त, बायबल इत्यादि ख्रिस्ती संप्रदायाला आवश्यक गोष्टी खोट्या म्हणून ठरल्या. तथापि एकंदर प्रत्येक क्वेकर संस्थेंतून परोपकाराची आवड उघड दिसून येते.

**क्वेटापिशीन** जिल्हा.-बलुचिस्तानांतील डोंगराळ जिल्हा. उ. अ. २९° ५२' ते ३१° १८' व पू. रे. ६६° १५' ते ६७° ४८' मध्यें वसलेला आहे. क्षेत्रफळ ५१२० चौरस मैल आहे. या जिल्ह्यांत भूकंप फार होतात. आक्टोबर १८९२ व मार्च १९०२ मध्यें फार मोठे भूकंप झाले. या दर्‍यांत अप्रीकॉट, डाळिंब, अक्रोड, बदाम वगैरे निरनिराळीं फळें होतात. या ठिकाणीं मेंढ्याकरितां मोठालीं दाट जंगलें वाढवून ठेवतात. या जंगलांत चित्ते, लांडगे, कोल्हे व ससे नेहमीं सांपडतात. येथील हवा साधारण उष्ण असते. व उन्हाळ्याच्या महिन्यांत चक्रवात होतात. क्वेटा याला पूर्वी शैल व पिशीन याला फुशंज व पशंग म्हणत.याची १९२१ मधाल लो. सं. १,३७,०८२ होती. सरासरी शेंकडा ८४ लोक मुसुलमान, शेंकडा १० हिंदु आणि शेंकडा तीन इंग्लिश आहेत बहुतेक सर्व पुश्तु भाषा बोलतात. कांहीं ब्राहुई व फारसी भाषा बोलतात. पिशिनमधील अफगाण लोक घोड्यांचा व्यापार करतात. क्वेटा व पिशीन या दोन तहशिलींत एकंदर ७०६ चौरस मैल जमीन लागवडीची असून त्यांपैकीं २२१ चौरस मैल जागा नेहमीं पिकाऊ असते. या ठिकाणीं गहूं, भात, बारली, मका, बटाटे आणि इतर धान्य व भाजीपाला फार चांगला पिकतो. नागराला उंट जुंपतात व हेच प्राणी माल नेण्याआणण्याकरितां उपयोगांत आणतात क्वेटाच्या पूर्वेस कोळसा पुष्कळ सांपडतो. फेल्टच्या कापडाचा व चटयांचा मोठा व्यापार आहे. क्वेटामधील कंदाहारी लोक तांब्याचीं भांडीं उत्तम करतात. अफगाणिस्तानांतून तूप, ताजीं व सुकीं फळें येतात. आणि सतरंज्या, धान्य व धातू हीं हिंदुस्थानांतून क्वेटामध्यें येतात व क्वेटामधून हिंदुस्थानांत लोकर व फळें आणि अफगाणिस्तानांत धातू रंग वगैरे पाठवितात. व्यापाराकरितां रेल्वे व मोठाले रस्ते केलेले आहेत त्या ठिकाणीं दुष्काळ क्वचितच पडतो.राज्यव्यवस्थेकरितां जिल्ह्याचे तीन भाग केलेले आहेत. चामन, पिशीन आणि क्वेटा. यांपैकीं पिशीन, चामन, आणि शोरारूड हीं ब्रिटिश बलुचिस्तानच्या ताब्यांत आहेत व क्वेटा तहशील हा निराळाच प्रांत आहे.

**क्वेटा, त ह शी ल**:—बलुचिस्तानमधील क्वेटापिशीन जिल्ह्याची तहशील व पोटविभाग. हा उत्तरअक्षांश २९° ५२' ते ३०° २७' आणि पूर्वरेखांश ६६° १५' ते ६७° १४' यावर वसलेला आहे. राज्यव्यवस्थेकरतां याला शोरारूड जोडलें आहे. १९११ मधील दोन्हींची लोकसंख्या ५८१०१ होती यांत क्वेटा शहर व ५४ खेडीं आहेत. गुराकरतां भोंवताली सरलेत नांवाचा टेंकड्या आहेत. जवळच सोर पर्वताच्या ओळींत कोळसा सांपडतो.

**श ह र**— क्वेटापिशीन जिल्ह्याचें मुख्य ठिकाण व बलुचिस्तानची राजधानी. हें क्वेटा तहशिलींत उत्तरअक्षांश ३०° १०'आणि पूर्वरेखांश ६७° १' यावर वसलेलें आहे. लोकसंख्या (१९२१) ४९,००१ हिंदुस्थान व क्वेटा हीं नॉर्थ वेस्टर्न रेलवेनें जोडलेलीं आहेत. पहिल्या अफगाण युद्धाच्या वेळेला हें इंग्रज लोकांच्या ताब्यांत होतें आणि त्यानंतर कांहीं दिवस खाकर लोकांच्या अंमलाखालीं गेलें. शहरांत शीख लोक फार आहेत व मुसुलमान, हिंदु व युरोपियन फार थोडे राहतात. शहराची व्यवस्था म्युनिसिपालिटीकडून होते. शहरांत बायकांचा एक दवाखाना, दोन मिशन हॉस्पिटलें, तीन हायस्कुलें, मुलींची शाळा व सॅंडेमन लायब्ररी या संस्था आहेत. बलुचिस्तान गॅझेट आठवड्यांतून दोनदां निघतें.

ख—व्यंजनांतील दुसरें अक्षर. खचे संस्कृत अर्थ अनेक आहेत; उदाः—आकाश, इंद्रिय, देहच्छिद्र, दोन ( संख्या ), सुख, ब्रह्म, ज्ञान, इ.

अ क्ष र वि का स.—पहिल्या अवस्थेंत हा वर्ण खालसा ख = ? ? ? ? ? येथील इ. स. पू. ३ ऱ्या शतकांतील शिलालेखांत आढळतो. या ठिकाणी खालची गाठ वाटोळी व वरीच मोठी आहे. इ. स. पहिल्या शतकातील कुशान राजाच्या वेळच्या मथुरेंतील लेखांत दुसरी अवस्था तीन स्वरूपांत दाखविली आहे. इ. स. ६८९ तील राजा दुर्गगणाच्या झालरापाटलेखांत तिसऱ्या अवस्थेंतला ख दिसेल. अर्वाचीन अवस्थेच्या मागील म्हणजे चवथी अवस्था हैहयवंशी राजा जाजलदेव याच्या वेळच्या ( इ. स. १११४ ) लेखांत अंकित झालेला आहे. आजचा ख व त्या वेळचा ख यांत फरक म्हणजे ख मधील पहिला अर्ध जो 'र' तो अर्ध्या ग सारखा ( काना सोडून ग, ग ) दिसतो. [ प्राचीन लिपिमाला ].

खगरिया—बिहार ओरिसा. मोंघीर जिल्हा. एका पोटविभागातील शहर. उ. अ. २५ ° ३०' व पू. रे. ८६ ° २९'. लो. सं. ( १९११ ) १०८०४. हें शहर गंडकी नदीतीरीं असून बेंगाल ॲन्ड नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवरचें स्टेशन आहे.

खंगार—कंगार; खागार, उत्तरहिंदुस्थानात यांची विशेष वस्ती आहे. ही एक चोरट्यांची जात असून या जातीच्या लोकांचें जास्त वास्तव्य बुंदेलखंडात असतें. हे लोक खेडेगावातील पहारेकऱ्याचें काम करतात. या लोकांचा रजपूत वंशाशीं निकट संबंध असल्यामुळें त्यांस रावत अथवा राव खंगार असेंहि म्हणतात. खेडेगावांत त्यांना कोतवाल अथवा कोतवार म्हणून ओळखतात. खंगार शब्दाची व्युत्पत्ति हिंदी खरग व संस्कृत खड्ग या शब्दावरून लावण्यात येत असते. खंगार जातीसंबंधीं अनेक दंतकथा प्रचलित आहेत व त्या किनपत विश्वसनीय आहेत याविषयीं प्रश्नच आहे. आपण क्षत्रिय कुलोत्पन्न आहोंत असें ते म्हणतात व याला आधार असा की रजपुतांप्रमाणेंच लग्नकार्यांत तरवार बक्षीस देण्याची त्यांची सध्याहि चाल आहे. जेव्हां दतियाचा नवीन बुंदेल राजा सिंहासनारूढ होतो तेव्हां कुंडारचा किल्ला व शेवटचा खंगार राजा याच्या मृण्मय प्रतिमा करून बुंदेला त्या फोडून टाकतो. खंगार हे पूर्वी एका काळीं राज्यकर्ते होते व त्यांचा रजपुतांशीं निकट संबंध होता हें निश्चित आहे. परंतु त्यांच्या गोत्रपद्धतीकडे पाहिलें तर ते द्रविडी वंशाचे असावे असा तर्क होतो. पूर्वी खगारलोक बुंदेलखंडाचे राजे होते त्यास बुंदेले रजपुतांनीं मारून त्यांनीं राज्य घेतलें ही गोष्ट खरी असेल.

हर्दू, भार्ता, पर्वतिया, बिसोरा, इटगोंबिया, मालनिया, कुररीया, घोरगोतिया, भिलगोतिया, बिजानिया, भारद, नाहरगोतिया, नागगोतिया, कुसुमगोतिया व मयोतिया इत्यादि खगार जातीच्या पोटजाती आहेत. देवकांवरूनहि त्यांच्यांत अनेक विभाग पडले आहेत. आजहि त्यांच्यात अनेक देवकें दिसून येतात. या दोन गोष्टींवरून ते द्रविड कुलोत्पन्न असावे असें प्रतिपादन केलें जातें.

यांच्या जातींत चार वर्ग आहेत. राय मिरधा किंवा नकीब, करवाल व दहाइत. राय वर्गाचे लोक इतर खंगाराशीं अनुलोम संबंध करतात. मिरधा लोक राजाचे रक्षक असत. करवाल लोक शूर होते. दहाइत लोक नीच समजले जातात. कुलाच्या नावाचा पदार्थ त्याचा देवक असतो. यांच्या कुलांचीं नावें बच्छा, वराह, बेलगोटिया, चंदन, चिरई, घुरगोतिया, ग्वा, हुकमान, ह्यर्या, फलगोतिया, महियर, माडगोतिया, तावागोतिया वगैरे. गोत्रांतरविवाह या जातींत रुढ असून उच्च वर्गाचे खगार, रजपुताचें अनुकरण करितात. कोतवालीसारखे धंदे करणाऱ्या हलक्या वर्गावर प्राथमिक अवस्थेचा ठसा उमटलेला दिसून येतो उच्च वर्गानें अलीकडे विधवाविवाह मान्य केला आहे. तथापि यांच्यांत फार जुन्या चाली दिसून येतात. जन्मसंस्काराच्या वेळीं घरात स्वस्तिकें काढून षष्ठीपूजन करण्यात येतें. लग्नें एकाच कुलनावाच्या लोकांत होत नाहींत व आतेमामेभावडांचीं लग्नें यांच्यात निषिद्ध मानलीं आहेत. मुलगी १० वर्षांची झाली कीं तिचें लग्न करतात. लग्नतिथि ब्राह्मणाकडून ठरवितात. वराला पिवळा झगा घालून लाल पायजमा घालतात व शेला पांघरावयास देतात. डोक्यावर खजुराचा मुगुट घालतात. त्याच्या गळ्यात बायकांची चांदीची सरी घालतात. व तीन रुपयाची माळहि घालतात. कपाळास काजळाची तीट लावतात. मुगाच्या झाडाभोंवतीं ६ प्रदक्षिणा व बहोल्याला एक प्रदक्षिणा घालतात. जर वधू अगदींच लहान असली तर गौना किंवा दुसरता(गर्भाधान)च्या वेळीं वराला विधी करतात. वराच्या बापास लुगडें नेसवून वधूच्या आईबरोबर नाचवितात व एकमेकांवर हळदीचें पाणी ओततात. विधवाविवाह. यांत संमत आहे. विधवेनें कोणासहि वरावें. बुधवारीं रात्रीं विधवेच्या हातांत बांगड्या घालून विवाह करतात. जाती

पंचायतीसमोरच्च काडी मोडावी अशी चाल आहे. आणि काडी मोडल्यावर जातीस भोजन द्यावें असेंहि आहे. हे यूल्हा देवास फार मानतात. हिंदू देवाचीहि पूजा करतात. पचघर देवाची स्थापना, डागी लोकानीं पाचदा खंगरियाबरोबर पोळी खाली त्याच्या स्मरणार्थ केली आहे खगार लोक देवीची उपासना करितात व नागबाबा आणि कानेरिया बाबा या संतानां भजतात. कुरार येथें यात्रेस जाऊन तेथील गिडवाणसा माता नांवाच्या देवीचें ते दर्शन घेतात. रात्रीं पूजा करण्यात येऊन प्रसाद वाटला जातो. लग्नाच्या वेळीं स्त्रिया 'गूढ मेहेरा पूजा' म्हणून एक पूजा करितात. वृक्षपूजेचें माहात्म्य यांच्यात बरेंच आहे गुंज, नंदी, बेल, वड वगैरे वृक्षाची पूजा करण्यात येते

खगार लोक इतर लोकास जातींत घेत नाहींत. पण खगार बाप व उच्च जातीच्या स्त्रियेची संतति मात्र जातींत घेतात. विजातीयाबरोबर व्यभिचार करणाऱ्या स्त्रियेस बहिष्कार घालतात याच्या ब्राह्मण उपाध्यायाच्याच हातची कच्ची रसोई हे खातात इतर उच्च जाती जसें बनिया, सुनार व तमेरा याच्या हातची पक्की रसोई खातात. चौका-पद्धतीप्रमाणें भोजन करतात हे आपल्या नावामागें सिंग शब्द लावतात व जातीनियम जरी फार कडक रीतीनें पाळतात तरी ब्राह्मण लोक याच्या हातचें पाणी घेत नाहींत.

आपले पूर्वज पूर्वी चागले शिपाई असत असें हे म्हणतात. पण आजकाल तर हे शेती व मजुरीहि करतात. चोरी करण्यात याची पूर्वी फार ख्याति असे. झाशी संस्थानात शहरच्या रखवालदारीचें काम याच्याकडे असे व चोरी झाल्यास ते जबाबदार धरले जात. म्हणून महाराज गंगाधर रावाच्या राज्यात सावकार व इतर दुकानदार आपलीं दुकानें रात्रीं उघडीं ठेवीत असत खंगाराची ज्ञातिविषयक पंचायत असून जातींतील तंटे पचायतीच्या पुढें मिटविले जातात. उच्च वर्णाचे खंगार रजपुतास जें अन्न चालतें तें खातात. तथापि खाण्यासंबंधीं त्याचे निर्बंध निश्चित नाहींत. हलके लोक जंगलातील प्राण्यावर उपजीविका करितात, बुंदेल्याची नोकरी करितात व कोतवाल म्हणूनहि खेडेगावात त्याना महत्व असतें. बऱ्याच जणाच्या मालकीच्या जमिनी नसल्यामुळें ते मजुरीहि करितात. हलक्या खगाराना जरी गुन्हेगार जात असें म्हणता येणार नाहीं तरी बऱ्याच जणाची चोऱ्या व लूट करण्याकडे प्रवृत्ति असलेली दिसून येते. मध्यप्रातात याची वस्ती सागर, दमो, नरसिंगपूर, जबलपूर वगैरे जिल्ह्यात आहे. मुंडा लोकातील एका वर्गाच नाव खगार असें आहे. [ क्रूक, रसेल व हिरालाल ]

**खगौल**—विहार-ओरिसा. पाटणा जिल्ह्याच्या दिनापुर पोटविभागातील शहर. उ. अ. २५° ३५' व पू. रे. ८५° लो. सं (१९११) ६०१५. दिनापुर रेल्वे स्टेशन अगदीं याच्या जवळ असून रेल्वे झाल्यामुळेंच या गावाला महत्व आलें.

**खजुराहो**—मध्य हिंदुस्थान. छत्तरपुर संस्थानातील एक गाव. या ठिकाणीं बरीच मध्ययुगीन देवस्थानें आहेत. उत्तर अक्षांश २४° ५१' व पूर्व रेखांश ७९° ५६'. लो सं. (१९११) १२४२. हें छत्तरपूर शहरापासून २५ मैल दूर आहे. शिलालेखातलें याचें नाव खजुरवाहक आहे चांदभाट याला खजुरपुर म्हणतो खजुरीच्या झाडावरून या गावाला हें नाव पडलें हें उघड दिसतें यासंबंधीं बऱ्याच कथा आहेत जिझोटी (अर्वाचीन बुंदेलखंड) राज्याची ही राजधानी होती ह्युएनत्संगनें याचा उल्लेख केलेला दिसतो या ठिकाणीं बौद्ध अवशेष एखाददुसरा सापडतो

महंमद गिझनीबरोबर कालिंजरच्या स्वारीवर (१०२१) आलेला अबु रिहान हा 'कजुराहा' चा उल्लेख करितो इब्नबतूता (१३३५) याला 'कजुरा' म्हणतो. त्याच्या वेळीं हें ठिकाण हिंदूंच्या ताब्यात असावेंसें दिसतें शिकंदर लोदी या प्रदेशात आल्यावेळेपासून (१४९४–९५) याच्या नाशास सुरुवात झाली असावी.

आज खजुराहोचें महत्व त्यातील देवस्थानाकरिता आहे. दोन सोडून बाकीचीं सर्व देवालयें ९५०–१०५० या काळात बांधिलेलीं दिसतात. यावरचे शिलालेख ऐतिहासिक महत्वाचे आहेत या देवळाचे तीन वर्ग पडतात, पश्चिम, उत्तर आणि आग्नेय प्रत्येक वर्गांत मुख्य देऊळ व अनेक लहान लहान देवळें येतात. पश्चिम वर्गात सर्व शैव व वैष्णव देवळें आहेत उत्तर वर्गात एक मोठें व काहीं लहान वैष्णव देवळें व नष्ट झालेल्या इमारतींचे अनेक ढिगारे दिसतात. आग्नेय वर्गांत सर्व जैन देवळें आहेत.

चौनसत (चौसष्ट) जोगिनी व घंटाई याखेरीज बाकीचीं सर्व देवळें कुरुदाच्या दगडाचीं एकाच धर्तीवर बाधलीं आहेत. पश्चिम वर्गातील सर्वांत जुनें देवालय चौसष्ट जोगिनींचें होय. याचें फक्त मधलें पटांगण शिल्लक आहे. हें जेबूर (नीस) दगडाचें बांधिलें आहे. याचा काळ ८ व्या शतकाची अखेर किंवा ९ व्या शतकाचा प्रारंभ असा सागण्यात येतो. बाकीच्या देवळात कंदर्य महादेवाचें देऊळ विशेष सुंदर आहे. या वर्गातील आणखी एक मोठें देऊळ रामचंद्र किंवा लक्ष्मणजीचें होय. ९५४ सालचा चंदेल घराण्याचा यावर लेख आहे. शिवाय याच वर्गातल्या विश्वनाथाच्या देवळावर १००१ आणि १११७ सालचे चंदेलवंशीय शिलालेख आहेत.

उत्तरवर्गात वामनाचें मोठें देऊळ आहे. पण पश्चिम वर्गातल्या सर्वोत्कृष्ट देवळाहून हें कमी शोभिवंत आहे. या वर्गातील अवशेषाचे डोंगर कनिंगहॅमच्या मतें पडलेल्या संघारामाचे असावेत. आग्नेय वर्गातील जैन देवालयात सर्वांत जुनें घंटाईचें असून त्याच्या आत फक्त बारीक खांब कायते उरले आहेत. या देवळाच्या अवशेषावरून तें ६ व्या

किंवा ७ व्या शतकांतील असावेतसे दिसतात या वर्गांतील मुख्य देवस्थान जिननाथाचें होय आतील नक्षीकाम फारच सुंदर आहे व देवालयाची धाटणीहि विचित्र आहे. यात सन ९५४ सालातील एक चदेल लेख आहे

खजुराहो गावापासून जवळच कुरारनाल्यावर कुवरनाथाचे भव्य देवस्थान आहे [ कनिंगहॅम—आर्किऑ सर्व्हे रिपोर्ट, पु २, ७ १० व २१ एपिग्राफिआ इंडिका पु १]

**खजुवा**—हा एक वेल आहे यास लॅटिनमध्यें ग्लिसिनेसाजा, इंग्रजींत सॉयबीन, देशी नांवें खजुवा, भट, रम, गरिकुले, होरेक वगैरे नावें आहेत.

खजुवा वेल दरवर्षी नवीन लावला जातो हा मूळचा चीन, कोचीनचीन, जपान व जावा या ठिकाणचा असून अलीकडे हिंदुस्थानात याची लागवड करण्यास सुरवात झाली आहे आणि हा वेल येथील जर्मनीत येऊ लागला आहे असें म्हणतात याची लागवड विशेषत बगाल्यात करतात हा वेल विशेषत पूर्वबगाल, असाम,खासिया पर्वत, मणिपूर सस्थान, नागा पर्वत व ब्रह्मदेश येथें आढळतो मद्रास व मुबई इलाखा येथें याची लागवड प्रयोगाच्या पलीकडे गेलेली नाही

याच्या काळ्या व पाढऱ्या अशा मुख्य दोन जाती असून सपाट प्रदेशात याची लागवड खरीप पीक म्हणून करतात जूनपासून सप्टेंबर महिन्यापर्यंत याची पेरणी होते व नोव्हेंबर पासून डिसेंबरपर्यंत पीक काढतात पालाश गधकिद हें खत या वेलाना चागलें मानवतें असाममध्यें आहू धान्याच्या पिकाबरोबरच याची पेरणी एप्रिल व मे महिन्यात करतात आहूच्या झाडाचा या वेलाना आश्रय मिळतो पीक डिसेंबर व जानेवारी महिन्यात काढतात

उ प यो ग —या धान्याची डाळ करून अथवा पीठ करून खातात ज्याच्या रोगा पक्व झाल्या आहेत असे वेल व दाण्याची पेंड गुराना चागली मानवते या झाडाचें बीं करडईच्या बियाप्रमाणें दिसण्यात असून त्याचें तेलहि तळ ण्याकडे करडईच्या तेलाप्रमाणें उपयोगात आणतात चीन व जपानात याची मोठया प्रमाणात लागवड होते [ वॅट ]

**खजुहा, त ह सी ल**—सयुक्तप्रात, फत्तेपूर जिल्ह्यातील पश्चिम तहसील क्षे फ ५०४ चौ मै व लो स (१९०१) १,९९,२२२ यात ३ शहरें व ३८५ गावें आहेत बिंडकी हें सर्वात मोठें शहर आहे गगानदीपासून यमुनेपर्यंत हा तहसील पसरला असून हींतून रिंद नदी वाहाते गगेच्या कालव्याची एक शाखा तहसिलीच्या एक तृतीयांशाहून जास्त प्रदेशाला पाणी पुरविते.

श ह र —खजुहा तहसिलीचें मुख्य ठिकाण उ अ २६° ३' व पू रे ८०° ३२' फत्तेपूर शहराच्या पश्चिमेस २१ मैलावर हें शहर आहे लो स ( १९०१ ) २९४४ १६५९ त सुजावर विजय मिळविल्याचें स्मारक म्हणून औरगजेबानें याला औरगाबाद असें नाव ठेविलें होतें पण तें टिकलें नाही त्या काळीं बाधिलेल्या येथील सराई व बारदरी या सुदर आहेत १८५६ च्या २० व्या कलमान्वयें येथील कारभार चालतो येथला बराचसा जुना व्यापार बिंडकी या शहरामुळें बुडाला, तरी येथाल पितळी भाडीं व गंजिफा अद्याप प्रसिद्ध आहेत

**खजूर**—खारकेची अगर खजुरीचीं झाडें सेनेगॉलपासून सिंधू नदीपर्यंतच्या टापूत होतात हें झाड मूळचें उत्तर आफ्रिका अगर अरबस्तानातलें असावें तेथून तें तैग्रिस व युफ्रेटिसच्या बाजूला म्हणजे मेसापोटेमिया व इजिप्तमध्यें गेलें असावें अरब लोकानीं तें मोराक्कोमध्यें नेलें व येथून तें स्पेनमध्यें गेलें हल्लीं खजुरीची लाग वड अमेरिकेचा काही भाग, क्वीन्सलड, आस्ट्रेलिया, ट्रिनिदाद इकडे होते इराण व बलुचिस्तान वगैरे देशा तहि ही लागवड होते मुलतान, मुझफरगड, वगैरे ठिकाणीं पंजाबात खजुरीची लागवड बरीच आहे सिंधमध्यें हल्लीं खजुरीची लागवड बरीच होऊ लागली आहे

खजुरीला अतिशय उष्ण व कोरडी हवा लागते यामुळें दुसऱ्या कोठें हीं झाडें झालीं तरी तेथें त्याना फळें येत नाहींत त्याप्रमाणें यास पाऊसहि फारस थोडा पाहिजे अल्जीरिया, अरिझोना, अलेक्झाड्रिया वगैरे ठिकाणीं ७ ते ९ इचपर्यंत पाऊस पडतो त्या ठिकाणीं खजूर तितका चागला होत नाहीं परतु बगदाद, केरो व अल्जीरियाचा काही भाग या ठिकाणीं पाऊस ५ इचापेक्षा कमी पडतो, तेथील खजूर, खारीक फार नामाकित आहेत फूल येण्याच्या सुमा रास म्हणजे मार्च ते मे महिन्यात व फळ पिकण्याच्या म्हणजे आगष्ट ते नोव्हेंबर महिन्यात पाऊस असल्यास फळ धरत नाहीं किंवा तें कुजू लागतें पाऊस थोडा पाहिजे असला तरी झाडें तेवढ्या पावसावर टिकाव धरीत नाहींत, यासाठीं त्याना पाणी दिलें पाहिजे ज्या वेळीं पानें कोंवळीं नसतात त्या वेळीं हवेचें उष्णमान फार खालीं म्हणजे २०° अशापर्यंत उतरलें तरी हरकत नसते खजुरीला उष्णता किती सहन करवते हें अद्याप समजलें नाहीं परतु पृथ्वीवरील कोण त्याहि ठिकाणची अत्यत प्रखर उष्णता व ऊन सहन करण्यास या झाडास कोणतीहि अडचण पडत नाहीं असें दिसतें झाड लहान असताना देखील त्याला ऊन पाहिजे

जमिनीसबधानें खजुरीचें झाड फारसें चिकित्सेखोर नाहीं. परतु रेताड अगर पुळणवट जमीन असेल तर झाड लवकर लागास येतें व फळहि लवकर पिकतें वरच्या मातीमध्यें क्षाराचें प्रमाण शेकडा ३–४ पर्यंत असलें तरी झाड बिघडत नाहीं, पण त्याला फळ मात्र येत नाहीं फळ यण्यासाठीं झाडाच्या मुळ्या बऱ्याच खोल जाऊन तेथील क्षाराचें प्रमाण शेकडा अर्धा इतकें उतरावयास पाहिजे

खजुरीचीं झाडें बीं लावून किंवा त्याच्या मुळ्यापासून जीं पिलें फुटत तीं लावून करतात खजुरीचीं नर व मादी

अशीं भिन्न झाडें असतात. यामुळें बीं लावलें असता अर्धी नर झाडें निघण्याचा संभव असतो म्हणून चांगल्या मादी झाडांचीं पिलें लावणें हा उत्तम मार्ग होय मादीच्या पन्नास झाडास एक नर पुरे होतो मादीझाडाला सोळा वर्षे पर्यंत बहुधा पिलें फुटत असतात. तीं लहान असताना त्यावर ओला काथ्या घालून पेटींत भरून तीं परगावीं पाठविता येतात व त्या स्थितींत तीं तीन महिनेपर्यंत रहातात. झाडें २५ फुटावर लावावीं. खड्डे तीन फूट हमचौरस घेऊन अर्धा खड्डा, ४ पौंड शेणखत व पेंड अशा खतानें भरावा झाड लावतेवेळीं शेंड्यावर खत, माती वगैरे कांहीं पडणार नाहीं अशाबद्दल काळजी घ्यावी. झाडें लावल्यावर महिनाभर दररोज, दुसऱ्या महिन्यात चार दिवसांनी एकदां व नंतर महिन्यातून एकदा असें पाणी द्यावं. फुलें येण्याच्या सुमारास ( फेब्रुवारी व मार्च महिन्यात ) पाणी मुळींच देऊं नये. फळ धरल्यापासून तें पिकेपर्यंत पाणी वेळच्यावेळेवर द्यावें. झाडें मोठीं होईपर्यंत गहूं, लसूण, घास वगैरे पिकें घ्यावींत नंतर अंजीर, डाळिंबें, द्राक्ष वगैरे झाडें लावावींत. दोन अगर तीन वर्षांनीं शेणखत द्यावें वाळलेलीं पानें वर्षास काढून टाकलीं पाहिजेत. खाजरीचीं पिलें दोन वर्षांनी एकदा काढावीं

सिंध प्रातात झाडें चार किंवा पाच वर्षांचीं झालीं म्हणजे त्याना फूल येतें. परंतु झाडें ८–१० वर्षाचीं होईपर्यंत त्याना भरपूर पीक येत नाहीं हीं झाडें १०० वर्षेपर्यंत चांगलें उत्पन्न देतात. नरफुलाचे तुरे असतात तुऱ्याची एक एक लहानशी फांदी घेऊन ती मादीफुलाच्या तुऱ्यावर सैलसर बांधून ठेवतात नरफुलाचे तुरे काढून ते कागदाच्या पुडींत घालून चांगले बंदोबस्तानें ठेविले तर वर्षभर टिकतात. त्याचा उपयोग एखादें मादीझाड भलतेच वेळीं फुललें तर त्या झाडासाठीं होतो घड वाढूं लागले म्हणजे त्यातील कांहीं काढून टाकतात या योगानें बाकीचे चांगले पोसतात. एकेका झाडावर ८–१० घड येतात. एकेका घडापासून १० ते १४ पौंड पर्यंत खजूर येतो. दर झाडाचें सरासरी उत्पन्न १२० पौंड समजतात. घडातील सर्व फळें एकदम पिकत नाहींत, या साठीं जात उत्तम प्रकारची असली तर फळ जसजसें पिकेल तसतसें हातानें एक एक वेंचून काढतात पण जात बेताचीच असेल तर अर्धीं फळें पिकलीं म्हणजे सर्वच घड उतरून त्यातील वाईट फळें काढून टाकून तो सावलींत टांगून ठेवतात.

**खझर**—एक प्राचीन राष्ट्र. फिरदोसीच्या महाकाव्यात इराणचे उत्तरेकडील शत्रू म्हणून या लोकाचा उल्लेख आहे. पण खझर हे यूरोप आणि आशिया याच्या सरहद्दीवर कमींत कमी ५०० वर्षे (इ स. ७५०–१२००) चमकत होते असें म्हणणें ऐतिहासिक सत्यास सोडून नाहीं. त्याच्या उत्कर्षाचा काल इ स. ६०० पासून ९५० पर्यंतचा होय. कास्पियन द्राचा किनारा व कॉकेशस पर्वताचीं शिखरें हें त्याचें वसतिस्थान असून त्याच्यावरून कास्पियन समुद्राला मुसुल्मान भूगोलज्ञ बहर–अल–खझर (खझरांचा समुद्र) असें म्हणत. व्होल्गा नदीच्या मुखप्रदेशावरील इटिल सेमेंडर, बाल्लिडझे, बेलेंड्झर (आर्मेनिया) आणि डॉनवरील सर्केल हीं त्यांचीं शहरें चांगल्या भरभराटीचीं व्यापारी केंद्र होतीं. कास्पियन व युक्झाईनवर त्याचें साम्राज्य होतें व पूर्व आणि पश्चिम खंडातील सर्व वाहतुक त्याच्याकडे असे. इराण, बिझान्शिअम, आर्मेनिया, रशिया आणि बल्गेरिया देशातील व्यापारी इटिल या ठिकाणीं जमत खझर साम्राज्याची मर्यादा वरचेवर बदलत असे, तरी त्याची साधारण मर्यादा म्हणजे कॉकेशस, व्होल्गा व डॉन यामधील प्रदेश होय. याशिवाय क्रिमिया प्रांत यात मोडत असे. इराण आणि बिझान्शिअम हे या साम्राज्याचे बलाढ्य शत्रू होते उग्रियन व स्लाव्ह याना खझर लोक सहज दडपून टाकीत. राज्याचा जास्तींत जास्त विस्तार म्हणजे नीपर ते मध्य व्होल्गावरील बोलगारी आणि कास्पियनच्या पूर्वकिनाऱ्यावर आम्हूबा येथपर्यंत झाला होता

**खटाव**—मुंबई इलाख्यातील सातारा जिल्ह्यात याच नावाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. या तालुक्यात भूषणगड व वर्धनगड हे किल्ले आहेत मराठी रियासतींत खटाव हा एक परगणा होता. गावास तट व वेशी आहेत. जुनीं दोन तीन सरदार घराणीं येथें आहेत गावाबाहेर एक महादेवाचें हेमाडपंती देऊळ असून त्याच्या सभामंडपात छतावर थोडी फार नकशी आहे. तेथील कर्दिजनवरची नक्शी फारच उत्तम असून ती परळी व माहुली येथील देवळासारखी आहे. जवळच नारायणाचें एक जुनें देऊळ आहे. दुर्गादेवीचा दुष्काळ पडला असता व ब्राह्मणी राज्यातील तत्कालीन देशमुख देशपांडे वगैरे दुष्काळाचा फायदा घेऊन स्वतंत्र होऊं लागले असता मलिक उल् तुजार यानें या प्रातातून मुसुलमानी सत्ता पुन्हा प्रस्थापित करण्यासाठीं दौरा काढून खटावच्या बाहीं रामोशानीं बंड केलें होतें तें मोडलें असें ग्रांट डफ म्हणतो (पृ. २६). प्रसिद्ध कृष्णराव खटावकर हा येथील रहाणारा होता (कृष्णराव खटावकर पहा)[सातारा ग्याझे.]

**खटौली**—संयुक्तप्रांत मुझफरनगर जिल्ह्याच्या जानसथ तहशिलींतील एक शहर नॉर्थ वेस्टर्न रेल्वेच्या मीरत ते रूरकी रस्त्यावर हें स्टेशन आहे. लोकसंख्या (१९११) ४७५१. पण १० वर्षांखालीं ती ८६९५ होती. शहर प्राचीन असून त्यात चार मोठीं जैन देवालयें व शहाजहानानें बांधलेली एक सराई आहे. १८७४ त बिहारात दुष्काळ पडल्यावेळीं या स्टेशनहून जिल्ह्यातील शिलकी धान्य बाहेर पाठविण्यात येई. त्यामुळे हें प्रसिद्धीस आलें शहरातील रस्ते फरसबंदी आहेत. बाहेर धान्य व साखर पाठविण्याचा मोठा व्यापार चालतो बहुतेक मोठे व्यापारी जैन आहेत.

**खट्वांग**—एक इक्ष्वाकुकुलोत्पन्न राजा. यास दिलीप असें नामांतर असून क्वचित् ऐलविल म्हटलें आहे हा मोठा

यज्ञ करणारा होता. एकदा देवांनीं यास युद्धांत आपणांस सहाय्य करावें म्हणून स्वर्गी नेलें होतें त्याप्रमाणें त्यानें सहाय्य केल्यामुळें देवांस जय प्राप्त झाला असता ते यास वर माग असें म्हणूं लागले. यानें आधीं माझें आयुष्य किती आहे तें सांगा म्हणजे वर मागेन म्हणताच त्यांनीं मुहूर्तमात्र आहे असें सांगितलें. मग हा कांहींच न मागता शीघ्रगामी विमानांत बसून त्वरेनें अयोध्येस आला आणि आपल्या दीर्घबाहु नावाच्या पुत्रास राज्यावर स्थापून विष्णुलोकाला गेला [ भारत द्रोण. अ. ६१, शांति. २९. वन ९ ] शंकराच्या एका गदेसारख्या आयुधाला खट्वांग असें नांव आहे

खंड—महाद्वीपाच्या लहान भागास जशी वर्ष म्हणून संज्ञा आहे तशी वर्षांतील लहान भागास खंड संज्ञा आहे. आपण रहातों या भारतवर्षात कुशावर्त, इलावर्त, ब्रह्मावर्त, मलय, केतु, भद्रसेन, इंद्रस्पृक्, विदर्भ आणि कीकट असे नऊ खंड आहेत. हींच नांवें मत्स्यपुराणांत इंद्रद्वीप, कसेरु, ताम्रपर्ण, गभस्तिमान्, नाग, सौम्य, गंधर्व, वारुण आणि भरत अशीं आहेत. [ मत्स्य अ. ११३ श्लोक ९–१०, देवी भाग ११ स्कं अ २१ ].

खडक, ओ ळ ख.—खडक ओळखण्याला त्याच्या गुणधर्मांची माहिती असली पाहिजे खडकाचे गुणधर्म तीन तऱ्हांनीं ठरवितात त्या तीन तऱ्हा अशा आहेत:— ( १ ) खडकाचें ढोबळ परीक्षण यांत सूक्ष्मदर्शक यंत्राचा वगैरे उपयोग न करता वरवर दिसणाऱ्या व थोड्या साधनांनीं शोधून काढता येणाऱ्या गुणधर्मांचें वर्णन असतें ( २ ) प्रयोग शाळेतील परीक्षण (३) सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें परीक्षण

*ढोबळ परीक्षणः*—खडक शोधण्याकरितां बाहेर हिंडावयास जातांना बरोबर मोठा हातोडा, छत्री, लोहचुंबक *महत्कारी काच ( मॅग्निफाइंग ग्लास ), खडकाचे तुकडे गोळा* करून आणण्याकरितां पिशवी, थोडें उदहराम्ल ( हैड्रोक्लोरिक ॲसिड ) इत्यादि जिनस बरोबर ठेवले पाहिजेत. प्रत्यक्ष जागेवर दिसणाऱ्या गोष्टींची नोंद येथेंच एका वहींत करून ठेवण्याची पद्धत आहे. खडक मूळ स्थितींत दिसल्यास ओळखावयास सोपें जातें परंतु खडकावर त्याच्या पिठाचा थर असल्यास किंवा खडकात फेर होऊन रखरखीत सांठल्यास ओळखण्यास जड पडतें. अशा *ठिकाणीं कित्येक वेळा वरचा भाग काढून खालच्या* खडकाचा तुकडा तपासण्यास घ्यावा लागतो. खडक पाहून *त्याच्या ढोबळ गुणधर्मांवरून तो कोणत्या प्रकारचा आहे हें* कसें ओळखावें तें पुढें दिलें आहे.

( अ ) खडकाचा नवीन तुकडा पडल्यावर त्या बाजूस बारीक एकमेकाला चिकटून कण असले, त्यावर कोणत्याहि *प्रकारची चकाकी नसली व विशिष्ट प्रकारची रचना नसली तर* खालीं दिल्याप्रमाणें गुणधर्म पाहून खडक कोणता तो ठरवावा

( १ ) *काठिण्य ( हार्डनेस ) ०.५ ते १ आहे; मऊ असून* नखानें किंवा चाकूनें सहज खरडला जातो, मातीसारखा *वास येतो; अम्ल ( ॲसिडनें ) टाकल्यानें कोणताहि वायु* निघत नाहीं, रंग राखी, पांढुरका, तांबूस, पिवळट असेल तर *एखादा मातीचा दगड, शेल, विस्तवानें न बदलणारी माती* किंवा ठिसूळ झालेला फेल्स्पार असलेला खडक अस*ण्याचा संभव असतो शेल किंवा स्लेट असल्यास खडक* थोडा कठिण असतो

( २ ) काठिण्य १.५ ते २, विशिष्ट गुरुत्व २.२ ते २.४: रंग पांढरा, पिवळट किंवा तांबूस, थर अथवा भेगांत सांपडतो, ॲसिड घातल्यास कोणताहि वायु निघत नाहीं तर तो बहुतकरून जिप्सम ' असेल

( ३) हातानें मोडला जातो, रंग पांढुरका किंवा पिवळट असून ॲसिड घातल्यास कर्बद्विप्राणिद (कार्बन डाय-ऑक्साइड ) वायु निघत असेल तर तो चुनखडीच्या दगडापैकीं असेल

( ४ ) काठिण्य ३ ते ४ आहे विशिष्टगुरुत्व २ ५ ते २ ७, रंग हिरवट व तांबडा यांचें मिश्रण, पुष्कळदां रंग पांढरा, हाताला साबणासारखा गुळगुळीत लागतो: ॲसिडनें वायु निघत नाहीं तर सर्पेंटाइन असेल

( ५ ) काठिण्य ३ विशिष्टगुरुत्व २ ६ ते २ ८, रंग पांढरट, निळसर, पिवळट, काळा, मुख्यत्वें रंग पांढरा, ॲसिडनें कर्बद्विप्राणिद( कार्बन डाय–ऑक्साइड) वायु निघतो तर तो चुन्याचा खडक असेल

( ६ ) काठिण्य ३.५, ते ४.५, विशिष्टगुरुत्व २ ९ ते २ ८,. रंग पांढरा पिवळट, ॲसिड खडकावर घातल्या फारसा परिणाम होत नाहीं परंतु पूड करून त्यावर घात*ल्यास थोडा-थोडा कर्बद्विप्राणिद वायु निघूं लागेल, तर तो* डॉलोमाइट असेल.

( ७ ) *काठिण्य ३ ते ४, विशिष्टगुरुत्व ३ ते ३ ९;* रंग काळसर तपकिरी, काळा, पुष्कळदां रंग पिवळा किंवा *तांबडा, ॲसिडमध्यें थोड्या प्रमाणांत विरघळून ॲसिडला* पिवळट रंग येतो. खडकांत किंवा थरांत सांपडतो तें एखाद्या लोहाचें प्राणिद ( ऑक्साइड ) असेल

( ८ ) रंग पांढुरका, पिवळट, निळसर, हातोड्यानें *नाद निघतो, व* चकत्या निघतात, ॲसिडनें वायु निघत नाहीं तर बहुतेक तो फोनोलाइट *किंवा* फेल्साइट असेल.

( ९ ) *विशिष्ट गुरुत्व २ ९ ते ३ २; रंग काळा किंवा* काळसर हिरवा, मुख्यतः तपकिरी असल्यास बेसॉल्ट किंवा ॲम्फिबोलाइट असेल

( १० ) काठिण्य ७. विशिष्टगुरुत्व २ ५ ते २.९; रंग पांढरा, तांबूस, पिवळट तपकिरी, चाकू ओरखडत

चाकूनी लोखंडी रंगाची रेघ उठते तो भाग, चकमक वगैरे असण्याचा संभव आहे.

*(आ )* खडकाचा फोडलेला भाग काचेसारखा असल्यास काचमणी, चकमक सेधव वगैरेसारखीं खनिज द्रव्यें किंवा आबसिडियन व पिचस्टोन सारखे खडक असतील.

( इ ) खडकाच्या तुकड्यात खनिजद्रव्यें स्फटिक स्थितींत आहेत, अशा वेळीं स्फटिक स्पष्ट दिसत असल्यास खडक ओळखण्याचा त्रास पडत नाहीं परंतु स्फटिक स्पष्ट दिसत नसेल तर चाकूनें खडक खरवडला जातो का पहावा खरवडला जाऊन अॅसिडनें कार्बन डाय ऑक्साइड निघाल्यास तो चुन्याचा खडक असणार. अॅसिडचा परिणाम फक्त पूड केल्यावर झाल्यास डॉलोमाइट पण अॅसिडचा परिणाम न झाल्यास जिप्सम समजावा. चाकूनें खरवडला जात नसल्यास त्याच्या व त्याच्यातील खनिज द्रव्याच्या रंगावरून खडक ठरवावा. *एकच खनिज पदार्थ असून हिरवट रंग आहे तर अॅम्फिबोलाइट असेल पादरा व हिरवट असे दोन खनिज* पदार्थ नसल्यास डायओराइट असेल.

( ई ) खडकात पल्लवी रचना असल्यास त्याला पल्लवीभूत खडक ( शिस्ट फॉलिएटेड ) असें म्हणतात व खडकात जें खनिजद्रव्य प्रामुख्यानें असेल त्यावरून खडकाचें विशिष्ट नाव ठरवितात. या वर्गात सर्व प्रकारचे शिस्ट किंवा ज्याना फॉलिएटेड खडक म्हणतात ते येतात.

(उ) खडक निरनिराळ्या प्रकारच्या तुकड्याच्या एकीकरणानें झाला असल्यास ते तुकडे तपासून खडक कोणत्या प्रकारचा आहे हें शोधून काढणें झाल्यास तुकड्याचा आकार व त्याची आकृति व त्याचप्रमाणें ज्या लुकणानें हें तुकडे चिटकून राहिले असतील तें लुकण याची तपासणी केली पाहिजे. जलजन्य खडक तुकड्याचे किंवा कणाचे झालेले असतात व त्याचें वर्गीकरण तुकड्याच्या आकृतीच्या आकारमानाप्रमाणें केलेले असतें

(२ )खडकतपासणीच्या प्रयोग शाळेतील पद्धति.—प्रयोग शाळेबाहेर खडक तपासण्याकरिता काय करावें हें वर सागितलें आहे. आता प्रयोगशाळेतील उपकरणाच्या मदतीनें खडक ओळखण्याचें काम कसें करावयाचें हें खालीं थोडक्यात दिलें आहे.

(अ) विशिष्टगुरुत्वः—खडकाचें विशिष्ट गुरुत्व माहिती असलेल्या माणसाला खडकाचा तुकडा हातात घेऊन अंदाजानें सागता येतें. परंतु नक्की माहितीकरिता व विशिष्टगुरुत्वाकरिता *मुद्दाम केलेल्या तराजूवर वजन करून काढलें* पाहिजे किंवा पदार्थविज्ञानशास्त्रात दिलेल्या कोणत्यातरी एखाद्या पद्धतीनें काढलें पाहिजे

(आ) बाह्यपृथक्करणः-रासायनिक पृथक्करण न करता बाह्य पृथक्करणावरून पुष्कळ खडक व त्यातील खनिजद्रव्यें ओळखतां येतात. बाह्यपृथक्करणाकरिता खडकाचा तुकडा घेऊन हातोड्यानें त्यातील कणाचा भुगा न करिता ते सुटे करावे, नंतर एकासारखे एक दिसणारे कण इतर कणापासून निराळे काढून ते महत्कारिकाच्या खालीं व लोहचुंबकानें तपासावे, *त्याचप्रमाणें निरनिराळ्या विशिष्टगुरुत्वाचे द्रवपदार्थ घेऊन* त्याच्यात वरील कण टाकावे. हलक्या द्रव्यावर टाकल्यास ते तळीं जाऊन बसतील व जड द्रव्यावर टाकल्यास त्यावर तरंगतील परंतु त्याच्या इतक्याच विशिष्टगुरुत्वाच्या द्रवात टाकल्यास ज्याठिकाणीं सोडावे त्याच ठिकाणीं राहातील आपल्याजवळ निरनिराळ्या विशिष्टगुरुत्वाचीं बरींच द्रव्यें तयार ठेवल्यास कणाचें विशिष्ट गुरुत्व तेव्हाच काढता येतें कित्येक वेळा खडकाची पूड करून त्यावर पाण्याचा ओघ सुरू ठेवल्यास जड व हलकीं द्रव्यें वेगळीं होतात

(इ )रासायनिक पृथक्करण.—कोणत्याहि खडकाचें रासायनिक पृथक्करण करणें भूस्तरशास्त्रज्ञाचें काम नसल्यामुळें खडक रसायन शास्त्रज्ञाकडे पाठवून त्याचें पृथक्करण करून आणण्याची पद्धत आहे. परंतु अगदी सोप्या तऱ्हेचे रासायनिक *प्रयोग* भूस्तरशास्त्रज्ञ करितात. उद्हराम्ल ( हायड्रोक्लोरिक अॅसिड ), दिव्याची ज्योत, कोळशावर तापविणें, काचेच्या नळींत तापविणें वगैरेंचा परिणाम खडकावर किंवा त्यातील द्रव्यावर काय होतो हें नोंदून ठेवणें *अत्यंत आवश्य आहे.*

( ई ) सूक्ष्मदर्शकाच्या सहाय्यानें परीक्षणः—सूक्ष्मदर्शकाच्या सहाय्यानें खडक तपासण्याची पद्धत जास्त जास्त प्रचारात येऊं लागली आहे, म्हणून त्याबद्दलची थोडी माहिती येथें देणें अवश्य आहे. प्रथमत. सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं घालून तपासता येईल इतका पातळ खडकाचा तुकडा करावा लागतो. लेथच्या सहाय्यानें किंवा पुष्कळ वेळा नुसत्या हातोड्यानें खडकाचा पैशायेवढा जितका पातळ निघेल तितका तुकडा पाडावा व तो लाकडी मूठ करून त्यावर एका टोंकाला चिकटवावा. तुकडा लाकडास चिटकण्याकरिता मेण व राळ एकेठिकाणीं ऊन करून त्याचें लुकण तयार करावें व त्यामध्यें तो बसवावा. नऊ इंच चौरस व अर्धा इंच जाडीच्या लोखंडाच्या तकटावर जाड इमरीची किंवा कुरंदाची पूड पसरावी आणि त्यावर पाणी घालून लाकडावर चिकटविलेल्या खडकाच्या तुकड्याची एक बाजू घासावी व जितक्या समपातळींत ती आणता येईल तितकी आणावी. एक बाजू वर सागितल्याप्रमाणें तयार झाली म्हणजे लुकण दिव्यावर ऊन करून तुकडा सोडवावा व तो उलटा करून चिकटवावा आणि एमरीवर घासावा. याप्रमाणें जाड एमरीवरचें घासणें झालें म्हणजे तुकड्याच्या दोन्ही बाजू अगदीं गुळगुळींत होण्याकरिता तुकडा काचेच्या तुकड्यावर ' कानडा बालसम ' नें चिकटवून मऊ एमरीवर घासावा व तो पारदर्शक झाला म्हणजे सुटे झालेले कण धुवून काटावे व धारेच्या मऊ दगडावर घासून साफ करावा. नंतर सूक्ष्मदर्शक यंत्रानें तपासण्याकरिता मुद्दाम केलेल्या काचेवर हा तुकडा कानडा बालसममध्यें चिकटवावा व त्यावर काचेचा पातळ तुकडा बसवावा. अशा तऱ्हेनें तयार केलेला

खडकाचा पातळ तुकडा सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं तपासता येतो. वरील सांगितलेली कृति फार काळजीपूर्वक करावी लागते. नाहींतर खडकाचा पातळ झालेला तुकडा तेव्हाच मोडण्याचा संभव असतो.

सूक्ष्मदर्शक यंत्रः—भूस्तरशास्त्राचा अभ्यास करतांना खडक किंवा खनिज पदार्थ तपासण्याकरितां जें सूक्ष्मदर्शक यंत्र उपयोगांत आणितात त्यास पेट्रॉलॉजिकल अथवा प्रस्तरनिर्णायक सूक्ष्मदर्शक यंत्र असें म्हणतात. या यंत्रांत दोन निकोलचे समपार्श्व ( प्रिझम ) असतात. त्यांत पदार्थांच्या खालच्याला, ज्यांतून आलेला प्रकाश पदार्थांतून घेतात त्याला, ध्रुवकारक ( पोलरायझर ) व वरच्याला पृथक्कारक ( ॲनलायझर ) म्हणतात. याशिवाय क्वार्टस वेज जिप्सम व अभ्रक यांचे पातळ तुकडे वगैरे साहित्य या सूक्ष्मदर्शक यंत्रांत अवश्य असतें.

परावर्तित प्रकाश.—प्रस्तरनिर्णायक सूक्ष्मयंत्रानें वर सांगितल्याप्रमाणें तयार केलेले खडकाचे पातळ तुकडे तपासतात. प्रथमतः परावर्तित प्रकाशांत हा तुकडा तपासल्यास पुष्कळ खनिज पदार्थ ओळखतां येतात पदार्थांतून येणाऱ्या उजेडापेक्षा या प्रकाशानें अपारदर्शक खनिज पदार्थांच्या रंगांतील सूक्ष्म छटा व पदार्थांवरील रेषा वगैरे स्पष्ट दिसतात.

पारप्रकाश.—अपारदर्शक खनिज पदार्थ ओळखण्यास परावर्तित प्रकाश उपयोगी पडतो परंतु प्रस्तरनिर्णायक सूक्ष्मदर्शक यंत्रांत विशेष उपयोग पारभूत प्रकाशाचाच होतो कारण बहुतेक पारदर्शक खनिज पदार्थच खडकांतून पुष्कळ असतात. पारभूत प्रकाशांत खडक तपासीत असतांना निरनिराळ्या कणांचा वक्रीभवनांक ( रिफ्रॅक्टिव्ह इंडेक्स ) काढण्याची पद्धत आहे ती अशीः—ज्या पदार्थांचा वक्रीभवनांक काढावयाचा असेल तो पदार्थ ज्याचा वक्रीभवनांक ठाऊक आहे अशा पदार्थाला लागून असतांना काढितात सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं हे दोन्ही पदार्थ असतांना यंत्राची नळी थोडथोडी वर उचलावी म्हणजे ज्या पदार्थाचा वक्रीभवनांक जास्त असतो त्या बाजूस त्या दोन पदार्थांतील रेषा सरकते आहे असें दिसतें. याप्रमाणें तो पदार्थ कोणत्याहि खनिज पदार्थांचा वक्रीभवनांक दोन तीन माहीत असलेल्या पदार्थांबरोबर तपासल्यास ठरवितां येतो.

ध्रुवीभूत ( पोलराइझ्ड ) प्रकाश—ध्रुवीभूत प्रकाशांत पदार्थ तपासण्याकरतां प्रस्तरनिर्णायक सूक्ष्मदर्शक यंत्रांत ध्रुवकारक व पृथक्कारक असे दोन समपार्श्व ( प्रिझम ) असतात. ध्रुवकारकांमधून आलेला प्रकाश तपासण्याच्या पदार्थांतून पाठवून नंतर पृथक्कारकांमधून प्रकाश न घेतां पहिल्यादा पदार्थ तपासावा व नंतर पृथक्कारकामधून प्रकाश घेऊन तपासावा. ध्रुवकारक यंत्राच्या खालच्या बाजूस बसविलेला असतो व त्याची जरूर नसल्यास तो एके बाजूस सारतां येतो पृथक्कारक यंत्राच्या नळींत किंवा नळीवर बसविला असतो, परंतु हा मुद्दा नको असेल तेव्हां एका बाजूस काढितां येतो. ध्रुवकारकांमधून व तपासण्याच्या पदार्थांतून आलेला प्रकाश पृथक्कारकामधून न घेतां पहात असतांना पोलरायझर (ध्रुवकारक) फिरवावा किंवा तपासण्याचा पदार्थ ज्यावर ठेविला असतो त्या सूक्ष्मदर्शक यंत्राची बैठक फिरवावी. असें करीत असतांना तपासण्याच्या पदार्थाचा रंग पालटत राहिला तर याला प्लिओक्रोइक असें म्हणतात. ध्रुवीभूत प्रकाश पदार्थांतून आल्यावर पृथक्कारकामधून घेऊन तपासण्याचा प्रकार खालीलप्रमाणें आहेः— ध्रुवकारक (पोलरायझर) व पृथक्कारक (ॲनलायझर) समांतर किंवा एकाच दिशेनें न ठेवतां एकमेकांस आडवे ठेवावे ध्रुवकारक व पृथक्कारक आडवे करून ठेवल्यास त्यांतून प्रकाश येत नाहीं आतां खडकांतील जो खनिज पदार्थ तपासावयाचा असेल तो मध्यें ठेवावा आणि अशा स्थितींत त्यांतून प्रकाश न आल्यास तो खनिज पदार्थ आयसोट्रॉपिक आहे असें म्हणतात क्रास्ड निकोलच्या मध्यें खनिज पदार्थ ठेवला असतां त्यांतून प्रकाश आल्यास त्याला ॲनिसोट्रॉपिक म्हणतात ॲनिसोट्रॉपिक पदार्थ असल्यास त्याची पुढें तपासणी करावी वरचा किंवा खालचा परंतु बहुतेक वेळा वरचा सोईचा असल्यामुळें तोच निकोल म्हणजे पृथक्कारक सावकाश फिरवावा व प्रकाश येण्याचें बंद झाल्याबरोबर थांबावें असें करतांना कोणत्या कोनांतून पृथक्कारक फिरविला तें नोंदावें व अशा तऱ्हेनें दहा पधरा वेळा फिरविल्यावर त्या कोनांची सरासरी काढावी या सरासरी काढून आलेल्या कोनास त्या पदार्थांचा अदृश्यीभवनकोन किंवा विधानकोन.( ॲंगल ऑफ एक्स्टिंक्शन ) असें म्हणतात. निरनिराळ्या खनिज पदार्थांचे विधानकोन निराळे असल्यानें ते पदार्थ ओळखण्यास विधानकोन काढल्यानें मदत होते. सूक्ष्मदर्शक यंत्राच्या सहाय्यानें परावर्तित प्रकाशांत, पारभूत प्रकाशांत व ध्रुवीभूत प्रकाशांत खडकाचे पातळ केलेले तुकडे तपासून त्याच्यांतील खनिज पदार्थांचे वक्रीभवनांक काढणें, ते प्लिओक्रोइक आहेत किंवा नाहींत, आयसोट्रॉपिक आहेत किंवा ॲनिसोट्रॉपिक आहेत व ॲनिसोट्रॉपिक असल्यास त्याचा विधानकोन कोणता आहे वगैरे टिपण केल्यास नेहमींचे बहुतेक खनिज पदार्थ ओळखतां येतील. याखेरीज आणखी विशेष विस्तृत तऱ्हेनें प्रस्तरनिर्णायक सूक्ष्मदर्शक यंत्राच्या सहाय्यानें तपासणी करितात. परंतु ती सर्व देणें या ठिकाणीं शक्य नाहीं त्याकरितां त्या विषयावर स्वतंत्र लिहिलेले ग्रंथ पहावे.

खडकाची ओळख होण्यासाठीं अवश्य असणाऱ्या परीक्षणाच्या तीन प्रकारांचें ( ढोबळ परीक्षण, प्रयोगशालीय परीक्षण व सूक्ष्मदर्शकीय परीक्षण) वर्णन येथवर झाल्यानंतर आतां खडकाच्या वर्गीकरणाकडे वळूं.

व र्गी क र ण.— खडकाचें वर्गीकरण पुष्कळ तऱ्हांनीं करतां येईल, त्याच्यांतील खनिज द्रव्यावरून, त्याच्या

आकारावरून, ते ज्या पद्धतीनें तयार झाले असतील तिजवरून किंवा ते ज्या काळात झाले असतील त्यावरून यापैकीं कोणत्याहि पद्धतीनें वर्गीकरण करणें शक्य आहे परंतु सर्वसम्मत खालील तीन मुख्य वर्ग केले जातात

(अ) जलजन्य खडक —पहिल्या वर्गांत पाणी, हवा, वनस्पती किंवा प्राणी याच्या योगानें तयार होऊन साठलेले खडक येतात. हे खनिज पदार्थाचे असोत वा सेंद्रिय असोत, जमीनीवर साठलेले असोत, पाण्यात साठलेले असोत, वनस्पतींच्या किंवा प्राण्याच्या वाढीनें झालेले असोत, ते सर्व या वर्गात येतात हे वाळू, माती वगैरे गाळाच्या योगानें तयार झालेले असतात व त्याचे थर असतात या वर्गातील खडकाना जलजन्य, गाळाचे किंवा थराचे खडक असें म्हणतात.

( आ ) अग्निजन्य खडक.— हे खडक पृथ्वीच्या उदरातील खडकाचा रस वर येऊन झालेले असतात. हा रस आतल्या आत थंड होतो किंवा बाहेर ज्वालामुखी वगैरेंच्या मार्गानें जमीनीवर पसरून थड होतो. या खडकात खनिज पदार्थांचे स्फटिक तयार होतात या वर्गातील खडकाना अग्निजन्य खडक असें म्हणतात. याचे बहुतकरून थर नसतात

( इ ) रूपातरित खडक —वरील दोन वर्गाखेरीज आणखी एक तिसरा वर्ग आहे. त्यातील खडक कसे झाले असतील हें नेहमींच सागता येत नाहीं. त्यान्यात अग्निजन्य खडकाप्रमाणें स्फटिक असतात व जलजन्य खडकाप्रमाणें त्याचे थरहि असतात हे मूळ अग्निजन्य किंवा जलजन्य असलेल्या खडकावर पाण्याचा, दाबाचा किंवा उष्णतेचा परिणाम होऊन तयार झालेले असतात. या खडकाची किंवा त्यातींत खनिज पदार्थांची पल्लवी ( फॉलिएटेड ) रचना असते. या वर्गातील खडकाना रूपातरित ( मेटामॉर्फिक ) खडक म्हणतात

( अ ) जलजन्य खडक —या वर्गापैकी काहीं खडक वाऱ्याच्या वाहण्यानें समुद्राकिनारी किंवा वालुकामय प्रदेशात होतात, काहीं वाहत्या पाण्याच्या योगानें नद्याच्या पात्रातून किंवा समुद्रकाठीं होतात, तर काहीं मृत वनस्पती व प्राणी याच्या अवयवाचे झालेले असतात यांशिवाय ज्वालामुखी पर्वताच्या तोंडातून फेंकून दिले गेलेले कण एके ठिकाणीं जमून झालेले खडकहि याच वर्गात घालतात. खडक या सज्ञेमध्यें फक्त कठिण व घट्ट झालेले दगड येतात असें नव्हे तर मोकळे कण, गाळ, रेती, वगैरे सर्वांचा खडक या संज्ञेत अंतर्भाव होतो.

वाळूचे खडकः—( मेक्यूल ऑर सँड रॉकस ) हवा, पाऊस, नद्या वगैरेंचे जुन्या खडकावर आघात होऊन त्याचे तुकडे झाल्यामुळें होतात. त्याच्यात जुन्या खडकातील खनिज पदार्थ असतात परंतु अमुकच प्रकारचे खनिज पदार्थ असतील असें म्हणता येणार नाहीं. बहुधा क्वार्ट्सचे प्रमाण जास्त असतें. कारण बाकीचे खनिज पदार्थ अगदीं बारीक भुगा होऊन धुवून जातात परतु क्वार्ट्स तसा जात नाहीं ( क्वार्टसशिवाय फेल्स्पार, अभ्रक, हॉर्नब्लेंड वगैरेंचे तुकडेहि सापडतात ). साधारणतः सारख्या आकाराचे व एकाच विशिष्टगुरुत्वाचे खडे एके ठिकाणीं येऊन त्याचे थर होतात. थरातून कित्येक वेळा वनस्पती व प्राणी याचे अवशेष पुरले जाऊन त्याच्या खुणा शिल्लक राहतात पुष्कळ वेळा खड्यामध्यें व थरामध्यें क्वार्ट्स् लाइम किंवा लोहाचें ऑक्साइड याचें लुकण साठून ते एकजीव होतात खड्याचा किंवा थराचा एकजीव न झालेल्या खडकात खालील प्रकारचे खडक येतात

डोंगरातील खडकाचा भुगा —मूळ खडकाचा चुरा होऊन वाऱ्यानें व पाण्यानें वाहून पायथ्याशीं साठतो त्यात बहुतेक अणकोचीदार व सुटे निरनिराळ्या आकाराचे तुकडे असतात.

माती अथवा जमीनः—खडकाचा भुगा होऊन त्याच्यापासून माती तयार होते मूळ खनिज पदार्थांतील मूळ द्रव्यें मातींत रूपातरित स्वरूपात असतात खडक व माती यामध्यें एक अधोमृत्तिका अथवा अधोभूमीचा थर ( सबसॉइल ) असतो. खडकाचा अर्धवट भुगा होऊन अधोमृत्तिका होते व तिजपासूनच पुढें माती तयार होते. जमीनीवर उगवणाऱ्या वनस्पतींच्या कुजलेल्या सेंद्रिय पदार्थांचा काहीं अंश मातींत असतो व त्यातीलच थोडा भाग अधोमृत्तिकेंत सापडतो. जसजशी माती वाहून जाते तसतशी अधोमृत्तिकेची माती होते ज्या मूळ खडकापासून माती होते त्याच खडकावर ती सापडते असें नाहीं. कित्येक वेळा ती वहात जाऊन दुसऱ्याच खडकावर आढळते.

वाळू.—वाळूचे कण लहान तर असतातच, परंतु ते कित्येक वेळा इतके बारीक असतात कीं, ते स्पष्ट दिसण्यास सूक्ष्मदर्शक यंत्राचें साहाय्य लागतें वाऱ्याच्या योगानें खडकाचे बारीक कण एकेठिकाणीं साचून त्याच्या लहान लहान टेंकड्या होतात व त्या वाऱ्यानेंच एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेल्या जातात. यामध्ये बारीक व मोठाल्या कणाचे कित्येक वेळा थर असतात. नद्यांच्या व समुद्राच्या पाण्याच्या तडाक्यानें वाळू मोठ्या प्रमाणात तयार होते. समुद्रात तयार झालेली वाळू त्यात सापडणाऱ्या शिंपाच्या कणावरून ओळखता येते. बारीक कण पुष्कळ वेळा घर्षणात न सापडता पाण्यात तरंगत राहतात व त्यामुळें त्याचीं टोंकें घासली न जाता अणकोचीदार राहतात मोठाल्या कणाचीं टोंकें मात्र घासून कणाना वाटोळेपणा येतो. वाळूचे जाड खरबरीत कण असल्यास त्यास रेव ( ग्रॅव्हल ) म्हणावे. परंतु सुपारीपेक्षां मोठे खडे असल्यास त्याना गोटे ( शिंगल ) म्हणावे. वाळूचे जसे थर सागितलेले प्रकार आहेत तसेच वाळूच्या कणाचा एकजीव होऊन झालेल्या कठिण खडकाचे प्रकार आहेत. मोठाले गोटे एकेठिकाणीं साठल्यावर त्याच्यात एखाद्या तऱ्हेचें लुकण बसून कठिण खडक तयार होतो. गोटे साधारणत.

वाटोळे झालेले असतात. वरेनसे गोटे क्वार्ट्झचे असतात. किस्येक गोटे इतर खनिज द्रव्यें किंवा मूळ खडकाचे असतात. अशा तऱ्हेनें तयार झालेल्या खडकाना गोट्याचे खडक ( कॉंग्लोमरेट ) म्हणतात. गोटे सर्व बाजूंनी झिजून वाटोळे झालेले नसले व त्याची टोंकें कोंचदार असली म्हणजे त्या खडकाना ( ब्रेकिआ ) म्हणावें. बारीक कणाचा जो खडक होतो त्यास सिकतादम किंवा वाळूचा खडक म्हणतात. वाळूच्या खडकात बहुतेक क्वार्ट्झचेच कण असतात तरी गोट्याच्या खडकाप्रमाणें यातहि इतर खनिज द्रव्यें असतात; परंतु ही द्रव्यें अगदी थोडक्या प्रमाणांत असतात. वाळूच्या खडकाना पुष्कळ तऱ्हेचे रंग असतात. तांबडा, पिवळा वगैरे रंग लोहाच्या प्राणिदा-( आक्साइड )मुळें वाळूच्या खडकाना येतात. खडकात एखादें विशिष्ट खनिज द्रव्य किंवा त्याचें लुकण असल्यास त्याचें नाव खडकाच्या नांवास जोडतात. उदाहरणार्थः— एखाद्या वाळूच्या खडकांत लोहाचें प्राणिद ( ऑक्साइड ) असल्यास त्याला लोही वाळूचा खडक ( फेरुगिनस सँडस्टोन ) असें म्हणतात व त्यात अभ्रक असल्यास अभ्रकी वाळूचा खडक ( मायकेशिअस सँडस्टोन ) असें म्हणतात. विंध्याद्रीवर व दक्षिणेंत बेळगाव, विजापूर जिल्ह्यात व मद्रास इलाख्यातील कडाप्पा जिल्ह्यांत वाळूचे खडक मोठ्या प्रमाणात सापडतात. इमारती बांधण्यास हे फार चागले व भक्कम असतात. यामुळें उत्तरहिंदुस्थानातील पुष्कळ इमारती या खडकाच्या दगडांच्या बांधल्या आहेत. वाळूच्या खडकाचे फळ्यासारखे तुकडे काढून त्याचा जमीनीवर बसविण्याकरिता उपयोग करितात. त्याचप्रमाणें त्याची जातीं वगैरे जिन्नस करितात. विजापूर जिल्ह्यातील बदामी गांवची प्रसिद्ध लेणीं वाळूच्या खडकात आहेत. गोवळकोंड्याचा पायाचा वाळूच्याच खडकावर आहे. वाळूच्या खडकापासून होणाऱ्या जमीनीस रेताड किंवा वाळूची जमीन म्हणतात.

मातीचे खडक.—निरनिराळ्या खडकाचा विठासारखा भुगा होऊन त्यापासून तयार झालेल्या चिखल, गाळ वगैरेंच्या खडकास मातीचे खडक म्हणतात त्याच्यात पुष्कळ तऱ्हेच्या खनिज द्रव्याची भेसळ असते व त्याचे प्रकारहि पुष्कळ आहेत.

चिकण माती.—हा एक प्रकारचा चिखलच आहे. याच्यावर वाफ सोडली असता त्याला मातीचा वास येतो. त्याच्यात चिकणाई असते व पाण्यात ओला केल्यास चिकट गोळा होतो.

चिनी माती.—फेल्स्पार नावाचा जो खनिज पदार्थ आहे त्याच्यावर पाण्याची व कार्बन डाय-आक्साइडची क्रिया होऊन अॅल्युमिनियम सिलिकेट निराळें निघतें तें पाढऱ्या रंगाचें व भुसभुशीत असतें. चिनीमातीची भांडीं करण्याकडे याचा विशेष उपयोग होतो. हिंदुस्थानांत ज्या ठिकाणीं ग्रॅनाइट खडक आहेत त्या ठिकाणीं अशा तऱ्हेची माती कांहीं ठिकाणीं आढळते. हीच माती अगदीं स्वच्छ पाढरी व लोहविरहित असल्यास त्याला पाइपक्ले ( चिलमीची माती ) म्हणतात. चिनीमातीचा उपयोग उत्तम पाढरी मातीचीं भांडीं करण्याकडे होतो. ही कांहीं ठिकाणीं फेल्स्पारपासूनच तयार झालेली असते. तींत थोडासाच लोहाचा अंश असतो परंतु चुना किंवा अल्कलीचा मुळींच अंश नसतो. या मातीला फायरक्ले ( अग्निमृत्तिका ) म्हणतात. गोंडवनात कोळशाच्या खाणींत फायरक्लेची माती पुष्कळ सापडते. फायरक्लेचा उपयोग भट्या बाधण्याकडे करतात. काचेच्या वगैरे कारखान्यात मातीचीं भांडीं विस्तवावर पुष्कळ तापवावयाचीं असतात म्हणून हीं भांडीं फायरक्लेचीं करतात. उत्तम फायरक्लेमध्यें असलेले पदार्थ त्याच्या शेंकडा प्रमाणासह पुढें दिले आहत. सिलिका ७३.८२; अॅल्युमिना १५.८८; लोहाचें आक्साइड २.९५; पाणी ६.४५, अल्कली ०.९ असून तिचें विशिष्ट गुरुत्व २.५ असतें.

विटाची माती:—विटा करण्यास उपयोगी पडणारी पुष्कळ तऱ्हेची माती सापडते. त्या सर्व प्रकाराना विटाची माती म्हणतात. या मातीचीं मडकीं, रांजण, सुजे वगैरे जिनस करतात. या मातींत लोहाचा अंश बराच असतो. विटाच्या मातीचें साधारण पृथक्करण पुढें दिलें आहे. सीलिका ४९.४४, अॅल्युमिना २४.२६; लोहाचें आॅक्साइड ७.७४; चुना १.४८; मॅग्नेशिआ ५.१४ व पाणी ९.९४.

फुलरची माती.—मध्यप्रांत, राजपुताना वगैरे ठिकाणीं हिरवट रंगाची मऊ माती सांपडते. ती गुळगुळीत असते परतु चिकट नसते. या मातीचा उपयोग अंगाला व कपड्याला साबणाप्रमाणें लावण्याकडे करितात. तिच्यांत शेंकडा सिलिका ५३; अॅल्युमिना १०, लोहाचें आॅक्साइड ९.७५; मॅग्नेशिआ १.२५; लाइम ०.५०; मीठ ०.१० व पाणी २४ असतें.

बॉक्साइट.—यामध्यें शेंकडा ४५ ते ८० भाग अॅल्युमिना, १५भाग पाणी आणि लोहाचें आक्साइड वगैरे असतात. बॉक्साइट कसें होतें या संबंधानें मतभेद आहे. कांहींच्या मतानें उष्णता व पाणी याच्या योगानें जुन्या खडकात फरक होऊन तें झालें असावें असें आहे. इतर कांहीं जणांचें म्हणणें असें आहे कीं ग्रॅनाइट, नीस, बसाल्ट वगैरे खडकावर पाणी व कार्बन डाय-ऑक्साइड यांचा परिणाम होऊन बॉक्साइट झालें असावें. बॉक्साइटपासून अॅल्युमिनियम काढतात किंवा अॅलम (फटकी) तयार करतात. यावर उष्णतेचा फारसा परिणाम होत नसल्यानें भट्टीच्या आंतल्या बाजूनं लेप देण्याकरिता त्याचा उपयोग करितात.

लॅटराइट.—किंवा जाभळा दगड. हा तांबडा, पिवळट किंवा पाढुरक्या रंगाचा छिद्रमय मातीचा दगड असतो. हा बॉक्साइटप्रमाणें ग्रॅनाइट, नीस, डायोराइट, बसाल्ट वगैरे खडकापासून झाला असावा अशी कल्पना आहे. अॅल्युमिना, लोहाचे ऑक्साइड व थोडा ।

उष्ण कटिबंधात दमट हवेंत विशेषत. हा खडक तयार होतो. डेक्कन ट्रॅप म्हणून जो खडक आहे त्यावर हा पुष्कळ ठिकाणीं सापडतो. हा प्रथम खणून काढला म्हणजे ओलसर व मऊ असतो परंतु कांहीं दिवस हवेंत राहिला की कठीण होतो. घरें बांधण्याकडे याचा पुष्कळ उपयोग करितात. मुंबई इलाख्यात बेळगाव, रत्नागिरी, कुलाबा व कारवार जिल्ह्यात लॅटराइट पुष्कळ सापडतो

मातीचा दगड—माती घट्ट होऊन दगडासारखी झाली म्हणजे मातीचा दगड होतो.

शेल —ज्याप्रमाणें वाळूचे कण एके ठिकाणीं दाबले जाऊन वाळल्यावर त्यापासून वाळूचे खडक होतात त्याचप्रमाणें अगदीं बारीक कण एकेठिकाणीं दाबले जाऊन त्यापासून जो खडक होतो त्याला शेल असें म्हणतात. शेलचे नेहमीं थर असतात थरातील पातळ पापुद्रे सुटे निघतात. मातीच्या दगडासारखा एकच गोळा नसतो निरनिराळ्या थराचे तांबडा, पादरा, पिवळा वगैरे कोणतेहि रंग असूं शकतात. अगदीं तांबडा रंग असल्यास त्यास काव व पिवळा रंग असल्यास पिवडी म्हणतात. भिंती, पत्रे वगैरेंना रंग देण्याकडे याचा चांगला उपयोग होतो

ज्वालामुखींतून निघालेल्या तुकड्याचे व गाळाचे खडक —ज्वालामुखींतून खडकाचा रस वर येऊन त्यापासून होणारे खडक अग्निजन्य असतात व म्हणून ते त्या वर्गात जातात परंतु रस बाहेर येण्यापूर्वी खडकाचे गोळे, तुकडे, बारीक कण व राखेसारखी भुकटी जोरानें वर उडून खालीं पडल्यावर त्याचे खडक बनतात ते गाळाच्या खडकाच्या वर्गात येतात. ज्वालामुखीच्या धक्क्याच्या योगानें जमिनीवरील खडकाचे तुकडे होऊन पुन्हा खडक बनतात. ते ज्वालामुखींतून बाहेर आलेल्या तुकड्याच्या खडकासारखेच दिसतात. परंतु बारकाईनें तपासणी केल्यास त्याचा उगम कळण्यास कठीण पडत नाहीं ज्वालामुखींच्या तोंडातून वर आलेले तुकडे सुटे असले म्हणजे त्याच्या आकारावरून त्यांना जीं निरनिराळीं नावें दिलेलीं आहेत त्यांचे वर्णन ज्वालामुखी या सदराखालीं दिलेलें आहे. या ठिकाणीं तुकडे एके ठिकाणीं येऊन त्याचे जे खडक तयार होतात त्याचा निर्देश केला आहे कित्येक वेळा ज्वालामुखींतून निघालेले तुकडे समुद्रात किंवा सरोवरात पडतात त्या ठिकाणीं नदींतून वाहून आलेल्या तुकड्याचे या तुकड्यात मिश्रण होतें जलजन्य खडकांना त्यातील तुकड्याच्या आकारावरून काम्लॉमरेट, ब्रेशिआ वगैरे संज्ञा दिलेल्या आहेत, त्याच संज्ञा ज्वालामुखींतून बाहेर आलेल्या तुकड्यापासून तयार झालेल्या खडकांना त्यांतील तुकड्याच्या आकारमानावरून देतात

सजीव पदार्थांपासून झालेले खडक.—या सदराखालीं वनस्पती, प्राणी यांची वाढ होऊन ते नष्ट झाल्यावर जागच्याजागीं तयार झालेले खडक किंवा ते वाहून एके ठिकाणीं साठवल्यावर झालेले खडक येतात त्यांचे वर्गीकरण त्याच्यांत जें विशिष्ट द्रव्य असेल त्यावरून करतात. ते वर्ग येणेंप्रमाणें:-(१)चुन्याचे अथवा कॅलकेरियस (२) सिकयुक्त अ. सिलीशियस (३) स्फुरयुक्त उर्फ फॉस्फॅटिक (४) कर्बयुक्त उर्फ कार्बोनेशियस. आणि (५) लोहयुक्त.

त्यामध्यें कॅलशिअम फास्फेट बऱ्याच प्रमाणांत असतो दक्षिण अमेरिकेंत व आफ्रिकेंत ग्वानो नांवाचा एक पदार्थ सांपडतो. हा पदार्थ समुद्रपक्ष्यांची विष्ठा, मृत शरीरें, त्यांनीं खाद्य म्हणून आणलेले मासे वगैरे साठून झालेला असतो. ज्या ठिकाणीं पाऊस नाहीं अशाच ठिकाणीं हा साठतो. हें उत्तम खत आहे व त्याप्रमाणेंच त्याचा पुष्कळ उपयोग होतो. पूर्वकालीन प्राण्यांची हाडें पुरलीं जाऊन त्याचाहि स्फुरयुक्त (फॉस्फॅटिक) खडक होतो त्याचप्रमाणें पूर्वकालीन प्राण्यांची विष्ठा पुरली जाऊन त्याचेहि खडक होतात.

(४) कर्बयुक्त अथवा कार्बोनेशियस खडक— वनस्पती वाहून जाऊन एके ठिकाणीं साठल्यावर पुरल्या जाऊन, किंवा वनस्पती उगवून, जागीं वाळून वगैरे पुरल्या जाऊन त्यांचे जे खडक होतात ते सर्व या वर्गांत येतात दगडी कोळसे अशाच प्रकारानें तयार झालेले आहेत

पीट—दलदलीच्या जागीं, उथळ पाण्यांत वनस्पती वाहून गेल्यावर कुजतात व त्याचेवर पुन्हा वनस्पती उगवत राहतात यामुळें कुजलेल्या वनस्पतींचे मोठाले थर होतात. याला पीट म्हणतात दलदलीच्या प्रदेशांत पुष्कळ ठिकाणीं हा पीट सांपडतो पीट ज्या ठिकाणीं सांपडतो त्या ठिकाणीं वाळवून जाळण्याकडे त्याचा उपयोग करितात पूर्वी अशाच तऱ्हेचा पीट पुरला जाऊन त्यापासून दगडी कोळशाचे निरनिराळे प्रकार तयार झालेले आहेत

लिग्नाइट— पीट दावला जाऊन त्यापासूनच पुढें लिग्नाइट तयार होतो लिग्नाइट ही पीट व दगडी कोळसा याच्या मधली स्थिति आहे कारण लिग्नाइटमध्यें बदल होऊन त्याचाच दगडी कोळसा तयार होतो. लिग्नाइटचा रंग पिंवळट, तपकिरी किंवा काळा असतो त्याचें विशिष्टगुरुत्व ०.५ ते १.५ असतें व त्याच्यांत शेंकडा ५५ ते ७५ कार्बन असतो लिग्नाइट भुरभुर जळतो व यांतून पुष्कळ धूर निघून त्याचा जळकट किंवा धुरकट वास येतो.

दगडी कोळसा— याचा रंग काळा किंवा काळ्याचा एखादा प्रकार असतो कोळशांत शेंकडा ७५ ते ९० कार्बन, ३ ते २० ऑक्सिजन, ०.५ ते ५.५ हैड्रोजन, २.५ पर्यंत नैट्रोजन आणि १ ते २० पर्यंत राख असते हा कोळसा चांगला जळतो व जळतांना त्याला एक प्रकारचा वास येतो दगडी कोळशाचे पुष्कळ प्रकार आहेत मूळ वनस्पती निरनिराळ्या प्रकारच्या असल्यास असे प्रकार होणें साहजिक आहे वाळूचे खडक, व यांत शेलवगैरे खडकांचे थर कोळशाचे थर सांपडतात.

ॲन्थ्रासाइट—अति दाबाखालीं कठीण झालेला असा हा दगडी कोळशाचाच प्रकार आहे. हा लवकर जळत नाहीं व जळत असतांना त्यांतून ज्वाला किंवा धूर निघत नाहीं व त्याला कोणत्याहि प्रकारचा विशिष्ट वास येत नाहीं. याचा रंग अगदीं काळा कुळकुळीत असून काचेप्रमाणें चकाकतो त्याच्यांत शेंकडा ९० कार्बन असतो व त्याचें विशिष्ट गुरुत्व १.३५ ते १.७ असतें

ऑइल शेल—ज्या शेल खडकांतून राकेल तेल काढतां येतें त्यांना ऑइल शेल म्हणतात या शेलचे थरच असतात आणि चांगला शेल असल्यास त्यांतून एका टनांतून ३० ते ४० गॅलन राकेल पूर्वीच्या वनस्पति व कांहीं प्राणी शेलमध्यें पुरले जाऊन दाबाखालीं कुजून त्याच्यापासून हें तेल तयार होतें शेलचें ऊर्ध्वपातन केल्यास तेल निघतें

पेट्रोलियम—या सदराखालीं सर्व तऱ्हेचीं खनिज तेलें येतात हीं खडकांतून सांपडतात प्रथमतः तीं एके ठिकाणीं मिसळलेलीं असतात परंतु उर्ध्वपातनानें तीं वेगळालीं करितात.

अँबर—हें खडकांत पुरल्या गेलेल्या जुन्या झाडांतील राळेपासून होतें

(५) लोहमिश्रित माती—दलदलीच्या जागीं कुजत असलेल्या वनस्पतींच्यापासून आम्लें निघतात त्याचा व कर्बाम्लाचा (कार्बोनिक ॲसिड) आसपासच्या खडकांतील लोहावर परिणाम होऊन लोहाचे क्षार व ऑक्साइड यांचें मिश्रण होऊन साठतें यांत पुढें माती मिसळली जाते व त्याचप्रमाणें वनस्पतीचे अंश मिसळले जातात या सर्वांच्या मिश्रणानें तयार झालेले थर लोहमिश्रित माती या सदराखालीं येतात

रासायनिक क्रियेनें तयार झालेले स्फटिकमय खडक—पाण्याच्या साहाय्यानें होणाऱ्या खडकाचें वर्णन वर दिलें आहे ते खडक वाहून आलेल्या गाळापासून झालेले असतात परंतु याशिवाय पाण्यांत विरघळलेल्या पदार्थांची एकमेकावर रासायनिक क्रिया होऊन त्यांचे थर तयार होतात हे पदार्थ बहुतेक स्फटिकमय असतात अशा प्रकारें तयार झालेल्या पदार्थांत विशेष महत्वाचे म्हणजे सैंधव, पापडखार, चुन्याचे दगड, जिप्सम व इतर खार हे होत

(आ) अग्निजन्य-स्फोटित-थररहित खडक—या वर्गांतील खडक पृथ्वीच्या उदरांतील खडकांच्या रसापासून झालेले आहेत खडकांचें रासायनिक पृथक्करण, त्यांतील खनिज द्रव्यें, त्यांची घटना, उत्पत्तीची पद्धति, ठिकाण व वय वगैरे वरून या खडकांचें वर्गीकरण निरनिराळ्या तऱ्हेनें करतां येण्यासारखें आहे परंतु यापैकीं कोणत्याहि एका गोष्टीकडे लक्ष देऊन वर्गीकरण केल्यास त्याचा विशेष उपयोग नाहीं म्हणून यापैकीं जितक्या गोष्टी एके ठिकाणीं आणतां येतील तितक्या आणून केलेलें वर्गीकरण खालीं दिलें आहे त्यामध्यें अग्निजन्य खडकांतील खनिजद्रव्यें व त्यांचें रासायनिक पृथक्करण या गोष्टींवरून पोटभाग पाडले आहेत अग्निजन्य खडकांत दोन किंवा अधिक खनिज द्रव्यें असतात त्यामध्यें स्फटिक (ॲल्युमिना), भस्म (मॅग्नेशिआ), चुना (लाइम), पालाश (पोटॅश) व सिंधू (सोडा) यांचें सिलिकेट, मस्त्रलोह (मॅग्नेटिक आयर्न) व (चुन्याचें स्फुरित)

उष्ण कटिबंधात दमट हवेंत विशेषत: हा खडक तयार होतो. डेकन ट्रॅप म्हणून जो खडक आहे त्यावर हा पुष्कळ ठिकाणीं सापडतो. हा प्रथम खणून काढला म्हणजे ओलसर व मऊ असतो परंतु कांहीं दिवस हवेंत राहिला की कठीण होतो. घरें बांधण्याकडे याचा पुष्कळ उपयोग करितात मुंबई इलाख्यात बेळगाव, रत्नागिरी, कुलाबा व कारवार जिल्ह्यात लॅटराइट पुष्कळ सापडतो

मातीचा दगड—माती घट्ट होऊन दगडासारखी झाली म्हणजे मातीचा दगड होतो

शेल —ज्याप्रमाणें वाळूचे कण एके ठिकाणीं दाबले जाऊन वाळल्यावर त्यापासून वाळूचे खडक होतात त्याच-प्रमाणें अगदीं बारीक कण एकेठिकाणीं दाबले जाऊन त्यापासून जो खडक होतो त्याला शेल असें म्हणतात शेलचे नेहमीं थर असतात थरातील पातळ पापुद्रे सुटे निघतात. मातीच्या दगडासारखा एकच गोळा नसतो निरनिराळ्या थराचे तांबडा, पांढरा, पिवळा वगैरे कोणतेहि रंग असूं शकतात अगदीं तांबडा रंग असल्यास त्यास काव व पिवळा रंग असल्यास पिवडी म्हणतात. भिंती, पत्रे वगैरेंना रंग देण्याकडे यांचा चांगला उपयोग होतो

ज्वालामुखींतून निघालेल्या तुकड्यांचे व गाळाचे खडक. —ज्वालामुखींतून खडकाचा रस वर येऊन त्यापासून होणारे खडक अग्निजन्य असतात व म्हणून ते त्या वर्गांत जातात परंतु रस बाहेर येण्यापूर्वी खडकाचे गोळे, तुकडे, बारीक कण व राखेसारखी भुकटी जोरानें वर उडून खालीं पडल्यावर त्यांचे खडक बनतात ते गाळाच्या खडकाच्या वर्गात येतात. ज्वालामुखीच्या धक्क्याच्या योगानें जमिनीवरील खडकाचे तुकडे होऊन पुन्हा खडक बनतात. ते ज्वालामुखींतून बाहेर आलेल्या तुकड्याच्या खडकासारखेच दिसतात. परंतु बारकाईनें तपासणी केल्यास त्याचा उगम कळण्यास कठीण पडत नाहीं ज्वालामुखींच्या तोंडातून वर आलेले तुकडे मुटे असले म्हणजे त्यांच्या आकारावरून त्यांना जीं निरनिराळीं नावें दिलेलीं आहेत त्यांचें वर्णन ज्वालामुखी या सदराखालीं दिलेलें आहे. या ठिकाणीं तुकडे एके ठिकाणीं येऊन त्यांचे जे खडक तयार होतात त्याचा निर्देश केला आहे कित्येक वेळा ज्वालामुखींतून निघालेले तुकडे समुद्रात किंवा सरोवरात पडतात त्या ठिकाणीं नदींतून वाहून आलेल्या तुकड्यांचे या तुकड्यांत मिश्रण होतें. जलजन्य खडकांना त्यांतील तुकड्याच्या आकारावरून काग्लॉमरेट, ब्रेशिआ वगैरे संज्ञा दिलेल्या आहेत, त्याच संज्ञा ज्वालामुखींतून बाहेर आलेल्या तुकड्यापासून तयार झालेल्या खडकाना त्यांतील तुकड्यांच्या आकारमानावरून देतात

सजीव पदार्थांपासून झालेले खडक.—या सदराखालीं वनस्पती, प्राणी यांची वाढ होऊन ते नष्ट झाल्यावर जागच्याजागीं तयार झालेले खडक किंवा ते वाहून जाऊन एके ठिकाणीं साठल्यावर झालेले खडक येतात त्याचें वर्गीकरण त्याच्यांत जें विशिष्ट द्रव्य असेल त्यावरून करतात. ते वर्ग येणेंप्रमाणें:-(१)चुन्याचे अथवा कॅल्केरियस (२) सिकयुक्त अ सिलीशियस (३) स्फुरयुक्त उर्फ फॉस्फॅटिक (४) कर्बयुक्त उर्फ कार्बोनेशियस. आणि (५) लोहयुक्त.

(१)चुन्याचे खडक.—हे दोन तऱ्हेनें तयार होतात. जुन्या खडकांत असलेला चुन्याचा अंश पाण्यानें वाहून जाऊन एके ठिकाणीं साठला म्हणजे चुन्याचा खडक होतो याबद्दलची विशेष माहिती दुसरीकडे दिली आहे. पुष्कळ चुन्याचे खडक सजीव पदार्थांपासून झालेले आहेत. सजीव पदार्थांपासून झालेले चुन्याचे खडक कित्येक वेळा स्फटिकमय होतात त्याची सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें नीट तपासणी केल्याखेरीज ते इतर चुन्याच्या खडकापासून निराळे असे ओळखता येत नाहींत सजीव पदार्थांपासून झालेले चुन्याचे खडक जेथें तयार होतात ते त्या ठिकाणीं सांठतात किंवा वाहून जाऊन दुसरीकडे साठतात चुन्याच्या खडकात बहुतेक सर्व खटकर्बित (कॅलशियम कार्बोनेट) असतो तो उदहराम्लात (हायड्रोक्लोरिक ॲसिड) विरघळतो व त्यात वाळू, माती वगैरे असल्यास न विरघळल्यानें वगळे होतात. थोड्या प्रमाणात मग्नकर्बित (मॅग्नेशियम कार्बोनेट) हि सापडतो हे खडक कठिण व भक्कम असतात किंवा अगदीं ठिसूळहि असतात. याचें काठिण्य ३ व विशिष्टगुरुत्व २.५ ते २.८ पर्यंत असतें. याचे रंग निरनिराळ्या तऱ्हेचे असून ते अगदीं पातळ थरापासून तों कित्येक यार्ड उंचीच्या ढिगापर्यंत आढळतात. फोरॅमिनीफेरा जातीच्या बारीक प्राण्याच्या शरीरापासून झालेल्या चुन्याच्या खडकाचे थर अटलांटिक वगैरे महासागराच्या तळाशीं पुष्कळ सापडतात ज्याला आपण खडू म्हणतो त्या प्रकारचा खडक या व अशाच तऱ्हेच्या बारीक प्राण्याच्या शरीराचे ढीग साठून झालेला असतो. उष्णकटिबंधांतील समुद्राच्या उथळ पाण्यात प्रवाळ नामक प्राण्याची पुष्कळ वाढ होते त्या तें राहण्याची घरें कॅलशियम कार्बोनेटचीं असतात व या घराची वाढ येवढी होते कीं, त्याचीं मोठमोठालीं बेटें हिंदीमहासागरांत पुष्कळ आहेत

(२) सिकयुक्त अथवा सिलिकाचे खडक.—पाण्यात थोड्या प्रमाणात शिलीका असतात ते कांहीं सूक्ष्म वनस्पती व प्राणी यांचें शोषण करून आपलीं शरीरें तयार करतात ते मेले म्हणजे त्याच्या मृत शरीराचे थर साठतात व त्यापासून खडक तयार होतात ट्रिपोलीची पूड झिलई-करिता व स्फोटक द्रव्यें करण्याकरिता उपयोग करतात ही ट्रिपोलीची पूड समुद्रात किंवा सरोवरात साठलेल्या एक प्रकारच्या सिलीकाच्या खडकापासून तयार केलेली असते

(३)फॉस्फॅटिक खडक—बहुतेक प्राण्याच्या शरीरात खटस्फुरित (कॅलशीयम फास्फेट) असतो कित्येक प्राण्याचीं शरीरें जुन्या खडकात पुरलीं जाऊन त्याचे खडक बनलेले आहेत.

त्यामध्यें कॅलशिअम फास्फेट बऱ्याच प्रमाणात असतो दक्षिण अमेरिकेंत व आफ्रिकेंत ग्वानो नावाचा एक पदार्थ सापडतो. हा पदार्थ समुद्रपक्ष्याची विष्ठा, मृत शरीरें, त्यानीं खाद्य म्हणून आणलेले मासे वगैरे साठून झालेला असतो ज्या ठिकाणीं पाऊस नाहीं अशाच ठिकाणीं हा साठतो हें उत्तम खत आहे व त्याप्रमाणेंच त्याचा पुष्कळ उपयोग होतो. पूर्व कालीन प्राण्याचीं हाडें पुरलीं जाऊन त्याचाहि स्फुरयुक्त ( फॉस्फॅटिक ) खडक होतो त्याचप्रमाणें पूर्वकालीन प्राण्याची विष्ठा पुरली जाऊन त्याचेंहि खडक होतात

( ४ ) कर्बयुक्त अथवा कार्बोनेशियस खडक— वनस्पती वाहून जाऊन एके ठिकाणीं साठल्यावर पुरल्या जाऊन, किंवा वनस्पति उगवल्या जागीं वाळून वगैरे पुरल्या जाऊन त्याचे जे खडक होतात ते सर्व या वर्गांत येतात दगडी कोळसे अशाच प्रकारानें तयार झालेले आहेत

पीट—दलदलीच्या जागीं, उथळ पाण्यात वनस्पती वाहून गेल्यावर कुजतात व त्यांचेवर पुन्हा वनस्पती उगवत राहतात यामुळें कुजलेल्या वनस्पतींचे मोठाले थर होतात याना पीट म्हणतात दलदलींच्या प्रदेशात पुष्कळ ठिकाणीं हा पीट सापडतो पीट ज्या ठिकाणीं सापडतो त्या ठिकाणीं वाळवून जाळण्याकडे त्याचा उपयोग करितात पूर्वी अशाच तऱ्हेचा पीट पुरला जाऊन त्यापासून दगडी कोळशाचे निरनिराळे प्रकार तयार झालेले आहेत

लिग्नाइट— पीट दावला जाऊन त्यापासूनच पुढें लिग्नाइट तयार होतो लिग्नाइट ही पीट व दगडी कोळसा याच्या मधली स्थिति आहे कारण लिग्नाइटमध्यें बदल होऊन त्याचाच दगडी कोळसा तयार होतो लिग्नाइटचा रंग पिवळट, तपकिरी किंवा काळा असतो त्याचें विशिष्टगुरुत्व ०.५ ते १.५ असते व त्याच्यात शेंकडा ५५ ते ७० कार्बन असतो लिग्नाइट भुरभुर जळतो व यातून पुष्कळ धूर निघून त्याचा जळकट किंवा धुरकट वास येतो

दगडी कोळसा— याचा रंग काळा किंवा काळ्याचा एखादा प्रकार असतो कोळशात शेंकडा ७१ ते ९० कार्बन, ३ ते २० ऑक्सिजन, ०.८ ते ५.५ हैड्रोजन, २.५ पर्यंत नैट्रोजन आणि १ ते २० पर्यंत राख असते हा कोळसा चांगला जळतो व जळताना त्याला एक प्रकारचा वास येतो दगडी कोळशाचे पुष्कळ प्रकार आहेत मूळ वनस्पती निरनिराळ्या प्रकारच्या असल्यास असे प्रकार होणें साहजिक आहे वाळूचे खडक, व यात शेलवगैरे खडकाचे थर कोळशाचे थर सापडतात

ॲंथ्रसाइट—अति दाबाखालीं कठीण झालेला असा हा दगडी कोळशाचाच प्रकार आहे हा लवकर जळत नाहीं व जळत असताना त्यांतून ज्वाला किंवा धूर निघत नाहीं व त्याला कोणत्याहि प्रकारचा विशिष्ट वास येत नाहीं. त्याचा रंग अगदीं काळा कुळकुळीत असून काचेमारखा चकाकतो त्याच्यात शेंकडा ९० कार्बन असतो व त्याचें विशिष्ट गुरुत्व १.३५ ते १.७ असतें

ऑइल शेल—ज्या शेल खडकातून राकेल तेल काढता येते त्यांना ऑइल शेल म्हणतात या शेलचे थरच असतात आणि चांगला शेल असल्यास त्यातून एका टनातून ३० ते ४० गॅलन राकेल पूर्वीच्या वनस्पति व काहीं प्राणी शेलमध्यें पुरले जाऊन दाबाखालीं कुजून त्याच्यापासून हें तेल तयार होतें शेलचें ऊर्ध्वपातन केल्यास तेल निघतें

पेट्रोलियम—या सदराखालीं सर्व तऱ्हेची खनिज तेलें येतात हीं खडकातून सापडतात प्रथमत तीं एके ठिकाणीं मिसळलेलीं असतात, परंतु ऊर्ध्वपातनानें तीं वेगळालीं करितात

अँबर—हें खडकात पुरल्या गेलेल्या जुन्या झाडातील राळेपासून होतें

( ५ )लोहमिश्रित माती—दलदलीच्या जागीं कुजत असलेल्या वनस्पतींच्यापासून आम्लें निघतात त्याचा व कर्बाम्लाचा (कार्बोनिक ॲसिड ) आरूपासच्या खडकातील लोहावर परिणाम होऊन लोहाचे क्षार व ऑक्साइड यांचें मिश्रण होऊन साठतें यात पुढें माती मिसळली जातें व त्याचप्रमाणें वनस्पतींचे अंश मिसळले जातात या सर्वांच्या मिश्रणानें तयार झालेले थर लोहमिश्रित माती या सदराखालीं येतात

रासायनिक क्रियेनें तयार झालेले स्फटिकमय खडक —पाण्याच्या साहाय्यानें होणाऱ्या खडकाचें वर्णन वर दिलें आहे ते खडक वाहून आलेल्या गाळापासून झालेले असतात परंतु याशिवाय पाण्यात विरघळलेल्या पदार्थांची एकमेकावर रासायनिक क्रिया होऊन त्याचे थर तयार होतात हे पदार्थ बहुतेक स्फटिकमय असतात अशा प्रकारें तयार झालेल्या पदार्थांत विशेष महत्वाचे म्हणजे सधव, पापडखार, चुन्याचे दगड, जिप्सम व इतर खार हे होत

( आ ) अग्निजन्य-स्फोटित-थररहित खडक —या वर्गांतील खडक पृथ्वीच्या उदरातील खडकाच्या रसापासून झालेले आहेत खडकाचें रासायनिक पृथक्करण, त्यातील खनिज द्रव्यें, त्याची घटना, उत्पत्तीची पद्धति, ठिकाण व वय वगैरे वरून या खडकाचें वर्गीकरण निरनिराळ्या तऱ्हेनं करता येण्यासारखें आहे परंतु यापैकीं कोणत्याहि एका गोष्टीकडे लक्ष देऊन वर्गीकरण केल्यास त्याचा विशेष उपयोग नाहीं म्हणून यापैकीं जितक्या गोष्टी एके ठिकाणीं आणता येतील तितक्या आणून केलेलें वर्गीकरण खालीं दिलें आहे त्यामध्यें अग्निजन्य खडकातील खनिजद्रव्यें व त्याचें रासायनिक पृथक्करण या गोष्टींवरून पोटभाग पाडले आहेत अग्निजन्य खडकात दोन किंवा अधिक खनिज द्रव्यें असतात त्यामध्यें स्फटिक ( ॲल्युमिना ), मग्न( मॅग्नेशिआ ), चुना ( लाइम ), पालाश ( पोटॅश ) व सिंधू ( सोडा )याचे सिलिकेट, मग्नलोह ( मॅग्नेटिक आयर्न ) व ( चुन्याचें स्फुरित)

(लाइमचें फॉस्फेट) असतात काहीं खडकांत सिकाम्ल (सिलिसिक ॲसिड) दृतकें असतें कीं त्यामध्यें मोकळा कार्टस् सांपडतो त्याचप्रमाणें ज्या खडकात आर्थोक्लेज फेल्स्पार सापडतो त्यात प्लॅजिओक्लेज फेल्स्पार सांपडणाऱ्या खडकापेक्षा अधिक सिकाम्ल (सिलिसिक ॲसिड) सापडतें अग्निजन्य खडकाचे पांच भाग आहेत ते असे:— (१) आम्लयुक्त (ॲसिड) खडक–यात सिकाम्लाचें (सिलिसिक ॲसिडचें) प्रमाण शेंकडा ६५ते ८० असतें व त्यातील मुख्य खनिज द्रव्यें आर्थोक्लेज फेल्स्पार, मायका (अभ्रक) व कार्टस हीं असतात. (२) उपाम्ल (सबॲसिड) खडक- यात सिलिसिक ॲसिडचें प्रमाण शें ६० ते ६५ असते. आर्थोक्लेज फेल्स्पार व हार्नब्लेंड हीं मुख्य द्रव्यें त्यात असतात (३) उपअनाम्ल (सब बेसिक) खडक–यात शेंकडा ५५ ते ६० सिलिसिक ॲसिड व प्लॅजिओक्लेज फेल्स्पार, आणि हार्नब्लेंड ही खनिज द्रव्यें असतात (४) अनाम्ल (बेसिक) खडक यात शेंकडा ४५ ते ५५ सिलिसिक ॲसिड व प्लॅजिओक्लेज फेल्स्पार, पायरॉक्झीन, मॅग्नेटाइट आणि ऑलिव्हिन हीं खनिज द्रव्यें असतात (५) अति अनाम्ल (अल्ट्राबेसिक) खडक–यात शेंकडा ४५ पेक्षा कमी सिलिसिक, ॲसिड ऑलिव्हाइन आणि पायराक्झीन हीं खनिज द्रव्यें असतात

(१) पहिल्या पोटभागात ग्रनाइट व ऱ्हयोलाइट जातीचे खडक येतात ग्रनाइट जातीचे खडकात आर्थोक्लेज फेल्स्पार, कार्टस व मायका हीं द्रव्यें असतात मायकाच्या ऐवजीं कित्येक वेळा हार्नब्लेंड असतें ग्रनाइटमध्यें टोपॅझ टुरमलिन, गार्नेट वगैरे दुय्यम खनिज द्रव्यें सांपडतात ग्रनाइटमध्यें फेल्स्पारचे मोठाले स्फटिक असून बाकीचे लहान स्फटिक असल्यास त्याला पारफिरिटिक ग्रनाइट म्हणतात सर्वच स्फटिक अगदीं लहान असल्यास त्याला मायक्रोग्रनाइट म्हणतात. ग्रनाइट खडक फार जुने आहेत परंतु कित्येक तृतीयावस्थाक (टरशरी) वगैरे युगात बाहेर आलेल्या खडकाच्या रसापासून तयार झालेले आहेत ग्रनाइट दुसऱ्या खडकात घुसून बॉस, डाइक, व्हेन वगैरे प्रकारानें सापडतो. ऱ्हायोलाइट जातीचे खडक ज्वालामुखींतून बाहेर आलेल्या रसापासून झालेले असतात या जातीच्या खडकातच ऑबसीडियन अथवा डोंगरी काच व पिच स्टोन म्हणजे राळे सारखा दिसणारा दगड वगैरे खडक सापडतात.

(२) दुसऱ्या पोटभागात सेनाइट व त्याचे पोटवर्ग आणि ट्रकाइट खडक येतात सेनाइटमध्यें आर्थोक्लेज, फेल्स्पार व हार्नब्लेंड बहुतेक असतात परंतु कित्येक वेळा हार्नब्लेंडच्या ऐवजीं मायका किंवा कुचित प्रसंगीं दुसरा एखादा खनिज पदार्थ सापडतो. ट्रकाइटमध्यें सेनाइटचेच खनिज पदार्थ सापडतात. परंतु यामध्यें स्फटिक चागले तयार झालेले नसतात व खडक हाताला खरखरीत लागतात.

(३) तिसऱ्या पोटभागात डायोराइट ॲंडेसाइट वगैरे खडक येतात. त्यात प्लॅजिओक्लेज फेल्स्पार व हार्नब्लेंड हीं खनिजद्रव्यें असतात कित्येक डायोराइटमध्यें मायका किंवा कार्टस् हीं द्रव्यें सापडतात. ॲंडेसाइट दिसण्यास ट्रकाइट सारखाच असतो त्यात पुष्कळ वेळा मायका, एन्स्टटाइट, ऑगाइट, कार्टस् वगैरे द्रव्यें आढळतात

(४) चवथ्या पोटभागात गॅब्रो, डॉलिराइट वगैरे खडक व त्याच्याच पोटजाती येतात. या खडकात, प्लॅजिओक्लेज फेल्स्पार, पायरॉक्झीन व मॅग्नेटाइट आणि कित्येक वेळां ऑलिव्हाइन हीं खनिज द्रव्यें असतात बेसॉल्ट, टॅचिलाइट, डायाबेस्, ग्रीनस्टोन वगैरे खडक याच पोटभागात येतात व ते डॉलिराइटचेच प्रकार आहेत असें म्हटल्यास हरकत नाहीं

वरील चार पोटभागात दिलेल्या खडकाखेरीज ऑलिव्हाइन, ऑगाइट वगैरे खनिज द्रव्य असलेले पेरिडोटाइट, पिक्राइट, सर्पेटाइन, फोनोलाइट इत्यादि खडक अग्निजन्य खडकाच्या वर्गांत येतात

(६) रूपातरित खडक —मूळ जलजन्य किंवा अग्निजन्य खडक असून कोणत्याहि कारणानें त्यात फरक होऊन जे नवीन खडक होतात त्याना रूपातरित खडक असें म्हणतात पाण्याच्या योगानें मूळ खडक पुष्कळ वेळा बदलतो. वाळूच्या खडकावरून पाणी वहात राहिल्यास वाळूचे कण एके टिकाणीं घट्ट बाधले जातील असे पदार्थ साठले जाऊन वाळूचा खडक फार कठिण होतो तेव्हा त्याला कार्टझाइट म्हणतात. उष्णतेनें सुद्धा मूळ खडकात फरक पडतो. उदाहरणार्थ चुन्याच्या खडकावर किंवा शेजारी ज्वालामुखीचा रस पसरल्यास मूळच्या चुन्याच्या खडकाचा संगमरवरी खडक होतो त्याचप्रमाणें पृथ्वीच्या कवचाच्या हालचालींनें खडक दाबले जाऊन मूळ शेल खडक असल्यास त्याचा स्लेट खडक तयार होणें वगैरे फरक होतात शिस्ट नावाचे खडक असतात त्यातील खनिजद्रव्यें स्फटिकमय असतात परंतु अग्निजन्य खडकात व या खडकात पुष्कळ फरक आहे. शिस्ट खडकातील स्फटिक चपटे झालेले असतात ते पानाप्रमाणें मध्यें जाड व कडेला पातळ असतात. प्रत्येक स्फटिकाचा पातळ भाग दुसऱ्या दोन स्फटिकाच्या पातळ भागात चिपेसरखा असतो. या मांडणीमुळें शिस्ट जलजन्य खडकाप्रमाणें थरमय दिसतो दोन्ही तऱ्हेच्या खडकाच्या थरात पुष्कळच फरक असतो. जलजन्य खडकाचे थर लांबपर्यंत स्पष्ट असे सापडतात परंतु रूपातरित खडकाचे थर तुटक असतात व कित्येक वेळा स्फटिकाच्या चपटेपणामुळेंच ते थरमय आहेत असें वाटतें. रूपातरित खडक स्फटिकमय असल्यानें त्याच्यात व अग्निजन्य खडकात थोडेसें साम्य आहे, त्याचप्रमाणें ते थरमय असल्यामुळें त्याच्यात व जलजन्य खडकांत थोडेसें साम्य आहे. हे खडक मूळ कशा प्रकारचे होते हें सागणें कठिण असतें. त्याचप्रमाणें सगळा खडक सारख्या प्रमाणात स्फटिकमय

न थरमय नसतो. ज्या ठिकाणीं थर अगदीं संदिग्ध रीतीनें दिसतात व स्फटिक फार चपटे झालेले नसतात त्या खडकाला शिस्टच्या ऐवजीं नीस संज्ञा वापरतात. रूपांतरित वर्गांतील महत्वाच्या खडकाची पुढें माहिती दिली आहे.

स्लेट अथवा पाटीचा दगड.—मूळ मातीचे जे खडक असतात ते दाबले जाऊन त्याचे कठिण, पातळ व सुटे थर तयार होतात त्यावेळीं त्याला पाटीचा दगड म्हणतात. दाबल्यामुळें झालेले थर मूळ थराच्या अनुरोधानेंच होतात असें नाहीं तर बरेच वेळा त्याच्या लंबरेषेंत होतात. मूळ मातीचेच खडक असल्यानें त्यामध्यें स्फटिक बहुधा नसतात. परंतु कित्येक वेळां अगदीं लहान व पातळ अभ्रकाचे तुकडे किंवा इतर कांहीं खनिज द्रव्याचे स्फटिक सापडतात हे खडक फार दाबले जाऊन शिस्टसारखे झाल्यास त्याना 'मातीचे शिस्ट,' 'फायलाइट, वगैरे नावें देतात. कायास्टो-लाइट वगैरे द्रव्यें खडकात असल्यास 'कायास्टोलाइट स्लेट वगैरे नावें खडकाना देतात. धारवाड, बेळगाव व विजापूर जिल्ह्यात निरनिराळ्या तऱ्हेचे पुष्कळ स्लेट सापडतात.

क्वार्टझाइट.—मूळ वाळूचे जे खडक असतात त्यापासून क्वार्टझाइट खडक तयार होतो मूळ खडकावरून व खडकातून पाणी वाहताना पाण्यातील चुन्याचा, लोहाच्या आक्साइडचा किंवा सिलिकाचा भाग वाळूच्या कणात बसून त्याचें लुकण तयार होतें व त्यामुळें खडक फार कठीण होतो तेव्हा त्याला क्वार्टझाइट म्हणतात आसपास खडकाच्या रसाचे प्रवाह येऊन वाळूचे कण अर्धवट वितळतात व पुन्हा निवाल्यावर त्यापासून जो खडक होतो तो मूळ वाळूच्या खडकापेक्षा फार कठिण होतो. तेव्हा त्यालाहि क्वार्टझाइट म्हणतात. वाळूचे खडक दाबले जाऊन त्यापासून क्वार्टझाइट खडक तयार होतो. हाच क्वार्टझाइट आणखी पुढें जास्त दाबला जाऊन त्याचे स्फटिक किंवा कण चपटे झाल्यास शिस्ट तयार होतो व त्याला क्वार्टझ् शिस्ट असें म्हणतात कित्येक वेळां मध्यभागीं क्वार्टझाइट व त्याच्या एका बाजूस वाळूचा खडक व दुसऱ्या बाजूस क्वार्टझ् शिस्ट सापडतात त्यामुळें मूळ खडकापासून रूपांतरित खडक कसे झाले असावे हें लक्षात येतें.

संगमरवरी दगड—मूळ चुन्याचे दगडाचे आसपास खडकाच्या रसाचे उष्ण प्रवाह आल्यानें किंवा खडकावर दुसरे थर येऊन त्यामुळें मूळ खडकात उष्णता उत्पन्न होऊन चुन्याच्या कणांचे लहान लहान स्फटिक तयार होतात. अशा स्फटिकमय चुन्याच्या खडकास संगमरवरी दगड म्हणतात हे पांढऱ्या, काळ्या, हिरव्या व तांबड्या रंगाचे असतात. ते घासल्यास त्याना चकाकी येते व म्हणून ते बांधणीच्या कामात महत्वाचे समजले जातात. संगमरवरी दगडात अभ्रक व संगजिऱ्याचे कण सापडतात व त्यावरून त्याना निरनिराळीं नावेंहि कित्येक वेळा दिलीं जातात. जबलपूरपाशीं संगमरवरी दगड मोठ्या प्रमाणात सापडतात व त्याचा उपयोग पुष्कळ ठिकाणीं होतो मूळ खडकापासून कित्येक वेळा संगमरवरी दगड न होता अर्धवट स्फटिकमय खडक होतो. त्याचा चुना उत्तम होतो व बांधण्याच्या कामाला त्याचा फारसा उपयोग नसल्यानें चुना करण्याकडेच त्याचा खप होतो.

नीस.—नीस खडक स्फटिकमय असून थरमयाहि असतात. यातील स्फटिक स्पष्ट असतात परंतु थर मात्र सुटे होण्यासारखे नसतात. मूळ ग्रनाइट, सेनाइट वगैरे खडक दाबले जाऊन त्यापासूनच बहुतेक नीस झालेले असतात त्यात सापडणाऱ्या खनिज द्रव्यावरून त्याचें इतर खडकाशीं साम्य पाहून त्याला निरनिराळीं नावें देतात. ग्रनाइटमध्यें सापडणारीं द्रव्यें असल्यास त्यास ग्रनाइट नीस, सेनाइटमधील द्रव्यें असल्यास सेनाइट नीस व त्याचप्रमाणें इतर नावें नीसला दिलीं जातात. नीस व शिस्ट हे दोन्हीहि रूपांतरित खडक आहेत. दोहोंमध्यें थोडेसें साम्यहि आहे तरी त्यातील मुख्य फरक म्हणजे शिस्टमध्यें स्फटिक जितके दाबले जाऊन चपटे झालेले असतात तितके नीसमध्यें नसतात व यामुळें नीस व शिस्ट हे खडक ओळखता येतात मद्रास इलाख्याचा बराच भाग, मुंबई इलाख्याचा दक्षिण भाग, बुंदेलखंड वगैरे ठिकाणीं नीस खडक सापडतो तेथें ग्रनाइट व नीस असे दोन्हीहि खडक शेजारीं शेजारीं सांपडतात यामुळें ते नीस मूळ कोणत्या खडकापासून झाले असावे याची कल्पना होते प्रथमतः नीस हा शब्द ग्रनाइटपासून झालेल्या खडकानाच विशेषतः लावीत असत परंतु आता नीस शब्द अधिक व्यापक अर्थानें वापरतात म्हणून नीस या शब्दाखालीं निरनिराळ्या प्रकारचे खडक येतात नीस खडकात हॉर्नब्लेंड, टूरमलीन, गार्नेट, एपिडोट, ॲपटाइट वगैरे पुष्कळ प्रकारचीं दुय्यम द्रव्यें सापडतात मूळ अग्निजन्य खडकापासून नीस खडक झाल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत परंतु नीस खडक नेहमींच अग्निजन्य खडकापासून होतो असें नाहीं. जलजन्य खडकापासून नीस झाल्याचीं सुद्धा उदाहरणें आहेत. कित्येक वेळा नीस, क्वार्टझाइट चुन्याचे खडक याचे आळीपाळीनें एकावर एक थर सापडतात, त्याचप्रमाणें कांग्लामोरेटचे थरहि सापडतात त्यावरून त्या ठिकाणचा नीस मूळ जलजन्य खडकापासून झाला असण्याचा संभव आहे. खडक कोणत्याहि मूळ खडकापासून होवो व तो कशाहि प्रकारानें होवो शेवटीं त्यातील कण चपटे होऊन तो अर्धवट थरमय असला म्हणजे त्याला नीस ही संज्ञा लावता येईल

शिस्ट—शिस्ट खडक म्हणजे काय, ते कसे होतात, व कसे असतात याबद्दलची माहिती वर दिलीच आहे त्यावरून असें स्पष्ट कळून येईल कीं, शिस्ट म्हणजे नीसच्या पुढची पायरी आहे. नीस अधिक दाबला गेल्यास त्यापासून शिस्ट होतो शिस्टमधील खनिज द्रव्यें इतकीं दाबलीं गेलेलीं असतात कीं तीं अगदीं चपटीं होतात त्याचे थरहि अगदीं पातळ असून लवकर सुटे होतात काहीं शिस्ट खडकाचें

वर्णन खाली दिलें आहे त्यावरून असें दिसून येईल की, शिस्ट खडकात जें मुख्य व महत्वाचें खनिज द्रव्य सापडतें त्यावरून शिस्ट खडकाना निरनिराळीं नावें दिलीं आहेत तीः- ( १ ) ग्रफाइट शिस्ट —पूर्वीचे कार्बोनेशियस शेल दाबले जाऊन त्यापासून ग्रफाइट शिस्ट तयार होतात. यामध्यें दुसरीं खनिज द्रव्यें असतात परंतु काळे ग्रफाइटचे पट्टे किंवा थर त्यात बरेच असतात म्हणून त्याना ग्रफाइट शिस्ट म्हणतात. ( २ ) ऑगाइट शिस्टः—हे हिरवट रंगाचे खपल्या निघणारे खडक असतात.त्यामध्यें लहानमोठे ऑगाइटद्रव्याचे कण असतात. ऑगाइटशिवाय कित्येक वेळा या खडकात क्वार्ट्स,फल्स्पार, मॅग्नेटाइट किंवा क्लोराइटवगैरे द्रव्यें थोड्याफार प्रमाणात सापडतात ( ३ ) हार्नब्लेंड शिस्टः—हा काळ्या रंगाचा खडक असतो यातील मुख्य द्रव्य हार्नब्लेंड असतें परंतु त्याशिवाय इतर नेहमीं सापडणारीं द्रव्यें सापडतात. (४) क्लोराइट शिस्टः—काळस· हिरव्या रंगाचा खडक असतो तो मऊ व ठिसूळ असून हाताला थोडासा गुळगुळीत लागतो. ( ५ ) टाल्क शिस्टः—हा पांढरा, पिंवळट किंवा थोडासा हिरवट रंगाचा खडक असतो तो फार मऊ, ठिसूळ असून हाताला गुळगुळीत लागतो (६) मायका शिस्टः—मायकाचे पातळ थर एकेठिकाणीं या खडकात सापडतात यात इतर द्रव्यें असल्यास फारच थोड्या प्रमाणात असतात. खडकाचा रंग पांढुरका, पिंवळट, काळसर किंवा तांबूस असतो. कित्येक शिस्ट खडकाला दोन किंवा अधिक खनिज द्रव्यें प्रामुख्यानें सापडतात. तेव्हा खडकाला नाव देतांना या द्रव्यांचीं नावें त्यात घालतात उदाहरणार्थ एखाद्या शिस्टामध्य मायका व क्वार्ट्स् अशीं·दोन्हीं नावें असल्यास त्याला मायकेशियस क्वार्ट्स् शिस्ट म्हणतात. याप्रमाणें जोडनावाचे शिस्ट पुष्कळ असतात.

**खडकवासलें तलाव**—पुण्याच्या नैऋत्येस पुण्यापासून सुमारें ११ मैलावर असलेल्या खडकवासलें नावाचें खेडें आहे तेथें मुठा नदीस बांधलेला एक तलाव आहे. सन १८७९त या तळ्याचें काम पुरें झालें या तळ्याची लांबी ११ मैल असून रुंदी पाऊण मैलापेक्षा जास्त नाहीं. पुणें शहराला या तळ्यातूनच मुख्यतः पाणीपुरवठा होतो तळ्याच्या अनियमित उंचसखलपणावरून तळ्याच्या विस्ताराचा नक्की अंदाज करता येत नाहीं तळ्याच्या काठचा प्रदेश अगदीं निर्जन असून, तेथें पक्षीहि आढळत नाहींत. कॅनॉटबोट क्लबाच्या मालकीच्या तीन चार लहान होड्या तळ्याच्या खडकाळ काठावर असतात याचे दोन कालवे काढले असून पहिला हडपसरावरून पाटसपर्यंत व दुसरा कोथरूडवरून खडकीपर्यंत गेला आहे.

**खडकी**—मुंबई इलाख्यातील पुणें जिल्ह्याच्या हवेली तालुक्यातील एक गाव. हें गाव पुण्याच्या वायव्येस ४ मैलावर आहे. याची लोकसंख्या १९११ सालीं १४०२८ इतकी भरली. या ठिकाणीं १८१७ च्या नोव्हेंबरच्या ५ व्या तारखेस इंग्रज व पेशवे याचामध्यें लढाई झाली. इंग्रजाचा सेनापति कर्नल बर असून पेशव्याचा सेनापति बापू गोखले होता. या लढाईत पेशव्याचा पूर्ण पराजय झाला. मुंबई इलाख्यातील हें प्रमुख लष्करी ठिकाण असून या ठिकाणीं तोफखाना व पलटणी आहेत. हत्यारें व दारूगोळा तयार करण्याचा येथें एक कारखानाहि आहे या गावचें उत्पन्न १९०३- ४सालीं २८००० रुपये असून खर्च २२००० रुपये आहे. येथें एक इंग्लिश शाळा आहे येथें एक मिशनरी संस्था असून ती हवेली तालुक्यात मतप्रसाराचें काम करीत असते. खडकी एज्युकेशन सोसायटीनें खडकी व आजुबाजुचीं गावें यात प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण्याकरिता १३ शाळा काढल्या आहेत

**खंडगिरी**—बिहार—ओरिसा पुरी जिल्ह्याच्या खुर्दा पोटविभागातील एक डोंगर हा भुवनेश्वराच्या पश्चिमेस ४ मैलावर आहे. उ. अ. २०° १६′ व पू रे ८५° ४७′. याला दोन वेगळीं शिखरें असून उत्तरेकडील शिखराला उदयगिरि व दक्षिणेकडील शिखराला खंडगिरि म्हणतात. तथापि खडगिरि हें नाव सबंध डोंगराला हि लावितात. यावरील लेणीं जैन भिक्षूंचीं आहेत सर्वांत जुनें लेणें खारवेला राजाच्या वेळचें आहे. पृथ्वीगुंफा लेण्यावरील या राजाचा मोठा लेख ख्रि. पू. १५५ तला आहे. या लेण्यातील अनेक जैन लेख व शिल्प यावरून १२ व्या किंवा १३ व्या शतकापर्यंत हीं जैनाकडे होतीं असें दिसतें. अगदीं जुन्या लेण्यामध्यें पुढील महत्वाचीं आहेत. उदयगिरी शिखरावरीलः—( १ ) राणी गुंफा; ( २ ) गणेश गुंफा ( यातील देखावे नवव्या विभागात दिले आहेत), (३) हाथी गुंफा, यात राजा खारवेलाचा प्रसिद्ध शिलालेख आहे ; ( ४ )बाघ गुंफा, ( ५) स्वर्ग गुंफा; (६ ) मौजपुरी आणि (७ ) पाताळ गुंफा, हीं शेवटील तीन लेणीं एकापेक्षा एक उंच असल्यामुळें स्वर्ग, पृथ्वी व पाताळ हीं नावें त्याना शोभतात. खंडगिरीवरील सुप्रसिद्ध लेणें अनंत गुंफा होय. तेंतुली गुंफा, तंतुआ गुंफा पहिली आणि दुसरी, नवमुनि व सातघर हीं बाकीचीं लेणीं होत नवमुनींत राजा उद्योत केसरीचा लेख आहे.[ रिपोर्ट. आर्कि. सर्व्हे ऑफ इंडिया १९०२—३ ].

**खंडायत**—ओरिसा प्रांतातील एक लढवय्यी जात. हिंदुस्थानात १९११ सालीं एकूण८०७१०६खंडायत होते त्यापैकीं निवळ बिहार ओरिसातच ७६९३५३ भरले. ओरिसाच्या राजाच्या सैन्यात या जातींतील बरेच लोक हलक्या दर्जावर असत. 'श्रेष्ठ' वर्ग राजपूताच्या खालोखाल गणतात. या जातीच्या मध्यप्रांतातील कांहीं लोकामध्यें काश्यप, नाग वगैरे गोत्रें आढळतात पण त्यावर विवाह अवलंबून नसतो. सामान्यतः एकाच पूर्वजाच्या संततीची आठवण आहे तोपर्यंत विवाह करीत नाहींत. बालविवाहाची चाल याच्यात रूढ आहे. वर मिळाला नाहीं व मुलीस न्हाण आलें तर बाणावरोबर तिचें लग्न करतात. बहुपत्नीत्व रूढ आहे पण अशा

मनुष्यास ' मॅपलियर ' म्हणजे पत्नीभक्षक म्हणतात. लग्नाचा मुख्य विधि वधूवरांचे हात कुशानें एकत्र बांधणें व वधूला कडेवर घेऊन वरानें भोंवत्याभोंवती सात प्रदक्षिणा घालणें हा आहे. धर्मविधींकरितां ब्राह्मणास बोलावण्याची चाल आहे [ रसेल व हिरालाल. सेन्सस रिपोर्ट. ]

**खंडाळ**—*गुजराथ. महीकांठांतील एक संस्थान.* वात्रक काठा जिल्ह्यांत या संस्थानचीं बारा गांवें आहेत. खंडाळचे मिया बाटलेले मुसुलमान आहेत. त्यांना गायकवाडास दरसाल खंडणी द्यावी लागते.

**खंडाळा**—पुण्याचे वायव्येस ४१ मैलावर सह्याद्रीचे पहाडांत हा एक गाव आहे. आसपास आंबा, जाम्भू, शाभूळ व इतर झाडांचीं जंगलें आहेत. ठिकठिकाणीं पहाडांत घरें व युरोपियनांचे व पारशांचे बंगले दृष्टीस पडतात नवी। वसलेल्या गांवाच्या व पश्चिमेकडील डोंगराच्या मध्यें मोटा तलाव आहे. अगदीं नैर्ऋत्यमार्गी उंबरीच्याहि पलीकडे ड्यूकस नोझ किंवा नागफणी किंवा विंचवाची नांगी अशा आकारावरून निरनिराळ्या नावांनीं संबोधिलें जाणारें शिखर आहे. प्रातःकाळीं किंवा सायंकाळचे वेळीं खंडाळा घाटांतील शोभा फार मनोहर असते.

ह्या घाटात कांहीं कांहीं ठिकाणीं लेख असलेले दगड व कोरीव मूर्ती आढळतात. येथून वेडसा, भाजा, लोहगड, विसापूर येथें जाण्यास वाटा आहेत. येथून साकर पठारासहि जातां येतें. ईशान्येस राजमाचीकडे जाण्याकरिता पूर्वेकडे एक मोठा वळसा घेऊन जावें लागते. जवळच फोर्सबे येथें टाटाच्या विजेच्या कारखान्याच्या कालव्याचा आरंभ आहे.

**खडीचा दगड**—हा एक मऊ अभ्रकाच्या जातीचा खनिज पदार्थ आहे. हा हातास मऊ व गुळगुळीत लागतो, त्यावरून याला इंग्रजींत सोपस्टोन असें म्हणतात. याची एक हलकी जात आहे, तिचा भांडीं वगैरे करण्याकडे उपयोग होतो म्हणून तिला पॉटस्टोन असें म्हणतात. खडीच्या दगडाचीं देश भाषांतील इतर नांवें सिलखडी, अभ्रकद्रुम, संगइ-पजीन, मुलयुम इ. आहेत. हिंदुस्थानात दरसाल सुमारें २५००० टन हा दगड निघत असावा असा हॉलंडचा अंदाज आहे. यांपैकीं चांगल्या प्रकारचा अभ्रक मद्रास, मध्यप्रांत, राजपुताना व ब्रह्मदेशामध्यें निघतो. या प्रत्येक प्रांतांतील पुरवठ्यासंबंधानें त्रोटक माहिती येणेंप्रमाणें.—

मद्रास.—कर्नूल जिल्ह्यांत मद्दवरम् गांवाजवळ बेद्दमचेर्लमधील अभ्रक सर्वांत उत्तम असतो त्याच्या खालोखाल अनंतपूर, उत्तरअर्काट, बल्लारी, कडाप्पा, सालेम, मलबार, वेलोर व दक्षिण कानडा हे जिल्हे आणि पदुकोट्टई संस्थान येथील अभ्रक चांगला असतो १८९९ त मद्रासमध्यें १०२ टन अभ्रक निघाला होता.

मध्यप्रांतः—जबलपूर जिल्ह्यांत संगमरवरी दगडांच्या खाणींत व भंडारा जिल्ह्यांत कन्हेरी येथें अभ्रकाचे उत्तम दगड सांपडतात कन्हेरी येथें ( १९०० सालीं ) या दगडाचे पेले, भांडीं, वगैरे जिन्नस करण्याचे १० कारखाने होते. १९०० सालीं ८२ टन दगड निघाला होता.

राजपुताना व मध्य हिंदुस्थानः—राजपुतान्यात जयपूर संस्थानामध्यें मोर, रैवळ व गिंगगड येथें या अभ्रकाचे दगड सापडतात. पैकीं मोर येथील दगड हिरव्या रंगाचे व पैलूदार असून आग्रा येथें नक्षीचें काम करण्याकरितां त्याचा उपयोग करतात बुंदेलखंडातहि हा दगड सापडतो. मध्यहिंदुस्थानात१९००साली५८टन दगड निघाला असें म्हणतात.

ब्रह्मदेश.—प्रोम, पकोक्कू, कथा, भामो, चौक्पू व मिंबू जिल्ह्यात अभ्रकाच्या खाणी असून १९०० सालीं ५१ टन दगड निघाले होते

उपयोग.—पेले, बशा, नक्षीच्या पेट्या, दाकाचे दाडे, कागदावर ठेवण्याचीं वजनें वगैरे करण्याकरितां या दगडाचा पुष्कळ उपयोग होतो. या दगडाच्या मूर्तीहि करतात म्हणून याला म्हैसूरकडे प्रतिमा कल्लर म्हणजे मूर्ति पाषाण असें म्हणतात. पुष्कळ देवळांत व राजवाड्यांत या दगडावरील सुंदर खोदकाम दिसून येतें याची पूड करून तिचा पांढऱ्या शाईप्रमाणें उपयोग करतात अथवा चुना चकचकीत दिसण्याकरितां त्यात घालतात ब्रह्मदेशात या दगडाच्या दुध्या पेन्सिली करतात याचा रंग दिला असता लोखंड गंजत नाहीं या गुणामुळें हिंदुस्थानाबाहेरहि या दगडाचा उपयोग होऊं लागला आहे लवकर वाळणाऱ्या वार्निशात याची पूड मिसळल्यास तयार होणारा रंग चांगला पक्का बसतो. हा दगड वितळण्यास कठिण असल्यामुळें मुशी व धुराच्या दिव्याचीं तोंडें (गॅसबर्नर) करण्याकरिता उपयोगी पडतो वातावरणांतील वायूंचा यावर बहुधा कांहींच परिणाम होत नाहीं यामुळें, चीनमध्यें वाळूच्या दगडासारख्या ज्या दगडानें काम हवेंत खराब होण्याचा संभव असतो त्यावरून हा दगड लावतात. [ वॅट ].

**खडीचें काम**—हिंदुस्थानात, विशेषेंकरून महाराष्ट्र व गुजराथ प्रांतामध्यें बायकांच्या साड्या, चोळ्या, पातळें यावर ठशानें खडी काढण्याचा पुष्कळ प्रघात आहे. कारण खडीच्या योगानें कापड ज्यास्त शोभिवंत दिसतें. खडी काढण्याकरितां लागणारें सामान फार खर्चाचें नसून हा धंदा पुष्कळ लोकास करता येईल पुणें, मुंबई, पंढरपूर, नाशिक, सातारा, सोलापूर वगैरे ठिकाणीं खडीचें काम फार उत्तम होतें.

खडीच्या धंद्याची कृति—जवसाचें तेल व राळ एकत्र करून तें मिश्रण शिजवून रोगण तयार करून ठेवावें. मग पाहिजे त्या वेळेस हा रोगणात सफेता कालवून तो पाच दिवस झाकून ठेवावा आणि सहाव्या दिवशीं कामासाठीं घ्यावा. कुरक्या घालण्याचा जसा शेवगा ( सोऱ्या ) असतो त्या प्रमाणेंच पितळेचे निरनिराळ्या आकृतीचे व नक्षीचे छाप

किंवा आत पोकळ असलेले ठसे असतात ते घेऊन त्याच्या आत वर सांगितलेले सफेत्याचे मिश्रण घालून त्या ठशात दांडा बसवून कापडावर खडीचा छाप उठवितात हा ठसा एक इंच लांबीचा व सुमारें अर्धा इंच घेराचा आतून पोकळ पत्रपात्रीप्रमाणें असतो ठशाच्या खालच्या ( बुडाच्या ) पत्र्यावर आरपार भोकें पाडून नक्षी, फुल्या, मोर, राघू वगैरे तयार केलेले असतात ज्या खणावर किंवा कपड्यावर खडी काढणें असेल तो खण डाव्या हातात घेऊन क्रमानें प्रत्येक भाग मधल्या बोटावर घेऊन त्या जागीं ठसा चेपतात याप्रमाणें खडीची नक्षी काढल्यावर त्याजवर कोणी कोणी ती ओली आहे तोंच अभ्रकाची वस्त्रगाळ पूड टाकून खण झाडून नक्षी वाळवितात

अभ्रकाची पूड करण्याची कृति —अभ्रकाचे बारीक तुकडे व राळ (भात) एका पिशवींत घालून ती पिशवी एका पातेल्यातील पाण्यात उजव्या हातानें बुडवून डाव्या हातावर कुसकरावी म्हणजे बारीक बारीक कण पाण्यात उतरतात मग तें पाणी फार बारीक कापडातून गाळावें म्हणजे कपड्यावर बारीक कण पुष्कळ जमा झालेले सापडतात ते वाळवून खडीवर टाकण्यासाठी उपयोगात आणावे हा धंदा सोपा व फायदेशीर आहे कोणी सोनेरी वर्खाची वस्त्रगाळ पूड वर टाकतात, कोणी खडीचे ठिपके उठवून त्यावर भिंगाच्या टिकल्या बसवून वाळवितात कोणी सरस व सारट याच्या बलकात सफेता कालवून त्याचा खडी तयार करून छाप उठवितात [ कलावैभव ]

**खंडेपरा**—बिहार–ओरिसा. ओरिसातील एक मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ २४४ चौ मै उत्तरेस महानदी, पूर्वेस कटक आणि पुरी जिल्हे, दक्षिणेस पुरी आणि नयागड संस्थान व पश्चिमेस दसपल्ला संस्थान आहे मूळचें हें संस्थान नयागडचा एक भाग होता पण २०० वर्षांपूर्वी नयागड राजाच्या एका भावानें हें आपल्यासाठीं विभक्त करून घेतलें संस्थानचें उत्पन्न सुमारें ३०,००० रुपये असून ब्रिटिशांना ४२१२ रुपये खंडणी जाते या संस्थानची जमीन चांगली सुपीक असून सबंध ओरिसांत या सारखी उत्तम लागवडींत असणारी जमीन सापडणार नाहीं डोंगराळ प्रदेशातून साल वृक्ष पुष्कळ आहेत, तसेच वड व आंबा मैदानात जागजागीं आढळतात महानदीला मिळणाऱ्या प्रवाहांतून व दोंका यांतून वाहतात लो स ( १९०१ ) ६९४५० संस्थानात एकंदर गावें ३२५ असून सर्वांत महत्त्वाचें गाव कंतिलो आहे तीस चाळीस प्राथमिक शाळा व एक दुय्यम शाळा संस्थानाच्या खर्चानें चालते

**खंडेराव गायकवाड**—हे दुसरे खंडेरावमहाराज होत गायकवाडींतील पहिले खंडेराव हे कडीच्या गायकवाड जहागिरीचे मूळ संपादक असून त्याचा काल श्री थोरले बाजीरावापासून थोरले माधवरावापर्यंतचा होता या दुसऱ्या खंडेरावमहाराजांचे वडील दुसरे सयाजीराव होत यांच्या आईचें नाव चिमणाबाई होतें याचे वडील बंधु गणपतराव हे गादीवर असता या दोघा भावांचे विशेष रहस्य नसे गणपतराव हे इ स १८५६ च्या नोव्हेंबरांत वारल्यावर त्यांना संतति नसल्यामुळें त्यांच्या मागून खंडेराव हे गादीवर बसले त्या वेळचा बडोद्याचा रेसिडेंट यांच्याबद्दल पुढीलप्रमाणें लिहितो " खंडेराव हे शरीरानें धिप्पाड, मोठे उत्साही, धूर्त, दूरदर्शी, जातीनें राज्यकारभार पहाणारे, दयाळू व उदार होते " यांना सर्व मर्दानी खेळाचा मोठा शोक असून शिकारीचीहि फार आवड होती यांनी ४० लाख रु खर्च करून मकरपुरा नांवाचा राजवाडा बांधून त्या बाजूस हरणें पाळण्याची ( शिकारीसाठीं ) व राखण्याची व्यवस्था केली हे आठवणीचे मोठे धडे होते त्यांनीं सैन्य, जमाबंदी व न्यायखातें यांत बऱ्याच सुधारणा केल्या व लोकोपयोगी कामें सुरू केलीं

ते उदार होते तरी पण फारसे उधळे नव्हते प्रजेचे ते आवडते झाले होते इंग्रज सरकारावर त्यांनीं इ स १८५७ सालीं जे उपकार केले त्याबद्दल त्यांचे मोठे आभार मानले आहेत साऱ्या हिंदुस्थानात यांच्या इतकी इंग्रजास मदत करण्याची तातड व राजनिष्ठा दुसऱ्या कोण्याहि संस्थानिकानें दाखविली नाहीं असें इंग्रजांनीं म्हटलें आहे मोठ्या बंडात बडोद्याचें सैन्य बंड मोडण्याच्या कामगिरीवर गेलें असता त्या संधीचा फायदा घेऊन महिकांठा व रेवाकांठा या प्रांतात तिकडील दंगेखोरांनी बंड उभारलें व तें थोडक्याच काळात साऱ्या उत्तरमंडळात पसरलें त्या वेळीं या वाघेरे लोकांच्या बंडाचा नायनाट खंडेराव महाराजांनीं केला त्याबद्दल त्या वेळचा रेसिडेंट शेक्सपियर यानें त्यांचे आभार मानले आहेत शिपायांच्या बंडात महाराजांनी दिलेल्या मदतीबद्दल हिंदुस्थानसरकारनें स्वतंत्र ठराव करून त्यात म्हटलें आहे की " खंडेराव महाराजांनीं जी अपूर्व राजनिष्ठा व तात्कालिक साहाय्य दिलें तें जर दिले नसतें तर इंग्रजांचा अमल पश्चिम हिंदुस्थानावर क्वचितच राहिला असता "याप्रमाणें लिहून या कामगिरीबद्दल बडोदेसरकारकडून घेण्यात येणारी शिबंदी फौजेच्या खर्चाची वार्षिक तीन लाखांची रक्कम इंग्रज सरकारनें त्यांना बहाल केली. आणि त्यांना मोरचेल वापरण्याचा मान दिला, व १८६२ त त्यांना दत्तक घेण्याची परवानगीहि दिली इंग्रजांनीं संस्थानांतील सैन्य नालायकीच्या सबबीवर कमी करण्यास महाराजांना पुष्कळदां सांगितलें होतें, परंतु ते स्वत शिपाईबाण्याचे असल्यानें त्यांनीं सैन्याच्या सुधारणेंत फार लक्ष घातलें होतें बडोद्यास बंदुका तोफा ओतण्याचा व दारूगोळा करण्याचा कारखाना होता एवढेंच नव्हे तर मैदानी मोठ्या तोफा ( यूरोपात तयार झालेल्या )हि त्यांनीं विकत घेण्याचें सुरू केलें होतें परंतु इंग्रजसरकारांनीं त्या तोफा त्यांच्याजवळ राहू न देतां स्वत खरेदी केल्या इजारदार पद्धती त्यांनीं काढून टाकली व सदर अदालत

वगैरे कोर्टे स्थापून नवीन कायदे केले त्यामुळे जमाबंदी व न्यायखात्यात सुधारणेस प्रारंभ झाला. त्यांची कुतबक्षानी नावाची एक पेढी ( सरकारी ) होती. तिचें भाडवल २१॥ लाखांचें होतें. पुढल्या वर्षी मौलाअली नावाची दुसरी एक २३ लाखाची भाडवलाची पेढी काढली. आणखीहि दोन लहान पेढ्या त्यांनी काढिल्या होत्या. त्यांच्या योगानें सरकारी पैशाची व्यवस्था चागली लागली. त्यांनी इनाम जमीनीवरहि थोडा बहुत सारा बसविला होता. पोलीस खात्यातहि त्यांनी याच सुमारास सुधारणा केली. हिंदूस खिचडी व मुसुलमानास(ग्यारमीच्या दिवशी) अन्न वाटण्याच्या कामी महाराज बरीच रकम दरसाल खर्चीत असत. याप्रमाणें १४ वर्षे राज्य केल्यावर खंडेराव महाराज हे मकरपुऱ्याच्या राजवाड्यात ता. २० नोव्हेंबर सन १८७० रोजी जलोदरानें मरण पावले. याच्या विरुद्ध १८५७ त फोळ्याचें बंड उभारलें गेलें होतें. व इ. स. १८६३ त आणि इ. स. १८६७ त तर दोनदा याच्या खुनाचाहि प्रयत्न करण्यात आला होता याच्या राणीचें नाव जमनाबाई असून त्याना ताराबाबा नावाची एक मुलगी झाली होती. याच्या नंतर याचे धाकटे बंधु मल्हारराव हे गादीवर बसले होते, ते इ. स. १८७५ त पदच्युत झाले. त्यानंतर जमनाबाई यानीं गोपाळराव नावाच्या मुलास दत्तक घेतलें. तोच मुलगा हल्लीचे बडोद्याचे महाराज सयाजीराव होत. यानीं १८७५ त मेच्या २७ तारखेस राज्यारोहण केलें. खंडेराव महाराजानां मल्लविद्येचा फार शोक होता. त्यामुळें बडोद्यास त्याच्या वेळीं हिंदुस्थानातले प्रख्यात अकरा मल्ल रहात असत त्याच्या प्रीत्यर्थ सालिना २५४६७० रु खर्च होई. याचा मल्लविद्येचा वस्ताद टोंकचा राहणारा अबदुल कादर नावाचा एक मुसुलमान होता महाराजानीं आपल्या राजवाड्यात लाल आखाडा नावाचा तालीमखाना बाधला होता तीरंदाजींतहि हे फार प्रवीण होते. त्यांच्या हौद्यातील मार्तीत बरेच मण अत्तर टाकले होतें असें म्हणतात. तालीमबाजीमुळें त्याचें शरीर भव्य व पीळदार बनलें होतें. ते मद्याला कधीं शिवले नाहींत. त्याचा पोषाखहि साधा ( चारीवमा सफेत माडचोळणा मलमलीचा सदरा व डोकीस दिल्लीशाई सफेत टोपी )असे. गुवईच्या सेलर्सहोमला त्यानीं २ लक्ष व व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्याला १ लक्ष ८० हजार रु. दिले. आगगाडीहि बडोदे राज्यात याच्या वेळीं सुरू झाली. [ दि रूलर्स ऑफ बडोदा प्रो. माणिकराव. खंडेराव महाराज व बडोद्यातील मल्ल विद्या ]

**खंडेराव गुजर**—शिवाजीमहाराजाचे सेनापती प्रतापराव गुजर याचा खंडोजी उर्फ खंडेराव हा पुत्र होय झुल्फिकारखानानें रायगड फितुरीनें घेतल्यानंतर येसूबाईसाहेब व शाहुमहाराज याना औरंगझेबाकडे पाठविण्यांत आलें,त्यावेळीं गडावर असलेली कांहीं मानकरी मंडळीहि ( केसरकर, गुजर वगैरे ) पकडली जाऊन औरंगझेबाच्या छावणींत गेली. त्यांत हा खंडोजीहि होता. या सर्व मंडळींस बाटवून मुसुलमान करण्याची इच्छा औरंगझेबास नेहमीं होई परंतु तिच्या आड त्याची मुलगी येत असे. एके दिवशीं मात्र त्यानें आज शाहूस बाटवावयाचेंच असा आग्रह घेतला. तेव्हा तोहि त्याच्या कन्येनें मोडला. परंतु शाहूच्या ऐवजीं दुसरा कोणी तरी मोठा सरदार बाटविण्याचाच जेव्हा त्यानें हट्ट घेतला, तेव्हा खंडोजी हा आपखुषीनें मुसुलमान होण्यास तयार झाला. त्यानें असें धर्मांतर केल्यामुळें शाहूवरील हा प्रसंग टळला. पुढें शाहूमहाराज गादीवर बसल्यानंतर त्यांनीं खंडोजीस या त्याच्या कृत्यासाठीं, परळ खोऱ्यातील साठ गावाचें देशमुखी वतन इनाम करून दिलें हें वतन त्यापूर्वी सुभानजी लायघर याला,त्यानें साताऱ्याचा किल्ला फितूर होऊन औरंगझेबास दिल्यामुळें त्याच्याकडून इनाम मिळालें होतें. तें त्याच्याकडून जप्त करून शाहूमहाराजानीं खंडोजीस दिलें. या खंडोजीचा मुसुलमानी वंश हल्लीं परळीनजीक कामथी येथें रहात असून त्यातील लोकाना या गोष्टींची सर्व माहिती आहे. याचीं नावें मुसुलमानी नसून हिंदूंचींच असतात नवरात्रादि सर्व हिंदू सण हे पाळतात खंडोजीस हिंदू धर्मांत परत घेण्यास त्यावेळीं मंडळी तयार झाली होती. परंतु त्याचें मुसुलमान बायकोवर फार प्रेम असल्यानें तिच्यासह मला पावन करून घ्या असा त्याचा आग्रह पडल्यावरून ती गोष्ट तशीच राहिली [ इति. संग्रह पु १ अं ४; मराठी रियासत भा २ ]

**खंडेराव दाभाडे**—दाभाड्याचा मूळपुरुष येसाजी हा तळेगाव (दाभाडे) ( तालुके मावळ जिल्हा पुणें ) येथील रहिवासी व मुकदम होता. दाभाडे क्षत्रिय असून याचें गोत्र शाडिल्य व देवक कळवाचें आहे. येसाजी हा शिवाजीमहाराजाचा हुजऱ्या होता महाराज आग्र्यास गेले असता येसाजीनें इकडे राजकुटुंबाची सेवा केली येसाजीचा थोरला मुलगा खंडेराव होय. राजारामछत्रपती हे जिंजीस जाताना येसाजीसह खंडेराव हा त्यांच्याबरोबर गेला होता जिंजीस राजाराम याना समाजी हा पुत्र झाला, तेव्हा त्यांनीं येसाजीस तळेगाव, इंदुरी, धामणें आणि उरसें हीं गावें इनाम करून दिलीं. राजाराम हे जिंजीहून परत येत असता मागे जनान्याच्या बदोबस्तास येसाजी यास ठेवलें होतें त्यानें मोठ्या युक्तीनें जनानखाना किल्ल्यातून काढून अनेक संकटातून पन्हाळ्यास आल्यावर येसाजी मेला राजाराम हे जिंजीस जात असता मोंगल मागें लागला होता. तेव्हा (खंडेरावाचा धाकटा भाऊ ) शिवाजीनें त्याला पाठीवर घेऊन दौड मारली असता त्याची छाती फुटून व रक्ताच्या गुळण्या होऊन तो मेला होता पन्हाळ्यास आल्यावर छत्रपतींनीं खंडेरावास सेनाधुरंधर हें पद देऊन गुजराथ व बागलाणकडे मुलुखगिरीवर पाठविलें आणि वस्त्रें व पोषाख देऊन निशाण आणि जरीपटका हवालीं केला शिवाय जुन्नर, पुणें व हरि-

थेऊर या तीन प्रांतांची व अफोले आणि जायळें या महालांची सरपाटिलकी ( दर शेंकडा २ रु ) व चाकण परगण्यांतील आणि पारनेर परगण्यातील १६४गांवाची सरदेशमुखी दिली शाहुछत्रपती सुटून आल्यानंतर खंडेराव ताराबाईला सोडून त्याना जाऊन मिळाला. मध्यंतरी चंद्रसेनानें खंडेरावास ताराबाईकडे ओढण्याचा प्रयत्न केला होता. पुढें १७१७ त खंडेरावास सेनापतीचें पद शाहुछत्रपतीनें दिलें, तें पुढें त्याच्या कुटुंबात कायम झालें याच वेळीं दिल्लीच्या बादशहानें दख्खनचा सुभेदार हुसेनअली याच्याविरुद्ध उठण्यास शाहूमहाराजास फर्मावेलें असता, त्यानी तें काम खंडेरावावर सोंपविलें. त्यानें खानदेश गुजराथवर स्वाऱ्या करून हुसेनचा रस्ता अडविला, तेव्हा त्यानें झुल्फिकारबेग यास त्याच्यावर पाठविलें खंडेरावानें त्याची सारी फौज ( झुल्फिकारसुद्धा ) अडचणींत गाठून कापून काढली तेव्हा हुसेननें आपले दिवाण मोहकमसिंग व चंद्रसेन जाधव याना रवाना केलें त्याची लढाई नगरजवळ झाली व पुढें खंडेरावानें निंबाळकर व सोमवंशी याच्या मदतीनें मोंगलांचा पुरता मोड केला यापुढें खंडेरावानें गुजराथ काठेवाडकडे मराठी अमल बसवावा असा हुकूम छत्रपतींनी त्याला केला व श्रावणमासची दक्षिणा आणि कोटिलिंगार्चन विधी सेनापतीनें करावा असें ठरविलें ( १७१७ ) पुढें सय्यद बंधूंच्या मदतीस ही मंडळी दिल्लीस गेली तींत खंडेराव हा सेनापती म्हणून गेला होता ( १७१९ ) दिल्लीहून परत आल्यावर बाळाजी विश्वनाथ यानी जी सरंजामी पद्धत निर्माण केली, तींत खंडेरावास खानदेश देऊन गुजराथ काबीज केल्यास तीहि जहागीर देऊन टाकूं म्हणून त्याला आश्वासन दिलें. सय्यदांचा हस्तक अलमअली व निजाम यांच्यात ( १७२० ) बाळापूरची जी लढाई झाली, तींत सय्यदांच्या विनंतीवरून खंडेरावास लढण्यासाठीं म्हणून छत्रपतींनी पाठविलें होतें. यानंतर फत्तेसिंग भोसल्याच्या अधिपत्याखालीं कर्नाटकांत ( १७२५–२६ ) झालेल्या स्वारीत खंडेराव हा हजर होता. बाळाजी विश्वनाथ व खंडेराव यांचें एकमत असे त्यामुळें बाळाजीपंतांनी ठरविलेल्या राज्यव्यवस्थेस अमलांत आणण्याचें लष्करी काम खंडेराव करी. महाराष्ट्राच्या उत्तर सरहद्दीवर राहून तो खानदेश, वऱ्हाड व गुजराथ या तिन्ही प्रांतावर नजर ठेवी. यापुढें तो वृद्ध झाल्यामुळें त्याचा मुलगा त्रिंबकराव मोहिमेवर निघूं लागला. खंडेरावानें वसई ते सुरतपर्यंतचें कोंकण काबीज केलें होतें. त्याच्याबद्दल ' बडे सरदार, मातबर, कामकरी हुषार होते ' असा उल्लेख आहे ( शाहु म. बखर ) शाहूछत्रपतींची मर्जी त्याच्यावर पुष्कळ होती तो एकदा पोटशुळानें आजारी पडला असता महाराजांनीं त्याचा समाचार मुद्दाम घेतला होता थोरले बाजीराव याच्या वेळीं खंडेराव वृद्ध झाल्यानें व खुद्द श्रीमंतांनीं सेनानायकाचें काम हातीं घेतल्यानें त्याची विशेषशी हकीकत आढळत नाहीं कदाचित खंडेराव मत्सरानें अलिप्त राहिला असावा. मात्र त्याबद्दल शाहुमहाराजानीं त्याला समजुतीचीं पत्रें अनेकदा पाठविलीं होतीं. अखेर १७२९ त खंडेराव मूतखड्याच्या विकारानें मरण पावला. इतिहासप्रसिद्ध उमाबाई दाभाडे ही याची बायको होय. याला त्रिंबकराव, यशवंतराव व बाबूराव असे तीन पुत्र होते [ शाहुमहाराज रोजनिशी; शाहु म. बखर, दाभाडे घराण्याचा इतिहास, मराठी रियासत म वि इति संग्रह. पेशवे दफ्तर ले २३ ]

**खंडेराव हरि**–हे महादजी शिंद्यांच्या प्रमुख सरदारांपैकीं एक होते यांचें आडनाव भालेराव असून याना खंडेराव आप्पा असेंहि म्हणत, त्यावरून इंग्रज लेखकानीं याना आप्पा खंडेराव असें नाव दिलेलें आहे. याचा उल्लेख स १७८० त आढळतो. त्या सालीं गोहदकरराणा, इंग्रज व महादजी शिंदे याच्यात जें युद्ध झालें त्यात खंडेराव हे शिंद्यातर्फे लढत होते या युद्धात गोहदकराचा जय होऊन त्यानं ग्वालेर किल्ला घेतल्यामुळें खंडेराव हे झांशीकाल्पीकडे मोहिमेस गेले. हें गोहदकराचें युद्ध तीन वर्षे चालू होतें *खंडेरावानीं पुष्कळ पराक्रमाचीं कामें केलीं*.पुढें १७८५ त पाटीलबावा दिल्लीच्या बादशहाच्या मदतीस गेले व त्यानीं त्याला आपले अंकित केले, या प्रसंगीं आग्र्याचा किल्ला घेण्याच्या कामीं रायाजी पाटलाबरोबर खंडेराव यानाहि पाठविलें होतें याच वर्षी दिल्लीस मराठ्यांचें वर्चस्व प्रथम स्थापित झालें होतें त्यामुळें त्या प्रसंगीं जीं अनेक राजकारणें व युद्धप्रसंग घडले त्यामध्यें अंबोजी इंगळे, रायाजी पाटील व खंडेराव यानीं महत्त्वाची कामगिरी केली यानंतर त्याना भेलसे प्रांताचे सुभेदार नेमून पुढें बुंदेलखंडात तेथील संस्थानिकाचा बंदोबस्त करण्याकरिता पाठविलें ( १७८६ ) या वेळीं पन्ना येथील राजा मेला असून त्याच्या पुत्रांत गादीबद्दल तंटे लागले होते, त्याचा फायदा घेऊन तेथील दिवाण बेणीहुजुरी यानें सर्व सत्ता बळकाविली होती. तेव्हा खंडेराव यानीं पन्न्यावर चाल केली. प्रथम बेणीनें खंडणी कबूल केली, परंतु पुढें त्यानें अटकळ केल्यामुळें खंडेरावानीं त्याचेवर हल्ला केला व शेवटीं तो पराभव पावून पळून गेला आणि सर्व लढाऊ सामानासह पन्न्याचा किल्ला खंडेरावाच्या हातीं लागला ही बातमी पाटीलबावामार्फत दिल्लीस बादशहास कळली असता. त्यानें पेशव्याना व पाटीलबावाना पोशाख पाठवून पाटीलबावाना नौबत वाजविण्याची परवानगी दिली. नंतर खंडेराव यानें कलिंजर किल्ला लढाई करून काबीज केला येथें पन्न्याच्या राजाचा दुसरा मुलगा राहात होता बाळाजी गोविंद बुंदेले यानीं मध्यस्थी करून ३५ लक्ष रुपये देऊन तह घडविला तेथून खंडेराव ओंडशास आले, आणि तेथील राजापासून दीडलाख रु खंडणी घेऊन पुढें दतियास आले येथील राजाकडे दोन लाख रुपये खंडणी द्यावी अगर सेवंढा किल्ला द्यावा अशी मागणी केली असता राजानें खंडणी कबूल केली पुढें १७८७ मध्यें जयपुरचा राजा प्रतापसिंग व महादजी

शिंदे यांची लढाई सुरू झाली. तेव्हां त्या लढाईंत राणेखान-भाई, अंबाजी इंगळे वगैरे सरदारांबरोबरच खंडेराव हेहि हजर होते या सालच्या अखेरीस खंडेराव हे ग्वाल्हेर, गोहद, भदावर वगैरे प्रांताचे कमावीसदार होते व त्याचे बद्दल त्यांनीं दहा लक्ष रुपये सरकारांत भरणा केला होता. दोन वर्षे खंडेराव ग्वाल्हेर प्रांतीं होते, पुढें सैन्याचा खर्च वाढल्यानें व रसदेचा भरणा वेळेवर होईनासा झाला होता म्हणून मध्यंतरीं त्यांचें व पाटीलबावांचें वितुष्ट आलें होतें. परंतु पैशाची व्यवस्था त्यांनीं लवकर केल्यानें तें नाहींसें झाले पुढें १७८७-८९ त गुलामकादरानें बंड मोडण्याचे कामीं खंडेरावांनीं पुष्कळ मेहनत केली व आग्र्याचा किल्ला काबीज केला या परिश्रमाबद्दल दिल्लीची बादशाही हस्तगत झाल्यावर पाटील बावांनीं त्याला रेवाडी प्रांतीं बावीस महा-लाची मानलन सांगितली. आणि १७९० त दिल्लीच्या किल्ले-दारीचीं वस्त्रें बादशहाकडून देवविलीं खंडेरावांनीं दिल्लीच्या किल्ल्याचा बंदोबस्त करून तेथें आपल्या पतीनें भवानी-कुंवर यास नेमलें यापुढील खंडेरावाचे बहुतेक पराक्रम व राजकारणें दिल्ली प्रांतांत घडून आलीं नर्जावखान या खाली मेल्यानंतर खंडेरावांनीं कानोडचा किल्ला काबीज केला त्याबद्दल बादशहानें त्याला पुष्कळ जडजवाहीर व वस्त्रें दिलीं खंडेरावांनीं कानोड येथें आपल्या जहागिरीचें मुख्य ठिकाण करून तेथून सर्व उलाढाली चालविल्या डी. बॉयन म्हणून एक फ्रेंच सेनापति, जो पुढें शिंद्याच्या लष्करांत प्रसिद्धीस आला, तो प्रथम खंडेरावाच्या पदरीं होता त्याच्याकडून त्यांनीं कवायती पायदळें करविलीं पुढें १७९३ त जॉर्ज टॉमस नावाचा एक युरेपियन त्यांनीं नोक-रीस ठेवला व त्याला खर्चाकरिता आपल्या जहागिरीप्रमाणें तिजारा, फिरोजपुर वगैरे गावें नेमून दिलीं त्याची जहागीर जी रेवाडीप्रांत त्याच्या रक्षणाच्या कामीं या सैन्याचा बराच उपयोग झाला पाटिलबावा १७९४ त मरण पावल्यानंतर दिल्लीप्रांताच्या बंदोबस्ताचें काम खंडेराव, डी. बॉइन, गोपाळराव भाऊ वगैरे सरदारावर पडलें पुढें या सर दारांत आपापसांत तंटे सुरू झाले त्यांत खंडेराव व जॉर्ज टॉम-सचें वाकडें आलें. टॉमस हा पुढें बराच प्र ब ळ होऊन त्यांनीं हांसर येथें स्वत ची जहागीर स्थापन केली खंडेरावांचे सोन-पत, पानपत व कर्नाळ हे तीन तालुके फौजेच्या खर्चा-करितां नवीन सोडून घेतले पुढें खंडेराव वृद्ध झाल्यामुळें त्याच्या हातून स्वाऱ्या शिकाऱ्या होईनातशा झाल्या शेवटीं प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें उदास होऊन त्यांनीं स १७९७ त यमुनेत जलसमाधि घेतली त्याना औरस पुत्र नसल्यानें, वामनराव नावाच्या पुतण्यास त्यांनीं दत्तक घेतलें परंतु तो तितका दूरदर्शी नसल्यामुळें शिंद्याच्या इतर सरदारांचें व त्याचें वांकडें आलें. याचें नांव १७९९ च्या जयपूरकरांच्या युद्धांत ऐकू येतें याच्या ताब्यात १८०३ पर्यंत ( सुर्जी अजनगांवचा तह ) कानोड, इस्माइल-पुर कोटपुतळी, बिजवाडा वगैरे प्रांत होते, परंतु वरील तहान्वयें त्यांचें स्वामित्व इंग्रजाकडे आलें आणि त्यापुढें कानोडच्या जहागिरीचें नाव देखील ऐकूं येईनासें झालें [ इतिहास संग्रह पु. ८ अं १०. ११ १२ ]

**खंडेराव होळकर**—मल्हाराव होळकराचा मुलगा व अहिल्याबाईचा पति याचा जन्म १७२३ त झाला होता इ स १७५४ त राघोबा दादा यांनीं अजमेर-कडे मोहीम केली त्यांत खंडेराव हजर होता सुरजमल जाट ठरलेली खंडणी देईना म्हणून त्याच्या कुंभेरीस मरा-ठ्यांनीं वेढा दिला ( १७५४ जाने ) हा वेढा चार महिने चालू होता दीड महिना झाल्यावर एके दिवशीं भोजन करून बेसावधपणें मोर्चांत निशाणापाशीं येऊन उभा राहिला असता किल्ल्यांतून जाटाकडील जेजालाची गोळी एका-एकीं हाताला लागून ठार झाला मल्हाररावास फार दु ख झालें दादासाहेबांनीं उत्तरक्रियेकरिता १० हजार रु सरकारांतून लगेच दिले रागानें मल्हाररावानें सुरजम-लाच्या वधाची व कुंभेरीच्या किल्ला पाडून टाकण्याची प्रतिज्ञा केली होती, परंतु माद्रानें सल्ला केल्यानें ती शेवटास गेली नाहीं [ म रियासत. मध्य विभाग, पुरुषोत्तम अहिल्याबाई चरित्र ]

**खंडेलवाल**—एक ब्राह्मण जात याची वस्ती राज-पुतान्यात सर्वांत जास्त आहे शेखावटीच्या सीमेवर अस-लेल्या जयपूर प्रांतातील खंडेला शहरावरून याचें नांव पडलें आदिगौड अथवा उच्च वर्गाचे गौड ब्राह्मण याची आपण एक शाखा आहों असें ते प्रतिपादन करतात

२ या शिवाय खंडेलवाल म्हणून बनियाची एक पोटजात असून तिच्या हिंदु व जैन अशा दोन शाखा आहेत वरील खंडेला शहरावरूनच त्याचेंहि नाव खंडेलवाल असें पडलें आहे बरेचसे प्रसिद्ध मथुराशेट याच जातीचे आहेत त्याची एकंदर ७२ गोत्रें असून ती काहीं इतर जातीवरून, काहीं स्थानिक नावांवरून व काहीं धंद्यावरून बनलीं आहेत या जातींत पुनर्विवाहास परवानगी नसते

हे लोक साधारणत वैष्णवपंथाचे असून त्याचे गुरुघराणें म्हणजे जयपूरचे साधुवारा होय गौड ब्राह्मण हे त्याचे उपाध्ये असतात त्याच्या २४ व १३ अशा कुलदेवता आहेत त्यांना मिठाई, माळा वगैरे अर्पण करून होमहि करण्यांत येतो यावन, नागिन, बाबुरी, जियान, आतन्, कलयाणी, मुक्ता, सकाइमाता, ताबी, लोहा, झलाइ अशा एकंदर ११ देवताची नावें मिर्झापुर येथें असलेलीं आढळतात

या जातींत मद्यमांसाची मनाई आहे स्वजातीच्या व गौड ब्राह्मणाच्या हातची कच्ची रसोई ते खाऊ शकतात अगरवाला, ओसवाला व महेश्वरी बनिया यांनीं तयार केलेली पक्की रसोई ते खातात

१९११ सालीं खंडेलवालांची संख्या एकंदर ८२४१४ होती, पैकीं ७१८७० हिंदू व १०५४४ जैन होते [ क्रूक ].

**खंडेला**—राजपुताना. जयपुरसंस्थान, तोरावटी निझामतींतील खंडेला जहागिरीचें मुख्य ठिकाण. जयपुरापासून हें ५५ मैल दूर आहे. लो. सं. (१९११) ५३५६, लाखेचे जिन्नस व खेळणीं याबद्दल खंडेला प्रसिद्ध आहे येथें एक किल्ला आहे खंडेला जहागीर दोन राजाच्या मालकीची असून जयपुर दरबाराला ७२५१० रुपये खंडणी द्यावी लागते.

**खंडोजी माणकर**—हा सरवलीचा रहाणारा असून फिरंग्याशीं १७३७ ते ४० पर्यंत मराठ्याच्या ज्या लढाया झाल्या त्यात एक प्रमुख लढवय्या होता. मानाजी व संभाजी आंग्रे याच्या भांडणात पेशव्यानीं शंकराजी फडक्याबरोबर यास मानाजीच्या मदतीस पाठविलें होतें साष्टीबेट काबीज करण्याच्या कामीं खंडोजीनें बरीच मेहनत केली पटवर्धन, जोशी व खंडोजी यानीं रात्रीचे चोरून छापे घालून ठाण्याचा किल्ला काबीज केला (२७।३।३७). त्या वेळीं तेथील किल्लेदारी खंडोजीकडेच सोपविण्यात आली पुढें वसईच्या मोहिमेच्या वेळीं खंडोजीनें वादरे, वेसावें व धारावी वगैरे ठिकाणें हस्तगत केलीं (फेब्रु. १७३९) वसई पाडाव करताना खंडोजीनें वेष पालटून गुराखी म्हणून किल्ल्यात नोकरी धरून भेद काढला होता. याचे वंशज कुलाबा जिल्ह्यात माणगाव तालुक्यात सरवलीस रहातात, त्याना सरवली वगैरे गावें इनाम आहेत [ पेशव्यांची बखर; म. रियासत, मध्यविभाग ]

**खंडो बल्लाळ**—खंडो बल्लाळ हा शिवाजीचा आवडता व विश्वासू चिटणीस बाळाजी आवजी याचा दुसरा मुलगा होय. (बाळाजी आवजी पहा) याचा जन्म इ. स. १६६६ च्या सुमारास झाला असावा. खंडोबास घोड्यावर बसणें, तरवार मारणें व अक्षराचें वळण उत्तम वळवणें इत्यादि तत्कालीन उपयुक्त असें शिक्षण मिळालें होतें. खंडोबल्लाळाचा बांधा मजबूत असून हा अंगानेंहि धिप्पाड होता.

शिवाजी महाराजाच्या मृत्यूनंतर जो शिवशाहींत सोयराबाईच्या कारस्थानानें घोंटाळा माजला त्यात संभाजी राजे याना कोणी गैरवाका समजाविल्यामुळें बाळाजी आवजीवर त्याची इतराजी झाली व त्याचा फायदा घेऊन कलुशानें बाळाजी आवजी व त्याचे बंधू शामजी बाळा व वडील चिरंजीव आवजी यास इ स. १६८१ च्या आगष्ट महिन्यात परळीखालीं उरमोडीच्या काठीं मारिलें व खंडो बल्लाळ व निळोबल्लाळ यास व्याघ्राकडून खावविण्यासाठीं म्हणून साताऱ्याजवळील 'अजिमतारा' गडावर नेऊन सदरेस उभे केलें. परंतु इतक्यात कांहीं राजकारण आलें म्हणून क्वजी बाबाची मजालस उठली व या दोन लहान मुलाना शिक्षा सांगण्याचें काम तहकूब राहिलें. या वेळीं संभाजी महाराजाबरोबर येसूबाईहि साताऱ्याचे मुक्कामीं होती. तिला जेव्हा बाळाजीच्या वधाची वगैरे ही हकीकत समजली तेव्हा तिनें संभाजाची चांगलीच कानउघाडणी केली, व संभाजीलाहि झाल्या गोष्टीबद्दल फार पश्चात्ताप झाला तेव्हा खंडोबल्लाळ व निळोबल्लाळ यास येसूबाईनें सोडवून त्याना व त्याचे मातुश्रीला दिलदिलासा देऊन आपल्या जवळ ठेऊन घेतलें. व विसाजी शंकर राजापूरकर, बाळाजी आवजीचे मामा व लक्ष्मण आत्माजी व इतर कारकून पूर्वीपार होते त्यापासून चिटणीसाचें कामकाज संभाजी घेऊं लागले. परंतु यापूर्वीच कलुशानें बाळाजीची चीजवस्त उडून गाव इनाम जप्त करण्याचे हुकूम दिले होते. ते सोडवून घेण्याचें तसेंच राहिलें. येसूबाईनें या दोन मुलाना आपल्या जवळ ठेऊन घेतलें व त्याच्या खर्चालाहि आपल्या खर्चांतून देऊं लागली. तिनें खंडो बल्लाळाला धीर देऊन त्याच्याकडून कामकाज घेऊन संभाजीच्या नजरेस खंडो बल्लाळ येईल असें करूं लागली. तथापि संभाजीच्या हाताखालीं काम करणें बरेंच धोक्याचें होतें. यापुढें संभाजीनें चौलास वेढा दिला व गोवेकरावर स्वारी केली त्यावेळीं खंडो बल्लाळ जवळ होते, व त्यास पुष्कळ श्रम व साहस करावें लागलें.

"एका गावास कौल लिहून द्यावयास सांगितला तो तरी धावता लिहिता नये म्हणून मार्गी बसोन कागद लिहिला. तो तीन चार कोश स्वारी गेली. निःसंग धावोन स्वारी आटोपिली कागद वाचोन दाखवून पालखीत सिके होते. राजश्रींनीं सिका केला. कागद जावकरी यांचे हातावर देताच आपास कलमल येऊन रगत वमन जालें. राजश्रींनीं मार्गे फिरोन दृष्टीस पडिल्यावरी पालखी उभी करून जवळ बोलाऊन नेलें आणि मेहेरबान होऊन बारीचा कोतवालपैकीं घोडा बसावयास दिला. पुढें राजश्रींनीं कुंभारजुवेंवर हल्ला केला व फिरंग्याची व संभाजीची लढाई झाली त्यात राजश्रीचे पुढें चहू हातावर आपाचा घोडा, केव्हां राजश्रीचे घोड्याचे सोंड आपाच्या घोड्याचे दाढीस" अशा तऱ्हेनें खंडोजीची निष्ठा व कामगिरी पाहून संभाजीनें परत रायगडी आल्यावर इ. स. १६८३ च्या डिसेंबर महिन्याच्या अखेरीस चिटनिसीचीं वस्त्रें वगैरे मान देऊन चिटनीसी त्याचे हातें घेऊं लागले. व यामुळें कलुशाच्या कारभाराला आळा बसला. याप्रमाणें कारभार चालत आहे तोंच इ. स. १६८८ च्या नोव्हेंबरात संभाजी कलुशाच्या मदतीस गेला व संगमेश्वरीं शिकारीचा मोड करून खेळण्यास जाऊन राहिला. कबिला बरोबर होता तो पुढें रवाना करून संभाजी संगमेश्वरास एक दिवस मुक्काम करून राहिला. येथें शेख निजाम उर्फ तकरीबखान यानें त्यास अचानक पकडलें. हें वर्तमान कबिल्याबरोबर असणाऱ्या खंडोजीस कळताच त्यानें येसूबाईच्या मेण्यात आपली मावसबहीण संतुबाई इला ठेऊन आपण व संताजी घोरपडे येसूबाई व शिवाजी याना घेऊन जलदीनें मजलीवर मजली मारीत रायगडास येऊन पोहोंचले. इतक्यात मोंगलानीं हा कबिला पकडला व 'संतुबाईला' येसूबाई म्हणून पकडून नेली तिनें खंडोजीनें दिलेली हिरकणी खाऊन प्राण दिला असें म्हणतात. पुढें राजारामाबरोबर चंदीस गेलेल्या मंडळींत खंडो बल्लाळहि होता व त्या

सर्व मंडळींस त्या प्रवासांत अनेक संकटें व हाल सोसावे लागले एक प्रसंगीं त्यांच्या मुलास ( बहिरोजीस ) त्याज बद्दल कैदेंत रहावें लागलें व पुढें घाटविल्यामुळें त्यानें आत्महत्या केली एका प्रसंगी त्यास तटावरून उडी टाकावी लागल्यामुळें त्याचा पाय कायमचा अधु झाला

झुल्फिकारखानानें चंदीस वेढा घातला असता राजारामास तेथून काढून लावण्याच्या कामीं खंडो बल्लाळानें शिर्के मोहिते यांजबरोबर कारस्थान केलें व त्या कामी त्यास दाभोळी व कुचरी गांवचा आपली सरदेशमुखीचीं वतनें सोडावीं लागलीं नंतर ही चंदीहून निघालेली मंडळी कांहीं काल कर्नाटकांत गनिमी लढाया करीत राहून पन्हाळा व विशाळगडीं येऊन राहिली व तेथून पुढील कार्यक्रम चालू केला इतक्यात राजाराम महाराज निवर्तले त्यावेळीं राजारामानें शाहूवरच लक्ष ठेवून आजपर्यंत ज्याप्रमाणें कारभार केला तसाच करावा असें सांगून आणाभाका घेतल्या परंतु ताराबाईनें तें न ऐकतां शिवाजीस गादीवर बसविलें त्यामुळें व इतर कारणामुळें खंडोजी व ताराबाईचें पटलें नाहीं

" राजश्री चंदीस असतां, राजश्रींच व आप्पांचा दणानुबंध चांगलाच पडला नित्य प्रहरा दिवसात भोजन करून जावें, तें राजश्रींनीं निद्रा केलियावरी मध्यरात्रीस घरास जावें कारभार व वाडियात जाणें येणें खेळणें, राजवाडियातील कजिया खोकला जाहला तरी समजाविशी आप्पाशिवाय होत नव्हती कोण येके गोष्टींचा पडदा नव्हता आठाचों दिवसी अंगावरील पोशाख आप्पास द्यावे ' तेंच ताराबाईच अमलांत बोलावल्यास जावें, विचारल्यास उत्तर द्यावें, असें होत होतें इतक्यात शाहु महाराज सुटून आले खंडोजीचा ओढा पहिल्यापासून येसूबाई व तिच्या मुलाकडे असणें साहजीक होतें संताजी घोरपडे याच्याशीं खंडोबाचा अति स्नेह होता तेव्हां खंडोबा व संताजी घोरपडे यांनी शाहूला राज्यांत आणण्यात जितकी कष्ट मेहनत करवली तितकी केली ताराबाईचा रखडा पाठीशीं होता परंतु त्याला या कार्यकुशल माणसांनीं दाद न देतां लटकीच लढाई केलीशी दाखवून शाहूला राज्यांत आणलें ताराबाई व राजसबाई यांच्यातील वैमनस्याचाहि फायदा यांना चांगलाच घेतां आला शाहूची स्थापना राज्यावर केल्यानंतर रामचंद्रपंत व शंकराजीपंत सचीव हे ताराबाईकडे गेले व प्रल्हाद निराजीचा अंत आधींच झाला होता त्यामुळें खंडोबा याच्याच तंत्रानें सर्व कारभार होऊं लागला ताराबाईच्या अमदानीपासून खंडोबा हा संताजीबरोबर लढाईवर जात असे व जी कांहीं प्राप्ति होत असे, त्यांतील पांचोत्रा खंडोबास मिळे शाहूच्या अमदानींत तर कोणचीहि गोष्ट खंडोबास नापसंत असेल तर ती करूं देत नसत एकदा परशुरामपंतास त्याचे हातावर लक्ष ठेवून त्यावर माड बसवून त्यांना मारण्याचा हुकूम शाहूनें दिला, ही बातमी खंडोबास कळतांच खंडोबानें त्या माडास ओढून काढून पंतास सोडविलें बाळाजी विश्वनाथाचा व खंडोबाचा विशेष लोभ होता आणि खंडोबाच्या उत्तर वयांत बाळाजीनें सर्व तोल सांभाळला खंडो बल्लाळ शके १६४८ अश्विन शु ५ स वारला

चिटणिसी वतन खंडोबाकडे आलें होतें परंतु तें चालविण्यास जीं गांवें दिलीं होतीं, तीं त्याच्याकडे शेवटपर्यंत चालली नाहींत संभाजीच्या वेळीं तर इनामती उजू होणें शक्य नव्हतें, आणि संभाजीनंतर राजाराम चंदीस जाऊन पडल्यामुळें पैसा कोठूनहि मिळेनासा झाला त्यामुळें खंडोबा नेहमीं कर्जबाजारी राहून त्याच्या घरीं नेहमीं सावकारी धरणीं बसलेलीं असत खंडोबाचा भाऊ निळोबा हाच घरचा कारभार पाहत असे परंतु तो भयंकर उधळ्या असे त्याला कधीं खर्चाबद्दल बोलल्यास तो आम्हाला ब्राह्मणी वेष नको म्हणून बदलीवर येई म्हणून खंडोबानें त्याच्या जवळ खर्चाबद्दल बोलणें सोडून दिलें होतें खंडोबाची प्राप्ति म्हणजे पूर्वी येसूबाईकडून मिळालेला व नंतर राजारामाकडून मिळालेला ऐवज हीच होती खंडोबा घराच्या व्यवस्थेकडे कधींच पहात नसे त्याच्या पहिल्या बायकोचें नाव म्हाळसाबाई असून तिला बहिरवजी नावाचा पुत्र व पुतळाबाई नावाची कन्या होती ही बायको चंदीस गेल्यानंतर एक वर्षाच्या आंत वारली म्हणून दुसरें लग्न केलें तिचेंहि नाव म्हाळसाबाई असेंच होतें ती किंचित कुरूप होती म्हणून राजाराम महाराजांनीं तिसरें लग्न करून दिलें तिचें नाव तुळजाबाई असें होतें दुसऱ्या म्हाळसाबाईला जिवाजी, बापूजी, गोविंदराव व सदाशिव हे चार पुत्र व बायजाबाई ही कन्या होती तुळजाबाईस एक पुत्र व सात कन्या अशीं आठ अपत्यें झालीं मुलाचें नाव भैरवजी व मुलींचीं सखु, आमा, अनु, सुंदरा तुकाबाई, राणू आणि येसू अशीं होतीं

चंदाहून निघताना खंडोबा खासाच निघाला होता गणोजी शिर्क्यानें त्याचा कबिला पोहोंचता करावयाचा परंतु निळो बल्लाळान जर खंडोबाचा सर्वच कबिला येथून गेला तर आमची वाट काय म्हणून हट्ट धरला तेव्हां म्हाळसाबाई व तिचीं मुलें मात्र ती गणोजानें पोहोंचविलीं नंतर बिलेदाराची सरसबाई हिला मूल नव्हतें म्हणून पुतळाबाईची तीन वर्षांची एक कन्या ठेवून घेऊन तिची सुटका केली खंडोबानंतर जिवाजी खंडरावास चिटणिसी दिली [ लेखक—वा सी बेंद्रे ]

**खंडोबा**—एक अर्वाचीन ज्ञातिविशिष्ट देवता खंडोबा उर्फ मल्हारी मार्तंड किंवा मार्तंड भैरव हा बहुधा सर्व देशस्थांचा कुलस्वामी असतो दक्षिणेंत जेजुरीस याचें प्रसिद्ध स्थान आहे त्याचें माहात्म्य जयाद्रि माहात्म्यांत वर्णिलें आहे देशस्थांप्रमाणें रामोशी धनगर हे खंडोबाचे उपासक असतात खंडोबा देव बनण्यापूर्वी लिंगायत वाणी होता असें रामोशी समजतात त्याला दोन बायका एक वाणी

व दुसरी धनगर जातीची असून ह्यासमवेत तो घोड्यावर बसलेला असतो, हातात तलवार असते. वनस्पतिवर्गांत भंडारत खंडोबाचें अस्तित्व आहे असें समजून भंडार पवित्र मानण्यात येतो. रामोशी तर भंडाराची शपथ वहातात. प्राणीवर्गात कुत्र्याच्या रूपात खंडोबा वास करितो. घरातून खंडोबाच्या धातूच्या मूर्ती असतात. कोणी मूलबाळ होण्याकरिता खंडोबास नवस करितात व मूल झालें म्हणजे ते त्याच्या पायावर घालतात मुलगा असल्यास वाघ्या बनतो व मुलगी असल्यास मुरळी होते. अशा वाघ्यामुरळ्या महाराष्ट्रात पुष्कळ ठिकाणी आढळतात. भक्ताच्या कपाळी भंडार लावून हे पैसे मागतात व *अनाचारात आयुष्य कंठितात.* [ *मुरळी, देवदासी* पहा ]. हेमचंद्र हरस्कंदौ या संस्कृत द्विवचनाचें हरखंडा असें प्राकृत रूप देतो खंडा हें अनेकवचन आहे. *प्राकृतात प्रायः द्विवचन नाहीं. तात्पर्य स्कंद या संस्कृत* शब्दाचें प्राकृत रूप खंड असें होतें. त्याचें ममतादर्शक मराठी रूप खंडू व प्राशस्त्यदर्शक मराठी रुप खंडोबा. म्हणजे महाराष्ट्रात जेजूरी, पाली वगैरे ठिकाणचे जे खंडोबा आहेत ते मूळचे स्कंद होत स्कंद म्हणजे कार्तिकस्वामी. कार्तिकस्वा*मीचें देऊळ पुण्याच्या पर्वतीस आहे. तें स्कंदाचें म्हणजे* खंडोबाचेंच होय. इतकेंच की पर्वतीवरच्या त्या देवाचें नाव संस्कृत आहे व जेजूरीच्या देवाचें नाव प्राकृत आहे. स्कंद ही देवता वीरांची व योध्याची फार पूर्वीपासून आहे. स्कंदाला सेनानी हें अपरनाम आहे. त्याची उपासना वीर करतात. *महाराष्ट्रातील सर्व जातीचे मराठे (ब्राह्मण, क्षत्रिय* वैश्य शूद्र, रामोशी वगैरे) खंडोबा हें आपलें कुलदैवत का समजतात हें वरील उद्‌घाटनावरून समजणार आहे. खंडोबा हें शिवदैवत आहे असें कित्येक समजतात, तें अर्थात् निराधार आहे. स्कंदपुराणात स्कंदोपासकांची म्हणजे खंडोबाच्या उपासकाची माहिती सापडते ( भारत इ. संशोधक *मंडळ* १८३२).

**खतें**—जो जिन्नस जमिनींत घातला असता तींत पोषक द्रव्याची वाढ होते, त्याला खत असें म्हणतात. खत व पाणी या दोहोंची पिकाचें उत्पन्न वाढण्यास जरूरी आहे. व हीं दोन्ही एकमेकावर अवलंबून आहेत. ज्या *ठिकाणीं* पुष्कळ व पुरेसा पाऊस पडतो त्याठिकाणीं फक्त खताचाच विचार केला पाहिजे; व ज्या ठिकाणीं नवीन जमीन काढिली असेल किंवा ज्या *ठिकाणीं* दरवर्षी गाळ येऊन बसत असेल तेथें फक्त पाण्याचाच विचार केला पाहिजे. पण असा जोड क्वचितच आढळून येतो खताचा *विचार करण्यापूर्वी झाडाचें अन्न कोणतें व तें कोठून येतें* याचा विचार करणें जरूरीचें आहे सतराव्या शतकाच्या अखेरपावेतों पोषक द्रव्यें झाडास वातावरणातून अगर जमिनींतून मिळतात असा समज होता. व्हानहेलमाँट हे सतराव्या शतकाच्या सुरवातीस झाडांचे सर्व घटक हे पाण्यातून मिळतात असें म्हणत होते. इ. स. १६६० या वर्षी सर केनेलडिग्बी यानीं आपल्या पुस्तकात असें प्रतिपादिलें आहे कीं, झाडाची वाढ ही सर्वस्वीं हवेंतील बाल्सम् नामक पदार्थावर अवलंबून असते, झाडाचा परेनाईटपणा व मरण हीं त्या पदार्थावर अवलंबून आहेत. पुढें इ. स. १७३० साली जेथ्रोटल् यानीं असा शोध लावला कीं झाडाचीं मुळें जमिनीचे कण खातात व जमिनीची जास्त मशागत करून जितके ते बारीक करावे तितकीं तीं झाडें जास्त जोरानें वाढतात, म्हणून टल्नी घोड्याच्या सहाय्यानें कोळपणी यावर एक पुस्तक लिहिलें त्यांत ते असें प्रतिपादूं लागले कीं जमिनीची मशागत चागली केल्यास *जमीन खतविण्याची किंवा पिकात फेरपालट* करण्याची मुळींच जरूरी नाहीं. त्याची अशी समजूत होती कीं, जमिनींत खत घातलें म्हणजे तीं पिकत ( कुजत ) असता *त्याचा परिणाम जमिनीवर होऊन तिचे कण बारीक* होतात. पुढें १७२० ते १८०९ पावेतों जास्त शोध लागत चालले. बोनेट व जेन सेनीबायर-स्वित्झर्लंडमधील शास्त्रज्ञ यानीं असा शोध लावला *कीं, झाडाच्या अंगीं हवेंतील* कॅर्बॉनिक् ॲसिड् गॅस घेऊन—उन्हाचे वेळीं कॉर्बन् ठेऊन *ऑक्सिजन वायु बाहेर सोडून देण्याची* शक्ति आहे. इ. स. १८०४ साली डी. सासुरे शेतकीरसायनशास्त्रवेत्ते यानीं झाडांतील खनिज द्रव्याचा शोध लाविला. फ्रान्स देशातील शास्त्रज्ञानीं झाडाना खनिज द्रव्याची फारच जरूरी आहे व हीं जर नसतील तर झाडें वाढावयाचीं नाहींत असें सिद्ध *केलें; व पोषक द्रव्याचा बराच मोठा भाग हवा व पाणी* यातून मिळत असून खनिजद्रव्यें मात्र जमिनींतून मिळतात असें ठरविलें.

इ. स. १८०२ ते १८१२ पावेतों सर हंफ्रे डेव्ही रसायनशास्त्रज्ञ यानीं व्याख्यानद्वारा असें प्रतिपादिलें कीं, झाडात सापडणारे पदार्थ *जमीन, वातावरण व पाणी* यातून मिळतात; व या तिन्ही तत्वाचा बारकाईनें विचार ( शोध ) केला म्हणजे झाडाचें अन्न कोठून मिळतें, तें कसें तयार होतें व त झाडास कसें जातें हें सर्व कळून येईल *ते म्हणतात कीं, प्राणिजन्य, व वनस्पतिजन्य पदार्थ* जे जमिनींत सापडतात ते व पाणी हेंच झाडाचें खरें अन्न होय. जमिनीचे कण पाणी राखून ठेवण्यास उपयोगी पडतात व तें पाणी तेथून *झाडाच्या मुळास जसजसें लागेल तसतसें* मिळत जातें इ.स.१८३४ साली बॉसिंग्‌ल्टा या फ्रेंच रसायनशास्त्रज्ञानीं आपल्या शेतीवर रासायनिक व शेतकीचे प्रयोग सुरु केले; व शेतकी क्रिया व शास्त्र या दोहोंतील प्रयोग *बरोबरीनें करण्यास सुरवात* झाली. पुढें सर जोसलेन लॉज यानें राद्देमस्टेड् येथें प्रयोगक्षेत्र काढिलें व तें अद्यापि चालू आहे. इ. स १८४० साली लीबीग यानें शेतकी रसायनशास्त्र या विषयावर ब्रिटिश संस्थेकडे एक रिपोर्ट पाठविला, त्यात त्यानें आपल्या बऱ्याच गोष्टींचा उहापोह केला आहे